# लोकशाहीर अण्णा भाऊ साठे
# निवडक वाङ्मय

संपादक मंडळ

**अर्जुन डांगळे**, निमंत्रक
**नीला उपाध्ये**, उपाध्यक्ष
**वसुंधरा पेंडसे-नाईक**
**डॉ. सुभाष सावरकर**




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ
मुंबई

प्रथमावृत्ती : अण्णा भाऊ साठे जयंती,
१ ऑगस्ट १९९८

मूल्य : ७५ रुपये



मुखपृष्ठ : प्रकाश विश्वासराव

प्रकाशक :
सचिव,
महाराष्ट्र राज्य साहित्य
आणि संस्कृती मंडळ
नवीन प्रशासकीय इमारत
मुंबई - ४०० ०३२



मुद्रक :
लोकवाङ्मय गृह
भूपेश गुप्ता भवन
८५, सयानी रोड
प्रभादेवी
मुंबई - ४०० ०२५

# अनुक्रमणिका

## भाग ३



## कादंबरी

## परिशिष्टे





# निवेदन

प्रतिभेला रंग, रूप, वर्ण, वंश, जातपात वा लिंगभेद ह्यांची कुंपणे नसतात. ती स्फुरते कुणाही सहृदयाला, अनुभूतिपूत अस्वस्थ आत्म्याला. प्रतिभेचे आजच्या औपचारिक शिक्षणावाचून तरी कुठे अडते? विश्वाच्या शाळेतील उघड्या डोळ्यांनी पाहिलेल्या व्यवहारातून शिकलेले पाठच तिला भावतात, पावतात.

शाहीर अण्णा भाऊ साठे हे वरील निकषांचे जागते उदाहरण होय. ते जसे जगले, त्याला जागले. ते लिहायला लागले आणि लिहीतच राहिले. साहित्यात त्यांनी आपले आगळे स्थान मिळवले. अण्णा भाऊंचे सगळेच साहित्य मोलाचे. जीवनाला उपयोगाचे. नव्या पिढीला प्रेरक ठरायचे. पण प्रचंड व्यासाचे. बरे ते इतर प्रकाशकांनी पुन:पुन्हा जनतेसमोर आणलेले.

म्हणूनच अण्णा भाऊंचे आगळेपण सिद्ध करणारे निवडक साहित्य व त्याबाबतचे काही विचक्षण आलेख प्रसिद्ध करून त्यांचे आंशिक ऋण फेडण्याचा महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाचा हा एक अल्प प्रयत्न.

संपादक मंडळाचे अथक परिश्रम, मंडळाचे सचिव श्री. चंद्रकांत वडे व मुद्रक लोकवाङ्मय गृह, मुंबई ह्यांनी घेतलेले कष्ट, ह्या पुस्तकाचे सौंदर्य परिपुष्ट करायला कारणीभूत आहेत. ह्या सर्वांचे मी आभार मानतो. जनतेला हा प्रयत्न आवडेल ह्यात संशय नाही.

मधुकर आष्टीकर
अध्यक्ष
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ

दिनांक : ११ मार्च १९९८

# संपादकीय

'लोकशाहीर अण्णा भाऊ साठे : निवडक वाङ्मय' ह्या 'महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळा'च्या वतीने प्रकाशित होणाऱ्या ग्रंथाला संपादक मंडळाचा निमंत्रक या नात्याने संपादकीय लिहिताना अतिशय आनंद होत आहे.

अण्णा भाऊंच्या वाङ्मयाचे मूल्यमापन करणारे खूप लिखाण अलीकडे झालेले आहे. पण वाटेगावहून पायी चालत मुंबईत आल्यानंतर कष्टाची कामे करणारे; शिक्षणाची, ज्ञानाची परंपरा नसलेले अण्णा भाऊ हे मराठीतील प्रतिभावंत शाहीर, लेखक म्हणून प्रसिद्धीला आले. ते कम्युनिस्ट चळवळीकडे कसे आकर्षित झाले, याचा शोध घेणे मला आवश्यक वाटते.

वाटेगावहून मुंबईत आल्यानंतर ज्या माटुंगा लेबर कॅम्पमध्ये अण्णा भाऊ आले; जिथे त्यांच्या प्रतिभेला आकार मिळाला; वैचारिक, तात्त्विक बैठक मिळाली त्याच लेबर कॅम्पमध्ये माझाही जन्म झाला. मी तिथे वाढलो. लहानपणी लेबर कॅम्पात पाहिलेले अण्णा भाऊ, त्यांचे पाहिलेले तमाशे, ऐकलेले पोवाडे हे पुसटसे आठवत होते. संयुक्त महाराष्ट्राच्या आंदोलनकाळात अण्णा भाऊ, अमर शेख, गव्हाणकर यांनी जे महाराष्ट्रात वादळ उठविले होते, ते अधिक स्पष्ट आठवत होते. अण्णा भाऊंना पुढे मान्यता मिळाली. कथाकार, कादंबरीकार म्हणून त्यांनी स्वतःचे कसे स्थान निर्माण केले, हेही मी अभ्यासले आहे. पण माझ्या मनात सतत जो प्रश्न होता, तो म्हणजे अण्णा भाऊ ज्या लेबर कॅम्पात वाढले ते त्यांचे वय संस्कारक्षम होते. अण्णा भाऊंजवळ मुळातच असलेली प्रतिभा बहरली, फुलली, तिला आकार आला. वैचारिक अधिष्ठान प्राप्त झाले. यामागचा इतिहास आणि वस्तुस्थितीचा शोध घेण्याचा प्रयत्न कुणी केला नाही. हा प्रयत्न करणे किंवा शोध घेणे हे मला आवश्यक कां वाटते, याची कारणे म्हणजे अण्णा भाऊ हे अस्पृश्य मांग जातीत जन्मलेले! कुठचीही ज्ञानाची, शिक्षणाची परंपरा इथल्या समाजव्यवस्थेने त्यांना लाभू दिली नाही. त्यामुळे जाडजूड ग्रंथांचे वाचन करून अण्णा भाऊंना वैचारिक बांधिलकी निर्माण करणे शक्य नव्हते. त्यावेळी अण्णा भाऊ जेमतेम मराठी वाचू शकत होते. घराण्याचा वैचारिक वारसा मिळणे शक्यच नव्हते. वारसा मिळाला, पण तो कष्टाचा, दारिद्र्याचा आणि 'महारा-मांगाची कला' म्हणून जिच्याकडे पाहण्यात आले, त्या ढोलकी-तुणतुणे आणि तमाशाचा.

ह्या सगळ्या संदर्भाच्या पार्श्वभूमीवर अण्णा भाऊंनी जी प्रतिभेची झेप घेतली, जी

वैचारिक मार्क्सवादी बांधिलकी स्वीकारली त्या गोष्टीचा शोध घेण्यासाठी मी अनेकांशी चर्चा केली. विशेषत: माटुंगा लेबर कॅम्पमधील कम्युनिस्ट पक्षाचे ज्येष्ठ कार्यकर्ते कॉ. हरी जाधव व त्याच लेबर कॅम्पात वाढलेले थोर विचारवंत आणि साहित्यिक बाबुराव बागूल त्यांनी यासंबंधीची वस्तुस्थिती सांगितली. तसेच माझ्या आईवडिलांनी अण्णा भाऊंच्या व कम्युनिस्ट चळवळीच्या ज्या आठवणी सांगितल्या त्या आधारे वाटेगाववरून पायी चालत आलेला आणि पोटासाठी लेबर कॅम्पातील झोपडपट्टीत स्थायिक झालेला मांग समाजातील तरुण ते मार्क्सवादी बांधिलकी स्वीकारून महाराष्ट्राच्या सांस्कृतिक आणि साहित्यिक क्षेत्रात तेजाने तळपणारे अण्णा भाऊ ह्यामधील काळ बराच अज्ञात राहिलेला आहे, त्याची सांगड घालून तो मी पुढीलप्रमाणे मांडीत आहे :

ज्या माटुंगा लेबर कॅम्पमध्ये अण्णा भाऊ वाढले, ते आजचे लोकमान्य टिळक हॉस्पिटल आहे, तिथे ही वस्ती होती. तिथे कम्युनिस्ट पक्षाचे 'स्टडी सर्कल' चालत असे. कॉ. के. एम. साळवी, कॉ. शंकर नारायण पगारे, कॉ. आर. बी. मोरे, कॉ. विश्राम गांगुर्डे, कॉ. तुकाराम सरतापे ही त्यातली काही प्रमुख नावे होती. ती वस्ती १९३६ साली तिथून उठवून आजचे लेबर कॅम्प आहे, तिथे वसवली. ह्या लेबर कॅम्पाची त्यावेळची सामाजिक व राजकीय जडणघडण लक्षात घेणे आवश्यक आहे. बहुतांशी महार समाजातील मंडळी—विशेषत: नाशिक, सातारा, सांगली, नगर या जिल्ह्यांतून येऊन स्थायिक झालेली—बहुतेक गिरण्यांत, गोदीत, म्युनिसिपालिटीत नोकरीला होती. त्या वेळी इथे दोनच राजकीय पक्ष प्रामुख्याने होते. एक म्हणजे, डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा 'शेड्यूल्ड कास्ट फेडरेशन' आणि दुसरा कम्युनिस्ट पक्ष होय. त्यावेळी बाबासाहेबांचा संपूर्ण दलित समाजावर—विशेषत: महार समाजावर—प्रचंड प्रभाव असताना त्यावेळी महार समाजातील अनेक कार्यकर्ते हे कम्युनिस्ट चळवळीत होते. कम्युनिस्ट पक्षाचे सभासद होते. ह्या संबंधी खूप लिहिण्यासारखे आहे. पण इथे ते शक्य नाही.

ह्या माटुंगा लेबर कॅम्पच्या नाक्यावर इराण्याचे 'लेबर रेस्टॉरंट' नावाचे हॉटेल आहे. ह्या 'लेबर रेस्टारंट'चा परिसर म्हणजे सगळ्या राजकीय पक्षांच्या कार्यकर्त्यांचा अड्डा होता. आजही तीच परिस्थिती आहे. ह्या परिसराच्या बाजूला 'एस्ट्रेला बॅटरीज' नावाची कंपनी होती. तिच्या बाजूच्या झोपडपट्टीत अण्णा भाऊ राहत होते. अण्णा भाऊंची प्रतिभा ही उपजत होती. तमाशा, शाहिरी ह्या वातावरणात त्यांचे बालपण गेले होते. बाबुराव बागूल सांगतात की, त्यावेळी लेबर कॅम्पात खूप मच्छर झाले होते. अण्णा भाऊंनी त्यावेळी मच्छरावर गमतीने पोवाडा लिहिला होता. त्यांनी तो 'लेबर रेस्टॉरंट'समोर बसलेल्या कम्युनिस्ट कार्यकर्त्यांना ऐकविला. ते सगळे प्रभावित झाले. त्यांनी अण्णा भाऊंचे

शब्दांवरचे सामर्थ्य हेरले. लेबर कॅम्पातील ज्येष्ठ कम्युनिस्ट कार्यकर्ते आणि कॉ. डांगे यांचे निष्ठावंत व विश्वासू अनुयायी कॉ. हरी जाधव यांच्या तोंडावर तर माटुंगा लेबर कॅम्पच काय पण राजकीय चळवळीचा इतिहास आहे. त्या इतिहासाचे ते एक साक्षीदार आहेत. एक त्यागी, संघर्षशील कम्युनिस्ट कार्यकर्ता म्हणून त्यांच्याबद्दल आजही आदर आहे. 'दादर कलापथक' नावाचे त्यांचे कलापथक होते. विसू राजे, पुष्पा कोठारे, प्रल्हाद देठे, जनार्दन पांचाळ हे त्यांचे सहकारी होते. ते सांगतात की, अण्णा भाऊंना पार्टीमध्ये आणण्याचे काम आणि पार्टीला लोककलेच्या माध्यमाची मिळालेली साथ याचे खरे श्रेय कॉ. शंकर नारायण पगारे यांना जाते. कॉ. पगारे यांच्या नजरेसमोर आंबेडकरी चळवळ होती. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा सामाजिक व राजकीय विचार सर्वसामान्य जनतेसमोर आंबेडकरी चळवळीतल्या कलावंतांनी अतिशय समर्थपणे लोककलेच्या माध्यमातून जलशाच्या माध्यमाद्वारे पोहोचविला. कॉ. पगारे यांना आंबेडकरी जलशाच्या सामर्थ्याचे भान होते. कॉ. पगारे हे त्या काळी कम्युनिस्ट पार्टीचे 'कार्ड होल्डर' होते. कम्युनिस्ट चळवळ ही जनसामान्यापर्यंत पोहोचवायची असेल तर आपणदेखील हातात ढोलकी-तुणतुणे घेतले पाहिजे, ही त्यांची धारणा होती. आंबेडकरी जलशाचे स्वरूप नेमके काय होते हे समजावून घेण्यासाठी 'तक्षक' या अनियतकालिकात १९७८ साली लिहिलेल्या व 'दलित विद्रोह' या माझ्या पुस्तकात समाविष्ट केलेल्या 'आंबेडकरी जलसे : स्वरूप व कार्य' या लेखातील काही भाग मी हेतुत: उद्धृत करीत आहे :

"आंबेडकरी जलशांचे मातृस्थान हे सत्यशोधकी जलसे होत. आंबेडकरी आंदोलनाच्या सुरुवातीला व नंतरही चळवळीचे विचार सर्वसामान्य लोकांपर्यंत पोहोचविण्याचे काम या जलशांनी केले आहे. साधारणत: १९३०-३२ च्या नंतर मुंबईत अनेक जलसा मंडळे स्थापन झाली. आर. एच. अडांगळे, के. के. साळवे, बनसोडे-कांबळे, केरूजी अर्जुन घेगडे, दीनानाथ भिकाजी भोसले, भीमराव करडक, दादासाहेब पगारे, जगताप-भालेराव ह्या मंडळींचे जलसे त्यात प्रमुख होते. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या चळवळीच्या आधारे समाजात वेळोवेळी घडणारी स्थित्यंतरे, क्षणोक्षणी घडणाऱ्या प्रत्यक्ष घटना आपल्या अशिक्षित आणि अडाणी बांधवांना समजेल अशा त्यांच्या ग्रामीण भाषेत, करमणुकीच्या स्वरूपात समजावून सांगितल्या. आंबेडकरी आंदोलनात ज्या घटना घडत गेल्या किंवा जे वाद उपस्थित केले गेले त्याचे प्रतिबिंब साहजिकच जलशांमध्ये पडलेले आढळते. त्यावेळी जलशासारख्या प्रचार माध्यमाची अत्यंत आवश्यकता होती. एक तर समाज अडाणी होता. दलितांची खास अशी वृत्तपत्रे नव्हती. प्रस्थापित वर्तमानपत्रे बाबासाहेबांना, त्यांच्या चळवळींना प्रसिद्धी देत नव्हती किंवा विकृत स्वरूपात देत होती. त्या मानाने आज दलित चळवळीला खूप प्रसिद्धी दिली जाते. या सर्व पार्श्वभूमीवर जलशांचे कार्य उठून दिसते."

— तर अण्णा भाऊंची प्रतिभा कॉ. पगारे यांनी हेरली. अण्णा भाऊ नंतर माटुंग्याच्या रेल्वे चाळीजवळील झोपडपट्टीत आपल्या दोन बहिणी व भाऊ शंकर यांच्यासमवेत राहू लागले. मांग, गारुडी समाजातील बरीच मंडळी तिथे राहत होती. अण्णा भाऊंना लिहिते करण्यासाठी कम्युनिस्ट पार्टीने त्यांची सोय भाडेकरू संघाची एक खोली होती तिथे केली. ती खोली लालबावट्याची खोली म्हणून प्रसिद्ध होती. कॉ. हरी जाधव सांगतात, "अण्णा भाऊंनी गण लिहावा म्हणून कॉ. पगारे पाठीशी लागले होते. जर गण लिहिला तर मी पाच रुपये बक्षीस देईन" असे अण्णा भाऊंना त्यांनी सांगितले. त्यातूनच 'प्रथम मायभूच्या चरणा' हा गण अण्णा भाऊंनी लिहिला. अण्णा भाऊंचा मावसभाऊ लक्ष्मण साठे हा ढोलकी वाजवीत असे. बापू साठे यांनी गणाला चाल लावली. मग वग पाहिजे होता. कॉ. पगारे अण्णा भाऊंना म्हणाले, "तू जर वगनाट्य लिहून दिलेस तर मी तुला नवीन शर्ट आणि लेंगा शिवून देईन." वगनाट्याच्या विषयासंबधी बराच विचार झाला. बापू साठे यांनी एक लोककथा सांगितली. त्या कथेच्या आधारे अण्णा भाऊंनी 'अकलेची गोष्ट' हा वग लिहिला.

परळ येथील दळवी बिल्डिंगच्या गच्चीवर, जिथे कम्युनिस्ट पक्षाचे मुख्य कार्यालय होते, तिथे हा गण व वगनाट्य सादर करावयाचे ठरले. तिथे कॉ. शंकर पगारे हे अण्णा भाऊ व त्यांच्या साथीदारांसह गेले. कम्युनिस्ट पक्षाचे निवडक कार्यकर्ते उपस्थित होतेच; परंतु कॉ. गंगाधर अधिकारी, कॉ. बी. टी. रणदिवे, कॉ. पी. सी. जोशी हे प्रमुख नेते उपस्थित होते. त्यांच्या उपस्थितीत हा कार्यक्रम पार पडला. कॉ. बी. टी. रणदिवे हे तर खूपच प्रभावित झाले.

अण्णा भाऊंच्या लेखणीचे आणि नवीन आविष्काराच्या तंत्राचे सामर्थ्य पार्टीला जाणवले होते. अण्णा भाऊंनी लिहीत राहावे यासाठी सतत प्रयत्न केले जात असत. कॉ. पी. बी. रांगणेकर हे जवळच माटुंग्याला राहायचे. ते वारंवार भाडेकरू संघाच्या ऑफिसच्या खोलीवर येऊन अण्णा भाऊंनी किती लिहिले, काय लिहिले याची चौकशी करीत. भाडेकरू संघाच्या ऑफिसमध्ये पोस्टर्सच्या ढिगाऱ्यावर बसून किंवा झोपून मेणबत्तीच्या प्रकाशात लिहीत किंवा वाचत बसलेल्या अण्णा भाऊंना पाहणारे आजही माटुंगा लेबर कॅम्पात आहेत.

पुढचा इतिहास साधारणत: परिचित आहे. टिटवाळा येथे १९४४ साली झालेल्या 'शेतकरी परिषदे'त 'लालबावटा कलापथका'ची स्थापना; अमर शेख, अण्णा भाऊ, गव्हाणकर यांचे एकत्र येणे; इप्टाशी (इंडियन पिपल्स थिएटर असोसिएशन) आलेला त्यांचा संबंध; संयुक्त महाराष्ट्राच्या आंदोलनात त्यांचा सक्रिय सहभाग यातून अण्णा भाऊंच्या प्रतिभेचे विविध पैलू जनतेसमोर आले आणि अण्णा भाऊंचे एक विकसित, प्रगल्भ, तेजाने तळपणारे आणि स्वतंत्र व्यक्तिमत्त्व साकार झाले.

अण्णा भाऊंच्या जीवनाचे चार टप्पे मी मानतो. पहिला म्हणजे वारणेच्या खोऱ्यात, डोंगरदऱ्यात वाढलेले अण्णा भाऊ; दुसरा टप्पा म्हणजे वाटेगावहून मुंबईला आपल्या वडिलांसह पायी चालत आलेले, पोटापाण्यासाठी नोकरीधंदा शोधणारे अण्णा भाऊ; तिसरा टप्पा म्हणजे मार्क्सवादी विचारधारा स्वीकारून पददलित, शोषित जनतेसाठी आपली लेखणी झिजविणारे, 'फकिरा'सारखी कादंबरी लिहिणारे, संयुक्त महाराष्ट्राच्या लढ्यात अमर शेख, गव्हाणकर यांच्यासह उभा महाराष्ट्र ढवळून काढणारे अण्णा भाऊ आणि चौथा टप्पा म्हणजे कम्युनिस्ट चळवळीचा भर ओसरल्यानंतर ते मृत्यूपर्यंत जगलेले अण्णा भाऊ.

या टप्प्यांपैकी मी फक्त त्यांच्या आयुष्याच्या दुसऱ्या टप्प्यावर लक्ष केंद्रित केले आहे. माझ्या दृष्टीने एक लोकविलक्षण प्रतिभावंत शाहीर लेखकाच्या आयुष्यातील उष:कालाचा शोध घेऊन तो चितारण्याचा प्रयत्न आहे. तो परिपूर्ण असेलच असा माझा दावा नाही. त्यात अधिक भर पडावी अशी माझी इच्छा आहे.

मी वर म्हटल्याप्रमाणे आंबेडकरी जलशाचे मातृस्थान हे सत्यशोधकी जलसे होत. आंबेडकरी जलशांप्रमाणे कम्युनिस्ट चळवळीने 'ढोलकी-तुणतुणे' घेऊन जनतेसमोर जावे हा कॉ. शंकर पगारे यांचा प्रयत्न पार्टीने विकसित केला; त्याला वेगळा आशय-आकार दिला. लोकनाट्य नावाचा प्रकार अस्तित्वात आला. फुले-आंबेडकर-मार्क्सवादी चळवळीत हे जे सांस्कृतिक नाते दिसते त्या पाठीमागे कोणते सूत्र असू शकते या विषयी साकल्याने विचार होणे आवश्यक आहे.

कॉ. हरी जाधव सांगतात, "कॉ. पगारे नसते तर मी कम्युनिस्ट पार्टीत आलो नसतो. मी गुंड झालो असतो." कॉ. पगारे हे भायखळ्याच्या पुलाखाली असलेल्या बर्फाच्या कारखान्यात मॅनेजर होते. त्या काळचे ते मॅट्रिक पास होते. ते नात्याने माझे आजोबा म्हणजे आईचे सख्खे मामा होते. 'अकलेची गोष्ट'मध्ये ते कधी कधी बंडा गवळ्याची भूमिका करीत. बाबुराव बागूल सांगतात, "त्यांची ती भूमिका अप्रतिम असे." आम्ही त्यांना शंकरबाबा म्हणून हाक मारायचो. पुढे ते बांधकामाचे कंत्राट घ्यायला लागले. असेच एकदा कामाच्या निमित्ताने वरून पडले. पाय, कंबर फ्रॅक्चर झाले. त्यातच त्यांचा पुढे अंत झाला. 'अकलेची गोष्ट' या वगात बंडा गवळ्याच्या भूमिकेत असलेल्या शंकरबाबांचे त्यांच्या घरात टांगलेले फोटो मी कौतुकाने बघत असे. माझ्या बालवयात पाहिलेले फोटो अजूनही डोळ्यांसमोर तरळत राहतात. पुढे अण्णा भाऊ लेबर कॅम्प सोडून गेले. पण पुढे जेव्हा जेव्हा ते लेबर कॅम्पात येत तेव्हा जाईआईला—म्हणजे शंकरबाबांच्या आईला—हमखास भेटायचे. खूप सांगण्यासारखे आहे, पण इथे थांबतो.

अण्णा भाऊंनी पोवाडे, लावणी, गीते, कथा, कादंबरी, प्रवासवर्णन, नाटक, लोकनाट्य असे विविध प्रकार हाताळले आहेत. वैचारिक आणि सामाजिक बांधिलकी

हे त्यांच्या लिखाणाचे सूत्र होय. उपेक्षित, दलित वंचिताच्या बाजूने त्यांच्या उत्थानासाठी अण्णा भाऊंनी आपली लेखणी झिजविली. त्यांचे नायक-नायिका आपल्या हक्कासाठी, सन्मानासाठी, निष्ठापूर्वक संघर्ष करताना दिसतात. अण्णा भाऊ हे बंद खोलीत केवळ लिखाण करणारे लेखक नव्हते, तर जनआंदोलनात सक्रिय झालेले कार्यकर्तेदेखील होते. अण्णा भाऊ हे एका विशिष्ट जातीचे, जमातीचे वा समाजाचे नव्हते तर ते जगातील कष्टकऱ्यांचे, पीडितांचे, शोषितांचे प्रतिनिधी होते. त्यांनी त्यांचे प्रतिनिधित्व निष्ठेने आणि मानाने केले. माझ्यासारख्या अनेक लेखक-कार्यकर्त्यांचे अण्णा भाऊ हे आदर्श आहेत. आम्हाला वंदनीय आहेत.

संपादक मंडळाच्या इतर सदस्यांनी त्यांच्या वाङ्मयीन कर्तृत्वाविषयी लिहिलेले लेख याच ग्रंथात समाविष्ट केलेले आहेत. त्यामुळे त्याविषयी अधिक लिहिणे आवश्यक वाटत नाही. शिवाय अण्णा भाऊंच्या साहित्यविषयक भूमिका विशद करणाऱ्या काही प्रस्तावना, भाषणे परिशिष्टात समाविष्ट केलेली आहेत. ती त्यांच्या साहित्यविषयक भूमिकेवर प्रकाश टाकणारी आणि त्यांच्या साहित्याचे विवेचन करणारी आहेत.

मराठी साहित्याचा इतिहास पाहिल्यास अण्णा भाऊंना योग्य तो न्याय दिला गेला नाही याची खंत वाटते. विशेषत: १९५० च्या आसपास मराठीत जी 'नवकथा' उदयाला आली, त्याच काळात अण्णा भाऊ कथालेखन करीत होते. मराठी साहित्याला जे विश्व परिचित नव्हते, जी माणसे परिचित नव्हती, ज्या भावभावना, आकांक्षा परिचित नव्हत्या; त्या उपेक्षित, पीडित जगाचे दर्शन अतिशय समर्थपणे अण्णा भाऊंनी आपल्या कथांद्वारे केले. परंतु त्यांना त्यांच्या नायकाप्रमाणे उपेक्षित राहावे लागले; पण अण्णा भाऊ अथक योद्ध्यासारखे आपली लेखणी चालवीतच राहिले.

आज प्रस्थापित साहित्यविचार, मापदंड बदलत चालले आहेत. नवीन समीक्षामूल्ये रुजू लागली आहेत. अण्णा भाऊंच्या कथा, कादंबऱ्या, पोवाडे, तमाशे, लावण्या दुर्मीळ होत आहेत. नव्या पिढीला अण्णा भाऊ साठे हे महान लेखक होऊन गेले, एवढेच माहीत आहे. परंतु या ग्रंथामुळे अण्णा भाऊंचे एकत्रित लिखाण नव्या पिढीला उपलब्ध होत आहे. अण्णा भाऊंना जो न्याय त्या काळी साहित्य समीक्षकांनी दिला नाही, तो न्याय नवे संशोधक, नवे समीक्षक देतील अशी अपेक्षा आहे.

'लोकशाहीर अण्णा भाऊ साठे : निवडक वाङ्मय' ह्या ग्रंथास थोडा विलंब लागला; याचे कारण म्हणजे अण्णा भाऊंच्या पंचाहत्तरीनिमित्त 'लोकशाहीर अण्णा भाऊ साठे : व्यक्ती व वाङ्मय' अशा स्वरूपाचा ग्रंथ काढण्याचा निर्णय मंडळाचे दिवंगत अध्यक्ष विद्याधर गोखले यांच्या कारकिर्दीत मंडळाच्या वतीने घेण्यात आला होता. या ग्रंथात मान्यवर समीक्षकांचे व अण्णा भाऊंच्या सहवासातील जाणकारांकडून अण्णा भाऊंनी जे साहित्यप्रकार हाताळले, त्याविषयी समीक्षात्मक लेख लिहून घेणे, त्यांचे व्यक्तिमत्त्वविषयक

लेख लिहून घेणे असे स्वरूप होते. याविषयीच्या कामकाजाची रूपरेषादेखील ठरविण्यात आली होती. दरम्यान अशाच प्रकारचा ग्रंथ 'लोकशाहीर तथा लोकलेखक : अण्णा भाऊ साठे - संदर्भ ग्रंथ' या नावाने प्रकाशित झालेला, आसाराम गायकवाड यांनी संपादित केलेला आढळला. अण्णा भाऊंविषयी प्रकाशित केलेला हा संदर्भ ग्रंथ मला परिपूर्ण वाटला. संपादक या नात्याने मला अशाच प्रकारचा ग्रंथ अभिप्रेत होता. पुनरुक्ती नको म्हणून मंडळाच्या बैठकीत अण्णा भाऊंचे निवडक वाङ्मय प्रकाशित करावे असा प्रस्ताव मी मांडला. मंडळाने तो तात्काळ स्वीकारला. व्यक्तिश: मला वाटते की, हे दोन्ही ग्रंथ अभ्यासकांना अतिशय उपयुक्त ठरतील. आसाराम गायकवाड संपादित हा संदर्भ ग्रंथ आम्हाला अतिशय उपयुक्त ठरला. संपादक आसाराम गायकवाड व 'झेप प्रकाशना'च्या शुभांगी कन्नडकर यांचे संपादक मंडळ आभारी आहे.

महाराष्ट्र शासन व 'महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळा'चे आभार मानत असतानाच मंडळाचे दुसरे दिवंगत अध्यक्ष डॉ. मधुकर आष्टीकर यांची आठवण होणे अपरिहार्य आहे. हा ग्रंथ लवकरात लवकर प्रकाशित व्हावा अशी त्यांची इच्छा होती. मंडळाचे अध्यक्ष या नात्याने त्यांनी व सचिव चंद्रकान्त वडे यांनी जे सहकार्य दिले ते मोलाचे आहे.

'मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालया'चे पदाधिकारी आणि तेथील कर्मचारीवर्ग - विशेषत: सुषमा माने यांचे आभार मानावे तेवढे थोडेच आहेत. कारण अण्णा भाऊंचे सगळे साहित्य एकत्रित उपलब्ध होणे ही कठीण गोष्ट होती. 'मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालया'ने सगळे साहित्य अत्यंत तत्परतेने उपलब्ध करून दिले.

ह्या प्रकाशनाच्या वाटचालीत अण्णा भाऊंच्या साहित्याचे प्रकाशक 'अभिनव प्रकाशन'चे माननीय वा. वि. भट, कॉ. जी. एल. रेड्डी, डॉ. एस. एस. भोसले यांचे मौलिक सहकार्य लाभले. त्यांचादेखील मी अत्यंत आभारी आहे. तसेच अण्णा भाऊंचे लिखाण यापूर्वी ज्यांनी प्रकाशित केले, त्या सर्व प्रकाशकांचा मी अत्यंत आभारी आहे.

'लोकवाङ्मय गृहा'ने अत्यंत देखण्या स्वरूपात, अल्पवेळात व जिव्हाळ्याने हा ग्रंथ मुद्रित केला. 'लोकवाङ्मय गृहा'चे प्रकाश विश्वासराव यांनी स्वत: आत्मीयतेने लक्ष घातले आणि मुखपृष्ठ तयार केले. ग्राफीक डिझायनर व्ही. के. भोईर यांनी बरेच परिश्रम घेतले. कृष्णा करवार व माधवी विचारे यांनी मुद्रितशोधन केले. या सर्वांचे संपादक मंडळाच्यावतीने मी आभार मानीत करीत आहे. तसेच संपादक मंडळातील मंडळाच्या उपाध्यक्षा नीला उपाध्ये, वसुंधरा पेंडसे-नाईक व डॉ. सुभाष सावरकर यांनी जे सहकार्य दिले; त्याबद्दल त्यांचादेखील मी अत्यंत आभारी आहे.

**अर्जुन डांगळे**
संपादक (निमंत्रक)

१५ जून १९९८

# 'लोकनाट्याचे जनक'
# शाहीर अण्णा भाऊ साठे

**वसुंधरा पेंडसे-नाईक**

'सामाजिक बांधिलकी' हा शब्द आपण अलीकडे सरसकट वापरत असलो तरी त्याचा नेमका कोणता अर्थ आपल्याला अभिप्रेत असतो हे निश्चितपणे सांगता येणे जरासे अवघडच आहे. प्रत्यक्षात, ज्या समाजात आपण जन्मलो, वाढलो, त्या समाजाबद्दल वाटणारी कृतज्ञता आणि आस्था व्यक्त करण्यासाठी, त्या समाजाच्या प्रगतीला हितकर आणि उपयुक्त अशी कृती करण्याची तीव्र इच्छा म्हणजे सामाजिक बांधिलकी असे म्हणता येईल. ज्यांच्या आयुष्याकडे आणि साहित्याकडे पाहिल्यावर या व्याख्येची यथार्थता पटावी असे उदाहरण म्हणजे शाहीर अण्णा भाऊ साठे!

प्रतिभेचे लेणे कुणा भाग्यवन्ताला लाभेल हे सांगता येणे कठीण. नाहीतर, वाटेगावच्या गावकुसाबाहेर मातंग समाजात जन्मलेला अण्णा भाऊ साठे नावाचा मुलगा, ज्याला वयाच्या १५-१६व्या वर्षापर्यंत धड अक्षरओळखही झालेली नव्हती, तो मराठी साहित्यातील मानसन्मान मिळवितो, 'फकिरा' या त्याच्या बावनकशी कादंबरीची सोळावी आवृत्ती निघते, मराठीव्यतिरिक्त भाषा माहीत नसलेला हा अभिजात कलाकार रशियाला जाऊन येतो आणि त्याच्या साहित्यकृतींची भाषांतरे केवळ भारतीय नव्हेत तर भारताबाहेरील भाषांमध्येही केली जातात, या अघटिताचा अर्थ कसा लावायचा?

भाऊ मांगांच्या घरात जन्मलेल्या अण्णांनी दारिद्र्य फार कोवळ्या वयात अनुभवले, समाजाच्या उपेक्षेचे चटके सहन केले, वेठबिगारीतील अमानुष पिळवणूक भोगली, गिरणीकामगारांच्या हालअपेष्टा आणि शोषण सोसले आणि झोपडपट्टीतील बकालपणाची सोबतही केली. इतके अपार दु:ख भोगलेल्या अण्णांच्या साहित्यात कुठेही आक्रस्ताळा तळतळाट, समाजाला शिव्याशाप किंवा अन्याय करणाऱ्यांना खलास करण्याची भाषा आढळत नाही, हे त्यांचे ठसठशीत वैशिष्ट्य प्रकर्षाने जाणवणारे आहे. समाजाकडून ज्यांच्यावर अन्याय होतो, त्यांच्याकडून दोन प्रकारच्या प्रतिक्रिया झालेल्या नेहमीच आढळतात. अन्यायाचा प्रतिकार करताना, ज्यांनी अन्याय केला त्यांना 'जशास तसे' उत्तर देऊन अद्दल घडविणे ही त्यातील एक प्रतिक्रिया असते. दुसऱ्या प्रतिक्रियेत अन्यायाबद्दल चीड असते, त्याचा प्रतिकार करण्याची जिद्दही असते. परन्तु त्या

अन्यायापाठची कारणे शोधून ती नाहीशी करण्याची तळमळ असते. ज्यांनी अन्याय केला त्यांच्यावर संतापण्याऐवजी, ज्यांच्यावर अन्याय झाला त्यांच्याबद्दलची सहानुभूती, आस्था, आत्मीयता अधिक तीव्र असते. अपार करुणा आणि संपूर्ण मानवजातीच्या हिताची मनीषा तिथे सामावलेली असते. येशू ख्रिस्त, भगवान बुद्ध, ज्ञानोबा माऊली यांच्या डोळ्यांतून पाझरणाऱ्या करुणेचा आणि मनात दाटलेल्या मानवहिताच्या मनीषेचा अंश ज्यांना लाभतो त्यांच्या कृतीत, उक्तीत, साहित्यात सृजनाची बीजे आढळतात, संहाराची नव्हेत. अण्णा भाऊंच्या साहित्यात हेच दिसून येते.

दलित, शोषित, पीडित यांनी आपल्यावरच्या अन्यायाचा प्रतिकार करावा तो स्वत: सुशिक्षित होऊन, सुसंस्कृत होऊन, संघटितरीत्या समर्थ होऊन, ही अण्णा भाऊंची प्रामाणिक इच्छा त्यांच्या साहित्यातून उमटलेली आढळते. महाराष्ट्र दलित साहित्य संघाच्या वतीने आयोजित केलेल्या पहिल्या साहित्य संमेलनातील उद्घाटनाच्या (२ मार्च १९५८) भाषणात अण्णा भाऊ म्हणतात, *''आम्हाला गंगेसारखे निर्मळ साहित्य हवे आहे. आम्हाला मांगल्य हवें आहे. आम्हाला मराठी साहित्याच्या थोर परंपरेचा अभिमान आहे. कारण मराठी साहित्याची नांदी आमच्याच जीवन-संघर्षाने झडली आहे. जेव्हा दलितांची सावली असह्य होती तेव्हा महानुभावपंथीय साहित्यिकांनी सर्वांना ज्ञान मिळाले पाहिजे, ज्ञान हे मोक्ष असे समजून त्यांनी बंड केले. ते आमचे साहित्यिक. माणसाला माणूस म्हणून जगता आले पाहिजे असा दावा मांडून ज्यांनी दलितांच्या भाषेत महाराष्ट्राला सुंदर ज्ञानेश्वरी दिली ते आमचे साहित्यिक आणि चुकलेले महाराचे मूल कडेवर घेऊन जाणारे ते एकनाथ, ते आमचे साहित्यिक. आम्ही आपल्या वर्गाचे इमान पटवून त्याचा उपमर्द होणार नाही याची काळजी घेऊन त्याचे साहित्य निर्माण करू या. या दलिताचे जीवन सुखी व समृद्ध कसे होईल याची काळजी करू या, या दलिताला नि त्याच्या जीवनाला वरच्या पातळीवर नेण्याचा आपल्या कलेतून प्रयत्न करू या.''* आपल्या दलितपीडितशोषित समाजबांधवाचे आयुष्य हा एक उन्नतीचा प्रवास ठरावा, सूडाचा प्रवास ठरू नये ही अण्णा भाऊंची तीव्र इच्छा त्यांच्या पोवाड्यांमध्ये, गीतांमध्ये, लोकनाट्यांमध्ये आणि कथा-नाटक-कादंबऱ्यांमध्येही सातत्याने दिसते.

१९४२ साली संपूर्ण बंगाल प्रांतात भीषण दुष्काळ पडला आणि अक्षरश: लाखो भूकबळी पडू लागले तेव्हा या दुष्काळग्रस्तांसाठी मदतनिधी गोळा करण्यासाठी मुंबईतील साम्यवादाचा प्रभाव असलेल्या कलावंतांनी एकत्र येऊन 'इप्टा' या संस्थेची स्थापना केली आणि कार्यक्रमांची मालिका सादर करण्याची योजना आखली. या कार्यक्रमासाठी बंगालच्या आपत्तीवर एक पोवाडा स्वत: रचून तो सादर करावा, असे अण्णा भाऊंना वाटले आणि त्यांच्यातील 'अभिजात शाहीर' प्रकट झाला. 'बंगालची हाक' या त्यांच्या पहिल्या पोवाड्यापासून पुढील सर्व सुमारे १४-१५ पोवाडे या अण्णा भाऊंच्या

कविमनाने अन्यायाविरुद्ध नोंदविलेल्या प्रखर प्रतिक्रियाच होत्या, मग तो अन्याय निसर्गाने माणसावर केलेला असो किंवा एका माणसाने दुसऱ्यावर केलेला असो. शाहीर अमर शेख यांनी आपल्या या परममित्राच्या निधनानंतर लिहिलेल्या लेखात अण्णा भाऊंसंबंधी मांडलेले विचार लक्षात घेण्यासारखे आहेत. "तसे पाहता आद्य शाहीर अगीनदास तुळसीदासापासून सगनभाऊ तो तहत आजच्या अनेक शाहिरांपर्यंत पोवाडेकार झाले. मग अण्णा भाऊंनी यात काय ते वेगळेपण दाखवलं? शाहिरी जीवन हा महाराष्ट्राला दिलेला अमोल नजराणा अण्णा भाऊंनी सार्थकी लावला. पोवाड्यांतून नुसती वर्णनं करून वाडवडिलांनी केलेल्या कहाण्या पद्यरूप ऐकविणे हे शाहिराचे काम नाही, तर शाहिरानं जनमन सागरात सर्वभर संचार करून नव्हे, तर त्याच्या तळाचा ठाव घेऊन त्यात चाललेल्या भावनोद्रेकांचा आविष्कार आपल्या लेखणीच्या लालित्यपूर्ण ढंगाने व्यक्त करून अथवा जनमानस हेलावूनच नव्हे तर त्या सागराच्या कणाकणाला ऊब देऊन, त्याच्या लाटांवर आरूढ होऊन गगनालाही गवसणी घालावी, तोच मराठी शाहीर. ही उक्ती सार्थ करणारे अण्णा भाऊ हे एकमेव शाहीर होते."

अण्णा भाऊंचे साहित्य, इथे मुख्यत: पोवाडे, वाचताना जाणवते की, अण्णा भाऊंनी हिंसाचार-अत्याचार यांचा नेहमीच धिक्कार केला आहे. फाळणीच्या पार्श्वभूमीवर पंजाब-दिल्ली येथे भडकलेल्या जातीय दंग्यावर रचलेल्या पोवाड्यात ते म्हणतात,

*माणुसकी पळाली पार । होऊनी बेजार । पंजाबातून ॥*
*सूडाची निशा चढून । लोक पशुहून । बनले हैवान ॥*

माणुसकीच्या या हत्येने विषण्ण झालेले अण्णा भाऊ कळवळून सांगतात –

*द्या फेकून जातीयतेला । करा बंद रक्तपाताला । आवरोनि हात आपुला । भारतीयांनो इभ्रत तुमची ईर्षेला पडली । काढा बाहेर नौका देशाची वादळात शिरली ॥ धरा सावरून एकजुटीने दुभंगली दिल्ली । काढा बाहेर राष्ट्रनौका ही वादळात गेली ॥*

शेवटी भारतवासीयांना आवाहन करतात –

*तू उठ आता सत्वर । हे तुडवून दंगेखोर । म्हणे अण्णा साठे शाहीर ।*
*सावरून धर । तुझी तू शांतिध्वजा सत्वर ॥*

'शाहिरांनो' या गीतातही शेवटी अण्णा म्हणतात –

सुखशांतीचा पोवाडा, गांजल्यांना ऐकवा । जाऊ द्या ती खोल खाली
दामिनीसम शाहिरी ॥

म्हणूनच 'खून का बदला खून' हे तत्त्वज्ञान अण्णा भाऊंना कधीच मानवले नाही. 'स्वत:वर अन्याय होऊ देऊ नका आणि दुसऱ्यावर अन्याय करू नका' हाच मूलमंत्र त्यांनी जपला. अन्याय्य रूढी नष्ट करण्यासाठी सर्वांनी एकजुटीने प्रयत्न करावेत ही

त्यांची धारणा होती. 'जग बदल घालुनी घाव । सांगून गेले मला भीमराव' म्हणणाऱ्या अण्णा भाऊंना घाव पडायला हवे होते ते दुष्ट रूढींवर आणि त्यातून नवमहाराष्ट्राची निर्मिती व्हायला हवी होती.

शेतकरी आणि गिरणीकामगारांची दु:खे पाहिलेल्या, भोगलेल्या अण्णा भाऊंना साम्यवादी विचार आपलासा वाटणे स्वाभाविकच होते. दलित-शोषित-पीडितांना माणूस म्हणून ताठ मानेने जगायला शिकविणारे हे नवे तत्त्वज्ञान अण्णा भाऊंना इतके भावले की, अखेरपर्यंत त्यांनी त्याची कास सोडली नाही. स्तालिनग्राडचा पोवाडा, बर्लिनचा पोवाडा, चिनीजनांची मुक्तिसेना, लेनिन शुभनामाचे गाऊ गान या साऱ्यांमधून त्यांनी साम्यवादाची मुक्त आणि मन:पूर्वक स्तुती केली. 'आपली प्रतिभा त्यांनी साम्यवादाच्या प्रचारासाठी राबविली' अशी टीका अण्णा भाऊंवर नेहमीच झाली. परन्तु कविमनाला जे भिडते त्याचीच अभिव्यक्ती त्याच्या काव्यातून घडते, हे कसे नाकारता येईल? 'मोले घातले रडाया' पद्धतीचा प्रचार आणि आंतरिक ऊर्मीतून उचंबळून आलेली कलाकृती ह्यातील जमीनअस्मानाचा फरक लक्षात येत नसेल तर तो साहित्याचा आस्वादक कसला?

साम्यवादाचे निस्सीम उपासक असलेल्या अण्णा भाऊंनी साऱ्या जगातील कामगारांनी, दलित-पीडित-शोषितांनी एक व्हावे या घोषणेचा उद्घोष करीत असतानाच आपले जाज्वल्य देशप्रेमही धगधगते ठेवले होते हे आवर्जून लक्षात ठेवायला हवे. मुंबई, महाराष्ट्र आणि भारत यांवरील त्यांचे मन:पूर्वक प्रेम त्यांच्या साहित्यात जागोजागी उमटले आहे. महाराष्ट्र देशा अमुच्या, उठला मराठी देश, महाराष्ट्रावरून टाक ओवाळून काया, महाराष्ट्राची परंपरा या केवळ नावांवरूनही ते दिसून येईल. म्हणूनच संयुक्त महाराष्ट्राची निर्मिती होताना बेळगाव, कारवार, निपाणी, धारवाड, उंबरगाव, डांग, हा सीमाभाग महाराष्ट्राला दुरावणार, कदाचित मुंबईही वेगळी काढली जाणार ही व्यथा त्यांचे काळीज पोखरीत होती. या व्यथेतून जन्मली एक अप्रतिम लावणी –

*माझी मैना गावाला राहिली । माझ्या जिवाची होतिया काहिली ।।*

तरुण, सुंदर, गुणी पत्नी दूर गावाला राहिल्यामुळे, तिच्या विरहाने जळणारा गिरणीकामगार पती हा प्रत्यक्षात मुंबईला, सीमाभागाला दुरावणारा महाराष्ट्र होता.

मुंबईचे अंतरंग जाणून घेतलेल्या अण्णा भाऊंच्या डोळ्यांना दिसलेली मुंबई फार वेगळी आहे. पठ्ठे बापूरावांना 'मुंबई नगरी बडी बांका' वाटली, 'हे मुंबई बंदर, सगळ्या दुनियेत सुंदर' अशी ग्वाही त्यांनी दिली, परंतु अण्णांच्या कारुण्यमयी दृष्टीला मुंबईच्या लावणीत दिसली ती मुंबई अशी –

*मुंबईत उंचावरी । मलबार हिल इन्द्रपुरी । कुबेरांची वस्ती तिथे सुख भोगती ।।*
*परळात राहणारे । रात्रंदिवस राबणारे । मिळेल ते खाऊनी घाम गाळती ।।*

ही विषमता त्यांचे हृदय हेलावून टाकीत होती. जो श्रम करून, घाम गाळून मुंबईला भारताची आर्थिक राजधानी बनवितो, त्याच्या नशिबी अर्धपोटी राहणे यावे हा दैवदुर्विलास त्यांना मुंबईत प्रकर्षाने जाणवला; म्हणूनच या 'तळहातावर पृथ्वी पेलणाऱ्या' समर्थ हातांना संघटित करणारे साम्यवादी तत्त्वज्ञान त्यांना मोहवून गेले. कष्टकऱ्यांनी, शेतकरी-कामगारांनी एक होऊन आपले सामर्थ्य वाढवावे, आपले न्याय्य सुख मिळवावे ही त्यांची तळमळ त्यांच्या अनेक गीतांमध्ये प्रतिबिंबित झाली. दौलतीच्या राजा । उठूनि सरजा । हाक दे शेजाऱ्याला रे । शिवारी चला ।। किंवा 'पूर्वेला आली जाग', 'रवि आला लावुनी तुरा', 'दुनियेची दौलत सारी' यासारख्या अनेक मधुर गीतांनी १९५०-६० या दशकाच्या सुमाराला साऱ्या महाराष्ट्रात लोकप्रियता मिळविली होती, ती केवळ नादमाधुर्यामुळे नव्हे, तर त्यातील विचार जनतेला आपले वाटले म्हणून.

अण्णा भाऊंच्या कविमनाला निसर्गसौंदर्याची किती भुरळ पडत होती त्याची साक्ष त्यांच्या गीतांमधून प्रकर्षाने दिसून येते. 'पूर्वेला जाग आली, मोहरली लाली' या गीतात अण्णा भाऊ म्हणतात, 'भाळी तिलक तिने रेखिला । लेवून पुरला, गुलाल उरला । नभातून तिने फेकिला ।। पहाटे पूर्व दिशा उजळली की तिची लाली केवळ आकाशात पसरते असे नव्हे तर चराचरावर उमटते, ही वस्तुस्थिती आपण सारेच पाहत असलो तरी अण्णा भाऊंना मात्र पूर्वेने कपाळावर कुंकवाचा टिळा रेखून, उरलेला गुलाल आसमंतात उधळलेला दिसला. 'रवि आला लावुनी तुरा' हे नितान्त सुंदर गीत तर संपूर्णच आस्वादायला हवे. सूर्याच्या आगमनाने पृथ्वीवर पसरलेले चैतन्य आणि ओसंडणारा आनंद या गीतात अण्णा भाऊंनी हळुवारपणे टिपला आहे. 'पानापानांत नाचे हा वारा । भूप रागाच्या छेडीत तारा । हासे कोकीळ मनी । मोर नाचे वनी । सप्तरंगांचा फुलवून पिसारा । म्हणून अण्णा भाऊंनी सूर्योदयाचे एक देखणे शब्दशिल्प निर्माण केले आहे. 'लावणी'च्या सौंदर्याला सोबत घेऊन वाढलेल्या अण्णा भाऊंच्या कविमनाने निसर्गातील सौंदर्यकण नेमके वेचून आपल्या गीतात गुंफावेत यात नवल ते काय? रसिकमनाला मोहविणारी ही गीते महाराष्ट्राला भावली ती यामुळेच.

'इनामदार' हे अण्णा भाऊंचे एकमेव नाटक. त्यातही खेड्यातील 'सावकारी पाश' शेतकऱ्यांभोवती कसे आवळले जातात आणि माणसे गुन्हेगारीला कां प्रवृत्त होतात, आपल्या फायद्यासाठी धनदांडगे त्यांचा कसा वापर करून घेतात याचे विदारक चित्र अण्णा भाऊंनी रेखाटले आहे. गमतीचा भाग असा की, या नाटकाचे प्रयोग मराठीत झाले नाहीत; परन्तु हिन्दी रंगभूमीवर मात्र हे नाटक लोकप्रिय ठरले! ए. के. हंगल वगैरे 'डाव्या' मंडळींच्या अभिनयाइतकेच त्याचे श्रेय अण्णा भाऊंच्या सकस लेखणीलाही द्यायला हवे. लोकनाट्यावर जबरदस्त पकड असलेल्या अण्णांना नाट्यलेखन अवघड नव्हतेच. लोकनाट्यातील रसरशीत बोलीभाषा इथे न वापरता सावकार, कारकुनांना

शोभेल अशी भारदस्त भाषा अण्णा भाऊंनी लीलया वापरली आहे याकडे मुद्दाम लक्ष वेधायला हवे. वारणाकाठच्या परिसरात, वाटेगावात अण्णा भाऊंनी ग्रामीण महाराष्ट्रातील शेतकऱ्यांची, दलित-शोषितांची जी दुःखे समरसून पाहिली तीच या नाटकातही उमटावीत यात नवल काय?

पोवाडे, गीते, नाटक या साऱ्यातून ज्या साम्यवादी विचारांचा, श्रमिकांच्या समस्यांचा प्रभाव दिसून येतो त्या साम्यवादाची जन्मभूमी असलेल्या सोविएत रशियाला जाण्याचे अण्णा भाऊंचे स्वप्न १९६१ साली जेव्हा प्रत्यक्षात उतरले तेव्हा आनंदाने ते पार हरकूनच गेले. एका सच्च्या श्रमिकाच्या कलावन्त मनाला दिसलेला रशिया 'माझा रशियाचा प्रवास' या छोटेखानी पुस्तकात आपल्याला भेटतो. या संपूर्ण प्रवासवर्णनाचा ढाचाच पार वेगळा आहे. मॉस्कोतील किंवा बाकूतील पर्यटनस्थळे, सौंदर्य या वर्णनापेक्षा अण्णा भाऊ अधिक रमतात ते तिथल्या माणसांच्या अंतरंगात. मॉस्कोतील 'सोविएत स्काय' हॉटेलात प्रथम भेटलेले दुभाषी डॉ. बारनिकोव, लेनिनग्राडच्या मराठीच्या प्राध्यापिका तातियानाबाई, लेनिनग्राड विश्वविद्यालयातील विद्यार्थी, रस्त्यावरील सामान्य नागरिक, अण्णा भाऊंना 'शाहीरे अझीज' म्हणणारे बाकूमधील डॉ. हमीद, या सर्वांशी आत्मीयतेने साधलेल्या संवादातून अण्णा भाऊंना रशियातील 'माणूस' पाहायचा होता. प्रेमात पडलेल्याला प्रिय व्यक्तीचे सारेच सुंदर वाटते. अण्णा भाऊ साम्यवादाच्या प्रेमातच पडल्यामुळे त्यांना रशिया म्हणजे भूलोकीचा स्वर्गच वाटला हे त्यांच्या प्रवासवर्णनातून जाणवतेच. परंतु साम्यवादी देशातील सामान्य माणसाच्या खोल मनात दडलेले सत्य शोधण्याचा अण्णा भाऊंचा प्रामाणिक प्रयत्न आपल्या वेगळेपणाने अधिक काळ स्मरणात राहतो.

साम्यवादी रशियाला भेट देण्याची संधी अण्णा भाऊंना बरीच उशिरा (१९६१ साली) मिळाली असली तरी साम्यवादाशी त्यांची ओळख १९४०च्या आसपास झालीच होती. शोषितांना शोषणमुक्त करण्याचे, एक स्वतंत्र माणूस म्हणून स्वाभिमानाने जगण्याचे आश्वासन देणारे साम्यवादी तत्त्वज्ञान त्यांच्या मनात खोलवर ठसले आणि हा ठसा त्यांच्या साहित्यावर आणि सर्वाधिक स्वरूपात त्यांच्या लोकनाट्यांवर उमटलेला आढळतो. आपल्या भोवतालच्या बदलत्या वास्तवाचे आणि बदलत्या सामाजिक जाणिवांचे भान ठेवून जो साहित्यप्रकार जन्म घेतो तो त्या त्या समाजाच्या जनमानसाची पकड घेतो या वस्तुस्थितीचे उत्तम उदाहरण म्हणून अण्णा भाऊंच्या लोकनाट्यांचा निर्देश करता येईल. तमाशा हा ग्रामीण महाराष्ट्राच्या लोकजीवनाचा अविभाज्य घटक आहे. साऱ्याच लोककलांविषयी असे म्हणता येईल. १९व्या शतकाच्या अखेरीला मुंबईसारख्या शहराला बाळसे आल्यावर, ग्रामीण महाराष्ट्रातून गरिबीने गांजलेल्यांचे लोंढे मुंबईकडे येऊ लागले. आपल्या 'काळ्या आई'ला आणि कुटुंबियांना गावाकडेच ठेवून शहरात

आलेली ही बहुसंख्य मंडळी गिरण्यांमध्ये भरती होऊन 'गिरणगावा'त एकमेकांना धरून राहिली, गिरणीनजीकच्या झोपडपट्ट्यांच्या आश्रयाला गेली. 'गिरणोदया'शी जमवून घेण्याचा प्रयत्न ती मंडळी करीत असली तरी त्यांच्या मनाचा सांधा गावाशीच जोडला होता.

अशा मंडळींपैकीच एक असलेले, मोरबाग मिल्समध्ये राबणारे अण्णा भाऊ गिरणगावच्या, गिरणीकामगारांच्या नव्या समस्यांना सरावत होते, शोषणाला सामोरे जात होते. श्रमिकवर्गाच्या शोषणाला वाचा फोडून, त्यांच्या संघटित शक्तीला जागृत करणारे 'लाल बावट्या'चे साम्यवादी विचार ऐकत होते, पचवीत होते. अशावेळी बालपणापासून ज्यांची संगत लाभली त्या लोककलांच्या, मुख्यत: तमाशाच्या, नव्या रूपाचा साक्षात्कार अण्णा भाऊंना झाला. या संदर्भात डॉ. सदा कऱ्हाडे यांनी 'अण्णा भाऊ साठे संदर्भ ग्रंथा'तील आपल्या लेखात मांडलेले विचार उद्धृत करणे आवश्यक आहे. ते म्हणतात, ''परंपरागत तमाशाची सुरावट घेऊन अण्णा भाऊंनी शाहिरीची नवी सजावट केली. या अर्थाने की, पोवाडे, लावण्या, गीते, गण, वग इत्यादी रचनाबंध त्यांनी स्वीकारले, परंतु त्यात नवा आशय भरला. हा नवा आशय समकालीन होता, वास्तवाधिष्ठित होता. तसाच भविष्यदर्शीही होता. त्यामुळे या परंपरागत कलेला नवी प्रतिष्ठा मिळाली. शाहिरीची ही नवी सजावट 'लोकनाट्य' या अर्थपूर्ण नावाने ओळखली गेली. शाहीर अण्णा भाऊ साठे यांचा कलावन्त म्हणून आदर करायचा तो लोकनाट्याचे प्रवर्तक म्हणूनच.''

इथे 'लोकनाट्य' या नावाविषयी सांगायला हवे. पां. तु. पाटणकर यांनी 'लोकराज्य'च्या 'लोकशाहीर अण्णा भाऊ साठे विशेषांका'त (१ नोव्हेंबर १९९३) सांगितलेली आठवण थोडक्यात अशी : संयुक्त महाराष्ट्राची चळवळ ऐन भरात आली होती. मुंबई महाराष्ट्रापासून तोडण्याची योजना जोर धरत होती. अशावेळी 'लाल बावटा कलापथका'द्वारे शाहीर गव्हाणकर, शाहीर अमर शेख आणि शाहीर अण्णा भाऊ साठे ही त्रयी उभा महाराष्ट्र जागवीत आणि गाजवीत होती. कलापथकाच्या तमाशांना हजारोंनी माणसे बैलगाड्या जोडून येत होती. मुंबईत मैदाने तुडुंब भरत होती. त्यामुळे चवताळलेल्या मोरारजीभाई देसाई यांनी तमाशावर बंदी घातली! त्यावर अण्णा भाऊंनी डोके लढवले. त्यांनी 'माझी मुंबई' हा वग लाखोंच्या समुदायापुढे सादर करताना प्रारंभी जाहीर केले की मायबाप सरकारने तमाशावर बंदी आणली आहे, म्हणून आज आम्ही आपल्यासमोर 'माझी मुंबई' हे लोकनाट्य सादर करीत आहोत! टाळ्यांच्या कडकडाटात आणि पोलिसांच्या उपस्थितीत तमाशाचे 'लोकनाट्य' असे बारसे करण्याचे एक ऐतिहासिक कार्य अण्णा भाऊंनी केले व आपल्या मिश्किलपणाने त्यांनी शासनाला हात चोळीत बसायला लावले.

अण्णा भाऊंनी तमाशाचे केवळ नावच बदलले नाही तर त्याचे अंतरंगही पार पालटून

टाकले. पारंपरिक तमाशात गण, गवळण, बतावणी, सवालजबाब, वग असे घटक असतात. 'गणा'मध्ये गणेशवंदन आणि गणेशस्तवन असते. अण्णा भाऊंनी ही परंपरा मोडून 'पहिल्या नमना'चा मान मातृभूमी, हुतात्मे, राष्ट्रपुरुष यांना देण्याचे बहुमोल काम केले.

*प्रथम मायभूच्या चरणा*
*छत्रपती शिवबा चरणा*
*स्मरोनि गातो । कवना ।।*

म्हणणाऱ्या अण्णा भाऊंनी एक अभिमानास्पद बदल करून आपल्या राष्ट्रप्रेमाला साद घातलीच; परंतु तमाशाकडे, अगदी प्रारंभापासूनच पाहण्याची, एक नवी दृष्टी दिली.

गणानंतर येत असे गवळण. परंतु मथुरेच्या बाजाराला निघालेल्या गवळणी आणि त्यांना अडविणारी कृष्ण-पेंद्याची जोडगोळी यांना अण्णा भाऊंनी वगळूनच टाकले! कारण त्या संवादांतून मनोरंजन होत असले तरी त्यात पांचटपणा आणि अश्लीलताच अधिक असे. 'समाजपरिवर्तनासाठी आणि क्रान्तीसाठी लोकरंजनापेक्षाही लोकशिक्षणाची आवश्यकता असते हे भान ठेवून अण्णा भाऊंनी लावणी आणि तमाशा या रंजनकलेला लोकशिक्षणाकडे वळविण्याचा प्रयत्न केला!' डॉ. सदा कऱ्हाडे (लोकराज्य १ नोव्हेंबर १९९३) यांनी मांडलेले हे मत अशा बदलांवरूनच सिद्ध झाले आहे. गणानंतर सरळ वगच सादर करण्याची कालानुरूप प्रथा अण्णा भाऊंनी सुरू केली. वगाच्या प्रारंभीच असलेल्या 'म्हणणी'तून कथानकाचा परिचय प्रेक्षकांना करून देऊन त्यांची उत्सुकता वाढविण्याचे काम त्यांनी सुरेख साधले. वगामध्ये येणारी परंपरागत राजाराणीप्रधान ही पात्रे बदलून त्या जागी शेतकरी-सावकार, कामगार-पुढारी अशी प्रेक्षकांच्या दैनंदिन परिचयाची वास्तव पात्रे आणली. पुराणातील कथा किंवा राजाराणींच्या काल्पनिक कथांची जागा काळाबाजार, सावकाराने केलेली कर्जदाराची नाडणूक, गिरणीकामगारांचे शोषण, पुढाऱ्यांच्या भूलथापा, निवडणुकीतील हिडीस राजकारण यांना देऊन अण्णा भाऊंनी क्रांतिकारक बदल केला आणि तो बहुजनसमाजात अतिशय रुचला. ही वस्तुस्थिती कुणालाच नाकारता येणार नाही.

तमाशा म्हणजे स्त्रीच्या सौंदर्याचे मांडलेले प्रदर्शन आणि लावण्या म्हणजे त्या सौंदर्याचा केलेला जास्तीत जास्त उन्मादी आविष्कार; ही व्याख्याच बदलून टाकण्याचे धाडसी पाऊल अण्णा भाऊंनी आपल्या लोकनाट्यांमधून टाकले. या काळात लोकनाट्यात स्त्रीपात्रे येतात ती शेतकऱ्याची बायको किंवा कामगाराची बायको म्हणून. आपले ठसकेबाज संवाद खणखणीतपणे सादर करण्याचे काम ही स्त्रीपात्रे करतात तेव्हा 'तमाशातील कलावती' म्हणून त्यांच्याकडे न पाहता लोकनाट्यातील एक आवश्यक पात्र म्हणूनच प्रेक्षक पाहतात, याचा इथे उल्लेख करायलाच हवा. तमाशातील स्त्रीला

'लोकनाट्या'त आणताना अण्णा भाऊंनी तिचा सन्मान किती अबोलपणे आणि सहजपणे वाढविला आहे!

शेतकरी, कामगारांच्या समस्या व अडचणी, दलित-पीडित-शोषितांच्या व्यथावेदना त्यांनी चटपटीत आणि हृदयस्पर्शी संवादांतून श्रोत्यांपुढे मांडल्या आणि श्रमिकांच्या एकजुटीचे सामर्थ्य, अन्यायाचा प्रतिकार करू शकणारी संघटित शक्ती आणि विषमतेच्या पलीकडे नेऊ पाहणारा साम्यवादी विचार त्यांनी जनतेपुढे ठेवला. अण्णा भाऊंनी लोककलेचा उपयोग साम्यवादाच्या पक्षीय प्रचारासाठी केल्यामुळे त्यांच्या लेखनसामर्थ्याला मर्यादा पडल्या अशी टीका त्यांच्यावर केली गेली. 'ते स्वत: काळावर आरूढ झाले; पण त्यांची लोकनाट्ये मात्र पक्षीय अभिनिवेशामुळे काळाच्या मागेच राहिली' असे मत पां. तु. पाटणकरांनी (अण्णा भाऊ साठे संदर्भग्रंथ) नोंदविले आहे आणि ते काही मंडळींना पटण्याचीही शक्यता आहे. परंतु त्याचवेळी डॉ. सदा कऱ्हाडे यांचे मतही विचारात घ्यायला हवे. 'ऐतिहासिक दृष्ट्या शाहिरी आणि तमाशा या दोन भिन्न कला मानल्या गेल्या. वीररसप्रधान ती शाहिरी आणि शृंगाररसप्रधान तो तमाशा. समाजपरिवर्तनाशी व राजकीय क्रान्तीशी तादात्म्य पावून समाजातले चैतन्य फुलविण्याचे कार्य शाहीर करतो, तर शृंगाराचे आकर्षण ठेवून जनमानसातील विकारांना चेतविण्याचे कुशल कार्य तमासगीर करतो, असा परंपरागत समज होता. परंतु अण्णा भाऊंनी हा समजच बदलून टाकला. तमाशाची रंजनकलाही लोकशिक्षणाकडे वळविता येते, हे भान ठेवून त्यांनी नवे तमाशेही लिहिले.' मनोरंजनातून समाजप्रबोधन कसे करता येते याचा वस्तुपाठच खरे तर अण्णा भाऊंनी समाजापुढे ठेवला. याबाबतची मतभिन्नता गृहीत धरूनही एवढे मात्र निश्चितच म्हणता येईल की लोककलेला कालानुरूप करण्याचे ऐतिहासिक मोलाचे कार्य करून अण्णा भाऊ साठे 'लोकनाट्याचे जनक' ठरले आणि त्यांचे ते स्थान ध्रुवताऱ्याप्रमाणे अढळच राहील.



## अनुक्रम

# गण

प्रथम मायभूच्या चरणा
छत्रपती शिवबा चरणा
स्मरोनि गातो । कवना ।।धृ।।
स्वराज्य माझा जन्मसिद्ध हक्क करुनिया गर्जना
लोक उठविला जागा केला त्या लोकमान्यांना
कठिण काळि राष्ट्रनौकांना
मार्ग दाखवीला तयांना
देशा दिली ज्यांनी प्रेरणा ।।१।।
क्रांतिकारि वीरांना आणि त्यागी हुतात्म्यांना
देशासाठी देह झिजविला त्या नररत्नांना
महाराष्ट्र भूच्या भूषणा ।
पणा लावुनिया प्राणा ।
अर्पियले ज्यांनी जीवना ।।२।।
आठवून मनी ही शुभनामे करुनिया स्तवना
आशिर्वाद मागतो आम्ही गावया कवना
सभापती आणि सुजना
कलावंत आणि रसिकांना
स्फूर्ति द्यावि हीच प्रार्थना



# महाराष्ट्राची परंपरा

महाराष्ट्र मायभू अमुची । मराठी भाषिकांची । संत महंतांची । ज्ञानवंतांना जन्म देणार। नररत्नांचे दिव्य भांडार । समरधिर घेत जिथे अवतार ।। जी ।।
शौर्याची अजरामर महती ।। आजहि नांदती । सह्याचलावरती । मावळा दख्खनचा राहाणार। स्वाभिमानार्थ जिणे जगणार । मराठा मानी आणि दिलदार ।। जी ।।

*(चाल बदलून)*

सह्याद्रि पसरला जिथे शेषासम गिरी ।।
दौलत घेऊनि सत्तावीस गड शिरी ।।
भेसूर कड्यावर बुरुज पहारेकरी ।।
ताड, माड, सागाची झाडे त्यांच्या शेजारी ।।
कळकिचे बेट आकाशात झुकांड्या मारी ।।
करवंदी, बाभळ आणि बोरी । चिल्लार कठिण काटेरी
खाली सुपीक शेती जमिन काजळापरी ।।
महाराष्ट्राची ती शेतसरी । सुवर्ण आणि भूवरी ।
कापूस, ऊस, गुळभेंडि, तूर, तिळ, हवरी ।।
काराळा फुले गोजिरी । उधळून महाराष्ट्रावरी ।
राळ्याचे लोंब पुढे लवून मुजरा करी ।।

*(चाल बदलून)*

महाराष्ट्राच्या अंगणात । सरिता या खेळ खेळत ।।
पंचगंगा शीतल शांत । महाराष्ट्रा शांतवीत ।।
कोयना कृष्णा चालत । घालून हातामध्ये हात ।।
जाऊनी पुढे धावत । आंध्रलाहि कुरवाळीत ।।
वारणा वाहे वेगात । वायूला लाजवीत ।।
पैठण परभणीत । गोदाचे रमले चित्त ।।

*(चाल बदलून)*

ही अवनी आदिवाशांची । कोळि भिल्लांची । मांग रामोशांची ।
कैक जातींची प्राणाहुनि प्यार । परंपरा ज्यांची असे अपार ।
पुढे शाहीर तीच गाणार ।। जी ।।

**चौक दुसरा**

आम्हाला चीड दास्याची । जुलमी सत्तेची । परचक्राची ।
इतिहास साक्ष देत याला । करुनि आम्ही जबरदस्त हल्ला ।
अन्यायाचा कडेलोट केला ।। जी ।।
संस्कृत भाषेचे मानी । विद्येचे धनी । एकदा त्यांनी ।
एक अन्याय केला अति घोर । मराठी असुन आमुची थोर ।
दडपून केले तिला कमजोर ।। जी ।।

*(चाल बदलून)*

ज्ञानाच्या मक्तेदारांनी कट पहा केला ।।
ती ठेकेदारी तगवून पुढे नेण्याला ।।
मानून हीन मराठीला । संस्कृतचा पगडा बसविला ।
प्रगतिचा मार्ग रोखिला । महाराष्ट्र दीन जाहला ।
अंतरला मायबोलिला । इतिहास, पुराणे, वेद दिसेना त्याला ।।
महाराष्ट्र संस्कृतीला । हा राहु ग्रासु लागला ।
अंधार पूर्ण दाटला । परि त्याहि कठिण समयाला ।
ज्ञानेश्वर संत पैठणी आले उदयाला ।।

*(चाल बदलून)*

घनघोर महाराष्ट्राची । ज्ञानेश्वरांची गर्जना । झाली ।।
संस्कृत भाषेची भिंत । करुनि आघात । त्यांनी फोडीली ।।
ती माय मराठी बोली । बाहेर काढिली । स्वैर सोडीली ।।
अज्ञाना, दीन दलिता । भगवद्गीता । त्यांनि वदवीली ।।

*(चाल बदलून)*

दांभिकाशी अति दुर्दमनिय लढा त्यांनि दिधला ।
महाराष्ट्राची परंपरा ती पुढती नेण्याला ।।
अन्यायावरि मात करोनी त्यांनी त्या समया ।
आमुची मराठी अम्हा शिकविली परतुन बोलाया ।।
तो संत राणा हो श्रेष्ठ । साहुनी कष्ट । दंडण्या दुष्ट ।
या अवनीवर अवतरला । भूषवून महाराष्ट्राला ।
तो वंद्य झाला जगताला ।
दिले उघडुनी ज्ञानाचे कोठारचि आम्हाला ।
महाराष्ट्राची परंपरा ती पुढती नेण्याला ।।

एकनाथ, जनी, संत तुकोबा अभंग जे बोले ।
'मराठा तेतुका मेळवा' रामदास वदले ।

*(चाल बदलून)*

थोर परंपरेचा रथ । शतके झुगारित । अखंड धावत ।
मोठ्या वेगाने पुढे आला । सह्याद्रीवरी पठाराला ।
गातो मी त्याच्या पोवाड्याला ।। जी ।।

*(चाल बदलून)*

ते वीर मावळे गडी धन्य जाहले । स्वातंत्र्यसंगरी करी शस्त्र घेतले ।
आणि प्रतिकाराचे कुंड पेटवुन दिले ।
गिरिकंदराला उठविले । गड कोटांना हलविले ।
शिवराय त्यात रणधीर । त्यानि घनघोर ।
कपारीतून शिंग फुंकिले ।। जी ।।

*(चाल बदलून)*

मोंगलांच्या साम्राज्याला । तोंड देण्याला । सज्ज जाहला ।
दख्खन सारा खडबडून उठला । बघून दिल्लीचा ऊर फुटला ।
आदिलशाहिचा धीर सुटला ।। जी ।।

*(चाल बदलून)*

औरंगजेब शिरजोर होऊन आला ।।
आणि आदिलशाहीची जोड मिळाली त्याला ।।
थैमान त्यानि मांडिला । लुबाडून मराठी मुलखाला ।
पोसाया जुलुमशाहीला । साम्राज्य दिल्लीचे दख्खनवर करण्याला ।।
लुटालूट जाळपोळिला । सीमा नसे अत्याचाराला ।
अब्रूचे जिणे जगण्याला । नाही आशा उरली कोणाला ।
मरणाची पसरली छाया चारी बाजूला ।।
जुलुमाच्या मध्यरात्रीला ।
तेव्हा स्वातंत्र्याचा वारा वाहु लागला ।।
लोटून ढग बाजूला ।
मावळा तारा होऊनि चमकू लागला ।।

*(चाल बदलून)*

मेघापरी हाक देते झाले शिवाजी । मग उठे तानाजी ।

बहिर्जी नि येसाजी । हंबिरराव आणि बाजी । मालसुरे आले सूर्याजी ।
हो मावळे मर्द रणगाजी ॥

*(चाल बदलून)*

करवंदीपार झिंगलेली । ऐकुनी हाक हर्षली ॥
दरडीने जांभई दिली । कळकाने मान डुलविली ॥
किल्ल्याने धाप टाकिली । बुरूजाने बाहु उभवीली ॥
त्या भयाण जाळीखाली । तलवार चमकू लागली ॥
घोड्याची टाप वाजली । वर धूळ उडू लागली ॥

*(चाल बदलून)*

राखाया या महाराष्ट्रा । उठे मरहाठा । रण करण्याला ॥
भुइकोट किल्ल्याच्या तटा । मारुनी रट्टा । पाडू लागला ॥
पट्टा घेऊन रोखिल्या वाटा । वैऱ्याचा पिट्टा । त्याने पाडीला ॥

*(चाल बदलून)*

रणधुमाळीमध्ये हेटकरी रक्ताने नाहला ।
महाराष्ट्राची परंपरा ती पुढती नेण्याला ॥
तोरण्यावरी स्वातंत्र्याचे तोरण बांधियले ।
पुरंदर, रायगड, पन्हाळा किल्ले सर केले ॥
मोंगली सैन्य पेंढार । देऊनि त्या मार । केले बेजार ।
औरंगजेब नमविला । दिल्लीरखान दमविला । शाहिस्तेखान शासिला ।
मर्द मावळा निर्भय लढला बुरुजा बुरुजाला ।
महाराष्ट्राची परंपरा ती पुढती नेण्याला ॥
सह्याद्रीच्या शिखरावरूनी फेकु दूर नजरा ।
पाहू चला त्या महाराष्ट्राच्या अजिंक्य आरमारा ॥

## चौक तिसरा

आंग्र्यांचे मोठे आरमार । सागरावर । करी संचार । थरथरे ऊर
बघून त्याला । कान्होजी आंग्रे सिमेवरला । महाराष्ट्राचा बालेकिल्ला ॥ जी ॥
महाराष्ट्र करण्या पादाक्रांत । इंग्रजी बेत । झाला निश्चित ।
मुंबईतून निर्वाणीचा । तळकोकणात शिरण्याचा । महाराष्ट्राला ग्रासण्याचा ॥ जी॥
हेरगिरी फंद फितुरी । यत्न नाना परी । करुनि ही सारी ।
समया समयास विफल ठरली । आंग्र्यांची फौज बिनीवरली ।
इंग्रजांपुढे नाही हरली ॥ जी ॥

*(चाल बदलून)*

कोकण समुद्रकाठ । जंगल झाडी घनदाट ।।
त्या गोव्यापासून थेट । कुलाब्याला भिडे जो नीट ।
चौबुरजी किल्ले भुइकोट । त्यावरील तोफा अफाट ।।
बेलाग बुरूज बेफाट । वैऱ्याला मृत्यूची वाट ।।

*(चाल बदलून)*

एके दिवशी अरबी सागर । होऊन स्थिर । होता झोपला ।।
आणि त्याच्या उशाशेजारी । मराठा गडकरी । होता बैसला ।।
तोफेत घालुनी गोळा । लावुनी डोळा । पहारा करण्याला ।।
त्या शांत मध्यरात्रीला । कराया हल्ला । इंग्रज आला ।।

*(चाल बदलून)*

चाहूल तोफखान्याला त्याची लागली ।।
गडगड गडाट गडावर तोफ घनगर्जली ।।
सतराशे सत्तावीस साली । सागराची झोप उडाली ।।
तांडेल, भंडारी, कोळी । आंग्र्यांची आरमारी शक्ती रणी उतरली ।।
चौफेर धावू लागली । इंग्रजी आरमारां तुडवित पायाखाली ।।
सागरी झुंज सुरू झाली । मराठ्यांनी झेप घेतली ।
जोराची धडक मारिली । इंग्रजांची 'डर्बी' नौका पालथी केली ।।
किती मुंडकी तुटली त्या वेळी । पाण्यात प्रेते बुडाली ।
आणि लाटांवरती टोपडी तरंगू लागली ।।
रक्ताची लाली दर्याला रंगिन आली ।।
इंचवर्ड साहेबाची दाणादाण उडाली ।।
मराठ्यांची सरशी झाली । गोऱ्यांनी शस्त्रे सोडिली ।
टाकून रण माघार त्याने घेतली ।।

*(चाल बदलून)*

मावळे लढाईत दर्दी । दर्यावर्दी । करून गर्दीला ।।
मारुनी मार बिनतोड । साहेबाचा मोड । लढाईत केला ।।
रिपु नाही पुढे येऊ दिला । त्याने रोखिला । विजयदुर्गाला ।।

*(चाल बदलून)*

पराजया मग पदरी घेऊनी क्षणभर दम घ्याया ।
गोऱ्यांनी गाठली मुंबई जखमा बांधाया ।।

विजयदुर्गापुढे विजयि जाहले मराठी झुंझार ।
मागे परतले महाराष्ट्राचे विजयी आरमार ।।
त्या विशाल नौकांवरून । गोव्यापासून । करी भ्रमण ।
तेजाळ त्यांना पाहून । आणि मनी मुग्ध होऊन । आनंदे मागे जाऊन ।
आंग्र्यांच्या आरमारा नदिपति मागे देता झाला ।
महाराष्ट्राची परंपरा ती पुढती नेण्याला ।।
सन अठराशे सत्तावनचा चौक ये पुढचा ।
पारतंत्र्यातील बंडाचा आणि सशस्त्र क्रांतीचा ।।

## चौक चौथा

इंग्रजी कारकीर्दीचा । परदास्याचा । वृक्ष गुलामीचा । धरुनी मूळ आला वर वेगात ।
कंपनी अंमल बसला भारतात । राष्ट्र संपूर्ण पडले बंदात ।। जी ।।
त्यांनी आपुली सत्ता स्थापिली । जनता नाडली । पार तंग केली । दरारा बसवून
साऱ्या देशात । हिंद परि पुन्हा उठला त्वेषात । अठराशे सत्तावनच्या बंडात ।। जी ।।
त्या वेळी एक अग्रणी । शूर स्वाभिमानी । चमकले रणी । सेनानी तात्या टोपेचे
नाव । ज्याने शत्रूचा घेउनी ठाव । मारिले कठिण घावामध्ये घाव ।।

*(चाल बदलून)*

बंडाचा वणवा देशात जेव्हा पेटला । तो दाहि दिशेला जळत धावू लागला ।
लक्ष्मीबाई हिरकणी देऊनिया जोडीला । तात्याला महाराष्ट्राने रणी लोटला ।
वुइंडहॅम गोऱ्या साहेबाला । वेढून मार त्याने दिला । बहाद्दराने कानपूरवरती
ताबा बसविला । मग मोठी फौज घेऊनि झांशिला गेला । ग्वाल्हेर आणि काल्पिला ।
जोराचा लढा त्यानं दिला । बंडाचा मोड परि झाला । अपयश आले तात्याला ।
धारातीर्थी लक्ष्मीबाईनी देह ठेविला । पुढे हासत तात्या टोपे फासावर गेला ।
दख्खनचा दीप तो उत्तरेत मालवला। तुम्ही शांत ऐका वृतान्त पुढे घडलेला ।

*(चाल बदलून)*

डोंगरात डरकाळी दिली । आरोळी झाली । उमाजी आला
जळी, स्थळी, स्वप्नामाजी । दिसे उमाजी । आंग्ल सत्तेला ।।
तोडण्या बेड्या दास्याच्या । परक्या सत्तेच्या । प्रतिकाराला

*(चाल बदलून)*

उमाजी नाईक आला । झाला गलबला । धडकी कैकाला ।
भरली, शत्रूला कंप सुटला । उमाजीराव आला बाभुळसरला ।
जाहीरनामा जाहीर केला । आवातनं दिले त्याने सकला ।
उठविले मांग रामोशाला । इंग्रजाविरुद्ध लढण्याला । गोरा सैनिक

पहारेवाला । भयभयीत झाला बघुन त्याला । बंदूक टाकून पळत
सुटला । विजारसुद्धा जड झाली त्याला । मॅकिंटॉश साहेब
घाबरला । गनिमी काव्यानं उमाजी आला । साहेबाचं भुस्काट
पाडायला हो माळानं दादा ॥ जी ॥

*(चाल बदलून)*

विश्वासघात जाहला । नाईक पकडला गेला ॥
इंग्रजांनी फासावर त्याला । देवोनी दम घेतला ॥
गाजवून महाराष्ट्राला । रामोशी धन्य तो झाला ॥

*(चाल बदलून)*

वासुदेवराव बळवंत फडके फडकला ॥
उलथाया परकी सत्तेला ।
सशस्त्र बंडाचा कयास त्यांनी केला ॥
महात्मा फुले लाभले महाराष्ट्राला ॥
अन्याय निवारुनि न्याय द्याया दलिताला ॥
टिळकांनी घालुनी साद सिंह उठविला ॥
उन्मत्त गोऱ्या गजाला । निर्भय इशारा दिला ॥
'पळ काळे कर लवलाही केसरी आला' ॥
थांबवून मुळशी, बिळाशीच्या सत्याग्रहाला ॥
त्या बेचाळीसच्या साताऱ्याकडे चला ॥

*(चाल बदलून)*

बंदूक ठासून उठे शेतकरी । तेली, तांबोळी ।
गुलामगिरीची होळी पेटवून मग मारी गोळी ॥
नांगर सोडून कुळव सोडून मोहहि सर्वांचा ।
मालक होउनि मिरवु लागला तो महाराष्ट्राचा ।
त्यांनी ग्रामराज्ये स्थापिली । नाकी बसविली । साताऱ्यात पहिली ।
अशक्य आज असलेले । ते शेतकऱ्यांना दिसले । त्यांनी शक्य करून दाविले ।
शेतकऱ्यांचा सहाय्यक वाली सह्याद्री झाला । महाराष्ट्राची परंपरा ती पुढती
नेण्याला ॥ शेचाळिसचे पर्व क्रांतिचे हलवी विश्वाला ।
ते पहाण्याला मुंबापुरीला सारे चला चला ॥

## चौक पाचवा

एकोणिसशे शेचाळिसाला । फेब्रुआरीला । मुंबई बंदराला ।
बंडाचा खलाशांनी केला । गुलामी शृंखला तोडण्याला ।

त्यागाचे पेटविले कुंड धरून धीराला । धड धड धडा धावुनि त्यासंगं ।
कामगार चंग । बांधुनी, दंग रणावर झाला ॥ जी ॥
महायुद्ध गेले संपून । रक्तमंथन । त्यात न्हाऊन ।
भारतीय खलाशी आला भारतात । सुखाचे दिवस बघत स्वप्नात ।
घेऊन कैक आशा हृदयात ॥ जी ॥
त्या वेळी इंग्रज होते । जेते रणकर्ते । मग कोण पुसते ।
हिंदी खलाशांचा काय बडिवार । 'सुवर' म्हणूनिया होत सत्कार ।
आणि कमरेत लाथेचा मार ॥ जी ॥

*(चाल बदलून)*

कहर झाला खलाशांना जीवनाचा कंटाळा आला ॥
स्वाभिमान चेतला त्यांचा मग धीर जरा वाढला ॥
खलिता पाठवून दिला निर्वाणीचा त्यांनी साहेबाला ॥

*(चाल बदलून)*

द्यावी वागणूक मानाची योग्य आम्हाला
वेतन पुरे, कसदार अन्न खायाला ॥
आणि बंद करा त्या तुमच्या जुन्या खोडीला ॥
वाचून अशा खलित्याला । ॲडमिरल गॉडफ्रे बिथरला ।
रागाने लाल जाहला । डोईवर भुवया गेल्या दात आवळला ।
फेंदारून नाक बटबटा पाहू लागला ।
उंदराने धमकी मांजराला । द्यावी तसे वाटले त्याला ॥
गालाच्या आत 'बास्टर' बोलू लागला ।
मंजूर मागणी नाही नकार धाडीला ।
खलाशांना चेव मग आला । एकवटून सर्व शक्तीला ॥
संपाचा सोटा घेतला । जुमानून वर पेलिला ।
साहेबाच्या डोक्यावर जोराने हाणीला ॥
तलवार कँपवर त्यांनी संप सुरू केला ।
कॅंसल बराकीमध्ये स्वस्थ बैसला ॥

*(चाल बदलून)*

पाहून असा प्रकार । इंग्रजी नूर । पालटला पार ।
टाकिले त्यांनी जुन्या डावास । ठकविले जसे उमीचंदास ।
तसे उखडून द्याया खलाशास ॥ जी ॥
म्हणती आम्ही सत्य सांगतो । तुमचे ऐकतो । मागण्या देतो ।

संप परि तुम्ही मागे घ्यावा । घोर हा प्रसंग टाळावा ।
जलदिने तुमचे म्हणणे कळवा ।। जी ।।

*(चाल बदलून)*

डावात खलाशी आला । मुंबई बंदराला बेसावध झाला ।।
इतक्यात गोऱ्या साहेबानं । जाळं टाकून । वेढा घातला ।।
सैनिक ठेविला खडा । घेउनि रणगाडा । मशीनगनवाला ।।
शस्त्राचा चिमटा लावून । दावा साधून । मग गुरगुरला ।।

*(चाल बदलून)*

वेढा केला आम्ही पुरा लढण्याची भोळी आशा तुम्ही नका धरू ।
सागर लढवून नौका बुडवून आरमाराचा नाश करू ।। जी ।।
सार्वभौम सम्राट आम्ही नच समरांगणि कधि मागे फिरू ।
हट्टा सोडुन आम्हा हात जोडून शरण यावे तुम्ही नका मरू ।। जी ।।

*(चाल बदलून)*

खलाशांनी मग शेवटची । विनवणी केली देशाची ।।
काँग्रेस आणि लीगची । अन् हिंदी क्रांतिकारकांची ।।
कम्युनिस्ट, कामगारांची । परंपरा थोर की ज्यांची ।।

(चाल बदलून)

घनगर्जना गगनी घुमली स्थिरला सागर ।
खलाशांनि मग कंबर कसली करण्या संगर ।।
मारा कराया मागे मुरडले निर्भय मैदानी ।
नांगर टाकुनी नौका नांगरल्या नौकानयनांनी ।।
चमक, अमला, इंद्रधनुष्य, आली आवंती ।
नटलि नर्मदा, पंजाबासह सजली कलावती ।।
नांगरून नौका आडल्या । तोफा चढल्या । नीट बैसल्या ।
गोळ्यांनी लावाया धार । पोलादी करून निर्धार । मग त्यांनी केला पुकार ।
ताजमहालावर तोफा रोखून मग बोले बोला ।
उठवा वेढा नातरि हा घ्या हा आला गोळा ।।
अथांग अरबी सागर ऐकुन आनंदे भरला ।
लाट आवरून, मान उंचावुन हळू हळू हसला ।।
खलाशांची ती हाक चहुकडे हवेत दुमदुमली ।
मुंबापुरीच्या कामकऱ्यांच्या हृदयाला भिडली ।।

*(चाल बदलून)*

ती हाक ऐकता कामगार मग उठला ।।

खलाशांना सहाय्य करण्याला ।
संपाचा घण मग त्याने हाती घेतला ॥
हादरले वायुमंडळ असा गर्जला ॥
कारखाने आणि गिरण्याला । थांबवून पार यंत्राला ।
कारभार ओस पाडिला । सामसूम केले नगराला ।
इंग्रजांनी लष्करी कुमक आणली शहराला ॥
रणगाडा धावू लागला ।
आणि विमान तळपू लागले कराया हल्ला ॥
कामगार आला रस्त्याला । उभारून भुईकोटाला ।
दमगीर केला हिसडून मशीनगनवाला ॥
तो शिवाजी पार्कला हातघाईवर आला ॥
परळात प्रलय मांडिला । विसरून देहभानाला ।
त्यांनी लालबागला लाल रंग आणीला ॥

*(चाल बदलून)*

त्याचे नयनी रस अग्नीचा लागे उसळाया ।
पूर होऊनी पुढे पातला वैरी वितळाया ॥
भयाण झाली मुंबानगरी विमाने वर उडती ।
चिरडाया जनतेला पोलादी गाडे धडधडती ॥
कामगार कोटावर चढे । होउनी पुढे । ठाकले खडे ।
धावते दुर्ग अडविले । फोडाया लढू लागले ।
दारिद्र्य लढू लागले । त्वेषाने भिडू लागले ।
रणांगणी ते तुच्छ मानी डमडम गोळीला ॥
महाराष्ट्राची परंपरा ती पुढती नेण्याला ॥
राजरस्त्यावर निज रक्ताचा सडा सांडियेला ।
महाराष्ट्राची परंपरा ती पुढती नेण्याला ।

## चौक सहावा

महाराष्ट्र हा नव्या युगाचा बजावून जगता
समाजसत्ता आता मागतो स्वायत्त स्वाधिनता ॥
तो पाचारि बुद्धिवाद्यांना । आणि जहालांना । शेतकरी यांना ।
उभवु या ऐक्याची भिंत । महाराष्ट्र करुनि संयुक्त ।
दुःख दैन्य दिसेना जेथ ।
लोकशाहिचे नंदनवनचि करण्या या भूला ।

महाराष्ट्राची परंपरा ती पुढती नेण्याला ।।
जिथे ना उरे कोटि जनाला जगण्याची भ्रांता ।
जिथे न थारा निरंकुशा आणि त्यांची अहंता ।।
परक्यांनी पाडिले खंड । असुनी अखंड । केले त्रिखंड ।
तो निझाम मराठवाड्याला । सालाझार शोषी गोव्याला ।
महाविदर्भ वेगळा झाला ।
या शकलांना या सांधू या, या, या, पुढे चला ।
महाराष्ट्राची परंपरा ती पुढती नेण्याला ।।
साद घाला वारल्याला, हेटकरी, कोळी, भिल्ला ।
अठरा पगड जातिला बोलवा संयुक्त करण्याला ।।
सालाझारासह नंगी निझामी करोनिया नष्ट ।
एकभाषिक तीन कोटिंचा निर्मा महाराष्ट्र ।।

*(चाल बदलून)*

सांधुनी मुंबई विशाल महाराष्ट्राला ।।
संयुक्त होऊनी साथ देण्या दुसऱ्याला ।।
शेजारी महागुजरात निर्मायाला ।।
आसाम, आंध्र, ओरिसा, बिहार, तामिला ।।
त्या संयुक्त कर्नाटका आणि केरळा ।।
स्वायत्ता देऊनी या साऱ्या घटकाला ।।
जमवुनी सारे हे तारे गुंफुनी माला ।।
या हिंद देशाच्या गळ्यात घालायाला ।।
विराट भारतीय संघराज्य करण्याला ।।

*(चाल बदलून)*

बा महाराष्ट्रा हो जागा झुगारून निद्रा ।
महाविदर्भ गोवा, मराठवाडा सारा । सांधुनी देश हा ।
तीन कोटिंचा प्यारा । ने पुढे थोर परंपरा ।
म्हणे अण्णा साठे घे मुजरा । धीराच्या धीरा ।
मराठी शाहीरांच्या शाहीरा ।। जी ।।



# स्तालिनग्राडचा पोवाडा

**चौक पहिला**

दलितांचा आशाकिरण । रशियाचा प्राण । जनजंगी ज्यानं लढविले रोस्तोव
आणि खार्कोव । रक्षिले लेनिनग्राद मॉस्को नाझींचा काळ तिमोशेंको ॥ जी जी ॥
फितुरीची उठली डाकीण । बर्लिनहून । गेली चालून फ्रान्साचे पेताँ आणि डार्ला ।
धरून नॉर्वेवर पाय रोवला । क्विस्लिंग वंदन करी तिजला ॥ जी ॥
भांडवलदारांना भीति । क्रांतिची होती । म्हणून या मूर्ति । शरण गेल्या नाझी फितुरीला ।
देशद्रोहाचा कळस केला । स्वातंत्र्य विकून नाझीला ॥ जी ॥
फ्रान्सचे नीच पुढारी । करिती फितुरी । चरचरा चिरी । मान फ्रान्सची, झाले बेइमान ।
कम्युनिस्टांची मुरगळलि मान । म्हणुनि नाझिचा झाला थैमान ॥ जी जी ॥

*(चाल दुसरी)*

अजिंक्य प्रचंड पलटण असून फ्रान्सला ॥ देशद्रोही नेत्यांनी तिचा घात हो केला ॥ सामील झाले नाझीला ॥ पॉप्युलर फ्रंटचा धुव्वा आधी उडविला ॥ मोठमोठे देश अभिमानी दिले फासाला ॥ कम्युनिस्ट पक्षावर वरवंटा फिरविला ॥ फितुरीनं फ्रान्सचा खांब पोखरिला ॥ हिटलरी हस्तकांनी नंगा नाच मांडिला ॥ म्हणुन नाझी फ्रान्सवर आला । फ्रान्सचा वीर आडवाया पुढं धावला । नाही लाज राष्ट्रवाद्यांला । त्यांनी हुकूम मागाहून दिला । सारं सैन्य मागं घेण्याला । अन् येताना पाडू नका सोमवरीला पुलाला ॥ असल्या ह्या काळ्या कृत्यानं नाझी सर झाला ॥ जी जी ॥

*(चाल पहिली)*

शस्त्रास्त्रे दारूगोळा भरून । बर्लिन हुकुमावरून । पॅरिस सर करून । शिरले युरोपात
नाझी भडकून । कैक देश पायांखाली तुडवून । संगिनी रक्तामधी बुडवून ॥
रुमानिया, फ्रान्स, बल्गेरिया । घेऊन सर्विया । झेक, नॉर्विया । जिंकूनी गेले डेन्मार्कात ।
सर्व देशात झाला आकांत । सडुनि किडे पडले कैक प्रेतात ॥
मग खूष झाला हिटलर । पाहून हे सारं । करी विचार । म्हणे हे लष्कर आमचे जोरदार ।
याने युरोपला केले बेजार । आता मी सार्वभौम होणार ॥ जी ॥

*(चाल दुसरी)*

हिटलरी हुकूम मग सुटला हेस साहेबाला ॥ तुम्ही जावे ग्रेट ब्रिटनला । अन् सांगा सूत्रधाराला । बंद करतो आता लढाईला । परि मान्यता द्यावी आजला । जिंकलेल्या

आमच्या युरोपाला । अन् गप् बसा एका बाजूला । आम्ही करितो रशियावर हल्ला । दडपून देतो कम्युनिस्ट भूत या वेळा ।। हेर हेस डुलवी मानेला । 'फ्युरऽऽर कबूल आहे मजला ।' हिटलरी आज्ञा घेउनि हेस चालला ।। जी जी ।।

(चाल पहिली)

सोविएटविरोधी कट । उभाराया तट । उडाला फॅसिस्ट । स्कॉटलंडमध्ये पडला जाऊन । इंग्रजांचा युद्धकैदी होऊन । क्रुद्ध झाले जन त्याला पाहून ।।
जनतेने केली पुकार । ऐका सरकार । हेस हा चोर । संयुक्त कोर्टात त्याला खेचून । लोकशाहीचा शत्रू समजून । नाझी हा खास काढा ठेचून ।। जी जी ।।

## चौक दुसरा

(चाल पहिली)

नाझीनी बेत मग केला । हेस परि गेला । करू या म्हणे हल्ला । रशियाचा लाल कोट पाडून । सोविएट लोकशाही मोडून । आशिया सारा घेऊ जिंकून ।।
सन एकोणीसशे एकेचाळ । मोठे जंजाळ । युद्धाचा काळ । जून बावीस तारखेला । नाझी सैन्याने हल्ला केला । मध्यरात्रीच्या सुमाराला ।।
अनाक्रमणाचा करार, मोडून पार । दरोडेखोर । अचानक शिरले युक्रेन प्रांतात । कीव राजधानी घेऊन कबजात । कैक रणवीर पडले समरात ।।
दोन हजार मैल आघाडीला । नाझी उभा झाला संगिनीवाला । एक कोट लुटारू हो तय्यार । घेऊन रणगाडे तोफा अपार । झाकला सूर्य पडला अंधार ।।
रशियाचा प्राण स्तालिन । बोले गर्जून । हात त्याचे दोन वोरोशिलोव तिमोशेंको उठले । लाल फौजेला हुकूम सुटले जणू सागरी तुफान उठले ।। जी ।।
दुंदुभि झडे मॉस्कोत । नाद गगनात । गेला दुमदुमत रूस खडबडून जागा झाला । हात आपोआप बंदुकीला गेला, तय्यार वीर झाला ।। जी ।।
सोविएत छायेखाली रूस होता बसलेला ।। फितुरीचे नाव नाही ठावे ज्याच्या जन्माला ।। लागला होता त्याचा डोळा नाझी वाटेला ।। एवढ्यात आवाज त्याच्या कानावर आला । आणि वीर सिद्ध हो झाला । बांधून शस्त्रे कमरेला । सोशालिस्ट कोंदणी जन्म जयाचा झाला ।। तो कसा स्वस्थ बसणार अशा वेळेला ।। वेगाने पुढे तो आला । रोखूनि संगिनी आडवा झाला नाझीला ।। जी जी ।।

(चाल : दिल्लीच्या दरवाजाला)

धावून जाई नाझीवर । रशियाचा लाल झुंजार ।। प्रतिक्रांतिचा भस्मासुर । गारद कराया पार ।। चढवित हल्ला अनिवार । किती नाझी झाले थंडगार ।। शत्रू होता संख्येने फार । धुमाळीने धावे रणावर ।। लाल फौज मारूनी मार ।। लुटारूंचा घेई समाचार ।। जी जी ।।

(चाल : दांगटाची)

जर्मनांनी मोठा जोर केला । कित्येक गावात नाझी शिरला । रोस्तो अन् खार्को संग्रामाला । कित्येक लाख नाझी ठार झाला । भाडोत्री शिपायांशी मुकला । मग सेबास्तोपोल किल्ला । घेण्याचा बेत त्याने केला । वेढा देण्याला तिकडे गेला । आठ महिने हा किल्ला लढला । अवसर मिळाला रशियाला । कडेकोट बंदोबस्त केला । मॉस्को शहराच्या आघाडीला । तिमोशेंकोने कोट रचला । संघटित करून फौजेला । सेबास्तोपोलचा किल्ला । नाझीला खाली करून दिला । झाला तैयार झुंजण्याला । लेनिनग्राड लढविण्याला । ऐका म्हणे भाई ॥ जी जी ॥

## चौक तिसरा

(चाल पहिली)

जिंकित शहरांपाठी शहर । नाझी निशाचर । करीत अत्याचार । आले लेनिनग्राद शहर भूमीत । अगणित गोळ्या घेऊन पाठीत । पळती माघारी धूम ठोकीत ॥

परतला पुन्हा जर्मन । आला धावून । कोट पाडून । उपनगरात हल्ला केला । लाल सैनिक पुढे भिडला । पुन्हा लढाईला रंग चढला ॥

वेशीत तोफ धडधडे । पडति भिंताडे । अग्नि भडभडे । नाझीकडे यशकाटा झुकला । लाल सैनिक खिन्न झाला । निराशा झडपी हृदयाला ॥ ३ ॥

(चाल : तव समान...)

स्तालीन बोलला बोला । रणावरील लाल फौजेला । लेनिनग्राद शहराला । लेनिन या पूज्य नावाला ॥ जरि नाझी पाय लागला । हे लांच्छन आम्हा नव मनूला । हे वैभव कामकऱ्यांचे । सोविएत श्रमिक जनतेचे ॥ आले लुटाया गुंड नाझींचे । कापाया काळीज आमुचे ॥ म्हणून आण घे समरांगणात । जोवरी शत्रू रशियात । तोवरी शस्त्र हातात । घेऊन लढू अविश्रांत ॥ गनिमांचा करू नि:पात ॥ रक्ताचा थेंब शेवटला । अखेरीची गोळी कमरेला । तोववील मारा गनिमाला । वाचवा मायदेशाला ॥ जी जी ॥

(चाल बदलून)

हा बोल लाल वीराच्या हृदयी भिडला । संतप्त जाहला त्वेष तयाला चढला । कडकडुनि मेघासम नाझीवर तो पडला । निकराचा हल्ला चढविला । बेहिम्मत केला । पुन्हा लढण्याला ॥ जी जी ॥

(चाल दुसरी)

मग नाझी मॉस्कोला गेला । घनघोर संग्राम झाला । दिली धडक लाल फौजेनं मागं हटविला ॥ वेशीपासूनि दोनशे मैल उडवुनि दिला ॥ अगणित बळी देऊनि घेतले खार्कोला ॥ सहा लाख नाझींचा मुडदा पडला रोस्तोवला ॥ प्रेतांचा ढीग साचला । गोबेल्स उभा वर झाला ॥ आणि सांगे सर्व जगताला । आम्ही सर केले रोस्तोवला । सोविएत

राज्य आता बुडवू वेळ नाही त्याला ।। घेऊन रोस्तोव खार्कोला । नाझींच्या सैन्याने मोठा कहर हो केला ।। जो जो गाव त्यानं सर केला । लाविली आग मग त्याला । लोकांच्या लुटति धान्याला । जरि कोणी विरोध हो केला । कापिती त्याच्या मानेला । झिंगती पिऊन दारूला । अबलांच्या लुटती शीलाला । कम्युनिस्ट म्हणून युवकांच्या तोडिती हाताला । बलात्कार आणि खुनाला । नाही दाद अत्याचाराला । पराजित रशिया जुलुमाने गनिम हो झाला ।। जी जी ।।

सूड सूड शब्द देशात बुलंद केला ।। जिथं तिथं गनिम नाझीला । जंगलात दिसू लागला । बिचकवी झुडुप मग त्याला । बंदुकीचा नेम झाडाने नाझीवर धरला ।। मातीचा ढीग गनिमांचा रंग रंगला ।। दारूची निशा गाडीला । सोडूनि रूळ लोळे एका बाजूला ।। बुरुजावरचा पूल स्वेच्छेने गगनी तो गेला ।। आपोआप सांधा बदलला । खार्कोवची गाडी भेटली लाल फौजेला ।। पाहून या उलथापालथीला । विसरला नाझी भानाला । वरिष्ठाचे पत्र उफराटे वाचू लागला ।। पिछाडीच्या नाझीची आशा नाही आघाडीला ।। जी जी ।।

*(चाल पहिली)*

ओढे, खोडे आणि नदिनाले । झाडे जंगले । झुडूपहि बसले । गनिम होऊन पिछाडीला । नाझी पिछाडीवर करून हल्ला । कापी नाझींच्या शेपटाला ।। जी जी ।।

पुढे तिमोशेंकोची फौज । उभारूनि ध्वज । उधळित तेज । पिछाडीला गनिम सैन्य मारी लाथ । नाझीला धरून लाल चिमट्यात भुलविला अरी त्यांनी रशियात ।। जी जी ।।

## चौक चौथा

*(चाल पहिली)*

रशियाची पोकळ भिंत । नाझी शोधीत । शिरकावया हात । नाही पर कोठे वाव मिळाला । लाल फौजेचा जोर कळला । त्यांनी मग आपुला मोहरा वळला ।।

*(चाल बदलून)*

जिला वळसा घालून नदी वोल्गा आहे गेली । ती स्तालिनग्राड नगरी तिच्या तिरी वसली । वर फडकत झेंडा लाल वैभवशाली । ही झारित्सिन होती पहिली । सतरा साली । बोल्शेविकांची मुकुटमणि झाली ।।

तो मणी घ्यावया हिरावून फॉन हॉथ आला । दहा लक्ष नाझी फलटण त्याच्या मदतीला । त्यानं तिन्ही बाजूनं वेढा शहराला दिला । पुढे जो जो प्रकार झाला । सांगतो तुम्हाला या समयाला ।। जी जी ।।

*(चाल पहिली )*

यांत्रिक सैन्य प्रबळ । मोठे पायदळ । निशाण काळ । रणगाड्यांचा ढीग रचला । विमान दाटले विमानाला । आणीबाणीचा काळ आला ।।

स्तालिनग्राडवर हल्ला । करण्याला आला । जर्मनीवाला । बंदूक बायोनेट सैन्य अनिवार ।

रोखल्या तोफा अडिच हजार । आता स्तालिनग्राड लढणार ।।
स्तालिनचे सुटले फर्मान । उठा सारे जन । करा रक्षण । मायदेशाचे, रक्त सांडून ।
तसू अन् तसू जमीन लढवून । असंख्य नाझी काढा कापून ।।
शहराचा रंग बदलला । पुन्हा रंग आला । निराळाच झाला । झाले आशियाचे रणमैदान ।
नाझी फौजेचे घ्यावया प्राण । गाडाया बनले कब्रस्तान ।। जी जी ।।

*(चाल : दिल्लीच्या दरवाजाला )*

शहराचे कराया रक्षण । बांधिले कोट जनतेनं ।। खंदकाचिया भिंतीनं ।
नटविले तिन्ही बाजूनं ।। लेनिनची ध्वजा उभारून । करावया देह कुर्बान ।
धावली अबला तरुण ।। जी जी ।।

*(चाल दुसरी )*

लाल फौज होती तय्यार त्या वेळेला ।। घेऊन स्तालीन नगराला । बाकूला जाण्याचा बेत नाझीला कळला ।। मार्शल तिमोशेंकोनं युद्धव्यूह रचला ।। कारखाने नेले पिछाडीला । पिछाडीच्या बंदोबस्ताला । दहा लाख लाल सैनिक त्याने उभा केला ।। तोफेची लावली रांग दरवाजाला ।। चहूकडे शिपाई उभा केला । बंदुकी त्यांच्या खांद्याला । चिलखत छातीला भाळी तारा शोभला ।। रोदिमस्तेव्ह मध्य शहरात झुंज देण्याला ।। तिमोशेंको होता उत्तरेला । फॅसिस्ट बगलेवर रोखून तलवारीला ।। ऑगस्ट तेवीस तारखेला । दोन हजार नाझी विमानांनी हल्ला चढविला ।। पाखडली आग शहरावर पहिल्या हल्ल्याला ।। पाऊण भाग शहराचा नाश जाहला ।। सोविएट शूर कामकरी नाही डगमगला ।। पेटवून घरादाराला । ज्यानं दग्ध भूमीचा टोला नाझीला दिला ।। त्यानं पडक्या घरावर तोफखाना जागिला ।। जी जी ।।

*(चाल पहिली )*

शहराचा भाग भंगला । पाहून त्याला । तिमोशेंकोला । त्वेष आला, लालीलाल झाला ।
शत्रूवर प्रतिहल्ला केला । स्फूर्तीचा जाळ पेटवीला ।।
जर्मन उठले जोरानं । तुफानी सैन्य । शस्त्रास्त्रे घेऊन । शहरावर नाझी तुटून पडला ।
पर कोटावर मारा केला । भिंत पाडून आत शिरला ।।
मुसंडीनं घुसती जर्मन । तिन्ही बाजूनं वाऱ्याप्रमाणं । लाल सैनिक आडवी त्याला ।
मारून आधी संगिनीला । मुडद्यांचा मोठा ढीग रचला ।।
तोफेचा झाला भडीमार । पसरला धूर । आवाज रणावर चोहिकडे एक आरोळी आली ।
कित्येकांच्या गोळी उरी शिरली । प्रेते बहु छिन्नभिन्न झाली ।।
एकवटून सर्व शक्तीला । जर्मन आला । जुटीने केला हल्ला ।
वोल्गाचा पूल ओलांडीला । आपल्याच मृत शिपायाला ।
तुडवित शहरामध्ये शिरला ।।

(चाल दुसरी)

फॅसिस्ट फौजेचा लोंढा शहरामध्ये आला ।। तो विद्युतगतीनं चहूकडे पसरला ।। जेव्हा नाझी शहरामध्ये आला । सर्रास जनतेवर मारा सुरू त्यानं केला ।। परि प्रतिकार पुढे फारच वाढत गेला ।। घनघोर युद्ध रस्त्याला । घरोघर बोळाबोळाला । मजला मजला नाझींच्या विरुद्ध झुंजू लागला ।। तोफेचा थर नाक्यावर गर्जू लागला ।। लाल शिपाई भिडला मग त्याला । शस्त्राचा प्रहार शस्त्राने रोखू लागला ।। किती मुडदा पडला धरणीला । रक्ताचा सडा सांडला । त्यावरून नाझीवर मारा होऊ लागला ।। जरि वीर आला भूमिला । जोम, धिमेपणा आणि शिस्त नाही विसरला ।। जिन्याखाली रक्तावर रडून मारी गोळीला ।। आडवून नाझी सैन्याला । वाचवाया लाल शहराला । शिकस्तीचा यत्न त्यानं केला । अर्पून पंचप्राणाला । दिपविले साऱ्या जगताला । परि जोर नाझींचा झाला । आशेचा किरण भंगला । निराशेचा अंधार आला । स्तालिनग्राड पडले मृत्युशय्येला ।। जग म्हणे धरले सूत त्याच्या नाकाला ।। जी जी ।।

(चाल बदलून)

चमकली वीज उत्तरेला अन् प्रकाश पडला । जनसेनापति तिमाशेंको वीर गर्जला । घेऊन फौजेला वोल्गा ओलांडून आला । देऊन शहराला धीर । मग तो नाझीवर । कोसळून पडला ।।

(चाल पहिली)

स्फूर्तीचा जाळ पेटला । स्तालिन नगराला । पुन्हा जीव आला ।
शहरामध्ये झाला शौर्य संचार । नाझीचा कराया पूर्ण संहार ।
चढविला हल्ला त्याने जोमदार ।। रणवीर रंगले रणी ।
भान नच मनी । नाझी तडफडूनि । धरणीला पडती कितिक घायाळ ।
दाणादाण झाली शत्रूची फार । वाहू लागली रक्ताची धार ।।
जगी शूर स्त्रिया फार झाल्या । कितिक होतील । कितीक असतील ।
परि बिनजोड रूसी ललना । उचलूनी कठिण बंदुकीला । गोळीपुढे
मान करी अबला ।। लावून शस्त्रे कमरेला । निघाली समराला । नाझी चिरण्याला ।
चमकली ललना लोकयुद्धात । घेऊनि तीव्र शस्त्र हातात ।
लाल रशियाच्या लाल राज्यात ।। जी जी ।।
जी दिसली कामकरी तीच शेतावर ।। ती विमान चालवी उत्तम घोडेस्वार ।। बंदूक मारी ती उभी आरमारावर ।। धडधडा धावे ती रेड आर्मीबरोबर ।। जी जी ।।

(चाल पहिली)

लाल फौज दलित जनतेची । जगत्क्रांतीची । दिव्य ज्योति साची । जनतेची भिंत उभी करणार । लोकशाहीचे युद्ध लढणार । शाहीर अण्णा भाऊ गाणार ।। जी जी ।।

## चौक पाचवा

*(चाल पहिली)*

पराजित गुलाम फौजेला । आणी आघाडीला । युद्ध करण्याला । घ्यावया स्तालिनग्राड शहर । जावया इराक इराणवर । पुन्हा मग हिंद पेशावर ।। जो जो हल्ला शत्रूनं केला । तो तो परतविला । नाझी संतापला । कराया ठार रशियाला । कपटयुद्धाचा कट रचला । तोंड नाही इतिहासी ज्याला ।।

*(चाल दुसरी)*

नाझीनी कपटनीतीचा खेळ सुरू केला । लाल वेष दिला नाझींनी आपल्या फौजेला । लाविली सोविएत चिन्हे रणगाड्याला । लाल रूप दिले विमानाला हल्ला करण्याला ।। दीपकाचा मोह पतंगाला । तसा मोह स्तालिन नगराचा नाझीला झाला ।। पुढे झेप घालू लागला । स्तालिनग्राड घेण्याला । परि गोळी लागून कैक पडला धरणीला ।। रणगाड्याखाली जर्मन कैक रगडला । जनतेच्या अभेद्य फळीचा भेद नाही झाला ।।

*(चाल पहिली )*

हजारो सोडी रणगाडे । यावया पुढे । तोफ कडकडे । स्तालिनग्राडमधून उडती । रणगाड्यांच्या भिंती फुटती । जर्मन त्यांच्या आत दडती ।।
असे रण झाले दारुण । रात्र अन् दिन । महिने गेले तीन । युद्धाला खंड नाही पडला । शहराने मोठा टिकाव धरला । हिवाळा पार निकट आला ।।
तिमोशेंको फॅसिस्टांचा काळ । पेटवून जाळ । युद्धाचा खेळ । पवित्रा बदलून खेळे समरात । बुडवी नाझीला नाझी रक्तात । स्तालिन नगराच्या अमर युद्धात ।। जी जी ।।

## चौक सहावा

*(चाल पहिली)*

पसरला बर्फ चोहिकडे गारिगार । त्याने अच्छादिले संगर झाले शुभ्र । आकाशी रक्तरंगी निशाण लहरे । त्याखाली जमले धुरंधर । रशियाचे प्यार । कराया विचार ।।
खवळावा सिंधू किंवा उठावे तुफान । उपटावे वृक्ष अजस्त्र त्यानं मुळातून । तसा प्रचंड हल्ला चढवून । रशियाच्या भूमिवरून । द्याया हाकलून । नाझी सैतान ।।
देई वीर तोफेला बत्ती । गोळे कडकडती । जाउनी पडती । फोडुनी नाझींचा रणगाडा । गर्जती दुसरी आघाडी उघडा । जगातील नाझी नाव काढा ।। जी जी ।।

*(चाल बदलून)*

वोल्गाचे पाणी गोठले । बर्फमय झाले । शिंग वाजले । लाल सेनेला इशारा झाला । तारीख २० नोव्हेंबरला । नाझीवर चढाई करण्याला ।।
धावले सेनानी झुकोव । मेजर रोदिमस्तेव । मार्शल वोरोशिलोव । स्तालिन तिमोशेंको रशियाचे । मानव जातीच्या रक्षणाचे लढाया जंग लोकयुद्धाचे ।। जी जी ।।

(चाल दुसरी)

बासष्टावी फौज रशियाची निघाली चालून ।। माऱ्याच्या जागा शत्रूच्या घेत हिरावून ।। विध्वंस करी नाझीचा हल्ला चढवून । सैरावैरा उधळी जर्मना शस्त्र सोडून ।। तोफेला भिडवले तोफखाने नेऊन ।। जसा धुरळा उडवी पवन । ढग मोठमोठे लहरीनं । किंवा पाऊस वळवाचा यावा चारी बाजूनं ।। तसा धावे नाझीवर लाल पंचानन ।। पकडाया चोर जर्मन । टाकिला पाश पोलादी तिमोशेंकोनं ।। दोन भाग लाल फौजेचे बनविले त्यानं ।। पाठविले दोन्ही बाजूनं । एक वोल्गा नदी ओलांडून । सुरोव्हिकीनोला घेऊन । आला खाली अति जलदीनं । तर उजवा भाग धावला चपल विजेहून ।। निकानिया व्हर्चिनियातून । चिरस्काया घेऊन पुढं आला झपाट्यानं ।। ते दोन्ही मिळाले परस्परा येऊन ।। लाल अडकित्त्यात तीन लक्ष धरून जर्मन ।। शत्रूला मागे रेटून । रिचकोविस्क मागे टाकून । सर केले मॅक्झीमोस्कि रेल्वे स्टेशन । रेदिनोव बोल्सीयातून । जर्मना दिले हाकलून । डागिली तोफ दार्सिका गावावरून ।। पसरले चारी बाजूनं । जर्मन रणगाड्यांची फौज वेढून । पोबारा केला नाझीनं । तेलाचा साठा टाकून । रणगाडे तेल घेऊन । चालले पुढे रशियन । नाझी रणगाडा लाविला नाझीमागून ।। अगणित युद्ध-साहित्य घेऊन रशियन । शत्रूला देत पिटाळून । नाल चिकच्या आग्नेय बाजूनं । जर्मनी हल्ले उधळून । नाझीच्या तटबंदीत खीळ मारून ।

(चाल पहिली)

स्तालिनग्रादच्या पुढं । सैन्याचं कडं । नाझीची हाडं । मोडण्यास झाली होती सुरवात । पुढं काय घडला तिथं वृत्तांत । सांगतो आता या चौकात ।।
चौफेर लाल तोफखाना । गर्जे दणादणा । रेटी जर्मना ।। आवळू लागला वेगे लाल पाश । उतरती कळा लागली त्यास । नाझींचा अंत आणी आसपास ।।
रशियाचे सेनासारंग । रणावर दंग । बांधुनी चंग । करिती तेजोभंग जर्मनांचा । रोखुनी मार्ग मदतीचा । चढवीती हल्ला निर्वाणीचा ।। जी जी ।।

(चाल दुसरी)

ज्याने तांडवनृत्य करीत युरोप जिंकिला ।। व्हर्सायचा तह मोडिला । अबिसिनिया गुलाम बनविला । स्पेनमध्ये फ्रँको स्थापिला । सतरा दिवसा आंत फ्रान्सला पराभूत केला । चेंबर्लेन साहेबाला कडक ज्यानं दम दिला ।। त्याच्य भोवती लाल फौजेचा कोट उभा झाला । बंदुकीच्या तुंब्यानं नाझी जर्जर केला ।। जी जी ।।
कुमकेचा मार्ग बंद झाला । अन्न पाणी मिळेना त्याला । बर्लिनचा आर्य भुकेला । मेलेल्या घोड्यांची मढी खाऊ लागला ।। धाव म्हणे माय बर्लिनी अशा समयाला ।। एवढ्यात स्वार एक आला । देऊनि खलिता नाझीला वेगानं गेला ।। सेनापती पॉलेस सायबानं खलिता वाचला ।। जी जी ।।

(चाल दिल्लीच्या दरबारात)

या लाल सेनेला शरण । शस्त्र सोडून । ठेवा समरात । आम्ही वेढा दिला चौफेर । तुम्हा अहा आत ।। औषध वस्त्र आणि अन्न । तुम्हा देऊन । वाचवू प्राण । इतबारे तुम्हा वागवू राखू मान ।। हा निर्णय निर्वाणीचा । रेड आर्मीच्या युद्धनीतीचा । हा वाचा खलिता अन् सांगा विचार तुमचा ।। उत्तराची तारीख नऊ । नका जाऊ देऊ । कळवा जलदीनं । नच जाब द्याल तरी निःपात करू संपूर्ण ।। जी जी ।।

(चाल पहिली )

असा खलिता पाहिला वाचून । पॉलेस साहेबानं । ऊर दडपून । तिरमिरी आली खाली बसला । कंबर बसली धीर खचला । विनाशकाळ डोळ्यापुढं दिसला ।।
एवढ्यात रेडियोवर । बोले हिटलर । शूर तुम्ही सारं । शरण नका जाऊ बोल्शेविकाला । पाठवू तुमच्या मदतीला । करा जंग लढा समरांगणाला ।।
तीन लक्ष तेहतीस हजार । नाझी लष्कर । त्यात शिरजोर । हिटलरी भर मिळाली बघा त्यास । उत्तर त्याने दिले नाही रशियास । कारण झाले ते त्यांच्या नाशास ।। जी ।।

## चौक सातवा

(चाल पहिली)

उत्तराची वेळ संपली नौबत झडली । नाझीच्या अंतांची घंटा वाजू लागली । रशियाची संगीन सारी वर उचलली । नाझींचा कराया अंत । निघाली जोरात । शत्रू-हृदयात धडकी ती भरली ।।
उतरावया नक्शा नाझींचा । निघाला रशियाचा । वीर वृत्तीचा । लाल सैनिक वीर वेगवान । भासला धनुष्यावरिचा जणू बाण । निघाला नाझींचा घ्यावया प्राण ।।
ज्वालामुखी स्फोट जहाला । कडा कोसळला । सिंह चवताळला । तुटून तो पडला नाझी सैन्यात । रणावर झाला मोठा आकांत । मुडदा किती पडला खाली रक्तात ।। जी जी ।।
नाझीहि होता लढणार । सावरून शस्त्र । आला तो समोर । शस्त्रांचा खणखणाट उठला । कैद्यांचा हात पाय तुटला । कित्येकांच्या वर्मी घाव बसला ।।
घनघोर युद्ध समराला । झाला मोड झाला । नाझी मागे फिरला । पराभवे आशाभंग झाला । प्रतिकार त्याचा थंड पडला । लाल फौजेचा हल्ला चढला ।। जी जी ।।

(चाल दुसरी)

चहुकडून लाल घणांचा घाव सुरू झाला ।। बर्फाचा थर रणावर । प्रेते त्यावर खच लागला ।। पॉलेसने युद्ध करण्याचा हिय्या सोडिला ।। फॅसिस्ट सैनिक समर सोडू लागला ।। रुमानियन भाडोत्री फौजेला । अखेरिचा टोला बैसला । तवा शरण आले रशियाला । जो तो लाल फौजेचा बंदी होऊ लागला । कैद्यांची लागली माळ स्तालिन नगराला ।। जानेवारी वीस तारखेला । पॉलेस साहेबानं शस्त्र ठेविले भूमीला ।। सोळा

सेनापतीसह शरण गेला रशियाला ।। नि:पात नाझींचा झाला । फॅसिस्ट ढग वितळला । स्टॅलिनग्राड तो चंद्र मोकळा झाला ।। गिळलेल्या स्तालिन नगराला । नाझीला मारून मार पुन्हा ओकविला । निकराचा चढवून हल्ला । सोव्हिएट फौजेने नाझी गारद केला । तीन लक्ष नाझींचा पर फडशा उडविला ।। जी जी ।।

रशियाचा लढनेवाला । धडधडा धावू लागला ।। जर्जर करून नाझीला । दौडीनं पुढे चालला ।। घेऊन परत गावाला । आधार देई जनतेला ।। लाल शकट त्यानं भिडविला । रेझेवच्या तटबंदीला ।।

*(चाल बदलून)*

फॅसिस्ट भिंत पाडून खिंडारा केला । रशियन संगिनींचा पूर आत लोटला । तुडवीत हिटलरी वेळापत्रकाला । चढवून रेझेवर हल्ला । त्याने बर्लिनला हादरा बसविला ।। सहा आठवड्यात सर करू रशिया हे स्वप्न । आणि नाझी फौज अजिंक्य ही उपमा महान । ही दोन्ही फोल केली लाल सेनेनं । हासत वदने मृत्यु कवटाळून । स्वातंत्र्य केले रक्षण । धन्य ते जन शूर रशियन ।। जी जी ।।

*(चाल बदलून)*

स्वातंत्र्य ज्योति राखाया । ती अखंड तेववाया ।। कम्युनिस्ट चौकटीतून जनजंगी झुंज झुंजून ।। मृत्युवर मात करून । तू करिसी देशरक्षण ।। पाहून तुझा हा त्याग । जग झालं सारं जागं । यावया तुझ्या मागोमाग ।। जी जी ।।

*(चाल पहिली)*

दलितांचा आशाकिरण । रशियाचा प्राण जनजंगी ज्यानं । लढविले रास्तो आणि खार्को । रक्षिले लेनिनग्राद मॉस्को । नाझींचा काळ तिमोशेंको ।। जी जी ।।

---

# अमळनेरचे अमर हुतात्मे

**चौक पहिला**

ज्याने लोकशाहिचा हक्कच स्थापायाला ।
मरणावर केली चाल, नाहि डगमगला ।
दिले मोल जिवाचे ठाकुन मैदानाला ।
तो शूर श्रीपती पाटिल हिंमतवाला ।
झेलूनी कठिण वाराला । रक्ताने उभा नाहला ।
तो मोहरा पडला समराला ।
लाल ध्वजेला दिमाखाने उंच ठेवुनी गगनाला ।। जी ।।

मी त्याचा गातो पोवाडा । जिवाचा धडा । करुनि दिला लढा । महाराष्ट्रामध्ये खानदेशात । अमळनेरच्या भरल्या चौकात । गुंड कायद्याच्या नव्या राज्यात ।। जी ।।

*(चाल दुसरी)*

निवडून दिले जनतेने राष्ट्रवाद्याला ।। मंत्री गेले विसरून पार जनता आईला ।। तेव्हा जोर आला अमळनेरच्या गिरणी मालकाला ।। कौन्सिलात त्यांचे कैवारी त्याच्या बाजूला ।। घेऊनि त्यांच्या मदतीला । दडपून कामगाराला । आणून पार जेरिला । कायमचा काटा काढावा विचार त्यानं केला ।। जी ।।

युनियनच्या कार्यकर्त्याला । वेचून गिरणीच्या बाहेर फेकायला ।। शेख नथुलाल या लढाऊ कामगाराला ।। कामावरून जेव्हा दूर केला । युनियनने त्याच वेळेला । एक खलिता पाठवून दिला । मालकाला जाब विचारला । चौकशीची मागणी केली वाद लाविला । नाही काळा कायदा मोडिला । रीतसर अर्ज पाठविला । काँग्रेसचे मजूर मंत्री नंदासाहेबाला ।। गृहमंत्री मुरारजीभाई देसाईला ।। अन्याय निवारून न्याय द्यावा आम्हाला ।। जी ।।

*(चाल डोंगरात डिरकी दिली)*

मंत्र्यांची घेतली भेट । पाहिली वाट । शांत राहून ।। गेला काळ सहा महिन्यांचा । डोळा मंत्र्यांचा । होता झाकून ।। कोपला सारा कामगार । झाला तयार । धीर धरून ।। घेई मग निर्वाणीचा । कौल संपाचा । एक होऊन ।।

*(चाल दुसरी)*

शूर अमळनेरचा कामगार खवळला ।। ऑगस्ट सात तारखेला निर्भय पार जाहला । घनघोर संपाचा डंका वाजू लागला ।। कडेकोट करून तयारीला । एकवटून सर्व शक्तीला ।

उर्मट गिरणी मालकाला । फिरवून घण संपाचा मारिला टोला ।। परि मोठा घोटाळा झाला । नोकरशाहीला धक्का बैसला । उंदराला मारले कळ आली गणोबाला ।।
जो सहा महिने निजलेला । मजूर खात्याच्या कुंभकर्णाला । एकदम विंचू चावला । मुंबईमधी वेताळ नाचू लागला ।।

*(चाल मोड)*

शेतकरी आणि मजुरानं । मते देऊन । मोठ्या आशेनं । मंत्रिपदी पाठविले ज्यांना । जनतेची कदर नुरली त्यांना । पुरे फावले नोकरशहांना ।।
खानदेशचे जिल्हा अधिकारी । शेफारले भारी । कामगारांवरी । जुलूम सुरू केला त्यांनी अनिवार । डेव्हीज डायरचा नवा अवतार । संप चिरडाया झाला तयार ।।
१४४ कलमाचा अम्मल बसविला । संपूर्ण दिले अधिकार पोलिसाला । करा बंदी मिरवणूक आणि सभा घेण्याला । जर कोणी यत्न तसा केला । तर मुळीच कचरू नका । दडपून टाका । तुम्ही दावू नका दया कोणाला ।।

## चौक दुसरा

*(चाल : हेच शिकविले काय भारता)*

लोकशाहीस्तव लोकमताने मंत्रिपदी गेले ।
विसरूनी लोका गेले पार सत्तेने धुंद बनले ।।
नाही वाळली शाई दिलेली वचने लिहून ।
नाही लोटले वर्षही त्यांना मंत्री होऊन ।।
त्यांच्या हुकुमांची जालीम शल्ये बोचून हृदयात ।
अमळनेरचा कामगार मग झाला संतप्त ।।

*(चाल मोड)*

श्रीपती पाटील दिलदार । पुढारी खंबीर । केला निर्धार । घेऊन विचार सर्वांचा । बेत त्याने केला निकराचा । पोवाडा ऐका म्होरं त्याचा ।।

*(चाल बदलून)*

शहरात सभा घेऊन । जबरीने तोंड उघडून ।। लोकशाही हक्क बजावून । हा जुलमी कायदा मोडून ।। घ्यावा न्याय तिथे मागून । नाही मार्ग याच्यावाचून ।।

*(चाल मोड)*

ऑगस्ट सत्तावीसला । सिद्ध जाहला । रस्त्यावर आला । शूर कामगार अमळनेरचा । बंदोबस्त करून मिरवणुकीचा । झुगाराया कायदा पोलिसांचा ।।
कामगार क्रांतीचा जयघोषच जाहला । दाही दिशा दणाणून गेल्या हादरा बैसला । वर लाल ध्वज आघाडीला फटकू लागला । त्याखाली श्रीपतीनं पहिला पाय उचलला । आणि पुढे चालू लागला । तो कामगार वर्गाचा । कम्युनिस्टांचा । स्वाभिमान साचा । शूर साजला ।।

(चाल दुसरी)

सहा हजार लोक घेऊनि शहरामध्ये आला ।। मिरवीत रस्त्यारस्त्याला । अमळनेरच्या मध्य चौकाला । येऊनि मोर्चा थांबला । तेथे सभा घेण्याचा बेत त्यांनी मग केला ।।

(चाल मोड)

घेउनि संगं सैनिक । अगदी निवडक । आला बघा तडक । डेव्हिड गोरा साहेब धावून । जळफळत मनी दात खाऊन । कामगारांचा हिय्या पाहून ।।

डेव्हिडने केली मग घाई । तेव्हा लवलाही । शिपाई ठाईठाई । बसविले गोळिबार भरून । आधीच अस्तन्या वर सारून । नोकरशाहीच्या हुकुमावरून ।।

अमळनेरच्या मुख्य चौकाच्या । वाटा लोकांच्या । येण्या-जाण्याच्या । पेठेचे अवघे मार्ग दोन । अडविले तेच पोलिसानं । दोन्ही बाजूनं बंदुकीनं ।।

(चाल बदलून)

अमळनेरच्या कामगाराला । वक्त हा आला । मोठा दारुण ।। शिपायांनी चार बाजूनं । धरिले आडवून । वेढा पसरून ।। आश्रय कामगारांना । मिळू नये कोणा । विचार करून ।। पेठेच्या व्यापाऱ्यांनी आपली । दुकाने बंद केली । टाळे मारून ।। परि कामगार नाही भ्याला । अचल राहिला । मेरूप्रमाणं ।।

(चाल पहिली)

दमगीर केला ज्यांनी लढून मशिनगनवाला । विराट रूप घेउनि तांडव मांडिला । आणि आंग्ल अत्याचाराचा दर्या हटविला । बाविस फेब्रुवारीला । भुइकोट करून मुंबईला । त्यांचे ते वारस थोर । होते तय्यार । बुजवाया मालकाच्या वगळाला ।।

## चौक तिसरा

(चाल मोड)

नरवणे बोलायला उठले । कैद त्यांना केले । फरपटत नेले । डेव्हिड गोरा साहेब उन्मत्त । असुन काँग्रेसी राज्य मुलखात । कचरला नाही त्याचा मुळी हात ।।

नरवण्यांचा केला अपमान । गोऱ्या साहेबानं । उठले सभाजन डेव्हिडची गुर्मी जिरविण्याला । साहेब होता पूर्ण तिथं फसला । प्रसंग पाटलांना निराळा दिसला ।।

(चाल दुसरी)

श्रीपति बिजली वेगानं पुढे तेव्हा गेला ।। लोकांना शांत राहण्याला सांगू लागला ।। साहेबानं समोर पाटलाला । बोलताना जेव्हा पाहिला । मुरारजीच्या हुकुमाची सई झाली बघा त्याला ।। पोलिसांना इशारा केला । त्यानं पाटील धरून ठेविला । पिस्तूल बाहेर काढिला । मनमुराद झाडल्या गोळ्या त्याने त्या वेळा ।। पाटलांचा बळी घेतला । सैरावैरा कामगाराला । उधळून पार देण्याला । 'फायर फायर' जोराने ओरडू लागला ।।

धडाधडा आवाज तेव्हा झाला । पटपटा कामगार खाली पडू लागला ।।

अंधार चोहिकडं झाला । दिसेनाही कोण कोणाला । डेव्हिड त्यात सैतान नाचू लागला । हेरून पुढारी टिपून मारी गोळीला ।।
पाहून विजयाबाईला । त्याने नीट नेम घेतला । रागाने चाप दाबला । इतक्यात रतन पाटील पुढे धावला ।। आणि आडवा झाला गोळीला । पाठीशी विजयाबाईला ।
घालून छातीवर घाव त्यानं घेतला ।। आणि वर्गयुद्धाच्या रणी पतन पावला ।।
गंगाधर भिला पाटील ठार जाहला ।। मोकल झुमकीराम गेला । शंकर मोतीराम पडला त्याच्या बाजूला ।। ठार झाला श्रीपती भिला । शंकर धोंडू रक्तात गार झोपला ।।
गोळीनं सोनू रंगाचा ऊर भेदीला । पाणी पाणी करीत बन्सीने प्राण सोडिला ।।
अमळनेरच्या राजरस्त्याला । रक्ताचा सडा सांडला । मुडद्यांचा खच लागला ।
झाले जखमी कैक तिथं मुकले हातापायाला ।। नऊ नेते क्रांतीचे त्यात आले कामाला ।।
मग गोळीबार बंद केला । डेव्हिड डायर शांत मागं परतला ।।

## चौक चौथा

*(चाल-योद्धा भगतसिंग)*

कामगार नेत्यांची उगवती एक पिढी पहिली । साम्राज्याच्या पोलिसांनी क्रूरपणे वधिली ।।
प्रेतांच्या राशीत श्रीपती होता हो स्तब्ध । नव्या पिढीला सांगायला शेवटचे शब्द ।।

*(चाल-मोड)*

हीं खबर अशी ऐकुनी । चरकली मनी । ती वीरजननी ।
पार्वतीबाईला धक्का बसला । थरारले ओठ कंठ सुकला ।
डोळ्यांतून अश्रु तिच्या गळला ।।
माता, पत्नि, जिवलग दोस्त सहकारी । पाहण्या आले धावोनि सारे सत्वरी ।
लागली रीघ तिथं जनता जमली सारी । श्रीपतीरावाला पाहून मरणाद्वारी ।
सारा गाव तेव्हा हळहळला । लहान थोराला । दुःख झाले भारी ।।

*(चाल दुसरी)*

जमलेल्या आप्तांना डोळेभर पाहून ।। पाटील जरासे शुद्धीवर येऊन ।। रक्ताची गुळणी गिळून । त्वेषाने मूठ वळून । बोलले बोल मरणाला मागे सारून ।।

*(चाल-हेच शिकवले काय भारता)*

'क्रांतिकार्य हे इथे राहिले अपूर्णचि आमुचे ।
पुढे नेऊनी पूर्ण करा ते कर्तव्य तुमचे ।।
जीस्तव आम्ही प्राण वेचिले झेलुनिया घावा ।
मम मित्रांनो ध्वजा लाल ही तुम्ही उंच ठेवा ।।'
असे बोलले बोल, खोल मग शब्द जाई त्यांचा ।
नेत्र झाकले, दीप निमाला तोहि कायमचा ।।

अमळनेरचे अमर हुतात्मे लाल नऊ तारे।
रक्तामाजी विझले निखारे ते धगधगणारे ॥

*(चाल-दुसरी)*

सारी प्रेते जनतेने तळहाती घेतली। मिरवीत त्यांना मग दहनभूमीवर नेली ॥ ती चितेवरती ठेविली। अन् पुनः पुनः पाहिली। शेवटचे केले वंदन शिरे नमविली ॥ भडकल्या चिता भेसूरता तिथे पसरली। मुठी वळुन कामगारांनी शपथ वाहिली ॥

*(चाल बदलून)*

या हुतात्म्यांना स्मरून। आज आम्ही घेतली आण ॥ अविश्रांत झुंज झुंजून। सर्व शक्ती पणा लावून ॥ देशात चारी बाजूनं।
न्यायासाठी पेटवू रान ॥ स्वातंत्र्ययुद्ध जिंकून।
मग न्याय मिळवू संपूर्ण ॥

*(चाल मोड)*

धन्य श्रीपतीचे अमळनेर। नऊ कामगार। ते हुतात्मे वीर।
स्फूर्ती देतील दलितवर्गास। लढाया लढा क्रांतीचा खास।
अण्णा साठेला पुरा विश्वास ॥

—•⊰⊱•—

# मुंबईचा गिरणीकामगार

**चौक पहिला**

सन एकोणीसशे आठ साली । इंग्रजानी भली । अटक बघा केली । टिळकांना कारागृही नेले । मुंबईचा कामगार खवळे । निषेध-संपाचे वादळ उठले । 'हिंदच्या मुक्तीचे भले । शिंग वाजले ।' रशियामध्ये लेनिन वदले ।। जी ।।

त्यागाचे दिव्य मंदिर । उभे खंबीर । शिखरावर । तळपते ध्वजा लाल त्यांची । हक्कास्तव सदा लढणाऱ्यांची । मरूनही अमर होणाऱ्यांची ।। जी ।।

गिरणी मालक भांडवलदार । तसेच सरकार । बेदरकार । कदर मजुरांची मुळी न करता । पिळून शोषित होते रक्ता । गाजवीत वरती आपुली सत्ता ।। जी ।।

*(चाल बदलून)*

बेबंद पिळणूक ती गेली कळसाला ।। चौदा चौदा तास दिवसाला । राबत होता मजूर गिरणीला । आटवीत होता रक्ताला । सूर्याचे तोंडही दिसत नव्हते त्याला ।। नव्हता मुळी न्याय, कायदा त्याच्या बाजूला ।। मग रजा, भत्ता, बोनस यावा कोठला? ।। नव्हती पर्वा त्याची मालकाला । उन्मत्त आंग्ल सत्तेला । सावरून एकमेकाला । रगडीत होते दिनरात कामगाराला ।। पर कामगार नव्हता चेपला । निष्प्राण नव्हता जाहला । अन्यायाशी तोंड देण्याला । त्याने वेळोवेळी कैक सामना दिला ।। मुंबईच्या गिरणी मालकाला । आडदांड दाडा काकूर आणाया वठणीला ।। एकोणीसशे अठ्ठावीसाला । रोखाया कामवाढीला । कामगार मैदानी आला । गिरण्यांची तोंडे दाबूनी साचा बंद केला ।। त्रासनात आऱ्या जाहला । थैली फेकून बाजूवाला झाला बाजूला ।। कपड्याचा हात मोडला । तिरमिरी आली धोट्याला । रोव्हीण, कँट, भुलेरांत गोंधळ माजला ।। मढ्यासमान पडल्या गिरण्या प्राणची गेला ।।

*(चाल बदलून)*

मुंबईत संप जाहला । आणि वणव्यासम पसरला ।।
तो चौऱ्यांशी गिरणीला । ग्रासून मोकळा झाला ।।
कामगार एक जाहला । सहा महिने संप लढवीला ।।
चेव आला सरकाराला । दडपण्या कामगाराला ।।
शस्त्रांचा खच लागला । ठायी ठायी राजरस्त्याला ।।

*(चाल दांगटाची)*

फिरू लागले चक्र सत्तेचे । दडपशाहीचे । धरपकडीचे लाठीमाराला ऊत आला । ठायी ठायी गोळीबार झाला । कामगार खवळुनिया उठला । ऐक्याचा डंका वाजवीला । बोलविला तरुण मैदानाला । परशुराम जाधव पुढं झाला । सोजिराशी झुंज खेळायाला । मर्दानं मोठा हिय्या केला । शिवडीच्या डोंगरात शिरला । रक्षण्या आपुल्या बावट्याला । चीड त्याची आली इंग्रजाला । अधिकारी धावून पुढं गेला । बंदूक रोखून छातीला । बजावलं त्यानं जाधवाला । 'गुमान ये शरण आज मजला । ना तरी झाडीन गोळीला ।' जाधवानं जबाब उलट केला । 'मरणाची भीति नको मजला । मरून मी जागेन ब्रीदाला । घाल तुझ्या येऊ दे गोळीला ।' जाधवानं कडक दम भरला गा, साहेबाला दादा ॥

*(चाल बदलून)*

कडाडाडा गोळी गर्जली । भेदून ऊर पुढं गेली ॥
सावरोनी ध्वजा आपली । मित्राच्या केली हवाली ॥
जाधव बैसले खाली । मृत्यूने झेप घेतली ॥
जीवनज्योत निमाली । त्या लाल ध्वजेच्या खाली ॥

*(चाल बदलून)*

घेवोनी जाधवाचे नाव । मारिले घाव । कामगारांनी ॥
नमविले धनवंतांना । उन्मत्तांना । त्यांनी मैदानी ॥
युनियन त्यांनी बांधली । अजिंक्य आपुली । एक होऊनी ॥
आशियाची थोर युनियन । लढाऊ बाण्यानं । राहे गाजोनी ॥

*(चाल बदलून)*

त्या युनियनची ध्वजा घेऊनी मारी थोर मजला ।
अन्यायाचे घाव झेली तो कधी नाही नमला ॥
किती घेतल्या झुंजा समरी त्यांची नच गणती ।
किती पावले मरण लढाईत लढत रणावर्ती ॥

*(चाल बदलून)*

डांगे, मिरजकर आणि ब्रॅडले । नेते लाभले । हिंमतवाले ।
उठविला ज्यांनी सारा कामगार । वर्गयुद्धाचा करूनी निर्धार ।
भांडवलदारी केली बेजार ॥

**चौक दुसरा**

इतिहास कामगारांचा । वळुन जरा वाचा । नसे तो कच्चा । अन्यायाची चीड ज्याला भारी । सदा जो देऊनी ललकारी उठवी देशात जनता सारी ॥

(चाल बदलून)

अन्याय कधी ना त्याला सहन जाहला ।। एकोणीसशे चौतीस साला । रोखाया कामवाढीला । निर्भय त्याने देहाचा बांध घातला ।। फुटपाडे-कांदळकर, आळवे लावले वाटेला ।। महायुद्ध पेटले एकोणचाळीसाल ।। ऑक्टोबरच्या दोन तारखेला । धिक्काराया महायुद्धाला । मुंबईचा शूर कामगार रस्त्यावर आला ।। राखाया आपल्या हक्काला । आडवाया काळ्या कायद्याला । मुंबईत संप पुकारिला । भागोजी बहिर्जीनं प्राण रणी वेचला । महागाई-बोनसचा लढा पुढे पेटला ।। चाळीस साली लढून धैर्यानं विजय मिळविला ।।

(चाल बदलून)

बावीस फेब्रुवारीला । खलाशांना सहाय्य करण्याला ।।
निर्भय होउनी रस्त्याला । भुइकोट त्याने बांधीला ।।
जरी तीनशे पडले धरणीला । नऊशेवर जखमी झाला ।।
तरी डमडमच्या गोळीला । त्याने भिडून सामना दिला ।
लंडनमध्ये अॅटलीला । येथून घाम फोडीला ।।

(चाल बदलून)

पन्नास साली ऑगस्ट चौदा तारखेला । बोनसासाठी खवळला । आणि त्याने संप पुकारिला । उन्मत्त गिरणी मालकाला कडक दम दिला ।। चिमट्यात धरुनि शत्रूला । संघाच्या शेपटावरी पाय ठेवीला ।। चिरचीर चालली तेव्हा चारी बाजूला ।। काँग्रेसच्या सरकाराला । भलताच राग मग आला । खादीचा डगला फेकला । रामराज्य जबडा उघडला । त्यांतूनी रावणी दात बाहेर काढीला । लाठीमार गोळीबाराला । सुरवात झाली चहूकडे अत्याचाराला ।। आणि धूर विषारी स्वैर धावू लागला ।। देशभक्त होमगार्डांनी कहरच केला ।। पाहुन कामगार मारिले टिपून गोळीला ।।

(चाल बदलून)

गणपत पानसरे मेला । महादेव कुंभारही गेला ।।
अन् विठू कृष्णा कदमाला । गोळीने दगा जाहला ।।
शिवचरण सुचित ठार झाला । तुकाराम पडला रस्त्याला ।।

(चाल बदलून)

लागली गोळी बाबू रघुनाथरावाला ।।
शंकर दाबे, दामाजी केशवही गेला ।
अशा बारा वीरांनी रणी देह ठेवीला ।।

(चाल बदलून)

आठवण ठेवूनी त्यांची । वीर हुतात्म्यांची । त्यांच्या हिंमतीची । ज्यांच्या शौर्याचा जाळ

झाला । वर्गास्तव ज्यांनी प्राण दिधला । मार्ग आक्रमा तुम्ही आपुला ॥

*(चाल बदलून)*

हुतात्म्यांच्या आत्मत्यागाच्या उंच स्तंभावरती ।
मुंबापुरीच्या कामकऱ्या तव ध्वजा पहा उडती ॥
हसत, हसत मर्दांनी आपुली शिरे अर्पियेली ।
पुढच्या पिढीचे तुम्ही लढावे त्याच ध्वजेखाली ॥
त्या योद्ध्यांची आठवण ठेवून जागून रक्ताला ।
गड युनियनचा पुन्हा सावरून लढण्या पुढे चला ॥

*(चाल बदलून)*

त्यांनी रणी एक होऊनी । झुंज देऊनी ।
रक्त सिंचुनी । बांधियली थोर युनियन ।
बेलाग दुर्गाप्रमाणं । आणि केले तिचे रक्षण ।
तडा फुटीचा पडला बा रे तव तटबंदीला ।
गंज लागला आज दुहीचा त्या तव खड्गाला ॥
शिंग फुंकोनी एकजुटीचे हाक देई सकला ।
गड युनियनचा पुन्हा सावरून लढण्या पुढे चला ॥
बाशिंग संघ बांधून । घाली थैमान । मोठ्या ऐटीनं ।
राखण्या भांडवलदारी । पेरीत फूट जहरी । तो मान आमुची चिरी ।
संघाच्या त्या बाशिंगाचे गोंडे तोडाया ।
कामगारांनो, उठा संघाचे भूतच गाडाया ॥
कामवाढीचे, बडतर्फीचे करार जो करतो ।
मारेकरी हा तुमचा, तुमच्या नावावर जगतो ॥
एकजुटीचा कर पोलादी पुढे करूनी आपुला ।
गड युनियनचा पुन्हा सावरून लढण्या पुढे चला ॥
येत हल्ला तुम्हांवर पुन्हा । पहिलाच जुना । चिराया माना ॥
बेकार होत सव्वा लक्ष । म्हणुनिया राही बा दक्ष ।
वैऱ्यावर ठेवुनी लक्ष्य ।
कंबर बांधुनी लाव । परतुनी हा येतो घाला ।
उठा सत्वरी सावध होउनी सारे पुढे चला ॥
बोलवा आता सकलांना ।
साऱ्या जहालांना । सोशालिस्टांना ।
द्या हाक शे. का. पक्षाला । दलितांच्या फेडरेशनला ।

साऱ्या लोकशाहीवाद्यांला ।
सांगा बजावून त्या सर्वांना आता या समया ।
ऐक्यावाचून विजय मिळेना लढणे ते वाया ।।

*(चाल बदलून)*

बा कामगारा तुजठायी अपार शक्ती । ही नांदे मुंबई तव तळहातावरती । ते हात पोलादी सर्व सुखे निर्मिती । परि तुला जगण्याची भ्रांती । बेकारी येत तुजवरती ।
म्हणे अण्णा साठे शाहीर । उठुनी सत्वर । उज्ज्वल राख आपुली कीर्ती ।।



# पंजाब-दिल्लीचा दंगा

## चौक पहिला

दिल्लीच्या विरुद्ध कट झाला । दिल्लीवर घाला । येऊ घातला । आणीबाणीचा वख्त अनिवार । फितुरांनी पाजळली तलवार । ढासळून द्याया नेहरू सरकार ।। जी ।। किती वीर मेले भारती । नाही त्यांची गणती । अजरामर कीर्ती । हुतात्मे किती धन्य झाले । स्वराज्यापायी फास वरिले । दिल्ली जिंकाया तख्त आपुले ।। जी ।।

*(चाल बदलून)*

दिल्लीसाठी झुंज सुरू झाली सत्तावन साली ।।
भारताच्या मुक्तीची नौबत झडली पहिली ।।
साऱ्या हिंदी जनांनी फळी उभारुनि आपली ।।
जोरदार लढाई दिली । माघार नाही घेतली ।
स्वातंत्र्य-संग्रामी शिरकमळे अर्पिली ।।
राष्ट्रसभा रणी उतरली । त्यागाची सीमा ओलांडली ।
परि क्रांति-ध्वजाला नाही पडू दिला खाली ।।
बेचाळिस साली जोराची धडक घेतली ।।
बावीस फेब्रुवारिला सेहेचाळीस साली ।।
सत्तावनची तोफ पुन्हा दर्यावर गर्जली ।।
मारिला वार बलशाली । शत्रुला तिरीमिरी आली ।।
इंग्रजांच्या पायाखाली जमिन सरकू लागली ।।
गोऱ्यांनी वेळ ओळखली । जाण्याची तयारी झाली ।
कारवाई कुटील पर केली ।
देशाची केली फाळणी डागणी दिली ।।
यादवीचा सुरुंग लाविला देशाच्याखाली ।।

*(चाल बदलून)*

हिंदु आणि मुसलमान । या दोन जमाती वगळून ।।
देशाची छकले पाडून । दोघांना दिली वाटून ।।
संस्थानी बिळे पोखरून । स्वत:साठी ठेवली राखून ।।

*(चाल पहिली)*

तारीख पंधरा ऑगस्ट उगवली । वैभवशाली । जनता आनंदली ।
दोन्ही राज्यांत हर्ष भरला । बघवलं नाही इंग्रजाला । निखारा अस्तनीत फुलला ।। जी ।।
इंग्रजानी सूत्रे हालविली । ठिणगी टाकली । फुंक मारिली ।
लाविली आग पंजाबाला । दंग्याचा डोंब पेटवीला । दोन्हीही राज्ये जाळण्याला ।। जी ।।

**चौक दुसरा**

पंजाबात गोरे अधिकारी । पाच जिल्ह्यावरी । सत्ता होति करी ।
शस्त्रे वाटली गुप्त गुंडांस । चिथावणी दिली त्यांना बंडास । अल्प जातीचा कराया नाश ।। जी ।। जातीय विष ओतून । दिले भडकून । पोलिस आणि सैन्य । गुंडांना फितुर कैक झाले । कारस्थानाला बळी पडले । रक्षकच आज खुनी बनले ।। जी ।।

*(चाल बदलून)*

पंजाब दारू-कोठार । ठासून बार । भरला भरपूर ।
इंग्रजानी पलिता लावला त्याला । भयानक मोठा स्फोट केला ।
रावळपिंडी मुलतानाला । लाहोर आणि अमृतसर जिल्हा ।
जालंदर लालेलाल झाला । पश्चिमेचा सूड उगवतीला ।
पूर्वेचा सूड पश्चिमेला । चोहिकडं हाहा:कार झाला ।
सतलज, रावि चिनाबाला । रक्तानं लाल रंग आला ।
लाखो लोकांचा मुडदा पडला । पंजाबात दादा ।। जी ।।

*(चाल बदलून)*

खून, लुटालूट, जाळपोळ । भडकला जाळ । रक्तबंबाळ । धावती लोक सैरावैरा ।
गोरगरिबांचा उडाला थारा । वरुनि गोळ्यांचा होत मारा ।। जी ।।

*(चाल बदलून)*

पंजाब झाला बेभान । मृत्यूचे चाले थैमान ।।
शिख, हिंदु, मुसलमान । सूडानं धुंद होऊन ।।
वैऱ्याला पार विसरून । आपसात पाडिती खून ।।
इंग्रज आग लावून । पाहती मजा लांबून ।।

*(चाल बदलून)*

शिसारी घारी गिधाडांना । आली कावळ्यांना । मढी चघळून ।।
माणुसकी पळाली पार । होऊनि बेजार । पंजाबांतून ।।
सूडाची निशा चढून । लोक पशुहून । बनले हैवान ।।
रक्ताचा लावुनी टिळा । मुंडक्यांची माळा । गळा घालून ।
मातेच्या पदराखालून । बाळ हिरावून । मारती जबरीनं ।।

(चाल बदलून)

ज्याने झेलिला घाव साहिला जालियनवाला ।
योद्धा भगतसिंग दिला आम्हांला ज्याने मतवाला ।।
वीर हजारो समरी पडले स्वातंत्र्यासाठी ।
क्रांतिभूमि पंजाब गाजला दुनियेच्या पाठी ।।
त्या हुतात्म्यांच्या भूमीत । झाला आकांत । ऐका हो शांत ।
दया धर्म नष्ट जाहला । अबलांच्या शीलांवर घाला । अघोरी होऊ लागला ।
ओढुनि नारी रस्त्यावरती करती बलात्कार ।
देऊनि कंठी नख शेवटी मारीत त्या ठार ।।
हेच शिकविले काय भारता तू पंजाबाला ।
योद्धा भगतसिंग दिला आम्हांला ज्याने मतवाला ।
सहस्त्र नारी जमवून । वस्त्र हिरावून । करोनि नग्न । त्यावरी शस्त्र रोखून ।
राक्षसी करी थैमान ।
नग्न नारींना मिरवी आज तो चौकाचौकाला ।
चेंडुफळीचा खेळ खेळतो उडवून शिरकमळां ।।
हे शिकविले काय भारता तू पंजाबाला ।
योद्धा भगतसिंग दिला आम्हाला ज्याने मतवाला ।।

**चौक तिसरा**

बेचिराख गावे जाहली । घरे बैसली । उरला नाही वाली अल्पजमातीची उडाली दैना ।
रोखिना तिथं कोण कोणा । पंजाबाचा झाला कत्तलखाना ।। जी ।।

(चाल बदलून)

पंजाबातून जेव्हा लोक पळू लागला ।।
सारे शत्रू लोकशाहीचे उठले समयाला ।।
इंग्रजांचा डाव साधला । जातीयवादी त्यांच्या साथीला ।
देव, धर्म, संस्कृतीचा खोटा बुरखा घेतला ।।
आडवून पळत्या लोकाला । ते पुसती "कुठं चालला ।
सामील नेहरू शत्रूला, घोटाळा झाला ।।
वाचवाया हिंदु धर्माला । स्थापाया हिंदु राष्ट्राला ।
उलथून पाडा नेहरूला ।"
असे म्हणून लोकांचा रोख त्यांनी फिरविला ।।
पेटवाया हिंदी राज्याच्या राजधानीला ।।
दोन लाख निर्वासिताला । चिथावून दिले दंग्याला

वैऱ्यांनी वणवा दिल्लीला आणून भिडविला ।।
काट्याने काटा काढायाचा कट जाहला ।।

*(चाल बदलून)*

हातबाँब घेऊनि पिस्तुले । दिल्लीत शिरले बंडवाले ।।
स्टेनगन घेऊनि आले । त्यांनी मशिनगन गाडिले ।।
दिल्लीला पाडू लागले । उध्वस्त कराया सजले ।।
दहा हजार लोक कापिले । रक्तानं रस्ते सारविले ।।

*(चाल बदलून)*

दिल्लीच्या दरवाजाला । मृत्यूनं नाच मांडिला ।।
शांतवाया राजधानीला । जवाहर आले रस्त्याला ।।
गांधीजी धावले मदतीला । शिकस्तीचा यत्न करण्याला ।।
सावरण्या संघराज्याला । जेव्हा त्यांचा हात गुंतला ।।

*(चाल बदलून)*

संस्थानी राजांना हाच समय लाभला ।।
जो तो दिल्लीकडे टकमका पाहू लागला ।।
भरमला भरतपूरवाला । आणि नाभा नाचू लगला ।।
जयपूर पार झिंगलेला । बिकानेर अलवाराला ।
झिंदला पुन्हा जीव आला । पतियाळा गुडघ्यावर
हात ठेवून खडा झाला ।। आजवर पिळून जनतेला ।
इंग्रजांचा बूट चाटला । मडमांची थुंकी झेलण्याला ।
ज्यांनी सदा पदर पसरला । त्यांचा धर्म जागा जाहला ।
जनतेशी झुंज देण्याला । कोण जाणे कोठून दम आला ।
सासरी नसे माहेरी अशा जातीला ।।
बगलबच्चे साहेबाचे जिंकू म्हणती दिल्लीला ।।
जेथे दुर्योधन, महारथी कर्ण छेदिला ।।
आणि चक्रव्यूह भेदिला । जेथे पानिपत जाहला ।
यादवीची चटक ज्या असे भारी धरणीला ।।
आजही त्याच जागेला । घेऊनि जातिवाद्याला ।
संस्थानिक आणि इंग्रज एका बाजूला ।।
समरात दुसऱ्या बाजूला । दारूण रण करण्याला ।
वाचवा लोकशाहीला । भारत उभा ठाकला ।
कामगार-शेतकरी सज्ज झाला समराला ।।

## चौक चौथा

हिंदी क्रांतीचा बाळरवि तो जेव्हा ये उदया ।
राहू केतू जातिवाद उलटे ग्रासाया ।।
एक जाहले देशघातकी घरभेदे समया ।
हिंदी जनाच्या मानेवरती सुरीच फिरवाया ।।
म्हणुनिया उठा लवलाही । वेळ आता नाही । नको दिरंगाई ।
द्या फेकुनी जातियतेला । करा बंद रक्तपाताला ।
आवरोनि हात आपुला ।
भारतियांनो इभ्रत तुमची ईर्षेला पडली ।
काढा बाहेर नौका देशाची वादळात शिरली ।।
धरा सावरून एकजुटीने दुभंगली दिल्ली ।
काढा बाहेर राष्ट्रनौका ही वादळात गेली ।।
युवकांनो येऊ द्या स्फूर्ति । तुम्हा आवडे ती ।
ध्वजा फडकती । ओढून पाडाया खाली । चोरांनी तयारी केली ।
तिला सावरा तुम्ही आजवर जशी ती सावरली ।
काढा बाहेर नौका देशाची वादळात शिरली ।
सैनिकांनो तुमच्या हाती इज्जत जनतेची ।
शस्त्र धरोनि नीट वाचवा अब्रू स्वदेशाची ।।
तू कोट हाताच्या वीरा । देश आधार ।
उठ कामगारा । जातियता विष पचवून ।
देशाचे करी रक्षण । दे तुफान हे परतवून ।
एकजुटीच्या राजा उंच धर ध्वजा लाल आपली ।
काढी बाहेर नौका देशाची वादळात शिरली ।

*(चाल बदलून)*

तू क्रूर कृतांतापरी वज्रदेहाचा ।
विश्वाचा निर्मिता महाकाळ काळाचा ।
तू हात उचलुनि आपुला पोलादाचा ।
थैमान थांबवून चोर दंगेखोरांचा ।
नायनाट केला गुंडांचा कलकत्ता तूच शमविला ।
जगा दाविला । कामकरी नेता एकजुटीचा ।।
तू मुंबापुरीचा रणपंडित झुंजार ।

ज्या अन्त नसे तो शांत करूनि सागर ।
तीन रंगी, हिरवा आणि लाल उडविला वर ।
लोहदुर्ग चुरडिले नाविकांच्या खातर।
तू उठ आता सत्वर । हे तुडवून दंगेखोर ।
म्हणे अण्णा साठे शाहीर । सावरून धर ।
तुझी तू शांतिध्वजा सत्वर ॥

# बंगालची हाक

**चौक पहिला**

बंगाल मारितो हाका । भारतीय युवका । उठा आता ऐका । वाचवा त्याला,
धरा सावरून । सर्व जनतेत ऐक्य उभारून । निराशा दुर्बलता झुगारून ॥
परतंत्र देश भारत । मतभेद त्यात । फितुरीचा हात । त्याने दुःखाचा बांध फुटला ।
बंगालवरति कडा तुटला । भुकेचा महादैत्य उठला ॥
ती वंगभमी सुंदर । पंरपरा थोर । क्रांतिआगर । स्वाभिमानाचा बालेकिल्ला ।
जिथे टागोरांचा जन्म झाला । तिथे भुकेने कहर केला ॥
नफेबाज भांडवलदार । नफ्यावर नजर । करिति गुरगूर । युद्धाचे नाव पुढे केले ।
झोळी भरण्यात गुंग झाले । जनतेच्या मानेवर बसले ॥

*(चाल बदलून)*

चंगळ झाली बघा त्याची नाचू लागला ॥
भराभरा वस्तूंच्या किंमती चढवू लागला ॥
टाकून मागे जनतेला । जणू घोडा दौडू लागला ।
लोकांच्या शक्तीचा ठाव त्यानं घेतला ॥
घालाया खीळ हो त्याला । नोकरशाहीने बेत उशिरा केला ॥
ती होती लंगडी नादान झाला घोटाळा ॥
तुरुंगात गांधी जवाहिर आहेत यावेळा ॥
मतभेद आहे इतरात फार पसरला ॥
म्हणून नफेबाजांना पूर्ण वाव मिळाला ॥
वरपांगी कंट्रोल-कायदा लुळा तो ठरला ॥

*(चाल पहिली)*

भाव नियंत्रणाचा कायदा । झाली म्हणे बैदा । जाईल आता मैदा । पिसाळला नफेबाज
बगळा । साठा दडविला त्याने सगळा । गहू, बाजरी, तांदूळ, जोंधळा ॥
भावनियंत्रण ऐकून । गेला भडकून । चिडला सडकून । धान्याचे साठे ठेवले दडवून ।
अघटित घटना आणली घडवून । काढाया हिंदी जनता बडवून ॥
देशद्रोही बेइमान । दडविले अन्न । जणू घोळून । दांडा हिंदी जपानी कुऱ्हाडीला ।
बंगालावर ठोकून बसला । काळ जाहला हिंदभूला ॥

## चौक दुसरा

भुकेची झाली सुरवात । खेड्यापाड्यात । वंग प्रांतात । छोटी मोठी गांवं आली आधि त्यात । भूक पसरली सर्व प्रांतात । उद्योगधंद्याच्या सर्व शहरात ।।
वरद्वान आणि गंगापूर । भुकेचा कहर । सारे जन चूर । हावरा बरसाल बहरमपुरात ।
भुकेने केला मोठा आकांत । ऐका बंगालचा पुढे वृत्तांत ।।
घरदार दिले सोडून । शेतमजुरानं । बिऱ्हाड बांधून । अन्नशोधार्थ बाहेर पडले ।
कलकत्ता शहर जवळ केले । मृत्यूच्या पार समीप गेले ।।

*(चाल दुसरी)*

कलकत्ता शहरामधे लोक सारा जमा झाला ।।
अन्न अन्न करीत गल्लोगल्ली हिंडू लागला ।।
परी अन्न होते भुयारात ठाव काय त्याला ।।

कोण अन्न शोधाया गेला हिंडून फार थकला । नाही अन्न मिळालं त्याला । निराश फार जाहला ।

झाडाखाली प्राण सोडून मोकळा झाला ।।
पिळुके देत देहाला । तडफडे कोण वाटेला ।
उचकीचा कोणाला आधी वेध लागला ।।
कोणाचा मेला बाप भाऊ चालला ।।
घेऊन मृत बाळाला । हंबरते कोण चौकाला ।
किंकाळी फोडी ती बाळ म्हणे मम गेला ।।
मुडद्याची लागली रांग कलकत्त्याला ।।
कैकांची निमाली ज्योत खीळ दाराला ।।

*(चाल बदलून)*

भारताचे शूर संतान । अन्नाविण सोडी ते प्राण ।।
शतकानुशतके ज्यानं । गाजविले शौर्य दारुण ।।
त्याचा तो देह कोल्ह्यानं । निर्भय केला भक्षण ।।
त्या वंग वीरमातेनं । भुकेच्या आहारी जाऊन ।
शील, कूल, मूल, विकून । शमविली पोटाची अग्न ।।

*(चाल दुसरी)*

बंगाल बुरूज भारताच्या आघाडीवरला ।। रोखून परचक्राला अवसर देई आम्हाला । राष्ट्रीय ऐक्य करण्याला । म्हणून करा मदत हो त्याला । सावरून धरा बंगालला । दैवाचा कोप या सोडा कल्पनेला ।। शिव्या देत नोकरशाहीला । नका बसू व्यर्थ या वेळा । नादान नोकरशाही सारा बाजूला ।।

अन् चला लागा कामाला । पाठवा मदत बंगालाला । अन् वाचवा त्याच्या प्राणाला ।
जर त्याचा प्राण वाचला । तर आडवा होईल जपान्याला । छातीच्या करूनी ढाला ।
रोखील वीर, जपानी रणगाड्याला ।।

*(चाल पहिली)*

जपान्याचे प्रवेशद्वार । जिथे होणार । पहिला गोळीबार । झडत तलवार झुंज पहिली ।
जनता ती शूर बंगाली । वाचवा तटबंदी अपुली ।।
गोळ्याच्या वर्षावात । करीत स्वागत । वैऱ्याचे खचीत । असा तो वंग प्रांत आपला ।
दुर्ग बेलाग सीमेवरला । वाजवील रणडंका पहिला ।।
बंगाल मारितो हाका । भारतीय युवका । उठा आता ऐका । वाचवा त्याला, धरा सावरून ।
अण्णा भाऊ म्हणे, ऐक्य उभारून । निराशा, दुर्बलता झुगारून ।। जी ।।

# एकजुटीचा नेता

एकजुटीचा नेता । झाला कामगार तैय्यार
बदलाया रे दुनिया सारी दुमदुमली ललकार ।।
सदा लढे मरणाशी ज्याला नच ठावे शांती
रक्त आटवून जगास नटवून जगण्याची भ्रांती
उठला खवळून झुंज झुंजण्याला
वादळ उठवून बांध फोडण्याला
निश्चय झाला पाय उचलला चालू लागला करण्या नवा प्रहार ।।
मध्ययुगाची जीर्ण हाडे ही निरंकुश राजे
देशी धनवंतांचे साथी परकी साम्राज्ये
फाडुनिया बुरखा उघड जगा दावू
जागवून रंका समरांगणि जाऊ
आता अपुला, हा शेवटचा उगारलेला वार नाही चुकणार ।।
शेतकरी अन् दलित जनाला घेऊनिया पाठी
लोकशाही क्रांतीच्या अपुल्या एक ब्रीदासाठी
कोटी करी ज्याने ध्वजा लाल धरिली
मेघासम आता फळी धरून आपुली
पुढे चालला, रणी गर्जला, करुनी आपुला पोलादी निर्धार
एकजूट जनतेची साधुनी, जनराज्याची करून बांधणी,
पूर्ण लोकशाहीला आणुनि, गाऊ मग यशगान
निनादून अस्मान, अंती वर्गविहीन-हिंद करू निर्माण
बंध तोडले, पाऊल पहिले, पुढे टाकले, मागे नच घेणार ।।



# महाराष्ट्रावरूनी टाक ओवाळून काया

कंबर बांधून ऊठ घाव झेलाया
महाराष्ट्रावरूनी टाक ओवाळून काया ।

महाराष्ट्र मंदिरापुढती । पाजळे याशीची ज्योती ।
सुवर्ण धरा खालती । निल अंबर भरले वरती
गड पुढे पोवाडे गाती । भूषवी तिला महारथी
तो अरबी सागर लागे जयाचे पाया
महाराष्ट्रावरूनी टाक ओवाळून काया ।।

ही मायभूमि धीरांची । शासनकर्त्या वीरांची
घामाची आणि श्रमाची । खुरप्याची आणि दोरीची
संतांची, शाहीरांची । त्यागाच्या तलवारीची
स्मरून धुंरधर आता त्या शिवराया
महाराष्ट्रावरूनी टाक ओवाळून काया ।।

पहा पर्व पातले आजचे । संयुक्त महाराष्ट्राचे
साकार स्वप्न करण्याचे । करी कंकण बांधून साचे
पर्वत उलथून यत्नाचे । सांधू या खंड की त्याचे
या सत्यास्तव मैदानि शिंग फुंकाया
महाराष्ट्रावरूनी टाक ओवाळून काया ।।

धर ध्वजा करी ऐक्याची । मनीषा जी महाराष्ट्राची
पाऊले टाक हिंमतीची । कणखर जणु पोलादाची
घे आण स्वातंत्र्याची । महाराष्ट्रास्तव लढण्याची
उपकार फेडुनी जन्मभूमीचे जाया
महाराष्ट्रावरूनी टाक ओवाळून काया ।।



# रवि आला लावुनी तुरा

रवि आला लावुनी तुरा । निघाली जिंदगी भरभरा ।।
दीप गगनाच्या डोईवर लागला । ढग तिमिराचा त्यानं निवारिला ।
झाले आकाश लाल । बघ उधळी गुलाल
रानारानात हर्ष पसरला । आला बहर गुलमोहरा ।
निघाली जिंदगी भरभरा ।।
रस रुपेरी वर्षे हा खालती । कृष्ण सोनेरी रंगात डोलती ।
बघ जागी झाली । धरा भाग्यशाली
नाचे देवाच्या दारी जणु मालती ।
उडे हरण जणू चौखुरा ।
निघाली जिंदगी भरभरा ।।
पानापानांत नाचे हा वारा ।
भूप रागाच्या छेडीत तारा ।
हासे कोकिळ मनी । मोर नाचे वनी ।
सप्तरंगाचा फुलवून पिसारा ।
जाहला हर्ष रानपाखरा ।
निघाली जिंदगी भरभरा ।।

# शिवारी चला

दौलतीच्या राजा उठून सर्जा
हाक दे शेजाऱ्याला रे शिवारी चला ।।
संदी लई नामी आलीया अवंदा
सावकारशाहीचा विखारी कुंदा
आरपार खुरपून पाडायचा रेंदा
दाखवाया बळा-उचल घे इळा
पोलादी पाजळून आपला रे शिवारी चला ।।
भांडवलशाहीचा चिवट केणा
वरवर छाटलाय तरी जाईना
अन् जराशीबी शेती पिकू देईना
उपटून मुळी घाल पायदळी
तुडवून आला गेला रे शिवारी चला ।।
साम्राज्यशाहीची माकडं काळी
हातातला घास नित खाऊ न देती
ध्या दिसा लुटत्यात रं आंबराई
एकजूट करून नीट नेम धरून
आखरीचा माराया टोला रे शिवारी चला ।।
रातदीस राबून सालंना साल
किती पिढ्या आम्ही काढायचं हाल
रोवू आता बांधावर बावटा लाल
काळावर चाल कर - हत्यार नीट धर
एकीचा बांधुनी किल्ला रे शिवारी चला ।।



# दुनियेची दौलत सारी

दुनियेची दौलत सारी, गड्या दुनियेची दौलत सारी
बघ पिकलीय माझ्या शिवारी ।।
रातदिवस राबून कसली
आली भरात अन् मुसमुसली
आज आनंदानं बघ हसली
वर आकाश उधळीत लाली
खाली-सोनेरी ही शेतसरी ।।
कणसं मक्याची हुरड्याला आली
बसली हळद लाजून खाली
तूर शेंगानं आपुल्या न्हाली
गहू खपलीचा लहरा मारी
भुईमूग रोवून बसला आरी ।।
आला रंगात राळा माझा
फुलं उधळितो कारळा तुझा
साऱ्या धान्याचा शाळू राजा
ऊस वाऱ्यावर डोलतोय भारी
सर्जा-दख्खनला दे ललकारी ।।
यारे हातात गोफण घेऊ
रान राखाया एकीनं जाऊ
ऐतखाऊंना हाकलून देऊ
जिवापरीस आमुची प्यारी
धरणी- कसेल त्याची सारी



# माझी मैना गावावर राहिली!

माझी मैना गावावर राहिली ।
माझ्या जिवाची होतीया काहिली ।।
ओतीव बांधा । रंग गव्हाळा । कोर चंद्राची । उदात्त गुणांची ।
मोठ्या मनाची । सीता ती माझी रामाची ।
हसून बोलायची । मंद चालायची । सुगंध केतकी । सतेज कांती ।
घडीव पुतळी सोन्याची । नव्या नवतीची । काडी दवण्याची ।
रेखीव भुवया । कमान जणू इंद्रधनूची । हिरकणी हिऱ्याची ।
काठी आंधळ्याची । तशी ती माझी गरिबाची ।
मैना रत्नाची खाण । माझा जीव की प्राण ।
नसे सुखाला वाण । तिच्या गुणांची छक्कड मी गायिली ।
माझ्या जिवाची होतीया काहिली ।।

गरिबीनं ताटातूट केली आम्हा दोघांची । झाली तयारी माझी मुंबईला जाण्याची । वेळ होती ती भल्या पहाटेची । बांधाबांध झाली भाकरतुकड्याची । घालवित निघाली मला माझी मैना चांदणी शुक्राची । गावदरीला येताच कळी कोमेजली तिच्या मनाची । शिकस्त केली मी तिला हसवण्याची । खैरात केली पत्रांची । वचनांची । दागिन्यानं मढवून काढायची । बोली केली शिंदेशाही तोड्याची । साज कोल्हापुरी । वज्रटीक । गळयात माळ पुतळ्यांची कानात गोखरं । पायात मासोळ्या । दंडात इळा आणि नाकात नथ सर्जाची । परी उमलली नाही कळी तिच्या अंतरीची । आणि छातीवर दगड ठेवून पाठ धरली मी मुंबईची ।

मैना खचली मनात । ती हो रुसली डोळ्यात ।
नाही हसली गालात । हात उंचावुनी उभी राहिली ।।

या मुंबईत गर्दी बेकारांची । त्यात भरती झाली माझी एकाची । मढ्यावर पडावी मूठभर माती । तशी गत झाली आमची । ही मुंबई यंत्राची, तंत्राची, जगणारांची, मरणारांची, शेंडीची, दाढीची हडसनच्या गाडीची, नायलॉनच्या आणि जॉर्जेटच्या तलम साडीची । बुटांच्या जोडीची । पुस्तकांच्या थडीची । माडीवर माडी । हिरव्या माडीची । पैदास इथं भलतीच चोरांची । ऐतखाऊंची । शिरजोरांची । हरामखोरांची । भांडवलदारांची । पोटासाठी पाठ धरली होती मी कामाची । पर्वा केली नाही उन्हाची, थंडीची, पावसाची ।

पाण्यानं भरलं खिसं माझं । वाण मल एका छत्रीची । त्याच दरम्यान उठली चळवळ संयुक्त महाराष्ट्राची । बेळगाव, कारवार, निपाणी, गोव्यासह एकभाषिक राज्याची । चकाकली संगीन अन्यायाची । फौज उठली बिनीवरची । कामगारांची । शेतकऱ्यांची । मध्यमवर्गीयांची ।

उठला मराठी देश । आला मैदानी त्वेष । वैरी करण्या नामशेष ।
गोळी डमडमची छातीवर साहिली ।

म्हणे अण्णा भाऊ साठे । घरं बुडाली गर्वाची । मी-तूपणाची । जुलमाची । जबरीची । तस्कराची । निकुंबळीला कत्तल झाली इंद्रजिताची ।
चौदा चौकड्याचं राज्य रावणाचं । लंका जळाली त्याची । तीच गत झाली कलियुगामाजी मोरारजी देसायाची आणि स. का. पाटलाची । अखेर झाली ही मुंबई महाराष्ट्राची । परळच्या प्रळयाची । लालबागच्या लढाईची । फाऊन्टनच्या चढाईची ।

झालं फाऊन्टनला जंग । तिथं बांधुनी चंग ।
आला मर्दानी रंग । धार रक्ताची मर्दानी वाहिली ॥

महाराष्ट्रानं गुढी उभारली विजयाची । दाखविली रीत पाठ भिंतीला लावून लढायची । परी तगमग थांबली नाही माझ्या अंतरीची । गांवाकडं मैना माझी । भेट नाही तिची । तीच गत झाली आहे या खंडित महाराष्ट्राची । बेळगाव, कारवार, डांग, उंबरगावावर मालकी दुजांची । धोंड खंडणीची । कमाल दंडेलीची । चीड बेकीची । गरज एकीची । म्हणून विनवणी आहे या शिवशक्तीला शाहीराची ।

आता वळू नका । रणि पळू नका । कुणी चळू नका ।
बिनी मारायची अजून राहिली । माझ्या जिवाची ॥



# जग बदल घालुनी घाव!

जग बदल घालुनी घाव । सांगून गेले मला भीमराव ।
गुलामगिरीच्या या चिखलात । रुतून बसला का ऐरावत ।
अंग झाडुनी निघ बाहेरी । घे बिनीवरती धाव ।।
धनवंतांनी अखंड पिळले । धर्मांधांनी तसेच छळले ।
मगराने जणु माणिक गिळिले । चोर जाहले साव ।।
ठरवुन आम्हा हीन कलंकित । जन्मोजन्मी करुनी अंकित ।
जिणे लादुनी वर अवमानित । निर्मून हा भेदभाव ।।
एकजुटीच्या या रथावरती । आरूढ होऊनी चल बा पुढती ।
नव महाराष्ट्रा निर्मून जगती । करी प्रकट निज गाव ।।

---

# मुंबईची लावणी

मुंबईत उंचावरी । मलबार हिल इंद्रपुरी ।
कुबेरांची वस्ती तिथं सुख भोगती ॥
परळात राहणारे । रातदिवस राबणारे
मिळेल ते खाऊनी घाम गाळती ॥१॥

ग्रँट रोड, गोखले रोड । संडास रोड, विन्सेंट रोड ।
असे किती रोड इथं नाही गणती ॥
गल्ली-बोळ किती आत । नाक्यांचा नाही अंत ।
अरबी सागराचा वेढा हिच्या भोवती ॥२॥

आगीनगाडी मोटारगाडी । विमान घेतं उंच उडी ।
टांग्यांची घोडी मरती रस्त्यावरती ॥
हातगाडी हमालांची । भारी गडबड खटाऱ्यांची ।
धडपड इथं वाहतुकीची रीघ लागती ॥३॥

मसणवटी महशूर । चंदनवाडी सोनापूर ।
त्यांची गाजे ख्याती इथं आहे कीर्ती ॥
टाचा घासून मरणाऱ्यांची । बिनवारशी सडणारांची ।
सागराच्या काठी बघा सोय लागती ॥४॥

सेंट जॉर्ज, बाटलीवाला । के.ई.एम., वाडियाला ।
रोग्यांची रोज तोबा गर्दी झडती ॥
टी.बी., गरमी, पटकी, परमा । खरूज, ताप खोकला दमा ।
असे नाना रोग होऊन कैक मरती ॥५॥

माणसाला माणूस खातं । लुटतं आणि लुटलं जातं
तीस लाख लोक एका जागी राहती ॥
भडकून उठती आधीमधी । दंगेखोर होऊन कधी ।
आपसामधे करून गर्दी मुडदे पाडती ॥६॥

लोअर परळ, चिंचपोकळी । वरळीच्या त्या जुन्या चाळी ।
नाही नवा रंग त्यांच्या भिंतीवरती ॥
नायगाव, धारावीला । माटुंग्याच्या शेजाराला ।
बेकारांची पोरं घाणीमध्ये लोळती ॥७॥

मोतीबाजार, शेअरबाजार । तिथे चाले मोठा व्यापार ।
सारे सट्टेवाले तिथं सट्टा खेळती ॥
फोरास रोड, तीन बत्ती । गोलपिठा नाक्यावरती ।
शरीर विकून कितीएक पोट भरती ॥८॥

लाल झेंडा घेऊन हाती । करायाला इथे क्रांती ।
मजुरांची पिढी नवी पाऊल टाकती ॥
अण्णा भाऊ साठे म्हणे । बदलुनी हे दुबळे जिणे ।
होणार जे विजयी ते रण करती ॥९॥



# इनामदार

## अंक पहिला

*(येळापूरकर गोपाळराव देशमुख (इनामदार) यांचा जुन्या पद्धतीचा दिवाणखाना, दिवाणखान्याला मधोमध येण्याजाण्याचा दरवाजा असून डाव्या बाजूला माडीवर जाण्याचा जिना आहे, जिन्याला लागूनच गोपाळरावांची बसण्याची बैठक असून बैठकीवर लोड, तक्क्या, पानाचे तबक व शेजारी तिजोरी आहे. बैठकीलगतच स्वयंपाकघर असून, स्वयंपाकघराच्या समोर (दुसऱ्या बाजूच्या विंगमध्ये) माजघर आहे. माजघराला लागून मुनीमजींची बैठक असून, बैठकीवर हिशेबाच्या वह्या रचून ठेवल्या आहेत. जवळ दौत, लेखणी आहे. समोरच्या भिंतीवर निरनिराळ्या देवांच्या तसबिरी असून एका खुंटीला बंदूक लटकत आहे.*

*प्रेक्षकांसमोरील रंगभूमीचा पडदा वर जाताच, दिवाणखान्याचे दालन धुराने भरून गेलेले दिसते. मुनीमजी धुपारतीत धूप घालून तो धूर आणखीन वाढवीत आहेत. यावेळी मुनीमजी फक्त पंचा नेसले असून त्यांचे सर्वांग उघडेबोडके आहे. त्यांच्या डोकीचे करडे केस ताठ उभे आहेत. तोंडाने मंत्रोच्चार करीत ते देवांना धुपाचा धूर दाखविण्यात मग्न होऊन गेले आहेत. वेळ तिन्हीसांजेची.*

*इतक्यात करीम प्रवेश करतो. तो दिसण्यात उंचापुरा असून, साधी पैरण, साधे पंजी व वर जाकीट त्याने घातले आहे. डोकीचे मुंडासे काढून ते डाव्या काखेत धरून आणि उजव्या हातात काठी व डाव्या हातात पायताण घेऊन तो बिचकत बिचकतच आत येतो. त्याच्या मिश्या पिळदार आहेत. मुनीमजी त्याला मंत्रोच्चार करीत असतानाच नीट न्याहाळतात आणि त्याच्या हातात पायताण पाहून —*

**मुनीमजी :** (पायताणाकडे बोट दाखवून) करीमबुवा, हे... हे काय? ती पायीची पायी बरी. ती डोकीवर घ्यायची नसते.

**करीम :** (अडखळत) खरं हाय, खरं!... पण —

**मुनीमजी :** पण मग ती बाहेर ठेवायची टाकून दिवाणखान्यात का आणलीस? आधी जाऊन त्या पादुका बाहेर ठेव! पाहिजे तर तू मेल्यानंतर त्या एखाद्या देवळात ठेवू. आता तूर्त बाहेर!...

**करीम :** ते खरं हाय, खरं! मी मेल्यावर देवळात ठिवाल, पण जितंपनी त्या आपल्या कुत्र्याच्या पोटात जातील्या नि मला अनवानी फिरावं लागेल! कालच त्येनं माझं नवं पायतान फाडलं! काय करायचं! दात आपलं नि ओठ आपलं! मालकाचं कुत्रं म्हणून गप्प बसलो, न्हायतर पेकाटच मोडलं असतं!

**मुनीमजी :** मग असं कर. ते देवळीत ठेव. जा, पळ!...

(करीम पायताण घेऊन बाहेर जातो. मुनीमजी माजघरात जातो. तोच बाहेर कुत्रे भुंकते. करीम पळत येऊन घोंगडे टाकून बसतो. मुनीमजी अंगात बंडी घालून घाईने येतो, आपल्या जागेवर येऊन बसतो, चोपड्यांच्या पाया पडतो व लेखणी कानावर ठेवून— )

**मुनीमजी :** हं, किती गावचा वसूल आणलास?

**करीम :** (खिशातून पैसे काढीत) आनला की तीन गावांचा!

**मुनीमजी :** किती?

**करीम :** आपलं तीस रुपये! हो!

**मुनीमजी :** असं का? छान! खरं आहे. कारण तीन आणे रोज तर तीन गावचाच वसूल, नि तोही तीन दिवसात नि तीसच रुपयं! जाऊ दे, पुढं बोलत नाही!

**करीम :** का? बोला की! बोलण्याला पैसं पडत न्हायती!

**मुनीमजी :** म्हणजे फुकटची जीभ लावली टाळ्याला असंच तुला म्हणायचं आहे ना?

**करीम :** तसं कशाला मी म्हनू? पण कुळाला तगादा करताना काय व्हतं त्ये आम्हास्नीच ठावं! आनी खरं सांगायचं म्हंजी पैसा मिळवाय जेवढं कष्ट पडत न्हायती तेवढं वसूल कराय कष्ट लागल्यात!-

**मुनीमजी :** (झटक्यात) म्हणजे?... म्हणजे तुला म्हणायचं आहे तरी काय?

**करीम :** म्हंजी येकतर आमी शिपाय दोन, बहात्तर गावास तगादा करायचा! कुळांच्या दारात बसायचं, कुळानं रडगाणं गायचं! मग आम्ही दरवाशाच्या आस्वलावानी दुसऱ्या दारी जायचं! ह्यात दीस जायचा नि इथं यावं तर तुमी तंबी दियाची!-

**मुनीमजी :** ए आता सरकार येतील. तुझं हे रडगाणं पुरे की!-

**करीम :** खरं हाय! तुम्हाला काय म्हना; तुमी आपलं हुटावर बसून शेळ्या वळायच्या!

**मुनीमजी :** (आवाज चढवून) करीम! काढ ते पैसे नि सांग नावं कुळांची! (बाहेरून कोणी आल्याचा भास होतो. पावलं वाजतात. त्याचा कानोसा घेऊन) सरळ बैस. सरकार आले वाटतं!

**करीम :** (बावरून) सरकार कुठं गेल्याती?

(दौलती हा इनामदारांचा बहिरा चाकर हातात पानाचे ताट घेऊन मंद गतीनं येतो. त्याने अंगात दंडकं घालून डोकीला पटका बांधला आहे. त्याचे धोतर गुडघ्यापर्यंत आखडले असून तो वृद्ध आहे. त्याच्या मिश्या करड्या पण पल्लेदार आहेत. तो करीम व मुनीमजी

ह्यांच्याकडे न पाहता ताट ठेवतो. मुनीमजी त्याला पाहून एक वही उचलून आदळतो.)

**मुनीमजी :** हं. बोल! - कुळांची नावं!

**करीम :** हं. घ्या हे पैसे. (खिशातून पैसे काढून पुढे ठेवून) आनी लिवा नावं : पांडू पाटील, परुंबडं, दहा रुपये, (मुनीमजी लिहू लागतो) बनाबाई मुळकिन, टाळगाव, दहा रुपयं. मुखल पिंजारी, घामवाड, दहा रुपयं. बास! मोजा त्ये पैसे.

(मुनीम पैसे मोजून वही बाजूला ठेवतो. थोडा विचार करतो.)

**मुनीमजी :** अरे हो! त्या लटक्याच्या वाडीच्या लखू लटक्याला तगादा करायला तुला सांगितलं होतं ना? (एकदम दौलतीकडे पाहत) - ए दौलतराव, सरकार कधी येणार?

**दौलती :** (कान पुढे करून) आँ! काय?

**करीम :** (किंचित मोठ्यानं) सरकार कवा येनार?

**दौलती :** (गंभीरपणे) राम जाणं! (पुन्हा तो मंदगतीने निघून जातो.)

**करीम :** देवानं नाक न्हाय दिलं तरी चालंल. पण कान देण्यात त्येनं हायगय करू नये. कान हाय तर मानूस हाय. कान जरूर द्यावं!

**मुनीमजी :** परंतु ते कान लांब नसावेत - तुझ्या कानासारखे!

**करीम :** (स्वत:चे कान चाचपून) म्हंजी गाढवावानी!

**मुनीमजी :** लखू लटक्याला तगादा केलास का? ते बोल! कान पाहिजे.

**करीम :** हो, केला की तगादा!

**मुनीमजी :** मग काय म्हणाला तो?

**करीम :** त्यो म्हनालाय बैल इकल्यावर समदीच बाकी भागवून टाकतो; वाईच कड काडा!

**मुनीमजी :** अरे, परंतु त्याचा बैल केव्हा विकायचा?

**करीम :** (चिलमीत तंबाकू भरीत) बैल बाजारात नेल्यावर!

**मुनीमजी :** (आश्चर्यानं) आणि बैल बाजाराला कधी न्यायचा?

**करीम :** (चिलमीचा झुरका मारून धूर सोडीत) त्यो बैल चालाया लागल्यावर!

**मुनीमजी :** (बिथरून रोखून पाहत) बैल चालाया लागल्यावर? अरे, परंतु तो बैल चालायचा कधी?

**करीम :** (धूर गिळून) आवं त्येला वैरन मिळाल्यावर!

**मुनीमजी :** (भडकून) करीम, काय हे? वैरण मिळाल्यानंतर बैल चालणार? म्हणजे पाऊस पडणार, मग चारा उगवणार, मग तो बैल खाऊन तयार होणार नि मग तो बाजारला जाणार! अरे करीम, काहीतरी खरं बोल, आणि...

**करीम :** (शांतपणे) खरंच, देवाच्यान!

**मुनीमजी :** (चिडून) बोडकं तुझं! मला आधी हे सांग की तू ही तंबाखू ओढीत आहेस

की गांज्या?

**करीम :** आता कसं सांगू?

**मुनीमजी :** आणि हेही सांग की मी माणूस आहे का लोणाऱ्याचं गाढव? बोल-

**करीम :** छे: छे:, तुमाला गाढव कसं बरं म्हनू?

**मुनीमजी :** (वेडावीत) हो, कसा म्हणू? मला शेपटी नाही, लांब कानही नाहीत. होय ना? मूर्ख! (डोळे वटारून जोरात) हे पाहा, उद्याच्या उद्या तो लकू लटक्या इथं आला पाहिजे! काय हे लोक! जर यांना लोकांचं कर्ज परत करता येत नाही, तर यांनी कर्ज काढावंच का? आणि काढावं तर ते फेडावं!

**करीम :** मी एक गोष्ट इचारू का? मी म्हनतो, अशा मानसाला तुमी कर्ज देताच का?

**मुनीमजी :** का म्हणजे? हा काय प्रश्न आहे? अरे, त्या कुळांना गरज असते म्हणून! - नाहीतर काय आमचे पैसे ठेवायला जागा नाही म्हणून देतो?

**करीम :** (खवचटपणे) कुळांना गरज असते वो! पन तुमी का देता?

**मुनीमजी :** अरे का काय? कूळ कर्ज घेते का? सांग, तू!

**करीम :** (सुपारी चघळीत) का? तुमी कर्ज देताच का? —

(पुन्हा बाहेर पावलांचा आवाज येतो. दोघेही दचकतात व दाराकडे पाहत उठून उभे राहतात. पुन्हा दौलती हळूहळू येऊन बंदूक पुसू लागतो.
मुनीमजी व करीम वैतागून पुन्हा आपापल्या जागेवर बसतात.)

**करीम :** काय दौलूनाना, तेरा बोकड्या सुरीमे शिऱ्या!

**दौलती :** (किंचित मान वळवून) कुणाच्या?

**करीम :** पांडू न्हावीकी, त्यो न्हावी मायंदाळा तनतन गया देख-

**मुनीमजी :** ए शहाण्या, तू इधर देख आधी. मग कर्ज देणारा हाही कर्ज घेणाराबरोबर गरजू असतो असं तुला म्हणायचं आहे का?

**करीम :** हो. खरंच की; देवाच्यान!

**मुनीमजी :** खरंच की!- काय खरंच?- ऐक; अरे ज्याच्याजवळ पैसा असतो, तो ज्याच्याजवळ नाही त्याला देतो! म्हणजे देणारा हा ज्याला गरज आहे त्याला देतो! म्हणजे घेणारा हाच गरजू असतो! लक्षात आलं का आता?

**करीम :** न्हाय! मग कर्ज देनारा देतोच का?

**मुनीमजी :** मग तूच सांग - कां?

**करीम :** अवं, दोगंबी गरजू! - येक, कर्जाचा धनी, येक येजाचा!

**मुनीमजी :** करीम, तू वेडा आहेस! अरे व्याजाचा नि कर्जाचा संबंध काय हे सांगशील का?

**करीम :** सांगू का? ऐका. आपून म्हशीला भरडा का घालतो?

**मुनीमजी :** दूध अधिक मिळावं म्हणून!
**करीम :** मग बगा, तसंच हाय ह्यो येजाचं बी!
**मुनीमजी :** कसं काय?
**करीम :** आदी कुळाला कर्जाचा कडबा चारायचा आनी मग बारा महिने येजाचं दूध काडीत बसायचं! न्हाय दीना, तर मग तगाद्याचा तडाका देऊन कोर्टात मुडदा पाडायचा. हे बगा म्हशीवानीच हाय!
**मुनीमजी :** खरं आहे. पण तुझं हे बोलणं भाकड म्हशीप्रमाणे आहे, तेव्हा कृपा करून आता ही भाकडकथा पुरे! धनी येतील! आलेच! (उठून उभे राहातात)
(गोपाळराव देशमुख प्रवेश करतात. त्यांच्या अंगात मलमलचा सदरा असून खाली धोतर, डोकीला मंदील व हातात काठी आहे. त्यांच्या भुवया दाट असून, मिश्या भरदार आहेत. मुनीमजीकडे क्षणभर पाहत-)
**गोपाळराव :** काय मुनीमजी, सर्व काही ठीक?
**मुनीमजी :** (नम्रपणे) जी, सर्व काही ठीक आहे!
**गोपाळराव :** ठीक! आणि करीम, वसूल?
**करीम :** (नम्रपणे) जी, गुदरला! (दौलती बाहेर जातो.)
**मुनीमजी :** मी तो जमा केला! आणि धनी, काशीहून माईसाहेबांचं पत्र आलं आहे!
**गोपाळराव :** (आनंदाने) असं? मग वाचा ना! काय म्हणतात त्या? (मुनीमजी धावत जाऊन दप्तरातून पत्र घेऊन पुन्हा पहिल्या जागेवर उभं राहून वाचू लागतो)
**मुनीमजी :** (पत्र वाचतो) 'श्रीमंत राजे, यांच्या चरणी शिरसाष्टांग नमस्कार. पत्रास कारण मी इकडे आनंदात असून, माझी मुळीच चिंता नसावी. कालच मी भिडे कुटुंबाबरोबर मथुरेहून काशीस आले. मला इकडे सर्व काही आवडते. पण करमत नाही. आपली एकसारखी आठवण होत असते. (गोपाळराव मान डोलावतात) दुसरी गोष्ट, मला इकडे आता पैशाची गरज आहे. पैसे पाठविण्याची सोय करावी. आणि येळापुरात जपून वागावे. रात्री कुठेच फिरू नये. आपले वैरी जागोजाग टपलेले आहेत. त्यांची आठवण होताच मन भांबावून जाते. तरी आपण माझ्यासाठी तरी स्वत:ची काळजी घ्यावी. उत्तर लवकर यावे. मी वाट पाहत आहे. आपली तारा —
**गोपाळराव :** (दीर्घ नि:श्वास टाकून) मग मुनीमजी, उद्याच पैसे रवाना करा! इथे पडून ते काही दूध देणार नाहीत. जाऊ देत आणि लागू द्यात सत्कार्याला! त्यांना लिहा, म्हणावं काशीत एखादं भरीव कार्य करा! एखादा घाट किंवा एखादे देऊळ असं काही तरी मोठं कार्य करून ठेवा म्हणावं! आणि मीही लिहितोच.
**मुनीमजी :** पण धनी, त्यांनी काशीत किती दिवस राहायचं म्हणता? बोलवा ना!
**गोपाळराव :** कसा बोलवू? मुनीमजी, स्त्रियांना मुलं आवडतात! आज या वयात, या

एवढ्या दौलतीला धनी नाही! या दोन वाड्यात दिवा लावणारा अजून नाही! म्हणून त्यांना वाटतं काशीविश्वेश्वर प्रसन्न होऊन एखादं पुत्ररत्न लाभेल. या दौलतीला धनी होईल! लोक त्याला सरकार म्हणून बोलवतील! तो पुढे मोठा होऊन माझी गोपाळरावाची-माझ्या थोर घराण्याची, पवित्र परंपरा पुढे नेईल! म्हणून त्या या वयात, अवघ्या विसाव्या वर्षी वणवण भटकत आहेत. माणसाला गरजेनं सोडलेलं नाही हेच खरं!

**मुनीमजी :** ठीक, मग मी उद्याच रक्कम रवाना करितो!

**गोपाळराव :** हो करा! आणि ए करीम, तू त्या गोविंदराव भिड्यांना घेऊन ये! (करीम मुजरा करून निघून जातो.) मुनीमजी, करीमने वसूल किती आणला?

**मुनीमजी :** धनी, त्याने अवघा तीस रुपये वसूल आणला, तो मी जमा केला!

**गोपाळराव :** का? अवघा तीस रुपये?

**मुनीमजी :** जी, अवघा तीस! कारण कित्येक कुळांनी काखा वर केल्या आहेत. ते बाकी भागवण्याची टाळाटाळच करीत आहेत! जवळजवळ सत्तर कुळानी तर बंडावाच केला आहे. तगादा करण्याची सोय उरली नाही! काही कुळं तर कानात वारं शिरल्यासारखीच करीत आहेत!

**गोपाळराव :** (त्वेषाने उठून) मग त्यांचे कान पकडून, त्यांना कोर्टाच्या कोंडवाड्यात कोंडून, त्यांची रग जिरविलीच पाहिजे! हे नाकापेक्षा मोती जड होता कामा नयेत! ठेचा एका एकाला!

**मुनीमजी :** जी सरकार!

**गोपाळराव :** या हरामखोर कुळांची यादी करा नि त्यांच्यावर खटले भरण्याची तरतूद करा! मला माहीत आहे. या सर्व कुळांना त्या मुकिंदाने-महिपतीने, राणूजीने या माझ्या वैऱ्यांनी भडकवले आहे! म्हणून ही मढी जीव आल्याप्रमाणे करीत आहेत. परंतु यांचे बापजादे आमच्या वडलांच्यापुढे नांगी टाकून वागत होते, इथं या जागेवर- (समोर बोट दाखवून) या जागेवर उन्हात पावसात उभे राहत होते! नाक घासत होते! तेच आज नाकापेक्षा जड होत आहेत. नव्हे झाले आहेत! यांचे पूर्वज स्वर्गवासी गणपतरावापुढे डोके टेकीत होते, तेच आज आमच्या डोकीवर मिरी वाटू पाहत आहेत! परंतु त्यांना कळू द्या की गोपाळराव हा सुद्धा नानासाहेबांचा नातू आहे!.... तो गणपतरावांचा पुत्र-वाघाचा बच्चा आहे! द्या बार उडवून! पैसा कुरीनं पेरा.

**मुनीमजी :** मग काय करावं म्हणता?

**गोपाळराव :** मुजोर कुळांची जीण गतप्राण झाली पाहिजे! त्यांना जन्माचा धडा मिळाला पाहिजे! त्यांच्या घरादारावरून गाढवांचा नांगर फिरवा, नाहीतर आम्हाला या येळापुरात नांदणे अशक्य होईल!

**मुनीमजी :** (नम्रपणे) सरकार, मी उद्याच तयारी करतो!
**गोपाळराव :** कराच! त्याशिवाय आता काम भागत नाही. हे कुणबट आम्हाला नेभळट समजून आमच्या छातीवर नाचू पाहत आहेत! आता माझ्याशी उघड सामना करायची हिंमत नसल्यामुळे माझे वैरी माझ्या कुळांना चिथावणी देत आहेत! पण... पण मीच शेवट त्यांना गारद करीन! कारण...

(गोविंदराव भिडे प्रवेश करतो.)

**गोविंदराव :** कारण जग हे रणभूमी आहे आणि त्या रणभूमीवर गारद करणारे व गारद होणारे लढत आहेत! नमस्ते सरकार!
(गोविंदराव अंगाने सडपातळ, उंचीने ठेंगू, पण बुद्धीने हुशार माणूस आहे. डोक्याला जरीचा मंदील, अंगात पैरण, वर सैल असा कोट, मलमलची पंजी नेसलेला असा मोठ्या रुबाबाने प्रवेश करतो. त्याचे वय अंदाजे ३५ असावे.)
**गोपाळराव :** (आदराने) या, या भिडे; मी आपली वाटच पाहत आहे! यावे.
**गोविंदराव :** (ऐटीत मंदगतीने येऊन उभा राहतो.) बोला!
**गोपाळराव :** बसा ना! बसा, मग बोलतो!
**गोविंदराव :** नाही, आधी कामगिरी सांगावी, हा सेवक हजर आहे!
**गोपाळराव :** सांगतो बसा! मुनीमजी, चहा आणा. करीम, (हाकेनंतर करीम प्रवेश करतो.) पान आण! (करीम व मुनीमजी अनुक्रमे बाहेरदारी व स्वयंपाकघरात निघून जातात.) अरे बसा ना!
**गोविंदराव :** नाही धनी, आधी कामगिरी सांगा!
**गोपाळराव :** (त्यांना हाताला धरून खाली बसवून घेत) बसा, सांगतो! मी या येळापुरात आपल्या काळजातील कळ फक्त तुम्हालाच सांगू शकतो! (गंभीर होऊन) गोविंदराव, तुम्ही सर्व काही जाणता! त्या मुकिंदाचं नि आमचं आज तीन पिढ्यांचं वैर धुमसत आहे हेही तुम्ही जाणता! परंतु मी अलीकडे अलीकडे घाबरलो आहे. मला स्वत:चं दुबळेपण जाणवत आहे! मला वाटतं, आपलं काहीतरी चुकत असावं! पण काय चुकत आहे, याची जाणीव होत नाही! कधीकधी मला वाटतं, आपण मोळापोटी केरसुणी जन्मलो आहोत. तर कधीकधी वाटतं, नाही - आपण व्याघ्रापोटी व्याघ्र जन्मलो आहोत; आपला शत्रू - तो मुकिंदा आपली कधीच बरोबरी करू शकत नाही! परंतु मला आश्चर्य वाटतं ते याचं की, ज्यांच्या बापजाद्यांनी आमच्या पूर्वजांपुढे मान वर केली नाही त्यांची ही अवलाद इतकी कडवी कशी?
**गोविंदराव :** आपण इथं चूक करीत आहात! कारण कूप म्हणू नये मोडका आणि कुणब्री म्हणू नये रोडका अशी म्हण आहे! शिवाय घोरपडीपोटी नाग जन्मतो!
**गोपाळराव :** परंतु आपण त्याचं डोकं ठेचू शकतो की नाही?

**गोविंदराव :** अवश्य! का नाही? आपल्या पित्याला दंश करणाऱ्या तक्षक नागांचा निःपात करण्यासाठी, जनमेजय राजानं नागवंशच नष्ट करण्याचा यज्ञ आरंभला आणि आकाशपाताळ दणाणून सोडलं!- आणि तुमच्या आजोबांना व वडिलांना दंश करणारे नाग आज येळापुरात जिवंत असता, तुम्ही बेहिंमत होऊन बसता हे बरं नाही.

**गोपाळराव :** नाही भिडे, मी बेहिंमत होत नाही! पण हेच पाहा ना. रात्रीच मला एक स्वप्न पडलं! - भयंकर स्वप्न! मी गांगरलो आहे त्यानं!

**गोविंदराव :** भयंकर स्वप्न?-

**गोपाळराव :** हो - तेव्हापासून मी घाबरलो आहे!

**गोविंदराव :** असं असं! म्हणजे पंचांग पाहाण्यासाठी आपण माझी आठवण केलीत!

**गोपाळराव :** (खिन्न होऊन) हो, अगदी विचित्र स्वप्न पडलं आहे तेव्हा...

**गोविंदराव :** हो हो, सांगा ना! माझ्याकडे आता या क्षणी पंचांग आहे! (खिशात हात घालून पंचांगाची वळकटी बाहेर काढतो आणि पंचांग पसरून) हं, - बोला स्वप्न!...

**गोपाळराव :** (दीर्घ निःश्वास टाकून) भिडे, माझ्या स्वप्नात एक भयंकर उग्र असा धिप्पाड माणूस आला! (मुनीमजी चहा आणून ठेवतात व आपल्या जागेवर जाऊन बसतात) आधी चहा घेऊन मोकळे व्हा!

**गोविंदराव :** तुम्ही सुरू करा, माझे कान मोकळे आहेत! (चहाचा एक घोट घेतो) हं, त्या माणसानं काय काय केलं?

**गोपाळराव :** त्यानं?... त्यानं मला एकदम गोळीच घातली!

**गोविंदराव :** (आश्चर्याने कप खाली ठेवून) काय गोळी घातली? बरं, बरं, पुढं...

**गोपाळराव :** माझं ऊर फुटून चिंधड्या झाल्या! (उराला हात लावून चोळतो तोच करीम पान घेऊन येतो!)

**करीम :** (पान पुढे ठेवीत) धनी, भाईर सरजेराव रामोशी आनी पांडू न्हावी आल्याती!

**गोपाळराव :** पाठवून दे त्यांना आत.

(करीम बाहेरून त्यांना आत घेऊन येतो. पांडू न्हावी हा तिशीच्या उमरीचा असून, त्याने अंगात एक साधी पैरण, वर जाकीट, डोकीला भलं मोठं पागोटं घातलेलं आहे, काखेत धोकटी आहे. सर्जेराव रामोशी हा दिसण्यात धिप्पाड माणूस आहे. त्याचे वय पन्नाशीच्या दरम्यान असून यावेळी त्याने साधी पैरण, धोतर, खांद्यावर घोंगडे, हातात भाला व डोकीला जुन्या पद्धतीने पागोटे बांधलं आहे. दोघेही पुढं होऊन मुजरा करतात. गोपाळराव मानेनेच त्याचा स्वीकार करतो.) बसा नाईक! पांडू बस ना!भिडे, नाईकांचं काय काम आहे ते संपवतो. मग सांगतो पुढचं! हं नाईक, बोला - काय? आणि पांडू, आज माझ्या जिवाला बरं नव्हतं! आज मी पडून होतो! तेव्हा तू जा, सकाळी ये. (दाढी चोळून) उद्याच करू! (पांडू मुजरा करून जातो) हं, नाईक, बोला!

**सर्जेराव :** धनी, काल माज्या पोराला महिपतीनं मारलं, तवा आपल्या कानावर घालावं म्हणून आलो व्हतो! आमचं धनी कोन ह्या पांढरीत?
**गोपाळराव :** कां - कां मारलं?
**सर्जेराव :** माज्या मल्लूनं म्हनं मुकिंदाच्या माणसांची कळ काढली!
**गोपाळराव :** म्हणजे काय केलं? कोणा बाईचा पदर धरला का डोळा मारला? काय केलं तरी काय? कळ काढली म्हणजे काय?
**सर्जेराव :** त्ये मी कसं सांगू धनी? –
**गोपाळराव :** मग असं करा, उद्या जा आणि त्या मुकिंदाला विचारा! - म्हणावं हे चालणार नाही. कोणीही कोणाला विनाकारण मारू शकत नाही! ही मोंगलाई नव्हे! आणि मी खरं सांगू, तुमचा मल्लू मांझ्या बैठकीला बसतो, रामोशी आमच्याशी इमानदारीने वागतात म्हणून ही मुद्दाम कुरापत काढण्यात आली आहे.
**सर्जेराव :** मग मी काय करू म्हणता?-
**गोपाळराव :** स्वतः तुम्ही जाऊन या दंडेलीचं कारण त्यांना विचारा; मग पाहू पुढे! होऊ दे झंगाझंगी!
**सर्जेराव :** बरं, इचारतो! मग जाऊ?
**गोपाळराव :** हो! हो - दाबात विचार! आमच्या हयातीत असे अन्याय आम्ही सहन करणार नाही! जा.
**सर्जेराव :** हो, म्हनूनच आलो व्हतो.
**गोपाळराव :** आणि हे पाहा, मल्लूला पाठवा, जा! काम आहे जरा. (सर्जेराव मुजरा करतो) पाहिलंत भिडे, कशी पुंडाई चालू आहे येळापुरात!
**गोविंदराव :** (नम्रपणे) धनी, मी सर्व काही जाणतो! पण मी म्हणतो, ह्या रामोशांनी तरी असं दुबळं का व्हावं? अरे रामोशी म्हटलं की त्या उमाजी रामोशाची आठवण होते. त्यानं इंग्रजासारख्या बलाढ्य सत्तेशी सरळ युद्धच पुकारलं होतं. आणि त्यात जेजुरीच्या माळावर इंग्रजांना उमाशी तह करावा लागला. तो रामोशी - त्यानं पन्हाळ्यापासून ते पुणे प्रांतापर्यंत मांग रामोशी एकत्र करून एक फौज उभारली आणि - हे रामोशी.
**गोपाळराव :** खरं आहे. भिडे, रामोशांचं बळ त्यांनाच कळत नाही. म्हणून हे शेतकरी त्यांच्या नाकात काड्या घालीत आहेत. सर्जेराव, जा नि मल्लूच्यावर जो अन्याय झाला आहे त्याचा सूड घ्या. आम्ही आहोत...
**सर्जेराव :** ठीक! धनी, मग मी जातोच. (जातो)
**गोविंदराव :** आता रामोशी पेटवून दिला. जाळ नक्की होणार! आपण आपले स्वप्न सांगावे!

**गोपाळराव :** हो, मग त्याने मला गोळी घातली आणि मी एकदम खाली पडलो! (दौलती येतो. एकाएकी त्याच्या हातातील ताट पडून मोठा आवाज होतो. इनामदार व गोविंदराव भयभीत होऊन पाहतात. नंतर इनामदार दौलतीकडे रागाने पाहत एक एक पाऊल पुढे जातो. दौलती मान खाली घालून उभा आहे. इनामदार जवळ जाऊन एकदम परत फिरतो)

**इनामदार :** दौलती, बाहेर जा - नव्हे, घरी जा! (दौलती निघून जातो)

**गोविंदराव :** म्हणजे आपण ठार झालात!

**गोपाळराव :** अगदी! आणि मग पोलीस आले! त्यांनी माझे प्रेत गाडीत घातले! (मध्येच आठवण होऊन) नाही... नाही, आधी माझ्या मरणाची वार्ता तुम्हाला समजली आणि तुम्ही धावतच आला.

**गोविंदराव :** कोण? मी धावत आलो? आणि...

**गोपाळराव :** आणि काय? ते माझे प्रेत पाहून तुमची एकदम वाचाच बसली!

**गोविंदराव :** (चमकून) काय? माझी वाचा बसली? मग खरंच भयंकर स्वप्न आहे!

**गोपाळराव :** हो. वाचा बसून, तुम्ही रडतरडत त्या गाडीमागून चालत होता!

**गोविंदराव :** मग अतिभयंकर! (घाबरून पंचांगाची पाने उलट चाळू लागतो. उलट सुलट पाने फिरवीत, काही तरी पुटपुटत, बोटावर बोटे मोजतो. घाम पुसून टाकतो. गंभीर चेहरा करून पंचांग पाहातो, पण मुळीच बोलत नाही. गोपाळराव त्याच्या तोंडाकडे आतुरतेने पाहत आहेत)... पण मी म्हणतो...

**गोपाळराव :** काय म्हणता?

**गोविंदराव :** की माझी वाचा का बसावी? (पुन: स्वत:ला सावरून) म्हणजे माझी... माझी वाचा... आधी माझी वाचा का बसली ते पाहतो, मग तुम्ही का मेला ते पाहता येईल!

**गोपाळराव :** छे: छे! असं कसं? अहो, आधी मी मेलो का याचं कारण समजल्यानंतर मग तुमच्या वाचेचा प्रश्न येतो! - म्हणजे माझे मरण, नंतर तुमची वाचा! - तेव्हा आधी माझं मरण पाहा.

**गोविंदराव :** (गंभीर होऊन) बरं, तसं करतो! - (पुन: पाने चाळून, कुंडली मांडून) हं, सापडलं!

**गोपाळराव :** सापडलं? ठीक, कोण तो?

**गोविंदराव :** तो ना? तो तुमचे कुलदैवत काळभैरव! - त्याचा कोप झाला आहे तुम्हावर!

**गोपाळराव :** कोण? काळभैरव - आमचे कुलदैवत? मग तो कोपण्याचे कारण?

**गोविंदराव :** देवांना कोपण्यासाठी मोठी कारणं लागत नाहीत सरकार? आणि येथे स्पष्ट म्हटले आहे की, पूजा नीट होत नाही! सर्वत्र दुर्लक्ष होत आहे.

**गोपाळराव :** पूजा होत नाही? छे: छे: असं कसं! अहो, इथं मुनीमजी दिवसातून तीन वेळा पूजा करतात! - जुन्या वाड्यात ताई पूजा करते! मग हा कोप का?
**गोविंदराव :** हे पहा, कोपाला एकच कारण नाही! आता हेच पाहा; आपण पुत्रप्राप्तीसाठी कुलदैवताची आराधना करायची सोडून, माईंना काशीला पाठविलंत, हा काय लहान गुन्हा आहे?
**गोपाळराव :** असं? मग काय करू म्हणता?
**गोविंदराव :** आता प्रथम स्वप्नशांतीचं एक जेवण घाला; फक्त ब्राह्मणांना! दुसरी गोष्ट, माईसाहेबांना परत बोलावून घ्या!
**गोपाळराव :** खरं आहे. अगदी खरं आहे! ज्यानं मला गोळी घातली ना, तो अगदी भैरोबासारखाच होता! लांब मिश्या-दाट भुवया, धिप्पाड देह...
**गोविंदराव :** अहो भैरोबाच तो! मी खोटं कशाला बोलू? आणि मी खरं सांगू? एका पंचांगाच्या सामर्थ्यावर मी सर्व दैवतं इथं आणून ओळीनं उभी करू शकतो!
**गोपाळराव :** खरं आहे, खरं आहे! परंतु तुमची वाचा...
**गोविंदराव :** (घाबरून) अरे हो, मी ते आता घरीच जाऊन पाहीन! जातो मी, रात्र होत आली; जाऊ मी? (गडबडीत उठून पुन: बसतो.)
**गोपाळराव :** हो, या! मुनीमजी, दिवा लावा ना. आणि करीम कुठं गेला? ए करीम! (करीम लगबगीनं येतो) तू जाऊ नकोस!
**गोविंदराव :** बरं, नमस्ते! (परत आठवल्यासारखे करून बसत) पण हो! धनी, घाबरू नये! स्वप्नात घडणाऱ्या घटना सत्यसृष्टीत घडत नाहीत असं काही लोक म्हणतात.
**गोपाळराव :** खरं आहे! परंतु पोळून निघालेलं मन नेहमी बिचकतं! म्हणजे त्याला...
**गोविंदराव :** म्हणजे बकऱ्याप्रमाणे पाण्यात सुरी...

(गोविंदराव उठून उभा राहतो)

**गोपाळराव :** खरंच, पाण्यात सुरी...! (उठतो) आता माझ्यापुढं दोनच मार्ग आहेत! सुरी चालविणे किंवा चालवून घेणे! माझी महत्त्वाकांक्षा फार मोठी आहे! मला वाटतं, माझ्या डोळ्यापुढे माझ्या वैऱ्यानं डोळे झाकावे; मग मी आपली नेत्रं झाकावी!
**गोविंदराव :** अगदी तसे घडेल - निर्धास्त असा!
**गोपाळराव :** मी तुमच्या बळावर निर्धास्तच आहे! तुम्ही मला विसरू नका! तुम्हासारखी - ज्योतीबा पवारांसारखी - त्या मल्लू नाईकांसारखी हिंमतवान माणसे जर माझ्या पाठीशी असतील, तर (छातीला हात लावून) हा बहाद्दर वाघाला दावं लावील!
**गोविंदराव :** असं का म्हणता सरकार? आम्ही का कोणी परके आहोत? अहो, तुमच्या वडिलांपासून आमचे वडील नि आमच्या वडिलांपासून तुमचे वडील -
**गोपाळराव :** एका जिवाने नांदले आणि त्या खोऱ्यावर दरारा गाजवून, लौकिक मिळवून

निघून गेले; तसेच आपण नांदू या नि जाऊ या! मला उद्याच भेटा!

**गोविंदराव :** अवश्य! नमस्ते!

(जातो-त्याला दरवाजापर्यंत गोपाळराव पोचविण्यास बाहेर जातात. मुनीमजी दिवा लावतो व नमस्कार करतो.)

**करीम :** (डोकं खाजवीत खवचटपणे) मुनीमजी, ह्येंच्या वडिलांपासनं त्येंचं वडील नि त्येंच्यापासून ह्येंचं वडील; ही भानगड काय?

**मुनीमजी :** तू गप्प बैस - बोलू नकोस! ते बाहेर आहेत!

**गोपाळराव :** (आत येत) मुनीमजी, बहकलेल्या कुळांची यादी तयार झाली का?

**मुनीमजी :** जी, झाली!

**गोपाळराव :** किती आहेत?

**मुनीमजी :** पासष्ट जवळ जवळ!

**गोपाळराव :** (संतापून) काय करायचं? कायद्याने आमचे हात बांधले आहेत! नाहीतर एक एकाला इथं आणून, त्याची मान पकडून डोकीवर दगड देऊन सहा सहा महिने उभं केलं असतं! परंतु आता त्याच कायद्याची कुऱ्हाड चालवून एकेकाचा मुडदा पाडा! द्या बार उडवून!

**मुनीमजी** : उद्याच करतो सारं!

**गोपाळराव :** हो, करा! पण तो रामू कुठं आहे?

**मुनीमजी :** करीम, अरे रामूचा पत्ता? कुठं आहे तो?

**करीम :** मला त्येची बातमी न्हाय!

**गोपाळराव :** अरे एका घरचे तुम्ही दोन नोकर; आणि कुणाचा कुणाला पत्ता नाही?

**मुनीमजी :** धनी, आज तीन दिवस झाले; त्याचा पत्ताच नाही!

**गोपाळराव :** अरे-अरे हे काय? तुम्ही चौकशी तरी केली का? करीम, तू त्याच्या घरी जाऊन पाहा; का खाल्ला वाघाने?

**करीम :** मला वाटतं आपून काळजी करू नये! रामूला वाघानं जरी गिळला तरी त्यो त्येच्या पोटांतबी मरणार न्हाय!

(इतक्यात रामू प्रवेश करतो. तो सडपातळ असून त्याने साधी पैरण, धोतर व पटका बांधला आहे. त्याच्या हातात काठी आहे. त्याचे वय पंचवीस आहे. तो पाय ताटून, मंदगतीने कण्हत हळूहळू पुढे येतो. त्याला भयंकर वेदना होत असल्याचे त्याच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसत आहे. गोपाळराव, मुनीमजी, करीम सारेच जण त्याच्याकडे आश्चर्याने पाहतात. रामू हळूच येऊन खाली बसतो.)

**गोपाळराव :** (गंभीर होऊन) काय रामू, कुठं होतास तीन दिवस! बोल! खरं खरं बोल!

**मुनीमजी :** हं सांग, सोंग नको करू!

**करीम :** हो. शिमग्याचा महिना अजून लांब हाय!
**गोपाळराव :** अरे बोल ना रामज्या!
**रामू :** सरकार, मी घरातच व्हतो!
**गोपाळराव :** काय घरात? मग इकडं का नाही आलास? वसूल कुठं आहे?
**रामू :** धनी, वसूल झालाच नव्हता. आनी मला चालाय येत नव्हतं! पार ताटून गेलोय मी सशावानी!
**गोपाळराव :** कशानं ताटलास? काय झालं?
**रामू :** काय सांगू...
**गोपाळराव :** सांग नीट - खरं खरं सांग!
**मुनीमजी :** ए सांग की; बाळशात शिरू नको!
**रामू :** परवा मी वसुलीचा तगादा करून परत येत व्हतो! (कण्हत पाय पसरतो) त्या सती टेकापशी आलो आनी त्यो नरशा बंडकरी म्होरनं आला, झालं!
**गोपाळराव :** (चमकून) कोण नरशा? (करीम व मुनीमजी नरमून ऐकतात)
**रामू :** हो नरशा! त्येनं मला इचारलं, कोन रं तू? तवा म्या आपलं सरळ सांगितलं की मी शिपाई हाय!
**गोपाळराव :** मग तो नरशा काय म्हणाला?
**रामू :** त्येनं मला अटक केली, तवा मी म्हटलं, मी सरकारी शिपाय नव्हं- देशमुखाचा शिपाय हाय.
**गोपाळराव :** मग त्यानं काय केलं?
**रामू :** त्येनं मागं म्होरं सरून माज्या कमरेत लातच घातली!
**गोपाळराव :** आणि रे?
**रामू :** लगेच दुसरी!
**मुनीमजी :** दुसरी?
**रामू :** की तिसरी!
**करीम :** काय तिसरी?
**रामू :** लगीच चौथी!
**गोपाळराव :** अरे... अरे...
**रामू :** पाचवी!
**मुनीमजी :** अरे मग?
**रामू :** सहावी! -
**करीम :** या खुदा!
**रामू :** सातवी, आठवी, कमाकम लाता घालून पाडलंच मला खाली!

**गोपाळराव :** (घाबरून) आणि मग रे?
**रामू :** मग त्येनं मला शिक्षा केली!
**मुनीमजी-करीम :** (घाबरून) शिक्षा?
**रामू :** हो. हो. शिक्षा. आरं, माझा खटला उभा न्हायला आदी नि मग शिक्षा झाली.
**गोपाळराव :** कसली शिक्षा दिली तुला त्यानं?
**रामू :** एक हजार बैठका आणि पाचसे दंड!
**गोपाळराव :** मग तू काय केलंस?
**रामू :** दुसरं कराया जागाच नव्हती! मी आपला उठ-बस कराय लागलो!
**गोपाळराव :** मग काय झालं?
**रामू :** मग उठबस करून ताटून खोकडावानी पडलो खाली आनी मेल्याचं सोंग घेतलं!
**गोपाळराव :** मग सोडलं तुला त्यानं?
**रामू :** हां सोडलं! मरून पडल्यावर काय करणार?
**मुनीमजी :** तू एक हजार बैठका काढल्यास?
**करीम :** आनी पाचसे दंड?
**गोपाळराव :** मग आलास तू? एक हजार बैठका?
**रामू :** हो, त्येची चिठ्ठी दियाची व्हती म्हनून त्येनं सोडलं मला! न्हाय तर...
**गोपाळराव :** कोणाला - कसली चिठ्ठी?
**रामू :** तुमास्नीच चिठ्ठी दिलीया त्येनं!
(पटक्याच्या शेवटातनं चिठ्ठी काढून देतो. गोपाळराव गर्भगळित होऊन ती चिठ्ठी घेतात. मुनिमजी घाबरून इकडे तिकडे पाहतात)
**गोपाळराव :** मुनीमजी, वाचा पाहू ही!
**मुनीमजी :** (दिव्याजवळ जाऊन घाबरत चिठ्ठी वाचतो) देशमुख गोपाळराव, आजपासून तीन दिवसात एक हजार रुपये पोचव, नाहीतर घरात येऊन गोळी घालीन!
**गोपाळराव :** (घाबरून ओरडतो) मला गोळी घालणार? मुनीमजी, करीम - रामज्या आता काय करायचं! मला नरश्या दरोडेखोर गोळी घालणार! (आवाज खाली घेऊन हळूच) करीम, जा, जा, गोविंदराव भिडेना घेऊन ये! (करीम बिचकत कंदिलाकडे पाहतो.)
**करीम :** कंदील नेतो!—
**गोपाळराव :** (थरथर कापत) मुनीमजी, सांगा ना! आता काय होणार? तीन दिवसांच्या आत ... चिठ्ठी देऊन किती दिवस झाले? मोजा-मोजा... करीम, थांब...
**मुनीमजी :** (थरथरत्या हातानं बोटं मोजीत) आज-आज तीन दिवस झाले, मग तो...
(घाबरून आजूबाजूला पाहतात)

**गोपाळराव :** तो आजच येणार नि मला गोळी घालणार! लेका राम्या, शुक्रवारी चिठ्ठी मिळाली होती ती शनिवारी तरी द्यायची होतीस! आता काय करणार आम्ही?
**रामू :** आता मी तरी काय करू? मला चालायाच येत नव्हतं!
**मुनीमजी :** बरं बोला, आता पुढं काय? नरशा आजच येणार - कदाचित नाहीही येणार. पण आपण सावध असलंच पाहिजे!
**रामू :** छे: छे: तो नक्कीच येनार! नि आताच येनार!
**करीम :** येनार नक्की? या खुदा!
**गोपाळराव :** (हळू आवाजात) करीम, तू बाहेर थांब. (करीम भीत भीत बाहेर जातो) मुनीमजी, तिजोरीत रक्कम किती आहे?
**मुनीमजी :** एक हजार नऊशे पन्नास!
**गोपाळराव :** (खुंटीची बंदूक घेऊन) मुनीमजी, मी परसदाराने निघून जातो. नंतर तुम्ही रक्कम घेऊन या! (कानोसा घेत बिचकत बिचकत आतल्या खोलीत जातो. करीम आत येतो. मुनीमजी हळू स्वरात)
**मुनीमजी :** रामज्या, नरश्यानं माझं नाव काढलं होतं का रे? शपथ आहे तुला - खरं सांग!
**रामू :** तर तर, तुम्हास्नी कसा इसरंल बरं? आवं, तुमापाशी तर चावीच असते ह्ये त्येला ठावं हाय! मुनीमजी म्हंजी तिजोरीची किल्ली.
**मुनीमजी :** मग काय बोलला तो? माझ्याविषयी?
**रामू :** त्यो म्हनला, एक हजार बैठका आनी दोन हजार दंड काढाया लावल्याशिवाय मुनीम किल्लीच देनार न्हाय!
**मुनीमजी :** म्हणजे मला दोन हजार दंड - एक हजार बैठका? देवा रे देवा, आता माझं कसं होणार?
**रामू :** आत्ता? बैठका काढायच्या आदी सोंग काढू नगा! म्यां सोंग काढलं न्हाय का?
**करीम :** रामज्या, चल लेका घराला!
**रामू :** जा. आता नरशा येणार हाय! आनी ये करम्या, लेका, शिमगा लांब हाय न्हवं? थांब, आता येतोय बग शिमगा!
(गोपाळराव इतक्यात पळत येतात. त्यांना पाहून करीम आणि मुनीमजी अधिकच भितात.)
**गोपाळराव :** (हळू आवाजात) मुनीमजी, मला कोण तरी दिसलं.
(मुनीमजी, रामू, करीम, गोपाळराव भयचकित होऊन दरवाज्याकडे रोखून पाहतात. वातावरण अधिकच गंभीर होते. देशमुख हळूहळू मागे सरकतात व आपली बंदूक खुंटीला लावतात. इतक्यात करीम आणि मुनीमजी एकदम मागे सरतात. नरश्या आपल्या दोन साथीदारांसह आतमध्ये घुसतो. त्याचा चेहरा उग्र आहे. त्याला पल्लेदार मिश्या आणि

राठ भुवया आहेत. तो उंच-धिप्पाड व शरीरानं तगडा आहे. त्याच्या खांद्यावर बंदूक व गळ्यात काडतुसांची माळ आहे. हातात परशु आहे. त्याचे साथीदारही उग्र चेहऱ्याचे व खुनशी दिसतात. त्यांच्या हातात कुऱ्हाडी आहेत. गोपाळराव नरश्याला समोर पाहून चित्रासारखे उभे राहून खिन्न होऊन पाहत आहेत. मुनीमजी व करीम चुळबूळ करत जागच्या जागीच उभे आहेत.)

**नरशा :** (मागेपुढे पाय देऊन गंभीर आवाजात) देशमुखा, मी नरशा आलो!

**गोपाळराव :** (शुद्धीवर येऊन) न... न... र... शा

(मुनिमजी एका बाजूने आत पळू पाहतात.)

**नरशा :** (दरडावून) हो, नरशा बंडकरी! (मुनीमजी पळतांना पाहून) ये मुनिमजी, नीट उभा ऱ्हा, न्हायतर टिपीऱ्यात पाडीन, पळू नगं! कुनीही पळायचं न्हाय, न्हायतर मागं गोळी लावीन!

**मुनीमजी :** (पहिल्यानं उभ्या राहिलेल्या जागेवर सरकत) नको-नको! मला गोळीपेक्षा बैठका काढून आलेले मरण आवडते! छान आहे ते.

**नरशा :** मग आत कुटं निगाला व्हतास?

**मुनीमजी :** आत? आत आपल्या बैठकाच काढायला! आपला मी आत बैठका काढतो!

(बैठका काढू लागतो.)

**नरशा :** नगं. उभा ऱ्हा तितं! (मुनिमजी बसतो. गोपाळरावांस) ये देशमुखा...!

**गोपाळराव :** (गोंधळून) मुनिमजी! (मुनिमजी उठून उभा राहतो.)

**नरशा :** गोपाळराव!

(मुनिमजी पुन्हा बसतो)

**गोपाळराव :** (स्वत:ला सावरून) हो, हो नरसू, ये!

**नरशा :** (डोळे वटारून) माजी चिठ्ठी!

**गोपाळराव :** हो हो, मिळाली - चिठ्ठी मिळाली!

**नरशा :** मग नीट उभा ऱ्हा!

**गोपाळराव :** नाही-नाही नरसू. मला चिठ्ठी उशिरा मिळाली! मला मारू नकोस, मी मुद्दाम टाळलं नाही! तुला किती रुपये पाहिजेत सांग! पैशापेक्षा माणूस मोठा आहे!

**नरशा :** खोटं! पैशापरीस मानसाची इब्रत मोटी हाय! त्वां माजी इब्रत जानली न्हाय, कारण तुला तुजी इब्रत दांडगी वाटली! पन आता मला माज्या इब्रतीसाठी तुला ठार मारावं लागनार हाय! चल आटप!

**गोपाळराव :** छे: छे: नाही! माझी इभ्रत जगण्यात आहे! जगण्यात पैसा आहे, सर्व काही आहे!

**नरशा :** मग काडा पैसा! येक हजार रुपयं; सुरती.

**गोपाळराव :** हो, हो, आनंदाने. मला जीवदान दे! एक हजार काय, पण... मुनीमजी, नरसूला दोन हजार द्या!
**नरशा :** (मोठ्यानं) नकं-मला येक हजार पायजे!
**मुनीमजी :** दोन हजार? (आत जाऊ लागतो)
**नरशा :** (ओरडून) ये थांब! कुटं?
**मुनीमजी :** (घाबरून) कि-कि-कि...ल्ली!
**गोपाळराव :** नरसू, शांत हो! पैसे घेऊन जा! बैस!
**नरशा :** काय म्हननं हाय? गोपाळराव, जसा तू मला भितो तसा मी बी तुला भितोय! लांबून बोल! तू नि मी सारखंच हाय!
**गोपाळराव :** नाही. मला माफ कर! तुला येथपर्यंत यावं लागलं याची मला माफी कर आणि ही सारी दौलत घेऊन जा! आज मला आनंद झाला आहे! तुझ्यासारख्या व्याघ्राने माझे घरी यावे, हे माझे भाग्य आहे! मी बेईमान नाही! आणि पैशासाठी माणसानं माणसाला मारू नये!
**नरशा :** मलाबी तसंच वाटतं! तुमी तगादं लावून मानसं मारता, मी उटबस कराया लावून मानसं मारतो. मला मानसं मारायचा कंटाळा आलाय!
**मुनीमजी :** मला वाटतं, तुझंच खरं आहे! म्हणजे त्या गोळीपेक्षा बैठका बऱ्या!
**नरशा :** हो, येक तर गोळी मिळत न्हाय नि गुळानं मरनाराला ईख कशाला?
**गोपाळ :** खरं आहे! नरसू, बैस. शांत हो! तू हवे तेवढे पैसे घेऊन चल! ही सारी दौलत तू आपली समज! परंतु माझी एक विनंती आहे. (हात जोडतो)
**नरशा :** काय? बोल!
**गोपाळराव :** तू मला आपला समज! मी महादेवाची आण घेऊन - बेलभंडार उचलून तुला सांगतो, मी तुला दगा देणार नाही! - पण...
**नरशा :** (कोचावर बसत, शांत होऊन) पन काय?
**गोपाळराव :** मला तुझ्या सारखा बहादूर दोस्त हवा आहे! तू पैसे घेऊन जा! मुनीमजी, तुम्ही नरसूला हवे तेवढे पैसे द्या! हो, परंतु नरसू, तू मला विसरू नये एवढीच माझी विनंती आहे! कबूल? (हात पुढे करतो).
**नरशा :** (शांत होऊन) हो, कबूल!
**गोपाळराव :** (आनंदाने) मग बैस! मुनीमजी, नरसूला जे हवे असेल ते जेवण करून घाला! हे जे देशमुखाचे आहे ते आता या नरसूचे आहे! - रामू, तू जा आता! करीम-मुनीमजी, तुम्ही जेवणाची तयारी करा. जा! (सर्वजण जातात) हं नरसू, (मध्येच स्तब्ध होतो व इकडे तिकडे पाहून नरसूच्या समोर गुडघे टेकतो) नरसू, मीही फार हिंमतवान आहे. पण मी एकटा आहे. आणि मला वैरी फार आहेत! ते माझे वैरी मला पाण्यात

पाहत आहेत! माझी ही दौलत लुटू पाहत आहेत! जर तू दोन दिवस इथं राहिलास आणि तू माझा मित्र आहेस ही गोष्ट त्यांना नुसती समजली, तरी ते माझं नाव काढणार नाहीत! म्हणजे माझी दौलत आणि तुझा दरारा, या दोहोंच्यापुढं त्यांची दाणादाण उडेल! मी मी म्हणणारांची गर्दन झुकेल आणि माझी मान ताठ राहील! फक्त दोनच दिवसात!

**नरशा :** ठीक! मी दोन दिवस ऱ्हातो!

**गोपाळराव :** बस् बस्, एवढेच कर! तुझ्या या उपकाराचे ओझे, नव्हे डोंगरच माझ्या शिरावर राहील! मी कधीच विसरणार नाही! - परंतु एक गोष्ट...

**नरशा :** कसली गोष्ट?

**गोपाळराव :** जरा जपून वागायचं! इथं काही लोक तडफदार आहेत! शिवाय त्यांच्याकडे काही हत्यारेही आहेत!

**नरशा :** (गंभीर होऊन) मग काय म्हणता?

**गोपाळराव :** (गंभीर होऊन) जर तुला येळापुरात दोन दिवस राहावयाचे तर तुला निर्भयता ही असलीच पाहिजे! आणि जोपर्यंत त्यांच्यापाशी हत्यारे आहेत, तोपर्यंत ती निर्भयता तुला लाभणार नाही.

**नरशा :** मग काय करायचं?

**गोपाळराव :** साधा नियम आहे त्याला! - ज्याप्रमाणे दुसऱ्याकडे अपार जमीन असल्याने माझी जमीनदारी चालू शकत नाही, त्याप्रमाणेच दुसऱ्याकडे हत्यारे असल्याने तुझी बंडखोरीही चालणे शक्य नाही! म्हणून मी म्हणतो, जसे दुसऱ्यांच्या दारिद्र्यात माझे ऐश्वर्य उठून दिसू शकते, तद्वत दुसऱ्याच्या दुर्बलतेत तुझी प्रबलता उठून दिसू शकते!

**नरशा :** मग कुनापाशी हत्यारं हायती त्येंची नावं सांगा! मला बी हत्यारांची गरज हाय!

**गोपाळराव :** सांगतो! - तू माडीवर चल - जरा आराम कर. जेवण वगैरे झाल्यानंतर बसू! मग सांगतो सर्व काही! - जा! मीही तुझ्या जेवणाची तजवीज करतो!

(नरशा व त्याचे साथीदार वर माडीवर जातात. नरशा गोपाळरावांची बंदूक घेतो. गोपाळराव विचार करीत येरझाऱ्या घालतात. त्यांना अत्यानंद झाल्याचे त्यांच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसत आहे. थोडा वेळ असाच गेल्यानंतर गोविंदराव भिडे येतो. तो अतिशय घाबरून गेलेला दिसत आहे. लगबगीनं पुढं येऊन)

**गोविंदराव :** धनी, घात झाला! नरशा बंडकरी येळापुरात आल्याची बातमी उठली आहे! आता काय करायचं?

**गोपाळराव :** (मुद्दाम घाबरल्यासारखे करीत) अरे देवा, मग हो काय होणार?

**गोविंदराव :** (गंभीर होत) धनी, चिंता करू नये! आता या क्षणी मी पाहतो! (खिशातून पंचांग काढून समोर पसरतो व पाने चाळू लागतो) अरे वाहावा रे नरशा बेट्या!

**गोपाळराव :** (माडीकडे घाबरून पाहत) अहो गोविंदराव, गप्प ना! मला त्याची भीती वाटते!

**गोविंदराव :** भीती? भीतीचे कारण नाही! तो नरशा इथं गावातच आहे! येळापुरात आहे!

**गोपाळराव :** (दबलेल्या आवाजात) आहे, पण हळू बोला ना!

**गोविंदराव :** का हो? हे पंचांग जवळ असल्यावर मी त्याच्या बापाला भिणार नाही!

**गोपाळराव :** (त्याच्या तोंडावर हात ठेवीत) अहो, हळू बोला! तो इथं येईल ना!

**गोविंदराव :** नाही! या वाड्यात तो कधीच येणार नाही. (नरशा धीमेपणाने माडीवरून खाली पायऱ्या उतरतो. गोविंदराव त्याला न पाहूनच बोलत आहेत.) आणि आला तर हा भिडे त्याला या पंचांगाच्या सामर्थ्याने जाळून भस्म करील. (नरशा गोविंदरावाच्या बाजूला येऊन उभा राहातो) नरशा गेला...

**नरशा :** (ओरडतो) कोण तू?

**गोविंदराव :** (नरशाला पाहून हुडहुडी भरल्याप्रमाणे चाचरत) मी... मी... मी... (गोविंदराव कुत्र्यासारखा जमिनीवर लोळू लागतो. त्याला गोपाळराव उभे करण्याचा प्रयत्न करीत असतानाच पडदा पडतो.)

# अंक दुसरा

*(मुकिंदाच्या घराचा समोरचा सोपा दिसत आहे - मध्ये चौकट आहे. आत भांडी वाजल्याचा आवाज होत आहे, त्यामुळे प्रेक्षकांना घरात कुणीतरी असल्याची जाणीव येते. दुरून जात्याचा आवाज येतो. सोप्यात खुंटाला सापत्या, कासरा वगैरे शेतीचे साहित्य व अवजारे आणि एक घोंगडे दिसत आहे. चौकटीजवळच खुंटीला कुऱ्हाड आहे.*

*थोड्या वेळाने मुकिंदाची सून गुणाबाई ही कसलंतरी गीत गुणगुणत कंदील लावून बाहेर आणते व तो सोप्यात ठेवून आत परत निघून जाते. पुन्हा ती बाहेर येऊन अंगणात तुळशीजवळ निरांजन लावते. ती दिसण्यात सुंदर, नाकीडोळी नीटस असून राहणी साधीच आहे. तिचे वय वीस वर्षाचे असावे. ती आत जाताच पुन्हा गंभीरता निर्माण होते.*

*काही वेळाने रामू प्रवेश करतो. तो इकडे तिकडे निरखून पाहतो व कानोसा घेतो. त्याला सगळे शांत व घरात कोणी न दिसल्यामुळे तो हाका मारतो –)*

**रामू :** आबा! आबा! वयनी!
**गुणा :** (आतून) कोन हाय त्ये?
**रामू :** मी रामज्या हाय! गुणावयनी.
**गुणा :** (बाहेर येऊन आश्चर्य प्रकट करीत) आँ? भावोजी? आवं हुंबराच्या फुलावाणी चांगलं बारा वरसानं की उगवताय! कुटं गेला व्हता?
**रामू :** कशाचं काय वयनी! मी बघा पार मेलो व्हतो! पन आपलं बायकूचं कुंकू बळकट म्हन वाचलो झालं!
**गुणा :** म्हंजी वं काय?
**रामू :** म्हंजी मी पार सरगाच्या वाटंला लागलो व्हतो! पन मधनंच मागं आलो!
**गुणा :** मला न्हाय कळलं, वाईच नीट सांगा की!
**रामू :** आवं म्हंजी असं, परवा मी वसुलीचा तगादा करून येत व्हतो! दिस बुडायाच्या बेतात व्हता नि त्या सतीटेकापासी... आणि मला...
**गुणा :** आनी तुमाला वाघानं गिळलं का काय?
**रामू :** आवं वाघानं नव्हं, त्या नरशानं गाठलं!

**गुणा :** आनी? (घाबरून) आनी वं?
**रामू :** आनी काय, तुडवून श्यान केलं माजं!
**गुणा :** आत्ता ग बया! मुडदा गेला त्या नरशाचा! त्येच्या बाचं काय खाल्लं व्हतं तुम्ही?
**रामू :** आवं त्येच्या बाचं खाल्लं नव्हतं म्हणून तर सुटलो! न्हाईतर यदुळा सरगात मी जुनापुराना झालो असतो! वाईच इस्तू द्या!
**गुणा :** त्यो नरशा कसला हाय?

(उठून आत जाऊन निखारा घेऊन येते. रामू विडी पेटवितो.)

**रामू :** काय म्हनाला? नरशा? हाय की रानमानसावानी, बंब्याच्या बंब्या! पन वयनी, सारी मानसं कुटं गेली? घरात कुनी न्हाय?
**गुणा :** सारी म्हंजी?
**रामू :** सारी म्हंजी दिनकर, महिपती नाना, त्यो रानुदाजी! आनी आबा!
**गुणा :** हाय, का बरं? राजाला दिवाळी ठावं न्हाय! आवं, आज टाळगावची जत्रा नव्हं का? आनी तुमी वं का गेला न्हाय?
**रामू :** न्हाय गेलो! कसा जानार - ह्ये काम हाय न्हवं? आनी मला चालाया कवा येतंय? 'जत्रेला गेलं कुत्रं, त्येच्या जीवाचं झालं मात्रं' तसं व्हायचं म्हनून न्हाय गेलो! पन आबा कुठं हाय?
**गुणा :** त्ये गेल्याती म्हारवाड्यात! त्यो नारूबाबा आजारी हाय, त्येला बघाय!
**रामू :** मग येईल तर आता?
**गुणा :** हो, आता येतील; बसा वाईच. (आत जाते व सांडपाणी घेऊन बाहेर येते व सरळ पुढे जाऊन फेकून देते. परत माघारी आत जाताना मध्येच कसला तरी विचार येऊन) नव्हं, मी म्हनत्ये, ह्यो नरशा अशी मानसं मारीत फिरतोय त्यो का?
**रामू :** त्येला का कारण लागतं? कुत्रं का पिसाळतं ह्ये इचारल्यावानीच इचारताय! - येक पिसाळलेलं कुत्रं दुसऱ्याला चावतं; मग दुसरं पिसाळतं! तसंच हाय त्ये! (गुणा आत जाते)
**गुणा :** (पदराला हात पुशीत रामूपढे येऊन उभी राहत) आनी परवा म्हनं, लटक्याच्या वाडीत त्येनं येका बाईला धरली!
**रामू :** खरं हाय! लोक म्हनत्यात. पर नरशाच्या नावावर भुमका लई पिकत्यात!
**गुणा :** त्या बाईला कुनी व्हतं का नव्हतं?
**रामू :** वयनी, जीवावर उदार झालेल्या मानसांचा सामना कराय जीवावर उदार झालेलीच मानसं लागत्यात! परवा मल्यानं तुजी चेष्टा केली. आनी दिनकराच्या आदी महिपती नानानंच भरपेठंत त्येला पाडला! तू नसिबवान हायस वयनी, तुजी पाटबळ दांडगी हाय!
**गुणा :** (अभिमानाने) खरंच मी नसिबवान हाय! जीवावर उदार असनारांनी येळापुरात

येऊन बगावं; त्येला जीव घेऊन पळावं लागंल. (जाऊ लागते).

**रामू :** वयनी, नरशा... (रामू अडखळतो. गुणा थांबते. स्वत:ला सावरून) नव्हं, नरशा येळापुरात येनार न्हाय!

**गुणा :** हो, न्हायच येनार!

(इतक्यात 'कोण हाय का' अशी बाहेरून हाक येते. रामू व गुणा कानोसा घेतात. पुन्हा 'कोन हाय का घऱ्हात' अशी हाक ऐकू येते. रामू पुढे होतो.)

**रामू :** (कानोसा घेत आतूनच) कोन हाय त्ये?

**सर्जेराव :** (बाहेरूनच) मी सर्ज्या रामोशी हाय!

**गुणा :** उघडा आनी (खुंटीवरील कांबळ्याकडे बोट दाखवीत) ह्ये बसाय टाका! हं उघडा!

(पदर सावरून आत जाऊन थांबते, रामू दार उघडतो. सर्ज्या व दुसरे दोन रामोशी आत येतात. रामू नंतर घोंगडे अंथरतो.)

**सर्जेराव :** (उभ्यानेच चौकस दृष्टीने इकडे तिकडे पाहत) आबा कुटं गेलती?

**रामू :** म्हारवाड्यात! येतील आता. बसा!

**सर्जेराव :** कवासं येतील?

(खाली कांबळ्यावर बसतो. त्याच्या बाजूला दुसराही रामोशी बसतो. पण तिसरा तरुण रामोशी तसाच खांद्यावर काठी घेऊन उभा राहतो.)

**रामू :** ये म्हादू, बस की!

**म्हादू :** (गुर्मीत) का? का गा?

**रामू :** का नव्हं, घोंगडं अंथरलंय म्हनून! असा का उभा ऱ्हायलास?

**म्हादू :** कसा- पायावर उभा हाय का डोक्यावर? कसा दिसतोय तुला?

**रामू :** पायावरच खरं! पर असा का हुंटावानी ताटलायस? माणसावानी बस की!

**म्हादू :** तू असा तिपड्यात का बोलतुयास?

**रामू :** येवढ्यासाठीच की, मानसानं मानानं पान खावं. वनव्यानं उकाळ चाटू नये!

**म्हादू :** म्हंजी? तुला म्हनायचंय काय?

**रामू :** म्हंजी देशमुकाच्या वाड्यात पायरीवर बसून पाय धरता, नि हातं तुला घोंगड्यावर बसवंना!

**म्हादू :** ये- तू असा फाजील बोलू नकं!

**सर्जेराव :** म्हादबा, बसा की! उगीच का तंडताय? बसा!

**म्हादू :** न्हाय मी त्या घोंगड्यावर बसणार!

(इतक्यात मुकिंदा बाहेरून प्रवेश करतो. त्याचे वय पन्नास पंचावनच्या दरम्यान असून त्याची शरीरयष्टी धिप्पाड व मजबूत आहे. मिश्या भरदार आहेत. त्याच्या

हालचालीवरून तो विचाराने पोक्त, शहाणा, दिलदार आणि त्यागी दिसतो. त्याच्या अंगात जुन्या चालीची पैरण, साधे धोतर, डोकीला पागोटे व खांद्यावर घोंगडं आहे. त्याच्या हातात काठी आहे. त्याला पाहून सर्जेराव 'राम राम' करतो. त्याला 'राम राम' असे उत्तर देऊन मुकिंदा तसाच पुढे होतो व घोंगडे काठी खुंटीला लावीत—)

**मुकिंदा :** काय नाईक, कवासं आला हुता?

**सर्जेराव :** आत्ताच आलो!

**मुकिंदा :** बरं झालं! - बसा हं. (इतक्यात रामूकडे पाहून) आनी रामज्या, तू?

**रामू :** मी उगाच आलोय! - (गुणा पाण्याचा तांब्या आणून बाहेर ठेवते. तो तांब्या उचलून मुकिंदा बाहेर जाऊ लागतो. इतक्यात त्याची नजर उभ्या असलेल्या महादूवर जाते.)

**मुकिंदा :** म्हादबा, बसा की!

**म्हादू :** बसतो! (खाली बसतो. मुकिंदा बाहेर जातो.)

**रामू :** (म्हादूला) ये, आरं माझं ऐकलं असतंस तर तुझ्या झोळीत का दगूड पडला असता?

**म्हादू :** ये, तू गुमान बस बरं! (मुकिंदा हातपाय धुऊन परत आत येतो व दरवाज्याजवळ तांब्या ठेवतो. गुणा तो तांब्या घेऊन आत जाऊ लागते. तिला उद्देशून—)

**मुकिंदा :** बाळ, नारूचा आजार कमी व्हायचं चिन्हं दिसत न्हाय! येळापूरचा चांगला माणूस जायाच्या बेतात हाय! (गुणा आत जाते. सर्जेरावाकडे वळून) हं, नाईक, बोला! - का आला व्हता?

**सर्जेराव :** मी एवढ्यासाठी आलो व्हतो, की महिपतीनं माझ्या मल्याला भर पेठंत मारलं ह्येचं कारण काय?

**मुकिंदा :** आता ह्येचं कारण तुमीच वळखा! म्हंजी माझं म्हननं असं, महिपतीवानी कर्त्या माणसानं मल्यावर हात का टाकला? कारण रामोशाचं नि आमचं मुळातच वाकडं न्हाय; मग ह्ये असं का झालं?

**सर्जेराव :** आबा, असं उडवाउडवीचं उत्तर नका देऊ! आनी आम्हालाच इचार कराया सांगता? मी म्हनतो, त्यात इचार कशाचा करायचा? रामूशी म्हंजी आल्लाच्या गायी, कुनीबी सुरी फिरवावी...!

**म्हादू :** (मध्येच) पन आमची अवलाद रामोशांची हाय.

**मुकिंदा :** म्हादू, अवलादीची भाषा बोलू नकं!

**म्हादू :** का, का बोलू नकं?

**मुकिंदा :** नकं, कारण रामोशांची अवलाद पाच हत्यारी असती, आनी दुसऱ्यांच्या अवलादीनं काकणं भरल्याती असं समजू नकं! ह्या येळापुरात देशमुखाचं आनी गावाचं तीन पिढ्यांचं वैर हाय! सारखी लढत चालू हाय! त्या लढतीत म्या; म्या या हातानं

इस वरसं हत्यार पेललंया! ज्येच्या हातात बळ त्ये हत्यार पेलतं! हातं बळाचा आनी हत्यार धरणाऱ्या अवलादीचा सवाल न्हाय! हातं नेक अवलादीचा सवाल हाय!

**सर्जेराव :** मग रामोशांनी नेकी सोडली ह्ये तरी पटवून द्या! बोला...

**मुकिंदा :** ह्ये बघा, हातच्या कांकनाला आरसा लागत न्हाय! खेडेगावात जाती लई असल्या तरी नातीबी लई हायती! - लांब कशाला, मी तुज्या आईला काकू म्हनत व्हतो; दिनूच्या आईला तू वयनी म्हनीतास; म्हंजी तुजंमाजं नातं भावाभावाचं! - मग माजी सून ती तुजीबी सून, ह्येला म्हनायचं नातं; आनी ही नाती डोळ्यातल्या बुबुळात नांदत्याती! पन रामोशांच्या डोळ्यात वळख उरली न्हाय; त्येनी देशमुखाच्या सांगन्यावरून वळख सोडली! - डोळ्यात पाणी न्हायलं न्हाय!

**सर्जेराव :** (मध्येच) आबा, उघड बोला!

**मुकिंदा :** उघड ऐका! तुझा मल्या गोपाळरावाचा कलीजा बनून, आमच्या काळजाचा घड - आमच्या लेकीबाळींची इज्जत घेऊन कापाय बगतोय! - म्हणूनच महिपतीनं त्या देशमुखाच्या काळजालाच हात घातलाय! - सांग, माझ्या गुनाची थट्टा ही नेकीच का? —

**म्हादू :** पन ह्ये आम्हास्नी कळलंच न्हाय!

**सर्जेराव :** (खिन्न होऊन) खरंच, ही भानगड मला आदी कळती तर हतं आलोच नसतो!

**मुकिंदा :** बरं झालं आलास - गोष्टीचा उलगडा झाला; आमालाबी वैरी नकं कोन! वैराचं पीक नसावं.

**सर्जेराव :** (आपल्याजवळील तंबाकू काढून चिलमीत भरीत) आबा, मल्याची आगळीक झाली, पन आता रामोशी नेकीनं वागंल! झाल्या गेल्या गोष्टीसाठी मला माफी करावी! इस्तू वाईच पायजे!

**मुकिंदा :** (आत पाहत) गुणा, बाळ इस्तू आन! (गुणा निखारा घेऊन सर्ज्यापुढे ठेवते व माघारी फिरते. इतक्यात— )

**सर्जेराव :** सूनबाई, थांबा. (गुणा थांबते) ऐका - एवढा एकच गुन्हा, आमच्या अवलादीला डाग लावनारा गुन्हा रामोशांकडून घडलाय. तवा ह्या माज्या पागोट्याला नि ह्या मिशीला बघून मला माफ करा; रामोशास्नी वाईट म्हनू नका. (बोलता बोलता खांद्यावरील घोंगड्याचा पदर पसरून, त्यावर डोके टेकतो. गुणा जाऊ लागते.)

**मुकिंदा :** (गहिवरून) न्हाय-न्हाय! बाळ थांब! नाईक, ह्ये काय? न्हाय बरं, असं वळचनीचं पानी आड्याला का घालवता? (गुणाला) बाळ, सासऱ्यानं सुनंच्या पाया पडायचं नसतं. ज्येचा मान त्येला परत करा!

(गुणा इकडे तिकडे पाहते आणि सर्जेरावाला पदर धरून नमस्कार करते. सर्जेरावाला समाधान होऊन तो मिश्या सावरतो)

**सर्जेराव :** येळापूरचा रामोशी तुमच्या आबरूवरून मुंडकंच ओवाळून फेकून देईल!

आबा, आमी जातो आता!

(असे म्हणत म्हणतच उठतात. गुणा आत जाते आणि गोविंदराव भिडे आत येतो).

**मुकिंदा :** काय गोईंदराव, इकडं कुटं?

**गोविंदराव :** इकडेच आलो! - देशमुख साहेबांना आता रामोशाची गरज लागली म्हणून मी रामोशवाड्यात गेलो, तर तिथं कळलं की रामोशी मुकिंदाकडे गेले आहेत! मग आलो आपल्या इकडे!

**मुकिंदा :** म्हंजी जिकडं आग तिकडं वारा! बरं, बसा!

**गोविंदराव :** हो, बसतो! पण ए सर्जेराव, काय भानगड आहे?

**सर्जेराव :** कसली भानगड? मल्याबद्दल आलो व्हतो!—

**गोविंदराव :** असं असं; आलं लक्षात! - पण मी म्हणतो, तुझ्या मल्याला त्या महिपतीनं मारलं आणि तू त्याला विचारायचं टाकून इकडे का आलास? दुख असेल त्याच ठिकाणी डाग द्यावा!

**मुकिंदा :** खरं हाय! पन खाजवून आनल्याल्या आवदानावर डाग देऊन जमत न्हाय; त्येला दुखच लागतं! न्हायतर दुसरं दुख पैदा व्हतं. आनी त्ये ह्या रामोशास्नी पटलं!

**गोविंदराव :** ते खरं आहे! परंतु माझं म्हणणं असं की, महिपती म्हणजे मुकिंदा नव्हे! महिपतीचा अपराध...

**मुकिंदा :** अपराध? महिपतीनं अपराध केला न्हाय!

**गोविंदराव :** तसं नाही! परंतु महिपतीसारख्या मोठ्या माणसानं गरिबाला असा त्रास द्यायचा हे काही बरं नाही!

**मुकिंदा :** नका-त्ये मला सांगू नका! गोरगरीबांच्या सुखाची भाषा तुमी नका बोलू! बाकी तोंडानं गरीबाचं हित सांगायचं, आनी हातानं गरिबाची मुंडी मोडायची; ह्ये तुमालाच साधलंय!

**गोविंदराव :** (त्याला अडवून) मुकिंदराव, भलतं सलतं बोलू नका.

**मुकिंदा :** का? आता का नाकाला घान आली? गणपतराव देशमुखाच्या खुनात त्वां खोटी साक्ष देऊन, राणूजीच्या बापाला फासी दिलास; ह्ये खोटं हाय? तुमी दोघांनी, गाव धारेवर धरून महिपतीवर चापटर काडला, ह्ये येळापूर इसरलं न्हाय! ह्ये रामोशी इसरतील, पन या गावची माती त्ये इसरनार न्हाय! तुमी त्वां नि देशमुखानं गावचा गंजीखाना जाळून मला तुरुंगात घातलं! गरीब शेतकरी तुमी सांगाल तसं वागला, पन आता काळ बदललाय!

**गोविंदराव :** काळ बदलला म्हणजे काय झालं?

**मुकिंदा :** म्हंजी शेतकरी बोलतोय. सरळ सरळ बोलतोय. आनी तुमी हातानी होत न्हाय म्हनून रामोशांस्नी पुढं करून आमच्या लेकीबाळीची आब्रू छिनाया बगता! - पन याद

राखा; त्ये आता जमायचं न्हाय! आब्रू लुटनाराचा पाय पायाला ऱ्हानार न्हाय! त्येचं डोकं धडावर ऱ्हायाचं न्हाय! त्यात आमचं डोस्कं गेलं तरीबी त्येची आमाला पर्वा न्हाय!

**सर्जेराव :** भिडेसाहेब, आमचं आनी मुकिंदाआबाचं जे व्हायचं त्ये झालं. आता वाढवता का तुम्ही?

**गोविंदराव :** (माघार घेत) मी कशाला वाढवू? पण माझं म्हणणं एवढंच की हा गाव आहे. थट्टा नाही.

**मुकिंदा :** (शांतपणे) तुमीच गावाला थट्टा समजताय! म्हणून आज तीन पिढ्या तुमी वैराची आग पुरून ठेवलीया! - वरचेवर फुंक मारून गाव जाळाय बगताय, आनी वर म्हनताय थट्टा नव्हं! - पन मी म्हनतोय, येळापूर म्हंजी थट्टा नव्हं; आग हाय आग! –

**गोविंदराव :** आम्ही-आम्ही वैराची आग पुरली? असं बोलू नका!

**मुकिंदा :** हो तुम्ही; आनी मी बोलनार! तुमच्या आनी गोपाळरावाच्या आज्यानं गावात नाचरी बाई आनून जुन्या वाड्यात गाव जमवला! - लोकांस्नी कर्ज देऊन, त्या बाईला दौलतजादा सोडाय इरेला घातलं! तमाशाच्या फडात कोऱ्या कागदावर आंगुठं घेऊन निम्म्या गावाच्या हाताला कडन्या लावल्या! - नाचणाऱ्या बाईच्या त्या मिळकतीच्या तीन वाटण्या करून वाटून घेतल्या नि निम्म्या गावावर तगादा-तसदी खटला-जप्ती-हानमार याचा पाऊस पाडला! आनी त्या पावसानंच आपल्या वैराचं पीक उगवून आलं! - त्ये पीक जतन करू नका! त्येला अन्यायाचं पानी आनी कुरापतीचं खत घालू नका! - बरं व्हायचं न्हाय!

**गोविंदराव :** काय होणार? जे व्हायचं ते होऊ दे! आम्ही आता कायद्यानंच सर्व काही करू! त्यासाठी पैसा पेरू! -

**मुकिंदा :** पेरा पैसा... पेरा! लुबाडलेला पैसा पेरून परत वैराचं पीक काडा! आम्ही मानसं पेरून मानसं उगवू (उपहासाने) पैसा! तुमाला वाटतं, पैशानं कायदा खरीदी करता येतो. खून गारद करता येत्यात; पन त्ये दिवस आता ऱ्हायलं न्हायती! जग, कायदे, मानसं, सारंच बदलून गेलंय! पन तुमी...

**गोविंदराव :** आम्ही? बोला ना... बोला!

**मुकिंदा :** तुम्ही चिखलात रेडा रुतावा तसं रुतलाय! बदलच होत न्हाय तुमच्यात! सारकं आगीत त्याल ओतताय. पन याद असू द्या, त्याच आगीत जळून मराल तुम्ही!

**गोविंदराव :** बरं-बरं. बघू कोण मरतो ते! चला, ए रामोश्यांनो, चला!

(झटक्यात बाहेर जातो. रामोशी तिथेच थांबतात)

**सर्जेराव :** (थोड्या वेळानं) आबा, आमी जातो!

**मुकिंदा :** (खिन्न होऊन) हं जावा, तुमी जावा! (रामोशी सर्व जातात. मुकिंदा खिन्नपणे विचार करतो. नंतर) गुना, दिनू कवा येनार?

**गुणा :** (दरवाजात येऊन) जेवून घ्यायला सांगितलंय, उशीर लागनार हाय!
**मुकिंदा :** असं? (रामूकडे नजर जाऊन) आनी रामू, तू का गप्प?
**रामू :** मी काय बोलू? मी ऐकत व्हतो!
**मुकिंदा :** ऐकलंस नव्हं? बाकी रामू आज नवल घडलं! ह्यो भिडे माझ्यापुढं उभा न्हात नव्हता! आज धा वरसात आजच त्यो माज्या घऱ्हात येऊन बोलला! त्येची ही हिंमत कशानं वाडली कायबी कळत न्हाय! आज येकादं मढं उठून बोलू लागावं, तसंच झालं बग!
**रामू :** आबा, एक भानगड हाय!
**मुकिंदा :** भानगड? कसली?
**रामू :** (बदललेल्या आवाजानं) आबा, गावात नरशा बंडकरी आलाय!
**मुकिंदा :** (डोळे विस्फारून) काय नरशा? त्यो दरोडेखोर - आनी गावात? कुठं हाय त्यो?
**रामू :** त्यो त्योच नरशा! गावात देशमुखाच्या वाड्यात राती व्हता!
**मुकिंदा :** मग त्वा सकाळच्यानं का सांगितलं न्हाईस?
**रामू :** मला वाटलं, त्यो पैसं घेऊन गेला असंल, पन दोपारी बगतोय तर माडीवर खुशाल कोंबड्या खात बसलाय!
**मुकिंदा :** रामू, चूक केलीस! बरं, आताच्या आता तू जा नि त्येच्यावर नजर ठेव; जा! (गुणा घरातून पाण्याचा तांब्या आणून बाहेर ठेवते ते पाहून) बाळ, आमी आता जेवनार न्हाय! (ती कारण न कळून थांबते व काहीतरी विचारणार हे पाहून) मला भूक न्हाय! तुमी घऱ्हात जा!

(गुणा गोंधळून घरात निघून जाते)

**रामू :** बरं आबा, मी जातो!
**मुकिंदा :** हो, हो, जा नीट!

(एवढ्यात पांडू न्हावी आणि त्याची बायको काशी यांच्या भांडणाचा गोंगाट घराबाहेर ऐकू येतो. तो तिला 'आगं, धोकटी सोड माजी' असे म्हणत असून, 'न्हाय, न्हाय सोडनार' अशी ती ओरडत आहे. दोघेही ते ऐकून आपआपल्या जागी थांबतात. ती दोघेही सोप्यात येतात.)

**पांडू :** आगं - आगं माजी धोकटी सोड! बायकू हाईस का खवीस?
**काशी :** न्हाय - न्हाय सोडणार! —
**मुकिंदा :** थांबा - थांबा; काय झालं?

(काशी मुकिंदाला पाहून धोकटी सोडते व पदर सावरून बाजूला सरते. गुणा बाहेर येऊन बाजूस उभी राहते. रामू पुढे होऊन)

**रामू :** काय वयनी, तुला ग कशाला ही धोकटी? का भाकरी भाजायचं सोडून डोस्की भादरायची हौस आली तुला?

**काशी :** (रागाने) हो, हो, आलीया!

**रामू :** नकं-नकं; रोज पाच खून करशील तू! आनी पाच मईन्यात एक मानूस उरनार न्हाय या गावात!

**काशी :** दाजीबा, तुमी मुकाट्यानं गप्प बसा. थट्टा करू नका; हो!

**मुकिंदा :** पर काय झालं कासूबाई? ये पांडू, काय रे, काय कलागत हाय ही? बोला, का भांडता?

**गुणा :** हं, कासू - सांग!

**रामू :** पांडू, बोल!

**काशी-पांडू :** सांगू का आबा?

**मुकिंदा :** एक जन सांगा; दोगांचं कसं ऐकू?

**काशी :** (पुढं सरसावून) मी म्हणते, ह्येनी रोज उठून त्या इनामदाराचं थोबाड गोंजरायचं नि घरात पोटाला न्हाय म्हणून म्या उपाशी बसायचं ह्येचं नाव काय?

**रामू :** मला वाटतं, पांडू, उद्यापासून थोबाडं गोंजारायची सोडून म्हशी भादर; म्हणजे प्वाट भरंल.

**काशी :** ह्ये बगा, लागला का तुमी बिबा घालाय? मी म्हनत्ये, ह्येनी म्हशी भादरू नये; पन त्या देशमुखाचंच एकट्याचं थोबाड रोजरोज घोटीत बसायचं, आणि गावच्या कुळांनी आपली वाडलेली थोबाडं घेऊन दारात येयाचं आणि ह्येनी आपलं थोबाड दडवून पळायचं, ह्ये बरं हाय का?

**मुकिंदा :** काय पांडू, रोज येकाचीच हजामत करून कसं चालंल? गावकी हाय ही!

**पांडू :** आबा, कवा गा मी येकाची...

**काशी :** आता खोटं बोलू नका! काल त्या देशमुकाला बरं वाटत नव्हतं म्हणून त्यो जुन्या वाड्यात निजला, आनी ह्ये नव्या वाड्यात त्येची वाट बगीत थोबाड घेऊन बसले! आनी कडूसं पडतापडता हळूच आल्याती!

**मुकिंदा :** खरं का पांडू? (पांडू शरमतो) चुकतंय ह्ये! आरे, जसा धरनीवर डोंगर तरलाय तसंच हतं गावात दरेक मानूस येकमेकांच्या आदारावर तरतोय! तू पंढरीचा बैता हायस! तू समद्यास्नी सारका असला पाहिजेस! रोज देशमुखाच्या वाड्यात बसून गावकी बुडवशील! नीट गावकी कर! काशी, तू बी अशी करू नकं. नवऱ्याला बायकांनी नीट वागवावं!

**रामू :** असं अस्वलावानी नाचवू नये!

**मुकिंदा :** बसा! काशी, जा घऱ्हात! पांडू, काय तंबाकू बिंबाकू ओडणार?

**पांडू :** हो, ओडतो की! (खाली बसतो)
**मुकिंदा :** मग काय तंबाकू देऊ तुला? रामज्या, तू जा!

(रामू जाऊ लागतो तोच दूर आरडाओरड ऐकू येते. सर्वच जण त्या दिशेने ऐकू लागतात. दंगल झाल्याप्रमाणे गलका होतो. बायकांचा रडण्याचा आवाज येतो. 'धावा धावा' अशा आरोळ्या ऐकू येतात. मुकिंदा गंभीर होऊन मान ताठ करून त्या दिशेने पाहतो व अंदाज घेतो.) रामू, जा बग; ज्या दिवशी भिड्यानं गंजीखाना जाळला त्या दिवशी अशीच बोंब झाली व्हती!

(इतक्यात घाबऱ्या घाबऱ्या करीम प्रवेशतो.)

**करीम :** आबा, आबा...
**मुकिंदा :** करीम, काय झालं सांग!
**करीम :** नरशानं दारू पिऊन, येळापूर जाळाया सुरवात केली! दिसंल त्येला मारीत...
**गुणा :** दिसंल त्येला मारीत? पन गावात कुनी हाय का न्हाय त्येला अडवाय?
**मुकिंदा :** बाळ, कोन असनार? असनारानी ह्यो भस्मासुर उटवला - आडवनारे हतं न्हायती. घात!
**गुणा :** मग घात झाला! आता काय व्हनार?
**रामू :** आता काय करूया?
**करीम :** महिपती, दिनकर, राणूजी कुटं हायती?
**मुकिंदा :** त्ये आज हतं न्हायती; म्हनूनच तर ही दंगल सुरू झाली. (तिकडे दंगलीचा आवाज चालू आहे) येळापूरच्या वैऱ्यांनी संदी सादून ह्यो घात केलाय!

(ज्या दिशेला दंगल होत आहे त्या दिशेने सर्वांचे डोळे आणि कान लागले आहेत.)

(दंगल वाढत आहे. आणि ती जवळ आल्यासारखी आवाजावरून समजते.)

**गुणा :** आता काय व्हनार?
**मुकिंदा :** पुढं काय व्हनार ह्ये आता कसं कळनार? - बाकी, चांगलं व्हनार!
**पांडू :** मग आबा आता...
**मुकिंदा :** हो, आता-आता आपून काय तरी केलंच पाइजे. आदी तू नि करीम दोगं टाळगावच्या रोखानं निगा! आनी काशे, तू-गुणा-रामू तुम्ही काशीच्या घऱ्हाकडं जायचं; चला बगू!
**करीम :** मग आमी निघतो!
**मुकिंदा :** हो निघा! महिपती-दिनू-राणू ह्येस्नी म्हनावं लवकर या! तुमच्या ह्या येळापूरला आग लागलीया! या म्हनावं - जा, जा, पळा! (करीम-पांडू घाईघाईने निघून जातात. नंतर काशी, गुणा, रामू यांच्याकडे वळून) तुमी बी निगा. उशीर करू नका! ती आग मुकिंदाच्या घऱ्हाकडं यायचा रंग दिसतोय! (दंगल वाढत आहे) आनी बाळ, (गुणास)

बंदूक कुटाय?

**गुणा :** (दु:खित अंत:करणाने) ती टाळगावला नेली!

**मुकिंदा :** ठीक, बरं झालं! तू काशीबरोबर जा!

**गुणा :** (गोंधळून) पन ... (झटकन घरात निघून जाते)

**मुकिंदा :** (आवाज उंचावून) बाळ, संकटाला मानसानं बगल दिल्यानं कमीपणा येत न्हाय! - पान्याआदी वळन बांदावं! तू जा; राजारामानं रायगड सोडला व्हता! राणीला मागं टाकून!

**गुणा :** (दरवाज्यात येऊन) मग तुमी का न्हाय चलत? बगल देयाची न्हवं? देऊ या.

**मुकिंदा :** मी न्हाय - म्या कवाच बगल दिली न्हाय. आणि समद्यानीच गड सोडून कसं चालंल? कुनीतरी लडलंच पायजे. जा काशी, रामू जावा! (सर्वजण दु:खी अंत:करणाने जाऊ लागतात) थांबा! - काशी, मी आपली इब्रत - नव्हं, माजी मुकिंदाची दौलत मी तुज्या वट्यात घालतोय! ती नीट जप!

**काशी :** ही दौलत मी उरासंग लावून जपीन नि सकाळ जशीच्या तशीच आनून दिईन!

**मुकिंदा :** शाबास! जावा! (मुकिंदाखेरीज सर्व जातात. मुकिंदा गुणाने आणून ठेवलेला तांब्या बाजूला ठेवून निर्धास्तपणे नि:श्वास सोडतो. दंगल, ओरड चालूच आहे. ती जवळ ऐकू येते. त्यामुळे वातावरण अधिकाधिक गंभीर होत आहे. मुकिंदा डोकीचे पागोटे काढून खुंटीला ठेवतो. थोडा वेळ विचार करून कंदिलाची वात कमी करतो. किंचित अंधार होतो. थोड्या वेळानं दारावर थाप बसल्याचा आवाज ऐकू येतो. मुकिंदा दरडावून विचारतो) कोन हाय त्ये?

**नरशा :** (बाहेरून) आदी दार उगड आनी बघ कोन हाय!

**मुकिंदा :** (आवाज चढवून) कोन हाय?

**नरशा :** (बाहेरून आवाज चढवीत) मी हाय नरशा!

(मुकिंदा पुढं होऊन दार उघडतो व चपळाईने मागे सरकतो आणि स्टेजच्या मध्यापर्यंत येऊन उभा राहातो. दारू पिऊन झिंगलेला नरशा व त्याचे दोन साथीदार मंदगतीने आत येतात. नरशाचा तोल जात असतो. तिरपडून स्वत:ला सावरून तो बंदूक नीट धरतो)

**नरशा :** मी... मी.. नर.. शा... बंड... क...री!

**मुकिंदा :** (कुत्सितपणे) आलास!

**नरशा :** (रोखून पाहत) हो-आलो मी!

**मुकिंदा :** लवकर आलास! जरा थांबून आला असतात तर...

**नरशा :** (गुर्मीत) तर... काय झालं असतं ऽ ऽ! त...र...

**मुकिंदा :** तर आतापतूर तुजं मुंडकं धडावर राह्यलं नसतं!

**नरशा :** मग आता आपलं मुंडकं संभाळ नि तुजी बंदूक मला दे! – बंदूक कुटाय? –
**मुकिंदा :** माजी बंदूक इचारनार तू कोन? –
**नरशा :** मी? - मी नरशा...
**मुकिंदा :** खोटं हाय ह्ये! - तुज्या पोटात देशमुकाची दारू भरलीय ती मला बंदूक इचारतीया! - आनी तू नशीबवान हाईस! - तुज्या नसिबानं आज येळापुरात कोन न्हाय! न्हायतर मारेकऱ्या, तुला बंदुकीऐवजी बंदुकीची गोळीच मिळाली असती! –
**नरशा :** (दोन पावले पुढे होत) खरं हाय! - मग आता आपली बंदूक काड, न्हायतर माज्या बंदुकीची घे!... (ओरडून) चल आटप! –
**मुकिंदा :** (ओरडून) पुढं येऊ नकं, तिथंच थांब! - (नरशा गोंधळून थांबतो - पण पुन्हा हळूहळू पाऊल पुढे टाकीत)
**नरशा :** न्हाय मी थांबनार! –
**मुकिंदा :** थांब न्हायतर...! –
**नरशा :** (तिरपडून) न्हायतर काय? (मुकिंदा झटकून खुंटीची कुऱ्हाड काढून पवित्र्यात उभा राहतो. त्याचा तो उग्र चेहरा पाहून नरशा चपापून मागं सरतो.)
**मुकिंदा :** मी थांबवीन तुला! (म्हणून कुऱ्हाड उगारून उभा राहतो. नरशा विचलित होऊन इकडेतिकडे पाहतो)
**नरशा :** (भेदरून) ये - तू थांब न्हायतर...
**मुकिंदा :** न्हायतर काय?
**नरशा :** मी तुला गोळी घालीन!
**मुकिंदा :** (शांतपणे) तू घाल गोळी! तू माज्या घऱ्हात आलास त्ये गोळी घातल्यासारकंच हाय! पन तू वाघाच्या घळीत आलास! (आवाज चढवून) घाल गोळी आनी जाऊन सांग त्या गोपाळ्याला, - म्हणावं गोळीची फेड कराय दिनू, रानू, महिपती आता येतील! त्ये तुला जल्मात नीज लागू देनार न्हायती. आनी तू... तू (जोराने कुऱ्हाड वर उगारतो तोच नरशा मागे सरून गोळी झाडतो. कुऱ्हाड वरच राहते. मुकिंदा छाती एका हाताने गच्च धरतो. त्याचा तोल जातो. पण स्वत:ला कुऱ्हाडीवर सावरून ताठ उभाच राहतो.) जा आता! जा... नि मरायची तयारी कर.

(नरशा कावराबावरा होऊन पाहतो.)

**१ला साथीदार :** (भेदरून) ये नरसू, आरं खून...
**२रा साथीदार :** (भीतीने) पळूया आता.
**मुकिंदा :** कुठं पळणार? आता तुम्ही पळून आपला जीव कसा वाचवनार? न्हाय... न्हाय... तुमा मारेकऱ्यांस्नी दडाय जागा मिळणार न्हाय! पन आता तुमी पळा... पळा... (खिन्न होऊन) पळा जा! (त्याच्याकडे पाहत मोठ्यानं) जा... पळा....!

(नरशा व त्याचे साथीदार लगबगीने पळून जातात. मुकिंदा हळूहळू कंदिलाकडे जातो. कंदिलाची वात वर करतो तांब्यातील पाणी घटाघटा पितो व घोंगड्याकडे जाऊ लागतो. पण त्याला चालवत नाही. तो अडखळतो. आधाराची कुऱ्हाड गळून पडते. नंतर तो हळूच खाली कोसळतो. मग पाणी पिण्यासाठी सरपटत तांब्याकडे जातो. तांब्या हातातून पडतो नि तो मरतो. पडदा पडतो.)

## अंक तिसरा

*(पहिल्या अंकातील देशमुखांचा दिवाणखाना. सर्व काही पहिल्याप्रमाणेच मांडलेले आहे. यावेळी मुनीमजी आपल्या जागेवर बसून गंभीरपणे आपल्या कामात गढून गेले आहेत. थोड्या वेळाने करीम प्रवेशतो व चिलीम काढून तंबाकू भरतो.)*

**करीम :** मुनीमजी, माजं काम झालं! जुन्या वाड्यात झाडू मारून घोड्याला खरारा करून आलो!
**मुनीमजी :** वा छान! पण रामभाऊ कुठं आहेत?
**करीम :** (चिलमीला काडी लावीत) त्यो व्हय?
**मुनीमजी :** (फुंकर घालून काडी विझवून) नको, आधी उत्तर दे आणि मग ओढ! तंबाकूचं नाव सांगून गांजा ओढतोस आणि म्हशीला शिंगरू झालं म्हणून खुशाल सांगतोस! राम्या कुठं आहे?
**करीम :** राम्या गेलाय म्हशी चाराय! बाकी मुनीमजी, कोंबड्या धरण्यापरास म्हशी चारनं बरं! - हो, पण आमच्या नसिबानं फौजदार सायेब हातं आलंत म्हनून त्यो नरशा आमच्या मानंवरनं गेला, आनी त्या गरीब कोंबड्याची मान मोकळी झाली. आनी मी खरं सांगू?
**मुनीमजी :** म्हणजे आतापर्यंत जे बोललास ते म्हशीला शिंगरूच ना?
**करीम :** छे: छे: वं! माजं म्हननं असं की त्यो नरशा लवकर गेला म्हनून बरं झालं! न्हायतर येळापुरात कोंबडं बियाला उरलं नसतं! त्येनं मायंदळ कोंबडं खाल्लं!
**मुनीमजी :** अरे पण आता सर्व अंडीपिल्ली बाहेर पडण्याची वेळ आली आहे ना? (देशमुख दारात येऊन खिन्न होऊन दातानं नखं कुरतडीत ऐकत उभा राहतो. दोघांचेही तिकडे लक्ष नाही.) त्याने गावात कोंबडी खाऊन मुकिंदाचा खून केला! आणि म्हणतात देशमुखांनी मारेकरी घालून खून करवला! —
**गोपाळराव :** (पुढं होऊन ओरडून) खोटं आहे! मुकिंदा आपल्या मरणाने मेला; कोण म्हणतो मी मारेकरी घातले? मारेकरी घालायला मी काय दुबळा आहे?
**मुनीमजी :** धनी, (घाबरून) गाव म्हणतो; मी... नाही!
**गोपाळराव :** गाव म्हणतो? आग लावा या गावाला! लबाड आहे हा गाव! नरशानं केलेल्या खुनाचा संबंध माझ्या अंगाशी लावू पाहणारे लोक माझे वैरी आहेत! ते माझ्यावर तोहमत घेत आहेत! माझ्यावर सूड घेऊ पाहत आहेत.
**मुनीमजी :** (त्यांच्या चेहऱ्याकडे पाहून अडखळतो) ते... ते खरं आहे!

**गोपाळराव :** खोटं आहे! जगात काहीच खरं नाही. फक्त मी सांगतो ते खरं आहे! मुकिंदा आपल्या मरणाने मेला हे खरं आहे!

**मुनीमजी :** (सावरून) खरं आहे ते!

**गोपाळराव :** नाही - माझंच खरं आहे! आणि हे पाहा, जर कोणी म्हणेल की मीच त्या मुकिंदाचा खून केला तर त्याचाही खून होईल!

**मुनीमजी :** (गंभीर आहे) ख..रं... आ...हे...

**गोपाळराव :** (करीमला) तो राम्या कुठं आहे?

**करीम :** म्हसरं पाण्यावर घेऊन...

**गोपाळराव :** अरे, दिवस पार मावळून गेला आणि आता गुरांना पाणी? नाही. असं हे चालणार नाही! वेळच्या वेळी सर्व कामे झाली पाहिजेत! आलं लक्षात?

**करीम :** हो, हो!

**गोपाळराव :** काय मुनीमजी, गावानं मला वाळीत टाकलं आहे?

**मुनीमजी :** हो, हो!

**रामू :** (गडबडीने येतो) मुनीमजी...

**गोपाळराव :** (मध्येच) ए, म्हशी पाणी प्याल्या?

**रामू :** हो, हो, हो!

**गोपाळराव :** आणि जुन्या वाड्यातल्या तुळशीला पाणी कोण घालणार?

**रामू :** माझी पाळी कालची व्हती! आज करीमची पाळी हाय हो!

**गोपाळराव :** करीम तुळशीला पाणी घातलं? (इतक्यात फौजदारसाहेब प्रवेशतात. त्यांच्या अंगावर सरकारी पोषाख असून ते वयाने चाळीस वर्षांचे असावेत. त्यांचे शरीर धिप्पाड असून कमरेला रिव्हॉल्व्हर लटकत आहे. गोपाळरावांचा प्रश्न त्यांनी ऐकलेला असतो.)

**फौजदार :** (करीमकडे पाहत) ए, तू करीम म्हणजे मुसलमान ना?

**करीम :** हो, हो! मी खाटीक - आपला खाटीक!

**फौजदार :** आलं लक्षात; म्हणजे बकऱ्याची मुंडकी छाटणारा! पण कायरे, तू तुळशीला पाणी घालणार म्हणजे काय?

**करीम :** (गोंधळून) हो, हो. इचारा मुनीमजीला. हो! हो.

**मुनीमजी :** खरंच... हो, हो!

**गोपाळराव :** त्याचं असं आहे... हो, हो–

**रामू :** म्हंजी, हो, हो!

**फौजदार :** आरे हे काय... काय आँ... हो, हो, हो?

**सर्वजण :** हो, हो - हो!

**फौजदार :** आहो हो हो! नीट बोला ना!

**गोपाळराव :** (सारवासारव करीत) हो, म्हणजे असं की आमची एक लंगडी म्हैस आहे, तिला करीम पाणी घालतो!... म्हणजे बसल्या जागेवर आणून घालतो! आलं लक्षात?

**फौजदार :** हो, हो!

**मुनीमजी :** हो, हो!

**रामू :** हो, हो!

**करीम :** हो, हो!

**गोपाळराव :** उभे का? बसा ना! पाहिलात आमचा हा गाव! कसा काय आहे? बाकी हे पाहा फौजदारसाहेब, आपण आलात म्हणून जीवित आणि वित्त यांचं रक्षण झालं!

**फौजदार :** (बसतो) खरं आहे! गाव तसा बरा आहे! पण इथला हा शेतकरी बिलंदर दिसतो! आता भिड्यांच्या वाड्याकडून येत असता काही लोक मी पाहिले. रगदार लोक आहेत इथं!

**गोपाळराव :** लोक? रावसाहेब हे लोक नाहीत; हे सैतान आहेत! त्यांनी तीन पिढ्या माझ्या घराण्याशी वैर बांधून ठेवलं आहे! हे सर्व मला पाण्यात पाहत आहेत! बरं, पण तुमच्या जेवणाचं काय?

**फौजदार :** जेवलो मी. परंतु आता भिडे मला सोडत नव्हते! ते म्हणतात, की मी स्वत: त्यांच्या वाड्यात राहावं!

**गोपाळराव :** छे: छे: नाही-नाही. तुम्ही इथं - इथं माझ्या वाड्यात राहायचं; कारण माझ्या जीवितालाच मोठा धोका आहे - म्हणून तुम्ही आला आहात. मुनिमजी, चहा करा ना! आणि करीम-रामू जेवण करून या! जा, लवकर या!- (दोघेही जातात. मुनीमजी आत जातो) रावसाहेब, या गावचे लोक अडाणी आहेत! त्यांना काहीच कळत नाही! समजावून सांगितलंत तर ते केव्हाही ऐकणार नाहीत! लकडीवाचून मकडी वळणार नाही पाहा!

**फौजदार :** परंतु देशमुख, असं पाहा, या गावाचं आणि तुमचं वैर निर्माण व्हायचं कारण तरी काय? माझ्या काही लक्षातच येत नाही!

**गोपाळराव :** रावसाहेब, कारण काय असणार? अहो, हे मूर्ख लोक! आणि आपण जाणताच की शहाण्याचा चाकर व्हावं, परंतु मूर्खाचा धनी होऊ नये! आम्ही त्यांचे धनी झालो आणि मूर्खपणा केला त्यात! या मूर्खांचा गैरसमज झाला की, ही आमची सरदेशमुखी आम्ही या गावच्या लोकांना लुटूनच वाढवली! परंतु साहेब, तसं मुळीच नाही हो! ही आमची देशमुखी आम्ही जबरीनं मिळविलीच नाही! मी खरं खरं सांगतो! तुम्ही ऐकाच! सांगू?

**फौजदार :** (ऐसपैस बसत) हो. सांगा ना!

**गोपाळराव :** (पुढं सरसावून) रावसाहेब, फार पूर्वी - म्हणजे तीनशे वर्षांपूर्वी आमच्या वंशातील प्रथमपुरुष हा एक संन्याशी होता! तो जन्माला कंटाळून या समोरच्या डोंगरात बसला होता! म्हणजे तप करून देवप्राप्तीसाठीच तो बसला होता! आणि त्याचवेळी मोंगलांचा सेनापती तो झुल्फीकारखान राजाराम महाराजांचा पिच्छा करीत धावत होता! त्याने या संन्याशाला पाहिले व ठार मारण्याची धमकी देऊन राजाराम महाराजांचा पत्ता विचारला! मग काय करणार? त्या साधूने राजारामाची छावणीच मोंगलांना दाखविली! आणि ह्या कामगिरीबद्दल खूष होऊन, त्या मोंगलानं त्या संन्याशास बहात्तर खेड्यांची जहागिरी बहाल केली! हा आमच्या या वैभवाचा इतिहास! मग तुम्हीच सांगा, आम्ही या मूर्खांना लुटलं ते कसं?

**फौजदार :** पण मी म्हणतो, हे शेतकरी असे शिरजोर झाले कसे?

**गोपाळराव :** तोच तर प्रश्न आहे! अहो साहेब, हे लोक कालपरवापर्यंत फार गरीब होते. हूं की चूं करीत नसत! अगदी या ठिकाणी (समोर बोट रोखून) इथं हे आमच्या वडिलांपुढं एका एका पायावर, दिवस दिवसभर, भर उन्हात पावसात उभे राहात! वर मान करीत नसत! अगदी खुशाल डोकीवर दगडसुद्धा घेऊन हो! पण आता हेच लोक, माझ्या डोकीत दगड घालू पाहात आहेत. मलाही मोठं आश्चर्य वाटतं की, या मढ्यांना प्राण कसा आला?

**फौजदार :** काळच उलटा आला आहे! जाऊ द्या. आता घाबरू नका!

**गोपाळराव :** (आनंदून) आता मुळीच डगमगणार नाही मी! कारण आता आपण प्रत्यक्ष इथे आहात! पण रावसाहेब, मुकिंदाच्या खुनाचा काही धागादोरा?

**फौजदार :** धागा नाही आणि दोरा नाही! जोपर्यंत तो नरशा हाती लागत नाही, तोपर्यंत काही नाही. पाहू या पुढं!

**गोपाळराव :** पण रावसाहेब, अशा ढिलाईनं या खुनाचा धागा नि दोरा आपण कसे काढू शकणार?

**फौजदार :** (रोखून पाहात) देशमुख, आपण निर्धास्त असा. मी आज वीस वर्षे हे फौजदारीचं खोगीर वागवीत आहे. मी कैक खुनी खटल्यांची उलटापालट केलेली आहे. आणि खुनाला वाचा फुटते, हा माझा अनुभव आहे...

**गोपाळराव :** (घाबरून) म्हणजे - मुकिंदाच्या खुनाला वाचा फुटणार?

**फौजदार :** अगदी शंभर टक्के. पाहा तर खरं माझी करामत. मी इथं बसून या तुमच्या वाड्यात त्या खुनाचा खुनी पकडून दाखवतो. सर्व धागेदोरे काढतो बाहेर.

**गोपाळराव :** म्हणजे, म्हणजे, या आमच्या वाड्यात?

**फौजदार :** हो हो - या वाड्यात - इथं.

**गोपाळराव :** (उगीचच चिडून) म्हणजे रावसाहेब, तो खून आम्ही केला आहे असं

आपलं म्हणणं आहे की काय? मग स्पष्ट बोला ना.

**फौजदार :** हे काय देशमुख? मी तसं कसं बरं म्हणेन? माझं म्हणणं एवढंच की मी इथं राहूनच त्या खुनाचे सर्व धागेदोरे जुळवणार आहे आणि खरं सांगू, तो नरशा हाती लागला की काम संपलं.

**गोपाळराव :** हो, हो खरंच, तो नरशा महापुंड झाला आहे! अरे पण चहाचं काय? (स्वयंपाकघरात पाहत) मुनीमजी, अहो चहाचं काय?

**मुनीमजी :** (डोळे चोळत फुंकणी घेऊन बाहेर येतो.) धनी, (फुंकणी दाखवीत) चूल फुंकीत आहे, पाणी कढत आहे - भुकी घातली आहे - आता चहा तयार व्हायची वेळ आली आहे!

**फौजदार :** (आश्चर्याने) म्हणजे चाकर-नोकर कोणीही नाही? हे काय?

**गोपाळराव :** (खिन्न होऊन नि:श्वास टाकीत) रावसाहेब, सर्व हरामखोर नोकर मला सोडून गेले आहेत! त्या स्वयंपाक करणाऱ्या बाईला अवदसा आठवली आणि ती एकदम पंढरीला गेली! मळेकऱ्यांनी मळे सोडले, गुराख्यांनी गुरे टाकली, परीट इकडे दिसत नाही! न्हावी आज पंधरा दिवस झाले - थोबाड दाखवीना! त्यामुळे आमचे हे थोबाड केसांच्या कुरणात गडप व्हायची वेळ आली आहे! परंतु आता आपण आला आहात, तेव्हा...

**फौजदार :** (गंभीरपणे) म्हणजे मी तुमची दाढी करावी म्हणता की काय?

**गोपाळराव :** (दाढी चोळीत) छे: छे: तसं कसं बरं मी म्हणेन? (मुनीमजी चहा घेऊन येतो. चहा घेऊन फौजदार विचार करू लागतात.) साहेब, कसला विचार करता?

**फौजदार :** काही नाही! तुमच्या दाढीचा!

**गोपाळराव :** म्हणजे करता वाटतं प्रयत्न?

**फौजदार :** (भडकून) हे पाहा, मी न्हावी नाही - फौजदार आहे हे विसरू नका!

**गोपाळराव :** (घाबरून) नाही नाही; मी कसा विसरू? पण—

**फौजदार :** गप्प बसा! - मी विचार करत होतो तो तुमची दाढी कशी खरडावी याचा नव्हे, तर ती कशी खरडली जाईल याचा!

**गोपाळराव :** हो, हो तेच! सांगा, कशी बरं खरडली जाईल?

**फौजदार :** मग ऐका; गावच्या न्हाव्याला चार आणे जादा द्या आणि टाका भादरून ती! मी आता भिड्यांच्या वाड्याकडे जाऊन येतो!

**गोपाळराव :** ठीक-ठीक, लवकर या! मी पाहतो न्हावी काय म्हणतो! (दाढी चोळीत) फार त्रास होत आहे! (फौजदार जातात. करीम व रामू येतात.) रामू-करीम-मुनीमजी इकडे या!- (तिघेही जवळ येतात) हे पाहा, ही-ही माझी दाढी आताच्या आत साफ झालीच पाहिजे! (सर्व घाबरतात) हो, झालीच पाहिजे!

**मुनीमजी :** धनी, परवा भिडे म्हणत होते की तुझ्या हातून एका मोठ्या माणसाचा खून होणार!

**करीम :** आनी सरकार, मी तर खाटीक हाय! माज्या या हाताना बकरी कापायची सवय हाय; तवा—

**रामू :** माजं तर वस्तरा बगताना डोळं झाकत्यात!

**गोपाळराव :** (ओरडून) ऐका! मूर्ख! अरे तुम्हीच माझी दाढी करावी असं मी म्हणत नाही! - माझं म्हणणं असं की, त्या पांड्या न्हाव्याला चुचकारून आणा! एका दाढीचे हवे तर दहा रुपये घे म्हणावं! आणि तेही आता; कारण तो दिवसाचा येणार नाही!

**मुनीमजी :** हो, ही युक्ति बरी आहे!

**करीम :** हो, रामज्या जा; पांड्याला गाठ!—

**गोपाळराव :** हो, जा रामू, पांड्याला आण!- आणि करीम, तूही जा त्याच्याबरोबर! पैशापुढं दगड बोलतो. जा! (दोघेही जातात) मुनीमजी, हे पाहा - मघा तो नरशाचा माणूस आला होता! त्याला मी सांगितलं आहे की, मुनीमजी गेला आहे कऱ्हाडला पैसे आणालया, येताच पाठवतो. अहो, त्या नरशानं एक हजाराचा तगादा लावला आहे. तेव्हा तुम्ही आतच थांबा - जा!

(मुनीमजी आत जातो. गोपाळराव विचारमग्न आहेत. नरशाचा साथीदार आत येतो. त्याला पाहून गोपाळराव चरकतो.)

**साथीदार :** मला नरसूनं पाटवलंय!

**गोपाळराव :** हो, काय म्हणतोय नरसू?

**साथीदार :** पैशाचं काय झालं? आनी भाकरी न्हाय?

**गोपाळराव :** तू जा! आता मी करतो व्यवस्था! आणि हे पाहा, इथं तो फौजदार आहे! तेव्ही कोणी वरचेवर येण्याचं टाळा! पैसे येताच रवाना करतो! भाकरीचं मात्र जमणार नाही! जा-जा आता फौजदार येतील!

(साथीदार जलदीने निघून जातो. मुनीमजी हळूच बाहेर येतात. गोपाळराव निःश्वास सोडतो.)

**मुनीमजी :** गेली वाटतं पीडा?

**गोपाळराव :** हो गेली! पण पीडांनी पाठच घेतली आहे! आता माझं काय होणार कोण जाणे!

(इतक्यात हातात कंदील घेऊन गोविंदराव प्रवेशतो)

**गोविंदराव :** काहीही होणार नाही! तुमच्या केसालाही धक्का लागणार नाही!

**गोपाळ :** या, या! पण म्हणजे माझी ही दाढी कैक मैल वाढणार म्हणता की काय?

**गोविंदराव :** (बसत) माझं म्हणणं आता कसलीही पीडा येणार नाही, असं माझं हे

पंचांग बोलत आहे! (खिशातून पंचांग काढतो) हे पंचांग म्हणतं की, तुमचा शनी आणि मंगळ यांचे युद्ध आता संपणार आहे! फक्त आजची रात्र...

**गोपाळराव :** (आनंदून) म्हणजे उद्यापासून सर्व काही सुरळीत होणार?

**गोविंदराव :** अगदी शंभर टक्के! अहो सरकार, जर हे पंचांग खोटं ठरलं तर मी हे इथंच असं जाळीन!

**गोपाळराव :** मग आनंद आहे! गोविंदराव, तुम्ही देव बोलत आहात! छान! (आठवण करून) पण तुमची ती वाचा बसली होती ती - म्हणजे माझ्या स्वप्नात! त्याचा काही उलगडा झाला का?

**गोविंदराव :** (घाबरून) हो, हो, झाला ना! हो, पण धनी, आता सर्व काही ठीकच व्हायचं आहे! (इतक्यात करीम-रामू-पांडू न्हावी येतात. त्यांस पाहून गोपाळराव हर्षभरित होऊन)

**गोपाळराव :** (चेकाळून) गोविंदराव, गोविंदराव, खरं; अगदी खरं! हा पाहा पांडू न्हावी आला. पंधरा दिवस याचा पत्ताच नव्हता! आणि हा नसल्यामुळे माझा अवतार बदलला होता! माणसातून पार उठलो होतो! रामू, पाणी आण! गोविंदराव, बसा; मी दाढी करून घेतो!

(पांडू धोकटीतील सामान काढतो व वस्तरा लावतो. रामू पाणी घेऊन येतो. गोपाळराव पांडूपुढे बसून दाढी खाजवतो. पांडू दाढीला साबण लावतो. सर्वत्र गंभीरता निर्माण होते. सर्वजण पाहात उभे राहातात. पांडू वस्तरा चालवून एका बाजूची दाढी करतो, तोच शिट्या वाजू लागतात. विचित्र आवाज निघतात. पांडू घाबरतो!)

**गोपाळराव :** (घाई करीत) हं. नको ऐकू! आता थोडं आहे!

**पांडू :** (कानोसा घेत - काम करीत) ह्ये काय हाय?

**गोपाळराव :** ती भुतावळ उठली आहे देशमुखाला गिळायला! तू आपलं काम कर! (पुन्हा जोराने ओरड होते. पांडू घाबरून एकाएकी उठून उभा राहतो. त्याला देशमुख पुन्हा खाली बसवितात) ए, अर्धी राहिली दाढी! चल आटप लवकर!

**मुनीमजी :** (घाबरून) कोण लोक आहेत? पाहा ना गोविंदराव!

**गोविंदराव :** (गंभीरपणे) खरोखरच ही भुतं आहेत!

**पांडू :** (एकदम उठून धोकटीत सामान भरीत) नकं, मी जातो! मला भीती वाटती! खरंच रं बाबा!

**गोपाळराव :** (गयावया करीत) नको, नको, असा केसानं गळा कापू नकोस! आता थोडी राहिली आहे, एवढी कर; बैस! - बैस!

**पांडू :** न्हाय बाबा, ह्ये लोग कोन हायती? मला भ्या वाटतंय!

**गोपाळराव :** नको रे नको! आरे कर! अर्धी...

**गोविंदराव :** अरे ए, अर्धी सोडू नये दाढी!
**मुनीमजी :** हो! कर, कर, ते पाप आहे!

(विचित्र आवाज वाढतात. पांडू धोकटी घेऊन पळून जातो. गोपाळराव त्याच्या पाठी धावतात. रामू, करीमही त्याला अडविण्यास पाठोपाठ निघून जातात. गोपाळराव खिन्न होऊन परततात.)

**गोपाळराव :** (स्वत:शीच) अरे, अरे किती वाईट हे! माझे -या येळापूरच्या इनामदाराचे पाट निघाले! गोविंदराव, गोविंदराव, ही विटंबना पाहा ना गोपाळरावाची! नानासाहेबांच्या नातवाचे पाट निघाले! हायरे दुर्दैवा!

**गोविंदराव :** धनी, धनी, एवढीच रात्र शांत राहा!

**गोपाळराव :** एवढीच रात्र? ते फौजदार साहेब का नाही आले? केव्हा येणार ते?

**गोविंदराव :** आता येतील, मी जाऊन त्यांना पाठवतो! जाऊ मी? जातो आता, रात्र फार झाली!

**गोपाळराव :** जा, पण रावसाहेबांना म्हणावं लवकर या! पाहा म्हणावं हा देशमुख! (गोविंदराव जातात.) नाही - आता मी या येळापुरात राहाणार नाही! मी इथं तोंड दाखवणार नाही! मला हे गावच नको! मी कऱ्हाडला राहीन!

**मुनीमजी :** सरकार, असा धीर सोडून कसं चालेल? हेही दिवस जातील!

**गोपाळराव :** धीर? आता धीर मी कसा धरू? काय आहे माझ्यापाशी धीर धरण्यासाठी?

**मुनीमजी :** सर्व काही आहे! - आपण देशमुख आहात!

**गोपाळराव :** देशमुख? कसला देशमुख? माझ्या त्या देशमुखीचे कोळसे झाले!

**मुनीमजी :** खरं आहे! - पण कोळसेच फुलून त्यांचे निखारे होतात!

**गोपाळराव :** कोळशाचे निखारे होतात; परंतु राखेचे निखारे कधीच होत नाहीत! राख कधीच पेटत नाही! (फौजदार प्रवेशतात, त्यांच्यासमोर जात) रावसाहेब पाहा, हे काय झालं पाहा!

**फौजदार :** फार फार वाईट झालं - जणू या जगानं बऱ्याचं वाईट आणि वाईटाचं बरं करण्याचा विडाच उचलला आहे! असं होईल याची मला कल्पनाच नव्हती!

**गोपाळराव :** परंतु कल्पनेच्या पलीकडे असलेल्या घटना घडतात. साहेब, माझी या देशमुखाची-गणपतरावांच्या अवलादीची अशी ही विटंबना झाली!

**फौजदार :** हो, पण आता वाईट वाटून काहीही उपयोग नाही! आजची रात्र स्वस्थ बसा, पाहू या काय आहे ते!

**गोपाळराव :** उद्या? नाही! ते आता शक्य नाही! आता मला स्वस्थ बसताच येणार नाही! मला आता या गावातच राहायचं नाही. मला घेऊन लवकर, लवकर कऱ्हाडला

चला!

**फौजदार :** शांत व्हा! आताशी मध्यान्ह रात्र झाली आहे! उजाडू द्या, मग पाहू पुढं!

**गोपाळराव :** नाही, नाही, मी सूर्योदयाची वाट पाहत बसणार नाही! मला घेऊन लवकर चला!

**फौजदार :** (शांतपणे) देशमुख, मला हे गाव आताच सोडता येत नाही! मला त्या नरशाचा-मुकिंदाच्या खुन्याचा तपास करायचा आहे!

**गोपाळराव :** मग तुम्ही राहा! फक्त काही शिपाई माझ्याबरोबर द्या! हो, करा एवढं!

**फौजदार :** नाही, तेही मला करता येत नाही! अशा अपरात्री मी आपली माणसे कुठेही पाठवणार नाही! नरशानं वाटा रोखल्या आहेत! तुम्ही सकाळपर्यंत गप्प बसा! माझं ऐका!

**गोपाळराव :** कसा बसू गप्प? मला गप्प बसवत नाही हो! (करीम येतो) काय करीम, काय खबर?

**करीम :** सरकार, पांड्या सापडला न्हाय!

**गोपाळराव :** बरं, राम्या कुठं आहे?

**करीम :** अंदारात त्येची माजी चुकामूक झाली!

**गोपाळराव :** ठीक! तू आणि मुनीमजी, तुम्ही दोघे आत्ताच्या आत्ता जुन्या वाड्यात जाऊन माझं सर्व सामान बांधा. महत्त्वाचं सर्व काही घ्या! सकाळी लवकर दोन गाड्या पाहा! - उद्याच आम्ही हे येळापूर सोडणार; जा पळा! - काय रावसाहेब, खरं ना?-

**फौजदार :** हो, खरं आहे! करा सर्व तयारी; जा! (मुनीमजी व करीम जातात) देशमुख, माणसानं संकटाला बगल द्यावी हेच शहाणपणाचं ठरतं!

**गोपाळराव :** (खिन्न होऊन) नाही साहेब, आम्ही कधीच असा पळ काढला नाही! (मंदगतीने जाऊन आपल्या जागयावर बसत) आम्ही नेहमी संकटावर चढाईच केली! पण आता...

**फौजदार :** हो, तोच प्रश्न आहे! तुम्ही एवढे मोठे इनामदार असून, आता तुम्हांला हा गाव सोडून पळ काढायचा प्रश्नच का निर्माण झाला?

**गोपाळराव :** हा प्रश्न निर्माण होण्याचं कारण आमचा जुना दरारा मागे गेला!— आम्हाला इथं अधिक शत्रू निर्माण झाले; म्हणून तर हा प्रश्न निर्माण झाला!—

(फौजदार कमरेचा पट्टा काढून गळ्यात अडकवितो व कोचावर ऐसपघळ बसून सिगरेट व काड्याची पेटी काढतो. सिगारेट तोंडात धरून काडी ओढून शिलगावतो व त्या जळत्या काडीकडे पहात—)

**फौजदार :** इनामदार, तुम्ही म्हणता शत्रू निर्माण झाले!

**गोपाळराव :** मग त्यात काहीच खोटं नाही!

**फौजदार :** (काडी फुंक घालून विझवीत– ) हे पाहा, मी काडी ओढली तेव्हाच जाळ झाला! म्हणून म्हणतो, तुम्ही शत्रू निर्माण केले की आपोआप झाले?

**गोपाळराव :** ते मी कसं सांगू? बाकी एक गोष्ट खरी की, जे आमची थुंकी झेलत होते तेच आमच्या तोंडावर थुंकू लागले! म्हणजे कमजोर होते ते शिरजोर झाले...

**फौजदार :** आता आलं लक्षात! म्हणजे जे शिरजोर झाले त्यांना चिरडण्यासाठी तुम्ही अति शिरजोर झाला आणि त्यातून हा जाळ झाला? होय ना?

**गोपाळराव :** त्याला आपण काहीही म्हणा! आमचं जहाज दर्यात फुटलं एवढं मात्र खरं! रावसाहेब, आपण केव्हा निघणार या गावातून?

**फौजदार :** मी? त्या नरशाचा बंदोबस्त करून!

**गोपाळराव :** होय, तो नरशा एक आहे. (उठून) रावसाहेब, तोही माझा शत्रू आहे!

**फौजदार :** (हाताने खाली बसण्यास सांगून) असू द्या!

(रामू धावत येतो)

**रामू :** धनी, गावच्या लोकांनी नरशाला येडा दिला!

**गोपाळराव :** (आश्चर्यानं) नरशाला वेढला? कोण कोण आहेत त्यात?

**रामू :** महिपती, राणूजी, दिनकर ह्येंनी त्याला येडला!

**फौजदार :** म्हणजे नरशा सापडणार?

**गोपाळराव :** आणि आता काय होणार? (इतक्यात दुरून गोळीबार ऐकू येतो. सर्व दचकतात. दुसरा बार होतो. सर्वजण आवाजाच्या दिशेनं भेदरून पाहातात. फौजदार सावध होऊन कमरेला पट्टा नीट बसवितात.) रामू, आता तूही जा आणि त्या जुन्या वाड्यातील सामानाची आवराआवर कर! पळ, आता काहीतरी भयंकर होणार!

(रामू निघून जातो. गोळीबार चालू असतो. फौजदार सावकाश इकडे तिकडे फेऱ्या मारीत आहेत. गोपाळराव कोचावर बसून सचिंत होऊन शून्यपणे पाहात आहेत. इतक्यात एक मोठा बार होतो.)

**फौजदार :** (चमकून) देशमुख, ऐकलंत? हा जो आता बार झाला ही रायफल थ्री नॉट थ्रीची असली पाहिजे! पाहा, रात्र कशी थरारली!

**गोपाळराव :** (उठून खिन्नपणे) रावसाहेब, खरंच भयंकर प्रकार आहे! ही असली रात्रही थरारली! परंतु मला वाटतं ही आजची रात्रही भयंकर आहे! साहेब, या येळापुरावर कैक रात्री येऊन गेल्या! पण अलीकडच्या ह्या तीन रात्री, अगदीच भयंकर ठरल्या आहेत! —

**फौजदार :** (कोचावर बसत) कोणत्या त्या?

**गोपाळराव :** (पुढं जाऊन) एक रात्र - ज्या दिवशी तो नरशा येळापुरात आला ती! दुसरी, मुकिंदाचा खून झाला ती आणि तिसरी ही आजची! मला वाटतं, आज प्रलयच होणार!

(लागोपाठ काही बार होतात. गोपाळराव घाबरतो. पुन्हा स्वत:स सावरून फेऱ्या घालू लागतो.)

**फौजदार :** खरंच, प्रलय व्हायची वेळ आल्याचा भास होत आहे!

(पुन्हा गोळीबार होतो)

**गोपाळराव :** (थांबून) मला वाटतं, ही रात्र अशीच राहाणार. अगदी युगानुयुगं राहाणार आणि ही चाललेली कत्तलही चालूच राहाणार! सूर्योदय हा होणारच नाही!

**फौजदार :** देशमुख, सूर्योदय हा होणारच! पण एकदा वणवा पेटला की पालापाचोळा जाळून मग शांत होतो; तसा हा अंधारही शांत होणार!

**गोपाळराव :** पण केव्हा? मला लवकर हवा आहे तो सूर्योदय!

**फौजदार :** शक्य नाही! आपण देशमुख असलात म्हणून सूर्य काही तुमचं कूळ नाही! तो त्याच्या नियमाला सोडून कधीच लवकर येणार नाही! आता तुम्ही निजा. मी उठवीन तुम्हाला! मग... (गोळीबार चालूच असतो)

**गोपाळराव :** (निराश होऊन) नाही, आता मला नीज येणंच शक्य नाही! या परिस्थितीत तर मुळीच शक्य नाही! हा गाव आणि तो नरशा हे दोन्हीही माझे शत्रू आहेत! ते आता लढत आहेत! या परिस्थितीत मी कसा झोपू? आणि साहेब, जेव्हा परिस्थिती आटोक्याबाहेर जाते तेव्हा ती ज्वालामुखीप्रमाणे जाणवते! नीजच येत नाही मग.

**फौजदार :** खरं आहे! पण परिस्थितीवर मात ही माणसानं केलीच पाहिजे!

**गोपाळराव :** नाही, त्यासाठी अमाप माणसांचं पाठबळ लागतं! एकट्याचं ते काम नाही! मी आता एकटा आहे! मी परिस्थितीपुढे पळच काढला पाहिजे! आता मात करायची बात फोल आहे!

**फौजदार :** मी म्हणतो, तुम्ही एवढं भिण्याचं कारणच काय? तुम्ही देशमुख आहात! तुम्ही कुठंही आनंदात राहू शकता! (कानोसा घेऊन) पाहा, गोळीबारही बंद झाला!

**गोपाळराव :** हो, बंद झाला खरा! लागला असेल निकाल एकाद्याचा! पण कोण मेला असेल बरं?

**फौजदार :** कोणी का मरेना, आता तुम्ही मात्र निर्धास्त असा! भिऊ नका!

**गोपाळराव :** नाही. मला नाही वाटत तसं! मला वाटतं, माझे पायच जगापासून उखडले गेले आहेत!

(इतक्यात नरशा येऊन दारात उभा राहतो. फौजदार झटकन मुनीमजीच्या बैठकीचा आडोसा घेतात. नरशाचे सर्वांग रक्ताने माखले आहे. त्याच्या डोकीचे पागोटे विस्कटलेले आहे. त्याचा एक पाय गुडघ्यामध्ये मोडला आहे. त्यामुळे त्याला नीट उभेही राहता येत नाही, म्हणून त्याने बंदुकीचा आधार घेतला आहे. त्याला पाहून गोपाळराव गोंधळून इकडे तिकडे पाहतात. पण त्यांना पळताही येत नाही. एकाद्या कोंडलेल्या श्वापदासारखी

त्यांची स्थिती होते.)

**नरशा :** (कठोरपणे पहात) देशमुख!

**गोपाळराव :** (गर्रकन फिरून) कोण नरसू - ये! आणि इकडे कुठं तू? अशा स्थितीत?

**नरशा :** हाकडं खाटकाच्या दारात!

**गोपाळराव :** पण हे काय? तुझ्या पायाला काय झालं?

**नरशा :** (ओरडून) तुजं पाप ह्ये मला नडलं!

**गोपाळराव :** म्हणजे? (घाबरून मागे सरतो) मला समजलं नाही! नाही - खरंच नाही.

**नरशा :** (खेकसून) मग ऐक तर - तू मला दोन हजार रुपयं कबूल करून मुकिंदाचा खून कराया लावलास! म्या तुजं ऐकून त्येचा खून केला म्हणून माजी ही दशा झाली! माझा पाय मोडला - मला (ओरडून) गोळी लागली!

**गोपाळराव :** (थरथर कापत) अरेरे, वाईट... वाईट... पण तू... तू इकडे का?

**नरशा :** (लंगडत पुढे येऊन) तुला सांगाय! माझ्या डोक्यात आकाशाची कुऱ्हाड पडली, माज्यावर गोळ्यांचा पाऊस पडला, माजी माणसं जायबंदी झाली, ह्ये सारं सांगाया आलोय मी. (स्वत:चा पाय धरून) माजा पाय मोडला...

**गोपाळराव :** पाय मोडला? मग इकडे कां आलास?

**नरशा :** (डोळे विस्फारून) तुजा-तुजा आता जीव घ्यायला, मी आलो हाय! उभा ऱ्हा.

**गोपाळराव :** नाही-नाही! नको, नरसू नको रे, मला मारू नको!

**नरशा :** नकं? का नकं? त्वां मला फसवून या येळापुराचं काळीज कापाय लावलंस! त्ये म्या या हातानं कापलं, म्हणून माजा पाय मोडला! (पाय वर करून दाखवीत) मी जल्मातून उठलो (ओरडून) आता तू तयार हो! (असे म्हणून नरशा मागे सरून बंदूक नीट रोखतो. मोठा बार होतो. गोपाळराव जोराची ओरड करून खाली कोसळतात. फौजदार बैठकीआडून नरशावर दोनतीन गोळ्या झाडतात. त्याच्या हातातली बंदूक गळून पडते. दोनतीन पावलं पुढं येऊन हळूच तो गोपाळरावांच्या बाजूस येऊन कोसळतो. फौजदार सावकाश उठून पुढे होतात व खिशातील शिटी काढून वाजवितात. चार शिपाई धावत येतात! गोविंदराव भिडे धावत प्रवेश करतो. तो गोपाळरावांचे प्रेत पाहून दचकतो–)

**गोविंदराव :** धनी! धनी - हे काय झालं?

(तो 'आ' वासतो; त्याबरोबर त्याची कवळी वरच्यावर राहून वाचा बसते. गावकरी नरशाचा पिच्छा करीत येतात. फौजदार त्यांना रोखून टोपी काढून–)

**फौजदार :** संपलं आता!



## अनुक्रम

# अकलेची गोष्ट

## दृश्य पहिले

**(लावणी)**

खानदेशामधी गाव राजुरी खेडे एक लहान ।
त्या गावाची गोष्ट सांगतो घ्यावी ऐकून ॥१॥
एक सावकार, दुसरा गवळी असे दोघेजण ।
मित्र जिवाभावाचे नांदत होते आनंदानं ॥२॥
करती काळाबाजार दोघांचे नफ्यावर ध्यान ।
स्वार्थासाठी शेतकऱ्याची मुरगळती मान ॥३॥

(राजुरी गावात जानबा शेतकऱ्याच्या घरी)

**जानबा :** कारभारनी, भिव्या सांगत हुता ते काय खोटं नाही बरं का! अग, समदा गाव पालथा घातला पर कापाड काय मिळालं नाही!

**पुतळा :** आख्ख्या पेठंत, कापाड नाही काय?

**जानबा :** असं नव्हं ग, कापाड मॉप गुडघाभर हाई! पन किंमत सांगत्यात आमच्या नरड्याच्यावर!

**पुतळा :** म्हंजी मला नाही समजत.

**जानबा :** अग, सहा आन्याच्या पंज्याला बारा रुपय सांगतुया येपारी. नाइतर बिनवंगनाची गाडी हान म्हनतुया! मग बोल, काय करावं गरीबानं?

**पुतळा :** हे समदं सरकारनंच केलंया!

**जानबा :** अग, सरकार म्हनतंया १५ आने पायली इका जुंधळं, पर हे येपारी तीन रुपये पायली इकत्यातच का नाही! तसंच कापडाचं.

**पुतळा :** मग सरकार काय करतया?

**जानबा :** सरकार माश्या मारतंया! या राज्यात आंदळं दळतं नि कुत्रं पीठ खातं तसं झालंया बघ! समदा ऐतखाऊंचा नि लाचखाऊंचा बाजार भरलाय!

**पुतळा :** पर गुंडाकाका काय म्हनाला?

**जानबा :** अग, कशाचा गुंडा नि कशाचा धोंडा! समदं एका माळंचं मनी - एक

रामटोला! त्यो तुझा काका एक पैबी कमी करीना, चिखलात रेडा रुतून बसल्यागत बसला!

**पुतळा :** पर म्हनाला तरी काय त्यो?

**जानबा :** 'परवाडलं तर घे; नाही तर हान गाडी मलकापूरच्या बाजाराला', म्हनाला!

**पुतळा :** अगबाई, तुमचा मैतर नव्हं त्यो!

**जानबा :** अग, कशाचा मैतर नि कशाचा काय. शेपूट तुटलं म्हनून काय साप चावायचं सोडतोया व्हय! मी किसानसभेचं काम करतुया नि त्यो किसानसभेच्या नावानं खडं फोडतुया - आता मैतराला कसा वळखल?

**पुतळा :** मग आता कसं करायचं? तुमचं धोतार फाटलया, मलाबी एक लुगडं पाहिजे!

**जानबा :** मलकापूरच्या बाज़ाराला तरी जाऊन बगतो मिळतंय का! भाकरी नि वाइच कांदा दे बांदून, एवड्यात जाऊन मागं येतो. (जातो.)

## दृश्य दुसरे

(गुंडूकाका - कापडाचा व्यापारी व बंडू गवळी मलकापूरच्या बाजाराहून परत येत आहेत.)

**गुंडू :** बंडबा, हा जान्या हल्ली फार शेफारलाय बरं का! सकाळी धोतर खरेदायला आला दुकानात आणि मी किंमत सांगितली तर एकदम अंगावर फेकून दिलं धोतर माझ्या! आणि ठसक्यानं निघून गेला. अलीकडं जरा गुर्मी आलीय त्याला.

**बंडू :** व्हय हो शेटजी. अलीकडं वाईच तिरशिंगराव झालाय आणि मोठ्या राजा इंद्राच्या गोष्टी सांगतुया!

**गुंडू :** त्याचं असं झालंय बंडबा, त्या किसानसभेच्या लोकांनी त्याचं डोकं बिघडवलं आहे.

**बंडू :** अक्सी बराबर! कुटंबी सबा घेत्यात नि काळा बाजार काय, पांढरा बाजार काय, शेतकरी राज्य नि कामकरी राज्य काय! काय वाटंल ते बडबडत्यात.

**गुंडू :** आणि ते ऐकून जान्यासारखे बिनअकली लोक शेफारतात अन् आम्हाला अक्कल शिकवायला लागतात! - ते काही असो बंडबा, ह्या जान्याचा काटा एकदा काढलाच पाहिजे. तुझं काय म्हणणं आहे?

**बंडू :** हां हां! काटा काडायलाच पाहिजे तेचा.

**गुंडू :** मग बोल, काय युक्ती करू या?

**बंडू :** हे बघा काका, इगतीचं काय बोलू नका. झालं तरी दोन रद्दं द्याला सांगा, तयारी हाई?

**गुंडू :** छे छे, रट्टेबिट्टे देऊन जमायचं नाही! (विचार करून) हं, असं करू या! आता जान्या बाजाराहून परत येईल. त्याला गाठायचं आणि मी म्हणेन त्याला हो म्हणायचं, मी बोलेन तसं बोलायचं! मी बरोबर इंगा दाखवतो त्याला. (जानबा येतो.) कसं काय जानू, झाला बाजार?
**जानबा :** झाला की. तुमीबी बाजारलाच गेलंता वाटतं?
**गुंडू :** होय, पण का रे जानू, आमच्यापेक्षा किती सवंग झाला बाजार?
**जानबा :** हे बगा शेटजी, तुमच्या गावठी भावात नि सरकारच्या कंट्रोलच्या भावात लई फरक!
**गुंडू :** लई फरक! अरे, पण किती फरक ते तरी सांगशील की नाही?
**जानबा :** लांब, घोड्याची नि गाढवाची तफावत! तुमचा भाव म्हंजी मुडदाच पाडतोय गरीबाचा.
**बंडू :** आता हो काका! ह्यो लईच शाना झालाय, कसं टोचून बोलतुया की!
**गुंडू :** त्याचं असं आहे बंडबा, त्या किसान सभेच्या लोकांनी याच्या डोक्यात राख भरली आहे.
**बंडू :** काय रं जान्या, उठला सुटला त्या किसान सभंच्या नावानं कोकाटतुयास, पर शेतकरी राजा झाल्यावर नांगर कुनी हानायचा? आँ, तुझ्या काकानं का किसान सभंच्या नावानं!
**जानबा :** बंड्या, थोबाड आवर न्हाईतर दाताड पाडीन बघ! तुला रं काय कळतंय आडग्या!
**गुंडू :** बंडबा, उगाच भांडण कशाला? शेतकरी लोकांना अक्कल नसते म्हणतात ते काही खोटं नाही! ही काय अक्कल झाली?
**जानबा :** पर शेतकऱ्याला अक्कल नाही म्हणतात ते कसं काय हो काका?
**गुंडू :** आता आजच बघ ना, आपल्या गावातला पैसा परक्या गावाला घेऊन दिलाच की नाही! शिकवून सवरून परक्यांची धन करतात.
**जानबा :** हे बगा काका, असं वड्याचं त्याल वांग्यावर काढू नका. शेतकऱ्याला अक्कल कशी नाही ते पटवून द्या! म्हटलं, आता जुना शेतकरी राह्यला नाही, नवा हाय नवा!
**गुंडू :** ह्या नव्या शेतकऱ्याला अक्कल आहे म्हणतोस, आणि तूही नवा शेतकरी आहेस?
**जानबा :** हां, हां हाईच!
**गुंडू :** बरं तर, आपण या गोष्टीचा पडताळा पाहू या. प्रत्येकानं एक एक अकलेची गोष्ट सांगायची. गोष्ट नाही सांगता आली तर अक्कल नाही म्हणून दंड द्यायचा!
**बंडू :** पर गोष्ट कसली सांगायची?

**गुंडू :** कसलीही. पण अकलेची गोष्ट पाहिजे.

**जानबा :** तुम्ही दोघं कसलीबी सांगाल खोटीनाटी.

**गुंडू :** ती कशी का असेना, पण अकलेची गोष्ट पाहिजे. आणि ऐकणारांनी ती खोटी आहे असं म्हणायचं नाही. जो कोण गोष्ट खोटी म्हणेल त्यानंही दंड दिला पाहिजे!

**बंडू :** पर दंड काय द्याचा ते तरी ठरवा.

**गुंडू :** जो हरेल त्यानं आपली सर्व इस्टेट - स्थावर, जंगम, जी काय असेल ती विकून जो पैसा येईल तो जिंकणाराच्या स्वाधीन करावा.

**बंडू :** (गुंडूला एका बाजूला घेऊन) पन मला कशी येनार गोष्ट सांगाय काका? आमच्या सात पिड्यांत कधी अकलेची गोष्ट कुनी सांगितली न्हाई.

**गुंडू :** अरे, काहीही सांग. ज्याला जान्या खोटं म्हणेल असं काही तरी सांग म्हणजे झालं!

**जानबा :** पर ह्यो दंड वसूल कसा करायचा? एकाद्यानं नाही दिला तर तेचं काय करनार?

**गुंडू :** आपण असं करू, पंच बोलावून त्यांच्यादेखत करार करू म्हणजे झालं! आहे कबूल?

**जानबा :** कबूल, कबूल, बोलवा पंच.

(पंच येतात. पंचांना करार समजावून देण्यात येतो व पंच गोष्ट ऐकायला बसतात.)

> पाच पंच साक्षी ठेवून । करार तिघानं ॥
> पंचांपुढे केला । गोष्ट सांगायला ॥१॥
> गोष्ट खोटी म्हणेल जर कोण । दंड द्यावा त्यानं ॥
> गुन्हा समजून । विकावी जमीन ॥२॥

**पंच :** हं बोला, कोण पहिली सांगणार?

**बंडू :** जान्या, सांग रं किसान सभेचं ग्यान!

**जानबा :** तुमीच सांगा आदुगर.

**गुंडू :** बरं बंडवा, तूच सांग प्रथम.

**बंडू :** काय हरकत नाई, सांगतो, ऐका. आमच्या घरान्याचीच गोष्ट सांगतो तुम्हाला! आमचं घराणं पहिलं फार मोटं! धंदा दुधाचा. आसपासच्या बहात्तर खेड्याला आमीच दूध पुरवायचं! घरात गायी नि म्हशींची तर गनतीच नव्हती. जिकडं तिकडं म्हशीच म्हशी नि गायीच गायी!

**जानबा :** असं! पर किती तेचा हिशेब सांग की.

**बंडू :** सांगतो, ऐकून घे—

**(लावणी)**

माझ्या घरात अगणित गायी म्हशींची खिल्लारं ।
रानात चरती चौफेर । कैक हजार । तान्ही वासरं ।।१।।
पाच हजार गाडी कडब्याची । वैरण रोजची खर्च आम्हाला ।।
तीन हजार कुणबी एकजात । आमच्या घरात । गडी कामाला ।।२।।

**जानबा :** पर एवढ्या जिनावरांचं दूध काडायचं कसं नि साठवायचं कशात रं?

**बंडू :** ऐक सांगतो-

**(लावणी)**

दुधाचा करायाला साठा माझ्या बापानं । पाच मैल
चौरस रुंदी । तळे चिरेबंदी । बांधले होते छान ।।३।।

**गुंडू :** अरे पण बंडू, दूध काढायचं कसं, तापवायचं कसं, ते नाही सांगितलंस?

**बंडू :** सांगतो की.

आपोआप लागती दूधधारा । वहात झरझरा ।
तळ्याकडे जात ।। तळ्यामध्ये जमत जाऊन ।
सूर्यतेजानं खूप तापत ।।४।।

**जानबा :** नि दही कुठं करायचं?

**बंडू :** तळ्यातच!

**जानबा :** नि ताक?

**बंडू :** तळ्यातच! दिवसा दूध तापायचं, रात्री दही व्हयाचं नि भल्या फाटंला समदी म्हसरं नि गायरं, नि रेडं नि बैल आत सोडायचं. मग समदं तळं रौंदाळायचं म्हंजे आपल्या मनानं ताक तयार! (जानू हसतो.) का, तुला खोटं वाटतंय?

**जानबा :** छे, छे, समदं खरंच हाइ! म्होरं सांग तू!

**बंडू :** समद्या खेड्यास्नी दूध, दही, तूप, लोणी आम्ही पुरवीत व्हतो. पर आता धरम बुडाला, लोक लई शानं झालं, म्हनून आमचा धंदा बसला! जरा कुटं महाग इकलं, जरा कुटं पानी घातलं की बोंबाबोंब आमच्या नावानं! बघू, आमचंबी दिस येतील। झाली माझी गोष्ट. कशी काय आहे काका?

**गुंडू :** अगदी सोळा आणे!

**जानबा :** सोळा आने नव्हं सतरा!

**बंडू :** (गुंडूला) आता हो शेटजी, ह्यो खोटं म्हनीत न्हाई की!

**गुंडू :** (एकीकडं बंडूला) जरा धीर धर बंडबा. (उघड) बरं, आता मी सांगतो बरं का गोष्ट. आम्ही मूळचे पिढ्यान पिढ्याचे व्यापारी. व्यापार करणं आणि नफा घेणं हा आमचा देवानं दिलेला जन्मसिद्ध हक्क! साऱ्या जगावर आमचा व्यापार चालत असे.

लोकांना नाना तऱ्हेचा माल पुरवणं हे आमचं कर्तव्य बरं का! आमच्या पदरी अफाट संपत्ती. आम्ही संपत्तीचे मालक असल्यामुळे सर्वांचे पालक! काय समजलं?

**बंडू :** आक्सी बराबर! मालक म्हंजी पालक!

**जानबा :** तू ऐक आडग्या! तुला काय कळतंय?

**बंडू :** मग, तुला खोटं म्हनायचं हाय काय?

**जानबा :** नाही गड्या, म्होरं ऐकू या!

**गुंडू :** मग ऐक तर -

**(लावणी)**

श्रीमंत आमुचं घर। पैसा अपार।
कुबेराहून फार। दरारा गाजे जगभर ॥१॥
सात समुद्रांच्या पार। आमचा व्यापार।
चालत होता नित। नफ्यानं पेवं भरली सात ॥२॥

**जानबा :** रशियात बी यापार चालायचा का तुमचा?

**गुंडू :** अरे सगळ्या देशांत, रशियात सुद्धा!

**जानबा :** तिथं किसान राज्याचा रट्टा हाय म्हनत्यात तेचं काय?

**गुंडू :** मग तुला काय खोटं म्हणायचं आहे?

**जानबा :** नाही! बरं, ह्यो यापार कसकसा चालंता?

**गुंडू :** सांगतो, ऐक.

दारात झाड वडाचं। फांद्या त्याच्या पाच।
गेल्या होत्या दूर। पार पाचही खंडांवर ॥३॥
त्या फांद्यांवरून सारा माल। करून पार्सल।
आम्ही धाडीत। अजब व्यापार असा होत ॥४॥

**बंडू :** वा, वा, शेटजी, मोटं शानपन! खरंच आकलंवाचून काय चालत न्हाई. हेचं नाव टक्कूरं!

**गुंडू :** पण आता लोक धर्मभ्रष्ट झाले. आम्ही पालक असून आम्हाला कोणी विचारेना. लोकांना हे सुद्धा कळत नाही की आम्ही नसलो तर हे जगणार कसे? आणि आता मोठेमोठे पुढारीही सांगायला लागलेयत की आम्हाला फासावर द्या म्हणून! का? तर म्हणे आम्ही काळ्या बाजारात नफा घेतला! पण हे विसरून चालायचं नाही की नफा घेणे हा आमचा धर्म आहे. आम्ही आमच्या धर्मानं वागत आहोत!! झाली माझी गोष्ट. कशी काय आहे जानबा गोष्ट?

**जानबा :** लई बेस! अकलेची हाई खरी!

**बंडू :** बघू रं जान्या आता तुझं ग्यान.

**जानबा :** तुम्ही दोघांनी आपल्या आपल्या घराऱ्यांची गोष्ट सांगितली तवा मीबी माझ्या घराऱ्याची गोष्ट सांगतो.

**गुंडू :** कसलीही सांग; पण अकलेची गोष्ट पाहिजे!

**जानबा :** पंच मंडळी, नीट ध्यान द्या बरं का. आम्ही पहिल्यापासन शेतकरी. सगळ्यांनी शेतात राबून पीक पिकवायचं नि साऱ्यांनी धान्य सारखं वाटून घ्यायचं. सगळा शेतकरी अगदी आनंदानं राह्याचा! त्या वक्ताला कुनाला कोन फसवीत नवतं. लुबाडीत नवतं. सावकार, नफेबाज यापारी, ह्यांचं नावबी ठावं नव्हतं. आपलं साऱ्यांनी शेतावर खपावं नि साऱ्यांनी सुखानं राहावं!

**गुंडू :** अरे, जरा खरं बोल!

**पंच :** मग तुम्हाला गोष्ट खोटी म्हणायची आहे का?

**गुंडू :** तसं नव्हे-!

**पंच :** मग कसं? सांगा जानबा तुम्ही पुढं.

**जानबा :** सांगतो-

अंत ना पार जमीन आम्हाला । शेतकरी सारा सुखी त्या वेळा ।
नव्हता आळस ठावं कोणाला । राबती आनंदानं शेताला ।
पावसाची चिंता नव्हती आम्हाला । जर पावसानं घोटाळा केला ।
आव्हान देऊन त्या वरुणाला । दंड ठोकून उभे शेताला ।
एकवटून साऱ्या शक्तीला । एका दिवसात खणून विहिरीला ।
पाजिती पाणी साऱ्या शिवाराला । चढे मग जोर जित्रापाला । हिरवं गार ॥
धान्याच्या नाना जाती । सांगू मी किती । झळके शिवार ॥१॥
सांगतो ऐका जात धान्याची । तऱ्हा लई न्यारी हरभऱ्याची ।
जोंधळा, शाळू अन् डुकरीची । सत्त्वाला जात मोठी गव्हाची ।
ऊस आणि मका, काळ्या उडदाची । पांढऱ्या तुरी, मूग, मटकीची ।
चाखावी बहार शेंगदाण्याची। सुबता सारी भाजीपाल्याची ।
साऱ्या मुलखाला । नाही दुकाळ ठावं कधी । आनंदामधी देश खुलल्याला ॥२॥

अशी सगळी माणसं आनंदात व्हती. पर धान्यात जसं कुंजीर निपजत्यात, कधी शिजायचंबी नाहीत नि भिजायचंबी नाहीत - तसं दोघं ऐतखाऊ जन्माला आलं! त्यास्नी ऐतं खायाची सवय लागली. खऱ्याचं खोटं करायचं, देवाच्या नावावर शेतकऱ्याला फसवायचं, याजानं पैसे द्याचं नि खोटंनाटं कागद करून शेतकऱ्याला बुडवायचं.

**गुंडू :** कोण रे दोघं ते?

**जानबा :** एक तुमचा वडील नि दुसरा बंड्याचा वडील!

**गुंडू :** आम्हाला शिव्या द्यायला लागलास की! वा! ही काय गोष्ट झाली?

**पंच :** तुम्हाला गोष्ट खोटी म्हणायची आहे का?

**गुंडू :** तसं नव्हे, पण —

**पंच :** पुढे ऐका तर!

**जानबा :** त्यांनी असा अन्यायानं पैसा साठवला नि लोकाला पिळायला सुरुवात केली. गुंडाच्या बापानं यापार सुरू केला. नि बंड्याच्या बापानं दुधाचा धंदा सुरू केला. म्होरं ऐतखाऊंची सद्दी सुरू झाली.

**गुंडू :** अरे गोष्ट सांगतोयस का किसानसभेचं व्याख्यान देतोयस?

**जानबा :** गोष्ट सांगतोया! एके दिवशी तुमच्या त्या वडाच्या झाडाची फांदी मोडली नि सारा गहू समिंदरात पडला. हेच्या बापाच्या गंजा व्हत्या कडब्याच्या त्या कशानं तरी पेटल्या.

वोळख तुमच्या माझ्या बापाची ।
तुमच्या बापाला गरज धान्याची ।
लागली नऊ लाख खंडीची ।
विनवणी करून माझ्या बापाची ।
घेऊन गेला पोती गव्हाची ।
याच्या बापाला गरज कडब्याची ।
टंचाई झाली वैरणीची ।
उपाशी गुरं मरत होती त्याची ।
पाच हजार गाडी कडब्याची ।
घेऊन गेला दाद नाही त्याची ।
दोघांनी बोली केली उधारीची ।
याद बघा तुम्ही विसरला त्याची ।

**गुंडू :** अरे अरे, असली कसली गोष्ट ही?

**पंच :** खोटी आहे का? पुढं ऐका तर!

**बंडू :** आता हो काका! माझी दोनच म्हसरं हाइती!

**जानबा :** लाज धरून पूर्वजांची । भागवून टाका रक्कम आमची ।
फिर्याद करीन वचनभंगाची । काढीन साक्ष पाच पंचांची ।
धडगत नाही अता तुमची । विचार करा मनी ।
आपसात भांडण मिटवा । बाकी चुकवा । हात धुवोनी ॥३॥

ज्या देवानं तुमाला नफा खायचा हक्क दिलाता त्या देवाला स्मरून बाकी चुकती करा बरं!

**गुंडू :** अरे जानबा, आम्ही उगाच करमणूक म्हणून गोष्ट सांगायची ठरवलं, तर तू भलतंच

काय करतोयस?

**जानबा :** काका, ते आता पंचास्नी सांगा!

**बंडू :** काय हो केलंसा हे काका, अवं माझी दोनच म्हसरं हायती की हो. जानबा, तुझ्या पाया पडतो. मला सोडीव ह्यातनं!

**पंच :** मग काय काका, बंडबा, गोष्ट खोटी आहे का?

**बंडू :** (एकदम) खोटी! साफ खोटी!

**पंच :** काका, तुमचं काय म्हननं?

**गुंडू :** गोष्ट चांगली आहे हो—

**पंच :** मग तुमच्याकडं नऊ लाख खंडी धान्याची बाकी आहे. आणि गुंड्या, तू गोष्ट खरी म्हटली आहेस. दोघांच्याही इस्टेटी लिलाव करायला पाहिजेत. आणि जानूला-शेतकऱ्याला-भरपाई करून दिली पाहिजे.

**गुंडू :** जान्या, हे तू आमच्या घरादाराचं वाटोळं मांडलं आहेस!

**जानबा :** जाऊ द्या की हो काका, शेतकऱ्याला अक्कल नाही नव्हं!

**गुंडू :** तुझं नि तुझ्या किसान सभेचं वाटोळं होईल!

**जानबा :** अरं जा रं, तुझ्यासारखी कुत्री लई भुंकून गेल्याती, हिटलरसारख्यांची पायली भरून पालथी झाली, मग तुझ्यासारख्याचं मापटं कोलमडायला कितीसा वेळ लागणार! खुशाल ठोक मापटं किसान सभेच्या नावानं!

(पंच बंडूच्या दोन म्हसरांचा व काकाच्या इस्टेटीचा लिलाव पुकारतात. लिलाव संपतो व जानबा विजयी होऊन घरी परततो.)

## दृश्य तिसरे

**जानबा :** कारभारनी, एऽ कारभारनी, अग बघितलंस का काय आनलंय बाजारातनं?

**पुतळा :** अग बया! ह्यो कागोद कशाला?

**जानबा :** अग किसानसभेचा इजय झाला! ऐतखाऊ लोकांनी लुबाडल्याल्या शेतकऱ्यांच्या जमिनी कसणाऱ्या शेतकऱ्यास्नी परत मिळाल्या! दे हाक गावातल्या समद्या शेतकऱ्यांस्नी!

(सर्व शेतकरी जमतात व किसानगीत म्हणतात)

(किसान-गीत : कवी गव्हाणकर)

धरतीची आम्ही लेकरं । भाग्यवान ।
धरतीची आम्ही लेकरं ।।धृ.।।
शेतावर जाऊ या । सांगाती गाऊ या ।
रानीवनी गाती जशी रानपाखरं ।।१।।

मेहनत जिमनीवरी । केली वरीसभरी ।
आज आलं फळ त्याचं डुले शिवार ॥२॥
शाळू, जुंधळा मोती । चमचम चकाकत्याती ।
मोत्यांची भाकर ही सालभरी खाऊ ॥३॥
सावकार, पुंजीवादी । जुलमी चिरडू गादी ।
या रे सारे अन्यायाला देऊ ठोकर ॥४॥
स्थापू समानता । पोलादी ऐक्यता ।
नाही धनी येथ कुणी नाही चाकर ॥५॥
धरतीची आम्ही लेकरं । भाग्यवान ।
धरतीची आम्ही लेकरं ॥



# शेटजीचे इलेक्शन

**लावणी**

नामी एक गाव रहिमतपूर। राहत होता तेथे एक सावकार।
नाव त्याचे मगरचंद गुजर। श्रीमंत थोर।
अफाट जमीन त्याच्या घरी। होता मानकरी। करी व्यापार ॥१॥
लढाईचा पुरा फायदा घेऊन। नफ्याने हात घेतले धुऊन।
चौफेर काळा बाजार करून। नाडले जन।
जवळचा पैसा खर्चून। मिळवावा मान। विचार केला त्यानं ॥२॥

## दृश्य पहिले

(जागा : इलेक्शन बोर्डाचे ऑफीस. बोर्डाचे सभासद गंभीरपणे विचार करीत बसले आहेत. एकाच्या हातात उमेदवारांच्या अर्जांचे पुडके आहे.)

**सभासद :** काय सखारामबापू, आज कुणाकुणाचे अर्ज आले आहेत?

**सखारामबापू :** (पुडके दाखवीत) हे पाहा भाराभर आले आहेत! कुणी लिहितो आहे, 'मी १९२० पासून काँग्रेसचे काम करतो आहे,' - कुणी म्हणतो आहे, 'मी काँग्रेसकरता वकिली सोडून एकंदर सात वर्षे तुरुंगात काढली,' - तर शिष्ट सांगताहेत, 'मी दिवसातून फक्त सहा तास झोपतो आणि १८ तास चरख्यावर सूत कातीत असतो!' (गंभीर होऊन) या मूर्खांना हे समजत नाही की, काँग्रेसमध्ये काम करणे आणि काँग्रेसच्या तिकिटावर कायदेमंडळ काबीज करणे याचा अर्थाअर्थी काही संबंध नाही!

**सभासद :** ते जाऊ द्या हो, पण आज विचारात घेण्याजोगा एक तरी अर्ज आहे की नाही?

**सखारामबापू :** तसा एक आहे अर्ज -

**सभासद :** कुणाचा बुवा?

**सखारामबापू :** ओळखा पाहू. कमीत कमी पन्नास हजार रुपये निवडणूक फंडाला मिळतील! बोला, कोण असेल?

**सभासद :** पन्नास हजार? कोण बुवा हे ऽ? काही मती नाही चालत.

**सखारामबापू :** (पुडक्यातून एक अर्ज काढून तो सभासदाच्या हाती देत) हा पाहा. शिफारस करणे आपल्या हातात आहे. वरच्या बोर्डानं पास केला तर ऽ - पास

होईलच म्हणा!

**सभासद :** (अर्ज वाचून आश्चर्याने) काय म्हणता? मगरचंद गुजराची तुम्ही शिफारस करणार?

**सखारामबापू :** हो, मग त्यात काय झालं?

**सभासद :** वा! १९४२च्या लढ्यात हा मगरचंद कुठं होता माहीत आहे ना? गावात सरकारी नोकरांनी याच्या हस्ते गव्हर्नरला मानपत्र दिलं. वॉरफंडाच्या कमिटीचा चेअरमन हा. काळ्या बाजारात तर याचा हात धरणारा साऱ्या जिल्ह्यात कोणी नाही! आणि याची शिफारस करता म्हणजे ऽ

**सखारामबापू :** अहो, त्याचं असं आहे, स्वातंत्र्याचा लढा करायचा म्हणजे सर्व तऱ्हेची माणसं पाहिजेत! तारा तोडणारे, गाड्या पाडणारे, लढाऊ वीरही पाहिजेत, नि कायदेमंडळात जाऊन डावपेच खेळणारेही पाहिजेत! कायदेमंडळाचं राजकारण म्हणजे निराळी चीज आहे!

**सभासद :** राजकारण, राजकारण म्हणजे काय? आपल्याला काही पसंत नाही तुमचं हे करणं!

**सखारामबापू :** (खिशातून एक कागद काढून) शिवाय ह्या सूचना आलेल्या आहेत वरच्या पार्लमेंटरी बोर्डाकडून : (वाचतो) 'जरा घरदार असलेली अशीच माणसं निवडावीत म्हणजे इलेक्शन फंडावर विशेष ताण पडणार नाही!'

**सभासद :** अहो पण ऽ

**सखारामबापू :** (हुकमी आवाजात) पण नाही नि बिण नाही! आम्हाला सर्व प्रकारची माणसं पाहिजेत. हे राजकारण आहे! माझा निर्धार एकदा झाला तो झाला.

(मगरचंद गुजर येतो. डोकीला तांबडी पगडी असून अंगात पांढरा कोट आहे.)

**सखारामबापू :** (उठून त्याचे स्वागत करीत) या, या, मगरचंद शेठ. अगदी शंभर वर्षे आयुष्य आहे तुम्हाला! अहो, तुमचेच बोलणे चालले होते आता!

**मगरचंद :** नमस्ते! नमस्ते! आमचा अर्ज मिळाला असेलच?

**सखारामबापू :** (बाकीच्या सभासदांना डोळा घालून) वा, वा! मिळाला म्हणजे काय! अहो, निर्णयसुद्धा घेतला आम्ही! अहो, तुम्हाला नाही कायदेमंडळात पाठवायचं, तर कुणाला, (पुडक्यातला एक अर्ज काढून वर धरीत) या नांगरगड्ड्या सत्त्याला? म्हणे 'आम्ही ४२ला तारा तोडल्या, तुरुंगात गेलो, फटके खाल्ले, आमच्या जमिनी सरकारने जप्त केल्या!' ठीक आहे. आम्ही म्हणतो तुम्हाला खरे दे.भ. म्हणून! पण कायदेमंडळाचा नि या गोष्टींचा संबंध काय?

**मगरचंद :** चालायचेच! निवडणुकीचे वारे आहे हे! - मग, तयारीला लागू म्हणता? हो, आपलं 'शुभस्य शीघ्रम्!'

**सभासद :** अहो, तयारी कसली? आज आमचे तिकीट म्हणजे हुकुमी एक्का! शिवाय आम्ही आहोच - पण ऽ (रुपया आंगठ्यावर वाजवल्याची खूण करीत) निवडणूक फंड ऽ

**मगरचंद :** वा, वा ऽ म्हणजे, आम्हाला काय काळजी नाही म्हणता? (खिशातून नोटांचे पुडके काढीत) तूर्त ठेवा हे. अहो, हा फंड म्हणजे साऱ्यांचा फंड हे काय सांगायला हवं आम्हाला? बरं तर, येऊ आता?

**सखारामबापू :** (मगरचंदाच्या पगडीकडे बोट दाखवीत) पण शेटजी, हे जरा ऽ

**मगरचंद :** हँ, हँ! म्हटलं तुमच्याकडून नकार मिळालाच तर महासभेकडे जायला लागणार तेव्हा ऽ - (पगडी काढतो. आत गांधी टोपी असते.) बरं, नमस्ते. आमच्याकडे लक्ष असू द्या. आणि फंडाबिंडाची काही फिकीर करू नका! (जाता जाता गाणे म्हणतो).

मला तिकीट मिळालं मी असेंब्ली-मेंबर होणार ॥
आजवर होतो कावळा । केला बाजार काळा ।
ढवळा बगळाच आता मी शोभणार ॥१॥
शंभू-उमावरा । शुभ्र-गंगाधरा
नमुन जयकार क्रांतीचा करणार ॥२॥
पर्वणी ही भली । सफेत गंगा आली ।
न्हाऊन पावन तिच्यामधे होणार ॥३॥
आला क्रांतीचा पूर । राजे किसान मजदूर ।
क्रांतिवादी खरा मीच ठरणार ॥४॥

**सभासद :** (मगरचंदाची पाठ फिरताच) हा नंदी आता कायदेमंडळात जाऊन काय करणार?

**सखारामबापू :** अहो, असे नंदीच पाहिजेत तिथं. सारेच उमावल्लभ होऊन कसं भागेल?

**सभासद :** (सत्तू येत असलेला पाहून) हा आणखी कोण? बैल गेला नि बैलहाक्या आला!

**सखारामबापू :** अहो, तोच तो सत्त्या! जरा सांभाळा बोलताना.

**सत्तू :** (येऊन) राम राम सखारामबापू, काय वळिखलं काय?

**सखारामबापू :** (न ओळखलं असे दाखवून) अ ऽ हं ऽ! पाहिल्यासारखं वाटतंय कुठं तरी! हो, हो सत्तू ना?

**सत्तू :** पायल्यासारखं? अवो, येरवड्याला ४२ साली नव्हतो का तुमच्यासंगं? तुमी बायको आजारी म्हणून पॅरोलवर सुटून आला नि मी परवापतर तिथंच व्हतो. बाकी तुमी

'अ' वर्गात व्हता नि मी 'क' वर्गात! नाही वळख पटायची! ते जाऊ द्या, पर माज्या अर्जाचं काय केलंसा?

**सखारामबापू :** अरे सत्तू, त्याचं असं आहे, 'जेनू काम तेनू थाय, बिजा करे सो गोता खाय!' कायदेमंडळात जाऊन तू शेतकरीगडी काय करणार?

**सत्तू :** म्हंजी, आमा शेतकऱ्यांची दुःखं नि अडचणी तुमा पांढरपेशा लोकांस्नी जास्त कळत्यात म्हनता?

**सभासद :** तसं नव्हे रे. हा श्रमविभाग आहे! शेतकऱ्यांनी शेती करावी —

**सत्तू :** चळवळ करावी, तारा तोडाव्या, फटके खावे, तुरुंगात जावं नि तुमी कायदेमंडळात जाऊन बसावं! असंच नव्हं?

**सखारामबापू :** अरे, तुम्ही चळवळ केली, तारा तोडल्या - ठीक आहे, पण असेंब्लीत काय तारे तोडणार तुम्ही? अरे बाबा, हे राजकारण म्हणजे काय हलकी गोष्ट आहे? शिवाय आता क्रांती करायची आहे! मजूर-शेतकरी राज्य करायचं आहे!!

**सत्तू :** चांगलं हाय, चांगलं हाय! शेतकऱ्याला बाजूला ठेवून तुमी शेतकऱ्यांचं राज्य करनार!

**सखारामबापू :** शिवाय तू तुरुंगातून सुटल्यापासून किसानसभेत काम करतोस असा रिपोर्ट आहे. म्हणजे तू त्या लाल बावटेवाल्यांच्या कम्युनिस्टांच्या नादी लागलायस.

**सत्तू :** खरं हाय. तुमच्यावानी 'खोबरं तिकडं चांगभलं' करायचं कळत न्हाई आमाला! जिथं शेतकऱ्यांच्या हिताचं काम व्हतंय तिथं आम्ही काम करतो. आमी आपलं बारकं शेतकरी. तुमी हत्तीवानी मोठं पुढारी! 'दावायचं दात येगळं नी चावायचं येगळं.' म्हनं 'शेतकऱ्यांचं राज करायचं हाय.'

**सखारामबापू :** कुणापुढं बोलतो आहेस? ध्यानात ठेव, सखारामबापूशी गाठ आहे! नायनाट करीन तुझा - काय समजतोस तू?

**सत्तू :** ते तर कवाच वळिखलंय आमी. एका अंगानं सरकार नि दुसऱ्या अंगानं तुमी! करा शेतकऱ्यांचा नायनाट! पर असं उघड उघड सांगा की! 'शेतकरी-कामगार राज्याचा' बुरखा कशाला घेता?

**सखारामबापू :** (रागानं) चल, चालता हो इथून! (त्याला धक्के मारून घालवतो.)

## दृश्य दुसरे

(सत्तूचे घर, सत्तूची बायको तारा घरात सत्तूची वाट पाहत उभी आहे.
सत्तू येतो.)

**सत्तू :** सगळे चोर! म्हनं क्रांती करणार! शेतकऱ्यांचं राज करणार!

**तारा :** अवो, पर तुमी व्हता कुटं कालच्यानं? किसानसभंचं पुढारी आलं व्हतं जिल्हायतनं. किती वाट बघितली तुमची! तुमाला म्हनं कायदेमंडळात पाठवाय पायनं किसानसभंतर्फे उभं करनार निवडणुकीला!!

**सत्तू :** खरं म्हनतियास?

**तारा :** तर काय खोटं सांगतिया? तुमाला बिगीद्यान बलिवलंया. किसान सभंच्या हापिसात वाट बगीत बसल्यात तुमची. भाकरी खा नि जाऊन या तिकडनं.

**सत्तू :** भाकरी आता येऊनच खाईन! (घाईने निघून जातो)

(धोंडीबा - मगरचंदचा नोकर येतो. त्याच्या डोकीला गांधी टोपी आहे.)

**धोंडीबा :** ए ऽ ताराक्का... ताराबाई ऽ अवो ऽऽ

**तारा :** का रं धोंड्या? उगीच का टक्कुरं उठवलंयास? तुला वेळ वकुत काय कळतोया का न्हाई? (त्याच्या डोकीवरची गांधी टोपी पाहून) आँऽ आन् हे रं कवाच्यान? तू तर मोठा पुढारीच झालायस!

**धोंडीबा :** अवो, समद्या घराचाच रंग बदलला, मग गड्याचाच कसा बदलायचा न्हाईल? आताच सांगितलं मालकानं घाल खादीची टोपी, म्हून घातली, त्यात काय झालं?

**तारा :** झालं बिलं काय न्हाई खरं; पर ही टोपी खऱ्या देशभक्तानंच घालावी, तू आनि तुजा मालक यांच्यावानी चोरांनी न्हवं.

**धोंडीबा :** हां हा ऽ, ताराबाई, तसं म्हनू नगा हां! आमचा मालक म्हंजी काय समजला? आता त्यो असींब्लीत जानार हाय!

**तारा :** तुज्या मालकाचं पुरं बाबा. काय वाटंल ते करील! न्हाय न्हाय तसलं रंग पालटील सरड्यावानी! अन् तूबी तसलाच - ढवळ्यापाशी पवळा –

**धोंडीबा :** बैल! - म्हना की. काय वाटंल ते आडवं तिडवं बोला! पर ताराबाई, मी तुमचं बोलन ऐकून घियापायी न्हाई आलो! पांडरी टोपी घातली त्यात तुमचं काय बिघाडलं? लागल्या सरूड नि बिरूड म्हनायला! सत्तू कुठं गेलाय ते सांगा अगुदर!

**तारा :** का रं? गेल्यात किसानसभंच्या हापिसात.

**धोंडीबा :** किसान नि फिसान करीत फिरतुया नि आमची बाकी भागविना.

**तारा :** बाकी? कसली रं? कुनाची?

**धोंडीबा :** कुनाची म्हंजी! आमच्या मालकाची. ती भागवायची सोडली नि लाल बावटा घेऊनशान सभा घीत फिरतुया-कोकटत!

**तारा :** ए ऽ मुडद्या, परत बोल बघू! थोबाडच फोडते.

**धोंडीबा :** आ ऽ, आता कसा राग आला? आमच्या मालकाला वाटंल तसं बोलताना? लाल बावट्याचं नाव काढलं की इंगळीवानी चावाय येताय!

**तारा :** लाल बावट्यानं तुज रं काय बिघडलंय? घासभर अन्नासाठी गोताला काळ

झालायस! मानूस हाईस, का हाईस तरी कोन?

**धोंडीबा :** मी मानूस नव्हं म्हनता!

**तारा :** तुझी जात कुनाची रं? तुला शेतकरी म्हनावं तर सावकाराची कड घेतुयास, नि सावकार म्हनावं तर सावकाराच्या वाड्यात झाडू मारतुयास! अरं, प्वाट भरत नसलं तर काटं भरावं पोटात!

**धोंडीबा :** हां, हां ऽ, ताराक्का, असं बोलू नका बरं का मला! आता एक माजी जिमीन गेली म्हणून काय झालं? मी काय तसा आगदीच हे हाय का-?

**तारा :** अरं तेच म्हनते मी. ज्यानं तुजी जिमीन लुबाडली तेच्याच दारातला इमानी कुत्रा बनून शेतकऱ्यांवर भुंकतोयास!

**धोंडीबा :** म्हंजी? जेचं खातो तेची इमानानं चाकरी कराय नगं?

**तारा :** अरं कुनाचं खातुयास? त्या मगरचंदाचं? तेच्या बानं तरी कदी नांगोर बगितलाता काय रं? तुझ्या त्या मालकाला बैलाला कासरा कसा लावत्यात ते तरी ठावं हाय का? (धोंडीबा काही न बोलता विचार करीत उभा राहातो.) का रं, आता का वाचा बसली? सांग की, कोन राबतंय शेतात? तू का तुजा मालक?

**धोंडीबा :** ताराक्का, मला तरी कळंच ना बगा काय!

**तारा :** लाल बावट्याला शिव्या द्याचं कळतंय? किसानसभेला शिव्या द्याचं कळतंय? (धोंडीबा काही तरी निश्चय करून तडक निघून जातो. तारा - आपली गोळी बरोबर बसलेली पाहून, आनंदानं घरात निघून जाते.)

### कटाव

धोंडीबाच्या धक्का बसला हृदयाला । त्याचा स्वाभिमान जागा झाला । ताराचा बोल मनी बोचला । मनामध्ये विचार त्यानं केला । 'विसरलो मी माझ्या वर्गाला । कुऱ्हाडिचा दांडा काळ गोताला । सामिल झालो आहे चोराला । भाऊबंदांना नाडतो, त्याला । सावकाराला । हक्काची असून भाकरी । करतो चाकरी । मुकलो मानाला' ।।१।। लुबाडलं ज्यानं माझ्या जमिनीला । केलं पार कंगाल मला । आपुला बंदा गुलाम बनविला । लावुनी हलक्यासलक्या कामाला । करतो अपमान वेळोवेळा । लाचार बनलो, महाग अन्नाला । परी तारानं मार्ग दावला । शेतकरी तारील शेतकऱ्याला । वठणीवर आणावा सावकाराला । बेत त्यानं केला । तुम्ही चित्त ठेवुनी स्थिर । ऐका प्रकार । पुढे घडलेला ।।२।।

## दृश्य तिसरे

(मगरचंदाचे घर. मगरचंद खादीचा नवा कोट अंगात चढवीत आहे.)

**मगरचंद :** धोंडीबा ऽ, ए ऽ धोंडी! गद्धा लेकाचा! कुठं जाऊन बसलाय कोण जाणे!

निवडणुकीच्या धामधुमीचा काळ तर जवळ येत चाललाय नि हा लेकाचा अंगचुकारपणा करतोय! (ओरडून) धोंडी ऽ ए ऽ धोंड्या -

**धोंडीबा :** जी भाऊसाहेब, आलो!

**मगरचंद :** बेअकली! कुठं गेला होतास गद्ध्या? तू काय मानूस आहेस?

**धोंडीबा :** आँ? म्हंजी? मी मानूस नव्हं म्हनता?

**मगरचंद :** गाढव!

**धोंडीबा :** आँ ऽ गाडाव! मी काय लाथा झाडतोया?

**मगरचंद :** उलट बोलतोस आणि गद्ध्या?

**धोंडीबा :** गद्धा! - मालक, माजं नाव धोंडीबा हाय! गावातबी लोक मला काय वाटंल ते म्हनत्यात. नि तुमीबी –

**मगरचंद :** काय म्हणतात गावात लोक?

**धोंडीबा :** कोन म्हनतंय गुजराचा कुतरा, तर कोण म्हनतंय कुराडीचा दांडा! धड मी आभाळातबी न्हाई आनि जिमिनीवरबी न्हाई! दोडका!

**मगरचंद :** मूर्ख लेकाचे! अकला आहेत काय त्यांना?

**धोंडीबा :** तुमीबी तेंच्यावानीच! –

**मगरचंद :** काय म्हटलंस?

**धोंडीबा :** अवं कायबी बोलताय. गाडाव काय, गद्धा काय, अस्वाल काय, काय वाटंल ते म्हनत्यात मला!

**मगरचंद :** मग? तू आमचा नोकर आहेस!

**धोंडीबा :** नोकर असलो म्हनून, मी काय मानूस नव्हं?

**मगरचंद :** (जरा नरमून) तसं नव्हे रे! या निवडणुकी आल्या आहेत जवळ नि तू अंगचुकारपणा करतोयस!

**धोंडीबा :** खरं सांगू भाऊसाब आपल्याच्यानं न्हाई व्हनार ही चाकरी!

**मगरचंद :** म्हणजे, तू नोकरी सोडणार म्हणतोस?

**धोंडीबा :** तर काय मुडदा पाडून घेऊन म्हनता या निवडणुकीत?

**मगरचंद :** असं भलतंच काय बोलतोस धोंडीबा? अरे, तू आमचा जुना नोकर आणि तू आम्हाला या निवडणुकीच्या धांदलीत सोडून जाणार? अरे, तू आमच्या सगळ्या कुळांना ओळखतोस. होय की नाही?

**धोंडीबा :** व्हय तर! माझ्यावानी, ज्या ज्या शेतकऱ्यांच्या जिमनी तुमच्या कबजात आल्या नि जे आता तुमची कुळं बनल्यात त्या भाऊबंदास्नी मी न्हाई तर कोन ओळखनार? मग, त्या समद्या कुळांस्नी सांगू म्हनता सावकाराला मतं द्या म्हनून?

**मगरचंद :** आज काय तुझ्या मानेवर कोण बसलंय काय रे?

**धोंडीबा :** सांगितलं नव्हं, तुमची ती निवडणूकबी नगं नि चाकरीबी नगं! कुनी शिव्या खाव्या तुमच्या?

**मगरचंद :** (गोडीगुलाबीनं) अरे असं काय करतोस धोंडीबा? आम्ही येथून पुढं नाही रागावणार तुझ्यावर, नाही शिवी देणार तुला! मग तर झालं? पण एवढी निवडणूक होईपर्यंत नको सोडू नोकरी!

**धोंडीबा :** तुमी आता कबूल करशीला नि उद्या माझ्या ४२ कुळीचा उद्धार करशीला राग आला म्हंजी. येपारी गडी तुमी, कुनी इस्वास धरावा?

**मगरचंद :** मी सांगितलं ना नाही रागावणार म्हणून? पण तू नोकरी सोडून मध्येच पळणार नाहीस कशावरून?

**धोंडीबा :** मी निवडणूक संपायच्या आता चाकरी सोडली तर माझा कान कापा! मग तर झालं? पर तुमी रागावला तर तुमचाबी कान –

**मगरचंद :** (सहन न होऊन) गाढवा! माझा कान –

**धोंडीबा :** बगा, रागावला! मी जातोच कसा!

**मगरचंद :** (बराच नरमून, लाडानं) बरं, बरं; माझा कान काप! झालं? कबूल! चल बरं आता, कामाला लागू या.

**(लावणी)**

एक धनी दुसरा चाकर । केला करार । मिळून दोघानं ।।
भरू नये रागं एकानं । जावं ना दुसऱ्यानं काम सोडून ।।
हा करार मोडील कोण । घ्यावा कापून । तयाचा कान ।।

**मगरचंद :** बरं धोंडीबा, आता असं करायचं, गावोगाव जायचं, आमच्या सगळ्या कुळांच्या नि इतर शेतकऱ्यांच्या गाठी घ्यायच्या. कुळांना बाकीबिकीबद्दल काही बोलायचं नाही बरं का या वेळी!

**धोंडीबा :** म्हंजी! समदं कराज माफ म्हनता?

**मगरचंद :** अरे तसं नव्हे. आपल्याला मतं मिळाली पाहिजेत ना? म्हणून जरा धीरे, धीरे! शेतकऱ्यांना सांगायचं, 'आम्हाला निवडून दिलं तर आम्ही तुमच्या हिताचे - कर्ज निवारण्याचे वगैरे कायदे करू!

**धोंडीबा :** मग मालक, तुमच्या कर्जाचं कसं? बुडलं की हो समदं!!

**मगरचंद :** ते पाहू रे नंतर! अगोदर निवडून तर आलं पाहिजे आपण?

**धोंडीबा :** मग बोला, पहिल्यानं कुटं जाऊ या?

**मगरचंद :** असं करू, आपली कुळं आहेत ना? त्यांना प्रथम भेटू. म्हणजे मग त्यांचे पाहुणे, त्या पाहुण्यांचे पाहुणे -

**धोंडीबा :** त्या पावन्यांच्या पावन्यांच्या पावन्यांचं पावनं! असं कराय गेलो तर समदा

हिंदुस्थान पालथा घालाय लागंल की वो! भाऊसाब, असं करू या, ह्या आसपासच्या भागातल्या समद्या शेतकऱ्यांचा गड्डा मला ठावं हाय. लई वजन हाय तेचं शेतकऱ्यांवर नि तुमचं कुळंबी हाय तो. त्येच्याकडं गेलं तर गाडीभर मतं मिळतील!

**मगरचंद :** कोण रे हा?

**धोंडीबा :** अवो त्यो वाडीवरला सत्तू! मागं नाही का चळवळीत गेला म्हनून सरकारनं जिमिन लिलावात काडली नि तुमी घेतली ती... दोन-तीन वरसांमागं?

**मगरचंद :** हां हां, तो चळवळ्या सत्तू होय? - ४२ला तारा तोडल्या तो? बरं, चल तर जाऊ या. कूळ आहे ना आमचं? (जातात)

## दृश्य चौथे

(सत्तूचे घर, धोंडीबा व मगरचंद येतात.)

**धोंडीबा :** अवो ताराक्का, वाइच भाइर या की!

**तारा :** (बाहेर येत) का रं धोंड्या, का आलायास परत? नि सावकारबी हाय बरोबर व्हय? का आलायस?

**धोंडीबा :** का म्हंजी? मत दे!

**तारा :** आँ? मत! मतबीत काय मिळनार न्हाई, पन झाडू बसंल पेकाटात!

**धोंडीबा :** मत पाहिजे मालकाला, तवा त्यो झाडूबी तिकडंच!

**मगरचंद :** (डोळे वटारून) धोंडीबा!

**धोंडीबा :** काय, राग आला व्हय मालक?

**मगरचंद :** तसं काही नाही खरं, पण ऽ

(सत्तू येतो.)

**सत्तू :** आँ! भाऊसाहेब, तुमी इकडं कुटं गरीबाकडं?

**मगरचंद :** म्हटलं, यावं चौकशी करून! तुझं कसं काय चाललंय? बरेच दिवसात गाठ नव्हती —

**धोंडीबा :** व्हय, आपलं एका दगडात दोन पाखरं! बाकीची वसूल व्हती काय बगायचं नि मताचंबी काय जमलं तर —

**सत्तू :** मतं रे कसली? कुणाला?

**धोंडीबा :** म्हंजी? मालक उभं राहिल्यात नव्हं का निवडणुकीला! टोपीवरनं तरी वळखावं तुमी!

**मगरचंद :** (राग आवरून, सत्तूला) त्याचं असं आहे सत्तूबा, आम्ही यंदा कायदेमंडळाच्या निवडणुकीला उभे राहिलो आहोत - म्हणजे आम्हाला उभं केलंय म्हणेनास! म्हटलं, तुझ्याकडं आलं म्हणजे शेतकऱ्यांच्या मतांची काळजी नाही!

**सत्तू :** असं व्हय? बरं, तुमाला निवडून दिलं तर तुमी शेतकऱ्यांसाठी काय करनार?
**मगरचंद :** वा, वा! काय करणार नाही शेतकऱ्यांसाठी! शेतकरी म्हणजे आमचा जीव की प्राण! फार कशाला सांगू? आम्ही कायदेमंडळात जाऊन स्वराज्य मिळवणार आणि राज्यच शेतकऱ्यांचं करून टाकणार!
**धोंडीबा :** म्हंजी शेतकरी राबाय राजा नि सावकार बसून खायला परजा! असंच नव्हं मालक?
**मगरचंद :** धोंडीबा!
**धोंडीबा :** (खिशातला चाकू काढून हातात घेतो.) राग आला मालक?
**मगरचंद :** (नरमून) तसं नव्हे रे! हं, तर काय सांगत होतो! हो, सगळं काही करणार शेतकऱ्यांसाठी. आमचा १२ कलमी निवडणूक जाहीरनामा वाचला असशीलच?
**तारा :** पुराणातल्या वांग्याची भाजी कुनी बगितलीया? खरं, तुमी आमच्या गावासाठी काय करनार ते तरी सांगा.
**मगरचंद :** अहो ताराबाई, हे राजकारण आहे. बायकांनी असं मधे बोलू नये!
**तारा :** ते का? शेतकऱ्यांची काय काय दु:खं हाइत, गावात काय अडचनी हाइत, ते आमा बायकास्नी कळत न्हाई व्हय?
**धोंडीबा :** ते कसं कळावं? मालकीनबाई तर माडीवरनं ४-४ महिनं खाली येत न्हाई! दागिन्याचा नि पैठणींचा ढीग भोत्यानं! सेवेला चार दासी, पाच गडी, एक डायवर, दोन कुत्री - अवो, बायका तितनं समद्या सारख्या! त्यास्नी राजकारण काय कळनार?
**मगरचंद :** (संतापून) धोंड्या, तू मधे बोलू नको म्हटलं ना? कशाला वटवट लावली आहेस? (धोंडीबा चाकू चाचपतो. मगरचंद राग गिळून शांत होतो) तर ताराबाई, आम्ही जातीनं गावासाठी काही गोष्टी करायच्या ठरवल्या आहेत -
**सत्तू :** काय काय ठरविलंय?
**मगरचंद :**

**(लावणी)**

सडका नीट करीन गावाच्या । पायऱ्या घाटाच्या ।
पूल एक दगडी बांधीन । रस्त्याला रस्ता सांधीन ॥
देवळावर कळस चढवीन । आड काढीन ।
शाळा एक मोठी उघडीन । पोरांबाळांना देऊ ज्ञान ॥
धर्मशाळा वाटसरूंसाठी । करू खटपटी ।
दवाखाना आणू एक गावाला । रोग नाही येणार नावाला ॥

**धोंडीबा :** बाकीच्या रोगाचं झालं, पर सावकारीच्या, जमीनदारीच्या रोगांची काय वाट?
(मगरचंद न ऐकल्यासारखे करतो.)

**मगरचंद :** आणि काय करायला पाहिजे? रस्ते, शाळा, विहीर, दवाखाना, देऊळ, धर्मशाळा —
**धोंडीबा :** कोंडवाडा, तुरुंग, पोलीसचौकी! —
**मगरचंद :** तू गप बैस म्हणतो ना?
**सत्तू :** हं, हं ऽ! राजा उदार झाला नि भोपळा हाती दिला!
**मगरचंद :** शिवाय स्वराज्य मिळविणे; शेतकरी-मजूर राज्य करणे -
**सत्तू :** ते समदं ऐकलं! पर, काळाबाजारवाल्यांच्या इस्टेटी जप्त करणार का?
**धोंडीबा :** म्हंजी, आमच्या मालकाला भिकंला लावता व्हय?
**सत्तू :** सगळ्या मोठमोठ्या जमीनदारांचे नि सावकारांचे दस्तऐवज जाळून टाकणार?
**धोंडीबा :** नि माझी जिमिन परत देनार?
**मगरचंद :** (रागाने) काय म्हणालास?
**धोंडीबा :** (चाकू चाचपीत) मालक, राग न्हाई नव्हं आला?
**मगरचंद :** रागावलो नाही रे, प ऽ ण - बरं सत्तू, तुमचं म्हणणं तरी काय ते नीट कळू द्या!
**सत्तू :** सांगू? तुमी निवडून गेल्यावर —
**धोंडीबा :** म्हंजी शेतकऱ्यांनी तुमाला निवडून दिल्यावर —

**लावणी-झगडा**

**सत्तू :** नोकरशाहिला । हाकलायाला । एकी देशामध्ये कराल का? ॥
**मगरचंद :** मुसलमानाचा । स्वनिर्णयाचा । वेडा हट्ट कोण पुरवील का? ॥१॥
**सत्तू :** सोडून घरदार । करोनि निर्धार । रणांगणामधि उतराल का? ॥
**मगरचंद :** स्वराज्यापायी । झाली लढाई । आम्ही मागं कधी राहिलोय का ॥२॥
अरे, असं का विचारतोस? स्वातंत्र्याचा लढा आम्हीच केला आजवर, नि ही निवडणूक म्हणजे अखेरच्या लढ्याची नुसती तयारी आहे! पाहा तर खरं. ४२ला नुसता बचावाचाच लढा होता, निवडून आल्यानंतर अखेरचं चढाईचं बंड करणार आहोत! हां ऽ, आहेस कुठं?
**सत्तू :** मी हाय जिमनीवरच, खरं पर तुमी ह्यो लढा कुठं सिमल्याला व्हाइसरॉयच्या बंगल्यावर करनार का दुसरी एकांदी जागा हुडकनार? लढा तुमी जमीनदार भांडवलदार करनार का भुकंनं मरनारा शेतकरी-कामगार करनार? तोंडं बगा लढेवाल्यांची! एका जागेपायी सिमल्यावर, 'ना मला, ना तुला, घाल गोऱ्या चोराला' म्हनून समदा इचका केला - तुमी बंड करनार, का तडजोडीचा दोरखंड लावनार देशाच्या गळ्याला?
**मगरचंद :** अरे, हे राजकारण आहे. तुम्हा शेतकऱ्यांना नाही उमगायचं.
**सत्तू :** खरं हाय. असलं बडबडीचं राजकारण भांडवलदारी खुर्चीवर बसलं तरच कळतं!

बरं, शेतकऱ्यांच्यासाठी —
शेतकऱ्यांचा । न्याय्य हक्काचा । कायदा कसाला लावाल का? ॥
**मगरचंद :** पचेल ते खावं । शोभेल ते ल्यावं । भलतं सलतं काय मागू नका ॥३॥
**सत्तू :** पोटाला पोटभर । मिळाया भाकर । जमीन घरोघर वाटाल का? ॥
**मगरचंद :** तुझं हे बोलणं । तिरकस चालणं । सांग कोणाला पटंल का? ॥
**सत्तू :** कर्जमाफीचा । (सावकारांच्या) जमीन जप्तिचा । कायदा सक्तिचा आणाल का? ॥
**मगरचंद :** असं कुठं झालं । कुणी पाहिलं । याला पुरावा देशील का? ॥५॥
अरे असं कुठं झालंय का? काहीतरीच मागायचं म्हणजे काय? जमिनी कुणाला कुणी वाटून दिल्यात?
**सत्तू :** हो, दिल्यात की!
**मगरचंद :** कुठं?
**सत्तू :** रशियात, बल्गेरियात, पोलंड देशात - वाईच बगा की जगाकडं!
**मगरचंद :** अरे, ते तिकडं झालं! इथं कसं कोण करणार?
**तारा :** किसानसभंचा लाल बावटा!
**मगरचंद :** लाल बावटा काय रशियातून जमिनी आणणार नि वाटणार?
**तारा :** ते कशापायनं? मॉप तुमच्यावानी एक एकाच्या घरात हजार हजार, दोन दोन हजार एकर जिमिन पडलीया!
**धोंडीबा :** मग मालक, असं करू या, - आपली हजार एकर जिमीन टाकू या वाटून नि घेऊ या मतं!
**मगरचंद :** गद्ध्या, माझी घरची जमीन वाटू?
**धोंडीबा :** मग काय आभाळातनं पडणार? अवो, जाऊ द्या की वो, नाइतरी शेतकऱ्यांचं राज करनारच हाय तुम्ही!
**मगरचंद :** गाढवा, तुला मध्ये बोलू नको म्हटलं ना? सत्तू, हे पाहा, आम्ही शेतकऱ्यांचं भलं करणार यात काही शंका नको -
**सत्तू :** शेतकऱ्यांचं भलं जर सावकारानं केलं असतं तर शेतकरी का भीक मागता?
**धोंडीबा :** नि गाढवांच्या लिदी जर गुळाच्या असत्या तर कुंभार का चिखोल मळता?
**मगरचंद :** (संतापून) लेकाच्या, गाढवा, मध्ये बोलू नको म्हटलं तर माझी, तुझ्या मालकाची अब्रू घेतोस?
**धोंडीबा :** राग आला व्हय धनी?
**मगरचंद :** राग नाही येणार तर काय -
**धोंडीबा :** (चाकू काढून) बगू, हिकडं करा तुमचा कान!

**मगरचंद :** (हातानं कान झाकून) अरे सत्तू, मला वाचव! मला ती निवडणूक नको, मतं नकोत नि हा नोकरही नको!! (पळून जातो. शेतकरी जमून गाणं म्हणतात.)

(गीत) (कवी अमर शेख)

शेतकरी आमि झालो समदं लाल बावटेवालं ।
देऊ एकीचा गुद्दा ठेवून आडवाया कुनी आलं ॥

—•—

# बेकायदेशीर

मगरचंद गुजर नामे एक मोठा श्रीमंत ।
होता नांदत अति डौलानं रहिमतपुरात ।।१।।
मोठ्या मोठ्या वचनाची लोकाला करून खैरात ।
मते घेऊनी निवडुन गेला होता कौन्सिलात ।।२।।
दिलेली वचने पार विसरला थोड्या दिवसात ।
परि लोकांनी त्याला ठेविला होता लक्षात ।।३।।

## दृश्य पहिले

**रघुनाथमल** (गिरणीमालक) : धोंडी ऽ, ए ऽ धोंडीबा! कुठं गेला हा? धोंड्या ऽ
**धोंडीबा :** (रघुनाथमलचा नोकर) : जी ऽ, आलो मालक!
**रघुनाथमल :** कुठं आहेस? आँ!
**धोंडीबा :** हातंच नव्हं का काम करतुया!
**रघुनाथमल :** बरं, सब ठीक आहे ना?
**धोंडीबा :** अक्षी बराबर.
**रघुनाथमल :** कोणाचं पत्र वगैरे?
**धोंडीबा :** अवं मालक, याक का दोन, चांगली एका गाढवाचं वजंभर आल्याती!
**रघुनाथमल :** आण पाहू ती इकडे. (धोंडी पत्रे आणतो. ती चाळीत) कोणाचा फोन वगैरे?
**धोंडीबा :** तेनं तर सकाळच्यानं टक्कुरं उठवलंया! याकसारखं किणबिण करतंय नि ऐकायला जावं तर काय मानसावानी बोलंना बगा!
**रघुनाथमल :** मग, कुणासारखं बोलतंय?
**धोंडीबा :** सायबावानी, विंग्लीश वो!
**रघुनाथमल :** (एक पत्र वाचता वाचता) अरे बाप रे!
**धोंडीबा :** आँ, काय झालं मालक?
**रघुनाथमल :** संप - !!
**धोंडीबा :** हात्तेच्या! मी घाबरलो नव्हं का. मला वाटलं, बाँबगोळाच निघाला त्या पाकिटातनं!

**रघुनाथमल :** मूर्ख, बेअकली, पाजी लेकाचे! उठल्या सुटल्या मागण्या! धोंड्या, - आपल्या मिलमध्ये कोणी लाल बावटेवाले आहेत का रे?
**धोंडीबा :** कोण बरं? काय दखल न्हाई मालक.
**रघुनाथमल :** त्या सद्याला जरा बोलाव पाहू.

(धोंडी जातो. रघुनाथमल बाकीची पत्रं चाळतो
सदू व धोंडी येतात. सदू रामराम करतो.)

काय रे सदू, आपल्या मिलमध्ये कोणी लाल बावटेवाले आहेत का?
**सदू :** हाय मालक, हाय!
**रघुनाथमल :** कोण रे?
**सदू :** सत्तू!
**रघुनाथमल :** काय रे धोंडी, हा सत्तू कोण? ओळखतो का याला?
**धोंडीबा :** तर! आता आलं माझ्या डोक्शात. पहिला ह्यो कांग्रेसवाला शेतकरी हुता. आता गिरणीत काम करतोय.
**रघुनाथमल :** काँग्रेसवाला होता? म्हणजे काय केलं काँग्रेसकरता यानं?
**धोंडीबा :** मागं ती चळवळ झाली न्हाई का? १९४२ची. त्या वक्ताला त्येला तुरुंगात घातला हुता सरकारनं. दोन वर्स सजा झालिती.
**रघुनाथमल :** म्हणजे बेचाळीसमधे हा काँग्रेससाठी जेलमधे गेला? केवढा देशभक्त! आणि आज काय ही अधोगती!
**धोंडीबा :** का हो? काय झालं?
**रघुनाथमल :** अरे, आता हा कामगारांना आमच्याविरुद्ध चिथावणी देतो आहे. हे काय काँग्रेसवाल्याचं काम झालं?
**धोंडीबा :** तर काय कराय पाहिजे बरं?
**रघुनाथमल :** अरे, काँग्रेसवाल्यानं खादी परिधान करावी, सूत कातावं, अहिंसा तत्त्व आचरावं.
**धोंडीबा :** कामगारांत फूट पाडावी, त्यासाठी नव्या नव्या भाराभर युनियनी काढाव्या, हतं याक नि तथं याक बोलावं -
**रघुनाथमल :** खामोश! ते काही असो, मी त्यांना एकही मागणी देणार नाही. करा म्हणावं संप. पाहतो मी. चिरडून टाकीन सर्वांना, खुशाल गिरणीला टाळं लावीन!
**धोंडीबा :** तेबी आजकाल फायद्यावरच हाय!
**रघुनाथमल :** म्हणे तुम्हाला एवढा फायदा झाला आहे नि तमकं झालंय! मग झाला म्हणून काय झालं? पैसा काय झाडाला लागतो?
**धोंडीबा :** ते कुठला, तेला घाम गाळावा लागतो!

**रघुनाथमल :** (एक पत्र लिहून धोंडीच्या हाती देत) हे पत्र नामदार मगरचंद यांना दे ताबडतोब. पाहतो यांच्या संपाच्या धमक्या कितपत चालतात! (आत जातो.)

**धोंडीबा :** (स्वत:शी) मालकाला वाटतंय, मला ह्यातलं काय कळतच न्हाई, पर मी मगरचंद शेटजीकडं चांगली धा वर्स नोकरी केलीया. हेंच्या राजकारणातल्या समद्या खाचाखोचा ठावं हाइती मला —

मजुरांची कदर नाही मालकाला । पैशाची धुंदी यांच्या डोळ्याला ।
कौन्सिलात याचा मोठा वशिला । मगरचंद शेठ कॉंग्रेसवाला ।
मित्र जिवलग याच्या बाजूला । लोकांनी मत देऊन ज्याला । निवडून
कौन्सिलात धाडला । आज तो मिनिस्टर आहे झाला । मारून
त्याला आपल्या बगलेला । दडपून द्यावे कामगाराला । बेत यानं
केला ।। लष्करी पहारा कडक । बेधडक । गोळीबाराला ।।

**रघुनाथमल :** (येतो) धोंडी, तू इथंच अजून?

**धोंडीबा :** चाललो नव्हं का. पर आनि काय निरोपबिरोप शेटना?

**रघुनाथमल :** म्हणावं पत्राचं उत्तर ताबडतोब द्या आणि सवड झाल्यास एकदोन दिवसात भेटून जा मला. जा आता. वेळ काढू नको मधे.

**धोंडीबा :** छे, छे, थेट जातो घाण्याच्या बैलावाणी!

## दृश्य दुसरे

(मगरचंद शेठचा बंगला. नामदार बाहेर जाण्याच्या तयारीत आहेत.
कपडे करता करता गात आहेत.)

**मगरचंद :** झालो पावन आम्ही । झाले स्थापन आमचे सरकार ।।धृ।।
पुण्याई गाठी । अहिंसेची मोठी ।
देशभक्तिची अपरंपार ।। झालो .... ।।१।।
शुभ्र टोपी शिरी । जादुगारीण खरी ।
नजरबंदीची जादू करणार ।। झालो .... ।।२।।
काळ्या बाजाराला । करून नाडला ज्याला ।
खुष तोहि आम्हावर कामगार ।। झालो .... ।।३।।
ज्यांची जमीन सारी । आज आमच्या घरी ।
त्यांनी मतांची लाविली धार ।। झालो .... ।।४।।

(धोंडीबा पत्र घेऊन प्रवेश करतो.)

**धोंडीबा :** राम राम शेटजी - नाही नामदारसाहेब!

**मगरचंद :** कोण तुम्ही? काय काम आहे?

**धोंडीबा :** माझं नाव धोंडी —
**मगरचंद :** काय धोंड्या ऽ?
**धोंडीबा :** डला या नव्हं. डी ऽ, धोंडी! तुमचा जुना नोकर!
**मगरचंद :** हो हो. तोच का? कुठं आहेस सध्या? का आलास?
**धोंडीबा :** पत्र दिलंया मालकांनी. (पत्र देतो) रघुनाथमल शेटनी.
**मगरचंद :** (पत्र फोडून वाचतो) अरे बाप रे! बेकायदेशीर!! काय हे लोक आहेत का सैतान? कायदा, सुव्यवस्था, शांतता काहीच कळत नाही यांना! उठल्या सुटल्या संप?
**धोंडीबा :** पर, कामगारांच्या मागण्या मिळंनात तर काय करावं त्यांनी?
**मगरचंद :** म्हणजे काय झालं, त्याला संप कशाला करायला हवा? आता आपलं सरकार आलंय हेही कळत नाही यांना!
**धोंडीबा :** तेंच्या अडचनी—
**मगरचंद :**मग काय झालं त्याला? बेकायदेशीर संप! ठोकून काढू! मूर्ख लेकाचे! आपल्या राज्यात संप करणं, शांतताभंग करणं म्हणजे काय?
**धोंडीबा :** अवो, लोकांनी काय तरी चांगलं दिस दिसतील म्हणून मतं दिली तुम्हाला नि निवडून दिलं. लोकांचं जरा भलं झालं पाहिजे आता!
**मगरचंद :** भलं म्हणजे? काय केलं पाहिजे? धीरे, धीरे आम्ही सर्व काही करतो आहोत.
**धोंडीबा :** पर आपलं ते कामकरी-शेतकरी प्रजाराज्य —
**मगरचंद :** म्हणजे माझ्या नाही लक्षात आलं?
**धोंडीबा :** हां. मतं मिळवायसाठी पाठ केल्याला मंतर त्यो! इसरायचाच आता!
**मगरचंद :** (रागाने) कसला मंत्र?
**धोंडीबा :** त्यो, इंग्रजाइरुध चढाईचं बंड, पूर्ण सोराज नि शेतकरी-कामकरी राज्य - म्हनून लोकांनी तुमच्यावानी मानसाला मतं दिली —
**मगरचंद :** आम्हाला मतं दिली म्हणजे काय उपकार केले आमच्यावर? आम्ही मत घेतली ती काय संपाच्या बोलीनं? हे पाहा, आम्ही सारं जाणतो. हे संप म्हणजे आमची मिनिस्ट्री - आमचं सरकार उलथून पाडण्यासाठी कम्युनिस्टांनी रचलेलं कारस्थान आहे!
**धोंडीबा :** पोटासाठी मागून दाद लागंना म्हणून कामगारानं संप केला तर तेला तुम्ही कारस्थान म्हणता?
**मगरचंद :** पोट पोट! आहे तरी केवढं पोट तुमचं? पोटाला काय संपच खाता?
**धोंडीबा :** अक्षी बराबर! कामगार संपावरच जगतोय मानुसकीनं. संप हाय म्हनूनच

कामगार मानूस हाय. न्हाइतर या मालकांनी कवाच पशू बनविला असता कामगाराला!

**मगरचंद :** 'पोटासाठी संप' म्हणतोस, मग हे काय? (वर्तमानपत्र दाखवीत) 'कम्युनिस्टांचे कुटिल कारस्थान,' - खोटं आहे का हे?

**धोंडीबा :** तेबी तुमचंच, भांडवलदारांचं! तुमी खून करायचा नि या वर्तमानपत्रवाल्यांनी लिवायचं, अफू खाऊन मेला म्हनून! मला तर वाटतं, असं पोट मारायचं सोडून ह्या वर्तमानपत्रवाल्यांनी पोटात कवळं कवळं दगड भरावं! आता कामगार नाही फसायचा ह्या पत्रांच्या भुलावणीला. त्यो बराबर संपाचं हत्यार चालिवनार!

**मगरचंद :** (चिडून) नि गोळी खाणार!

**धोंडीबा :** ती तर आमच्या पाचवीलाच पुजलीया! नामदारसाब, संपाचं नाव ऐकून जर एवढं डोक्सं फिरतंय तुमचं, तर संप झाल्यावर हाय त्या जाग्यावर -हानार का पळून जानार?

**मगरचंद :** हे पाहा, तू संपाचं नावसुद्धा काढू नको! बेकायदेशीर!

**धोंडीबा :** राग मानू नका, पर तुमचं हे राजकारण मला कोल्हुबाचं राजकारण दिसतंया!

**मगरचंद :** म्हणजे कसं काय?

**धोंडीबा :** माझी आजी मला याक गोष्ट सांगायची. ती सांगू का तुमाला?

**मगरचंद :** कसली गोष्ट?

**धोंडीबा :** तहान लागली एका कोल्ह्याला । पाणी पिया गेला ।
नदीच्या मोठ्या डोहात । भर दोपारच्या अंमलात ।।१।।
कोल्ह्याचा तोल तवा गेला । पाय निसटला ।
खाली तो पडला पाण्यात आला मग मरायच्या बेतात ।।२।।
कोण नव्हतं आजूबाजूला । वाचवाया त्याला ।
ऐन त्या उनाच्या रखात । किंचाळाया केली सुरवात ।।३।।
दया आली एका सुसरीला । गेली मदतीला ।
घेऊनी पाठीवरी शांत । कडेला नेला निर्धास्त ।।४।।

त्या सुसरीची पाठ लागली रुताय! पर करनार काय? रुततंय म्हनावं तर सुसर अंग काढून घेनार नि आपन मरनार. मग त्या कोल्ह्यानं केली सुरवात म्हनाय, 'सुसरीबाई तुजी पाठ मऊ', 'सुसरीबाई तुजी पाठ मऊ.' जवा कडंला आला, चटकन उडी मारली नि बिथारला तिच्यावर!

**मगरचंद :** मग काय म्हणाला?

**धोंडीबा :** दुसरं काय म्हननार? तुमच्यावानीच की, 'कशाला मला पाठीवर घेतलं, रुतलं नव्हं का!' तुमी कसं म्हनता, 'मतं दिली म्हंजे काय उपकार केला आम्हावर?'

**मगरचंद :** (रागाने) अरे गाढवा, मला कोल्हा म्हणतोस?

(धोंडी पळून जातो.)

## दृश्य तिसरे

(कामगार भागातील धोंडी, काशीनाथ वगैरे कामगारांची चाळ.
काशीनाथ विडी पीत बसला आहे. धोंडी येतो.)

**काशीनाथ :** आमी मागण्या लवकर मिळाव्या म्हनतू, पर या मालकाला घाम ईल असं वाटंना. काय करावं बरं?

**धोंडीबा :** सांगू का? त्या सातारच्या लोकांनी काळ्याबाजारवाल्याला नि सावकाराला वठणीवर आणाय काय केलं? हाय काय ठावं?

**काशीनाथ :** पायात पत्र्या मारल्या म्हनत्यात!

**धोंडीबा :** मग या मालकास्नी वठणीवर आनाय काय कराय हवं? बोल, तुझं काय म्हननं हाय?

**काशीनाथ :** गड्या, पत्र्याबित्र्याचं मला न्हाय पटत. पर आनि एक इचारू का?

**धोंडीबा :** इचार की. असा बाळुत्यात शिरू नकं!

**काशीनाथ :** आपण मालकाच्या दारात उपास केला तर कसं होईल?

**धोंडीबा :** (चेष्टेने) हो ऽऽ हो ऽ ... उपास नाही तर रोजा करूया!

**काशीनाथ :** बग, तू लागलाच चेष्टा करायला.

**धोंडीबा :** अरं, तू मानूस हाईस का कोन? उपास केलास नि मेलास म्हनून काय सुतक येनार व्हय मालकाला? अरं, ही मालकांची जात लई चिकाट-भोकरावानी! कामगारानं संपाचा नालपीर अंगात आनून हैदोस घातल्याबगार तेंच्या अंगातलं भूत जानार न्हाई!

**काशीनाथ :** संप? पर हे आपलं सरकार काय करील? (सत्तू येतो.)

**धोंडीबा :** ऐकलंस का सत्तू? ह्यो काशीनाथ म्हनतुया संप केला तर आपलं सरकार काय म्हनंल!

**सत्तू :** तुझं सरकार! हेलाच म्हनत्यात 'पाटलाचं घोडं नि म्हाराला भूषण.' ते आनि काय करणार? काळा कायदा हाईच. फार तर लवाद नेमील - न्हाईतर हाईच ... गोळीबार!

**धोंडीबा :** ह्यो आनि म्हनतुया की 'मालकाच्या दारात उपास करू या!'

**सत्तू :** हे बग काशीनाथ, तू नव्हं नंदा जरी उपास करून मालकाच्या दारात म्येला तरी मालक न्हाइ वळणार!

**काशीनाथ :** पर सत्तूदा, हे लवाद, लवाद कसलं असतं हे?

**सत्तू :** सांगतो ऐक —

उदार होऊन नेमी सरकार । लवादाचा ऐका परकार ।।धृ।।
मालकाच्या मतानं आणि सरकारच्या सुतानं निवड होते लवादाची ।
लवाद म्हणजे माणूस पर जात निराळी असते त्याची ।
मोठा पगार, मोठा दर्जा, मोठ्या इभ्रतिची ।
सात पिढीला त्याच्या, ओळख नसते गिरणीच्या कामाची ।
बापजाद्याला माहिती नसते बाबिन, रोहिनीची
कशी लागते तार, कसा फिरतो रोळ, कशी झडप मारायची ।
त्रासनाचा त्रास, बाजू डबल चाविची ।
लवादाला दखल नसती ती कशी चालवायची ।
कळली म्हणून ऐट आणून दुःखं कामगारांची ।
बेशरम निवड होते न्याय द्याया त्याची ।
आणून नव्या पुराव्याला । साथ देतो धनिकाला ।।
पकडीत धराया कामगार । उदार ।।१।।
लवाद म्हणजे उंट, दिसण्यात उंच दिसायचा ।
वर्षाला एक पाऊल या हिशोबानं चालायचा ।
तोलून बोल मालकाच्या बाजूनं बोलायचा ।
पोट मोठं, मान लांब, पाला शेंड्याचा खायाचा ।
हाकलून मालक नेईल तिकडं तडक जायाचा ।
कोर्टाच्या आवारात खेळ होतो सर्कशीचा ।
न्याय म्हणजे ओठ त्याचा लोंबत ऱ्हायाचा ।
त्यात पराजय हुकमी कामगारवर्गाचा ।
हा न्याय नव्हे अन्याय, अपमान कामगारवर्गाचा ।
म्हणून त्याला एकच जबाब सार्वत्रिक संपाचा ।
आता माघार नाही । चला करून चढाई ।।
चोहिकडून करा भडिमार । लवादाचा ऐका परकार ।।२।।

**धोंडीबा :** ऐकलंस काशीनाथ? ह्यो असा असतो बग लवाद!

**काशीनाथ :** मग आमी आता करावं तरी काय?

**धोंडीबा :** मालक आता काय असा तसा वठणीवर ईत न्हाई एवढं मला ठावं हाय बग!

**सत्तू :** म्हणजे काय रं धोंडी?

**धोंडीबा :** म्हंजी, मालक जरा इचार करतुया.

**सत्तू :** कसला रं?

**धोंडीबा :** तुमच्या मागण्याचा कागोद आल्याबरोबर वाचला. पर संपाचं नाव वाचून शेटजी माकडावानी किंचाळला नि दोन हजार शिवी घातली तुला पुढारी म्हनून.
**काशीनाथ :** काय म्हनला मागण्याबद्दल?
**धोंडीबा :** लगीच हातभर कागोद खराडला नि धाडलं मला मगरचंद गुजराकडं.
**सत्तू :** बरं, मग तितं काय झालं?
**धोंडीबा :** संपाचं नाव वाचून नामदारसाब 'बेकायदेशीर' म्हनून परसभर वर उडून खाली पडला नि लागला बडबड कराय 'चिरडून टाकीन', यंव करीन नि त्यंव करीन!
**सत्तू :** मग बोल आता काशीनाथ, काय कराय पाहिजे मागण्या मिळवायसाठी?
**काशीनाथ :** संप!
**धोंडीबा :** काय उपास? अरे,

मकडीला लकडी नि रेड्याला वेसण ।
संपाविण मालक वठेल का? ॥

**सत्तू :** धोंडी, काशीनाथ, लागा तयारीला संपाच्या. बगूच या कसा चिरडत्यात संप ते!

(सर्व जातात. पडद्यामागून कामगारांच्या घोषणा.)

मग सिद्ध झाला कामगार । संप चौफेर केला जाहीर ॥
दणाणुन सोडले सारे शहर । सर्व बाजार बंद कारभार ॥
खवळून उठले मग सरकार । पिसाळला मगरचंद गुजर ।
काढला हुकूम त्यानं सत्वर । बोलावले गावामध्ये लष्कर ।
खडा केला शिपाई नाक्यावर । बंदूक हाती भरोनी बार ।
मगरचंदाची आज्ञा पाळणार ॥ रोखिला मोर्चा कामगारांचा ।
हल्ला निकराचा । केला लाठिमार ॥

## दृश्य चौथे

(रघुनाथमल शेटचा बंगला. धोंडी डोक्याला पट्टी बांधून येतो. शेट जरा घुश्श्यात असतो.)

**धोंडीबा :** बघितलं मालक, नाही ऐकलं तेनी. घातलाच गोंधळ आखिरीला. जिकडं तिकडं समदी बोंबाबोंब!
**रघुनाथमल :** पण तुला यायला एवढा उशीर का? नि हे डोक्याला का बांधलंयस?
**धोंडीबा :** तसं काय न्हाई, लागलंय जरा.
**रघुनाथमल :** अरे, पण काय लागलं?
**धोंडीबा :** कुत्रं चावलं!

**रघुनाथमल :** ऑं, काय म्हणतो? डोक्याला कुत्रं चावलं?
**धोंडीबा :** हां, हां, डोक्याला चावनारीबी कुत्री लई हाइती.
**रघुनाथमल :** अशी कुत्री कुठं असतात का जगात?
**धोंडीबा :** काल कौन्सिल हॉलाम्होरं हुती! आज कुठं हाइती ठावं न्हाई.
**रघुनाथमल :** (लक्षात येऊन) बरं, बरं, तुला उशीर का झाला गद्ध्या?
**धोंडीबा :** गाडी न्हाई मिळाली मालक.
**रघुनाथमल :** गाडी नाही मिळाली? ते का?
**धोंडीबा :** अवं मालक, संप झालाय!
**रघुनाथमल :** अरे बाप रे, काय म्हणतोस? गाडीचाही संप? बरं, पत्रं-बित्रं काय असतील ती आण पाहू इकडं.
**धोंडीबा :** (आत जाऊन येतो) आज पित्रं बि न्हाइ नि बित्रं बी न्हाई!
**रघुनाथमल :** काहीच नाही! म्हणजे?
**धोंडीबा :** संप!
**रघुनाथमल :** पोस्टाचाही संप!
**धोंडीबा :** त्यो पोस्टमन झाला तरी कामगारच हाय की!
**रघुनाथमल :** बरं असू दे. ती गंगा आली का बघ, आणि त्या सद्याला विचार फोनबीन कुणाचा आला होता का?
**धोंडीबा :** (जाऊन येतो) सकाळच्यान वाचा बसल्यावानी थंडगार बसलाय त्यो फोन. हूं का चूं करीत न्हाई!
**रघुनाथमल :** मग कुठं बिघडलाय का चौकशी कर बघू.
**धोंडीबा :** इकडं न्हाई बिघडला.
**रघुनाथमल :** मग कुठं कंपनीत बिघडला?
**धोंडीबा :** कंपनीतला कामगार बिघडला असेल! संप!
**रघुनाथमल :** अरे, बाप रे! जिकडं तिकडं संप! म्हणजे काय हे! बरं, त्या गंगाला म्हणावं चहा आण जरा गरम गरम.
**धोंडीबा :** गंगाबी संपावर! पाहिजे तर मी करतो च्या, पर बिनदुधाचा बरं का!
**रघुनाथमल :** बिनदुधाचा! का?
**धोंडीबा :** संप! - भय्याला याला गाडी नकं का?
**रघुनाथमल :** बरं, मी हॉटेलात घेतो चहा. मोटार तयार आहे का पाहा. मला जरा नामदार मगरचंदाकडं जायचं आहे.
**धोंडीबा :** (जाऊन येतो) मालक, मोटार तयार हाय, पर डायवर न्हाई आला! त्योबी संपावर गेला वाटतं.

**रघुनाथमल :** हरे राम, हे जय गोपाल, आज काय झालं हे? धोंडी, मी आपला विचारतो आहे आणि तू संप, संप म्हणून उत्तरं देतो आहेस! काय आहे काय हे?
**धोंडीबा :** मग मी तरी काय करनार? झालंया ते सांगतो! काय खोटं हाय?
**रघुनाथमल :** मला गेलंच पाहिजे मगरचंदला भेटायला! संप, संप, संप! आमच्या मिलमध्ये संप आणि घरात पण संप - काय भूत आहे का सैतान आहे!
**धोंडीबा :** कुणाला ठावं, संप म्हनत्यात खरं! हितंच हाय नि दिसत तर कुठंच न्हाय!
**रघुनाथमल :** मग आम्ही काय करावं? आमची काय अक्कल चालत नाही.
**धोंडीबा :** आता काय करायचं, काम बंद तर चूल बंद नि चूल बंद तर अक्कल बंद! आता असं करा मालक, आना आपलं लस्कर नि लावा कामाला. झाडून काढील, कपडं धुईल, चहात मीठ नि सांबाऱ्यात साखर घालील!
**रघुनाथमल :** (रागानं) बरं, बरं, तू नको जास्त बोलू. मी पायानंच जातो मगरचंदकडे. आमचे पाय तर नाही ना कुठं गेले?
**धोंडीबा :** बेतानं जावा, न्हाइतर पायबी संप करतील!
**रघुनाथमल :** गद्ध्या, मला चिडवतो? हं, तू संभाळ जरा इकडं. मी जाऊन येतो.
**धोंडीबा :** अन् मीबी तिकडंच येनार हाय!
**रघुनाथमल :** कुठं येणार? काय म्हणतोस?
**धोंडीबा :** आता हात संप करनार नि मोर्चा येनार कौन्सिल हॉलवर तुमच्या मागोमाग! नामदारसायबाला भेटाय! बरं, रामराम. (जातात.)

## दृश्य पाचवे

(कौन्सिल हॉलमधील नामदार मगरचंद गुजर यांची खोली.
रघुनाथमल घाईने येतो.)

**रघुनाथमल :** मगरचंदजी, मी चित मेलो. माझी मिल बंद, माझी चूल बंद, माझं घर बंद, मोटार बंद! संप, संप, संप!
**मगरचंद :** रघुनाथमल, शांत व्हा, शांत व्हा! अहो, तुम्ही तसे आम्ही आणि भट तसे स्वामी!
**रघुनाथमल :** पण हे काय? संपाशिवाय बात नाही! माझ्या रामानं देखील संप करावा म्हणजे काय?
**मगरचंद :** हे पाहा, संप करून ओरडू नका. बेकायदेशीर! ...मी तरी काय करणार?
**रघुनाथमल :** मग तुमचं लष्कर काय करतं आहे?
**मगरचंद :** (रागाने) माश्या मारतं आहे! तुमचं म्हणणं काय? आणून लावू तुमच्या घरी कामाला?

**रघुनाथमल :** अहो, तसं नव्हे –
**मगरचंद :** रघुनाथमल, जरा धीरानं घ्या. मी संपाच्या पुढाऱ्यांना आताच भेटीला बोलावलंय. पाहू काय मार्ग निघतो तो.
**रघुनाथमल :** ही पीडाच झाली आहे. संप म्हणजे एखादा रोग असता तर औषध दिलं असतं, भूतबाधा असती तर मंत्रतंत्र केला असता, पण या संपावर काही इलाजच सुचेना!
**सत्तू :** (आत येऊन) हेच्यावर एकच इलाज. कामगारांच्या मागण्या देऊन टाकणं! अगदी रामबाण! रामराम नामदारसाब.
**मगरचंद :** नमस्ते. कसं काय सत्तू, बरं आहे ना?
**रघुनाथमल :** अरे, हा तर भला माणूस दिसतो! मग संप कां करतो?
**मगरचंद :** बेकायदेशीर बोलू नका.
**सत्तू :** (धोंडी व इतर कामगारांना आत बोलावतो. ते येतात.) धोंडी, हे बघितलंस का कायदेमंडळ?
**धोंडीबा :** समदी मेंबरं हितंच असत्यात का?
**सत्तू :** हां हितच. आणि टकुरी फोडायचं कायदंबी हितनंच निघत्यात बरं का!
**धोंडीबा :** हे कायदं करताना लई धुडगूस होत असंल हितं?
**मगरचंद :** अरे, बारा बैलांचं औत चालवायचं म्हणजे बैलांना हाकावं लागतंच. तसंच हे आहे!
**धोंडीबा :** म्हंजी ह्यो बैलहाक्यांचा अड्डा हाय म्हनिनासा!
**मगरचंद :** तुमचे भाई डांगे पण इथंच असतात.
**सत्तू :** अवो, डांगे हतं पाहिजेतच!
**रघुनाथमल :** कशाला बाबा, संप करायला?
**धोंडीबा :** तसं न्हवं. हितं मेंबरं बैलास्नी हाकत्यात का बैल मेंबरांस्नी हाकत्यात ते बगायला!
**मगरचंद :** (राग गिळून) बरं बोला, तुमचं म्हणणं काय आहे?
**सत्तू :** तुमी काँग्रेसच्या नावावर मतं घेऊन निवडून आला, आणि आता कामगारांवर दडपशाही सुरू केलीसा. हेचं नाव काय? काल माधवजीच्या कामगारांवर पोलिसांनी तुमच्या डोळ्यादेखत लाठी चालिवली, ह्याला जबाबदार कोन?
**मगरचंद :** हे पाहा, आम्हाला शांतता आणि सुव्यवस्था राखलीच पाहिजे. ते राज्ययंत्राचे प्राण आहेत!
**सत्तू :** म्हणजे शांतता, शांतता म्हणीत इंग्रज सरकारनं जे केलं तेच तुमीबी करताय. मग तेंच्यात नि तुमच्यात फरक काय? आणि लोकांनी तुम्हाला निवडून दिलं तेचा

फायदा काय?
**मगरचंद :** मग तुम्ही सांगा पाहू गेल्या सहा महिन्यात किती भानगडी केल्यात? उठल्या सुटल्या मागण्या -
**रघुनाथमल :** नाहीतर संप करणार नि आमचं दिवाळं काढणार!
**मगरचंद :** तुम्ही बेकायदेशीर किती संप केलेत बोला?
**रघुनाथमल :** या महिन्यात कमीतकमी साठ संप केले या लोकांनी! म्हणजे सारा जर हिशेब केला तर तीन लाख, पंचावन्न हजार चारशे दिवसांच्या कामाची नुकसानी करून —
**मगरचंद :** गोंधळ घातलात अं, काय हे?
**धोंडीबा :** आता रं सत्तू, हेनी नफ्याचा हिसाब केल्यावानी हिसाब केलाय संपाचा!
**मगरचंद :** एवढा अनर्थ करून आम्हालाच वाईट म्हणता? आमची मिनिस्ट्री येण्यापूर्वी तुमच्या मागण्या नव्हत्या? का नाही झाले संप?
**सत्तू :** अवो, चांगलं सा-सा महिने संप लढिवलं की आम्ही! आम्ही संप केला तवाबी तुमीच व्हता का?
**मगरचंद :** बेचाळीसला का नाही हो केला संप? अं?
**सत्तू :** म्हंजे बेचाळीसचं बंड म्हणता ते कुनी केलं?
**मगरचंद :** आम्ही केलं!
**धोंडीबा :** तवा तुम्ही कुठं हुता?
**मगरचंद :** तुरुंगात!
**धोंडीबा :** तुरंगात! ही काय भानगड? तुरंगात बी तुमी नि बंड बी तुमीच केलं?
**मगरचंद :** अरे तो लढा जनतेचा होता. बरं, ते राहू दे. तुमचं म्हणणं काय आहे ते तरी ऐकू द्या.
**सत्तू :** आमचं म्हननं सांगू?

मतं घेताना । दिलेल्या वचना । जागाल का तुम्ही सांगा आता? ।

**मगरचंद :** आमचं ऐकावं । दमानं घ्यावं । उगीच गडबड का करता? ॥१
वचनं दिली म्हणून काय झालं? थोडा धीर आहे की नाही?
**सत्तू :** तुमी तर म्हणत होता निवडून आल्याबरोबर चढाईचं बंड करणार नि सोराज मिळवून कामगार शेतकऱ्याला सुखी करणार.

बंडाची बोली । आता कुठं गेली । धीराची भाषा का करता? ॥

**मगरचंद :** इंग्रज सरकार । गुळानं मरणार । विष घालावं का म्हणता? ॥२
आता इंग्रज सरकार सत्तात्याग करून विलायतेला चाललंय. आता त्यांच्याविरुद्ध बंड करायचं म्हणजे विलयतेलाच जाऊन करावं लागेल!

**सत्तू :** देशातनं गोरं लस्कर कवा जानार ते सांगितलं नाही, खलाशांच्या बंडाच्या वेळी शेकडो लोकांचं मुडदं पाडलं, देसभर उठल्याली संपाची लाट लस्कराच्या जोरावर चिरडायची चाललीया, पोलिसाला नव्या बंदुका वाटायच्या चालल्यात - कसा काय सत्तात्याग म्हनायचा ह्यो?

**मगरचंद :** काही असलं तरी आता काळ बदलला आहे. इंग्रजांचा हृदयपालट झालाय! जरा धीरानं घ्या!

**धोंडीबा :** तुमी निवडून गेल्याबरोबर इंग्रजांचा रिदयपालट झाला तसा ह्या मालकांचा का व्हत न्हाई नि आमच्या मागण्या का मिळत न्हाईत?

**मगरचंद :** मालकांचा हृदयपालट होत नाही त्याला आम्ही काय करणार?

**सत्तू :** तुमी एवढंच करा, तुमचं १४४ कलम नि पोलीस काढून घ्या; म्हंजी आमी मालकाच्या घरादाराचा रंग पालटतो. मागं ज्ञानदेवानं रेड्याला येद म्हनाय लावलं म्हनन्यात. तसं आमी गिरनीच्या भोंग्याला येद म्हनाय लावतो बगा!

**मगरचंद :** म्हणजे? पोलीस नि १४४ कलम काढून घेऊन तुम्हाला धिंगाणा घालायला रान मोकळं करावं काय? बेकायदेशीर!

**धोंडीबा :** तुमाला कायद्याचा एवढा पुळका हाय तर मग तुमचं १४४ कलम मालकाला लावा की! रोखा पोलिसांची बंदूक त्येंच्यावर नि सांगा मागण्या द्याला आमच्या!

**मगरचंद :** बेकायदेशीर! तू मध्ये बोलू नको. तर काय सांगत होतो सत्तू? हो, जरा धीरानं घ्या. सर्व काही सुरळीत होईल!

**सत्तू :** ही असली पळवाट सांगू नका आता। लढ्याला का भिता?
नि धीराची भाषा का करता? ।।

**धोंडीबा :** मी सांगू?

जनतेला झुलवाय । आणि मतं मिळवाय ।
ताकापुरती ती होती कथा ।।३

**सत्तू :** तुमी सडकून बोलला । लढाईला निघाला ।
आता तडजोडीमध्ये का शिरता? ।।

**मगरचंद :** अरे व्याव्हल भ्याले । त्यांनी सर्वच दिले ।
घटनासमिती आली हाता ।।४

या घटना समितीतूनच स्वराज्याचा —

**सत्तू :** भोपळा दिला नव्हं का?

**धोंडीबा :** त्यात बियाबी हाइती का मोकळाच कुनाला ठावं!

**मगरचंद :** त्यात स्वराज्य आहे, पण साधारण लोकांना ते दिसणार नाही!

**रघुनाथमल :** हो, हो. मगरचंदजी कधीच खोटं बोलत नाहीत.
**धोंडीबा :** हा, रेवडीवाल्याला गंडेरीवाला साक्षीदार!
**रघुनाथमल :** हे काय बोलतोस धोंडी? आँ!
**धोंडीबा :** खरं हाय तेच बोलतोया मी!
**मगरचंद :** सत्तू, अहो हे राजकारण तुमाला कळण्याजोगं नाही!
**सत्तू :** बरं, आमचंच इचारतो. सातारच्या शेतकऱ्यांचा 'ऑगस्ट क्रांतिवीर' म्हणून तुमी उदोउदो केला. मतं मिळिवली तेंच्या नावावर नि आता काय केलंसा!

शेतकऱ्यांची । हत्यारं त्यांची । जप्त केली हा न्याय कोणता? ॥

**मगरचंद :** झालं ते झालं । होऊन गेलं ।
काळा कोळसा का उगाळता? ॥५

**रघुनाथमल :** धोंडी, कोण रे हे शेतकरी सातारचे?
**धोंडीबा :** 'पत्री सरकार' म्हणत्यात त्यास्नी. सावकार नि काळाबाजारवालं भांडवलदार यास्नी पत्र्या मारल्या त्यांनी!
**रघुनाथमल :** अरे बाप रे! काय म्हणतोस?
**धोंडीबा :** खरं आहे तेच सांगतोय मी!
**सत्तू :** चलो दिल्लीला । घोष केलेला । आता कसा तो विसरता? ।
**मगरचंद :** ताब्यात दिल्ली । आमुच्याच आली । तिकडे जाण्याची नको चिंता ॥६
आता घटना समितीमधून स्वराज्य मिळणार, तेव्हा दिल्लीला जायचं काम काय?
**सत्तू :** कोण, कोण असणार या घटनासभेत? कसं कसं सोराज्य मिळणार?
**मगरचंद :** सर्व पक्षांचे लोक - हिंदू, मुसलमान, राजेरजवाडे - साऱ्यांचे प्रतिनिधी जमून स्वातंत्र्याची घटना बनविणार!
**सत्तू :** त्यात राजेबी असणार? नि ते तुमचं 'शेतकरी-कामकरी-प्रजाराज्य' आननार म्हनिनासा?

वैऱ्यांचे इमानी । महाराजे संस्थानी । यांना हाताशी का धरता? ॥

**मगरचंद :** ते वंश पूर्विचे । वैभव देशाचे । त्याविण शोभा नाही भारता ॥७
**सत्तू :** आणि आमचं कामगार-शेतकऱ्यांचं कोण असणार या घटनासभेत?
**मगरचंद :** आम्हीच! दुसरं कोण?
**सत्तू :** तुमीच!
तुम्ही शेतकरी-कामकरी । जनतेचे कैवारी ।
संपाला विरोध का करता? ।
**मगरचंद :** पाण्यात राहुनी । माशाशी दुष्मनी ।
पदरी बांधुनी का घेता? ॥८

अरे, तुम्ही संप करून तुमच्या पालकाचे; म्हणजे पर्यायाने स्वत:चेच नुकसान करता. शिवाय सर्वांनाच न्याय मिळावा अशी आम्हाला तळमळ आहे!

**धोंडीबा :** मागण्यांसाठी कामगारांनी संप केला म्हंजी मळमळ का लागली?

**मगरचंद :** तुम्ही संप करून गोंधळ घालता - हिंसा करता!

**सत्तू :** तुम्ही अहिंसावादी । सत्याचे दर्दी ।
लोकांची टाळकी का फोडता? ॥

**मगरचंद :** स्वराज्य राखाय । जबरीनं जोपाय ।
लोकशाही आणि शांतता ॥९

आम्हाला सुव्यवस्था आणि कायदा पाहिजे!

**सत्तू :** न्याय सगळ्यालाच पाहिजे पर -
मालकाला वाचवाय । नफ्याला पचवाय ।
काळ कायदा का पुढं करता? ॥

**धोंडीबा :** मी सांगू?
धन्याला कण्या । चोराला मलिदा । चोरून चारायाकरता ॥१०

**मगरचंद :** (रागाने) खोटं आहे हे. आम्ही भांडवलशाहीचे कट्टे दुष्मन आहोत!

**रघुनाथमल :** हेऽहे काय मगरचंदजी! आपला केव्हा तरी झगडा झाला आहे का?

**मगरचंद :** बेकायदेशीर! तुम्ही बोलू नका मधे. हे पाहा सत्तू, आम्ही लवाद नेमला आहे. याचा निकाल लागेल तेव्हा पाहू तुमच्या मागण्यांबाबत. तुम्ही जा आता.

**धोंडीबा :** आमच्या मागण्या आताच मिळाय पाहिजेत.

**मगरचंद :** ते काही नाही. एकही मागणी मिळणार नाही!

**रघुनाथमल :** हो, हो. नाहीच मिळणार!

(बाहेर कामगारांच्या घोषणा ऐकू येतात.)

**मगरचंद :** हे काय, कोण लोक आहेत हे?

**सत्तू :** कामगारांचा मोर्चा आलाय. आज १० हजारच हाइत. उद्या एक लाख. परवा समदं पाच लाख येतील! बोला, काय करता मागण्यांचं?

**रघुनाथमल :** (घाबरून) नामदारसाहेब, कबूल करा, कबूल करा!

(इतर काही कामगार आत येतात.)

**मगरचंद :** जरा शांत रहा. साऱ्या मागण्या मान्य आहेत आम्हाला.

(रघुनाथमल व मगरचंद जातात.)

**सर्व कामगार :** कामगारांच्या एकजुटीचा विजय असो!



# माझी मुंबई
# अर्थात
# मुंबई कोणाची?

महाराष्ट्राच्या शिरी मुकुट जो मानाचा चढला ।
मानवतेने मुंबापुरी एक हिरा त्यात जडला ॥
अमोल मणि हा कोण धन्याचा द्यावा कोणाला ।
मुंबापुरी कोणाची चहुकडे वाद सुरू झाला ॥
महाराष्ट्रामध्ये वारस सारे सभेमाजि बसला ।
'माझी मुंबई' शांत ऐकावी विनंति सकलाला ॥

## दृश्य पहिले

(मुंबईतील एक कामगार वस्ती. बाळकू आणि गणू चाळीच्या अंगणात पान खात गप्पा मारत आहेत. अंतू प्रवेश करतो.)

**बाळकू :** या अंतोजीराव! आम्ही तुमचीच वाट बघतोय.

**अंतू :** का? का रं? काय काम लागलंय माझं?

**गणू :** अरं बाबा, कामबीम काही न्हाई. एक लावणी म्हन मंजी झालं!

**अंतू :** ए, लावणी बिवणी मला येत न्हाई बरं का!

**बाळकू :** बरं, मग पवाडा म्हण.

**अंतू :** हं. चांगलं हाय! काय तरी पन म्हन! कोंबडी न्हाई तरी अंडं तरी पर देच! मी हितं पवाडा म्हणाया आलो न्हाई. ताबडतोब शिवाजी पार्काला जायचं हाय सभेला! इष्णू कुठं गेलाय?

**बाळकू :** त्या इष्णूचं वाईच निराळंच झालंया!

**अंतू :** निराळं? त्ये रं काय?

**बाळकू :** अरं बाबा - बेकारी! इष्णूच्या म्होरं काम पळतंय सशावानी अन् त्येच्या मागं इष्णू पळतोय शिकारी कुत्र्यावानी!

**अंतू :** ए, तुझं लेक्चार वाईच नीट सांग की म्हराटीत!

**बाळकू :** अरे, म्हंजी त्याला एक तर काम मिळंना - आणि मिळालंच तर आठ दिसांच्या आत फाटकाच्या भाईर! गेला असंल त्या पांडूकडं कामाचं इचाराया!

**गणू :** हो. एवढ्यातच येईल, 'ह्यांव ह्यांव चिंध्या नेल्या गोंद्या धाव' करीत! तो येईपत्तर तू म्हन पवाडा, कर सुरू.

**बाळकू :** हं. घे ह्यो डफ, नि कर सुरू तू - अरं, नित्य मरं त्याला कोन रडं! ऱ्हाऊ दे इष्णूचं. तू म्हण पवाडा.

**अंतू :** ह्ये बरं हाय गड्या, बळंच बोहल्यावर बसवायचं! अरं मर्दा, माझा गळा चालत ऱ्हाय रं.

**बाळकू :** म्हन की! पाहिजे तर जाता जाता चाय पिऊन जा.

**अंतू :** ह्ये आनि वर! आँ! माझ्या नावावर जगा अन् बारा गाव भीक मागा - मीच पदरचा चाय पिऊन जाय व्हय?

**पोवाडा**

काळ्या बाजाराचा रोग आला । मागं लागला । गोरगरिबाला ।
सुखाचा घास मिळंना झाला । काळ हा अति बिकट आला ।
करावं काय आता बोला ॥ धृ. ॥
साऱ्याच वस्तू महागल्या । भुयारात गेल्या । मिळंनाशा झाल्या ।
वरती बैसले चोर नफेबाज । करिती ते आज आपुले काज ।
म्हणती देशात आपुले राज ॥
सारा माल ठेवती दडवून । विकती चोरून । दामदुपटीनं ।
नियंत्रण कायदा दिला उडवून । काढिती लोकांनाच बडवून ।
गरिबाला वख्त हा आणिबाणिचा आला ॥
कपडा गेला सासुरवाडीला । तेलानं पळ काढिला ।
कुठं बसल्या साखऱ्या ठावं नाही मला ॥
पळापळी चारी बाजुला । सरकारी नियंत्रण कायदा आला टेकीला ॥
कुठं दडले साठेबाज काही कळेना त्याला ॥
त्यो थापा देऊ लागला । त्यानं थंड हवा खाण्याचा बेत मग केला ॥
आणि तडक सुटला त्यो चौपाटीला गेला ॥
बोलवून भेळवाल्याला । तुंबलेला राग त्या भेळीवर काढिला ॥
नाही वाली राहिला आम्हा गोरगरिबाला ॥
नाही सीमा राहिली आज आमच्या दुःखाला ॥
काम करून रात्रंदिन । जबरीनं कंठिता जिणं ॥
का बसला पाय गाळून । मुडद्याची कळा घेऊन ॥

या उंदरांना खेचून । काढू या बिळकातून ॥
आम्ही महाराष्ट्राचे धनी नाव मऱ्हाटा ।
आम्ही दरीकपारीत चालविलाया पट्टा ।
हातावरला अजोनी नाही जिरला घट्टा ।
परि समय आला हा खोटा । डोकीला नाही पागोटा ।
जोंधळा नाही गहु, खातो रबरी आटा ॥
गिरणीत लावितो तार चालवितो धोटा ।
बंदरात हमाली करतो लावुनी काटा ।
रस्त्याला झोपतो कुठं टाकाव्या खाटा ।
नफेबाज करति बघा थट्टा । निट चल म्हणती ए बेटा ।
घडी घडी नडवुनी पुरा पाडिती पिट्टा ॥
प्याला दुध जित्या आईचं । काळ्या खडकाचं । पाणी हाय तुमचं ।
नफेबाजांना दावा समयास । काळा बाजार न्यावा विलयास ।
वाटेगावकर विनवी सकलास ॥

**बाळकू :** बाकी ह्या म्हमईत म्हराठ्याचं असं झालंय खरं गड्या! या महागाईनं अन् काळ्या बाजारानं तर पिडलंय.
**गणू :** अरं, समद्याच कामगारांचं तसं झालंय. (विष्णू प्रवेश करतो.)
**विष्णू :** ये म्हराठा, म्हराठा, म्हराठा! कशाचा रं म्हराठा? अन्न खाया न्हाई त्येची काय वाट?
**गणू :** काय अंतू - सांगितलं न्हाय का तुला? 'ह्यॉंव ह्यॉंव चिंद्या नेल्या गोंद्या धाव.'
**अंतू :** काय इष्णू, कसं काय चाललंय? अरं, आम्ही तुझीच वाट बघतोय मघापासनं.
**विष्णू :** माझी वाट बघताय की मी मरायची? मी खरं सांगू का? मला काम तरी लावा, न्हाईतर एखाद्या तुरुंगात तरी घाला.
**अंतू :** हॉं! हॉं! ते काय जमायचं न्हाई गड्या! जरा कळ काढ. तुरुंगात तरी जागा कुठाय? 'पब्लिक सेफ्टी' कायदा हाय न्हवं का? जी तुरुंगात गेल्यात त्यास्नीच येऊद्यात, मंग तू जा.
**विष्णू :** म्हंजी तुरुंगात जा, पर काम न्हाई, असंच नव्हं काय?
**अंतू :** तसं नव्हं रं -
**विष्णू :** मग कसं रं? मी आता पिसाळन् —
**बाळकू :** अरं पर का?
**विष्णू :** का? अरं, ह्यो रोज उठायचं नि दरवाश्याच्या अस्वलावानी दारोदार हिंडायचं - माझ्यानं झेपंना! काम काम करतोय, पर काम लागेना! अरं, कुठवर बेकार फिरू?

**बाळकू :** अरं, मग नगं फिरू. तुल कोन फिर म्हनत्योय? घरात बस आनि मिळंल तसं खा. लागंल तवा लागंल काम!
**विष्णू :** खाण्यापिण्याचं न्हाई गा! पर असं ह्ये नाळगुंद झाल्यावानी बसू तरी किती?
**बाळकू :** बघ बरं अंतू! फिरायचं बी न्हाई नि बसायचं बी न्हाई ह्येचं नाव काय?
**विष्णू :** ह्येचं नाव 'लवकर काम लावा.'
**अंतू :** बरं, पन पांडू काय म्हनला?
**विष्णू :** त्यो तुझा गडी न्हाई शुद्धीत, तराकलाय पार!
**गणू :** का रं? काय झालं?
**विष्णू :** अरं, कामाचं काय तरी सांगील म्हनून मी आपला हरकून गेलो. आनि जाऊन बघतोय तर त्यो खाटंला काटा अडकवून बसलाय कळवंड करीत!
**अंतू :** कळवंड! अरं पन कुनाबरोबर?
**विष्णू :** घुशीबरोबर!
**अंतू :** आँ! घुशीबरोबर? म्हंजी रं?
**विष्णू :** सकाळी पांडू बसला व्हता च्या पीत. इतक्यात एक घूस जी आली ती फुड्यातलं बटर बिस्कीट घेऊन पळाली नि बसली बिळात जाऊन!
**गणू :** बरं मग?
**विष्णू :** मग काय! पांडूनं घेतली काठी - अन् घातली बिळात अन् लागला ढोसाय. मी दारात हुभा राहून बघतोय आपला!
**बाळकू :** बरं, म्होरं काय झालं?
**विष्णू :** पांडू जोरजोरानं ढोसतोय नि म्हनतोय - नीघ भाईर! नीघ भाईर! तुला दावतो! नि घूस आतनं घुर्र घुर्र करतिया!
**अंतू :** अरं, ती घुरघुरत व्हती की पांडूला आत बोलवीत व्हती?
**विष्णू :** तवर मांजरानं च्याचा कप लवंडलाय - अन् पांडूचा झालाय शिमगा सुरू!
**बाळकू :** म्हंजी या शिमग्यात तुझ्या कामाचं व्हाऊनच गेलं म्हनीनास?
**विष्णू :** मग म्यां दिव्याचं तेल ओतून जाळ करून च्या केला, - पदरचा एक रुपाया हुता त्यो खर्चून बिस्किटं आणली आणि दिली. तवा कुठं जरा आराम पडला पांडूला!
**अंतू :** मग तुझ्या कामाबद्दल काय म्हनाला?
**विष्णू :** त्याच्या मालकानं म्हनं सांगितलंय 'जरूर लागल्यावर कळवीन'. ते ऐकलं अन् कान कापल्यावानी आलो परत!
**अंतू :** मग आता काय करू या तुझं बा?
**विष्णू :** काय बी करा, पन काम लावा!
**बाळकू :** अरं हो, पन एक काम हाय गड्या! पर तुझ्याच्यानं व्हनार का त्ये?

**विष्णू :** का व्हनार न्हाई? का बैलगाडी वडायची हाय का?
**बाळकू :** अरं, तसं न्हवं रं! आमच्या कंपनीच्या म्यॅनेजरच्या हपिसात हाये. तसं काय जड न्हाई!
**विष्णू :** बघितलंस का अंतू? जड बी न्हाई-चांगलं बी हाई, पर माझ्याच्यानं व्हनारं न्हाई!
**बाळकू :** अरं, पन आमचा म्यॅनेजर लई खट्याळ हाई.
**विष्णू :** त्यो कसा काय? त्याला काय शिंगं हाईत?
**बाळकू :** तसं न्हवं! अरं न्हाई त्या भानगडी काढतो त्यो! सारखं आपलं बारा घंटे 'इतिहास' करीत असतो. लइ किरकीर!
**विष्णू :** तू मला काम लावून बाजूला हो. मी त्येची किरकीर बंद करून त्येला चिरचिर कराया लावीन तर नावाचा पाटील!
**अंतू :** म्हंजी रं काय करणार तू?
**विष्णू :** आठ दिसाला माझं काम सुटतंय. त्यातलंच ह्ये याक! लावा तर खरं! होईल त्ये होईल. शेंडी तुटो न्हाईतर पारंबी!
**बाळकू :** बरं तर ठरलं! उद्या सकाळी देवाचं नाव घेऊन तयार हो.
**विष्णू :** त्ये रं आनि कसं?
**अंतू :** मरीआईच्या म्होरं बोकड तयार व्हतं तसं! बरं, चला आता. जमली का समदी?
**गणू :** त्यो सोमा, भय्या, त्ये कुठं आलेत? ह्या आपल्या सभेला त्येस्नीबी न्येलं पाहिजे!
**विष्णू :** अरं कसली सभा? आपली म्हराटी मुलूख येक करन्याची व्हय?
**अंतू :** हो! काही काही लोकांनी लावलंय ममई येगळी कराया पाहिजे म्हनून! आपन समद्या कामगारांनी बराबर आवाज उठविला पाहिजे. ममई म्हंजी आपल्या म्हराटी मुलखाचं काळीज हाय!
**गणू :** अरं म्हंजी कसं?
**अंतू :** अरं म्हंजी, काळीज हाय म्हनून समद्या देहाला रगात मिळतंय! अन् देहात रगात हाय म्हनून काळीज चालू राहतं! तसं म्हराटी मुलखातलं अन्न, पानी, कापूस, आनि आमी कामगार हाय म्हनून म्हमई चालतिया! आनि ही ममई —
**विष्णू :** बराबर हाई! म्हमईला, आमच्या म्हराटी मुलखातनं येगळी काढताच येनार न्हाई. (भय्या व सोमा येतात.) आता ह्यो भय्याच सांगेल. काय भय्या?
**भय्या :** अरे भाई, लेकिन सवाल क्या है ये तो कहो! फिर बतायेंगा!
**अंतू :** म्हंजी आज आमी तुमाला सभेला नेणार हाय - शिवाजी पार्कावर

(सर्व जातात.)

## दृश्य दुसरे

(जय बालाजी केमिकल कंपनीच्या मॅनेजरचे ऑफीस.
मुनीमजी गाणे म्हणत आहेत.)

**मुनीमजी :** इतिहास हाच जगी थोर मानवा मार्ग दावणार || धृ. ||
विशाल जग हे दिसते सगळे | इतिहासाविण सारेच दुबळे |
छेदुनी अंधकार घोर | मानवा मार्ग दावणार ||१||
गतकाळाला आणी परतुनी | नव्या मनुला स्फूर्ती देऊनी |
घडोनी जगा घडविणार || मानवा मार्ग दावणार ||२||

(गाणे संपते. इतक्यात लाडोबा मिसाळ - एक बडे व्यापारी - येतात.)

**लाडोबा :** नमस्ते मुनीमजी.

**मुनिमजी :** नमस्ते, नमस्ते, लाडोबा महाराज! यावं.

**लाडोबा :** आपल्याला गाण्याचीही कला अवगत दिसते. फारच सुंदर! पण मुनीमजी, एक ओळ मी बाहेरून ऐकली. पण तिचा काही अर्थ समजला नाही बुवा!

**मुनीमजी :** अर्थ न कळण्याचं कारण तुमचं इतिहासाचं ज्ञान कच्चं आहे.

**लाडोबा :** म्हणजे कसं काय? जरा नीट समजावून सांगा!

**मुनीमजी :** हे पाहा मिस्टर मिसाळ, जगात निरनिराळे वाद आहेत आणि वादीही आहेत! म्हणजे, हिंसावादी, अहिंसावादी, बंडवादी, क्रांतिवादी, चरखावादी, खादीवादी आणि सर्वांमध्ये मीही एक आहे. आणि तो म्हणजे इतिहासवादी.

**लाडोबा :** कसं पटणार? कारण मी व्यापारवादाखेरीज इतर कोठल्याच वादाचा अभ्यास केला नाही.

**मुनीमजी :** अहो लाडोबा, परंतु आपल्या व्यापारवादाला देखील इतिहास आहे.

**लाडोबा :** म्हणजे कसे?

**मुनीमजी :** अहो, आपल्या व्यापारवादाचाच इतिहास घ्या ना. इंग्रज हिंदुस्थानात आले, ते कसे आले?

**लाडोबा :** कसे? तुम्हीच सांगा?

**मुनीमजी :** अहो महाराज! एका हाती तराजू नि एका हाती तलवार घेऊन आले. फार दूर कशाला? आमचा इतिहास पाहा ना! ज्या जमिनीवर आमचा पाय पडला, तिथं तो पाताळात गेला. पटलं?

**लाडोबा :** नाही बरं!

**मुनीमजी :** नाहीच पटणार! कारण तुम्हाला इतिहास कळत नाही.

**लाडोबा :** अहो, पण पाय पाताळात गेला म्हणजे काय?

**मुनीमजी :** ह्या मुंबईत आम्ही शंभर वर्षांपूर्वी आलो. मूळ भांडवल दोरी लोटा. मग

पुढं व्याज बट्टा, आणि आज ह्या कंपनीचा मोठा भागीदार! तेव्हा ऐतिहासिक काळात इथं रुतलेला आमचा पाय केव्हाच निघणं शक्य नाही. आणि म्हणूनच मी म्हणतो की कोणत्याही वादापेक्षा इतिहासवाद हाच श्रेष्ठ! पटलं का?

**लाडोबा :** नाही बरं! उगाच खोटं कशाला सांगू?

**मुनीमजी :** बरं, आता आपल्या घटना समितीचंच घ्या. आपल्या घटना समितीनं भारताचा ध्वज अशोककालीन नीलचक्रांकित असावा हे कशावरून सांगितलं?

**लाडोबा :** कशावरून?

**मुनीमजी :** अहो, इतिहासावरून! नाही तर काय आपल्या घटनासभेचे मेंबर अशोककालीन आहेत? म्हणूनच मी म्हणतो, साऱ्या वादात इतिहास हाच श्रेष्ठ आहे. पटलं?

**बाळकू :** (प्रवेश करून) रामराम साहेब!

**मुनीमजी :** कोण बाळू का? काय पाहिजे?

**बाळकू :** आपल्या हपिसात एक मानूस कमी हाय. तवा मी एक आनला हाय!

**मुनीमजी :** अच्छा! घेऊन ये पाहू. (बाळकू विष्णूला हाक मारतो.)

**विष्णू :** रामराम शेटजी!

**मुनीमजी :** रामराम! काय तुझं नाव?

**विष्णू :** माझं नाव विष्णू.

**मुनीमजी :** लिहिता वाचता येतं का तुला?

**विष्णू :** हो, येतं आपलं पोटापुरतं!

**मुनीमजी :** पोटापुरतं म्हणजे?

**विष्णू :** म्हंजी वाचायपुरतं हो! मऱ्हाटी!

**मुनीमजी :** असं असं! पण शिकलास किती तू?

**विष्णू :** मराठी पाचवी पास!

**मुनीमजी :** बरं, एखाद्या विषयात प्रावीण्य वगैरे?

**विष्णू :** म्हंजी?

**मुनीमजी :** कोणत्या विषयात चांगले मार्क मिळाले तुला? भूगोल, गणित, इतिहास?

**विष्णू :** अँ... इतिहास!

**मुनीमजी :** असं का? छान! बरं, मग तू आजपासून कामावर रुजू झालास! कारण इतिहासाचा अभ्यास केलेला माणूस मला फार जवळचा वाटतो. माणसानं इतिहासाला धरून स्पष्ट बोलावं. पटलं?

**विष्णू :** हो, पटलं!

**मुनीमजी :** पटणारच! कारण इतिहासाचा अभ्यास! बरं, बाळकू, विष्णूला कंपनीच्या कामाची माहिती दे. दामल्यांना सांगून आजची हजेरी मांड. जा.

(दोघेही रामराम करून जातात.)

**लाडोबा :** हा आपला नवीन नोकर वाटतं?

**मुनीमजी :** हो. आहे की नाही चुणचुणीत? हं! बरं, बोला तुमचं काम.

**लाडोबा :** असं सांगा, तुमच्या कंपनीत एखादं नवीन औषध तयार आहे का?

**मुनीमजी :** अहो लाडोबा, बाहेर नवीन रोग आल्याशिवाय नवीन औषध कसं तयार होणार? रोग तयार की औषध तयार! पटलं?

**लाडोबा :** अहो, मग मी काय करू?

**मुनीमजी :** तुम्हीही एखादा रोगांचा कारखाना खोला!

**लाडोबा :** तसं नाही हो! माझे सर्व स्टोअर्स हल्ली नीट चालत नाहीत, मग मंदीनं म्हणा किंवा...

**मुनीमजी :** अशक्तपणामुळे म्हणा! असंच ना? खरं सांगू? तुमच्या त्या सर्व स्टोअर्सना रोग झालाय. आणि त्यावर आमच्याकडे औषधही तयार आहे.

**लाडोबा :** औषध तयार आहे? मग सांगा पाहू?

**मुनीमजी :** अहो, त्या स्टोअर्सना एक 'बी.एम्.'चं, 'मेड इन वॉर टाइम इंडिया'चं एक इंजेक्शन देऊन टाका. म्हणजे तुमचे स्टोअर्स चालतील, एवढंच नाही तर ते घोड्यासारखे पळत सुटतील.

**लाडोबा :** अहो, पण ते 'बी.एम्.'चं इंजेक्शन काय आणि ते स्टोअर्सना द्यायचं कसं?

**मुनीमजी :** तुमचा इतिहास कच्चा आहे म्हणतो ते एवढ्याचकरता. गेल्या पाच-सहा वर्षांचा इतिहास विसरला वाटतं?

**लाडोबा :** माझ्या नाही ध्यानात आलं?

**मुनीमजी :** अहो, गेल्या पाच-सहा वर्षांच्या काळात अखिल व्यापाऱ्यांनी हे 'बी.एम्.' इंजेक्शन जसं दिलं तसं.

**लाडोबा :** अहो, पण हे 'बी.एम्.' आहे तरी काय?

**मुनीमजी :** अहो, 'बी' म्हणजे 'ब्लॅक' आणि 'एम्' म्हणजे 'मार्केट', पटलं? द्या तुमची ऑर्डर!

**लाडोबा :** (एक कागद देत) ही आमची ऑर्डर. माल उद्याच पाठवा आणि 'बी.एम्.' करता केव्हा येऊ?

**मुनीमजी :** परवा या! बरं, नमस्ते. या.

**लाडोबा :** नमस्ते. (जातो.)

**मुनीमजी :** विष्णू! ए विष्णू! (विष्णू येतो.) हे पहा, आम्ही आता जरा बाहेर जात आहोत.

तू इथंच थांब आणि पाच वाजता घरी जा. (मुनीमजी जातो.)

**(कटाव)**

विष्णू कामावर रुजू जाहला । मुनीमजीकडे राबू लागला ।
परि एक समय अचानक आला । जोडून मुंबई महाराष्ट्राला ।
संयुक्त महाराष्ट्र करण्याला । महाराष्ट्रीय तरुण जागला ।
धनिक उभे झाले विरोधी बाजूला । मुंबईसाठी वाद माजला ।
तुम्ही चित्त ठेवूनी स्थिर । ऐका प्रकार । पुढे घडलेला ॥

## दृश्य तिसरे

**मुनीमजी :** (हातात वृत्तपत्रांचे भेंडोळे आहे. हातवारे करीत रागाने पाय आपटीत प्रवेश करतो.) म्हणे मुंबई महाराष्ट्राची! यांच्या बापानं ठेवलीय!! विष्णू! कुठं गेला हा?

**विष्णू :** जी ऽ आलो न्हवं का शेटजी!

**मुनीमजी :** पंखा सुरू कर अगोदर.

**विष्णू :** पंखा कालच बंगल्यावर नेला न्हवं!

**मुनीमजी :** ठीक. तू हातानंच घाल वारं! जरा जोरानं!

**विष्णू :** काय झालं शेट आज? वाईच गरम पडलंय?

**मुनीमजी :** हो. जरा पाय चेप!

**विष्णू :** (एका हातानं पाय चेपीत दुसऱ्या हातानं वारं घालतो.) पर एकाएकी आज असं कसं बरं झालं?

**मुनीमजी :** जरा डोकं बी दाब. काय हे? म्हणे मुंबई...!

**विष्णू :** आँ? एकदम मुंबई?

**मुनीमजी :** हो, तू पाय चेप! म्हणे मुंबई महाराष्ट्राची!

**विष्णू :** अरं देवा रं! मुंबई महाराष्ट्राची!

**मुनीमजी :** मुळीच नाही. मुंबई आझाद! तू डोकं दाब!

**विष्णू :** आणि पाय?

**मुनीमजी :** पायही चेप आणि थोडा चहा आण!

**विष्णू :** आणि वारं?

**मुनीमजी :** वारंही घाल! आम्ही विरोध करणार!!

**विष्णू :** (थोडे पाय, थोडे डोके चेपतो, जरा वारा घालतो.) शेटजी, मला जर देवानं दहा तोंडांचा, वीस हातांचा नि चाळीस पायांचा रावण केला असता तर बरं झालं असतं!

**मुनीमजी :** रावण? ते का? थोडी तपकीर काढ!

**विष्णू :** (तपकीर काढीत) म्हंजी इस हातानं वारं घातलं असतं, डोकं-पाय चेपलं असतं नि चाळीस पायानं चा, काफी, सोडा, बरफ आणलं असतं!
**मुनीमजी :** आणि दहा तोंडांनी आम्हाला गिळून टाकलं असत! घाल ती तपकीर माझ्या नाकात!
**विष्णू :** (मुनीमजीच्या नाकात तपकीर घालतो.) आज असं का बरं झालं तुम्हाला?
**मुनीमजी :** काय रे झालंय मला?
**विष्णू :** न्हवं, भूत लागल्यावानी हो!
**मुनीमजी :** तू डोकं दाब गद्ध्या! आमचं म्हणणं आहे मुंबई आझाद, आझाद आहे!
**विष्णू :** जय बजरंग बली! आता मातर खरंच भूत!
**मुनीमजी :** तुझ्या बोडक्याचं भूत गाढवा! मला जे काही झालं आहे ते बरोबर आहे!
**विष्णू :** अगदी इतिहासाला धरून झालंय म्हणा ना!
**लाडोबा :** (प्रवेशून) नमस्ते शेटजी! का हो? डोकंबिकं दुखतंय की काय?
**मुनीमजी :** अहो, माझं डोकं दुखत नाही, ते भडकलं आहे!
**लाडोबा :** का हो, असं काय झालं एकाएकी?
**मुनीमजी :** अहो, महाराज, तात लागली आहे गळ्याला! तुम्ही आजची वर्तमानपत्रं वाचलेली दिसत नाहीत?
**लाडोबा :** म्हणजे? काही महत्त्वाची - औषधावर कंट्रोल बसल्याची - बातमी आहे की काय?
**मुनीमजी :** मेंदूवर कंट्रोल ठेवून नीट ऐका. संयुक्त महाराष्ट्र परिषदेनं आमचा निषेध केला! मुंबई महाराष्ट्रातच राहिली पाहिजे अशी जोरदार मागणी केली आहे - आणि म्हणे, या मागणीला आम जनतेचा जोरदार पाठिंबा आहे!
**लाडोबा :** मग मात्र कठीण प्रसंग आहे! अहो, सकाळी माझ्या ध्यानातच आलं नाही हे, कारण...
**मुनीमजी :** कारण हा तुमचा इतिहासविषयीचा...
**लाडोबा :** मूर्खपणा! असंच ना?
**मुनीमजी :** तसं कसं मी म्हणू?
**लाडोबा :** मग आता आपण अखिल व्यापारी जन-आपला संघ-काय करणार?
**मुनीमजी :** आपण आपली सर्व बुद्धी, सर्व संपत्ती, सर्व शक्ती पणाला लावून मुंबईचा बचाव करणार!
**विष्णू :** म्हंजी मुंबईला कोन गिळून टाकनार हाय म्हणता?
**मुनीमजी :** काय रे विष्णू? तुला तरी पटतं का हे?
**विष्णू :** काय म्हनला?

**मुनीमजी :** हे संयुक्त महाराष्ट्र परिषदवाले म्हणतात, की 'मुंबई महाराष्ट्रात असावी' आणि म्हणे 'या मागणीला सर्व कामगारांचाही पाठिंबा आहे.' सांग पाहू, मुंबई कोणाची?

**विष्णू :** म्हंजी मला नीट सांगा बघू.

**मुनीमजी :** अरे, म्हणजे मुंबई मराठी मुलखात असावी की वेगळी स्वतंत्र असावी?

**विष्णू :** अहो, हे काय विचाराय पाहिजे? मुंबई मराठी मुलखाचीच! आमचीच! पटलं का तुम्हाला?

**मुनीमजी :** नाही पटलं!

**विष्णू :** कारण - तुमचा इतिहास कच्चा!

**मुनीमजी :** गाढवा! माझा इतिहास कच्चा? तोंड सांभाळून बोल!

**विष्णू :** बरं, तुम्ही नीट सांगा, मुंबई निराळी, आझाद, का मागता ते?

**मुनीमजी :** त्याला हजारो कारणं देता येतील. मी जे म्हणतो की मुंबई स्वतंत्र राहिली पाहिजे, ते शंभर टक्के सत्य आहे. मी वाटेल ती पैज लावायला तयार आहे.

(खिशातले नोटांचे पुडके काढून टेबलावर आपटतो.)

**विष्णू :** पैज लावा खरं! पन स्वतंत्र कशी आनि का हे पटवून द्याया हवं!

**मुनीमजी :** हो! हो! तू जर नीट बोलणार असशील तर अगदी इतिहासाला धरून पटवून देतो तुला!

**विष्णू :** पर जी गोष्ट खरी हाय त्या बाबतीत मला वाकडं बोलायचं कारन काय?

**मुनीमजी :** काय रे? खरं आहे, सत्य आहे, ह्या कुणाला गप्पा मारतोस? म्हणजे तू तेवढा खरा आणि आम्ही खोटं बोलतो?

**लाडोबा :** पण शेटजी, दोघेही चिडू नका. एकमेकांना पटवून द्या.

**मुनीमजी :** हो. हो. कबूल, पण इतिहासाला धरून बोललं पाहिजे, इतिहासाला धरून प्रश्न विचारला पाहिजे... पटलं?

**विष्णू :** हां! पर कुनी कुनावर चिडायचं न्हाई!

**मुनीमजी :** ठीक आहे. मी म्हणतो, मुंबई ही महाराष्ट्राची नाही. ती मुळातच वेगळी आहे ह्याला भरभक्कम पुरावा आहे.

**विष्णू :** कसला पुरावा म्हनता?

**मुनीमजी :** इंग्रजांनी ह्या मुंबईला बेट म्हटलं आहे बरं... द्वीपकल्प म्हटलेलं नाही.

**विष्णू :** इंग्रजांचं असं हाय.

**(लावणी)**

तहान लागली एका कोल्ह्याला । पाणि पियाला गेला ।
नदीच्या मोठ्या डोहात । भर दोपारच्या अमलात ।।१।।

(गाणे चालू असता सोमा, भय्या, दामले वगैरे लोक येतात.)

कोल्ह्याचा तोल तवा गेला । पाय निसटला ।

खालि तो पडला त्या पाण्यात । आला मग मरायच्या बेतात ॥२॥

**लाडोबा :** बरं, त्याचं काय इथं?

**विष्णू :** कोल्हा जवा पाण्यात बुडाया लागला तवा त्यानं केली वरडाया सुरवात 'मला काडा न्हायतर जग बुडंल!' हे ऐकून एका शेतकऱ्यानं त्याला भाईर काढला आणि इचारलं, 'कसं जग बुडनार?' म्हणून कोल्हा म्हनला, 'अवो, मी मेलो असतो तर मला जग बुडलंच असतं!'

**लाडोबा :** अरे, पण तू सांगतोस त्याचा आणि मुंबई बेटाचा संबंध काय?

**विष्णू :** अवो, इंग्रजांनी त्या कोल्ह्यावानी मुंबईला बेट म्हटलं! पर इंग्रज यायच्या आधी ही मुंबई महाराष्ट्रातच व्हती!

**मुनीमजी :** म्हणजे मुंबई बेट असं इंग्रजांनी आपल्या फायद्यासाठी म्हटलं म्हणतोस, ते का?

**विष्णू :** अवो, इंग्रज चोर होते!

**मुनीमजी :** मग या चोरांना तुम्ही इकडं येऊच का दिलं? आणि चोरांनी दोनशे वर्षे तुमच्यावर राज्य कसं केलं?

**विष्णू :** आमी न्हाई येऊ दिलं बरं का! इंग्रज पहिलं सुरतेला आलं! आनि दोनशे वर्षात आम्ही दोनशे बंडं केली.

**मुनीमजी :** अरे काय बाता ठोकतो आहेस? जरा इतिहासाला धरून बोल.

**विष्णू :** अवो, बाता न्हवं! अठराशे सव्वीसपासनं ते एकोणीसशे शेचाळीसच्या खलाशांच्या बंडापत्तर वर्षाला एक बंड! वाचा जरा इतिहास!

**लाडोबा :** अहो शेटजी! हा तुमचा नोकर तुमचा अपमान करतोय!

**मुनीमजी :** (जळफळत) मग काय करूया! तो इतिहासाला धरून बोलतोय. बरं, विष्णू,

आता कायद्यानं बोला । सांगा आम्हाला ।
धनी कोण या मुंबईला? ॥

**विष्णू :** आमची मुंबई । कुणाची नाही । सवाल उलटा कशाला ॥१॥

**मुनीमजी :** अरे पण...

नाना भाषेची । अनंत जातीची ।
तूच मागशी कशी हिला? ॥

**विष्णू :** जशी गरुडाला पंखं । आणि वाघाला नखं।
तशी ही मराठी मुलखाला ॥२॥

**मुनीमजी :** पण इथं अनेक प्रांतातले लोक पिढ्यान पिढ्या येऊन राहिले ते का?
**विष्णू :** का कुणाला ठावं? आमी कवा पत्र धाडलं हुतं कसंबी करून याच म्हनून?
**मुनीमजी :** इतिहासाला धरून बोल! आमच्या पिढ्यान पिढ्या इथं खपल्या ते फुकटच वाटतं?
**विष्णू :** मग तुम्ही सांगा, दोनशे वर्षं इंग्रज हतं राहिले ते फुकटच का? जसं ते, तसं तुमी!
**मुनीमजी :** अरे पण...

आम्ही येऊन मुंबईला । व्यापार वाढवला ।
पैसा पेरिला का बोला? ॥

**विष्णू :** नदीला बगळा । जमून सगळा ।
टपून बसतो कशाला? ॥३॥

**लाडोबा :** अहो, हा तुम्हाला बगळा म्हणतोय!
**मुनीमजी :** विष्ण्या! आम्ही बगळे?
**विष्णू :** चिडायचं नाही असं ठरलंय! आनि इतिहासाला धरून काय त्ये इचारा!
**लाडोबा :** अरे, पण शेटजींना वाटेल ते बोलतोस म्हणजे काय?
**मुनीमजी :** शिवाय आम्ही इथं येऊन...

तोंड पैशाचं सोडलं । कारखानं काढलं ।
वैभवशाली केली हिला ॥

**विष्णू :** आकाश माझं । धरणी माझी ।
कशी द्यावी ही उपऱ्याला ? ॥४॥

**मुनीमजी :** काय आम्ही उपरे? आम्ही येऊन मोठमोठ्या इमारती बांधल्या, रस्ते केले, गिरण्या सुरू केल्या, बाजारपेठ उघडली, आणि तुम्ही मराठी लोक हिच्यावर आपला हक्क सांगता तो का? मग आम्ही का सांगू नये? इतिहासाला धरून बोल!
विष्णू : मग आता तुमीच सांगा, इंग्रजांनी बी हतं आगीनगाडी आनली, कारखानं काढलं, बाजारपेठ उघडली, तारखातं सुरू केलं, आणि दोनशे वर्षं राज्य केलं. मग त्यांनी हिंदुस्थानावर आपला हक्क का सांगू नये?
**लाडोबा :** वा, वा, वा! तसं कसं सांगता येईल? ते परक्या देशाचे होते.
**मुनीमजी :** आणि आम्ही आमचं घरदार सोडून, आमचं सगळं घेऊन इकडं आलो ते का?
**विष्णू :** तुमीच सांगा का ते!
**मुनीमजी :** सांग की आता तूच!
**विष्णू :** चिडायचं न्हाई बरं का, आमाला लुटायला!

**लाडोबा :** अरे, तुझ्या जिभेला हाड आहे की नाही? शेटजीला लुटारू म्हणतोस?
**मुनीमजी :** विष्णू! आम्ही लुटारू? तू इतिहासाला धरून बोलतोस? काय रे, तुम्हाला आम्ही कसे लुटतो?
**विष्णू :** मराठ्यांनी सुरत लुटली तसंच! थोडा फरक हाय! मराठ्यांनी सुरत लुटली हत्यार घेऊन. तुमी आमाला लुटलं भांडवल घेऊन! पटलं?
**मुनीमजी :** काय पटलं काय? काय वाटेल ते बोलतोस तू!
**विष्णू :** पर मी इतिहास सोडलाय का?
**मुनीमजी :** ते पूर्वीचं काही असलं तरी आम्ही आहोत म्हणून ही मुंबई, मुंबई आहे; नाही तर सातारा झाला असता सातारा! सगळी घाण! —

आम्ही हौशी रंगिले । उद्योगवाले ।
आम्हावीण शोभा नाही हिला ॥

**विष्णू :** जसा पिंगळ्याला पिंजरा । गाढवाला अंबारी ।
बाशिंग शोभतं घुबडाला ॥५॥

**लाडोबा :** आता मात्र कहर झाला. अहो, हा तुम्हाला पिंगळा, गाढव, घुबड, काय वाटेल ते म्हणतोय!
**विष्णू :** मुनीमजी, इतिहासाला धरून विचारा !
**मुनीमजी :** चुलीत गेला तुझा इतिहास! तू इतिहासाला धरून बोलतोस?
**विष्णू :** आणि परत चिडायचं नाही म्हनून तुमी कबूल केलेलं हाय!
**मुनीमजी :** (जळफळत) अरे, पण जरा जपून बोल!
**लाडोबा :** अहो, तो तुम्हाला काय वाटेल ते बोलतो, आणि तुम्ही ते ऐकून घेता. चांगलं कान धरून विचारा.
**मुनीमजी :** (लाडोबाला एकीकडं) कसा विचारू? मी घुबड कसा हा ऐतिहासिक प्रश्न आहे का? तुम्हीच विचारा पाहू.
**लाडोबा :** मी काय विचारू? मला नाही विचारता येणार.
**मुनीमजी :** हं! तर विष्णू, ही मुंबई अगोदर वेगळी होती, पण...

आम्ही पर्वत फोडून। बोगदे पाडून ।
जोडली मुंबई देशाला ॥

**विष्णू :** चाकावर माशी । बसून खाशी ।
रथ चालवील का बोला? ॥६॥

**मुनीमजी :** म्हणजे? बोगदे कुणी काढले?
**विष्णू :** तुमी? अवो तुमचा जीव तुमाला जड होतोय. पोटचं पोर कडेवर घेता येत न्हाई. मग दगडाची पाटी कशी घेनार?

**मुनीमजी :** (चिडून) म्हणजे राबला तुम्ही. पण पैसा कुणाचा?
**विष्णू :** अवो, आमीच सुरुंग ठासला, पेटिवला, खडक फोडला...
**मुनीमजी :** हो, हो. म्हणजे काम केलं., पण पैसा आमचा होता हे विसरून चालणार नाही.
**विष्णू :** पैसा?...

अहो दोरी लोटा । सोटा लंगोटा ।
भांडवल घेऊन इकडं आला ॥

**मुनीमजी :** ऋषीचं कूळ । आणि नदीचं मूळ ।
फुकट पाहसी कशाला? ॥७॥

बरं ते जाऊ दे. ही वीज आम्ही बनवून इथपर्यंत आणली, तिला खेळविली आणि म्हणून ह्या मुंबईचं वैभव वाढलं.
**विष्णू :** तुमी? वीज बनिवली? कशी, नि कुठं?
**मुनीमजी :** अरे, मुळशीला एक धरण बांधलं!
**विष्णू :** कशाचं?
**मुनीमजी :** कशाचं म्हणजे? पाण्याचं!
**विष्णू :** पाण्याचं न्हव! रक्ताचं!
**लाडोबा :** काय माणूस आहे हा!
**मुनीमजी :** ए विष्णू! रक्ताचं धरण कसं रे?
**विष्णू :** मुळशीचं धरण बांधताना महाराष्ट्राची हजारो एकर पिकाऊ जमीन गेली. ऐंशी गावांचा उठावा झाला. हजारो कुटुंबांच्या प्रपंचांचं वाटोळं झालं! म्हंजी महाराष्ट्राच्या रक्ताची वीज तयार होऊन मुंबईला आली. गिरण्या, कारखानं, आगीनगाडी चालवू लागली. आनि शिवाय समदा मराठी कामगार हतं आपलं उरल्यालं रक्त आटिवतोय. पटलं?
**मुनीमजी :** तू काय वाटेल ते सांगतोस ! मला लेक्चर नाही पटत तुझं. तू त्या शिवाजी पार्कच्या कॉन्फरन्सला गेला होतास वाटतं?
**विष्णू :** बरं असं सांगा...

इंदूर बडोदा । माळवा समदा ।
मागावा का आम्ही सांगा मला? ॥

**मुनीमजी :** तसं कसं होईल? ते कोण देईल?
पचेल ते खावं पोटाला ॥८॥

मग सांगा, आम्ही आमच्या प्रांतात आलेल्या त्या महाराष्ट्रीय राजांना काय करावं? त्यांना काय हाकलून द्यावं?

**विष्णू :** हाकलू बिकलू नका. हळू पकडून म्हशीच्या डब्यात घालून पार्सल करा.
**मुनीमजी :** म्हणजे काय करणार रे?
**विष्णू :** असं करणार, की तिकडच्या तिकडं त्यास्नी राणीच्या बागेत नेऊन ठेवनार! पटलं? (जमलेले दामले, बाळकू, सोमा, भय्या वगैरे 'पटलं, पटलं, हे मात्र सर्वांना पटलं,' असे म्हणतात.) हं! त्या ऐतखाऊस्नी हिकडं आनायचं पटलं! मग इथल्या चोरास्नी तिकडं पाठवायचं पटलं का?
**मुनीमजी :** पण मला नाही पटलं !
**विष्णू :** कसं पटणार? चोराला चांदण्याची हुरहूर!
**सोमा :** पण विष्णू ! मुंबई मराठी मुलुखाला जोडली तर मी म्हणतो, भय्यासारख्या बाहेरच्या लोकांस्नी तुमी हाकलून लावणार की काय?
**भय्या :** हां भाई! सवाल तो ठीक है!
**मुनीमजी :** मग दे उत्तर! या सर्व परप्रांतीयांना तुम्ही बेकार करणार?
**विष्णू :** तसं न्हाई मुनीमजी. हिकडं काम करून पोट भरायसाठी जे आल्यात, त्यास्नी इथनं जायाचं कारण न्हाई. एवढंच न्हवं तर तुम्ही त्येंची आनि आमची जी दशा केलीया, ते समदं बदलून इथं समद्या लोकांस्नी सुख मिळायपाईच आमी मुंबई मराठी मुलुखात जोडाया मागतो ! जसा तुमचा महागुजरात झाला तरी अहमदाबादाचा मराठी कामगार तिथंच राहील, तसंच इथं समदं राहू शकत्यात.
**मुनीमजी :** पण आमचं म्हणणं आहे की आम्ही या मुंबईत बहुसंख्याक आहोत म्हणून—

पुढची यादवी । आता टळावी ।
वेगळी करावी मुंबईला ॥

**विष्णू :** उवासाठी डोकं । जाळावं पाक ।
हे कसं पटणार कुणाला ? ॥९॥

**मुनीमजी :** काय म्हणालात?
**विष्णू :** म्हंजी एखाद्या माणसाच्या डोक्यात उवा झाल्या म्हंजी काय त्यानं डोकं जाळावर होरपळावं काय?
**लाडोबा :** अहो, हा गाढव तुम्हाला उवा, लिखा, काय वाटेल ते बोलतोय!
**विष्णू :** शेटजी, मला इतिहासाला धरून काय बी इचारा!
**मुनीमजी :** मग तुला काय म्हणायचं आहे? यादवी होऊ नये, प्रांताप्रांतात भांडण लावू नये म्हणून आम्ही मुंबई वेगळी मागतो हे काय खोटं आहे? ...

आम्ही ठोकून आरोळी । मागतो वेगळी ।
आझाद मुंबई कशाला?

**विष्णू :** चिडवून कोंबडं । लावून झोंबडं।
दुरून गमजा बघायला ॥१०॥

**लाडोबा :** कहर झाला आता. अहो, हा तुम्हाला धडधडीत दंगेखोर म्हणतोय !

**विष्णू :** मी इतिहासाला धरून बोलतोय!

**मुनीमजी :** कसला तुझा बोडक्याचा इतिहास? इतिहासात काय आम्ही दंगे लावलेले आहेत?

**विष्णू :** मग सांगा! मागं झालेला दंगा त्या इंग्रजांनी नि भांडवलदारांनी लावला. त्यात हजारो कामगारांचा नि गरीबांचा सत्यानाश झाला. आता परत आझाद मुंबई मागून तुमी मलबार हिलवर बसणार आणि आमचा मुडदा पाडणार?

**मुनीमजी :** म्हणजे आम्ही आझाद मुंबई मागितल्यानं दंगे होणार? आणि आम्ही गंमत पहाणार?

**विष्णू :** मग असं सांगा, मागं झालेल्या दंग्यात एखादा गिरणीमालक, एखादा कारखानदार, तुमचा मोठा मॅनिजर, मेलाय का?

**लाडोबा :** तू जरा जपून बोल! तू शेटजीला दंगेखोर, लुटारू, काय वाटेल ते बोलायला लागलास?

**मुनीमजी :** हे पाहा, तुम्ही जर भलताच हट्ट धरून बसला तर आम्ही आमच्या गिरण्या, कारखाने, आमचं सर्व भांडवल...
आम्ही सारंच घेऊ । निघून जाऊ ।
कसं जगाल तुम्ही सांगा मला ॥

**विष्णू :** ते तुमचं सारं —
आम्ही ताब्यात घेऊ । परत चालवू ।
खुशाल जावं पंढरीला ॥११॥

**लाडोबा :** हा माणूस काय बोलतोय तरी काय? कशाची पंढरी?

**विष्णू :** हो! म्हंजी शेवटचं इठ्ठलाचं दर्शन बी होईल नि इमान बी मिळंल.

**लाडोबा :** पंढरीला कसलं विमान?

**विष्णू :** अवो, टाटाचं न्हवं! तुकाराम महाराजास्नी मिळालं ते. अड्डाच हाय तिथं.

**मुनीमजी :** हा माणूस अगदीच हे आहे. बिलकूल काही पटवून घेत नाही. तुम्ही सांगा पाहू मंडळी! सोमा, तुझं काय म्हणणं आहे? आमचं म्हणणं तुम्हाला पटतं का?

**सोमा :** विष्णूचं म्हणणं बराबर हाय! जसा बडोदा गुजराथमधनं वेगळा करता येणार नाही, तसंच मुंबई आझाद होऊ शकणार नाही.

**भय्या :** ठीक बात! जैसा कानपूर नहीं आझाद हो सकता, वैसी बंबई! और हम मजदूरों

को डरने की क्या बात है? विष्णू तो बिलकूल सच कहता है।
**मुनीमजी :** अरे, तू तर घाटीच.
**दामले :** पण शेटजी! माझं देखील असं म्हणणं आहे की मुंबई आझाद केली तर यादवी माजण्याचा संभव आहे. ती महाराष्ट्राला जोडणं हे इतिहास, भूगोल, संस्कृती, आर्थिक व्यवस्था या सर्वाला धरून आहे आणि विष्णूनं ते आपल्या भाषेत पटवून दिलंय बुवा आपल्याला!
**मुनीमजी :** लाडोबा! पाहिलेत सगळे? तुम्ही सांगा पाहू त्यांना!
**लाडोबा :** मी खरा महाराष्ट्रीय आहे. माझ्या अंगात महाराष्ट्राचे रक्त खेळत आहे. मी महाराष्ट्राच्या अंगाखांद्यावर खेळलो आहे, वाढलो आहे. परंतु मित्र हो! आज आपला हिंद देश भयाण अशा अडचणीच्या दर्यांमधून मार्ग काढीत आहे. आज देशापुढे काश्मीर, हैद्राबाद, महागाई, चलनवाढ, संप वगैरेसारखे प्रश्न वा वासून उभे आहेत. अशा वेळी आपण संयुक्त महाराष्ट्रासह मुंबईचा प्रश्न या वेळी उपस्थित करून राष्ट्राच्या अडचणीत भर घालू नये. निदान आणखी दहा वर्षे तरी या बाबतीत काही बोलू नये असं आमचं प्रामाणिक मत आहे.
**मुनीमजी :** शाबास लाडोबा! बघ विष्णू! लाडोबा एक महाराष्ट्रीय असून कसा निर्णय दिला?
**विष्णू :** अवो निर्णय कसला? ही महाराष्ट्राशी बेइमानी हाय!
**मुनीमजी :** विष्णू! तू लाडोबांना बेइमान म्हणून त्यांचा अपमान करीत आहेस. तू इतिहासाला धरून बोल! ही बेइमानी कशी?
**विष्णू :** अवो, सूर्याजी पिसाळानं केली तशी!
**लाडोबा :** हा माझा अपमान आहे. मला सूर्याजी पिसाळ म्हणतो म्हणजे काय?
**विष्णू :** चिडायचं नाही साहेब.
**लाडोबा :** पण तुला दिसत नाही काय? देशाची किती भयंकर परिस्थिती आहे आज!
**विष्णू :** ते मला कळतं! लोकांच्या पोटापाण्याचा प्रश्न आला, लोकांच्या कोणत्याबी मागणीचा प्रश्न आला, की भांडवलदारांच्या तोट्याचा प्रश्न येतो. आणि ह्यो तोट्याचा प्रश्न आला की झाली परिस्थिती भयंकर, 'जय अलख निरंजन' म्हणून उभी!
**लाडोबा :** अरे, पण आज अगोदर देशाचे दोन तुकडे झालेत, त्यात तुम्ही महाराष्ट्र, कर्नाटक, आंध्र, केरळ, गुजराथ असे तुकडे पाडून देशात अनर्थ निर्माण करणार आहात!
**विष्णू :** मुनीमजी म्हणत्यात मुंबईचा तुकडा वेगळा करा तसं आमी कुठं म्हनतुया? आमी म्हनतुया हे असं नवं प्रांत बनवून समद्या लोकांची एकी करा!
**मुनीमजी :** (चिडून) बरं, बरं, फार झालं आता. माझं डोकं दुखायला लागलंय! तू

जा आता कामाला. चालता हो.

**विष्णू :** (नोटांचे पुडके उचलतो.) आणि पैसे बी घेऊन जातो. चला हो. फराळ करूया.

(मुनीमजी व लाडोबाखेरीज बाकीचे आनंदाने जातात.)

**मुनीमजी :** अरे, पण हे लाडोबा काय म्हणतात? जरा थांब.

**विष्णू :** (लांबून) आमी फराळ करून येतो.

**लाडोबा :** काय हा माणूस मोठा विचित्र आहे बुवा! अहो, तुमचा नोकर असून काय वाटेल ते बोलला.

**मुनीमजी :** तो नाही बोलला. आमचा इतिहास बोलला. आता काढून टाकतो गाढवाला कामावरून.

**लाडोबा :** हं! जरूर काढा. पण तसा सरळ सोडू नका.

**मुनीमजी :** मग काय करू म्हणता?

**लाडोबा :** आज संध्याकाळी साडेसहा वाजता माझा माल घेऊन त्याला पाठवा. आणि कंपनी बंद करून घरी चला. मीही माझं दुकान बंद करून जातो. त्याला कंपनीत परत येऊ देऊ नका.

**मुनीमजी :** अहो, पण पुढं काय? माझ्या नाही ध्यानात आलं.

**लाडोबा :** कसं येणार? तुमचं राजकारण कच्चं आहे! पुढं काय ते नंतर कळेल तुम्हाला. माझा सूर्याजी पिसाळाचा इंगा दाखवितो त्याला. (जातो.)

**मुनीमजी :** विष्णू! ए विष्णू! इकडे ये.

**विष्णू :** हं, बोला. काय बाकी हाय?

**मुनीमजी :** आता काही नाही. ही यादी बाळकूला दे. म्हणावं, आताच्या आता माल भर. (विष्णू जाऊन येतो.)

**विष्णू :** हं दिली. पुढं काय करायचं?

**मुनीमजी :** हे पाहा, तो माल घेऊन तूच जा!

**विष्णू :** अवो, पर कुठं?

**मुनीमजी :** मी हा पत्ता देतो, त्याप्रमाणं जा. हा पत्ता (वाचतो) श्री. एल. के. मिसाळ, वल्लभदास मार्केट, सरदार पटेल रोड, मुंबई. कळलं? लौकर परत ये.

**विष्णू :** बरं शेटजी. (मुनीमजी जातो.)

**(कटाव)**

विष्णू मग माल घेउनि गेला । दुकान परी बंद दिसलं समयाला ।
म्हणून तो तातडीनं परतला । कंपनीच्या दरवाज्याला आला ।
तिथंही टाळा त्यानं पाहिला । त्याचा मग कोंडमारा जाहला ।

त्यानं मग बसून विचार केला । रात्रभर माल घेऊन उशाला ।
तो कंपनीच्या शेजारी । रस्त्यावरी । बसून राहिला ॥१॥
सकाळी मुनीमजीनं त्याला । कंपनीमध्ये नाही येऊ दिला ।
खबर ही देऊन लाडोबाला । वैऱ्यांनी दावा साधला ।
विष्णूला पुरता अडकायला । वर्दी त्यांनी दिली मग पोलिसाला ।
पकडिले मग विष्णूला । वैरी बनविला । नेले कचेरीला ॥२॥

## दृश्य चौथे

(हातकड्या घातलेल्या विष्णूसह पोलीस अधिकारी)

**पोलीस अधिकारी :** बोल, तुझं नाव काय?
**विष्णू :** विष्णू सावळा पाटील.
**पोलीस अधिकारी :** राहणार?
**विष्णू :** गाव शिरसी, तालुका वाळवे, जिल्हा सातारा.
**पोलीस अधिकारी :** हे पहा, जय बालाजी केमिकल कंपनीचे मॅनेजर आणि मि. लाडोबा मिसाळ, यांनी तुमच्यावर चोरीची फिर्याद दिलेली आहे.
**विष्णू :** अवो पण सायेब, मी माल घेऊन गेलो तवा दुकान बंदं! मागं आलो तर कंपनी बंद! मी माल घेऊन रस्त्यात निजलो ती चोरी कशी?
**पोलीस अधिकारी :** ती चोरी कशी ती कोर्टाला विचार, जामिनावर सुटू शकतोस. पण पाचशे रुपये रोख भरायला लागतील.

(लाडोबा, मुनीमजी, बाळकू, दामले वगैरे येतात.)

**लाडोबा :** अहो मुनीमजी! त्याला विचारा आता! इतिहासाला धरून बोल म्हणावं, मुंबई कुणाची?
**मुनीमजी :** अहो विष्णुपंत पाटील! म्हटलं, आता सांगा, मुंबई कुणाची?
**विष्णू :** मुंबई माझीच! पहिली व्हती, आता हाय, पुढं असणार. पटलं?
**मुनीमजी :** नाही बरं! पटलं नाही!
**विष्णू :** नाहीच पटणार! कारण तुमचा इतिहास कच्चा आहे!
**मुनीमजी :** पण तू आता सरकारी पाहुणा आहेस हे विसरू नकोस. जेलमध्ये बस ओरडत 'माझी मुंबई, माझी मुंबई' म्हणून!
**दामले :** अहो, ते का? मी आहे की मागं!
**भय्या :** मैं भी हूँ!
**बाळकू :** विष्णू! घाबरायचं कारण न्हाई, तुझ्या मागं आम्ही समदं आहोत!

**लाडोबा** : पण विष्णू! इतिहासाला धरून सांग! आता मुंबई कुणाची?

**विष्णू** : अवो, स्वराज्याची चळवळ करताना भगतसिंग फासावर गेला म्हणून चळवळ मेली का? तसंच मी तुरुंगात गेलो - तरीही संयुक्त महाराष्ट्राची चळवळ मरणार नाही! तुमी किती बी भानगडी केल्या, तरी लोकांची चळवळ मरत नसते. मुंबई आमचीच.

(मुनीमजी तपकीर ओढतो)

**मुनीमजी** : काय? कुणाची?

**विष्णू** : आमची!

**मुनीमजी** : इतर लोक कुठं जाणार मग?

**विष्णू** : इथंच राहणार, पण एक जात राहणार नाही.

**मुनीमजी** : कुणाची जात?

**विष्णू** : तुमची अन् लाडोबांची. पटलं?

(मुनीमजी जोराने तपकीर ओढतो. विष्णूला पोलीस अधिकारी घेऊन जातात.)

# मूक मिरवणूक

## दृश्य पहिले

*(कामगारवस्तीतील एका चाळीतील खोली. विष्णू, वय सुमारे तीस, कापडाच्या गिरणीत कामाला असावा. जेवायला बसला आहे. पुतळा, विष्णूची बायको, वय सुमारे तेवीस, त्याला वाढीत आहे.)*

**पुतळा** : बोलत का नाही? आज पुन्हा त्या जाबराबरोबर भांडला वाटतं?

**विष्णू** : पुतळा, तुला एक हुखाणा घालू का?

**पुतळा** : हुखाणा? हो, घाला की!

**विष्णू** : दोन मालकांची एक वस्तू; तिचं नाव काय?

**पुतळा** : एक वस्तू नि दोन मालक! काय बरं? मला नाही पटत. दोन मालकांची एक वस्तू असणं शक्यच नाही. काहीतरीच सांगता... थापा...!

**विष्णू** : थापा?

**पुतळा** : हो, हो, थापा.

**विष्णू** : आणि सांगितल्यावर?

**पुतळा** : मी म्हणत्ये, एका वस्तूचे दोन मालक हेच खोटं. असं असणारच नाही.

**विष्णू** : आणि पटवून दिल्यावर काय हरणार?

**पुतळा** : बरं, ती वस्तू कुठं आहे?

**विष्णू** : ती सर्व ठिकाणी आहे.

**पुतळा** : आपल्या चाळीत आहे का?

**विष्णू** : हो, आहे.

**पुतळा** : बरं, आपल्या घरात आहे का?

**विष्णू** : हो, आहे.

**पुतळा** : आपल्या इथं? काय बरं? दोन मालकांची एक वस्तू आणि तीही आपल्या घरात? (विचार करते.)

**विष्णू** : हरलीस?

**पुतळा** : सांगा की!

**विष्णू :** सांगू?
**पुतळा :** हं, सांगा.
**विष्णू :** खोली! पटलं?
**पुतळा :** (शरमून) खोली! ते कसं?
**विष्णू :** अग, ज्यानं चाळ बांधली तो एक, आणि ज्याच्या नावावर आहे तो दुसरा. (हसतो.)
**पुतळा :** मी सांगू का, आपल्याला खोली लवकरच शोधली पाहिजे. दत्तूची बायकोमुलं कधी येतील त्याचा नेम नाही, आणि असं लोकांच्या घरात राहणं मला पसंत नाही. घर असावं पण सत्तेचं.
**विष्णू :** सत्तेचं! हे पाहा, सत्तेबित्तेचं नाव काढू नको इथं तरी. आपल्याला घर मिळालंच तर ते भाड्यानं मिळणार. तेही पागडी देऊन. आणि तीही एवढी की जन्मात आम्ही देऊ शकणार नाही, आणि जन्मात खोली घेऊ शकणार नाही.
**पुतळा :** मग हो काय करायचं दत्तूची माणसं आल्यावर?
**विष्णू :** ते आता ठरवून काय फायदा?
**पुतळा :** तुम्ही रोज अशी उडवाउडवीची भाषा बोलता, आणि मला वेडी समजता, याचं नाव काय? आत्ता ठरवायचं नाही तर कधी आणि कोण ठरविणार?
**विष्णू :** ते सरकार ठरविणार!
**पुतळा :** सरकार? केव्हा ठरविणार?
**विष्णू :** योजनेवर विचार झाल्यावर.
**पुतळा :** योजनेवर विचार कधी होणार?
**विष्णू :** ते तुला मलाच काय, पण त्या मुंबादेवीलासुद्धा कळणार नाही.
**पुतळा :** मग आम्ही काय करायचं!
**विष्णू :** आम्ही झोपडं घालायचं!
**पुतळा :** आम्ही झोपडं घालायचं? मग हे सरकार काय करणार?
**विष्णू :** सरकार ते पेटवून देणार!
**पुतळा :** म्हणजे?
**विष्णू :** म्हणजे काय, वरळीला शेकडो झोपड्या सरकारनं पेटवून दिल्या. चेंबूरच्या पाचशे झोपड्या मोडल्या.
**पुतळा :** मोडल्या? का?
**विष्णू :** लोकांना घरं नाहीत म्हणून!
**पुतळा :** तुम्ही काय सांगता ते कळतंच नाही मला.
**विष्णू :** अग, आपल्यासारख्या लोकांनी घरं नाहीत म्हणून वरळीच्या आणि चेंबूरच्या

रिकाम्या जागेत बांधलेल्या शेकडो झोपड्या सरकारी हुकूमानं पेटल्या आणि मोडल्या, हे कळायला काय दोन डोक्यांची गरज आहे? एकावर कळतं, पण तुला म्हणे कळत नाही.

(विष्णूचे जेवण आटोपते. पुतळा ताट काढते. तो पान काढून सुपारी कातरीत खाटेवर बसतो. ती सुपात तांदूळ घेऊन ते निवडायला बसते.)

**पुतळा :** मी एक विचारू का?

**विष्णू :** हो, विचार की!

**पुतळा :** मी म्हणत्ये, घर नाही म्हणून लोकांनी घर बांधायचं आणि ते सरकारनं मोडायचं, याचं कारण काय? (पाखडते)

**विष्णू :** हे पाहा, ते सूप न वाजविता ऐकशील तरच मी तुला सांगेन आणि तुला ते कळेल. आहे कबूल?

**पुतळा :** (पाखडणे बंद करते) हं, सांगा.

**विष्णू :** हं, ऐक तर. माणूस पहिलं डोंगरात भुयार करून राहत होता. तो पुढं मैदानात आला. तेव्हा प्रथम त्यानं झोपडं बांधलं. मग मातीची आणि कवलाची घरं केली. पुढं आली भांडवलशाही आणि तिच्याबरोबर कामगार. तुला कळतंय का, की आपली हं हं करून मला बडबड करायला लावणार?

**पुतळा :** तसं मला कळतंय बरं! हं, सांगा.

**विष्णू :** मग भांडवलदारांनी भांडवलाच्या जोरावर कामगाराला राबवून सिमेंट, पोलाद तयार केलं आणि नवी नवी घरं बांधायला सुरुवात केली.

**पुतळा :** ती कसली?

**विष्णू :** ती म्हणजे घरावर घर, मजल्यावर मजले, ते इतके की शंभर शंभर!

**पुतळा :** बरं, मग पुढं?

**विष्णू :** पण त्यांनी बांधलेली ही घरं लोकांनी राहावं म्हणून बांधली नव्हती, तर आपल्या फायद्यासाठी. ते मागतील तेवढं भाडं देईल त्यालाच ती भाड्यानं द्यायची. लोकांजवळ पैसा झाला कमी आणि घराचं भाडं झालं जास्त. त्यात त्या मालकांना लागला एक नवा रोग!

**पुतळा :** रोग? तो कसला?

**विष्णू :** तो म्हणजे पगडीचा. मग तर माणसाला घर भाड्यानं घेणं जास्तच कठीण झालं.

**पुतळा :** आणि मग?

**विष्णू :** मग माणसानं केला विचार, आणि निघालं मागं परत!

**पुतळा :** मागं कुठं?

**विष्णू :** आपल्या पहिल्या ठिकाणी. भुयारातून निघून मैदानात बांधलेल्या झोपड्यात.

**पुतळा :** आणि ...

**विष्णू :** आणि त्यानं माडीशेजारी आपली झोपडी उभी केली. माडीशेजारी झोपडी बघून भांडवलशाहीची खोपडी गरम झाली.

**पुतळा :** पण का?

**विष्णू :** का म्हणजे? माणूस पुढं जायचं सोडून मागं निघाला म्हणून! त्या झोपड्यामुळं भांडवलशाहीच्या अब्रूला आणि नफ्याला भोक पडू लागलं. म्हणून तिनं केली सुरवात झोपड्या जाळायला! कळलं?

**पुतळा :** अग बाई! एवढ्याशा गोष्टीला तुम्ही केवढी लांबड लावली हो ही!

**विष्णू :** पण पटलं का? की आणि...

**पुतळा :** पटलं! पण दत्तूची माणसं आल्यावर आपण कुठं जायचं ते ठरवा अगोदर!

(रामू, विष्णूचा धाकटा भाऊ, हातात चार-पाच धान्याच्या पिशव्या घेऊन प्रवेश करतो.)

**विष्णू :** काय रामू, आणलंस राशन?

**रामू :** (रागाने) काय रासन? हां, आणलं की! पाच थैल्या घेऊन पन्नास धक्कं खात दुकानावर गेलो आणि दोन तास रांगेत उभं राहून मूठभर दाणं नि बचकाभर पीठ घेऊन आलो!

**विष्णू :** अरे, पण माझ्यावर का कावतोयस?

**रामू :** तुझ्यावर कशाला कावू? पण काय मुंबई आहे! मुंगीच्या रिवणावाणी माणूस आणि धक्के देत खुशाल चालतं - बेभान!

**विष्णू :** अरे बाबा, थोडी गर्दी झाली आहे, लागतो धक्का, मग काय करणार?

**रामू :** थोडी गर्दी आणि लागतो धक्का! तुम्हा मुंबईत राहणाऱ्या लोकांना धक्कं खायची सवयच झालीया! जिकडं बघावं तिकडं रांग. नळावर, संडासावर, ठेसनावर, हॉटेलात, न्हाव्याच्या दुकानात - रांग आणि धक्कं. मला तर सोसंना हे!

**विष्णू :** बरं, बरं, होईल तुलाही सवय बेताबेतानं. शेजारच्या दुकानात जाऊन जरा चहाची भुकी आण बघू.

(रामू जातो. पुतळा एका पिशवीत धान्य भरते व ती घेऊन दाराकडे जाते. बाहेरून आवाज येतो. 'विष्णू, ए विष्णू!')

**पुतळा :** उपासेसाहेब आले वाटतं! बरं, मी दळण घेऊन जाते चक्कीवर. (जाते.)

**उपासे :** (विष्णूच्याच वयाचा. त्याच चाळीत राहाणारा, गिरणीत कारकून असतो. खादीचा लेंगा, लांब शर्ट व टोपी या पेहरावावरून त्या चाळीचा पुढारी असावा असे वाटते. जरा रागातच प्रवेश करतो.) विष्णू, मला सांगा हा तुमचा भाऊ आहे

की भूत, का सैतान? त्याला कुणाला बोलावं, काय बोलावं, किती बोलावं, कसं बोलावं, काहीच कळत नाही. वाटेल त्या माणसाला वाटेल ते बोलतो म्हणजे काय? आँ? थोडं तरी सौजन्य!

**विष्णू :** अहो पण साहेब, झालं काय ते तरी सांगा!

**उपासे :** काय सांगणार? तो तुमचा भाऊ कुणालाही काही बोलतो. दम देतो, शिव्याही देतो, म्हणजे काय हे?

**विष्णू :** अहो, तेच मला जरा नीट सांगा! तो कुणाला काय बोलला, मला जरा नीट कळू द्या ना!

**उपासे :** कुणाला कशाला? स्वत: मला बोलला आणि काय वाटेल ते बोलला.

**विष्णू :** अहो, पण म्हणाला तरी काय तो?

**उपासे :** स्वत: दोन दोन तास नळाखाली बसतोय तो, आणि मला म्हणतो, 'नळ काय तुझ्या बापाचा आहे का?'

**विष्णू :** बरं, आणि काय म्हणाला?

**उपासे :** आणि काय सांगू? मला म्हणतो, 'नळाच्या तोटीत जा.'

**विष्णू :** असं! आणि?

**उपासे :** आणि म्हणतो, 'तुला अक्कल नाही. तेव्हा नळबाजारातून जुनीपुराणी विकत आण.' काय हे?

**विष्णू :** पण हे तुमचं भांडण का झालं?

**उपासे :** आता मी काय सांगणार? तुमच्या त्या भावाला काय कारण लागतं? थोडंही सौजन्य नाही त्याच्यात! माझ्यासारख्या माणसाचा अपमान म्हणजे काय! मी आज बेचाळीसपासून समाजकार्य करीत आहे, पण असा अपमान कोणीही केला नाही माझा!

(रामू चहाची पुडी घेऊन येतो.)

**रामू :** कसं काय पुढारीसाहेब, रामराम! बरं हाय का?

**विष्णू :** (रागात) रामू, तू ह्यांना काय काय बोललास सकाळी?

**रामू :** कोण मी? यास्नी? काय नाही! का हो साहेब, काय भानगड आहे ही? मी बोललो तुम्हाला?

**उपासे :** हो, हो, हो, तू!

**रामू :** काय बोललो, सांगा पाहू?

**उपासे :** तूच सांग.

**रामू :** मी सांगू, आणि ते का?

**उपासे :** तूच सांग, आणि नीट, खरं खरं सांग.

**रामू :** खरं सांगायचं म्हणजे मी कायच बोललो नाही.

**उपासे :** काय हा माणूस आहे बुवा! सकाळी एवढी माझी फजिती करून, आता म्हणतो, 'बकऱ्याला काळीजच नाही!'

**विष्णू :** रामू, तू सकाळी यांना म्हणालास की नाही, 'नळ तुझ्या बापाचा आहे का?'

**रामू :** हो, म्हणालो!

**विष्णू :** तसं कां म्हणालास?

**रामू :** हे साहेब म्हणाले, 'बापाचा नळ असल्यासारखं नळाखाली बसतोयास बेटा' मग मी म्हणालो, 'तुमच्या बापाचा नळ आहे का?'

**विष्णू :** तू दोनदोन तास नळाखाली कां बसतोस?

**रामू :** नळाला पाणी येत नाही! माझं डोकं भिजाया दोन तास लागत्यात. मग मी काय करणार? हे म्हणत्यात, कोरडीच आंघोळ कर!

**विष्णू :** तू ह्यांना नळाच्या तोटीत शीर म्हणालास?

**रामू :** हे म्हणाले, 'लवकर आटप.' तेव्हा मी म्हणालो, 'नळाला पाणीच येत नाही, मग कसं आटपू?' हे म्हणाले, 'का पाणी येत नाही?' तेव्हा मी म्हणालो, 'आत जाऊन बघा!'

**विष्णू :** तू यांना जुनी अक्कल विकत आणा म्हणालास?

**रामू :** हे म्हणाले, 'तुम्हा लोकांना कधीच अक्कल येणार नाही हे मला कळतं.' मी म्हणालो, 'तुम्हाला ते कधीच कळणार नाही. आम्हाला अक्कल आहे की नाही कळायला अक्कल लागते.' हे साहेब बोलले, 'काय? म्हणजे मला अक्कल नाही म्हणतोस मूर्खा!' मी म्हणालो, 'हो, नाही. पाहिजे तर जुनी आणा. नळबाजारात मिळेल तुम्हाला!' एवढंच. का हो साहेब, खरं का नाही?

**विष्णू :** काय साहेब, हे सगळं खरं का?

**उपासे :** हो, हे खरं आहे! परंतु खरं सांगू का? सकाळी माझा टेंपर जरा लूज झाला होता. ते जाऊ द्या. माझं म्हणणं एवढंच की, जरा सौजन्य.

**विष्णू :** अहो, 'तुम्ही सौजन्य दाखविल्याशिवाय दुसऱ्याकडून त्याची अपेक्षा करू नका' असं तुमच्या सरकारचं पोस्टर सांगतं ते तरी वाचा!

**उपासे :** आमचं सरकार! काय बोलता हे!

**विष्णू :** का हो? तुमचं नाही?

**उपासे :** अहो, आमचं आहे. पण त्याचं धोरण भांडवलशाहीला पोषक आहे ते आम्ही चुकीचं समजतो, आणि त्याच्याविरुद्ध सतत जोरदार लढा करतो.

(रहिमू, एक विष्णूच्या वयाचा मुसलमान कामगार. हातात वर्तमानपत्र आहे. उपासेला चांगला ओळखत असावा. प्रवेश करतो.)

**रहिमू :** रामराम पुढारीसाहेब, काय विष्णू, काय चाललंय?

**विष्णू :** साहेब म्हणताहेत की सरकारशी ते सतत, जोरदार लढा करतात!
**रहिमू :** एवढा मोठा प्रचंड, भयाण लढा, की त्याला उपमा फक्त आगगाडीच्या इंजिनाचीच!
**रामू :** त्याच्यातून धूर निघतो का?
**रहिमू :** हो, धूर निघतो, शिटी वाजते, पण यांच्या लढ्याचं इंजिन मागंच सरतं, पुढं जातंच नाही.
**रामू :** का पुढं जात नाही?
**रहिमू :** त्याला सिग्नल दिलेला नसतो, आणि लाईन क्लिअर नसते.
**रामू :** आणि मग त्यांच्या लढ्याची मालगाडी उभीच राहते का?
**रहिमू :** यांच्या लढ्याच्या इंजिनाला डबेच पुढे ढकलू लागतात. मग यांचं इंजिन सांगतं, 'अरे थांबा, अजून सिग्नल पडला नाही!'
**विष्णू :** म्हणजे रे काय रहिमू?
**रहिमू :** लढ्याचं सिग्नल म्हणजे देशातील परिस्थिती! ती कधीच सुधारत नाही, आणि हे लढा कधीच करीत नाहीत!
**रामू :** हे तर आता म्हणाले, 'जोरदार लढा करतो!'
**रहिमू :** लढा करतात, पण मैदानात नाही, घरात!
**रामू :** आणि नळावर!
**उपासे :** (चिडून) साले काय लोक आहेत हे? बरं, विष्णू, मी जातो. एका सभेला जायचं आहे.
**विष्णू :** जाल, थांबा हो, कसली सभा आहे?
**उपासे :** एका संपाबद्दलची आहे, तो संप आज आम्ही मागे घेणार आहोत, म्हणजे ...
**रहिमू :** म्हणजे इंजिन मागे सरणार, सिग्नल नसणार, डबे पुढे रेटणार, मोठाच लढा होणार! काय मास्तर?
**उपासे :** ए रहिमू, तेरा डोका फिर गया है! मोठं तत्त्वज्ञान सांगतो. अरे, परिस्थितीप्रमाणे केव्हा केव्हा मागं सरावं लागतं... कुणालाही!
**रामू :** कुणाला सरावं लागतं? अहो, नांगराचा बैलसुद्धा मागं सरत नाही - कसलीबी परिस्थिती असू द्या!
**उपासे :** पाहिलंस विष्णू! असा हा काही तरी बेफाम, अचाट बोलतो.
**रहिमू :** पर तो कायद्यानं बोलतो.
**उपासे :** वा रे कायदेवाला!
(ज्याच्या नावावर विष्णू राहत असलेली खोली असते तो कामगार दत्तू प्रवेश करतो.)
**दत्तू :** विष्णू, माझी माणसं आज ना उद्या येणार, तुम्ही आपली सोय बघा दुसरीकडं.

(दळणाची पिशवी घेऊन पुतळा घाबऱ्या घाबऱ्या प्रवेश करते.)

**पुतळा :** ऐकलं का, भय्या म्हणतो, सारी चाळ दोन दिवसात खाली करायचा हुकूम झालाय!

**उपासे :** म्हणजे? मालकानं लावलेली नोटीस इंजिनिअरनी चाळदुरुस्तीची गरज नाही असं सांगून परत घ्यायला सांगितलं होतं ना?

**विष्णू :** हो. आणि ती नोटीस मागं पण घेतली होती..

**पुतळा :** पण तो निकाल मालकानं सरकारातनं बदलून घेतला म्हणे, आणि भय्या म्हणतो, 'चाळ नाही खाली केली तर पोलीस येऊन खाली करणार!'

**दत्तू :** आता हो उपासेसाहेब? आता काय?

**उपासे :** हा अन्याय आहे. आता लढा करायचा!

**रहिमू :** पण पुढं जायचा की मागं?

**उपासे :** ते त्या वेळच्या परिस्थितीवर अवलंबून राहील. विष्णू, आता आपण सर्व भाडेकरूंनी एकी करून या अन्यायाचा जाब विचारला पाहिजे. त्यासाठी वाटेल ते दिव्य करावे लागले तरी ते केलं पाहिजे. उद्या आपण सर्व भाडेकरूंची सभा घेऊ. लोकांना सांगा. मी जरा जाऊन येतो.

(पडदा)

## दृश्य दुसरे

(रात्रीची वेळ. फुटपाथवर रहिमू, धोंडी वगैरे कामगार आपापल्या पथाऱ्या पसरून गप्पा मारीत बसले आहेत. रहिमूच्या हातात वर्तमानपत्र आहे.)

**रहिमू :** ह्या पेपरमध्ये मला सर्वत्र तंटा दिसतोय.

**धोंडी :** म्हंजी ते कसं का?

**रहिमू :** हे बघ की, लग्नात मारामारी - एक इसम ठार - तंटा. नवऱ्याने बायकोला ठार मारली - तंटा. एक बातमी - रेल्वे कामगार संप करणार; दुसरी - रेल्वे कामगारांनी संपावर जाऊ नये - तंटा. नेहरू म्हणतात, 'हिंदी कम्युनिस्टांचा कट ' तंटा. जिकडं बघावं तिकडं तंटाच तंटा. जो तो आजकाल तंटा करतो आहे. तू करतो आहेस, मी करतो आहे, विष्णू रामू करताहेत. हे सारे तंटे आहेत आणि या साऱ्या तंट्यांचा एक मोठा तंटा होणार केव्हा तरी, असा रंग दिसतो या पेपरवरून!

**धोंडी :** बरं, आपली चाळ खाली करायची म्हनत्यात खरं का?

**रहिमू :** हो. उद्या ह्या चाळीच्या भाडेकरूंचा मालकाशी आणि सरकारशी एक लढा सुरू होणार - तो एक तंटा.

**धोंडी :** बरं, पण हे तंटे का होतात? ह्याचं मूळ काय?

**रहिमू :** याचं मूळ तू!
**धोंडी :** मी?
**रहिमू :** तुझं पोट!
**धोंडी :** माझं पोट?
**रहिमू :** तुझं म्हणजे, म्हणजे तुझ्यासारख्या लोकांचं पोट!
**रामू :** (रामू पथारी घेऊन येतो) आलेकुम सलाम, रहिमू.
**रहिमू :** सलाम वालेकुम, काय तंटेखोर, आज किती तंटे केलेस?
**रामू :** तंटे? दोन! एक उपासे सायबासंगं व दुसरा गाडीत.
**रहिमू :** गाडीत? का?
**रामू :** गाडीत होती गर्दी - आणि एक माणूस आपला पाय समजून माझा पाय खाजवू लागला, मग दिली थोबाडीत! झाला तंटा सुरू.
**रहिमू :** चूक केलीस. उपासेसाहेबाबरोबर ठीक होतं, पण गाडीत चूक केलीस.
**रामू :** ती कशी काय?
**रहिमू :** गाडीत गर्दी होते हा काय गाडीत बसणाऱ्याचा गुन्हा आहे? समज, दहा कोंबड्यांच्या खुराड्यात शंभर कोंबडी भरली तर काय होईल?
**रामू :** त्या कोंबड्यांच्या अंगावर एकबी पंख राहाणार नाही!
**रहिमू :** बरोबर - आणि शंभर लोकांच्या डब्यात पाचशे लोक भरले तर काय होईल?
**रामू :** याचा पाय त्याच्या इजारीत नि त्याचा हात याच्या पैरणीत —
**रहिमू :** ठीक, आणि?
**रामू :** याचं डोकं त्याच्या बगलेत आणि त्याचं डोकं चाकाच्या बगलेत!
**रहिमू :** म्हणजे निकाल! म्हणून म्हणतो थोबाडीत मारलीस ती चूक केलीस. बरं, धोंडी, आज तू किती तंटे केलेस?
**धोंडी :** मी? एकच.
**रामू :** अरे, पण का ते सांग —
**धोंडी :** मला आज याकच काम मिळालं ते म्हणजे एका शेटचं गाडीभर सामान दुसऱ्या माळ्यावर चढवायचं होतं. एक रुपया ठरवून त्यानं सारं सामान माझ्या डोईवर दिलं. तिच्यावर दोन बेडिंग ठेवली. एका काखेत एक बेडिंग दिलं. दुसऱ्या काखेत एक बोजा. एका हातात एक शेगडी नि दुसऱ्या हातात जेवणाचा डबा...
**रामू :** अरं, अरं, इतकं सामान
**धोंडी :** मग काय, माझा पाय रुतून बसल्यागत झाला, नि पायच उचलेना आणि ढासळलं सामान खाली. सामान पडलं म्हणून त्यानं मला शिवी दिली. मी त्याला एक ठोसा दिला!

**रहिमू :** बरोबर मारलास. जो माणूस टांगाभर सामान एका माणसावर लादतो त्याला गाडीभर मार दिला पाहिजे!
**रामू :** ए धोंडी, तू हमालीचं काम का रे करतोस? सोडून दे की!
**रहिमू :** हो. सोडून दुसरं बघ एखादं.
**धोंडी :** काय करनार? आपलं नशीबच खोटं आहे.
**रामू :** रहिमू, या धोंडीचं नशीब असलं असतं तर ते कुठं असतं बरं?
**रहिमू :** याचं नशिब? ते घोड्याएवढं असून घोडनदीच्या पुलावर असतं.
**रामू :** आणि त्यात काय आहे?
**रहिमू :** त्यात हेलपाटी ठेवली आहे!
**धोंडी :** आणि तुमच्या नशिबात?
**रहिमू :** माझ्या फूटपाथ! रामूच्या नशिबात मार खाणं आणि मार देणं!

(एक इसम आपली पथारी घेऊन येतो.)

**इसम :** ए, माझी जागा कुठं आहे?
**रहिमू :** अरे बाबा, तुझी कुठली जागा? कुठं तरी टाक पथारी नि पसर हातपाय!
**इसम :** (रामूच्या पथारीकडे बोट करून) ही माझी रोजची जागा आहे. मी तिथंच झोपणार!
**रामू :** ए ऽ, तुझी जागा मसणात आहे. जा.
**इसम :** तू जा मसणात, माझी जागा सोड! उठ.
**रामू :** मी उठू? मी उठलो की दात पाडीन.
(रामू व तो इसम यांची जुंपते, रहिमू त्यांना आवरतो व दोघांना दोन हातांनी धरतो.
**रहिमू :** हं, बोला आता, कुणाची जागा आहे ही!
**रामू :**
**इसम :** } माझी!
**रहिमू :** अरे बिनडोक लोकांनो, ही मुनशीपालटीची जागा आहे! आणि काय रे, तू आता येऊन रामूशी मारामारी करतोय काय? जा. तिकडं पड त्या कोपऱ्यात गुमान, नही तो काट डालेगा! रामू, तूही गप पड आता, नही तो जबान खेचूंगा! साला फुटपायरीवरच्या जागेसाठी भांडण करता आपसात? उद्या चाळ खाली करायला मालक येईल त्याच्याबरोबर करा काय करायचा तो तंटा! निजा आता.
**धोंडी :** (लांब पाहत) अरे बाप रे, पोलीस आला.

(सर्वजण झोपेचे सोंग घेऊन पडतात. पोलीस येतो.)

**पोलीस :** ए झोपणार, उठा! (कोणी उठत नाही असे पाहून लाठीने ढोसतो, एक एक उठतात -) काय रे काय दंगल आहे?

**रहिमू :** दंगल नाही हवालदार. आम्ही खेळत होतो.

**पोलीस :** काय खेळता रे? एक तर बेकायदेशीर रस्त्यावर निजता, आणि गडबड करता? साला उद्यापासून कोण दिसलं इथं तर याद राखा! एकेकाला चौकीवर नेऊन चार्ज करीन.

**रामू :** म्हंजी उद्यापासनं आम्ही इथं निजायचंच नाही म्हणता?

**पोलीस :** हो!

**धोंडी :** मग कुठं निजायचं?

**पोलीस :** मसणात!

**रामू :** उद्या चाळ खाली होऊन समदीच फूटपाथवर येणार हाइती. एवढ्याला जागा होईल का मसणात?

**रहिमू :** हवालदार, तुमच्या तरी चाळी बऱ्या आहेत का? तुम्ही कुठं निजता?

**पोलीस :** मसणात!

**रामू :** आम्ही इथं निजू नये असा कायदा...

**पोलीस :** मसणात! (जाऊ लागतो)

**रहिमू :** अहो, बिडी तरी वढा की, एवढ्या घाईनं कुठं चालला?

**पोलीस :** मसणात! (जातो)

**रामू :** सर्व काही मसणात! निजा रे आता.

(सर्व झोपतात. पडदा पडतो.)

## दृश्य तिसरे

(त्याच चाळीतील लोक. काही भाडेकरू बसले आहेत. त्यात पुतळा, विष्णू, रामू, धोंडी, रहिमू वगैरे आहेत. काही अजून येत आहेत. उपासे येतात.)

**उपासे :** आले का सर्व लोक? ए रामू, खाली बस.

**रहिमू :** लोक आता कुठं येताहेत हळूहळू!

**उपासे :** काय हळूहळू? उद्या पोलीस येऊन धक्के देऊ लागले म्हणजे मग? हे मजूर लोक ढिले कसे कोण जाणे! आणि हे म्हणे क्रांती करणार! अजून यांना वेळेचं महत्त्व कळेना. घराचा प्रश्न किती जिव्हाळ्याचा प्रश्न! आणि हे म्हणे येताहेत हळूहळू... जसे काय लग्नाला!

**रामू :** हं, उपासेसाहेब, करा सुरू.

**उपासे :** ए, तू मला उपासे म्हणू नको. माझं नाव गिरिजाशंकर आहे. मी कामगारांच्या मागण्या मिळाव्या म्हणून एकदा उपोषण केलं आणि या लोकांनी माझं नावच बदलून टाकलं. काय हे लोक!

**रामू :** अहो साहेब, मोटार चालवितो तो मोटारवाला, टांगा हाकणारा तो टांगेवाला –

**उपासे :** आणि झाडू मारतो तो झाडूवाला! आँ? तू पुन्हा बोलू नको. काय विष्णू, सुरू करूया का?

**विष्णू :** हो, करा जमलेच म्हणायचे सारे.

**उपासे :** अच्छा. आता आपल्यापुढे जो प्रश्न आहे तो किती गंभीर स्वरूपाचा आहे, हे मी सांगण्याची काही जरुरी नाही. ही चाळ खाली करावी अशी मालकाने पूर्वी एक नोटीस आम्हाला दिली होती. परंतु आम्ही चळवळ केली. सरकारला चौकशी कमिटी नेमावी लागली. या कमिटीने चौकशीअंती निर्णय दिला की, ही चाळ अद्याप चांगली आहे; तेव्हा मोडण्याची भीती नाही. सरकारनं मालकाला नोटीस परत घेण्याचा हुकूम दिला. मालक पराभूत झाला. आमचा विजय झाला, पण आज सरकारने आपला निर्णय बदलला आहे. तो मालकाच्या बाजूचा आहे. आम्हाला सर्व चाळ खाली करा, नाहीतर पोलिसामार्फत चाळ खाली करू, असा हुकूम काढला आहे, तेव्हा हा आमच्यावर अन्याय आहे. आपण याच्याविरुद्ध लढा केलाच पाहिजे आणि न्याय मिळविला पाहिजे. एवढे सांगून मी माझं भाषण संपवितो. (टाळ्या)

**विष्णू :** मग आपण लढा म्हणजे काय केले पाहिजे ते सांगा.

**उपासे :** आपण एकजूट केली पाहिजे. सर्व मतांचे, सर्व पक्षांचे, म्हणजे काँग्रेसवादी, समाजवादी, हिंदुमहासभावादी, लीगवादी-कम्युनिस्ट खेरीज करून - सर्व भाडेकरूंची आम्ही एकी करायला तयार आहोत.

**रहिमू :** परंतु आमी कसले भाडेकरू ते सांगाल का आम्हाला?

**उपासे :** आम्ही म्हणजे?

**रहिमू :** आम्ही म्हणजे, मी, रामू, धोंडी... आम्ही कसले भाडेकरू?

**उपासे :** तुम्ही कसले ते तुम्हाला जन्म देणारा तो देवसुद्धा सांगू शकणार नाही, मग मी कसा सांगू बरं?

**रामू :** अहो साहेब, रहिमू म्हणतो की आमच्या नावावर खोली नाही आणि फुटपाथ पण नाही, तेव्हा आम्ही कसले भाडेकरू?

**उपासे :** आमच्या दृष्टिकोनात तुम्ही बसत नाही. परंतु मार्क्सच्या शब्दात तुम्ही लुंपन म्हणजे नादार - सर्वस्व हरलेले - आहात.

**रहिमू :** अहो, पण आम्ही सर्वस्व हरवलेले कसे? मी रेल्वेत काम करतो, रामू शेतकरी आहे, आणि...

**रामू :** धोंडी तर इकडची दुनिया तिकडं ठेवतो - डोक्यावरनं!

**उपासे :** बरं, बरं. भलता वाद करू नका. आपल्यापुढं जो चाळीचा प्रश्न आहे त्याला

धरून बोला.
**विष्णू :** मग आता आपल्या प्रश्नाबद्दल काय करूया, ते तुम्हीच सांगा. तुम्हीच पुढारी आहात.
**उपासे :** हो, ते खरं आहे. परंतु इतरांचं मत काय आहे हे पाहिलं पाहिजे. हा सर्वांवरच अन्याय आहे. सरकारला आपण जाब विचारणार आहोत. तेव्हा सर्वच सांगा, काय करूया ते.
**विष्णू :** मग माझं असं मत आहे की तुम्ही आमचे पुढारी म्हणून मालकाच्या दारात दोन महिन्यांचा उपास करावा.
**उपासे :** छे, छे! भलतंच काहीतरी! दोन महिने उपवास म्हणजे काय? हे पाहा मंडळी, मी जनसेवेसाठी, मजुरांच्या राज्यासाठी, काय वाटेल ते करायला तयार आहे, पण उपवास नाही. कारण तो आमच्या कार्यक्रमातच नाही.
**रामू :** मग मागं एकदा कसा केला हो?
**उपासे :** अरे बाबा, आम्ही लढाही मानतो आणि अहिंसाही मानतो! इतकेच काय, आम्ही शंभर टक्के गांधीवादी आहोत. मी जो पूर्वी उपवास केला होता ती परिस्थिती निराळी होती. तो प्रश्नही मोठा होता. हा घराचा प्रश्न तितकासा मोठा नाही. सरकारशी व मालकाशी वाटाघाटी केल्यास हा प्रश्न सुटेल. उपवास नको!
**रहिमू :** मग आम्ही मोर्चा काढून सरकारला जाब विचारूया.
**रामू :** हो, हो, मोर्चा!
**सर्व :** मोर्चा! मोर्चा!
**उपासे :** परंतु आज परिस्थिती वाईट आहे. मोर्चा काढणं बरं नाही. आपल्या स्वराज्यात शांतता राखली पाहिजे!
**रामू :** मग लढा कसा करायचा तुम्हीच सांगा?
**उपासे :** सर्व काही करता येतं. मी म्हणतो, आपण सर्व लोकांच्या सह्यांचा अर्ज सरकारला पाठवून देऊ. याचं उत्तर काय येतं ते पाहून लढ्याच्या बाबतीत ठरवू. आता अर्ज आणि त्याचं उत्तर!
**विष्णू :** परंतु त्या अर्जाचं उत्तर कुठं येणार? कारण उद्या चाळ खाली होणार आणि आम्ही एखाद्या गटाराकडेला असणार - तिथं चाळ नंबर, खोली नंबर, काय द्यावा?
**रहिमू :** अर्जाचे उत्तर गटाराकडेला देणे असं त्यात लिहावं आणि सरकारला सांगावं, उत्तर गटारातच टाका म्हणजे आम्हाला मिळेल.
**रामू :** आपण गटाराकडे बसून त्याची वाट बघूया, म्हणजे ते येईल पोहत, पोहत.
**उपासे :** (चिडून) अरे, तुम्ही माझी काय थट्टा करता?
**विष्णू :** थट्टा नाही, पण अर्जावर पत्ता काय द्यावा?

**उपासे :** बरे, तुमचे काय म्हणणे आहे?
**सर्व :** मोर्चा! मोर्चा!
**उपासे :** अच्छा, सर्वांचे जर म्हणणे असेल तर मला कबूल आहे. परंतु एक अट आहे. ती म्हणजे आपला मोर्चा हा संपूर्ण शांततामय असला पाहिजे.
**विष्णू :** म्हणजे कसा काय?
**उपासे :** म्हणजे त्या वेळी त्या मोर्चात कुणीही बोलायचे नाही. गडबड नाही आणि बडबड नाही.
**रामू :** तुमचा जयजयकार नाही?
**उपासे :** काही नाही. घोषणा नाही, जयजयकार नाही. सायलेंट डेमॉन्स्ट्रेशन! म्हणजे मूक मोर्चा!
**रहिमू :** आणि असं ठरवूया, कुणीही बोलायचं नाही, हालायचं नाही, आणि बघायचं नाही.
**रामू :** फक्त 'आंधळ्याला पैसा दे भगवान!'
**उपासे :** काय हे लोक आहेत! कोण आहेत? आम्हीही फार जहाल आहोत, आमच्यापेक्षा कोणीही जहाल नाहीत. परंतु परिस्थिती ...
**रामू :** अहो, एखादं मढं नेतानासुद्धा लोक बेंबीच्या देठापासनं रडतात, नाही तर...
**धोंडी :** नाही तर बेंबीच्या देठापासनं भजन म्हणत्यात. आणि तुम्ही म्हणता बोलायचं नाही.
**उपासे :** हो, मी तुमचा पुढारी आहे. मला जास्त कळतं म्हणून मी म्हणतो तसंच झालं पाहिजे. सायलेंट प्रोसेशन! मूक मिरवणूक! आहे कबूल?
**विष्णू :** बरं बाबा, कबूल!
**उपासे :** ऐका तर. आत्ता ताबडतोब आपण निघायचं. सर्वांनी दोन-दोनच्या रांगेत शिस्तीने चालायचं! कोणीही कसल्याही परिस्थितीत बोलायचं नाही, जय म्हणायचा नाही, शांत चालायचं!
**रामू :** रहिमू, नीट ऐकून घे, नाही तर ग्यानबा तुकाराम करून नाचायला लागशील.
(उपासे सर्वांना रांगेत उभे करतो. मोर्चा चालू लागतो. सर्वांपुढे उपासे, त्याच्यामागे पुतळा वगैरे स्त्रिया, मागे विष्णू, रामू इत्यादी आहेत. मधून मधून एकमेकाला खुणा करून आपापसात काहीतरी सांगतात. मधला पडदा पडतो. दुसऱ्या बाजूने मिरवणूक पुन्हा स्टेजवर येते. त्यांच्या समोरून एक पोलीस इन्स्पेक्टर व ४-५ पोलीस येऊन त्यांना अडवतात.)
**उपासे :** (लोकांना खुणेने) आता काय करूया?
**रामू, रहिमू :** (खुणेने) बोलू नका.

**पोलीस इन्स्पेक्टर** : ए, कोण तुम्ही? ही मिरवणूक कसली?
**उपासे** : (लोकांना खुणेने) काय करू?
**रामू** : (खुणेने) बोंब मार.
**पोलीस इन्स्पेक्टर** : तुम्ही सरळ बोलणार, का मीच बोलवू तुम्हाला?
(उपासे खुणा करून त्याला काही सांगतो. पोलीस इन्स्पेक्टरला काहीच कळत नाही. दोघेही गोंधळून जातात. इन्स्पेक्टर चिडतो.)
**पोलीस इन्स्पेक्टर** : बारा चाळीस, काय आहे हे लफडं?
**एक पोलीस** : मला वाटतं हे सर्व ४२० वाले असावेत.
**उपासे** : (खुणेने) तसं काही नाही हो. (लोकांना) सांगू का?
**पोलीस इन्स्पेक्टर** : (मागून त्याला लाथ मारतो) काय आहे?
**उपासे** : सायलेंट प्रोसेशन. मारता का?
**रामू** : (उपासेला धक्का मारून) बोलला का?
**उपासे** : (त्याच्याकडे वळून) मूक मिरवणूक का? मला बोलणं भाग पडलं. परिस्थिती बदलली म्हणून बोलणं भाग पडलं.
**पोलीस इन्स्पेक्टर** : (त्याला आपल्याकडे फिरवून) आता माझ्याशी बोला.
**उपासे** : इन्स्पेक्टरसाहेब, आमच्यावर, म्हणजे या भाडेकरूंवर, मजूर लोकांवर अन्याय झाला आहे. म्हणून आम्ही शांततेने मिरवणूक घेऊन सरकारला विनंती करायला जात आहोत.
**पोलीस इन्स्पेक्टर** : मिरवणुकीवर बंदी आहे.
**उपासे** : (रुबाबात) तुम्हाकडे तसा लेखी हुकूम आहे का?
**पोलीस इन्स्पेक्टर** : तुम्ही मिरवणुकीची परवानगी काढली आहे का?
**उपासे** : तुम्ही आम्हाला बंदी करता ती कुठल्या कायद्यान्वये?
**पोलीस इन्स्पेक्टर** : सर्व कायद्यांच्या बापान्वये! जनता संरक्षण कायद्यान्वये, पब्लिक सिक्युरिटी ॲक्टअन्वये.
**उपासे** : यस् बरं, सकाळीच आमची चाळ खाली करण्याचा हुकूम झाला, त्याला आम्ही काय करावं?
**पोलीस इन्स्पेक्टर** : मिस्टर, ते आम्हाला विचारू नका. तुम्ही दहा मिनिटात मिरवणूक मोडून जा. नाहीतर ती आम्हाला मोडावी लागेल. आय् गिव्ह यू टेन मिनिट्स.
**उपासे** : तुमचं म्हणणं मला मान्य आहे. परंतु या दहा मिनिटात मी या लोकांना कसं समजावून सांगू?
**पोलीस इन्स्पेक्टर** : सॉरी, नो मोर दॅन दॅट.
**उपासे** : मग असं तरी करा की मंत्र्यांच्यापर्यंत मला तरी एकट्याला जाऊ द्या, म्हणजे

वाटाघाटी करता येतील.

**पोलीस इन्स्पेक्टर :** तुम्ही एकटे जाऊ शकता. पण ही मिरवणूक ताबडतोब मोडली पाहिजे.

**उपासे :** ओ.के. (लोकांना उद्देशून) कामगारबंधूंनो, आपण इथपर्यंत आलो. सरकारच्या कानावर आपले गाऱ्हाणे घालण्याचे काम पुरे झालेले आहे. आता अशी परिस्थिती आहे की आम्हाला पुढे जाता येत नाही व जाण्याचं कारण नाही.

**विष्णू :** पुढे का जाता येत नाही?

**उपासे :** कारण परिस्थिती गंभीर आहे! शिवाय तुमचा पुढारी नात्याने मी लोकमंत्र्यांना भेटू शकतो. इन्स्पेक्टरसाहेबांनी तशी परवानगीही दिली आहे. वाटाघाटीने प्रश्न सोडविणे हेच योग्य आहे. विचार करायला फक्त दहाच मिनिटं.

**पोलीस इन्स्पेक्टर :** मिस्टर, आता आठच.

**उपासे :** हो, आता तर आठच. आता विचार करण्यात अर्थ नाही. तुम्ही माझ्यावर सर्व सोपवून पुढचा घोर प्रसंग टाळण्याकरिता मागं फिरलं पाहिजे.

**पुतळा :** (पदर खोवून पुढे सरसावत) मागं फिरलं पाहिजे? म्हणजे काय केलं पाहिजे?

**उपासे :** शांततेचं रक्षण केलं पाहिजे. आता लढायचं कारण नाही. मागं फिरा.

**पुतळा :** आता मागं कुठं जाणार?

**विष्णू :** उद्या हेच पोलीस येऊन आमचं सामान बाहेर काढणार आहेत. तुम्ही आत्तापर्यंत लढा, लढा म्हणून ओरडलात. आता पळा, पळा म्हणून ओरडत आहात.

**पुतळा :** मी म्हणते आम्ही मागं जाणार नाही.

**पोलीस इन्स्पेक्टर :** आता फक्त पाचच मिनिटे आहेत.

**पुतळा :** असू दे, आम्ही पुढेच जाणार.

**विष्णू :**<br>
**रामू :** } आम्ही पुढेच जाणार.<br>
**रहिमू :**

**उपासे :** लोकहो, जे तुम्हाला पुढे जाण्याची चिथावणी देताहेत ते देशद्रोही आहेत. त्यांना तुमचं कल्याण साधायचं नसून आपला राजकीय डाव साधायचा आहे. मी तुमचा पुढारी आहे. माझ्यावर विश्वास ठेवा आणि मागं फिरा.

**सर्व :** आम्ही पुढेच जाणार!

**पोलीस इन्स्पेक्टर :** आता फक्त दोनच मिनिटं आहेत. शिपायांनो, तयार रहा.

**विष्णू :** कामगारांनो, तयार राहा!

**पुतळा :** (उपासेला) आणि पळणाऱ्यांनो, पळून जा.

(उपासे पोलीस इन्स्पेक्टरच्या कानी लागतो.
पोलीस इन्स्पेक्टर विष्णूला पकडण्यासाठी पुढे होतो.)

**उपासे :** आता अवघं एक मिनीट आहे. विचार करा नि मागं फिरा!
**सर्व :** (घोषणा) मालकाचे डाव हाणून पाडा! सरकारचे मालकधार्जिणे धोरण हाणून पाडा! परेल चाळीच्या भाडेकरूंचा विजय असो!
**पोलीस इन्स्पेक्टर :** लाठीचार्ज.
(लोक पुढेच जाऊ लागतात. उपासे त्यांना अडवू लागतो. पुतळा त्याला ढकलून बाजूला सारते. लाठीहल्ला सुरू होतो. लोक घोषणा देत पुढे जातात.)

# लोकमंत्र्यांचा दौरा

## दृश्य पहिले

*(सेक्रेटरीएटमधील एक खोली. गृहमंत्र्यांचे सेक्रेटरी श्री. घोटाळे कागदपत्र चाळण्यात दंग आहेत. शिपाई चिठ्ठी घेऊन येतो. घोटाळे ती वाचतात.)*

**घोटाळे :** कोण? गिरणी मालकसंघाचे मि. खटारिया? पाठव त्यांना आत. (शिपाई जातो. मि. खटारिया - शुद्ध खादीधारी - प्रवेश करतात.) या, या मिस्टर खटारिया, गुड मॉर्निंग!
**खटारिया :** जय हिंद, घोटाळेसाहेब.
**घोटाळे :** जय हिंद, जय हिंद!
**खटारिया :** गुड मॉर्निंग!
**घोटाळे :** गुड मॉर्निंग!
**खटारिया :** अहो सेक्रेटरीसाहेब, हा काय घोटाळा आहे! कोणतं तरी एक नक्की करा!
**घोटाळे :** घोटाळा? कसला घोटाळा?
**खटारिया :** हाच हो, मी जय हिंद म्हटलं तर तुम्ही म्हणता गुड मॉर्निंग! आमची दोघांची गाठच पडत नाही. म्हणून म्हणतो, एक काय ते नक्की करा!
**घोटाळे :** अहो, हा घोटाळा जुनाच आहे! आणि मि. खटारिया, आपली गाडी शेवटी कुठं रुळावर आली बरं?
**खटारिया :** शेवटी आली की गुड मॉर्निंगवर!
**घोटाळे :** तेच नक्की झालं आहे असं खुशाल समजा, आणि तसं वागा!
**खटारिया :** म्हणजे हो काय? आणि जय हिंद?
**घोटाळे :** स्वराज्य मिळेपर्यंत 'जय हिंद' ठीक होतं! आता स्वराज्य टिकविण्यासाठी 'गुड मॉर्निंग!' लक्षात आलं का?
**खटारिया :** नाही बुवा लक्षात आलं!
**घोटाळे :** आता तुमचं तुम्हाला कळत नाही म्हणजे कमाल झाली! अहो, सुखासाठी, शांततेसाठी, बलवान होण्यासाठी हिंदुस्थान कॉमनवेल्थमध्ये राहणार!
**खटारिया :** हो राहणार, बरं मग?

**घोटाळे :** मग काय? तिथं राणीपासून ते कुमारी पामेला माउंटबॅटनपर्यंत आणि राजापासून ते बेव्हिनपर्यंत कुणालाच 'जय हिंद' म्हणता येत नाही.
**खटारिया :** काय म्हणता मि. घोटाळे?
**घोटाळे :** अहो, खरं आहे ते! जय हिंदच्याऐवजी त्यांना 'जॉय इंड' म्हणावं लागतं आणि त्यांची तोंड कशी मुटक्यासारखी होतात!
**खटारिया :** खरंचं मि. घोटाळे, तुमचं डोकं पण डोकं आहे! अच्छा, जाऊ दे ते !
**घोटाळे :** हो, हो, बोला. तुम्ही का आला होता?
**खटारिया :** मला मंत्र्यांची भेट हवी आहे.
**घोटाळे :** मंत्र्यांची भेट? का हो, काय झालं?
**खटारिया :** अहो, बऱ्याचशा गिरण्यांमध्ये वातावरण तंग झालं आहे!
**घोटाळे :** कशामुळे बुवा?
**खटारिया :** हा रोख बोनसचा झगडा निर्माण झाला आहे ना!
**घोटाळे :** एवढंच ना? त्यात कसला झगडा आला आहे?
**घोटाळे :** अहो, साहेब, आपली वर्तमानपत्रं खोट्या कंड्या ठोकून देताहेत हे खरं! पण वस्तुस्थिती निराळी आहे. संप होण्याचा रंग आहे!
**घोटाळे :** आँ, संप! कोण करणार? कम्युनिस्ट?
**खटारिया :** अहो, ते तर जन्माला आले तेव्हा संप बरोबर घेऊनच आले आहेत. पण हे आपले साथीसुद्धा संप करणार म्हणताहेत की!
**घोटाळे :** साथी? मग संप होत नाही! मी पैज लावतो.
**खटारिया :** आता कसं सांगू तुम्हाला? तारीख पण जाहीर झाली, १६ ऑगस्ट.
**घोटाळे :** हो. पण मी सांगतो, त्या १६ ऑगस्टची २ मार्च झाल्याशिवाय राहत नाही. ये रे माझ्या मागल्या आणि ताक कण्या चांगल्या! मग हरभरे कोण फोडणार?
**खटारिया :** पण हे कम्युनिस्ट आहेत ना लोखंडाचे हरभरे फोडणारे! संपाची घोषणा देणारे देतील आणि ती घेऊन हे कम्युनिस्ट पुढं जातील; मग?
**घोटाळे :** पण ही घोषणा देणारे गरीब गाय आहेत!
**खटारिया :** तेच म्हणतो ना मी! संप झाल्यावर ही गाय बसेल रवंथ करीत आणि संपाचा वाघ बसेल आमच्या मानेवर!
**घोटाळे :** पण सांगितलं ना संप होत नाही म्हणून?
**खटारिया :** हो, पण मला हे सर्व मंत्र्यांच्या कानावर घालायचं आहे.
**घोटाळे :** पण मंत्री आज भेटणार नाहीत तुम्हाला.
**खटारिया :** का हो? कारण काय?
**घोटाळे :** कारण ते हल्ली दौऱ्यावर आहेत.

**खटारिया :** अहो, पण मी सकाळी वाचलं, की दुपारी येणार म्हणून!

**घोटाळे :** आणि त्याच्याच खाली का नाही वाचलंत की ते तिसऱ्या प्रहरी परत दौऱ्यावर जाणार म्हणून?

**खटारिया :** मग हो, मी आता काय करू?

**घोटाळे :** काही करू नका. मी कळवतो तुम्ही आला होता म्हणून. नंतर हवं तर फोनवर बोला. झालं? जा आता.

**खटारिया :** बरं, पण त्यांना या संपाबद्दलही सांगून ठेवा.

**घोटाळे :** हो, ते सांगतो. पण तुम्ही उगीच घाबरू नका! संप होत नाही.

**खटारिया :** अहो पण, जर कामगारांनीच ठरवलं संप करायचं तर?

**घोटाळे :** मग नक्कीच होणार! पण घाबरून जाऊ नका. अच्छा, नमस्ते.

(श्री. खटारिया जातात. शिपाई पुन्हा चिठ्ठी आणतो.)

हे कोण आणि? गिरणी कामगारांचे प्रतिनिधी-मंडळ! (शिपायास) त्यांना म्हणावं सर्व मंडळ आत नको, फक्त एक माणूस पाठवा. हो.

(विष्णू, एक गिरणी कामगार, प्रवेश करतो.)

**विष्णू :** रामराम साहेब!

**घोटाळे :** जय हिंद, कोण रे बाबा तू?

**विष्णू :** मी? विष्णू अप्पा धुमाळ.

**घोटाळे :** तू धुमाळ असं नाहीतर धुमधडाके अस. तू आलाहेस का?

**विष्णू :** मी? मंत्र्यांना भेटाय आलोय.

**घोटाळे :** मंत्र्यांना भेटायला? काय रे, जो तो उठल्यासुटल्या मंत्र्यांना भेटायला येतो याचं नाव काय? तू का भेटणार त्यांना?

**विष्णू :** सहज, थोडं काम आहे.

**घोटाळे :** सहज म्हणजे? हे सेक्रेटरीएट आहे की चौपाटी? काय, समजता काय तुम्ही? भेळवाला आणि मंत्री काय एक आहेत? आँ, जरा काही झालं की निघाले!

**विष्णू :** साहेब, उगीच भडकून जाऊ नका. मंत्री भेटणार का नाही ते सांगा.

**घोटाळे :** शक्य नाही. भेटणार नाहीत.

**विष्णू :** का हो, का भेटणार नाहीत? मी युनियनचा माणूस आहे. माझ्यासंगं नीट बोला.

**घोटाळे :** असशील, माझं काय करणार तू? काय इथं संप करणार आहेस?

**विष्णू :** हे बघा, युनियनचं हापीस सोडून सगळ्या ठिकाणी संप करता येतो. संप काय नवीन न्हाई. ज्या दिशी भांडवलशाही जन्माला आली त्याच दिशी संप जन्माला आला. आणि त्याच दिवसापासनं भांडवलदार नि त्यांची पिल्लं यास्नी त्याची भीती

पडलीया!

**घोटाळे :** काय बोलतोस हे? मी काय भांडवलशाहीचं पिल्लू आहे?

**विष्णू :** तुम्हाला कशाला म्हणू? जे कोण संपाला भित्यात त्यास्नी म्हटलं हो.

**घोटाळे :** बरं, तुझं तत्त्वज्ञान राहू दे. मंत्र्यांची भेट होणार नाही. तू जा.

**विष्णू :** अहो, पण भेट का होणार नाही?

**घोटाळे :** ते दौऱ्यावर आहेत!

**विष्णू :** पर, आज येणार म्हणत्यात—

**घोटाळे :** हो, येणार आणि परत जाणार.

**विष्णू :** मग, गेल्यावर परत येणार का-?

**घोटाळे :** येणार. पण पुन्हा जाणार!

**विष्णू :** म्हणजे सारखं दौऱ्यावरच?

**घोटाळे :** अरे बाबा, अलीकडं काम फारच वाढलं आहे ना?

**विष्णू :** काम? कसलं हो?

**घोटाळे :** दौऱ्याचं! आणि कसलं?

**विष्णू :** मग मी काय करू?

**घोटाळे :** तूही दौरा काढ - मंत्र्यांच्या भेटीचा!

**विष्णू :** म्हंजी, पोलीसमंत्री, मजूरमंत्री, उद्योगमंत्री, मच्छिमारमंत्री, दारूमंत्री सारेच दौऱ्यावर गेल्यात म्हणता?

**घोटाळे :** अरे बाबा, सगळे आपापल्या दौऱ्यावर आहेत. का उगाच डोकेफोड करतो आहेस? बाकीच्यांशी तुला काय करायचं आहे रे? मी मगरचंदजींचा सेक्रेटरी आहे नि ते तुला भेटणार नाहीत. जा आता. (दोघेही जातात.)

## दृश्य दुसरे

*(मंत्री मगरचंदजी यांची सेक्रेटरीएटमधील खोली. मगरचंदजी प्रवेश करतो.)*

**मगरचंद :** आम्ही अहिंसावादी, सत्याचे पालन करणार ॥धृ.॥

राज्यधुरा भारी । घेऊन मानेवरी । आम्ही अखंड ओढीत नेणार ॥१॥
नव्या भारताला चढवू वैभवाला । झाडे लावायचा करूनी निर्धार ॥२॥

निरमू नवा मनू । इथं गोकुळ आणू ।
साऱ्या लोकांना निरा ही पाजणार ॥३॥
सत्यमेव जयती । या ध्येयावरती ।
श्रद्धा ठेवून हळू, हळू चालणार ॥४॥

**घोटाळे :** (बऱ्याचशा फायली काखेत घेऊन घाइघाईने प्रवेशतो) जय हिंद, सर.

**मगरचंद :** जय हिंद! काय मि. घोटाळे, कसं काय चाललं आहे मुंबापुरीत? काय बातमी?

**घोटाळे :** आज सर, सर्व गटारं तुंबून सारी घाण उफाळून वर येत आहे!

**मगरचंद :** आँ! घाण? म्हणजे काय?

**घोटाळे :** म्हणजे सर, गटारं तुंबली! झाडू कामगार काही नमतं घेत नाहीत आणि ही घाण काही कमी होत नाही!

**मगरचंद :** ते समजलं हो, पण हे म्युनिसिपल कमिशनर काय करतात हल्ली?

**घोटाळे :** ते रोज पत्रकं काढतात!

**मगरचंद :** कसली?

**घोटाळे :** हीच, 'संप परिस्थिती कायम, घाण पूर्ववत!' पण आजच्या पत्रकात मात्र ते म्हणताहेत की, 'आम्ही काही झालं तरी मलबार हिलकडं घाण होऊ देणार नाही. वाटेल ते करून सर्व गटारं साफ करू!'

**मगरचंद :** मग चिंता नाही. पण काय हो, म्युनिसिपल कमिशनर ह्या संपवाल्यांचा बंदोबस्त करताहेत की नाही? किती दिवस घाण पडून राहणार ही?

**घोटाळे :** सर, इथं आपली घाण आहे तोपर्यंत!

**मगरचंद :** घोटाळे, माझी घाण म्हणता?

**घोटाळे :** सॉरी सर, तसं नव्हे, 'लोक घाण करतात तोपर्यंत' असं मला म्हणायचं होतं!

**मगरचंद :** जरा नीट बोलत चला. मी म्हणतो, या संपवाल्यांच्या विरुद्ध हे म्युनिसिपल कमिशनर काही जालीम उपाय करणार आहेत, की साऱ्या शहरात घाण साचू देणार आहेत?

**घोटाळे :** त्यांनी हजारो पत्रकं काढून संपवाल्यांना बजावलं की, 'कामावर या, मग मागण्यांचा विचार करू;' 'संप केला ही चूक झाली असं लिहून द्या;' 'कामावर या; नाही तर राहत्या चाळीतून बाहेर काढू.' पण काहीच आराम नाही.

**मगरचंद :** काहीच उपयोग झाला नाही म्हणता?

**घोटाळे :** शिवाय आतापर्यंत आपल्या खात्यानं सातशे संपवाले पकडून तुरुंगात टाकले आहेत. कित्येकांना जबर शिक्षाही ठोठावल्या आहेत, पण कोणीच भीत नाही. संप पूर्ववत!

**मगरचंद :** बस्! आता हस्तक्षेप केलाच पाहिजे! असल्या हेकेखोरांची गय करता कामा नये. सर्वांनाच पकडून तुरुंगात टाकलं पाहिजे!

**घोटाळे :** म्हणजे, सर्व आठ हजार कामगारांना? पण मग जास्तच घाण होण्याची शक्यता आहे सर!

**मगरचंद :** नाही तरी आता कुठं ते काम करताहेत? आम्ही अशा लोकांची पर्वा करीत

नाही. होऊ दे किती घाण होते ती. आम्हीही काही कमी नाही! वेळीप्रसंगी आम्ही स्वत: झाडू घेऊन रस्त्यात येऊ!

**घोटाळे** : आम्ही म्हणजे कोण? मला समजलं नाही सर.

**मगरचंद** : आम्ही म्हणजे सर्व अधिकारी, सर्व आमदार, सर्व मंत्री आणि तुम्हीसुद्धा!

**घोटाळे** : मी! छे, छे, सर! खरं सांगतो, मी जन्मात कधीच लंगोटी लावून गटारात उतरलो नाही!

**मगरचंद** : म्हणजे, आम्ही उतरलो होतो असं तुम्हाला म्हणायचं आहे काय?

**घोटाळे** : तसं नाही सर - पण -

**मगरचंद** : ते काही नाही. तुम्हालाही झाडू मारावा लागेल! मारणार की नाही?

**घोटाळे** : ओ. के. सर!

**मगरचंद** : ठीक. आणखी काय विशेष?

**घोटाळे** : परवा आपल्या गैरहजेरीत लोकांनी राजबंद्यांना पाठिंबा देण्याकरता एक मिरवणूक काढली होती. तिच्यावर गोळीबार झाला.

**मगरचंद** : किती मेले?

**घोटाळे** : एकच, भिकू कुवेकर नावाचा.

**मगरचंद** : फक्त एकच? ठीक झालं! हे लोक पोलिसांवर हल्ला करतात, बंदूक हिसकावून घेतात, म्हणजे काय?

**घोटाळे** : पण सर, एका संपादकानं गोळीबाराच्या चौकशीची मागणी करताना लिहिलं आहे की, 'मृत इसमाच्या पाठीत गोळी लागली आहे त्या अर्थी त्यानं पोलिसांवर हल्ला केलाच नाही.'

**मगरचंद** : पाठीत गोळी लागली म्हणून काय झालं? त्यानं पोलिसांवर हल्ला केला नाही असं कसं म्हणता येईल? तो कम्युनिस्ट होता!

**घोटाळे** : बरोबर सर, कम्युनिस्ट कसा वाटेल तसा हल्ला करू शकतात. कोणी सांगावं? कदाचित पाठीनं हल्ला करायची नवी पद्धत त्यांनी सुरू केली असेल!

**मगरचंद** : घोटाळे, मला ह्या कम्युनिस्टांची भीतीच वाटते. आमचं पोलीस खातंही ढिलं आहे!

**घोटाळे** : सर्वांनाच पकडून घालावं तुरुंगात!

**मगरचंद** : घोटाळे, काय म्हणता? पोलिसांना -

**घोटाळे** : सॉरी सर, मला वाटलं तुम्हाला तसं वाटतं!

**मगरचंद** : तुम्हाला तसं कसं वाटलं? उद्या मलाही तुरुंगात घालावंसं वाटेल!

**घोटाळे** : छे, छे सर, तसं कसं वाटेल!

**मगरचंद** : तुम्हाला पुढं पुढं बोलायची फार सवय लागली आहे त्याचा हा परिणाम.

अच्छा, उद्याचा आमचा कार्यक्रम बोला.

**घोटाळे** : (डायरी चाळीत) उद्या वृक्षारोपण दिनानिमित्त आपला दौरा.

**मगरचंद** : कोणत्या गावी?

**घोटाळे** : इथंच, मुंबईत. कामगार वस्तीत तीन व्याख्याने.

**मगरचंद** : आलं लक्षात. पण व्याख्यानाचा विषय कोणता?

**घोटाळे** : विषय आपला नेहमीचाच - 'राम व्हा!'

**मगरचंद** : हो, हो, खरं आहे. प्रत्येक हिंदी माणसानं राम झालं पहिजे. प्रत्येक स्त्रीनं सीता झालं पाहिजे. तरच देशात खरी शांतता नांदेल, रामराज्य निर्माण होईल! बरं आहे घोटाळे, सगळा कार्यक्रम नक्की करून मला फोनवर कळवा. जय हिंद! (जातात.)

**घोटाळे** : राम व्हा! राम व्हा!

राम व्हा हिंदवासी सारे । बोल मंत्र्यांचे ऐका रे ॥धृ.॥
भरतासम बसा ठाण मांडुनी । किंवा भटका वल्कले नेसुनी ।
लक्ष्मणाचा आदर्श ठेवुनी । उपवासी राहा कंबर बांधुनी ।
वनामध्ये वणवण फिरणारे! बोल मंत्र्यांचे ऐका रे ॥१॥
लंकापतिसम रावण व्हा कुणी । बिभीषणासम घरभेदे कुणी ।
कुंभकर्णापरी स्वस्थ झोपुनी । सारे सोडूनी लोळत राहा कुणी ।
सहा, सहा महिने झोपणारे । बोल मंत्र्यांचे ऐका रे ॥२॥
अठरा पद्मे वानर होऊनी । कंदमुळे खा बारिक चावूनी ।
रामभक्तीचे सुव्रत घेऊनी । हळू, हळू या कुणी मारुती होऊनी ।
पुच्छाने लंका जाळणारे । बोल मंत्र्यांचे ऐका रे ॥३॥
ना तरी कर्फ्यु ऑर्डर येईल । इकडून गोळी तिकडे जाईल ।
गुंडा कायदा पिच्छा पुरवील । येरवड्याला घेऊनी जाईल ।
दळाया लावील हरबरे । बोल मंत्र्यांचे ऐका रे ॥४॥

## दृश्य तिसरे

*(कामगारवस्तीतील विष्णूची खोली. विष्णू एकटाच बसलेला आहे. त्याचा भाऊ हणमू खेड्याहून येतो.)*

**विष्णू** : आँ ऽ ऽ, कोण हणमू! अरं कवा आलास?

**हणमू** : हा आत्ताच येतोय न्हवं का!

**विष्णू** : अरं मर्दा, म्होरं पत्रबित्र घालायचं नाही व्हय?

**हणमू** : न्हाई घातलं, आलो तसाच. बरं, कसं काय, बरा हाईस न्हवं?

**विष्णू :** हां, मी बरा हाय हिकडं, पर गावाकडची मानसं कशी काय?
**हणमू :** अक्षी खुशाल समदी. मजेत हायती!
**विष्णू :** बरं, पाऊसपाणी कसं काय? नि तू असा एकाएकी उठून कां आलास?
**हणमू :** का म्हंजी? अरं तिकडं ना काम, ना अन्न. होती सोबत, आलो झालं. रोज उठून त्या सावकाराला तरी काय सांगू? तू मार सांगून आला हुतास बुर्नुसाच्या पगाराला पैसं धाडतो म्हणून! पर बुर्नुस राह्यला तुझ्यापाशी नि सावकारानं तिकडं हुंबऱ्याची सालं काढली. बाकी तुमाला काय काळजी म्हना आमची! ह्या म्हमईच्या वाकड्या नळाचं पानी पिऊन तुमची अक्कल बी वाकडीच चालती!
**विष्णू :** अरं पर मी तरी काय करू, माझा बोनस झालाच न्हाई तर?
(समोर हॉटेलवाल्याला टाळी वाजवून खुणेने दोन सिंगल चहा पाठवायला सांगतो.)
**हणमू :** झालाच न्हाय म्हंजी, उगवूनच आला न्हाई का काय? चांगली तारीख पन सांगून आला होतास!
**विष्णू :** हो, पण आता तारीख पुढं गेली.
**हणमू :** पुढं? किती दिवस?
**विष्णू :** आजपासनं धा वर्सं!
**हणमू :** अरं, अरं! काय म्हनतोस? धा वर्सं? का रे?
**विष्णू :** सरकार म्हनतं, आता तिकटी घ्या. आणि धा वर्सानं पैसं!
**हणमू :** आनि त्या तिकटी घेऊन चाटायच्या का पेटवायच्या? आमी सावकाराला काय सांगावं नि खावं काय?
**विष्णू :** सावकाराला सांगायचं जप्ती आण म्हणून, नि खायाची भाकरी!
**हणमू :** आनि भाकरीला दानं?
**विष्णू :** दान नसलं तर शेंगदाणं!
**हणमू :** ते रं कुटनं आणावं?
**विष्णू :** ते नसलं तर कंदमुळं!
**हणमू :** ए ऽ शाण्या, रानात कंद असतं तर समदी वांडरं गावात का शिरली असती घरावरली कौलं फोडाय?
**विष्णू :** कंदमुळं नसली तर पेंड खावावी!
**हणमू :** अरं, काय तुझं डोस्कं बिस्कं फिरलंय काय? तरी बरं, पेंडीवरच थांबलास! कडबा, गवात खायाला सांगितलं न्हाईस?
**विष्णू :** अरं, पर हे समदं खाया मी कुठं सांगतोय? सरकार सांगतंय ते म्हणालो मी!
**हणमू :** काय, खरं म्हनतोस काय? सरकार मानसाला पेंड खाया सांगतंय?
**विष्णू :** अरं, आईच्या रक्ताशपत. समदं खरं सांगतोय मी.

**हणमू :** मग मातर हाद झाली गड्या! हे सरकार पार तराकलंय वाटतं. मला वाटत हुतं खेड्यावर आमचंच हाल व्हत्यात नि तुमी हिकडं चैनीत हाइसा. पर मर्दा, तुमचं बी आमच्यावानीच हाय की!

**विष्णू :** अरं बाबा तुमचं बरं, तुमच्या मागं एकच पीडा हाय. पर हतं आमच्या मागं कैक पीडा हात धुऊन लागल्यात!

*(चहावाला पोऱ्या चहा आणतो. दोघं चहा पितात. इतक्यात शेजारच्या चाळीत राहाणारे त्यांच्याच गावचे रामू व सदू हे कामगार येतात.)*

**रामू, सदू :** आँ, कोण हणमूदादा? कवा आलास गा! रामराम.

**हणमू :** झालं घटकाभर. काय रामभाऊ, सदबा, कसं काय? बरं हाइसा न्हवं?

**रामू :** आमी बरं हाय गा. पर गावाकडं आमची मानसं कशी काय?

**सदू :** आनि आमची मानसं गा? सत्त्या भेटलाता येताना?

**रामू :** आमची म्हातारी आजारी व्हती म्हनं. कशी काय आता?

**हणमू :** हे बगा, समदा गाव खुशाल हाय. बिनघोरी असा, काळजी करू नका.

**रामू :** बरं सांगावा, बिंगावा काय?

**हणमू :** म्हातारीनं काय सांगावा दिलाय काय गा?

**हणमू :** सांगावा समद्यांचा एकच. जिवाला जपून न्हावा नि ताबडतोब पैसं पाठवा! तिकडं अन्न न्हाई मानसास्नी. लेकानु पैसं पाठवा की! पैसं धाडायचं न्हाईत नि बिघाभर त्वांड पसरून इचारायचं, 'मानसं कशी ऽ हाई ऽ त?'

**रामू :** अगा, पर आमी तरी काय करणार, बोनसच मिळंना तर?

**हणमू :** मिळंना म्हणून काय सांगता? घ्या की हिसकून.

**रामू :** पर सरकार म्हनतंय तिकिटं घ्या. पैसं धा वर्सानं!

**हणमू :** अरं धा वर्सानं कशाला? का मेल्यावर दिसाचं जेवाण घालाय? अरं, भांडाण करा की सरकारबरुबर. काय धर्माला देतंय?

**विष्णू :** भांडाण कसं करावं? सरकार आपलं हाय म्हनत्यात!

**हणमू :** आपलं कसं? आमचं पैसं आमाला देईनात; ते सरकार आमचं कसं?

**विष्णू :** आपलं न्हाई म्हणशील तर गोळी!

**हणमू :** आनि आपलं म्हनावं तर होळी!

**विष्णू :** होळी, शिमगा काय म्हणू नकंस? आता स्वराज्य आलंय, पेंड खाऊन दिवाळी साजरी करायची!

**हणमू :** ए ऽ सवराज! आरं, तुमच्या तोंडाचं वाळून चिचुकं झालं, तुमच्या अंगावर मीठ बांधाय चिंधी न्हाई. मग हे सवराज हाय कुटं?

**विष्णू :** ते मलबार हिलवर येऊन बसलंय!

**सदू :** खरंच गड्या!

**हणमू :** अरं पर हिकडं, तुमाकडं कवा येणार? आनि ते जर अजून तुमाकडं ईना तर आमाकडं, खेड्यांवर कवासं येणार? का तेला गर्दीत गाडीच मिळंना?

**विष्णू :** अरं, ईल की बेताबेतानं, अजून तेला खरंच गाडी मिळंना!

**हणमू :** काय, गाडी मिळंना? अरं, दोन वर्सात छकडा की आला असता म्हमइस्नं खेड्यापतर!

**विष्णू :** सांगू का? खरं हे सवराज छकड्यात बसलंय. आणि त्यो छकडा बी भलतीकडंच निघालाय बघ!

**रामू :** अरं कुणीकडं?

**विष्णू :** ह्यो छकडा हळू, हळू निघालाय!

**हणमू :** अरं पर कुणीकडं निघालाय?

**विष्णू :** ऐक.

दमानं हळू हळू निघाला छकडा ।
नागमोडीनं रखडत वाकडा ।।धृ.।।
हा छकडा पहिलाच जुना । ॲटलीने रंगवून पुन्हा ।
आंदण दिला नेहरूंना । बजाविले, 'सांगा लोकांना, ।
हेचि स्वराज्य,' सवाल रोकडा ।। दमानं... ।।१।।
बसले काँग्रेसचे मंत्री आत । घालुन राजाच्या हातात हात ।
हुकूमशाही चाबुक फिरवीत । लोकहिताचे गाणे गात ।
लोकशाहीचा चढवून मुखडा ।। दमानं... ।।२।।
बैल टाटा नि बिर्ला दोन । मानेवरती शिवाळ घेऊन ।
छकडा ओढिती जीव लावून । लंडनच्या थेट मार्गानं ।
खाया टूमनची वैरण पाखडा ।। दमानं... ।।३।।
देश लोकशाहीसाठी लढतो । शेतकरी जमीन मागतो ।
ठायी ठायी चढाई करतो । पुढे कामगार गर्जतो ।
कान पकडून द्यावया हासडा ।। दमानं... ।।४।।

(गाणे संपते न संपते तोच मि. घोटाळे ऐटीत प्रवेश करतात.)

**घोटाळे :** जय हिंद मंडळी, काय अगदी थवा करून बसला आहात! काय विचार चालला आहे? (कोणीही बोलत नाही. त्याच्याकडे पाहत राहतात.) अरे, बोलत का नाही तुम्ही? आणि तसे पाहता काय माझ्याकडं? मी काय सोंग आणलं आहे?

**हणमू :** (विष्णूला खोचरून) कोण रं हे?

**विष्णू :** तुला सांगितलं न्हवं आमच्या मागं लई पीडा हाइती म्हणून? त्यातली ही एक.

**घोटाळे :** काय रे, इकडे मंत्रीबिंत्री आले होते का?
**हणमू :** कसल्या वानाचं हायती ते?
**घोटाळे :** तुला वाण सांगू? आणि काय? शिंगं, शेपटी! तुला काय वाटलं माझा बैल चुकला आहे? नांगरगट्ट्याच दिसतो आहेस!
**विष्णू :** अहो, तुमीच तसं विचारलं तर तेनं तरी काय करावं?
**घोटाळे :** मी काय विचारलं रे? मी काय बैल विचारला, तेव्हा हा वाण विचारतो?
**रामू :** अहो साहेब, ह्यो शेतकरी हाय. आणि खेड्यावर अशीच रीत हाय बोलायची.
**घोटाळे :** अरे वा रे रीतवाला! म्हणजे माणसाला काय वाटेल ते म्हणता येतं का खेड्यावर?
**सदू :** ते जाऊ द्या साहेब, पण आपण कोण?
**घोटाळे :** म्हणजे? मला तुम्ही ओळखत नाही? सगळा गाव मला ओळखतो!
**रामू :** पर आमी वळखीत नाही. सांगून टाका कोण ते.
**घोटाळे :** अरे, मी सरकारचा सेक्रेटरी आहे ए. के. घोटाळे. समजलं?
**विष्णू :** आता आलं ध्यानात. महादेवाच्या नंदीवानी, मंत्र्यांना भेटायच्या आदी तुमाला भेटावं लागतं न्हाई का?
**घोटाळे :** (आठवण होऊन) अरे हो, तुम्ही ते संपवाले मिस्टर- मिस्टर धुमधडाके नाही का? बरी गाठ पडली. हे पाहा, आज वृक्षारोपण दिनानिमित्त नामदार मगरचंदजी इकडे येणार आहेत. आज राष्ट्रोन्नतीसाठी काय केले पाहिजे, तुम्ही कामगारांची कर्तव्ये कोणती वगैरे गोष्टी ते समजावून सांगणार आहेत. त्यांचे भाषण नीट ऐकून घ्या. आणि मिस्टर, तुम्ही संपाबद्दल वगैरे इथं काही बोलू नका बरं का!
**हणमू :** ए विष्णू, हे मंत्री म्हणजे कोण रे?
**विष्णू :** अरे, ती एक तिसरी पीडा! ऐक उगंच.
**सदू :** अरं, आलं वाटतं मंत्री.

(ना. मगरचंदजी येतात. त्यांच्याबरोबर आणखी काही कामगार, काही खादीधारी दे.भ. व काही पोलीस येतात.)

**मगरचंद :** जय हिंद कामगार मंडळी.
**सर्व कामगार :** रामराम!
**घोटाळे :** मंडळी, हे आपले लोकमंत्री नामदार मगरचंदजी. आणि हे -
**विष्णू :** मी, विष्णू अप्पा धुमाळ. ह्यो माझा भाऊ हणमू, ह्यो रामू वाघमारे, ह्यो सदू चव्हाण —
**मगरचंद :** मंडळी, आज आम्ही वेळात वेळ काढून मुद्दाम तुमच्या चाळींना भेट द्यायला आलो. कारण आजचा हा वृक्षारोपण दिन अत्यंत महत्त्वाचा आहे. आता स्वराज्य आलेलं

आहे - तुम्ही लोकमंत्र्यावर म्हणजे तुमच्या मंत्र्यावर विश्वास ठेवून वागलं पाहिजे. आजचे हे संप - हरताळ बंद केले पाहिजेत. कमी खाऊन जास्त काम केलं पाहिजे. तुम्ही शिस्त, शांतता, कायदा यांचं पालन केलं पाहिजे. सत्य-अहिंसेचं पालन करून देशातल्या प्रत्येक माणसानं राम बनलं पाहिजे. आणि ह्या रामराज्याचं रक्षण केलं पाहिजे.

**विष्णू :** ते आलं लक्षात, पण आम्ही काय करावं ते जरा नीट सांगा.

**मगरचंद :** वा, वा, छान प्रश्न विचारलात. आजच्या परिस्थितीत कामगारांची - साऱ्या जनतेची कर्तव्ये सांगतो. ती शांतपणे ऐकून घ्या —

बोल आमुचे लक्षात ठेवा । तुम्ही झाडे लावा ।

बाग फुलवाया राष्ट्राची । सुखी होईल पिढी पुढची ।।१।।

**घोटाळे :** तुमची पोरबाळं सुखी व्हायला पाहिजेत ना? मग झाडे लावा!

**मगरचंद :** मिळेल लाकूड घर बांधाया । सर्पण जाळाया ।

फळे येतील मधुर खावया । विसाव्यासाठी थंड छाया ।

**घोटाळे :** झाडांच्या सावलीत झोपायला सुद्धा हरकत नाही. घरटंचाईचाही प्रश्न सुटेल!

**विष्णू :** म्हणजे झाडंच लावायची म्हनता?

**घोटाळे :** हो, हो. खुशाल! जेवढी जास्त झाडं लावली जातील तेवढा आपला देश वैभवशाली होणार आहे!

**हणमू :** अवं पर कुटं लावायची झाडं?

**घोटाळे :** कुठं म्हणजे? जागा दिसेल तिथं!

**विष्णू :** असं का? हं, चल हणमू, रामू, घ्या ते टिकावं हिकडं! (रामू आतून टिकावं आणतो.) हं, पाडा हितं डबरा!

**घोटाळे :** अरे, अरे थांबा, ऐका-

**रामू :** आता का थांबा? झाडंच लावायची तर होऊन जाऊ द्या की!

(टिकाव उचलतो.)

**घोटाळे :** अरे, पण ती म्युनिसिपालटीची जागा आहे. म्युनिसिपालटी काय म्हणेल?

**विष्णू :** ती काय म्हणंना, आम्ही तुमचं नाव सांगणार! हं, व्हली रामू!

**घोटाळे :** अरे, पण मी कुठं सांगितलं तुम्हाला असं करा म्हणून?

**हणमू :** (मंत्र्याकडे बोट करून) मग ह्या साहेबाचं नाव सांगू. उकर तू रामू.

**मंत्री :** हे पाहा झाडं लावायची, पण ती इथं नव्हे. रानात, शेतात.

**विष्णू :** मग हितं आमाला का सांगता?

**घोटाळे :** अरे, प्रचार करायचा आहे म्हणून. आज वृक्षारोपण दिन आहे!

**मगरचंद :** आमच्या घोषणांची अशी टिंगल करू नका. विचार करा —

नका जाऊ उगाच भडकून । शांत राहून ।
स्वराज्याचे करावे रक्षण । वक्त आला आहे दारुण ॥३॥

**घोटाळे :** हो, देशात आणीबाणीची परिस्थिती निर्माण झाली आहे तेव्हा लोकांनी शांत राहून सर्व काही केलं पाहिजे!

**विष्णू :** म्हणजे काय केलं पाहिजे?

**मगरचंद :** तुम्ही अधिक धान्य पिकवा । शांतता टिकवा ।
आम्हाला देऊनी आधार । समजुनी आपले सरकार ॥४॥

आज उत्पादन वाढवण्यावर सर्व राष्ट्राचे जगणे, मरणे अवलंबून आहे. प्रत्येकाने अधिक धान्य पिकवले पाहिजे! प्रत्येकाने अधिक काम केले पाहिजे, तरच आपण आपले स्वराज्य टिकवू शकतो. नाही तर सर्वनाश!

**हणमू :** पण साहेब, मला रानात शेत न्हाई आणि गावात घर न्हाई. मग मी अधिक धान्य कुठं पिकवायचं ते सांगा!

**घोटाळे :** आजपर्यंत कुठं काम करीत होतास?

**हणमू :** लोकांच्या जमनीवर, म्हंजी जमीनदार, सावकारांच्या शेतावर.

**घोटाळे :** मग तिथंच, - पण अधिक!

**हणमू :** हे बघा, पटत न्हाई मला. शेतावर मजुरी देत्यात सहा आणे, लईतर आठ आणे. तवा आम्हाला जमीन मिळाल्याशिवाय आमचं पोट काय भरणार न्हाई आनि पोटभर अन्न मिळाल्याशिवाय अधिक धान्य काय पिकणार न्हाई!

**मगरचंद :** तुम्हाला जमीन आम्ही एकाएकी कुठली देणार?

**घोटाळे :** काय जमीन आम्ही खिशात घेऊन फिरतो आहो?

**हणमू :** अहो, जेंच्या घरात पाचशे, हजार-हजार एकर हाय ती घेऊन आमाला जर दिली —

**मगरचंद :** म्हणजे जमीनदारशाही नाहीशी करायची. तोही विचार आहे आमचा, पण त्यांना कोट्यवधी रुपये नुकसानभरपाई द्यावी लागणार आणि सरकारजवळ तेवढा पैसा नाही. तेव्हा ते हळू हळू होईल. परंतु आज...

**घोटाळे :** अधिक धान्य पिकवलं पाहिजे!

**विष्णू :** अहो, पर ते कुठं पिकवायचं?

**घोटाळे :** कुठं म्हणून काय विचारता? शेतात, बागेत, परसात, अंगणात, इतकंच नव्हे व्हरांड्यात, गॅलरीत, गच्चीवर कुठंही पिकवा!

**हणमू :** आँ! व्हरांड्यात, गॅलरीत?

**घोटाळे :** तुम्हाला माहीत नाही? अहो, स्वत: मगरचंदजींनी आपल्या बंगल्यावर व्हरांड्यात, मोठमोठ्या पेटाऱ्यात-खोक्यात, - गहू पेरला आहे, गॅलरीत कुंड्यांमध्ये भात

पेरलं आहे!

**विष्णू :** खरं म्हणता?

**मगरचंद :** खरं आहे. मीच काय? आपले पंतप्रधान जवाहरलाल नेहरू यांनी सुद्धा आपल्या बागेत गहू पेरला आहे. सर्व कुंड्यांमधील फुलझाडं काढून टाकून त्यात रताळी, कांदे आणि बटाटे लावले आहेत. हे सर्व स्वत: आपल्या हातानं केलं त्यांनी.

**घोटाळे :** इतकंच काय, बंगल्याच्या गच्चीवर भुईमूग करणार आहेत ते.

**मगरचंद :** घोटाळे-

**घोटाळे :** सॉरी सर!

**रामू :** अहो, आम्हाला झोपायला जागा नाही, फुटपायरीला पडावं लागतं आनि हे खोकं, कुंड्या कुठं ठेवायच्या?

**घोटाळे :** आड्याला टांगा!

**मगरचंद :** ऐका नेहमीचे बोल । सत्य बिनमोल ।
कसे राष्ट्राला तारावे । सर्वांनी अन्न कमी खावे ॥५॥

**विष्णू :** म्हंजी, - झाडे लावा, अधिक धान्य पिकवा-

**घोटाळे :** आणि तिसरी घोषणा, 'कमी खा'! आजच्या परिस्थितीत 'कमी खा' ही आमची घोषणा अगदी रामबाण आहे!

**हणमू :** आँऽऽ कमी खाऊन जास्ती काम कसं करायचं? अहो, पोटभर वैरण नसली तर बैलसुद्धा गाडी वडीत न्हाई. आमी तर माणसं!

**मगरचंद :** ते खरं आहे, पण बचत केली पाहिजे, देशाला आज अधिक धान्य पाहिजे!

**घोटाळे :** माणसं नसली तरी चालेल!

**मगरचंद :** घोटाळे, घोटाळा करू नका!

**विष्णू :** पर आज जे मिळतंय तेनंच पोट भरंना. आणि कमी कसं खावं आणि बचत तरी कशी करावी?

**सदू :** काय आपलं खाऊच नये! ते तरी सांगा.

**मगरचंद :** वा, तसं कोण म्हणेल? खाल्लंच पाहिजे. पण –
खा अळू, कंदमुळे, रताळी । शेंगदाणे, केळी ।
वाचवा तांदूळ या समया । कचरू नका खूप पेंड खाया ॥६॥

**घोटाळे :** हो, हो. अळवाची भाजी आरोग्याला फारच चांगली. ती रोज खा. शिवाय रताळी, केळी खा - पेंड खा!

**हणमू :** आणि बैल व्हा!

**मगरचंद :** हे पाहा, आमच्या घोषणांना असं विकृत स्वरूप देऊ नका.

**विष्णू :** पण साहेब, हे सगळं खायचं कसं? आम्ही कंदमुळं कधी जन्मात खाल्ली

नाहीत. केळी बारा आणे डझन, शेंगदाणं बचकाभर खाल्लं तर पोट फुगतंय.

**हणमू :** आणि पेंड कशी खायची?

**मगरचंद :** मि. घोटाळे, सांगा यांना.

**घोटाळे :** पेंड ना? चावून, बारीक करून गिळायची हो! किंवा पूड करून भाकरीच्या पिठात मिसळायची. भाकरी फार खमंग लागते!

**हणमू :** अवो, पण आमी कधीच खाल्ली नाही.

**घोटाळे :** (हातातला 'लोकमान्य' दाखवीत) वा, वा, असं का बरं. हे लोकमान्याचे संपादक म्हणतात की तुम्ही - म्हणजे शेतकरी - हौसेनं पेंड खाता म्हणून.

**हणमू :** तेच्या बानं खाल्ली असंल! आपण न्हाई खात.

**मगरचंद :** अरे, असे भडकून काय जाता? घोटाळे, यांना पेंडीचं शास्त्रीय महत्त्व सांगा.

**घोटाळे :** हे पाहा, एक टन पेंडीत पन्नास बकऱ्यांच्या मांसाइतकं किंवा तीस हजार कोंबडीच्या अंड्यांतल्या इतकं, म्हणजे साडेतीन हजार गॅलन दुधातल्या इतकं प्रोटीन असतं! समजलं?

**मगरचंद :** पाहा बरं. किती प्रोटीन हे! आणि हे प्रोटीन माणसाला फार आवश्यक असतं. काय घोटाळे?

**घोटाळे :** हो, आणि सुदैवानं आपल्या देशात पंधरा लक्ष टन भुईमूग तयार होतो. त्याची साडेसात लक्ष टन पेंड तयार करता येईल. आणि त्या पेंडीत जे प्रोटीन असेल ते बावीस अब्ज पन्नास कोटी अंड्यातील किंवा सुमारे दोनशे बासष्ट कोटी गॅलन दुधातल्या प्रोटीनची बरोबरी करू शकेल.

**मगरचंद :** समजलं किती महत्त्व आहे पेंडीचं?

**हणमू :** काय कळलं न्हाई.

**मगरचंद :** तुम्हाला नाहीच कळायचं. चला हो घोटाळे! या लोकांच्या नादी लागण्यात अर्थ नाही (जातात.)

## दृश्य चौथे

(कामगारवस्तीत लोकमंत्र्यांची सभा. स्टेजवर मंत्री, श्री. घोटाळे आणि अध्यक्ष श्री. खटारिया बसले आहेत.)

**खटारिया :** बरं मंडळी, आता आपण सभा सुरू करूया. मित्र हो! आपली ही सभा नामदार मंत्र्यांच्या दौऱ्यातील म्हणजे वृक्षारोपण सप्ताहातील शेवटची सभा आहे. शिवाय या सभेत नामदार मंत्री भाषण करतीलच. पण ज्यादा नाही. जर कुणाला वृक्षरोपणाविषयी शंका असतील तर त्या शंकाचे ते निरसन करतील. तेव्हा आता

नामदारांनी सभा सुरू करावी, म्हणजे भाषण सुरू करावे, अशी मी त्यांना विनंती करतो.

(टाळ्या, मंत्री उभे राहतात)

**मंत्री :** नागरिक बंधूंनो! मी इथं आज मंत्री या नात्यानं बोलत नसून तुमचा सेवक या नात्यानं बोलत आहे. आज आपला देश मुक्त, आझाद, असून आम्ही मंत्री होऊन थोडेच दिवस झाले आहेत. आम्ही मंत्री झालो त्या दिवसापासून, नव्हे त्या क्षणापासून, आमची भयाण संकटांनी पाठच घेतली. आम्ही पुष्कळ विचार करून पाहिला, पण काही सुचेना. शेवटी आम्हाला कळून चुकले की, देशात जर जगायचं असेल तर आपण एकच कार्य केलं पाहिजे, आणि ते म्हणजे झाडं लावण्याचं. बस्स! वृक्षारोपणाविना दुसरे काहीच आम्ही करू शकत नाही. कारण सर्व संकटांवर एकच उपाय - वृक्षारोपण. दुसरा मुद्दा : आपण कमी खाऊन जास्त काम करून संपत्ती उत्पादन केली पाहिजे. देशात अन्न कमी आहे, म्हणून पूरक अन्न खाल्लं पाहिजे. केळी, रताळी, चवळी, राजगिरा, घेवडा, पापडी, भोपळी, दोडका, पडवळ आणि सर्वश्रेष्ठ पेंड हे सर्व जर आपण मनापासून खाल्लं, तर आपला देश नक्कीच वैभवशाली होणार. तेव्हा एक, झाडं लावा; दोन, कमी खावा; तीन, जादा काम करा. हे तीन मंत्र पाळा. एवढंच मला सांगायचं आहे. आणि कोणाला प्रश्न वगैरे विचारायचे असतील तर त्यांनी विचारावेत.

(स्टेजवर विष्णू आणि हणमू येतात.)

**घोटाळे :** कोण, विष्णू का?

**विष्णू :** हं, बोला. पेंड कशी खायाची?

**मंत्री :** घोटाळे, पेंड कशी खायची ते सांगा.

**घोटाळे :** बरं तर, हे पाहा विष्णू, पेंड कशीही खाता येते. म्हणजे तशीच चावून गिळता येते. किंवा भाकरीत घालून चालते. किंवा...

**हणमू :** किंवा आपलं बैलावानी वो.

**घोटाळे :** शाबास! हो.

**मंत्री :** हो काय? ए बैल!

**घोटाळे :** कोण, मी बैल सर?

**मंत्री :** घोटाळे, गप्प बसा. हं, काय प्रश्न आहे तुमचा?

**विष्णू :** तुम्ही मंत्री झाल्यापासनं किती गोळीबार केले?

**मंत्री :** आम्ही अहिंसावादी आहोत. आमची अहिंसा ही हिंसेविरुद्ध आहे, नि राज्य अहिंसावाद्यांचं राज्य आहे.

**विष्णू :** ते आता समद्यांस्नी कळाय लागलंय. ते नका सांगू. म्हणं अहिंसा!

**मंत्री :** काय रे! काय कळाय लागलं तुला?

**विष्णू :** वाघावानी अहिंसा.

**घोटाळे :** म्हणजे रे काय?
**विष्णू :** म्हंजी एक वाघ जमीन फुंकून पावलं टाकीत आळंदील देवाला निघाला व्हता.
**मंत्री :** म्हणजे कसा?
**विष्णू :** म्हंजी वाकत, लपत छपत.
**घोटाळे :** अरे, तो शिकारीला निघाला असेल.
**विष्णू :** छे, न्हाय वो. येवढ्यात म्होरनं एक कोल्हा आला. आन् वाघानं त्या कोल्ह्याला नमस्कार केला. तवा कोल्हा म्हनला, दादा, असं गा काय?
**मंत्री :** मग वाघ काय म्हणाला?
**विष्णू :**

*(चाल : माझ्या घरात)*

वाघानं नमस्कार केला । लपून कोल्ह्याला । उभा राहिला ।
उचलोनी उजवा कर । करोनी वर । आशीर्वाद दिला ।।१।।

**घोटाळे :** म्हणजे वाघानं नमस्कार केला! छान!
**विष्णू :** पन कोल्हा जास्तीच घोटाळ्यात पडला.
**मंत्री :** मग वाघ काय म्हणाला?
**विष्णू :** वाघ म्हनला,

मी सोडला धंदा शिकारीचा । जीव घेण्याचा । कंटाळा आला ।
घेऊनी अहिंसा व्रत । आता मी जात । आहे आळंदीला ।।२।।

**घोटाळे :** काय म्हणतोस? वाघ नि आळंदीला? काही तरी घोटाळा आहे.
**विष्णू :** पण कोल्ह्यानं इचारलं, वाघोबा दादा, असं एकाएकी कसं गा झालं?
**मंत्री :** मग वाघ काय म्हणाला?
**विष्णू :** वाघ म्हनला,

माझा झाला हृदयपालट । सकाळी झटपट । सांगतो तुला ।
वाट फुंकून टाकतो पाऊल । हिंसा होईल भीती ही मला ।।३।।

**मंत्री :** म्हणजे तो अहिंसावादी?
**घोटाळे :** होतं सर असं केव्हा केव्हा.
**विष्णू :** तर हो. पायाखाली मुंगी मरंल म्हनून त्यो तसं करीत व्हता.
**घोटाळे :** म्हणजे झटपट अहिंसा. मग त्या कोल्ह्यानं काय केलं?
**विष्णू :** मग—

मग कर जोडूनी कोल्हा । चरणी लागला । लीन जाहला ।
म्हणे दया माझ्यावर करा । दयासागरा तारा गरिबाला ।।४।।

**घोटाळे :** म्हणजे कोल्ह्यानं पाय धरले का?

**विष्णू :** मग काय करनार? संत वो!
**मंत्री :** परंतु मग वाघानं काय केलं?
**विष्णू :** दुसरं काय करनार? आयती पुढ्यात आलेली मान दातात गपकन धरली...
**घोटाळे :** (उडी मारून) अरे, अरे! आणि त्याची ती अहिंसा?
**विष्णू :** जशी आली तशी गेली.
**घोटाळे :** मग मात्र चिरचीर करीत बसला असेल तो कोल्हा, नाही का?
**विष्णू :** न्हाय बरं! त्यो मोठ्यानं हासायला लागला.
**मंत्री :** मग वाघानं काय केलं?
**विष्णू :** त्येनं इचारलं, का रं हासतो? आनि कोल्हा म्हनला : खरंच गड्या, तू आळंदीला निघालास, पन देवाच्या न्हवं, तर चोराच्या. हे ऐकून वाघबी हासाय लागला.
**घोटाळे :** आणि मग?
**विष्णू :** आनि काय? आपली मान मोकळी होताच कोल्हा निसटला त्यो परत वाघाच्या जवळ आला न्हाय. त्येची अहिंसा त्येला कळली, तशी तुमची अहिंसा आता आमास्नी कळून चुकलीया.
**मंत्री :** हे पाहा, असं भलतं भलतं बोलू नको, नि विचारू नको. हा वृक्षारोपण सप्ताह आहे. तेव्हा दुसरं विचार. नीट बोल. आमचं तर असं म्हणणं आहे की-
**विष्णू :** काय?

मंत्री आम्ही पुढारी तुमचे । हिंदी जनांचे ।
आम्ही पाठीशी आज नसता ।
**विष्णू :** धीराच्या बाता । सोडून आता ।
जाब गोळीनं का देता ॥१॥

**मंत्री :** कारण तुम्ही मागण्या मागत नाही, तर संप करता, दंगल करता. म्हणून शांततेसाठी आम्हाला तसं करावं लागतं. कारण आम्ही सर्व केलं आहे.
**विष्णू :** काय केलं?
**मंत्री :** घोटाळे, दाखवा योजना.
**घोटाळे :** ऐका! ह्या पंधरा वर्षे मुदतीच्या योजना मंत्र्यांनी हाती घेतल्या असून यांच्यासाठी प्रत्येकी आठ कोटी रुपये खर्च होणार. म्हणजे एकशेवीस कोटी रुपये खर्चून या महाराष्ट्राचं स्वरूपच बदलून देणार. दहा वर्षांत सोळा योजना पूर्ण होणार. पाट-बंधारे, वीज, वगैरे वगैरे. आणि त्या पूर्ण होताच १५ लक्ष एकर जमीन पाणी पिणार व ४ लक्ष १२ हजार टन धान्य अधिक उत्पन्न होईल असा अंदाज आहे. पुढं १६ योजना हाती घेणार. त्या १९६० मध्ये पूर्ण होतील. त्यासाठी ३६ कोटी ७६ हजार रुपये ९ आणे ४ पै खर्च होणार आहे-

**हणमू :** अहो, पन हेच आमास्नी समजंना.
**घोटाळे :** अहो, हेच तर नडतं आहे. इथं समजण्याचा प्रश्न नाही. फक्त ऐकून घ्या. समजून घेऊन काही पोट भरणार नाही. नुसतं ऐकून घ्या!
**मंत्री :** आमचा धीरच मोठा । मुळा नि मुठा
गिरणा योजना आम्ही आखली ।।
**विष्णू :** आज मरा । आणि उद्या पाय धरा ।
थाप खुशाल तुम्ही द्या आपली ।।२।।
**मंत्री :** नाही, नाही. ही थाप नाही. घोटाळे, सांगा आपण काय करणार पुढं ते.
**घोटाळे :** अडीच कोटींची निरा धरण योजना, सोलापूर योजना, कोयना, तापी, काळी धरणे, नगर-खामगाव योजना, भांबुर्डी तलाव, भंगी तलाव, सपनन तलाव, डॉन तलाव, धर्मा तलाव, भीमा तलाव व हे सर्व तलाव तयार करून देण्यासाठी एक योजना तयार करण्यासाठी आज एक योजना आखली जात आहे. आणखी काय पाहिजे?
**मंत्री :** ह्या सर्व योजना जर...
**विष्णू :** आमच्या डोक्यावर दिल्या, तर...
**हणमू :** आम्ही पाताळात जाऊन पोटभर पाणी पिऊन फुगून वर येऊ.
**मंत्री :** नाही. या योजनांमुळे देशाचा फायदा होणार आहे.
**हणमू :** अहो, पर ह्या योजना अंमलात येईपातुर समदे तलाव बुजून जातील.
**विष्णू :** आणि कऱ्हाडची कृष्णा नदी वऱ्हाडात जाईल.
**हणमू :** आनि तिला कऱ्हाडला आणायला परत योजना करीत बसावं लागेल.
**मंत्री :** हे पाहा, असं भलतं-सलतं बोलू नका.
आम्ही मंत्री हिंदचे । मेरू धीराचे । राखु जनांच्या सौख्याला ।।
**विष्णू :** देऊन धनिकाला आसरा । नफ्याचा कासरा ।
लावून गरीबाच्या मानेला ।।३।।
**मंत्री :** नाही, नाही. आणि हो, आम्हाला गरीब-श्रीमंत सारखेच आहेत. दोघांनी सरळ व्यवहार करावा अशी आमची इच्छा आहे. परंतु संप नाही. कारण आम्हाला देशात शांतता टिकवायची आहे.
**विष्णू :** देशात म्हंजी काय? नि तुमचा देश म्हंजी?
**मंत्री :** घोटाळे, यांना देश सांगा.
**घोटेळे :** म्हणजे भूगोल वाचून पहा.
**मंत्री :** घोटाळे, घोटाळा करू नका. तर हो. आणि आता तू मला या वृक्षारोपणाबद्दल विचार. इतर प्रश्नांची उत्तरं नंतर आमच्या ऑफीसवर मिळतील.
**विष्णू :** अहो, मी रोज येतो. पन तुमची गाठच पडत न्हाइ न्हवं.

**घोटाळे :** कशी पडणार रे? रोज येतो म्हणजे काय? ते मंत्र्याचं ऑफीस आहे की राणीचा बाग? काय?

**हणमू :** आम्ही पंधरा वरसं खायाचं काय ते सांगा.

**मंत्री :** हे पाहा, त्यासाठी अधिक धान्य पिकवून, अन्नाची तूट भरून निघेपर्यंत इतर वस्तू खाऊन राहणं.

**घोटाळे :** इतर वस्तू म्हणजे लक्षात आलं का? नाही तर भलतंच समजाल.

**विष्णू :** नाही. सांगा की काय खावं?

**मंत्री :** खा चावून केळी । गिळा रताळी । पेंड वाढवील शक्तीला ॥

**घोटाळे :** निरा प्राशन । वृक्षारोपण । बोल मंत्र्याचा बहू भला ॥३॥

म्हणजे पेंड, निरा, केळी, रताळी, शेंगदाणे, जे दिसेल ते खावा, असं मंत्र्यांचं मत आहे.

**मंत्री :** कारण जगात आपला हिंद देशच असा आहे की इथं मुबलक पेंड पैदा होते, अगदी भरपूर.

**घोटाळे :** आणि हाच एवढा असा देश आहे की इथं पेंड खाणारे लोक असू शकतात.

**मंत्री :** शिवाय आपण अन्नाची बचत केली पाहिजे. अन्नाचं महत्त्व कमी लेखू नये. कारण -

अन्नं न परिचक्षित तद् व्रतम् ।
सत्य माना या वचनाला ॥

**विष्णू :** अगडबंब हा गडबडगुंडा ।
सरळ मराठीत सांगा मला ॥४॥

**मंत्री :** म्हणजे? हे तुला समजलं नाही? घोटाळे, सांगा त्याला.

**घोटाळे :** ओ के सर. शिपाई, ती डिक्शनरी इकडे आण पाहू.

**मंत्री :** घोटाळे, घोटाळे! हा काय घोटाळा आहे? डिक्शनरी कशाला?

**घोटाळे :** सर, ती अमेरिकन आहे. त्यात नक्कीच सापडेल.

**मंत्री :** (भडकून) काय सापडेल, बोडकं! अहो, मी मघा बोललो ते इंग्रजी नाही. संस्कृत बोललो होतो.

**घोटाळे :** मग सॉरी सर. मला वाटलं ते इंग्रजी होतं. आणि मला संस्कृत येत नाही.

**मंत्री :** मग तुम्ही शाहाणे आहात. हो, तर विष्णू, ते असं आहे. अन्न म्हणजे ब्रह्म आहे. आणि आपण त्याला जपलं पाहिजे, एवढाच याचा अर्थ तूर्त मी सांगतो. तेव्हा जनतेनं अन्नाची निर्मिती करावी.

**हणमू :** पन कशी करावी? गावात घर न्हाय, शिवारात शेत न्हाय, त्येनं काय बोंबलावं?

**मंत्री :** घोटाळे, ज्यांना जमीन नाही त्यांनी शेती कशी करावी हे सुद्धा यांना कळेना.

**घोटाळे :** अरे बाबा, साधा उपाय आहे. त्याला जमिनीची जरुरीच नाही.
**मंत्री :** कारण मी सांगतो. ऐका -

पेटीत माती । त्याच्यात शेती । करून उद्धरावे देशाला ॥

**विष्णू :** नळात मळे । खिशात खळे । पिशवीत घालून बैलाला ॥५॥

**मंत्री :** नाही, नाही, तसा विपर्यास करू नका. जर तीस कोटी माणसांनी पेटीत माती भरून शेती केली तर नक्कीच देशाचा उद्धार होईल.
**विष्णू :** यांनी झाडं कुठं लावावी?
**हणमू :** चुलीजवळ. . .
**विष्णू :** का आगगाडीच्या इंजनात?
**मंत्री :** नाही. चेष्टा करू नका. शिवाय आपल्या पूर्वीचे देव, ऋषी, मुनी यांनी पालेभाजीचं महत्त्व सांगितलं आहे की —

ऐका पुरावा आता । पाला खाता । लाभे सुंदरता सर्वाला ।

**विष्णू :** शेळीनं पाला । खाऊन तिजला । काय फायदा सांगा मला ॥६॥

**हणमू :** काय फायदा सांगा?
**मंत्री :** हे पाहा, आपली पुराणं सांगतात की सर्व सुखाचं एकमेव साधन म्हणजे वृक्षारोपण होय. जर तीस झाडं लावली तर एक पुत्रलाभ होतो.
**घोटाळे :** आणि नामदारांनी आतापर्यंत तीन हजार झाडं स्वत: लावली.
**हणमू :** मग ह्यास्नी किती प्वारं व्हनार?
**घोटाळे :** त्याचा हिशोबच नाही.
**मंत्री :** घोटाळे, काय?...
**घोटाळे :** सॉरी!
**विष्णू :** म्हंजी भाजी खाऊन काम व्हतं म्हनता?
**मंत्री :** हो. म्हणजे सौंदर्यहीन बायांनी रोज भाजी खाल्ली तर त्यांना अप्सरांचं स्वरूप लाभतं.
**घोटाळे :** मग नाक नसलं तरी ते नोकदार उगवून येतं, कारण भाजीत एक द्रव्य असतं.
**मंत्री :** आणि सुंदर स्त्रीनं अशोक वृक्षावर दारूची चूळ टाकली की तिला पुत्र होतो.
**घोटाळे :** बाकी दारूबंदी लक्षात घ्यावी, किंवा परमिट काढावं त्यांनी.
**मंत्री :** काय बडबडता? हो. आणि त्यांनी त्या वृक्षावर लाथ जरी मारली तरी मूल होतं. त्यांना हे सर्व देवांनी सांगितलं आहे.

आम्ही देशात झाडं । लावू चहुकडं । सुखी कराया जनतेला ॥

**विष्णू :** तुम्ही होऊन भामटे । घेता चिमटे । पुरं समजलं लोकाला ॥७॥

**मंत्री :** काय समजलं रे? मूर्ख? (पोलीस येतात.)
**घोटाळे :** अरे, तुम्ही इकडे कुठे?
**पोलिस :** या दोघांना पकडण्यासाठी.
**घोटाळे :** आम्हा दोघांना नाही ना?

(विष्णू व हणमू यांना पोलीस पकडतात.)

**मंत्री :** असं का! जन हो! यांच्यावर वॉरंटे होती म्हणून यांना पोलिसांनी अटक केली. तुम्ही शांत बसा. सभा संपली नाही.
**विष्णू :** सांगा हेच का स्वराज्य?
**हणमू :** आता झाडं कशी लावायची? आता आम्ही जातो तुरुंगात. तुम्ही आता टोपीत शेती करा नि खिशात झाडं लावा.

(पोलीस त्यांना घेऊन जातात.)

**मंत्री :** हे दोन लोक पोलिसांना हवे होते; तेव्हा त्यांना जनता संरक्षण कायद्यान्वये अटक झाली. आणि –
**घोटाळे :** आपली ही सभा आणि हा वृक्षारोपण सभा संपली.



# पेंग्याचे लग्न

**( गण )**

प्रथम मायभूच्या चरणा
छत्रपती शिवबा चरणा
स्मरोनि गातो । कवना ।।धृ.।।
स्वराज्य माझा जन्मसिद्ध हक्क करुनिया गर्जना
लोक उठविला जागा केला त्या लोकमान्यांना
कठिण काळि राष्ट्रनौकांना ।
मार्ग दाखवीला तयांना ।
देशा दिली ज्यांनी प्रेरणा ।।१।।
क्रांतिकारी वीरांना आणि त्यागी हुतात्म्यांना
देशासाठी देह झिजविला त्या नररत्नांना
महाराष्ट्र भूच्या भूषणा ।
पणा लावुनीया प्राणा ।
अर्पियले ज्यांनी जीवना ।।२।।
आठवून मनी ही शुभनामे करुनिया स्तवना
आशीर्वाद मागतो आम्ही गावया कवना
सभापती आणि सुजना
कलावंत आणि रसिकांना
स्फूर्ति द्यावी हीच प्रार्थना

**(लावणी)**

रत्नागिरी जिल्ह्यात राजुरी नामे गावात ।
प्रकार घडला मोठा मजेशीर तो ऐका शांत ।।
गावकरानं हिंमत केली येऊन जोरात ।
पैज मारिली लगीन पेंग्याचं करतो दारात ।
नवरी पाहिली तिथही धरली तयारी झाली ।
परी पेंग्याच्या त्या लग्नाला नाना विघ्नं आली ।।

## प्रवेश पहिला

*(नारूबाबाचं घर. दगडूजी गावकर प्रवेश करतो. त्यानं पंजी अखडलं हातात काठी घेतली आहे. डोकीचं मुंडासं काखेत मारून तो मारामारीला तयार झाला आहे. तो रागानं थरथरत नारूला हाका मारतो. आतून कोणी बाहेर येत नाही.)*

**गावकर :** ए नारू! आरे ए, नारू! आरे कोण आहे का घरात? ए नाऱ्या! नाऱ्या!!

**नारू :** (प्रवेश करतो. एक निम्म्या वयाचा, शेतकरी पोषाखात) - आँ! कोन गावकर? या. या. रामराम. या.

**गावकर :** (बिथरून) नाही येत. प्रथम हे सांग की तुला आमच्याशी तंटा करायचा आहे?

**नारू :** (लाचारपणे) छे! छे! हे काय गावकर? तुमच्याशी तंटा करून आम्ही ऱ्हायचं कुठं?

**गावकर :** मग काय आमचा खून करायचा का?

**नारू :** तोबा! तोबा! असं म्हणू नका. तुम्ही गावाचं धनी हायसा. आम्ही गरीब...

**गावकर :** (खेकसून) खोटं. मला माहीत आहे. या गावात सारे गरीब आमचे वैरी बनले आहेत. आम्ही गावकर त्यांना कसपटासारखे दिसू लागलो आहोत. म्हणून जो तो तंटा करू पाहत आहे. आम्हाला दाबू पाहत आहे. त्यात तूही आहेस.

**नारू :** (घाबरून) कोण मी? छा! छा! तसं म्हणू नगा.

**गावकर :** म्हणू नका? का? मग हा काय प्रकार आहे? मग तू आम्हावर असा अन्याय का करतोस? बोल! बोल!

**नारू :** पर कसला अन्याय झाला माझ्याकडून?

**गावकर :** कसला? लाज वाटत नाही विचारायला? अरे, रोज तुझी म्हसरं माझ्या शेतात शिरतात. शेत उलगलं त्यांनी, नि तुझा तो द्वाड पेंग्या खुशाल जनावरं माझ्या शेतात घालून बसतो.

**नारू :** माझी ढोरं तुमच्या शेतात?

**गावकर :** हो, हो, तुझी ढोरं. नि तो तुझा लाडका पेंग्या खुशाल बघत बसतो.

**नारू :** (गयावया करीत) न्हाय! तसं न्हाय गावकर. माझ्या पेंग्याला काय बी कळत न्हाय. चूक झाली.

**गावकर :** (ओरडतो) खोटं. तो त्या संघाच्या नादाला लागून मुद्दाम कळ काढत आहे.

**नारू :** न्हाय वं धनी. माझा पेंग्या गरीब हाय. आम्ही तुमच्याशी वैर करनार न्हाय. तुम्ही हाय तर ह्यो गाव हाय नि गाव हाय तर आम्ही हाय.

**गावकर :** खोटं बोलू नको. अरे, तो कुणबी सेवा संघ निघाला आहे ना? त्याचं पुढारी जे सांगतील ते तुम्ही ऐकता आणि तसं नाचता. तुम्हाला गावकराची गरज उरली नाही.
**नारू :** नका, नका असं म्हणू. आम्ही गरीब हाय. आता त्या पेंग्याला धोपटून काढतो. (एवढ्यात पेंग्या प्रवेश करतो. त्यानं फक्त पंजी लावली आहे. अंगावर घोंगडे आहे आणि डोकीवर लाकडाची मोळी घेतली आहे. तो झोपेत चालत येतो. त्याला नारू आणि गावकर पाहू लागतात. पेंग्या पेंगत उभा राहतो.) - पेंग्या? ए पेंग्या!
**पेंग्या :** (एकदम जागा होऊन) ओऽऽ अरे, मी कुठं आलो?
**नारू :** (रागानं) अरे, पेंग्या तुझी झोप गेली का? आणि जनावरं कुठं हायती? म्हसरं रे?
**पेंग्या :** म्हशी रानात.
**नारू :** आनी तू?
**पेंग्या :** मी घरात. मला लागली झोप नि मी आलो इकडं. म्हसरं कुठं गेली मला काय ठावं!
**गावकर :** (भडकून) पाहिलास हा पेंग्या! आरं ती म्हसरं आता माझ्या शेतात असणार. असंच हा रोज करीत असतो.
**नारू :** (रागाने) पेंग्या! नीट बोल, म्हसरं कुठं हायती? लेका, गावकराच्या शेतात म्हसरं सोडून तू हा असा झोपतोस काय? थांब, तुला झोडपतोच.
**पेंग्या :** गावकराच्या शेतात मी न्हाय वं म्हसरं सोडीत, पण म्हसरंच तिकडं जात्यात. नि तो गावकर उगीच चिरकटतोय. मी काय करणार!
**गावकर :** पाहिलास? कसा बोलतो आहे?
**पेंग्या :** मी काय करनार! मला म्हसरं ऐकत न्हायती. नि तो गावकर उगाच बोम्बटतोय.
**नारू :** पेंग्या —
**गावकर :** (चिडून) नाऱ्या, ऐक! ऐक!
**नारू :** (घाबरून) पेंग्या ऽ आरे जागा हो. (मोठ्याने) ए पेंग्या ऽ ऽ
**पेंग्या :** (एकदम जागा होऊन) ओ ऽ ऽ .
**नारू :** आरं नीट बोल. ह्यो गावकर आल्याती.
**पेंग्या :** (भानावर येऊन) हो, हो, मी निजलो व्हतो. (घाबरतो आणि पळून जाण्यासाठी मागे सरकू लागतो.)
**गावकर :** पेंग्या, थांब, पळू नको लेका.
**पेंग्या :** मग काय करनार! मघाशी तीन म्हशी, दोन रेडकं नि तीन गाया तुमच्या शेतात शिरल्या. पण तुम्ही तीनशे शिव्या दिल्या.
**नारू :** तुला तीनशे जोडे माराय पायजे.

**पेंग्या :** (मनगटाने नाक पुशीत) हो, मारा. मी आता म्हसरंच राखणार न्हाय. हो ऽऽ

**नारू :** (घाबरून) मग रे काय करनार?

**पेंग्य :** मी, मी, मी की न्हाय, म्हमईला जानार. नगं आमाला ती म्हसरं. हो ऽ ऽ

**नारू :** (आश्चर्यानं) काय? म्हमईला जानार?

**गावकर :** आरं, पर झालं तरी काय?

**पेंग्या :** (रडकुंडीला येऊन) काय व्हनार? गावकर, आता माझं निम्मं वय झालं, माझी दाढी पिकली, अजून माझं लगीन न्हाय. बाबानं दोन लगनं केली. आनी मी —

(मनगटाने नाक पुशीत गाणे गातो)

नाही लगीन अजून मी असाच कुठवर मरणार? ॥
म्हशी राखून राखून । मी गेलो थकून ॥
कधी बापाचं डोळं उघडणार? ॥ नाही...
माझी पिकली दाढी । मी राखतो रेडी ॥
पुढच्या सालीच दात माझं पडणार ॥ नाही...
आता सारं सोडून । मी जातो पळून ॥
नाही गावाला तोंड पुन्हा दावणार ॥ नाही...

**नारू :** (घाबरून) पेंग्या, आरे लेका, तसं करू नको.

**पेंग्या :** मग कसं करू? म्हसरं राखू?

**गावकर :** पेंग्याचं खरं आहे. आरे नाऱ्या, पोर मोठा झाला. आता त्याला चार पोरं झाली असती —

**पेंग्या :** चारच? आवं माझ्या बराबरच्या एका म्हशीला आठ रेडकं झाली.

**गावकर :** नाही म्हणजे नाऱ्या, तू वेडा आहेस. अरे, टाक ना करून लग्न पोराचं, नाहीतर जाईल कुठं तरी झोपेत पेंगत.

**नारू :** मग मी कधी नाही म्हटलं? पर जर तुम्हीच कृपा केली तरच माझ्या पोराचं लगीन व्हयील. न्हाय तर माझं पोर...

**गावकर :** आरे, मी कधी नाही म्हटलं आहे? मी तुला दोन नवऱ्या करून दिल्या की नाही?

**पेंग्या :** पर मला एकबी न्हाय दिली?

**नारू :** तुमचं उपकार मी विसरनार न्हाय. आता एवढं पेंग्याचं बी करा. घ्या पदरात.

**गावकर :** खरं आहे रे. परंतु पेंग्याचा प्रश्न जरा अवघड आहे. हा पेंग्या असा भुतासारखा. डोकीवर अंथरूण घेऊन झोपेत चालतो. याला नवरी मिळणं कठीण आहे.

**नारू :** नका, नका असं करू. (पाया पडतो.)
**पेंग्या :** मग मी जातो.
**गावकर :** थांब रे. करतो खटपट. परंतु...
**नारू :** (हरकून) पेंग्या, आरे गावकर देव हायती. ते एकच काय, दहा नवऱ्या बघून देतील.
**पेंग्या :** (चेकाळून) काय? दहा? पाच न् पाच दहा. आरे बापरे, मग पोरं किती व्हनार?
**गावकर :** पाहिलंस? हा कसा वेड्यासारखा करतो? कोण याला नवरी देणार?
**नारू :** (ओरडतो) पेंग्या ऽ ऽ
**पेंग्या :** (मोठ्याने) ओ ऽ, बरं, बरं, आता न्हाय. मी काय येडा हाय?
(मनगटाने नाक पुसतो)
**गावकर :** हां, असं सरळ बोल. मी पाहतो नवरी. परंतु, परंतु...
**नारू :** हो, हो आलं डोक्यात. खर्चाला पायजे. देतो. (पाच नोटा काढून देतो.) हे पन्नास ठेवा खर्चासाठी, आनी करा कृपा.
**गावकर :** वा छान! आता पेंग्याचं लग्न झालंच म्हणून समज!
**पेंग्या :** हो. खरंच, दोन नवऱ्या बघा.
**गावकर :** (चिडून) नाऱ्या ऽ
**नारू :** (चिडून) पेंग्या ऽ
**पेंग्या :** आता न्हाय. मी काय येडा हाय? (मनगटाने नाक पुशीत) मी, मी येडा न्हाय. हां.
**नारू :** तू बोलूच नको.
**पेंग्या :** बरं, बरं, आता न्हाय बोलत. आता लौकर करा तेवढं लगीन.
**गावकर :** म्हणजे नवरी काय माझ्या खिशात आहे काय रे?
**पेंग्या :** नवरी न्हाय. पर नोटा हायती.
**नारू :** (मोठ्याने) पेंग्या ऽ
**पेंग्या :** (मटकन खाली बसतो.) ओ ऽ ऽ
**नारू :** (गावकर हात जोडतो.) कृपा करा.
**गावकर :** करतो. पण ऐक. त्या संघाचं ऐकायचं नाही.
**नारू :** न्हाय, न्हाय ऐकत. (पेंग्या कानात बोटे घालून उभा राहतो.)
**गावकर :** संघ सांगतो, खर्च करू नका. आरे, परंतु खर्चाशिवाय लग्नं कशी होणार?
**पेंग्या :** म्हंजी माझं लगीन व्होनार न्हाय म्हनता?
**गावकर :** ऐक रे. हो. अडीच मण करड नको, पाच शेर घ्या. पस्तीस नारळाऐवजी नऊ नारळाचा थाळा भरा. देज अठरा रुपये घ्या असं संघ म्हणतो.

**नारू :** बाकी गावकर, संघाचं हे म्हननं मला पटलंय.
**गावकर :** (भडकून) काय? संघाचं पटतंय? तर मग जा. त्या संघाकडं नि सांग त्यांना. करा म्हणावं या भुताचं लग्न. जा, जा. मी निघालो.
**नारू :** (घाबरून) आरे हो, माझं चुकलं. माफ करा. गावकर, मी पाया पडतो.
**पेंग्या :** (भोंगा पसरून) माझं लगीन न्हाय होनार? हो ऽ ऽ
**गावकर :** नाही होणार. जा त्या संघाला सांगा.
**नारू :** नका. नका. पाया पडतो. मला दोन जोडं मारा.
**पेंग्या :** (पुढे होऊन) थांब, मीच मारतो-
**नारू :** (मोठ्याने) पेंग्या ऽ ऽ
**पेंग्या :** मग तू चुकलास का?
**गावकर :** आरे, हा पेंग्या तुझ्यापेक्षा शहाणा आहे.
**नारू :** आता मी संघाचं नाव काढणार नाही.
**गावकर :** (शांत होऊन) ठीक! आता चूक करू नको. आरे, संघ हा काल आला. आम्ही पिढ्यानपिढ्यांचं गावकर आहोत. संघ नि ढंग आम्ही चालू देणार नाही. हे मूर्ख संघवाले म्हणतात, पायसर नेसा. परंतु पायसराला मोठी लुगडी कोण देणार? आणि मांडकास हा आपला जुना रिवाज आहे.
**नारू :** हो, हो. खरं हाय.
**गावकर :** करड किती देणार?
**नारू :** अडीच मण.
**गावकर :** देज किती देणार?
**नारू :** सांगाल तेवढं!
**गावकर :** थाळा किती नारळाचा?
**नारू :** पस्तीस.
**गावकर :** आणि संघाला काय सांगणार?
**नारू :** तुम्ही सांगाल ते.
**पेंग्या :** तुम्ही मागाल ते. नि आम्ही बोलू ते.
**गावकर :** पेंग्या, तू काय सांगणार?
**पेंग्या :** अडीच मण -
**गावकर :** (भडकून) काय अडीच मण? मग जा मरा. लग्न होत नाही. नाही होत.
**पेंग्या :** (रडू लागतो) हो हो ऽ ऽ
**नारू :** पेंग्या ऽ
**पेंग्या :** ओ ऽ ऽ

**नारू :** पाच शेर बोल!
**पेंग्या :** पाच शेर. पाच शेर.
**गावकर :** (शांत होऊन) बरं हो. नीट लक्षात घ्या. ए नारू! जर नेटा लावायची वेळ आली तर तयार अस. मी जातो. त्या आपल्या पाडीची एक पोरगी आहे. पाहतो. म्हणजे मी नक्कीच करतो. पेंग्या -
**पेंग्या :** ओ ऽ
**गावकर :** लेका तुला पाखरासारखी नवरी बघतो.
**पेंग्या :** काय म्हसरासारखी?
**गावकर :** देखणी, झकास पोरगी आहे माझ्या लक्षात. जातो मी. नारू, तयारी कर.

(गावकर ऐटीत जातो.)

**नारू :** (चेकाळून) लेका, आता तुझं लगीन व्हनार! तुला बायको. मला सून.
**पेंग्या :** मग मला पोरं व्हनार. तुला नातू - मग मी रागावणार. मग ती माझ्या पाया पडणार. मी असा तिला मारणार. (नारूच्या पाठीत बुक्की मारतो.)
**नारू :** लेका, मला मारतोस? (पेंग्या पळून जातो.)

माझ्या पेंग्याच्या लगनाला या ॥
नाही म्हणू नका । कुठं जाऊ नका ।
येऊन मानाचं पान तुम्ही घ्या ॥ माझ्या..... ॥
पेंग्या भोळा माझा । जसा शंभू राजा ।
सारे लगनाला या । आशीर्वाद त्याला द्या ।
नका दौडू ही संधी वाया ॥ माझ्या... ॥

## प्रवेश दुसरा

*(गणूचं घर. गावकर शांतपणे प्रवेश करतो.)*

**गावकर :** अहो गणूबाबा, जरा बाहेर या.
**गणू :** (एक जख्ख म्हातारा शेतकरी काठी टेकीत प्रवेश करतो.) कोन गावकर? रामराम. या. या.
**गावकर :** रामराम. कसं काय गणूबाबा? बरं आहे ना?
**गणू :** बेस हाय गावकर.
**गावकर :** आणि राणूचं काही कागदपत्र येतं का मुंबईचं?
**गणू :** हो, हो, येतं की.
**गावकर :** आणि ती... पोरगी कुठं दिसत नाही?

**गणू :** हाय की. ती भाकरी करतीय.

**गावकर :** असं, असं. आता ती मोठी झाली असेल.

**गणू :** हो. पर तसं काय न्हाय. बाकी...

**गावकर :** असं, असं. समजलं. बाकी गणूबाबा, पोरं मुंबईला जाऊन बिघडू लागली आहेत, असं माझं मत आहे.

**गणू :** खरं हाय. पर माझा राणू देवमानूस हाय. तो कधीच बिघडणार न्हाय.

**गावकर :** खोटा आहे हा समज. मी म्हणतो, तो तुझा पोर - राणूसुद्धा बिघडलाच आहे.

**गणू :** माझ्या डोक्यात येत न्हाय. कसा बिघडला म्हनता?

**गावकर :** सांगू? आरे हेच पाहा ना. तो तुझा राणू विजार घालतो. मोठ्या मोठ्या गोष्टी बोलतो. मी म्हणतो, आरे आपण कुणबी, गरीब. परंतु तुम्ही मुंबईच्या पैशानं राजे झालात नि आपल्या पोरीला - त्या पुतळाला पायसर नेसाय शिकवलंत. ही काय रीत झाली? आरे, कुणबिणीनी मांडकास घालायची सोडून हे थेर का करावे? याला कारण तो गणू.

**गणू :** तरण्या पोरीनं मांडकास घालनं आम्हाला बरं दिसत न्हाय. पायसर नेसनं वाईट न्हाय गावकर.

**गावकर :** मला शिकवू नको. तुझ्या पोरीचं पायसर बघून साऱ्याच पोरी पायसर नेसू पहात आहेत. जुनी रूढी आहे लक्षात घ्या.

**गणू :** पर आता मानूस नवा हाय. सुधारना होती ती का वाईट हाय?

**गावकर :** वाईट नसणारच. आरे, परंतु हजारो वर्षे मांडकास घातली तेव्हा अब्रू गेली नाही! आणि आताच हा पायसर कशाला हवा?

**गणू :** पर गावकर! शेणातला किडा शेणात ऱ्हात न्हाय. आनी आम्ही मानसं हावं. जरा सुधारलं पाजये.

**गावकर :** असं का? म्हणून हे संघ काढता आणि आम्हा गावकरांना कस्पटासारखं मानता.

**गणू :** तसं न्हाय. आम्ही दोघालाबी मानतो. संघ आनी गावकर. आमचा कोनच वैरी न्हाय.

**गावकर :** मग आमचं का ऐकत नाही तुम्ही? मग देज कमी. थाळ्याचे नारळ कमी. करड कमी. हे काय चाललं आहे? आणि आमचे गावकराचे हक्क बुडवून ते त्या संघाला देता. हे काय आहे? आरे, आम्ही गावकर नि गावकी जिवंत आहोत म्हणून गाव जिवंत आहे. पटलं?

**गणू :** न्हाय, पटत न्हाय —

**गावकर :** नाही पटू दे. ऐक. मी का आलोय माहीत आहे?
**गणू :** न्हाय. सांगा.
**गावकर :** ऐक - मी तुझ्या पोरीचं लग्न ठरवलं आहे. कळलं का?
**गणू :** माझ्या पोरीचं, पुतळाचं आनी लगीन —
**गावकर :** हो. हो. तयारी कर. तुझ्या राणूला पत्र टाक. परवा गावकी बसणार आहे.
**गणू :** पर माझ्या पोरीचं लगीन मला करायचं न्हाय. माझी ताकद न्हाय.
**गावकर :** ते मला विचारू नको. ताकद नसेल तर तुला नेटा लावाय सांगेन मी.
**गणू :** पर पोरीचं लगीन झाल्यावर मी जगणार कसा? गावकर, काय हे?
**गावकर :** लग्न झालं की तूही जा मुंबईला. जळू दे ती तुमची थेरं. या गावात राहाण्यालायक तुम्ही माणसं नाहीत. तुझ्या पोरीचं ते पायसर बघून भवतालच्या बारा वाड्यात सर्व पोरी पायसर नेसू लागल्या आहेत. म्हणून मी तिचं लग्न करणार नि परत मांडकासच नेसाय लावणार. समजलं? परवा गावकी बसणार तुझ्या दारात. तयार अस. (गावकर जातो.)
**गणू :** पुतळा, बाहेर ये.
**पुतळा :** (बाहेर येऊन) काय झालं बाबा? काय म्हणत होते गावकर?
**गणू :** घात झाला. त्यांनी तुझं लगीन ठरवलं..
**पुतळा :** मी कधीच लग्न करणार नाही.
**गणू :** तो गावकर हाय. तो कायबी करील.
**पुतळा :** मी काही गाय नव्हे, कुणाच्याही दावणीतील गवत खायाला. मी माणूस आहे. माझं लग्न दादा करणार; गावकर नाही.
**गणू :** त्याचं न्हाय ऐकलं तर तो गावकर भुतं घालील. वाळीत टाकील.
**पुतळा :** काहीही करू दे. जीव तर घेणार नाही?
**गणू :** तो जीवसुद्धा घेईल.
**पुतळा :** मग त्याच्या आधी मीच आपला जीव घेईन. मग तो काय घेणार? तुम्ही जा नि दादाला तार करा.
**गणू :** पण गावकर ऐकणार न्हाय.
**पुतळा :** मी गावकराचं ऐकणार नाही. जा. तुम्ही तार करा. (गणू जातो आणि पेंग्या हळूच प्रवेश करतो) ए पेंग्या, इकडं कुठं? कां आलास रे?
**पेंग्या :** (लाजत) एक गंमत सांगायला.
**पुतळा :** गंमत? कसली गंमत?
**पेंग्या :** (मनगटाने नाक पुशीत) माझं. . . माझं की न्हाय, माझं, माझं....
**पुतळा :** काय तुझं मढं जानार मसनात?

**पेंग्या :** नव्हं. माझं, माझं, माझं वाजनार.
**पुतळा :** नीट बोल. काय वाजनार रं?
**पेंग्या :** (नाक पुशीत) माझं माझं वळख तू...
**पुतळा :** ए गुमान सांग. न्हायतर नीघ बाहिर.
**पेंग्या :** सांगू? सांगू? (तोंडाने सनईसारखा आवाज काढतो.) समजलं?
**पुतळा :** मुळीच नाही. सरळ सांग.
**पेंग्या :**

गुपित हे माझ्या मनातले । सांगतो लगीन माझे ठरले ॥
गावकरांनी उपकार केले । नवरी बघाया निघून गेले ॥
बाबा गेला कर्ज काढाया । बैल मोडूनी पैसा जोडाया ॥
कारण दिवस जवळ आले । सांगतो लगीन माझे ठरले ॥
बेंड लावूनी भों भों पुढती । बसून राहिन बहुल्यावरती ॥
आरवीण मिरवीण नवरा होऊन । चला तुम्हाला मुबलक पाजीन ॥
घर तुम्ही समजा माझे आपले । सांगतो लगीन माझे ठरले ॥
निम्म्या वयात या बायको येणार । मग पोराचा बाप मी होणार ॥
बायको माझी भोळी बिचारी । मारीन मी तिला मग हळसारी ॥
वरातीला घोडे मोठे आणले । सांगतो लगीन माझे ठरले ॥

**पुतळा :** अस्सं, तर तुझं लग्न ठरलं?
**पेंग्या :** (लाजून नाक पुशीत) हो, हो, लगीन ठरलं.
**पुतळा :** आरे, पण नवरी रे कसली करणार?
**पेंग्या :** (मनगटाने नाक पुशीत) सांगू? सांगू? चांगली करणार. गोरी. पायसर नेसणारी. आनि सांगू कसली?
**पुतळा :** हो, हो, सांग ना –
**पेंग्या :** सांगू? मग सांगतोच. पण लाज वाटती.
**पुतळा :** ए पेंगाजी, नखरा करू नको. सांग.
**पेंग्या :** नवरी? सांगतोच, सांगू? अशी नवरी करणार, अगदी तुझ्यासारखी -
**पुतळा :** (चिडून) काय माझ्यासारखी? (हातात केरसुणी घेऊन) काय कुणासारखी?
**पेंग्या :** (हरकून) हो, हो तुझ्यासारखी.
**पुतळा :** (केरसुणीचा फटका मारून) बोल, कुणासारखी? माझ्यासारखी? (दुसरा लगावते.)
**पेंग्या :** (खाली पडून) नको, नको, मारू नको.
**पुतळा :** मग बोल, कुणासारखी? (पुनः मारते.)

पेंग्या : तुझ्यासारखी नको. म्हशीसारखी.
पुतळा : मग उठ! आणि पळ -
पेंग्या : हो हो पळतो. (नाक पुशीत) मला नको तुझ्यासारखी मारकी नवरी.
(पळून जातो.)

**(कटाव)**

गावकर पडला मोठ्या ईर्षेला ।
आडवून कुणबी सेवा संघाला ॥
तोंड देण्याला सज्ज जहाला ।
कुजक्या जुन्या रूढी-रिवाजाला ॥
लोकांमध्ये अखंड टिकवायाला ।
संकटात ठेवून कुणबी समाजाला ॥
मानाचं जिणं स्वतः जगण्याला ।
गणूजीवर पूर्ण सूड घेण्याचा बेत त्यानं केला ॥
पेंग्याच्या लग्नासाठी करून खटपटी । गाव जमवीला ॥

## दृश्य तिसरे

*(गणूचं घर, गावकर गाव जमवून प्रवेश करतो.)*

**गावकर :** हं, या मंडळी. बोलवा गणूला.
**मंडळी :** गणूबाबा, या. तुमच्या सोप्यात गावकी बसणार.
**गणू :** (प्रवेश करून) पण माझा मुलगा आला न्हाय; नि तुम्ही माझ्या पोरीचं लगीन काढलंय. मी काय करनार आता?
**गावकर :** काय करायचा तुझा मुलगा? आम्ही गाव आहे ना. या मंडळी --
(एवढ्यात राणूजी मुंबईहून येतो.)

**गणू :** आला, आला, राणू-माझा.
**गावकर :** (चमकून) काय आला? बरं झालं.
**राणू :** रामराम मंडळी.
**गावकरी :** रामराम.
**गावकर :** लौकर आलास? आम्ही वाट पाहत होतो.
**राणू :** तार मिळताच निघालो.
**गावकर :** काय तार? काय लिहिलं होतं तारेत?
**राणू :** घरात उंदीर शिरला; लवकर ये.

**गावकर :** उंदीर? बरं, बरं! हं. असू दे. आता तुझ्यासाठी ही गावकी बसणार आहे.
**राणू :** माझ्यासाठी? माझी तशी काय तक्रार नाही.
**गावकर :** अरे, तुझ्यासाठी म्हणजे तुझ्या बहिणीसाठी. तिचं आम्ही लग्न ठरवलं आहे.
**राणू :** माझ्या बहिणीचं लग्नं? कुणाशी?
**गावकर :** ते विचारण्याचा तुला अधिकार नाही.
**राणू :** मला अधिकार नाही? मग तिचा जन्म कुठं झाला नि ती वाढली कुठं?
**गावकर :** तुझ्या घरी, खरं आहे.
**राणू :** आजपर्यंत अन्नपाणी, धडुतं-कपडा तिला कुणी घेतला?
**गावकर :** तुम्ही घेतला हेही कबूल!
**राणू :** ती लेक कुणाची?
**गावकर :** गणूबाबाची.
**राणू :** मग तिच्या नशिबाचं बरंवाईट करण्याचा अधिकार कोणाचा?
**गावकर :** तो अधिकार आमचा. गावकरांचा आहे.
**राणू :** मी तो मानत नाही. माझा कुणबी सेवा संघ मानत नाही. बोला.
**गावकर :** का मानत नाही? मानावाच लागेल!
**गणू :** नाही मानणार! बहीण माझी, तुमची नाही.
**गावकर :** मग आज पिढ्यानपिढ्या कसं ऐकलं? पूर्वी आम्ही सर्वांची लग्नं लावली होती की नाही?
**राणू :** लावली; तेव्हा आम्हाला कळत नव्हतं.
**गावकर :** आणि आता कळतं, नाही का? काय कळतं? अडीच मणाची करड नको, पायसर नेसा म्हणता. पस्तीस नारळ नको. गावकर नको. ही काय तुमची अक्कल झाली? अरे, वाटोळं आहे हे समाजाचं.
**राणू :** संघानं वाटोळं केलं म्हणता? आमच्या आई-बहिणींनी पायसर नेसावं. अडीच मण करड घेऊ नये, पाच शेर घ्यावी. देज अठरा रुपये घ्यावं. समाजसुधारणा व्हावी अशी आमच्या संघाची मागणी आहे, त्याला तुम्ही वाटोळं म्हणता?
**गावकर :** मग तुम्ही नि तो संघ आमचा हक्क का मानत नाही, बोल?
**राणू :** तुम्ही संघाचा हक्क माना. संघ तुमचा मानील.
**गावकर :** मग संघ अडीच मण करड नको कां म्हणतो?
**राणू :** गरीबाचं वाटोळं होतं म्हणून आणि तुम्ही अडीच मण करड घेऊन लोकांचं वाटोळं करता.
**गावकर :** (भडकून) आम्ही वाटोळं करतो. ऐक - आम्ही आहोत म्हणून हा कुणबी समाज जिवंत आहे.

आम्ही गावकरी । मानकरी । गावाचं हितकरी ।
आम्हाविना तुमचं चालंल का? ।

**राणू :** म्हातारीनं आपलं । कोंबडं झाकलं ।
सूर्योदय कधी थांबल का?

**गावकर :** म्हणजे आम्ही नसलो तर सर्व काही चालेल असं तुला वाटतं?

**राणू :** अहो, म्हातारीनं कोंबडं झाकलं म्हणून सूर्य का थांबतो? तसंच आहे हे.

**गावकर :** मग असं सांग -
आम्ही गावात राहतो । कारभार करतो ॥
लोकांची लग्नं का लावतो? ॥

**राणू :** झाकून डोळा । नदीला बगळा ।
टपून सांगा का बसतो? ॥

**गावकर :** (भडकून) मंडळी, हा आम्हाला बगळा म्हणतोय. आम्ही काय मासे मारतो?

**राणू :** मासे नाही; माणसं मारता. तुम्ही रेड्यावर गाडा लादून वर भाव खाता. तुम्ही कुणाच्या मुलीचं कुणाशीही लग्न लावता. त्याच्या वयाच्या, रंगाचा, रूपाचा कधी विचार करता का?

**गावकर :** खोटं आहे हे. आम्ही सर्व विचार करतो. आणि लग्नं लावणं हा आमचा हक्क आहे.

**राणू :** कुणी दिला तुम्हाला हा हक्क?

**गावकर :** आरे, पूर्वीपासून तो हक्क चालत आला आहे.
आम्ही गावकऱ्यांसाठी । करतो खटपटी ॥
आम्ही काढतो नित खस्ता ॥

**राणू :** पायकाच्या पाशात । गरिबाला गुंतवून ।
नामानिराळे का असता? ॥

लग्नासाठी गरिबाला कर्ज काढाय लावता आणि तो नवरा पायकी करून मरतो. तुम्ही मजा करून मोकळे होता. याचा विचार कधी करता का? स्वार्थ पाहता.

**गावकर :** (चिडून) खोटं आहे. कुणाची आम्ही पै खात नाही. (पेंग्या हळून प्रवेश करतो) विचार या नारूमामाला. काय दिलं त्यानं आम्हाला?

**पेंग्या :** (मनगटाने नाक पुशीत) न्हाय बरं काय बी दिलं; मातर पाच नोटा दिल्या दहादहाच्या —

**गावकर :** (मोठ्याने) पेंग्या ऽ

**नारू :** (मोठ्याने) पेंग्या ऽ

**पेंग्या :** (मटकन खाली बसत) ओ ऽ आता न्हाय.

**नारू :** गाढवा, मधी बोलू नको.

**गावकर :** हा मूर्ख आहे. याला काडीची अक्कल नाही.

**पेंग्या :** हो. गावकराचं खरं.

**राणू :** मग याचं लग्न तुम्ही का करता? बोला?

**गावकर :** तसा हा शहाणा आहे. परंतु...

**पेंग्या :** हो. मी का येडा हाय? (मनगटाने नाक पुसतो.)

**गावकर :** आणि अशा गरीबाचं लग्न होऊ नये का?

**राणू :** करा की! परंतु त्याच्यासारखीच नवरी पाहा. मेंढराच्या गळ्यात माणिक बांधू नका आणि एखाद्या गरीब बाईचा गळा कापू नका!

**गावकर :** मंडळी! हा आम्हाला कसाब म्हणतो आहे. याचा अर्थ काय? याला विचारा.

**राणू :** याचा अर्थ जो आमच्या कुणबी सेवा संघाला मानीत नाही तो कसाब आहे.

**गावकर :** आरे, आम्हीही मानतो संघ. काय नारू, खरं आहे की नाही? संघाच्या अटी आम्हालाही मान्य आहेत. विचार या नारूला.

**पेंग्या :** हो, आमाला गावकरानं सारं शिकवलंय. अडीच मणाचं पाच शेर सांगायचं. नऊ नारळ बोलायचं. तीनशे रुपयं देऊन आठरा बोलायचं....

**गावकर :** (चिडून) पेंग्या! मेलास तू!

**नारू :** आग लागी तुझ्या तोंडाला!

**पेंग्या :** (तोंड दाबून) चुकलं. आता न्हाय बोलनार.

**राणू :** तुम्ही संघाचं मानता, मग हा काळाबाजार का करता? पेंग्या, बोल खरं खरं.

**पेंग्या :** मी न्हाय बोलनार.

**गावकर :** का बोलणार नाही?

**पेंग्या :** गावकर मला मारतील.

**गावकर :** तो पेंग्या मूर्ख आहे लेकाचा!

**नारू :** हो, खरंच येडा हाय!

**गावकर :** गरीब आहे. आणि अशा गरीबाचं लग्न आम्ही करतो म्हणून सर्व लोक आम्हाला मान देतात आणि आम्ही आहोत म्हणून हा गावगाडा चालतो. आम्ही आहोत म्हणून या गावाला शोभा असते.

> आम्ही गावात राहातो । गावकी करतो ।
> आम्हाविणा शोभा ना गावाला ।

**राणू :**

> जशी गाढवाला अंबारी । पिंगळ्याला पिंजरा ।
> बाशिंग शोभतं घुबडाला ।।

**गावकर :** (भडकून) मला घुबड, पिंगळा म्हणतो.

**पेंग्या :** नको नको, माझं लगीन करू दे. मग काय बी बोला!

**नारू :** पेंग्या, बोलू नको रे.

**गावकर :** (चिडून) आरे, आमची निंदा करशील तर किडे पडतील. आम्हीच खरी लोकसेवा करतो.

**राणू :** (आत जाऊन पुतळाला घेऊन बाहेर येतो.) हं बोला. या माझ्या बहिणीचं लग्न तुम्ही या पेंग्याशी लावून लोकसेवा करता? कसली ही लोकसेवा? जाब द्या.

**पेंग्या :** (उडी मारून) आरे देवा, ही नवरी...

**नारू :** पेंग्या ऽ बोलू नको.

**गावकर :** पेंग्या ऽ बोलू नको.

**पेंग्या :** मला ही नवरी नको. ही मला मारती. ही माझी आई हाय. (कान धरून बसतो.)

**गावकर :** आरे मुडद्या, मग कसली नवरी करणार?

**पेंग्या :** मी, मी, मी म्हशीसारखी.

**नारू :** पेंग्या ऽ

**पेंग्या :** चुकलं. आता न्हाय.

**सर्व गावकरी मंडळी :** अहो गावकर, राणूचं म्हननं बरोबर हाय. तुम्ही आता संघाचं ऐकलं पायजी.

**गावकर :** (नरमून) खरं आहे, खरं आहे. अहो, आम्ही कधी संघाला विरोध करतोय? परंतु ह्या नारूसारखी नि पेंग्यासारखी भुतं आमच्या मागं लागतात. राणूचं पटतं मला.

**राणू :** पटतं नव्हं? तर चला, आपण आपल्या कुणबी समाजाला जागृत करू. चला.

(सर्व जमून गाणे गातात)

(**कवी** : शाहीर गव्हाणकर)

सोन्याचा दिवस हा भला लाभला ।
सोन्याचा दिवस हा भला ।।धृ।।
रूढीच्या अंधारी । खाल्ल्या ठेचा भारी ।
कर्जाच्या बोजानं । दबली आजवरी ।।
ज्ञानाचा दीप नवा आज तेवला ।।१।।
कुणब्यानं पिकवावं । सावकारानं खावं ।
शेत आम्ही राखावं । चोरांनी ते न्यावं ।।
उलटा सारा न्याय परि आता संपला ।।२।।
संघानं हाक दिली । कुणब्याला जाग आली ।
शेतकरी ऐक्यानं । वैऱ्यावर मात केली ।
कुणबी सेवा संघ दावी मार्ग आम्हाला ।।३।।

# दुकाळात तेरावा

## प्रवेश पहिला

ऊन पडले फयना
बांगडी मैना । ग बाई मी बांगडी मैना ।।
तू शुक्राची चांदणी ।
कोंदणातील तू हिरकणी
फुलातील तू रातराणी ।
नार न्यारी मृगनयना ।। ग बाई मी ।।१।।
तू चंद्रकोर चवथीची ।
मी काडी जशी दवण्याची
तू एक किमया नियतीची ।
तुलना नसे तुझ्या सुलक्षणा ।। ग बाई मी ।।२।।
मी कलावंत अग्रणी
सप्तसुरात तू रागिणी ।
नूपुरात तुझ्या मोहिनी ।
दृष्ट न लागो तुझ्या पैंजणा ।। ग बाई मी ।।३।।

(लावणी संपते. जयप्पा तुणतुण्याची खुंटी उलट फिरवून तुणतुणे खाली उतरतो. फडाचा मालक झेंडबा भडकतो.)

**झेंडबा :** आरं ए ऽ भुताच्या बच्च्या ऽ ऽ

**जयप्पा :** (मखख चेहरा करून) काय, बुटाचा बच्चा?

**झेंडबा :** (वैतागून) आरं ऽ भुताचा बच्चा!

**जयप्पा :** बेस्ट! आता समजलं. उंटाचा बच्चा!

**झेंडबा :** आरं ऽ उंटाचा बच्चा नव्हे, भुताचा, भुताचा!

**जयप्पा :** मग काय, बेस्ट आयडिया!

**झेंडबा :** आरं मी तुला म्हणतोय, भुताचा बच्चा!

**जयप्पा :** असं असं, मला वाटलं, तुम्ही मलाच म्हणताय भुताचा बच्चा!

**झेंडबा :** आरं तुला-तुला-तुला.

**जयप्पा :** मला? मग काय बेस्टच!
**झेंडबा :** वामनराव, पुढं या आणि ही बेस्टची पीडा आपल्या फडातून डिस्मिस् करा.
**जयप्पा :** (हरकून) गिरमिट बेस्ट आयडिया!
**वामनराव :** ए आयडिया, आतापासून तुला मालकांनी फडातून काढून टाकलं आहे.
**गुलाबराव :** जयप्पा, जानेका सर्व्हिस कर ऽ ऽ.
**जयप्पा :** (चेकाळून) बेस्ट! (आणि पुन्हा चेहरा रडवा करून) काय म्हणता? मला फडातून काढणार? नका नका. तसं करू नका.
**झेंडबा :** ते तुणतुणं खाली ठेवून चालाय लाग.
**जयप्पा :** (हात जोडून) आवं, पण माझा गुन्हा तरी काय? मी गरीब हाय.
**झेंडबा :** मला आधी हे सांग की ते तुणतुणं तू खाली का उतरलंस?
**जयप्पा :** उतरलंय? मग चढवतो की. (तो कर्रकन खुंटी पिरगळून तुणतुणे एकदम वर चढवतो. पुन्हा अपसूर निर्माण होतो.)
**झेंडबा :** (ओरडून) आरं, सूर कुठं हाय?
**जयप्पा :** आता डोस्क्यात आलं; सूर गेला व्हता.

(जयप्पा सूर नीट करतो. इतक्यात एक गावकरी प्रवेश करतो.)

**गावकरी :** रामराम, तमासगीर मंडळी!
**सर्व तमासगीर :** रामराम!
**गावकरी :** काय तालीम चालू हाय वाटतं?
**झेंडबा :** व्हय. ही भुतावाणी माणसं सुतावाणी सरळ करायचं काम चालू हाय. कारण गणपती जवळ आलंत. का आला व्हता?
**गावकरी :** दुसरं काम काय असणार? तुमचा तमाशा आमच्या गावाला आला पायजी. बोला, सुपारी किती घेणार? झट्कन बोला.
**जयप्पा :** बेस्ट -
**झेंडबा :** रुपयं तीनशे बसतील.
**गावकरी :** तीनशे? आमचं साडेतीनशे घ्या. पर तमाशा नवा पायजी. आम्हाला जुनं गाणं नकं.
**झेंडबा :** आवं, नवा करकरीत वग करतो की - मग तर झालं?
**गावकरी :** (पैसे काढून) हं, हे घ्या बयाना शंभर; नि कार्तिक पुनवेला खुजगावात दाखल व्हा. वाट बघाय लावू नका.
**झेंडबा :** तेची काळजी करू नका. सकाळीच तुमच्या पांढरीत हजर व्हतो.
**गावकरी :** बस् बस्! पर आता नवी लावणी कसली बसवायची? वाईच मासला दाखवा की!

**झेंडबा :** ऐका. जयप्पा, सूर दे.

**मुलगी :** कलेत मी अग्रणी ।

**झेंडबा :** सप्तसुरात तू रागिणी ।

नूपुरात तुझ्या मोहिनी ।

दृष्ट न लागो तुझ्या पैंजणा ।। ग बाई मी ।।

**गावकरी :** शाबास बहाद्दरा! मग आमच्या गावची जत्रा नक्कीच गाजणार. रामराम. चलतो. (गावकरी जातात.)

(सर्व तमासगीर झेंडबाला विचारतात -)

**वामनराव :** अहो मालक, तुमचा तो नवा करकरीत वग कुठं आहे?

**सर्व जण :** खरंच-खरंच.

**जयप्पा :** बेस्ट आयडिया. कुठंय नवा तमाशा?

**झेंडबा :** टाळक्यात. कळलं?

**वामनराव :** टाळक्यात? परंतु कुणाच्या?

**झेंडबा :** आपल्या समद्यांच्या टकुरीत एक नवा तमाशा हाय आणि तोच मी भाईर काढणार हाय.

**सर्व तमासगीर :** (डोकं खाजवीत कुरकुरतात.) आमच्या समद्यांच्या टाळक्यात, नि नवा तमाशा हाय?

**झेंडबा :** हो-हो. तुमच्या साऱ्यांच्या टाळक्यात माझा नवा तमाशा हाय नि तो चटकन भाईर काढा. न्हायतर सारंच डिस्‌मिस्!

**जयप्पा :** बेस्ट. करा साऱ्यास्नी डिस्‌मिस्!

**वामनराव :** मालक, सरळ सांगा, हा काय प्रकार आहे? काहो, नवा तमाशा आमच्या सर्वांच्या डोक्यात आहे याचा अर्थ काय?

**झेंडबा :** त्येचा अर्थ त्योच, की तुमच्या साऱ्यांच्या टाळक्यात माझा तमाशा हाय, त्यो गुमान मला द्या. न्हायतर मला तुमची टाळकी फोडावी लागतील.

**सर्व तमासगीर :** (डोकी वर करून) काय म्हणता, आमची डोकी फोडणार?

**जयप्पा :** मालक, हात जोडतो. एवढं काम कराच. ही आमची टकुरी बेकार झाल्याती; म्हंजी आम्ही ही कारणाशिवाय वागवतोय.

**वामनराव :** मालक, या तमाशाचं नाव काय?

**मालक :** दुकाळात तेरावा! आणि त्यो तमाशा आपुन साऱ्यांनी एकदा केला व्हता तसाच त्यो परत करू या. चला, कामाला लागा.

## प्रवेश दुसरा

### गण (लावणी)

खानदेशामध्ये दुष्काळामधील महिना तेरावा पायी चालत आला ।
ऐकून घ्या तुम्ही, त्यानं मुलखामधी कसा गोंधळ केला ।।
दुष्काळातला महिना तेरावा खिशात घेऊन ।
फडाचा मालक बाहेर पडला मोठ्या दिमाखानं ।।
अन्नटंचाई अन् महागाई दोन संकटानं ।
पिडली होती जनता याचं त्याला नव्हतं भान ।

(लावणी संपते. स्टेजवर हळूहळू अंधार होतो.)

**जयप्पा :** (अंधारात) ए ऽ बायकू! तू कुठं हायस? आरं, ही गेली तरी कुठं?

(झेंडबा प्रवेश करतो. त्याने ऐटबाज पटका बांधला असून अंगात शिकारी चालीचा कोट घातला आहे. त्याच्या खांद्याला लष्करी बॅग (थैली) आहे. तो अंधारात जयप्पाच्या खांद्यावर हात टाकतो. तसा जयप्पा 'भूत-भूत!' करीत किंचाळतो.)

**झेंडबा :** आरं मी भूत नाही! मी झेंडबा हाय. थांब हं. ब्याटरी लावतो.

(झेंडबा बॅटरी लावतो. स्टेजवर प्रकाश पडतो.)

**जयप्पा :** (धापा टाकीत) कोण-मालक? भले, मला वाटलं कुणीतरी भूत का बच्चाच आलाय.

**झेंडबा :** आरं, मीच आलोय. पण तू असा भुतासारखा अंधारात का बसलायस?

**जयप्पा :** मग काय करणार? आज आमच्या तेलात दिवाच न्हाय. म्हंजी दिव्यात तेलच न्हाई. नि बायको गेलीया गावात रॉकेल आणाय. आणि मी तिच्या नावानं हाका मारीत बसलोय.

**झेंडबा :** असं असं आणि काय, सर्व ठीक हाय ना?

**जयप्पा :** बाकी तसा मी ठीक हाय. पर मालक, तुमी वाकडी वाट कशी केली? म्हंजी इकडं कुणीकडं?

**झेंडबा :** आरं वा! हे काय बोलणं झालं? आवं, तुम्ही आपल्या फडातली एक नंबरची इरसाल म्हणजे गुणी माणसं. तुमची विचारपूस मी करायची नाही तर कुणी करायची? तुला आनंदात पाहून मला आनंद झाला आहे.

**जयप्पा :** होणारच! आणि खरं सांगू? माझा त्यो बेस्टपैकी अंधारातला आनंद तुमास्नी चटकन दिसल्याबद्दल मलाबी आनंद झालाय.

## (लावणी)

*(चाल : खंडबा नीट करीत गावाच्या)*

तेलाशिवाय जळतो दिवा । ध्यानामधी ठेवा ।
वक्त हा मोठा कठिण आला । दडला गहू हुलगा । महाग झाला ।
गोड्या तेलाचा भाव चढला । गरिबाचा पडला ।
फोडणी आम्ही मनामधीच देतो ।
झोपेमधी तुपाचं नाव घेतो ।
पुढाऱ्यांच्या मोटारी उडल्या । आणि सभा झडल्या ।
'फुल्या करा,' टाहो त्यांनी फोडला ।
फुल्या घेऊन पुढारी दडला ॥

**झेंडबा :** असं काय! आणि आपली सर्व तमासगीर मंडळी खुशाल आहेत ना?

**जयप्पा :** एकदम बेस्ट! आता बघालच की! (पुतळा प्रवेश करते. तिच्या काखेत गाठलं असून एका हातात दिवा (चिमणी) आहे. तिला पाहताच जयप्पाचा पारा चढतो नि तो आवाज चढवून बोलतो -)

ए ऽ, तू बायकू हायस का भूत?

**पुतळा :** आवं, पन असं भुतावाणी किंचाळाय झालं तरी काय?

**जयप्पा :** किंचाळू नको तर काय करू? मी आपला अंधारात भुतावाणी बसलोय आणि तू आपली गावात जाऊन खुशाल बसलीयास —

**पुतळा :** (बिथरून) काय? खुशाल बसले व्हते? आवं म्या दुपारपास्नं कंटुरापुडं रांग लावली व्हती. उभं ऱ्हाऊन पायाच्या खुंट्या झाल्या नि तुम्ही ऐतं घरात बसून म्हणता खुशाल बसले व्हते!

**जयप्पा :** (नरमून) अग तसं नव्हं. वाईच लवकर यायचं, आणि कंटुरात काय मिळालं?

**पुतळा :** काही न्हाय. शेवटी त्या कंटुरवाल्यानं सांगितलं की दुकानात माल संपला.

**जयप्पा :** (तिला बाजूला घेऊन) अरेच्या! मग आता ग कसं व्हणार! कारण आपल्या घरी एक मोठा पाव्हणा आलाय की ग!

**पुतळा :** (हळू आवाजात) मोठा पाव्हणा? त्यो आणि कशाला आला दुकाळात तेरावा—

**जयप्पा :** (हळू आवाजात) अग, तसं म्हणू नकं. त्यो आमच्या तमाशाचा मालक हाय नव्हं का!

**पुतळा :** आवं पर तुमचा त्यो मालक खाणार काय? नि निजणार कुठं?

**जयप्पा :** आता कुरकुरू नकं. आपणाला कायतरी केलंच पायजी. जा घरात. (मोठ्याने)

अग, हे मालक म्हंजी आम्हा दुबळ्या घरी गंगाच आलीय.
**पुतळा :** (हळू आवाजात) असं का? पर ही तुमची गंगा आमास्नी बुडवील त्येचं काय?
**जयप्पा :** (दबक्या आवाजात) आगं ऽ तसं बोलू नकं ऽ जा, जा तू घरात नि दिवा लाव.

(पुतळा आत जाते.)

**झेंडबा :** (खिशातून सिगारेटचे पाकीट काढून त्यातील शेवटची सिगारेट पेटवून रिकामे पाकीट फेकून) कायहो जयसिंगराव, तुमच्या गावात सिगरेट मिळंल ना?
**जयप्पा :** ढिगानं. लागलं तितकी सिगरीट मिळंल.
**झेंडबा :** मग फक्त दहाबारा पाकिटं मागवा.
**जयप्पा :** (दचकून) म्हंजी मी सिगरेटीचं दुकान सुरू करू म्हणता का काय?
**झेंडबा :** (ऐटीत) अलीकडे मला सिगारेट फार लागते.
**जयप्पा :** आसं का ऽ?
**झेंडबा :** होय आणि आता प्रथम चहा येऊ द्या.
**जयप्पा :** नंतर काय येऊ द्या?
**झेंडबा :** नंतर सुंदरपैकी जेवण. थकून आलो आहे; त्यामुळं सपाटून भूक लागली आहे प ऽ र ऽ
**जयप्पा :** खरंच-थकून आला असाल प ऽ र ऽ
**झेंडबा :** बोल-बोल! थांबलास का?
**जयप्पा :** (गोंधळून) म्हंजी-म्हंजी -
**झेंडबा :** ऐक, तुला काय म्हणायचं आहे ते मीच सांगतो. तुला असं म्हणायचं आहे की तुम्ही थकून आला असाल - पण मी कधी तुम्हाला पत्र पाठवलं होतं की कसंही करून याच; असंच ना?
**जयप्पा :** छा: छा: तसं कसं म्हणू? मला म्हणायचं व्हतं की उद्यासाठी काय करू?
**झेंडबा :** (आनंदित होऊन) वा-वा! छान. मग ऐकून घे. तुझ्या या गावात कोंबडे नावाचे प्राणी असतीलच, नि तेही भरपूर असणार, नाही का?
**जयप्पा :** (नकारार्थी मान हालवीत) मालक, खोटं सांगत न्हाय. मागच्या महिन्यात कोंबड्यांचा रोग आला नि एकूण एक कोंबडं मरून गेलं.

(एवढ्यात आतून कोंबड्याचा आवाज येतो.)

**झेंडबा :** ते पहा; स्वत: कोंबडं सांगत आहे की मी मेलो नसून उद्या मरणार आहे.
**जयप्पा :** तसं एकदोन कोंबडं हाय म्हणा!
**झेंडबा :** मग सकाळी एक कोंबडं मरू द्या. तो मरणार का?
**जयप्पा :** (कान धरून) कोंबडा काय, त्येचा बाप बी मरंल. आवं, गावात कोंबड्यांचा

रोगच आल्यावर कोंबडं काय करणार? ते मरनारच की!

**झेंडबा :** (गंभीर होऊन) जयप्पा, म्हणजे याचा अर्थ असा, की मी या गावात कोंबड्यांचा रोग होऊन आलो आहे, असंच ना?

**जयप्पा :** (हात जोडून) तसं कसं म्हणू मी? बाकी सकाळी कोंबडा नक्कीच मरणार.

**झेंडबा :** (खुशीत येऊन) शाब्बास! परंतु आपल्या फडातली इतर मंडळी कुठं आहेत? मी इथं आलो आहे हे सर्वांना समजलं आहे का नाही? ते येत का नाहीत?

**जयप्पा :** मालक, आता ते सारं येणार. अगदी कावळं जमावं तसं जमतील, आणि तुमच्यावर तुटून पडतील.

**झेंडबा :** (बिथरून) जयप्पा, ते सर्व कावळे जमून माझ्यावर तुटून पडणार याचा अर्थ मी म्हणजे मेलेलं गाढव आहे, असंच ना?

**जयप्पा :** छा: छा: तसं नव्हं मालक. तुटून पडणार म्हंजी तुमची बडदास्त करणार. म्हंजी कित्येक कोंबड्यांचा मुडदा पाडणार.

**झेंडबा :** (शांत होत) असं असं. आलं लक्षात.

(इतक्यात इतर सर्व तमासगीर येतात. सर्वजण झेंडबाला रामराम करतात.)

**वामनराव :** कसं काय मालक, आमच्या गावाला येऊन पायधूळ झाडली?

**जयप्पा :** ते साऱ्यास्नी नंतर कळून यील बरं का!

**झेंडबा :** हं, काय वामनराव, तुम्ही सर्व माझी माणसं. म्हणजे माझ्या फडातलं तमासगीर. तेव्हा म्हटलं, जाऊन त्या सर्वांची विचारपूस करावी. पुढील कार्यक्रम सांगावा. म्हणून आलो आहे. शिवाय आपण कुणी परके नाही. नि आपली एकमेकांची घरं एकमेकाला परकी नाहीत.

**तायाप्पा :** आनंद झाला मालक, आता आल्यासारखं दाबून ऱ्हावा आठ-पंधरा दिवस.

**जयप्पा :** बेस्ट, मालक, ऱ्हावाच! (सर्वांकडे हात करून) म्हंजी त्याशिवाय कोंबड्याचा बीमोड होनार न्हाय.

**झेंडबा :** (खुशीत येऊन) राहातो, राहातो. अगदी आनंदानं राहातो. कसं काय तायाप्पा, जिजाबा, बरं चाललं आहे ना?

**तायाप्पा**
**जिजाबा** } अक्शी झ्याक हाय!

(पुतळा चहाचा कप घेऊन येत. झेंडबा कपाळाला आठ्या घालतो.)

**झेंडबा :** अरे, हा कशाचा चहा आहे?

**जयप्पा :** साखरेच्या बापाचा, म्हंजी गुळाचा.

**झेंडबा :** गुळाचा? ठीक आहे, चालेल. आलीया भोगासी असावे सादर.

**वामनराव :** बरं मालक, आतापर्यंत किती गावच्या सुपाऱ्या आहेत?

**झेंडबा :** चिक्कार! या वर्षी आपण भरपूर पैसा मिळवणार. कारण आज एकही फड आपल्या फडाच्या पासंगालासुद्धा बसत नाही.

**सर्वजण :** ते खरं हाय-खरं हाय.

**वामनराव :** बरं मालक, आमच्या घरी चहाला कधी येणार?

**जिजाबा :** आणि माझ्या घरी तुम्ही आलंच पायजी.

**गणू :** आणि माझ्याबी.

**सदू :** आणि माझ्या घराला बी पाय लागू द्या.

**जयप्पा :** तू तर कसलीच काळजी करू नकं. तुझ्या घरालाच काय, पण तुझ्या घरावर देखील मालक पाय देनार हायती.

**तायप्पा :** आणि मालक, माझं घर इसरू नका.

**जयाप्पा :** बेस्ट, या तायाप्पाच्या घरात चांगला पंधरा दिवस तळ ठोकून बसा. त्याशिवाय त्याला दिवसाची चांदणी दिसनार न्हाय.

**झेंडबा :** हे पाहा मंडळी, मी नुसता चहा घ्यायला येणार नाही. कारण तुमचा फार आग्रह आहे. म्हणून मी प्रत्येकाच्या घरी चारपाच दिवस मुक्काम करणार आहे. निर्धास्त असा.

(सर्वजण दचकतात नि डोकी खाजवतात.)

**तायाप्पा :** (कण्हत) ते खरं हाय, पर मालक, माजी बायकू आजच बाळंतीण झालीया. तवा वाईच अडचण हाय.

**जिजबा :** माझी बी तीच अडचण हाय.

**गणू :** आणि मालक, कालच माझी कारभारीन माहेरी गेलीया.

**सदू :** खरंच खरंच, हेची बायकू माहेरी गेलीय. आणि माझी आत्ताच कुठंतरी पळून गेलीया.

**जयप्पा :** (रागानं) कारं? पळून गेली का मसणात गेली? आणि ही बाळांतपणं नि पळापळ एकाएकी का म्हणून झाली बोला. आणि हे बी सांगा, की माझी बायकू घरात हाय, तिला बी पळून जाऊ दे का? मग तुमचा आत्मा थंड पडेल का?

**वामनराव :** मालक, माझ्या घरी कसलीच अडचण नाही. आपण माझ्या घरी खुशाल चार दिवस येऊन मुक्काम करू शकता. पऽण!

**झेंडबा :** म्हणजे तुमच्याही घरी अडचण आहे, असंच ना!

**वामनराव :** अडचण तशी नाही, परंतु मी आहे ब्राह्मण. तेव्हा माझ्या घरी कोंबडाबिंबडा मिळणार नाही.

**झेंडबा :** (आश्चर्याने) काय म्हणता? कोंबडा मिळणार नाही?

**जयप्पा :** आवं मालक, कोंबडाच काय, पर कोंबडीच्या अंड्याचं रिकामं कवचबी दिसणार न्हाय. मातर वराण भारत भरपूर वरपावा लागंल. आणि मालक, हे समदं लोक बेस्टपैकी खोटं बोलत्यात.

**झेंडबा :** मला समजलं नाही. सरळ सांग.

**जयप्पा :** मालक, या तायाप्पाची बायकू बाळंत झाली हे खरं, पर त्येला वरसं सात झाल्याती. आता हे पोरगं साळंत जातंय.

**झेंडबा :** आणि जिजाबाची बायको कधी बाळंत झाली?

**जयप्पा :** तिला तर कधीच मूल होत न्हाय. आणि य गण्याची बायकू आताच मला दिसली.

**गणू :** (कण्हत) मग ती परत आली असंल!

**झेंडबा :** (रागाने) जयप्पा, तू बोल. हे सर्व तमासगीर आहेत याची मला कल्पना आहे. बोल तू पुढं.

**जयप्पा :** आणि या सदूची बायको पळून गेली न्हाय. ती आत्ताच आमच्या जात्यावर दाणं दळून घरी गेली. आता ती पीठ मळून भाकरी करीत असंल.

**झेंडबा :** (आवाज चढवून) असं का? मग ऐका तर. आता मी प्रत्येकाकडं पाच पाच दिवस राहाणार आहे. बोला, कुणाची काही हरकत, अडचण आहे का स्पष्ट सांगा. अडचण सांगा.

**सर्वजण :** का ऽ य पण न्हाय!

**जयप्पा :** मालक, आता ह्यांची कसलीच अडचण न्हाय. पर चार दिवसात ह्येस्नी दुकाळात तेरावा महिना कसा असतो ते कळून येणार हाय. चला, भाकरी तयार झाली, जेवू या.

## प्रवेश तिसरा

*(तायाप्पाचे घर. तायाप्पा झेंडबाला घेऊन प्रवेश करतो.)*

**तायाप्पा :** या या मालक. हे बघा माझं घर.

**झेंडबा :** (सर्वत्र नजर फिरवीत) छान आहे! ही बॅग कोपऱ्यात जपून ठेव.

**तायाप्पा :** (बॅग घेऊन) अरेच्या! बारदान बरंच मोठं दिसतंय.

**झेंडबा :** होय. त्यात सर्व काही आहे. म्हणजे त्या बॅगेत पोथी आहे, गीता आहे. भूतबाधेवरलं मंत्रतंत्र आहे आणि रोगराईवरली औषधं आहेत, म्हणजे दवाखाना आहे.

**तायाप्पा :** मग बरं हाय. बोला, हुकूम सांगा.

**झेंडबा :** आता प्रथम चहा घेऊ द्या. नंतर अंड्याचा झक्‌पैकी रस्सा करा. कारण आत्ताच

जयाप्पाकडं कोंबड्याचं जेवण झालं आहे. परंतु उद्या सकाळी चहा झाली की कोंबडी, भात, चपाती, लिंबू, कांदा असा स्वयंपाक होऊ द्या. आणि उद्या संध्याकाळी मटणाची तयारी करा.

**तायाप्पा :** (भेदरून) बरं बरं, करतो.

**झेंडबा :** मग चहाची ऑर्डर करा.

**तायाप्पा :** आरेच्या! विसरलोच की (आत डोकावून) अग ए ऽ बायको. हायीस का घरात? चल भाईर ये. (सरूबाई प्रवेश करते.) ए ऽ तू बायकू हायीस का तुणतुण्याची खुंटी? बायला ऽ पिळावं तवाच सूर कळायचा.

**सरू :** अवं मग वैतागताय कशासाठी?

**तायाप्पा :** (सरूला बाजूला घेऊन दबक्या आवाजात) अग, वैतागू नको तर काय करू? गळ्याला फास लागलाय माझ्या.

**सरू :** तेच सांगा की. ह्यो वं कोण?

**तायाप्पा :** (दबक्या आवाजात) त्योच, त्योच फास. पर हळू बोल.

**सरू :** पर ह्यो कोण?

**तायाप्पा :** ह्यो आमच्या फडाचा मालक हाय.

**सरू :** मग ह्यो हिकडं कशाला आलाय? दुकाळात तेरावा महिना!

**तायाप्पा :** (घाबरून) अग, हळू बोल. न्हाई तर ह्यो ऐकंल.

**सरू :** नि काय गिळून टाकील? आणि ह्यो हिकडं कशाला आलाय?

**तायाप्पा :** अग ऽ गावमटकेगिरी करायची त्येला खोडंच हाय आणि ह्यो हतं पाच दिवस ऱ्हानार हाय.

**सरू :** आवं पर घरात शिपीभर दाणं न्हायती नि ह्यो तुमचा मालक खानार काय? नि ऱ्हानार कुठं? मेली पीडाच हाय ही.

**तायाप्पा :** (रडवा चेहरा करून) पीडा म्हंजी दांडगी पीडा हाय, पण आता काय बी करून उसनंपासनं काढून हे भूत घालवलं पायजी. माझ्यासाठी काहीच बोलू नकं.

(सरू आत जाते नि जयप्पा हळून प्रवेश करतो.)

**झेंडबा :** काय तायाप्पा, नवराबायकोची कसली कुजबूज चालली होती?

**तायाप्पा :** (गोंधळून) दुसरी कसली चालणार? ह्येच की आपलं तुमच्याबद्दल - म्हंजी तुमची उठबस कशी करायची ह्येचा आम्ही इचार केला. अंडं, मटन, कोंबडं, चपाती, भात, लिंबू, कांदा -

**झेंडबा :** (खुशीत येऊन) शाब्बास! नि सिगरेट पाच पाकिटं फक्त आजच्यासाठी.

**तायाप्पा :** (आवंढा गिळून) ब ऽ रं ऽ. सारं करतो (पुन्हा सरूला हाक मारतो.) सरू, वाईच इकडं ये.

**सरू :** (बाहेर येऊन) काय हुकूम हाय सांगा. हजर हाय मी.

**तायाप्पा :** आधी फर्स्ट क्लास चहा कर. संध्याकाली अंड्याचा रस्सा; उद्या सकाळी कोंबडी. संध्याकाळी मटन-भात, चपाती, लिंबू, कांदा हे सारं इसरू नकं.

**सरू :** असं का? बरं. न्हाय इसरत. पण मी अंडी कुठं बघू? आमची कोंबडी तर खुडूक झालीया. ती अंडी घालीत न्हाय.

**जयप्पा :** ते काय चालणार न्हाय. ती अंडी घालीत नसंल तर म्हणावं गुमान घाल. न्हायतर म्हणावं चुलीवर पिल्ली काढावी लागतील.

**सरू :** (झटक्यांत) बरं ऽ सांगते हां. (आत जाते)

**झेंडबा :** (रुबाबात) बरं मंडळी. मी चूळ भरतो. (विंगकडे जाऊन मोठ्याने) बाकी जयप्पा, आज तुझ्या कोंबड्यानं कमाल केली ऽ

**जयप्पा :** (झेंडबा बाहेर गेल्यानंतर कपाळावर हात मारून) खरं बाबा-कोंबड्यानं कमाल केली, पर माझी सालं गेली की! (तायाप्पाकडे वळून) काय तायाप्पा, आताच काळीज गळ्यात आलं वाटतं?

**तायाप्पा :** व्हय रं बाबा, खरं सांगू का, आज माझ्या घरात राकीसच शिरलाय.

**जयप्पा :** आता ह्यो राकीस पाच दिवस घराभाईर पडनार न्हाय नि त्यो रोज कुटंबी लंगी काढदाणा करणार. नुसता दुकाळात तेरावा हाय.

**तायाप्पा :** आरं, त्यो माप बलगी कुटून दाणं काढील. पर माझ्याकडं बलगी तरी हाय का?

**जयप्पा :** आरं ऽ म्या सावकाराचं कर्ज काढून ह्यो डबरा भरला.

**तायाप्पा :** आरं, पर मी काय करू? हात धरावा तर रोडका नि शेंडी धरावी तर बोडका. मी गरीब; हे पाच दिवस कसं ओढू?

**जयप्पा :** ओढ तसंच डोळं झाकून - घाण्याच्या बैलावाणी. न्हायतर बेस्टपैकी वडाराचं दोन रेडंच जुंप; म्हंजी बरं पडंल.

ऊन पडले फयना । ग बाई मी बांगडी मैना ।
न्हवं बाई मी रांगडी मैना ।

**सरू :** (बाहेर येऊन) आवं ह्यो तुमचा मालक सांजला अंड्याचा रस्सा खाणार. पर ह्यो झोपनार कुठं?

**जयप्पा :** कुठं म्हंजी? बेस्टपैकी घरात.

**सरू :** आणि आम्ही?

**जयप्पा :** तुम्ही दारात. पाच दिवस वनवास.

**सरू :** ठीक हाय. बघते मी बी - (आत जाते)

(एक गावकरी प्रवेश करतो)

**गावकरी :** आरं तायाप्पा, तुझ्या घरी म्हनं दांडगा तमासगीर आलाय, खरं का?
**तायाप्पा :** (कण्हत) खरं ऽ हाय. दांडगा तमासगीर आलाय आणि त्येच्या संग दांडगा रानबोका बी आलाया.
**गावकरी :** ह्यो दांडगा तमासगीर नावाचा माणूस जवळनं बघावा म्हणून आलोय मी.
**जयाप्पा :** नका, नका, जवळनं नका. लांबनंच बघा.
**तायाप्पा :** कारण तुमास्नी त्यो ताव सोसायचा न्हाय,

कलेत मी अग्रणी । सप्तसुरात तू रागिणी ।
नूपुरात तुझ्या मोहिनी । दृष्ट ना लागो तुझ्या पैंजणां
ग बाई मी बांगडी मैना ॥

(या ओळी गात झेंडबा प्रवेश करतो.)

**गावकरी :** (पुढं जाऊन) रामराम शाहीर.
**झेंडबा :** रामराम. आपण कोण?
**गावकरी :** मी एक गावकरी हाय. कसं काय, बरं हाय नव्हं?
**झेंडबा :** आमचं सदासर्वदा बरंच असतं. कारण –
(त्यावेळी सर्व लोक प्रवेश करतात. सर्व सनगं सुरात लावतात. कारण -)

**(लावणी :** *चाल : अंत ना पार जमीन***)**

आमच्या घरात गाण्याची शेती । गाण्याची शेती ।
शेती ती सदा बहराला येती ।
आणि ती चौअंगी डोलती ।
फळं नि फुलं आम्हाला देती ।
कलेची कणसं डुलू लागती । राजे आम्ही भले...
डफ तुणतुण्याचे आम्ही धनी । सदा मैदानी ।
डफ घेऊनी उभे बिनीवाले ॥
गाण्यानं पेवं आमची भरती! पेवं भरती
सनगं आमची अखंड गरजती ।
जनता प्रीत आम्हावर करती ।
फजामधी कलगी आमची तळपती
हलगी बोलती थोर नशिबाचे । नशिबाचे थोर ...
राखतो इमान शाहिरीचे! एक ब्रीदाचे ।
लोकनाट्याचे । लोकप्रेमाचे ॥

**झेंडबा :** आणखी शिवाय आम्ही भूतपिशाच्च्यावर हुकमत करतो. रोगराई निवारतो आणि लोकांना दुःख देईल त्याच्यावर तोफा डागतो.

**गावकरी :** मग शाहीर, तुमचं सारंच वेगळं नि आगळं हाय. तुम्ही रोग बी निवारता का?
**झेंडबा :** वाटेल तसला! नि जुन्यातला जुना!
**गावकरी :** आवं मग देव पावला. शाहीर, माझा भाऊ पोटदुखीनं आजारी हाय. लई खटपट केली. डाक्टरास्नी दाखवलं पर गुण आला न्हाय. कारण पैसा न्हाय म्हणून डाक्टरानं नीट औषधच दिलं न्हाय. आणि त्यो दोन्ही डोळ्यांनी आंधळा हाय.
**झेंडबा :** आता कुठं आहे तो?
**गावकर :** हे काय शेजारचंच आपलं; आणू का?
**झेंडबा :** घेऊन या त्याचं स्ट्रेचर. जयप्पा कंपाउंडर तयार?
**जयप्पा :** (ओरडून) हजर डॉक्टर –
**झेंडबा :** टेबल तयार कर.
**जयप्पा :** (तीन माणसे वाकून त्याच्या पाठीचे टेबल करून त्यावर फडके मारीत) डॉक्टर, टेबर तयार.
**झेंडबा :** (डॉक्टरच्या ऐटीत) पेशंटला घेऊन या.
(चार माणसं पेशन्टला आणतात नि टेबलावर उताणे झोपवतात, त्याच्या अंगात लष्करी कोट नि पायात बूट आहेत.)
**झेंडबा :** (पेशंटला) नाव काय?
**पेशंट :** कोंडिबा मारके.
**झेंडबा :** डोळे कसे गेले?
**कोंडिबा :** ते लढाईत गेले, बॉम्बगोळ्यानं.
**झेंडबा :** मग तुम्हाला काय मिळालं?
**कोंडिबा :** का ऽ य बी न्हाय. एक एवढा कोट नि बूट.
**झेंडबा :** (कोंडिबाला तपासू लागतो. नंतर त्याच्या पोटाला हात लावतो.) मंडळी, रोगाचं मूळ सापडलं. बोला, या गावात डॉक्टर आहे का?
**सर्व :** हाय, हाय.
**झेंडबा :** त्यानं या रोग्याची तपासणी केली होती का?
**सर्व :** केली - केली.
**झेंडबा :** मग काय केलं त्या डॉक्टरनं?
**गावकरी :** आवं, त्यानं तर या गरिबाची पोटदुखी वाढवली.
**जयप्पा :** आता तुम्ही वाढवू नका.
**झेंडबा :** हा रोगी जेवत नाही - म्हणजे भाकरी खात नाही. खरं आहे का हे?
**सर्वजण :** अक्षी खरं हाय.

**झेंडबा :** (ओरडून) मग हा भाकरी का खात नाही?
**वामनराव :** कशी खाणार? त्याला भाकरीच मिळत नाही!
**जयप्पा :** मग का त्यानं वाटंची माती खावी?
**झेंडबा :** (गंभीरपणे) मंडळी, भाकरी न मिळाल्यामुळे याचं एक आतडं निकामी झालं आहे.
**वामनराव :** मग त्यावर उपाय काय?
**झेंडबा :** (ओरडून) एकच उपाय नि तो म्हणजे ऑपरेशन! म्हणजे शस्त्रक्रिया!
**जयप्पा :** म्हणजे पोटाची चिरफाड.
**झेंडबा :** कंपाउंडर, शस्त्रक्रियाचं सामान काढा.
**जयप्पा :** (थैलीतून एक सुरा काढून) डॉक्टर सरकार, ही घ्या आपली तरवार नि करा कोंडिबाची कत्तल. आता थांबू नका.
**झेंडबा :** (सुरा घेऊन नि त्याची धार पाहत) कंपाउंडर, पुढं ये. या हत्याराला दगडावर धार लावून जलदी आणा.
**जयप्पा :** (पळत जाऊन सुऱ्याला धार लावून परत येतो.) डॉक्टर, घ्या तरवार नि चालू करा. बेस्टपैकी फाडा पोट कोंडिबाचं.
**झेंडबा :** मंडळी, ही पाहा शस्त्रक्रिया - आणि टर्रकन् कोंडिबाचे पोट फाडून एक आतडे बाहेर काढून जयप्पाकडे देऊन) कंपाउंडर हे आतडं त्या डॉक्टरला बहाल करा आणि सुईदोरा घेऊन रोग्याचं पोट शिवून टाका.
**जयप्पा :** (गडबडीने आपली कामे करतो). डॉक्टर, माझं काम बेस्टपैकी झालं.
**झेंडबा :** मग रोग्याला उठवून बसवा आणि त्याला सांगा, खा-पी बोल!
**कोंडिबा :** (चटकन उठून बसतो) आज मला आराम पडला. (हात जोडतो) तुम्ही देव हायसा.

**(लावणी)**

शाहीर आपला दौरा संपवून मागं परतला ।
टोप्या घालून आपल्या फडातील सर्व लोकाला ।।

## प्रवेश चवथा

*(सर्व तमासगीर विचार करीत आहेत.)*

**जयप्पा :** मंडळी, मालक येऊन गेला, पण मला त्या सावकारी भुताच्या गळ्यात बांधून गेला. माझं बेस्टपैकी भुस्काटच पाडलं त्यानं.
**तायाप्पा :** आणि माझं रं काय? आरं, त्येनं माझी एक महिन्याची चंदी पाचच दिवसात

गडप केली नि मी असा खंक झालोय.

**गणू :** मी तर ठारच झालो!

**सदू :** आरं बाबा, मला तर अंडं, कोंबडी आणि मटन हुडकून मरायची पाळी आली व्हती.

**वामनराव :** माझ्या घरचा फोडणीचा भात त्यांना फार आवडत होता.

**जयप्पा :** मग आता सांगा. यावर उपाय काय? कारण त्यो दुकाळात तेरावा परत येणार.

**तायाप्पा :** मग काय मी जगणारच न्हाय.

**वामनराव :** मंडळी, माझं ऐका. याला एकच उपाय आहे नि तो म्हणजे असा की, हा मालक दुकाळातील बारा महिन्यात एक तेरावा होऊन आला होता. आता आपण सर्वांनी दुकाळातील एका महिन्यात तेरा महिनं होऊन जायचं.

**जयप्पा :** बेस्ट आयडिया! जायचं आणि घरात जेवढं असेल तेवढं खायचं. बकऱ्यांचा निकाल लावायचा, कोंबड्यांचा नि:पात करायचा, काय? माझी आयडिला कबूल?

**गणू :** कबूल कबूल. तरच मालकाला दुकाळातल्या तेराव्याचा इंगा कळंल.

**सदू :** कळंल म्हंजी काय? कळणारच!

**वामनराव :** आणि मगच हा तेरावा आपल्या गावाकडं कधीच वळनार नाही. तयारी करा नि उद्याच निघू या.

**जयप्पा :** बेस्ट आयडिया - आत्ताच निघू या.

**तायाप्पा :** नको-उद्याच जाऊ.

**सर्वजण :** ठरलं-उद्याच निघायचं.

**वामनराव :** मग सकाळी लौकर उठा. कारण आम्हाला इस्लामपूरच्या बाजार वक्ताला तिथं पोचलं पाहिजे. पोहचायचं ते लगेच तमाशा सुरू करायचा.

**जयप्पा :** ऊन पडलं फयना । ग बाई मी रांगडी मैना —

## प्रवेश पाचवा

*(बाजार भरला आहे. बाजारात झकपैकी पोषाख करून झेंडबा फिरत आहे.)*

**झेंडबा :** (स्वत:शी) दोन माणसांचं मटण आलं. झिंगं घेतलं. बांगडं विसरलो नाही. विडीपान, सिगरेट घेतली. आता एक चहा ठोकून घर गाठावं झालं —

(एवढ्यात जयप्पा नि दुसरे दोन तमासगीर प्रवेश करतात)

**जयप्पा :** रामराम मालक! कसं काय, खुशाल हायसा न्हवं?

**झेंडबा :** (चमकून) कोण जयप्पा? रामराम. आरं तू इकडं कुठं नि कसा?

**जयप्पा :** (मख्ख चेहरा करून) आपला असाच - तुमच्या भेटीला.

**झेंडबा :** ठीक आहे. ठीक आहे. चला, एक एक चहा घेऊन घरी जाऊ.

(इतक्यात तायाप्पा नि दुसरे दोघे रामराम करतात.)

**तायाप्पा :** रामराम मालक. आनंदी आनंद हाय न्हवं?

**झेंडबा :** (बळेच हसत) रामराम तायाप्पा, आनंद आहे. तू पण इकडं कुठं?

**तायाप्पा :** तुम्हाकडंच म्हटलं जावं नि भेटावं.

**झेंडबा :** एवढंच ना, मग चला, सर्वजण चहा घेऊ.

(इतक्यात वामनराव, गणू, सदू, जिजाबा आणि कोंडिबा प्रवेश करतात. सर्व रामराम करतात.)

**वामनराव :** कसं काय मालक? सर्व काही कुशल आहे ना?

**झेंडबा :** अगदी आनंदी आनंद, परंतु तुमची ही दिंडी इकडं कुणीकडं? नि कोंडिबाही?

**वामनराव :** तुमच्याकडं. म्हटलं, मालकांची विचारपूस करावी. एवढंच!

**झेंडबा :** काही हरकत नाही. आता आपण सर्व प्रथम चहा घेऊन मग घरी जाऊया. चला.

(थोड्या वेळात पुतळा नि सरू येऊन बेरीज पूर्ण होते.)

## प्रवेश सहावा

*(झेंडबाचं घर. झेंडबा तमासगीराचं लटांबर घेऊन प्रवेश करतो.)*

**झेंडबा :** (बायकोला) अग ऽ ए ऽ आहेस का घरात? चल, बाहेर ये. बघ कोण आलं आहे?

**लक्ष्मी :** (प्रवेश करून नि दचकून) अग बाई ऽ ही सर्व मंडळी इकडं हो कशी? आणि अशी अचानक?

**झेंडबा :** अग, इकडं कशी म्हणजे काय? ही आपली माणसं आपल्याकडं आली आहेत.

**लक्ष्मी :** (झेंडबाला बाजूला घेऊन) अहो, दुकाळात म्हणे एकच तेरावा असतो. पण हे तर दुकाळात तेराच्या तेरा आले आहेत की. आता हो काय होणार?

**झेंडबा :** (हळूच) हे ते आमचे तीन तेरा करणार आहेत. कारण परवाच मी त्यांचे बारा वाजवून आलो आहे. जा, कामाला लाग.

(बायको आत जाते. झेंडबा वळून-)

**झेंडबा :** हं, मंडळी बोला, काय सेवा करू? अगदी आपलंच घर आहे समजा-

**जयप्पा :** आधी बेस्टपैकी चहा येऊ द्या. आणि मग झणझणीत जेवण.

**झेंडबा :** निर्धास्त राहा. चहा आता येईल. नंतर उत्तमपैकी मटणाचं जेवण होईल.

**सदू :** पानसुपारी बी येऊ द्या.
**तायाप्पा :** मला सिगरेटी पायजीत.
**जयप्पा :** मलाबी दहा पाकिटं.
**जिजाबा :** मला बिडी चालेल.
**कोंडिबा :** मला आपली फक्त भाकरी मिळावी.
**वामनराव :** मला आपला फोडणीचा भात! वरण, पोळ्या, लोणचं नि वरण असेल तर फारच उत्तम. मला मटण मुळीच चालत नाही. कारण —
**जयप्पा :** (मधेच) कारण बोकडाची हाडं त्येच्या घशात अडकत्याती.
**झेंडबा :** वामनराव, सर्व काही होईल. पण काय हो कोंडिबा मारके, तुम्ही कशी दौड मारली? का काही खास काम होतं?
**जयप्पा :** मी सांगतो. त्येचं कापलेलं आतडं त्येस्नी आता परत पायजी. भलतीच गरज हाय त्येची.
**तायाप्पा :** आणि लगीच दुसरं आतडं कापायचं हाय. आणू का तुमची तरवार?
**कोंडिबा :** तरवार नकं आणू; भाकरी आण.
(सर्व मंडळी डोळे मिचकावीत चहा पितात.)
**जयाप्पा :** ए, काय बेस्ट चाय हाय ह्यो? मला वाटतं, इकडं गुळवणी बुवांचं राजच नसावं.
**तायाप्पा :** आरं, नसावं कसलं, न्हायचं! इकडं साखरूबाईची जत्रा हाय.
**वामनराव :** म्हणूनच पोटभर चहा घ्या. कारण साखरेचा चहा तुम्हाला परत मिळणार नाही.
**कोंडिबा :** खरंच मंडळी, मग हाणा बरं! दोनदोन चारचार कप!
(मग 'पानसुपारी, सिगरेट, कुठं?' असा एकच गलका सर्वच करतात. झेंडबा सर्व काही हजर करतो. दोन मुली आत जातात. आणि थोड्याच वेळाने सर्वच तमासगीर मंडळी आळीपाळीने जांभया देऊ लागतात. सर्वांच्या शेवटी कोंडिबा मारके वाघासारखा आवाज काढून जांभया देतो. एकदा जयप्पाचा जांभईसाठी पसरलेला जबडा पुन: मिटतच नाही. त्यामुळे तो तोंड पसरून स्टेजवर नाचू लागतो. नंतर उशिराने तायाप्पा, वामनराव व इतर मोठा प्रयत्न करून जयप्पाचा जबडा मिटवतात. झेंडबा तो सर्व प्रकार पाहत असतो.)
**झेंडबा :** मंडळी, जबडे फाटतील याची काळजी घ्या. आणि उठून पंगतीला बसा. जेवण तयार आहे. चला.
(पुन: गोंधळ उठतो. जो तो धावत सुटतो. कोण एका जागी बसलेला उठून दुसरीकडे पळतो. नंतर झेंडबा स्वत: वाढू लागतो. झेंडबा आत जातो.)

**जयप्पा :** (हळू आवाजात) मंडळी, आता हयगय करू नका. गळ्याल येईपतूर ठासा.
(सर्व जेवू लागतात नि एकाएकी पुन्हा गलका करतात -

'इकडं भात येऊ द्या मालक-'

'मला चपाती वाढा मालक-'

'मला वाईच मटण पायजी मालक-'

'कढाण आणा मालक.'

झेंडबाची भलतीच धांदल उडते. तो धापा टाकतो.)

**वामनराव :** (उठून मोठ्याने) मालक, मला खीर — खीर नि वरण —

(सर्व जेवून उठतात नि पुन्हा ओरडतात -)

'पान'

'सुपारी!'

'बिडी-बिडी!'

**एक :** बरं मालक, आम्ही झोपतो.
**दुसरा :** कुठं पथारी पसरावी?
**तिसरा :** अंगावर काय घ्यायचं?
**चौथा :** मला घोंगडं द्या!
(तोही गोंधळ शांत होतो. सर्वजण झोपतात. आणि स्टेजवर हळूच अंधार होतो.)

**झेंडबा :** (बाहेरून येतो) ए ऽ आहेस का घरात? जरा बाहेर ये पाहू.
**लक्ष्मी :** (प्रवेश करून) हे हो काय आणलंत?
**झेंडबा :** हा तेरा भुतांचा खानादाना, पण ही भुतावळ गेली कुठं; नि ती दुपारी जेवली का?
**लक्ष्मी :** कुठं जाणार? जेवून भटकायला गेली.
**झेंडबा :** आणि त्या दोन मुली?
**लक्ष्मी :** इथंच कुठं मामाच्या घरी. पण काय हो? हा तमाशा संपणार कधी? नि केव्हा? अहो, या लोकांनी पाच दिवसात घर धुतल्या तांदळासारखं केलं. नि आज तरी का ऽ ही नाही.
**झेंडबा :** (गंभीरपणे) मला कल्पना आहे. आता हा तेराचा तमाशा संपवण्यासाठी मला स्वत:ला एक भयंकर तमाशा करावा लागणार आहे. आणि आजच तो मी करणार, पण तुला एक काम करावं लागेल.
**लक्ष्मी :** (पुढं जाऊन) हं, सांगा, काय करावं लागेल?
(झेंडबा गंभीर चेहरा करून तिच्या कानात काहीतरी सांगतो. ते ऐकून तीही गंभीर होते.)

**झेंडबा :** मात्र घाबरू नको. जा घरात!
(ती जाते आणि लगेच एकएक जण प्रवेश करतो नि पुन: 'पानसुपारी, बिडी, सिगरेट' असा गलका होतो नि त्यातूनच पुन: प्रत्येक आळीपाळीने जांभया देऊ लागतो.)
(जयप्पा मफलरने आपले तोंड बांधतो.)
**झेंडबा :** काय मंडळी, आज लौकर भूक लागली वाटतं? हरकत नाही. चला, बसा पंगतीला.
(सर्वजण पुन्हा पंक्तीत जागा मिळविण्यासाठी दंगल करतात.
नंतर ती दंगल शांत होते.)
**झेंडबा :** (किंचित तीक्ष्ण सुरात आत पहात) हं! लोक पंगतीला बसले. ताट वाढ. काय हे? बिचाऱ्यांच्या बचाळ्या फाटायची वेळ आली आहे.
**लक्ष्मी :** (प्रवेश करून फणकाऱ्याने) त्यांचे जबडे फाटू द्या नाहीतर आणखी काही होऊ द्या. मी त्यांना काय वाढू, सांगा ना?
**झेंडबा :** (ओरडून) मुजोरी करू नको. जेवण वाढ..
**लक्ष्मी :** (चिडून) अहो पण कुठून वाढू? आग कशी लागत नाही त्यांच्या तोंडांना? (ती आत जाते.)
**झेंडबा :** (एकाएकी खवळतो, ओरडतो) काय म्हणालीस? माझ्यासमोर माझ्या माणसांचा हा अपमान! आता मी ही असली बायको जिवंतच ठेवीत नाही. मी हिचा आता खूनच करणार नि फासावर जाणार?
(तो धावतच घरात जातो. तमासगीर घाबरून पहातात. आणि आत धडाधड आवाज होऊ लागतात.) माझ्या माणसांचा अपमान? (मारल्याचा आवाज)
**लक्ष्मी :** (मोठ्याने) मेले! ग मेले!!
**झेंडबा :** (ओरडून) मर. शंभर वेळा मर (पुन: मारल्याचा आवाज आणि बायकोच्या किंकाळ्या. नंतर मारण्याचा आवाज, ती रडणे यांचा वेग वाढतो. बाईवर भयंकर मार पडत असावा असा भास होतो. बाहेर तमासगीर भेदरले आहेत. घरातील तो मार आपल्यावरच पडत आहे असे त्यांना वाटते. घरात धाड् असा आवाज येताच जयप्पा आपले डोके वाचवू पाहतो. तायाप्पा एकाच पायावर नाचतो. गणू कोंडिबाच्या मागे दडतो. सदूला तिरमिरी येते. वामनराव पळायचा विचार करतो.)
**एकजण :** आरं शाहीर पिसाळलाय! त्यो नक्कीच बायकोचा खून करणार!
**दुसरा :** आरं, घरात जाऊन बाईला वाचवा की! (सर्व तमासगीर हळूहळू आत जाऊ लागतात. तोच झेंडबा दारात येऊन जमिनीवर काठीचा जोरदार तडाखा देतो. तसे सर्व तमासगीर मागे पळतात. जयप्पा, तायाप्पा लोळू लागतात. कोंडिबा सर्वत्र चाचपू लागतो. गणू, सदूला हुडहुडी भरते. घरात माराचा आवाज नि रडे यात खंड नसतो. पण बाईचा

आवाज मंद जाणवू लागतो.)

**वामनराव :** (मोठ्याने ओरडतो) आरं मूर्खांनो, मालकानं बायकोचा खून केला. आता पळू या ऽ

(नंतर सर्व पळून जातात नि हातात काठी घेऊन झेंडबा बाहेर येतो.)

**झेंडबा :** (संतापून) कुठं गेली ही माझी माणसं? अखेर मी बायकोचा खून केला. चला, या आणि पाहा. मला अटक करा. अरे, हे सर्व तेरावे गेले कुठं? गेले. त्यांनी पळ काढला? (आत जाऊन) ऐकलंस का? तेरा गेले-

**लक्ष्मी :** (सूप नि भोपळा घेऊन हसत प्रवेश करते.) काय हो, तुम्ही सर्व गाडगी फोडली नि हे सूप बघा कसं झालं ते —

**झेंडबा :** हाट्! काऽ ही कामाची नाहीस. अग, तुला साधं रडताही येत नाही.

**लक्ष्मी :** अय्या! उगीच कशी हो रडणार मी? उलट, मला हसूच येत होतं. नि मारल्याशिवाय का कुणाला रडू येतं?

**झेंडबा :** भ ऽ लं! मग मी तुला खरोखर मारलं असतं तर ते तेरा तुझं तेरावं करून गेले असते. चला रं ए ऽ पळपुटे तमासगीर - पुढं या. (सर्व स्टेजवर येतात.) बोला, कसा झाला नवा तमाशा?

**वामनराव :** सुंदर-सुंदर!

**जयप्पा :** बेस्ट! मातर माझं टाळकं थोडक्यात वाचलं.

**तायाप्पा :** माझं तंगडंच मोडत व्हतं.

**कोंडिबा :** (चाचपीत) बरं डाक्टर महाराज, तेवढं माझं आतडं परत करा बरं.

**झेंडबा :** आता ते मिळणार नाही. सर्व सामानाची आवराआवर करून खुजगावच्या जत्रेला चला. (प्रेक्षकांकडे बघून) बरं मंडळी, आता आम्ही खुजगावला निघालो! रामराम.



# पुढारी मिळाला!

**(लावणी)**

दक्षिण साताऱ्यात वाघेरी खेडं एक लहान ।
कृष्णा काठावर नांदत होतं मोठ्या आनंदानं ।।
पाटील त्या गावचा हैबती मोठा त्याचा मान ।
त्याच्या शब्दावाचून गावामध्ये हलत नव्हतं पान ।।
आले पुढारी, झाली त्याची भारी ओढाताण ।
कोसळले संकट तयावरी घ्यावे ऐकून ।।

## दृश्य पहिले

(वाघेरीचा हैबती पाटील व फकड्या सभेची तयारी करीत आहेत.
टेबल-खुर्ची ठेवलेली आहे.)

**पाटील :** फकड्या, आज सभेला येनारं डोईफोडेसाहेब कसलं असतील रं? बाकी त्यांचं नाव ऐकूनच माजं डोस्कं गरगरू लागलंया. त्येस्नी बघितलंयस का तू?

**फकड्या :** छ्या-छ्या! अवो, तुम्ही गावचं पाटील असूनबी डोईफोड्यास्नी बगितलं न्हाई; मग मी कसा बगणार?

**पाटील :** खरं हाय तुजं. बाकी फकड्या, आपल्या गावाला आता दांडगा पुढारी मिळणार. बरं, तू असं कर, तू त्या गोपाळचंद मारवाड्याच्या वाड्यात थांब. साहेब तिथंच येणार हायती. त्ये आल्याबरोबर इकडं घेऊन ये त्यास्नी. जा-पळ.
(फकड्या जातो.)
(लोकांकडे वळून) - मंडळी, खाली बसा. आता येत्याल साहेब. गडबड करू नका.

**एक इसम :** (प्रवेश करून) पाटील, पुढारी आल्याती.

**पाटील :** मंडळी बसा, बसा. पुढारी आलं. (इतक्यात एक लुंगी नेसलेला, दाढी असलेला, एक इसम हातात काठी घेऊन गंभीर मुद्रेने प्रवेश करतो. आल्याबरोबर तो क्षणभर प्रेक्षकांकडे तोंड करून साष्टांग नमस्कार घालतो. त्याच्या मागोमाग पाटीलही तसेच करतो. नंतर तो इसम खुर्चीवर प्रेक्षकांकडे पाठ करून बसतो.

**पाटील :** (भीतभीत) आँ? असं काय मानसांकडं पाठ करून बसलाय? मानसं इकडं हायती.

**इसम :** आम्ही असंच बसणार! (पाटील घाबरतो व खुर्ची फिरवून त्याचे तोंड प्रेक्षकांकडे करतो.)
**पाटील :** मंडळी, आपल्या गावाला पुढारी मिळाला. आता त्येचं भाषण सुरू व्हनार हाय. (त्या इसमाकड वळून) बरं साहेब, सुरू करा सभा.
**इसम :** (पाटलांकडे पाहून खाकरतो.) अं ऽ ऽ हं!
**पाटील :** अहो, सुरू करा की.
**इसम :** (ओरडून) नाही करणार. तू हरबरे खा.
**पाटील :** आँ? काय झालं हे?
**इसम :** (मोठ्याने खाकरतो.)
**पाटील :** अवो, सुरू करा.
**इसम :** (दोन्ही पाय खुर्चीवर घेऊन) बोला, 'काळभैरव की जय!', 'लहानथोर की जय!', 'तुमची जय। आमची जय!' (पाटील त्याला साथ देतो.) मंडळी, आम्हाला मत द्या. पाटलाला मत द्या. आणि तुम्ही हरभरे खा. (नंतर तो खुर्चीवर उभा राहातो व 'झाला महार पंढरीनाथ' हे गाणे सुरू करतो.)
**पाटील :** (घाबरून) आँ? अहो साहेब, तुमी तर सभंचं कीर्तन सुरू केलंया. फकड्या ऽ ए ऽ फकड्या ऽ
**फकड्या :** (धावत येऊन) पाटील, तार आलीया तुमच्या नावाची.
**पाटील :** लेका, साहेब इकडं येऊन त्येनं कीर्तन सुरू केलंय नि तू तिकडं कुठं मेला व्हतास?
**फकड्या :** (तार देत) अवो, ही तार तरी वाचा. डोईफोडे साहेबांची हाय म्हनं.
**पाटील :** (तार वाचीत) "आजची सभा उद्यावर ढकला. आम्ही आज येऊ शकत नाही- डोईफोडे." आँ? अरं मग, ह्यो रं कोन?
**फकड्या :** (पुढे होऊन, त्या इसमाकडे पाहून) अवो पाटील, ह्यो तर जांबुळवाडीचा येडा नारायण मास्तर!
**पाटील :** आँ? अरं मग, घालीव त्याला भाईर.
**फकड्या :** (इसमास) ए बाबा, उतर खाली.
**इसम :** नाही-नाही. मी अध्यक्ष आहे. मी नाही उतरणार.
**पाटील :** न्हाई उतरणार? फकड्या, दे गचांडी. (फकड्या पुढे होतो.)
**इसम :** अरे हट्ट! हरबरे खा!
**फकड्या :** ए, उतर खाली.
**इसम :** अरे हट्ट! (खाली उतरून) बरं मंडळी, जातो आम्ही. पण परत येणार आहे. जेव्हा सभा असंल तेव्हा मी नक्कीच येणार. (गाणे म्हणत निघून जातो.) 'कधी करिशी

लग्न माझे तुज ठावे ईश्वरा

**पाटील :** फकड्या, कोन ह्यो?

**फकड्या :** त्यो जांभुळवाडीचा नारायण मास्तर हाय. त्येला विलेक्शनचं वेड लागलंय. 'मला निवडून द्या' असं म्हणून तो येड्यावाणी फिरतोय.

**पाटील :** अरं लेका. आता येडाच येऊन पुढाऱ्याच्या खुर्चीवर बसाय लागला तर व्हनार कसं? माजं तर डोस्कंच फिरायची वेळ आलीय.

**फकड्या :** मग काय करू या?

**पाटील :** ह्या भानगडीतून मोकळं व्हायचं तर गावच्या पुढाऱ्यांस्नी इचारावं. आता असं करू - पहिलं त्या सत्तूकडं जाऊ. मग त्या पडवळाकडं जाऊ. चल - (दोघे जातात.)

## दृश्य दुसरे

(सत्तूच्या घरासमोर)

**पाटील :** (फकड्यास) तू सत्तू पाटलाला बाहेर बोलव.

**फकड्या :** सत्तू पाटील - वाईच भाईर या. (सत्तूची बायको पुतळा बाहेर येते.)

**पुतळा :** कोण-पाटील? सकाळीच इकडं कुठं आला व्हता?

**पाटील :** कुठं म्हंजी? ही पाटीलकी हाय न्हवं? सत्तूकडं आलो व्हतो. वाईच काम व्हतं.

**पुतळा :** त्ये भाईर गेल्याती. येतील आता, पन पाटील, कसलं काम निघालंय, सांगा तरी.

**पाटील :** काय सांगू पुतळा? फुकाट आमचं जिणं कुत्र्यावानी. नाव सोनुबाई नि हाती कथलाचा वाळा. कुनीबी उठायचं नि आमास्नी तंबी दियाची. का, तर आम्ही गावचं पाटील.

**पुतळा :** म्हंजी? वाईच नीट सांगा की.

**पाटील :** काय सांगू? काल म्हमईच्या पुढाऱ्याची तार आली की, सभंची तयारी करून ठिवा. म्या समदी तयारी केली तर लगीच दुसरी तार आली की, आम्ही आज येत न्हाय. आजची सभा उद्या घ्या.

**पुतळा :** आवं त्या पुढाऱ्याची मोटार कुठं वाटंत पंक्चारली असंल.

**पाटील :** पर माझं डोस्कं पंक्चारलं न्हवं हतं? एक तर पुढारी म्हटलं की माणूस इंचू चावल्यावानी करतंय. गैरइश्वास दाखवतंय. आनी हे पुढारी कानात वारं शिरल्याल्या कोकरावानी उड्या मारत्यात.

**पुतळा :** पर कोन वं ह्यो पुढारी यनार हाय?

**पाटील :** कोन डोईफोड्या हाय म्हनं?
**पुतळा :** कसा काय, बरा हाय का मानूस?
**पाटील :** मानूस? पुतळा त्यो मानूस लई हुबलाक हाय म्हनत्यात. आनी त्या कायदी मंडळाचा मेंबर बी हाय म्हनं.
**पुतळा :** मग, त्या मेंबराच्या सभंला मेंढरं जमवायची आनी त्या मेंबराला सांगायचं, 'सांग सभा.'
**पाटील :** छ्या-छ्या, त्यो डोईफोड्या बिबा हाय नुसता, त्येचं मला भ्याच वाटतंय. आनी त्यो डोईफोड्या म्हणतोय, 'तुमचा गाव आमच्या मतानं चालला पायजे. न्हायतर पाटीलकीचा मुडदा पडंल.'
**पुतळा :** मग तुमी तरी का भिता? काय करतोय त्यो?
**पाटील :** छे-छे. त्येचं मला भ्याच वाटतंय. आणि ही पाटीलकी हाय न्हवं? ती गेल्यावर?
**सत्तू :** (प्रवेश करून) काय पाटील? काय चाललंय? का आला व्हता सकाळीच?
**पाटील :** बरं झालं आलास.
**सत्तू :** का वं? डोस्कं दुखतंय?
**पाटील :** न्हाय बाबा. पोटात दुखतंय. अरं, त्यो डोईफोड्या पुढारी येनार हाय. त्येची तार आलीया, 'मानसं जमवून सभंची तयारी करून ठिवा.' म्या काल समदी तयारी केली पर एक येडाच येऊन बसला खुर्चीवर नि धमाल केली त्या येड्यानं.
**सत्तू :** आनी त्यो पुढारी?
**पाटील :** त्येची मोटार म्हनं कुटं रेंजाकली. पर त्यो आज येनार हाय.
**सत्तू :** मग घ्या सभा. माज्याकडं का आलात?
**पाटील :** असं कसं? माजी कुत्तरफाड चाललीया. त्यो डोईफोड्या म्हणतोय सभंला मानसं जमवा. नि सभंला कुत्रं बी यीना. तवा काय करू?
**सत्तू :** हे बघा पाटील - गावात जावा आनी सांगा लोकांस्नी. म्हनावं चला सभंला. कारण त्या डोईफोड्यांनी देशात डाळ वासली. मागं लोकांस्नी गोळ्या घातल्या. आता सभंला या म्हंजी परत त्यो तुमास्नी गोळ्या घालील.
**पाटील :** म्हंजी मानसं मला डबऱ्यात घालतील. असं कसं सांगू? आनी त्यो म्हनतोय आता येनाऱ्या निवडणुकीत तुमच्या गावची मतं आम्हालाच मिळाली पाहिजेत.
**सत्तू :** ते बी सांगा. म्हनावं, द्या परत मतं; म्हंजी त्यो तुमास्नी लाथा दील.
**पाटील :** तसं कसं सांगू?
**सत्तू :** कसं म्हंजी? मागं मतं दिली आनी त्यो निवडून आला. त्येनं आपल्या वाटा सोडून शेतकऱ्यांचं बारा वाजवलं. आता पुन्हा निवडून द्या; म्हंजी राहिलेल्या सगळ्या लोकांची

वाट लावील.

**पाटील :** छे-छे - माझ्यानं हे झेपंना. मी अस्वलावानी नाचतोय आनी त्यो मला दरवेशावानी नाचवतोय.

**पुतळा :** मग नका नाचू. कोण म्हणतंय नाचा म्हणून?

**पाटील :** अवं ऽ आता कसं सांगू? ही पाटीलकी हाय न्हवं —

**सत्तू :** मग नाचा - जावा.

**पाटील :** छे छे!! गावात मानसात मानूस ऱ्हायलं न्हाय. त्यो पडवळ तर मला बघून गुरगुरतोय नुसता. तुमी हाकडं मला वरबाडताय - नि त्यो डोईफोड्या तिकडून लचका तोडतोय. तवा म्या काय करावं?

**सत्तू :** हे बघा पाटील, तुमी खरं हाय ते बोला. उगाच खोटं बोलू नका. पाटीलकीच्या भ्यानं गावाचं नुकसान करू नका. जावा - सभा घ्या. येऊ दे त्या डोईफोडेला. आमी हाय तुमच्या मागं.

**पाटील :** मग काय, सोन्याहून पिवळं झालं. म्या पाटीलकीच्या भयानं हादरलो व्हतो.

**सत्तू :** अवं कुठं जातीय पाटीलकी? सारा गाव हाय तुमच्या मागं.

**पाटील :** मग जातो. आता वाईच काळीज छाताडात परत आलं. आता जातो - पडवळाची गाठ घेतो.

(पाटील, फकड्या जातात. सत्तू, पुतळा घरात जातात.)

## दृश्य तिसरे

(साथी पडवळ गाणे म्हणत प्रवेश करतो. इतक्यात पाटील व फकड्या येतात.)

**पाटील :** कोण पडवळ महाराज? बरं झालं गाठ पडली. अगदी देवानं धाडल्यावानी आलासा.

**पडवळ :** हे पाहा - नीट बोला. मी महाराज नाही. आणि मी काय मरण पावलो होतो? मला देवानं धाडलं म्हणजे काय? मी याच गावचा पडवळ आहे.

**पाटील :** हे बघा - तुमी पडवळ असा न्हाय तर दोडकं असा. म्या आपलं सरळ बोलतो. हो ऽ आनी मी ह्या गावचा पाटील हाय. तुमाला गाठावं म्हणून आलो. नीट बोला मानसावानी.

**पडवळ :** म्हणजे? तुम्हाला म्हणायचंय काय?

**पाटील :** आसं - आता कसं दाव्याला आलासा?

**पडवळ :** म्हणजे? मी काय जनावर आहे नि चरून दाव्याला आलोय?

**पाटील :** तसं न्हवं हो. म्हंजी मार्गावर आलासा.

**पडवळ :** म्हणजे आतापर्यंत मी आडमार्गावर होतो?
**पाटील :** तसं न्हवं हो. म्हंजी सरळ बोललासा.
**पडवळ :** हं. असं नीट बोला. काय म्हणता?
**पाटील :** तुमी आमच्या गावचं पुढारी. तुमी सभंला का येत न्हाईसा?
**पडवळ :** (भडकून) कोणाच्या सभेला? कसल्या सभेला? त्या डोईफोड्याच्या सभेला मी कधीच येणार नाही. त्यापेक्षा - त्यापेक्षा मी...
**पाटील :** (मधेच) सरगाला जाईन.
**पडवळ :** मुळीच नाही. त्यापेक्षा मी माझी वेगळी सभा घेईन. परंतु त्येच्या सभेला नाही येणार.
**पाटील :** (फकड्याला बाजूला घेऊन) लेका फकड्या, त्यो पडवळ हाय का त्यो जांबुळवाडीकर रं?
**फकड्या :** छा! छा! पडवळच हायती. पन जांबुळवाडीकरासारखंच करत्यात.
**पडवळ :** पाटील, आमचं आणि त्या डोईफोड्याचं आणि त्याच्या पक्षाचं कधीच जमणार नाही. त्यांना आम्ही हाणून पाडणार. समजलं?
**पाटील :** न्हाय बरं - फकड्या तुला?
**फकड्या :** (मान डोलवीत) न्हाय ऽ बरं.
**पडवळ :** नाहीच कळणार तुम्हाला. कारण तुम्ही त्या डोईफोड्याचे मिंधे आहात. परंतु आम्ही त्याला उखडून काढणार आहोत. समजलं?
**पाटील :** न्हाय ऽ बरं. फकड्या तुला?
**फकड्या :** (मान हलवीत) न्हाय ऽ बरं.
**पडवळ :** अरे, मुंडकी काय डोलावता?
**पाटील :** पन मागं, तुम्ही नि त्यो डोईफोडे एक व्हता.
**पडवळ :** होतो. एका पक्षात होतो. परंतु त्याचं नि माझं काही लग्न झालं नव्हतं, समजलं?
**पाटील :** न्हाय ऽ बरं. फकड्या तुला?
**फकड्या :** (मुंडी डोलवीत) न्हाय ऽ बरं.
**पडवळ :** अरे न्हाई बरं काय? त्याला श्रीमंतांची सेवा हवी होती आणि मला गरीबांची. म्हणून मी खेड्यात राहून ती करीत आहे.
**पाटील :** पण आमच्या सभेचं काय? येणार ना?
**पडवळ :** (भडकून) नाही. येणार नाही, येणार नाही, नाही. तुम्ही त्या डोईफोड्याचं दोस्त आहात. आता तुमची आमची भेट स्वर्गावर...
**पाटील :** आवं ऽ पर ऐकून तरी घ्या.

**पडवळ :** काय ऐका? तुम्ही त्या डोईफोड्यासारखी भुतं आणून गावात सोडता आणि वर म्हणता त्यांचा बंदोबस्त करा. समजलं?
**पाटील :** न्हाय ऽ बरं फकड्या तुला?
**फकड्या :** (मुंडी हालवीत) न्हाय ऽ बरं.
**पाटील :** आवं पन त्यो डोईफोड्या सरकारी माणूस हाय. आनी मी पोलीस पाटील हाय. म्या काय करावं?
**पडवळ :** काय करावं? अहो, त्याला तुम्ही गावची सर्व मतं दिली आणि सरकारी केला. आता येऊन बसू दे तुमच्या उरावर. समजलं?
**पाटील :** न्हाय ऽ बरं फकड्या तुला?
**फकड्या :** (मुंडी हालवीत) न्हाय ऽ बरं.
**पडवळ :** बिनडोक लेकाचे. जा-जा तुम्ही. चले जाव!
(पडवळ निघून जातो. पाटील व फकड्या जातात.)

## दृश्य चौथे

**(लावणी)**

पाटलानं हिंमत केली । कंबर कसली ।
झाला तय्यार । करोनी निर्धार ।
पुढाऱ्यांची परीक्षा घ्याया । एकी उभाराया ।
उभ्या गावाची । लहान थोरांची ।
आता प्रकार पुढं घडलेला । सांगतो तुम्हाला ।
घ्यावा ऐकून । शांत चित्तानं ।

(पाटील सभेची तयारी करीत आहे.)
**पाटील :** फकड्या ऽ ए फकड्या ऽ कुठं गेला ह्यो?
**फकड्या :** जी ऽ आलो न्हवं का.
**पाटील :** (त्याच्या डोक्याकडे पहात) आँ? हे रे काय? तू सभंला आलास की कुनाच्या मढ्याला? आरं, बोडका का?
**फकड्या :** (डोकं चोळीत) पागुटं इसारलं.
**पाटील :** डोस्कं न्हाय ना विसरलं?
**फकड्या :** मग पागुटं बांधून येतो तर.
**पाटील :** आँ? म्हंजी परत जाणार? नगं नगं. तू इथंच थांब. त्यो जांबुळवाडकर यायचा परत. नि तू इथं नसल्यावर मी त्येला काय करू? आनी त्या येड्याला खुर्चीवर बघून

त्यो डोईफोडे माजं डोस्कं फोडील. तू सभंचं सामान आण.

**फकड्या :** म्हंजी काय आनू?

**पाटील :** म्हंजी खुर्ची-टेबल-बत्ती, बावटा लाल, दवंडी दे. आनी येताना हात हालवीत येऊ नगंस. मानसं संगंच घेऊन ये. आधी मानसं येऊ दे. मग तू ये; हो. जा.

**फकड्या :** बरं ऽ जातु तर.

**पाटील :** मानसं आनायला विसरू नगंस. जा.

**फकड्या :** बरं ऽ जातु तर.

**पाटील :** जा - पळ.

**फकड्या :** हो. पळतो.

**पाटील :** हो हो. पळच.

**फकड्या :** हो हो - पळतोच की.

**पाटील :** अरीच्या? मग पळ की. का भटाच्या पोथीत बघून मग पळणार?

(एक इसम धावत येतो.)

**इसम :** पाटील ऽ डोईफोडे सायब आल्याती.

**पाटील :** आलंत? फकड्या, आता पळू नगंस. थांब. ह्यो कोन आलाय बघ. त्यो डोईफोड्या हाय की त्यो जांबुळवाडकर हाय त्ये बग.

**फकड्या :** खरं हाय तुमचं.

**पाटील :** हं; तेवढा बावटा नीट लाव. ती खुर्ची पुढं कर. बत्ती नीट कर. हार आनी माणसं ही आलीच पायजीत. आधी मानसं आण आनी मग खुर्ची येऊ दे. (फकड्या गडबडीने बावटा लावतो. खुर्ची पुढे करतो. डोईफोडे गंभीर मुद्रा करून प्रवेश करतो. त्यावेळी पाटील फकड्याला खुणा करतो. नंतर तिघेही झेंड्याला नमस्कार करतात.)

**डोईफोडे :** पाटील?

**पाटील :** हरभरे खा.

**डोईफोडे :** अहो, हरभरे कसले? सभेला माणसं कुठं आहेत?

**पाटील :** (फकड्याच्या कानात) ह्यो डोईफोड्याच हाय बरं. (डोईफोडेकडे वळून) सायब, काल का आला न्हाई?

**डोईफोडे :** काल आमची मोटार बिघडली.

**पाटील :** काय सायब? काल लई मानसं आली व्हती. मुंगी शिरायला जागा नव्हती. पर आज मानसांची खोपडीच बिघडली.

**डोईफोडे :** तुमची खोपडी ताब्यात आहे ना? माणसं कुठं आहेत?

**पाटील :** मानसं? मानसं घरात.

**डोईफोडे :** आणि तुम्ही कुठं?

**पाटील :** आम्ही? आम्ही दारात.
**डोईफोडे :** आणि आम्ही?
**पाटील :** तुम्ही? तुम्ही मोटारीत.
**डोईफोडे :** काय आहे हे पाटील? तुम्ही कुणाशी बोलत आहात? तुमच्या मानेवर भूत बसलं आहे? मी डोईफोडे आहे.
**पाटील :** म्हटलं, मी बी या गावचा पाटील हाय.
**डोईफोडे :** (चिडून) अरे वा! ही गुर्मी? पण मी ही पाटीलकी उडवून लावीन तुमची.
**पाटील :** (भडकून) असं! मग लावाच उडवून. नगं मला ही पाटीलकी. घ्या आपली नि बसा चगळत. सपशेल राजीनामा घ्या. चल रं फकड्या चावडीत.
**डोईफोडे :** (नरमून) असं काय हे पाटील, रागावू नका.
**पाटील :** (रागावून) रागावू नका? तुमी आमचा अपमान करता. काळजाला हात घालता! आमी नाकावर माशी बसून घेनार न्हाय; नि तुमी नाक कापायची बात बोलता.
**डोईफोडे :** पाटील, शांत व्हा.
**फकड्या :** आनी हरबरे खा.
**पाटील :** शांत काय व्हा? तुमच्यावानी पुढाऱ्यांस्नी काखोटीला मारणाराची अवलाद हाय आमची.
**डोईफोडे :** खरं आहे ते!
**पाटील :** काय खरं हाय? नगं आमाला ही पाटीलकी.
**डोईफोडे :** छे-छे असं करू नका पाटील. अहो, आमची सारी भिस्त तुमच्यावर आणि त्या पडवळावर.
**पाटील :** ते खरं, पन पडवळसाहेब गेले-
**डोईफोडे :** गेले? एकाएकी?
**पाटील :** हं. एकाएकीच!
**डोईफोडे :** अरे अरे ऽ फार वाईट झालं. (हात जोडून) परमात्मा मृताच्या...
**पाटील :** अवो ऽ मेले न्हायती त्ये. तुमची पार्टी सोडून दुसऱ्याच पार्टीत शिरलेत.
**डोईफोडे :** असं का? मग दोन्ही सारखंच आहे. आम्हाला ते मेल्यातच जमा आहेत. परंतु पाटील, तुम्ही मात्र आम्हाला सोडून जाऊ नका.
**पाटील :** बरं-बरं. करा सुरू सभा. मानसं येतीली हळूहळू.
**डोईफोडे :** मग असं करू या - तुम्हीच व्हा अध्यक्ष आणि करा सुरू. मी मागाहून बोलीन.
**पाटील :** पर मी काय बोलू?
**डोईफोडे :** तुम्ही ना? तुम्ही बोला. आम्ही पूर्वी काय केलं ते सांगा. आणि आम्ही पुढं

काय करणार आहोत ते मी सांगतो. दाबात बोला.

**पाटील :** फकड्या, मी सुरू करतो सभा. तू नजर ठेव. त्यो जांबुळवाडकर येनार हाय. मंडळी, आपलं पुढारी आल्याती. हे पुढारी कालच्या पुढाऱ्यावानी न्हाईत, न्हाईतर तुमी आपला गैरसमज करून घ्याल. म्हंजी मला असं म्हनायचंय की आपल्या गावाला शेवटी पुढारी मिळाला. हे डोईफोडेसायब म्हनत्यात की दाबात बोला. तवा मी आता दाबातच बोलतो. ह्येंचं सरकार आलं नि देशाचं वाटूळं झालं. कुनाचा पायपोस कुनाच्या पायात न्हायला न्हाय. धोरणं सारखी उठतीया नि बसतीया. आमी शेतकरी मातर हाय त्याच जाग्यावर हाय. पर ह्येंची मोटार सारखी पळतीय.

**डोईफोडे :** (चुळबुळत) पाटील, पाटील, काय बोलता?

**पाटील :** मी अध्यक्ष हाय. जर कड काढा. हो - तर म्होरं काय? हे पुढारी येऊन सांगायला लागलं, 'आम्ही गरिबी हटवणार'. यांची गरिबी हटली खरी, पर आमची वाडलीय. हे म्हनत्यात, 'कमी खावा, आनी अधिक धान्य पिकवा. जमीन मागू नका!' म्हंजी आमी राबायचं नि दाणं सावकारानं न्हियाचं. ह्येंच्या राज्यात आंधळं दळतं नि कुत्रं पीठ खातं बगा.

**डोईफोडे :** पाटील!

**पाटील :** बरं त्ये जाऊ द्या. म्होरं एक अकलेचा कांदा पुढारी आला नि म्हणाला, 'झाडे लावा.' दुसरा म्हणाला, 'पोरं कमी करा.' एकूण काय, तर गाढवांचा गोंधळ नि लाथांचा सुकाळ झाला.

**डोईफोडे :** (भडकून) पाटील, काय बोलताय? हा शुद्ध गाढवपणा आहे!

**पाटील :** हो. आता हे डोईफोडेसायब म्हनत्यात त्यो गाढवपनाच हुता. खरं हाय. अवं एक पुढारी येऊनशान खुशाल म्हनतो - 'राम व्हा नि रामराज्य आना.' आता वं? रामाच्या राज्यात गिरण नव्हती. आता पायलीच्या पंधरा गिरणी झाल्यात. आता जर आमी राम झालो, तर गिरनीचं काय करायचं? पर या पुढाऱ्याचं मत असं की आमी राम व्हायचं नि लंगोटी लावून गिरन चालवायची. कापड मातर त्या रावणानी वापरायचं. तुमास्नी हे पटतंय का? तवा कालचा हरबारं खा म्हनणारा पुढारी नि हे पुढारी - यांच्यात काय फरक हाय का?

**डोईफोडे :** (चिडून) पुरे करा हा गाढवपणा आता!

**पाटील :** शाबास. सायब म्हनत्यात, आता ह्यो गाढवपणा पुरं करा. खरंच ह्यो पुढाऱ्यांचा गाडाभर गाढवपणा आता पुरं, असं आपुन सांगू या.

**डोईफोडे :** बोडकं तुमचं! बेअकली!

**पाटील :** हो. बोडकं तुमचं बेअकली. बराबर हाय. तुमास्नी अक्कल असंल तर ह्या पुढाऱ्यांचं ऐका. नसंल तर ऐकू नका.

**डोईफोडे :** शाबास पाटील.
**पाटील :** हो. कारन ह्यंच्या राज्यात सारंच उलटं असतं. ज्येला अक्कल असती त्येला येडं म्हनत्यात, नि जो येडा असतो त्येला शाणा म्हनत्यात. आनी हे पुढारी लई शाणं हायती. त्येंचं भाषण डोळं झाकून ऐका.
**डोईफोडे :** म्हणजे मी मूर्ख आहे - असंच ना? पाटील, किती दुगाण्या झाडायच्या?
**पाटील :** आता: तुमी लाथा झाडू नगा. मी अध्यक्ष हाय. हं, करा सुरू. न्हायतर मानसं जातील जत्रंला.
**डोईफोडे :** (नरमून) बरं बाबा. मित्रहो, आताच तुम्ही हैबतराव पाटलांचं विद्वत्ताप्रचुर आणि विनोदी भाषण ऐकलंत. आता मी आमचं धोरण स्पष्ट करून सांगणार आहे. या देशातल्या चाळीस कोटी मानवांचं पालनपोषण करण्याचं महान कार्य आमच्यावर - म्हणजे आमच्या पक्षाच्या शिरावर येऊन पडलं आहे. पण मानव हा सत्यव्रत असला पाहिजे. त्याचं हृदय मोठं असलं पाह्यजे. पूज्य महात्माजी, पंडित नेहरू हेच सांगत आले. मीही तेच सांगतो. हृदयपरिवर्तन हा माणसाला सुधारण्याचा अमोघ मार्ग होय.
**पाटील :** म्हंजी घाण काम करण्याची विद्या आपण सोडायची नि दुसऱ्याला द्यायची.
**डोईफोडे :** पाटील, मधे बोलू नका. तर काय सांगत होतो. हृदय मोठं असलं पाहिजे. म्हणजे मानव कोणत्याही संकटसमयी विचलित होत नाही. म्हणजे घर असो, वा नसो, अन्न मिळो वा न मिळो, हृदय मोठं असलं की माणसाला त्याची खंत वाटत नाही. त्याला कसलीही गरज भासत नाही.
**पाटील :** हृदय मोठं असलं की तो उपाशी राहून औत वढतो.
**डोईफोडे :** (पाटलाकडे वळून) म्हणजे काय?
**पाटील :** म्हंजी बैल वो.
**डोईफोडे :** गप्प बसा हो. तर आम्ही इतकी वर्ष राज्य केलं ते याच तत्त्वावर. त्याचप्रमाणं शेतकरी सुखी व्हावा, जमीनदारी नष्ट व्हावी, बेकारी नाहीशी व्हावी याचा विचार करण्याचा आम्ही शिकस्तीचा प्रयत्न केला आहे. आम्ही लोकांच्या उपयोगाचे कैक कायदेही केले आहेत. परंतु सुख हे मानवाला एकाएकी कसं मिळणार? विकास हा बेताबेतानं व हळूहळू साधायचा असतो, म्हणून आम्ही जपून चालतो, तोलून बोलतो —

आम्ही अहिंसावादी सत्याचे पालन करणार ॥
राज्यधुरा भारी । घेऊन मानेवरी ।
आम्ही अखंड ओढीत नेणार ॥
नव्या भारताला । नेऊ वैभवाला ।
झाडं लावायचा करून निर्धार ॥

निर्मू नवा मनू । इथं गोकुळ आणू ।

सत्यमेव जयते । या ध्येयावरती ।

श्रद्धा ठेवून हळूहळू चालणार ।

लक्षात आलं तुमच्या? पण आमचे शत्रू हे इतर पक्षाचे लोक - आमच्या विरुद्ध आग ओकीत आहेत. त्यांच्या डोकीत सगळा गोंधळ भरला आहे. आमचे शत्रू आमच्या नावानं जळतात. आम्ही दारू खुली केली, म्हणून आम्हाला नावं ठेवतात. पण लक्षात ठेवा, त्यांचं राज्य येताच ते तुम्हाला दारूच्या पिंपात बुडवून काढतील अन् मग तुम्ही दारू पिऊन तर्रऽ व्हाल.

**पाटील :** फकड्या, लेका चढली वाटतं? कांदा आण.

**डोईफोडे :** पाटील, मी भाषण करीत आहे.

**पाटील :** मला वाटतं चढली तुमास्नी.

**डोईफोडे :** गप्प बसा हो. तर काय म्हणत होतो, आम्हीच तुमचं कल्याण करू. आम्ही पुष्कळ योजना तुमच्यासाठी आखल्या आहेत... त्या सर्व...

**पाटील :** त्या एका जागी जमवल्या तर त्येंचा डोंगर व्हयील.

**डोईफोडे :** मधे बोलू नका. आम्ही काही धरणं बांधणार आहोत. काही तळी बुजवणार आहोत. आम्हाला हसू नका. कोणी सांगतील त्याला फसू नका. येत्या निवडणुकीत आम्हालाच मते द्या. जयहिंद!

**पाटील :** मंडळी, सभा सरली. आता घराकडं जा; नि हरबरं खा. जा.

**डोईफोडे :** पाटील, अहो, सभेला माणसं नव्हती वाटतं?

**पाटील :** हो - नव्हती.

**डोईफोडे :** म्हणजे आमचं भाषण झालं ते...

**पाटील :** त्ये एरंडाचं गुऱ्हाळ झालं सायब...

**डोईफोडे :** (भडकून) पाटील, माणसं का आली नाहीत?

**पाटील :** आवं, काल थोडी आली व्हती. पर एक येडाच येऊन बसला तुमच्या जागी. आनी त्यो म्हनला हरबरं खा. तवा लोकाला वाटलं आज दुसरा येडा येईल नि सांगंल - फुटाणं खा, असं समजून कोन आलं नसंल सभेला.

**डोईफोडे :** मग हो काय करायचं?

**पाटील :** आता तुमीच सांगा.

**डोईफोडे :** हे पाहा, या गावात आमचं पुढारीपण प्रस्थापित झालं पाह्यजे नि ते टिकलंही पाह्यजे. कारण लौकरच निवडणुका येत आहेत. आणि लोक आमच्यापासून दुरावले तर आमचं सार्वजनिक जीवन संपुष्टात येईल.

**पाटील :** मग काय करू या?

**डोईफोडे :** असं करू या. तुम्ही तर आमचेच आहात. तेव्हा तुमचे पाव्हणे, मग त्या पाव्हण्याचे पाव्हणे... मग त्यांचे पाव्हणे...

**पाटील :** आवो - आवो, हे पाव्हण्यांचं नि त्या पाव्हण्यांचं पाव्हणं हे जर बघीत फिगय लागलो तर याड लागंल, नि येडं हुन दगड मारीत फिरावं लागंल. तवा मी सांगतो तसं करू या.

**डोईफोडे :** मग सांगा. काय करू या?

**पाटील :** मी गावचा पाटील हाय. माजं लयी पाव्हणं हायती. शिवाय गावात माझा दरारा बी हाय. ह्यो गाव माजा शब्द मोडणार न्हाय. आता आपुन परत सभा घेऊ या. मी समद्यास्नी सांगतो की 'बाबांनो, आता कोनी येडाबिडा येनार न्हाय. तवा तुमी सभंला याच. गावाला पुढारी मिळाला.'

**डोईफोडे :** मग येतील लोक?

**पाटील :** येतील म्हंजी? येतीलच. चालत न्हवं-नुसतं पळत येतील. एक मानूस पायात पायतानं घालनार न्हाई.

**डोईफोडे :** (घाबरून) आँ? म्हणजे हो?

**पाटील :** म्हंजी त्येस्नी पायतानाची आठवणच व्हनार नाय. तुमाला काय वाटलं? हातात पायताणं घेऊन पळत येतील?

**डोईफोडे :** असं असं. मग छान आहे. बोलवा उद्या लोकांना.

**पाटील :** बोलावतो खरं. पण...

**डोईफोडे :** पण काय?

**पाटील :** तुमी लोकांसमोर आमचा अपमान करता. काय बी रागात बोलता. तवा तसं चालायचं न्हाय. तुमी आमचा अपमान केला की आमी सभा मोडणार. हो ऽ ऽ नि मग काय सांगनार?...

**डोईफोडे :** हो-हो कबूल, कबूल.

**पाटील :** मग करतो तर सभंची तयारी.

**डोईफोडे :** ठीक आहे. मी आज वस्तीला गोपालचंद महाभुजमल यांच्या वाड्यात राहतो. तुम्ही सगळी तयारी करा. (जातो.)

**पाटील :** फकड्या, डोईफोड्यांचं डोस्कं ताळ्यावर आलं. आता तू त्या सत्तूला सांग, की आज तुजी सभा हाय. भाषण कराय ये. नि त्या पडवळाची गाठ घेऊन त्येला म्हनावं तुजी सभा हाय. तू ये. पन ए लेका फकड्या, हे कुनाचं कुनाला कळू दियाचं न्हाय. येऊ दे या साऱ्या पुढाऱ्यांस्नी मैदानात. आनी दे दवंडी गावात येऊ देत मानसं ही रेडंझुंज बघाय. जा पळ. ह्यातनंच गावाला खरा पुढारी मिळणार हाय. लाग कामाला जा.

**फकड्या :** जातुच तर...

**(लावणी)**

बार भरला पाटीलबानं करून विचार ।
दवंडी दिली गावभर ।।
उभ्या गावाला जबाब द्याया बांधुन कंबर ।
डोईफोडे झाला तयार ।।
कर्तृत्वाचा लौकिक मांडून लोकांसमोर ।
हिंमतीनं करण्या प्रचार ।।
गाव जमला, शांत बसला होऊनीया स्थिर ।
ऐका पुढचा प्रकार ।।

## दृश्ये पाचवे

(सभेची तयारी झाली आहे. पाटील, फकड्या व डोईफोडे हे व्यासपीठावर दिसत आहेत.)

**पाटील :** फकड्या, लेका, ह्या मानसांच्या गर्दीत त्यो जांबुळवाडकर शिरंल नि दील धमाल उडवून. नीट नजर ठेव. हो ऽ मंडळी. ऐका - हे आपलं पुढारी हितं आल्याती. हे म्हनत्यात आमचं ऐका. कारण आमच्या गावाला पुढारी नव्हता. त्यो आता मिळाला. खरं, पर त्यो तुम्ही नीट पारखून घिया पाहिजे. न्हाय तर घोटाळा व्हायचा. बैल चांगला दिसतो पर एखादा बशाबी निघतो. हो - तवा ह्यो बैल नीट बघूनशान घ्या. न्हाय तर मानंवर शिवळ घिऊन मारील. मरगळ; म्हंजी पाच वर्षं उठनेकी बात न्हाय. मग बोंबलत बसावं लागतं शेपूट धरून.

**डोईफोडे :** पाटील, काय हे?

**पाटील :** साहेब, आपलं काय ठरलंय काल? मोडू सभा?

**डोईफोडे :** छे - छे पण जरा जपून बोला.

**पाटील :** मग म्या काय गांजा वडलीया? आवं ऽ आमची बोलीच तशी हो. तुम्ही मातर आमचा अपमान करायचा न्हाय. हो ऽ न्हाय तर हुई ऽ ऽ ऽ

**डोईफोडे :** नका नका - आम्ही तुमचा अपमान करणार नाही.

**पाटील :** मग करा सुरू लौकर. न्हायतर त्यो जांबुळवाडकर यील नि घालील गोंधळ.

**डोईफोडे :** (चमकून) बरं, बरं, सुरू करतो. गावकरी मंडळी, आम्ही गेली कित्येक वर्षं तुमच्यावर राज्य करत आहोत. आम्ही आजपर्यंत काय काय केलं ते तुम्हाला माहीत आहे. आणि पुढं आम्ही काय करणार...

**पाटील :** त्ये बी आमान्सी ठावं हाय.

**डोईफोडे :** तसं नव्हे. भावी कार्याची रूपरेषा आमच्याकडं तयार आहे. जर तुम्ही आम्हाला आपलं नेतृत्व दिलं तर आम्ही या देशाचं नंदनवन करू. राव आणि रंक सुखी करू. मजूर आणि मालक यांचं ऐक्य करू. सर्वोदय साधून शांतता स्थापू.
**पाटील :** त्यासाठी हजार दोन हजार मानसं ठार मारू - चार-आठ हजार मानसं तुरुंगात घालू...
**डोईफोडे :** पाटील, पाटील काय हे?
**पाटील :** करू का हुई ऽ ऽ ऽ?
**डोईफोडे :** नका नका. पण मधे बोलू नका.
**पडवळ :** (प्रवेश करून) पाटील? माझ्या सभेत हा काय बकवास सुरू केला आहे? बंद करायला सांगा.
**डोईफोडे :** काय तुमची सभा? अहो, तुम्ही वाट चुकलात. जा त्या झाडाखाली तुमची सभा असेल.
**पडवळ :** पाटील, काय हे? माझ्या सभेत माझा अपमान? सभा माझी आहे.
**डोईफोडे :** अरे जा- सभा माझी असून ती तू मोडू पहात आहेस. गुमान जा.
**पडवळ :** नाही जाणार. ही सभा माझी आहे. तुमचं बिऱ्हाड घेऊन तुम्ही त्या वावरात जा - चरायला.
**पाटील :** हो ऽ ऽ थांबा. मी अध्यक्ष हाय. असं एकमेकांचं बोचकारं काढू नका. गुमान आपापलं बिऱ्हाड घेऊन हातंच बसा बरं.
**पडवळ :** नाही - नाही. मुळीच नाही. या डोईफोडेला ठोकरच मारली पाह्यजे.
**डोईफोडे :** ए, ठोकरीची भाषा बोलू नको. आम्हालाही पाय आहेत. आम्ही दोन मारू.
**पाटील :** आरं - आरं, एकमेकाला मारू नका.
**पडवळ :** पाटील, तुम्हीच सांग, या डोईफोड्याच्या पक्षानं गेल्या तीस वर्षात देशाचं वाटोळं केलं कां नाही? यानी पुन्हा लोकांसमोर का यावं?
**डोईफोडे :** आम्ही वाटोळं केलं आणि तुम्ही गुंडगोळे करणार आहात ना? आम्ही काहीच केलं नाही? १५० वर्षात इंग्रजांनी जे केलं नाही ते आम्ही गेल्या पाचच वर्षात करून दाखविलं आहे.
**पाटील :** आवो, इंग्रजांनी १५० वर्षात जेवढ्या गोळ्या झाडल्या नव्हत्या तेवढ्या ह्येनी पाच वर्षात झाडल्या.
**डोईफोडे :** पाटील, गप्प बसा.
**पाटील :** साहेब, करू का हुई ऽ ऽ ऽ
**डोईफोडे :** नको नको... पण जरा जपून बोला.
**पाटील :** पडवळ महाराज, तुमी जरा दमानं घ्या. बसा.

(पडवळ बसतो. एवढ्यात पुतळा प्रवेश करते.)

**पुतळा :** हे हो काय?

**पाटील :** हे ऽ ऽ डोईफोडेसाहेब आपलं मत मागाय आल्यात आमच्या गावाला.

**पुतळा :** अहो साहेब, तुम्ही आपलं कुरणात वळू शिरल्यावानी एकाद्या गावात शिरताय नि म्हणताय आमचं ऐका.

**डोईफोडे :** अहो बाई, असं काय बोलता?

**पुतळा :** मग तुमीच सांगा - तुमच्या राज्यात आमास्नी काय मिळालं? किती लोकांची तुम्ही डोस्की फोडली?

**पाटील :** खरंच डोईफोडे, तुमी मायंदाळ डोस्की फोडली.

**डोईफोडे :** (चिडून) काय बोलता?

**पाटील :** करू हुई ऽ ऽ ऽ?

**डोईफोडे :** नको - नको. पण जरा जपून बोला. हं, तर बाई, आम्ही जर या गावचे पुढारी झालो तर...

**(लावणी)**

करा मंत्री आम्हाला पुन्हा । पाहून योजना
खरोखर जागू दिल्या वचना ।
सुखवू साऱ्या गरिबांना ॥

**पुतळा :** म्हंजी तुमी परत मतं मागणार? वचनं मोडणार न्हाय?

**डोईफोडे :** खरंच बाई, आम्ही वचनं मोडणार नाही.

तळी विहिरी, कालवे खोदू ।
धरणं आम्ही बांधू ।
अडवुनी नद्या उलट वळवू ॥
शिवारात पाणी साऱ्या खेळवू ॥

**पाटील :** म्हंजी पुतळाबाई, इतकं पानी येणार की सारा शेतकरी त्यात बुडून मरणार नि सारा जमीनदार माडीवर बसून गंमत बघणार,

**डोईफोडे :** पाटील, काय हे?

**पाटील :** करू हुई ऽ ऽ ऽ?

**डोईफोडे :** तसं नाही हो, जरा जपून बोला. हो ऽ तर बाई, नंतर मोठाच चमत्कार होणार.

लागतील अन्नाच्या राशी । दरवाज्यापाशी ।
गुरांनी गोठे भरतील । दहीदूध पोरं खातील ॥

**पडवळ :** अहो - अहो, काय थापा मारता? तुम्हाला ठोकरच मारली पाहिजे.

**डोईफोडे :** अहो, गप्प बसता का... (ठोकर मारण्याचा पवित्रा घेतो.)
**पाटील :** आरं ऽ आरं ऽ केली का जुपी?
**डोईफोडे :** काय नाव तुमचं? पुतळाबाई - नाही का? आम्ही प्रत्येक खेड्यात वीज पोहोचवू.
**पाटील :** म्हंजी हे दिवं लावणार!
**डोईफोडे :** पाटील ऽ ऽ (ओरडतो.)
**पाटील :** करू का हुई ऽ ऽ?
**डोईफोडे :** अहो, पण मधे बोलू नका. हं तर —

घराघरावर चढवू पोल। ऐका मग बोल।
रेडियोची फिरवा तुम्ही चावी।
त्यासाठी साथ आम्हा द्यावी ॥

**पुतळा :** खोटं, खोटं. आठ हात वाळूक नि नऊ हात सालपाट. तुम्ही निसत्याच थापा मारता.
**पडवळ :** बरोबर आहे. यांना ठोकरच पाहिजे.
**सत्तू :** (सत्तू प्रवेश करून) का हो पाटील, माझी सभा म्हणून सांगितलंसा आनी ह्यो काय तमाशा?
**पडवळ :** आँ, तुझी? आणि मला सांगितलं - माझी, इथं येऊन पहातो तो हे डोईफोडे गुरुजी.
**डोईफोडे :** (विचारमग्न होऊन) हं, खरंच. काय हो पाटील, ही विळ्याभोपळ्याची मोट का बांधली?
**पाटील :** हे बघा. एक शेतकरी पंढरीला जात हुता, गाडी जुपून. त्या गाडीच्या चाकावर बसली एक माशी. त्या माशीला वाटलं, ही गाडी आपल्याच बळानं चाललीया.
**डोईफोडे :** अहो, पण याचा अर्थ काय?
**पाटील :** म्हंजी असं, की त्या माशीवानी तुमचं झालंया. तुमा पुढाऱ्यांस्नी वाटतंय, हे सारं जग आपल्या बळानं चाललंया. पन माशीच्या बळानं जशी गाडी चालत नाय तसं तुमच्या बळानं जग चालत न्हाय हे तुमच्या डोस्क्यात शिरंच ना. म्हनून तुमास्नी आज एका फडात आणलंय. पण तुमी बैल बुजल्यावानी एकमेकाला बुजताय.
**पडवळ :** अहो पण इथं आमचं एकमत नाही. हे डोईफोडे एका मताचे, तर हा सत्तू दुसऱ्या मताचा नि मी तिसऱ्या मताचा...
**पाटील :** तवा तुमास्नीच तेवढी मतं हायती आनी आमी काय झाडाला पिकलोय? कवाबी यायचं नि आमास्नी तोडून खिशात कोंबायचं!

**पडवळ :** ही आमची नीती नाही. ती या डोईफोड्यांची आहे. हे विश्वासघातकी आहेत. यांनी देशाचं वाटोळं केलंय. यांना ठोकरच मारली पाह्यजे.

**सत्तू :** मग हेस्नी ठोकर माराया तुम्ही-आम्ही एक.

**पडवळ :** तुमच्याशी एकी नाही रे बाबा. तू तर देशघातकी.

**डोईफोडे :** बरोबर. चला. तुम्ही-आम्ही एक.

**पडवळ :** तुम्ही विश्वासघातकी.

**पाटील :** आरं, मग चांगला साळसूद कोण?

**डोईफोडे :** आम्ही! आम्ही विश्वासघात केला नाही. आम्ही स्वराज्य मिळविलं नि ते टिकवलं. आता याची भरभराट करण्यासाठी आम्हाला पाठिंबा द्या, नि पाहा...

**पडवळ :** पाठिंबा? नाही. तुम्हाला ठोकर...

**डोईफोडे :** ए ठोकर! आम्ही दोन मारू. आम्ही त्या इंग्रजांना ठोकर मारली आहे.

**(सवाल - जबाब)**

आम्ही बहाद्दर दर्दी । करून गर्दी ।<br>
आम्हीच परका पळवला । तरुण रणावर खेळवला ।<br>
सदा अग्रणी । लढा देऊनी । स्वतंत्र भारत मिळविला ॥

**सत्तू :** तुम्ही बहाद्दर! मग ऐका!

तुम्ही धीरानं ऐका । भडकू नका ।<br>
सिंह वनामध्ये पिसाळला त्याने गजाला लोळवला ।<br>
बहाद्दर कोल्हा । होता ओढ्याला ।<br>
ताव माराया । चेकाळला ॥

**पडवळ :** अगदी बरोबर. लढा आम्ही केला; तेव्हा हे कोल्हे ओढ्याला होते.

**पाटील :** अरं वा! परकी ह्यनी पळवला. आनी आमी लोकांनी काय गांज्या ओढली व्हती? यांच्या परमानं तुमीबी खरंच कोल्होबा हायसा.

**डोईफोडे :** पाटील, काय बोलता?

**पाटील :** करू का हुई ऽ ऽ ऽ?

**डोईफोडे :** अहो तसं नाही - पण कोल्हा म्हणता.

**पडवळ :** अगदी बरोबर - कोल्हा. लढा सुरू झाला तेव्हा हे कोल्हे ओढ्याला होते.

**डोईफोडे :** कोल्हा? कोण कोल्हा? कसा कोल्हा?

**सत्तू :** अहो, कोल्हा हो. सिंह शिकार करीत असतो तवा त्यो ओढ्याला खेकडं मारीत असतो. शिकार मारून सिंह गेला की कोल्हा त्या ऐत्या शिकारीवर ताव मारतो. अहो, साऱ्या जनतेनं लढा केला.

**पुतळा :** तुमी मातर ऐत्या बिळात नागोबा झाला, त्या कोल्ह्यावानी. आणि तुमी आजवर

जे केलं तेच पुढं करणार का?

**डोईफोडे :** नाही बाई. आमच्या हातून काही चुका झाल्यात म्हणून लोक आमच्यावर जरा रागावलेत. झालं गेलं विसरून जा. पण आम्ही आता पुन्हा त्या चुका करणार नाही. आता तुम्ही पाहाच —

झरझर झरझर । पंपानं दूरवर ।
पाणी पुरवू साऱ्या शेतांना ।
पूर्ण करू दिल्या वचनांना ।
आम्ही धुरंधर । भरभर भरभर
खरंच सुखवू हिंदीजना ।।

**सत्तू :** थापा!

तुम्ही भाराभर बोलता । पाझर फोडता ।
साऱ्या लोकांना भुलवता ।
गोड बोलुनी झुलवता ।
मंत्री होताच फटफट फटफट ।
गोळ्या चहूकडं चालवता ।।

**पुतळा :** आनी अहिंसेच्या गप्पा मारता!

**पडवळ :** खरोखर, यांना ठोकरच हवी.

**सत्तू :** बस! समद्या पुढाऱ्यांची एकी झाली पायजे.

**पडवळ :** छट्! तुझ्याशी आमची या जन्मात एकी होणार नाही.

**पाटील :** मग एकीला हरकत घेनाऱ्या पुढाऱ्यांची जनतेनं शेंडी पकडली पाह्यजे.

**पुतळा :** पन पुढाऱ्यांची शेंडी लोकांनी पकडायची हे यांच्या लोकशाहीत बसतंय का?

**पाटील :** ते कसं बसणार? लोकांची शेंडी पुढाऱ्यांनी पकडायची हेच बसणार!

**डोईफोडे :** पाटील, बंद करा बकवास!

**पाटील :** करू का हुई ऽ ऽ ऽ?

**डोईफोडे :** तसं नाही हो! हो, तर सत्तू, आम्ही केवळ गोळ्याच झाडल्या नाहीत तर-

करून हिंमत मोठी । शेतकऱ्यांसाठी ।
योजनांचा आम्ही ढीग लावला ।
भ्रमाचा भोपळा । सव्वा हात मोकळा ।
कधी कुणाच्या कामी आला ।।

**डोईफोडे :**
तुम्ही शांत बसावं । दमानं घ्यावं ।
झटपट स्वर्ग मागू नका ।।

**सत्तू :**
आज मरा । आणि उद्या पाय धरा ।
उगाच थापा मारू नका ।।

**डोईफोडे :** नाही. या थापा नाहीत. आमची शेती योजना पुरी होताच अन्नधान्याचं उत्पादन दसपटीनं वाढेल आणि...

**पाटील :** म्हंजी त्यावेळी शेतकरी तिरडीवर असणार.

**डोईफोडे :** (चिडून) पाटील!

**पाटील :** करू का...?

**डोईफोडे :** नका - नका. पण काय रे सत्तू, तू माझ्या सर्व म्हणण्याला विरोध करतोस; पण मी म्हणतो, विरोधी पक्षाचं सरकार जर आलं तर ते तुमचं भलं करील याला गॅरंटी काय?

**पडवळ :** तुमचा पाडाव करून आता आम्ही राज्यावर आलोत! आता बघालच तुम्ही-

**पुतळा :** होय. बघतोच आहो की कालचा दीस बरा.

**डोईफोडे :** खोटं. आम्ही बेईमान नाही. शेवटी आम्हीच देशाचं भलं करणार आहोत.

**पुतळा :** खोटं. तुमी सोंगाडं हायसा.

**पाटील :** ए, वरडू नका. हो तर मंडळी, ही पुढाऱ्यांची कुस्ती तुमी बघितलीत. आता आमच्या या गावाला पुढारी कसा असावा ते माझ्या डोस्क्यात आलं. जो आमची बोली बोलतो, जो आमच्या मनातलं बोलतो, आनी बोलल्याप्रमानं वागतो तो आमचा पुढारी. हे डोईफोडंसायब कुणाचं कुनासाठी काय बोललं त्ये मला कळलंच न्हाई. ह्ये दुसरं पडवळसाहेब - बोलतात दाबात पर ह्येंची शेंडी कुनाच्या हातात हाय ते तुमास्नी ठावं हाय. सत्तू आपला हाय. त्येची एका हातात तांगूर नि दुसऱ्या हातानं कायदा करायची हिंमत मला पटली. त्योच आमचा पुढारी. पडवळसारखा आपसात भांडणारा पुढारी आम्हास्नी नगं.

**डोईफोडे :** पाटील, पाटील, माझं नाव डोईफोडे आहे हे विसरू नका. वाट लावीन मी तुमची.

**पाटील :** फकड्या, लेका जांबुळवाडकर कीर्तन कराय लागला. घालीव त्येला भाईर

(डोईफोडे रागात निघून जातो. त्याच्या मागोमाग पडवळ गुपचूप सटकतो.)

**पाटील :** मंडळी, आपल्या गावाला पुढारी मिळाला. ह्यो सत्तूच आपला पुढारी...



# बिलंदर बुडवे!

## दृश्य पहिले

एका गावामध्ये रहात होता बुडवे बिलंदर
बुडवी लोकांची कर्जे, दरारा त्याचा चौफेर ।।
आवळा देऊन कोहळा घेणारा चाणाक्ष चतुर ।
नव्हता त्याला भेटला जगामध्ये असा आजवर
योग घडला, जुळून आला, ऐका प्रकार ।
त्याला भेटला एक शेतकरी एका ओढ्यावर ।।

(बाबुराव फरशी घेऊन प्रवेश करतो व ओढ्याकाठी असलेल्या झाडाखाली बसून विडी ओढू लागतो. इतक्यात राणू येतो.)

**बाबू :** रामराम मंडळी, कोण आपण?

**राणू :** रामराम. आम्ही शेतकरी, तुम्ही कंच्या गावचं?

**बाबू :** मला चोरवाडीचा बाबुराव बाजी बुडवे म्हणतात. तुमचं गाव कंचं?

**राणू :** म्या चोरमाऱ्यांच्या मलकापूरचा पाटील हाय. माझं नाव राणोजी. राणोजी पाटील.

**बाबू :** आलं लक्षात! चोरमाऱ्यांच्या मलकापूरचा पाटील हाय. आणि ह्या कोण आपल्या?

**राणू :** ही माझी कारभारीण हाय. माहेरी गेली व्हती. आता आपल्या गावाला घेऊन निघालो मी.

**बाबू :** आलं लक्षात, आलं लक्षात.

**राणू :** हौसा, सोड भाकरी, खाऊ या हतं. म्होरं पाणी मिळणार न्हाय.

**हौसा :** आवं, पर ह्यो कोण हाय?

**राणू :** आसंना कुनीबी?

**हौसा :** लई खोदून खोदून इच्यारतोय, बारीक बैलावानी.

**राणू :** इच्यारू दे. आपुन खाऊ या भाकरी.

**हौसा :** सरळ बघा, न्हाईतर चोरवाडीचा चोर आसंल.

**राणू :** आसं ना! आपुनबी चोरमाऱ्यांच्या मलकापूरचे हाव. (भाकरी खाऊ लागतात.)

**बाबू :** पाटील, लगीन कधी झालं?

**राणू :** दोन वर्स झालं असतील.
**बाबू :** आलं लक्षात, छान आहे.
**राणू :** तुमास्नी किती पोरंबाळं हायती?
**बाबू :** आमचं लगीन अजून झालं नाही पाटील.
**राणू :** लगीन झालं नाही? मंग कवा करायचं? का दात पडून दातऱ्या उगवल्यावर? हे काय बरं न्हाय!
**बाबू :** (पुन्हा विडी पेटवून) त्याचं असं हाय पाटील, आम्हा श्रीमंतांना लग्नाला भारी खर्च पडतो. आणि आज एका लग्नाचा खर्च करण्याची आमची ऐपत उरली न्हाय. आलं लक्षात पाटील?
**राणू :** नाय बा. मंजी असं, ज्याला एका लगनाचा खर्च करता येत नाय तो श्रीमंत कसला?
**बाबू :** कसला मंजी? आम्ही पूर्वी श्रीमंत होतो. आता नाय.
**राणू :** मंजी श्रीमंती खालसात निघाली?
**बाबू :** निघाली म्हंजी? आमच्या वाडवडिलांनी खालसात काढली. आता नुसतं नावच उरलं आमचं.
**राणू :** नाव सोनूबाई, हाती कथलाचा वाळा! पर ह्ये झालं कसं पाटील, वाईचं सांगता का?
**हौसा :** तुम्हास्नी भारी भाकडकथा आयकायची खोड बघा.
**राणू :** अग ऐकू या की. अं? बाबुराव, सांगा तुमची कथा.
**बाबू :** अहो, आता काय सांगू तुम्हाला? फार फार श्रीमंत होतो आम्ही.

**(लावणी)**

थोर होती आमची श्रीमंती ।
धना नव्हती गणती ।
शांतता होती आमच्या सदनी ।
लक्ष्मी भरीत होती पाणी ।
लोकांच्या ध्यानीमनी एवढी ।
होती आमची करणी ।
करणापरी घर आमचे दानी ।
आम्हाला वैरी नव्हते कुणी ।

**राणू :** मग दांडगा कारभार होता की!
**हौसा :** आवं, आता चला की, ऊन उतारलं. काय ऐकता गुराळ.
**राणू :** ऐकू या ग. हं, पुढं सांगा काय ते.

सौदागर असे जहाजे भरुनी ।
न्यायचे दर्यावरुनी ।
घेत होतो नफा व्यापार करुनी ।
आमुची ही होती अवघी करणी ।

**राणू :** समदी करणी तुमची?

**बाबू :** हो तर, मोठी श्रीमंती आणि...

घरी होत्या घोड्यांच्या पागा ।
हवेशीर बागा, किल्ले भुईकोट,
तटावरुनी, मारिले वैरी मैदानी ।

आलं लक्षात पाटील?

**राणू :** आलं बरं. आवो, ही फार मोठी श्रीमंती.

**बाबू :** परंतु आता काय बी उरलं नाय!

**राणू :** आता बीनलगनाचं! काय पाळी आली तुमच्यावर. वंगाळ झालं बघा हे.

**बाबू :** म्हंजी दिस वाईट आलं. आवो सारंच बदललं ह्ये. म्हंजी आमचं मूळचं बर्वे नाव सुद्धा बदलून आता लोक आम्हाला बुडवे म्हणतात.

**हौसा :** आवं, ह्यो कुणी तरी थापाड्या दिसतोय.

**राणू :** (हळू) अग दिसतो काय? हायच! (उघड) बरं श्रीमंत, पण बुडवे म्हंजी काय भानगड हाय?

**बाबू :** म्हंजी आमच्या पूर्वजांनी लोकांची कर्जे काढली; आणि ती बुडवली. तेव्हापासून लोक आम्हाला बुडवे म्हणू लागले.

**राणू :** आता तुम्ही धंदा तरी कोनता करता म्हणावं?

**बाबू :** तोच! कर्ज काढायचा व बुडवायचा!! वडलांचा...

**राणू :** होय, पर त्यो धंदा तरी चालतोय काय?

**बाबू :** होय, अगदी सुतासारखा सरळ चालू हाय.

**राणू :** मला हे खरंच वाटंना.

**बाबू :** खरं का वाटत नाय? हा बाबुराव बाजी बडवे ह्या भागात फार प्रसिद्ध व्यक्ती समजली जाते. समजलात पाटील?

**राणू :** हो, ते खरं हाय. पर एकादा कर्ज वसूल करणारा खमक्या भेटला तर मग?

**बाबू :** ते शक्यच न्हाय पाटील. आजपर्यंत मला दिलेलं कर्ज कुणीही वसूल केलेलं नाय.

**राणू :** हेच मला पटंना बघा.

**बाबू :** खात्री करून घ्यायची हाय का त्याची?

**राणू :** नव्हं, म्हटलं काळ बदललाय; शिवाय माणूस हुशार झालंय, नवं कायदं आल्यात.

**बाबू :** मग ठीक हाय, दूर कशाला? तूच दे मला कर्ज आणि कर वसूल पाहू.

**राणू :** कबूल हाय मला! मी देतो कर्ज.

**हौसा :** आवं, न्हाय ते काय करीत बसताय? ही खाजून खरूज नगं आमास्नी. चला बघू.

**राणू :** तू गप ग. मला बघायचं हाय, कसं कर्ज बुडतं ते. हं, किती कर्ज घेणार?

**बाबू :** तू देशील तेवढं. आणि सांगशील त्या अटीवर आणि ते तू कसंही वसूल कर.

**राणू :** मी नुसतं इस रुपये देणार, आणि एक हजाराचा कागद करून घेणार. आणि एका साक्षीदाराची सही.

**बाबू :** कबूल, कबूल! पण कागूद कुठं करायचा?

**राणू :** हातंच करायचा. कबूल?

**हौसा :** आवं, तुम्हाला याडबीड लागलंय की काय?

**राणू :** तू ऐक ग, करा कागूद.

(बाबुराव कागद लिहून देतो. राणुजी त्याला रुपये देतो. दुसरा एक वाटसरू येतो व तो साक्षीदार म्हणून सही करतो.)

**बाबू :** बरं पाटील रामराम, मी आता जातो.

**राणू :** जावा खरं, पर कर्जवसुलीसाठी कवा येऊ?

**बाबू :** कधीही या, कसंही या; आणि कर्ज वसूल करा. माझं नाव लक्षात ठेवा, बाबुराव बाजी बुडवे! (जातो.)

**हौसा :** अग बाई बाई! काय म्हणावं तुमास्नी? वाटंच्या चोराला पैसं देऊन बसलाया.

**राणू :** तू चल आता गुमान. त्याच्या बापापाशी वसूल करतो कर्ज!

**हौसा :** म्हंजे काय खटला खेळत बसणार? (दोघेही जातात.)

## दृश्य दुसरे

### (लावणी)

घेतलं कर्ज बुडव्यानं, गेलं होऊन एक वर्ष त्याला ।

एकदा राणुजी आला । दारी उभा झाला । कर्ज वसुलीला ।

(बुडव्याचे घर. बुडवे व त्याचा बाप बोलत आहेत.)

**म्हातारा :** तू बर्वे कुळाला बुडवे करून कुळाला डाग लावला हायीस.

**बाबू :** आणि कुळातील सर्व पूर्वजांनी सारी दौलत गमावली, दिवाळं काढून घेतलं,

हा डाग नव्हं?

**म्हातारा :** अरे, त्यांनी कमावलं आणि त्यांनी गमावलं; पण तू त्यांच्या नावावर आसरा! हे काय बरं हाय? याचा अर्थ काय?

**बाबू :** याचा अर्थ कुळाला डाग लागू नये म्हणून प्रयत्न करीत आहे.

**म्हातारा :** म्हणजे लोकांना लुटतोस. हा प्रयत्न?

**बाबू :** म्हंजे एकेकाळी श्रीमंत असलेल्यानं आज दुसऱ्याची मजुरी करून जगणं...

**म्हातारा :** पण एकादं दिवशी एकादा येऊन मारील तुला कुत्र्यासारखा तव्हा?

**बाबू :** ते शक्यच नाही. मला कुणीही मारणार नाही. कारण मला मारून कुणीही फासावर जाण्याइतका मूर्ख नाही. साधा खटला न भरणारे, मारणार कुठं?

(राणूजी प्रवेश करतो.)

**राणू :** रामराम बुडवे महाराज.

**बाबू :** रामराम. कोण तुम्ही? हां, राणूजी पाटील, छान! आलं लक्षात.

**राणू :** अजून नाही आलं लक्षात. पण आता येईल लक्षात.

**बाबू :** (चाचरत) म्हणजे काय?

**राणू :** अहो बुडवे महाराज, आमचे एक हजार रुपये काढा.

**बाबू :** अरे सद्‌गृहस्था, एक फुटकी कवडी नाही माझ्यापाशी.

**राणू :** आवं, ती तुमची जहाजं, त्या तुमच्या घोड्यांच्या पागा आणि बागा कुठं हाय सारं?

**बाबू :** गेलं ते सारं! आता मी आणि माझं वडील दोघंच आहो या जगात! शिवाय आमची श्रीमंती बुडून फार दिवस झाल्याती.

**राणू :** आणि त्या श्रीमंतीची ऐट मारत लोकांस्नी बुडवत फिरता नव्हं का?

**बाबू :** अगदी ठीक बोललास?

**राणू :** म्हंजे सोडाला मारला होडा, तर त्यो म्हणतोय माझाच पीळ गोंडा!

**बाबू :** म्हंजे? मला नाही कळलं तुमचं बोलणं!

**राणू :** आता गुमान कर्जाची रक्कम काढा, न्हाय तर –

**बाबू :** म्हंजे तू काय करणार? (घाबरतो.)

**रामू :** मी काय करणार ते करून दाखवतो आता.

**बाबू :** काही कर पर कायद्यानं कर हो.

**राणू :** कायदा गेला चरायला कुरणात. आधी पैसं काढा. आणि तुमच्या मालकीचं काय हाय ते सांगा; त्येच घेऊन जाणार हाय.

**बाबू :** माझ्या मालकीचं काहीच नाही. फक्त हा बाप हाय. अन् त्योच माझी सर्व इस्टेट हाय.

(लोक जमतात.)

**राणू :** बैलं, गुरढोरं काहीच नाही?

**बाबू :** काही नाही. जे काय आहे ते माझा म्हातारा. पाहिजे असला तर घेऊन जा. नेतोस हा म्हातारा?

**राणू :** हो, काय हरकत हाय? नेतो म्हातारा. चला म्हातारेबाबा, उठा.

**बाबू :** (घाबरून) म्हणजे माझ्या म्हाताऱ्याला तू घेऊन जाणार की काय?

**राणू :** हो हो घेऊन जाणार.

**बाबू :** अरे, हा म्हातारा मरेल. याला नेऊन तू काय करणार?

**राणू :** मी काय बी करीन!

**एक इसम :** अरे, परंतु हा म्हातारा आहे.

**राणू :** बघ, एक हजार रुपये काढतो का तू?

**इसम :** तुला पाहिजे तर जा घेऊन म्हातारा.

**बाबू :** घेऊन जा, घेऊन जा. परंतु लक्षात ठेव म्हातारा मेला तर —

**राणू :** तू काय करणार माजं?

**बाबू :** काय करणार? भरून घेईन म्हातारा. न्हायतर मरशील फुकट व्यर्थ!

**राणू :** अरे, एकाच्या बदली दोन देऊन टाकीन. ये फक्त पैसे घेऊन माझं. चलावं म्हतारबाबा.

(राणूजी म्हाताऱ्याला घेऊन जातो.)

**बाबू :** आता यानं बरा म्हातारा नेला की!

**इसम :** आवं, सावकार हे काय चांगलं झालं नाय.

**बाबू :** आणि काय बी वाईट झालं नाय. कारण तो काय माझ्या म्हाताऱ्याला मरू द्यायचा नाय. कारण जर का म्हातारा मेला तर त्याला भरून द्यावा लागेल. म्हणून तो त्याला चांगला जपणार.

**इसम :** परंतु बुडवे शेटजी, तुम्हाला दनगट असा माणूस भेटला बरं.

**बाबू :** आहो, थोडं दिस थांबा. तसं काय माझा म्हातारा जास्त दिस जगणार नाय. आणि जर का म्हातारा मेला तर त्याच्या घरादाराचं वाटोळं करतो बघा.

**इसम :** म्हंजे वो शेटजी, काय करणार तुम्ही?

**बाबू :** जर का म्हातारा मेला तर एक लाख रुपयाचा नुकसानभरपाईचा दावा करणार आणि तो त्या राणूकडून वसूल बी करणार.

**इसम :** पण शेटजी, म्हातारा बिचारा जाणार की!

**बाबू :** जाऊ द्या हो. पिकलं पान केव्हातरी गळणारच. तेव्हा ते जर अशा वेळी गळालं तर मला फायदाच नाही का होणार? अहो, तरुणपणी त्यानं एक फुटकी कवडीही

माझ्यासाठी गाठीला ठेवली नाही.

**इसम :** मग ठीक आहे. पण तुम्ही आता असं करा; एक माणूस त्याच्या पाळतीवर ठेवा. म्हंजे त्याची बातमी तुम्हाला वरचेवर कळत व्हाईल.

**बाबू :** ते करतो मी सगळं, पण पुढंमागं म्हातारा मेलाच तर एक हजार रुपये माझ्याजवळ हवेत. त्याची तुमच्यासारख्या लोकांनी सोय केली पाहिजेल.

**इसम :** (बिचकून) अन् ते कशाला?

**बाबू :** आवं, त्याचं एक हजार रुपये द्यायचं अन् आपलं म्हातारं दे म्हणून सांगायचं. तो काही म्हातारा देल नाय म्हणजेच नेमका तो आपल्या तावडीत सापडणार आणि आपल्या पेचात सापडला की मग पहा पुढं काय होणार ते.

**इसम :** परंतु आमच्या रकमेची काय वाट?

**बाबू :** अहो, एक लाख रुपये तिथंच वसूल करून घेतो. आणि तिथंच तुमची रक्कम व्याजासहित काढून देतो.

**इसम :** ठीक हाय, तुम्ही काळजी करू नका. आम्ही करू सारी व्यवस्था.

**बाबू :** हो हो, आलं लक्षात.

**इसम :** पर म्हातारा मेल्यानंतर हो.

**बाबू :** हो, आलं लक्षात माझ्या.

(सगळे जातात.)

## दृश्य तिसरे

**(लावणी)**

राणूजीनं मोठा हिय्या बांधिला।
बुडव्याला पेचात पकडीला
कर्जात म्हातारा घेतला।
आणुन घरामध्ये ठेविला
मनामध्ये विचार त्यानं केला।
मरू नाही द्यायचा म्हाताऱ्याला
शेराला सव्वाशेर भेटला।
राणू पडला ईर्षेला
नाही रक्कम बुडू द्यायची।
रग जिरवायची धरून बुडव्याला
बुडव्या होता पक्क्या गुरूचा चेला।
राणुजीच्या मागावर राहिला

दुरून कानोसा घेऊ लागला ।
म्हातारा कधी जातो स्वर्गाला
त्याची तो वाट बघू लागला ।
राग बुडव्याचा राणोजीला
सिद्ध जाहला तुम्ही प्रकार पहाता कुठला
अचानक नडला पडला

**राणू :** अग ये, वाईचं भाईर ये.
**हौसा :** (बाहेर येऊन आश्चर्याने) अन् हे वं काय?
**राणू :** आँ ऽ, कुठं काय?
**हौसा :** आवं कर्ज वसूल करायला गेला अन् हे काय आणलं?
**राणू :** तुला काय दिसतंय? (म्हाताऱ्याला एका कोपऱ्यात बसवतो.)
**हौसा :** आवं, मला दिसतंया माणूस, पर कर्ज कुठंया?
**राणू :** हेचं नाव कर्ज!
**हौसा :** म्हंजे कर्जात म्हातारा आणला की काय?
**राणू :** हो, आणला म्हंजी, आणला.
**हौसा :** (कपाळावर हात मारून घेते.) आता रं देवा!
**राणू :** आनि देवाला का हाका मारतीस?
**हौसा :** आवं हे मरंल की.
**राणू :** म्हणून म्हणतो याला चांगला जप, मरू देऊ नगं. चल बघू, आता वाढ जेवायला.

**(लावणी)**

कर्जात आणला म्हातारा, जपी या जरा, मरू नको देऊ,
कर शिकस्त या जगावया, घालीया जेवू
एकटा टाकुनी दारी, कधी क्षणभर दूर नको जाऊ
जर मेला म्हातारा, बुडवे घेईल माझा जीऊ

## दृश्य चौथे

(बाबुराव बुडव्याचे दार. मित्रांशी तो विचार करीत बसला आहे.)

**बाबू :** मित्रांनो, माझा म्हातारा सकाळी स्वर्गवासी झाला आहे. शेवटची भेट झाली नाही हो!
**इसम :** हे मात्र वाईट झालं. शेवटी कर्जात कुजून मेला बिचारा.
**बाबू :** म्हातारा मेला नाही. त्या दुष्टानं त्याला मारला.

**इसम :** पण म्हातारा मेला कसा?
**बाबू :** दोन दिवस त्याला ताप येत होता. त्याची मला खबर होती. पण सकाळी एकाएकी मेल्याची खबर आली. धावत गेलो, पण भेट झाली नाही. फक्त नदीला जळणाऱ्या त्याच्या प्रेताला नमस्कार केला. जरा रडलो आणि आलो.
**इसम :** (गहिवरून) मग आता काय करायचं बोला?
**बाबू :** म्हातारा भरून देऊ असं त्यानं कबूल केलं हाय.
**इसम :** अहो, मी एक लाखाचा दावा करणार आणि वसूलही करणार आहे.
**इसम :** खरंच तसं केलंच पाहिजे.
**बाबू :** परंतु मला या क्षणाला एक हजार रुपये पाहिजेत. तेव्हा आता तुम्ही श्रीमंत मंडळी मला एक हजार रुपये द्या. आणि चला नदीला. प्रेत जळत आहे. त्या राण्याच्या घराचा लिलाव करू.
**इसम :** पण आमच्या पैशाचं हो काय? खरंच, तो एक प्रश्न आहे. शिवाय तुमचं रेकॉर्ड बरं नाही म्हणून म्हणतो -
**बाबू :** अहो, स्वत:च्या हातानं एक लाख रुपयं वसूल करा आणि तुमचं एक हजार रुपये व्याजासह काढून घ्या. मग तर झालं?
**इसम :** हे आम्हाला मान्य आहे. मग चला बरं, मढं जळत आहे तोपर्यंत मारा दौड.
**बाबू :** हो, चला लौकर, माझा म्हातारा ...

(सर्वजण जातात.)

## दृश्य पाचवे

(राणूजीचे घर. राणूजी एकटाच आहे. थोड्या वेळात हौसा प्रवेश करते.)

**राणू :** काय, झाला का बाजार?
**हौसा :** बाजार झाला खरा; पण म्हातारा कुठं हाय?
**राणू :** त्याचा बी बाजार झाला.
**हौसा :** (घाबरून) म्हंजी वं?
**राणू :** तू बाजाराला गेलीस अन् घडीभरात त्यानं डोळं झाकलं.
**हौसा :** आता रं देवा! तो बुडव्या येऊन म्हातारा दे म्हणाला तर काय कराल?
**राणू :** (रागावून) म्या तरी काय करू? म्या तयाला मर म्हणलं हुतं?
**हौसा :** म्या रातीच सांगितलं व्हतं, त्याला ताप येतो. आपल्या घराला पोचवा, पण माझं मेलीचं कोण आयकतंया?
**राणू :** हे बघ, आता वांय वांय करून काय फायदा नाय. डाव माइया अंगावरच आलाय.

आता काय करायचं?

**हौसा :** आता काय करायचं?

(इतक्यात बुडवे, इसम येतात.)

**बाबू :** तू-तू माझा म्हातारा मारलास, ठार मारलास!

**राणू :** हो, हो, मारला!

**इसम :** म्हंजी खून केलास!

**हौसा :** न्हाय वो! फार दिस ताप येत व्हता आणि आजारी व्हता तो.

**इसम :** न्हाय न्हाय, सारं खोटं हाय.

**बाबू :** अजून शंभर वर्ष जगणारा माझा वडील! ठार मारलंस तू त्याला.

**हौसा :** न्हाय वो, खरंच थकला होता.

**इसम :** अगदी खोटं, म्हातारा थकला नव्हता.

**बाबू :** अहो, घोड्यासारखा धडधाकट होता माझा म्हातारा.

**इसम :** खून केला यानं त्याचा. बोलवा फौजदाराला.

**बाबू :** आण माझा म्हातारा. हो ऽ ऽ

**इसम :** आण म्हातारा. खून केला त्याचा तुम्ही.

**राणू :** नाय हो, खरंच थकला होता त्यो.

**बाबू :** ते मला नगं सांगू, आताच्या आता माझा म्हातारा आण. आणि घे तुझे एक हजार रुपये.

**(लावणी)**

**बाबू :** आता शेवट ऐका, घेऊनी पैका माझा मला द्या म्हातारा,

**राणू :** घात झाला, मरून गेला, आसंल पोहचला देवाघरा.

**बाबू :** खटला कोर्टात नेईन, वकील देईन, पिळून काढीन तुला पुरा.

**राणू :** पान पिकलेलं गळून गेलं. आता इथं ते तुम्ही करा.

**बाबू :** काय उलट्या काळजाचा माणूस हाय?
नको भांडण पेटवू, गांजणी उठवू फुक्कट होईल तुझा चुरा!

**राणू :** दहा महिन्यांचा खर्च बापाचा, आणून आधी इथं भरा!

**इसम :** हो हो, घे ते आपुले कर्ज आणि आण म्हातारा. नाहीतर मरशील फुकट! फासावर जाशील.

**बाबू :** नाहीतर लाख रुपये भरून दे.

**राणू :** अं...... बाबा, एक लाख रुपये?

**हौसा :** न्हाई ओ दोनशे घेऊन जा की.

**बाबू :** न्हाय, ते शक्य न्हाय. कारण मला त्याचं दिस घालायचं हाय, त्याचं थडगं

बांधायचं हाय.

**राणू :** आवं पर, एवढं पैसे कुठून आणू?

**बाबू :** न्हाय तर म्हातारा दे!

**इसम :** हे आपलं पैसं घे अन् म्हातारा दे.

**राणू :** (नोटा घेऊन) आवं, पर मेलेला म्हातारा कसा आणू?

**इसम :** आवं शेटजी, बोलवाच फौजदाराला.

**हौसा :** नगा नगा, त्यो आपल्या मरणानं मेला.

**बाबू :** ये राणू, ते पैसं खाली ठेव. आधी तो माझा म्हातारा आण अन् मग पैशाला हात लाव हो.

**राणू :** (नोटा हौसाच्या हाती देत) बुडवे महाराज, ओरडू नगा (हौसाला बाजूला ओढून) आणि हे पैसं देऊ नगासा. (आत जातो. सर्व शांतपणे पाहतात. राणूजी म्हाताऱ्याला घेऊन येतो) हं, घ्या. बघून घ्या. म्हाताराच हाय बरं, त्याचं भूत नव्हं हे!

**इसम :** अरेरे, मेलेला म्हातारा कसा आणलास?

**राणू :** तुमास्नी काय करायचं? आणला सरणातनं!

**बाबू :** (शांत होऊन) म्हंजी माझा म्हातारा मेला नव्हता का?

**राणू :** ते इच्यार म्हाताऱ्याला.

**बाबू :** मंग सकाळी नदीला जाळलंस ते काय?

**हौसा :** ते बी आपल्या बाला इच्यारा.

**इसम :** शेटजी, माझं एक हजार रुपये?

**राणू :** ते बी म्हाताऱ्यापाशी —

**बाबू :** अरे ते पैसे —

**राणू :** ते पैसे माझं कर्ज! आणि ह्यो तुमचा म्हातारा!

**बाबू :** अरे, पण मी त्याचे पैसे... काय देऊ परत त्याला?

**राणू :** काय बी कर, न्हाय तर नगं करू, न्हाय तर म्हातारा दे.

**हौसा :** आता जावा लवकर डोळ्याच्या उजेडात चोरवाडीला. या बया, आता तुम्ही काय करताव इथं? जावा की तुमीबी आपापल्या घराला!



## अनुक्रम

# माझा रशियाचा प्रवास

## १. मुंबई ते मॉस्को

आपण वाटेल ते करून एकवेळ सोविएत संघराज्य पाहावे, असं मला फार फार वाटत होतं. ती आशा माझ्या मनात दिवसेंदिवस सारखी प्रबल होत होती. रशियातील ते कामगार-राज्य कसे असेल, तिथं कॉ. लेनिननं केलेली क्रांती, मार्क्सचे महान तत्त्वज्ञान कसे साकार झाले असेल, ती नवी दुनिया, नवी संस्कृती, नवी सभ्यता कशी फुलत असेल, या विचारानं माझं मन भारावलं होतं. मी वेडाच झालो होतो.

मी सन १९३४च्या दरम्यान अनेक जप्त पुस्तके वाचली होती. 'रशियन क्रांतीचा इतिहास', 'कॉ. लेनिनचे चरित्र' या पुस्तकांनी माझ्या मनावर खूप परिणाम केला होता. आणि म्हणूनच मी रशिया पाहण्यासाठी उत्सुक झालो होतो. कसंही करून एकदा रशियाकडे सरकावं असा माझा विचार झाला होता. मी खटपट करीत होतो. मी दोन वेळा पासपोर्ट मिळावा म्हणून अर्ज करून पाहिला. पण त्यावेळचे मुंबई राज्याचे मुख्य मंत्री भलतेच कडक होते! त्यांनी मला विश्वासात घेऊन सुनावले की, बाबा, तू आमचा वैरी आहेस. खरोखरी सांगतो की, आम्ही चांगली माणसं म्हणून तू बाहेर आहेस. नाही तर यावेळी तुझी जागा तुरुंगात ..... तो काळ १९४८चा होता. त्या वेळी माझे मित्र सिनेनट श्री. बलराज सहानी यांनी माझी पॅरिसपर्यंतची तिकिटेही काढली होती. कारण पॅरिस येथे भरणाऱ्या जागतिक शांतता परिषदेचे मला निमंत्रण आले होते; पण जमले नाही.

पुढे १९६१ साली माझ्या 'फकिरा' या कादंबरीला राज्य सरकारचे पहिले पारितोषिक मिळाले आणि याच वेळी इण्डो सोविएत कल्चरल सोसायटीनं मी रशियास जावे, असं ठरवलं. त्या संस्थेचे मला पत्र मिळताच मी पुन्हा प्रयत्न करू लागलो; पण जवळ एक पैसाही नव्हता.

परंतु जेव्हा मी रशियाला जात आहे, ही गोष्ट महाराष्ट्राला समजली तेव्हा एक चमत्कार घडला. माझ्यावर पैशांचा पाऊस पडला. एकाच दमात माझा अर्धा खर्च निवारला! त्यामुळे पुढे अनेक भानगडीतून जाऊन मला रशियाला जाण्याचा पासपोर्ट मिळाला. माझी तयारी झाली. मला गगन ठेंगणं वाटू लागलं. न पाहिलेला रशिया माझ्या डोळ्यापुढं

तरळू लागला.

शाहीर द. ना. गव्हाणकर यांनी मला कित्येक तास बसून रशियात कुठं काय आहे, कसं बघायचं, कसं बोलायचं, याचे धडे दिले. कारण मुंबई ते सातारा हा प्रवासही मी कधी एकटा करीत नाही, तो मी मॉस्कोला जाणार! हा प्रश्न माझ्या दृष्टीनं मोठा कठीण होता. देश, आप्त, घर सोडून मी एकट्यानं इतकं दूर जायचं म्हणजे माझ्या बाबतीत फारच अवघड होतं.

दुसऱ्या महायुद्धात सोविएत जनतेने पराक्रमाची शर्थ केली होती. त्यामुळे मी उत्स्फूर्त होऊन स्टालिनग्राडच्या लढाईवर एक पोवाडा लिहिला होता. माझी प्रतिभा लाल सैन्याबरोबर बर्लिनपर्यंत गेली होती आणि आता मी स्वत: मॉस्कोपर्यंत जाणार होतो. इण्डो सोविएत कल्चरल सोसायटीच्या शिष्टमंडळात माझा समावेश झाला होता, पण मुंबईहून दिल्लीपर्यंत एकटा जाऊन मग मला इतर सभासद भेटणार होते. त्यापैकी एकालाही मी ओळखत नव्हतो.

घरापासून विमानतळापर्यंत माझ्या अनेक मित्रांनी-आप्तांनी मला फुलात बुजवलं. आशीर्वाद दिले. विमानतळावर अनेक दोस्त आले होते. त्यांना आनंद झाला होता. मी मात्र मनात खचलो होतो. मॉस्कोचा प्रवास नि तोही विमानानं या कल्पनेनं मला धडकी भरली होती. माझे मित्र मला एक एक सूचना करीत होते. एक म्हणाला, ''तुम्ही रशियात झोपड्या किती आहेत, तेवढ्या पाहून या बरं का!''

एकानं सांगितलं, ''पुलाखाली किती लोक राहतात, याची काळजीपूर्वक तपासणी करा.''

एकजण गंभीर चेहरा करून म्हणाला, ''पोलादी पडद्याची जाडी किती आहे, याची नोंद करून लवकर या!''

एकानं देव निर्वासित झाले आहेत, ते कुठं राहतात, त्यांची परिस्थिती काय आहे, हे न चुकता पाहून या - अशी सूचना केली.

आणखीही कित्येक सूचना आल्या. वर्णभेद... व्यक्तिस्वातंत्र्य.... बेकारी...., म्हणजे सर्व रशियाचे संशोधन करून मी यावे, असेच त्यांचे मत होते आणि मी हूं म्हणून ऐकत होतो. माझ्यापुढं ते विमान शांत उभं होतं, पण माझा आत्मा उडाला होता. काळीज धडधडत होतं. त्यामुळे मी बोलत नव्हतो. फक्त हूं म्हणून मुंडी डोलवून वेळ काढीत होतो.

सूचना, उपदेश, फुले, हार, आशीर्वाद हे सर्व घेऊन मी ता. १२ रोजी रात्री अकरा वाजता दिल्लीकडे विमानाने भरारी मारली. त्यावेळी महाराष्ट्राची भूमी अंधारात गडप झाली होती. ती दिसावी म्हणून मी धडपडत होतो. मी विमानाकडे जाते वेळी हात उंचावून उभी असलेली माझी आप्तमंडळी, शंकरभाऊ, शांता, शकू, शाहीर द. ना. गव्हाणकर,

गणपत सातपुते, श्री. वैराळे, श्रीमती जयवंताबाई या सर्वांच्या मूर्ती माझ्या डोळ्यांपुढून हालता हालत नव्हत्या. गणगोत, देश, घर सोडून दूरदेशी जाताना किती दुःख होतं, याचा मला त्यावेळी अनुभव आला.

सकाळी पाच वाजता पालम विमानतळावर माझ्या विमानानं पाय टेकले नि माझा जीव भांड्यात पडला.

अगदी सूर्योदयापासूनच मी खासदार एस. ए. डांगे यांच्या बंगल्यावर दाखल झालो. तेव्हा 'डी' झोपले होते. सौ. उषाताई डांगे यांना मी आल्याचं समजताच त्या हसत पुढं आल्या. आमचा अण्णा मॉस्कोला निघाला, असं म्हणून त्यांनी माझ्या पाठीवरून हात फिरवला. तेव्हा मला माझ्या आईची आठवण झाली.

उषाताईनं घाई केली. पैसे घेऊन त्या माझी तयारी करायला तयार झाल्या, पण मी मुंबईहून निघताना सर्व तयारी केली होती.

ताईनं विचारलं — ''अण्णा, कपडे ?''

''घेतले आहेत —'' मी उत्तरलो.

''बूट— ?'' ताईनं दुसरा प्रश्न केला.

''आहेत.'' मी उत्तर दिले. हे ऐकून ताई निर्धास्त होऊन हसल्या आणि माझ्यासाठी काय काय खरेदी करावे, याचा विचार करू लागल्या. दुपारीच ताश्कंदपर्यंतचं जाण्यायेण्याचं तिकीट आणि व्हिसा माझ्या हाती पडल्यानं मी विवंचनामुक्त झालो.

दुसऱ्याच दिवशी पुढं जायची तयारी करू लागलो. कपडे करून आवराआवर केली. तोच डांगे शांतपणे माझ्याकडे आले. माझा तो साहेबी पोशाख पाहून गालात हसले. मग त्यांनी माझा टाय सरळ बांधला. अंगातील कोटावरून स्वतः ब्रश फिरविला आणि पाठीवर थाप मारली! ज्या हातांनी कामगारांच्या अनेक पिढ्या घडवल्या नि लढवल्या ते हात माझ्या पाठीवरून फिरताच माझं काळीज डोंगराएवढं झालं! मुंबईत आचार्य अत्रे आणि दिल्लीत कॉ. डांगे यांचे आशीर्वाद घेऊन 'चितोड की रानी' या भारतीय विमानातून मी आकाशात झेप घेतली. त्यावेळी मातृभूमी सोडण्याचे दुःख आणि सोविएत देश पाहण्याचे सुख यांचा विलक्षण संगम माझ्या अंतःकरणात निर्माण झाला होता. मी पुन्हा पुन्हा आपली धरती पाहत होतो आणि तिचे दर्शन घेत होतो. मी लवकरच परत येणार आहे, हे मी विसरलो होतो.....

विमान सारखं उंच चढत होतं. 'चितोड की रानी' हे अत्यंत सुंदर नि सुसज्ज विमान पाहून मी चकित झालो होतो. ते विमान हिमालयाला बगल देऊन भरारी मारीत होते. खाली डोंगर टेकडीसारखे दिसत होते. नद्यांना ओघळाचं स्वरूप आलं होतं. एखाद्या शहरातील इमारती काड्याच्या पेट्यांएवढ्या दिसत होत्या.

दिल्लीच्या पालम विमानतळावर शेवटचा प्रवासी म्हणून मी 'चितोड की रानी' या

विमानात चढलो, तेव्हा माझे सहप्रवासी मला पाहून गालात हसले. 'हा एक महामूर्ख आहे बरं का', असा त्यांचा चेहरा बोलला. मी आपला गुमान विमानात बसलो. कुणी माझी दाद घेतली नाही. रंग काळा, पोशाख साधा, गळ्यात टाय नीट नाही. मग मला शहाणा कोण म्हणणार?

परंतु त्याच विमानात सिलोनचे युवक प्रतिनिधी होते. त्यात एक सिलोनी कम्युनिस्ट पार्टीच्या मुखपत्राचे संपादक आणि सिलोनी लोकसभेचे सभासद होते. त्यांना माझा पत्ता लागला. त्याच महिन्यात 'मनोहर'मध्ये माझा परिचय आला होता, तो सौ. मीनाक्षीबाईंनी लिहिला होता आणि 'खापऱ्या चोर' या माझ्या तमाशातील माझे चित्र छापले होते. विमानात तो अंक कोणी तरी दाखवला आणि हा 'खापऱ्या चोर' या विमानात आहे, ओळखा अशी चर्चा सुरू झाली. शेवटी काहींनी मला हेरलं नि मग मी आपल्या सिलोनी मित्रांत दंग झालो. ताश्कंदपर्यंत आमच्या शिष्टमंडळानं माझी दाद घेतली नाही.

परंतु ताश्कंदला पोहोचताच त्यांचे डोळे उघडले आणि मीही एक चांगला माणूस आहे, अशी त्यांची खात्री झाली.

मद्रासचे जॉन माझ्या गळ्यात पडले. म्हणाले, "साठेजी, आमचे सारेच चुकले, माफ करा. आम्ही तुम्हाला वेगळे ठरवले होते. परंतु आता आमची खात्री झाली की तुम्ही फार चांगले आहात!"

बरोबरच पाच वाजता 'चितोड की रानी' हे विमान उझबेकिस्तानची राजधानी ताश्कंद येथे उतरले. तेव्हा अनेक उझबेकी मित्रांनी फुले देऊन आमचे स्वागत केले. एक उझबेकी मित्र पुढं येऊन म्हणाला, "आता तुम्ही थोडा आराम करा. न्याहारी करा. कारण तुमच्यासाठी सोविएतचे जेट विमान तयार आहे."

"परंतु चितोड की रानी'मध्ये असलेल्या आमच्या सामानाचं काय?" मी विचारलं. तो सद्गृहस्थ हसून म्हणाला, "ते सर्व ठीक होईल. तुम्ही काही काळजी करू नका!"

ताश्कंद येथे आम्ही प्रथम आपली घड्याळं अडीच तास मागं घेतली आणि बरोबर सात वाजता सोविएत विमानात चढलो. 'ए' क्लासमध्ये आमची सोय केली होती.

माझे विमान चाळीस फूट उंचीवरून ताशी आठशे पन्नास किलोमीटर वेगाने धावत होते. त्या विमानातील आतील व्यवस्था साधीच वाटत होती. प्रत्येक ठिकाणी वेल्वेटचे लाल नि जांभळे पडदे लटकत होते. त्या पडद्यांमुळे आमची मोठी पंचाइत झाली होती. प्रत्येक पडद्यामागे काही तरी असे. निरनिराळ्या जागी निरनिराळे पडदे लोंबत होते. कुठं शौचकूप होते, तर कुठं स्वयंपाकगृह होते. कुठं नोकरांचे विश्रांतिस्थान होते नि त्या प्रत्येकाच्या दारापुढे ते पडदे लटकत होते. प्रत्येक दारापुढे रशियन भाषेत त्या स्थानाचे नाव लिहिले होते आणि ते आम्हाला समजत नव्हते. त्यामुळे आमची परिस्थिती कठीण झाली होती.

आमच्या शिष्टमंडळात बंगालचे चतर्जी नावाचे एक वृद्ध वकील होते. ते विमानात चढले की झोपत आणि जागे झाले की प्रथम शौचकूपाची चौकशी करत. एक तास विमानाचे भ्रमण झाले आणि श्री. चतर्जी एकाएकी जागे झाले. त्यांनी प्रथम सर्वत्र नजर टाकली. निरनिराळ्या पाट्या वाचून पाहण्याची खटपट करून पाहिली, पण शौचकूप कुठे आहे, याचा पत्ता लागेना. मग त्यांनी अनेक पडदे वर करून पाहणी केली, पण काहीच पत्ता लागला नाही. अखेर त्यांना हवाईसुंदरीची मदत घेणे भाग पडले.

विमानाची ती भयंकर दौड पाहून माझा मीच स्तंभित झालो होतो. अनेक विचारांनी माझं डोकं सुन्न झालं होतं.

अंतराळातून माझे विमान उडत होते. ते ढगांच्या राशीतून मार्ग काढीत होते. खाली निरनिराळी शहरे दिसत होती. म्हणजे अनंत दिव्यांच्या पुंजक्यांवर खाली एखादे शहर असावे, असं मी समजत होतो. माझं मन स्वदेशात घुटमळत होतं. विमानाने मुंबई ते मॉस्को या दरम्यान मी भरारी मारीत होतो. माझ्या चक्षूंपुढं मुंबई दिसत होती. माझ्या आईच्या प्रतिमेपुढं शांता नि शकुंतला यांनी एक निरांजन लावले होते. ते मी परत येईपर्यंत जळणार होते. त्याचा मी विचार करीत होतो. ते निरांजन जळत असेल, तेवत असेल.....

'आला आला' म्हणत मॉस्को विमानतळ आला. आम्हाला सिगारेट ओढू नका, कमरेला पट्टे लावा, मॉस्को आले अशी सूचना मिळाली. मी खिडकीतून खाली पाहिले. ते मॉस्कोचं पहिलं दर्शन घडताच मन विचारमुक्त झाले. ती मॉस्कोनगरी मी प्रथम आकाशातून पाहिली आणि तिची कीर्ती आठवली.

विमानानं एक जंगी झेप घेऊन धरणीवर पाय टेकले. मी सावध झालो. नि:श्वास टाकून ऊर रिकामं केलं. विमानाच्या दारात तशा रात्री अनेक मित्र फुले घेऊन आले होते. बाहेर थंडी मी म्हणत होती. थंड वारे सर्वत्र धावत होते. अंगाला चावत होते. माणसाच्या नाकातोंडातून वाफेचे लोट निघत होते.

मी पार गांगरलो होतो. मला भानच उरले नव्हते. माझा चेहरा पडला होता. मी कुठंतरीच पाहत होतो. त्या गडबडीत आपला ओव्हरकोट अंगात घालायचा मला विसर पडला होता. सर्वांच्या शेवटी मी पाय ओढीत चालत होतो. मी आपला ओव्हरकोट काखेत दाबून धरला होता आणि चोरासारखा सर्वत्र पाहत होतो. समाजसत्तावादी माणसं न्याहाळत होतो. भयंकर थंडी वाजत होती. त्याची मला जाणीव नव्हती. थोडक्यात मी भांबावूनच गेलो होतो.

"तुम्हाला थंडी वाजत नाही?" कझकीना नावाची एक महिला जवळ येऊन म्हणाली. त्यामुळे मी अधिकच गोंधळून गेलो नि उत्तरलो, "छे, कुठं आहे थंडी!" पण त्यावेळी माझ्या नाकातोंडातून वाफेचे लोट बाहेर पडत होते. ते पाहून मी स्वत:च पुन्हा घोटाळ्यात पडलो नि कझकीना मोठ्यानं हसल्या. ओव्हरकोट अंगात घालायचं विसरून हा माणूस

थंडीनं कुडकुडत आहे, हे लक्षात येऊन त्या हसत होत्या. त्यांनी मला थांबवलं. उभं करून मग माझा कोट घेऊन त्यांनीच तो माझ्या अंगात घातला आणि मग मला बरं वाटलं. मी भानावर येऊन चालू लागलो. कझकीनाबाई अगदी नम्रतेने म्हणाल्या, ''ही आमची मॉस्कोनगरी. ती तुम्ही उद्या पाहालच!''

'हं.' करून मी चौफेर नजर टाकली आणि पुन्हा कझकीना म्हणाल्या, ''हे मॉस्को आमचं हृदय आहे!'' हे उद्‌गार ऐकून मी आश्चर्यानं चमकलो.

''खरं आहे तुमचं म्हणणं.'' असं म्हणून मी ढेंगा टाकू लागलो. कझकीना म्हणाल्या, ''हे वातावरण तुम्हाला कसं वाटतं?''

''अगदी आमच्या दिल्लीसारखं–'' मी उत्तर दिले. आता माझा पडलेला चेहरा बराच उठला होता.

विमानतळाहून आम्ही मोटारीनं शहराकडे जात होतो. आमच्या मोटारी वेगानं दौड मारीत होत्या. आमचे शिष्टमंडळाचे सभासद दबक्या आवाजात आपसात बोलत होते. त्या चार मोटारी वळणं घेत होत्या. माझ्याबरोबर मद्रासचे श्री. जॉन बसले होते. हे जॉन पियानोचे दर्दी म्हणून त्यांची या शिष्टमंडळात निवड झाली होती. ते फारच शांत स्वभावाचे नि प्रेमळ होते. मी मोटारीच्या खिडकीच्या काचा खाली करून बाहेरची दिव्यांची झुंबरं पाहत होतो. थंड वारा मोटारीत जाऊन अंगाला चावत होता. त्या चावऱ्या वाऱ्यानं जॉनच्या डोळ्यांतून पाण्याच्या धारा वाहत होत्या. त्या पाहून मी विचारले,

''काय मित्रा, रडू काय येतंय?''

''मुळीच नाही!'' जॉन चिडक्या सुरात म्हणाला, ''मी कधीच रडत नाही, पण एक विचारू?''

''अरेच्या, त्याला परवानगीची काय गरज आहे?'' मी म्हणालो, ''विचारा ना!''

''एवढ्या कडाक्याच्या थंडीत तुम्ही खिडकीची काच खाली केली आहे, याचं कारण काय सांगाल का?''

''त्याचं असं आहे,'' मी म्हणालो, ''आपण इकडे आलो आहोत ते सर्व काही पाहण्यासाठी. तेव्हा माझं मत आहे की, आपण जे काही पाहायचं ते कसलीही काच न लावता पाहू या. आता रडता का?''

''मिस्टर साठेजी,'' जॉन म्हणाला, ''तुमचं अर्ध म्हणणं मला मान्य आहे. आपण सर्व काही सरळ पाहावं, पण या थंडीत माझ्या डोळ्यांना त्रास होतोय. मी रडतोय हा तुमचा समज चुकीचा आहे!''

मी त्या राजरस्त्यानं मॉस्कोकडे जात होतो. आनंद झाला होता, पण आता भाषेची अडचण पडून आपला हा रशियाचा प्रवास व्यर्थ होणार, याची मला बोचणी लागली होती. आमच्या या शिष्टमंडळात बंगाल, मध्यप्रदेश, गुजरात, मद्रास अशा निरनिराळ्या

प्रांतांतील लोक होते. सर्वजण वेगवेगळ्या व्यवसायातील होते. सर्वांना इंग्रजी येत होते; परंतु मी एकटाच असा होतो की मला कोणतीही परकी भाषा येत नव्हती. थोडीशी हिंदी आडवीतिडवी बोलता येत होती एवढंच.

मी 'सोविएत स्काय' या आलिशान हॉटेलात पोहोचलो. तेव्हा तिथं मला कॉ. बारनिकोव भेटले. त्यांनी एकदम पुढं येऊन माझा हात धरला नि शुद्ध हिंदी भाषेत बोलायला आरंभ केला.

''मी बारनिकोव. मी लेनिग्राडचा आहे. तुम्ही येणार म्हणून मला मुद्दाम तुमच्यासाठी बोलावलं आहे. आता एक महिना मी आपल्याबरोबर असणार म्हणजे आपल्या दुभाष्याचे काम करणार!'' कॉ. बारनिकोवचे ते शुद्ध हिंदी, मोकळा नि गोड स्वभाव पाहून मला आनंद झाला. नंतर मी आपल्या खोलीत गेलो आणि पुन्हा कॉ. बारनिकोव यांनी येऊन विचारले, ''उद्या काय काय पाहणार आहात?''

''प्रथम रशियातली माणसं!'' मी उत्तर दिले आणि कॉ. बारनिकोव गालात हसले.

## २. रशियातील भ्रमंती

मी रशियात जाण्यापूर्वी माझी 'चित्रा' ही कादंबरी रशियन भाषेत प्रकाशित झाली होती. काही कथांचा अनुवादही झाला होता. माझी 'सुलतान' ही कथा रशियन लोकांना फारच आवडली होती. हा 'सुलतान' मला अमरावतीच्या मध्यवर्ती तुरुंगात भेटला होता. तो माझ्या आधी कथारूपाने रशियात पोहोचला होता. त्यामुळे 'सुलतान'फेम अण्णा भाऊ साठे असं माझ्याबद्दलचा मजकूर छापताना लिहिलं जात होतं.

माझा 'स्टालिनग्राड'चा पोवाडा तर रशियात फारच लोकप्रिय झाला होता. आणि हे सर्व पुण्य पदरी घेऊन मी रशियात भ्रमण करीत होतो.

पहिल्या दोनच दिवसांत ओहक = पाणी, पिचस्की = आगपेटी, खराश = खरे आहे, हे शब्द मी शिकलो.

आम्ही मॉस्कोत पोहोचलो आणि आमच्यापुढं एक नवीन पेच पडला. दोन डॉक्टर, एक आमदार, एक सॉलिसिटर, एक पियानोवादक नि एक लेखक म्हणजे मी, अशा सहा लोकांत पाच आवडी उभ्या राहिल्या आणि आम्ही त्यांचा विचार करू लागलो. जो तो आपलं मत पुढं रेटू लागला.

दोन डॉक्टर काखा वर करून सरळ म्हणाले, ''रशियात जेवढी म्हणून शस्त्रक्रिया होणार आहे, ती आम्हाला पाहिलीच पाहिजे, नाही तर रशियात येऊन आमचा काय फायदा?'' या दोन डॉक्टरांपैकी एक हैदराबादचे शहा हे स्वतःच आजारी होते आणि

स्वत:वर एक शस्त्रक्रिया करून घेण्याच्या उद्देशाने ते आले होते.

दुसरे डॉक्टर दयालू, हे म्हैसुरी गृहस्थ होते. त्यांना हिंदी भाषा तर मुळीच येत नव्हती.

लखनौचे आमदार पुष्कराज हे नाकीडोळी तरतरीत होते. तशात त्यांचा पोशाखही नीटनेटका म्हणजे नेहरू टाईप होता. ते म्हणाले, "मला रशियात लोकशाही आहे का, याची चौकशी करायची आहे. आपण कायदे मंडळाचे कामकाज पाहणार. कुत्र्याची चिरफाड पाहून आमच्या पोटात काय पडणार?" एवढं बोलून ते थांबले. परंतु आपण खाटीक नाही, असा त्यांनी चेहरा केला.

नंतर कलकत्त्याचे सॉलिसिटर श्री. चतर्जी पुढे झाले. कलकत्त्याचा उच्चार करताना ते 'क'चा उच्चार 'कु' करीत. म्हणजे ते सरळ 'कलकुत्ता' म्हणत. ते म्हणाले, "मला कुत्र्याचे ऑपरेशन नको नि काथ्याकूटही नको! माझा जो पेशा आहे, तो मला हवा. मी या रशियातील न्यायदानपद्धती पाहणार आहे. रशियात अन्यायाचे राज्य आहे, असं मी फार ऐकलं आहे. तेव्हा मला कोर्टात घेऊन चला — "

यानंतर मद्रासचे जॉन उठले. या जॉनच्या डोळ्यांच्या पापण्या मंद गतीनं उघडझाप करीत. ते हसू लागले की त्यांच्या डोळ्यातून पाणी येई. ते म्हणाले, "मी एक कलावंत आहे. मी पियानोवादक आहे. मला कुत्र्याचे ऑपरेशन पाहायची इच्छा नाही; कारण माझी पत्नी डॉक्टर आहे. आमच्या या शिष्टमंडळाची रचनाच मुळी क्लिष्ट झाली आहे. मी आपला पियानो ऐकणार, तुम्ही काहीही करा—"

शेवटी माझी पाळी आली. मी म्हणालो, "मला फक्त या देशात फुटपाथनं भटकायचं आहे!" हे ऐकून त्या सर्वांनी एकमेकांच्या तोंडाकडे पाहिलं.

अखेर असं ठरलं की ज्याला जे आवडेल ते त्यानं पाहावं.

दुसऱ्या दिवशी भारतीय दूत निवासाचे निमंत्रण आले. तिकडे आम्ही वेळेवर पोहोचलो. परंतु युवक प्रतिनिधी अजून येणार होते. मी दारातच फुटपाथवर थांबलो. माझ्यापुढं रस्तादुरुस्तीचं काम चाललं होतं. अवघी पाच माणसं ते काम करीत होती. पाच माणसं नि एक मोटार एवढंच. दुसरं काहीच नव्हतं. उकरण्याचं, माती भरण्याचं नि पूर्वीच डांबर वितळवून काढण्याचं काम ती मोटार करीत होती. बाकीचे कामगार सूटबूट घालून देखरेख करीत होते. आमच्याकडील बड्या ऑफीसरासारखा त्यांचा थाट होता. तिथं सक्ती नव्हती. गुलाम नव्हते. मात्र ते यंत्रच त्या माणसांचा गुलाम होऊन गुमान काम करीत होतं.

भारतीय दूत निवासात जाताच मन भारतीय जीवनाकडं धावलं. भारतीय संस्कृतीनं बहरलं. घरची आठवण झाली. जिना चढून जाताच महात्मा गांधी आणि पंतप्रधान नेहरू यांच्या प्रतिमांचं दर्शन झालं आणि मुख्य दालनात जाताच आपण मॉस्कोत नसून दिल्लीत, मुंबईत कुठं तरी आपल्या देशात आहोत, असं वाटलं. तशी त्या दालनाची

रचनाच केली होती. कोणत्याही देशाच्या व्यक्तीला तिथं जाताच आपण भारतीय दूत निवासात आहोत याची चटकन जाणीव होईल असाच तिथला साज-सरंजाम होता.

थोड्या वेळानं एक चमत्कार झाला. निरनिराळ्या दारूचे प्याले भरलेले पात्र पाहुण्यांच्या घोळक्यातून फिरू लागले. त्या पाठोपाठ भारतीय कबाब आला आणि थोड्याच वेळात डोकी धडावेगळी झाली! म्हणजे कामातून गेली! माझं तर नक्कीच बेकार झालं!

त्या समारंभाला आम्ही, युवक प्रतिनिधी, मॉस्कोतील अव्वल दर्जाचे विद्वान नि मॉस्को ॲकॅडमीचे काही विद्वान सभासद हजर होते. तो दिवस माझा आनंदात गेला. अनेक भारतीय मित्र मला त्या भारतीय दूत निवासात भेटले. ज्यांच्याबरोबर मी अनेक संकटातून गेलो, एका बंद खोलीत दिवस काढले, पुरीभाजी खाल्ली, ते मला मॉस्कोत भेटले. म्हणजे गळ्यात पडून हृदयात आनंदाचा सागर घेऊन भेटले.

आणि तो अपार आनंद उरात घेऊनच मी रात्री लेनिनग्राडकडे रवाना झालो.

रशियामध्ये माझा प्रवास विमानानंच फार झाला. रेल्वेनं फक्त एकदा लेनिनग्राडला गेलो आणि पुढं अझरबैझानची राजधानी बाकूहून ब्लीसीपर्यंतचा मी रेल्वेप्रवास केला. नाही तर एरवी उठसूट पंख फुटल्याप्रमाणं मार भरारी, असा माझा क्रम झाला होता.

लेनिनग्राडला जातेवेळी आमची व्यवस्था उत्तम केली होती. एका कंपार्टमेंटमध्ये दोन पलंग, स्वच्छ गाद्या, तशाच उश्या, चादरी, नळ, कंगवा, साबण, पावडर, रेडिओ, म्हणजे सारंच! शिवाय प्रवाशांची देखभाल करायला एक बाई होती. ती प्रेमळ बाई आपली मुलं झोपली का याची आईनं चौकशी करावी तशी खपत होती.

मला तो रेल्वेप्रवास कसासाच वाटला. मला पटकन बोरीबंदर स्टेशनची आठवण झाली. ती गर्दी, तो कोलाहल, ती धावपळ, त्या मारामाऱ्या, डब्यात ठासून भरलेली माणसं, त्यांचा गलका, बिथराबिथरी नि 'बोल, बंबादेवी जय' हा सर्व प्रकार माझ्या हाडीमासी भिनलेला! मी त्याला कसा विसरू? तशापैकी त्या स्टेशनात काहीच नव्हतं. सर्व काही शांत शांत वाटत होतं. फलाटावर जळकी काडी नव्हती. पेटती सिगारेट नव्हती. मग बिचारी विडी कोठून येणार! त्या स्टेशनमध्ये एक तर पोस्टरांची जत्रा भरली नव्हती आणि जी होती ती स्वच्छ होती. त्यावरून मी कल्पना केली की, येथे थुंकू नये, असं पोस्टर लावताच त्यावर पान खाऊन थुंकणारा प्राणी या रशियातच नसावा. नाही तर हे इतकं सुंदर पोस्टर घाटकोपरला एवढ्या आरामात काय राहातं! कधीच याच्या बत्तर बाळ्या झाल्या असत्या. पोस्टरवर मीनाकुमारीला मिश्या लावणाऱ्या आणि पृथ्वीराजच्या मिश्या भादरवणाऱ्या कलावंतांनी कधीच आपली कला दाखवली असती!

गाडी सुरू झाली होती. लेनिनग्राडकडे धावत होती. बाहेर अंधार होता. मी बाहेर पाहण्याचा प्रयत्न करून काहीच उपयोग झाला नाही. बाहेरचं काहीच दिसत नव्हतं.

मला झोप लागत नव्हती. मी जॉनला बरोबर घेऊन बाहेर पडलो. गाडीत चालू लागलो. आपल्याकडच्या टी.सी.च्या ऐटीत निघालो. परंतु सारी गाडी शांत होती. काही लोक निवांत झोपले होते काही वाचीत बसले होते. कुठं पत्त्याचा खेळ चालला होता. मध्येच काहीतरी विनोद होऊन हास्याचा स्फोट होत होता. परंतु उठबसणीचा खेळ कुठं दिसला नाही. बाकाखाली आराम नाही की संडासात दडी मारलेला महाभाग नाही! सारंच निराळं! जर या गाडीत गर्दीच नाही तर इथं खिशाला कात्री लावणारा कारागीर कसा असणार! याचा विचार करीत मी एका डब्यात शिरलो. तिथंही सारं शांत. मला टी.सी. हा प्राणीच दिसला नाही. 'जय सौजन्य सप्ताह' म्हणून प्रवाशांच्या टाळक्यात जोडा मारणारा सज्जन टी.सी. मला कुठंच भेटला नाही!

मात्र एका प्रसंगानं मला स्तंभित केलं. एका खिडकीजवळ एक सुंदर तरुणी बसली होती. तिची मान कलती होऊन ती काचेवर टेकली होती. तिने डोळे झाकले होते. ते डोळे न उमललेल्या कळीप्रमाणे बंद होते. तिच्यापुढे एक लहानसा पाळणा लोंबत होता नि त्या शुभ्र पाळण्यात एक लहानसा रशियाचा नागरिक विसावा घेत होता. आईच्या कुशीत मनसोक्त निद्रा घ्यावी तसा तो निद्राधीन झाला होता. त्याला त्याच्या लेनिनने सर्व काही दिले होते. तो एक महिन्याचा असावा. परंतु आतापासूनच रशियन संघराज्य त्याची काळजी घेत होतं. त्याला प्रवासात एक सुंदर पाळणा दिला होता. कारण हाच बालनागरिक मोठेपणी आपल्या मातृभूमीसाठी शंभरदा मरणार याबद्दल सोविएत संघराज्याला खात्री होती.

मी फिरून परत येऊन दार बंद करून पलंगावर पडलो. आणि लेनिनग्राडचा विचार करू लागलो. सकाळीच मी तेथे पोहोचणार होतो. तेथे जाताच मला **प्रा. ततियाना कातेनिना** या बाई भेटणार होत्या नि त्यांच्याशी मी मराठी बोलणार होतो. कारण महाराष्ट्रापासून अक्षरशः हजारो मैलांवर मराठी भाषेच्या विकासासाठी, तिच्या वाढीसाठी मराठी भाषा रशियन मुलामुलींना शिकवण्यासाठी धडपडणारी ती बाई उद्याच आपणाला भेटणार याचा मला आनंद झाला होता.

थोड्या वेळात कंपार्टमेंटच्या दारावर टिक् टिक् असा आवाज झाला. मी गडबडीनं दार उघडलं. एक माणूस दारात नम्रपणे उभा होता. त्यानं मला पाहताच अभिवादन केलं. त्यानं दारात एक मोठी पाटी ठेवली होती आणि त्या पाटीत अनेक प्रकारच्या दारूच्या बाटल्या भरल्या होत्या. त्यानं रशियन भाषेत दारू हवी का म्हणून विचारले. नंतर आपल्याकडे कोणत्या प्रकारची किती दारू आहे, याची यादी सांगितली. मी मनात नमस्कार करून त्याला वाटेला लावला. नि मनात म्हटलं, जर का तू ही टोकरीभर दारू घेऊन मुंबईत दिसला असतास तर एकाच क्षणात तुझी वाट लागली असती! प्रथम तुझी कणीक तिंबली गेली असती. मग तुझ्या मानेवरची ती कोटाची कॉलर पकडून आजपर्यंत

जे पाच लाख तुरुंगात गेले आहेत, त्यात तुझी भरती झाली असती. जा! तू रशियात आहेस —

मी डोळे मिटले. झोपण्याचा बेत केला. तोच रेडिओ कडकडला आणि भारताचे पंतप्रधान पं. जवाहरलाल नेहरूंचा आवाज कानी आला. ते राष्ट्रसंघाच्या सभेत भाषण करीत होते. त्यांचं ते भाषण कोणत्या रेडिओनं प्रक्षेपित केलं, ते मात्र समजलं नाही. परंतु तो परिचित आवाज ऐकताच मन भर्रकन दिल्लीत पोहोचलं आणि मनाच्या वेगापुढं जगातील सर्व वेग निकामी आहेत, याचा त्यावेळी मला प्रत्यय आला.

## ३. मॉस्को ते लेनिनग्राड

सकाळी लेनिनग्राड येथे अनेक मंडळी आमच्या स्वागतार्थ हजर होती. फुले, कॅमेरा, टेलिव्हिजन, वर्तमानपत्र यांचे प्रतिनिधी यांनी गर्दी केली होती. त्यात आश्चर्याची गोष्ट म्हणजे, प्रोफेसर ततियानाबाई आपल्या सर्व मराठी विद्यार्थ्यांसह खास मला घ्यायला आल्या होत्या. त्यापूर्वी ओळख असावी तद्वत सरळ माझ्यापुढे येऊन शुद्ध मराठीत विचारपूस करू लागल्या. तेव्हा आपण लेनिनग्राडमध्ये नसून मुंबईत असल्याचा मला भास झाला आणि एकापरी ते खरेही होते. कारण माझी 'चित्रा' कादंबरी त्यांच्याच देखरेखीखाली रशियन भाषेत भाषांतरित झाली होती. त्या माझ्याशी मराठीत बोलत होत्या. आणि त्यांच्या विद्यार्थिनी निना नि शश्या ह्या मराठी जपून बोलत होत्या. मी भोवती जमलेली सर्व मंडळी विसरून गुळाला मुंगळा डसावा तद्वत मराठी बोलणाऱ्या रशियन मित्रांत गुंग झालो होतो.

या ततियानाबाई मराठी शुद्ध बोलतात, आणि मराठी बोलताना एखादा शब्द अडला तर — 'त्याला काय म्हणतात' म्हणून गंभीर होतात. या वेळी किंचित त्या खिन्न होतात. परंतु इंग्रजी वा हिंदीची मदत न घेता मराठीचाच आधार घेऊन त्या शब्दाची अडवणूक दूर करून मग हर्षभरित होऊन हसतात. तेव्हा त्यांचा चेहरा आनंदानं फुलतो.

मी भारत सोडण्यापूर्वी आचार्य अत्रे यांनी त्यांना एक पत्र दिले होते, मी ते त्यांना दिले. तेव्हा तर त्यांचा आनंद द्विगुणित झाला. त्यांनी आचार्यांचं पत्र वाचलं आणि त्यात शेवटी प्रणिपात ही अक्षरे मला दाखवून त्यांनी आचार्यांना सादर प्रणाम केला नि म्हणाल्या "तुमचे आचार्य माझे गुरू आहेत!" या बाईंनी मराठी — रशियन शब्दकोश तयार केला असून, लौकरच रशियात अनेक लोक मराठी बोलताना दिसणार आहेत.

त्या दिवशी मी लेनिनग्राड विश्वविद्यालयात गेलो आणि मराठीचा अभ्यास करणाऱ्या सर्व विद्यार्थ्यांशी चर्चा केली. तेव्हा मला आचार्य अत्रे यांची 'चांगुणा' आणि ना. सी.

फडके यांची 'उद्याची बात' या दोन कादंबऱ्या एका टेबलावर दिसल्या. आणि मला हसू आले. मराठीतील ही दोन टोकं लेनिनग्राड नगरात एकत्र आली होती. मी कां हसलो याचा गर्भित अर्थ कुणालाच समजला नाही. मीही झाकली मूठ तशीच ठेवली.

लेनिनग्राड शहर मला शांत नि आनंदी वाटले. मॉस्कोची पळापळ तिथे दिसली नाही. परंतु नगराची रचना भव्य नि सुंदर होती. फुलांच्या ताटव्यापासून फूटपाथवरून पुस्तक वाचीत जाणारे तरुण-तरुणी पाहून थोडा हेवा वाटला. लेनिनग्राड शहरामधून वाहणाऱ्या नेव्हा नदीच्या काठानं अनेक चकरा मारून ज्या जहाजावर ऑक्टोबर क्रांतीचा प्रथम ध्वज उभारला ते जहाज पाहून आत्मा शांत झाला.

नंतर आम्ही त्या ऐतिहासिक विंडसर पॅलेसमध्ये मुरकंड दिली. ततियाना कातेनिना ह्या मजबरोबर होत्या. त्या मला प्रत्येक वस्तूचा अर्थ मराठीत समजावून सांगत होत्या. त्यांचे मराठी विद्यार्थी मजबरोबर हिंडत होते. त्यामुळे माझा मराठीचा गोतावळा वाढला होता.

केरेन्स्की सरकारला अटक झालेली खोली आणि प्रथम सोविएत स्थापन झालेले स्थळ पाहून आम्ही कॉ. लेनिन यांच्या खोलीत प्रवेश केला. तेव्हा मन खिन्न झाले. कारण इतकं दूर येऊन तो ऑक्टोबर क्रांतीचा पिता तेथे नव्हता. परंतु त्यांची ती खोली तशीच सजीव होती. ती खोली, खुर्ची, टेबल, टाक, दौत नि त्यांचा फोन ह्या सर्व वस्तू पाहिल्या, की कॉ. लेनिन आपल्या खोलीत विश्रांती घेत असल्याचा भास होतो आणि मन धावतच आतल्या खोलीत शिरते. परंतु तिथं कॉ. लेनिन दिसत नाहीत. त्यांचा तो पलंग एकटाच त्यांची वाट पाहत असल्याचे पाहून मन काळवंडते. डोळे भरून येतात नि कॉ. लेनिनची खोली पाहिली यातच समाधान मानावे लागते.

खरे म्हणजे, रशियन माणूस हा इतिहासप्रिय आहे. जुना इतिहास तो जतन करतो. नवा निर्माण करतो आणि नवा इतिहास डोळ्यात तेल घालून जपतो, याची मला तेथे प्रचीती आली.

लेनिनग्राड शहरापासून काही अंतरावर एक उद्यान आहे. त्याचे रशियन नाव मला आठवत नाही. मी त्याला 'शांतिउद्यान' म्हणत होतो. एकोणीसशे बेचाळीस साली नाझी आक्रमकांनी लेनिनग्राडला वेढा दिला, तेव्हा उपासमारीने आणि लढाईत जे हजारो नव्हे लाखो लोक मरण पावले त्यांचे ते एक महान स्मारक आहे. कडेवर मूल घेऊन एक स्त्री असून, समोर कॉ. लेनिन उभे आहेत. मागे दगडावर लेनिनग्राडसाठी मरणाऱ्या वीरांची नावे कोरली आहेत. फुलझाडाच्या ताटव्यात चार फूट उंचीचे चबुतरे उभे असून, त्यावर फक्त 'एकोणीसशे बेचाळीस' अशी अक्षरे दिसत आहेत आणि पहिल्याच प्रवेशद्वाराजवळ एक अग्निकुंड धगधगत आहे. ती आग आज कित्येक दिवस जळत असून, जगाच्या अंतापर्यंत जळणार आहे. ती आग म्हणजे महान लेनिनग्राडसाठी,

रशियन भूमिसाठी, समाजवादासाठी ज्यांनी प्राण अर्पण केले त्यांची स्मृती आहे.

त्या उद्यानात हजारो लोक फुले घेऊन येतात आणि त्या अग्निकुंडापुढे उभे राहून 'तुम्ही ज्याकरिता मेला, त्यासाठी आम्ही जगत आहोत,' असेच जणू म्हणत असल्याचा भास होतो.

कित्येक म्हातारी माणसं त्या अग्निकुंडासमोर उभी राहून छातीवर क्रुसाची खूण करताना मला दिसली. तिथे गेले की माणसाला थट्टामस्करी आठवत नाही. युद्धाची चीड, युद्धाचा द्वेष यात माणूस गुरफटून जातो. कारण लेनिनचे नाव धारण करणाऱ्या त्या नगराला नाझीचे पाय लागू नयेत म्हणून ज्या लाखोंनी प्राण अर्पण केले, त्यांचे ते महान स्मारक आहे, म्हणूनच ते उद्यान, ती आग डोळ्यापुढून हलत नाही. जी युद्धविरोधी आग आज रशियन मानवांच्या हृदयात अखंड जळत आहे, त्याचे ते उद्यान म्हणजे एक प्रतीकच आहे.

नंतर आम्ही लेनिनग्राडचे म्युझियम पाहिले. तिथं हजारो वर्षांच्या वस्तू सलामत आहेत. श्रीमती ततियाना कातेनिना या मला प्रत्येक वस्तूविषयी मराठीत समजावून सांगत होत्या. सम्राट चंद्रगुप्तापासून आजपर्यंतची सर्व भारतीय नाणी मला तेथे दिसली. खास मराठी तलवार नि पट्टा ही हत्यारं त्या ठिकाणी पाहून आश्चर्य वाटले. याच ठिकाणी टिपू सुलतान यांची एक तलवारही आहे.

याच नगरात मला कॉ. पी. ए. बारनिकोव भेटले. माझे दुभाषी म्हणून त्यांची योजना झाली होती. यांनी तुलशीरामायणाचा गद्यात रशियन अनुवाद केला असून, तो आता छापत आहे. ते हिंदीचे पंडितच आहे. ते माझे दुभाषे म्हणून जेव्हा माझ्याबरोबर निघाले, तेव्हा मला आनंद झाला. हे बारनिकोव सावलीसारखे माझ्या मागे असत. मी हिंदीत शब्द उच्चारताच त्याचा रशियन अनुवाद होई आणि आपण रशियन बोलत असल्याचा मला भास होई.

तारीख एकवीस रोजी स्टालिनग्राडला जाण्यासाठी तारीख वीस रोजी आम्ही मॉस्कोत दाखल झालो. तेव्हा कॉ. बारनिकोव हे माझ्या मागेच होते.

मॉस्कोत 'सोविएत स्काय' हॉटेलात शिरताना मला एक ओळखीचा गृहस्थ भेटला. त्याने मला अडवून विचारले :

"तुम्हांला रशियन येतं?"

"नाही." मी उत्तर दिले.

"मग भाषेची मोठी अडचण आहे," असे म्हणून त्याने माझी कीव केली आणि मी म्हणालो—

"मला भाषेची मुळीच अडचण नाही—"

माझ्या या बोलण्याने तो इसम चमकला. म्हणाला,

"तुम्हांला रशियन कळत नाही आणि भाषेची अडचणही नाही, याचा अर्थ– ?"
तेव्हा मी म्हणालो,

"माझ्याकडे दोन जिभा असून, त्यांपैकी एक हिंदी आहे नि दुसरी रशियन आहे. जी हिंदी जीभ आहे, ती माझ्याजवळ असून, रशियन जीभ मी कॉ. बारनिकोव यांच्याकडे दिली आहे-" हा माझा भयंकर खुलासा ऐकून तो इसम कावराबावरा झाला नि हसू लागला. रशियन माणूस विनोदप्रिय असल्याचे मला त्यावेळी कळून आले.

तारीख वीस रोजी मॉस्को पाहणे, लेखक संघाला भेट देणे नि रात्री एका जाहीर सभेला हजर राहणे एवढीच कामे होती. आम्ही मॉस्को पाहत पाहत शेवटी काही वस्तू खरेदी केल्या. मी काही खेळणी घेतली आणि एक कॅमेरा घेतला. टॅक्सी केली आणि बारनिकोवला घेऊन लेखक संघाकडे गेलो. दारात टॅक्सी सोडली. आणि त्या टॅक्सीतून माझा कॅमेरा पळाला हे मला कळले नाही. अर्ध्या तासानंतर मला उमजले की कॅमेरा नि खेळणी गेली. मग धावपळ झाली. परंतु सोविएत देशात टॅक्सीचे खास रेडिओ स्टेशन असून, बहुतेक टॅक्सीत रेडिओ, फोन असतो. आम्ही लगेच टॅक्सी रेडिओला फोन केला. तेव्हा उत्तर आले की, रात्री नऊ वाजता तो कॅमेरा 'सोविएत स्काय' हॉटेलवर येईल. आणि याच वेळी टॅक्सी ड्रायव्हर तो कॅमेरा घेऊन माझ्याकडे धावत आला. त्याला अजून रेडियोने कळवले नव्हते. तो कॅमेरा घेऊन मी सुटकेचा निःश्वास टाकला. माझ्या दृष्टीनं तो प्रकार मोठा नाट्यमय असाच होता. तो माझ्या मनावर कोरला गेला. रशियन माणूस यंत्राचा गुलाम नसून यंत्रच त्याच्या अधीन आहे.

आणि जेव्हा मी दुसऱ्या टॅक्सीतून मैत्रीभवनाकडे निघालो, तेव्हा टॅक्सी रेडिओ सांगत होता : "तवारीश–८०८३ भारतीय पाहुण्याचा कॅमेरा 'सोविएत स्काय' हॉटेलात पोचवा." त्या वेळी तो कॅमेरा माझ्या गळ्यात होता. आणि याच वेळी कॉ. बारनिकोव यांनी अनुवादित केलेले रामायण फरारी झाले होते. त्यामुळे बारनिकोव बैचेन होऊन टॅक्सीतून उडी मारण्याचा विचार करीत होते आणि भारतीय तुलसीरामायण मॉस्कोत बेपत्ता झालेले पाहून मी पोट धरून हसत होतो.

## ४. लाल ताऱ्याखाली

चौदा सप्टेंबर एकोणीसशे साठच्या सकाळपासूनच मॉस्को शहरात माझा फेरफटका सुरू झाला होता. आपला तो साहेबी पोषाख मी दुमडून कपाटात कोंबला होता. आणि सिल्कचा सदरा, पायजमा, कोल्हापुरी जरीच्या वहाणा, अशा देशी थाटात गॉर्की रोड या विशाल राजपथानं चालत होतो. समाजवादाचे यश नि मॉस्कोची माणसं कशी आहेत?

या दोन प्रश्नांची उत्तरं मी शोधीत होतो. भव्य राजमार्ग, रेखीव इमारती, माळेत मोती ओवल्याप्रमाणे रस्त्याच्या दुतर्फा उभी असलेली झाडं आणि तीही एका जातीची, एका वयाची आणि समान उंचीची. मध्ये फूटपाथ. त्यांच्या आत फुलझाडांचा सुंदर ताटवा. तोही मैलच्या मैल लांबीचा. हे सारे पाहून नि पल्लेदार, स्वच्छ, आरशासारखे रस्ते पाहून मॉस्कोचे वैभव त्या रस्त्यावर नम्र उभे असल्याचा भास झाला नि डोळे फुलपाखराने एखाद्या बागेत भिरभिरावे तसे नाचू लागले.

तेथे ठायी ठायी सिगारेटची राख टाकण्याची सोय आहे. पाहावे तिथे सुंदर कुंडी उभी असते नि ती कुंडीही मॉस्कोची शोभा वाढवते. आजूबाजूला सिगारेटचे थोटूक, जळकी काडी, यांपैकी काहींच दिसत नव्हते किंवा कागदाचा कपटा किंवा चिमूटभर धूळ तिथं मिळणे मुष्कील आहे. मी त्या वस्तू पाहण्याची खटपट करीत होतो नि त्याच मला सापडत नव्हत्या. कारण जळकी काडी त्या रस्त्यावर टाकायची नाही, असा मॉस्कोच्या माणसांनी पणच केला आहे. जी माणसं आपल्या राजमार्गावर इतकं प्रेम करतात ती आपल्या देशावर किती प्रेम करीत असतील, याची कल्पनाच करवत नाही!

ज्यानं दलितांचे साहित्य नि साहित्यिक निर्माण केले आणि जो सोविएत साहित्याचा पितामह मानला गेला त्या महान गॉर्कीचं नाव धारण करणारा तो गॉर्की पथ गॉर्कीइतकाच भव्य आणि निर्मळ दिसत आहे. आजही तो आपल्या मॉस्को नगरीची शोभा द्विगुणित करीत आहे.

रशियात कलावंताला किती मान आहे, याची तर तिथं पदोपदी प्रचीती येते. रशियन महान साहित्यिकांना रशियन लोकांनी अजरामर करून ठेवले आहे. कित्येक मार्गांना, चौकांना, कलावंतांची नावं दिली आहेत नि त्यांचे भव्य पुतळे उभे केले आहेत. त्यांचं साहित्य आणि इतिहास या दोन गोष्टी अगदी हातात हात घालून जागोजाग उभ्या आहेत. टॉलस्टॉय, पुष्कीन, गॉर्की, मायाकोवस्की, ही नावं सजीव झाली आहेत.

मॉस्को शहरात मला एक मोठा पेच पडला. आणि तो म्हणजे त्या माणसांची धावपळ. ही माणसं अशी पळतात का? ती सुंदर, नम्र आणि शहाणी माणसं सारखी पळत होती! धाव धावून रस्ते ओलांडीत होती. त्या पळण्यात कष्ट नव्हते. जबरी नव्हती. तर उत्साह ओसंडत होता. पण त्या पळण्याचं मला कारण कळत नव्हतं. म्हातारे, तरुण, मुलगे, मुली सारेच पळताना दिसत होते. आणि त्याचं कारण हुडकीत मी फिरत होतो.

मॉस्कोचे रस्ते ओलांडताना मीही मॉस्को नागरिकांच्याप्रमाणे धावू लागलो. आणि ते पाहून चाणाक्ष मंडळी गालात हसू लागली. परंतु पळताना माझी परिस्थिती नाजूक होत असे. कारण मॉस्कोत सर्व वाहने उजवीकडून चालतात. मला डावीकडून चालणे ठाऊक! त्यामुळे घोटाळा होत होता. परंतु गॉर्की मार्गावरच वाहतूक नियंत्रण करणारे पोलीस दोन्हीकडची वाहतूक बंद करून मला मार्ग देत. कारण मॉस्कोच्या

राजपथावर मी स्वर्गवासी होण्याचा संभव अधिक होता. शिवाय मी त्यांचा पाहुणा होतो.

काही खवचट मॉस्कोकरांनी ''तुम्ही का पळता?'' असा प्रश्न विचारला आणि मी खवचट उत्तर दिले, ''तुमची एखादी मोटार मोडेल म्हणून मी पळतोय!''

सतरा सप्टेंबरला आम्हांला भारतीय वकिलातीने पार्टी दिली. त्याच वेळी जागतिक युवक संघटनेची मॉस्कोत सभा होती. त्यामुळे अनेक देशांचे युवक त्या पार्टीला हजर होते. भारतीय वकिलातीने दखल घेतली आणि श्री. थान यांनी आमची विचारपूस केली तेव्हा बरे वाटले.

पहिल्याच दिवशी मॉस्कोत मला एक मित्रलाभ झाला. त्याचं नाव लिओनिद. हा उत्तम फोटोग्राफर आहे. सहा फूट उंची, गोरा रंग, सुदृढ देह, तरतरीत चेहरा, पाणीदार निळे डोळे. अंगात सुंदर कपडे, वर करड्या रंगाचा ओव्हरकोट, खांद्याला बॅटरी, गळ्यात कॅमेरा अशा घाटात लिओनिद मला भेटला नि त्याच क्षणी माझा मित्र झाला. आम्हा दोघांनाही पोटापुरतं इंग्रजी येत होतं. आणि इंग्रजीची वाट अडली की आम्ही कथकली पद्धतीच्या खुणा करून मार्ग काढीत होतो. जेव्हा आम्हांवर खुणा करायची पाळी येई, तेव्हा आम्ही मुक्याप्रमाणे खुणा करून स्वत:च हसत होतो.

मॉस्कोत मला जे मित्र मिळाले, त्यात फोटोग्राफर, मोटार ड्रायव्हर, बागेत काम करणारे, हॉटेलमधील मुली, लिफ्ट चालवणाऱ्या वृद्ध बाया आणि अशा या मित्रांकडूनच मला रशियन माणसांचा आत्मा समजला.

प्रथम मॉस्कोची माणसं पळतात का, या प्रश्नाचा निकाल लागला. त्यासाठी मी अनेक पळणारांच्या पाठी पळून, त्यांना अडवून, त्या पळण्याचे कारण विचारले. कित्येकांना समोर पाहून अडवले. अगदी सर्व वयाच्या व्यक्तींना रोखून आपला प्रश्न विचारला, ''तुम्ही पळता का?''

आणि त्या चाणाक्ष माणसांनी हसत उत्तर दिले. त्या उत्तरामधून एक अर्थ निष्पन्न झाला की —

''आम्हांला आमची सप्तवार्षिक योजना लवकर पूर्ण करायची आहे.''

हे कारण ऐकून मी चकितच झालो. ती सुंदर, नम्र, सभ्य माणसं विचारीही आहेत, हे मला कळून चुकलं. समाजवादाचे यश त्या जनतेच्या विचारात अगदी खोल आहे. तिथं प्रत्येक मानव आपलं पाऊल देशहितार्थ टाकीत आहे. त्याला भविष्याची आस लागली आहे. तो सुखासाठी, शांततेसाठी, एकही क्षण वाया दवडीत नाही. म्हणून नम्रता, सभ्यता, तिथे फुलाप्रमाणं फुलत आहे. सुखाचा सुगंध सर्वत्र दरवळत आहे.

या जनतेनं गेल्या चाळीस वर्षांत अपार त्याग केला आहे. रक्त, अश्रू नि घाम गाळून समाजवादाची प्रतिष्ठा वाढवली आहे नि ती राखली आहे ती जनता रणात रणपंडित आहे.

आक्रमकाच्या गुहेत शिरून त्याचा तिने चुराडा केला आहे. पण तो रणात. एरव्ही ती जनता शांतताप्रेमी आहे.

लिओनिदच्या खांद्यावर हात टाकून मी लाल चौकातून क्रेमलिनकडे जात होतो. मी तोंडात सिगारेट धरली होती, पण खिशात काडी नव्हती. म्हणून तशीच सिगारेट ओठात दाबून ढेंगा टाकीत होतो. पुढून एक गृहस्थ आला. त्यानं जवळ येताच फर्रकन काडी ओढून माझ्या सिगारेटला लावली. असं होईल, याची मला मुळीच कल्पना नव्हती.

''तुम्ही भारतीय?'' त्या गृहस्थानं विचारले. आणि त्याचे आभार मानून मी हो म्हणताच तो गळ्यात पडला, म्हणाला—

''तुमचे नेहरू कसे आहेत?''

''अगदी ठणठणीत.'' मी उत्तर दिलं, ''ते आज यूनोत बोलत आहेत—''

हे ऐकून तो हर्षभरित झाला. तो नेहरूंना धन्यवाद देत निघून गेला. सोविएत देश म्हणजे नेहरूंवर प्रेम करणारांचा देश आहे. तिथे नेहरूंविषयी नितांत आदर आहे.

लाल चौकाच्या वरच्या बाजूस एक जुने चर्च आहे. त्याची स्थिती खंबीर असून, ते लाल चौक आणि क्रेमलिन यांची शोभा वाढवीत आहे. कित्येक भाविक त्यात जातात. काही मंडळी त्या चर्चकडे पाहून आपल्या छातीवर क्रुसाच्या खुणा करताना मी पाहिली. यावरून तिथं भाविकांच्या भावना मुक्त आहेत.

मी चालत चालत लिओनिदला प्रश्न केला,

''तुमचं वय किती?''

''एकवीस-'' त्यांनी उत्तर दिलं.

''काम काय करता?''

''फोटो—'' असं म्हणून त्यानं कॅमेरा पुढे केला.

''वडील काय काम करतात?'' या माझ्या प्रश्नानं तो गंभीर झाला. हृदयात कळ उठावी तसा तो दिसू लागला. त्याच्या हसऱ्या निळ्या डोळ्यात विलक्षण गंभीर भाव तरळला. तो मोजक्या शब्दांत म्हणाला,

''सातेजी, माझे वडील सोविएत देशाचं रक्षण करता करता आघाडीवर मारले गेले—''

''गेल्या महायुद्धात?'' मी विचारले आणि त्यानं मानेनं होकार दिला. त्यावेळचा त्याचा तो चेहरा नि त्यावरचा तो भाव पाहून माझं अंतःकरण भरून आलं.

''तर मग तुम्ही वीरपुत्र आहात—'' मी उद्‌गारलो आणि लिओनिद हसला. वडील मारले गेले, तेव्हा माझा मित्र तीन वर्षांचा होता. आपला जन्मदाता कसा होता, हे त्याला ठाऊक नव्हते. आता वडिलांचा फोटो पाहून त्याला पितृदर्शन घडते.

''लग्न झालंय का?'' मी त्याची गंभीरता एकदम उडवून दिली आणि माझा हेतू

सफल झाला. स्वारी खुदकन हसून उत्तरली,

"लग्न झालं नाही, पण लौकरच होणार आहे—"

"म्हणजे निश्चित झालं आहे?"

"नक्की झालं आहे—" तो म्हणाला, "थोड्याच दिवसात मी चतुर्भुज होणार—"

"तुझी भावी पत्नी कशी आहे?" मी मुद्दाम विचारले आणि तो आनंदानं मोहरला. बोलू लागला, — "सातेजी, माझी पत्नी फार फार सुंदर आहे, तशीच ती गुणी आहे. माझं भाग्य थोर म्हणूनच ती मला मिळाली आहे..."

त्याच्या शब्दांतून निर्मल गंगा वाहत होती. कृत्रिमपणाचा लवलेश नव्हता. तो अंत:करणापासून आपल्या भावी पत्नीचं वर्णन करीत होता. त्यावरून त्याच्या मनाची मला कल्पना आली आणि तो बोलतच होता-

"तिच्याविषयी मी शब्दानं सांगू शकत नाही—"

"पुरे, पुष्कळ सांगून टाकलेस—" मी त्याची थट्टा केली. रशियन तरुणांत वैफल्य आलं असून, त्यांच्यात लैंगिक विकृती बोकाळली आहे, असा काही महाभाग आरोप करतात. त्याला लिओनिद लाल चौकात जणू उत्तरच देत होता.

"खरंच, तुझ्या भावी पत्नीवर तुझं प्रेम आहे?" हा माझा प्रश्न ऐकून पुन्हा तो गंभीर झाला आणि गप्पकन आपल्या हृदयावर हात ठेवून "होय" म्हणाला.

रशियन तरुण प्रेमाला फारच पवित्र मानतो. मंगल मानतो. त्याची साक्ष तो हृदयावर हात ठेवून देतो आणि दुसरी कसली शपथ हवी आहे? हृदय तेच सर्वात पवित्र असतं. हृदय हाच देव आहे रशियात.

"फोटोग्राफी करून तुमचा संसार चालणार का?" हा प्रश्न ऐकून तो हसत सुटला. माझी कीव करीत म्हणाला,

"इथं समाजसत्तावाद आहे नि त्यानं आम्हांला जगण्याची शाश्वती दिलेली आहे, हे तुम्ही विसरता सातेजी—"

शेवटी घात झालाच! आपलं अज्ञान उघड होऊ नये म्हणून मी फार काळजी घेत असता वरील प्रश्न विचारून चूक केली. पुनः तशी चूक करायची नाही, असा मी त्याच जागी निश्चय केला.

मॉस्कोत मी आपलं पहिलं भाषण मराठीत केलं. तेव्हा दोन दुभाषे माझ्या मागे उभे होते. मराठीचं इंग्रजी नि इंग्रजीचं रशियन होऊनच ते श्रोत्यांच्या कानात शिरणार होतं. शिवाय पुढं बसलेले श्रोतेही बडी मंडळी होती. मी मराठीत बोलणार हे ऐकून त्यांनाही आनंद झाला नि मी आरंभ केला.

''कदाचित मराठीत होणारे हे भाषण ऐकण्याची तुम्हांवर ही पहिलीच वेळ आली असावी. परंतु भारतात महाराष्ट्र हे एक राज्य आहे. त्या राज्यात साडेतीन कोटी लोक मराठी बोलतात नि ती माणसं तुमच्यासारखीच नेक, झुंजार आहेत. तुमचा अफानासी भारतात गेला होता, पण त्याचं पहिलं पाऊल माझ्या मराठी धरणीवर, महाराष्ट्र राज्यात, शिवाजी राजाच्या मातृभूमीत पडलं होतं – त्या राज्याच्या मराठीत मी बोलतोय...''

भाषण संपताच माझ्यावर कॅमेऱ्यांची मुरकंड पडली. याच गर्दीत मला एक प्रोफेसर एव्गेनी चेलिशेव भेटले. ते आता शिवाजीमहाराजांचं चरित्र रशियन भाषेत लिहीत आहेत. त्यासाठी त्यांनी महाराष्ट्राची एक सफर केली आहे. ते उत्तम हिंदी बोलतात. पुणे शहराच्या बऱ्याच गल्ल्या त्यांच्या ओळखीच्या आहेत. सदाशिव, शनिवार, शिवाजीनगर ही पुण्यातील नावं ते उच्चारू लागले, तेव्हा माझी पाचावर धारण बसली. जर या प्रोफेसर महाशयांनी मला जिलब्या मारुतीची खुशाली विचारली तर मी काय सांगू? या विचारानं माझा चेहरा एकदम पडला आणि मी विषयाला कलाटणी दिली. जेव्हा त्यांनी मला शिवाजी महाराजांविषयी काही प्रश्न विचारले, तेव्हा मी म. म. पोतदार, प्रा. न. र. फाटक, आचार्य अत्रे ही नावं पुढं करून स्वत:चा बचाव करून घेतला आणि त्याच वेळी मला कळून चुकले की हे मॉस्कोचे नागरिक विचारानं मुंबई, पुणे, दिल्ली या आपल्या शहरातच वावरत आहेत. त्यांनी लो. टिळक, पं. नेहरू यांची चरित्रं प्रकाशित केली असून, लौकरच शिवाजी महाराजांचं चरित्रही ते प्रकाशित करणार आहेत. टागोरसाहित्य तर सर्वत्र वाचलं जातं. रामायण, महाभारत या ग्रंथांचा पूर्वीच अनुवाद झाला आहे.

अशा मानवांत हिंडताना, त्यांच्याशी बोलताना, जो आनंद प्राप्त होतो, जो विनोद अवतरतो, तो अनुभवण्यासाठी मॉस्कोतच जावे आणि त्या लाल ताऱ्याखाली उभं राहून तो आनंद लुटावा. तसं भाग्य मला लाभलं. म्हणूनच मी त्या लाल ताऱ्याखाली उभा राहून तो आनंद अनुभवला.

## ५. बाकूकडे

स्टालिनग्राडकडे पाहून आम्ही अझरबैझानची राजधानी बाकू या शहराकडे निघालो होतो. सकाळी सात वाजता विमान उडालं होतं नि तब्बल दिवसभर ते आकाशातून भ्रमण करणार होते. मी खिडकीजवळ बसून धरणी पाहत होतो. परंतु ढगाच्या पडद्यातून तिचं दर्शन होत नव्हतं.

शिष्टमंडळाचे एक सभासद चतर्जी झोप काढीत होते. दुसरे पुष्कराज भट प्रभावीत

होऊन सोविएत देशावर चर्चा करीत होते. डॉ. दयालू आराम करीत होते. कॉ. बारनिकोव काहीतरी वाचत होते. मद्रासचे जेकब जीम उठून माझ्याशेजारी येऊन बसत म्हणाले,

"साठेजी, पालम विमानतळावर तुम्ही दिसला तेव्हा, हा माणूस मूर्ख असावा असा आमचा अंदाज होता. पण ती चूक होती, असं आता सिद्ध झालं आहे. कारण या देशात तुमचा गोतावळा मोठा असून, खरंच तुम्ही लेखक आहात यात शंका नाही. शिवाय तुमची भाषणंही अगदी फायरब्रँड होतात, त्यानं मला फार फार आनंद होतोय. परंतु माझं गिटार बेपत्ता होणार हे तुमचं भाकीत बरोबर नाही—"

मी म्हणालो, "हा सोविएत देश आहे. इथं अशक्य असं काहीच नाही. शिवाय हा माणसांचा देश आहे. जिथं रामायण फरारी होतं, तिथं गिटार काय करणार—"

हे ऐकून जेकबचा चेहरा पुन: उतरला. तो म्हणाला, "ठीक आहे. पण गिटार गेल्याचा आनंद तुम्हांला मिळणार नाही—" असं म्हणून त्यांनी आपल्या गिटारवर नजर टाकून नंतर डोळे झाकले.

आणि माझ्या डोळ्यांपुढं प्रसंग तरळू लागले. आपण रशियात काय काय पाहिलं, याची एक मालिकाच डोळ्यांपुढून सरकू लागली.

रशियात मी नवी सृष्टी पाहिली. एक नवा समाज पाहिला. समाजवादाच्या सावलीत वाढलेली मुलं नि फुलं पाहिली. जर मी सोविएत देश पाहिला नसता तर माझ्या जीवनात एक फार मोठी पोकळी राहून गेली असती.

मी अनेक शाळा-कॉलेजं नि विश्वविद्यालयं पाहिली. अनेक विद्यार्थ्यांशी बोललो. मला अनेक मास्तर भेटले. मी दवाखाने पाहिले आणि सामुदायिक शेतीही पाहिली. या दरम्यान मला अनेक अनुभव आले. एका शाळेत मला एक शिक्षक भेटला. तो दिसण्यात भोळा दिसला. त्याला मी सहज प्रश्न केला, "तुमच्या देशात निरक्षरतेचे प्रमाण किती आहे?"

तेव्हा तो भोळा दिसणारा शिक्षक गंभीर मुद्रा करून म्हणाला, "असेल की सात टक्के—"

"हे सात टक्के अडाणी का राहून गेले?" मी दुसरा सवाल टाकला आणि ते महाशय आपली गंभीरता वाढवून म्हणाले, "हे सात टक्के लोक अडाणी आहेत त्याचं कारण त्यांना चालता येत नाही. काही लोक पाळण्यात आराम करीत आहेत; तर काही आईच्या पोटात आहेत—"

हा जबर खुलासा ऐकून मी चाट पडलो नि एकदम हसत सुटलो, पण खरं म्हणजे माझी चूक झाली होती. याची जाणीव होताच माझा नूर पालटला. मी म्हणालो, "अहो, मी थट्टा केली—"

ते गृहस्थ नम्रपणे म्हणाले, "मग मी काय म्हणतोय, मीही थट्टा केली." मग आम्ही दोघेही खूप हसलो. अगदी मनमुराद हसलो.

रशियात शिक्षणाची नदीच वाहत आहे. आणि माणसांना विद्येचं वेड लागलं आहे. म्हणूनच प्रगतीनं त्यांचा पदर धरला आहे. फुलं, मुलं, फळं नि माणूस समान पातळीवर असून तिथं जीवनात मुळीच विसंगती उरलेली नाही.

मुक्त माणसं, स्वायत्त माणसं आणि कष्टाळू माणसं यांचा तो देश आहे. तिथं दारिद्र्य नावाला उरलेलं नाही. चाळीस वर्षांत समाजवादानं त्या देशात अमरापुरी निर्माण केली आहे. ती नवी दुनिया सारखी फुलत आहे. रोज तिला नवा बहर येत आहे.

घरातील घाण ऐन रस्त्यावर आणून ओतणारा त्या देशात एकही नाही. एवढेच नव्हे तर रस्ते म्हणजे आपले वैभव समजून त्यावर जळकी काडी देखील ते लोक टाकीत नाहीत. देशातील प्रत्यक वस्तू त्यांच्या मालकीची आहे. म्हणूनच ते तिची काळजी घेत असतात. मॉस्कोतील गॉर्की मार्गावर घाण करणे म्हणजे देशाची अप्रतिष्ठा करण्याचे पाप समजले जाते. स्टालिनग्राड येथील स्मारकाविषयी अपउच्चार काढणे त्यांना रुचत नाही. कॉ. लेनिन आणि स्टालिन ही नावं त्यांना फार फार प्रिय आहेत. ते त्यांचे वीरपुरुष आहेत. लेनिन हे नाव ते फार जपून उच्चारतात.

मी जर रशियन प्रगतीचे आकडे जमवले असते तर मला वाटते, एक डोंगरच उभा झाला असता. म्हणून आकड्यांची वाट धरली नाही. फक्त पाहत होतो. जपून बोलत होतो. मी समाजवादाचं यश पाहत होतो नि अपयशही हुडकीत होतो. ऐश्वर्याबरोबर दारिद्र्यही मी शोधीत होतो. परंतु मला ते दारिद्र्य दिसत नव्हते. दारिद्र्य हे दडत नसतं.

एखादी लबाड सत्ता डोंगराएवढे सत्य दडवू शकेल, परंतु तिला दारिद्र्य हे मुळीच दडवता येणार नाही, असं माझं मत आहे नि ते खरे आहे; असा माझा दावा आहे.

कारण दारिद्र्य हे फार क्रूर असते नि ते नग्न असते. त्याच्या खुणा माणसाच्या मनावर, हृदयावर नि चेहऱ्यावर शुद्ध उमटलेल्या दिसतात. त्या दडणे शक्यच नाही. शिवाय दारिद्र्याच्या त्या खुणा माणसाच्या वस्त्रावर उमटलेल्या असतात. त्या म्हणजे कपड्यावरची जुनी ठिगळं नि फाटक्या कापडांना घातलेले टाके ह्या होत. मला वाटते, या खुणा कुणीच दडवू शकणार नाही.

मी रशियात या खुणा पाहण्याची पराकाष्ठा करीत होतो. परंतु अखेरपर्यंत मला ठिगळं लवलेले कापड कुणाच्या अंगात दिसले नाही. म्हणूनच मी निर्भयपणे सांगू शकतो की, सोविएत संघराज्यात दारिद्र्याचे नावही उरलेले नाही. महान ऑक्टोबर क्रांतीनं तो क्रूर शब्दच तिथं जाळून टाकला आहे. म्हणूनच त्यांच्या प्रगतीची भरारी गगनाला भिडत आहे.

मी पुतळे, शाळा व अनेक बागा पाहिल्या. मला सर्वत्र शिक्षण दिसले. जागोजाग जे पुतळे उभे आहेत, ते सुद्धा एक प्रकारे शिक्षणच देत आहेत. निकामी वस्तूंचे तिथे विनाकारण प्रदर्शन केलं जात नाही, असंच माझं मत झाले. त्या देशात प्रत्येक वस्तू

म्हणजे जीवनाचा अलंकार असते.

बाकूकडे निघालेले आमचे विमान जेव्हा कास्पीयन समुद्रावर आलं, तेव्हा मी खाली पाहिलं. सारी धरणी हिरवी असावी तसं दृश्य दिसलं. आम्ही कास्पीयन समुद्र ओलांडला आणि बाकू आल्याची वर्दी मिळाली. पट्टा लावा, अशी लाल पाटी दिसू लागली. तो संपूर्ण दिवस आम्ही विमानात म्हणजे आकाशात काढला होता. अंतराळातील अखंड दाबानं डोकी सुन्न झाली होती आणि भलताच थकवा आला होता. केव्हा एकदा या विमानातून बाहेर पडतो, असं सर्वांनाच झाले होते. अगदी कंटाळा आला होता.

विमान उतरताच आम्ही मुरकंड देऊन बाहेर पडलो. त्यावेळी आझरबैझानी मित्र फुलं घेऊन स्वागतासाठी आले होते. त्यांत बडी मंडळी, वर्तमानपत्र प्रतिनिधी, रेडिओ, टेलिव्हिजन आणि फोटोग्राफर यांनी नुसती एकच गर्दी केली होती. सर्वत्र एकच गडबड उठली आणि या गडबडीत मद्रासचे जेकब आपलं गिटार विसरून मोटारीत बसले. बाकू शहरापर्यंत गिटार गेल्याचे कुणाच्याच लक्षात आले नाही.

आणि जेव्हा गिटार गेले ही गोष्ट जेकबला समजली, तेव्हा तो भलताच दुःखी झाला. परंतु त्याला जे दुःख झाले ते गिटार गेले म्हणून नव्हे, तर माझं भाकीत खरे ठरले म्हणून. तो झाकली मूठ झाकून गप्प बसला. त्यानं गिटारचं नावच काढलं नाही नि काढले तेव्हा मला कळू नये, याची खबरदारी घेऊनच हालचाल केली.

मग गिटारची शोधाशोध सुरू झाली. विमानतळाकडे मोटारी पळाल्या. फोन केले. तेव्हा ते गिटार घेऊन ते विमान मॉस्कोकडे दूर गेले होते.

दोन दिवसांत गिटार परत बाकूला आलं तेव्हा जेकबला आनंद झाला आणि सोविएत संघराज्याच्या योजनाबद्ध व्यवहाराचे मला आश्चर्य वाटले. या दरम्यान कॅमेरा, पेन, रामायण नि गिटार या वस्तू हरवल्या आणि परत सापडल्या. यावरून सोविएत देशातील माणसं किती व्यवहारदक्ष आहेत, याची कल्पना आली.

आझरबैझानचे वातावरण, रीतीरिवाज किंचित जवळजवळचे भासले. काही शब्द पूर्वी ऐकल्यासारखे वाटले. आणि आपण आपल्या भारताच्या समीप आहोत असा भास झाला.हे आझरबैझान सोविएत संघराज्यातील पंधरा घटक राष्ट्रांपैकी एक असून ते आशिया खंडातील एक मुस्लिम राष्ट्र आहे. परंतु समाजवादानं, ऑक्टोबर क्रांतीनं त्याचे जीवनच बदलून टाकले आहे. म्हणजे आझरबैझान आज ऐश्वर्याच्या कळसावर आहे. इथं लेनिनला तर आपल्या सोविएत संघराज्याचा नि ऑक्टोबर क्रांतीचा पितामह मानतात आणि कॉ. किरोव यांचेवर हे लोक फार फार प्रेम करतात. कारण त्यांच्याच खटपटीनं पहिला ट्रॅक्टर आझरबैझानमध्ये आला आणि या राष्ट्राच्या प्रगतीला आरंभ झाला. कॉ. किरोवबद्दल या लोकांत फार फार आदर आहे.

आज तिथं प्रत्येक माणूस मुक्त नि स्वतंत्र आहे. तो 'हम आझाद हैं' असं गर्वानं

सांगतो आणि त्याचा तो गर्व रास्त आहे.

बाकू विमानतळावर पाय ठेवताच मला हमीदसाहेब भेटले नि लगेच माझे मित्र झाले. अठरा वर्षांपूर्वी मी स्टालिनग्राडच्या संग्रामावर पोवाडा लिहिला असून, मी कामगार आहे या दोन गोष्टींमुळे त्यांचा माझ्यावर जीव जडला आणि ते मला 'शाहीरे अझिज' अशी हाक मारू लागले. ही त्यांची हाक मी जन्मात कधीही विसरू शकत नाही. कारण त्यांच्या हाकेत जगातील सर्वश्रेष्ठ नि मंगल भावना सामावली होती.

## ६. संपन्न बाकू

सोविएत संघराज्यात बाकू शहराचा चौथा क्रमांक आहे. पहिले मॉस्को, दुसरे लेनिनग्राड, तिसरे खार्कोव नि चौथे बाकू असा तो क्रमांक लागतो. आम्ही पोहोचलो त्याच रात्री नऊ वाजता हमीदसाहेब (माझे अझिझ) येऊन म्हणाले, "चला थोडं बाकू पाहून येऊ—"

बाकूतील आल्हाददायी वातावरणात आमचा थकवा केव्हाच दूर झाला होता. आम्ही लगेच निघालो. बाकू शहराच्या पुढे कास्पियन समुद्र नि मागे एक उंच टेकडी आहे आणि त्या टेकडीवर कॉ. किरोव यांचा भव्य पुतळा समुद्राकडे हात रोखून उभा आहे. जणू ते भाषण करीत आहेत की, — आझरबैझान, ह्या कास्पियन समुद्रात तेलरूपी अपार संपत्ती दडली ती बाहेर काढा—

त्या पुतळ्याच्या पायाजवळून संपूर्ण बाकू नगरी दिसते. ते पाहून असं वाटते की, आकाशातील इंद्रधनुष्य मानवानं वाकवून जमिनीवर अंथरले असून, त्याचंच नाव बाकू ठेवले आहे. इतकं ते शहर अप्रतिम, सुंदर दिसते नि मन थक्क होऊन जाते.

परत फिरताना हमीदसाहेबांनी मला विचारले, "शाहीरे अझिझ, कसं दिसतंय बाकू— ?"

"तुम्ही श्रीमंत आहात!" मी उत्तर दिले, पण ते त्यांना रुचलं नाही. ते नाराज होऊन म्हणाले,

"तुम्ही आम्हांला श्रीमंत म्हणू नका. तुम्ही आम्हाला आझाद म्हणा!"

"तुम्ही आझाद आहात म्हणजेच तुम्ही वैभवशाली आहात नि म्हणूनच श्रीमंत आहात." या माझ्या खुलाशानं ते हसले आणि ऐकू लागले. मी म्हणालो, "मॉस्को पाहावं संध्याकाळी, लेनिनग्राड पाहावं दिवसा, स्टालिनग्राडचा मर्दपणा युद्धात आणि बाकूचे सौंदर्य रात्री इथं उभं राहून पाहावं, असं माझं मत झालं—"

या माझ्या मतावर हमीदसाहेब फार फार खूष झाले. आझरबैझान हा कवीचा देश

असल्यामुळे माझे वरील विधान त्यांना इतकं आवडलं की, हमीदसाहेबांनी तर ते लगेच पाठ केले.

आणि ते विधान दुसऱ्या दिवशी रेडिओवर माझं मलाच ऐकू आलं.

बाकू या शब्दाचा अर्थ अग्नी असा होतो, असं मला सांगण्यात आले. तेव्हा ही आग इतकी सुंदर कशी याचं मला आश्चर्य वाटलं. बाकू शहराच्या आसपास हजारो तेलाच्या विहिरी आहेत. तेल म्हणजे आग, यावरून कदाचित त्या शहराल आग (बाकू) असं नाव दिलं असावं. बाकूच्या परिसरात अनेक, नव्हे हजारो तेल विहिरी आहेत, त्यापैकी काहींचं वय शंभर वर्षांचं, तर काहींचं दहा वर्षांचं आहे. त्यापैकी काही अडीच मैल खोल आहेत.

जमिनीच्या पोटातून अपरंपार तेल काढून हा देश संपन्न होत आहे. जमिनीतून तेल काढण्यात या देशाची माणसं कुशल आहेत.

आता तर त्यांनी सागरावर चढाई आरंभली आहे. निसर्गाशी दारुण संघर्ष सुरू केला आहे. कास्पियन सागरावर कित्येक मैल आत जाऊन त्यांनी सागरावर एक लहानसं शहरच वसवलं आहे. त्या शहरापर्यंत सागरावरून मार्ग काढला आहे नि त्या मार्गानं त्या नगराचे जगाशी संबंध जोडून एक नवे आश्चर्य प्रस्थापित केले आहे.

त्या कास्पियन सागरावरील शहरात राहणारे लोक पाण्याचा अंत घेऊन मग त्या सागराखाली बेरंगी मारून सागरतळाखालचे तेल काढीत आहेत. आणि ते तेल सागरातून निघून सरळ एका नळानं योग्य स्थळी पोहोचत असते. परंतु या कार्यात या लोकांना निसर्गाशी भयंकर असा संघर्ष करावा लागत असून, कित्येक वेळी प्राणही द्यावे लागतात आणि ती माणसं कसलीच कुचराई करीत नाहीत. खवळलेल्या कास्पियन समुद्राचा सर्व साधनानिशी प्रतिकार करून निसर्गावरचे आपले प्रभुत्व कायम राखतात. म्हणूनच या आझरबैझान लोकांचे जीवन सुखी नि समृद्ध झाले आहे. शिक्षण तर त्यांचा स्थायीभाव झाला.

बाकूत आम्ही एका मशिदीत शिरलो. तेव्हा काझीसाहेबांनी आमचं स्वागत केलं. सोविएत देशात धार्मिक विधीला बंदी असते, असा जो खोटा प्रचार रूढ आहे, त्याला बाकूत उत्तर मिळते. त्या ठिकाणी कित्येक आझरबैझानी येऊन नमाज पढून जातात. निघते वेळी काझीसाहेबांनी भारतीय मुसलमानांना अभिवादन सांगा, अशी विनंती केली. तिचा सादर स्वीकार करून आम्ही निरोप घेतला.

त्याच दिवशी आम्ही आझरबैझान सुप्रीम सोविएतच्या अध्यक्षांची भेट घेतली. त्या आलिशान इमारतीत प्रवेश करताच एका रेड आर्मीनं खाडकन सॅल्यूट ठोकला तसा मी हसलो. कारण माझं मला नवल वाटलं. कुठं मी आणि कुठं आझरबैझान.

हे सुप्रीम सोविएतचे अध्यक्ष अत्यंत प्रेमळ, नम्र नि विद्वान आहेत. त्यांनी अगदी

हृदयापासून आमचं स्वागत केलं. मग बोलणं सुरू झाले.

माझ्या सोविएत दौऱ्यात मी कुणाला कसलाच प्रश्न विचारीत नसे. मात्र रशियन माणसाचा प्रत्येक शब्द मी टिपून घेत होतो. आमच्या लखनौच्या पुष्कराजने त्यांना एक प्रश्न विचारला की, 'तुम्ही आझरबैझानचे अध्यक्ष, तुम्ही सोविएत संघराज्याच्या अध्यक्षांना कोणत्या भाषेत पत्र लिहिता?' हा प्रश्न ऐकून हसून ते म्हणाले,

''मला रशियन आणि आझरबैझान या दोन्हीही भाषा येतात नि आमच्या अध्यक्षांना आझरबैझान भाषा येत नसेल, तर मग मी त्यांना आझरबैझान भाषेत पत्र लिहून त्यांचं काम सोपं होईल का अवघड होईल– ? रशियन माणूस आपलं काम आपण होऊन अवघड करीत नाही.''

दुसऱ्या दिवशी बाकूपासून एकशे ऐंशी किलोमीटरवर असलेले एक सामुदायिक शेत पाहायला निघालो. मार्गात आम्ही अनेक खेडी पाहिली. आता सोविएत संघराज्यात अघटित चमत्कार झाला असून, खेडे नि शहर यांत कसलेच अंतर उरलेले नाही. खेडी आता शहराचा दर्जा घेऊन बसली आहेत. ती लहान असतात नि तेथील लोक शेतावर काम करतात. म्हणूनच त्यांना खेडं म्हणावं लागत आहे एवढंच. आमची मोटर एका नदीच्या पात्रात उतरली होती. ती नदी घनदाट झाडीतून गेली होती आणि पाणी वाळूबरोबर वाहत होतं. मध्ये वाळूचा एक ढीग होता नि एक माणूस त्या ढिगावर उताणा पडला होता. त्याचा पोषाख अगदीच मळकट दिसत होता. त्याला पाहताच माझी खात्री झाली की, हा एक दरिद्री नि दुर्दैवी असून, मरून पडला आहे.

मी लगेच मोटर थांबवून बाहेर पडलो. समाजवादी देशात तो मला पहिला दरिद्री नि बेवारसी दिसला. मी हमीदसाहेबांना त्याचं कारण विचारताच सर्वच मोटारीबाहेर पडून त्या इसमाला हाका मारू लागले, पण तो हूं की चूं करीत नव्हता. त्याच्या सभोवती पाण्याची धार वाहत असल्यानं त्याच्यापर्यंत जाता येत नव्हतं आणि मी तेथून हलत नव्हतो. मग मोठी आरडाओरड केली, पण यश आलं नाही. हा नक्कीच मेला असावा, अशी माझी खात्री झाली.

मग शेवटचा उपाय सुरू झाला. आमच्या बरोबरीचे सर्व पाहुणे त्या उताण्याला वाळूचे खडे मारू लागले. म्हणजे एक प्रकारे त्याच्यावर दगडफेकीला आरंभ झाला. परंतु कुणाचाच दगड त्याला लागत नव्हता नि तो गप्प पडला होता.

अखेर कुवाच्या मेयरना यश आलं. नि त्यांचा दगड जाऊन नेमका त्याच्या पोटावर बसला. तसा तो चटकन उठला आणि आपण बेवारशी मेलो नाही, याची त्यानं ग्वाही दिली आणि माझा एक भ्रम दूर झाला.

'तू का पडला आहेस– ?'' मेयरनी विचारले, तेव्हा उजव्या हाताचा अंगठा तोंडाला लावून तो म्हणाला, ''सकाळीच थोडी घेतली आहे नि ऊन पडलं आहे म्हणून निवांत

पडून आराम करतोय –"

हे ऐकून तो भयंकर आराम पाहून मी भानावर आलो. त्या आराम करणाराच्या अंगावरची मळकी कापडं भलतीच महागडी आहेत, हे मला नंतर कळून आले.

तो सामुदायिक मळा पाहून झाल्यानंतर मी एका दुमजली घरात शिरलो. माझ्या मागून सर्वच मंडळी आली. ते एका शेतकऱ्याचे घर होते. तिथं दहा माणसं राहत होती. त्यांपैकी पाच शेतावर काम करीत होती नि पाच मुलं शाळा शिकत होती. या घरात मला दोन रेडिओ, एक टेलिव्हिजन नि एक टेलिफोन दिसला. प्रत्येकाची निराळी खोली, पलंग, गाद्या, आरसे वगैरे पाहून मला आमच्या इकडच्या जुन्या सरदाराच्या ऐश्वर्याची आठवण झाली.

रशियात मला सर्वत्र असाच अनुभव आला. कुठंही जीवनात विसंगती दिसली नाही. सर्वत्र जीवन एका पातळीवर उभं आहे आणि सारखं फुलत आहे. या दौऱ्यात मी विमान, रेल्वे, मोटार आणि पाय या सर्व साधनांचा वापर केला आणि तो महान देश पाहिला. मला आनंदी, स्वच्छंदी, नम्र नि शहाणी माणसं भेटली. ताश्कंद ते बाकू हे अंतर फार मोठे आहे नि ते अंतर कापीत मी जात होतो. परंतु मला एकही दुर्बल, निकामी, भिकारी, उपाशी, आळशी असा माणूस दिसला नाही. याचं कारण समाजवाद.

कॉ. लेनिननं तिथं समाजवादी दुनिया निर्माण केली आहे. ती मला स्वप्नसृष्टीसारखी भासत होती नि स्वप्नसृष्टीत माझे भ्रमण सुरू होते.

रशियन माणूस भरपूर खातो आणि फार चवीनं उशीर खातो. भरपूर पितो. तिथं पाणी पीत नाहीत. तो भरपूर आराम करतो. कारण तो भरपूर काम करतो. काम करणे हे त्याचे आद्य कर्तव्य असतं. श्रम हाच तिथं धर्म आहे नि रशियन मानव तो धर्म काटेकोर पाळतो आणि त्यातच त्याच्या प्रगतीचे गमक आहे.

तो जितकं प्रेम कारखान्यावर करतो अगदी तितकंच प्रेम तो आपल्या कलेवर करतो. रशियन माणूस भलताच कलाप्रिय आहे, याची प्रचीती मला मॉस्कोतील प्रख्यात बोल्शीव्ही थिएटरात आली. तिथं मी 'दगडाचे फूल' हा ऑपेरा पाहिला. त्यावेळी थिएटरात एकही जागा रिकामी नव्हती. प्रेक्षकांनी ते नाट्यगृह भरलं होतं. नि त्यांच्यासमोर दोनशे कलावंत एकाचवेळी रंगमंचावर सूत्रबद्ध काम करीत होते. दोनशे वादकांचा ताफा संगीताचे स्वर निर्माण करून वातावरण भारून काढीत होते. संगीतानं तिथं इंद्रधनुष्य निर्माण केले होते. प्रत्येक अंकाला संगीत दिग्दर्शकाचे प्रदीर्घ टाळ्यानं स्वागत होत होतं. रशियन माणूस नुसतेच कष्ट करीत नसून कलेची कदरही करतो. याचाच अर्थ त्याचे जीवन सर्व दृष्टीनं सफल नि समृद्ध झाले आहे.

मॉस्को, लेनिनग्राड, स्टालिनग्राड व बाकू या शहरात मला मुळीच विसंगती दिसली नाही. मात्र वैशिष्ट्यपूर्ण रचना, निराळी नि आगळी वाटली.

तीन दिवस बाकू पाहून नंतर त्या महान बाकूचा, आझरबैझान राजधानीचा निरोप घेतला. तेव्हा पाव्हणे (अझिझ) हमीदसाहेब मला सोडत नव्हते. ते गंभीर नि दुःखी दिसत होते नि मी मनात दग्ध झालो होतो.

## ७. कलेचे माहेर

बरोबर सात वाजता आमचे विमान ताश्कंद विमानतळावर उतरले, तेव्हा सूर्य मावळत होता नि ताश्कंदवासी मित्रांनी विमानतळावर गर्दी केली होती. अनेक तरुण-तरुणी फुलांचे कवळे घेऊन आमच्य स्वागतासाठी हजर होते.

त्या गर्दीत कॉ. नबी मोहमद हे पुढं होते. ते दिसण्यात एखाद्या सिनेनटासारखे दिसत होते, पण ते सिनेनट नव्हते. एक फार मोठे साहित्यिक आहेत. त्यांना हिंदी, उर्दू, अरबी, फ्रेंच, जर्मन, रशियन अशा अनेक भाषा येतात. नुकताच त्यांनी सरदार जाफरी या भारतीय उर्दू कवीच्या काव्याचा उझबेकी भाषेत अनुवाद केला असून, भारत-रशिया मैत्रीसंघाचे ते सरचिटणीस आहेत. त्यांनी आमचे स्वागत केले नि त्याच वेळी त्यांची व माझी दोस्ती झाली.

हे उझबेकीस्थान पूर्वी रखरखीत वाळवंट म्हणून प्रसिद्ध होते. रशियात महान समाजसत्तावादी क्रांती झाल्यानंतर तब्बल सात वर्षांनी ते सोविएत संघराज्यात सामील झाले आणि मगच त्याच्या प्रगतीचे शकट भरधाव निघाले. मग त्याच्या गतीला सीमाच उरली नाही. वैराण वाळवंटावर नंदनवन बहरू लागले आणि श्रमजीवी मानवाच्या श्रमानं वाळूवर सोनं पिकू लागलं.

आज उझबेकीस्थानची उन्नती पाहून माणूस तोंडात बोटं घालतो. पूर्वी इथं बुरखा पद्धती भयंकर होती. स्त्रियांना बुरखा घ्यावा लागत होता. पण आज तिथं एकही बुरखा दिसत नाही. उलट सर्व महत्त्वाच्या जागी स्त्रियाच असल्याचे दिसून येते. याचे एकच उदाहरण म्हणजे उझबेकीस्थान या घटक राष्ट्राच्या अध्यक्षपदावर एक स्त्री आज विराजमान आहे आणि एकूण एक माणूस तेथे साक्षर आहे. जिथं जिथं मी गेलो, तिथं तिथं मला सोविएत देशाच्या प्रगतीबरोबर सोविएत कलेचंही दर्शन झालं. त्या जनतेला कलेचे तर वेड आहे!

आपल्याकडे काही जागी वजनाची यंत्रं दिसतात तशी यंत्रं मी मॉस्कोत पाहिली. परंतु ती वजनाऐवजी दोन रुबल तोंडात टाकताच प्यालाभर थंड सरबत देतात. हे सांगण्याचे कारण एवढेच की, रशियात यंत्रं माणसाची अगदी पाहुण्याप्रमाणे सेवा करतात. सरबत देणाऱ्या यंत्रापासून दिगंतराचा भेद करणाऱ्या रॉकेटपर्यंत त्यांनी मारलेली दौड सर्वश्रुत आहे. मी त्यांचे वर गेलेले रॉकेट पाहिले नाही. मात्र जे वर जाऊन परत आले आहे,

ते मला दिसले. पण तेही लगेच मी विसरून गेलो. आणि सोविएत कला, जीवन पाहण्यात दंग झालो. मॉस्कोत मी बोलशॉय थिएटरात 'दगडाचे फूल' हे नृत्यनाट्य पाहिले. पहिल्या झपाट्यात मी ते नाट्यगृह पाहून मंत्रमुग्ध झालो. त्याची ती भव्य रचना, त्या पितळी रंगाच्या गॅलऱ्या नि समोरचे प्रचंड स्टेज, लाल मखमली खुर्च्या हे सर्व काही अप्रतिम आहे. तशीच त्या रंगभूमीची म्हणजे त्या नाट्यगृहाची प्रतिष्ठाही थोर आहे.

शेकडो वादक संगीताचे इंद्रधनुष्य निर्माण करीत होते. आणि त्या नादावर शेकडो कलावंत आपल्या कलेचा सुंदर आविष्कार करीत होते. एकही कलावंत इकडे का तिकडे होत नव्हता की त्यांचे पाऊल चुकत नव्हते. एक तरुण मुलगी तर पायाच्या अंगठ्यावर भोवऱ्याप्रमाणे गरगर फिरत होती. रशियन जनता आपल्या कलावंतांचे किती कौतुक करते हेही मला दिसले. अंक संपताच दीर्घ टाळ्यांचा गजर होई. मग सर्व कलावंतांना प्रेक्षकांसमोर यावे लागे आणि ते आले की पुन: टाळ्यांचा वेग वाढे. याला म्हणतात सहर्ष कौतुक.

मॉस्कोत मी दुसरं एक नाटक पाहिलं. ते नाटक सर्व लहान मुलांनी लहान मुलांसाठी केलं होतं. ते थिएटरच लहान मुलांचं असून, तिथं नियमानं लहान मुलांसाठी नाटकं खेळली जातात. आणि नवल असं की, तिथं छोट्या प्रेक्षकांची तोबा गर्दी असते. तिकिटासाठी त्यांना रांग लावावी लागते. त्या सर्वांचे निरनिराळे आकार, रंगीबेरंगी पोशाख नि सर्वांची ती धावपळ पाहून मी तर थक्कच झालो!

रशियात सर्वत्र सिनेमा-नाटक यांच्या प्रयोगापूर्वी कर्कश घंटा वाजत नाही. प्रयोगाची वेळ झाली की, सर्व दिवे पुन: पुन: विझून पेटतात आणि मग बाहेर गेलेले प्रेक्षक येऊन आपापल्या जागेवर बसतात.

लेनिनग्राड येथे मी एक सिनेमा पहिला. उशिरा आल्यामुळे मला अगदी पुढील रांगेत जागा मिळाली होती. चित्रपट सुरू होताच सारं थिएटर मोटारीवर बसून चालू लागल्याचा आभास निर्माण झाला. सर्वांच्या पुढं मी असल्यानं आपण सर्वांपुढे कुठे तरी जात आहोत, असं मला वाटू लागलं. मी हळूच आजूबाजूला पाहू लागलो. आलं आलं म्हणता एक मोठं कारंजं जवळ आलं. त्याच्या पाण्याचे मोठे फवारे उडत होते. त्या फवाऱ्यांजवळ जाताच मी पाणी अंगावर येईल म्हणून अंग चोरून खाली वाकलो व आजूबाजूचे सर्व प्रेक्षक हसले. मी विरमून इकडे तिकडे पाहिले नि पुढे कॉ. लेनिनचा एक भव्य पुतळा आमच्याकडे आला आणि लगेच कॉ. लेनिन भाषण करू लागले. त्यांनी तो आपला ऐतिहासिक उंचावलेला हात अधिकच उंचावला नि महान ऑक्टोबर क्रांतीला प्रारंभ झाला. क्रांतिकारकांनी पहिला दरवाजा पाडून आत प्रवेश केला. या चित्रपटाचं तंत्रच मोठं विलक्षण होतं. ते प्रेक्षकांना सर्वत्र हिंडवत होते. कधी रेल्वेनं तर कधी विमानानं असं आम्ही रशियाभर हिंडत आहोत, असं वाटत होतं.

ताश्कंद येथे उतरलो त्याच दिवशी मला 'दिलाराम' हे सुंदर नाटक पाहायला मिळाले. याही वेळी आम्ही उशिरा थिएटरवर पोहोचलो. तेव्हा नाटक सुरू झालं होतं. आणि एकही तिकीट शिल्लक नव्हतं. आम्ही हिरमुसून उगीचच इकडे तिकडे पाहू लागलो. आणि याच वेळी भारतीय पाहुणे बाहेर आले असून, त्यांना तिकीट नाही, अशी बातमी आतील प्रेक्षकांना समजली. तसे आठ प्रेक्षक बसलेले उठून बाहेर आले. व त्यांनी आपली तिकिटे आम्हांला देऊन ते निघून गेले. मग आम्ही त्यांच्या जागेवर जाऊन बसलो. पाहुण्यांचा मान राखण्याची उदात्त भावना मला नवीन वाटली. केवढं हे मोठेपण नि केवढी ही थोर समज! आम्ही आपल्या पाहुण्यांच्या जागेवर बसून ते नाटक पाहत होतो. ते 'दिलाराम' नाटक रंगभूमीवर आणण्यासाठी सरकारने लाखो रुबल खर्च केले होते, असं मला कां. नबींनी सांगितलं. एका नाटकासाठी सरकार लाखो रुबल खर्च करते, हे मी नवीनच ऐकले आणि लाखो रुबल खर्चून निर्माण केलेले नाटक कसे असेल म्हणून अगदी बारीक नजरेनं मी त्याचं निरीक्षण करू लागलो. पहिल्याच प्रवेशात मला कळून आले की, या समाजवादी देशात रंगभूमी वैभवाच्या शिखरावर उभी आहे. त्या रंगभूमीवर एकाच वेळी अनेक माणसे दिसत होती. कधी जुन्या काळातील मोठा बाजार भरत होता, तर कधी फुलझाडांचे ताटवेच्या ताटवे आम्ही पाहत होतो. भव्य राजवाडे, उंच गोपुरं, भयाण तुरुंग, मोठमोठे साखळदंड व धिप्पाड सैनिक हे सारं पाहून मी तर स्वत:लाच विसरलो.

त्या नाटकाची कथा अगदी साधी होती. एका गरीब मुलीचं एका चित्रकारावर प्रेम असतं. एकदा बेहराम त्या मुलीला पाहतो आणि जबरदस्तीनं नेऊन तिला राणी करतो. मग तो चित्रकार वेड्यासारखा आपल्या प्रेयसीला शोधीत राजधानीत येतो. एके ठिकाणी बाजारात ती राणी पालखीत बसून येते नि त्या दोघांची भेट होते. पुन: त्यांची दग्ध मनं हर्षभरित होतात. परंतु लौकरच ती गोष्ट राजाला समजते आणि राजा त्या चित्रकाराला तुरुंगात टाकतो. पुढे ती मुलगी आपल्या प्रियकराला घेऊन पळून जाते. परंतु वाळूच्या भयंकर वादळात सापडून ती दोघेही मरतात.

अशी ही साधी कथा त्या नाटकात इतक्या भव्य स्वरूपात दाखविली आहे की, पाहणाऱ्याची मतीच गुंग होते. कला, तंत्र याचा या नाटकात सुंदर संगमच झाला आहे. वाळवंटातील ते वादळ विजेच्या साहाय्यानं निर्माण केले होते, पण ते पाहताना भीती वाटत होती. मी तन्मय होऊन नाटक पाहत होतो. काही वेळा मोठ्यानं हसत होतो. तेव्हा माझ्या रांगेतील एका प्रेक्षकानं मला विचारलं, "तुम्हांला रशियन कळतं?"

"मग हसलात कसे?" त्यांनी पुन: विचारलं आणि मी उत्तर दिलं, "खरी कला ही सदैव काळजाशी भिडून बोलत असते. तिला कानांची गरज भासत नाही."

हे नाटक म्हणजे एका गुलाम मुलीनं एका जुलमी राजावर मात करून खऱ्या

प्रेमासाठी केलेल्या आत्मबलिदानाची कहाणी आहे. ही कहाणी सर्व दृष्टीनं जीवननिष्ठ अशीच आहे. ती पाहत असताना प्राचीन राजेशाही किती क्रूर नि बेबंद होती, याचं दर्शन घडतं. जुनी करवसुली, कैद्यांचे जीवन आणि राजदरबारातील एकमेकाविरुद्धचे हेवेदावे या सर्व गोष्टी त्या प्रेमकथेबरोबर बेमालूम सांगण्यात आल्या होत्या आणि प्रत्येक कलावंत आपल्या कलेत अगदी प्राण ओतून आपली भूमिका पार पाडीत होता. दिलारामाचं काम करणारी बाई तर मूर्तिमंत कलेचा अवतारच वाटत होती. चित्रकाराला हृदय अर्पण करते वेळीचा तिचा अभिनय पाहून भावना उचंबळून येत होत्या. तर जबरीनं राणी झाल्यानंतरचा तिचा अभिनय काळजाला पीळ पाडीत होता. त्यावेळी ती प्रेम हे जबरीनं दिलं जात नाही हे प्रत्येक हालचालीनं सांगत होती आणि खरं प्रेम कधीच मरत नाही, याची ती न बोलता ग्वाही देत होती.

हे नाटक पाहून बाहेर येताच कॉ. नबींनी विचारलं, "कसं काय वाटलं हे नाटक?"

तेव्हा मी उत्तर दिलं, "हे नाटक म्हणजे खऱ्या प्रेमाचे एक भव्य स्मारक आहे आणि हे भव्य स्मारक सोविएत सरकारने लाखो रुबल खर्चून उभारले आहे. हा देश म्हणजे कलेचे माहेरघर आहे!"

## ८. ताश्कंद ते दिल्ली

सोविएत रशियात मी त्या रशियन जनतेच्या जीवनाचे अनेक पदर पाहिले. तिचा अपार उद्योग, तिची विद्वत्ता आणि कला, साहित्य आणि उदात्त संस्कृती हे सर्व पाहून मन थक्क झालं. जेव्हा आम्ही दिल्ली सोडली तेव्हा आमच्या या शिष्टमंडळातील काही प्रवासी उदासीन होते. सोविएतविरोधी भांडवलदारी प्रचाराची छाया आमच्या मनावर कायम होती. समाजवाद करून किती प्रगती करू शकेल? एकूण एक मानव सुखी करणे कुणालाच या जगात शक्य नाही. कुठं तरी पोकळी असणारच असंच काहीसं आमचं मत होतं. लखनौचे श्री. पुष्कराज भट हे एक विचारवंत असून, ते आमदार आहेत. शिवाय ते काँग्रेस पक्षाच्या मताचे आहेत. कम्युनिस्टांबद्दल त्यांचं मत अनुकूल नाही, पण मनानं ते फारच दिलदार आहेत. ते रशियात प्रत्येक गोष्ट अगदी चिकित्सक दृष्टीनं पाहत होते. मॉस्कोपर्यंत पुष्कराज माझे मित्र झाले होते. आमचं दोघांचं मत होतं की, कितीही बिलंदर सत्ता असली तरी ती दारिद्र्य दडवू शकणार नाही. ते नग्न असतं. आणि सर्वत्र दिसतं. म्हणून आम्ही ते पाहण्याची खटपट करीत होतो. आमच्या पुढे कसलाच पोलादी पडदा नव्हता. पण जेव्हा आम्ही प्रवास करत ताश्कंद शहरात दाखल झालो, तेव्हा पुष्कराज संपूर्ण बदलले होते. रशियन जनतेची ती प्रगती पाहून आम्ही सर्वच प्रभावीत झालो होतो.

मात्र हिंडण्याचा कार्यक्रम आमचा कायम होता. मला रशियन मुळीच येत नव्हतं; तर श्री. पुष्कराज यांना थोडं थोडं कळत होतं. कसलीही पाटी दिसली की, ते उभे राहून एक एक रशियन अक्षर वाचत. मी नुसताच आ करून पाहत असे. रशियन येत नाही म्हणून मला फार वाईट वाटे.

एकदा दुपारचं जेवण उरकून पुष्कराज आणि मी, आम्ही दोघं हिंडत हिंडत एका बागेत शिरलो. त्या बागेत पंधरा वीस इसम हिरवळीवर लोळत होते. काही वृत्तपत्रं वाचीत होते. काही पत्रं लिहिण्यात निमग्न झाले होते. आम्हांला वाटले, ही बेकारांची झुंड असून, ही कामं शोधून वैतागली असावी आणि आता या बागेत येऊन पडली असावी. मी एका गृहस्थाजवळ बैठक मारली. मी माझ्या तीक्ष्ण नजरेनं त्या इसमाला न्याहाळून घेतला. त्यानं आपल्या करड्या पल्लेदार मिश्या पिळून त्याचे आकडे केले होते. त्याचा पोशाख नीटनेटका होता. त्यानं एक मोठं पुस्तक घेतलं होतं. मी विचारलं, ''तुम्ही असं का बसला आहात?''

''मग कसं बसू?'' त्यानं विचारलं. तसा मी पेचात पडलो. म्हणालो, ''नव्हे, तुम्ही यावेळी बागेत कसे?''

''तुम्ही तसेच आम्ही,'' त्यानं उत्तर दिलं. मग मी खुलासा केला की, आम्ही भारतीय असून, इंडो-सोविएत सांस्कृतिक संस्थेचे प्रतिनिधी आहोत. मला असं सांगा की, तुम्ही नोकरी कोठे करता, का बेकार आहात?

तो गृहस्थ पोटभर हसून म्हणाला, ''आम्ही फार फार नोकरी केली आहे आणि आता सेवानिवृत्त होऊन आराम करीत आहोत. आता पत्र वाचणे, नातलगांना पत्र लिहिणे एवढंच काम करीत असतो. आमच्या देशात तुम्हांला औषधालाही बेकार मिळणार नाही. इथं समाजवाद आहे.''

पुढं मी काहीच विचारलं नाही. आम्ही लगेच ती बाग सोडली आणि परत निघालो.

चालता चालता पुष्कराज दिसतील त्या रशियन पाट्या उभं राहून वाचीत होते. एका सुंदर इमारतीपुढं एक लाल रंगाचा मोठा बोर्ड दिसला आणि पुष्कराज थांबून तो वाचू लागले. मी नेहमीप्रमाणे त्यांचेकडे पाहू लागलो. आणि आम्हांला पाहून येणारे जाणारे ताश्कंदचे नागरिक थांबून आम्हांला पाहू लागले. पुष्कराजनी ती पाटी वाचून होताच मी हिंदीत विचारले, ''कसली पाटी आहे ती?''

''ही बँक आहे.'' पुष्कराजनी मला हिंदीतून उत्तर दिले आणि बाजूला उभी असलेली एक तरुणी चटकन पुढे येऊन हिंदीत म्हणाली, ''ही बँक नसून आमची कायम स्वरूपाची निवडणूक कचेरी आहे.'' हा खुलासा ऐकून आमचे चेहरे धडाधड पडले आणि आम्ही लगेच काढता पाय घेतला.

दुसऱ्या दिवशी ताश्कंदजवळ असलेले 'स्तालिन सामुदायिक शेत' पाहिलं. तो

सामुदायिक मळा म्हणजे एक वेगळे राज्यच आहे आणि ते एक प्रकारचे आश्चर्यही आहे. कारण या मळ्याची स्थापना १९२९ साली झाली, त्यावेळी फक्त तीनशे तीस एकर जमीन या मळ्याच्या मालकीची होती. १९३४ साली या मळ्यात फक्त दोन ट्रॅक्टर काम करीत होते. परंतु आज एक हजार पाचशे हेक्टर जमीन या मळ्याच्या मालकीची असून, आता चौतीस ट्रॅक्टर तेथे काम करीत आहेत. तेथे सध्या ११०४ शेतकरी काम करीत असून , त्यांपैकी ४७५ स्त्रिया आहेत. या मळ्यात चार शाळा आहेत. दोन हजार पाचशे कोंबड्या रोज मळ्यात अंड्यांचा ढीग लावीत आहेत. अकराशे पाळीव गायींचे दूध काढण्यासाठी तेथे निराळे दूधकेंद्र निर्माण करण्यात आले असून, एकाच वेळी १६ गायी स्वखुशीने येऊन दूध देत असतात. त्या मळ्यात १३ दूध काढणारी यंत्रे बसविली असून, गायी रांग लावून दूध देत असतात. या मळ्याच्या मालकीची सात हजार पाचशे मेंढरे असून, त्या भागात तीनशे पंचाहत्तर घरे आहेत आणि मालाची ने-आण करण्यासाठी वीस मोटार ट्रक्स रोज पळापळ करत आहेत. शिवाय हायस्कूल, दवाखाना, जनावरांचा दवाखाना, प्रसूतिगृह, वगैरे सर्व पाहिलं की, माणसाची मती गुंग होऊन जाते.

आम्ही गेलो तेव्हा द्राक्षाला नुकताच बहर आला होता, म्हणजे ती पिकली होती. काळी, जांभळी, गुलाबी, वाटोळी, लांबकुळी असे पंधरा प्रकार आणि आकार पाहिले की, सोविएत शेती सुधारणेचे कौतुक नव्हे तर आश्चर्य वाटू लागते. आम्ही ती सुंदर द्राक्षे गिळतच त्यांचे कौतुक करीत होतो. तो सुंदर मळा, ती संपन्न शेती, ती सुंदर फळं, फुलं नि सुखी माणसं पाहत आम्ही एका भव्य मंडपाखाली आलो. तो मांडव द्राक्षांच्या वेलींनी आच्छादला होता. सर्वत्र पिकलेल्या द्राक्षांचे घोस लोंबत होते. नि त्या मंडपाखाली आमच्या भोजनाची तयारी करण्यात आली होती एका सुंदर टेबलावर अनेक प्रकारचे जेवण मांडले होते. त्यात खास भारतीय पद्धतीचा मसाला दरवळत होता. आणि त्या सुगंधात आम्हांला आपल्या घरची आठवण होत होती. या भोजनप्रसंगी मळ्याच्या अध्यक्षांनी एक भावपूर्ण असे भाषण केले. ते आमचं स्वागत करून म्हणाले, "तुम्ही आमचे शेजारी आहात आणि शांततेचे पाईक आहात. तुमचे पंतप्रधान पं. नेहरू आज शांतता नांदावी म्हणून अलोट यत्न करीत आहेत. याचा अर्थ तुमचे आणि आमचे उद्दिष्ट एक आहे. जर तुमची मैत्री चिरकाल राहील तर जगात कधीच युद्ध होणार नाही, अशी आमची श्रद्धा आहे. म्हणून भारत-रशिया हे दोन देश चिरायू होवोत."

रशियात मी जिथं गेलो, तिथं मला शांततेचा जयघोष ऐकू आला. तिथं प्रत्येक माणसाला शांततेचे वेडच जणू लागले आहे. याचा अर्थ ती जनता दुबळी आहे, असा कोणी घेऊ नये. ती जनता महान आहे आणि प्रबळही आहे. भारत आणि रशिया या दोन देशांच्या हाती जागतिक शांतता सुरक्षित आहे, अशी तिथं सर्वांची श्रद्धा आहे.

तिथं वृद्ध माता आपल्या मुलांनी व्यर्थ रणात मरू नये नि कुणाला मारू नये, या एकाच विचारात आहे. त्यांनी जगावं आणि या देशाला संपन्न करावं, आम्हांला शांतता हवी. कारण शांततेच्याच काळात जीवनाला बहर येतो. कला प्रगत होते. फुलं फुलतात, असा आमचा अनुभव आहे. युद्धाने काय होतं हे आम्ही प्रत्यक्ष पाहिलं आहे म्हणून आम्हांला युद्ध नको. थोडक्यात सांगावयाचे म्हणजे शांततेसाठी झटणाऱ्या आमच्या पंतप्रधानांना समग्र रशियन जनता लाख लाख दुवा देत आहे. रक्तपात नसावा हा सर्वत्र मंगल असाच हेतू आहे. या हेतूंत अहंकार नाही. फाजील दुरभिमान नाही. मी तर असं म्हणेन की यात पवित्र हेतू आहे. आणि यात साऱ्या जगाचे कल्याण सामावले आहे. रशियन लोक भारताला आपला खरा मित्र मानतात. म्हणूनच ते भारतीय संस्कृतीचा कसून अभ्यास करीत आहेत.

ताश्कंद येथे आम्ही एक शाळा पाहिली. तिथं एकूण एक मुलं हिंदी भाषा शिकत होती. आम्ही शाळेत प्रवेश करताच आम्हांला भारतीय वातावरण जाणवलं. प्रत्येक मूल प्रत्येक शब्द हिंदीत उच्चारीत होतं. त्यामुळे माझी पाचावर धारण बसत होती. कारण माझी हिंदी मुंबईची हिंदी! एखादा उच्चार चुकला की ही बेरकी पोरं अब्रु घेणार अशी मला भीती वाटत होती. म्हणून मी फार कमी बोलत होतो. त्याच दिवशी आम्ही ताश्कंद विद्यालयाला भेट दिली. त्यावेळी त्या विशाल सभागृहात अफाट गर्दी झाली होती. आम्ही जरा उशिराच पोहोचलो. पण ते गुणी विद्यार्थी आम्हांवर रागावले नव्हते. आम्ही सभागृहात प्रवेश करताच सर्व मुलं-मुली उठून त्यांनी टाळ्या वाजवून आमचे स्वागत केले. एका सुंदर मुलीनं लाल गुलाबाची फुलं माझ्या हाती देऊन सांगितले, "ही आमच्या देशातील फुले तुम्ही भारतापर्यंत घेऊन जा आणि भारतीय स्वातंत्र्यासाठी ज्या वीरांनी आत्मबलिदान केले, त्यांच्या समाधीवर ती अर्पण करा. . ." हा त्या मुलीचा संदेश नि ती फुलं पाहून काळजात एक कळ उठली आणि भारतानं स्वातंत्र्य मिळवून आपली मुक्ती करून घेतली याला जगात आणि रशियात किती महत्त्व आहे, याची मला महती पटली.

रशियन माणसांना स्वातंत्र्य हा शब्द अतिशय प्रिय आहे. स्वतंत्र मानवाबद्दल त्यांना फार प्रेम वाटते, नि जे परदास्यात खितपत आहेत, त्यांच्याविषयी अत्यंत आदर आणि तितकीच आस्था त्यांना वाटते.

आला आला म्हणता तो दिवस आला! आपल्या मायदेशाकडे निघण्याची आमची तयारी झाली. सोविएत जेट विमान सज्ज झाले आणि माझ्या हृदयाने ठाव सोडला. कॉ. बान्निकोव, श्रीमती ईराना, मॉक्सीवोव, कॉ. नबी महमद ही मंडळी विमानाच्या थेट शिडीपर्यंत येऊन उभी राहिली. सर्वांच्याच हृदयात कालवाकालव सुरू होती. डोळे भरत होते. मी अश्रू दडवीत होतो. आम्ही कडकडून भेटलो. ती अंतिम भेट होती. त्या महान

देशाचं ते अंतिम दर्शन होतं. मी अंतरीची कळ दाबण्याचा बहाणा केला. उगीचच खिसे चाचपले. म्हणालो, "अरे! सिगरेट संपली की! फक्त वीसच आहेत" तेव्हा मला मिठी मारून कॉ. मॉक्सीवोव म्हणाले, "हे रशियन जेट विमान आहे. तुम्ही दोन सिगारेट संपविण्यापूर्वीच तुम्हांला ते तुमच्या राजधानीत पोहोचवील." मी आश्चर्यानं पाहिलं नि ते पुन्हा म्हणाले, "हे सरळ तुम्हांला हिमालयावरून घेऊन जाईल." आणि आता आपण आपल्या हिमालयावरून आपल्या मातृभूमीत जाणार या कल्पनेनं मी भारावून गेलो. कॉ. बान्निकोव यांनी मला आपलं सुंदर पेन दिलं आणि तो पेन, ती गोड आठवण, आणि त्या महान देशाचं अंतिम दर्शन घेऊन विमान उडाले आणि त्याची ती जबर भरारी सुरू झाली.

यावेळी मनात निराळ्याच भावना उचंबळून उठल्या होत्या. मी वयाच्या अकराव्या वर्षी मुंबईला आलो. त्यावेळी आमचं सारं कुटुंब दरमजल दर कोस करीत मुंबई जवळ करीत होतं. गाडीखर्च नव्हता म्हणून आम्ही मुंबईला पायी चालत निघालो होतो. चालून माझे पाय सुजले होते. दोनशे सत्तावीस मैलांचे अंतर कापायला आम्हांला दोन महिने लागले होते. आणि आता तोच मी मिनिटाला दहा मैल भरारी मारीत होतो. तीस हजारांपेक्षाही जास्त उंचीवरून आमचे विमान उडत होते. मी खाली पाहत होतो. तेव्हा हिमालयाच्या मस्तकावर निसर्ग नुकताच हिमाचा वर्षाव करत होता आणि तो महान गिरिराज आमच्या सरहद्दीवर आपले अनंत बाहू पसरून ताठ उभा होता. त्याचं ते दर्शन आणि सोविएत रशियाची स्मृती मी कधीच विसरणार नाही. नव्हे, ती विसरणंच शक्य नाही. रशियातील माझं भ्रमण म्हणजे माझ्या जीवनाचे एक साफल्य मी मानतो.

नकळत मायदेशाची ओढ वाढू लागली. त्या नादात मी एक सिगरेट ओढून टाकली आणि दुसरी पेटविली, तोच पुढे लाल पाटी लागली आणि दिल्ली दिसू लागली.



# जीवनयात्री कथाकार
# अण्णा भाऊ साठे

**नीला उपाध्ये**

अण्णा भाऊ साठे यांची कथा साकल्याने वाचल्यावर मनावर एक अमिट ठसा उमटतो तो एका जीवनयात्री कथाकाराचा! जगण्यावर, माणसांच्या गुणदोषांवर मनापासून प्रेम करणाऱ्या या कथाकाराच्या कथांवर कुठेही विदेशी कथाविश्वातील वैफल्यवादाचे सावट नाही. उलट विष्णुपंत कुलकर्ण्यांच्या मुखातून 'जा, तुम्ही कुत्र्यासारखं मरू नका, उकिरड्याचा पांग फिटतो, तुम्ही तर माणसं आहात' असा जगण्याच्या ईर्षेचा तेजस्वी संदेश या कथा देतात. उगाच नाही अण्णा भाऊंच्या 'खुळंवाडी' या १९५७ साली अभिनव प्रकाशनाचे वा. वि. भट यांनी प्रसिद्ध केलेल्या पहिल्याच कथासंग्रहाला लिहिलेल्या प्रस्तावनेचा प्रारंभ थोर साहित्यकार प्र. के. अत्रे यांनी असा केला होता – 'अण्णा भाऊ साठे यांच्या कथेचे एका वाक्यात वर्णन करावयाचे झाल्यास असे सांगता येईल की, ही जगण्यासाठी लढणाऱ्या माणसाची कथा आहे. ही कच खाणारी, हार मानणारी माणसं नाहीत. या सर्वांना मानाने जगायचे आहे आणि आक्रमक वृत्तींशी निकराने लढून त्या सामन्यात त्यांना जिंकायचेही आहे.' आचार्य अत्र्यांच्या या परिच्छेदात अण्णा भाऊंच्या कथेचे मर्म नेमकेपणी व्यक्त झाले आहे.

अण्णा भाऊंचा 'खुळंवाडी' हा पहिला कथासंग्रह १९५७ साली प्रकाशित झाला असला तरी, त्यापूर्वी आठ-दहा वर्षे आधीच त्यांनी कथालेखनाला प्रारंभ केला होता. 'मशाल' साप्ताहिकात १९४९ साली प्रसिद्ध झालेली 'माझी दिवाळी' ही अण्णा भाऊंची पहिली कथा. शाहिरीचा धंदा करीत करीत अण्णा भाऊंनी लिहिलेल्या या कथांनी संग्रहबद्ध व्हायच्या आधीच हिंदी, सिंधी, बंगाली, मल्याळम या देशी तसेच जर्मन, झेक, इंग्लिश, पोलिश, रशियन आदि परदेशी भाषांत प्रवेश केला होता. 'खुळंवाडी' नंतर 'बरबाद्या कंजारी', 'भानामती', 'फरारी', 'लाडी', 'गजाआड', 'आबी', 'कृष्णाकाठच्या कथा', 'चिरागनगरची भुतं', 'निखारा', 'नवती', 'पिसाळलेला माणूस', 'गुऱ्हाळ' असे त्यांचे एकामागून एक तेरा कथासंग्रह १८ जुलै १९६९ रोजी अण्णा भाऊंचे निधन होण्यापूर्वी प्रकाशित झाले.

अण्णा भाऊंचं हे सारं कथालेखन 'माझे स्वतःचे अनुभव सांगण्याजोगे आहेत' या

ऊर्मीतून झालेले आहे. 'खुळंवाडी' नंतर अभिनव प्रकाशनानेच १९६० साली त्यांचा 'बरबाद्या कंजारी' हा कथासंग्रह प्रकाशित केला तेव्हा त्याच्या प्रस्तावनेत अण्णा भाऊंनी म्हटले होते, "मी जे जीवन जगतो, पाहतो, अनुभवतो, तेच मी लिहितो. मला कल्पनेची पंखं लावून भरारी मारता येत नाही. त्याबाबतीत मी स्वत:ला बेडूक समजतो! या कथासंग्रहातील सारी पात्रं या ना त्या नात्यानं माझ्या आयुष्यात येऊन गेली आहेत. जातपंचांनी बरबाद्याचा कान जेव्हा कापला तेव्हा मी अंधारात बसून पाहत होतो. सुलतान नि भोमक्या हे दोघे अमरावती मध्यवर्ती तुरुंगात माझ्या बराकीत कैदी होते. आम्हा तिघांच्याही कार्डावर 'खून करणे, दरोडा घालणे' असे भयानक आरोप होते. मकुल मुलाणी तर मला मामा म्हणत होता. इरेनं गाढव खाणारा तुका अजून जिवंत आहे; फक्त त्याला ते गाढव पचलं नाही एवढंच! एकंदरीत माझी माणसं ही वास्तव आहेत नि जिवंत आहेत!"

अण्णा भाऊंची ही माणसं — तो बरबाद्या, भोमक्या, विष्णुपंत कुलकर्णी, निळू मांग आणि कितीतरी अविस्मरणीय व्यक्तिरेखा केवळ अण्णा भाऊंचीच न राहता, समस्त वाचकांची होतात. कारण, मूलभूत मानवी प्रवृत्तींना साद घालण्याचं विलक्षण सामर्थ्य अण्णा भाऊंच्या जोरकस, चित्रदर्शी भाषाशैलीमुळे त्यांच्यात उतरलेलं आहे.

कुसुमावती देशपांडे यांच्यासारख्या पांढरपेशा मराठी समीक्षकांनी अण्णा भाऊंच्या रांगड्या शैलीतील रसवट कथांना मराठीतील नवकथाकारांच्या रांगेतील मानाचं पान दिलं नाही. परंतु अन्य मराठी कथालेखकांपेक्षा अण्णा भाऊंच्या कथांतून नैतिक मूल्यविचार अधिक ढळढळीतपणे व्यक्त झाल्याचे आढळते. आपल्या पात्रांच्या सुखदु:खांशी सहानुभूतीपूर्वक समरस होऊन अण्णा भाऊंनी शब्दबद्ध केलेली ही पात्रं नैतिकतेचा सखोल संस्कार वाचकाच्या मनावर करतात, त्यांच्या 'प्रायश्चित्त' या कथेतील दगडखाणीवर राबणारे एकाच झोपडीत मध्ये पडदा घालून राहणारे बळी नि उमा हे मेहुणे-साडू एके रात्रीत दारूच्या नशेत चुकून आपापल्या बायकांऐवजी स्वत:च्या सख्ख्या बहिणींशी रत होतात. धर्माने जी पवित्र नाती निर्माण केली त्यांचा भंग आपल्याकडून नकळत झाला, त्याचा घोर लागलेली ती दोन पूर्वीची हसतीखेळती आनंदी जोडपी पश्चात्तापाच्या भावनेनं मरण जवळ करतात! भारतीय संस्कृतीच्या रक्षणार्थ स्वत:च्या प्राणांचं बलिदान देऊन अत्यंत घोर असं 'प्रायश्चित्त' ते कोवळे जीव घेतात, हे त्या नितांतकरुण कथेत वाचताना मन सुन्न होऊन जातं.

नैतिकतेचा मक्ता हा काही सुखासीन, सुखवस्तू उच्चवर्णीयांनाच मिळालेला नसतो, गावगाड्यातील गरीब, उपेक्षित पददलितही आपापल्या परीने नैतिक मूल्यांची जाणीव आपल्या जीवनात कशी जोपासतात याची आणखी कितीतरी उदाहरणं अण्णा भाऊंच्या कथांतून दिसतात. त्यांच्या 'हिरा' या कथेचा सैनिक नायक विश्वास लक्ष्मण शिंदे

लढाईवर गेला असताना, त्याची पत्नी हिरा हिची अब्रू त्याचा मित्र विनू पवार लुटतो व वर पुन्हा ते विश्वासला कळवतो. विश्वासची घरची माणसं निरपराध हिराला भ्रष्ट ठरवून हाकलून लावतात. पण उदारमनस्क विश्वास लढाईवरून परतल्यावर आपल्या पत्नीचा तिच्या मुलासह स्वीकार करतो आणि लष्करातली नोकरी सोडून मुंबईत स्थायिक होऊन सुखाने संसार करतो.... त्यांच्या 'बिलवरी' कथेतील इनामदाराचा स्वामिनिष्ठ सेवक अमीन आपला धनी नर्तकी बिलवरीची अब्रू लुटू पाहतो तेव्हा त्याच्याविरुद्ध बंड करतो....

स्त्रीचं शील ही अण्णा भाऊंच्या पात्रांची मर्मबंधातील ठेव असल्याचं त्यांच्या 'डोळे' या कथेतूनही जाणवतं. या कथेची देखणी नायिका गीता आपल्या रूपावर पती जळतो नि आपला संशय घेतो, दिराचीही वाईट नजर आपल्यावर आहे, या जाणीवेने व्यथित होऊन शेंडाचा चीक घालून आपले सुंदर डोळेच फोडून घेते!

नीतिधैर्यच माणसाला प्रसंगी कसे विलक्षण बळ देते, याचं उत्तम उदाहरण म्हणजे अण्णा भाऊंचे 'विष्णुपंत कुलकर्णी' हे पात्रं. हा खरा तर सरकारी ताबेदार. पण दुष्काळात ब्रिटिश सरकार महारमांगांना खुशाल उपाशी मरू देत आहे, हे लक्षात येताच संतापलेले विष्णुपंत धीरोदात्तपणे महारमांगांना मठातील धान्य लुटून पोट जगवण्याचा मार्ग सुचवतात आणि लुटालुटीच्या आरोपावरून महारमांगांना अटक करायला आलेल्या प्रांतसाहेबाला परखडपणे सुनावतात!

'अण्णा भाऊ साठे यांचे कथाविश्व' या छोट्या पुस्तिकेत अण्णा भाऊंप्रमाणेच पुरोगामी मार्क्सवादी विचारधारेची कास धरलेले समीक्षक डॉ. सदा कऱ्हाडे यांनी म्हटले आहे, त्याप्रमाणे 'अण्णा भाऊंच्या कथांतील अशा अनेक व्यक्तींना असे नैतिक मूल्यांचे पाठबळ आहे. याचाच अर्थ असा की, या कलावंताने प्रथम स्वत: नैतिक मूल्यांचे सामर्थ्य जाणले होते. सुखसमृद्धी, सभ्यता यांची मंगलस्वप्ने साकार व्हायची असतील तर, नैतिक मूल्यांची जोपासना व्हायला हवी, अशी त्यांची श्रद्धा होती. त्या श्रद्धेचे अधिष्ठान त्यांच्या वाङ्मयाला आहे. त्यामुळे त्यांच्या कथांतील अनेक घटना, व्यक्ती या सगळ्यांची वाटचाल जीवनातील सत्-विकासाकडे आहे, हे लक्षात घेतले पाहिजे.'

आसाराम गायकवाड संपादित 'अण्णा भाऊ साठे संदर्भ ग्रंथा'त 'अण्णा भाऊंच्या कथांतून अभिव्यक्त झालेला गावगाडा' हा लेख लिहिणारे डॉ. प्रकाश कुंभार यांनी असे मत व्यक्त केले आहेकी, 'बहुतांशी दलितांनी स्वीकारलेल्या बौद्ध धम्मात नैतिक मूल्यांना स्थान आहे. हा विचार आंबेडकरी चळवळीत अधिक प्रभावीपणे रुजावा, या हेतूनेच नैतिक मूल्यांची जाणीव दलितांच्या वस्त्यांतून कशी जगते, जागवली जाते आणि प्रत्यक्ष आचरणात आणली जाते, हे अण्णा भाऊंनी आपल्या काही प्रमुख कथांमधून दाखवून दिले आहे.' मला स्वत:ला व्यक्तिश: हे मत पटत नाही. कम्युनिस्ट पक्षाचे कार्यकर्ते असलेल्या, आंबेडकरी चळवळीने प्रभावित झालेल्या अण्णा भाऊंनी त्या विचारसरणीचा

प्रचार त्यांच्या लोकनाट्यातून जरूर केला; पण त्यांच्या सुरुवातीच्या खूपशा कसदार कथा असा काही संदेश देण्यासाठी लिहिल्या गेल्या आहेत, अशा प्रचारकी थाटाच्या बिलकूल वाटत नाहीत; आपल्या आजूबाजूच्या पददलितांच्या जीवन-निरीक्षणातून, मानव्याच्या विशाल जाणीवेतून साकारलेला तो प्रतिभाविष्कार आहे, असे जाणवत राहते.

नैतिकतेची चाड असल्यामुळेच अण्णा भाऊंच्या कथांतील ही माणसं जीवनासाठी टोकाचा संघर्ष करायला डगमगत नाहीत. त्यांच्या खूपशा कथांतील माणसं पोटाच्या भुकेनं व्याकुळ झालेली असतात आणि तो भुकेचा प्रश्न सोडवण्यासाठी प्रसंगी बंडखोर बनायला वा पशुपातळीवर जायलाही ती तयार असतात! त्या दृष्टीने अण्णा भाऊंची 'स्मशानातलं सोनं' ही सर्वोत्तम कथा तपासून बघण्याजोगी आहे. वारणेकाठच्या गावातील भीमा ज्या खाणीत राबून आपलं नि आपल्या कुटुंबियांचं पोट जाळायचा, ती खाण बंद पडते आणि पोटाची भूक त्याला मसणवटी धुंडाळायला प्रवृत्त करते, कारण मढ्याच्या राखेत सोनं असतं, त्याचा त्याला एक दिवस शोध लागलेला असतो! पण एके रात्री मढ्यावर आलेल्या कोल्ह्यांशी झुंजताना त्या मढ्याच्या तोंडात त्याची बोटं अडकतात. गावकऱ्यांच्या भीतीनं ती बोटं त्याला गमवावी लागतात नि दुसऱ्या दिवसापासून बंद खाण पुन्हा सुरू होते. पण बोटं गमावल्यामुळे औजार हाती पकडू न शकणारा भीमा आता खाणीत पुन्हा कामाला जाऊ शकणार नसतो! नियतीची ती विपरीत लीला वाचकाला सुन्न करून जाते.

'बरबाद्या कंजारी' कथासंग्रहातील अण्णा भाऊंचा 'सुलताना' नेमस्तपणे जगून पोट भरता येत नाही, तेव्हा बंडखोरी करतो... पोटासाठी भिकारी बनलेल्या 'भोमक्या'ला तुरुंगात डांबलं जातं नि अपुरं अन्न दिलं जातं, तर तो जेलरबरोबर संघर्ष करायला कमी करीत नाही...

स्त्रीच्या योनिशुचितेचा बडिवार माजवू नये, असे स्त्रीमुक्तीवाल्या कार्यकर्त्या बलात्कारित स्त्रियांच्या संदर्भात आता अलीकडे सांगू लागल्या आहेत. पण हा पुरोगामी विचार अण्णा भाऊंनी त्यांच्या 'हिरा' तसेच 'फरारी' या कथांतून शीलभ्रष्ट पत्नीचा स्वीकार करणारे उदारमनस्क नवरे चितारून ३०-३५ वर्षांपूर्वीच मांडला आहे. एक स्त्री म्हणून मला स्वत:ला अण्णा भाऊंच्या कथांतील एकच बाब खटकते - या कथांतील एकजात सर्व नायिका देखण्या असतात! या साऱ्याजणी गोऱ्यापान, बांधेसूद, हरणासारख्या टपोऱ्या डोळ्यांच्या असतात! त्या आपल्या मोत्यांसारखे शुभ्र दात दाखवत हसू लागल्या की, जणू काकणं किणकिणतात, खडकावर रुप्याची नाणी खळखळतात! अण्णा भाऊंच्या वास्तवदर्शी कथांतील ही स्त्रीसौंदर्याची मुक्त उधळण अवास्तव वाटते! आपल्या सर्वच स्त्रियांना सद्वर्तनी रंगवण्याचा त्यांचा अट्टाहासही असाच अवास्तव वाटतो! त्यांची करारी 'आबी' म्हणूनच अधिक पटते!

अण्णा भाऊंच्या काही कथांतील सूक्ष्म विनोद विलोभनीय वाटतो! त्यांच्या 'काडीमोड'मधली औताड्याची सखुबाई आपल्या लेकाचं हरणाबरोबर लग्न लावून देते; पण अंध:श्रद्धेतून त्या नवपरिणीत दांपत्याला संग करू देत नाही आणि काडीमोडापर्यंत पाळी जाते. तेव्हा हसता हसता वाचक विचारमग्नही होतात. 'उपकाराची फेड' मध्ये मळू महार मेलं ढोर उचलायचं नाकारून शंकऱ्या चांभाराला जशास तसा धडा शिकवतो, तेव्हाही हसता हसता वाचक विचारात बुडतोच! त्यांचा 'कोंबडीचोर'ही पोटाच्या भुकेचं तत्त्वज्ञान ऐकवतो!

अण्णा भाऊंनी आपल्या माणसाचं दु:ख जगापुढे मांडण्यासाठी कथालेखन करून माणुसकीचा महामंत्र दिला; वाङ्मयाचे सामर्थ्य वाढवले. तिसरी-चौथीपर्यंत देखील शिक्षण न झालेल्या अण्णा भाऊंनी कसदार लेखन करून मराठी सारस्वताच्या दरबारात आपलं स्थान राखीव केलं. 'नवकथाकार', 'प्रादेशिक कथाकार', 'ग्रामीण कथाकार' अशी कुठलीही बिरुदं स्वत:च्या नावामागे लावून न घेता आपल्या पृथगात्म कथेने अण्णा भाऊंनी १९६० नंतर प्रकर्षाने पुढे आलेल्या दलित कथेसाठी पायवाट घालून दिली, हे कुणीही नाकारू शकणार नाही. जीवनावर मनापासून प्रेम करणाऱ्या, जीवनाचा नवा अर्थ सांगणाऱ्या या जीवनयात्री कथाकाराला मानाचा मुजरा.



## अनुक्रम

# बरबाद्या कंजारी

''चला जा! कापा माझा कान! मी डरत न्हाय!'' बरबाद्या गर्जला. त्याने एक बैठक मारली; दंड थोपटून गिर्की घेतली. सर्व मोठमोठे पंच-सरपंच चकित झाले.

स्वत: बरबाद्याने 'कान कापण्याची मला भीती नाही,' असे शेवटी सर्वांना सांगून टाकले. पंचांनी निकाल दिला. बरबाद्याचा कान कापण्याची तयारी झाली.

एका बाजूने बी.बी.सी.आय. रेल्वे चर्चगेटकडे धावत होती आणि दुसऱ्या बाजूने जी.आय.पी. कल्याणकडे पळत होती. त्या दोन्ही लोहमार्गांना जोडणारा एक फाटा अगदी जवळून जात होता. अधूनमधून विजेवर चालणारी गाडी धावत येत होती.

तिन्ही बाजूंनी रेल्वे असलेल्या त्या टापून हजारो लहान लहान झोपडी एकमेकांना खेटून बसली होती. त्यांच्या डोकीवरून टाटा पॉवर स्टेशनचे राक्षसी टॉवर डोकीवर विजेच्या तारांचे भारे घेऊन जवळची खाडी ओलांडून समोरच्या सह्याद्रीत शिरले होते. त्या टॉवरांची फौज त्या झोपड्यांच्या जवळून उठली होती. शेजारीच ती टाटा पॉवर कंपनी गुरगुरत होती. त्या टॉवरांच्या फौजेचे कूच पाहून सहज वाटत होते - केवढे हे महान कार्य! देशाला वीज पुरविण्याची केवढी ही धडपड!! केवढा त्याग!!

आणि डाव्या बाजूने तुळसी तलावाचे शीतल पाणी सर्व उपनगरे मागे टाकून शहरात शिरले होते. तर दुसऱ्या बाजूने तानसा अन् कानसा तलावांपासून येऊन प्रचंड नळ आपली धुडे ओढीत गेले होते.

तीन बाजूंनी रेल्वे, दोन बाजूंनी पाण्याचे नळ, डोकीवरून टाटाची वीज आणि तिथेच खाली ती हजारो माणसांची घरटी ते सर्व पाहत बसली होती. सभोवती आधुनिक जगाची धावपळ चालू होती आणि ती धावपळ पाहत ती झोपडी भेदरली होती.

जिथे जागा मिळेल तिथे आणि जमेल तसे झोपडे बांधले गेले होते. अगदी पेकाटाला पेकाट लावून झोपड्यांची पलटण उभी होती.

तिथेच बरबाद्या कंजारी आपले झोपडे बांधून नांदत होता. त्याची जमातही तिथे रहात होती. तिथे नुसती कंजारी लोकांची वस्ती नव्हती तर फासेपारधी, डवरी, भिकारी, डोंबारी, वडारी, बेलदार, घिसाडी, गारुडी, अशा अनेक जमाती राहत होत्या. डांबरी कागद, जुने पत्रे, कुजक्या फळ्या, सडकी बारदाने यांचीच ती पाले उभारली होती.

जे काही निकामी झाले होते, ज्याची मुळीच गरज उरली नव्हती, अशा सर्व वस्तू आणून त्या कामी लावल्या गेल्या होत्या.

आणि त्या ठिकाणी शेकडो नव्हे, तर हजारो माणसे राहत होती. जणू काय त्या निकामी वस्तूंच्या पालात राहाणारे ते लोक आणि त्यांनी पैदा केलेल्या त्या सर्व वस्तू एकच असून त्यांचीही जणू आता कुणाला गरज उरली नव्हती.

तिथे पाण्याचे नळ नव्हते. संडास नव्हते. तिथे होते ते फक्त दारिद्र्य, अंधार, क्रूरता, भेसूर अज्ञान आणि दुष्ट दुर्गंधी.

सुसंस्कृत जग अर्धा मैल अंतरावर दचकून उभे होते. ते पुढे जात नव्हते. त्याची कोणीतरी वाट रोखली होती.

तिथे राहणाऱ्या कोणाही माणसाला या जगात कामगार म्हणून जगण्याचा मान मिळाला नव्हता. कोणीही आपल्या मनगटाच्या जोरावर जगत नव्हता. मात्र तसे जगण्याची शिकस्त करीत होता. जो मार्ग दिसेल त्या मार्गाने आपल्या जीवनाची गाडी हाकणे त्यांना भाग होते. खून, दरोडे, चोऱ्या, लुटालूट हे मार्ग त्यांना सहज शक्य होते, परंतु त्यांनी त्याचा अवलंब मात्र केला नव्हता. त्यांनी आपल्या जगण्याची जबाबदारी प्रचलित राज्यकर्त्यांवर मुळीच टाकली नव्हती.

त्या लोकांपैकी कैकांना पोसण्याची जबाबदारी माकडावर येऊन पडली होती. जणू तोच तेवढा इमानी प्राणी होता. म्हणून तो त्यांच्यात राहात होता. त्यांच्यासाठी उड्या मारीत होता. आपले नकटे नाक उडवून भीक मागत होता. तो रामकालीन लंकेवर चढाई करणारा जीव दारोदार फिरून आपल्या धन्याला जगवत होता.

काहींनी आपले पोट गाढवावर लादले होते. तो सर्वांच्या दृष्टीने बेअकली गाढव धन्यासाठी पडेल ते ओझे नेत होता, राबत होता आणि आपल्या मालकाचे पोट भरीत होता. त्या एका गाढवाला राखण्यासाठी त्या बेलदाराची तीन पोरे जीव टाकत होती.

कोणी शिंदीची पाने आणून, त्याचे झाडू करून मुंबापुरीची घाण काढीत होते. कोणी जुन्या काथ्या आणून त्याला पिंजून चऱ्हाटे वळून विकत होते. कोणी लाकडे आणून त्याच्या खाटा तयार करीत होते.

परंतु एवढे करूनही त्यांची पोटे भरत नव्हती. सागरात चिमूटभर साखर टाकण्यासारखे होत होते. त्या वस्तीत राहणारी लहान मुले रोज सकाळी-संध्याकाळी टोपल्या, डबडी घेऊन शहरात ''बाय, भात वाडा! बाय, भात वाडा!'' असे ओरडत आणि शेवटी गल्लीत शिरून पडलेला भात घेऊन परत फिरत. त्या गल्लीत राज्य करणारी मांजरे त्या पोरांना काहीच बोलत नसत. जणू काय त्यांनाही माहीत होते की, 'मुले म्हणजे फुले!'

काही लोक दिवसभर या विशाल मुंबईत फिरून सापडेल ते आणून आपल्या पोटात ठाशीत. कोणी सडकी भाजी, पडका भात, मेलेली बदके, कोंबडी, टाकून दिलेली अंडी आणत होती. जणू काय त्यांना सजीव असे काहीच नको होते. सर्व निर्जीव त्यांना आवडत

होते, किंवा ते लोक स्वत: निर्जीव होते.

परंतु ते गात होते, बोलत होते, चालत होते, जगण्याची धडपड करीत होते. प्रामाणिकपणे जगत होते.

बरबाद्याही त्यांच्यात राहत होता. तो पोटासाठी कानमळ काढण्याचे काम करीत होता. येणाऱ्याजाणाऱ्याचा कान मटकन पकडून, दोन पैशांसाठी त्याच्या कानात काटूक घालून उगाच टोकरत बसत होता. परंतु इमानाने, बेइमानीने नव्हे.

बरबाद्याची उंची सहा फूट होती. धिप्पाड देह, काळासावळा रंग, रुंद गर्दन, लांब पण शेवटी पसरट झालेले नाक, गुबगुबीत गाल, मोठे डोळे, दाट भुवया आणि वळवणीप्रमाणे लोंबणाऱ्या मिश्या याही त्याच्या देहाला साजेशाच होत्या. गालफडात धरलेले कालाकांडी पान, त्यामुळे त्या मिश्यांचे शेंडे लाल झाले होते. किंजाळात पवीड अडकल्याप्रमाणे त्याच्या मिश्यांत पानाचा चोथा अडकलेला असे.

शिवाय मोठेच्या मोठे पागोटे, गुडघ्यापर्यंत लांब पैरण, खाली दोनपदरी धोतराची लुंगी, पायात रबरी बूट, असा बरबाद्याचा थाट असे. त्याला सारे लोक बिचकून वागत. तो सदा बाह्या वर करूनच फिरत असे. त्याच्या मनगटाचे केस दुरून दिसत असत. कानात हिना या अत्तराचा फाया खोवून दिलेला दुरूनही दिसे. एखाद्या मास्तराने आपला टाक कानावर ठेवावा अशी लोखंडी सळी त्याच्या कानावर ठेवून दिलेली असे. त्या सळीने तो गिऱ्हाइकांचे कान टोकरी. गळ्यात एक लहानशी चामड्याची पेटी. तिलाही रिंगेभिंगे जडलेली. त्या पेटीत एक चिमटा. थोडासा कापूस, लहानशी तेलाची बाटली.

असा तो बरबाद्या लोकांचे कान टोकरून आपले, आपल्या दोन मुली निल्ली अन् दुल्ली यांचे व बायकोचे, अशी चार पोटे भरत होता. त्याची बायको व दोन पोरी ह्याही काही बसून नसत. त्या जुना काथ्या आणून त्याचा वाक करून चऱ्हाटे वळून विकत असत. त्यामुळे बरबाद्या पोटाला पोटभर खाऊन रुबाबात राहत होता. शरीराने धिप्पाड, डोकेफिरू, शिवराळ म्हणून लोक त्याला भीत होते. गडीमाणसे हटकून रामराम करीत.

बरबाद्या कोणाचेही ऐकत नसे. जर त्याचे डोके फिरले आणि त्याने आपली काठी काढली तर सारी वस्ती गर्भगळित होत असे. त्याच्या एकाच दणक्यात जुन्या कागदाची पाले क्षणात साष्टांग नमस्कार करायची आणि पालाचा मालक हात जोडून शरण यायचा.

बरबाद्याची निल्ली नुकतीच वयात आली होती. ती तोंडात पानाचा विडा घेऊन मान खाली घालून इकडून तिकडे जायची. अगदी बेपर्वा चालायची. ती कोणाकडेही ढुंकून पाहत नसे. दिव्याला काजळी आल्याप्रमाणे निल्लीच्या ओठावर पानाची काजळी जमत होती. तेव्हा तर निल्ली भलतीच देखणी दिसायची.

बेकार पोरे निल्लीसाठी मरत होती, झुरत होती. कल्याणच्या हाजी मल्लंगला नवस

करीत होती. त्यांची मागणी होती, 'एवढी बरबाद्याची निल्ली मिळू दे!' परंतु कोणताही देव त्यांना पावत नव्हता. निल्ली डोळेभर दिसतसुद्धा नव्हती. पोरे गोंडा घोळत होती, पण निल्ली पान खाऊन फक्त थुंकत होती. आणि जर एखाद्या उर्मट पोराने निल्लीची छेड काढली, तर मग बरबाद्याची काठी बाहेर निघत होती आणि ती काठी त्या पोराच्या घरादाराचा बुकणा करायची.

एकदा दुपार झाली होती. सर्व लोक आपल्या पोटाच्या पाठी निघून गेले होते. कोणी येत होते. ऊन धगधगत होते. बायका चऱ्हाटे वळीत होत्या. म्हातारी माणसे खोपटाची राखण करीत होती. लहान पोरे आईवडील येण्यापूर्वी विडीची तलफ भागवून घेत होती. कोणी छापकाटा खेळत होती. कोणी शिव्या देण्याचा सपाटा चालवत होती. सारी वस्ती भकास दिसत होती. तिच्यावर उन्हाच्या झळा घोटाळत होत्या. जणू ती वस्ती गरम नि:श्वासच टाकीत होती.

मेलेल्या कोंबड्यांच्या, बदकांच्या पंखांचे ढीग वारा विस्कटत होता. पालांची पाखी लटलटत होती. लहानशी वाऱ्याची झुळूक त्यांना कापरे भरवत होती. दारातले डबे उन्हाने तापले होते. जागोजाग असलेले राखेचे ढीग उठून उभे राहत होते.

एखाद्या घळीत वाघ पडावा तसा बरबाद्या पालात पडला होता. त्याची बायको चहा करीत होती. निल्ली आणि दुल्ली तिच्या बाजूला बसल्या होत्या.

'काय बरबाद्या! काय करतो?' बरबाद्याचा शेजारी दल्लाराम उघडा बोडकाच दारात आला होता. त्याने वाकून विचारताच बरबाद्या गुरकला,

'काय रं! काय म्हणतोस?'

बरबाद्याची सर्व दृष्टींनी एकटा दल्लारामच बरोबरी करीत होता. पण बरबाद्या त्याला भीत नव्हता.

'बरबाद्या, एक गोष्ट बोलू?'

'अरे काय? बोल ना. आन् असा बाहेर काय खडा? आत ये ना.' बरबाद्या पडूनच म्हणाला.

दल्लाराम आत आला. जवळ बसत गंभीर चेहरा करून म्हणाला, 'तुझी निल्ली माझ्या सैद्याला देतो?'

'काय देणार?'

'तूच बोल, काय घेणार?' दल्लाराम म्हणाला.

'हे पाहा. पाच शंभर आनी....'

'बस बस!' दल्लारामने बरबाद्याला मध्येच अडवून म्हटले, 'आरे, पाच शंभर? पुढं बोलूच नको.'

बरबाद्या उठून बसला आणि म्हणाला, 'आरे का साला बोलू नको?' त्याने निल्लीचे

तोंड वर करून दाखवत म्हटले, 'ही निल्ली आहे का आरसी?'

'मग साल्या, माझा सैद्या काय कमी हाय?' दल्लारामने नाक फेंदारून प्रश्न केला.

'आरे जा! मोठा आला सैद्याचा बाप! आरे त्यो सैद्या माणूस हाय का माकड?' बरबाद्याने आपल्या भावी जावयाबद्दल प्रश्न केला.

आणि दल्लाराम म्हणाला, 'हे पाहा, दोन शंभर घेतो का?'

'काय? दोन शंभर? कबूल!' बरबाद्या दल्लारामाच्या हातात हात दिला.

लगेच दल्लाराम बाहेर पडला. 'ओरे! इधर आव! ओरे! इधर आव !' असे ओरडून त्याने लोकांना जमवले आणि सांगितले, 'बरबाद्याने आपली निल्ली माझ्या सैद्याला दिली.'

सर्वांना पानपट्टी मिळाली.

दुसऱ्या दिवशी जमात जमली. मोठे पुढारी आले. बरबाद्याला दोनशे रुपये मिळाले आणि दल्लारामाचा हळकुडा, जळक्या तोंडाचा, बगळ्यासारख्या मानेचा, भला उंचच्या उंच सैद्या नवरदेव झाला.

हळदी झाल्या, लग्न झाले.

तारुण्याने बहरलेली, मोराप्रमाणे नाचरी, आपल्या सुंदरतेचा बेहद्द गर्व करणारी ती निल्ली, दल्लारामाची सून व सैद्याची पत्नी झाली, आणि सासरी गेली.

मुलीने दिल्या घरी किंवा व्याल्या घरी मरावे हा नियम त्या जमातीला लागू नव्हता, तर मुलीने दिल्या घरीच जन्मभर राहावे असा दंडक होता. तिथेच तिने मरायचे होते आणि तशी मरायला निल्ली गेली म्हणजेच शेजारच्या पालात गेली. बरबाद्याची सत्ता मात्र तिच्यावर मुळीच उरली नाही.

निल्ली नांदत होती. महिने येऊन जात होते. सैद्याला ताप येत होता. त्याचे शरीर खचत होते. तो खोकत होता. त्याला झोप येत नव्हती. दल्लारामाने त्याला दवाखान्यात नेले. डॉक्टरने तपासून सांगितले, 'याला क्षय झाला आहे. याला कोरडी हवा मिळावी म्हणून बाहेरगावी पाठवा.'

परंतु दल्लारामला गाव नव्हते आणि त्याच्याजवळ पैसा नव्हता. मग सैद्या कुठे जाणार? तो झुरू लागला. मनाशी म्हणू लागला, 'आपणाला क्षय झाला आहे. आपण जगणार नाही.' बरोबर सहावा महिना उगवला आणि सैद्याने डोळे झाकले.

निल्ली रंडकी झाली. तिचे तारुण्य रंडके झाले. तिची फसवणूक झाली. परंतु जरी नवरा मेला, जरी निल्ली विधवा झाली तरी तिला सासऱ्यापाशीच जन्म काढावयाचा होता. जन्मभर तिला त्याच घरी राहणे भाग होते. वाटेल ते करून दिल्याघरी मरणे अवश्य होते. मग ती काय करणार? जमातीचा नियमच तसा होता.

निल्ली विधवा झाल्याने बरबाद्याला वाईट वाटले, पण तो काय करणार? दोनशे रुपये घेऊन तो मोकळा झाला होता. त्याची निल्लीवर सत्ताच नव्हती. ती फक्त

दल्लारामची होती.

निल्लीही दिल्या घरी नांदू लागली, परंतु तिचे तारुण्य तिला हैराण करू लागले. तिच्या कोमल भावना तिला निजू देईनात. ती मनात झुरू लागली. ती खिन्न झाली होती. कसल्या तरी झळा तिला लागत होत्या. चटके बसत होते.

अजून किती वर्षे आपण या घरात अशीच काढणार? हा जन्म कसा जाणार? या चिंतेने ती होरपळून निघत होती. जणू तिच्या नुकत्याच फुलणाऱ्या कळीवर निखारा ठेवला गेला होता.

समोरच्या पालातला हैदऱ्या निल्लीकडे सारखा पाहत होता. रोज तासन तास टक लावून पाहत होता. निल्ली जेव्हा जेव्हा त्याच्याकडे पाही तेव्हा तेव्हा त्याचे डोळे तिच्यावर रोखलेले असत. त्याच्या नजरेला नजर भिडताच निल्लीला कसनुसेच वाटे. तिच्या हृदयात विलक्षण लहर तरंगत राही.

पुढे पुढे हैदऱ्याच्या नेत्राला नेत्र भिडताच निल्लीच्या अंगात विद्युतसंचार होऊ लागला आणि ती मग हैदऱ्याचाच विचार करू लागली.

एका अंधाऱ्या रात्री गडद काळोखात निल्ली गडप झाली आणि सकाळी त्या वस्तीत हाहाकार उडाला.

अज्ञान, दारिद्र्य, लाचारी आणि तारुण्य यांचे भयंकर मिश्रण होऊन त्यांचे हालाहल निर्माण झाले आणि त्याने निल्लीला त्या वस्तीतून नाहीशी केली.

सकाळीच बरबाद्या उठून जवळच्या संडासमध्ये कपडे धुऊन स्वच्छ करीत होता. त्याने पैरण वाळत लावली होती आणि पागोटे धुवायला घेतले होते. त्याला दोन आडवेतिडवे सुपके देऊन नंतर तो लुंगीवर वळणार होता.

इतक्यात पालात बोंबाबोंब उठली, 'ओ — दय्या मऱ्या रे! जी दय्या मऱ्या रे!' अशी ओरड सुरू झाली आणि दुल्ली धावत आली. 'आरे बा! दुल्ल्याने घर मोड्या!' दुल्ली म्हणाली.

आणि बरबाद्या उठून उभा राहिला. त्याने लुंगी वर धरून धूम ठोकली. अगदी वाऱ्यासारखा तो पालात आला. त्याने पालात शिरून आधी आपली काठी काढली. त्याचे पाल खरेच पेचकटून पडले होते. बरबाद्याने दल्लारामकडे डोळे फाडून पाहिले. काही विचारले नाही. सरळ काठी फिरवली आणि हाणामारीला सुरुवात केली. दुसऱ्या झपाट्यात दल्लारामचा देह धरणीला पडला. सर्वत्र बोंब उसळली. दल्लाचे भाऊबंद उठले. त्यांनीही काठ्या काढल्या आणि ते बरबाद्यावर तुटून पडले.

वीस-पंचवीस लोकांत एकटा बरबाद्या घुसला आणि एकेका दणक्यात एकेक गडी खाली पडू लागला. एक कडाका पालावर मारून त्याचे कंबरडे मोडू लागला. तुडवू लागला. ओरडू लागला. त्याच्यावर चारी बाजूंनी मारा होत होता. दुल्ली रडत होती. तिची

आई बोंबलत होती. बरबाद्या ज्याला खाली पाडेल त्याची माणसे बोंबलत होती. बोंबेत सारखी भर पडत होती.

शेवटी चहूबाजूंनी मारा होऊन, बरबाद्या दमून रक्तबंबाळ होऊन खाली पडला. मारामारी बंद झाली. पण रडारडी चालू होती. बरबाद्याची बायको 'मऱ्या रे दय्या!' अशी ओरडत होती.

संध्याकाळ झाली. त्या वस्तीवरचा प्रकाश नाहीसा झाला आणि भेसूर अंधाराने झडप घेतली. सर्वत्र काळोख दाटला. हजारो जीव त्यात गडप झाले. पार एकमेकांना दिसेनासे झाले. फक्त माणुसकीला साथ देणारे आणि त्या हजारो जिवांप्रमाणे किणमिणत जळणारे दिवे पेटले.

बरबाद्याची पंचायत बसली. मोठमोठे पंच जमले होते. निरनिराळ्या झोपड्यांतून ते आले होते. पंच, सरपंच, फर्डे बोलणारे, जन्मभर जमातीचा न्याय निवडणारे, सर्व जमले.

दुसरे कोणीही नव्हते. भारतीय संस्कृतीचे मिरासदार, तरफदार, वारसदार यांपैकी कोणीही नव्हते. ते जगच निराळे होते. ते संस्कृतीला माहीत नव्हते. परंतु आशियाच्या एका मोठ्या देशाच्या — भारताच्या राजधानीच्या — मुंबापुरीच्या अगदी जवळ ते जग होते.

जगप्रसिद्ध लेबर कँपजवळ, त्या ओसाड जागेत बरबाद्याचा खटला उभा राहिला होता. डोकीला पट्टी बांधलेला दल्लाराम, सारे पंच, त्याची बायको एका बाजूला बसली होती. रक्ताने न्हालेला बरबाद्या हातात ठोमका घेऊन एका बाजूला उभा होता. त्याची गुर्मी तिळभरही ढळली नव्हती. सर्वत्र नि:शब्दता पसरली होती.

'हं, बरबाद्या बोल! तुझी निल्ली हैदऱ्याला घेऊन गेली हे खरं हाय का?' एका पंचाने सवाल केला.

'अरे साल्या, मी काय तिला जायला सांगितलं काय?' बरबाद्याने एक शिवी हासडून पंचाला उत्तर दिले.

पंचाला धक्का बसला. तो भडकून गेला. निल्लीने केवढा अन्याय केला होता! मनुष्यप्राण्यांच्या उत्पत्तीपासून चालत आलेला नियम तिने मोडला होता. नवरा मेला तरी सासऱ्याजवळ नांदण्याचा कायदा तिने मोडला होता. असे असून हा सैतान बरबाद्या उलट बोलत होता. पंचांना 'साल्या' म्हणत होता. हे सर्वच त्यांना नवे वाटत होते. सर्वच लोक बरबाद्यावर खवळून उठले. बरबाद्याने काठी सरळ केली. दगडावर आपटून आवाज काढला. पुन्हा सर्व शांत झाले. पुन्हा पंच म्हणाला,

'ए भडव्या! निल्ली गेली की नाही?'

'तुझा बाप भडवा! डुकराची अवलाद बेट्या! आरे साल्या, तो हरामजादा सैद्या मेला, नरकात गेला, म्हणून माझी निल्ली गेली!' बरबाद्याने कच्चा जवाब दिला आणि लगेच

दुसरा पंच पुढे उडी मारून म्हणाला,

'निल्ली गेली हे तुला कबूल हाय का?'

'सैद्या मेला हे तुला कबूल हाय का?'

'कबूल!' पंच उत्तरला.

'मग माझी निल्ली गेली, मला कबूल!'

'कबूल? मग काढ दोन शेंबर दंड,' मध्येच एक पंच म्हणाला.

'सैद्या का मेला ते आधी सांग!' बरबाद्या ओरडला.

उशीर गप्प बसलेला एक पंच येऊन म्हणाला, 'दल्लाराम, सांग, सैद्या कसा मेला?'

आणि मग दल्लाराम उठून हात जोडून म्हणाला, 'मी आपलं लेकूर हाय बापांनो!'

सर्वांनी माना डोलावल्या.

दल्लाराम पुढे म्हणाला, 'पोराला वाईट बिमारी झाली. डॉक्टरानं जागा बदल म्हणून सांगितलं. पन आपुन कंजारी लोकं कुटं जानार? गाव नाही शीव नाही, जिथं ऱ्हातो तेच गाव. शेवटी पोरगा मरून गेला. म्हणून काय याच्या निल्लीनं पळून जावं का?'

दल्लाराम खाली बसला आणि बरबाद्या उठला. तो मोठ्याने म्हणाला,

'मग तुझा पोरगा मेला नसता तर माझी निल्ली गेली असती का? बोल!'

'मग काय तिची हिंमत होती जायची?' दल्ला उत्तरला.

'मग टाक दोन शंभर तूच दंड.' बरबाद्या ओरडला.

'वा रे वा! मोठा बारीस्टरचा बेटा आलास दोन शंभरा दंड मागणारा!' एक पंच म्हणाला आणि बरबाद्यानं पुढे होऊन त्या पंचाच्या मिशीचा झुबका मटकन धरला नि हलवीत तो म्हणाला, 'आन तू मोठा मॅजिस्टरचा बेटा आलास मला दोन शंभरा दंड मागणारा!'

तेव्हा एक पंच काखेत कुबडी घेऊन उड्या मारीत पुढे आला. त्याचा एक पाय आणि एक हात त्याने पहिल्या महायुद्धात जर्मनीच्या कैसरला अर्पण केला होता. तो शांतपणे म्हणाला,

'बरबाद्या, ही पंचकी आहे. सरळ सांग, तुला म्हणायचं तरी काय?' कुबड्याने प्रश्न करून बरबाद्यावर नजर रोखून ठेवली तेव्हा बरबाद्या म्हणाला,

'मी दंड देणार न्हाय...'

तेव्हा तो लंगडा पंच भडकून दल्ल्याकडे फिरून चिरकला, 'दल्ल्या, बरबाद्या साला डुकराची आवलाद आहे. या भडव्याचा कानच कापला पाहिजे...'

'तू कुत्र्याचं मूत आहेस!' बरबाद्या डोळे फिरवत म्हणाला, 'सरळ बोल नाही तर तुझी दुसरी तंगडी गमावून बसशील!'

बरबाद्याची ती धमकी ऐकून तो लंगडा पंच नरमला. तो आवाज खाली घेऊन म्हणाला,

'ही जमात आहे नि हे पंच आहेत, तेव्हा तू जरा तोंड आवरून बोल.'

'मग कसा बोलतोय मी?' बरबाद्याने पुन्हा आवाज चढवला. तो सर्व पंचांना उद्देशून म्हणाला, 'हे पहा पंचलोक, तुमच्या पोरींचे नवरे मेले असते आणि मग त्या पोरी पळून गेल्या असत्या तर तुम्ही काय केले असते? याचा आधी जबाब द्या.'

'आम्ही काय करणार? आम्ही गप्प बसलो असतो.' सर्वांनी एकच जबाब दिला. तेव्हा बरबाद्या एका पंचासमोर उभा राहून त्याला म्हणाला, 'तुझे पाच जावई मरून तुझ्या पोरी पळून गेल्या असत्या तर तू एक हजार दंड दिला असतास का?'

'इतके पैसे कसं? ते कठीण होतं.' तो पंच खजील होऊन म्हणाला.

'मग चोरा, मला पैसे दे म्हणून कसं रे सांगतोस?' बरबाद्या भडकून म्हणाला, 'जा, मी दिडकी देणार नाही. हा साला दल्ल्या. याला कुठं घर असतं तर आपल्या पोराला हवा बदलाय हा घेऊन गेला असता. मग तो सैद्या मेला नसता आणि माझी निल्ली पळून गेली नसती.' असं म्हणून तो दंड ठोकून मिश्यांना पीळ भरू लागला.

'मग आम्ही आता तुझा कान कापणार. हुक्कापाणी बंद करणार नि तुला पंचकीला घेणार नाही!'

'कापा साल्याचा कान...' सर्व पंचांनी ओरडून निर्णय दिला, तेव्हा बरबाद्या त्यांच्यापेक्षा चढ आवाज काढून गरजला,

'नरकात जावा साल्ल्यांनो! कापा माझा कान, मी तुम्हाला डरत नाही. म्हणे कान कापणार!'

मग एका पंचाने वस्तरा घेतला. त्याने तो तळहातावर पाजळला. नंतर वस्तऱ्याची धार आंगठा फिरवून पाहात तो म्हणाला,

'हे बघ बरबाद्या, आम्ही तुला खतम करू. अजून पंचांना शरण येऊन दंड भर आणि मोकळा हो. नाही तर मरशील.'

'माझी खोपडी फिरवू नका.' बरबाद्या चिडक्या आवाजात म्हणाला, 'मला धमक्या देऊ नका. मी हॉटेलात चाय पीन, मी संडासातल्या नळावर पाणी भरीन. तुमच्या पंगतीला येणारच नाही.'

'बरं मग ठीक. कापा त्याचा कान नि फिरू द्या साल्याला मुंडा होऊन.' एका पंचाने घाई करीत म्हटले. तोच दुसऱ्याने एक कुत्रे धरून पुढे आणले. सर्वांनी त्या कुत्र्यावर अबीर-गुलाल उधळला. तेव्हा जमलेले सर्व लोक भीतियुक्त सुरात बोलू लागले, 'आता बरबाद्या मुंडा होणार.'

'त्या कुत्र्याचा कान कापा!' मुख्य पंचाने हुकूम सोडला.

'ठीक, कापा-' बरबाद्या काळोखात गुरकला, 'कापा डुकरांनो, माझा कान कापा-'

तसा एका पंचाने दिवा पुढे आणला, दुसऱ्याने कुत्रे पुढे ओढले नि तिसऱ्याने त्याचा

कान चिमटीत धरला आणि वस्तऱ्याने तो खसकन कापला. त्याबरोबर ते कुत्रे मोठ्याने केकटू लागले. त्याच्या कानातून रक्ताची धार गळू लागली नि ते भीतीने वेडेपिसे होऊन कान झाडीत पळत सुटले. सर्वत्र दु:खाची छाया पसरली नि सर्व लोक गंभीर झाले.

उशिराने एक पंच म्हणाला, 'आजपासून बरबाद्या वाळीत पडला. त्याचे हुक्कापाणी बंद. यापुढे त्याचा रोटी व्यवहार, बेटी व्यवहार बंद!'

मग सर्व लोक घरोघर गेले. बरबाद्याही घरी परतला. तो स्वत:शीच बोलत होता, 'या चोरांना माझा कान कापून नि मला वाळीत टाकून आनंद झाला असेल! मोठं भूषण वाटलं असेल! पण त्यांना त्यात काय मिळणार आहे? त्या साऱ्यांना पिलेग होत नाही! यांच्या रांडा रंडक्या का होत नाहीत? ठीक. मी बरबाद्या आहे. मीही त्या साल्यांचे कान नाही कापले तर नावाचा बरबाद्या नव्हे!'

सर्व लोक झोपले होते. पण बरबाद्या कंजारी जागा होता. तो बडबडत होता. काल त्याने पंचांचा निर्णय झुगारला होता. असे पूर्वी कधीच झाले नव्हते. जमातीच्या पंचांविरुद्ध बंड करणे सोपे नव्हते नि बरबाद्याने तेच केले होते. तो स्वत:चा विजय समजून बडबडत होता. मध्यानरात्र उलटून गेली. मग त्याला झोप लागली. रातकिड्यांच्या किरकिरीने वातावरण भरून गेले. त्या वस्तीतील सर्व लोक झोपले होते. तरी त्यांची मने मात्र बोलत होती, लढत होती, कढत होती नि उसासे टाकीत होती.





'बेकायदेशीर' वगामधील अण्णा भाऊ



पंचविशीतले अण्णा भाऊ



लालबावटा कलापथक (१९४४). डावीकडून गणपत सातपुते,
मनु कारखानीस, घोंडी तळसंदेकर, शाहीर अमर शेख.
शाहीर अण्णा भाऊ आणि शाहीर गव्हाणकर
टिटवाळा येथील शेतकरी परिषदेत



संयुक्त महाराष्ट्राची हाक महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यांत घुमविणारी
लालबावटा कलापथकाची त्रिमूर्ती
शाहीर अण्णा भाऊ, शाहीर अमर शेख आणि शाहीर गव्हाणकर



'फकिरा' चित्रपटात 'सावळ्या'च्या भूमिकेत अण्णा भाऊ साठे



महाराष्ट्राचे दोन शाहीर – अमर शेख व अण्णा भाऊ!



**लोकशाहीर अण्णा भाऊ साठे**

जन्म : १ ऑगस्ट १९२०

मृत्यू : १८ जुलै १९६९

# सापळा

'लेका म्हारांनी पायरी सोडली, त्येस्नी आता गावाचा इंगा दाखवू या. न्हाय तर म्हार जात डोक्यावर बसंल.' असं सांगत दादा देशमुख आळीपाळीने फिरला.

त्यानं महारांविरुद्ध आग पेटवली आणि एकदम भडका उडाला. उभा गाव पिसाळला. महारांवर इंगा फिरवण्याची भाषा जो तो बोलू लागला. 'महारवाड्यावरून गाढवाचा नांगर फिरवीन, तरच नावाचा दादा देशमुख!' अशी दादानं डिरकी ठोकली. एकूण एक लहानथोर चावडीवर जमले. महारांना घेऊन येण्यासाठी बज्या रामोशी दांडलला गेला आणि चावडीवर महार आले की त्यांना झोडपून काढण्याचा विचार करीत गाव बसला.

कारण दादा देशमुखाच्या वाड्यात मरणकळाच पसरली होती. आज दोन दिवस देशमुखाचा एक प्रचंड बैल मरून दावणीत पडला होता. तो लोखंडाप्रमाणे ताठला होता आणि भोपळ्याप्रमाणे फुगून डोळे वटारून पडला होता. भुंग्यासारख्या मोठाल्या माश्यांनी त्या बैलावर झाकळण घातलं होतं. तो मेलेला बैल पाहून देशमुखाची बायको-पोरं हवालदिल झाली होती, भयभीत झाली होती. दादा रडकुंडीला आला होता. आपला बैल मेला याचं दु:ख होण्याऐवजी त्याचा तो मृतदेह आज दोन दिवस वाड्यातून हालत नव्हता याचंच त्याला भयंकर दु:ख झालं होतं, आणि त्याच्या दु:खाला गरीब महार आणि त्याची भावकीच जबाबदार होती म्हणून तो चिडला होता.

कारण महारांनी मेलेली ढोरं ओढण्याचं एकाएकी बंद केलं होतं. म्हणून देशमुख महारांच्या नावानं खडे फोडीत होता. त्यानं शेवटी दत्ता पाटलाला भडकावून दिला होता. महारांशी सामोपचारानं बोलून भागणार नाही, एकदम जोडाच काढला पाहिजे, असं तो सर्वांना सांगत होता. दत्ता पाटील हा पोलीस पाटील न्यायनिवाडा करून महारांना शासन करण्यासाठी टपला होता. तो डोळे झाकून बसला होता. आता महार लोक आले की आपण कसं बोलावं याचा तो विचार करीत होता. शब्द जुळवत होता. गुणपाल शेट्ये गाल फुगवून महारांची वाट पाहत होता. तो जमलेल्या सर्व बड्या धेंडांना महारांच्या अन्यायाची कथा आणि तिचे भावी परिणाम सांगत होता. महार जर नमले नाहीत तर उभ्या गावाचा महारवाडा होईल असं तो सर्वांना पुन:पुन्हा सांगत होता.

आणि सर्वांच्या डोळ्यांपुढे देशमुखाचा तो मेलेला बैल तरळत होता. त्यामुळे सारा गाव दबकला होता. या बैलानं सर्वांची मती गुंग करून सोडली होती; आणि खरंच तिथं जमलेला प्रत्येक माणूस मनात म्हणत होता, जर आपली ढोरं दावणीत मरून पडली

तर काय होणार? नुकसान होईल ही गोष्ट ते आपोआप विसरूनच जात. ती जर महारांनी ओढली नाहीत तर स्वत:लाच ती ओढावी लागतील याचीच भीती त्यांना पडली होती. आणि म्हणूनच सारी डोकी गरम झाली होती. एकेरीवर आली होती. जनावर मरून पडलं, परंतु त्याच्या मृत देहाशेजारी बसून अन्न कसं खावं याच एका विचारानं सर्वांचे चेहरे काळवंडले होते आणि रागावले होते.

गुंडा चाळका मध्येच उठून म्हणाला,

'मंडळी, म्हातारी मेल्याचं दुख न्हाय. पण काळ सोकावतोय ह्येचा आज इचार झाला पायजी. म्हारांस्नी ठोकून...'

इतक्यात पाटील डोळे उघडून म्हणाला, 'म्हंजी असं, ढोरं मरू द्या, पर म्हारं डोस्क्यावर बसू देऊ नका. असंच न्हवं?'

'हो, हो, असंच.' चाळका मोकाट मान डोलवीत म्हणाला, 'ह्या उभ्या गावात दत्ता पाटलावानी शेना मानूस कवा झाला नव्हता. माझं बोलनं त्येनी चटकन हेरलं. आता तेवढा महारांस्नी इंगा दाखवू या म्हंजी झालं.' 'इंगा' या शब्दावर त्यानं जोर दिला.

'दाखवलाच पायजी.' देशमुख नाक फुगवून आणि आवाज उंचावून म्हणाला, 'जातीनं पायरी सोडली. कुत्रं, मांजरं, जनावरं नव्हं नि मांग, म्हार मानूस नव्हं ही वडिलांची म्हन हाय. पर ह्या भडविच्यांनी माझ्या दावनीत बैल कुजाया लावलाय. पोरंबाळं नुसती हंबकुटी आल्याती, शंदडावानी बैल फुटण्याची वेळ आलीया. नि म्हाताराचा डोळाच उघडंना...'

'वाईच कड काडा', दत्ता पाटील म्हणाला, 'म्या सारी म्हारं गोळ्या घालून हुंबरावानी पाडली असती. पर काय करू. माझा बैल मरंना गा.'

एवढ्यात महारांना बोलावण्यासाठी गेलेला वज्या रामोशी एकटाच आला. तो रिकामाच आलेला पाहून देशमुखाचे पित्त खवळले. तो रामोशावर बिथरून म्हणाला,

'ए बेरडा, काय रं म्हनती म्हारं?'

'येत्याती न्हवं का?' रामोशी उत्तरला आणि सुतारानं पडल्या आवाजात विचारलं,

'ए नाईक! ती म्हारं भेदरली असतील न्हाय काय?'

'ती का भेदरत्याती?' रामोशी म्हणाला, 'त्येनी का दरुडा घातलाय! का कुनाचं घर फोडलंय?''

'ते बी खरं हाय!' शंकऱ्या सुतार पुटपुटला. त्याचा कण्हत निघालेला सूर ऐकून शेजारचा पांडू न्हावी तरकटला,

'काय खरं हाय रं शंकऱ्या! मग ही मेलेली ढोरं का आपल्या बानं वोढायची?'

न्हाव्याच्या चढत्या आवाजाने पाटलाची मान वर झाली. तो सर्वांना धीर देत म्हणाला,

'मंडळी, गप्प बसा. बाचू नका.'

एवढ्यात सारी महारं जमून आली. त्यांना पाहून गावकरी आपसात कुजबुजले. खाकरून सरळ झाले. कुणी मारामारीची तयारी केली. सर्वांचे डोळे महारांवर फिरले. त्यांनी हरीबा महाराला पाहिला आणि सर्वांनी पापण्या पाडल्या. सर्व महार समोरच बसले, आणि गावकरी एकमेकांच्या तोंडाकडे पाहू लागले. पाटील, शेटे, चाळका, देशमुख ह्यांनी माना ताठ केल्या. आजूबाजूला कुजबूज वाढली. ती हातानं शांत करीत पाटील म्हारांना म्हणाला,

'हं, बोला गा म्हारांनो, ह्ये भूत का बरं उठवलंय? आता आम्ही गावानं ढोरंगुरं पाळावी का नगं बोला?'

हे ऐकून हरीबा महार शांतपणे म्हणाला,

'पाळावी की. ज्येच्यात गुरं पाळाय बळ असंल तेनं खंडीनं पाळावी. आम्ही का नगं म्हनतुया?'

'तू नगं म्हनीत न्हाईस', पाटील म्हणाला, 'आता रीतीनं बोला. ढोरं पाळावी म्हून सांगतूस नि मेल्याली ढोरं वढीनास, ह्येचं नाव काय?'

'ह्येचं नाव सांगू?' हरीबा म्हणाला, 'ढोरं तुमची, दूध तुमी खायचं. बैल तुमचं, जितंपणी तुम्ही वैरणकाडी घालायची. त्या ढोरानं तुमची औतकाटी वढायची; आनि जिती ढोरं मेली की आम्हास्नी फुकट रोजगार?'

'म्हंजी तुमची ढोरं आम्ही वढावी—' बाळू महार मध्येच म्हणाला, आणि पाटील बोलणार तोच देशमुख ताडकन उठून म्हणाला,

'आरं ए शेन्याच्या कांद्या, आज पातुर त्वा मेल्याली ढोरं का वढलीस, बोल?'

'वढली की. आम्ही न्हाय कवा म्हनतुया?' हरीबा म्हणाला, 'पर तवा आस्मानी कळत नव्हतं. आता कळतंया, हो— '

'काय कळतंया रं शेन्या?' शेटा मान वाकडी करून गुरकला, 'आरं, देवानंच तुला मेल्याली ढोरं वढायपाई म्हार केलाय.'

'असं का?' हरीबा पागुटं मागं सारून शेट्यावर बिथरला - 'कंच्या देवानं आमास्नी म्हार केलं व? मग जावा नि त्या देवालाच म्हनावं, चल वढ ती ढोरं. जा.'

'आता वं? ऐका रं गावकऱ्यानुं -' देशमुख किंचाळत म्हणाला, 'ऐका, ह्यो महार कसा आडवा तंडाय लागलाय बघा. हऱ्या, आडवा बोलू नगं.'

'मी सरळच बोलतुय—' हरीबा म्हणाला आणि पाटील गुरकला,

'मग देशमुखानं काय करावं बोल!'

'मी काय सांगू?' हरीबा महार म्हणाला, 'देशमुखानं पायजी तर त्येचं—'

'अरं काय करावं—' पाटील मध्येच खेकसला. 'काय करावं, काय लोंचं घालावं? सांग की.'

'पायजी तर दावनीत पुरावा.' हरीबा म्हणाला, 'जिता व्हता तवा वैरण घातली, शान काढलं, नि आता पुरायला भ्या वाटतंय? पुरा की म्हनावं.'

सर्व मंडळी एकदम बोलू लागली. सर्वत्र कालवा सुरू झाला. हाणामारीला तयार झालेली माणसं ऐकत बसली. कुणाचाच धीर झाला नाही. आणि आता शेवटी आपापली जनावरं गोठ्यात पुरावी ही हरीबाची सूचना ऐकून सारेच गोंधळात पडले. परंतु हरीबाचं बोलणं देशमुखाच्या काळजालाच भिडलं. तो उठून एक हात कमरेवर ठेवून वाकला, नि एका हाताची मूठ उलटी तोंडापुढं धरून रडक्या सुरात म्हणाला,

'ए हऱ्या म्हार! आता तुझ्या म्होरं बोंबलू का?'

'बोंबला, पर एका बाजूनं बोंबला.' हरीबा म्हणाला.

'म्हंजी मी दोन्ही बाजूनं बोंबलतोय? त्ये कसं, सांग बरं?' देशमुख म्हणाला, आणि साऱ्या गावानं विचारलं,

'ए हरीबा, नीट बोल. दोन्ही बाजूनं बोंबलू नगा म्हंजी काय रं?'

'म्हंजी असं,' हरीबा चढत्या सुरानं म्हणाला, 'आम्ही ढोरं वढली म्हंजी बी बोंबलताय नि वढीना म्हनलं म्हंजी बी बोंबलताय—'

आरं पर कसं त्ये सांग?' चावडी ओरडली नि हरीबा म्हणाला,

'तुम्ही आमास्नी शिवून का घेत न्हाय?'

'तुम्ही घान काम करता रं,' पाटील हुंकारला.

'म्हणून आम्ही ते सोडलं आता—' हरीबा उत्तरला.

'तुमच्या वडिलांनी ढोरं वढली व्हती, त्येचं काय?'

'आनि तुमच्या वडिलानं पाडळीचा दरुडा केला व्हता, त्याचं काय?' हरीबानं विचारलं नि पाटील चाचरत म्हणाला,

'सरळ बोल.'

'न्हाय बोलत.... आपापली ढोरं वढा, आमास्नी सांगू नका', असं म्हणून हरीबा उठून वाटेला लागला. सारी महारं त्याच्या पाठीमागून चालू लागली. गाव एकदम गप्प झाला. पाहात राहिला.

आता महारांच्या अंगातील पीळ असातसा निघणार नाही, काहीतरी जालीम उपाय करूनच महारांना नमवलं पाहिजे, त्यांचा दारकोंड झाला पाहिजे, नाकेबंदी झाली पाहिजे. महाराचं माणूस रानात हिंडू देऊ नका, जनावर फिरकू देऊ नका. भडाडा जनावरं कोंडात घाला. कुणाला गावात दुकानावर उभं करू नका; याचाच विचार झाला आणि असंच करायचं असा निर्धार करून महारांभोवती सापळा लावण्याचा विचार करीत बैठक मोडली.

ती सारी माणसं तशीच दादा देशमुखाच्या वाड्याकडे गेली. दोन दिवसांचा ताठून

पडलेला बैल त्यांनी पाहिला आणि मग पुन्हा सर्वांनी विचार केला. मग वीस गड्यांनी तो बैल वाड्याबाहेर काढला. आणि रिकाम्या बैलगाडीत ते धूड कसं तरी चढवलं आणि बैल जपून ती गाडी रानात नेली. पुढं दहा गड्यांनी मोठा डबरा काढला होता. त्यात शेवटी तो बैल त्यांनी लोटून दिला. सर्वांनी घाम गळेपर्यंत माती ओढून तो खड्डा बुजवला नि सुटकेचा निःश्वास टाकला. चार महारांचं काम त्याला उभा गाव लागला नि दमला, तेव्हा कुठे तो बैल मातीआड झाला.

गावातील ती सभा सोडून हरी महार महारवाड्यात आला आणि गंभीर आवाजात म्हणाला,

'केश्या, बाळ्या, ती कावडनी आना.' त्याबरोबर ती मेलेली ढोरं ओढण्याची कावडनी आणि आरुसं घेऊन केसू महार आला, आणि पुन्हा हरीबा म्हणाला,

'लाकडं फोडायची कुऱ्हाड घ्या.'

बाळूनं कुऱ्हाड आणली आणि विचारलं, 'आनली कुऱ्हाड, काय करू म्हणता?'

'फोडा की कावडनी. बारीक करा.' हरीबानं हुकमी स्वरात सांगताच बाळ्यानं कावडणीचा बुकणा केला आणि त्याचा ढीग करून हरीबाने त्याला आग लावून दिली. त्या जळत्या आगीत ते आरुसं टाकून हरीबा म्हणाला, 'ही कावडनी घेऊन आपल्या वाडवडिलांनी जन्मभर मेल्याली ढोरं वढली. आज आपून ती कावडनीच जाळून टाकली. आता परत मेल्याल्या ढोराला हात लावायचा न्हाय. टाचा घासून मरू या. पर मानानं मरू या. ढोरं वढतो म्हून आम्ही कुत्र्यावानी ठरलोय.'

साऱ्या गावानं जमून देशमुखाचा बैल गाडला आणि ढोरं ओढण्याची, वाहून नेण्याची कावडणी महारांनी जाळून टाकली.

त्या दिवसापासून गावाचं रूपच बदललं. गावची ती बडी माणसं जागोजाग महारांवर टपून बसली. महार कधी पेचात सापडतो याची वाट पाहू लागली. उभ्या महारवाड्यावरच त्यांनी करडी नजर ठेवली. महारांनी ती परिस्थिती जाणली होती. तेही प्रत्येक पाऊल जपून टाकीत होते. कुणाला कसलाही वाव देत नव्हते. दुसऱ्या वावरात पाय देत नव्हते. सर्व काही सावधगिरीनं करीत होते.

परंतु त्यांच्या सभोवती गावाचा सापळाच लागला होता. एखादा लांडगा झुडपात दबा धरून बसावा आणि खांडावेगळं होताच त्यांनी मेंढरू पळवावं तशी स्थिती झाली होती. बांधाच्या आत महारानं पाऊल टाकताच दांडगीसराची काठी फिरू लागली. शेळ्या, मेंढरं, गुरं-ढोरं जे जे त्यांच्या हद्दीत शिरलं त्याला कोंडवाडा दाखवला जाऊ लागला. कोंड भरून महार ऐरमेठी झाले. गावाची आणि महारांची तेढ विकोपाला गेली.

घरापासून शेतापर्यंत महार सरकारी सडकेवरच वावरताना दिसू लागला. त्यांची गुरं उपाशी मरू लागली. तेव्हा सर्व महारांनी तक्क्यात बैठक घेतली. हरबाला बोलावलं.

दारकोंड कसा उठवावा याचा ते विचार करू लागले. सर्व महार दु:खी होऊन हरीबा काय सांगतो ते ऐकू लागले. केसू महारानं प्रथम सुरुवात केली,

'हरीआबा, आता जगायचं कसं? गावानं भलतीच करडी कमान धरली. आता जगनं कठीन झालं.'

त्यावर हरीबा शांतपणे म्हणाला, 'जर आपून उद्या कावडनी घेऊन गावची मेल्याली ढोरं वढू लागलो तर उद्याच आपला दारकोंड उठंल. तवा तुमचं काय मत हाय ते सांगा.'

'छा, छा, तसं कसं?' बाळू म्हणाला, 'तुमचं मत तेच आमचं मत. तुम्हीच सांगा!'

'मग ऐका तर', हरीबा म्हणाला, 'एक मोठं वडाचं झाड व्हतं. त्या झाडाला मुळासकट उपटून टाकायचा ब्येत वाऱ्यानं केला आणि मोठं कावदूर घेऊन वारा आला. तवा झाडानं हेरलं, आता आपून जगत न्हाय. आनि चटकन त्या झाडानं आपल्या साऱ्या फांद्या फेकून दिल्या आनि नुसता खुंटच उभा राह्यला. वारा जोरात आला. पर त्यो खुंट काई हलला न्हाय, तसं त्या झाडावानी आपून बी करू या. खुंटावानी उभं ऱ्हावू या.'

'काय करू या बोला?' सर्वांनी विचारलं. आणि हरीबा म्हणाला,

'आठ दिवसांत समदी शेरडं, मेंढरं, ढोरं इकून रिकामं व्हा बरं त्या झाडावानी, झडझडीत खुंट.'

'ठरलं. बुधवारी बाजारात इकतो आम्ही.' सर्वांनी कबूल केलं आणि हरीबा पुन्हा म्हणाला,

'मी उद्या तालुक्याला जाऊन सरकारात दाद मागतो.'

पहाटेला हरीबा तालुक्याला निघाला होता. तो घराबाहेर पडला तेव्हा अंधारच होता. अजून तोंडओळख झाली नव्हती. नुकताच पूर्वेला उजाळा येत होता. सृष्टी आणि आकाश यांच्यामध्ये प्रकाशमय पट्टा निर्माण झाला होता. ढगांच्या प्रचंड आकृत्या भयाण दिसत होत्या. त्या एकमेकांवर हळूच जाऊन आदळत होत्या. सडकेकडच्या झाडांवर पाखरं किलबिलाट करीत होती. हरीबा मनात चरकला होता. आपण एवढ्या अंधारात घर सोडलं हे बरं झालं नाही असं त्याला वाटू लागलं. तो मागं-पुढं पाहत पाय उचलून माळावर आला. दुतर्फा पळसाच्या झुडपातून चालू लागला.

पळसाच्या झाडांनी त्या माळावर गर्दी केली होती. जागोजाग पळसाची झाडं उभी होती. पारगावचा तो माळ पळसानं प्रसिद्ध होता. तो सरकारी माळ होता. पत्रावळ्या—द्रोण यासाठी गुरव त्या माळाचा लिलाव घेत होते. कैक गुरव त्या माळावर सावकार झाले होते. त्या माळावर कैक खून होत असत. कित्येक चोर दबा धरून बसत नि वाटसरूंना लुटत. कोणीही त्यांची दाद घेत नसे.

दर पाच वर्षांनी त्या माळाचा लिलाव होत होता.

'खुनी माळ', 'पळसाचा माळ' म्हणून त्याला लोक ओळखत होते. गावची गुरं तिथंच

चरत असत.

हरीबा त्या माळाल आला आणि एकदम भ्याला. जवळच दोन गडी दिसले. ते काही तरी बोलत हरीबाच्या पुढं निघाले होते. त्यांना पाहून हरीबानं पाय गाळले आणि त्याच वेळी त्या दोघांनी हरीबाला पाहिलं आणि हाक मारली,

'कोन येतं त्ये?'

'मी हाय हरी — कोन हाय त्ये?'

'आमी हाय. ये की. नारू गुरव हाय मी-' नारू गुरवाचा आवाज ऐकून हरीबाला धीर आला. तो भर्रकन जाऊन त्यांच्यात मिसळून चालू लागला. नारू आणि शंकर हे दोघे तालुक्याला निघाले होते. आजच तालुक्याला पारगावच्या पळसाच्या माळाचा सरकारी लिलाव होणार होता. त्यासाठी ते दोन गुरव रकमा घेऊन निघाले होते. दोघांचे तिघे होताच त्यांनाही बरं वाटलं. दुसऱ्याच्या भीतीमुळं गावाचं नि महारांचं भांडण विसरून ते वाट चालू लागले. परंतु एवढ्या सकाळी हरीबा निघालेला पाहून त्यांना किंचित शंका आली, आणि जेव्हा तो तालुक्याला निघाल्याचे त्यांना समजले तेव्हा तर ते अधिकच विचारात पडले.

तालुक्याला पोचल्यानंतर गुरव लिलावाकडे गेला आणि पारगावावर खटला करण्यासाठी हरीबा चांगला वकील शोधत फिरू लागला. आपली बाजू नीट मांडणारा, आपल्या पोराबाळांचा दारकोंड उठवणारा, असा शहाणा वकील त्याला हवा होता. तो जागोजाग चौकशी करीत मामलेदार कचेरीपुढं येऊन दाखल झाला.

त्या वेळी पारगावच्या त्या पळसाच्या माळाचा लिलाव नुकताच उभा राहिला होता. गावोगावचे फक्त गुरव आले होते. कमरेच्या रकमा सैल करून सवाल चढवण्याची ते तयारी करीत होते. कोण किती चढणार याचा अंदाज घेत होते. आणि सरकारी कारकून जाहीर झालेला आकडा पुन:पुन्हा घोकत होता. एकशे पाच रुपयांपर्यंत एक गुरव चढला होता. बाकीचे एकमेकांकडे तिरप्या नजरेनं पाहत धीर करीत होते.

हरीबा गर्दीत येऊन ऐकत होता. आपणच जर माळाचा लिलाव घेतला तर काय होईल असा विचार त्याच्या डोकीत आला आणि सरकारी कारकून दमून म्हणाला, 'एकशे पाच रुपये एक वार—'

'दोनशे दहा रुपये!' एकदम आवाज आला.

सर्व गुरव गर्रकन फिरले. कित्येक डोळे हरीबावर भिरभिरले. हरीबानं दुप्पट आकडा चढवल्यानं सर्वांना आश्चर्य वाटलं. पारगावचे गुरव त्याच्याकडे पाहतच राहिले. शेजारच्या गावचा एक श्रीमंत गुरव पुढं आला. त्यानं टवकारून आवाज काढला. 'तीनशे रुपये.'

आणि हरीबा ओरडला - 'पाचशे रुपये!' हरीबाच्या त्या आवाजानं सर्वांची ईर्षा आणि

धूम एकदम गारठली.

हरीबाच्या नावाचा लिलाव जाहीर झाला आणि लगेच हरी महारानं कमरेचे पाचशे रुपये भरले.

तो दिवस महारांना भाग्याचा ठरला. त्यांनी आपली गुरं-ढोरं विकण्याचा बेत रद्द केला. सारी पोरंबाळं, आपली शेरडं, मेंढरं पळसाच्या माळाला चारू लागली. महारांना पाय ठेवाय जागा मिळाली. पळसाला पानं तीन असं उपहासानं म्हटलं जातं, परंतु त्याच पळसानं महारांचं जीवन सुखी नि निर्भय केलं; एवढंच नव्हे तर परिस्थितीची चक्रं महारांच्या दिशेनं अती वेगात फिरली, महारांची चढाई सुरू झाली.

पळसाचा माळ म्हणजे पारगावच्या पायाखालची भक्कम जमीन होती. आजपर्यंत गावची गुरं-ढोरं त्या माळावर जात होती. लिलाव घेणारे गुरव फक्त पळसाच्या पानांपुरते पाहत. जमिनीवरचे करड गवत त्यांना नको होते. ते गावच्या गुरांना आडकाठी करीत नसत, खुशाल चरू देत. गावची गुरं जोगवत.

परंतु हरीबानं लिलाव घेऊन डाव उलटवला. माळावर चरायची सवय झालेली गावाची जनावरं कुठंच ठरत नव्हती. दाव्याचं पेंड पडलं की ती त्या माळाला चरू लागत आणि हरीबा एकूण एक जनावरं हाकून कोंडात घालू लागला. महारांचा कोंड वसूल करणारा दत्ता पाटील गावाचा कोंड वसूल करू लागला. दोन वर्षात गाव काजबारला, जेरीला आला.

एकदा दिवस वर आला होता. पळसाच्या माळाला महारांची गुरं चरत होती. हरी महार हातात काठी घेऊन एका पळसाच्या झुडपात बसला होता. एवढ्यात दत्ता पाटलाची बारा जनावरं मुरकुंडीनं आली आणि पळसाच्या माळावर चरू लागली. पाटलाचा गडी गुरांपासून बराच दूर राहिला होता. ती गुरं पाहून हरीबाला आनंद झाला.

त्या गुरांची आणि त्या दिवसाची तो आज कैक दिवस वाट पाहत होता. ती गुरं हाकत हरीबा चावडीवर गेला आणि पाटलाला म्हणाला,

''पाटील, कोंडाची किल्ली द्या.'

'का, कशाला पाहिजे?' पाटील बावरून म्हणाला.

'तुमची गुरं कोंडात घालाय...' हरीबा म्हणाला आणि पाटील चमकला. त्यानं जोत्यावर येऊन गुरं मोजली आणि त्याचा चेहरा खर्रकन उतरला. पेठेतील लोक जमले. कोंड भरून जमलेले गावकरी आले. गोरगरिबांनी चावडीपुढं गर्दी केली. त्या गर्दीत हरी महार एकटाच उभा होता.

तोच पाटील म्हणाला, 'काय करतूस ह्ये हरीबा?'

'तुम्ही केलं त्येच करतुय मी —' हरीबा म्हणाला.

'गाव धून निघाला. ह्या वादात सरकारी खजिना फुगला हे तुला पटतंय का?' पाटलानं

शांतपणे विचारलं; आणि हरीबा म्हणाला,

'भांडी इकून महारांनी कोंड भरलाय, पाटील—'

'हो हो. खरं हाय त्ये-' पाटील म्हणाला, 'पर गावाशिवाय महारवाड्याला शोभा न्हाय नि म्हारवाड्याशिवाय गावाला कळा न्हाय. ही पांढर साऱ्यांचीच हाय — साऱ्यांनी एका आईच्या लेकरावानी ऱ्हावं.'

'तसं कसं—' हरीबा दु:खी आवाजात म्हणाला, 'जर तसं असतं तर गावानं आमच्या भवती ह्यो सापळा लावलाच नसता.'

'आता त्यो सापळा आम्ही काढून टाकतो.' पाटील म्हणाला, 'हातनं म्होरं आपण सरळ वागू या—'

'सरळ कसं?' मध्येच हरीबानं विचारलं आणि पाटील म्हणाला,

'आरं बाबा, मानसावानी!' हे ऐकून हरीबानं नि:श्वास टाकला. तो नि:श्वास हरीबानं किती तरी दिवस दाबून धरला होता.

—॥ ३ ॥—

# निळू मांग

तोफ तयार झाली. गोळा भरला होता. बत्तीवाला बत्ती घेऊन पुढं आला आणि तो साजूरचा निळू मांग हातात काळी टोपी घेऊन तोफेकडं चालू लागला. त्याचं प्रत्येक पाऊल मजबूत पडत होतं. तो निर्भय होता. आता आपण मरणार आहोत हे त्याच्या गावीच नव्हतं. त्याला कसलीच भीती नव्हती. तो वर सरळ तोफेपुढं जाऊन उभा राहिला.

सर्व साहेब दुचित झाले. त्यांनी एकमेकांकडे नजर टाकली. गंभीर चेहरे केले. काहीतरी बोलावं असं त्यांना वाटू लागलं. हा निळू मांग आता तोफेच्या तोंडी जाणार याची काळजी वाटू लागली. अखेर एक वरिष्ठ अधिकारी दु:खी स्वरात म्हणाला, 'प्रभू तुझ्या आत्म्याला शांती देवो. तुला क्षमा करो. आता तू प्रभूकडं जाणार. जर तुला काय बोलायचं असेल तर बोलून घे. आता तू मरणार. जगातून जाणार. तुझा शब्द उमटणार नाही. बोल, काही इच्छा असेल तर सांग.'

हे ऐकून निळूला नवल वाटलं. मनाशी तो पुटपुटला, मला तोफेच्या तोंडी देऊन मोकळी होणारी ही माणसं आता या शेवटच्या घडीला माझं इतकं कौतुक का करीत आहेत? मी यांचा इतका लाडका कधी होतो? आणि उघडपणे म्हणाला, 'म्हंजी साहेब, मी आता मरणार आणि मी मरता मरता बोलावं असं तुमचं मत हाय; पर कुणासंग बोलू? माझी घोडी तिकडं उभी हाय. माझी माणसं तिकडं उभी हायती नि मी बोलायचं म्हंजी वाईच जडच हाय. मला वाईच इचार करू द्या.'

आणि निळू विचार करू लागला.

आपण खुरप्याच्या अणीपासून थेट तोफेच्या तोंडापर्यंत कसं आलो याचाच तो विचार करू लागला. मला कुणी नि का आणलं? या प्रश्नाचं निळू उत्तर शोधू लागला.

साजूर गावात निळू मांग एक सज्जन, गरीब माणूस म्हणून ओळखला जात होता. प्रत्येक माणूस निळूला मान देत होता. निळू कोणाची थुंकी ओलांडत नव्हता, कुणाच्या पाचोळ्यावर पाय देत नव्हता. भरपूर उंची, अंगात भरपूर बळ, रंगानं सावळा नि चेहऱ्यानं गावात तो उजवा होता. त्यांच्या वयाला नुकतंच बाविसावं वर्ष लागलं होतं. पण तो शांत होता. आई, काकू, नानी, वहिनी, अक्का असं म्हणून तो गावचा लाडका झाला होता. त्याला फक्त आई होती. आईनंच त्याला जगवून वाढवला होता. लहानपासून वृद्धापर्यंत सर्वच लोक निळूला चांगला माणूस म्हणत होते. अब्रूदार म्हणून त्याची गावात ख्याती होती.

साजूर गाव कोयनेच्या काठावर वसला होता. नदीकाठी मका, ऊस ही पिकं मी

म्हणत होती. कष्ट करून माणसं – गरीब माणसं पण श्रीमंत होती.

साजुरात चिमाजी नि भिमाजी हे दोन भाऊ पाटील घराण्यात जन्माला येऊन आपापसात भांडत होते. शेवटी त्यांनी गावचे पंच जमवून आपल्या जमिनीची वाटणी करून घेतली होती, पण त्यांचं वैर कायम होतं. धाकटा भिमा भ्याला होता. जरी आपण आपला हिस्सा वाटून घेतला तरी हा थोरला चिमाजी आपल्या हाती काहीही पडू देणार नाही असं त्याला वाटत होतं. म्हणून तो एक चांगला राखण्या हुडकत होता.

भिमाचं उभं पीक नाहीसं होत होतं. उभा मका लुटला जात होता. हळद चोरीला जात होती नि त्याचं कुणीच मनावर घेत नव्हतं. तो भिमा हैराण झाला होता. तो लुटला जात होता. त्याला कुणीतरी एक खंबीर राखणदार हवा होता.

सकाळ झाली होती. साजूर गाव जागा होऊन आपल्या रोजच्या उद्योगाला लागला होता. नदीकडं माणसं घागरी घेऊन पळत होती. पाणवठ्याची पांद माणसांनी भरली होती. कावडी करकरत होत्या. निळू घागर भरून घराकडं निघाला होता. वाटेत भिमा भेटला. निळूचा तो प्रचंड देह पाहून थांबला आणि विचार करून म्हणाला,

'निळू, माझा मका राखणीला घेतोस का?'

'काय देणार?' निळू खांद्यावर घागर घेऊन म्हणाला, 'मला काय, कुणाचं बी कामच करायचं हाय.'

'मी तुला मणभर मकं नि मणभर भात घालीन. बोल, कबूल हाय का?'

'कबूल!' निळूला आनंद झाला. उगीच उंडगं फिरण्यापरीस काहीतरी काम करावं म्हणून त्यानं भिमा पाटलाचा मका राखणीला घेतला. बोलणं - सर्व काही ठरलं. मणभर मकं नि मणभर भात मिळणार याचा निळूला आनंद झाला.

निळूला नुकतीच गुन्हेगार म्हणून नव्या कायद्यानुसार तीन वेळची हजेरी लागली होती; पण 'चांगला माणूस' म्हणून गावानं शिफारस केल्यानं त्याला एक वेळची हजेरी द्यावी लागत होती.

निळू गरीब होता. रात झाली की घराबाहेर पडतच नव्हता नि पडलाच तर शेजारी असलेल्या महारवाड्यात जाऊन बाबा महाराला भेटत होता. त्याच्या घरी बसत होता. बाबाचा निळूला मोठा आधार होता. तो बाबाचा शब्द मोडत नव्हता. उभ्या गावात सर्व जण बाबाला शहाणा समजत होते.

शिवारात मका ताल मारीत होता. आता हुरडा झाला होता. गावात मक्याचे बिरंबे दिसत होते. पोरंबाळं कणसं खात होती. पावसाळा संपताच लोकांपुढं नवं अन्न आलं होतं. माणसं मक्याच्या भाकरी कपाळाला लावून खात होती.

निळूनं नदीकाठी भिमा पाटलाच्या मक्यात खोप घातली होती. खोपीपुढं जाळ केला होता नि राखणदार म्हणून मक्याची राखण करीत होता.

निळूनं भिमा पाटलाचा मका राखणीला घेतल्यामुळं गावात लोक म्हणत होते की, 'निळूनं हे बरं केलं नाही. दोन हत्तींच्या लढतीत गरीब उगंच पडला. याचा परिणाम वाईट होणार.'

निळू एक वेळ हजेरी देऊन मक्याची राखण करीत होता. हातात कुऱ्हाड घेऊन रात्रभर त्या मक्याच्या शेताभोवती पहारा करीत होता. त्यानं त्या शेतात खोपीपुढं आगटी काढली होती. एखादं कणीस भाजून ते खात खात तो राखण करीत होता. त्याच्या खोपीपासून थोड्या अंतरावर चिमा पाटलाची वस्ती होती. तो आणि त्याचा दोस्त रामू सुतार हे दोघं रात्रभर बसून चिमाच्या मक्याची राखण करीत होते. भिमाचा मका निळू मांगानं राखणीला घेतल्यामुळं चिमाजीला राग आला होता. तो भिमावर सूड घ्यायची वाट पाहत होता आणि रामू सुताराला 'काय करावं?' याचा सल्ला विचारत होता.

आणि निळू भिमा पाटलाच्या शेतात तयार होता. सावध होता. निळूवर चालून जाणं कुणालाच शक्य नव्हतं. त्याची कुऱ्हाड काय करील याचा नेम नव्हता. निळूचा तो देह पाहून चिमाजी टरकत होता, पण निळूवर कसा तरी सूड घ्यावा असं त्याला वाटत होतं.

दिवस मावळत होता. निळूला हजेरी देण्यासाठी जाणं भाग होतं. तो गावाकडं निघाला होता. निळू गावाकडं चाललेला पाहताच चिमानं हाक मारली. तो म्हणाला,

'ए निळू मांग, ये की लेका. अगदी शेताचा मालक असल्यावाणी राखण करीत बसलायास. कुठं निघालास? ये, पान खाऊन जा.'

'नको. हजेरी देऊन येतो.' निळू काकुळतीला येऊन म्हणाला, 'वाईच मक्याकडं नजर असू द्या. आता हजेरी देऊन येतो.'

'जा, पण लवकर ये,' चिमा म्हणाला आणि निळू गावाकडं गेला.

निळू दूर जाताच रामू सुतार हसला. चिमा पाटलाला आनंद झाला. रामू म्हणाला, 'पाटील, निळ्याची राखण करू का?'

आणि चिमानं त्याला होकार देताच त्यानं पोतंभर कणसं मोडली. काही भाजून खाल्ली नि बाकीची घरी घेऊन गेला.

सकाळी मक्याची कणसं चोरीला गेलेली पाहून निळूला वाईट वाटलं. तो भिमाकडं जाऊन म्हणाला, 'रात्री हजेरीला गेलो नि चोरांनी मला दगा दिला. पोतंभर मका गेला.'

'ठीक झालं, पण आता सावध ऱ्हा.' भिमानं निळूला सूचना केली.

मग निळू बाबा महाराकडं गेला. सर्व हकीकत सांगून म्हणाला, 'मी हा मका राखणीला घेऊन चूक केली. आता काय करू? मी रोज हजेरी देण्यासाठी जाणार नि घरचं चोर मका फस्त करणार.'

बाबा महारानं निळूला धीर दिला. तो म्हणाला, 'आजपासून मी येतो मळीला. तू हजेरी देऊन येईपातूर मी पहारा करीन. मग रातभर तू पहारा कर.'

हे ऐकून निळूला आनंद झाला.

दुसऱ्या दिवशी जेव्हा निळू हजेरी देण्यासाठी गावात निघाला तेव्हा पुन्हा चिमाजी पाटलानं त्याला हाक मारली नि निळू जवळ येताच रामा सुतार म्हणाला,

'काय निळू मांग, राती नांगीसरावर मकीसरानं तप केलं तवा कुठं होतास?'

निळू हसला नि गावात गेला. त्याच्या खोपीपुढं बाबा महार पहारा करीत बसला होता. त्याला पाहून सुतार चरफडून गप्प बसला.

निळूनं हजेरी दिली. येता येता त्यानं चिमा पाटलाचा धडकाच मेंढा घेतला. सुताराची नवी जडणीची गाडी घेतली नि महारवाडा गाठला. मेंढा नि गाडी बाबाच्या दारात ठेवून तो मळीला आला नि म्हणाला,

'बाबा, तुझ्या दारात सुताराची नवी गाडी नि पाटलाचा मेंढा उभा हाय. तू लवकर जा. मेंढा मारून ती गाडी चुलीला लाव. मेंढा शिजव नि मला घेऊन ये. पळ जा.'

बाबा गेला. त्यानं मेंढा मारला. गाडी निखळून जाळली. मेंढा रांधला आणि त्यातलं मास घेऊन तो रात्री मळीला आला. मग निळूनं पोटभर मांस खाल्लं. ढेकर दिला नि बाबा पुन्हा घरी गेला.

सकाळ झाली. रामू सुतार बोंबलत आला आणि तो चिमाजी पाटलाला म्हणाला,

'पाटील, मी रात्री खालसात निघालो. लोकांची तीनशाची गाडी गेली आणि तुमचा मेंढाबी गेला.'

हे ऐकून चिमाजीची पाचावर धारण बसली. त्याला निळूचा संशय आला.

दोन दिवस गेले.

रात झाली होती. गावात प्रत्येक वस्तीवर जाळ धुमसत होता. निळूनं आपल्या वस्तीवर बाबा महाराला बसवला होता नि आपण गावात गेला होता. आता निळ्या हजेरीला धावत गेला असंल, आपण जाऊन मांगाचा काटा काढावा या विचारानं रामू सुतार निळूच्या वस्तीकडं गेला, पण बाबा अंगावर घोंगडं घेऊन पाठमोरा बसला होता. हा निळ्याच आहे असं समजून सुतारानं पळ काढला. हजेरी देऊन निळू येताच बाबा आपल्या घरी गेला. चार दिवस तसेच गेले.

एका सकाळीच रामू सुतार निळूकडं आला. त्याच्या आगटीजवळ बसला नि म्हणाला,

'काय निळू, कडक राखण करतोस?'

'लोकांची नोकरी हाय ही.' निळू म्हणाला, 'पण ए सुतार, परवा गाडीसरावर मेंढीसरानं तप केलं तवा तू कुठं रं व्हतास?'

हे ऐकून सुतार चरकला. आपली नवी गाडी नि पाटलाचा मेंढा मांगानंच गारद केला अशी त्याची खात्री झाली. तो काहीच बोलला नाही. गुमान उठून चिमा पाटलाकडं गेला.

निळूचा बोल त्यानं पाटलाला सांगितला.

मांगानं दगा दिला. आपला मेंढा मारला. सुताराची गाडी जाळली. आता निळूचा बंदोबस्त केलाच पाहिजे, असा विचार करून त्यानं निळूच्या नावाची फिर्याद नोंदवली. गावातील पाच साक्षीदार उभे केले. निळूला अटक झाली. खटला उभा राहिला. पाटलानं वकिलांची फौज उभी केली. कायद्याची उलथापालथ होऊन शेवटी निळूला तीन महिन्यांची सजा लागली. तीन महिने खडी फोडायला निळू तुरुंगात गेला. विनाकारण गेला.

निळूनं तीन महिने तुरुंगात काढले आणि तो घरी आला. तेव्हा तो जळत - कढत आला. ज्यांनी ज्यांनी त्याच्याविरुद्ध साक्षी दिल्या होत्या, त्यांचा तो कर्दनकाळ होऊन आला. निळूत झालेला तो भयंकर बदल पाहून गावकरी टरकले. साक्षीदार भयभीत झाले. पोटात सुई जावी तसे ते चमकू लागले.

निळू काहीच बोलला नाही. तो खात होता. गावातील लोकांनी, 'कसं काय निळू' म्हणून त्याची विचारपूस केली, पण निळू कोणाशीच बोलला नाही.

आठ दिवस गेले नि एका रात्री एकाच वेळी पाच साक्षीदारांची घरं एका ओळीनं पेटली. अगदी ढणढणत राहिली नि त्यांनी दुसरी पंधरा पोटात घेतली. एका रात्रीत वीस घरांची राख झाली.

पुन्हा चार दिवस गेले नि पुन्हा चार घरांनी पेट घेतला. त्याच्या जाळानं आजूबाजूची दहा घरं जाळून टाकली. गाव भयभीत झाला. ओसाड झाला. सर्वत्र राख दिसू लागली.

ही निळू मांगाची करणी म्हणून गाव बोलू लागला. चिमा पाटलाची पाचावर धारण बसली. त्याच्या तोंडचं पाणी पळालं. आणि एके दिवशी त्याच्याही घराला आग लागली. गावात हाहाकार उडाला. 'आता गावात घरच शिल्लक राहत नाही' असं माणसं बोलू लागली. सुताराचं घर तर पहिल्याच दमात जळालं होतं. त्याला निळूनं सांगावा दिला होता की, 'दुसरं घरं बांधू नको, तू जेवढी घरं बांधशील ती सारी अशीच जळणार आहेत.' नि तो सांगावा ऐकून सुतार एक खोप घालून बसला होता.

निळू मांग अर्धा गाव जाळून फरारी झाला होता. रानात फिरत होता. त्यानं कुऱ्हाड घेऊन डोंगर धरला होता. त्या भागातील सर्व फरारी त्याला मिळाले होते. ते सर्व एक जिवानं डोंगरात राहत होते. प्रत्येक चोर चोऱ्या करून घर भरत होते नि नाव निळूचं होत होतं. त्या भागात जेवढा गुन्हा होत होता तो निळूच करीत आहे अशी सरकारात नोंद होत होती. सरकार निळूवर दात खात होतं. धरणं सुटलं होतं. बंदुका त्याचा शोध घेत होत्या.

आणि निळू मृत्यू चुकवीत होता. जिवावर उदार होऊन पळत होता. कधी उभा राहून लढत होता. त्याच्या दराऱ्यानं साजूर गाव भयभीत झाला होता. निळूचा आगाजा वाढला

होता. त्याचं नाव ऐकताच मी मी म्हणणाऱ्यांना कापरं भरत होतं. कुणीही सरकारात तक्रार करीत नव्हतं. जो सरकारात कळवील त्याचा सत्यानाश होईल ही सर्वांनाच भीती होती.

दूरदूरचे गुन्हेगार निळूला मोठा माणूस मानीत होते. त्याची मदत घेत होते. स्वत: चोरी करून निळूला ऐती वाटणी आणून देत होते. निळूच्या पाठबळानं त्यांना गगन ठेंगणं वाटत होतं.

निळू निर्भय झाला होता. तो वाटेल ते करायला सज्ज होता. तो कुणालाच भीत नव्हता. आता त्यानं जगावरच चढाई आरंभली होती.

सकाळ झाली होती. कृष्णाकाठ शांत भासत होता. एका डोंगरात निळू बसला होता. तोच एक माणूस आला. तो म्हणाला, 'मी वारणाकाठचा हाय. वारणाकाठी भेडस गावात सरकारी खजिना हाय. तेवढा फोडून जन्माचं सार्थक करू या.'

निळू तयार झाला. आपली माणसं घेऊन तो भेडसगावाला निघाला. तो खजिना वाटेगावचा फकिरा मांग फोडणार हे ऐकून त्याला आनंद झाला. त्यानं घाई केली नि फकिराची भेट घेतली.

नि एका रात्री सरकारी खजिना लुटला गेला. एक लाख रुपये गेले नि मग सरकार खवळले. अनेक फौजदार धावू लागले. माग काढण्यात आला नि एका मांगाने सर्वांची नावं सांगितली. त्यात निळूचंही नाव निघालं. निळूनं सरकारी खजिना फोडला म्हणून धरणं सुटलं.

रामा सुतारानं अंथरूण धरलं होतं. तो रोज सकाळी आपणच वाईट वागलो म्हणून कोपऱ्यात बसून तोंडात मारून घेत होता.

कित्येक गावकरी आपलं घर कधी पेटणार याची वाट पाहत होते. कित्येकांना आपलं घर पेटलं आहे अशी स्वप्नं पडत होती. ते सर्व रामा सुतार नि चिमा पाटील यांना शिव्या देत होते.

निळू निर्भय होता. भेडसगावचा खजिना लुटून आल्यापासून तर तो जिवावर उदार झाला होता. तो दररोज मशाल घेऊन गावात शिरत होता. भयाण रात्री मशालीच्या प्रकाशात तो भयंकर उग्र चेहरा पाहून लोक गांगरत होते. दाराच्या फटीतून निळूला पाहत होते आणि 'देवा ही पीडा पुढं घेऊन जा!' म्हणून देवावर भार घालीत होते. निळूनं गावावर जबर दहशत बसवली होती. तो मनात म्हणत होता, 'मी गरीब म्हणून दिवस काढले. रामराम केला. दूर बसून तंबाखू मागून घेतली. दूर बसून ती खाल्ली. पण गावानं त्याचा गैर अर्थ लावला. मला दुबळा समजून तुरुंग दाखवला. आता मी त्यांना मसणवटा दाखवणार.'

दिवस उगवत होते नि मावळत होते. निळू डोंगरात फिरत होता. त्याचा दरारा वाढत

होता. सरकारही स्वस्थ नव्हते. मोठमोठे अधिकारी निळूला कैद करायला धावपळ करीत होते. प्रत्येक पोलीस जीव राखून चढाई करीत होता. त्याला निळूचा मारा कळत होता. पिसाळलेला माणूस – निळू – जीव घेईल अशी त्या हरेकाला भीती वाटत होती.

सरकार इरेला पडलं. आपलं सारं बळ मैदानात आणलं आणि निळूचा पाठलाग आरंभला. डोंगर वेढला. रानात प्रत्येक बांधावर पोलीस उभा केला. प्रत्येक जाळी वेढली. प्रत्येक झाडाखाली शिपाई दिसू लागला. निळू कोंडला गेला. त्याचं बळ कोतं पडलं. त्यानं हत्यार टाकलं नि तो सरकारच्या हवाली झाला.

मग साजूर गावच्या कित्येक लोकांनी सुटकेचा निःश्वास टाकला. त्यांच्या डोक्यावरची लटकती तलवार दूर झाली नि ते ऐकून निळूची म्हातारी आई रडू लगली. आपला निळू फुकट फासावर जाणार याचं तिला दुःख झालं.

पुन्हा निळूचा खटला उभा राहिला. सरकारनं कायदा नि त्याचे किडे वकील यांचा कोर्टात खच घातला. त्या सर्वांपुढं एकटा निळू उभा राहिला. त्याला वकील नव्हता. त्याच्या वतीने उभं राहणं म्हणजे एक गुन्हाच आहे असं वकिलांना वाटत होतं. निळूच्या वतीनं साक्षीदार नव्हता. हा माणूस चांगला आहे, असं म्हणायचं कुणात सामर्थ्य नव्हतं. तो एकटा होता, पण निर्भय होता. 'आपण गुन्हा केला नाही. पण इमानदार आहोत, पण राम्या सुतार नि चिम्या पाटील यांनीच आपणाला चिडवून या भयंकर मार्गाला लावलं. तेच खरे गुन्हेगार आहेत,' असं त्याचं मत होतं.

सरकारी खजिना लुटून राजद्रोह करणारा निळू मांग हा भयंकर गुन्हेगार मानला जात होता. त्याला क्षमा नव्हती. न्यायाधीश त्याला कोणती कडक शिक्षा करावी याचा विचार करीत होते. काळ्या पाण्यापासून फाशीपर्यंतच्या सर्व शिक्षा त्यांना सौम्य वाटत होत्या. कडक शिक्षा सांगण्यात आली. तो ऐकून निळू हसत म्हणाला,

'सरकार, मायबाप, मी निळ्या मांग. मी साजुरात तंबाखू मागून खाणारा. तुम्ही माझी किंमत तोफेच्या गोळ्याच्या किंमतीची ठरवल्याबद्दल मी तुमच्या पायांवर डोकं ठेवतो.' असं म्हणून निळू मटकन खाली बसला. त्यानं आपलं मस्तक जमिनीवर टेकून न्यायमूर्तीला नमस्कार केला आणि तसाच उठून बेगुमान चालू लागला. मृत्यूकडे निघाला. चालता चालता तो बरोबर असणाऱ्या शिपायाला म्हणाला,

'ए, नोकरी करून फुकट पोटावारी मरू नगं, मरताना तोफेच्या एका गोळ्याची किंमत घेऊन मर. आरं, तोफेच्या तोंडी म्हंजी मामुली काम नव्हं!'

तोफेपुढं उभं राहून काय बोलावं याचा निळू विचार करीत होता. आपल्या गतायुष्यातील अनेक प्रसंगी आठवून तो एकाएकी भानावर आला, हसला नि म्हणाला,

'सायब, मी काय बोलू? आता मी मरणार. बोलण्यासारखं माझ्याकडं काईच न्हाय. तुमी मला लवकर वाटेला लावा. संपू द्या एकदाची ही कटकट.'

'तुला काही सांगावंसं वाटतंय का?' एका साहेबानं गंभीर होऊन विचारलं.

निळू शांतपणे म्हणाला, 'सरकारी खजिना लुटला लुटणाऱ्यानं आणि तोफेच्या तोंडी जाणं बेगुन्हा निळ्यानं. चला द्या बत्ती!'

साहेब चकित झाला. त्याचा धीर त्याची ती धीरवृत्ती नि मृत्यूला कवटाळण्याची हिंमत हे सर्व पाहून साहेबांना नवल वाटलं. त्यांनी आपसात पुन्हा विचार केला. 'निळूला तोफेच्या तोंडी देऊन आपण फार मोठं काहीच साध्य करू शकत नाही. उलट, निळ्याला सोडला तर लोक चकित होतील', असा विचार करून वरिष्ठ अधिकाऱ्यानं 'निळूला सोडा' असा हुकूम केला. निळू सुटला, अगदी आनंदानं नाचत हर्षभरित होऊन आपल्या आईला भेटण्यास साजूरकडं धावू लागला आणि तोफेच्या तोंडी गेलेला निळू परत आलेला पाहून गावकरी दुमचटले.

साजुरात येताच निळूनं प्रथम कोयना नदीत उडी घेतली. भरपूर पोहला नि म्हणाला, 'आई, ह्यो निळ्या जगला. मेला असता तर हे तुझं पाणी मला अंतरलं असतं. आता मी सरळ माणसारखा वागंन, माणसासारखा जगंन!'



# मरीआईचा गाडा

पाऊस पडून खडवं पडलं होतं. आकाश अगदी चांदीच्या भांड्यासारखं लखलखीत दिसत होतं. ढगाचा एकही डाग त्याच्या पाठीवर नव्हता. गावात उदास वाटत होतं. गल्ल्या उगीचच लोळत होत्या. सर्व घरं भकास होऊन बसली होती. गावाच्या मध्यभागी असलेला पार खिन्नपणे उभा होता.

गावकरी गंभीर मुद्रा करून आजूबाजूला बसले होते. स्त्रिया, मुलं हवालदिल होऊन आपल्या भविष्याचा विचार करीत होती. त्यांचं भविष्य तराजूत हेलकावे खात होतं.

गावात मरीआई शिरली होती. त्याचा विचार करण्यासाठी गाव जमला होता. हागओकीनं दहा माणसं पडली होती. त्यांचं काय होणार? आणखी कोणावर ती भयंकर पाळी येणार? याचा ते विचार करीत होते. गावचे चार शहाणे म्हातारे पारावर विचारमग्न बसले होते. निर्विकार चेहरा करून ते आपसात कुजबूजत होते. परंतु ते गावात शिरलेल्या मरीआईचा विचार करीत नव्हते. त्यांच्या डोळ्यांपुढं वरच्या आळीचा नाना उभा होता. त्या चौघा म्हाताऱ्यांना नाना मरीआईपेक्षाही भयंकर वाटत होता.

वरच्या आळीचा नाना तरुण होता. विचारांचा पाठपुरावा करीत होता. तो करील तशी गावची पोरं करीत होती. गावच्या मुलांनी शिकावं, शहाणं व्हावं, जुन्यानं जाऊन नवं यावं म्हणून तो धडपडे. परंतु ते चार म्हातारे त्याच्या नावानं कुढत होते, चरफडत होते. 'कालचं प्वार - त्येला काय कळतंय?' असा त्यांचा दावा होता.

त्या चार म्हाताऱ्यांत सटवाजी हा देहानं आणि उत्पन्नानं जाड होता. त्याच्या वयानं साठी मागं टाकली होती. त्याच्या वयाचा आणि श्रीमंतीचा दुहेरी दरारा गावात होता. तो उघडाबोडका, अंगावर घोंगडीची खोळ घेऊन बसला होता. निम्मं घोंगडं ढुंगणाखाली घेऊन आपल्या गुडघ्यावर दाढी टेकून पुढं बसलेल्या केरूच्या तोंडाकडं टक लावून तो पाहत होता.

केरू नलावडा आपल्या थोटक्या मिश्या चाचपीत सटवाजीच्या थोटक्या नावाची पाहणी करीत होता. केरू अंगानं किडकिडीत होता. तो जीव घोटाळेपर्यंत बोले. त्यामुळं लोक त्याला बडबड्या केरू म्हणत. आपण कधीच मरणार नाही. आपल्या आयुष्याची कागदपत्रं देवाघरी वाळवीनं खाल्ली आहेत, असं तो लोकांना सांगे. केरू नंबर दोनचा शहाणा समजला जात असे.

तिसरा भाऊ बाबाजी. यानं सत्तरीची सीमा केव्हाच ओलांडली होती. त्याच्या पाठीला

पोक येऊन तो डुकराप्रमाणे खाली पाहत चाले. आणि खाली मुंडी घालूनच जोरानं बोले. भाऊ कपाळाला हात लावून बसला होता.

चौथा म्हातारा दिसायला पेहेलवानाप्रमाणे दिसे. त्याचं वय पस्तीस वर्षांचं होतं. पण दुर्दैवानं त्याचे सर्व केस पिकून त्याला जबरीनं म्हाताऱ्याच्या पंक्तीला बसवलं होतं. गावची पोरं त्याला 'म्हातारबा' या नावानं हाका मारीत आणि म्हातारबा रोज औषध लावून पुन्हा पांढऱ्याचं काळं करण्याची शिकस्त करी.

असे हे चार म्हातारे एकत्र बसत आणि त्या तीनशे घरांच्या गावात बसून त्रिखंडाची चेष्टा करीत. कधी ते स्वराज्य मागणारांना म्हणत, 'फुकाट मराल, इंग्रजांच्या राज्यात दिवस मावळायचा न्हाय.' शिवारातून गेलेल्या आगगाडीची शीळ ऐकून ते म्हणत, 'भूत-हिच्या भना, हेला सोबा हाय का? बैलाशिवाय गाडी नव्हं!'

आणि नाना तर त्यांना सैतानच भासत असे.

एकाएकी केरू म्हणाला, 'सटवू नाना, ऐकता का?'

त्याबरोबर सर्व म्हातारे सावध झाले. त्यांनी केरूकडे पाहिलं. सटवाजी दाढी तशीच गुडघ्यावर ठेवून म्हणाला, 'हं बोला - काय?'

केरू म्हणाला, 'माझ्या डोळ्यांची पापणी लवतीया, कोन तरी मरनार.' त्यानं मरण आणि पापणी यांची सांगड घातली आणि दीर्घ निःश्वास टाकला.

'कुणी तरी का? संकऱ्या जंगमच पुचकनार. लई ज्यार हाय!' सटवाजीनं शंकर जंगमचं भविष्य वर्तवलं.

'पण मला वाटतं, तो पाटलाचा नान्या आधी मरावा.' केरूनं आपली इच्छा व्यक्त केली.

'व्हय, व्हय. खरंच त्यो वेगळा हाय. आवं, तो नान्या आमास्नी गाढव समजतोय!' भाऊ बाबाजीनं आपलं मत जाहीर केलं.

ते चौघे हळूहळू कुजबूज करीत होते. मांग, महार, चांभार, कुंभार, न्हावी सर्व गाव जमला होता. पण त्याची त्या चार म्हाताऱ्यांना जाणीव नव्हती. ते आपल्याच विचारात दंग होते. आपला वैरी नानाही येऊन बसला आहे हे त्यांच्या लक्षात आलं नव्हतं.

शेवटी नाना उठून उभा झाला. त्यानं आपले दोन्ही हात जुळवून कपाळाला लावले आणि सर्वांना ऐकू जाईल अशा आवाजात तो म्हणाला,

'सटवू नाना, गाव जमला — सभा सुरू करा.'

नानाचा खणखणीत आवाज ऐकून ते म्हातारे एकदम भानावर आले. त्यांनी चौफेर निरखून पाहिलं आणि भुवया चढवीत सटवाजी म्हणाला, 'मग कर की सुरू.'

'तसं कसं? तुम्ही वडील हायसा.' नाना हसत म्हणाला.

आणि केरू चिडून ओरडला, 'आरं, तूच सुरू कर. शेणा हायस तू'! त्याचे डोळे गरगर फिरले.

'असं एकमेकांवर येऊ नगा.' गुरवानं सूचना केली.

'गावात मरीआई शिरलीया, त्येचा आगुदर इच्यार करा.' तराळानं हात जोडून विनंती केली.

सटवाजीनं खाकरून घसा साफ केला आणि तो मोजक्या शब्दात म्हणाला, 'गावकरी मंडळी, गावात मरीआई शिरलीया. ती लई वंगाळ हाय.'

त्याला मध्येच थांबवून केरू पुढं बोलू लागला, 'मरीआईचा गाडा या गावात शिरलाय. संकऱ्या जंगम उशाला पंचांग घेऊन सारखा हागतोय आणि ओकतोय - जर त्यो जंगम मेला तर पंचांग बघनार कोन?'

मध्येच नाना उठला आणि ओरडला, 'हो, हो — म्हणूनच आम्ही काय करावं ते सांगा.'

नानाच्या ओरडण्यानं केरूची जीभ लुळी पडली आणि सटवाजीनं डिरकी फोडली, 'नान्या ऐक - आमचं असं मत हाय की आजपासनं गावात तीन शुकिरवार पाळावं, तरच मरीआई आपला हात आवरील. न्हाय तर.....'

आणि केरू बोलू लागला, 'न्हाय तर गावचा कुलकर्णी मरंल. मानूस ब्याला उरनार न्हाय.'

केरूचं पुढचं बोलणं ऐकून नानानं सवाल केला, 'हो, हो — पन तीन शुकिरवार पाळायचं म्हंजी काय करायचं?'

'म्हंजी तीन वार पाळायचं रं-' म्हादबानं दाढेखाली तंबाखू धरून सांगितलं.

'पर करायचं काय?' नानानं त्याला दरडावून विचारलं.

'ऐक-' सटवाजी मोठ्यानं म्हणाला, 'आजपासनं तीन आठवडे गावात व शिवारातून चाक बंद'.

'हो, हो. चाक बंद!' भाऊनं 'चाक' शब्दावर जोर दिला.

'ही चाकं बंद झाली की मरीआईच्या गाड्याची चाकं बंद व्हनार.' म्हादबा ऊर्फ म्हातारबानं उठून खुलासा केला.

'म्हंजी गाडीचं आणि मोटचं चाक बंद. आणि ती चाकं बंद झाली की मरीआईच्या गाड्याचं चाक बंद व्हतं.' सटवाजीनं नानाला उत्तर दिलं.

'हे मला पटत न्हाय.' नाना म्हणाला.

'न्हाय पटू दे. तुला काय कळतंय?' म्हादबा उद्गारला.

'आज्याला नातू शिकवतोय!' भाऊ ओरडला.

'मायंदळ शेणा झालाय!' केरूनं शेरा मारला.

गोंगाट वाढला. चार म्हातारे आळीपाळीनं बोलू लागले. सभेला बाजाराचं स्वरूप आलं. 'हो-हो', 'न्हाय', 'आरं गपा' – जो तो ओरडत होता. कोणी कुणाचे ऐकत नव्हतं.

मग नानानं सर्वांपेक्षा मोठा आवाज काढला, 'आरं, मग जात्यीबी बंद करा.'

थोडा वेळ सर्व शांत झालं.

त्यावर केरूही ओरडला, 'आरं जात्याची तळी असती. चाकं नसत्यात.'

'न्हाय, न्हाय पटत मला.' नानानं डाव्या हाताचे कुडबुडे वाजवीत सांगितलं.

पुन्हा सर्व शांत होऊन ऐकू लागले.

'तुला न्हाय पटणार. तू उरफाट्या डोस्क्याचा हाईस.' भाऊनं आपलं डोकं खाली घालून टोमणा मारला.

आणि नानाही चिडून म्हणाला, 'तुझं डोस्कं ठावं हाय मला.'

पुन्हा दंगल माजली. चारही म्हातारे कोणाचंही ऐकून घेण्याऐवजी स्वतःच बोलू लागले.

तेव्हा बिऱ्या धनगर वैतागून म्हणाला, 'मंडळी, तुमी मरीआईचा इच्चार करता का डोस्क्याचा?'

या धनगरी सवालानं सर्वांची डोकी ताळ्यावर आली. पुन्हा सर्व शांत झालं. सटवाजीनं नानाला विचारलं, 'गावात शिरल्याल्या मरीआईला काय करावं? सांग तूच.'

मग नाना शांतपणे म्हणाला, 'चाकंबिकं बंद करून भागनार न्हाय. आपून गाव झाडून काढावा, तालुक्यास्नं औषध आणावं, डाक्तर आणून मानसास्नी टोचावं.'

हे ऐकून म्हातारे भडकले. केरू नानाकडे हात करून चिरक्या आवाजात म्हणाला, 'आत्ता रं देवा! आवं ह्येच्या म्होरं बोंबलावं काय काय?'

लगेच भाऊ भडकून म्हणाला, 'मंडळी, ह्यो टोचूनशान मानसं मरनार बघा.' त्यानं तिरप्या नजरेनं नानाकडे रोखून पाहिलं.

आणि सटवाजीनं धमकी दिली, 'नान्या, मरीआई तुज्या डाक्तराच्या उरावर बसाया डरनार न्हाय.'

पुन्हा गोंधळ वाढला. पटकून झटकून जो तो बोलू लागला आणि पुन्हा गुरव ओरडला, 'ऐका मंडळी –' सर्व शांत झालं आणि गुरवं पुढं बोलू लागला. 'आपुन नानाचं बी ऐकू या आणि सटवाजीचं बी ऐकू या.'

'म्हंजी काय करू या?'

बिऱ्या धनगरानं खुलाशाची मागणी केली आणि गुरव म्हणाला, 'तीन शुकिरवार पाळू या. औषध बी आनू या – कबूल?'

'कबूल, कबूल.' लोक ओरडले.

'आमास्नी बी कबूल.' सटवाजी म्हणाला, 'पण तिसऱ्या शुकिरवारी मरीआईचा गाडा गावाभाईर घालवायचा, हे कबूल हाय काय?'

हा सटबाजीचा सवाल ऐकून सर्वांनी माना डोलावल्या. 'हे बी कबूल.' लोकांनी ओरडून संमती दिली.

सभा संपली. लोक उठले.

नाना पाचपन्नास गडी घेऊन कामाला लागला. त्यानं गाव झाडून स्वच्छ केला. सर्व गोठे झाडले. गल्ल्या, बोळ अगदी झकपक केलं. आणि तो पुन्हा सटवाजीकडं गेला.

नाना परत आलेला पाहून सटवाजी चिंतातुर झाला. हा कसली तरी कुरापत काढणार म्हणून तो चरकला. तोच नाना म्हणाला, 'सटवूनाना, मी तालुक्याला जातो.'

'मग जा की —' सटवाजीला हायसं वाटलं.

'पर मी गाडी घेऊन जानार हाय.'

गाडीचं नाव ऐकून म्हातारा चिडला. परंतु राग गिळून तो म्हणाला, 'गाडी घेऊन जानार म्हंजी डोक्यावर घेऊन जानार?'

'छे, छे, गाडी जुंपून अन् बसून जानार!' नाना म्हणाला.

सटबाजी खेकसला, 'गाडी रं कशाला? का तालुक्यास्नं लग्नाचं वऱ्हाड आनायचं हाय?'

'अगा, वऱ्हाड नव्हं, औषध नि डाक्तर आनायचा हाय!' नाना हसत उद्‌गारला.

'डाक्तर आन न्हायतर त्येचा बा आन, पन गाडी जुंपू देनार न्हाय.' सटवाजीनं दम भरला.

'मग डाक्तर का पायानं आनू?' नाना गंभीर होऊन म्हणाला.

'कसा बी आन. पायानं आन न्हाय तर गाढवावर आन. पर गाडी जुंपू देनार न्हाय.' सटबाजी बिथरून म्हणाला.

दोघांचं बोलणं वाढलं. हां हां म्हणता गर्दी जमली. त्यांचे आवाजही चढले. एकमेकांवर ते खेकसू लागले. जमलेले लोक त्यांना शांत करू लागले. केरू नलवडा येऊन दाखल झाला आणि बाचाबाचीत भर पडली.

'माझं वाईचं ऐका.' नाना म्हणाला.

'न्हाय ऐकत. चाक बंद.' सटवाजी म्हणाला.

'बरं, चाक बंद—' नाना नमतं घेऊन म्हणाला आणि म्हातारे शांत झाले.

मग नाना बोलू लागला, 'आपल्या शिवारातनं आगिनगाडी रोज जातीया. एका मालगाडीला साठ डबा असतो आनि एका डब्याला चार चाकं असतात. म्हंजी समदी मिळूनं दोनशे चाळीस चाकं असत्यात. ती आधी गुमान बंद करा.' नानानं 'बंद करा' या शब्दावर जोर दिला.

हा आगगाडीच्या चाकांचा भयंकर हिशेब ऐकून त्या म्हाताऱ्यांची डोकी गरगर फिरू लागली. ते एकमेकांकडे पाहू लागले. आपण काय उत्तर द्यावं हे त्यांना सुचेना.

एवढ्यात नानानं फेरहल्ला चढविला. 'आगा बघताय काय? उठा की.'

'आरं, आमी काय करावं?' केरू पुटपुटला.

'ती गाडी आडवा.' नाना हुकमी आवाजात म्हणाला.

'आरं, पर आगिनगाडी आमी कशी आडवावी?' सटवाजी वैतागल्या सुरात म्हणाला.

'कशी बी आडवा, न्हाय तर आडवं पडा.' नाना त्यांना पेचात पकडून म्हणाला.

'आमी आडवं पडून मरावं म्हणतोस?' सटवाजीनं विचारलं.

'आनि म्या डाक्तर गाढवावर लादावा?'

प्राणावर बेतलं तेव्हा त्या म्हाताऱ्यांनी माघार घेतली. नाना गाडी घेऊन तालुक्याला गेला. डाक्तर, औषध आलं नि गावातला रोग हटला.

परंतु सर्व तीन शुक्रवार पाळल्यामुळंच झालं असा त्या चार म्हाताऱ्यांनी हट्ट घेतला व मरीआईचा गाडा वाजतगाजत काढून शिवेबाहेर गेलाच पाहिजे ही मागणी केली. नानाचा नाइलाज झाला आणि मरीआई शिवेबाहेर घालविण्याची तयारी झाली.

सरता शुक्रवार होता. लोकांनी गावात आरास केली. घरोघर आंबील घुगऱ्यांचा नैवेद्य केला होता. लहानथोरांचे चेहरे आनंदित झाले. त्यांनी मरीआईच्या देवळापुढं गर्दी केली.

सुतारानं लहानसा गाडा तयार करून दिला होता. तो देवळापुढं ठेवला होता. त्यात लहानशी मरीआई बसवली होती. आयाबाया येऊन तिला नैवेद्य दाखवीत होत्या. खण-नारळ येऊन त्यांचा त्या गाड्यापुढं ढीग लागला होता.

पोरं खिदळत होती. चार म्हातारे गंभीर मुद्रा करून गाडा काढण्याची घाई करीत होते.

गाड्याचे पुढारी अभिमानाने सर्वांकडे पाहत होते. त्या गर्दीत नाम्या महार उघडाबोडका उभा होता. त्यानं भंडाऱ्यानं मळवट भरून लिंबाचा डहाळा घेतला होता. त्याच्या पाठीमागं परटाची म्हातारी केस सोडून मळवट भरून खडी होती. त्या दोघांच्या अंगात मरीआई येणार होती.

नानानं कसलंही विघ्न आणू नये याबद्दल सटवाजी, महादबा, केरू भाऊ हे काळजी घेत होते आणि विजयी दृष्टीने देखरेख करीत होते.

सूर्य वरती फिरला. नाम्यानं मागंपुढं पाय ठेवून मोठी किंकाळी फोडली. क्षणात त्याचं सर्वांग थरथरू लागलं आणि तो कडुलिंबाचा पाला चापलू लागला. त्याचा तो भयंकर अवतार पाहून पोरं भयभीत झाली. 'आलं, अंगात आलं!' केरूनं गर्जना केली. तोच नाम्याच्या अंगात मरीआई घुमू लागली, कण्हू लागली आणि परटाची म्हातारी नाम्यापेक्षाही विचित्र आवाज काढून खेकळू लागली. दोन्ही हातांनी खोबरमिठी आपल्या डोकीवर धरून

ती अंगाला आळोखेपिळोखे देऊ लागली. नाम्या आणि म्हातारी घुबड घुमल्याप्रमाणे घुमत नाचू लागली.

'अंगात आलं, मागं सरा.' सटवाजी ओरडला आणि लोक मागं सरले. मरीआईनं रिंगण धरून नाच सुरू केला.

वाद्यं वाजू लागली. मांगाची हालगी कडकडली. कैकाड्यानं आपली सनई ढगावर रोखून फुंकण्यास सुरुवात केली आणि उस्मान्या आताराचा ताशा पारव्यासारखा बोलू लागला. त्याच्या तालावर त्याची मुंडीही गडबडू लागली. 'डिगांग डिक्च्यांग' — बिऱ्या धनगराचा ढोलाचा दणका थेट मेंदूला भिडू लागला.

'मरीआईच्या नावं चांग भलं!' केरू, सटबाजी, भाऊ व महादबा यांनी आरोळी ठोकली. त्यांना लोकांनी साथ दिली. त्यांचा आवाज गगनाला पोचला. गाडा निघाला.

गाडा निघाला होता. नाम्या नाचत होता. दुडक्या चालीवर वाकड्या-तिकड्या उड्या मारत होता आणि परटाची म्हातारी डोकीवरच्या खोबरमिठीसह मान ओवाळीत, मध्येच उडी मारीत काहीतरी बोलत वाट चालत होती.

नाना एका पडक्या भिंतीवर उभा राहून पाहत होता. तो चटकन पुढं होऊन म्हणाला, 'होऽ वाईच थांबा.'

वाद्यं थांबली. देवीची वाट मंदावली. लोक शांत झाले आणि सटवाजी भडकून पुढे आला नि म्हणाला, 'ए दीडशेण्या, गाडा का थांबवलास?'

'नव्हं, देवी कंच्या बाजूला जानार?' नानानं हळूच विचारलं.

सटवाजीनं देवीकडे वळून हात जोडले आणि विचारलं, 'आई कंच्या बाजूला जानार तू?'

'मीऽ शिरट्याकडं ऽऽ जानारऽऽ' नाम्याच्या अंगातील देवी म्हणाली. आणि लगेच परटाच्या म्हातारीनं तेच पालुपद आळवलं — होऽ शिरट्याला जानारऽऽ'

'चल, बाजूला हो.' सटवाजी नानाला म्हणाला.

पण नाना अधिकच पुढं जाऊन शांतपणे म्हणाला, 'न्हवं, आम्ही ही मरीआई त्या शिरट्याच्या शिवंला सोडनार नि मग मरीआई शिरट्यात शिरून हागओक सुरू व्हनार.'

'मग त्येला आम्ही काय करायचं?' केरूनं नाक उडवीत विचारलं.

मग नाना मोठ्यानं बोलला, 'आगा, त्या शिरट्यात आमच्या गावच्या आठ पोरी दिल्यात. त्येंचं काय व्हनार?'

ज्यांच्या मुली शिरट्यात दिल्या होत्या ते सर्व पुढं होऊन ओरडले, 'न्हाय, न्हाय — मरीआईचा गाडा शिरट्याकडं जाऊ देनार न्हाय.'

हा भयंकर कोलदांडा बघून नाम्याच्या अंगातील देवी म्हणाली, 'अरंऽ बाबानू, मी पाडळीला जानारऽऽ'

'पर आई, पाडळीत बी आमचं पाव्हणं हायती, त्येंचं काय व्हनार?' नाना हात जोडून म्हणाला आणि पाडळीत ज्यांचे पाहुणे होते ते सर्व पुढं झाले. त्यांनी दंगल केली, 'गाडा पाडळीत जाऊ देनार न्हाय.'

दक्षिण — उत्तर या दोन्ही दिशा बंद होऊन मरीआई आणि तिचे सटवाजी, केरू, भाऊ हे पुढारी पेचात पडले. आपल्या पाव्हण्यांच्या जिवासाठी निम्मा गाव नानाच्या पाठीशी उभा होऊन 'पाडळीचं नाव काढू नका' असं ओरडू लागला. त्याच्या ओरडण्यानं गाव हादरू लागला.

नाम्याच्या अंगातील मरीआई कान पाडून ऐकू लागली. चार म्हातारे विचारांच्या चिखलात रुतून बसले.

मग मरीआई आपला विचार बदलू लागली, 'ऐका रंऽऽ'

सर्व लोक शांत होऊन ऐकू लागले. म्हाताऱ्यांना आनंद झाला.

देवी पुढं म्हणाली, 'मला मावळत्या बाजूला जायचं हाय.'

हे ऐकून केरू एकदम पुढं येऊन म्हणाला, 'हो हो — जाऊ या.'

सटवाजीनं उडी मारली, 'खरंच जाऊ या.'

आणि नाना बोलला, 'पण देवा, मावळतीला खुबी हाय, नि खुबीत आमच्या गावच्या अकरा पोरी नांदत्यात!' नानानं नाम्यापुढं हात जोडले आणि खुबीकरांचे पाव्हणे पुढं येऊन ओरडले, 'खुबीला मरीआईचा गाडा जाऊ देनार न्हाय.'

नाम्याची देवी मागं सरली. भयंकर बोंबाबोंब सुरू झाली. सर्व गाव ओरडू लागला. कोणी म्हणू लागले, 'खुबीकडे जायचं न्हाय —' कोणी म्हणत, 'पाडळीचं नाव काढू नका,' तर कोणी ओरडत होते, 'शिरट्याला जायचं न्हाय.'

मग नाम्यानं आपला म्होरा उगवतीकडं वळवला. परटाची म्हातारी त्याच्या मागून पाय ओढीत निघाली. सटवाजी, केरू, भाऊ ओरडले, 'बरं, देवीला उगवतीला जाऊ द्या.'

आणि नानाही चिडून म्हणाला, 'न्हाय जाऊ देनार.'

'आरं का जाऊ न्हाय देनार?' भाऊ रडकुंडीला येऊन म्हणाला.

'नान्या, नान्या, तुजं बरं व्हनार नाय. मरशील त्वांड इचकून.' केरूनं शाप दिला.

नाना म्हणाला, 'मरू दे मी, पन गाडा न्हाय जाऊ देनार. उगवतीला बिचुत हाय नि बिचुतात आठरा घरं पाव्हण्यांची हायती.' नानानं गर्जना केली.

बिचुतकरांचे पाव्हणे पुढं आले. पुन्हा गोंधळ उडाला.

मरीआईच्या चारी वाटा बंद झाल्या आणि हमरीतुमरीवर येऊन सर्व लोक ओरडू लागले. नाम्याच्या अंगातील देवी कावरीबावरी होऊन किलकिल्या डोळ्यांनी आजूबाजूला पाहू लागली. परटाची म्हातारी तर पळून जाण्याच्या बेतात आली.

वाद्य केव्हाच बंद झालं होतं. उस्मान्या आता ताशा पाठीवर टाकून गर्दीत शिरला आणि गळ्यात प्रचंड ढोल घेऊन बिऱ्या धनगर पुढं गेला. कैकाडी आपली सनई काखेत मारून त्या भयंकर गर्दीकडे पाहू लागला.

बिऱ्या ओरडून म्हणाला, 'पाडळीत माझी पोरगी हाय. गाडा बंद!' त्यानं टिपरी कमरेत खोचून गिरकी मारली.

गावाचे पुढारी म्हातारेही चिडून ओरडत होते. भाऊ ओरडून म्हणाला, 'कोण आडवा येतोय, बघतोच मी.'

आणि एक शेतकरी हातात सोटकं घेऊन ओरडला, 'येऊन दे पाडळीकडे गाडा. ह्या नाम्याचं डोस्कंच फोडतो एका दणक्यात.'

नाम्यानं दोन्ही हात डोक्यावर धरून बैठक मारली. तोच दुसरा म्हणाला, 'आरं हाण त्येला.'

तोच नाम्या उठून ओरडला, 'आगा, मला का?'.

'देव गेला, देव गेला!' सर्वत्र आवाज उठला. दंगल शांत झाली. मग त्या गाड्याचं काय करायचं याचा विचार झाला आणि मरीआईचा गाडा पुन्हा निखळून देवळात ठेवण्यात आला.

जुन्याचा पराभव आणि नव्यांचा विजय झाला. त्या चार म्हाताऱ्यांनी नानाचा विजय कबूल केला आणि त्या दिवसापासून 'नान्या'ऐवजी 'नाना पाटील' अशा नावानं ते त्याला बोलावू लागले. त्यांनी त्याचं पुढारीपण मान्य केलं.



# रक्ताचा टिळा

चौदा वर्षांचे काळंपाणी ही भयंकर शिक्षा नागूनं बारा वर्षे भोगून संपवली. दोन वर्षे माफी मिळाल्यामुळे त्याच्या सुटकेचा हुकूम झाला. पायातील दंडाबेडी निखळली. दरवाजे खडाखड उघडले गेले नि चुलवणाबाहेर पडावं तसा नागू तुरुंगाबाहेर पडला. त्यानं मोकळ्या हवेत निःश्वास टाकला. बारा वर्षे कोंडलेली त्याची नजर सर्वत्र तरारली. आणि एकाएकी तो भयभीत झाला.

तुरुंगासमोर एका झाडाखाली एक उग्र चेहऱ्याचा धिप्पाड माणूस बसला होता. तो नागूला पाहताच वाघासारखा उठला. त्याचा तो रुंद चेहरा भयाण दिसत होता. त्याने भरपूर दाढी वाढवली होती. त्याच्या दाट भुवयाखालील त्याचे डोळे निखाऱ्यासारखे दिसत होते. त्यानं अंगात पैरण घालून खाली फक्त लुंगी लावली होती. त्याच्या हालचालीत कोप होता. पण तो स्वतःला सावरीत होता. तसाच तो निर्भयही दिसत होता. त्याच्या डाव्या काखेत एक लहानसं गाठुडं होतं आणि उजव्या हातात त्यानं कुऱ्हाडीचा पल्लेदार दांडा घेतला होता. नागूला पाहून तो कावराबावरा झाला. त्यानं एक पाऊल उचललं.

तसा नागू घाबरा झाला. त्याचा तो भयंकर चेहरा ओळखीचा वाटला. पण नाव आठवेना. तो गपकन थांबला. त्याचं नाव आठवावं म्हणून त्यानं आठवणीची कवाडं उघडण्याचा प्रयत्न करून पाहिला. पण ती गंजलेली कवाडं उघडली नाहीत. त्याची निराशा झाली. मग तो बावचळून पुढं जाण्याऐवजी परत पळाला. तुरुंगाचं दार लोटू लागला. पहारेकऱ्याचं डोकं फिरलं. त्यानं नागूची मान धरून हिसडा दिला. बारा वर्षे नागूला तुरुंगात कोंडून ठेवणारा तो पहारेकरी, आज परत आत जाण्यासाठी नागूनं नुसता दाराला हात लावताच पिसाळला नि म्हणाला,

'डोकं फिरलं काय तुझं?'

'न्हाय हवालदार', नागू लाचारपणं म्हणाला, 'ह्यो माणूस कोण?'

'तो भिकारी आहे, राक्षस नाही. पळ-' असं म्हणून पहारेकऱ्यानं बंदुकीचा खांदा बदलून गर्रकन गिरकी मारली. नागूचा नाइलाज झाला. त्यानं चोरट्या नजरेनं पाहत जवळजवळ पळच काढला. मग दूर जाऊन पाहिलं तेव्हा तो दाढीवाला हातात काठी घेऊन ढेंगा टाकीत वाघाप्रमाणे दबा धरून येताना दिसला. आणि नागू गर्भगळित झाला. त्यानं धूम ठोकली. आणि 'पुणे-कोल्हापूर' या मोटारीत मुरकंड देऊन, अगदी ड्रायव्हरच्या मागच्या सीटवर बसून सुटकेचा निःश्वास टाकला.

पुणे-कोल्हापूर या पोलादी मार्गावरून ती मोटार भरधाव वेगाने धावत होती. बाजूची झाडं गिरक्या घेत मोटारीकडे येऊन भराभर मागं जात होती.

सूर्य माळतीकडं निघाला होता. हिरवीगार झाडं डुलत होती. नुकताच पावसानं आपला तळ उठवला होता. त्यामुळे झाडाझुडपांना बिल्वरी बहर आला होता. प्रवासी बाहेरची ती सुंदर शोभा पाहत होते.

ती मोटार तेव्हा महाराष्ट्राच्या काळजावरून - सातारच्या धरणीवरून - झेप घेत पळत होती. तिचा वेग वाढत होता, पण उंच सह्याद्रीच्या पायाजवळ जाताच फार तर मुंगळ्याएवढी भासत होती.

नागू आपलं मन निर्भय करीत होता. आपण उगीच भ्यालो. पण तो माणूस कोण? तसा का उठला? तो पूर्वी कुठं दिसला होता? असे अनेक प्रश्न तो स्वत:ला विचारीत होता. नकळत त्याची मान वळली. डोळ्यांनी दगा दिला. त्याने सर्वत्र पाहिलं नि नागू दचकून उद्गारला, 'धनाजी!' गंजलेलं आठवणीचं दार उघडताच ते नाव बाहेर पडलं नि तो पुन्हा भयभीत झाला. त्याला धडकी भरली. आपला क्रूर मृत्यू आपल्या मोटारीतून बसून आपल्याबरोबर प्रवास करीत आहे हे पाहून तो अस्वस्थ झाला.

तो माणूस दाराजवळच्या सीटवर निवांत बसला होता. त्याच्या हातातील कुऱ्हाडीचा दांडा उभा होता. नि त्याची नजर नागूच्या डोकीवर कायमची बसली होती.

नागू पुन्हा बावचळला. त्याचं मन पुन्हा विचारचक्रात गुरफटलं. हा आपला वैरी. हा धनाजी रामोशी. हा आता माणसातून उठला असावा. याला आपलं रक्त हवं असावं म्हणून हा बारा वर्षे आपली वाट पाहत असावा.

ही बेरडांची अवलाद काय करील कोण जाणे. याला कसा टाळावा, कसा चुकवावा, या विचारात नागूचा जीव गुदमरला. त्याची नजर घडोघडी वळून पाहत होती नि त्याची भीती वाढत होती. तो स्वत:वर चिडला नि त्यानं खिडकीतून बाहेर पाहिलं.

मोटारीनं कऱ्हाड मागं टाकलं होतं नि ती त्याच वेगानं इस्लामपूर जवळ करीत होती. बाहेर अंधार मी म्हणत होता. तो जणू मोटारीच्या चाकाखाली चरचरत होता. नागू मनात म्हणाला, 'आपण उगीच तुरुंगातून सुटलो, तुरुंगात असतो तर बरं झालं असतं. ही पीडा लागली नसती.' माणसाशी बोलावं तसा तो अंधाराशी बोलत होता.

गप्पकन मोटार कासेगाव स्टँडवर थांबली. चार उतारू उतरले. 'वाटेगाव दोन मैल' ही पाटी नागूला दिसली आणि आपणही इथंच उतरावं असं त्याला वाटलं, पण त्याच वेळी मोटार पुढं निघाली नि नागू निराश झाला. त्यानं शांत बसण्याची खटपट आरंभली. परंतु भीती त्याला शांत बसूच देत नव्हती. ती विचारांची भुतं उठवून त्याचं काळीज फोडीत होती. एका विचारातून मुक्त होताच तो दुसऱ्यात अडकत होता. आता इस्लामपूर येऊन जाईल; मग ही मोटार त्या वैराण माळावर एका वटवृक्षाखाली थांबेल. तिथं मला

उतरावंच लागेल. त्या ठिकाणी हा धनाजी नक्कीच उतरणार. मग आपणाला दोन मैल ढालवाडीला हा जाऊच देणार नाही. आई, बाप, बहिणी, गावकरी कुणाचीच भेट होणार नाही. इथपर्यंत येऊन काहीच फायदा नाही...

हे सर्व त्या पापाचे फळ आहे. तेच महापाप मला गारद करीत आहे. ते मला जाळीत आहे. होरपळून मारीत आहे.

खरंच, ते महापाप होतं. आवडी माझी सख्खी बहीण. सख्ख्या बहिणीचं नातं रेशमासारखं मऊ नि कापरासारखं नाजूक असतं. पण मी त्याची पर्वा केली नाही. ती देखणी आवडी. तरुण आवडी. केळीच्या कोंबासारखी आवडी. त्या भयाण रात्री 'नको नको' म्हणून हात जोडत होती. पाय धरीत होती. 'मला सोड' म्हणून आर्जवीत होती, पण... पण मी ऐकलं नाही. महापाप करून मोकळा झालो. त्याचेच हे आता प्रायश्चित्त आहे!

आपल्या देखण्या बहिणीची - आवडीची - आणि त्या कुकर्माची आठवण होऊन त्याचे डोळे भरून आले. त्यानं पुन्हा सहज वळून पाहिलं. नि त्याच वेळी त्याचं मन त्या जबर दहशतीच्या वरवंट्याखाली रगडलं गेलं. क्षणात त्याचा खरडाच झाला...

परंतु लगेच त्याला इस्लामपूरच्या पांडू पहिलवानाची आठवण झाली. जुना दोस्त वस्ताद या वेळी नक्की मदत करील. एक रात जागा देईल. पांडू दुर्जन होणार नाही, असं वाटून त्याला धीर आला. आणि इस्लामपूर येऊन आदळलं. उतारूंनी कालवा केला. चढणाऱ्यांनी दारात झिंबड केली. ती संधी साधून नागू बाहेर पडला. नि पळाला. नि पांडू वस्तादाचं घर आठवीत त्यानं धूमच ठोकली.

वाटेकडेलाच पांडूचं घर होतं. बरेच अंतर राखून नगरपालिकेचे दुबळे दिवे जळत होते. सर्व कवाडं बंद होती. सर्वत्र सामसूम झाली होती. नागूनं पांडूचं दार ठोकलं. तसा पांडू वस्ताद नावाचा एक हाडाचा सापळा बाहेर आला. तो उघडा बंब होता. फक्त लंगोटा घालून तो जांभया देत अंग खाजवीत होता.

'कसं काय पैलवान, बरं हाय का?' नागूनं सुरुवात केली.

आणि पांडू टीर खाजवीत म्हणाला, 'म्या पहिलवानकी सोडून लई दिवस झालं. तुम्ही कोण माझ्या डोक्यात न्हाय आलं-'

हे ऐकून नागू अवमानित झाला. काहीच बोलला नाही. काय बोलावं याचा विचार करू लागला. आणि पांडूनं पुन्हा सांगितलं, 'खरं, माझ्या डोक्यातच यीना-'

'आँ! आवं, मी त्यो ढालवाडीचा नागू चौघुला.' नागू चरफडून म्हणाला, 'मी तुमच्याच तालमीत तयार झालूया की. तुमचा माझ्यावर फार जीव व्हता.'

'असं असं. आलं डोक्यात.' पांडू डोकं खाजवीत म्हणाला, 'म्हंजी ती सख्ख्या भनीची भानगड करून तुरुंगात गेल्याला-?'

नागूचा आत्मा पुन्हा पोळला. त्यानं फक्त मान होकारार्थी हलवली आणि पांडू म्हणाला, 'बरं, पर अशा अपराती येणं का केलंय?'

या बोलानं तर नागूच्या काळजावर डागणीच बसली. तो म्हणाला, 'आजच तुरुंगातनं सुटलोय. रातभर मला वसतीला जागा द्या.'

'छा: छा:! तेवढं बोलू नका!' पांडू लटकं हसत म्हणाला, 'अजून रात तशी झालेली न्हाय. गौरीच्या सणासाठी चार पोरी आल्यात्या. तुमी भनीची भानगड केली हे, नि तुमान्सी म्या जागा दिली हे कळलं तर त्या जोड्यानंच माझी हजामत करतील. देवाच्यान्-' असं म्हणून त्यानं काखा वर करून बगला खाजवल्या, आणि नागू रडकुंडीला आला.

'माझ्या मागं त्यो धनाजी लागलाय', असं म्हणून त्यानं समोर भिंतीकडं पाहिलं. दुरून येऊन एक प्रचंड सावली त्या भिंतीवर स्थिर उभी होती. आता त्या सावलीच्या हातात कुऱ्हाड दिसत होती, ती पाहून नागूचं काळीज फाटलं. तो चाचरत म्हणाला, 'प...ई...ल...वा....न....ब...घा....'

आणि ती भयाण सावली बघून पांडू टरकला. तो म्हणाला, 'घरात शिरून परसदारानं पळा.'

तेवढाच उपकार समजून नागू पांडूच्या घरात शिरला नि मागच्या दारानं बाहेर पडून अंधारात पळाला. घडीभर त्यानं मृत्यूला गुंगारा दिला.

ढालवाडी शांत झाली होती. दिवसभर कष्ट करून दमलेली माणसं घोरत होती. रात चढत होती. वातावरण गुदमल्यासारखं वाटत होतं.

रघू चौधुल्याच्या घरात तेवढा दिवा जळत होता. घरची माणसं दुचमटून बसली होती. सोप्यात नागू गंभीर होऊन विचार करीत होता. रघू भिंतीला पाठ लावून बसला होता. त्यानं अंगावर घोंगडं घेतलं. नागू सुटून आल्यानं आनंद होण्याऐवजी सर्वांना दु:खच झालं होतं. पोरी दचकल्या होत्या. आणि सर्वांच्या डोळ्यापुढं आवडी उभी राहिली होती. आवडीची आठवण होऊन म्हातारा रडत होता. तो मुकी आसवं ढाळीत जुने दिवस आठवत होता - आणि आवडीला पाहत होता.

बारा वर्षांपूर्वी...

रघू चौधुल्याचं घर आनंदानं भरलं होतं. थोरली सारजा नांदगावात नांदत होती. मधला नागू कुस्ती करत होता, आणि धाकटी आवडी वयात आली होती. आवडीच्या रूपाला, गुणाला गावात जोड नव्हती. साऱ्या घरची आवडी म्हणून चौधुल्यानं तिचं नाव आवडी ठेवलं होतं. नाकीडोळी खुडून घ्यावी अशी ती आवडी चालू लागली की तिच्या टाचेखाली खडा करकरत होता. तिच्या गालावरचं हसू कधीच मावळत नव्हतं नि रघूला तिच्यावाचून करमत नव्हतं.

पुढं बोरगावचा पोलीस पाटील भगवानराव हा रघूकडं पाव्हणा होऊन आला. त्यानं आवडीचं रूप पाहिलं नि आपल्या मुलासाठी तिला मागणी घातली. 'सून करीन तर हीच करीन' असा पाटलानं हेका धरला.

ठरावअराव झाला. तिथी निश्चित होऊन आवडीवर तांदूळ पडलं नि ती लगेच सासरी गेली. तेव्हा ढालवाडी सुनी सुनी भासली. चौधुला उदास झाला.

परंतु आवडी मात्र आनंदानं मोहरली होती. ती स्वत:च्या रूपानं, तारुण्यानं आणि सासरच्या वैभवानं भारावली होती. आपल्याइतकं सुख कुणाच्याच वाट्याला नसेल असं तिला वाटत होतं.

परंतु चौथ्याच दिवशी तिचा भ्रमनिरास झाला. सकाळीच आवडीचा नवरा एकाएकी उलथून पडला. गुरगुरत त्यानं पाय वर केले. आणि मग उपडा पडून तोंड मातीत खुपसू लागला. एका हातानं त्यानं गाडीची साठी धरून आवळून मोडली. मग त्याचे दोन भाऊ धावले. त्यांनी खेटरे घेऊन त्याच्या तोंडावर धरली. तेव्हा तो उशिरा शुद्धीवर आला.

तो प्रकार पाहून आवडी स्तंभित झाली. मग कोमेजली; नि त्याच वेळी तिची सासू म्हणाली, 'सूनबाई, तुझ्या मालकाला हे असं फेफरं येतं, तरी जपून अस बरं.'

हे ऐकून आवडीचा आत्मा पेटला. तिला त्या वैभवाची, पाटीलकीच्या दिमाखाची किळस आली. ती मनात म्हणू लागली. 'हे माझ्या घरी आले. त्यांनी मला पसंत केली. कसोटीवर सोनं घासावं तशी मला पारखून घेतली. पण त्यांनी माझ्या पदरात हे पितळ बांधलं. आपला हीण यांनी दडवून माझा घात केला. आता मी याच्या शेजारी जन्म गुदरायचा, कधी फेफरं येईल याचा म्हणे नेम नाही.'

आवडी मनात झुरत होती, आपलं वाईट झालं या भयानं नवऱ्याजवळ नांदायचं कसं याचा ती विचार करू लागली. ती माहेरी गेली. तिनं थोरला भाऊ म्हणून नागूला तो प्रकार सांगून पाहिला. त्यानं नुसतं ऐकून घेतलं. विचित्र नजरेनं पाहिलं. त्याचं आवडीला नवल वाटलं. तिच्या मनाचा भडका झाला.

मग आवडीनं ती गोष्ट आईबापांच्या कानावर घातली. तेव्हा तर बापानं कानावर हात ठेवला. तो म्हणाला, 'मुलीचा जन्मच असा असतो. तिनं दिल्याघरी नाहीतर व्याल्याघरीच मेलं पाहिजे. तिला मरणाला तिसरी जागा नाही.'

या उपदेशानं आवडी भडकली. 'माझं नशीब फुटलं. माझी फसवणूक झाली,' असं म्हणून खूप खूप रडली. तिची दारुण निराशा झाली. आणि सरणावर चढावं तद्वत ती पुन्हा सासरी गेली; नि जळत, पेटत, कुढत नांदू लागली.

त्या वेळी बोरगावच्या धनाजी रामोश्याचं नाव गाजत होतं. गावात त्याचा बोलबाला वाढला होता. मातब्बर माणसं धनाजीला मान देत होती. तरुण, देखण्या, बलवान धनाजीला त्याची कीर्ती शोभत होती.

रोज काही ना काही संदर्भात पाटलाच्या वाड्यात धनाजीचं नाव निघत होतं. आवडी ते ऐकत होती - आणि धनाजी कसला असेल, त्याला एकदा पाहावा असं तिला सारखं वाटत होतं.

एकदा बोरगावची जत्रा भरली होती. आवडी काकणं भरून फिरत फिरत परत निघाली होती. ती पाराखालीच येताच चकित झाली. पाराखाली धनाजी उभा होता. भरपूर उंची, रसरशीत चेहरा, पीळदार देह, अंगावरची स्वच्छ कापडं, हातात लखलखीत कुऱ्हाड. हे सर्व पाहून आवडी विस्मयानं पाहतच राहिली. तिची तरल नजर त्याच्यावर स्थिरावली. आणि त्याच वेळी धनाजीनं तिच्याकडं पाहिलं. दोन नजरा टक्करल्या. तशी आवडी बावरली नि गालात खुदकन् हासली. मान खाली घालून निघून गेली. त्या दिवसापासून आवडीला वेड लागलं होतं. धनाजीही काही ना काही निमित्त काढून येत होता; नि तो आला की आवडीचा जीव वाराहुरा होत होता. त्याचा शब्द कानी पडावा, तो दिसावा म्हणून ती खुळी होत होती. चौकटीत येऊन चोरून पाहत होती, आणि तो गेला की ती खिन्न होत होती. त्याला पाहण्यासाठी तिचे डोळे चरफडत होते. मनाची ओढ वाढत होती. एक हुरहूर शिगेला पोचून तिच्या मनाचं स्वरूप बदलत होती.

आणि एके दिवशी आवडीनं गावाला जबरदस्त धक्का दिला. प्रत्येक माणसाला तिरमिरीच आली. जो तो म्हणू लागला, 'आता इच्चाइला, ही आवडी रामुशाचं घरात की शिरली.'

पाटलाची आळी तर वेडीपिशी झाली. तरणी पोरं टापरी बांधून कुऱ्हाडी नाचवू लागली, नि 'खून-फाशी' एवढंच बोलू लागली. ती खबर ढालवाडीला जाताच आवडीचे आईबाप डोके आपटून घेऊन लागले. आवडीनं सासर नि माहेर या दोन्ही आघाड्यांवर एकाच वेळी लढाई पुकारली होती. त्या दोन्ही गावात तिनं वणवाच पेटवला होता.

बोरगाव तर सारखं 'आवडीऽ आवडीऽ' करीत होतं. पाटलीण रामोशाचं घरात शिरली याचं त्या गावाला दुःख झालं होतं. त्यानं आवडीचा नष्टावा करण्याचा विचार केला होता. परंतु रामोशाशी झुंजणं कठीण होतं. धनाजीची कुऱ्हाड नि भावकी यापुढे गावाचं काहीच चालणार नाही हे सर्व लोक जाणून होते नि आवडीनं धनाजीजवळ राहणं त्यांना पसंत नव्हतं. धरलं तर चावतं नि सोडलं तर पळतं अशी या गावाची अवस्था झाली.

मग गावानं तिसरा मार्ग काढला. सर्व शहाणी माणसं, बोलकी नि कर्ती माणसं जमली आणि पंचायत पाडली. पाराखाली गाव जमला, नि वातावरण पाहून लोकांनी हत्यारं सांभाळावी असं ठरवून सर्व रामोशी एका जिवानं आले होते. निरनिराळी टोळकी जागोजाग बसली होती, बोलणारे पुढे सरकले होते. आणि पदरी दमडी नसताना बाजाराला जाऊ नये असा दूरचा पोच करून न बोलणारे दूर बसले होते.

अखेर भगवान पाटलानं आरंभ केला. तो म्हणाला, 'ऐका मंडळी, आमचं म्हणणं

एवढंच की रामुशांनी या भानगडीत पडू नये. त्येनी जळात ऱ्हाऊन माशाशी वैर करू नये.'

'मग काय करावं?' धनाजीनं जागीच बसून सवाल केला.

पाटील म्हणाला, 'तुम्ही आवडीला घरात ठेवू नगा. ते ईख हाय. आवडी म्हंजी आमचं नाक हाय. अब्रू हाय. गावची इज्जत हाय आणि ते रामुशांचं मराणबी हाय. आम्ही शेंबडासाठी नाक कापून टाकू.'

हे ऐकून धनाजी उठला नि म्हणाला, 'पाटलाचं खरं हाय. मी आवडीला हाकून देतो, पर तुम्ही तिला घरात घेणार का?'

'तसं कसं व्हयील? न्हाय बरं.' सारी पाटील आळी ओरडली. आणि भगवान पाटील गरजला, 'आवडीचं आम्ही कायबी करू. तिच्यावर आमची मालकी हाय.'

'खरं हाय', आवडीचा दीर ओरडला, 'ते बाटलेलं भांडं हाय. तू तिला हाकून दे, मग आम्ही तिचं कायबी करू. जाळू, पुरू, मारू-'

'खबरदार-' धनाजी संतापून म्हणाला - 'जाळायची, मारायची भाषा करू नगं. जर तुम्ही तिला घरात घेणार न्हायसा तर तिला माझ्या घरात ऱ्हाऊ द्या-'

'भऽऽलं-' बजाजी देशमुख उठला. मग किंचित वाकून एक हात कमरेवर ठेवून म्हणाला, 'आज आवडी तुझं घर शिरली, उद्या गावातल्या साऱ्या बायका तुझ्याकडे येतील, मग आम्ही काय बोंबलावं? काय करावं रं शेण्या?' त्यानं उजव्या हाताची मूठ उलटी करून हळूहळू बोंबलून दाखवून मटकन बैठक मारली आणि त्या वेळी सर्व गाव गंभीर झाला.

'आवडी ईख हाय—'

'घरात ठेवू नगं—'

'हाकून दे—'

'न्हाय तर मरशील—'

सारा गाव ओरडू लागला. त्या दंगलीनं धनाजी संतापला. तो गोंगाटावर मात करील असा आवाज चढवून म्हणाला,

'मी तयार हाय. माझी कत्तल होऊ दे. जी आवडी पाटीलकीवर ठोकर मारून माझ्या गरीबाच्या झोपडीत आली, ती माझा देव हाय. तिला तडकी आड करणार न्हाय. म्या तिला हाकून दिली की तुम्ही तिला कुत्र्याच्या मौतीनं मारणार हायसा. आता ती आवडी मरूनच माझ्या घराभाईर पडल. तुम्ही कवाबी या. मला गोळी घाला. न्हाय तर माझ्या कुऱ्हाडीखाली कडक व्हा. मी आवडीला दुर्जन व्हणार न्हाय. तिच्या मानेवर मान तोडून मरंन.'

धनाजीच्या शब्दांनी गावावर जणू तोफखानाच पेटवला. बोलक्यांची दाणादाण

उडाली. सर्वांनी घोंगडी झटकून बैठक मोडली. 'रामुशी ऐकणार न्हाय,' असं म्हणत त्यांनी घरं गाठली.

आवडी सुखात बुडाली होती. नागिणीप्रमाणं गावापुढं डुलत होती. धनाजी तिला तळहाताच्या फोडाप्रमाणं जपत होता. तिच्या पायांत सोळाभार वजनाची जोडवी छनछनत होती. शिंदेशाही तोड्यानं तिच्या गोऱ्या पोटऱ्यांना भलतीच शोभा आणली होती. गळाभर दागिनं, उंची किमतीचं लुगडं, हिरवीगार काकणं. धनाजी तिला घडीभरही विसरत नव्हता.

परंतु आवडीला माहेरची आठवण होत होती. ती उणीव तिला डाचत होती. ते एक सुख तिला हवंहवंसं वाटत होतं. त्या सुखासाठी ती मनात झुरत होती. 'धनाजीजवळच मरायचं; पण माहेर कसं जोडावं?' याची तिला बोचणी लागली होती. आई, बाप, भाऊ, बहीण यांची आठवण होताच ती फुलासारखी कोमेजून जात होती, हृदयात आग पेटत होती. माहेरी जावं, आईच्या गळ्यात पडून खूप रडावं, बापाला पाहावं, बहिणींना भेटावं, असं तिला एकसारखं वाटत होतं. ती माहेरची खुडलेली वाट पाहून रडत होती.

पुढे गौरीचा सण आला. सासरी गेलेल्या मुली माहेरी आल्या. पोरी थव्याथव्यानं गौरीची गीतं गाऊ लागल्या नि आवडी बेचैन होऊ लागली. आपणही माहेरी जावं असं तिला वाटू लागलं. ती त्याचा विचार करू लागली.

कडूसं पडलं होतं. गावात पोरी जमून गौरीची गीतं गात होत्या. 'राजस पाखरा, जा माझ्या माहेरा-' आणि ते ऐकून आवडी रडत होती. ती अंधारात उभी राहून डोळे टिपीत होती. तोच एक चमत्कार झाला.

नांदगावची सारजा आली. आणि तिला पाहून आवडीनं हंबरडा फोडला. ती बहिणीच्या गळ्यात पडली नि लहान मुलीसारखी रडू लागली. सारजाही रडली. धनाजीला बरं वाटलं. बहिणीबहिणी खूप बोलल्या. मग सारजा धनाजीला म्हणाली,

'मी आवडीला नांदगावला न्हेते. गौरीचा सण झाला की येऊन परत आणा-'

हे ऐकून धनाजीला आनंद झाला. तो म्हणाला, 'ह्यो कृष्णा-कोयनेचा संगम कोण मोडील? आवडे, जा तू नांदगावला. गौरीचा सण झाला की सकाळीच मी येतो.'

आवडी सारजाबरोबर नांदगावला गेली. हळूहळू माहेरची वाट मोकळी होईल असं तिला वाटलं नि ती आनंदली.

तो गौरीचा सण होता. आज सकाळपासून आवडी हासत खेळत बहिणीच्या घरी वावरत होती. बोलत होती. पोळ्या करीत होती. उद्या सकाळी धनाजी येणार होता, म्हणून नजर झुगारून त्याची वाटत पाहत होती. वेडी आवडी उद्या येणाऱ्या सकाळची आजची कडूसं पडताना वाट पाहत होती.

कडूसं पडलं. सारजानं एका ताटात निवद भरला. 'माझ्या सासऱ्याला निवद दाखवून येऊ दे' असं म्हणून सारजा आवडीला घेऊन रानात निघाली तेव्हा गाव सणामुळे आपल्या

नादात दंग झाला होता. लोक पोळ्या खाऊन ढेकर देत होते.

सारजाच्या मागून आवडी चालत होती. त्या दोघींनी बराच पल्ला मारला होता. गाव पुष्कळ दूर राहिला होता. शिवार निर्जन नि भकास भासत होता. अंधार चराचराला गिळीत होता. आवडी दचकून चालत होती. ती मनात भ्याली.

एका बांधावर एक मोठं आंब्याचं झाड उभं होतं. त्याच्या बुडख्याला गड्द काळोख दाटला होता. तिथं सारजा थांबली. आणि गप्पकन नागू पुढं आला. त्याच्या हातात कुऱ्हाड लखाखली. ती पाहून आवडीला हुडहुडी भरली. ती 'अक्काऽ' म्हणून सारजाच्या मागं दडली. मग तिनं सारजाला मिठी मारली. तिला कापरं भरलं.

सारजा क्षणात निर्दय झाली. तिनं आवडीला धरून नागूपुढे लोटली. नि ती म्हणाली, 'माहेरच्या तोंडाला डांबर फासणाऱ्या दुष्टे, भोग आता पापाची फळं!'

आवडीनं टाहो फोडला. पण तिचा आवाज गोठला होता. ती भीतीनं थिजली होती. आणि तिच्या डोकीवर नागूची कुऱ्हाड तळपत होती. 'नको नको, मी पाया पडते. मी परत तुम्हाला तोंड दाखवणार न्हाय. मला मारू नका. मी आत्ताच जाते-' असं म्हणून आवडी लोटांगण घालत होती. तिनं नागूपुढं डोकं टेकलं. वेड्यासारखी ती माती चाचपली. पुन्हा उठली आणि बहिणीच्या मागं दडली. परंतु पुन्हा सारजानं तिला दूर लोटली . मग ती खाली कोसळली. आणि त्याच वेळी नागूनं घाव घातला.

'धऽनाऽजीऽऽ' - अशी किंकाळी फोडून आवडी शांत झाली. ती देखणी बंडखोर आवडी पुन्हा बोलली नाही; आणि...

आणि भल्या पहाटे धनाजी नांदगावात आला. त्यानं सारजाच्या दारात येऊन आवडीला हाक मारली.

तशी सारजा धडपडत बाहेर येऊन निर्विकार चेहरा करून म्हणाली, 'आवडी रातीच गेली बोरगावला.'

त्या शब्दांनी धनाजीवर वीज पडली. त्याला तो भयंकर दगा कळून आला. त्याचे काळीज फाटले. नि तो रडू लागला. त्यानं नवं इरकली लुगडं आणि नवी चोळी दुहेरी शिवून तयार आणली होती, पण तिथं आवडी नाही हे कळताच त्याचा आत्मा खचला आणि तो सरळ फौजदाराकडं गेला. सरकारी यंत्रे लगेच फिरू लागली. नांदगाव पोलिसांनी वेढला. पहिल्या झपाट्यात सारजा गांगरली आणि कबूल झाली. 'आवडीचा खून'.

मग लगेच नागूला अटक झाली.

आणि त्याच दिवशी धनाजीला वेड लागलं. 'आवडी-आवडीऽ' करीत तो आक्रोश करू लागला. ती नवी चोळी, ते नवं लुगडं काखेत घेऊन तो सूडानं वेडावला...

दिवा शांत जळत होता... रघू चौघुला डोळे पुसून म्हणाला, 'काय मिळवलंस? जन्मली कन्या कुळाबाहेर हे तुला समजलं कसं न्हाय? सख्खी भन ठार मारणारा तू

जगावास कशाला? तुला बघून घरात पोरंबाळं अन्न खाईनाती... तुला सैतान समजत्याती...'

इतक्यात पोरं किंचाळली. एकच दंगल झाली. पोरी पळत सुटल्या. थरथर कापू लागल्या. रघूनं ओरडून विचारलं,

'काय झालं?'

'आरस्पानी पाण्यात भूत दिसलं-' पोरी म्हणाल्या. आणि रघू म्हणाला, 'भूत नव्हं. त्यो धनाजी हाय.'

तसं नागू उठून पळू लागला. दिवस पळत होता. रात्र पळत होती. नागू पळत होता आणि त्याच्या मागं धनाजी पळत होता...

आला आला म्हणत गौरीचा सण आला. नागूला आवडीची आठवण झाली. तो पळत पळत नांदगावच्या शिवारात शिरला. जिथं ती आवडी नागूच्या पाया पडत होती, चरफडत होती, 'मला मारू नको' म्हणून आर्जवीत होती, तिथं तो गेला. आंब्याच्या झाडाकडं पाहत त्यानं ती माती चाचपली. जिथं आवडीनं डोकं टेकलं, तिथं टेकून तो म्हणाला, 'आवडे, मला माफ कर, माझं चुकलं...' आणि -

आणि धनाजीची प्रचंड कुऱ्हाड त्याच्या मानेवर कोसळली. अंधाराच्या ठिणग्या उसळल्या. काळी जमीन अधिक काळी झाली. नि पुन्हा ती कुऱ्हाड खाली आदळली! 'आवडाऽ-' अशी दीर्घ आरोळी तलवारीप्रमाणे रात्रीची चिरफाड करीत गेली नि नागू शांत झाला!

मग धनाजीनं ते इरकली लुगडं, ती चोळी बांधावर ठेवली. आकाशात पाहिलं. आणि 'आवडाऽ' अशी आरोळी ठोकली. ती आरोळी त्या शिवारात.... सह्याद्रीच्या कपारीत चिरंजीव होऊन घुमत राहिली.

---

## भोमक्या

'भोमक्या, तुझं नाव भोमक्याच ना?'

'हारी हारी! ते माले काय ठाऊक?'

'तुला मुलं किती आहेत?'

'दोन, हारी हारी!'

'तुझी बायको कुठं आहे?'

'हारी हारी! माले माहीत नाय.'

'तुझं लग्न कधी झालं?'

'हारी हारी! माले माहीत न्हाय.'

आम्ही सर्व कैद भोमक्याला प्रश्न विचारीत त्याच्याभोवती गर्दी करून बसत असू आणि भोमक्या भेकड हास्य करीत उत्तर देत असे. तोही आम्हाबरोबर अमरावती तुरुंगात कैदी होता.

अगदी घरबश्यासारखा रंग. ठेंगू पण थोडे लठ्ठ शरीर. आखूड मान, किडकिडीत पाय. मोठे नगाऱ्यासारखे पोट, तेही बेडकीच्या पोटासारखे ढिळढिळीत. तो उभा राहिला म्हणजे भोपळ्यात काटक्या रोवल्याप्रमाणे त्याचे पाय दिसत. डोकीला जटा. उंचच्या उंच हातभर लांब टोपी. आणि तेवढीच लांब दाढी. नेसायला फक्त एक लंगोटी. चेहऱ्यावर सर्वत्र केसच केस. फक्त डोळे तेवढे दिसत. तो तालबद्ध चाले आणि चालताना त्याचे सर्वांग थरथरत असे. जेलचे जेवण येईपर्यंत तो खिन्न होऊन बसत असे. तोपर्यंत तो कोणाशीच बोलत नसे. आणि एकदा का जेवण आले की, उठून गप्प जेवण करी. मग मात्र त्याची वाचा उघडल्यासारखी होई. मग तो चेकाळून गप्पा ठोकी, अथवा आपल्या भसाड्या आवाजात नामस्मरण करू लागे. त्याचा आवाज म्हणजे पिसाळलेल्या वाघाचे गुरगुरणेच वाटे.

त्याच्या बोलण्याची आम्ही आतुरतेने वाट पाहत बसत असू. तो क्वचितच बोले. त्यामुळे आम्हाला फार वाईट वाटे. जरा एखादे वेळी तो बोलला की सारा तुरुंग खदखदा हसायचा; पण स्वारी बोलत नसे. आणि त्याला लहर आली की त्याचा अभंग सुरू होई.

'ठायींच बसूनी करा चित्त, दुमदुमली पंढरी ।।

नामा म्हणे तुकाराम तुकाराम, जनाबाई, मुक्ताबाई, भागूबाई, राधाबाई ।।

तुका म्हणे इथं असावा जातीचा, येरा गबाळाचं काम नाही ।।'

मग सर्व हासत बोलत असायचे. त्यामुळे भोमक्या साऱ्यांना फार आवडे.

सर्व कैदी दोन रांगांनी उभे राहत. आणि मग तुरुंगाधिकारी मि. घोटाळे आमची पाहणी करीत. तेव्हा कैदी आपल्या तक्रारी सांगत.

एकदा आमची रांग उभी होती. भोमक्या माझ्या शेजारी उभा होता. घोटाळे ऐटीत इकडे तिकडे पाहत निघाला.

'साहेब!' भोमक्या खाकरून घसा साफ करीत म्हणाला.

'का? काय रे?' घोटाळेने उभे राहून पृच्छा केली.

'मी असा भोपळ्यासारखा, किती दिवस उघडा राहू?' भोमक्याने तक्रार गुदरली. सर्व कैदी हसू लागले.

'म्हणजे काय रे?' घोटाळेने विचारले.

'नव्हं, मी घरावर भोपळा पिकल्यासारखा पिकू लागलो. माझा रंग काळा होता तो पिवळा होतोय, साहेब.' भोमक्या म्हणाला.

मला हसे आवरेना. सर्वत्र हास्यकल्लोळ उठला. जो तो आपले हसणे दाबून धरण्याचा प्रयत्न करीत होता, परंतु जमत नव्हते. भोमक्या मात्र निर्विकार चेहरा करून स्थितप्रज्ञासारखा उभा होता. आणि घोटाळे कावराबावरा होऊन माकडाप्रमाणे पाहत होता. त्याला काहीच कळत नव्हते. काही कैदी आपल्या गुडघ्याला हात देऊन हासत होते. घोटाळे गोंधळून गेला. त्याला कैद्यांची चीड आली. तो संतापला.

'खामोश!' घोटाळे मोठ्याने ओरडला आणि लष्करी ऐटीत मागे हटला; पण त्याचा पाय घसरून तो आदळला.

आणि भोमक्याही हसू लागला. त्याने मांजरासारखा जबडा पसरला आणि जांभया दिल्याप्रमाणे तो करू लागला.

त्याच्या त्या हसत्या अवताराकडे पाहून पुन्हा हास्यकल्लोळ उठला. घोटाळे बिथरला.

'मी म्हणतो, खामोश!' घोटाळे ओरडला. सर्वत्र शांतता प्रस्थापित झाली.

'हं, काय रे?' घोटाळेने भोमक्याला सवाल केला.

'माले अंगात घालाय काय द्या की.'

'ऑफीसमध्ये काय जप्त केलेलं आहे का?'

'माझा एकताऱ्या ठेवून घेतलाय. बाकी कपडे न्हवते. मग काय घेणार? ही लंगोटी काय त्यांनी घेतली नाय! अनी घेऊन तरी काय करणार ते?' भोमक्याने आपल्या लंगोटीकडे बोट करून म्हटले. पुन्हा सर्वत्र हासे उफाळले आणि घोटाळे रागारागानेच चालता झाला.

थोड्याच वेळात एक वॉर्डर आला आणि त्याने एक चड्डी व बंडी आणून दिली.

भोमक्याला आनंद झाला. जन्मात कधी त्याला नवी करकरीत चड्डी-बंडी मिळालीच नव्हती.

'मायले, ही लंगोटी आता फेकतो,' तो पुटपुटला.

सहाची घंटा झाली. आम्ही बराकीत बंद होण्याची वाट पाहत होतो. बंद होणे आम्हा सर्वांना मुळीच आवडत नसे; पण त्याशिवाय गत्यंतर नसे.

आम्ही बंद झालो. भोमक्या काखेत चड्डी-बंडी घेऊन आत आला. त्याला ती अंगात घालण्याची घाईच झाली होती. आज तो खूष दिसत होता. त्याने आपला पोषाख बदलण्याचे काम सुरू केले. माझे किंवा कोणाचे लक्ष तिकडे नव्हते.

'पाटील, हे माले कसं दिसतं?' भोमक्यानं मला विचारलं. आणि पुन्हा हास्याचे फवारे उडाले. कैदी लोळू लागले. भोमक्याची बंडी त्याच्या छातीत तंग बसली होती. लहान मुलीची चोळी एखाद्या मोठ्या बाईने घातल्यासारखी ती दिसत होती. त्यामुळे त्याला खोडा घातल्यासारखे होऊन तो आपले हात वर करून उभा होता. खाली चड्डीनेही तोच प्रकार केला होता. तिनेही त्याच्या मांड्यांना घट्ट मिठी मारली होती. भोमक्याला कोलदांडा बसल्यासारखे झाले होते. वागरीत ससा अडकावा तसा तो अडकला होता. त्याला श्वास घेणे जड झाले आणि तो गिरक्या घेऊ लागला. सभोवती कैदी हसत लोळत होते.

एखाद्या मांजराने दुधाच्या आशेने गाडग्यात डोके घालावे आणि शेवटी त्याचे मुंडके अडकून बसावे तसा भोमक्या अडकला होता. थोड्या वेळाने तो खाली कोसळून पडला आणि धडपडू लागला. दम तोडून तो कण्हू लागला.

परिस्थिती खरोखरच बिघडली असून भोमक्या धोक्यात आहे हे जेव्हा सर्वांच्या लक्षात आले तेव्हा दोन पठाण कैदी उठले. खाटिकाने बकऱ्याची सागळ उपसल्याप्रमाणे भोमक्याच्या अंगातील बंडी त्यांनी उपसून काढली. दुसऱ्या दोघांनी त्याचप्रमाणे त्याची चड्डी उपसली. भोमक्याची मुक्तता झाली. त्याने सुटकेचा निःश्वास टाकला. तो दीर्घ धापा टाकीत पडून राहिला. त्याचे ते प्रचंड पोट मंद गतीने एखाद्या भात्यासारखे उठबस करू लागले. त्याच्या डोळ्यात निराशा भरली. आम्हा कैद्यांचे हसे पळून गेले. ज्या खोलीत भारताचे माजी गव्हर्नर जनरल चक्रवर्ती राजगोपालचारी हे एके काळी शांत चित्तानें भारतीय उन्नतीचे व पुरातन संस्कृतीचे ग्रंथ वाचीत होते, त्या खोलीत भारतीय संस्कृतीचा वारसदार भोमक्या निपचित पडला होता. चड्डी-बंडीने त्याची खोड मोडली होती.

बाहेर अंधार नाचत होता. भकास तुरुंगाच्या भिंती पहारा देत उभ्या होत्या. सर्व काही बंद झाले होते. जणू निसर्गाची सर्व हालचालसुद्धा तेथे बंद पडली होती. तेथे बोलणे बंद होते, चालणे बंद होते. गाणे बंद होते. तेथे नजरेने धावणेही बंद होते. सर्व स्थिरचर बंद होते. फक्त कठोरता, दहशत, भेसूरता, क्रूरता यांचे साम्राज्य नांदत होते. भयाण भिंतीच्या कबज्यात हजारो जीव निर्बल पडले होते. तेथे बालकांचे कोमल रडे, स्त्रियांचे

मधुर बोलणे, पाखरांचे किलबिलणे अथवा कोंबड्यांचे आरवणे ऐकू येणे शक्य नव्हते. तासातासाला 'साठ कैदी ऑलबेल!' अशी कर्कश आरोळी ऐकू यायची. जेलच्या मध्यभागी असलेल्या मनोऱ्यावर प्रचंड घंटा दणाणत होती. तिचा आवाज दूरपर्यंत जात होता. बराकीच्या बाहेर व्हरांड्यात पहारेकरी आपले पाय आपटीत पहारा करीत होता. सर्व कैदी निर्धास्त निजले होते. काही जण तालबद्ध घोरत होते.

'पाटील, तुमाले नीज का येत नाय?' भोमक्याने प्रचंड जांभई देऊन प्रश्न केला.

'नाही. मी विचारात पडलो आहे'. मी उत्तरलो.

'मायले, माले पण नीज येत नाय.' त्याने तक्रार केली.

'भोमक्या, तू जेलात कसा आलास?' मी विचारले.

त्याने एक दीर्घ निःश्वास सोडला.

'तुम्ही कसे आले?' त्याने मला उलट सवाल केला.

'मला पोलिसानं आणलं म्हणून मी आलो.' मी म्हणालो.

'तुमाले जसं आणलं तसंच माले पण आणले त्येनी.'

नंतर त्याने आपला संपूर्ण इतिहास सांगितला. परंतु आपली जात कोणती, आपले गाव कोणते, आपल्या बापाचे नाव काय, यापैकी काहीच त्याला सांगता येत नव्हते.

भोमक्या माणूस होता आणि त्याच्या शरीराची ओबडधोबड, बेढब रचना हीच मुळी प्रतिष्ठेच्या बुरख्याखाली वावरणाऱ्या समाजाचे अंतरंग टाहो फोडून जाहीर करीत होती. त्याने कामगार होण्यासाठी नागपुरापासून मुंबईपर्यंत दौड मारून प्रत्येक ठिकाणी कामाचा शोध केला. जेथे जेथे त्याला जाता आले तेथे तेथे त्याला काम मिळाले नाही. त्याची दरिद्री आकृती पाहूनच त्याला उपेक्षेने हाकून लावण्यात आले.

मग तो भीक मागू लागला. दारोदार जाऊन भाकरी मागू लागला. भाकरी मागून जगू लागला. काही ठिकाणी तो कपडेही मागून घेऊ लागला. काही काळ त्याचे ठीक चालले, पण पुन्हा कठीण वेळ आली. त्याच्या लक्षात आले की आपण कपडे मागून चूक करीत आहोत. कारण जेव्हापासून मागून मिळवलेले कपडे तो आपल्या अंगावर घालू लागला तेव्हापासून ते कपडे फाटून जाईपर्यंत त्याच्यावर कठीण प्रसंग येऊ लागला. ज्या त्या दारात लोक त्याला खालवर पाहू लागले.

'चांगला कापला तर तुझे दोन होतील. काम कर.'

'ए, तुला हातपाय नाही? झोकात कपडे करून भीक मागतोस? जा पुढे.'

असे नाना तऱ्हेचे प्रश्न लोक करू लागले आणि त्यामुळे त्याच्या पोटावर कठीण प्रसंग येऊन तो उपाशी मरू लागला.

आपण जितके दळभद्री राहू तितके आपण जास्त दिवस जगू, नाहीतर मरून जाऊ; आपल्याला कोणीही रोटी देणार नाही; मग हे कपडे कशाला घाला? आणि जर हे पोट

भरायचे आहे तर अंगभर कापड नसले म्हणून काय झाले? कापड मागून अंगावर घालावे तर भाकरी मिळणार नाही; आणि भाकरी मिळवायची तर कपडे चालणार नाही. आपण दोहोंतून एक पसंत केले पाहिजे. दोन्हीही आपण उपभोगू शकत नाही. कारण आपण भिकारी आहोत. जर आपण माणसांप्रमाणे माणूस असतो, तर नक्कीच आपल्याला काम मिळाले असते. पण आपण माणूसच नाही, म्हणून तर आपल्याला काम नाही, आणि काम नाही म्हणून अन्न नाही. आणि अन्न नाही म्हणून आपण भीक मागतो. आणि भीक मागायची, तर कपडे कशाला? भिकारी का कपडे वापरतो? मग त्याला भीक कोण घालील? त्याने नागडेउघडेच राहिले पाहिजे.

भोमक्या विचार करीत फिरत होता. त्याने एक जरमली पातेले मिळविले. त्याला भोक पाडून त्यात दांडी घातली आणि त्याला एक तार लावून त्याचा ताऱ्या केला. मनात येईल व जे कुठे ऐकले असेल ते तो येईल तसे गाऊ लागला. दिवसभर भीक मागून संध्याकाळी एका धर्मशाळेत राहू लागला.

एका लग्नाच्या जेवणात भोमक्याला एके दिवशी पुष्कळच जेवण मिळाले. ते घेऊन तो त्या धर्मशाळेत येऊन बसला होता.

अंधार गडद पडला होता. डोळ्यात बोट घातले तरी दिसत नव्हते. तो अधाशाप्रमाणे चाचपडून ते अन्न पोटात भरीत होता. तिथे दिवा नव्हता. पाणी नव्हते. कोणीही नव्हते. फक्त त्याच्या तोंडाची मचमच होत होती. तो रंगात येऊन खात होता.

'मला थोडी भाकरी देता का?' एका स्त्रीचा आवाज आला.

'ए, कोण तू?' भोमक्याने अंधारात डोळे फाडून पाहत विचारले.

'मी भिकारी आहे.' अंधारातून आवाज.

'हो, पण गडीमाणूस का बायको?' त्याने आपल्या जबड्याची धावपळ थांबवून प्रश्न केला आणि तसा तो स्तब्धपणे उत्तराची वाट पाहत राहिला.

'बायकोमाणूस?' भोमक्या पुटपुटला. त्याच्याने पुढे बोलवेना, कारण 'ए जा, काम कर!' असे तो म्हणू शकत नव्हता. त्याने विचार केला आणि भाताची एक बचक भरली.

'ए, कुठं आहेस तू?' तो गुरगुरला.

'मी इथं आहे. वाढा.'

त्याने भात दिला. त्यांची जेवणे झाली.

'ए, तुझं नाव काय?' भोमक्यानं विचारलं.

'सुंद्री.'

'तुला आज काहीच मिळालं नाही?'

'नाही.' सुंद्री म्हणाली.

'बरं, उद्यापासून माझ्याबरोबर ये. येशील?'

'हो हो! पण तुमचं नाव?'

'माझं नाव भोमक्या. नीज आता.'

त्या दिवसापासून भोमक्या आणि सुंद्री भीक मागू लागली.

भीक मागत मागत त्यांना दोन मुले झाली.

एकदा भोमक्या एका धर्मशाळेत उतरला. दिवस थंडीचे होते. सुंद्रीला व मुलांना धर्मशाळेत ठेवून तो एकटाच बाहेर पडला. त्याने ताऱ्याची तार चढवून दिली. थंडीने कुडकुडत तो भीक मागू लागला. त्याचा अभंग सुरू झाला. थंडीचे त्याला चटके बसत होते. पातेल्याचा तारा बरळत होता. आणि तोंडात येईल त्या देवांची तो नावे घेत होता. एका घरातून एक श्रीमंत माणूस बाहेर आला. त्याने भोमक्याचा तो भयंकर अवतार निरखून पाहिला. आणि कनवटीचे दोन पैसे काढून भोमक्याला दिले. भोमक्याला आनंद झाला. त्याने त्या धनिकाला धन्यवाद दिले.

पुढे भोमक्या रोज आपल्या भिक्षेची सुरुवात या दयाळू गृहस्थाच्या दारातून करू लागला. एक, दोन आणि तीन दिवस गेले. चवथ्या दिवशी तो दयाळू माणूस एकदम निर्दय बनला. त्याने चिडून भोमक्याला लाथ मारली आणि 'जर पुन्हा इथं पाय ठेवशील तर ठार मारीन!' अशी धमकी दिली. भोमक्याला त्या माणसाबद्दल आश्चर्य वाटले. त्याने त्या दारात पुढे कधीच जायचे नाही असे ठरविले.

आणि त्या दिवसाच्या प्रकारानंतर दुसऱ्या दिवशी भोमक्यावर भयंकर प्रसंग आला.

भोमक्या भीक मागून आला होता. सुंद्री आणि त्याची दोन मुले बसली होती. त्यांना आनंद झाला होता. रोज जेव्हा भोमक्या भिक्षेहून येई तेव्हा त्यांना आनंद होई. कारण तो बारा घरचे बारा प्रकार आणी आणि ते आपल्या कच्च्याबच्च्यांना देई. आजही त्याने पुष्कळ काही आणले होते. तो झोळीत हात घालून एक एक वस्तू काढून देत होता. पोरे मिटक्या मारीत खात होती.

अंधार पडत होता. रात्र जणू डोळे झाकीत होती. सर्व काही अंधाराच्या उदरात विलीन होत होते. लांबवर सर्वत्र दिवे लुकलुकत होते. मधून मधून माणसांचे आवाज़ ऐकू येत होते. पण धर्मशाळेत कोणीही मोठ्याने बोलत नव्हते. कोपऱ्या कोपऱ्यात भिकारी बसून कुजबुजत होते. त्यांच्या सभोवती अंधार पसरला होता. त्यांच्या डोळ्यांत, त्यांच्या पुढ्यात, सर्वत्र अंध:कारच होता. अंधाराशिवाय तेथे दुसरे काहीच दिसत नव्हते. जणू हे जग अंधारात गटांगळ्या खात आहे असा भास होत होता. अंधारातच वारे सळसळत होते. अंधारातच थंडी दात खात होती. अंधारात चिलटे गुणगुणत होती. आणि अंधारातच भोमक्याची मुले जेवत होती. एकदम त्या अंधारात बॅटऱ्या लखलखल्या, शिट्या वाजल्या आणि बुटांचा खडखडाट झाला. क्षणभर ती धर्मशाळा थरारली. सर्व भिकारी गर्भगळित झाले. भोमक्याची पोरे भेदरून आपल्या आईच्या पदराआड दडली. धर्मशाळेत

भेसूरता शिरली.

'हाच तो.' एक जण ओरडला. सर्व बॅटऱ्यांचा चकचकाट भोमक्यावर स्थिर झाला. भोमक्या उठून उभा राहिला. त्याच्या खांद्याला त्याचा तात्या लोंबत होता. त्याच्यावर दहाबारा धिप्पाड माणसांनी झडप घातली आणि क्षणात त्याला ओढीत बाहेर काढले. दुसऱ्या क्षणी सर्वत्र शांतता पसरली. भोमक्याला मेलेले कुत्रे ओढल्याप्रमाणे त्यांनी ओढीत चालवले. त्याची धडपड बारीक आवाजात ऐकू येत होती. तीही क्षणात बंद झाली. त्याची पोरे रडू लागली. सुंद्री रडू लागली. आणि सर्व कोपऱ्यात दडलेले ते जीव बोलू लागले. त्याच वेळी भोमक्या प्रकाशात उभा होता. सर्वत्र विजेचे दिवे जळत होते. मोठमोठे पोलीस अधिकारी बसले होते आणि भोमक्या पोलादी बेड्यांनी जखडला गेला होता. पहिले दोन दिवस रोज दोन दिडक्या दान देणारा दयाळू महात्मा एका खुर्चीवर बसला होता. भोमक्या खिन्न झाला. तो मनात म्हणू लागला : 'हाच तो दयाळू माणूस. यानंच मला दोन दिवस दोन दोन पैसे दिले आणि तिसऱ्याच दिवशी लाथ देण्याची धमकी दिली. आता हा काय करणार आहे आपलं?' त्याला काही कळत नव्हते.

'सर्कलसाहेब, हाच तो माणूस! हा त्या दिवशी सकाळी आला आणि संध्याकाळी दरोडा.' तो श्रीमंत गरजला.

'ठीक. मग हा भिकाऱ्याच्या वेषातील दरोडेखोर आहे तर! अटक करा याला.' सर्कलसाहेबाने हुकूम केला. भोमक्या कैदी झाला.

आणि आता तो माझ्या शेजारी पडला होता. तो बोलत बोलत निजला. मी मात्र विचार करीत पडलो होतो. मी या भांडवली जगाकडून न्यायाची अपेक्षा मुळीच करीत नव्हतो. मला त्याचा अनुभव आला होता. मीही भयंकर आरोपाखाली कैदी झालो होतो.

मी विचार करीत होतो तो भोमक्याचा आणि त्याच्या नावाचा.

भोमक्या माणूस आहे.

पण समाजात त्याचे स्थान काय?

आणि मराठी भाषेत त्याच्या नावाचा अर्थ काय? हे कुठच्या भाषेतील नाव आहे? हे कशापासून उत्पन्न झालं?

मला काहीच उलगडा होत नव्हता.

बाहेर प्रचंड घंटा घणघणत होती. 'ऑलबेल'ची आरोळी दिली जात होती. जणू काय तासातासाला त्या क्रूर दहशतीची ती जाणीवच करून दिली जात होती. मला झोप येत नव्हती.

मला त्या नावाचा अर्थ लागेना. मी चिडलो. स्वत:चीच मला चीड आली. मी पुष्कळ मराठी पुस्तके वाचली होती. बरेच शब्दकोश पाहिले होते. पण त्याच्या त्या नावाचा अर्थ का लागत नव्हता?

'काही नाही. भारतीय संस्कृतीचा टेंभा मिरवणाऱ्यांच्या डोकीत भारतीय गुलामगिरीने आणि दारिद्र्याने घातलेला धोंडा म्हणजे हा भोमक्या!' मी संतापून पुटपुटलो आणि घोंगडीत डोके खुपसून मेल्यासारखा पडलो.



# रेडं झुंज

एक मोठा ओढा जवळच्या डोंगरातून खाली येऊन त्यानं त्या मुंबईच्या उपनगरात मुरकंड दिली होती. त्यामुळे त्या उपनगराचा छेद झाला होता. प्रख्यात आग्रा रोड त्या उपनगराच्या पोटात, पुढे मुंबईस गेला होता आणि त्याच्या बाजूने सुंदर इमारती ऐटीत बसल्या होत्या. ओढ्याच्या पलीकडे हजारो झोपड्यांचा तळ पडला होता. सन अठराशे नव्वदात इंग्रजांनी त्या ओढ्यावर एक पूल बांधून ती फाळणी सांधली होती. तो पूल लाकडी होता. आणि आता त्याची वयोमर्यादा संपली होती.

ओढ्याच्या अलीकडे ऐन काठावर, त्या पुलाच्या तोंडाशेजारी सुकर्ण भय्याचा तबेला होता. तो तबेला जंगली लाकडे आणि झावळ्यांनी उभा केला होता आणि तो दोनशे म्हशी पोटात घेऊन शेणाच्या ढिगात बसला होता.

पलीकडच्या काठावर पुलाच्या ऐन तोंडावर बाबालालचा तसलाच तबेला गुडघेभेटी आला होता. बाबालालच्या दोनशे म्हशी त्या तबेल्यात आपला संसार करीत होत्या आणि मुंबईला दूध पुरवून आपल्या मालकाचा संसार सोन्याचा करीत होत्या. आणि त्या दोन तबेल्यांच्या मुतरघाणीने त्या उपनगराचे डोके बधिर करून टाकले होते.

त्या दोन्ही तबेल्यांत पन्नास भय्ये रात्रंदिवस खपत होते. ते भय्ये एखाद्या राणीची सेवा करावी तशी त्या म्हशींची बडदास्त ठेवीत होते. त्यांना स्नान घालणे, त्यांची घाण काढणे, त्यांना चारा घालणे, दूध काढणे ही सारी कामे यंत्राप्रमाणे ती शंभर माणसं अहोरात्र करीत होती. सुकर्ण व बाबालाल या दोघांत धंद्यावरून एक विचित्र स्पर्धा निर्माण झाली होती. ते दोघे एकमेकाला पाण्यात पाहत होते. दोघेही शेण भरल्याप्रमाणे दौलत गोळा करीत होते आणि दोघेही एखाद्या राजासारखे ऐटीत मिरवत होते. त्या दोघांची धंद्यातील ती स्पर्धा त्यांच्या रक्तात भिनली होती. रक्तात विष भिनावे तशी त्यांची ती स्पर्धा त्यांच्या जीवनातच मिसळली होती.

दोघांनी एकमेकांवर मात करण्याचा चंगच बांधला होता. बाबालालने गुलढबू मिश्या वाढवल्या म्हणून सुकर्णानेही वाढवल्या होत्या. दोघांचीही शरीरं धिप्पाड या शब्दाला काखेत घेऊन बसली होती. रुंद गर्दन, प्रचंड उराडे, मोठमोठी पोटं, यात ते दोघे सारखेच होते. दोघांनीही टाळूचे झेले राखले होते. बाबालालने कातीव पलंग आणला की सुकर्णानेही आणला. सुकर्णाने मांडीसारखी काठी आणली व तिला पितळी नागाच्या वेटोळ्यांनी मढवली तर दुसऱ्याच दिवशी बाबालालनेही तसलीच नि तेवढीच काठी

आणून ती चांदीच्या नागाच्या वेटोळ्यानेही मढवून काढली. ते दोघे त्या दोन तबेल्यांत हत्ती झुलल्याप्रमाणे झुलत होते.

पुढे सुकर्णाने एक रेडा पाळून त्याला दोन म्हशींचा रतीब सुरू केला, ही कुणकूण लागताच बाबालालनेही एक तेवढाच रेडा आणू त्याला दारात साखळदंडानं जखडून टाकला. ते दोन प्रचंड रेडे त्या दोन तबेल्यांत उभे राहून आपल्या प्रचंड मालकाची शोभा वाढवत होते आणि स्वत: वाढत होते. मालकाइतकाच त्या रेड्यांचा मानमरातबही वाढला होता. सुकर्णाचे चाकर त्याच्या रेड्याला 'हनुमानजी' म्हणत; तर बाबालालचे चाकर त्याच्या रेड्याला 'भीमसिंग' म्हणून महाभारतकालीन पंडुपुत्र भीमाचाच हा अवतार असं खुशाल समजत होते.

कुरबूर, धुसफूस, उचापत हे सर्व प्रकार जुने झाले होते आणि आता त्यांनी आक्रमक धोरणाचा स्वीकार केला होता. आपल्या तबेल्यात सुकर्ण आपल्या म्हशीला शिवी देताच इकडं बाबालालही आपल्या म्हशीचा उद्धार करीत होता. तिकडे तो खाकरला की इकडे हा खाकरत होता. बारीक बारीक प्रसंगांनी त्या दोघांची झुंज जवळ येत होती.

एका सकाळी सूर्य वर आला होता. बाबालाल उन्हाला पाट लावून बसला होता. त्याच्या अंगाला तेल लावून चार नोकर अंग रगडीत होते. त्या चाकरांना घाम सुटला होता. ते धापा टाकीत मालकाला रगडीत होते. मध्येच झाकलेले पेकाट सरळ करीत एक चाकर बाबालालला म्हणाला,

'ठाकुरजी! सुकर्णाची एक म्हैस उठत नव्हती.'

'मग काय झालं?' बाबा गुरकला.

'मग सुकर्णानं एकाच काठीत त्या म्हशीला उठवली.' चाकरानं सांगितलं. आणि बाबालाल भडकला. सर्वांगाला तणावा देऊन तो ओरडला —

'मग आणा माझी काठी. एका दणक्यात उभी म्हैस खाली बसवून दाखवतो.'

आपल्या नोकरांनी आपल्या वैऱ्याचे गोडवे गावे ही गोष्ट सहन न होऊन बाबालाल पिसाळला. धूळ झटकल्याप्रमाणे ते चार चाकर झटकून टाकीत त्याने त्या नोकरांना सक्त ताकीद दिली —

'खबरदार! त्यो दंड्या माझा दुस्मान आहे. त्याचं नाव काढू नका. आण ती काठी.'

आता एका गरीब म्हशीचा जीव विनाकारण जाणार या कल्पनेने ते नोकर भयभीत झाले.

इतक्यात त्या पुलावरून सुकर्णाचा तो रेडा सांड सुटल्याप्रमाणे धडधडत अलीकडे येऊन बाबालालच्या तबेल्यात शिरला. क्षणात सर्वत्र हाहाकार उसळला. तो रेडा म्हशींच्या दावणीत शिरून त्याने भलतीच दंगल उडवून दिली. त्याने कैक म्हशी हुंदडून पाडल्या.

सर्वत्र धावपळ, ओरड सुरू झाली. मग हातात ती आपली काठी घेऊन बाबालाल पुढं धावला. त्याच्या पाठी त्याचे नोकर आणि सुकर्णाची सारी माणसं यांनी तो रेडा बाहेर काढण्याचा प्रयत्न सुरू केला. त्या दंग्यात बाबालालच्या चार म्हशी मोडल्या. काही दावी तोडून भन्नाट पळत सुटल्या. किती तरी वेळानं त्या शंभर माणसांना यश आले आणि सुकर्णाचा तो रेडा एकदाचा परत गेला.

परंतु त्या प्रसंगानं बाबालाचं डोकंच फिरलं. ते वेड्यासारखा बडबडू लागला.

'हा, हा माझा अपमान आहे. त्या माझ्या वैऱ्यानं मुद्दाम आपला रेडा माझ्या तबेल्यात घातला. माझ्या चार म्हशी मोडल्या. मी सूड घेणार.'

आणि तिकडे आपल्या रेड्याच्या पाठीवर दमदार थाप मारीत गालात हासत सुकर्ण मिश्यांना पीळ भरीत होता. मनातल्या मनात म्हणत होता, 'ठीक केलंस बेटा, तू खरा हनुमान आहे, अगदी त्याच्यासारखाच स्वामिभक्त आहेस. तू आज लंका जाळून आलास.'

सूर्य मावळला होता. चोहीकडे अंधार दाटला होता. त्या ओढ्याच्या काठावर दोन्हीकडच्या नोकरांनी शेणी पेटवून धगट्या केल्या होत्या आणि त्यांच्याभोवती बसून रात्रीचे जेवण ते तयार करीत होते. सर्वत्र धूरच धूर रेंगाळत होता. मस्त चिलटं भुंग्यासारखी गुणगुणत माणसांना शोधीत होती. मुताच्या उग्र वासाने वातावरण कुंथत होते. काळोखाने नगरपालिकेचे दिवे गिळून टाकले होते. अंधारात कुत्र्यांची टोळकी उगीच भुंकत होती.

आणि अंधारात बाबालानं आपला रेडा हळूच पुलापाशी आणून सुकर्णाच्या तबेल्याकडे सोडून दिला. एकाएकी मेघ गडगडावा तसा तो रेडा डुक्करमुसंडीने पुढे धावला आणि सुकर्णाच्या तबेल्यात घुसला. दोनशे म्हशी एकदम धडपडत उठल्या. क्षणात हाहाकार झाला. धडाधड म्हशी जमीनदोस्त होऊ लागल्या. मेंढरात लांडगा शिरावा तसा प्रकार झाला. पन्नास नोकरांनी एकच आरोळी ठोकली.

पन्नास भय्ये काठ्या घेऊन धावत होते. काळोखात तो रेडा ओळखत नव्हता. काहीच दिसत नव्हते. म्हशी कोलमडत होत्या, भय्ये ओरडत होते. सुकर्ण आपली प्रचंड काठी घेऊन नाचत होता. शिव्या देत होता. नोकरांना ढुश्या देत होता. त्याच्या तोंडाला ओरडून फेस आला होता.

आणि तो रेडा म्हशींना उलथ्यापालथ्या करीत तबेलाभर दौडत होता. सुकर्णाच्या डोकीवर आकाश कोसळले होते. तो कण्हत होता.

'आरे, धरा रे त्याला!' आक्रोश सुरू होता.

पुन्हा बाबालालची माणसे धावली आणि सर्वांनी मिळून कसा तरी तो रेडा पकडला

व सर्व काही शांत झाले. परंतु जाळात पिठाचे गोळे जळून गडप झाले. कुणाचा भात करपला, तर कुणाची डाळ जळून गेली. सुकर्ण ऊर बडवीत ओरडत होता.

'बाबालालनं माझा खाना खराब केला. माझ्या पाच म्हशी ओढ्यात पडून ठार झाल्या.'

इकडे बाबालाल हातात काठी घेऊन भुतासारखा उभा होता. तो म्हणत होता, 'मी काय करणार? म्या काय करावं?'

'मी सूड घेणार बेटा!' सुकर्ण पुलाच्या तोंडाशी येऊन मांडी थोपटीत गरजला.

'आरं जा! दे माझ्या रेड्याला फाशी.' बाबालाल गुरकत होता.

आणि अंधारात आपली काठी फिरवीत सुकर्ण म्हणत होता, 'अरे बेटा, आता रडायला तयार राहा.'

त्या दिवसापासून ते दोघे एकेरीवर आले आणि उघड उघड यादवीची भाषा बोलू लागले. दोघेही एकमेकाला गारद करण्याचा विचार करू लागले. एकमेकांवर हल्ला करण्यासाठी टपून बसले.

दुसऱ्या महिन्यात ती वेळ आली. सर्वत्र सामसूम होते. अंधार मी म्हणत होता. मध्यरात्र झाली होती. माणसं आणि म्हशी यांच्या घोरण्याचा दीर्घ स्वर घुमत होता. सर्व काही शांत होते. ओढ्याकाठच्या उकिरड्याला आग लागली होती. मध्यरात्रीचा वारा ती आग फुलवीत होता. सुकर्णाला झोप येत नव्हती. तो त्या रात्री आपला रेडा घेऊन, धोतर आखडून, एका हातात काठी घेऊन त्या पुलाच्या तोंडाशी येऊन कानोसा घेत होता.

आणि त्याच वेळी बाबालालही आपला रेडा धरून पुलाच्या अलीकडे दबा धरून बसला होता. ते दोघेही दिसत नव्हते, परंतु एकाच हेतूनं पुढं सरकत होते. हत्तीसारखे ते वेडे एक एक पाऊल पुढे टाकीत यादवीची वाट चालत होते.

बाबालाल आणि सुकर्ण हे दोघे पुलाच्या दोन टोकांशी आले. आणि त्या रेड्यांनी एकमेकांना पाहिले. त्याबरोबर त्यांच्या देहात द्वेषाची मोठी लाट उसळली. त्यांनी आपआपल्या मालकांना जोराचा हिसडा देऊन एकमेकांवर झेप घेतली. पुलाच्या ऐन मध्यावर त्या दोन रेड्यांची पहिली टक्कर झाली. दोन प्रचंड मस्तके एकमेकांवर आदळून मोठा आवाज झाला. ते दोन देह एकमेकाला नष्ट करण्याच्या ईर्षेनं एकमेकांवर कोसळले. त्या धडकेच्या धमक्याने सारी झोपडपट्टी जागी झाली. शंभर भय्ये आपापल्या काठ्या घेऊन खडबडून धडपडत धावत सुटले.

पुलाच्या ऐन मध्यभागी जगप्रसिद्ध रेडं झुंज सुरू झाली होती. दोन विजा एकमेकींवर आदळाव्या तसे ते रेडे एकमेकावर आदळत होते. त्यांच्या शिंगांचा खडखडाट होत होता. सर्व शक्ती एकवटून ते परस्पराला रेटत होते. त्यामुळं पुलाच्या पायात कापरं भरलं होते. परंतु रेडे बेभान होऊन, नख्या रोवून, डोक्याला डोके लावून उभे होते. संधी

साधून ताडपत्री फाडावी तशी एकमेकांची कातडी फाडून ते रक्तबंबाळ होत होते.

आणि आपली ती काठी डोकीवर सरळ धरून बाबालाल आपल्या रेड्याच्या पाठीमागे पवित्र्यात उभा होता. त्याच्या मागे त्याचे पन्नास नोकर आपापली दांडकी सरसावून उभे होते. अगदी तसाच सुकर्णही उभा होता. त्यानंही आपली काठी हवेत धरली होती. त्याचीही पन्नास माणसं हमरीतुमरीवर येऊन उभी होती.

ते दोघं पिसाट झाले होते. ते वाघासारखे उग्र भासत होते. त्यांना चेव आला होता. ती रेड्यांची झुंज नसून आपणच लढत आहोत, आपणच शिंगाला शिंग लावून एकमेकाला रेटत आहोत असं त्यांना वाटत होतं. त्यांची इभ्रत पणाला लागली होती.

सकाळी सूर्यप्रकाशात उपनगर उजाळले. सर्व लोक जागे झाले. हां हां म्हणता त्या झुंजेची बातमी गावात शिरली. हजारो लोक त्या पुलाशी जमून ती लढत पाहत उभे राहिले. रेडं झुंज सुरूच होती. आपल्या रेड्याच्या मागं काठी नाचवीत एका पायावर टुणक् टुणक् उड्या मारीत सुकर्ण म्हणत होता,

'दोस्तांनो, उभे राहा. जर आपला रेडा परत फिरला तर तुम्ही त्याला इथंच ठार करा.'

आणि बाबालालही गिरकी मारीत ओरडत होता,

'दोस्तांनो! तय्यार असा. आपला रेडा परत फिरला तर तुम्ही त्याला इथंच मारून टाका.'

आक्रमक वृत्ती ही सर्व प्राण्यांत असते. पण त्याचबरोबर पराजय पदरी घेण्याचाच, कबूल करण्याचा किंवा माघार घेण्याचा प्रामाणिकपणाही त्यांच्यात असतो. परंतु दोनच जाती अशा आहेत की त्या पराजय कबूल करीत नाहीत की माघारही घेत नाहीत. त्या म्हणजे माणसात स्पर्धेनं पिसाट झालेले भांडवलदार आणि पशूंत उन्मत्त झालेले रेडे. त्यांना पराजय नि माघार कबूल नसते. नि:पातच मान्य असतो.

रेडे तर आठ दिवस लढतात. मरेपर्यंत माघार घेत नाहीत. ते झुंजतच प्राण सोडतात. स्वत:च्याच रक्तात ते नाचतात.

अशा त्या उन्मत्त रेड्यांची ती प्रख्यात झुंज त्या पुलावर जुंपली होती. त्यांच्या रेटारेटीनं तो जुनाट पूल डगमगत होता. रेडे एकमेकांना मारून रक्तानं न्हाऊन निघाले होते. त्यांची दमछाक होऊन नरडी बेसूर घरघरत होती.

आणि त्यांच्या मागे त्यांचे स्पर्धेनं वेडावलेले मालक काठ्या घेऊन उभे होते.

रेडे पुढे सटकत होते, मागे सरत होते, ठसकत होते आणि एकमेकांना ठार करण्याची शिकस्त करीत होते. त्यांचे डोळे लाल झाले होते. जणू रक्तच उसळत होते. त्यात सुकर्णाच्या रेड्याच्या गळ्यातील साखळीत बाबालालच्या रेड्याचे शिंग अडकून त्यांची झुंज कायमची पक्की होऊन बसली होती.

आपला रेडा मागे सरताच बाबालाल ओरडला होता, 'मारा साल्याला.'

आणि सुकर्ण बसक्या आवाजात म्हणत होता, 'भडव्या, मागं सरू नको.' रेड्यांनी दिशाच बदलली. बाबालालचा रेडा सुकर्णाच्या दिशेला जाऊन सुकर्णाचा रेडा बाबालालच्या पुढ्यात आला. त्याबरोबर त्या दोघांनाही आनंद झाला. त्यांनी कडाडून दात खाल्ले आणि आपल्या काठ्या सरळ धरल्या. परिस्थिती अधिकच नाजूक झाली. काठ्या जिभल्या चाटू लागल्या. वैऱ्याचा रेडा पुढ्यात आलेला पाहून सुकर्ण चिडला, त्याचे भान हरपले. त्याने मागेपुढे पाय देऊन बाबालालच्या रेड्याच्या पाठीत पहिला दणका दिला. त्यावर स्वत:च्या प्रहार झाल्यासारखा वाटून बाबालाल मोठ्यानं ओरडला आणि चपळाईनं आपली काठी फिरवून, सर्व शक्ती एकवटून त्याने सुकर्णाच्या रेड्याच्या ढुंगणावर दणका दिला. आणि मग दोन्ही रेड्यांवर सारख्या काठ्या पडू लागल्या. थोड्याच वेळात ते दोन्ही रेडे रक्तबंबाळ झाले. त्यांच्या पाठीची कातडी लोंबू लागली.

आणि पोलीस आले. त्यांनी प्रथम लाठीमार करून मग बाबालाल, सुकर्ण यांना अटक केली.

परंतु रेड्यांच्या युद्धात आपण ढवळाढवळ कशी करावी हा पेच पोलिसांना पडला. ते उपाय शोधीत बसले. अर्धा तास झाला. काहीच सुचेना.

किती तरी वेळ केवळ डोक्याला डोके लावून उभे राहिलेल्या रेड्यांना उत्साह आला. त्यांनी पुन्हा जोराची रेटारेटी सुरू केली आणि एकमेकांवर निर्वाणीचा हल्ला चढवला. सारे बळ एकत्र करून ते हुंदळू लागले. त्या रेडं झुंजेनं विक्राळ रूप धारण केलं. पोलीस व बघे भयभीत होऊन पाहू लागले.

तोच मोठा आवाज झाला. दोन दिवस बेजार झालेल्या त्या पुलानं ती दंगल असह्य होऊन आंग टाकलं. ती दोन धुडं घेऊन तो खाली कोसळून पडला. रेड्यांसह पूल कोसळताच लोक पुढे धावले.

एका खडकावर ते दोन देह निपचित होऊन पडले होते. त्यांचा चुरा झाला होता.

परंतु त्या मृत स्थितीतही त्यांनी शिंगाला शिंग लावलेलं होतं. जणू त्याही स्थितीत त्यांनी लढावे अशीच त्यांच्या मालकांची ती क्रूर ईर्षा सांगत होती.



# बिलवरी

सह्याद्रीच्या वेढ्यात एक तळवट अंथरलं होतं. त्यावर येळापूर गाव ऐटीत बसला होता.

गावदरीपासून निघालेलं शिवार डोंगराला भिडलं होतं. त्यात भाताची पिकं पिवळी पडली होती. भातानं भरलेली तवरी सुगीची वाट पाहत होती. सर्वत्र कष्टाची फुलं डोलत होती.

आश्विन महिना होता. थंडीनं वाऱ्याचा पदर धरला होता, नि ती दोघं रानात थैमान घालीत होती.

शेजारचा हिरवा डोंगर अधिकच हिरवा दिसत होता. पण रानपाखरांचं मन तिथं लागत नव्हतं. त्यांनी येळापूरच्या शिवारात तळ दिला होता. ती सर्व किलबिलाट करीत होती.

सुगी जवळ आली म्हणून दूरदूरचे भिकारी त्या खोऱ्यात येत होते. डबरी-डोंबारी, घिसाडी, दरवेशी, माकडवाले यांची रीघ लागली होती. आपापले पेटारे घेऊन सापवाले, तुरेवाले वावरत होते.

दुपार टळून गेली होती. इनामदारांचा चाकर अमीन मळ्यात राखण करीत होता. त्याला आळस आला होता. तो समोरच्या डोंगराकडे एकटक पाहत होता. त्या डोंगरानं आपलं डोकं ढगात खुपसलं होतं. अमीनची नजर डोंगरावरनं उतरत नव्हती. भव्यता त्याला भुरळ घालीत होती.

इतक्यात इनामदारांच्या माळावर डोंबाऱ्यांचा एक मोठा तांडा आला. माणसं, गाढवं, डुकरं, कुत्री, कोंबडी यांनी कालवा केला. गाढवावरची ओझी उतरली नि पालं उभी राहिली. त्या ओसाड माळावर एक नवी दुनिया उतरली.

अमीन एकदम भानावर आणि आणि ढेंगा टाकीत माळावर गेला. त्याला पाहून डोंबारी दचकले. कुत्री भडकून भुंकू लागली. त्यामुळे अमीनही भडकला. 'ही इनामदारांची जागा आपल्या बापाची समजून तुम्ही छावणी ठोकली, याचं नाव काय?' अमीननं सर्वांना उद्देशून सवाल केला.

एका पालाकडे बोट दाखवीत सर्व डोंबारी एकाच सुरात म्हणाले, 'ते बिलवरीला इचारा.'

अमीन दारात येताच बिलवरी हसत बाहेर आली. पान खाऊन तिच्या रेखीव ओठांना काजळी चढली होती. डोळे सुंदर होते, नि नजरेत तरलता होती. तिच्या नाकात चमकणारी फुली तिच्या नजरेशी स्पर्धा करीत होती. तिचा रंग गव्हासारखा होता. छाती

रुंद होती आणि तिचे उरोज पदराआड दडत नव्हते. पाठीवर रुळणारे केस खाली पोटऱ्या कुरवाळीत होते. त्यामुळे तिच्यावर नजरच ठरत नव्हती. तिने अमीनकडं पाहिलं.

अमीनचे भान हरपले. काय बोलावे याची त्याला भ्रांत पडली. तो कावराबावरा झाला आणि बिलवरी खुदकन हसली. तिच्याभोवती डोंबाऱ्यांनी गर्दी केली होती. त्यात शेंडीवाले, दाढीवाले, मिश्या पिळून आकडे केलेले, तुळतुळीत डोकीचे, भुरभुरीत झिपरे, नि लंगोटी लावलेले, जख्ख म्हातारे, अशी कित्येक माणसे होती. त्यांच्या घोळक्यात बिलवरी अप्रतिम दिसत होती.

अमीनच्या पराधीन आत्म्याला ती देवासारखी वाटली. त्याच्या अतृप्त काळजात एक कळ जिवंत झाली.

'माझं नाव बिलवरी. मी आपली जमात घेऊन सुगी कराय आले आहे. मी परवानगी काढली नाही, परंतु या ओसाड माळाचं नशीब उघडलं आहे — ' असं म्हणून ती मोहक हसली. तिच्या हसण्याचा आवाज अलगुजासारखा निघाला नि अमीन भारला गेला. तो विचार करून म्हणाला,

'पण सरकार — '

'मी स्वतः त्यांची भेट घेईन, तुम्ही काळजी करू नका — ' ती पाठीवरचा पदर पुढे ओढीत म्हणाली.

अमीन काहीच न बोलता परतला.

बिलवरी वीस वर्षांची होती. तिच्या तारुण्याची कमान चढत होती. त्याला रूपाची जोड मिळाली होती. तिच्या कंठात मधुरता नि पायात जादू होती. कित्येकांना तिने वेड लावले होते. तिचा तमाशा म्हटलं की लोक चेकाळत. कित्येक तिच्यासाठी झुरणी लागले होते.

परंतु ती अचल होती. दोनशे माणसांची कर्ती होती. तिच्या छायेत ती गरीब जमात जगत होती. काही मातबर तिला वाडे बांधून द्यायला तयार होते. काहींनी इनामी जमिनीची बक्षिसपत्रं तयार ठेवली होती. पण बिलवरी त्या मोहाला बळी पडत नव्हती. ती वाऱ्याप्रमाणे त्यांच्याजवळ येऊन दूर जात होती.

तिला पाहून दगडासारखा अमीन वितळला होता. त्याच्या डोळ्यांपुढे बिलवरी गिरक्या घेत होती. बिलवरी भाग्यवान, गुणवान आहे नि आपण लाचार आहोत, याची त्याला खंत वाटत होती.

अमीन गरीब होता. लहानपणीच त्याचे आई-बाप मेले होते. तो अंगापिंडानं घनगंभीर होता. नाकीडोळी तरतरीत होता. तो पंचवीस वर्षे इनामदारांचं अन्न खात होता. अंगात रेड्याचं बळ नि उरात वाघाची हिंमत घेऊन धन्याची सेवा करीत होता. त्याला आप्ताचा एकही तंतू नव्हता. इनामदार हाच आपलं सर्वस्व समजून तो त्याच्याबरोबर सावलीसारखा

हिंडत होता. धनी हसला की तोही हसत असे. धनी चिडला की तोही चिडत असे. आपल्या मातबर मालकासाठी त्यानं कित्येक कलागती काढल्या होत्या. पाचपन्नासांशी झुंज दिली होती. त्यामुळे इनामदारांऐवजी अमीनचाच गावावर दरारा बसला होता.

तो फार कमी बोले. फारसा हसतही नसे. तो अबोल बसून फक्त ऐकून घेई नि गाठीला बांधून ठेवी. मालक नसला की मग बोले. बोलताना दूरवर पाहून हळूच बोले. पण हसत बोले. अमीन एखाद्या माणसाळलेल्या वाघासारखा त्या वाड्यात वावरत असे.

त्याचा मालक त्या खोऱ्यात भयंकर माणूस म्हणून ओळखला जात होता. त्याच्यापुढे ताठ मान करून चालणे गुन्हा होता. मुजरा न करणाराला क्षमा केली जात नसे. त्याच्या दोन बायका दोन वाड्यात नांदत होत्या. त्याचा तिसरा वाडा म्हणजे एक गुहाच होती. तिथं सुंदर चेहरे, तरुण देह यात तो जगत होता. बेबंद होऊन वयाची चाळिशी दारूत बुडवीत होती. नि त्या चिरेबंदी वाड्यात वाघासारखा गर्जत होता.

सूर्य मावळतीची वाट चालत होता. वाऱ्यानं दिशा बदलली होती. झाडांच्या सावल्यांनी अंग टाकलं होतं. अमीन बिलवरीचा विचार करीत होता.

इनामदार मळ्यात आला. त्याला पाहताच अमीन उठला. माळावरची पालं पाहताच इनामदाराला राग आला. तो समोर पाहत म्हणाला,

'अमीन ही पालं कुणाची?'

'डोंबाऱ्यांची, सरकार —' अमीन उत्तरला.

'कुणाला विचारलं त्यांनी?' इनामदार म्हणाला. 'जाऊन त्यांच्या पुढाऱ्याला घेऊन ये.'

अमीन गेला. बिलवरी व तिचा बाप यांना घेऊन आला. बिलवरी हसतच आली. तिला पाहून इनामदार चकित झाला. थोड्या वेळापूर्वी आलेली चीड विरघळून तो शांत झाला.

'परवानगी न घेता मी माळावर उतरले. क्षमा करा. मी सुगी कराय आले आहे. सुगी संपली की आम्ही जाऊ—' अगदी नम्रपणे बिलवरी म्हणाली. पदरात आपला देह लपेटून घेत ती पुन्हा हसली. तिची ती मोहक हालचाल इनामदाराच्या वर्मी बोचली. तिनं त्या उग्र माणसाचं अस्तित्व भुईसपाट केलं. तो उदार होऊन म्हणाला,

'काही हरकत नाही. खुशाल राहा. नाव काय तुझं?'

'माझं नाव बिलवरी. माझा तमाशाही आहे.' ती अदबीनं म्हणाली.

'अरे वा! छान. मग तमाशा कधी दाखवणार?' हर्षभरित होऊन इनामदारानं विचारलं आणि बिलवरी आपली चपळ नजर भरकन त्याच्याकडे वळवीत म्हणाली,

'सांगाल तेव्हा, नि सांगाल त्या ठिकाणी!'

'मग आजच, आमच्या वाड्यात.' असं म्हणून स्वारी उठली. आणि गावाकडे गेली.

बिलवरीनं अमीनला विचारले,
'तुमचं नाव काय!'
'माझं नाव अमीन —'
'अमीन?' आश्चर्यानं चकित झाल्यासारखं करीत ती म्हणाली. 'मी तमाशाला येण्यापूर्वी तुम्ही माझ्याकडे या. तुम्ही येईपर्यंत थांबेन.' तिच्या त्या सुंदर डोळ्यांत आपुलकीचा भाव भरला आणि अमीनचं मन त्यात बुडून गडप झालं.
निम्मी रात्र झाली होती. विलासराव इनामदारांचा चिरेबंदी वाडा बिलवरीच्या पायातील नूपुरांनी निनादत होता. पल्लेदार आवाज वातावरणाची कत्तल करीत होता. बिलवरी तलवारीप्रमाणे तळपत होती.
इनामदारांची मित्रमंडळी भान हरपली होती. वाड्याचा दरवाजा बंद होता. नादिष्ट गावकरी बंद दारापुढे बसून ऐकत होते. बारकी पोरं दाराच्या फटीतून आत पहात होती, नि इनामदाराला इरसाल शिव्या देत होती.
तमाशा रंगात आला होता. बिलवरीनं वरच्या सप्तकात एक लावणी सुरू केली होती.
'मी नार असे लाजरी । माझ्या वेणीचा गोंडा बाई कोल्हापुरी —'
कडवं तुटताच ती झेप घेत होती. निळा रेशमी पदर फराऱ्याप्रमाणे डोकीवर धरून धनुष्याच्या कमानीप्रमाणे लवत होती. त्या वेळी शीड उभारलेले तारू सागरावर आरूढ व्हावे तशी ती दिसत होती. दौलतमंद प्रेक्षकांच्या भावनांचा कडेलोट होत होता. ते रुपयांच्या मुठी उधळून आपला हर्ष व्यक्त करीत होते.
अमीन काळवंडला होता. तो कोपऱ्यात बसून बावरला होता. त्याला त्याच्या लाचारीची जाणीव झाली होती. हे सर्व लोक थोर आहेत. आपण मात्र गरीब आहोत. आपण बिलवरीला काहीच देऊ शकत नाही. नव्हे, आपण आनंदही व्यक्त करू शकत नाही. आपण यांचे गुलाम आहोत असे वाटून तो भुई टोकरत होता.
तमाशा संपला. बिलवरीनं पदरानं घाम पुसला. साजाची आवराआवर केली. तेव्हा इनामदार म्हणाला,
'आमचं समाधान झालं नाही. परत उद्या —'
'येईन की!' असं म्हणून बिलवरी अमीनकडे वळून म्हणाली, 'चला, मला घरी पोहोचवा.'
दुबळेपणाच्या जाणीवेनं खचलेला अमीन एकदम उठला. डिवचताच पेटाऱ्यातून नाग उठावा तसा तो उभा राहिला. अंगावरून गाडी गेलेल्या सर्पाप्रमाणे इनामदाराचं मन चरफडलं. बिलवरीची अमीनशी सलगी त्याला आवडली नाही. तो कडवट सुरात म्हणाला,
'बिलवरी, अमीन आमचा चाकर आहे.'

इनामदारांच्या त्या शब्दांनी अमीनवर निखाऱ्यांचा वर्षाव केला. त्याचं हृदय विदीर्ण झालं. बिलवरीपुढं मालकानं आपला मुद्दाम अपमान केला असं वाटून त्याचं मेलेलं मन एकदम उठून बसलं. 'चाकर' या शब्दानं घातलेला घाव पेलून ते सरळ झालं. एखाद्या वाघाच्या वर्मी बाण बसावा, नि तो तसाच घेऊन त्या वाघानं गिरिकंदरात फिरावं, तद्वत इनामदाराचा बोल उरात घेऊन अमीन अंधारात शिरला.

गावदरीपाशी येताच बिलवरी अमीनला म्हणाली,

'सरकारांनी तुमचा अपमान केला. एवढ्या मोठ्या माणसानं असं बोलणं बरं नाही.'

'तेही एक बरंच झालं.' अमीन दग्ध सुरात म्हणाला, 'मी गरीब आहे. मला कुणी नाही. जन्मभर मी त्या वाड्यात आहे. पण आज वाईट घडलं. माणूस धनानं मोठा असून चालत नाही; तो मनानंही मोठा असावा —'

'छान!' ती चटकन म्हणाली, 'तुम्ही फारच शहाणे आहात. गरीबालाही मन असतं हे कुणीच विसरू नये.'

बोलत बोलत ती दोघं पाराजवळ आली. बिलवरी म्हणाली,

'मी उद्याही वाड्यात जाणार आहे. मला न्यायला तुम्हीच आलं पाहिजे. मी वाट पाहीन.'

शिवारात सुगीची हातघाई सुरू होती. अमीन रोज बिलवरीकडे जाऊन बसत होता. त्यांचा परिचय वाढत होता. एखादे दिवशी अमीनला उशीर झाला की बिलवरी बावरत होती. आपण त्याची वाट का पाहतो याचं नवल वाटून मनातच हसत होती. अमीननं यावं, बोलावं, हसावं, असं तिला वाटत होतं आणि अमीन न चुकता येत होता.

एके दिवशी चावडीपुढं बिलवरीनं तमाशा केला. तेव्हा गावाला बरं वाटलं. पण इनामदाराला राग आला. बिलवरी कित्येक वेळा वाड्यात येऊन गेली होती. परंतु त्याचा आत्मा संतुष्ट झाला नव्हता. अमीन रोज तिच्याकडे जाऊन बसतो असं सुभानाकडून त्याला समजलं होतं. त्यामुळे मत्सर वाढला होता. अमीनवर त्यानं करडी कमान धरली होती. तो बेचैन होऊन बिलवरीचा विचार करीत होता. तिची कला, रूप, जवानी, सारं एकाच दमात गिळून टाकावं असं त्याला वाटत होतं.

बिलवरीच्या गोड वर्तनानं नि मालकाच्या कटू बोलानं अमीनच्या मनाला पीळ पडत होता. अपमानाच्या कानशीत त्याच्या मनावरचा दुबळा गंज घासून निघत होता. तो अधिकच अबोल होऊन विचार करीत होता. बिलवरीच्या मनाचा त्याला अंत लागत नव्हता. तो एका घोर संघर्षात सापडला होता. नि कात टाकून नाग मोकळा व्हावा तसा रिकामा होत होता.

एका सकाळीच इनामदारानं सुभानाला पाठवून बिलवरीला बोलावून घेतली. ती आली तेव्हा दग्ध स्वरात तो म्हणाला,

'बिलवरी, तुझ्या तमाशावर मी फिदा आहे. तू या वाड्यात कित्येकदा येऊन जातेस– '

'मग त्यात नवल काय सरकार?' बिलवरी मध्येच म्हणाली.

'नवल आहे तर', इनामदार शांतपणे म्हणाला. 'या वाड्यात कित्येक दगड विरघळले आहेत. परंतु हे तूप वितळत नाही. असा चमत्कार पूर्वी कधीच घडला नव्हता. मी खरं सांगू? तू म्हणजे एक धुंदी आहेस –'

'मला बाई समजलं नाही हं.' डोळ्यांची उघडझाप जलद करीत ती म्हणाली, आणि तिच्या डोळ्यांत रोखून पाहत इनामदार बोलू लागला,

'तसं कसं होईल? आम्ही दुधाची तहान ताकावर भागवत आहोत. हे डोळे, हे हसरे ओठ, नि हा देह –'

'आलं लक्षात –' ती चटकन म्हणाली, 'मला भलतीच गळ घालू नका. मुळासकट ऊस खाऊ नये.'

'त्या मुळातच उसाचा आत्मा असतो.' तो तिच्या चेहऱ्यावरचा भाव टिपून घेत म्हणाला, 'तो आत्माच आम्हाला हवा आहे. त्यासाठी जी किंमत पडेल ती आम्ही आनंदाने देऊ.'

त्याच्या त्या काव्यानं बिलवरी गंभीर झाली. तिच्या स्वराला किंचित धार चढली. कपाळावर आठी चमकून विरली. पण क्षणात चेहऱ्यावर हसू फुलवीत ती म्हणाली,

'माझी कला मागा, तिचा आत्मा मागू नका. त्याची किंमत करता येणार नाही. किंमतीने विकला जाणारा आत्मा हा आत्माच नसतो.'

'असं म्हणू नको.' आपल्या स्वरातील प्रखरता सौम्य करीत इनामदार म्हणाला, 'तुझा देहच कलामय आहे. त्यानंच मला या थराला आणून ठेवलं आहे. तुझ्या कलेचा ज्यात उगम आहे तेच आम्ही मागतो आहो, त्यात गैर काय?'

'गैर नाही कसं?' ती खणखणीत शब्दांत म्हणाली, 'पाणपोईवर पाणी मिळतं म्हणून का माणसानं मेघाची किंमत करावी –'

या बोलानं इनामदाराचा सारा अहंकार ढासळून गेला. ही अशी हाती येणार नाही, याबद्दल त्याची खात्री झाली. ही तूप नसून पोलाद आहे. ह्या पोलादाला निखाऱ्याच्या राशीतच लोटलं पाहिजे असा विचार करून तो एकदम हसला नि म्हणाला,

'तू शहाणी आहेस. मी तुझी परीक्षा घेतली. आज रात्री तमाशा करायचा आहे. माझी काही मित्रमंडळी येणार आहेत. तेव्हा घडीभर ये –'

तमाशाला यायचं कबूल करून बिलवरी पालात आली. अमीन आला होता. त्याला पाहताच तिला धीर आला. काही वेळ ती बोलली नाही. नंतर हळूच म्हणाली,

'तुमच्या मालकाची नियत ढळली आहे. मी त्याची शेज सजवावी अशी त्याची इच्छा

आहे. आज तो तसा बोलला.'

'तो वाडा म्हणजे वाघाची घळ आहे.' अमीन म्हणाला, 'त्या घळीत नाचून अजून तू सलामत आहेस. नशीबवान आहेस —'

'परंतु आता तो वाघ मला एखादे दिवशी गिळून टाकील!' ती वैतागून दबक्या सुरात म्हणाली, 'आणि आजच मला पुन्हा त्या वाड्यात तमाशाला जावं लागणार आहे.'

त्यावर अमीन हसला व म्हणाला, 'तू एकटी त्या वाड्यात जाऊ नको.'

'मला वाटतं, आजची रात वैऱ्याची ठरणार!' ती खिन्न होऊन म्हणाली.

'उगीच घाबरू नको. मी आहे तिथं-' अमीन म्हणाला. तेव्हा बिलवरीचा आत्मा निर्भय झाला. ती रात्रीच्या तमाशाच्या तयारीला लागली. परंतु येळापुरातून तिचं मन उठलं होतं.

रात्री वाड्यात तमाशा सुरू होता. मधल्या चौकात पन्नाससाठ माणसं बसली होती. ती सारी दारू पिऊन झिंगली होती. इनामदार कावराबावरा दिसत होता. त्यामुळे बिलवरीचं काळीज थरारलं होतं. ती अमीनकडं पहात होती. अमीन एका खांबाला टेकून सावध बसला होता.

— बिलवरी बेचैन होती. तिच्या मनाची अस्वस्थता सारखी वाढत होती. अखेर तिने तमाशा संपवला नि घुंगरं सोडण्यासाठी ती बसली, तशी पुढची माणसं एकदम उठली. रेटारेटी वाढली आणि बाहेर जाणाऱ्यांनी बिलवरीची माणसं रेटीत बाहेर काढली. इनामदारानं बिलवरीला सांगितलं, 'हे लोक दारूनं पागल झाले आहेत. तू थांब.' पण ती अमीनच्या पाठीमागे गेली. अमीन उठला तसा इनामदार ओरडला,

'सुभान्या! अमीनला बाहेर काढून दरवाजा बंद कर.'

तसा सुभान्या पुढे धावला. अमीननं एकाच दणक्यात त्याला खाली पाडला, तो लगेच बिलवरीला घेऊन दाराकडे निघाला. परंतु बाहेर गेलेले लोक परतले. अमीननं कुऱ्हाड ठोकली. झपाट्यानं आपली वाट करून तो एका गल्लीत शिरला.

'अमीनला ठार मारा —' इनामदार ओरडला आणि सर्व लोक अमीनवर तुटून पडले. अंगावर येणारी माणसं मारीत मारीत अमीन मागं सरकत होता. त्याच्या आडून बिलवरी मागं सरकत होती. अरुंद गल्लीतून अमीन पाठ न फिरवता लढत होता. त्याची कुऱ्हाड अंगावर येणाऱ्याच्या हाडावर टक्कर घेऊनच परत हवेत उडत होती. लागोपाठ माणसं पडत होती. अमीनच्या दणक्यानं त्यांची दारू उतरून त्यांना देवाची आठवण होत होती. गावदरीपर्यंत अमीननं सर्वांचा दम उखडून टाकला आणि बिलवरीला घेऊन जवळच्या डोंगरात शिरून बेपत्ता झाला.

अमीन मारला गेला नाही, तो बिलवरीला घेऊन गेला हे ऐकून इनामदार पिसाट झाला. त्यानं बंदुकीत काडतुसं टाकली. दिवट्या पेटवल्या. अधिक माणसं बरोबर घेतली आणि डोंबाऱ्याची पालं वेढली. सर्वत्र झडती घेतली. मग बिलवरीच्या बापाला अटक केली.

सर्व डोंबाऱ्यांना तो म्हणाला,

'बिलवरी नि अमीन यांना हजर करा. तोपर्यंत हा म्हातारा वाड्यात कैद राहील!' हे सांगून तो गावात आला.

इनामदार गावाकडे गेल्यानंतर माळ शांत झाला. कुत्र्याची दंगल हळूहळू मुकी झाली. चंद्र उगवून वर आला. सारा प्रदेश उजाळला. दुधासारखं चांदणं वर्षू लागलं. सृष्टीला रुपेरी रंगाचा मुलामा चढला. नि सर्वत्र नि:शब्दता पसरली.

अमीन आणि बिलवरी डोंगरावर एका उंच जागी बसली होती. बिलवरीनं हळूच बाजूला पाहिलं. जवळच अमीन बसला होता. लगेच तिच्या डोळ्यांपुढे गल्लीतील अमीन उभा राहिला. त्याची कुऱ्हाड, चपळता, हिंमत, बळ, हे सारं आठवून ती भारावली.. नि त्याच्याकडे सरकली नि भावनावश झाली. महापूर येताच नदी मर्यादा सोडते तशी तिची अवस्था झाली. भावनांचा महापूर येऊन तिने मर्यादा सोडली, नि अमीनला हृदयाशी कवटाळून धरले. त्याचे हात आपल्या हातात घेऊन ती म्हणाली, 'माझ्या पायात वीज आहे तर या हातात वीज आहे. या हातांवरून जगातील सारी श्रीमंती ओवाळून टाकावी.' त्या वेळी तिच्या चेहऱ्यावर चांदण्या लुकलुकत होत्या.

त्या दिवसापासून ती दोघं त्या डोंगरात राहत होती. रात्री पालात जाऊन मिळेल ते खाऊन परत येत होती.

या दरम्यान अमीनचा कायापालट झाला होता. त्याच्या वठलेल्या मनाला नात्याची फांदी फुटली होती. त्याला मायेचा मुगार आला होता. सुंदर बिलवरी त्याच्यावर मायेचा वर्षाव करीत होती. तिनं त्याची आप्ताची उणीव भरून काढली होती.

रात्रीचा भर ओसरत होता. अमीन जागाच होता. तो गंभीर होऊन येळापूरकडे पाहत होता. बिलवरीही जागी होती.

'कसला विचार करता?' तिने विचारले.

'उद्याचा —' अमीन म्हणाला, 'तू देवासारखी आलीस. मला पदरात घेतलंस. आता तू गेलीस म्हणजे मी एकटाच. शिवाय आता येळापूरही मला अंतरलं.'

'येळापूर अंतरलं तरी मी अंतर देणार नाही.' बिलवरी गंभीर होऊन म्हणाली, 'मी देवासारखी आले. पण आता जाताना हा देव गाढवावर लादून घेऊन जाणार आहे —' असं म्हणून ती एकाएकी हसली. तिच्या शब्दांनी त्याला स्वर्गात नेले नि ती पुढे म्हणाली,

'बाप वाड्यात डांबला आहे; तो सुटला की आपण जाऊ.'

तसा अमीन उठला. बिलवरीला घेऊन तळवटाला आला. पालाजवळ येताच म्हणाला,

'तू पालं मोडून गाढवं लादून तयार असं. मी बाबाला घेऊन येतो.' असं म्हणून तो गावाकडे चालू लागला. तेव्हा बिलवरी घाबरली.

'जरा जपून. बंदूक आहे त्याच्याकडे.' ती ओरडली, तसा अमीन थांबला. तोच पुन्हा तिचे शब्द चडफडत त्याच्याकडे आले –

'तुम्ही येईपर्यंत मी जाणार नाही.' आणि हे शब्द हृदयात घेऊनच अमीन वाड्यापुढं येऊन दाखल झाला. त्यानं हाक दिली.

'सुभान्या! दार उघड.' अमीनच्या हाकेनं वाडा दणाणला.

'अखेर आला शरण', असं म्हणत सुभानानं दार उघडलं.

'ए हुबाला, सकाळी येऊन पाय धर, पळ –'

'अमीन, थांब!' अमीनच्या हाकेनं जागा झालेला इनामदार चौकटीत येऊन गुरकला. तो चेव येऊन पुन्हा ओरडला, 'बिलवरी कुठं आहे.'

'आपल्या घरात –' अमीन बिथरून उत्तरला, नि इनामदार धावला. त्यानं गपकन अमीनला मिठी मारली. लगेचच अमीननं आपली शक्ती एकवटली. अंगाला बिलगलेला इनामदार भर्रकन उचलून डोकीवर घेतला आणि तसाच एका खोपावर फेकला. खांबावर आदळून पडलेल्या इनामदारानं कसलीच हालचाल केली नाही. अमीन परत फिरला आणि त्यानं सुभानाला एकाच लाथेनं खाली पाडला. तेव्हा सुभानानं प्रसंग हेरला. तो खाली पडूनच म्हणाला,

'ए गड्या, जिवं मारायची भानगड करू नग, काम सांग बरं.'

'बिलवरीचा म्हातारा पाठकुळी घेऊन चल.' अमीननं त्याला काम सांगितलं आणि सुभान्या तयार झाला. तोच इनामदार विव्हळला – 'सुभान्या, लेका, मला मारलं की.'

'आता मला काही सांगू नका.' सुभाना म्हणाला, 'आदी बिलवरीचं बिऱ्हाड पोचवून येतो.' असं म्हणून त्यानं तो म्हातारा पाठीवर घेऊन माळ जवळ केला.

बापाला पाहून बिलवरीला आनंद झाला. तो सुभानाच्या पाठीवरून आलेला पाहून ती हसली. तिनं पालं मोडून गाढवं लादली होती. लगेच तिने निघण्याची सूचना केली.

बिलवरीचा तांडा पूर्वेकडे तोंड करून निघाला होता. माणसं, गाढवं, डुकरं, यांनी मार्ग भरला होता. त्यांचं अस्थिर जीवन गतिमान झालं होतं.

अमीन एका गाढवावर बसला होता. आपलं पागोटं कपाळावर ठेवून तो ऐटीत निघाला होता. बिलवरी बसलेलं गाढव त्याचा बाजूनं चालत होतं. ती अमीनकडं पाहून गालात हसत होती. पूर्वेला प्रकाश जागा झाला होता. तो ढगांचे कोट पाडून बिलवरीकडं येत होता. पहाटेचा दिव्य लालिमा बिलवरीच्या डोळ्यात एकरूप होत होता.

आणि एका गाढवावर लादलेल्या खुराड्यात कोंबडा बांग देत होता.

---

# उपकाराची फेड

शिवारावर सकाळची कोवळी किरणं तळपत होती. वातावरणात आल्हाद भरला होता. उभ्या पिकांनी गजबजलेला शिवार धुंद झाला होता. कणसातील चीक पिऊन उंडारलेली रानपाखरं स्वच्छ आकाशात गिरक्या घेत होती. जागोजाग हिरव्यागार झाडांवर बसून ती किलबिलत होती. नाचत होती. गात होती.

आणि गावाच्या मध्यभागी असलेला कळस ताल देत होता. माणसाच्या देहात एक आगळी गती भरली होती. त्याचं तन, मन नि धन रानात होतं. एकूण एक कष्टाळू माणूस रानात धावत होता नि गाव निर्जन होत होता. सर्व काही शांत भासत होतं.

महारवाड्याशेजारच्या चांभारवाड्यात सामसूम झाली होती. शंकऱ्या चांभाराच्या दारापुढच्या लिंबावर एक बगळा आपली मुंडी आपल्या बगलेत मारून एका पायावर उभा राहून पेंगत होता. आणि खाली सोप्यात शंकर हातघाईवर आला होता. त्यानं एक पाय सरळ पुढे पसरून आणि एक दुमडून पाठ भिंतीला लावली होती आणि तो मन्या परटाचं खेटर सरळ करीत होता. आरी, रापी, अस्ती, इंगा ही त्याची हत्यारं त्याच्या आजूबाजूला पडली होती. एका परळात सळाचं भेंडोळं मुरत होतं. नुकतीच आणलेली कातड्याची घडी सोप्यात दरवळत होती. घरात चहा कढत होता. त्यामुळे त्याच्या अंगात भलतीच चपळाई शिरली होती. तो परटाच्या खेटराला उलटंपालटं करीत होता.

आणि किंचित अंतरावर उपलाणी बसलेला मन्या परीट शंकऱ्याच्या हातातील आपल्या खेटराकडं टक लावून पाहत होता. त्या खेटराबरोबर त्याची नजरही उलटीपालटी होत होती. मन्या परटाचा उभ्या गावावर दरारा होता नि त्याच्या बोलाला मोलही होतं. बेचाळीसपासून तो पुढारी म्हणूनच त्या गावात मिरवत होता. आणि असला पुढारी आपला मैतर म्हणून शंकऱ्या चांभार भलताच चढला होता.

बाजूला एका लाकडाच्या ओंडक्यावर बसून लखू मांग चांभाराकडे पाहत होता. त्याच्या पायताणाचा पणा उपसून निघाल्यामुळं त्याचा खोळंबा झाला होता. आणि शंकऱ्याचं काम संपत नव्हतं.

शंकर चांभार हातानं खेटर नीट करीत तोंडानं बोलत होता. बोलण्यात याची बरोबरी करणारा माणूस त्या गावात नव्हता. वर्षात चारसहा महिने मुंबईत राहून हा चांभार भलताच 'शाणा' म्हणून या गावात ख्याती पावला होता. तो दिल्लीपासून तो चामड्याच्या बाजारापर्यंत सर्व विषयांवर बोलत होता. विनोद करीत होता. हासत होता नि परीट व

मांग यांना हसवीत होता.

इतक्यात मळू महार पायाच्या अंगठ्यात पायताण धरून ओढीत आला. त्याला पाहून शंकऱ्या म्हणाला,

'का? घोडं मरगळीला आलं?'

'हो, आंगठा तुटला गा' असं म्हणून मळूनं बैठक मारली. मग शंकऱ्यानं परटाचं खेटर परटाकडं सरकवून सळ ओढला, एक आरी घेतली आणि तो सळ व ती आरी मळूकडं फेकीत तो म्हणाला,

'हं, घ्या ह्ये सामान नि करा नीट पायतान.' सळ आणि आरी घेऊन मळू आपलं पायतान सांधू लागला. तसा लखू मांग पुढं सरकत म्हणाला, 'मला बी देगा, पणा उपसलाय — '

'वाईच कड काढ.' शंकऱ्या आंग मोडीत म्हणाला, 'माझ्यापाशी आरी हाय एक नि मागता दोघं. कशी बरं देऊ? पाळीपाळीनं घ्या; न्हाय तर म्हमईच्या भांडणावानी हातंच भांडण लागंल हो —' असं म्हणून तो मोठ्यानं हसला. मांगा–महाराच्या खेटराला हात लावू नये हा रिवाज शंकऱ्याही काटेकोर पाळीत होता. मग तो कुठं आरी टोचावी, कसा सळ ओढावा हे मळूला दुरूनच सांगू लागला.

मळू पुढं पाहत आपलं काम करीत होता. तो कोणाशीच बोलत नव्हता. परंतु शंकऱ्याला गप्प बसवलं नाही. त्यानं खाजवून खरूज काढली. तो परटाला वळून म्हणाला,

'म्हाराचं बी घसारलं बरं —'

'त्ये रं कसं?' मळूनं सळ ओढीत विचारलं. आणि शंकऱ्या म्हणाला,

'त्येनी समितीला मतं देऊनशान कांग्रीसाला पाडलं.'

'एक गोष्ट बोलू?' मळूनं आरी टोचीत विचारलं.

'हो हो, बोल की —' शंकऱ्यानं टकुरं खाजवलं.

'चांभाराला टाक्यागणिक बुद असती अशी एक म्हण हाय —' मळू चिडक्या सुरात म्हणाला, 'पण तुला चांभार असून एक बी न्हाय —'

'माझ्या टकुऱ्यात न्हाय आलं!' शंकऱ्यानं नकारार्थी मान हलवली. आणि मळू म्हणाला, 'अरं कांग्रीस पडली ह्यात तुझ्या बाचं काय गेलं?'

'तसं नव्हं,' शंकऱ्या चाचरत म्हणाला, 'आपून गरीब चिलटानं हत्तीवर गाड्या खेळणं बरं न्हाय-'

'आरं मग ते हत्ती पडला रं कसा? बोल?' मळूला चीड आली. त्यानं बोल या शब्दावर जोर दिला. त्याबरोबर शंकऱ्या पेकाट खाजवू लागला. त्याचा चेहरा खर्रकन उतरला. बोलण्यात ख्याती पावलेला शंकर भुईसपाट झाला. परीट नि लखू मांग

गंभीर होऊन शंकऱ्याकडं पाहू लागले.

एवढ्यात चहा तयार झाला. शंकर घरात गेला आणि चहा पिऊन पुन्हा बाहेर आला. त्याला हुशारी आली. त्यानं देवळीत ठेवलेल्या खास कपात लखूला चहा दिला आणि तो मळूला म्हणाला,

'वाईच चहा घेनार का?'

'मी चांभाराचा च्या पीत न्हाय.' हातातली आरी परत फेकत मळू म्हणाला आणि शंकर चिडला. तो आपल्या मिश्या साफसूफ करीत म्हणाला,

'मानानं पान खावं असा वडलांचा बोल हाय.'

'पण शेरडावाणी पाला खाऊ नये असा माझा बोल हाय.' मळूची नाकपुडी थरारली. ती पहाताच शंकर गुरकला,

'म्हंजी काय?'

'म्हंजी वासरात लंगडी गाय—'

शंकऱ्याला मळूचा राग आला. परंतु मळूची वयोमर्यादा आडवी आली म्हणून तो गप्प बसला आणि तोंड आवरून शांतपणे म्हणाला,

'असा तिड्यात का बोलतोस?'

'माझं बोलणं सरळ हाय.' मळू म्हणाला, 'तू माझा चहा पिनार का?'

'त्ये कसं बरं जमंना? तू म्हार नि मी चांभार —'

'मग आम्हीच तुझा चहा का प्याचा?'

'साऱ्यांनी आपापल्या पायरीनं वागावं.' शंकर म्हणाला आणि मळू थोडं पुढं सरकून बोलला,

'तुझी कंची पायरी? चल नाव घे.'

'तू आमची बरोबरी करू नगं.' शंकऱ्या म्हणाला, 'तुमी ढोरं ओढता, कातडी काढता....'

'आनी ती कातडी चिलबिलून तू संसार करतोस नि वर बेंबीला थुंका लावून बामन...'

'अरं मग आम्ही म्हाराचं खावं का काय?'

शंकऱ्या रडकुंडीला आल्यासारखा मध्येच ओरडला, 'अठरा पगड जात देवानं केलीया, आणि आमी तुमास्नी सळ नि आरी देतो त्योच उपकार माना, इसरू नगा....'

'न्हाय इसरत.' मळू चटकन उठला नि म्हणाला, 'तुझा सळ नि आरीचा उपकार फेडूनच मी मरंन' असं म्हणून तो वाटेला लागला. शंकऱ्या चांभार त्याच्या पाठमोऱ्या आकृतीकडं टक लावून पाहत राहिला. परीट नि लखू मांग यांनी चांभाराकडं पाहिलं आणि चांभार लाजला. दुःखी झाला. तो परटाकडं वळून हळूच म्हणाला, 'म्हारानं माझा अपमान केला.'

मळू महार आणि शंकर चांभार या दोघांच्या आयुष्यात तो दिवस मोठा आणीबाणीचा ठरला. त्या दिवसापासून ते एकमेकांशी बोलत नव्हते. समोरासमोर कधी येत नव्हते नि आले तरी दिशा बदलून चालत होते. त्यांच्या मनात शब्दांच्या जखमा चिघळत होत्या. काट्यानं कुरूप व्हावं तसं दोघांच्या काळजातच कुरूप केलं.

'सळ नि आरी देतो ह्ये उपकार मान.' हा शंकऱ्याचा बोल मळूच्या काळजात रुतून बसला होता आणि 'कातडी चिलबिलून संसार करतोस नि वर बेंबीला थुंका लावून बामन...' ही मळू महाराची डिरकी शंकऱ्याच्या वर्मी लागली होती.

ते सुगीचे दिवस गेले. पुन्हा साऱ्या जमिनी उघड्या होऊन उन्हं खात पडल्या. पुन्हा पावसाळा तोंडावर आला. नगारे वाजवून वर्दी दिली नि मेघराजांची स्वारी भूतलाकडं निघाली. मृग नक्षत्र निघालं. काळ्या धरणीनं सुंदर हिरवी शाल पांघरली. तिच्या मस्तकी अनंत जातींची नि रंगाची रानफुलं डोलू लागली. एखाद्या लाजऱ्या बाईप्रमाणं ती भानावर आली. डोंगराचं वैभव वाढलं. माळावर रेशमासारखे करड झळझळू लागले. भुस्कटाप्रमाणे चिलटं भिरभिरू लागली. सर्वत्र सुरवंट वळवळू लागले. आणि मग हळूहळू त्या सुरवंटांची फुलपाखरं होऊन माळानं उडू लागली. सर्वत्र आनंद भरला.

पण त्याच दरम्यान गावची गुरं चिपळू लागली आणि एकाएकी फरं सुजून ती बसू लागली. त्या गावात जनावरांचा रोग शिरला नि हाहाकार उडला. पहिल्या दणक्यात शंकऱ्याची म्हैस आजुरली, दुसऱ्याच दिवशी तिनं डोळे वटारून जीव सोडला आणि एकदम शंकऱ्याच्या डोळ्यापुढं मळू महार उभा राहिला. तो तसाच लगबगीनं महारवाड्यात गेला.

मळू उन्हाला पाठ लावून बसला होता. त्याला शंकऱ्या म्हणाला,

'मळू नाना, माझी म्हैस मेली, चल.'

'चल कुठं?' मळू शांतपणे म्हणाला, 'मी येऊन काय तुझ्या म्हशीला जिती करणार हाय?'

'तसं नव्हं — आता बघ, चल की —' चांभार चाचरला.

'त्या मेल्या म्हशीला बघून मला काय मिळणार?'

मळू महाराच्या बोलण्याचा रोख कळताच शंकऱ्यानं परटाचं घर गाठलं आणि मग दोघांनी गाव उठवलं.

'म्हारं चढली लेका-चला', 'म्हारास्नी आता गाव दिसंना —' 'आरं चला की म्हारुडा द्या फुंकून' असे कैक दगड मारून मन्या परटानं आग्या मोहोळ उठवलं. परटाच्या पुढ्यातील पोरं दिसेल ते घेऊन महारवाड्याकडे धावत निघाली.

गण्या गुरवानं ते पाहिलं आणि त्याला चेव आला. त्यानं काखेतील शिंग तोंडाला

लावून फुंकलं.

त्याबरोबर एकूण एक माणूस बाहेर पडला आणि त्या लोंढ्यात मिसळून महारवाड्याकडं निघाला. सर्वांच्या शेवटी चावडीत खबर गेली आणि रंगू पाटील उपरणं झटकत धावत निघाला. दंगल पार महारवाड्याजवळ आली. ती आरडाओरड ऐकून मळू थळात आला.

तेव्हा हातात काठी घेऊन पंजी आखडून परीट कोकरासारखा उड्या घेत येताना दिसला. त्याच्या मागं शे-दोनशे पोरं पळत होती. त्यांना पाहून मळू आडवा उभा झाला नि मोठ्यानं ओरडला, 'तिथंच थांबा. म्होरं येऊ नगा.'

त्याबरोबर सर्वच अचाकले. परीट गपकन थांबून म्हणाला,

'जीव पायजे असंल तर मागं सर.....'

'मला नगं जीव. कंटाळा आला त्येचा.' मळू नाक फेंदारून म्हणाला, 'काय भानगड हाय?'

'मी म्हारुडा पेटवनार हाय.' परीट गुरकला.

'तू नगं पेटवू. मीच पेटवतो.' मळू ओरडला, 'पर काय झालं त्ये आदी सांग.'

मळूच्या बोलण्यानं परीट पेचात आला. तो विचार करीपर्यंत सारा गाव थळीत येऊन दाखल झाला. काय प्रकार आहे तो समजून घेऊ लागला. 'आरं काय झालं?' असं जो तो खेकसू लागला. एवढ्यात परटाला मागं सारून रंगू पाटील पुढं आला नि म्हणाला, 'मळू, काय भानगड हाय कळू दे की —'

'भानगड काय न्हाय.' मळू म्हणाला. 'परीट म्हारुडा जाळाय आलाय.'

'काय रं मन्या, काय झालं?' पाटलानं रोखून पाहत विचारलं. आणि नाक फुगवून परीट म्हणाला,

'शंकऱ्याची म्हस मेलीया नि म्हारं ती ओढीत न्हायती. असली म्हारंच नगं आमास्नी.....'

'आरं कुनाची बी घरं कुनी जाळाय हातं काय मोगलाई हाय व्हय?' पाटील बिथरून म्हणाला आणि भर्रकन गावात दोन तट पडले. परटाविरुद्ध गावाचा कल फिरला. त्यामुळे परीटही पेटला नि ओरडला,

'मला फासावर चढवा. मी मागं हटनार नाय होऽऽ'

'आरं तू सतरा वकत फासावर जा. पण त्या शंकऱ्या चांभाराच्या मेलेल्या म्हशीपाशी गाव ढाणकाला देऊ नग.' पाटील परटापेक्षा दुप्पट आवाज चढवून ओरडला आणि एकदम सारा गाव परटावरच उलटला. त्याबरोबर परटाची माणसं एक एक नाहीशी झाली. गर्दीतून ती डोळा चुकवून सरकली नि मन्या एकटाच त्या गावाबरोबर तंडू लागला. तो म्हणाला,

'मग गावची मेल्याली ढोरं कोन वढणार गा?'

'त्येची तुला का पंचात?' पाटील म्हणाला, 'तुझ्या गोठ्यात शेपूट न्हाय नि का वळवळ करतोस?'

इतक्यात शंकऱ्या गर्दीतून पुढं आला. त्यानं हात जोडून विचारलं,

'माझी म्हस म्हारं वढीत का न्हायती? इचारा. पायतानाचा आंगठा तुटला की त्येस्नी चांभार दिसतो. येरवी दिसत न्हाय.'

'का दिसं न्हाय? दिसतो की!' मळू म्हणाला, 'आंगठा तुटला की तू सळ नि आरी देतोस.'

'हो होऽऽ' चांभार मध्येच ओरडला, 'देतोच की —'

'मग थांब तर —' असं म्हणून मळू घरात गेला आणि आरुसं आणि कावडनी घेऊन आला. ती ढोरं ओढण्याची अवजारं चांभारापुढं ठेवून पुन्हा म्हणाला, 'एकदा सळ आणि आरी देऊन त्वा माझ्यावर उपकार केलास, आता ह्ये आरुसं नि कावडणी देऊन मी त्या उपकाराची फेड करतो. ह्ये घेऊन जा नि वढ आपली म्हस.'

चांभार कावडण्याकडे डोळे फाडून पाहत म्हणाला, 'कावडणं नि आरुसं नेऊन मी काय करू याचं?'

त्यावर मळू म्हणाला, 'सळ नि आरी घेऊन म्या जसं केलं, तसं तू बी कर. जमंल. जा.'

मळूचे ते बोलणं ऐकून सारा गाव हासला. मळूच्या मनातलं दुःख सर्वांना उमजलं आणि आपल्या काळजातील ती जखम भरून आल्यासारखं मळूला वाटलं. मन्या परीट खजील झाला.



# इरेनं गाढव खाल्लं

'माणसानं इरेनं जगावं. एवढंच नव्हं तर माणसानं इरेनं गाढव बी खावावं.' तुकाचे हे ब्रीदवाक्यच असे. आणि एकदा त्यानं ते गाढव खाल्लं.

हा तुकाराम कोणी पुरातन संत तुकाराम नव्हे. हा तुका एक शेतकरी तुका आहे. घरात बारा एकर जमीन. म्हणजे सर्व आळीतील लोकांपेक्षा जास्त. त्यात तुकाची उठबस गावातील बड्या लोकांत असायची. म्हणजे ज्यांच्या घरात शेकडो एकर जमीन असून ते स्वत: जमीनदार आहेत, जे राजेशाही थाटात राहतात, आयते बसून खातात; ज्यांच्या घरी टोळकीच्या टोळकी बसून चकाट्या पिटतात, जे लोक दारू, गांज्या ही व्यसने म्हणजे एक भूषण मानतात, आणि सहज जरी बोलायचे झाले तरी 'ए, तुझ्या पायाचं कंडकंच पाडीन!', 'तुझ्या बरगड्या उपसून काढीन!' असे गुर्मीत बोलतात, अशा लोकांत तुका रोज बसत होता. शिवाय, तो स्वत: मूळ दक्षिण सातारचा. मग काय कमी? जे असायचे ते भरपूर होते. मिश्यांचे तराटच्या तराट, शुभ्र पटका, दोन टांगी पंजी, नेहरू सदरा, हातात फरशी कुऱ्हाड. तो चालताना एखाद्या राजासारखा चालायचा.

घरात तो आणि त्याची म्हातारी आई. त्यामुळे तो बेपर्वा असे.

आळीतील सर्व लोक त्याला जमीनदार म्हणत, त्यामुळे त्याला अभिमान वाटे. अंगावर मूठभर मांस चढल्यासारखे वाटे. तो आपली जमीन दुसऱ्याला खंडाने वाट्याने देत होता. त्यामुळे त्याला सर्व काही आयते मिळत होते. त्याच्या अंगाला माती लागत नव्हती.

आणि त्याचे मित्रसुद्धा मोठी औषधी माणसं होती. त्यापैकी एक आबाजी. तो शरीराने किडकिडीत होता. त्याची मान बगळ्यासारखी होती. तो सदा झोके घेत असे. तो जनावरांच्या दलालीवर आपले सर्व चालवत असे. खोटे बोलण्यात तो साऱ्या गावात चढ होता. त्याला गांजा ओढल्याशिवाय बोलताच येत नसे.

दुसरा बंडू हा गांज्याने खंगून गेला होता. तो नेहमी म्हणे, 'गांजा व मांस या दोन वस्तूंवरच हे जग चालतं. ह्या वस्तू जर नसतील तर जगाचे पाय लुळे पडून ते पाण्यात म्हैस बसल्यासारखे बसेल.' आणि तो पटाईत चोरही असे. पण गांज्या ओढल्याशिवाय त्याला काहीच करता येत नसे. 'गांजा ओढून आपण एखाद्याच्या डोळ्यातलं काजळ देखील काढू' असा त्याचा दावा होता.

तिसरा बाळू महार. हा क्षयाने जर्जर झाला. त्याच्या तोंडावर सदा मढ्याची अवकळा आलेली होती. तो जातीने महार गडी. परंतु काम गवंड्याचे करीत होता. त्याला दोन

मुले होती. पण तो आपली सर्व कमाई गांज्यात घाली. त्यामुळे त्याची बायको रोज त्याच्या मरणाचीच वाट पाहत असे.

आणि ही सर्व इरसाल माणसं तुकाच्या गळ्यातील ताईत होती. तो रोज त्यांना जमवून बसे. तो त्यांना चहा, गांजा, बिड्या पुरवी. ते सर्व इतकी गांजा ओढीत की सारं घर धुराने भरे. चुलीपुढं म्हातारीला गुंगी येई आणि पाखडीतील उंदीरसुद्धा बेशुद्ध होऊन त्याचा कडेलोट होई.

एकदा या बिलंदर लोकांची बैठक बसली होती. चहाचे पाणी सळसळत होते. म्हातारी चूल फुंकीत बसली होती.

आबाजीने डाव्या तळहातावर उजवा तळहात ठेवून मध्ये गांज्याची कळी पिळली, क्षणभर त्याचे अंग थरारले. त्याने एक दीर्घ धाप टाकली. चिलीम भरली, आणि ती त्या चौघात फिरू लागली.

'खरं सांगू का तुकाराम, तुम्ही-तुम्ही आता लगीन करा.' आबाजीनं सुरुवात केली.

'हो, हो खरंच करा - झकासपैकी.' बंडूनेही टेकू दिला.

म्हातारीने कान टवकारले, ती मागं फिरली. 'खरंच आबाजी, टाका एवढं करून. घ्या पदरात आता. कुठवर दळून - मळून भाकरी करून घालू मी? बघा एखादी कसलीबसली पोरगी आणि टाका करून. घ्या एवढं पुन्य बांधून.' म्हातारी वैतागून म्हणाली.

'कसलीबसली का? तुम्हा आणाल एखादं भूत - पण ते मला परवडणार न्हाय हो, सांगून ठेवतो. बायको करीन तर शिकलेली.' तुका बिथरून म्हणाला.

'मग तुमचं म्हणणं काय?' बाळूने धुराचा लोट सोडीत विचारले.

'माझं म्हणणं सांगू? बायकू पाईजी शिकल्याली. माझ्या घराण्याला शोभली पाइजी. मला हुंडा बी मिळाला पाइजी. आणि ती बायकू नांदली पाइजी. हो, न्हाय तर हळकुंडाच्या गळ्यात शेळकुंड बांधाल नि मला मापटं ठोकावं लागंल.' तुका म्हणाला.

'म्हणजी आम्ही करू ते वाईट करू असं तुम्हाला वाटतं?' आबाजीने आपली गिधाडासारखी मान पुढे करून विचारलं.'

'अवं, आम्ही गांज्या ओढतो आणि बरळत बसतो असं समजू नका. काय हो बाळूबा?' बंडूने डिवचून म्हटले.

'हो हो. आम्हाला जर लढाईत भर्ती केलं तरी बी आम्ही तोफखाना चालवू. बंदुकीचा नेम करू. लढू. एखादा गड सर करू!' बाळू ठसका देत म्हणाला.

'आणि तुमचं लगीन आम्हाला करता येणार न्हाय म्हणता?' आबाजीने धूर सोडून प्रश्न केला.

'का गांज्या ओढल्यावर माणूस पिसाळल्या कुत्र्यावाणी भुंकतं असं तुम्हाला वाटतं?'

बाळूने चिडून विचारले.

'तसं न्हवं — मी यंदा घर बांधणार हाय. भवतंनं कुसब बांधणार हाय. आड काढणार हाय. म्हणजे देशमुखाच्या वाड्यावानी समदं करणार हाय. तवा चांगली पोरगी बघा म्हंजी झालं.' हर्षभरित होऊन तुका म्हणाला.

म्हातारी ऐकत बसली होती.

बाहेर सर्व काही अंधारात गडप होत होते. सर्व घरात दिवे मिणमिणत होते. मधून मधून कुत्री भुंकत होती. तुकाच्या घरी लग्नाचा बेत चालला होता.

'मग आबाजी, कवा जाता नवरी बघाया?' म्हातारी म्हणाली. तिला लग्नाची घाई झाली होती.

'आमचं काय? आम्ही सकाळ निघतो. पण तुमचा बेत सांगा. पैसापाण्याचा बंदोबस्त हाय न्हवं?' बाळूने धूर गिळत विचारले.

'पैशाची काळजी करू नका. तुम्ही नवरी बघा. मी पैसा कुरीनं पेरीन.' तुकाने गुर्मीत सांगितले.

'मग काय, आम्ही उद्याच निघतो!' आबाजी म्हणाला.

'बायकू झ्याक बघा. शिकल्याली; नि जाताना भाड्यानं गाडी घेऊन ऐटीत जा.' तुका म्हणाला.

रात्र बरीच झाली होती. उद्याच नवरी शोधायला जायचे नक्की करून बैठक बरखास्त झाली.

तो कार्तिकाचा महिना होता. थंडी मी म्हणत होती. तुकाच्या घरात लग्नाची घाई सुरू झाली होती. सकाळी भल्या पहाटे तुकाच्या दारात बैलगाडी जुंपून उभी होती. घरात गांजाची चिलीम फिरत होती.

गांज्या ओढून आबाजी, बाळू, बंडू धुंद झाले. त्यांचे डोळे तारवटले. ते सर्व जण गाडीत बसले. पण आबाजीला गाडीत चढताच येईना. तुकाने त्याला वर चढवले.

'आबाजी, तुझ्या काखेत हे काय?' तुकाने विचारले.

'हा मास्तरगिरीची दाखला. नवरीला दाखवाय.' आबाजी म्हणाला.

'नवरीला दाखवाय का?' तुकाने प्रश्न केला.

'असं केल्याशिवाय शिकल्याली नवरी कशी मिळणार?' आबाजीने खुलासा केला.

गाडी चालू लागली. सर्वत्र सामसूम होती. गाडी गावपांदीनं गावदरीला आली. पांदीच्या वरल्या बाजूला येताळाचं देवस्थान आणि स्मशान होतं, तिथं गाडी थांबली. अंगावर घेतलेल्या घोंगड्यानं आबानं हात जोडून देवावर भार घातला. तो म्हणाला, 'येत्ताळबा

राजा, काम फत्ते होऊ दे. तुला तोळाभर गांज्या जाळीन.' आबानं नवस केला नि गाडी पुढं निघाली.

त्यांनी सर्व कऱ्हाड तालुका पालथा घातला आणि शेवटी कृष्णा नदीच्या काठी एका गावात नवरी ठरवून मंडळी परतली.

तुका दारातच उभा होता. 'काय? काम फत्ते?' तुकानं घाईघाईने विचारले.

'ईच्याभना, आम्ही जाऊन काम फत्ते होणार न्हाय? मग आम्ही माणसं हाय का मुंगूस?' आबाजीने मिशीवर ताव देत उत्तर दिले. ते तिघेही मोठ्या दिमाखात घरात शिरले.

'काम फत्ते झालं न्हवं? मग देव पावला!' तुका उद्‌गारला.

'अन् तुकाराम, मी आज बारा वरसं ढोरांचा बेपार करतोय. म्यां आजपावतर हजारो रेडकं वांद्र्याला इकल्यात आणि एक नवरी पटवता येणार न्हाय व्हय?' आबाजी जोरात गुरकला. म्हातारीला आनंद झाला. घरात एकच धांदल झाली. चहाला पाणी चढले, गांज्याची चिलीम भरली गेली.

'हे — किती शिकलीया नवरी? आनी तिचं वय काय? हुंडा किती, आनी दिसायला चांगली हाय का?' तुकाने प्रश्नांची सरबत्ती सुरू केली.

'हुंडा शंभर रुपये. पोरगी मराठी सा यत्ता झालीया. नाकाडोळ्यानं रसरसीत हाय. वय सोळा-सतरा असंल. आक्शी खुडून घ्यावी अशी फैनाबाज हाय.' आबाजीने ठसकत ठसकत सांगून टाकले.

'पोरीचं काय इचारताय? नुसती हरणावाणी हाय. तिचं डोळं नुसतं टपटपत्याती.' बंडूनं आपलेच डोळे वटारून दाखवत म्हटले.

तुका मिटक्या मारीत ऐकत होता. आता आपण शिकलेली बायको करणार, मग सर्व काही इनामदारी थाटाने होणार, लोक आपली तारीफ करणार! त्याला आनंद झाला.

'पण ती नांदणार का?' तुकाने मध्येच शंका व्यक्त केली.

'तिचा देव नांदल. तुम्ही आपली तयारी करा.' आबाजीने सांगितले.

तुकाने दोन तुकडी गहाण टाकली आणि लग्नाची तयारी केली. तिथी ठरल्या. दारात मांडव घातला. तुकाचे लग्न झाले. नवरी नांदाय आली. म्हातारीला भारी आनंद झाला.

तुकाने ईर्षेने शिकलेली बायको केली. परंतु त्याचे मन त्याला खाऊ लागले. बायको शिकलेली, आपण अडाणी. जर हे तिला समजले तर वाईट होईल. ती आपल्याला हसेल. आपण नुसता नांगरगट्या असून आबाजीने तर तिला आपण शिकलो आहे असा दाखला दाखवला आहे. जर तिला समजले तर मग काय होईल? आपला मोठा अपमान होईल. ती आपणाला कस्पटाप्रमाणे समजेल.

तुका विचार करीत होता. तो पाखरासारखा झुरत होता. तो फार कमी बोलत होता. आपली भाषा, आपले अडाणीपण तिला कळू नये म्हणून सदा स्तब्ध राहत होता.

एकदा त्याच्या बायकोने त्याला एक कार्ड दिले. ते तिच्या माहेरचे होते. तो गडबडला. त्याला चरका बसला. आपण अडाणी आहोत हे हिला नक्कीच समजले असून मुद्दाम हिने आपणाला हे कार्ड दिले आहे, असा त्याचा समज झाला. तो मनात चरफडला आणि बाळूची गाठ घेऊन त्याने त्याला सर्व सांगितले.

'बाळू, गड्या बरं झालं न्हाय.' तुका म्हणाला.

'का? काय झालं?' बाळूने विचारले.

'ईच्याभनं घसारवाल्यानी वाटतंय.' तुका म्हणाला.

'आरं, पर झालं तरी काय?'

'भानगड वाढत चाललीया.' तुकाने तक्रार केली.

'कसली रे भानगड? सांग की.'

'काल माझ्या सासऱ्याचं कारीट आलं, आनी बायकूनं त्ये मला दिलं नि म्हनली वाचा.'

'मग रं काय केलंस?'

'मग काय करणार? रडायच्या बेतात आलो आणि थोबाडीत मारल्यावानी गप्प बसलो, झालं.' तुका दु:खी होऊन म्हणाला.

'मग म्होरं काय?' बाळूने विचारलं.

'आता म्होरं काय? माझा अपमान झाला. माझ्या हुर्द्यात बाण लागला. शिकल्याली बायकू करून कोलदांड्यात अडकलो मी.' तुकाने मनातील शल्य सांगितले.

'हे बघ, तू तिचा नवरा हायस.' बाळू म्हणाला.

'मग काय करू?' तुकाने विचारले.

'माझ्या बापानं टोपलंभर गांज्या ओढली आणि माझ्या आईला मुसळानं बडवली. तवा बायकोचं लई लाड करू नये. आनी तुकारामाने अभंगात सांगितलंय. 'पायाची वहान पायी बरी!' बाळूनं तुकाराम पुढे करून उपदेश केला. तुका उठून घरी आला.

जेवणवेळ झाली होती. आळीतील लोक जेवणाच्या तयारीत होते. तुकाच्या बायकोने जेवण वाढले. पाण्याचा तांब्या भरून आणून ठेवला. आणि तो ठेवताना सांडले. तुकाला राग आला. तो एकदम भडकला.

'ए, असली हुबलाक वागणूक माझ्या घरात खपणार न्हाय.' तुका डोळे वटारून गुरगुरला. घरात वातावरण तंग झाले.

'सांडलं असंल पाणी. सांडू दे.' म्हातारी म्हणाली.

तुकाची बायको भेदरून कोपऱ्यात उभी राहिली. हे असे काय झाले आहे हे तिला

मुळीच कळत नव्हते.

'सांडलं असंल पाणी? पण का सांडलं?' तुका चिडक्या आवाजात ओरडला. घर गर्जले. म्हातारी नरमली. तिलाही आश्चर्य वाटले.

'जाऊ दे. सांडू दे — मग का जीव घ्यायचा हाय तिचा?' म्हातारी समजावणीच्या स्वरात म्हणाली.

'हो, हो, मी नवरा हाय. मी जीव बी घेईन. तुला ठावं न्हाय का, मी इरेनं वागणार माणूस हाय त्यो? गावातल्या मोठ्या लोकांच्या बायका कशा गोगलगाईवानी वागत्यात, आनी ही आपली नाकापरीस मोती जड होतीया!' तुकाने म्हातारीवर डोळे वटारून सांगितले. बायको सशाप्रमाणे भेदरून थरथर कापत होती.

'होईल बेताबेतानं, अजून नवं हाय!' म्हातारी म्हणाली.

'काय बेतानं होईल? तू आमच्यामधी पडू नकं!'

'मग काय मी जाऊ इथून? घेतोस तिचा जीव?' म्हातारी चिडली.

'हो हो, घेतोच बघ!'

'घे बघू कसा घेतोस ते!' म्हातारी गुरकली.

तुकाने दांडके काढले आणि बायकोला बडवायला सुरवात केली. घरात बोंबाबोंब सुरू झाली. म्हातारी ओरडू लागली.

त्या दिवसापासून रडारडी त्याच्या घरात मेढच मारून बसली. आळीतील शेजारीपाजारी तुकाच्या भांडणारा कंटाळून गेले.

ही बातमी तुकाच्या सासऱ्याली समजली आणि तोही एके दिवशी आला आणि 'चार रोज माहेरी नेतो', असे म्हणू लागला.

तुकापुढे दुसरा पेच निर्माण झाला. जर बायको माहेरी गेली तर तिकडे सर्व लोकांना सांगेल की, आपला नवरा अडाणी असून आपल्याला रोज मारतो. मग तिकडेही आपली अब्रू जाणार. आता काय करावे?

शेवटी सासऱ्याला सांगितले, 'तुमची मुलगी येत असेल तर घेऊन जा.' परंतु ती तयार झाली आणि तुकाचे डोके फिरले. पुन्हा घरात बोंबाबोंब सुरू झाली. दारात लोकांनी गर्दी केली.

'मी इनामदाराचा बच्चा हाय - आनी मला बिन इचारता जातीस?' तुका रागाने लाल होऊन ओरडत होता.

'अरं तुका, का मांजराच्या पिल्लावाणी कळवंड करीत बसलायास?' एका शेजाऱ्याने विचारले.

'इच्याभना, उगाच धूमशान घालीत बसला झालं.' तिसरा म्हणाला.

'ए, का मारामारी करीत बसलायस?'

'का म्हंजी? जवा तवा कुदरांडपणा करतीया!' तुका धापा टाकीत म्हणाला.

'अरं पर अवलगामी लागलं तिला तर मरंल.'

'मरू द्या. म्हैस घेतली नि रोगानं मेली म्हणीन.' तुका गुरगुरला.

'अरं, पर फाशी जाशील की!'

'सतरा वकत फासावर जाईन. तुम्ही नका मला सांगू. जावा बरं आपल्या घरला!' तुका बिथरून म्हणाला.

'अरं बघताय काय? तकडं आबाजीच्या दारात पावन्यानं फास घेतला! पळा.' एका पोऱ्याने वर्दी दिली.

लोक तिकडे धावले. जिकडे तिकडे मुंगीच्या रिवणासारखे माणूस दिसू लागले. लोक आबाजीच्या दारात जाऊन पाहातात तो तुकाच्या सासऱ्याने दारातील लिंबाला दोर लावून त्यात मान अडकावून दिली असून आबाजी घामाघूम होऊन त्याला वाचवण्याचा प्रयत्न करीत आहे.

कोणीतरी झाडावर चढून फास कापून पाहुण्याचा जीव वाचवला. त्याची मान मोकळी केली. त्याला पाणी पाजून शुद्धीवर आणले.

'मला मरू द्या. मी जिवंत म्हणून परत जाणार न्हाय. ह्या आबाजीनं माझ्या पोरीचं वाटुळं केलं. मी इथंच मरणार.' तुकाचा सासरा ओरडून सांगत होता.

'अरं पण तुमचं म्हणणं तर काय ते कळू द्या!' एकाने विचारले.

'माझी पोरगी माझ्या मागनं पाठवा.'

पुन: लोक परत धावले आणि त्यांनी तुकाला विचारले, 'तुका तू पोरीला माहेरी पाठवणार का न्हाय?'

'न्हाय पाठवणार!' तुका चिडून म्हणाला.

'आम्ही पाठवणार.'

'कसं पाठवणार?'

'सरळ पाठवलीस तर बरं. न्हाय तर तुला कोलदांडा घालू.'

'बरं तर, या बघू—' तुका चिडून उठला आणि आपली कुऱ्हाड शोधू लागला. लोकांनी तुकावर मुरकंड दिली. त्याला जखडून बांधले. सर्वत्र शांतता झाली.

'चंद्रभागा, ये बाहीर,' तिच्या वडिलांनी तिला हाक मारली आणि हासत नांदाय आलेली चंद्रभागा रडत एका लुगड्याचा पिळा काखेत घेऊन लंगडत बाहेर आली नि आपल्या वडिलांपाठी चालू लागली. लोक उभे राहून पाहत होते. ती दूर गेली, पण तिने एकदाही परतून पाहिले नाही.

तुकाची बायको गेली आणि थोड्याच दिवसांत म्हातारीने राम म्हटला. तुकाने पुन्हा दोन तुकडी गहाण टाकली आणि म्हातारीचं दिवस घातले.

आणि तो बायकोची वाट पाहत बसला. त्याने दिवस मोजले, महिने मोजले, वर्षे मोजली. तिला जाऊन आठ वर्षे पूर्ण झाली. तोपर्यंत तुकाने सर्व जमीन गहाण टाकली. घरातील सर्व किडूकमिडूक विकले. बायको गेली, म्हातारी गेली. त्याचे सर्वस्व संपले. तो रोटी, शर्टापासून चटणीपर्यंत सर्व वस्तू मागून आणू लागला. स्वत: दळू लागला. स्वत: भाकरी करू लागला. त्याला कोणीतरी सांगितले की, तुझी बायको आता मास्तरीण झाली असून मुलांना शिकवण्याचे काम करीत आहे.

हे ऐकून त्याची गुर्मी लुळी पडली. त्याची ईर्षा नष्ट झाली होती. त्याची जमीनदारी नशा उतरली होती. तो दारोदार फिरत होता.

मी त्याला नेहमी टाळीत होतो. त्याच्याशी बोलण्याची मला भीती वाटत होती. कारण त्याच्याशी बोलणे म्हणजे इरेने गाढव खाण्याची तयारी करणे होते आणि ते मला झेपण्यासारखे नव्हते. पण एकदा त्याची-माझी अचानक गाठ पडली.

'काय तुकाराम, कसं काय, बरं आहे?' मी भीत भीत विचारले.

'न्हाय बरं, माझं बरं न्हाय.' तो निराश होऊन म्हणाला.

'का हो, काय झालं?' मी हळूच विचारले.

'म्या इरेनं गाढव खाल्लं, पण मला पचलं न्हाय!' असे म्हणून तो मोठ्याने हासू लागला. पोट धरून हासला. मी चकित होऊन पाहू लागलो.

'बरं, आत्ता कुठं निघालास?'

'ही जुनी खेटरं चांभाराला देतो.' त्याने एक पिशवी वर करून दाखविली आणि तो मंद गतीने पुढे निघाला.



# रानगा

अंधाराच्या जबड्यातून नुकताच यळावी गाव बाहेर पडला होता. श्रावणातला तो पाऊस क्षणभर विसावा घेत होता. घरांच्या कवलांवरचे पाणी हळूहळू झिरपत वळचणीकडे सरकत होते आणि झाडांच्या पानांवर बसून झोके घेणारे पाण्याचे थेंब शेवटी धरणीवर आपटत होते. थंडगार वारे पिसाळलेल्या कुत्र्यासारखे धावत होते आणि रोजच्या कामाला लागलेल्या शेतकऱ्यांच्या काळजाला बोचकारीत होते. सर्वत्र चिखल बरबरत होता.

मारुतीच्या देवळाशेजारी असलेल्या तालमीत पहिल्या कोंबड्यापासून मेहनत करून येताळ्या नुकताच बाहेर ओट्यावर येऊन उभा राहिला होता. श्रमदानाने साकार झालेली सडक तालमीपुढून पाणवठ्याला गेली होती. त्या सडकेनं पाण्याला जाणाऱ्या स्त्रियांना तो न्याहाळत होता. देवळापुढच्या अंगणातच पाण्याचा उकिरडा ओकाऱ्या देत होता. त्यात कैकाड्याची दोन डुकरं रोंदळत होती. त्यांना पाहून येताळ्या संतापला होता. एवढ्यात एक पुष्ट गाढव तालमीपुढं येऊन मंदगतीनं चावडीच्या रोखानं निघालं. त्याला पाहून येताळ्यानं एक शिवी दिली, 'च्यायचं भडवं.'

इतक्या भिवा ठोंबरे येऊन दबक्या स्वरात म्हणाला, 'येताळ्या, शेळक्याची माणसं तुला मारणार हायती. जरा जपून अस.'

हे ऐकून येताळ्या बिथरून म्हणाला, 'मला मारणाऱ्याच्या पोटात पाच काळजं पायजीत. या म्हणावं लेको. एका सवनं बारा माणूस मारीन तरच नावाचा येताळ्या.'

असं म्हणून त्यानं गर्रकन गर्दन फिरविली. आणि एखाद्या वळूप्रमाणे शांतपणे तो घराकडे निघाला.

येताळ्याने तांबडमातीत मेंचटलेल्या टॉवेलनं आपल्या टाळूची आणि हनुवटीची पेंड बांधली होती. त्या टॉवेलातून त्याची टाळू घोड्याच्या टाळूसारखी कपाळावर आली होती. त्याचं लहानसं कपाळ, फेफटं नाक, गुबगुबीत गाल, सर्व काही तांबडमातीनं लडबडलं होतं. त्याच्या त्या धिप्पाड देहावर त्याचं डोकं अगदीच लहान दिसत होतं. त्याचा पिंगळ्यासारखा दिसणारा चेहरा आज किंचित उग्र भासत होता. त्याचे ते वाटोळे बटबटीत डोळे उगीचच फिरत होते. आपले दात नसलेले तोंड घट्ट मिटून, नाक फेंदारून तो शून्यात पाहत होता. पंजी आखडल्यामुळे त्याच्या भरदार पोटऱ्या बाभळीच्या खोडासारख्या दिसत होत्या. त्याच्या काळ्या रंगावर तांबड्या मातीचे थर बसविल्यामुळे तो चिखलातून रेडा उठावा तसा दिसत होता. त्यानं अंगात दंडकं घातलं होतं. आणि

आपली प्रचंड छाती पुढं काढली होती, त्याच्या हातात शुभ्र कुऱ्हाड चमकत होती. तिच्याकडे तो समाधानपूर्वक पाहत होता. शेळके मारामारीला येणार ही बातमी ऐकून तो बेचैन होण्याऐवजी बेफिकीर झाला होता. तो मुसमुसत चालला होता.

पुढून येणारी माणसं त्याला पाहून बिचकून उडीच मारीत आणि बगल देत होती. मात्र त्याच्याकडे येताळ्याचे मुळीच लक्ष नव्हते.

यळावीत येताळ्याचा भलताच दरारा होता. लोक त्याला भीत होते. गावात, बाजारात, जत्रात, कुस्त्यांच्या फडात, तमाशात, सर्वच ठिकाणी येताळ्याची ती कुऱ्हाड चमकत असे. गावात जरा जरी गडबड झाली तरी येताळ्या पुढे असायचा. आणि बारा माणसं ठार करण्याचा तो आपला निर्धार सांगून टाकायचा. त्याच्या बोलण्याला, बळाला, वर्तनाला गावात तुलना नव्हती.

परंतु त्याची घरची स्थिती तशी नव्हती. दोन बैल, एक म्हैस, चार एकर जमीन, चार अकणी घर, एक म्हातारी आई, असा त्याचा प्रपंच बेताचाच होता.

परंतु येताळ्या बेतात नव्हता. आजूबाजूला बाया दिसल्या की त्याचा पाय जमिनीवर ठरत नसे. काहीतरी अचाट कर्म करून स्त्रियांना दिपवण्यासाठी तो जिवाचे रान करी. स्त्रियांनी आपल्याकडे मोहित होऊन जीव टाकावा अशी त्याची फार मोठी इच्छा होती.

एकदा एका लग्नात बऱ्याच देखण्या पोरी आल्या. त्यांना पाहून येताळ्याला चेव आला. तो बेभान झाला. त्या पोरींना बळ दाखविण्यासाठी त्याने पाण्याने भरलेली घागर आणून ती दाताने उचलली. सर्व वऱ्हाडी मंडळी हैराण झाली. त्या पोरी आश्चर्याने थक्क झाल्या. पण येताळ्याच्या दैवाने दगा दिला. त्याच्या सर्व दातांचा चुराडा उडून ती घागर खाली पडली आणि त्याच्या मूळच्या कुरूपतेत भर पडून तो कायमचा बोळका झाला. त्या दिवसापासून तो आपले बेलट्यासारखे तोंड घेऊन फिरू लागला. जरी त्या वेळी त्याची बचाळी मोडली होती तरी त्याची खोड मात्र मुळीच मोडली नव्हती. लोक त्याला 'रानगा' या टोपणनावाने ओळखीत, पण त्याच्या तोंडावर त्याला येताळ्या म्हणत.

श्रावणी पाऊस पिंजलेल्या कापसाप्रमाणे भुर्भुर्रत होता. प्रत्येक झुडपाला नवती आली होती. जिकडं तिकडं फुलं हासत होती. कैक घरावर भोपळीच्या वेलांनी पाय पसरले होते. त्यांनी कौलं झाकली होती. पाळण्यात मूल झोपावे तसे हिरव्यागार पानात पिवळे भोपळे लोळत होते.

शेतकरी आपली रोजची कामं आटोपून रानात जात होते. पेठेतले दुकानदार दुकानाच्या फळ्या बाजूला सरकावून गिऱ्हाइकाची वाट पाहत बसले होते.

येताळ्या पाराखाली आला तेव्हा दोन कुत्री एकमेकांना चेलमडण्याचा खेळ खेळत होती. त्यांना पाहून त्याने डोळे वटारले. तो उभा राहिला.

पुढून म्हातारा बंडू साळी येत होता. तो आपलं ढेंगाळलेलं घोडं ओढीत रानात निघाला

होता. आणि आपलं मुस्काट वर करून पोट ओढीत ते घोडं अचकत निघालं होतं. बंडू साळ्याला आपल्या घोड्यावरच बसायचं होतं. म्हणून तो एक उंचवटा शोधत होता. त्याच्या डोळ्यांपुढं चावडीचं जोतं होतं.

परंतु येताळ्याला पाहून बंडू साळी थांबला. आणि येताळ्या म्हणाला,

'काय नाना, रानात वाटतं? आणि ह्यो पंचकल्याणी वारू वढत का न्हेता? बसा की वर.'

येताळ्याने सुरू केलेली चेष्टा लक्षात घेऊन साळी चिडला. तो डोळे वटारून भुवया चढवून खालवर पाहत म्हणाला,

'आणि तुम्ही पहिलवान, कुठं घराकडं वाटतं?' साळ्यानं मारक्या म्हशीनं शिंग पुढं करावं तशी मान वाकडी केली. दात नसलेला जबडा मिटला.

'हो, आताच तालमीतनं आलो.' येताळ्या हासत म्हणाला. आणि साळ्याच्या घोड्याच्या पाठीवर त्याने जोरात थाप मारली. त्याबरोबर ते घोडं तिरपटलं.

त्याची कळ बंडू साळ्याला येऊन तो गुरकला, 'ए तालमीवाल्या, काहीतरी काम कर. असा महारोग्यासारखा ऐतं खाऊ नको.'

हे साळ्याचे बोलणे ऐकून येताळ्या कावराबावरा झाला. त्याने आजूबाजूला पाहिले. जवळच औलाड्याची हौशी दिसत होती. त्यामुळे येताळ्या चिडला व म्हणाला,

'माझ्या अंगात लई बळ हाय, दाखवू का?'

असं म्हणून साळी दाखीव म्हणायची मुळीच वाट न पाहता येताळ्याने बंडू साळ्याच्या घोड्याच्या पोटाखाली उजवा हात घालून त्याला कवळा घातला आणि कचकन ते घोडं उचलून आपल्या खांद्यावर घेतलं. त्याबरोबर ते घोडं पाय झाडू लागलं. त्याचा जीव गरड्याला आला आणि अगतिक होऊन तो बंडू साळी पाय आपटू लागला. केकटू लागला. 'लेका येताळ्या, माझं घोडं मेलं. सोड त्येला.'

मग येताळ्यान घोडं खाली ठेवलं. बंडू साळ्याचा जीव सुळावरून उतरला. पुढं जाऊन त्यानं घोड्याची काळजीपूर्वक पाहणी केली आणि हळूच त्याच्या पाठीवर थाप मारली. त्याबरोबर भेदरलेल्या त्या घोड्यानं दुगाण्या झाडल्या. साळ्याने डोळे आकुंचित करून चिडक्या आवाजात म्हटले,

'लेका येताळ्या! तू माणूस नसून रानगा हायस! असा वागू नगं. मुंगी हो आणि साखर खा. पण असा हत्ती होऊन लाकडं फोडू नको. नाहीतर फुकट मरशील!'

'फुकट मरशील' हे शब्द येताळ्याच्या वर्मी लागले. आणि तो एकदम भडकला. तो म्हणाला, 'नाना, मी फुकाट मरणार न्हाय. मरंन तर बारा माणूस मारूनच मरंन. असा तसा मरणार न्हाय.'

असं म्हणून येताळ्या पुन्हा झटक्यानं निघाला. बंडू साळी त्याकडे पाहत राहिला.

एवढ्यात साळ्याचे घोडे खिंकाळू लागले. ते ऐकून पाराखाली उभे असलेले गाढव एकदम जागे होऊन ओरडू लागले. त्या दंग्याने पारावरचे कावळे भेदरून पळाले.

येताळ्या घरी आला तेव्हा त्याची आई फणफणत बसली होती. त्याला पाहून ती अधिकच चिडली. ती म्हशीकडे तोंड करून बडबडू लागली, 'माणसानं माणसासारखंच वागावं. एवढा उन्माद करू नये. देवाघरी झडती द्यावी लागते. पाण्यात न्हायचं नि माशाशी वैर का करावं?'

उशीर ऐकून घेऊन येताळ्या खेकसला,

'ए आई, काय झालं तुला? का भूत लागलं?'

'मला भूत लागलं?' म्हातारीनं भुवया चढवून विचारलं.

आणि येताळ्या म्हणाला,

'हो हो तुला, नि सांग, काय झालं?'

'सांगू?' म्हातारी एकेरीवर येऊन म्हणाली, 'त्या शेळक्याच्या पोरीला आडवलीस का?'

'म्या कवा आडवली तिला?' येताळ्या म्हणाला, 'तिनंच मला आडवलं.' असं म्हणून तो बेगुमान हसला. त्यानं म्हातारी अधिक चिडली.

'सारं गाव तुझ्या नावानं बोंब ठोकतंय!' म्हातारी कपाळावर मारून घेऊन म्हणाली. तसा येताळ्या म्हणाला,

'बोंबलू दे.'

खुंटीला लावलेली कुऱ्हाड पुन्हा हातात घेऊन येताळ्या ओरडला, 'हो, म्या आडीवली.'

'असं?' म्हातारी ठसकली, 'मग आत्ता त्ये शेळकं येऊन तुझा मुडदा पाडतील तवा?'

'येऊ दे त्येस्नी', येताळ्या पुन्हा ओरडला, 'एका सवंनं मारतो त्येस्नी. बियाला शेळका ठेवीत न्हाय. बीमोड करतो.'

'त्येंचं हात काय बांधल्याती?' म्हातारी गुरकली.

'मोकळं असू देत.' येताळ्या एका पायावर उभा राहून बोलू लागला, 'कचाकच मुंडकी तोडून जातो फासावर झुकत. तू बग तरी खरं.'

हे ऐकून म्हातारीला तिरीमिरी आली. तिच्या डोळ्यांपुढं होणारी मारामारी टाळण्याचा म्हातारी विचार करू लागली. तिला रक्तपात नको होता.

येताळ्याच्या दगडी मनावर अलीकडे शेळक्याच्या सजीने मोहिने घातली होती. तिच्या चालण्याने, बोलण्याने तो घायाळ होई. ती आपल्या निऱ्या टेपीत निघाली की त्याच्या काळजाला हबके बसत आणि तिच्या बेदरकारपणाचा त्याला राग येई. तिचं रूप, तारुण्य त्याच्या डोळ्यात सलू लागे. तिनं आपल्याकडं पाहावं, असं त्याला वाटे.

पण ती त्याच्याकडं मुळीच पाहत नव्हती. एखाद्या लांडुरीप्रमाणं ती डुलत जाई आणि येताळ्या वैतागे.

पुढे पुढे सजीचा ताठा त्याला असह्य झाला. एकदा तरी तिचे नाक खाली करायचे अशा ईर्षेने तो तिच्या डायी पडला. अगदी सावलीसारखा तिच्या मागावर फिरू लागला. एखाद्या बहिरी ससाण्यासारखा सूर मारण्यासाठी तो टपला होता. एकेरीवर आला होता.

परंतु सजीला त्याची कल्पनाच नव्हती. ती अप्रतिम स्वरूप व उन्मादक तारुण्य लाभल्यामुळे तिन्ही लोकांचे स्वामित्व प्राप्त झाल्यासारखी वागत होती.

काल दुपारी सजी एकटीच पांदीने नदीला निघाली होती. पांदीला चिटपाखरू नव्हते. निऱ्याचा घोळ डाव्या हातात आवरून एखाद्या फुलपाखराप्रमाणे ती चालत होती. पांदीच्या दोन्ही बाजूंच्या कुपावरील कुपात भुंगे गुणगुणत होते. एक कावळा चिमणीच्या मागे लागला होता. तो भसाड्या आवाजात ओरडला आणि सजी चमकून वर पाहू लागली.

इतक्यात येताळ्याने पांदीत उडी घेतली आणि हातात कुऱ्हाड धरून तिच्या आडवा झाला. त्या वेळी तो पिसाट झाला होता. त्याला पाहून रसरशीत सजी क्षणात कोमेजली, तिच्या तोंडचं पाणी पळालं. एखादी हरण सापळ्यात सापडावी तशी बावरली आणि शब्द तिच्या नाजूक ओठावर पांगुळले.

'बायकाच्या जातीनं लई ताठा करू नये.' येताळ्या भकास चेहरा करून म्हणाला.

'माझी पाठ सोड!' सजी स्वत:ला सावरून म्हणाली.

'न्हाय सोडणार!' येताळ्या खेकसला.

'मी ओरडंन!' तिने धमकी दिली.

'ओरड!' त्याने घोगऱ्या आवाजात म्हटले आणि पुढे झेप घेतली. ती अंग आवरून किंचित मागं सरकली आणि-

आणि उस्मान्या आत्तार आपल्या शेळ्यांचे खांड घेऊन पांदीने वर आला. त्याला पाहताच येताळ्या कुंपणावर उडी घेऊन बाजूच्या शेतात गेला.

सजीच्या कंठात आडलेला हंबरडा बाहेर पडला. लोक जमले. आरडाओरड शेळक्यांच्या आळीला गेली. आणि सर्व शेळके डिरक्या ठोकीत उठले. त्यांनी कुऱ्हाडीत दांडे ठोकले नि तलवारी घासल्या. आता येताळ्याचा मुडदा नक्की पडणार असं गाव बोलू लागला.

सूर्य मावळतीला फिरला आणि येताळ्या उठून बसला. त्यानं अंगाला आळोखपिळोखे देऊन जांभई दिली. आणि तो टाळू खाजवीत बसला. जवळ बसलेल्या म्हातारीने बोलणे सुरू केले. ती म्हणाली,

'येताळा, पंचीम जवळ आली. बयाला तरी आण जा की बिडास्न'.

'मग एवढी घाई का?' पुन्हा त्याने जांभई दिली.

'पंचीम आठ दिवसावर आलीय आणि तू भनीच्या घरी चार रोज ऱ्हाऊन ये जा!' म्हातारी म्हणाली.

आणि भुवया चढवून येताळ्या ठिस्कारला,

'छे छे, ऱ्हायाचं नाव काढू नगं.'

'तसं नव्हे!' म्हातारी सारवासारव करीत म्हणाली, 'बया तुझी वाट बघत असंल.'

मग येताळ्या म्हणाला,

'पायजे तर आता जाऊन सकाळी तिला घेऊन येतो. पर ऱ्हानार ऱ्हाय बरं.'

त्याने चेहरा गंभीर केला. आणि बिडाला जाण्याच्या तयारीला लागला. चूळ भरून नवा सदरा घालून कुऱ्हाड घासून येताळ्या बहिणीच्या गावाला निघाला.

येताळ्या बिडाला निघाला होता. शेळक्याची माणसं वाटंत गाठून मारतील, याची जाणीव असून तो हादरला नव्हता. उलट त्या प्रसंगाची तो आतुरतेनं वाट पाहत होता. आपण जगात अजिंक्य आहोत, मृत्यू आपल्यापुढं उभाच राहू शकत नाही, अशी अहंता छातीत घेऊनच तो चालत होता. त्याचे एकेक पाऊल ऐदानाप्रमाणं चिखलात पडत होतं. त्यामुळं त्याच्या पायाखालून सटकणारी चिखलाची चिपळी कासराभर दूर पळत होती.

नदीला जाणारी पांद चिखलाने भरली होती. वरचेवर पावसाची सर येऊन आणि वाटसरूंना तुडवून त्या चिखलाची घोटीव आंबील झाली होती. त्यातून दमदार पावलं टाकीत तो निघाला होता.

येताळ्या नदीवर आला, तेव्हा नाव उभी होती. त्या नावेत सहा स्त्रिया आणि चार पुरुष अशी दहा माणसं नाव सुटण्याची वाट पाहत बसली होती आणि त्या नावेचा भोई नाव खुंट्याला तांगडून दुरून येणाऱ्या वाटसरूंची वाट पाहत होता.

एवढ्यात येताळ्या नावेजवळ आला. प्रथम त्याने स्त्रियांच्या घोळक्याला पाहून चौकशी केली. त्यात किती तरुण आहेत, किती म्हाताऱ्या आहेत, याची काळजीपूर्वक पाहणी करून मग भोयाकडे नजर टाकली. त्या सहा स्त्रियांपैकी दोन पोरी अगदी तरुण होत्या. त्या प्रथमच नांदून प्रथमच माहेरी निघाल्या होत्या. त्यांचा हसरा स्वभाव, नटवेपणा वगैरे पाहून तो चेकाळला. त्याने दणकन नावेत उडी घेतली. नाव डगमगली. आणि आत बसलेली माणसं उलथीपालथी झाली. भोई खाली पडून पुन्हा उठून म्हणाला, 'ए, माणूस हायस काय रानगा?'

हे ऐकून येताळ्या खजील झाला. तो काहीही न बोलता एका कोपऱ्यात बसला. कोलमडून पडलेली माणसं त्याच्याकडं मारक्या नजरेनं पाहात नीट बसली. तोंडातल्या तोंडात पुटपुटली.

'नाव कवा सुटणार?' कुऱ्हाडीच्या दांड्याने नावेच्या फळीवर ताल धरीत येताळ्याने विचारले.

'का? लई घाई झालीया वाटतं?' भोई दरडावणीच्या स्वरात बोलला.

त्यावर येताळ्या काहीच बोलला नाही. हा हाडकुळा लंगोटी लावलेला म्हातारा आपणाला भीत कसा नाही, याचा तो विचार करू लागला. त्याला त्याचे नवल वाटले. मग त्याने हळूच त्या बायांच्या घोळक्यात पाहिलं. त्या वेळी त्या दोन पोरी त्याच्याकडे पाहत असलेल्या दिसल्या. त्यांच्या चेहऱ्यावर आश्चर्याचा भाव दिसत होता. येताळ्याची नजर त्यांच्याकडे वळताच त्या पोरींनी स्वतःच्या नजरा बेमालूम दुसरीकडे वळवल्या. ते पाहून येताळ्याला हायसे वाटले. तो त्या पुरुष मंडळींना म्हणाला,

'या की, तंबाखू खाया.'

'दात हायती का?' भोयाने टोला मारला आणि स्त्रियांकडच्या बाजूला हास्याची लाट उसळली.

येताळ्या हिरमुसला, पण लगेच गंभीर झाला. त्याच्या चेहऱ्यावर रागाची छटा तरळली. त्याबरोबर भोयाने आपल्या बोलण्याचे सुकाणू वळवून बोलण्याचा रोख बदलला. तो पुन्हा म्हणाला, 'दात कुस्तीत पडलं वाटतं?'

मग मात्र येताळ्या शांत झाला. त्याचा राग पुन्हा एकदम मावळला. त्याने होकारार्थी मान डोलावली. परंतु 'तू माणूस हायस का रानगा?' हे भोयाचे शब्द त्याच्या डोकीत वळवळत होते.

सूर्य मावळतीला पोचला होता. त्याची किरणं कृष्णा नदीच्या विशाल पाण्यावर सरपटत होती. ती शांत कृष्णा आज भलतीच उग्र झाल्यामुळं हत्तीएवढ्या लाटा उधळीत होती. जणू ते महाराष्ट्राचे पाणी दक्षिण हिंदुस्थानात पोचण्यासाठी विद्युतगतीने धावत होते. सर्व चैतन्य एकत्र येऊन ते नाचत असल्याचा भास होत होता. त्या पाण्यावर दृष्टी ठरत नव्हती. चपळता यापुढे लुळी झाली होती. त्या प्रचंड दराऱ्याने नाव डगमगत होती. आत बसलेल्या जिवांची काळजं लुकलुकत होती. 'कृष्णाबाई, आम्हाला सुखरूप पोचव' असं ती मनात म्हणत होती. आर्जवीत होती.

भोयाने नाव सोडण्यासाठी नावेचा सौंदर सोडून तो उठला. तोच एक सापवाला आपल्या दहा वर्षाच्या मुलीच्या डोकीवर सापांचे पेटारे देऊन स्वतः खांद्यावर कावड घेऊन धावतच आला. भोयाने त्याचे सामान व त्याला नावेत घेऊन नावेचा समतोल रहाण्यासाठी सर्व स्त्रिया एका टोकावर बसवून आणि सर्व पुरुष मंडळी दुसऱ्या टोकावर बसवून समतोलाची तरतूद केली आणि देवाचे नाव घेऊन नाव लोटली. नाव झर्झर तरंगत निघाली.

भोई नाव हाकू लागला. त्याने पाण्याचा ओढ पाहून आपल्या नावेला गती दिली. त्या बलशाली पाण्याला चकवीत, लाटांचा छेद करीत तेरा माणसांचे प्राण स्वतःच्या मुठीत घेऊन तो निघाला. महापुराशी त्याने एक प्रकारचे युद्धच आरंभले होते. तो लढत

होता. त्याची नजर पुढे होती. कुठे भोवरा आहे, कुठं पाणी आहे, कुठं गाळ आहे याची त्याला माहिती होती. मुख्य धारेचा छेद अजून पुढे होता. तो काटीत असता त्याला दोन मैल खाली भटकत जावं लागणार होतं. म्हणून तो शिकस्त करीत होता. त्याचे सर्व लक्ष धारेकडे होते.

परंतु येताळ्याचे लक्ष सापवाल्याच्या त्या पेटाऱ्यांकडे होते. तो त्या पेटाऱ्यांकडे टक लावून पाहत होता. सापवाला चिलीमभर तंबाकू ओढीत होता. बाकी मंडळी गप्पा मारून करमणूक करून घेत होती. त्या दोन पोरी कुजबुजून हासत होत्या.

सापांचे सर्व पेटारे येताळ्याच्या पुढ्यातच रचले होते. त्याच्या समोर तो सापवाला बसला होता. आणि त्याची पोरगी त्याच्या मांडीवर डोके ठेवून निजली होती.

सापांचे पेटारे आणि त्या पोरी यांच्यामध्ये येताळ्याची नजर धडपडत होती. पुष्कळ विचारांती त्याला एक कल्पना सुचली.

'ह्यात कसला साप हाय गा?' येताळ्याने विचारले.

आणि तंबाखूचा धूर सोडीत डोळे वटारून भुवया चढवून सापवाला म्हणाला, 'अस्सल नाग हाय त्यात.'

नाग म्हणताच त्या दोन पोरींनी माना उंचावल्या व बावरून येताळ्याच्या रोखाने त्या पाहू लागल्या. त्यामुळे येताळ्याला अधिकच चेव आला. तो हुरळून म्हणाला, 'मग काढ की वाईच!'

'छे राव, नवं जनावर हाय त्ये!' सापवाला पसरट चेहरा करून म्हणाला, 'सैतान हाय त्यो नाग. काल दोनदा मला चावला.'

'आरं मग बघू वाईच. दाखीव लांबनं.' येताळ्या गळ घालीत म्हणाला.

'न्हाय रं बाबा, उगीच गप्प बस!' सापवाल्याने डोळे वटारले आणि दम दिला.

परंतु बायकांच्या घोळक्यात नागोबा पाहण्याची भलतीच उत्सुकता वाढली. पदरांची चाळवाचाळव झाली. बुरख्यातून डोळे गिरक्या घेऊ लागले. त्या दोन पोरींनी येताळ्याकडे सारखी नजर लावली. त्यामुळे त्याने त्या सापवाल्याकडे भलताच तगादा लावला. पुरुष मंडळींनीही मूक संमती दिली. सापवाला 'नाही' म्हणत होता, येताळ्या 'दाखव' म्हणत होता. त्या दोघांची हुज्जत लागली होती. भोई ऐकत होता. शेवटी त्याने 'गप्प बसा' असा इशारा दिला.

त्या वेळी मुख्य धारेचा छेद सुरू होत होता. भोयाला घाम फुटत होता. कारण निर्वाणीचा प्रसंग अगदी जवळ येऊन ठेपला होता. नावेची ससेहोलपट व्हायचा क्षण समीप आला.

परंतु साप पाहण्याची येताळ्याची आतुरता वाढली होती. सापवाला आपले ऐकत नाही म्हणून त्याला राग आला होता. नाव कुठं आहे याकडे लक्षं नव्हतं. एकाएकी

त्याला एक युक्ती सुचली. त्याने सापवाल्याची नजर चुकवून आपल्या कुऱ्हाडीचा दांडा एका पेटाऱ्याच्या वरच्या ढाकणाला लावला आणि एकदम खसकून ते ढाकण उचकटले. त्याबरोबर एक प्रचंड नाग फणफणून फणा काढून क्षणात शेपटीच्या अणीवर उभा राहिला. त्याने पहिला हल्ला त्या सापवाल्यावरच केला. परंतु चपळाईने स्वत:ला मागे लोटून त्याने तो वार चुकवला. त्या नागाचा विक्राळ फणा पाहून येताळ्याची बोबडीच वळली आणि तो पाठीवर कलंडला. लगेच स्वत:ला सावरून सापवाल्याने पुन्हा त्या नागावर झडप घातली. परंतु तो चपळ नाग विजेप्रमाणे सळकन निसटला. एखाद्या तलवारीच्या पात्याप्रमाणे लखलखत तो त्या स्त्रियांकडच्या बाजूला धावला.

क्षणात नावेवर हाहाकार झाला. बायांनी एक ओरड आरंभली. नावेत गोंधळ सुरू झाला. जो तो 'नाग, नाग' करून ओरडू लागला आणि जीव वाचविण्यासाठी धडपडू लागला. साप आपल्याकडे येत असलेला पाहताच सर्व बाया ज्या टोकावर पुरुष मंडळी होती तिकडे धावल्या.

एका क्षणात नावेचा समतोल नष्ट झाला. मृत्यूशी उशीर झुंजणारा तो भोई कस्पटाप्रमाणे दूर फेकला गेला आणि नाव कलंडली. गर्रकन फिरून उपडी झाली. एखाद्या पाटीखाली कोंबडी डाळावी तद्वत ती तेरा माणसं डाळली गेली - क्षणभरच त्यांनी जगण्यासाठी शेवटची धडपड केली. एकच किंकाळी फोडली आणि मृत्यूनं त्यांना आपल्या पोटात गडप केले! त्यांचा मागमूस नाहीसा केला! येताळ्याचा तो राक्षसी देह पुन्हा कोणालाच दिसला नाही.

दुसऱ्या दिवशी मृतांचे नातलग नदीवर येऊन आक्रोश करू लागले. त्यात येताळ्याची आई ऊर बडवीत ओरडली, 'माझा हिरा हरपला.'

हे ऐकून भोयाला संताप आला. तो अगतिक होऊन त्या म्हातारीपुढं जाऊन मोठ्यानं ओरडला, 'हिरा नव्हता त्यो, रानगा व्हता. त्येनं बारा माणसांचा जीव घेतला आणि आपला तेरावा दिला.'

— असं म्हणून तो थुंकला आणि वैतागून चालू लागला.



# राम-रावण युद्ध

सटवं-मुरारी वाद त्या खोऱ्यात प्रख्यात होता. एखादे दिवशी कुंडलवाडी त्या वादात कटून मरणार, असं कित्येकांनी भाकीत करून ठेवलं होतं आणि ते खरं ठरायची वेळ समीप येत होती.

आडवेतिडवे बोळ, काही गल्ल्या. एक टीचभर पेठ, एक पडकी चावडी, एक देऊळ, तिथंच शाळा, अशा थाटात ती कुंडलवाडी ऐन नदीकाठावर आज वर्षानुवर्षे संसार करीत होती. परंतु अलीकडे सटवाजी नि मुरारी या दोन नावांत तिची संपूर्ण फाळणी झाली होती. परंतु वैरानं त्या दोघांची नावं एकत्र आली होती. सटवं-मुरारी ही दोन नावं सारखी गाजत होती.

दोघेही मातब्बर होते. तसे बलिष्ठही होते. तापट, हेकट म्हणून त्यांची ख्याती. घरी अमाप जमीन, बारा बैलांची दावण, टोलेजंग वाडे आणि तसाच जबरी अहंकार! या सर्व दृष्टीनं ते एकमेकाला मुळीच कमी नव्हते. अगदी ताजव्यात घालून द्यावेत.

कुंडलवाडीचा देव वाकुबा भलता खारीस्त देव म्हणून मानला जात होता. जरी त्याचं नाव वाकुबा होतं तरी तो रंगेल होता. त्याची जत्रा रंगाचे गाडे काढून भरवली जात असे. तीही ऐन धुळवडी दिवशी. त्या दिवशी रंगाचे हांडे, काईली करून नि गाडीत घालून त्या गाड्या देवाला जात. त्या दिवशी लहानथोर, बायका-मुलं सारी रंगात बुडून निघत. इतका रंग फेकला जाई की घर न् गल्ल्या रंगून जात. अशाच एका जत्रेला बारा वर्षांपूर्वी सटवाजी आणि मुरारी यांचं ते भयंकर वैर उद्‌भवलं होतं.

तो धुळवडीचा दिवस होता. माणसांनी गाव गजबजला होता. परगावची माणसं आली होती. रंगाचे गाडे गेले की, तमाशा उभा राहणार होता. म्हणून सर्व माणसं आतुर झाली होती. तमासगीर येऊन दाखल झाले. बारा बलुती सारखी धावत होती.

सूर्य वरती फिरला आणि देवळात किशा गुरवानं शिंगाची ललकारी ठोकली.

रंगाचे गाडे निघाले. ज्यांच्याजवळ गाडी नव्हती त्यांनी रंगाच्या घागरी डोकीवर घेऊन देवळाची वाट धरली, तर कुणी तांब्यात रंग घेऊन वाकुबाला वाहिला.

सटवाजी नि मुरारी यांनी मांदणं भरून ती गाडीत ठेवली होती. पुढे बारा बारा बैल जुंपले होते. बैलांना तोडे घालून सजवले होते. झुला घातल्या होत्या आणि सापतीच्या खिळेऐवजी बरचे उभे केले होते. कुंडलवाडीची खरी जत्रा त्या दोन मातब्बरांच्या हाती होती.

ते दोघेही धुंद झाले होते. हातात कुऱ्हाडी घेऊन गाड्या हाकीत होते. आणि त्यांच्या

आळीची तरुण पोरं त्यांची पाठ राखीत होती. बेंबीच्या देठापासून एका सुरात ती ओरडत होती, 'वाकूबाच्या नावं चांऽग भलाऽऽऽ'

सर्वत्र हल्लकल्लोळ उसळला होता. मुरारीचा गाडा निघाला होता. मोक्या मांग घोटून दाढी करून, ऐटबाज पटका बांधून पुढं हालगी वाजवत होता. उस्मान आत्ताराचा ताशा भलताच चढला होता. आत्तार टिपऱ्याबरोबर मुंडकं डोलवत रंगात आला होता - त्याचा मधला मुलगा नरसू कुंथून ढोलकं बडवत होता. पण मोक्या मांगाच्या हालगूनं घात केला! हालगीच्या गोंधळात नरशाचं लक्ष उडून ढोलक्याचा ठयका चुकला! ताशा न् ढोलकं दोन वाटानं निघालं; तसा आत्तार भडकला! त्यानं फट्‌कन टिपरू नरशाच्या डोक्यात हाणलं नि नरशानं भोंगा पसरला. त्यात मुरारी ओरडला, 'वाकुबाच्या नावं चांगऽभलाऽ...'

वाकुबाची सेवा मनापासून घडावी म्हणून प्रत्येक माणूस जीव तोडीत होता. कसूर होत नव्हती. मुरारीचा गाडा वाकुबापुढं पोहोचला. तेव्हा त्याच्या आधीच सटवाजीचा गाडा देवाला रंग वाहून परतला होता. देवळापासून लोक रंग खेळू लागले होते, रंगाचे पाट वहात होते.

तो सारा प्रकार पाहून मुरारीचं डोकं फिरलं. त्यानं उडी मारून गुरवाला ओढीत बाहेर आणून सवाल केला,

'माझा पहिला मान असून तो त्या सटव्याला कसा दिलास; बोल?' त्यानं 'बोल' या शब्दावर जोर दिला आणि गुरव म्हणाला, 'ऐका, ज्यो आदी यील त्यो देवाला रंग घालून जातो, ही वहिवाट हाय! तुम्ही उशीर केला, त्येला म्या काय करावं? म्होरला गाडा लवकर आणा!'

गुरवानं वहिवाट सांगताच मुरारी बिथरला. त्यानं गुरवाच्या कानशिलात खाडकन चपराक वाजवली आणि अब्रूदार गुरवानं प्रचंड बोंब ठोकली. त्याच्या बोंबेने गाव दणाणला. आनंदानं रंग खेळणारी माणसं धावली. म्हणाली, 'आगा, काय झालं?' परंतु गुरव बोलला नाही, तो आपला दोन्ही हातानं तालबद्ध बोंबलत राहिला.

मग लोकांना त्या बोंबेचं कारण समजलं. 'सटवाजीला पहिला मान दिला म्हणून गरीब गुरवाला मुसळ्यानं मारलं. वंगाळ झालं.' असं म्हणत लोक पांगले. परंतु ती बातमी ऐकून सटवाजी खवळून उठला. आपल्यासाठी गुरवाला मार मिळाला, ही गोष्ट त्याला झोंबली. नि त्यानं कुऱ्हाड घेतली. सारे ठोमरे तयार झाले. सटवाजी तर वाघासारखा झेपा घेत देवळाकडं निघाला. ठोमऱ्याच्या हत्यारी माणसांनी गल्ली भरली.

ठोमरे कलागतीला येत आहेत ही बातमी वाऱ्यासारखी पसरली, तसे मुसळे बिथरले. मुरारी बरचा घेऊन सडकेत आला. तो झुंजेच्या बैलाप्रमाणे डिरक्या काढीत होता. आणि त्याची पाठबळ जिवावर उदार होऊन मैदानात आली होती. थोड्याच वेळात मुसळे नि ठोमरे यात गावाची विभागणी झाली आणि दोन फळ्या समोरासमोर उभ्या झाल्या. गोफणी

जोडून माणसांनी दगडाच्या ओट्या बांधल्या. हत्यारे लखलखू लागली. बंदुका लोड झाल्या.

त्या प्रसंगानं कुंडलवाडी थरारली होती. बायकापोरं भेदरली होती. आयांनी मुलं घरात कोंडली होती आणि म्हातारी माणसं हवालदिल होऊन, 'आता काय होणार?' याची वाट पाहत होती. या दोन प्रबळ फळ्या रोखून धरण्याचं सामर्थ्य कुणातही नव्हतं.

परंतु बंदोबस्तासाठी फौजदार आला होता. तो पुढं आला. त्यानं शिपाई तयार करून त्या दोन तटांच्यामध्ये आपली फौज उभी केली. बंदुका रोखल्या नि ठोमरे-मुसळे यांनी कत्तल रोखून धरली. फौजदार निर्भान होऊन ओरडला, 'पुढं सरकू नका! नाही तर गोळ्या घालीन!'

फौजदाराच्या डिरकीनं ठोमरे-मुसळे नरम झाले.

परगावची माणसं घाबरून पळत होती. जो तो दिसेल त्या वाटेनं पळत होता. काखेत पागोटं दाबून म्हणत होता, 'लेका, पळा, न्हायतर गव्हासंग किडा रगडंल.' रानोमाळ माणसं सैरावैरा पळत होती. अन् कुंडलवाडी ओस पडत होती.

फौजदारानं दरडावणी देताच ठोमरे-मुसळे यांनी माघार घेतली. आपापल्या मनात वैराची गाठ बांधून ते घरोघर गेले.

सूर्य मावळला नि कुंडलवाडी रात्रीनं आपल्या पोटात घेतली. परंतु राखेतील निखाऱ्याप्रमाणे ती माणसं धगधगत होती. एकमेकांवर कढत होती.

आठ दिवस तसेच लोटले आणि नवव्या दिवशी 'जोपर्यंत सटवं-मुरारी वाद मिटत नाही, तोपर्यंत कुंडलवाडीची जत्रा बंद' असा हुकूम चावडीच्या खांबाला चिकटविण्यात आला. त्या हुकमानं सारी कुंडलवाडी हळहळली, 'गेली, जत्रा गेली, अब्रू गेली आणि कुंडलवाडीची इभ्रत गेली!' असं लोक म्हणू लागले. 'ही कुंडलवाडीच हुबलाक हाय. त्येस्नी अक्कलच न्हाय.' सर्व कुंडलवाडीची छीः थूः झाली. अन् सर्व खोऱ्याची खात्री झाली की, एखादे दिवशी कुंडलवाडी पेटणार आणि सारी जणं कटून मरणार.

दिवस जाऊ लागले. महिने गेले. वर्षे लोटली. तब्बल वीस वर्षे येऊन गेली. वीस वेळा शिमग्याचा सण आला. वीस धुळवडी झाल्या. परंतु कुंडलवाडीत जत्रा भरली नाही. कुंडलवाडीच्या जीवनातील रंगच उडाला. माणसं रंजीस झाली.

परंतु सटवं-मुरारीचा पीळ कायम होता. ते आपापल्या पांढऱ्या मिश्या पिरगाळीत होते. फुणग्या टाकून, फुंक मारून वैराची आग फुलवत होते. ठोमरा खाकरला की मुसळा बिथरत होता. नि मुसळा खोकला की ठोमरा पेटत होता.

पण गावची जत्रा मोडली याचं साऱ्यांनाच वैषम्य वाटत होतं. तडजोडीची भाषा उठत होती. परंतु मानाचा प्रश्न आड येत होता. प्रथम मान कुणाचा?

काही शहाणी माणसं, परगावचे पाहुणे यांनी तडजोडीचा प्रयत्न सुरू केला. ठोमरे-

मुसळे यांनी एकाच वेळी गाडे घेऊन देवळात यावे आणि एकाच वेळी देवाच्या टाळूवर रंग ओतावा तशी तडजोड पुढं आली.. आणि ती एकदम सर्वांनी मान्य केली. सटवं-मुरारी या म्हाताऱ्यांनी संमती दिली. आणि कुंडलवाडीला आनंद झाला. कटुता जाऊन माणसं आनंदीत झाली. वातावरण हर्षोन्मादानं भारलं गेलं. आनंदी आनंदाच्या ऊर्मी उसळू लागल्या.

यंदा जत्रा भरवायचं निश्चित झालं. तमाशाचा विचार झाला. परंतु तमाशाऐवजी गावच्या मंडळीनी नाटक बसवावं असं मत पुढं आलं. तेही मान्य झालं. 'राम-रावण युद्ध' हे नाटक निवडलं. परंतु पुन्हा वाद पैदा झाला. राम कोणत्या आळीचा? आणि रावण कुणी व्हायचं?' 'आपण राम होणार' असा दोन्ही फळ्यांनी आग्रह धरला. मुसळ्यांनी रावण व्हायला साफ नकार दिला. पुन्हा वैमनस्य उत्पन्न झालं. लोक पुन्हा विचारात पडले.

पुन्हा शहाणी माणसं बसली. विचार केला आणि यंदा ठोमऱ्यांनी रावण नि त्याच्या राक्षसांची पात्र करावीत व पुढच्या वर्षी मुसळ्यांनी तीच कामं करावीत, असं ठरलं. ते ठोमऱ्यांनी मंजूर केलं. एका वर्षासाठी दानव व्हायला ते तयार झाले.

जत्रेची तयारी नाटकाच्या तालमी, यात गाव गढून गेला. वैर विसरलं, वर्गणी भरपूर जमली. नाटकासाठी भरजरी पोशाख तयार करण्यात आला. दोन्ही फळीची तरणी पोरं नाटकासाठी झटू लागली. संवाद घोकू लागली.

फाल्गुन महिना आला नि ऊन रखरखू लागलं. कुंडलवाडीच्या लोकांनी जमिनीची मेहनत करून ते मोकळे झाले होते, आपल्या गावची जत्रा भरणार म्हणून ते हरखले होते. आईबापानी नांदायला गेलेल्या आपल्या मुलींना आणण्यासाठी मुराळी पाठवले होते. कुंडलवाडीची जत्रा दिवसादिवसानं पुढं येत होती. आणि माणसं हर्षभरित होऊन जत्रेची वाट पाहत होती.

'वाकुबाच्या जत्रेत 'राम-रावण युद्ध' होणार, सर्वांनी कुंडलवाडीला यावे', अशी जाहिरात फिरली होती. गावगन्ना पत्रके पाठवली होती. आणि सारा खोरा त्या जत्रेची वाट पाहत होता. तमाशाऐवजी नाटक, नवा पायंडा पडणार होता.

शिमगा आला. होळीला पोळी बांधून पाटलानं बोंब ठोकली. मग सर्वत्र बोंब उठली नि दुसऱ्या दिवशी कुंडलवाडीची जत्रा भरली. कुंडलवाडीनं आनंदाचा दिवस पाहिला.

वीस वर्षांच्या दीर्घ मुदतीनं ती जत्रा भरली होती. गाव आनंदात बुडाला होता. वाकुबाच्या देवळात नारळाचा ढीग लागला होता. पोरंबाळं नाचत होती, 'वाकुबाच्या नावं चांऽऽग भलाऽऽ' या आरोळ्यांनी गाव दणकत होता. नांदून आलेल्या लेकी दागिन्यानं नटून सजून देवाला जात होत्या. दूरदूरचे पाहुणे येऊन दाखल झाले होते. रंगीबेरंगी पागुटी गल्लीनं फिरत होती. अन् त्या प्रत्येक माणसाच्या जिव्हेवर नाटक खेळत होतं.

सटवाजी ठोमऱ्यांचा मुलगा राऊबा हा ताकदवान होता. तो रावणाचं काम करणार होता. आणि मुरारी मुसळ्याचा राम ज्याला रामाचं काम दिलं होतं. त्या दिवशी सटवं-मुरारी यांच्या पायांना विसावा नव्हता. ते दोघे सारखे चरफडत होते. सटवाजी आपल्या मुलाला दरडावून म्हणत होता, 'लेका राव्या, सांजला नाटक कसं गाजलं पायजी! दणकेबाज काम कर! माझं नाव बद्दू करू नगं; साऱ्या ठोमऱ्यांस्नी माझी ताकीद हाय, ईर्षेनं मरा आणि ईर्षेनं जगा!'

आणि अस्वस्थ झालेला मुरारी मुसळा आपल्या पोराला आपली पल्लेदार मिशी दाखवीत म्हणाला,

'लेका रामज्या, जाम झालं पायजी! रात्री नाटकात काम कसं सोळा आणं कर, न्हायतर लाथ घालीन!'

असा रामज्याला दम भरून मुरारी गणू मुसळ्याच्या घरी गेला. गणूचा बाजीराव हा पहिलवान होता. म्हणून त्याला मारुतीचं काम मिळालं होतं. मुरारी बाजीरावापुढं बसून स्वत:ची मिशी पिळगटीत म्हणाला,

'बाज्या, लेका सांजंला रावणाची लंका जाळलीच पायजी. न्हाय तर जोड्यानं मारीन!'

मुरारी नि सटवाजी यांनी आपआपल्या आळीची पोरं चेतवली होती. ती ईर्षेनं भरली होती.

'हजारो लोक येणार, त्यांच्यापुढं नाचक्की करून घेऊ नका', असं सटवं मुरारीनं त्यांना सांगितलं होतं म्हणून दोन्हीकडची पोरं बेभान झाली होती. आम्ही मुसळ्यावर मात करणार असं ठोमऱ्यांना वाटत होतं. तर आम्ही ठोमऱ्यांना गारद करू असं मुसळ्यांना वाटत होतं.

सटवं-मुरारीनं ठिणग्या टाकून आग धुमसत ठेवली.

रंगाचे गाडे परत फिरले. लोकांनी पुरणपोळ्यांची जेवणं आटोपून नाटकाला, वाकुबाच्या देवळाची वाट धरली.

देवळासमोरचा चौक आरास करून सजवला होता. चुरमुरी कागदांची तोरणं भिरभिरत होती. केळीचे खुंट उभे करून कमानी केल्या होत्या. देवळाला लागून एक रंगमंच उभारला होता. पेट्रोमॅक्सच्या बत्त्यांचा झगमगाट झाला होता. ऑरगनचे स्वर वातावरणात कंप निर्माण करीत होते. नाटकाची रंगत वाढत होती. अन् लोकही तरंगत होते.

गावची व परगावची हजारो माणसं डोळ्यात प्राण आणून नाटक पाहत होती. भरजरी पोषाख, रंगीत मुखवटे, राम-लक्ष्मण, सीता-रावण यांना पाहून ती दिपली होती. भाविकांची मनं उचंबळून त्यांना नमस्कार करीत होती. मारुतीला पाहून पहिलवान मंडळी संतुष्ट झाली होती. त्याची चपळ हालचाल बघून ते टाळ्या पिटत होते. बाया सीतेला डोळे भरून पाहत होत्या. कुंडलवाडीत वाल्मीकी-रामायण साकार झालं होतं. अनंत

नेत्र नाटकाचा रस पिऊन धुंद झाले होते.

हूं का चूं आवाज होत नव्हता. सटवाजी आणि मुरारी अगदी पुढं बसले होते. त्या दोघांची इभ्रत त्या रंगमंचावर इरेला पडली होती. ती सलामत कशी राहील याचाच ते विचार करीत होते. ते सुतकी चेहरा करून बसले होते. त्यांना त्या नाटकात राम दिसत नव्हता, तर आपली ईर्षा, आपलं वैर दिसत होतं.

सर्व मुसळे नि ठोमरे भान हरपून नाटक पाहत होते. त्यांनी आपापली हत्यारं उभी धरली होती. कुऱ्हाडीवर पेट्रोमॅक्सचा प्रकाश टक्करत होता.

कुंडलवाडीत काहीतरी विपरीत घडणार म्हणून फौजदार मोठी पलटण घेऊन आला होता. जागोजाग बंदुका घेऊन पोलीस उभे होते. सर्वत्र कडेकोट बंदोबस्त होता.

आणि नाटक पुढं सरकत होतं. मुसळ्यांची सीता रावणानं पळविताच ठोमऱ्यांनी आपली पागुटी हवेत भिरकावून आरोळी ठोकली,

'वाकुबाच्या नावं चांऽऽग भलाऽऽऽ....'

मग बाजीराव मारुती होऊन लंकेत गेला, सीतेचा शोध लावून लंका जाळून परतला. तेव्हा सर्व मुसळे ताडकन उठले. त्यांनी 'वाकुबाच्या नावं चांऽऽग भलाऽऽ' करून वातावरण दणादणून टाकलं. आकाशाला हादरा बसला.

मग राम लंकेवर निघाला. पुढं अंगद पाठवला. रावणापुढं ऐटीत बसून तो कुंडलवाडीचा अंगद बोलू लागला,

'लेका रावणा, आमची सीता गुमान देऊन मोकळा हो, न्हाय तर मरशील. माझं ऐक, ईनाकारण मरू नगं! सीता सोड, न्हायतर आमचा रामज्या, न्हवं राम, येऊन तुझा मुडदाच पाडील! मग फुकट मरशील.'

हे ऐकून तर मुसळे तरकटले. परंतु भरजरी पोषाख करून रावणाचा मुखवटा घातलेला रावण म्हणाला,

'ए लेका वांडरा, तुझा बाप कोण? त्यो वाली का त्यो सुग्रीव हे आदी सांग नि मग लढाईची बात कर. मी सीता देणार न्हाय. ये म्हणावं त्या रामाला.'

'तुझं मरान जवळ येत चाललंय.' अंगद म्हणाला, 'अन् माझा बाप कोण हे तुला ठावं न्हाय? माझ्या बापानं तुला पकडून माझ्या पाळण्यावर उलटा टांगला व्हता आणि मुतानं तुझं त्वांड भिजत व्हतं, ह्येची आठवण कर.'

'आरं जा, दळभद्र्या!' रावण म्हणाला, 'तुझ्या बापाला मारून तुझी आई सुग्रीवाला ज्या रामानं दिली, त्येची बाजू घेऊन मला शानपान सांगतोस काय? नालायक?'

लाह्या फुटाव्यात तसे शब्द बाहेर पडत होते. आणि तेही अगदी बेंबीच्या देठापासून. प्रत्येक पात्राचे पोटातील वैर ओठावर आले होते. रामायणाचा आडोसा घेऊन ते सर्व एकमेकाला ओरबाडत होते. सर्वच बिथरले होते.

पुढे बसलेले लोक तल्लीन झाले होते. त्यांना त्या नाटकात कृत्रिमता मुळीच वाटत नव्हती. प्रत्येक माणूस उरात अपार ईर्षा घेऊन आपले काम करीत होता. त्यांनी रामायण तिथे जिवंत केले होते. राम-रावण निखाऱ्याप्रमाणे फुलले होते.

शेवटचा अंक सुरू झाला. राम आपली सेना घेऊन लंकेवर स्वारी करावयास निघाला. तेव्हा पुढे बसलेल्या मुसळ्यांनी आणि ठोमऱ्यांनी निःश्वास रोखून धरले. स्टेजवर हत्यारे चमकू लागली. तसा सटवाजी कावराबावरा झाला.

आणि मुरारी आपली मिशी कुरवाळू लागला. खाकरून म्हणला, 'भले बहाद्दरानू.'

रामाची सेना स्टेजवर येऊन जाताच रावणाची सेना आली. तेव्हा ठोमरे हरकले. सटवाजीचा चेहरा पसरला. तो गालात हसला. निर्भान झालेला राऊजी पाहून त्याचं काळीज डोंगराएवढं झालं. तो मनात म्हणाला, 'राम घमेंडीत असंल, पण माझा रावणही काही कमी नाही.'

परंतु फौजदार विचारमग्न झाला होता. काठ्या, कुऱ्हाडी, बरचे घेतलेले हे लोक लढाई कशी करणार? का लढाईच करणार नाहीत असे मनात म्हणून तो सरळ पाहू लागला. पोलीस बेसावध होऊन नाटकात दंगले.

दोन्हीकडची सेना येऊन गेल्यावर राम-रावण यांची प्रचंड सेना सुवेळा चळावर उतरल्या असून, त्या समोरासमोर तळ देऊन बसल्या आहेत; असा आभास निर्माण झाला. आता लढाई होणार म्हणून प्रेक्षक मुग्धगंभीर झाले.

पडदा वर गेला आणि युद्धकांडाला प्रारंभ झाला. दोन्हीकडची सेना रणधुमाळीला येऊन लढू लागली. अगदी दातओठ चावून एकमेकांना दणके देऊ लागली. लढाई सुरू झाली.

त्या वेळी तो प्रदेश शांत होता. अगदी निर्जीव भासत होता. आणि कुंडलवाडीत युद्धकांडाला प्रारंभ झाला होता. प्रेक्षक अवधान रोखून बसले होते. सर्व नजरा त्या रंगभूमीवर केंद्रित झाल्या होत्या. त्या हजारो डोळ्यांसमोर त्या रंगभूमीला रणभूमीचे स्वरूप प्राप्त झाले होते. दोन्हीकडची पोरं तडफदार खेळत होती. लढाई हातघाईवर येत होती.

समोर बसलेले ठोमरे-मुसळे मध्ये ओरडत - 'हाणा' आणि पुन्हा सारं शांत होई. मुसळे 'हाणा' असं ओरडले की, मग ठोमरे ओरडून म्हणत, 'मारा.' त्यांच्यापुढे धुमश्चक्री चालू झाली होती. कुंडलवाडीची माणसं जीवनातील युद्ध त्या रंगभूमीवर खेळत होती.

मारुती नाचत आला. त्यानं खाडकन् शड्डू मारला. कचकन् बैठक काढली. तोच रावणाकडचा एक राक्षस आला. दोघांची हातमिठी झाली, पण मारुती पटात पडून त्याच्या पाठीवर गेला आणि तो राक्षस डोकीवर घेऊन खाली दणकला. तसा टाळ्यांचा गजर झाला. मुसळ्यांनी पागुटी उडवली नि एकच आरोळी ठोकली, 'भलं मारुत्या.'

आणि ठोमरे चिडले. त्यांना नाकं फेंदारली. त्या राक्षसाचा पराभव त्यांना बोचला.

ते मारुतीला दणका बसण्याची वाट पाहू लागले. मारुतीनं आपटलेला तो राक्षस लंगडत लंगडत परत गेला आणि दुसरा आला. पण मारुतीनं त्यालाही चेलमडून आपले नाव सार्थ केले.

मग चार राक्षस जुटीने आले. अगदी मारुतीचेच भुस्कट पाडायच्या इराद्याने आले; परंतु मारुतीनं धोका ओळखून माघार घेतली. मारुती पळून गेला आणि ठोमऱ्यांनी टाळ्यांचा गजर केला.

तेव्हा मुसळे चरफडले. मारुतीचं पळणं त्यांना पसंत पडलं नाही. त्यांनी मारुतीला दोष दिला, 'हाट् लेका बाज्या–' कुणीतरी डिरकलं. मैदानात आलेले चार राक्षस रामसेनेची वाट पाहू लागले.

प्रथम राम-रावण यांची डोकी तापली. तसं वातावरण तापत गेलं. मग सटवं-मुरारीची डोकी तापली. आणि थोड्याच वेळात साऱ्या कुंडलवाडीचं डोकं तापून राम-रावण युद्ध वाढीला लागलं. त्याचा डोलारा डगमगू लागला.

तिथं लढाईला तोंड लागलं होतं. दोन्हीकडचे वीर चेव चढून एकमेकाला मारीत होते. लढत होते. कसं मरावं आणि किती मारावं; याचा कोणी विचारच करीत नव्हतं. डोळे झाकून झपाटा दिला जात होता. तसाच दुसरा दणका देऊन त्याचा सूड घेत होता. आणि त्या दुसऱ्याला तिसरा बडवत होता. सर्वत्र हाहाकार उसळला होता. आदळआपट वाढत होती.

ती घनघोर लढाई पाहून प्रेक्षक खूष झाले होते, अगदी देहभान विसरून नाटक पाहत होते. टाळ्या पिटत होते. 'वाकुबाच्या नावं चांगऽभला' ही गर्जना आकाशाला भिडत होती. आणि पुन्हा गपकन सारं शांत होतं. वातावरण हिंदकळत होतं.

रंगभूमीवरील राम-रावण यांच्या जयापजयाचं सटवं-मुरारी यांना सारखे धक्के बसत हते. तर फौजदार भयंकर विचारात पडला होता. हे नाटकातील कृत्रिम युद्ध की खरोखरीची हाणामारी याचा त्याला उलगडा होत नव्हता. त्याने पुष्कळ नाटके पाहिली होती. पण आजचे हे नाटक तो प्रथमच पाहत हता. आणि हे नाटक असून हे लोक खरोखरीचे लढत आहेत असं त्याला वाटत होतं. पण काहीच करता येत नव्हतं.

ईर्षा शिगेला पोचली होती. रामकालीन पोषाख केलेली ती माणसं रामायण मुरगळत होती. रामायणबरहुकूम तिथं काहीच घडत नव्हतं आणि जे घडत होतं ते उलट घडत होतं. ठरावीक वेळी मरणारे राक्षस मरतच नव्हते, की कुणीही पराभव पत्करीत नव्हता. उलट रामसैन्यात दारुण प्रसंग येत होता. रामायणाचं सूत्र सुटून ते विस्कटलं गेलं होतं. परंतु पुढे बसलेल्या प्रेक्षकांपैकी कुणालाच ते कळत नव्हते. रामसेनेची बंभेरी उडत होती. रावण कुऱ्हाडीच्या तुंब्यानं राम सेनेला कुटीत होता; अगदी पिशा बडवाव्या तशी माणसं बडवीत होता.

राम, लक्ष्मण, मारुती, अंगद ही मंडळी चिडली होती. ते जसं जमेल तसा दणका देत होते आणि सर्वात महत्त्वाचे म्हणजे ती लढाई संपता संपत नव्हती. उलट वाढत होती. रामायण धोक्यात आलं होतं.

बघे एकमेकांना कोपरखळ्या देऊन म्हणत होते, 'बघ लेका, कसं झॅक नाटक चाललंय.'

मग राम, लक्ष्मण, अंगद, मारुती यांनी एकदम रावणावर हल्ला चढविला. परंतु रावण हटला नाही. तो कुऱ्हाडीच्या तुंब्यानं एकेकाला चोपू लागला. त्यामुळे राम संतापला! त्यानं रावणाच्या पाठीत धोपाटी घालताच रावणाने उलटी कुऱ्हाड त्याच्या डोकीत हाणून त्याला खाली पाडला. लक्ष्मणाला शक्ती लागण्याच्या ऐवजी रामच पसरला. आणि रामायण डोकीवर उभं राहिलं. राम पडताच त्याचा भक्त मारुती पुढं आला. त्यानं रावणाला उचलून आवळला. इतक्यात कुंभकर्ण आला. प्रथम येणारा आणि मरणारा कुभकर्ण! तो नंतर आला. त्यानं आपलं मुदगोळ फिरवून मारुतीच्या टाळक्यात घातला. त्या रट्ट्यानं मारुतीचं डोकं फुटून तो रक्तबंबाळ झाला.

मुरारी-सटबाजी बिथरून नाटक पाहत होते. हयातभर वैर खेळून वेडावलेले त्यांचे आत्मे ती डोळ्यांपुढं चाललेली क्रूर यादवी पाहून संतुष्ट होत होते. रामायणाच्या डोकीवर पेटलेली ती वैराची आग पाहून त्यांच्या डोळ्यांचं पारणं फिटत होतं.

नंतर राम उठला. मारुतीची झांज गेली. नळनीळ, अंगद, सुग्रीव सारेच मैदानात आले. रावणाचे सर्व सैन्य धावले आणि एकच हलकल्लोळ उसळला. सारखी हाणामारी सुरू झाली. रावण पिसाट होऊन मारू लागला. दोन्ही सैन्य प्रमत्त होऊन जिद्दीनं झुंजू लागलं.

पुन्हा रावण नि कुंभकर्ण यांनी जोडीनं चढाई केली. एक झपाटा बसून पुन्हा राम पडला नि रावण-कुंभकर्ण यांनी मारुतीला चोप दिला. अगदी भरीव मार दिला.

काठीवर काठी पडू लागली. कुऱ्हाडीवर कुऱ्हाड आदळली, पेट्रोमॅक्सवर दणके बसून त्या खळखळ निखळून पडल्या. बत्तीची आग भडकून छतावर चढू लागली.

मग मात्र प्रेक्षक बावरले. तोच मारुतीनं आपलं शेपूट तट्कन ओढून तोडलं नि फेकलं. तोंडाचा मुखवटा काढून हातात घेतला आणि उलटी मूठ आवळून बोंब ठोकली, 'मेलोऽऽ मेलोऽऽऽ पळा —'

मारुतीची प्रचंड बोंब ऐकून लोक घाबरले. काही सैरावैरा पळत सुटले.

आणि फौजदार स्टेजवर चढला. त्याने पिस्तूल रोखून दंगल शांत केली. आणि रामायणाची कत्तल वाचविली. प्रेक्षकातून पुढे सरकणाऱ्या ठोमरे-मुसळे यांना पोलिसांनी अडवून धरले आणि कुंडलवाडीचे रामायण समाप्त झाले.

# मकुल मुलाणी

'तुझी मुंडी छाटल्याशिवाय माझ्या मनाला शांतता मिळणार नाही' हे मकुलचे शब्द हाजराच्या कानात घुमत होते. त्यांची प्रखरता तिच्या काळजाला झोंबत होती. तिच्या चक्षूंपुढे भेसूर प्रसंगांची मालिका निर्माण होत होती. मकुलने आपली मान कापली आहे. पोलीस आले. पोलीस येऊन त्यांनी मकुलला अटक केली आहे. कोर्टात खटला सुरू झाला आहे. असे अनेक देखावे तिच्या नजरेपुढून जात होते.

ते महामुंबईचे उपनगर एका डोंगराच्या पायावर डोके ठेवून पडले होते; आणि प्रख्यात आग्रा रोड त्याच्या पाठीवर पाय देऊन मुंबईकडे निघाला होता. त्या उपनगरात पावसात भिजलेल्या कावळ्याच्या कळपाप्रमाणे घरे थरथरत होती. येऊन गेलेल्या सर्व युगांचे अस्तित्व ती पटवत होती. डोंगरातून येणारे रानटी वारे त्या घरांना कोपरखळ्या देत होते, आणि म्हशींच्या तबेल्यातली मुतट घाण आणून घराघरात कोंबत होते. अगदी एका टोकाला असलेल्या दोन चाळी पाय निसटलेल्या माणसाप्रमाणे तिरप्या झाल्या होत्या, त्या एकमेकींच्या उरावर कोसळण्याच्या बेतात होत्या आणि प्रत्येक मोडक्या दाराच्या फळीवर लावलेला नगरपालिकेचा हुकूम इंग्रजी भाषेत भाडेकरूंना धोक्याची सूचना देत होता. 'या चाळी धोक्याच्या आहेत.' परंतु प्रत्येक खोलीत दोन बिऱ्हाडे खुशाल राहत होती आणि मकुल मुलाणीही तिथे आपले दहा माणसांचे प्रचंड कुटुंब घेऊन नांदत होता.

मकुल दारात पडून घोरत होता. त्याच्या धिप्पाड देहावर हजारो चिलटांनी बैठक मारली होती, आणि उशाला बसून एक लाडं कुत्र चोरून आणलेलं जुनं खेटर कुरतडत होतं. चाळीच्या आढ्यावर बसून एक मांजर त्या कुत्र्यानं काय काय आणलं आहे याचा शोध करीत होतं.

थोड्याच वेळापूर्वी मकुल जेवून दारात पडला होता. त्याच्या मनाला अनंत विचारांच्या सुया टोचू लागल्या. निखाऱ्याने निखारा पेटावा तद्वत विचारातून विचार फुलू लागले. मकुल विवंचनेच्या डोहात बुडून गेला.

आपल्या महमद आणि अमीर या दोन मुलांना नोकरी कधी लागणार, आपली वयात आलेली मुलगी हुर्मत तंबाखू मागत फिरत आहे. तिचे लग्न कसे होणार, तर थोरली सकीना महिन्यात आठच दिवस सासरी नांदून बाकीचे सर्व दिस आपल्या डोकीवर मिरी वाटत आहे, हे तिला काय सांगावे. आणि गाडीबरोबर नळा या न्यायाने जावईही आपल्या घराची साल काढीत आहे त्याचा बंदोबस्त कसा करावा. आजवर कशी तरी आपण

या दहा माणसांनी पोटं भरली, आत्ता काय करावे, असे कैक विचारांचे धागे धरून मकुलचे मन धडपडत होते तोच त्याची बायको हाजरा बाहेर आली होती. तिने हळूच विचारले होते,

'ऐकता का?'

'हं, बोल, काय?' मकुल म्हणाला होता.

'मी म्हणते, सकिनाला इथंच राहू द्यावी.' हाजराने शांतपणे सल्ला दिला, आणि मकुल चमकून म्हणाला, 'आणि नांदणार कोण?'

आणि हाजरा शांतपणे म्हणाली, 'मग त्यालाही राहू द्यावा इथंच.'

'आणि एवढ्या लष्कराला दाणापाणी मी एकटा कसा पुरवू?'

मकुल चटकन उठून बसला. त्याचा आवाज एकदम चढला. त्याने हाजरावर भडिमार केला, 'काय करू? विकून घेऊ? की तुला विकू? की तुझ्या आईला विकू? बोल?' दम घेतला तोच हाजराला जोर आला. आईचे नाव घेताच ती भडकली,

'हां हां, माझ्या आईचं नाव काढायचं नाही..... नाही तर....'

'काय करणार तू?' मकुलने चढाई सुरू केली.

'सरळ बोलायचं.' बचावाच्या पवित्र्यात हाजरा उत्तरली, आणि मकुल गुरकला, 'आता सरळ बोलणार नाही, समजलीस!'

'म्हणजे मला मारणार?' हाजराने मानेला झोके देत प्रश्न केला आणि मकुलही त्याच ऐटीत म्हणाला, 'हो, आता तुला मारणारच.'

'मारणार? पूर्वी कधी मारलं होतं का?' हाजराने आपला हात मकुलच्या नाकाजवळ नेऊन विचारले आणि मूठ वळून मकुल म्हणाला,

'आजपर्यंत तुला मारलं नाही याचा अर्थ मी कधीच मारणार नाही असा नव्हे; आणि मी तुला न मारण्याचं कारण ही भडवी पोरं आहेत. एक पोर झालं, कसं मारावं, दोन झाली, कसं मारावं, तीन झाली, कसं मारावं, असं म्हणता म्हणता, तुला नऊ पोरं झाली आणि त्यांनी मार चुकवला; पण....'

'पण काय? आता काय करणार?' हाजरा मध्येच ओरडली आणि मकुलही ओरडून म्हणाला,

'आता तुझी मुंडी छाटल्याशिवाय माझ्या मनाला शांतता मिळणार नाही.'

मकुलच्या डोळ्यात जाळ झालेला हाजराने पाहिला. त्याचा आवाज तिला निर्धारयुक्त वाटला, तिच्या मनाला भीती वाटली. ती हळूच मागे सरकली. तिने पीछेहाट घेतली होती आणि आपल्या अंथरुणावर पडून ती त्याचाच विचार करीत होती. थोड्याच वेळापूर्वीचे भांडण तिच्या डोकीत नाचत होते. ती स्वत:ला विचारीत होती, 'हा असा पिसाट झाला कसा?'

काही दिवसांपूर्वी मकुलच्या घरात हास्य वावरत होते. दोन मुलगे कामावर होते. एक रेल्वेत आणि एक गोदीत. काम करून ते पगार आणत होते. छोटा नबू बकऱ्यांच्या मुंड्या, हाडकं विकून स्वत:च्या पोटापुरते मिळवत होता. मकुल मार्केटात बकऱ्याचे मांस विकत होता. महिन्याला दोन पगार उरत होते. पगाराच्या दिवशी सुना, दोन नातू, बायको, दोन मुली, तीन मुलगे आणि स्वत: मकुल अशी दहा-बारा माणसं नटून सजून सिनेमाला जात होती. नमाजाला जात होती. चांगली माणसं म्हणून शेजारीही त्यांचा मान राखत होते. लोक म्हणत, मकुल मुलाणी भला आहे.

पण एक भयंकरी दुष्ट दिवस उगवला. त्या दिवशी महंमद आणि अमीर यांच्या नोकऱ्या सुटल्या. दोन पगारांचा झरा ठणठणीत झाला. आज नाही, उद्या लागेल; नोकरीच्या आशेवर काही दिवस गेले. घरातील किडूकमिडूक निघून गेले. मकुलच्या संसाराच्या गाड्याला खीळ लागली. दोन कर्ते तरुण मुलगे बेकार होऊन कामासाठी वणवण फिरू लागले. आणि एकटा मकुल संसाराचे जोखड मानेवर घेऊन ओढू लागला. अगदी मेटाकुटीला येऊन ओढू लागला. परंतु सारेच व्यर्थ होते. प्रपंचाची विस्कटलेली घडी नीट होतच नव्हती. ती घडी नीट व्हावी म्हणून एका भाकरीच्या दोन होऊ लागल्या. भाताने तळ धरला, आमटीच्या भांड्याचे पोट पाण्याने फुगू लागले आणि अर्धपोटी माणसे पोट भरण्यासाठी एकमेकाला चकवू लागली. दोन सुना चोरून खाऊ लागल्या. आणि दोघीही एकमेकांची चहाडी हाजराला सांगू लागल्या. हाजरा त्या दोघींनाही दोन दोन दिवस झोपूच देत नव्हती आणि त्या दोन चाळींची झोप हराम करीत होती. दोन मुलांना काम मिळाले नाही म्हणून मकुल त्यांच्यावर चिडत होता. कधी कधी वैतागून मिळतील त्या पैशाचे हॉटेलात जेवून घरातील सर्वांना उपास करायला भाग पाडत होता. ज्याच्या हाती ससा तो पारधी झाला होता. त्या घरची दोन माणसे एका जागी येताच एकमेकांवर गुरगुरत होती. एकमेकांचा द्वेष करीत होती. तरीही ती एका खोलीतच राहत होती.

पहाट झाली होती.

ती मुंबापुरीवरची सुंदर पहाट होती. ती पस्तीस लक्ष मानवांना जागृत करण्यासाठी अवतीर्ण होत होती. तिच्या आगमनाने कोट्यवधी हात दौलतीचे डोंगर उभारण्यासाठी सज्ज होत होते. त्या हातांनी राक्षसी यंत्र मानवतेपुढे नमविण्यासाठी कामगारवर्ग नव्या उत्साहाने उठत होता. त्याच्या पोलादी पायांनी मुंबईचे सर्व राजमार्ग पुलकित केले होते. आग्रा रोड जागा होऊन मुंबईकडे धावत होता. ते उपनगर जागे झाले. दूधवाले भय्ये धावधावून दूध घालीत होते. लोक आपल्या कामाच्या रोखाने निघाले होते. मकुल जागा झाला होता.

मकुलने तोंडावरून पाणी फिरविले. घरात जाऊन चहाचा प्याला घेतला. गंभीर मुद्रा करून चहाचा घोट घेऊन त्याने हुकमी आवाजात बजावले, 'ए ए साल्यांनो, आज

तुम्हाला नोकरी लागलीच पाहिजे.'

हे ऐकून महंमद म्हणाला, 'आणि जर नाही मिळाली तर?' नोकरी अशी तशी मिळत नाही हे महंमदला आता अनुभवाने कळून चुकले होते.

'नाही मिळाली तर?' मकुल रोखून पाहत चिरक्या स्वरात म्हणाला, 'आपली आपली बायकापोरं सांभाळा, नाही तर त्यांना जिवंत पुरा.'

'मी नोकरीच करणार नाही.' अमीर वैतागून म्हणाला.

'मग खाणार काय, कोवळे कोवळे दगड?' मकुलने डोळे आकुंचित करीत प्रश्न केला.

'मी मार्केटात दुकान सुरू करणार.' अमीर उत्तरला.

'आणि मीही तेच करणार.' म्हणत महंमदने अमीरची री ओढली.

'काय वाटेल ते करा.' मकुल ओरडला. 'दुकान घालून मटन विका. नाहीतर दरोडा घालून जगा. पण जगा. मी निघालो.'

मकुल मार्केटाकडे निघून गेला.

तो रविवारचा दिवस होता. मार्केटात पूर्वीचे चार आणि नवे दोन असे सहा दुकानदार गिऱ्हाइकांवर नजर रोखून बसले होते. त्यांच्या नाकासमोर लटकणाऱ्या बकऱ्यांच्या तंगड्या मंद गिरक्या घेत होत्या. त्यांच्याजवळचे सुरे लखलखत होते. हिरव्या रंगाच्या टपोऱ्या माश्या घुमत होत्या आणि चोरटी मांजरं त्या खाटकांचा डोळा चुकवून त्यांच्यावर मात करण्याच्या विचारात होती. बाजूला हावरी कुत्री हाडं चघळून स्वत:चे थोबाड रक्तबंबाळ करून घेत होती.

मकुल आपली लुंगी घट्ट आवळून हातात सुरा घेऊन बसला होता. समोर अमीर येणाऱ्या गिऱ्हाइकाला हाक मारीत होता. बाजूलाच असलेला महंमद तर बेभान झाला होता. सर्वच दुकानदार आज पिसाट झाले होते. येणाऱ्या माणसाच्या पदरात आपला माल बांधण्याची पराकाष्ठा करीत होते. गिऱ्हाइकाने मार्केटात पाय ठेवताच 'एऽ दाऽदा' अशी एकच गर्जना वरच्या छपराला हादरवीत होती आणि आलेले गिऱ्हाईक लांडग्याला पाहून मेंढरू पळावे तसे पळ काढीत होते. गिऱ्हाईक पळून जाताच ते सहा खाटीक एकमेकांवर गुरगुरत होते. शिव्या देत होते.

'ए भोसडीवाले, कायकू चिल्लाते? आरे ओ मामू तो मेरा था.'

'अबे भडवे —' मकुल त्या सर्वांना म्हणत होता, 'ओ तो हमारी चाली में ऱ्हत्या है.'

त्या मार्केटातला व्यवहार जिकिरीने चालला होता. सहा खाटीक हातघाईवर येऊन विक्री करीत होते. मकुल मुलाणी वरच्या वर आपली रक्कम मोजून पाहत होता. त्याच्या पुढ्यात फक्त सव्वा रुपया उताणा पडला होता. तो कपाळावर आठ्या आणून त्या

रुपयाकडे पाहत विचार करीत होता, 'आज गिऱ्हाईक का येत नाही? अमीर आणि महंमद यांची दोन दुकानं झाल्यामुळंच आपला धंदा बसू लागला आहे. आता आपलं कसं होणार? अकरा वाजले. अजून माल उठत नाही.' असा विचार करीत मकुल बसला होता.

इतक्यात एक हाडकुळी ख्रिस्ताँव म्हातारी मार्केटात आली. तिने आत येताच आपला लांब झगा चापून चोपून सरळ केला. हातातली पिशवी झटकून तिरपी मान करून तिने सर्व खाटिकांना निरखले आणि खारुटीप्रमाणे बिचकत बिचकत ती ऐटीत पुढे सरकली. तोच, 'माझी म्हातारी' अशी सहाही खाटकांनी एका सुरात हाक ठोकली. त्याबरोबर म्हातारी खटकन थबकली. तिने कासवाप्रमाणे मान आत ओढून घेतली. आणि डोळे वटारून ती सर्वांकडे पाहू लागली. आणि आपण इंग्रजांचे वारस आहोत आणि हे सारे जंगली लोक आहेत, असा चेहऱ्यावर आव आणून रागाने पाहत पुन्हा ती पुढे निघाली. तोच एक खाटीक ओरडला,

'खबरदार! येऊ द्या तिला! ती माझी म्हातारी आहे.' त्याने हातातला सुरा सर्वांवर रोखला. तोच मकुल उठून ओरडला,

'ए मादरचोद, म्हातारी माझी आहे.'

मकुलने समोरच्या काट्याला लटकणारे बकऱ्याचे तंगडे काढून हातात घेऊन त्या म्हातारीला हाक मारली, 'आन्टी, मी तुझी वाट बगतोय, ये.' एवढेच म्हणून म्हातारी पुढे येण्याची वाट न पाहत त्याने ताडकन उडी घेतली आणि म्हातारीवर झडपच घातली. एका हातात बकऱ्याचे तंगडे आणि एका हातात म्हातारीचा हाडकुळा दंड धरून तो तिला फराफरा ओढू लागला. तोच महंमद धावून आला. त्याने म्हातारीचा दुसरा दंड धरून हिसका दिला. क्षणात सर्वच खाटीक म्हातारीवर तुटून पडले. आणि त्या म्हातारीची कुतरफाड सुरू झाली.

आपली दोन फरकुटी आता उपसली जाणार, आता आपण मरणार, या रानट्यांच्या मगरमिठीतून सुटणार नाही, याबद्दल म्हातारीची खात्री झाली. ती डुकराच्या पिल्लाप्रमाणे किंचाळू लागली.

आणि ते सहा खाटीक वाघाप्रमाणे डिरक्या ठोकीत म्हातारीला ओढीत होते. इतक्यात अमीरने मकुलच्या गालफडावर जोराने ठोसा हाणला. त्याबरोबर मकुल खाली कोसळून पडला. परंतु तरीही चपळाई करून त्याने त्या म्हातारीची एक तंगडी पकडली. आणि त्या म्हातारीबरोबर मकुलही ओढला जाऊ लागला. अमीरने मकुलला मारल्याचे लक्षात येताच महंमदला राग आला. त्याने हाडे तोडण्याचा ओंडका उचलून अमीरच्या पाठीत घातला. त्याबरोबर अमीर पुढे जाऊन समोरच्या भिंतीवर आदळला. त्याचे डोके फुटून तो रक्ताने न्हाला. त्याने क्षणभरच कळ मारून चटकन महंमदवर हल्ला केला. आणि

महंमदचे नाक फोडून टाकले. या रणधुमाळीत म्हातारीने संधी साधून जीव मुठीत घेऊन पळ काढला.

हां हां म्हणता गर्दी वाढली. लोकांनी मध्ये पडून ती यादवी थांबवली. लोक बापाला मारल्याबद्दल अमीरला दोष देऊ लागले.

त्या गर्दीत अमीर आणि महंमद आपल्या जखमा पुशीत होते. मकुल मुलाणी गालफडाला एक हात धरून बडबडत रडत होता. 'मला पोटच्या पोरानं मारलं, माझी अब्रू गेली,' असं म्हणत तो त्या गर्दीत काहीतरी शोधत होता. बघणारे त्यालाही चार हिताच्या गोष्टी सांगत होते. इतक्यात मकुलने खाली पडलेली आपली दाढ चिमटीत घेऊन वर धरली आणि मोठ्यानं हंबरडा फोडला, 'माझ्या पोरानं माझी दाढ पाडली होऽ.'

मकुलने एकदम घराकडे धाव घेतली, त्याच्या पाठोपाठ अमीर आणि महंमद दोघेही पळत सुटले. त्या लोकांना तोंड दाखवण्याची त्यांना लाज वाटली.

मार्केटातल्या त्या भयंकर दंगलीने ती सारी वस्ती थरारली होती. बापलेकांच्या हाणामारीचा सर्वत्र बोलबाला सुरू झाला होता. ते वृत्त हाजराच्याही कानावर येऊन आदळले होते. दोघांनी मिळून अमीरला मारले असे ती ओरडत दारातच उभी होती. तिचा चेहरा बिथरलेल्या माकडाप्रमाणे लालेलाल झाला होता; ती मकुल आणि महंमद यांच्यावर दात खात त्यांची वाट पाहत होती. अमीरच्या बायकोने सासूच्या सुरात सूर मिळवला होता. वडील मुलीने आईच्या मदतीला धावून जाण्याची तयारी केली होती आणि जावईबुवांनी आपल्या बायकोची पिछाडी सुरक्षित राहावी म्हणून दांडके घेतले होते आणि...

आणि दुसऱ्या बाजूला नबूने हातात एक फुटकी वीट घेऊन मेव्हण्याच्या टाळक्याचा नेम धरला होता. महंमदच्या बायकोने तोंड द्यायला सुरुवात केली होती. हुर्मत कमरेला पदर बांधून सज्ज होती. चौफेर गर्दी जमली होती.

तोच मकुल आला. त्याला पाहताच हाजरा पिसाळली. 'मेरे बच्चेकू क्यूं माऱ्या?' अशी किंकाळी मारून तिने मकुलवर झेप घेतली. तोच महंमदच्या बायकोनं सर्व शक्ती एकवटून तिच्या झिपरीला हिसका देऊन कैक दिवसांचा सूड उगवला आणि क्षणात सकीनाने भावजयीच्या पाठीत दणका दिला. इतक्यात जावईबुवांचे दांडके मकुलच्या पाठीत आणि नबूची वीट मेव्हण्याच्या मस्तकात बसली. एकच गाठ पडून हलकल्लोळ उसळला. महंमद येऊन त्याने बापाची बाजू सावरली. चौफेर हाणामारी सुरू झाली. गटारातला गाळ आणि रक्त यांनी ती सर्व माणसे लडबडली. आक्रोशाने आकाश धुंद झाले. त्वेष आणि द्वेष यांनी वातावरण तापू लागले. एका रक्ताची ती माणसे एकमेकांचे रक्त सांडू लागली. शेजारीपाजारी मागे सरले. कोणी पुढे होऊन त्यांना शांत करू शकत नव्हते.

तोच कोणीतरी ओरडले, 'पोलीस आले.' दारूभट्टीवर धाड घालायला निघालेल्या त्या पोलिसांनी त्या दंगलीवर धाड घातली. दंगलखोर मकुल मुलाण्याच्या कुटुंबाच्या माना त्यांनी पकडल्या आणि त्यांना मोटारीकडे फरपटवीत दंगल शांत केली. शांतता प्रस्थापित झाली. सर्व लोकांनी त्या मोटारीभोवती गर्दी केली, तेव्हा मकुल मुलाणी आणि त्याचे कुटुंब त्या मोटारीत बसून रडत होते. एकमेकांच्या जखमा पाहून कपाळावर मारून घेत होते. मकुल मुलाणी बाहेरच्या लोकांना केविलवाण्या सुरात विनवीत होता,

'ए दादांनो, मी माणसांतून उठलो, मला तुरुंगात घालू देऊ नका. मी होतो कसा आणि झालो काय?'

एवढ्यात मोटार टरटरली आणि मकुलसह त्याचे बिऱ्हाड घेऊन निघून गेली. लोक खिन्न होऊन परतरले. जो तो मनात म्हणू लागला, 'खरंच, मकुल मुलाणी माणसांतून उठला!'

# दे. भ.चं भूत

आपण मरणानंतर भूत व्हायच्याऐवजी जितेपणी भूत झालो. पण दुसऱ्या भुतासारखं आपण कुणाच्याही उरावर बसत नाही, कुणाचाही मुडदा पाडीत नाही, आणि या गावात आपणाला कुणीही भीत नाही, हे असं का?

असला भयंकर विचार करीत म्हाद्या ओढ्याओढ्यानं ओढ्याच्या उगमाकडं निघाला होता. ओढ्याच्या दुतर्फा वृक्षांनी गर्दी केली होती. आंबा, जांभूळ, करंजी, ऐन ही झाडं हातात हात घालून आणि डोकीला डोकं लावून उभी होती. उन्हाची प्रखरता कमी होत होती. आणि पंख मोडलेल्या पाखराप्रमाणे वारा धडपडत होता. पाखरं सावली सोडून फिरकत नव्हती. समोरचा सह्याद्री शांत भासत होता.

म्हाद्याची नजर झाडांच्या शेंड्यावरून भरारी घेत होती. तो करंजा शोधीत निघाला होता. त्याच्या पायाची बोटं थेट आकाशावर रोखली होती. तो फक्त टाचा टेकून एखाद्या जखमी खेकड्याप्रमाणं आचकत चालत होता. व्हनात मुसळ पडल्याप्रमाणं त्याच्या टाचा आदळत होत्या. आणि वाळू चरचरत दूर पळत होती.

सूर्यप्रकाशात त्याचं चकचकीत डोकं उजळलेल्या तांब्यासारखं चमकत होतं. त्याचं लठ्ठ शरीर थलथलत होतं. आणि त्याच्या गुबगुबीत पसरत्या चेहऱ्यावर त्याचं नाक संपूर्ण पालथं पडलं होतं. त्याचे फासुळीसारखे दात बाहेर झेपावत होते. त्यानं फक्त एक लंगोटी लावली होती व खांद्यावर एक पोतं घेतलं होतं. त्याच्या हातात एक वळकटीचा छकाटा होता. या भयंकर अवतारामुळे त्याची स्वत:शीच स्वत: भूत असल्याबद्दल खात्री झाली होती. आणि गावकरी तर त्याला जन्मापासून भूत म्हणत होते. 'माणसाच्या पोटी आलेलं भूत', 'म्हाद्या भूत', 'पांगळं भूत' अशी कितीतरी नावं त्याला लाभली होती. तो ज्या दिवशी जन्मला त्या दिवशीच त्यानं गावात दंगल उडवून दिली होती. त्या वेळी डोक्यावर टाळूचा गोंडा, जबड्यात बत्तीस दात घेऊनच आईच्या पोटातून बाहेर आला. आणि रडण्याऐवजी हासत सुटला. त्याचा रुबाब पाहून सुईणीलाही रडू कोसळलं. तिनं किंकाळीच फोडली. 'भूत, भूत!' म्हणून ती ओरडली. हां हां म्हणता लोक जमले. आयाबायांनी दारात गर्दी केली, दुरून भूत पाहिलं आणि पळ काढला. त्याच्या बापानं त्याचं नाव महादेव असं ठेवलं. पण लोकांनी 'म्हाद्या' करून पुढं 'भूत' जोडून त्याचं 'म्हाद्या भूत' केलं आणि तेच पुढं रूढ झालं. पुढं म्हाद्याची आई मेली, बाप मेला आणि त्याच्या भूत या नावाला मजबुती मिळाली.

आज त्याला पंचवीस वर्षं पूर्ण झाली होती. तो पाय फेंगडे असूनही केवळ हातावर जगत होता. तो ओढ्याच्या करंज्या पाडून त्या विकून पोट भरीत होता. तो गावात आला की, पोरं पळून जात. रडती पोरं त्याचं नाव ऐकून हसू लागत. आणि तरुण पोरी तर त्याच्या वाऱ्यालाही ठरत नसत.

परंतु म्हाद्याला त्याचं काहीच वाटत नसे. फक्त पोरींची वागणूक त्याला पसंत नव्हती. त्यांचं पळणं, बगल देणं त्याला मान्य नव्हतं. त्यांनी आपल्याजवळ बसावं, तासन तास बसावं, लोकांनी आपणाला भ्यावं. आपल्या हुकमात वागावं असं त्याला वाटे. आणि तोच विचार तो करी. सुंदरता आणि श्रीमंती त्याच्यापासून दूर होती. आणि तो त्यांचा हेवा करीत होता, द्वेष करीत होता.

परंतु गावकरी त्याला कधीच पाठमोरे होत नसत. जो तो त्याची विचारपूस करी. सहज भेटताच शेतकरी विचारी, 'म्हाद्या! भाकरी खाल्लीस का?' पण तो सहसा कुणाच्याही घरी जात नसे. गावचा धनिक सावकार अण्णा थोरात. त्यांच्या वसरीत बसून जे मिळेल ते खाऊन तो राहत असे. या धनिकाच्या कृपेवरच तो जगला होता, जगत होता.

मात्र अलीकडेच त्याची फार ओढाताण व्हायला लागली होती. कारण बेचाळीसची लढाई त्याच्याभोवती सुरू झाली होती. आणि थोरात एकाएकी बेपत्ता झाला होता. कुणी म्हणत, 'तो स्वराज्याची लढाई लढायला गेलाय.' कुणी म्हणत; 'अरं, कसली स्वराज्याची लढाई अन् कसलं काय? स्वराज्याच्या नावानं झालाय घरच्या म्हातारीचा काळ!...... लढाई खरी लढतोस रामू म्हारुगडा; नाहीतर ह्यो येडा...!'

आजही तो विचारमग्नपणानं करंज्या शोधीत फिरत होता. तो एका झाडाखाली थांबला. या झाडावरून किती करंज्या निघतील याचा त्यानं अंदाज केला आणि खांद्यावरचं पोतं दूर भिरकावून दिलं. हातातील छकाट्यानं झाड झोडपून काढलं. पण शेंड्यावर पुष्कळ करंज्या शिल्लक दिसल्या. त्यानं पुन्हा विचार केला, मग लंगोटी नीट केली आणि 'जय बजरंग' असं म्हणून झाडाच्या पायावर डोकं ठेवलं व क्षणात उठून ताडकन उडी मारली. अगदी वानराप्रमाणं तो झाडाच्या शेंड्याला गेला. दोन हातात दोन फांद्या धरून चेकाळलेल्या माकडाप्रमाणं त्यानं झाड हलवायला सुरुवात केली. थोड्याच वेळात एकूण एक करंजी वाळूवर पडली. मग त्याला आनंद झाला आणि उंचावर लागणाऱ्या वाऱ्यानं तो हर्षभरित झाला. त्याला गाण्याची उकळी आली. मग तो आपल्या भसाड्या आवाजात काही तरी अचकट विचकट गाऊ लागला.

त्याच्या त्या कर्कश आवाजानं त्या खोऱ्यातील शांतता भयभीत झाली. त्या नि:शब्द रानात त्याच्या गाण्यानं दगडफेकच केली. सावलीची पाखरं भेदरून पळायचा विचार करू लागली. पलीकडच्या विहिरीवर दोन कावळ्यांनी त्याला साथ दिली. आणि क्षणात त्याचं गाणं बंद झालं. अगदी नरडं दाबल्याप्रमाणं बंद झालं. आणि तो त्या समोरच्या

सोंडप्यानं त्याच्याकडं येणाऱ्या दोन इसमांना निरखून पाहू लागला.

लौकरच ते दोन इसम त्या झाडाखाली येऊन थांबले. त्या दोघांकडेही हत्यारं होती. त्यांना पाहून म्हाद्या माकडासारखा चुळबूळ करू लागला. खाली पाहू लागला.

'ए! काय करतोस?' एकानं वर पाहत विचारलं आणि शेंड्यावरून खाली पाहत म्हाद्या म्हणाला,

'करंज्या पाडतोय.'

'मग खाली ये.' दुसरा इसम गुरगुरला.

म्हाद्या सरपटत खाली येऊन पोट चोळत उभा राहिला. हुकमाची वाट पाहू लागला.

'चल!' त्या इसमांनी हुकूम सोडला.

'कुठं?' म्हाद्या भीत भीत म्हणाला.

'डोंगरात.' एका इसमानं खुलासा केला.

'पर माझ्या करंज्या?' त्यानं पुन्हा विचारलं.

'पडू देत तकडं, चल!' एकजण खेकसला.

'आगा, पर कुठं? तो रडकुंडीला येऊन म्हणाला.

'तुला दे. भ.नं बोलिवलंय.' एकजण म्हणाला.

दे.भ.चं नाव ऐकताच तो चेकाळला. त्यानं आनंदून प्रश्न केला, 'कंच्या दे.भ.नं?'

'दे.भ. थोरवतानं.' त्या इसमांनी खुलासा केला.

आणि म्हाद्यानं उडीच मारली. पोतं झटकून खांद्यावर घेऊन छकाटा उचलून तो चालू लागला. एखादी बैलगाडी आडरानात शिरावी तसा तो धडपडत बेभान होऊन तो पळू लागला.

ते तिघे ओढ्यातून निघून माळाला लागले तेव्हा म्हाद्यानं हळूच विचारलं. 'दे. भ. म्हारुगडा कुठं हाय?'

'लांब, खुंदलापूरच्या डोंगरात.'

'म्हंजी दे.भ. थोरवत आणि दे.भ. म्हारुगडं हे एका जागी न्हायती तर?' म्हाद्यानं चिंता व्यक्त करीत प्रश्न केला. पण त्याला उत्तरच मिळालं नाही. तो त्या दोन इसमांबरोबर त्या गर्द झाडीत गडप झाला.

एकाएकी म्हाद्या नाहीसा झाला आणि गावात सर्व लोक हळहळले. कोण म्हणाले, 'तो मेला,' कोण म्हणाले, 'तो विहिरीत पडला.' काहींना वाटलं, 'कुठं तरी गेला असंल, येईल!' पण त्यांचे ते सारे कयास चुकीचे ठरले. म्हाद्या आला नाही.

म्हाद्याला जाऊन नववा महिना सुरू झाला होता. रानात सुगी लागली होती. काढणी-मोडणीची हातघाई उसळली होती. सर्व शेतकरी दंग झाले होते. परंतु धरणीकंपाच्या धक्क्याप्रमाणे उभ्या गावाला जोराचा धक्का बसला. जो तो म्हणू लागला, 'म्हाद्या आला.'

सूर्योदयाबरोबरच म्हाद्या गावात शिरला होता. त्याच्यात भलताच बदल झाला होता. त्यानं पैरण घातली होती. तो पिवळं पंजी नेसला होता. त्याच्या डाव्या खांद्यावर पोत्याऐवजी घोंगड्याची घडी होती आणि छकाट्याची जागा डबल बॅरलच्या बंदुकीनं घेतली होती. त्याच्या गुळगुळीत डोकीवर पिवळ्या रंगाचा पटका होता. त्याचा सदा हासरा चेहरा गंभीर झाला होता. त्यामुळे तो भयंकर उग्र दिसत होता. तो बेदरकारपणे पेठेने चालत होता. आणि लोक जागोजाग उभे राहून पाहत होते.

तो एखाद्या मस्त हत्तीप्रमाणे सकाळीच आबा म्हारुड्याच्या दारात येऊन दाखल झाला. तेव्हा आबा दारात म्हशीची धार काढीत होता आणि त्याच्या बनीने रेडकू धरले होते. म्हाद्याला पाहताच ती घरात पळाली. परंतु बनीचे ते पळणे त्याला मुळीच आवडले नाही. तो अधिकच गंभीर झाला. इतक्यात म्हशीच्या पोटाखालून आबा म्हणाला, 'आरं, कसं काय म्हाद्या?' आबा जवळजवळ आश्चर्याने ओरडला.

पण म्हाद्या डोळे फिरवत म्हणाला, 'मला दे.भ. महादूखान म्हणत्यात.'

हे ऐकून आबा वरमला. त्याला नवल वाटले. तो पुन्हा म्हणाला,

'आरं, पर हायस कुटं मर्दा?'

'मी डोंगरात ऱ्हातु.' म्हाद्या गुरगुरला.

'आणि करतुस रं काय?' आबा लटकेच हासत बोलला.

आणि म्हाद्याने उत्तर दिले,

'मी मानसं मारतो. आणि जो मला भूत म्हणेल त्येच्या उरावर बसतो.' त्यानं बंदुकीचा खांदा बदलला.

त्याचे हे उत्तर आबाला बंदुकीच्या बारासारखे वाटले. तो मनात भ्याला, आणि त्याला रागही आला. त्याच्या शब्दातली प्रखरता, बेडर वृत्ती, घरात डोकावून पाहण्याची निर्भयता, यामुळे आबा चमकला. म्हाद्या जुना नाही याची त्याला खात्री पटली. हा काहीतरी कुरापत काढण्यासाठी आला असावा असा अंदाज बांधून आबा घरात गेला.

तोच म्हाद्याने सोप्यात बैठक मारली. आणि आबाही फरशी कुऱ्हाड घेऊन त्याच्यापुढं जात्याचा खुंटा ताशीत बसला.

आबाने कुऱ्हाड घेतलेली पाहून म्हाद्याने आपली बंदूक पुढे घेतली. खिशातली विडी काढून तो म्हणाला, 'काय शिजतंय?'

'मानूस शिजतंय.' आबा त्याच्याकडे जळजळीत नजरेने पाहत उत्तरला.

'म्हंजी तुम्ही मानसं कवापासनं खाता?' म्हाद्या चमकून, पण उगीच हसत म्हणाला.

'तू मानसं माराय लागल्यापासनं!' आबानं आकुंचित डोळे करून चटकन उत्तर दिले.

'बरं, वाईच इस्तु द्या!' म्हाद्या म्हणाला.

'इस्तु न्हाय.' आबा कुऱ्हाडीची धार आंगठ्याने चाचपीत उत्तरला.

'मग ह्यो धूर कसला?' म्हाद्यानं प्रश्न केला.

'राखंचा.' आबा म्हणाला.

'असं आडव्यात का शिरता?' म्हाद्या चिडून म्हणाला.

'तू आडवा बोलतोस म्हणून!' आबा उत्तरला. आणि त्याने एकाच दणक्यात हातातला खुंटा तोडून टाकला.

'मग योक सांगावा ऐका.' म्हाद्या बिथरून बोलू लागला, 'औंदापास्नं तुम्ही थोरवताची जमीन करायची. म्हंजी नांगरट, कुळवट, पेरणी सारं करायचं, नि सुगीला पीक वाड्यात पोचवायचं. मी निघालो.'

तो चटकन आंगणात आला. तोच आबा ओरडला,

'एऽ दे.भ. त्या थोरवताला सांग, म्हणावं, मी काय मेल्या आईचं दूध प्यालो न्हाय. आपल्या जमिनीचा लिलाव कर म्हणावं!'

हे ऐकून म्हाद्या दोन पावले पुढे आला आणि डोळे वटारून म्हणाला,

'मग आपल्या घरादाराचा लिलाव बघाय तयार हो. तुला दावतो मी माझं म्हादूखानाचं मेखसू.'

असे म्हणत तो गर्रकन मागं फिरला आणि रागाने चालू लागला. जवळजवळ धावतच तो आडाला झाला.

म्हाद्या गेल्यानंतर बाचाबाच ऐकत उभे असलेले लोक बोलू लागले. त्या सर्वांना म्हाद्याच्या वर्तनाचे नवल वाटले. तो इतका शिरजोर झाला कसा याचाच ते सर्व लोक विचार करीत होते. गर्दीत उभा असलेला संतू चांभार बोलला.

'आजपातुर म्हाद्या मानसाच्या पोटायला आल्यालं भूत व्हता. पन आता त्यो भुताच्या पोटाला गेल्यालं भूत हाय.'

'पर मग या भुताचा धरबंद कसा करायचा?' गंगू भोसला एका दगडाच्या खिळ्यावर चढून मोठ्याने म्हणाला.

आणि नायकू नायकवाड्याने डिरकी फोडली, 'चला, बघू मग. गहू तवा पोळ्या.'

सर्व लोक घरोघर गेले. प्रत्येकाला म्हाद्याच्या त्या बेडरपणाचे कोडे पडले.

आणि दुसऱ्याच दिवशी आबा म्हारुगडा एकाएकी बेपत्ता झाला. उभा गाव त्याला शोधण्यासाठी रानोमाळ धावत सुटला. त्यांनी सारे शिवार पालथे घातले, पण आबाचा पत्ता लागला नाही. आबाची बायको टकरा घेऊ लागली. बनी रडू लागली. पोराबाळांनी सोप्यात आक्रोश मांडला. सर्व लोक जमून त्यांना धीर देऊ लागले. आणि म्हाद्यानेच आबाचा खून केल्याबद्दल त्यांची खात्री पटली.

आणि म्हारुडाच्या आबाचे पायताण सोप्यात पडलेले पाहून पुन्हा लोकांना चमत्कार वाटला. त्यांचा कयास बरोबर ठरला. आबा गेला, आता पुढं काय होणार? याचा जो

तो विचार करू लागला. गावावर म्हाद्याची भलतीच दहशत बसली..

चौथ्या दिवशी भिवा जाधव भाकरी खाऊन रानात जाण्याचा विचार करीत सोप्यात बसला होता. तो डोळे झाकून दात टोकरीत होता. तोच अचानक म्हाद्या आला. त्याला पाहून भिवाच्या काळजाचे पाणीच झाले. त्याने घाबरून विचारले, 'का येणं केलं म्हादबा?'

म्हाद्या सरळ बसत म्हणाला, 'उगाचच आलो व्हतो.'

तो घरात चौकस दृष्टीने पाहू लागला आणि भिवाच्या घरात पोरांची एकच गडबड झाली.

भिवाच्या सोप्यात म्हाद्या आल्याची बातमी लागून आळीतल्या लोकांनी जागोजाग डवंगे केले आणि कानात जीव आणून ऐकू लागले.

म्हाद्या पुन्हा म्हणाला, 'तुमची हावशी कुठं दिसंना?'

'गेली नांदाया,' दात टोकरायचं काटूक दूर फेकून भिवा उत्तरला.

'बरं, त्यो आबा म्हणं कुठं गेला. खरं काय?' म्हाद्या भिवाकडं रोखून पाहत बोलला.

'खरंच गेला कुठं?' भिवा पुटपुटला.

'म्हणं त्येचं पायताण आलं. मग त्यो कुठं जावा?' म्हाद्याने गंभीर मुद्रा करून प्रश्न केला.

'देवाला डोळं!' भिवाने आढ्याकडे दृष्टी फेकून देवावर भार घातला. आणि रानात निघायची घाई सुरू केली. ती पाहून म्हाद्या म्हणाला,

'कुठं निघाला?'

'रानात.' भिवा उठून उभा राहिला.

'योक सांगावा हाय —' गुरकून पाहत बोलला.

'कुणाचा?' भिवा पुन्हा खाली बसला.

'थोरवताचा.' म्हाद्या म्हणाला, 'तुमी थोरवताची जमीन औंदा केली पायजे.'

'का म्हनून?' भिवा भीत भीत उद्गारला.

'त्यांच्या मागं सरकार लागलंय म्हून.' म्हाद्याने खुलासा केला. आणि भिवा समोरच्या दोन बैलांकडे पाहत म्हणाला, 'मी दोन हातांचा हाय, मला न्हाय झेपणार. पर ह्यो दांडगावा का?' भिवा वैतागल्या स्वरात म्हणाला. तो कावबावरा झाला.

आणि म्हाद्या उठून उभा राहत म्हणाला, 'उद्यापास्नं काम सुरू करा. जातु मी.'

'आवं, माझ्या लंगुटीला ठिगळ लावायचं मला जमंना, आणि मी थोरवताच्या आभाळाला दावं कसं लावू?' भिवाने प्रश्न केला.

'त्ये मला ठावं न्हाय.' असे म्हणून म्हाद्या चालू लागला.

म्हाद्या निघून गेला आणि भिवाच्या घरात गोंधळ सुरू झाला. पोरंबाळं घाबरली. तोच दूर उभे असलेले लोक सोप्यात आले. त्यांनी सर्व काही समजून घेतले, आणि भिवाला

धीर दिला. 'काय करतोय बघू –' अशा गुर्मीत तरणी पोरं तयार झाली. भिवाही इरेला पडला.

'थोरवत सावकार म्हणजे काय असा लागून गेलाय! त्याच्याजवळ बंदूक आहे. अन् इतरांच्या हातात काय बांगड्या आहेत?' कुणीसे म्हणाले.

'आरं, आमच्या रामू म्हारुगड्याचा कचका अजून पाह्यला नाही म्हणावं!' दुसरा म्हणाला.

'रामू म्हारुगडा - आवं, त्यालाच बोलवा.' सगळ्यांनी एकच गलका केला. पण रामू येण्यापूर्वी किंवा त्याने काही करण्यापूर्वीच - एक दिवस बातमी आली की, रानात गेलेला भिवा आलाच नाही. पुन्हा लोक दाही दिशा पळत सुटले. त्यांनी सारा शिवार चाळला, पण भिवाचा पत्ताच लागला नाही. सांजला भिवाची बायको भिवाला शोधून आली आणि चावडीवर तिनं मोठी बोंब ठोकली. ती ऐकून सर्व लोक चावडीवर जमले. एकच गर्दी झाली.

गंगू भोसला म्हणाला, 'आता वरडून काय फायदा?'

हे ऐकून तिने डोळे पुसले, पण मोठ्याने ओरडून ती म्हणाली, 'पण ह्या मानसं खाणाऱ्या भुताचा बंदोबस्त तर व्हनार हाय का न्हाय?'

'बंदोबस्त तर झालाच पायजे.' संतू चांभार खिन्न होऊन म्हणाला, 'पर नाईकवडा म्हनीत व्हता, गहू तवा पोळ्या. पर मी म्हनतो, आता पोळ्यांची येळ आली का न्हाय? का पार या गावचा निष्पावा झाल्यावर पोळ्या करणार?'

'खरं हाय, खरं हाय.' वताऱ्याने चांभाराला साथ दिली.

आणि भोसला म्हणाला, 'आता येळ गमावू नका. रामूला बोलवा - या भुताला त्योच बाटलीत भरील!'

आता प्रत्येकाच्या डोळ्यापुढे रामूची मूर्ती दिसू लागली. काळीसावळी, दणकट, करारी. थोराताच्या मानाने रामू म्हणजे पोरसवदाच. पण गावचा तो लाडका होता. थोराताची छप्पन्न कुलंगडी; पण रामू - छे: त्याच्याबद्दल वावगा शब्द काढण्याची कोणाची छाती नव्हती. थोराताला सुद्धा तो त्यामुळे थोडा जडच झाला होता. आणि आता तर बेचाळीसचं बंड सुरू झाल्यापासून दोघांच्या दोन वाटा झाल्या होत्या.

थोराताची देशभक्ती म्हणजे काय ते सर्वांना माहीत झाले होते अन् रामूचीही! जिल्ह्यातील साऱ्या घडामोडी गावच्या तरण्या पोरांना समजत. एकत्र जमून ते मोठमोठे मनसुबे रचीत. आजही असेच करावे असे वाटण्याजोगा प्रसंग होता. साऱ्या गावकऱ्यांनाच वाटायला लागले की, हे काम रामूच करील.

आणि प्रत्येकाच्या डोळ्यांपुढे रामू म्हारुगडा दिसू लागला. आता फक्त तोच काही करू शकतो असे सर्वांना वाटले. वतारी एकदम उठून म्हणाला, 'हे काम रामूच करील.'

'आरं, रामूला गाठायचा कुठं?' नाईकवडा म्हणाला.

आणि आबाचा पोरगा म्हणाला, 'रामू खुंदलापूरच्या डोंगरात हाय.'

सर्वांना आनंद झाला. लगेच त्याच ठिकाणी चार गडी निवडून त्यांना खुंदलापूरच्या डोंगराकडे पाठविण्यात आले. आणि वळवाच्या पावसाची वाट पाहावी, तसा गाव रामू म्हारुगड्याची वाट पाहत बसला. आज ना उद्या तो या बगलेवर येऊन म्हाद्याचा बंदोबस्त करणार या आशेमुळे सर्वांना हायसे वाटले.

रामूच्या कानावर म्हाद्याच्या पुंडाईची तक्रार घालून आठवा दिवस उगवत होता. झुंजरकाचा मलमली पडदा अजून गावाच्या अंगावर कायम होता. कोंबड्यांनी सूर्योदयाचा जयजयकार आरंभला होता. शेतकऱ्यांनी गुरं सोडली होती. स्त्रिया घागरी घेऊन पाणवठ्याकडे निघाल्या होत्या.

इतक्यात वावटळीप्रमाणे एक बातमी गावात शिरली आणि सारा गाव थरारला. रिकाम्या घागरी घेऊन बाया धावतच आल्या आणि त्यांनीच ती बातमी आणली की, म्हाद्या पाणवठ्याला निजला आहे! मग काही शेतकरी जमून तिकडे गेले. त्यांनी चौकशी केली आणि पुन्हा बातमी आली की, म्हाद्या मेला आहे. तो उरावर बंदूक घेऊन पडला आहे!

ही बातमी ऐकून उभ्या गावाला आनंद झाला. सर्वांनी सुटकेचा निःश्वास टाकला.

पंचनामा झाल्यावर म्हाद्याचे मढे सरकारी पहाऱ्यात तालुक्यात गेले आणि सर्व वळणे घेत घेत पुन्हा ते मूळ मुद्यावर आले. गावकऱ्यांनी ते बिनवारशी म्हणून दूर लोटले नाही, तर उलट सर्वांनी त्याला मसणवट्यात नेऊन अग्निमुखी दिले. सर्व गाव त्या अग्नीभोवती बसून राहिला. कोणीही हूं का चू करीत नव्हता.

सर्व चिता आगीने वेढली. म्हाद्याचा धूर वाऱ्याबरोबर दूर जाऊ लागला. त्या धुराकडे पाहत गंगू भोसला म्हणाला,

'मंडळी! हाडळ, रानगा, खवीस, झुटींग, ही सारी भुतं गावंढाळ असत्यात, पर हे दे.भ. चं भूत लई हुबलाक असतं, हे तुमास्नी पटतंय काय?'

'खरंच, ह्येनं दोन गडी मारलं राव!' नायकू नाईकवडा त्या मढ्याकडं हात करून म्हणाला.

'मग चला बरं. जळू द्या त्येला सावकाश.' भोसला उठून उभा राहिला.

पण वताऱ्यानं त्याचा हात धरून म्हटलं. 'थांब नाना, ह्येचा पार जळून बुकणा हुंदे, न्हाय तर भडवं दावील म्हादूखानाचं मेखसू.'



# डोळे

मी पन्हाळगड उतरून तळवटाला आलो, तेव्हा सूर्य गड चढून बुरुजावर गेला होता. चैतन्यमय झालेलं वातावरण कसं बेबंद भासत होतं.

पन्हाळगडापासून विशाळगडापर्यंत ती सह्याद्रीची प्रचंड रांग चैत्रपालवीनं गजबहरलेली होती. अनंत रानफुलांनी वारा धुंद झाला होता. पिकली पानं गळून खच लागला होता. त्यांचे जागी नवी पानं डोलत होती. रंगीबेरंगी पाखरांच्या भराऱ्या, हंसमोरांगीची प्रखर झडप, बहिरी ससाण्याची जोरदार सुळकंडी यामुळं ते गगन नुसतं रणमैदान झालं होतं. ती घनदाट झाडी, तो विशाल पर्वत, त्यावरचे ते गड नि ते वाडे पाहून छाती धडधडत होती. डोळे दिपत होते.

मी मनात पुटपुटलो, 'इथंच मराठ्यांनी वाट धरून मराठी अस्मिता दाखवली.'

पायथ्याला येऊन मी सागावकडं वळणार, इतक्यात एक मंजुळ आवाज आला. त्या उग्र भयाण जंगलात ही बाई कोण, म्हणून मी दचकून पाहिलं तेव्हा एक सतरा वर्षांची सुंदर तरुणी माझ्याकडं येताना दिसली. तिचा चेहरा तरतरीत नि विलोभनीय दिसत होता. तिचे डोळे टपोरे नि पाणीदार होते. त्यात चपलता होती. रेखीव भुवया, नोकदार नाक यामुळे तिच्यात उणं काहीच भासत नव्हतं. त्याचबरोबर तिचा देह निरोगी आणि रसरशीत होता. आपल्या उभार उरोजावरचा रेशमी पदर तिनं डाव्या हाताच्या दोन बोटांत कायमचा धरून ठेवला होता. मयूरपंखी रेशमी लुगड्यानं तिचं स्वरूप द्विगुणित केलं होतं. ती भलतीच बेरकी असावी असा माझा समज झाला.

'कुठं जायचं तुम्हाला?' तिनं जवळ येऊन हसतमुखानं प्रश्न केला आणि माझ्यावरून नजर फिरविली. 'सागावला जाणार.' मी उत्तर दिलं. तेव्हा तिनं नि:श्वास टाकला, 'बरं झालं बाई. मी घाबरले होते, सोबत मिळावी म्हणून. पण देवानं माझं गाऱ्हाणं ऐकलं नि तुम्हाला धाडलं.'

डोकीच्या केसापासून ते पायाच्या नखापर्यंत मी तिला न्याहाळून घेतली. 'तुला कुठं जायचं?' मी विचारले. तेव्हा पायाचा ठसा फोफाट्यात उठवून त्याकडे पाहत ती उत्तरली, 'मला सागावलाच जायचं आहे. माझी मावशी आहे सागावात. नंतर मी भेडसगावला जाणार.'

नंतर मी प्रश्न केला नाही. वाट धरली. ती माझ्या मागून चालू लागली. थोडं चालल्यावर ती हळूच म्हणाली,

'तुम्ही भाबडे आहात.'

'कशावरून?'

'मी कुठं जायचं म्हणताच तुम्ही खरं बोलला.' ती बोलू लागली, 'म्हणून मी तुमच्यावर विश्वास टाकून निघाले आहे. जर तोच प्रश्न तुम्ही मला विचारला असता, तर मी तुम्हाला खोटं सांगून भलतीकडेच नेलं असतं.' हे ऐकून मला हसू आलं. कारण, मी मुळीच खरं बोललो नव्हतो. मला सागावला जायचं होतं, पण सागाव हे माझं गाव नव्हतं. दुसरी गोष्ट ती खरं बोलली नसावी असा माझा पक्का समज होऊन बसला. काहीतरी भानगड आहे असं मला वाटू लागलं. परंतु दोन लबाड सहप्रवासी एकत्र निघाल्यानंतर हा प्रवास एकत्र कसा होणार, याचं मला हसू येत होतं.

'तू का घाबरली होतीस?' मी विचारलं.

'या भागात काही लोक फार वाईट आहेत. काही फरारी आहेत. बायांना डोंगरात गाठून अब्रू घेतात. एकट्यादुकट्या बाईला असं जाताच येणार नाही.' ती म्हणाली.

'मग तू एकटी कां बाहेर पडली आहेस?' पुन्हा मी प्रश्न केला. तेव्हा ती गंभीर झाली. आपली गती वाढवून माझ्याबरोबर येऊन आपली कथा सांगू लागली:

माझा नवरा संशयी आहे. मी साधी अशी आहे; पण नवऱ्यापेक्षा मी शंभर पटीनं देखणी आहे; म्हणून नवरा मला सारखा छळत असतो. मी हसले की तो चिडतो, नव्हे मनातून रडतो. बरं, हासणं ही मला एक खोडच जडली आहे. नि माझे डोळे दुष्ट आहेत. माझी नजर चपळ आहे, पण दाहक आहे. ती मला जाळीत असते. मी कसंही पाहिलं तरी सासरची माणसं एकदम पिसाळतात. मी दुर्वर्तनी आहे, असं नवऱ्याला सांगतात. आपल्या तव्यावर भाकरी जळावी तसा नवरा जळतो नि मग मलाही जाळतो.....

खरं सांगू? मी दुष्ट नाही. मी नवऱ्याला देवाइतकं मानते. हृदय उघडं करून दाखवते. पण त्याचं मन संशयानं आंधळं झालं आहे. त्याला माझं निर्मळ हृदय गढूळच दिसतं.....

माझा एक चुलत दीर आहे. तो गोरा आहे. देखणा आहे. दिसण्यात भारी उमदा आहे. माझ्या नवऱ्यापेक्षा तो शंभरपटीनं सुंदर आहे. माझ्यासारखी बाई त्याला दूर ठेवूच शकत नाही, असा आहे तो, पण.....

देव जाणे, काय झाले. त्याला या डोळ्यांचं वेडंच लागलं. तो रोज मुद्दाम येऊ लागला. अगदी कोणी का घरात असेना, तो काही ना काही सबब सांगून घरात आतपर्यंत येऊन माझ्यापुढं असे नि मला एकटक पाही.

मलाही त्याचं नवल वाटू लागलं. पुढं पुढं तर मी जिकडं जाई, तिकडं तो येई. मी पाण्याला निघाले की तो निघे. रानात जावं तर तिकडं तो दिसे. तो वेडाच झाला.

आणि तो सर्व प्रकार नवऱ्याला उमगला. तो तर एका महिन्यात वेडाच झाला नि मलाही वेड लावू लागला. नवरा मत्सरानं जळत होता. दीर मला पाहण्यासाठी चरफडत

होता. त्या दोन अग्नीत माझी राख होत होती.

एके दिवशी मी धीर केला आणि दिराला विचारलं, 'तुम्ही हे काय आरंभलं आहे?'

तेव्हा तो नि मी -- आम्ही दोघेच शेतात होतो. वेळ दुपारची होती. आसपास कोणीही नव्हते. तो हसून म्हणाला,

'मला काय झालंय ते मलाच कळत नाही. हां, एवढं खरं की, तुला पाहिल्यावाचून मला चैन पडत नाही. तुझे हे दोन डोळे नि त्यावरच्या या भुवया, ते पापण्यांचे लांब केस, हेच रोज स्वप्नात येतं आणि ते पाहण्यासाठी माझा जीव वेडापिसा होत असतो.'

तेव्हा मी त्याला विचारले,

'मी एकाची बायको आहे, हे लक्षात आहे ना?' तेव्हा तो खिन्न होऊन हसत म्हणाला,

'मी कधी काय म्हणतोय? मी फक्त तुला पाहत असतो. मला तुझे डोळे पाहावेसे वाटतात एवढंच.'

मला त्याची दया आली. काळजात कळ उठली. मी म्हणाले,

'डोळे गोड दिसतात, पण त्याच डोळ्यात ओळख नांदत असते.

'सोन्याची किंमत कसोटी सांगते. तद्वत नात्याची महती नजरेला कळते. जर हे डोळे तुमच्या स्वप्नात येत असतील तर..... तर मी ते खुरप्याच्या पातीनं फोडून घेईन, पण हा छळ मला नको.'

हे ऐकून दीर घाबरला. जणू माझे हे रक्तबंबाळ डोळे त्याला कल्पनेनं दाखवले. तो उठला. 'नको नको. तू डोळे फोडून घेऊ नकोस--' असं म्हणून तो निघून गेला. त्याचवेळी माझा नवरा तिथं आला. त्यानं दिराची पाठमोरी आकृती पाहिली नि तो वेडावला, 'गीता, तो कोण गेला?'

'भावजी.' -

'का आला होता?'

'मला काही गोष्टी विचारायच्या होत्या.'

'कसल्या गोष्टी?'

'याच की तो माझ्या पाठी का लागला आहे!'

'मग विचारल्या?'

'हो विचारल्या आणि त्यानं चूक कबूल केली.'

'खोटं, मी मनात भरत नाही म्हणून तू अशी त्याला एकांती भेटून पाप करतेस.'

हे ऐकून मी ओरडले. त्याच्या पाया पडले. नानापरीने मी त्याला विनवले. पण त्याचा संशय वज्रलेप झाला होता. तो ऐकेना. अखेर एका गोष्टीवर तो तयार झाला. तो म्हणाला, 'विशाळगडावर खऱ्याखोट्याचा निवाडा करणारा देव आहे तिकडं चल. तिथं तू खरी ठरलीस, तर ठीक. नाही तर तुझी तू नि माझा मी.'

काल आम्ही विशाळगडावर पोहोचलो, तेव्हा एका माणसानं एका पातेल्यात गोडं तेल आणून ते चुलीवर कढवलं. त्यात एक पैसा टाकला. तेल जेव्हा कडकडून कढू लागलं तेव्हा तो देवमाणूस म्हणाला,

'हं, बाई, तू जर पवित्र आहेस तर तो तेलातील पैसा काढून दे. जर तुझा हात जळला तर तू पापी नि जर तुला काहीच इजा झाली नाही तर तू देव!'

ते ऐकून मी भ्याले नि म्हणाले,

'तुम्हीच ते करा. मी पापी आहे असं म्हणून तो पैसा काढा. जर तुमचा हात जळला नाही तर मी पापी.'

.....त्या वेळी तो माणूस एकदम पिसाळला नि काठी घेऊन माझ्या अंगावर आला. त्याने मला शंभर टक्के गुन्हेगार म्हणून निर्णय दिला.... मीही आता गुन्हेगार म्हणून माहेरी जात आहे.....

ही सर्व कथा ऐकून माझ्या काळजात पाझर फुटला. मी स्तंभित होऊन विचार करू लागलो. परंतु तिच्या चेहऱ्यावरचा तो लबाड भाव पाहून बावचळून गेलो. तोच ती म्हणाली,

'एक गोष्ट बोलू?'

'हो, बोल ना! पण मला भाबडा म्हणू नको.'

'या भागातून जाणं धोक्याचं आहे.' ती म्हणाली, 'मी म्हणजे एक धोका आहे. मी तुमची कोणी नाही हे जर एखाद्या गावगुंडाला समजलं तर तो मला पकडून ठेवील. मी जन्मातून उठेन.'

'मग काय करू या?' मी उलट प्रश्न केला. तेव्हा तिनं काहीच न बोलता माझ्या खांद्याचं बोचकं आपल्या डोकीवर घेतलं. पदर नीटनेटका घेऊन एखाद्या नव्या नवरीसारखी चालू लागली. नंतर हळूच म्हणाली, 'माझं नाव गीता आहे. कुणी विचारलं तर बायको म्हणून सांगा.'

'म्हणजे?'

मी दचकताच ती कपाळावर आठी घालीत म्हणाली,

'दचकाया काय झालं? अशी बायको दिल्याबद्दल देवाचं उपकार मानां. चला.'

मला तिची भीती वाटू लागली. आणि माझा तो पडेल चेहरा पाहून दगडांवर रुपये ओतावे तशी ती हसली.

या वेळी मी दुसऱ्या एका विवंचनेत गुंतलो होतो. ती वाट माझ्या पायाखालची नव्हती मी प्रथमच त्या वाटेनं जात होतो. त्यामुळे घोटाळा झाला होता. सूर्य बराच फिरला होता आणि सागाव पुष्कळ दूर होतं, ही गोष्ट मला उमगली होती. तेव्हा आम्ही डोंगर चढत होतो. दीड मैलाची उतरण. नंतर पायथ्यापासून दोन मैल सागाव. हा सात मैलांचा डोंगरी

प्रवास थोड्या वेळात शक्य नव्हता. म्हणून मी चिंतातुर होऊन पाय उचलत होतो. गीता पळत होती.

सूर्यास्तापर्यंत आम्ही बरीच मजल मारली. चढण चढून माथाही ओलांडला नि उतरणीसमीप येऊन दाखल झालो. ऐन उतरणीजवळ खिंडीत एक लहानसा गाव होता. ती वाट त्या गावातूनच जाऊन पुढे ती डोंगरात उतरली होती. वाटेकडेलाच एक देऊळ होतं. तिथं सात-आठ माणसं बोलत बसली होती. त्यात एक म्हातारा मोठा चाणाक्ष होता. पिवळा पटका बांधून तो ऐटीत बसला होता. तो कावळ्यासारखा कावराबावरा दिसत होता. पलीकडे दोन पहिलवान बसले होते. ते तांबडमातीनं लडबडलेले होते नि धिप्पाड होते. आम्ही जवळ येताच ती मंडळी बावरली होती. म्हातारा चेकाळला. पहिलवान मला पाहण्याऐवजी गीताकडेच पाहू लागले. एकजण तिच्याकडे एकटक पाहत मिशीचा शेंडा पिळू लागला. त्यांची नजर जणू तिला पिळूनच काढीत होती. इतक्यात तो म्हातारा म्हणाला,

'कोण गाव पाव्हणं?'

'सागाव.' मी उत्तर देऊन पुढे सटकू लागलो, तेव्हा तो म्हातारा म्हणाला,

'थांबा की. रात कोण?... ही बायको वाटतं?'

'हो.'

'डोंगरातनं जायाचं, वाईच लवकर निघायचं!'

'झाला उशीर, जातो आता.' मी म्हणालो. म्हातारा मला घोटाळून थांबवू लागला. तो काहीतरी विचारीत होता. मी उत्तर देत होतो. तेवढ्यात ते दोन पहिलवान एकमेकाला खुणवून निघून गेले. तेव्हाच मला त्यांचा संशय आला. मी पाय काढला.

डोळ्याच्या उजेडानं डोंगर उतरायचा नि मग पायाच्या अदमासानं सागाव गाठायचं असा विचार करून मी निघालो. गीता घाबरली होती. एकाएकी तिचा चेहरा पडला होता. ती केविलवाणा स्वर काढून म्हणाली,

'ते दोघं पुढं गेलेले आहेत. नक्कीच काहीतरी होणार.'

मलाही त्यांचा संशय आला होता. त्याला पुष्टी मिळताच मीही खचलो. कडुसं पडत होतं. तोंडओळख मोडत होती. दीड मैल डोंगर उतरायचा होता. तोही कीर्र झाडीतून. बरं, त्या गावात रात्र काढावी तर तेही शक्य नव्हतं. ते दोन पहिलवान त्याच गावचे होते.. ऐती वाघाच्या घरी शेळी पाव्हणी. आता गेल्यावाचून गत्यंतरच उरलं नाही.

'चल, हिंमत सोडू नको.' मी उद्‌गारलो.

जिथं उतरण्याची पायवाट होती तिथं दोन्ही बाजूनं सोंडपं पुढं जाऊन त्यांना खेकड्याच्या दोन नांग्यांचा आकार आला होता. आम्ही उतरणीजवळ आलो. तिथं कोणीच नव्हतं. तेव्हा पुनः धीर आला नि पायास वेग आला. आम्ही भरभर उतरू लागलो.

दोन-तीन वळणं घेऊन मध्यावर पोहोचलो आणि वरून शीळ वाजली. ती डोंगरात वळवळत पळाली. आम्ही भयभयीत झालो. तेव्हा आमच्या डोकीवरचे आकाश लखलखीत होते. बाकीचा डोंगर अंधारात बुडत आला होता आणि झाडांच्या बुडख्यात, त्या गर्द झाडीत अंधार मावत नव्हता. फक्त वरच्या उजाळ्यानं ती मळवाट तेवढीच दिसत होती.

शीळ येऊन आमच्या उरात तलवारीप्रमाणं शिरली. आम्ही वर पाहिलं, तेव्हा एक आकृती खाली येताना दिसली. लगेच आम्ही खाली पाहिलं. तेव्हा दुसरीही आकृती वर येत होती. आम्ही मधीच सापडलो होतो. मी विचार केला आणि भर्रकन वाट सोडून बाजूला झाडीत शिरलो. ते दोघं एका जागी येईपर्यंत आम्ही दोघांनी कपारीत बरीच दौड मारली. परंतु गळून पडलेली पानं पायांखाली चरचरू लागली आणि त्यांनीच घात केला. कारण, त्या आवाजाच्या रोखानं ते दोघे आम्हाकडे धावत आले. परंतु त्या पानांनी पुन: आमच्यावर उपकारही केले. कारण त्यांची आम्हाला अचूक चाहूल लागली. लगेच थोडं वर चढून परत मुख्य वाटेकडे दौड घेतली. अगदी जीव मुठीत घेऊन.

आणि पुन: घात झाला. आमची चाहूल त्या दोघांना लागली. तेही परत धावत येताना पुन्हा ती पानं चरचरत होती. ते आल्याचं लक्षात येताच आम्ही परत आडवी धूम ठोकली.

मी सर्व शक्ती एकवटून त्या दोन बिलंदर डाकूंना चुकवत होतो. तंग कास घालून गीता माझं ते बोचकं सांभाळून अगदी सावलीसारखी माझ्याबरोबर धावत होती. ते भयंकर संकट खरं म्हणजे गीतावर होतं. हे तिनं जाणलं होतं. ती पळत होती.

गडद अंधारात, बेलाग कपारीत ती आमची जीवनमरणाची झुंजच सुरू झाली होती. माझी सर्व कापडं करवंदीच्या जाळीत अडकून फाटली होती. आणि मला दरदरून घाम फुटला होता.

त्या दोघांना सापडायचं नाही, पुढं येणारं झाड चुकवायचं आणि अंदाजानं बरोबर पळायचं; किंचित तोल गेला की मरण वाढून ठेवलं होतं. त्यावर पूर्ण लक्ष ठेवून स्वत:चा जीव वाचविण्याची कठीण कामगिरी त्या वेळी प्रथमच माझ्यावर पडली होती. आपण त्यांना सापडलो तर आपल्या समोर या पोरीची काय अवस्था होईल? त्यांनी आपल्यासमोर तिची अब्रू घ्यावी, हे मला असह्य झालं होतं... ते मला थोडेच मारून सोडणार? ही गोष्ट मी पार विसरलो होतो... तिची अब्रू, तिचे हाल, तिचे दु:ख म्हणजे आपले, अशी माझी भावना होऊन बसली होती.

नंतर एकाएकी एक आवाज घुमू लागला,

'ए, गुमान वाटेवर या, आणि ए टग्या, तू ऐक, मरू नगं. आता आम्ही दगडानं तुमास्नी चेपून काढू. मग मरा... न्हायतर ती पोरगी देऊन जा बरं.' त्यांनी मला हुकूम केला.

ही त्यांची घोषणा ऐकून मी गांगरून गेलो. अंधारात अंदाजच घेऊन जर त्यांनी दगड मारला तर काय? याचा मी विचार करू लागलो, तेव्हा त्या दोघांपैकी एक म्हणाला,

'तू हतंच थांब. मी बॅट्री घेऊन येतो. त्याशिवाय ही घावणार न्हायती.'

'हां हां, जा. आणच बॅट्री.' दुसरा म्हणाला आणि एक जण दूर गेल्याची मला चाहूल लागली. त्यांनी दगडानं आम्हाला मारण्याचा बेत रहित केला. मला बळ आलं. माझ्याकडंही कुऱ्हाड होती. मी तिला दांडा घातला. हळूच ठोकला. तेव्हा तो माणूस घाबरला. पुन्हा त्यानं दगडाचा अवलंब केला. फर्रकन एक दगड त्यानं आमच्या रोखानं फेकला. तेव्हा जागा सोडून आम्ही दुसऱ्या ठिकाणी बैठक मारली.

तोच दुसरा दगड घुमत आला आणि त्यानंच आम्हाला मुक्त केलं. कारण त्या दगडानं एका जाळीत बसलेले दोन मोर उठले आणि ते आमच्या पाठीमागून कपारीत त्या इसमाच्या वरच्या बाजूनं धावून निघाले.

त्या दोन मोरांच्या पायाखाली चरचरणारा पाचोळा त्या इसमापर्यंत चरचरत गेला. ते आम्हीच पळत आहोत असं समजून तो माणूस त्या मोरांना आडवा पळू लागला.

मोर नि तो इसम यांच्या पावलांचा कानोसा घेऊन आम्ही तेवढीच संधी साधली.

भर्रकन आम्ही उतरणीवर येऊन वाट धरली आणि खाली धूम ठोकली.

आम्ही तळवटाला आलो तेव्हा एकाएकी माझी शक्ती लोपली. मी गलितगात्र झालो. मला चालणं अशक्य होऊन मी कुऱ्हाड टेकीत निघालो. तेव्हा गीतानं मला आधार दिला. माझ्या मनावरचा भीतीचा दाब दूर होताच माझा दाबून धरलेला दमच उखडला होता. परंत गीता अजून दमली नव्हती. कारण, ती अजून निर्भय झाली नव्हती. अजून तिच्या मनावर भीतीचा एक विलक्षण पगडा कायम होता. आम्ही एका झाडाखाली बसलो. इतक्यात वर कपारीत गडगडाट झाला. लगेच 'मेलोऽऽ' अशी ओरड झाली, काहीतरी पडलं असं वाटून आम्ही कान टवकारले, तोच तो माणूस ओरडू लागला. 'सखाराम, मेलो. वाचव मला—'

'वाघानं धरलं वाटतं?' भेदरून पाहत गीता म्हणाली. त्याचं विव्हळणं चालूच होतं. आम्ही ऐकत होतो.

'अजून जाऊ या.' गीतानं आग्रह केला.

'नको. बघू या त्याचं काय झालं...' मी उत्तरलो. त्या वेळी आम्ही त्याच्या नि भीतीच्या शीवेपार होऊन बसलो होतो.

थोड्या वेळानं बॅट्री आणायला गेलेला पहिलवान पॅट्रोमॅक्सचा कंदीलच घेऊन आला. त्याच्या निळ्या प्रकाशात तो हिरवा डोंगर विलक्षण दिसू लागला.

'नारबा, कुठं हायस रं?' त्यानं हाक मारली. आणि मग दुसरा आवाज आला, 'सखाराम, मी हतं हाय, मी पडलो. माझा पाय मुळीत अडकून बसलाय. माणसं आण.'

लगेच कंदील तिथंच ठेवून सखाराम गावाकडं पळाला. आम्ही सागावकडं पळ काढला नि वारणेत येऊनच दम टाकला. तेव्हा वारणा शांत होती. किनारा थंड पडला होता. पावसाळ्यात कस्पटाप्रमाणे हत्तीला ओढून नेणारी वारणा नदी आता निरांजनाच्या मंद ज्योतीप्रमाणे शांत शांत वाहत होती. पाय ठेवताच वाळू करकरली. तेव्हा माझं काळीज निर्भय झालं. वारणा सागावला घासून गेली होती. नदीतून सागावाचे दिवे दिसत होते. जेवण वेळ टळत होती; तेव्हा माणसांचा गलका मंदावला होता. मध्यभागी येताच गीता हळूच म्हणाली,

'एक गोष्ट बोलू?'

'बोल, पण मला भाबडा म्हणू नको.' मी तिची चेष्टा केली. तेव्हा स्वत:च्या गालावर हळुवारपणे मारून घेत ती म्हणाली,

'तोबा, तोबा, जीभ झडंल तसं म्हणणाऱ्याची!'

'मग बोल!'

'आत्ता मी खरं सांगते—' गीता गुडघाभर पाण्यातून चालता चालता म्हणाली, 'माझं माहेर भेडसगाव. सागावात माझी मावशी नाही. सकाळी मी खोटं सांगितलं तुम्हाला.'

माझा संशय खरा ठरला. मला हसू आलं. नि मीही खरं बोललो नव्हतो. मी विचारलं, 'मग, आता बोलतेस ते तरी खरं का?'

'आता खरंच मी खरं सांगते.' गीता दिलगीर होऊन म्हणाली, 'माझं माहेर मानवाडा. शिराळच्या पुढं.'

'मग, ऐक. मीही खरं सांगितलं नाही. माझं गाव हे सागाव नव्हं. इथं बहीण आहे. माझं गाव पाटेगाव. शिराळच्या पुढं.

'ए बाई, मग शेजारीच की!' असं म्हणून ती मोठ्यानं हसली. नि लगेच गंभीर होऊन म्हणाली,

'आजचा प्रसंग जीवावरचा होता. त्यानं प्रथम माझं डोळं पाहिलं. उशीर तो माझ्या डोळ्यात पाहत होता. म्हणूनच त्यांनी कपटी डाव टाकला होता. जर आपण सापडलो असतो तर वाईट झालं असतं. माझ्यासाठी तुम्हालाही ताप घडला असता आणि मी तर अब्रूलाच मुकले असते. तुम्ही भारी हिंमत केली. वाटतं, हे डोळेच फोडून घ्यावेत.' शेवटी ती आवेगानं उद्गारली.

तिच्या उद्गारात निर्धार होता नि वैताग होता. वयात आल्यापासून तिला एकही सुखाचा क्षण लाभला नव्हता, म्हणून ती निराश झाली होती, आणि दु:खाचा उगम आपल्या नेत्रात आहे अशी तिची समजूत झाली होती.

ती रात्र सागावात काढून पहाटेस आम्ही आपली पुढील वाट धरली, तेव्हा गीता हर्षानं मोहरली होती. तिचे पाय जमिनीला ठरत नव्हते. माहेरची ओढ लागून ती आई,

बाप, भाऊ यांना पाहाण्यासाठी आतुर झाली होती.

आणि त्याच वेळी आईबापाला आपलं दु:ख सांगायची तिला घाई झाली होती. हृदयात पेटलेले दु:खाचे निखारे जणू ती आईबापापुढे ओतून शांत होणार होती.

परंतु दुपारी मानेवाडी जवळ आली, तेव्हा ती रंजीस झाली. मानेवाडीची फुटवाट आली तेव्हा तर रडकुंडीला आली. सडकेपासून चार फर्लांगावर मानेवाडी दिसत होती. तेव्हा ती उभी राहिली. आपल्या घराकडं जाताना तिनं सद्‌गदित होऊन माझा निरोप घेतला. चार पावलं चालून ती पुन्हा थांबली. हात उंचावून ओरडून म्हणाली,

'कधी तरी या – माझी आठवण झाली तर!' असं म्हणून ती मंदगतीनं निघून गेली.

बदलणं हा जगाचा जणू नियम आहे. त्याप्रमाणे ते बदलत होतं. नि जुन्या जगातून नवं आगळं अनोखं जग उदय पावत होतं. जुनी सुखं लोपून नवी येत होती. जुनी दु:खं दूर होऊन नवी दु:खं माणसांना रगडीत होती, परंतु माणूस दु:खापुढं पाठ फिरवीत नव्हतं. मीही त्यातच होतो. मी कुंडलवाडीहून घरी निघालो होतो. माझी वाट मानेवाडीतून पुढं होती. गावात शिरताच वाऱ्यानं दार उघडावं तद्वत आठवणीचं दार खाडकन उघडलं. मला गीताची आठवण झाली, पण तिच्या बापाचं नाव नि घर मला माहीत नव्हतं. मी किंचित थांबून विचार केला नि समोरच्या घराकडं वळलो. मला गीताची चौकशी करायची होती. मी दारात पोचलो नि चकित झालो.

सोप्यातच गीता बसली होती. हिरवं लुगडं, खडीची तंग चोळी, स्वच्छ नि टापटीप पोषाख. तिला पाहून मला आनंद झाला. परंतु तिच्या चेहऱ्यावर किंचित रेषा उमटली नाही. ती भुईमुगाच्या शेंगा फोडत होती. ती जागची हाललीही नाही. मला चीड आली. मी खणखणीत स्वरात विचारलं, 'काय, ओळख लागत नाही वाटतं?'

माझा आवाज ऐकताच ती दचकली. डिवचताच पेटाऱ्यातून नागीण उठावी तशी उठली. 'तुम्ही आला?' एवढंच म्हणून ती रडू लागली. अगदी सर्व शक्ती एकवटून तिनं हंबरडा फोडला. भर्रकन पदर ओढून त्यात तोंड दडवून पुन्हा ती मटकन खाली बसली नि मोठ्यानं रडू लागली.

मी घाबरून पळायचा बेत रचला. तो तिची आई आली. तिनं तिला पोटाशी धरली. बाप येऊन माझ्यापाशी बसला नि म्हणाला, 'पोरीनं वाईट केलं. डोळे फोडून घेतलं.'

हे ऐकून मला अंगावर कडा कोसळावा तसं वाटलं. जिभेवरचे शब्दच पांगुळले. मी नुसतं पाहत राहिलो. नंतर ती शांत झाली. दु:खाचा पूर ओसरला. तेव्हा गीताची आई डोळे टिपत म्हणाली, 'पोरीनं शेंडाचा चीक घालून डोळं फोडून घेतलं.'

तशी गीता अस्वस्थ झाली. माझ्या रोखानं पाहत ती तीव्र स्वरात म्हणाली,

'तुम्ही माझ्या शिरावर उपकाराचा डोंगर रचलात. त्या दिवशी तुम्ही होता म्हणून माझी अब्रू वाचली. एकदा तुम्हाला पाहवंसं वाटत होतं, पण आता नाही पाहू शकणार.

परंतु एक हिंमतवाला भाऊ म्हणून आठवण काळजाच्या गाठीत ठेवीन.'

'गीता, तू हे वाईट केलंस—' मी चिडून उद्गारलो, तेव्हा गीता रडता रडता हसली नि म्हणाली,

'काही म्हणा. सर्वच असं म्हणतात. पण माझ्या डोळ्यांनी माझं नांदणं उठवलं. इज्जत गेली. बापाच्या नावाला कलंक लावला. म्हणून वैतागून मी तसं केलं... पण... पण माझे डोळे सुंदर होते...'

तिचा कंठ दाटला. सारंगीने करुण स्वर हवेत फेकावा तसे ते 'माझे डोळे सुंदर होते...' हे शब्द त्या सोप्यातच चरफडले.

वातावरण मलूल झालं. ती रडू लागली.

गीता असह्य होऊन रडत होती. 'माझे डोळे सुंदर होते...' हे शब्द ती थरथरत्या ओठांनी अस्पष्ट उच्चारीत होती. आणि लहान मुलाप्रमाणे रडत होती. छळ झाला, नांदणं गेलं, बेअब्रू झाली म्हणून स्वतःचे सुंदर डोळे — अगदी जगाच्या मोलाचे डोळे — फेकून देणारी गीता आता डोळ्यांसाठी रडत होती. दुःखापोटी दुःखच निपजतं. तद्वत गीताच्या दुःखानं क्रूर दुःखाला जन्म दिला होता. तिचे डोळे गेले होते, पण ते तिच्या अंतरात अमर होते. त्यांची महती तिला आता पटली होती — म्हणून ती रडत होती.

# भुताचा मळा

एका डोंगराच्या पायथ्याशी ऐन माळावर वाकडीतिकडी बाभळीची आणि लिंबांची झाडं उभी होती. त्या झाडांच्या गर्दीत सेवरवाडी एखाद्या वनवाशासारखी दिसत होती.

सेवरवाडीपासून दीड मैलांवर बंडू सेवऱ्याचा मळा होता. अगदी गर्द झाडीच्या सावलीत तो मळा गजबजला होता. भरपूर पाणी असलेली विहीर, तिथं नारळीची दोन उंच झाडं अंगात आल्यासारखी आभाळात डोलत होती. त्या मळ्यात पिकाला भलताच जोर होता. मांडीसारखा ऊंस, कंबरभर हळद, तशीच मिरची, मका - अगदी माणूस पेरलं तरी उगवेल असा तो मळा होता.

हत्तीसारखे पुष्ट बारा बैल. दुधाळ गायी-म्हशी, शेळ्या-मेंढ्या, कोंबड्या यांनी तिथलं वातावरण बोलकं झालं होतं.

चार मुलं, चार सुना, नातवंडं, चाकरीचे गडी असा प्रचंड कुणबा घेऊन बंडू सेवरा त्या मळ्यात चिरेबंदी वाडा बांधून संसार करीत होता. त्याच्या मळ्यात अमरावती उतरली होती.

बंडू सेवरा जन्मला कधी आणि मरणार कधी याची सेवरवाडीत कित्येकांना चिंता वाटत होती. कारण बंडूच्या बरोबरीचा एकही माणूस नव्हता. उलट त्याच्यानंतर जन्मूनही जख्ख म्हातारपण पाहिल्यानंतरच कित्येकांनी राम म्हटला होता. त्यांची हाडं मातीला मिळाली होती. कुणाचा धूर कौलाशी गेला होता.

परंतु बंडू सेवरा दणदणीत होता. त्याचा रुंद चेहरा सुरकुत्यांनी झाकळला होता. पण त्याचे डोळे तीक्ष्ण होते. डोकीचे केस, भुंवया नि गुलढबू मिश्या... सारंच पिकून रेशमासारखं झळझळत होतं. त्याचा उंच देह ताठ होता. डोकीला जरीचा मंदील, अंगात पैरण, गुडघ्यापर्यंत स्वच्छ धोतर असा त्याचा थाट होता. तो मुसळाएवढी काठी हातात घेऊन शांतपणे चालत असे.

बंडूचं आयुष्य आणि मळ्यातील ते वैभव पाहून लोक म्हणत, 'बंडू सेवरा माणूस नसून भूत आहे' आणि त्याच्या मळ्याला 'तो भुताचा मळा आहे' असे म्हणत.

गावात बंडूविषयी अनेक कथा-दंतकथा रूढ झाल्या होत्या. त्या तोंडोतोंडी झाल्या होत्या. मळा दिसताच लोकांना भुताची आठवण होऊन त्यांच्या डोकीत भूत थैमान घालीत असे.

काही बोलकी माणसं दुसऱ्याला बसवून एक कथा सांगत:

पुष्कळ दिवसांपूर्वी बंडू सेवरा गरीब होता. तो आपल्या शेतात खोप करून राहत होता. तो आणि त्याची बायको लोकांचा रोजगार करून पोट भरीत असत.

एके दिवशी बंडू लोकांचं गवत कापीत होता. त्याची बायको खोपीत भाकरी करीत होती. थंडीचे दिवस होते. दंवानं गवत भिजलं होतं. बंडूचा विळा सारखा चालला होता. त्यानं एक मूठ धरून विळा चालविला आणि त्या मुठीतून एक अस्सल नाग कापून ओढला गेला. मुठीतील सापानं बंडूला कडाडून चावा घेतला. साप चावल्याबरोबर बंडू घाबरला. त्यानं बोंब ठोकली. लोक धावले. त्याची बायकोही ऊर बडवीत आली.

चार लोकांनी धावपळ केली. औषधं आणली. मुळ्या वाटून चारल्या, पण गुण आला नाही. बंडूने डोळे झाकले.

'मला माझ्या बांधाला पुरा!' अशी त्यानं मरणापूर्वी विनंती केली. मग लोकांनी बांधाला गोर काढून बंडूचं मढं गोरीत घातलं.

आणि माती लोटण्यापूर्वीच बंडूने डोळे उघडले. तसे लोक चकित झाले. मेलेला बंडू सेवरा उठला. सर्वत्र आरोळी झाली. बंडू गोरीत जिवंत झाला. ते नवल घडलं. आणि काही शहाण्यांनी त्या नवलाला पुढील अर्थ जोडला, 'बंडू मेला व्हता. पण त्याचवेळी भूत आलं नि बंडूच्या मढ्यात शिरलं!'

बंडू सेवरा परत संसार करू लागला. पण लोकांनी त्याला भुतांत जमा केला होता.

पुढे अनेक चमत्कार लोकांनी पाहिले. बंडूला चार मुलं झाली. ती कर्ती झाली. त्यानं तो मळाच खरेदी केला. विहीर काढली. चिरेबंदी वाडा उभा केला. आणि तेव्हापासून इतकी वर्षे झाली तरी तो मरतच नव्हता!

हा सर्व भुताचा चमत्कार असून त्या मळ्यात भुताचा गोतावळा संसार करीत आहे, अशी कित्येकांनी आपली समजूत करून घेतली होती; आणि तशीच इतरांची समजूत ते आग्रहानं करून देत होते.

त्या मळ्यात घडणारे चमत्कार पाहण्यासाठी गावचे लोक टपून बसलेले असत.

एका रात्री भर मध्यान्हीला मोटेचे चाक वाजू लागले. सेवरवाडी खडबडून उठली. बंडूच्या मळ्यात अपरात्री मोट जुंपलेली पाहून पुन्हा लोकांची खात्री झाली की, हे काम फक्त भूतच करू शकते.

एकदा अशीच मध्यरात्र झाली होती. सर्वत्र अंधार दाटला होता. सेवरवाडी निपचित पडली होती. घरोघर माणसं घोरत होती. त्यांच्या झोपेचा भार चालला होता. एकाएकी नाना खोताला जाग आली. आणि तो दारात आला. तशी त्याची नजर चटकन भुताच्या मळ्याकडे वळली. तिथं त्याच्या दृष्टीला जे दिसलं ते पाहून तो चकित झाला.

त्या मळ्यात अनेक मशाली पेटल्या होत्या. उग्र प्रकाशाने मळा उजाळला होता. अनेक जाळांचा एकच जाळ होऊन झाडंझुडपं स्पष्ट दिसत होती. कित्येक माणसं

बोलावीत तसा गलबला वाढत होता. नाना खोतानं क्षणभर विचार केला, हा भुतांचा प्रताप गावाला दाखवावा. म्हणून तो गावाला उठवू लागला. 'आरं ए, उठा, भुताच्या मळ्यात जत्रा भरलीया बघा' असं म्हणत त्यानं गावाला वळसा घालून एकूणएक माणूस जागं केलं. सारा गाव अंथरुणावरला दारात आला आणि तो अघटित असा चमत्कार पाहू लागला. एक म्हातारा दबक्या आवाजात बोलला,

'अरं, चाललंय तरी काय त्या मळ्यात?'

'काय म्हंजी?' एक गावकरी समोर पहात म्हणाला, 'मुलखातली भुतं बंडू सेवऱ्याला भेटायला आली असतील, दुसरं काय?'

'थांबा गा!' नाना खोत दोन्ही हातानं लोकांना गप्प करीत म्हणाला, 'मी जाऊन बघून येतो.' त्यानं आजूबाजूला पाहिलं. त्याचा आगाऊ तुक्या त्याला दिसला नाही.

गावची तरणी पोरं म्हणाली,

'आमी येतो चला...'

नाना खोत आणि ती पोरं बंडूच्या मळ्याकडं अंधारात पळत गेली. परंतु मळ्यापर्यंत कुणीच गेलं नाही. दुरूनच पाहून परत आले. अगदी धावतच आले. सर्व गावानं उत्सुक होऊन एकच प्रश्न केला,

'अरं, काय करत्यात भुतं?'

'काई न्हाय', नाना धापा टाकीत म्हणाला, 'सारी भुतं जमून नांगूर धरलाय. आपापलं बैल घेऊन लई भुत आल्याती!!...'

ती भयंकर बातमी ऐकून लोक घाबरले नि हळूहळू पाय काढू लागले. थोड्याच वेळात सारा गाव अंथरुणावर आडवा झाला. नाना खोत घरात आला, तेव्हा त्याचा दहा वर्षांचा तुक्या अंथरुणावर नव्हता. नाना घाबरून तुक्याला शोधण्यासाठी पळू लागला, तेव्हा तुक्या दारापुढच्या लिंबावर चढून भुतांचा मळा पाहत होता. तो बापाला म्हणाला,

'ए, आबा, मी हाय न्हवं का! मी भुतांचा नांगूर बघतुया!!'

नानाला त्याचा राग आला. पण ते पोर झाडाच्या शेंड्याला होतं म्हणून वाचलं. नानानं शिवी हासडली,

'भडव्या, खाली ये.'

नाना वयानं तरुण होता. जुना पहिलवान. आता कुस्ती सोडून संसार करीत होता. ताकदवान, धाडसी म्हणून गावात त्याचं नाव होतं. घरात साप निघाला, कुत्रं पिसाळलं, गाडी रुतली की नाना पैलवान न चुकता पुढं असायचा.

तुक्या खाली येताच त्याच्या डोकीत एक बुक्की बसली आणि त्याच्या आईनं त्याला उचलून घेतला. 'अगदी बापावाणीच गऽऽ बाई' असं म्हणत ती तुक्याला घरात घेऊन गेली.

नानाचा तुक्या अवघ्या दहा वर्षांचा होता. पण त्याच्या खोडीला गावात जोड नव्हती.

उभी शेंडी, गोल चेहरा, खोजे डोळे, बसकं नाक असा त्याचा अवतार असे. बोलण्यात तो भारी हुशार असे आणि म्हशीच्या गळ्यातील लोढण्याप्रमाणे, जिकडे बाप जाईल तिकडे तो जात असे. पण नानाचं काहीच चालत नव्हतं. तुक्या अगदी सावलीवाणी बापाच्या मागं फिरत होता. पावलोपावली तो भांडणं काढीत होता. त्या पोराच्या लीलांना नाना वैतागला होता.

आपापल्या घरात माणसं जागीच होती, भुतांच्या गोष्टी सांगत होती. नाना दारात बसून चिलीम ओढीत होता. इतक्यात भुजा कैकाडी आला. त्यालाही तलफ आली होती. त्यानंही आपली चिलीम भरली. पौष महिन्याची थंडी ओरबाडीत होती. अंगावरचं पटकूर सरळ करीत भुजानं झुरका मारला आणि सारा धूर गिळून प्रश्न केला –

'नाना, भुतं नांगर धरू लागली, आता म्होरं काय व्हनार ह्या जगाचं?'

'आरं बाबा, ह्ये कलियुग हाय.' नाना गंभीर आवाजात म्हणाला. 'आता सारी भुतं गावात शिरून शेतंभातं करू लागतील नि आमास्नी भुतं होऊन फिरावं लागंल बोंबलत–'

'खरंच बाबा!' कैकाडी मान डोलवीत म्हणाला, 'आक्रीत हाय आक्रीत. पर ही बंडू सेवऱ्याची भानगड खरी का?'

'आगा, ती भानगड खरी हाय.' नाना म्हणाला, 'बंडू सेवरा मरून लई दिवस झालंती - नव्हं वरसं झाली. त्यो गोरीत जिवंत झाला. त्येचं कारण त्येच्या मढ्यात भूत शिरलं! म्हंजी, आता हाय त्यो बंडू सेवरा नसून भूत हाय!'

'मग एखाद्या दिवशी ह्ये भूत सेवरवाडी भरडून टाकील!' कैकाडी घाबरून म्हणाला. तेव्हा त्याला धीर देत नाना म्हणाला,

'तसं बिसं काई होणार न्हाय! ते भूत आता माणूस झालंय, म्हणून ते गावाला हात लावणार न्हाय.'

'म्हंजी तरी बरं –' भुजानं सुटकेचा निःश्वास टाकला, आणि अंग टाकायला निघून गेला. तुक्या जागाच होता. पडून सारं ऐकत होता. कैकाडी जाताच तो म्हणाला,

'आबा, भूत गरीब असतं न्हाय का?'

तुक्याच्या शब्दानं नाना दचकला. क्षणात त्याला तुक्याचा राग आला. एक दणका द्यावा असं वाटून त्यानं मूठ वळली, पण राग आवरला. मनातल्या मनात चरफडत त्यानं अंग टाकलं.

तो फाल्गुन महिना होता. दिवस मावळत होता आणि त्याच घडीला चंद्र उगवत होता. पुनवेची रात उमलत होती. रानात गुऱ्हाळं लागली होती. लाकडी घाणे हुंकारत होते. मळ्यामळ्यात उसांच्या राशीतून गुळाच्या भेली उत्पन्न होत होत्या. शिवारात गोड वास रेंगाळत होता.

नाना खोत उसाच्या वाड्याचा भारा डोकीवर घेऊन गावाकडं निघाला होता. त्याचा तुक्या सलग ऊस तोंडाला लावून चघळीत मागून पळत होता. मध्येच थांबून लंगोटी सरळ करीत होता.

तेवढ्यात आडव्या वाटेनं भुजा कैकाडी आला नि नानाबरोबर चालू लागला. चालता चालता भुजा म्हणाला,

'तुमचं हे प्वार भारी न्हावट हाय, त्येला साळंत तरी घाला. नुसतं भुतावाणी हिंडतंय.'

'नका, तेवढं बोलू नका!' नाना म्हणाला, 'हे प्वार मास्तराला मुतवंल नि मुतलास का म्हणून मग हागवंल. ह्यो बिब्बा हाय.'

ते बोलत बोलत गावदरीला आले. त्याच वेळी गावाकडून बंडू सेवरा आला. त्याला पाहून नाना नि भुजा दचकले. नानानं थांबून रामराम केला. बंडू म्हणाला,

'आज मळ्यात डावरा हाय. आजपासनं माझं गुऱ्हाळ उभं ऱ्हातंय. पाच बकरी मारल्याती, तवा जेवाय ये. गावाला आवातणं देऊन आलोय,' असं म्हणून सेवरा कैकाड्याकडं फिरून म्हणाला, 'ए कैकाडी, तूबी ये, कडाण खाया.'

कैकाडी मागं सरला नि नुसतीच मुंडी डोलावू लागला. सेवरा मळ्याकडं गेला. तेव्हा कैकाडी खालच्या आवाजात म्हणाला,

'खरंच बाबा भूत! तुमी रामराम केला तवा सेवऱ्यानं रामाचं नाव घेतलं न्हाय.'

'अगदी बराबर!' नाना कैकाड्याची तारीफ करीत म्हणाला, 'भुजा, तुला डोस्कं हाय बरं! आरं, म्या मुद्दाम रामराम ठोकला. पर भूतबी बेरकी हाय. त्येनं रामाचं नाव घेतलं न्हाय.'

'पण बाबा, ह्ये भूत गरीब हाय.' तुक्याला गप्प रहावलं नाही. नाना चिडला. त्यानं तुक्याच्या बोडक्या डोकीत जोरदार ठोसा हाणला, तशी त्याच्या तोंडातली उसाची चुई गळून पडली.

जेवणवेळ झाली होती. चंद्रप्रकाशात सृष्टी न्हाऊन निघाली होती, दुधासारखं चांदणं ओसंडत होतं. सेवरवाडीची कौलारू घरं चांदीच्या घरासारखी दिसत होती. भुताच्या मळ्यात कडाण खायला जावं की न जावं हा भयंकर पेच सेवरवाडीपुढं पडला होता. साऱ्यांची नानावर भिस्त होती. नाना आला तर आपण येणार असे सारेच म्हणत होते.

परंतु नानाचा तुक्या उघडा बोडका दूर उभं राहून ऐकत होता. त्यामुळं नाना कां कू करीत होता. आपण निघालो की, हा तुक्या येणार याची भीती नानाला वाटत होती.

सर्व तरणी माणसं एका लिंबाच्या झाडाखाली बसून विचार करीत होती. नाना म्हणाला,

'मला काई येता येत न्हाय, तुमी जावा—' आणि जवळच्या एका गावकऱ्याच्या कानात कुजबुजला, 'आरं, आमचा तुक्या अजून निजला न्हाय. भुतावाणी उभा हाय.

तुमी चला म्होरं, तुक्या निजला की मी येतोच.'

'चलू या. नाना न्हाय आला तर न्हाय येऊ दे. आपून जायचं. चला.'

सर्व एकमेकांच्या कानात फुसफुसले आणि बैठक मोडली. एकजण नानाला हळूच म्हणाला,

'नाना, लवकर ये. कडाण उलगल्यावर येऊ नगं.'

पुष्कळ माणसं निघून गेली आणि नाना चरफडत अंथरुणावर पडला. तुक्यानं बाप निजल्याची खात्री करून घेऊन मगच अंग टाकलं. नानाला त्या पोराचा राग आला, पण करणार काय? एकुलतं एक नि वाकडं! मारावं तर तुक्याची आई मारू देत नव्हती. नानाचा नुसता कोंडमारा होत होता.

बाप जात नाही म्हणून तुक्या निर्धास्त झाला.

परंतु पोराचा लोढणा झालाय. आपण कुठं जाऊ शकत नाही. हे पोर नसून भूत आहे. मारावं तर मरंल. न मारावं तर मागचं टळत नाही, असा विचार करीत नाना पडला होता. वरचेवर तुक्या निजला की नाही याचा कानोसा घेत होता.

उशिरानं तुक्या घोरू लागला. नानाला आनंद झाला. तुक्याच्या अंगावर घालून तो उठला. बायकोला जागं करून म्हणाला,

'मी निघालो — डावरा जेवायला.'

'जावा, निजला तुका.' बायकोनं नानाला सांगितलं.

नाना काठी, घोंगडं घेऊन बाहेर पडला. गावची माणसं बरीच पुढं गेली म्हणून त्यानं जवळची वाट धरली. तो माळानं जलद निघाला. तेव्हा आकाशात राखी रंगाच्या ढगांनी गर्दी केली होती. पूर्ण चंद्र त्या ढगांच्या घड्या तुडवीत भरधाव पळत होता. तो दडत लपत मार्ग आक्रमीत होता. चंद्र ढगात दडला की, सृष्टीवर अंधार पडत होता. आणि बाहेर आला की, प्रकाश उधळला जात होता. सृष्टीला रुपेरी मुलामा चढत होता. नाना पाया गती देत होता. तो माळानं धावत निघाला होता. क्षणोक्षणी तो आपला वेग वाढवीत होता.

चालता चालता त्याच्या डोकीत भुताचा विचार जागा झाला, अन् हळूहळू वाढू लागला. थोड्याच वेळात त्या विचारानं अक्राळविक्राळ स्वरूप धारण केलं. भूत अनंतरूपी असतं! ते वाटेल ते रूप घेऊन माणसाला मारतं. कधी साप होतं, कधी कुत्रं, तर कधी बाई होतं. एखादा पहिलवान मरून त्याचं भूत झालं तर ते माणसाला अडवून कुस्ती खेळतं. एखादी बाई असेल, तर ती पुरुषाला अडवून हैराण करते. एकूण माणूस हा भुतापुढं असमर्थ ठरतो नि मरतो...

असा विचार करीत नाना निघाला होता. एकाएकी तो थांबला. त्यानं हळूच वळून पाहिलं. पाठीमागच्या लवणाच्या माथ्यावर एक कुत्रं दिसलं. तो कान टवकारून नानाकडं

पाहत उभं होतं. 'ह्ये कुत्रं कुणाचं?' नानानं स्वत:ला प्रश्न विचारून 'असंल गावातलं!' असं स्वत:च उत्तर दिलं. मग त्यानं आजूबाजूला पाहिलं. सर्वत्र बाभळीची, बोरीची झाडंझुडपं मुरटा होऊन बसली होती. ती दबा धरून बसल्याचा आभास निर्माण झाला. नाना मनात भ्याला. प्रत्येक झुडपाकडे निरखून पाहू लागला. रोजची झुडपं त्याला विचित्र दिसत होती.

'आपून उगंच घाबरलो.' असं म्हणून तो हसला. इतक्यात त्याच्या पायाखालून काहीतरी सळकन झुडपात शिरलं. तसा तो पुन: चमकला. नकळतच भ्याला आणि आपण असे भितो का म्हणून स्वत:वर चिडला.

सृष्टी अंधारातून प्रकाशात ये-जा करीत होती. माळांवरची वाकडी-तिकडी बाभळीची झाडं वातावरण विद्रूप करीत होती.

नानानं उभं राहून मागं पाहिलं, तेव्हा ती कुत्र्याची आकृती उभी होती. फर्लांगभर दूर असलेल्या कुत्र्याचा चेहरा निरखण्याचा नाना प्रयत्न करू लागला. उंचच्या उंच कान, तीक्ष्ण डोळे, रुंद जबडा, असं भयाण कुत्रं नानाला दिसू लागलं, तसा तो बिचकला. हे कुत्रं गावचं नसून भूतच असावं असं समजून पाय काढला. तो झपाट्यानं निघाला. भुताच्या विचारानं त्याला घेरलं. ती भीती झटकून टाकण्याचा तो प्रयत्न करू लागला. चंद्र ढगातून बाहेर आला आणि नानानं पुन: वळून पाहिलं, तेव्हा त्याला ते कुत्रं दिसलं नाही. त्या जागी एक मानवाकृती दिसली. तोच चंद्र ढगात शिरून अंधार झाला नि त्या अंधारात ती माणसाची लहानशी आकृती नानाला उंच भासू लागली. मग मात्र नानाची पाचावर धारण बसली. आणि त्यानं पळायचा विचार केला. तो गर्रकन् फिरून भुताच्या मळ्याकडं पळू लागला. पळत पळत त्यानं मागं पाहिलं. तेव्हा पाठीमागचं भूतही पळत असल्याचं त्याच्या लक्षात आलं. आणि त्यानं अधिक जोरानं धूम ठोकली.

माळ सरला होता. आणि नाना एका पांदीत शिरून पळत होता. ती पांद दुतर्फा असलेल्या झाडांनी झाकली होती. त्यामुळं अंधार भरला होता. पण जिथं झाडांची पानं तुरळक होती तेथून तेवढा प्रकाश पांदीत गळत होता. आणि त्या पांदीत अंधार नि प्रकाश एक जागी अगदी पाठीला पाठ लावून बसल्याचं दृश्य दिसत होतं.

पांदीत नानाला धीर आला. तो अंधारात दडून बसून पाहू लागला. कुत्रं होतं ते माणूस कसं झालं? आपण पळून तरी काय होणार? भूत आपणाला पहाणार! असं म्हणत तो पुन्हा उठला. त्यानं आपल्या मार्गानं परत पाहिलं, झाडाच्या पानांतून गळणाऱ्या प्रकाशात ती आकृती पुढं पुढं येत असल्याचं दिसत होतं. ती जलद चालत होती. अंधारातून प्रकाशात नि प्रकाशातून अंधारात शिरत होती. तिच्या पायाखाली पांदीतील वाळू सळसळ होती. नाना भयभीत होऊन पुढं चालत होता आणि ती आकृतीही त्याच्याच वेगानं पळत होती. पांदीत पळापळ सुरू होती.

नानाला दरदरून घाम फुटला होता. अंगावरची सारी कापडं भिजली होती. डोकीचं पागुटं विस्कटलं होतं. हातातील काठी आवळून त्याच्या हाताला थेटा आला होता. त्याला धाप लागली होती. पांद संपत नव्हती अन् तो भुताचा मळा जवळ येत नव्हता.

भुताचा मळा जवळ येताच नानाला धीर आला. आणि तो स्वत: संतापला. दणका देऊन पळायचं, असा विचार करून तो थांबला. त्यानं चाचपून एक दगड घेतला आणि दबा धरून पाहू लागला.

त्या गडद अंधारातून ती आकृती दिसत नव्हती. परंतु वाळूत खसखसत तिची पावलं नानाकडं येत होती. नाना एका झाडाच्या बुडख्याला दगड घेऊन बसला होता. दणका देऊन पळायचं हा निश्चय पक्का झाला आणि ती आकृती वैतागून पळत आली. नानानं अंधारात कानोसा घेतला. अंदाज करून जोरानं दगड हाणला अन् तितक्यात जोरानं पळ काढला. एक भयंकर किंकाळी त्याच्या पाठीवर टक्करली.

नाना भुताच्या मळ्यात आला, तेव्हा त्याला आनंद झाला. जणू काहीच घडलं नाही. असा आविर्भाव करून तो हसला. जेवला आणि सर्व मंडळी सेवरवाडीला निघाली. नानाला दम निघाला नाही, तो म्हणाला,

'मर्दा, मला भुतानं गाठलं व्हतं!'

'मग काय केलंस?' सर्वांनी एकच प्रश्न केला.

आणि नानानं सर्व कथा सांगितली. बोलत बोलत सर्वजण सेवरवाडीत आले नि घरोघर गेले. नाना आपल्या घरी गेला. त्यानं अंधारात तुक्याला चाचपून पाहिलं. तेव्हा तुक्या अंथरुणावर नव्हता. नानाला धक्का बसला. त्यानं बायकोला जागं करून विचारलं,

'तुक्या कुठाय?'

'असंल की अंथरुणावर!' बायको उत्तरली.

आणि नाना घाबरला. त्यानं दारात येऊन आरडाओरडा केला. आळीतील सारी माणसं उठली. नंतर सर्व सेवरवाडी उठली. नाना रडू लागला. त्याची बायको ऊर बडवू लागली. एकदम गलका वाढला. सारा गाव बोलू लागला, 'आरं, तुक्या कवासा गेला?' 'आरं, कुठं गेला?'

एक म्हातारा ओरडला, 'आरं प्वाराला हाक तरी मार!'

नानानं हाक मारली – 'तुक्या ऽऽऽऽ –' त्याचा पल्लेदार आवाज रात्रीची चिरफाड करीत दूर गेला. नाना चरफडून बसला. आपल्या मागं कुत्रं दिसलं! मग माणूस दिसलं!! आपण अंधारात दगडाचा दणका दिला!!! ते कोण? नानाच्या डोकीत पुन: विचार घण घालू लागले.

'नाना, तुला भुतानं कुठं गाठलं व्हतं?' एकानं विचारलं.

नाना म्हणाला, 'चावऱ्याच्या पांदीत.'

'मग तू काय केलंस?' दामू मास्तरनं नानाला विचारलं.

'म्यां दगड हाणून पळ काढला.' नाना म्हणाला.

'कंदील, मशाली पेटवा.' मास्तर म्हणाला – 'चला, तुक्याला शोधू या.'

लोकांनी पलिते, कंदील पेटवले. आणि ज्या वाटेने नाना भुताच्या मळ्याकडे गेला होता त्या वाटेने पळत गेले.

पांदीत तुक्या पडला होता. त्याचं डोकं फुटलं होतं. तो रक्तात पडून कण्हत होता. त्याला पाहून नानानं तोंडात मारून घेतलं. नि मास्तर म्हणाला,

'गावाकडं त्याला पळवा. जिवंत आहे.'

तुक्या मरता मरता वाचला आणि तुक्याच्या जाचातून नानाची सुटका झाली. आठ दिवसांनी तुक्या हिंडू फिरू लागला. पण नानाबरोबर फिरायचं त्यानं बंद केलं.

एकदा नानानं विचारलं,

'भूत गरीब असतं न्हाय का?'

'छा, गा. भूत वंगाळ असतं!' तुक्या उत्तरला आणि नाना हसला.



# स्मशानातील सोनं

शेजारच्या गावात एक बलाढ्य सावकार मरण पावल्याची बातमी ऐकून भिमानं ताडकन उडीच मारली. त्याला समाधानाचं भरतं आलं. आनंद त्याच्या हृदयात मावेनासा झाला. त्यानं त्या गावाकडे पाहून भरर्कन आपली नजर आकाशात सूर्याकडे झुगारली.

सूर्य तेव्हा मावळत होता. आकाशात पावसाळी ढगांनी गर्दी केली होती. ते नांगरून पडलेल्या जमिनीप्रमाणे ओबडधोबड दिसत होतं. त्या अक्राळविक्राळ ढगांतून मावळता प्रकाश मुंबईवर वर्षत होता.

वारा मंद वहात होता. त्यामुळे ते घनदाट जंगल करकरत होतं आणि त्या जंगलात वसलेली ती पत्रास झोपडी भेदरली होती. जुने पत्रे, चटया, फळ्या, पोती यांनी तिथं घरांचा आकार घेतला होता नि त्या घरात माणसं राहत होती. बेकार वस्तूंनी तिथं बेकारांवर छाया धरली होती. दिवसभर पोटाच्या पाठी धावून दमलेली माणसं आता तिथं स्थिरावली होती. सर्व चुली पेटल्या होत्या. हिरव्या झाडीतून शुभ्र धूर रेंगाळत होता. पोरं खेळत होती. एका प्रचंड चिंचेखाली भिमा विचारमग्न बसला होता. त्याच्या हृदयात भयंकर हुरहूर उठली होती. त्याला त्या मेलेल्या सावकाराची ओढ लागली होती. त्याचा आत्मा कित्येक वेळा त्या गावच्या स्मशानात जाऊन परत त्या चिंचेखाली येत होता. भिमा पुनः पुनः सूर्याकडे पाहून त्या गावाकडे पाहत होता. त्याला आता अंधाराची गरज होती. म्हणून तो चुळबुळत होता. त्याची लाडकी लेक नार्बदा जवळच खेळत होती आणि बायको घरात भाकरी थापीत होती. हा भिमा अंगापिंडानं जबरा होता. लाल रंगाचा मोठा पटका, पिवळे धोतर, जाड कापडाची पैरण, असा त्याचा सातारी पोषाख होता. तो भर पहिलवानासारखा दिसे. त्याचं प्रचंड मस्तक, रुंद गर्दन, दाट भुवया, पल्लेदार मिश्या, रुंद पण तापट चेहरा पहाताच कित्येक दादांना हुडहुडीच भरत असे.

भिमाचं गाव दूर वारणेच्या काठी होतं. पण रेड्याचं बळ असूनही पोट भरत नाही म्हणून तो मुंबईला आला होता. मुंबईत येऊन त्यानं काम मिळावं म्हणून सारी मुंबई पालथी घातली होती. पण त्याला काम मिळालं नव्हतं. आपणाला काम मिळावं, आपण कामगार व्हावं, पगार आणावा, बायकोला पुतळ्यांची माळ करावी अशी कित्येक स्वप्नं फाटून भिमा निराश होऊन त्या उपनगरात, जंगलात आला होता. मुंबईत सर्व आहे, पण काम आणि निवारा या दोन गोष्टी नाहीत; त्यामुळं त्याला मुंबईचा राग आला होता. आणि त्या उपनगराजवळ येताच शेजारच्या डोंगरात, एका खाणीत त्याला कामही मिळालं होतं.

त्या जंगलात काम आणि निवारा मिळताच भिमाला आनंद झाला होता. तो आपलं रेड्याचं बळ घेऊन त्या डोंगराला जणू टक्करच देत होता. त्यानं टिकाव घेताच डोंगर मागं सरकत होता. त्यानं सुतकी उचलताच काळे पाषाण तोंड पसरत होते. त्यामुळे कंत्राटदार त्याच्यावर खूष होता. आणि भिमाही संतुष्ट होता; कारण त्याला पगार मिळत होता.

परंतु सहाच महिन्यात ती खाण बंद पडली आणि भिमावर बेकारीची कुऱ्हाड कोसळली. तो एका सकाळीच कामावर रुजू झाला आणि लगेच त्याला समजले की आजपासून ही खाण बंद झाली. आपलं काम सुटलं ही वार्ता ऐकूनच भिमा भांबावला.. उपासमार त्याच्यापुढे नाचू लागली. क्षणात तो विवंचनेच्या डोहात बुडाला. आता उद्या काय हा एकच प्रश्न तो स्वत:ला विचारू लागला.

अंगातील कापडं काखेत दाबून भिमा घरी निघाला होता. तो एका ओढ्यावर थांबला. त्यानं तिथं आंघोळ केली आणि उद्विग्न मन:स्थितीत तो घराकडे फिरला. तोच त्याची नजर एका राखेच्या ढिगावर स्थिरावली. ती राख मढ्यांची होती. जळकी हाडं सर्वत्र पसरली होती. त्या मानवी हाडांच्या जळक्या खुळप्या पाहून भिमा अधिकच गंभीर झाला. एखादं बेकार असेल बिचारं. कंटाळून मेलं असेल. सुटलं असेल एकदाचं — असं मनाला सांगू लागला. आपणही असेच मरणार! दोनच दिवसांत उपासमार सुरू; मग नाबदा रडत बसेल. बायको मलूल होईल आणि आपण काहीच करू शकणार नाही —

इतक्यात त्या राखेच्या ढिगावर काही तरी चमकलं. तसा भिमा पुढे झाला. त्याने वाकून, निरखून पाहिलं. तिथं एक तोळ्याची सोन्याची आंगठी होती. ती चटकन उचलून भिमानं करकरून मूठ दाबली. त्याला आनंद झाला. एक तोळा सोनं आणि तेही मढ्याच्या राखेत, याचा त्याला हर्ष झाला. मढ्याच्या राखेत सोनं असतं याचा त्याला नवा शोध लागला. जगण्याचा नवा मार्ग सापडला.

आणि दुसऱ्याच दिवसापासून भिमा या प्रदेशात सर्वत्र हिंडू लागला. नदी नाल्यातले मसणवटे तुडवू लागला. प्रेताची राख जमवून ती चाळणीनं चाळू लागला. आणि रोज त्या राखेतून सोन्याचे कण काढू लागला. बाळी, मुदी, नथ, पुतळी, वाळा असे काही ना काही घेऊन रोज येऊ लागला.

भिमाचा हा नवा उद्योग जोरात सुरू होता. तो निर्भय होऊन राख चाळीत होता. अग्नीच्या दाबानं प्रेताच्या अंगावरचं सोनं वितळून त्याच्या हाडात जातं याचा त्याने ठाव घेतला. जळकी हाडं चेचून तो त्यातून सोन्याचे कण काढी. कवट्या फोडी. मनगटं कुटी. पण सोनं मिळवी.

संध्याकाळी तो कुर्ल्याला जाऊन ते सोनं विकून रोख रक्कम मोजून घेई, आणि घरी येते वेळी नार्बदासाठी खजूर घेई. त्याचा तो धंदा अखंड चालला होता.

भिमा प्रेताची राख चाळून जगत होता. त्यामुळे जगणे नि मरणे यातील अंतरच त्याला कळेनासे झाले होते. ज्या राखेत सोनं असेल ती राख श्रीमंताची आणि सोनं नसेल तरी गरीबाची अशी त्याची ठाम समजूत झाली होती. मरावं तर श्रीमंतानं नि जगावं तर श्रीमंतानं. गरीबानं मरूच नये असा त्याचा दावा होता. अवमानित पामराला जगण्याचा नि मरण्याचा मुळीच अधिकार नाही, असं तो शेजाऱ्यांना दरडावून सांगत होता. जो मरतेसमयी तोळाभर सोनं दाढेत घेऊन मरतो तो भाग्यवान असतो असं त्याचं मत होतं.

बेकारीच्या उग्रतेनं त्याला उग्र केला होता. तो रात्रंदिवस मसणवटी धुंडाळीत होता. मढं हे त्याच्या जीवनाचं साधन झालं होतं. त्याचं जीवन मढ्याशी एकरूप झालं होतं.

त्याच दरम्यान त्या भागात अनेक चमत्कार घडत होते. पुरलेली मढी बाहेर पडत होती. एका सावकाराच्या तरुण सुनेचे प्रेत तर स्मशानातून नदीवर येऊन पडले होते, आणि त्या प्रकारामुळे कित्येक लोक भयभीत झाले होते. अलीकडे मढी नदीपर्यंत कशी जातात याचं त्यांना नवल वाटत होतं. कोणी तरी प्रेत उकरून काढीत असावा असा संशय येऊन पोलीसखातं पाळतीवर होतं. पण मढ्यावर पाळत करणं तितकं सोपं नव्हतं.

सूर्य मावळला. सर्वत्र अंधार पसरला. भिमाच्या बायकोनं भिमाला जेवण वाढलं तेव्हा तो गंभीर होऊन जेवू लागला. आज हा कुठंतरी जाणार हे लक्षात येऊन ती हळूच म्हणाली, 'आज कुठं जाणार वाटतं? मला वाटतं, हे काम नको आम्हाला. कुठं तरी दुसरं काम करा. मढं, मढ्याची राख, सोनं, संसार हे सारंच विपरीत आहे. लोक नावं ठेवतात—'

'तू बोलू नको!' तिचं बोलणं ऐकून भिमाचं मन दुखावलं. तो चिडक्या स्वरात म्हणाला, 'मी काहीही करीन. त्यात काय जातं? माझी चूल बंद झाल्यावर कोण पेटवणार आहे का?'

'तसं नव्हे —' नवऱ्याचा तो उग्र चेहरा पाहून ती हळूच म्हणाली, 'भुताखेतासारखं हे हिंडणं चांगलं नाही. मला भीती वाटते म्हणून म्हणते.'

'मसणवट्यात भुतं असतात असं तुला कोणी सांगितलं? अग, ही मुंबई एक भुतांचा बाजार आहे. खरी भुतं घरात राहातात आणि मेलेली त्या मसणवट्यात कुजतात. भुतांची पैदास गावात होते - रानात नाही.' भिमा म्हणाला.

त्याचं हे बोलणं ऐकून ती गप्प झाली आणि भिमानं निघण्याची तयारी केली. तो गुरकून म्हणाला, 'मुंबई चालून मला काम मिळालं नाही. पण मढ्याची राख चाळून सोनं मिळालं. डोंगर फोडला तेव्हा दोन रुपये दिले मला. पण आता सहज ती राख मला दहा रुपयेही देते —' असं म्हणून तो घराबाहेर पडला, तेव्हा बरीच रात्र झाली होती. सर्वत्र नि:शब्द शांतता नांदत होती नि भिमा निघाला होता.

भिमा अंधारातून निघाला होता. त्यानं डोकीला टापर बांधली होती. वर पोत्याची खोळ घातली होती आणि कंबर बांधली होती. काखेत एक आणीदार पहार घेऊन तो ढेंगा

टाकीत होता. त्याच्या सभोवती घोर अंधार थैमान घालीत होता. त्याला कसलीही भीती वाटत नव्हती. सकाळी एक लुगडं, एक परकर पोलका, खजूर, एवढाच तो विचार करीत होता. आज तो बिथरला होता.

वातावरण घुमत होतं. क्षणोक्षणी गंभीर होत होतं. मध्येच एखादं कोल्ह्याचं टोळकं हुकी देऊन पळत होतं. एखादा साप सळसळत वाट सोडून जात होता. दूर कुठं तरी घुबड घूत्कार करून भेसूरतेत भर घालीत होतं. त्या निर्जन जंगलात सर्वत्र ओसाड दिसत होतं.

कानोसा घेत भिमा त्या गावाच्या जवळ आला. त्यानं खाली बसून दूर पाहिलं. गावात सामसूम झाली होती. अधून मधून कोणी तरी खाकरत होतं. एखादा दिवा डोळे मिचकावीत होता. परिस्थिती अनुकूल आहे असं पाहून भिमाला आनंद झाला. आणि तो चटकन स्मशानात शिरून त्या आजच्या सावकाराची नवी गोर शोधू लागला. फुटकी गाडगी, मोडक्या किरड्या बाजूला सारीत या गोरीवरून त्या गोरीवर उड्या मारीत निघाला. प्रत्येक ढेपणीपाशी जाऊन काडी ओढून पाहू लागला. एका रांगेनं तो निर काढीत निघाला होता.

आकाशात ढगांनी गर्दी केली होती. त्यामुळे अंधार अधिकच काळा झाला होता. पण एकाएकी वीज उठली होती. ती ढगांच्या कप्प्यात नाचत होती. पाऊस पडण्याचा संभव वाढला होता. त्यामुळे भिमा घाबरला होता. पाऊस पडला की नवी गोर सापडणार नाही याची त्याला चिंता पडली होती, म्हणून तो चपळाई करीत होता. त्याला घाम फुटला होता नि तो भान हरपला होता.

मध्यानरात्रीपर्यंत त्यानं सारं स्मशान चाळलं. या टोकापासून त्या टोकाला तो जाऊन पोहोचला आणि भयचकित होऊन मटकन बसला. वारा भरभरत होता. मोडक्या किरडीच्या जुन्या झावळ्या फडफडत होत्या. जणू कोणी तरी दातच खात असावं, तसं ऐकू येत होतं आणि त्यातून भयंकर गुरगूर उठत होती. कोणी तरी गुरगुरत होतं, मुसमुसत होतं आणि माती उकरीत होतं. त्याला नवल वाटलं. तो पुढे सरकला तोच सर्व काही शांत झालं. आवाज येईनासा झाला. परंतु लगेच कोणीतरी हातपाय झाडीत असल्याचा भास होऊन तो चमकला, खटकन जागीच थांबला. विद्युत गतीनं भीती त्याच्या देहातून सरकून मस्तकाकडे धावली. आयुष्यात आजच तो प्रथम भयभीत झाला.

परंतु दुसऱ्याच क्षणी त्यानं स्वत:ला सावरलं. खरा प्रकार त्याच्या लक्षात आला आणि तो स्वत:च खजील झाला. कारण जवळच ती नवी गोर होती, आणि दहापंधरा कोल्ही जमून तिला चौफेर उकरीत होती. त्यांना मेलेल्या माणसाचा वास लागला होता. गोरीवरचे दगड तसेच ठेवून दुरूनच त्यांनी घळी पाडायला प्रारंभ केला होता. आजूबाजूनं गोर उध्वस्त करायचं काम ती करीत होती. परंतु पुन: त्यांच्यातही भयंकर स्पर्धा निर्माण

झाली होती. प्रथम मढ्याजवळ कोण जाणार या ईर्षेनं ती एकमेकांवर गुरगुरत होती, पुन: नाकानं वास घेत होती आणि प्रेताचा वास येताच ती सर्व शक्ती एकवटून माती ओढीत होती.

हा प्रकार लक्षात येताच भिमा चिडला. त्यानं प्रचंड झेप घेतली आणि तो धपकन त्या गोरीवरच जाऊन बसला. लगेच गोरीवरचे दगड उचलून त्याने त्या कोल्ह्यांच्या टोळीवर हल्ला चढवला.

अचानक झालेल्या त्या भडिमारानं कोल्ही चमकली, दचकली नि मुरून बसली. तसा भिमाला चेव आला. कोल्ह्यांआधी आपणच गोर उकरायची असं ठरवून तो गोरीवरची माती काढू लागला.

आणि याच वेळी कोल्ह्यांनी भिमाला पाहिला. एक कोल्हा पिसाट होऊन भिमावर धावला. क्षणात भिमाचा लचका तोडून तो पुढे पळाला. अंगावरचं पोतं फाटलं हे पाहून भिमा दु:खित झाला. त्याचं सर्वांग शहारलं. हातातील पोतं झटकून तो कोल्हा पुन: भिमावर धावला नि भिमा त्याच्याशी झुंज घ्यायला तयार झाला. त्यानं हातातील पहार सरळ धरली. कोल्हा पुढे येताच त्यानं दणका दिला. झपाट्यानं कोल्हा गारद झाला. बाजूला पडून त्यानं पाय खोडून प्राण सोडला नि रणधुमाळी सुरू झाली. पुन: भिमा गोर उकरू लागला आणि मग सर्व कोल्ही त्याच्यावर तुटून पडली. भयंकर युद्धाला प्रारंभ झाला.

भिमानं निम्मी गोर उकरून मढे अर्धे उघडे केले होते. पण कोल्ह्यांच्या हल्ल्यापुढे तो भांबावून गेला आणि हातात पहार घेऊन त्यानेही प्रतिकाराला सुरवात केली होती. चारी बाजूने कोल्ही त्याच्यावर धावत होती आणि जिकडून कोल्हे येईल तिकडे तो दणका मारीत होता. कोल्हे तिरपडून पडत होते आणि अचानक त्याचा लचका तोडून पळत होते.

गावाच्या शेजारी ते अभूतपूर्व युद्ध पेटलं होतं. कुंतीपुत्र भीमाचं नाव धारण करणारा तो आधुनिक भीम कोल्ह्यांशी लढत होता. उद्याच्या अन्नासाठी, मढ्यासाठी, आपली सर्व शक्ती पणाला लावून लढत होता. पशू आणि मानव यांचे मृतदेहासाठी दारुण रण पेटलं होतं.

सृष्टी निद्रा घेत होती. मुंबई विश्रांती घेत होती. तो गाव निपचित पडला होता. आणि त्या स्मशानात सोन्यासाठी नि मढ्यासाठी झटापटीला जोर चढला होता. भिमा प्रहार करून कोल्ह्यांना पाडीत होता. कोल्ही त्याचा मार चुकवून त्याचा लचका तोडीत होती, किंवा त्याच्या मारानं घायाळ होऊन किंचाळत होती. भिमा लचका तुटताच विव्हळत होता. शिव्या देत होता. शिव्या, मार, गुरगुरणे, किंचाळणे यामुळे ते स्मशान थरारले होते.

कितीतरी उशिराने कोल्ह्यांचा हल्ला थांबला. अंधारात दबा धरून ती सर्व कोल्ही विश्रांती घेऊ लागली. आणि तो अवसर मिळताच भिमाने त्या गोरीतील ते प्रेत माती काढून मोकळं केलं. तोंडावरचा घाम पुसून टाकला. आणि तो त्या गोरीत उतरला. तोच पुनः कोल्ही तुटून पडली नि पुनः हाणामारीला सुरवात झाली. परंतु भिमाच्या प्रचंड शक्तीपुढे अखेर कोल्ही पराभूत झाली. त्यांनी आपला पराजय कबूल केला.

आणि लगेच भिमानं त्या प्रेताच्या काखेत हात घालून जोरानं ते प्रेत उपसून वर काढलं, मग काडी ओढून प्रेताची पाहणी केली. दडदडीत ताठलेलं मढं त्याच्या पुढं त्या गोरीत उभं होतं. त्यानं चपळाई करून त्या प्रेताचा हात चाचपून पाहिला. एक अंगठी सापडली. कानात मुदी होती. ती भिमानं ओरबाडून काढली. नंतर त्याला आठवण झाली की प्रेताच्या तोंडात नक्की सोनं असणार. त्यानं त्याच्या तोंडात बोटं घातली. पण प्रेताची दातखिळी घट्ट बसली होती. क्षणात त्यानं आपली पहार प्रेताच्या जबड्यात घालून त्याची बचाळी उचकटली. एका बाजूनं ती पहार जबड्यात घालून दुसऱ्या बाजूनं त्यानं आपली बोटं त्या प्रेताच्या तोंडात घातली आणि त्याच वेळी दबा धरून बसलेल्या कोल्ह्यांनी कोल्हेकुई केली. सर्वांनी हुकी देऊन पळ काढला, पण त्यांच्या त्या ओरडीनं गावातली कुत्री जागी झाली. आणि कुत्र्यांनी गाव जागा केला. 'आरं कोल्ह्यांनी प्रेत खाल्लं, चला —' असं कोण तरी ओरडलं न ते ऐकून भिमा घाबरला. त्यानं प्रेताच्या तोंडातून एक अंगठी काढून खिशात टाकली आणि घाईघाईनं पुनः डाव्या हाताची बोट प्रेताच्या दाढेत घालून सर्व कोपरे चाचपून पाहिले आणि —

आणि बोटं काढून नंतर पहार काढण्याऐवजी प्रथम त्यानं पहारच काढली. खटकन त्याची बोटं प्रेताच्या दातात अडकली. अडकित्त्यात सुपारी सापडावी तशी सापडली. भयंकर कळ त्याच्या अंगात कळवळली.

आणि त्याचवेळी गावाकडून कंदील घेऊन माणसं येत असलेली दिसली. तसा भिमा भयभीत झाला. त्यानं बोटं काढण्याची शिकस्त केली. त्याला प्रेताचा राग आला. त्याचेकडेच येणारी माणसं पाहून तो अधिकच चिडला. त्याने हातातील लोखंड प्रेताच्या टाळूवर जोराने मारले. आणि त्या दणक्यानं त्याची बोटं अधिकच अडकली. प्रेताचे दात बोटात रुतले. त्याच्या अंगात मुंग्या उठल्या. हेच खरं भूत, हे आज आपल्याला पकडून देणार, लोक येऊन प्रेतासाठी मला ठार करतील. नाही तर मारमारून पोलिसांच्या हवाली करतील असं वाटून भिमा अगतिक झाला. वैतागला, निर्भान झाला. सर्व शक्ती एकवटून तो प्रेतावर प्रहार करू लागला. 'भडव्या, सोड मला.' तो जोरानं ओरडला.

गावकरी जवळ येत होते. भिमा अडकला होता. मग त्यानं विचार केला आणि नंतर पहार त्या प्रेताच्या जबड्यात घातली आणि मग हळूच बोटं ओढून काढली. तेव्हा ती कातरली गेली होती, फक्त चामडीला चिकटून लोंबत होती. ती तशीच मुठीत घेऊन

त्यानं पळ काढला. भयंकर कळ अंगात घेऊन तो पळत होता.

तो घरी आला तेव्हा त्याला भयंकर ताप भरला होता. त्याची ती स्थिती पाहून घरात रडारड सुरू झाली.

त्याच दिवशी डॉक्टरनं भिमाची ती दोन बोटं कापून काढली.

आणि त्याच दिवशी खाणीचं काम पुन: सुरू झाल्याची बातमी आली. ती ऐकून हत्तीसारखा भिमा लहान मुलाप्रमाणे रडू लागला. कारण डोंगर फोडणारी ती दोन बोटं तो स्मशानातील सोन्यासाठी गमावून बसला होता.

# प्रायश्चित्त

सुभद्रा नि लीला काम करीत होत्या. दगड भरणाऱ्या यंत्राच्या जबड्यात त्या दगड लोटीत होत्या. त्या दोघी स्वच्छ सारख्या रंगाची लुगडी नेसल्या होत्या. त्यांचा ओतीव बांधाही सारखाच दिसत होता नि त्यांच्या वयात मुळीच अंतर जाणवत नव्हते. पाणीदार टपोरे डोळे, नोकदार नाक, तरतरीत तोंडावरील चेहऱ्यावरचा हासरा भाव, यामुळे त्या दोघी उठून दिसत. शिवाय देखण्या म्हणून तिथे त्यांची ख्याती होती. भर उन्हात त्या दगड वहात होत्या. त्यांची हालचाल मोहक होत होती. दुपारच्या उन्हाने अन् श्रमाने त्यांच्या चेहऱ्यावर घामाचे बुंद जमले होते. त्यांच्या भरदार उरोजाला नाजूक हादरे बसत होते नि त्यांच्या रसरशीत पोटऱ्या तटतटत होत्या. त्यांच्याकडे वाकड्या नजरेने पाहण्याची कुणाला हिंमत होत नसे; कारण त्यांचे कुंकवाचे धनी उमा आणि बळी हे दोघे जवळच होते. ते दोघे दोनशे फूट उंचशा कड्यावर विद्युत बळावर चालणारी सुरुंगाची पहार दगडात रेटण्याचे काम करीत होते. तरुण, बलिष्ठ, तापट म्हणून त्या दोघांचा त्या सर्व कामगारांवर भलताच दरारा होता.

तिथे डोंगर फोडण्याचे काम चालू होते. ज्यांना मुंबईत काम मिळत नव्हते अशा माणसांनी तो युगानुयुगे एका जागी बसलेला डोंगर अर्धा कापला होता. अगदी मुंगीने मेरू ओढून न्यावा तसे आश्चर्य घडले होते. पार शेंडीपासून पायापर्यंत तो डोंगर तासून काढल्यामुळे पाचशे फूट उंचीचा सरळ कडा उभा होता. त्याच्या मस्तकावर मेखा मारून तळापर्यंत प्रचंड दोर सोडले होते आणि त्या दोरांना धरून अंतराळात माणसे काम करीत होती. तिथे श्रमशक्तीला महापूर आला होता. तिच्या आघातापुढे काळे पाषाण तडकत होते.

दगड भरडणाऱ्यांची धडपड, पहारींचा तो खणखणाट, सुतकीचे घाव याने वातावरण हादरत होते. दगड घेऊन मोटारी पळत होत्या. धूळ नि सुरुंगाच्या दारूची उग्र घाण याने वारा पेंगुळला होता, आणि त्या दंगलीत माणसाचे शब्द भुईसपाट होऊन बळ गतिमान झाले होते.

बळी आणि उमा ह्यांच्या हातातील पोलादी पहारी लोण्यात तप्त सळी शिरावी तद्वत विद्युत बळाने दगडात मुरकंड देत होत्या आणि ते तरुण अंतराळात त्या पहारी पेलीत होते. ते दोघे सख्खे मेहुणे होते. सुभद्रा ही बळीची बहीण होती आणि उमाला दिली होती, तर उमाची बहीण लीला ही बळीला दिली होती. त्यांची साटेलोटे या पद्धतीने

लग्ने झाली होती. अगदी एका तिथीला, एका मांडवात, एका बोहल्यावर, एकाच भटाने त्या चौघांवर तांदूळ टाकले होते आणि लग्न होताच ते दोघे आपल्या बायका घेऊन मुंबईला आले होते नि आपल्या त्या कामावर रुजू झाले होते. तेव्हापासून ते अंतराळात त्या दोरावर लटकत दिवसभर सुरुंगाचा नेम घेत आणि संध्याकाळी सुरुंग पेटवणाऱ्या बत्तीवाल्याचे जादा कामही करीत. त्यामुळे त्यांना तीन तीन रुपये जादा मिळत. शिवाय सुभद्रा व लीला याही आता कामाला लागल्या होत्या. त्या चौघात रोज अठरा रुपये प्राप्ती होई.

परंतु आपल्या नवऱ्यांचे ते सुरुंग पेटवण्याचे काम त्या दोघींना मुळीच आवडत नव्हते. ते त्या दोराने वर जाताच त्या दोघींचा जीव कासावीस होई. जिवावरचे ते काम करून जेव्हा ते सुखरूप खाली येत तेव्हा कुठे त्या दोघींच्या चेहऱ्यावर आनंद तळपे; मग त्या कोंडलेले नि:श्वास सोडीत नि मग ती चौघे हासत घरी जात. परंतु ती भीती त्यांच्या मनात कायमचीच घर करून बसली होती. ती रोज त्या दोघींना भेडसावीत होती. जर तो सुरुंग लवकर पेटला तर –

त्या चौघांचे ठीक चालले होते. बायकोचे तीन नि नवऱ्याचे सहा या हिशोबाने त्यांचे सुरेख बस्तान बसले होते. आता त्यांना खेड्यावरचा दुष्काळ जाणवत नव्हता. उलट महिन्याला चार रुपये ते गावी पाठवीत होते व स्वत: खाऊन सुखी होते. कष्ट तर त्यांच्या आंगवळणीच पडले होते. त्यातच खाण-मालकाने कामगारांसाठी उभारलेल्या झोपड्यातील एक झोपडी त्या चौघांना मिळाली होती. त्या एका झोपडीत त्यांच्या दोन चुली, दिवे, दोन तवे, कामापुरती भांडी असा संसार होता. झोपडीत मधोमध दोन लाकडी पेट्या लावून पलीकडे बळी-लीला ही दोघे राहत आणि अलीकडे उमा नि सुभद्रा यांनी संसार मांडला होता.

परंतु ती चौघे नात्याने एक होती. एकाला काटा टोचताच दुसऱ्याला कळ येत होती. परकेपणाची ही भावनाच तिथे उत्पन्न होत नव्हती. पलीकडे माझा भाऊ आहे ह्याची सुभद्रेला कल्पना होती, तर अलीकडे माझा भाऊ आहे असे लीला समजत होती. तीच समजूत बळी नि उमा यांची होती. त्या घरात त्यांनी कष्ट करून आनंद, हर्ष यानें ते झोपडे भरले होते. त्यांचा संसार सुखी होता.

त्यांचे ते झोपडे त्या शेकडो झोपड्यांच्या मधी होते. अनेक लोकांनी तिथे गर्दी केली होती. अनेक जातींची नि रंगांची, गुणांची अशी माणसे तिथे राहत होती. कोण दिवसभर मुंबईत भीक मागून येत तर काही जुने कागद जमा करीत, तर काही मुंबई पोलिसांनी हद्दपार केल्यामुळे झोपड्यात येऊन दिवसभर काम करीत नि रात्री दारू काढीत. डोंबारी, डवरी, कंजारी, वंजारी, फासेपारधी, वडार अशा अठरापगड जातींचे तिथे एकत्रीकरण झाले होते. काम करू शकणारी खाणीत काम करीत. पंगू, म्हातारी, पोरे ही भीक मागत

नि जगत.

तिथे दारूवाले राजाच्या दिमाखाने वावरत. ते उधार दारू पाजून महिन्याला शेकडो रुपये वसूल करीत नि काम करून थकलेला प्रत्येक माणूस त्यांचे बांधील गिऱ्हाईक असे. त्या वस्तीत एक आगळी दुनियाच वसली होती. ती सारी माणसे दिवसभर काम करीत नि रात्री कोण गात, कोण देवाची भजने करीत, तर कोण दारू पिऊन ती वस्ती थरारून सोडीत. कधी हाणामाऱ्या करीत, तर कधी एकमेकांवर चाकू खोलून तुटून पडत. रडत, कढत, झगडत ती सारी माणसे त्या वस्तीत दिवस काढीत होती.

परंतु उमा व बळी ह्यांचे नाव कोणीच काढीत नसत. उलट त्या सर्व वस्तीवर त्या दोघांचाच दरारा होता. कारण ते तरुण होते. त्यांच्या अंगी बळ होते. ते खूप कष्ट करीत, खूप मिळवीत आणि कोणावर कधीच अन्याय करीत नसत.

परंतु अलीकडे ते दारू पीत होते. रजा असेल त्या दिवशी दारू घेता घेता आता ते रोजच घेऊ लागले होते. त्या वस्तीत सारेच दारू पीत होते. दारू पिणे हे एक मोठेपणाचे लक्षण सारेच मानीत. कैक भट्टीवाले बाटल्या घेऊन त्यांच्या मागे लागत. दारूचे उत्पन्न अधिक असल्यामुळे ती चहाप्रमाणे मानली जात असे. आणि आपल्या नवऱ्यांचे ते वागणे, ते दारू पिणे त्या दोघींना आवडत नसे. त्यांचा दारूला विरोध होता, पण तो दारू वाईट म्हणून नव्हे; तर दारूपायी पैसे जातात म्हणून!

सूर्य मावळतीला गेला. सहा वाजले आणि सुटी झाली. एकाएकी सर्व काही शांत झाले. विद्युत पहारी स्थिर झाल्या. दगड भरणारी ती यंत्रे गपकन थांबली. आपापले कपडे काखेत घेऊन माणसे झोपडपट्टीकडे धावत निघाली. मग ती खाण निर्जन झाली नि सुरुंग पेटताहेत हा इशारा देणारी शिटी वाजली आणि गंभीर वातावरण निर्माण झाले. हातात बत्त्या घेऊन बळी आणि उमा त्या दोरावरून अंतराळात निघाले. सुभद्रा नि लीला दूर उभ्या राहून त्या कड्याकडे पाहू लागल्या.

सुभद्रा नि लीला दूर उभ्या होत्या. त्यांच्या नजरा पण त्या कड्यावर स्थिरावल्या होत्या. त्यांचे जीव त्यांच्या डोळ्यात आले होते. त्यांचे सर्वस्व त्या दोरावरून धावत होते. त्या निःश्वास रोखून पाहत होत्या. बळी नि उमा यांनी त्या दोरावरून धावत सर्व वातींना पेट दिला नि चपळाईने ते दोनशे फूट कडा चढून भर्रकन वर निघून गेले आणि गपकन त्या दोघींनी तो रोखलेला निःश्वास सोडला आणि पुन्हा निःश्वास कोंडेपर्यंत देवाची नावे घेतली, मनातल्या मनात देवाचे आभार मानले आणि ते दोघे जवळ येताच त्या लहान मुलाप्रमाणे खुदकन हासल्या आणि नव्या दमाने आपल्या खोपीकडे निघाल्या.

आणि वातीने आग सुरुंगांना भिडवली. तो डोंगर धडधडून पेटल्याचा भास झाला. त्याने सारा प्रदेश हादरला. प्रचंड दगड गगनात जाऊन जमिनीवर आले. जमिनीवरचे क्षणभर नाचले. धुळीने वाऱ्याचे तोंड लाल केले.

ती चौघे बोलत बोलत त्या तळ्याजवळ आली. त्या तळ्यातील निळी कमळे नि हिरवीगार पाने यांनी तळ्याचे पाणी झाकून टाकले होते. वाऱ्याच्या नाजूक धक्क्याने ती निळी कमळे मंदगतीने डोलत होती. त्यांच्याकडे सुभद्रेने भर्कन नजर फेकली आणि शेजारची म्हातारी तिला दिसली. ती म्हातारी अर्धे लुगडे नेसली होती आणि अर्धे धुऊन पसरून वाळवीत होती. जीवनातील मोठा पेचप्रसंग तिने सोडवला होता. तिला सुभद्रा म्हणाली,

'आज्ये, दिस बुडाला की!'

'बुडू दे', म्हातारी विजयी मुद्रा करीत म्हणाली, अर्धं लुगडं आज धुऊन झालं. आता उद्या अर्ध पिळून काढीन. चल, आले मी –'

एवढ्यात झिंगऱ्या धावत आला. तो एका पायाने लंगडा होता आणि दादागिरीसाठी त्याने आपले सर्व दात गमावले होते. तो एका पायाचा माणूस पोलिसांना डोईजड झाल्यामुळे त्यांनी त्याला त्या खाणीत काम करायला भाग पाडले होते. परंतु झिंगऱ्या गहूभरही नमला नव्हता. तो दिवसा काम करीत होता नि रात्री दारू काढीत होता. त्या खाणीतील ते काम त्याच्या फायद्याचे ठरले होते. कारण त्याला निवारा, गिऱ्हाईक, भांडवल हे सारे तिथे मिळत होते. म्हणून तो उलट पोलिसांचे आभारच मानीत होता.

झिंगऱ्या धापा टाकीत म्हणाला,

'उमाजी, कुठं निघाला?'

'कुठं म्हंजी? घराकडं रं!' उमा उत्तरला नि झिंगऱ्या लटकाच राग आणून म्हणाला,

'ए काय रं हाय घरात? याड बीड लागलं का तुमास्नी? घर न् काम, काम न् घर.'

'ए बाबा, जाऊ दे आमास्नी आपल्या घराला.'

सुभद्रा फणकारली आणि झिंगऱ्या गर्वाने उसळून म्हणाला,

'घर! कुणाचं घर? आगं माझे आई, ती चिमनलालशेटची मेहरबानी होय–'

'तुला काय आगेपिछे सारखंच.' लीला भुवया चढवीत म्हणाली,

'हात धरावा तर रोकडा नि शेंडी धरावी तर–'

'बोडका–' झिंगऱ्या मध्येच मोठ्याने ओरडला आणि पोट धरून हसू लागला.

'ए बोडक्या, म्हननं काय तुझं?' बळीने विचारले आणि एकदम गंभीर होऊन झिंगऱ्या म्हणाला,

'माल काढलाय आज एक नंबरचा.'

'पेटव तुझा माल.' सुभद्रा खेकसली, 'नगं आमास्नी त्यो.'

'आरं तुम्हाला कोन घे म्हणतो,' झिंगऱ्या आश्चर्य व्यक्त करीत म्हणाला, 'मी बळी नि उमा ह्यास्नी सांगतोय. नि खरं सांगू, माझा आजचा माल पेटवूनच देणार हाय मी –'

'उधार देणार?' उमा गुरकला.

'मीच काय, माझा बाप देईल.' झिंगऱ्या उत्तरला.

'दोन बाटल्या—' बळीने दोन बोटे पुढे केली आणि झिंगऱ्या म्हणाला,

'एकच बाटलीत तुम्ही दोघे आकाशात जाऊन परत याल आन् डोकीवर चालाल डोकीवर. आनि दोन घ्याल तर तुम्ही सर्कस कराल नि पोलीस रिंगमास्तर बनून तुमाला नाचवील आणि माझं दिवाळं निघंल.'

झिंगऱ्याच्या या बोलण्याने ती चौघेही हासत सुटली. मग झिंगऱ्या त्या दोघांना घेऊन निघाला.

'तुम्ही चला, आम्ही येतो चक्कर मारून.' असे म्हणून ते दोघे झिंगऱ्याबरोबर चालू लागले आणि त्या दोघी वळून घराकडे निघाल्या. सुभद्रा मध्येच थांबून म्हणाली,

'लौकर यायचं - वाट बघाय लावू नका.'

'नका, नका. जेवून निजा.' बळी म्हणाला आणि पुढे चालू लागला. झिंगऱ्याला शिव्या देत त्या दोघी घराकडे वळल्या.

सर्वत्र गडद अंधार भरला होता. त्या अंधारात ती वस्ती मेंढराच्या खांडासारखी बसली होती. एखाद्या वेड्याने चिंध्या पांघराव्यात तद्वत ती घरे कळाहीन दिसत होती. उदास वाटत होती. त्या वस्तीत मध्येच एखादी वाऱ्याची झुळूक शिरत होती आणि त्या वाऱ्याच्या धक्क्याने जुने पत्रे करकरत होते. त्यामुळे कुणीतरी संतापून दात खात आहे, असा भास होत होता.

अगदी थोड्याच अंतरावर समोरासमोर दोन टेकड्या उभ्या होत्या नि त्या दोन टेकड्यांच्या दोन मस्तकांवर प्रचंड असे दोन लाल रंगाचे दिवे क्षणोक्षणी पेटून विझत होते. त्या दोन दिव्यांच्या मधून विमानाचा मार्ग होता. टेकडीवर टक्कर घेऊ नये म्हणून ते दिवे विमानांना धोक्याचा इशारा देण्याचे काम अखंडपणे करीत होते. मध्येच एखादे विमान भिरभिरत येऊन त्या खिंडीमधून झेप घेऊन उतरत होते.

रोज कितीतरी विमाने त्या वस्तीवरून ये-जा करीत होती. त्या विमानांतून जगातील कैक श्रेष्ठ माणसे मुंबईला जात होती. त्यात विद्वान, पंडित, शास्त्रज्ञ असत. भारतीयच नव्हे, तर जगाच्या संस्कृतीची ज्यांना तळमळ लागली आहे असेही थोर आत्मे असत. कैक राजे महाराजे असत. कित्येक भारतरत्न, पद्मश्री असत. तर कोणी महाकवी, मोठे साहित्यिक, कादंबरीकारही असत. पण त्यापैकी एकालाही ती वस्ती दिसत नव्हती. दिल्लीच्या आसपास त्या जुन्या थडग्यातच भारतीय संस्कृती आहे असे समजणाऱ्यांना त्या वस्तीत माणूस राहतो एवढेसुद्धा जाणवत नव्हते. आधुनिक जग त्या वस्तीपासून फक्त पंधरा मैलांवर थांबले होते. कारण त्या वस्तीजवळ एक मैलाचा दगड छाती काढून उभा होता आणि तो इंग्रजी भाषेत सांगत होता, मुंबई - पंधरा मैल!

बारा वाजून गेले. सुभद्रा-लीला बसून कंटाळल्या. त्यांची कष्टाने थकलेली शरीरे

पेंगळून गेली. डोळ्यात झोपेचा दर्या जागा झाला. चरफडत त्यांनी दिवे मालवले, अंथरुणावर अंगे टाकली. विश्रांतीसाठी हपापलेली शरीरे निर्जीव होऊन घोरू लागली.

रात्र अधिकच काळी होत होती. त्या सामसूम झालेल्या वस्तीत एकाएकी कोण तरी बरळत होते. मध्येच एखादे पोर किंचाळत होते, घुशी दौडत होत्या, मांजरे भेसूर सूर काढून एकामेकांपुढे बसून ओरडत होती. तळ्यावर पाणी पिण्यासाठी आलेली कोल्ही जाताना हुकी ऽऽ हू अशी हुकी देत पळत होती आणि अशा थाटात ती रात्र पुढे सरकत होती.

बळी आणि उमा एकमेकांचा आधार घेत कसे तरी दारात आले. मग त्यांनी स्वत:ला सावरीत, रांगत त्या खोलीत मुरकंड दिली. त्यांचे पाय जमिनीवर ठरत नव्हते. ते गरगर फिरत होते. हळूच अंथरूण लागेल तिथे ते आडवे झाले. आपण घरात आहोत एवढीच त्यांना जाणीव होती. आणि आपल्या शेजारी कोण केव्हा येऊन निजले आहे हे सुभद्रा नि लीला या दोघींना मुळीच ठाऊक नव्हते. कारण असेच ते रोज येत नि त्यांच्या शेजारी पडत; तेव्हा आजचेही त्यांचे येणे काही नवीन नव्हते!

थोडे क्षण आले नि गेले. झोपेत देहाला स्पर्श झाला आणि मग तरुण देहात एक विचित्र धग आली. भावना गतिमान झाल्या. त्या बेशुद्ध स्थितीत बेबंद झाल्या. झोपेने नि श्रमाने भरलेल्या डोळ्यात धुंदी भरली आणि-आणि सर्व काही शांत शांत झाले. निद्रेने हळूच त्यांच्यावर पांघरूण घातले आणि त्यांची हृदये शांत स्पंदन करू लागली. नाकातून ये-जा करणारे नि:श्वास निर्भय ये-जा करू लागले. घोरण्याचा दीर्घ नाद उमटू लागला. परंतु या अंधारात, त्या स्थितीत रेशमासारखी नाजूक नाती कापराप्रमाणे भर्रकन केव्हा पेटली हे कुणालाच उमजले नाही.

ती रात्र संपत आली होती. सूर्योदय समीप येऊन ठेपला होता. सारी वस्ती जागी झाली होती. रात्रीची विश्रांती घेऊन श्रमशक्ती पुन्हा सज्ज झाली होती. खाणकामगार जागे झाले होते. त्यांच्या चुली पेटल्या होत्या.

सुभद्रा नि लीला ह्यांनाही जाग आली. त्यांनी गडबडीने उठून प्रथम दिवे लावले. दोन चुलींवर दोन दिवे पेटले. त्यांचा कापरा प्रकाश त्या खोपीत थरथरला आणि त्या दोघींच्या नजरा आपापल्या अंथरुणाकडे वळल्या. स्वत:च्या अंथरुणावर स्वत:चे भाऊ पाहताच त्यांच्या दृष्टीत कंप भरला. त्या चरफडल्या आणि त्यांच्या दृष्टीपुढे रात्रीचे ते प्रसंग साकार झाले. विध्वंसक सुरुंगांना वातीने आग पोचवावी तसे घडले. त्यांच्या हृदयांनी भडभडून पेट घेतला. अग्नीपेक्षाही दाहक अशी पश्चात्तापाची आग त्यांच्या मस्तकाकडे सरकून त्या क्षणात वेडावल्या. जिभा निष्प्राण झाल्या. शब्द थिजले. आशा, आकांक्षा, हर्ष, आनंद हे सर्व भाव त्यांच्या त्या डोळ्यांत जळून भस्म झाले. त्यांना प्रकाशाची भीती वाटू लागली नि त्यांनी दिवे मालवले, पुन्हा अंधार झाला. भयंकर

अंधारातही ती हृदयाची आग शांत न होता परत वेगानेच उठली आणि पश्चात्तापाने त्यांना त्या तळ्याकडे भिरकावून दिले. नंतर उमा उठून नाहीसा झाला. मग बळीही घराबाहेर पडला. एकमेकांना क्षणभर न विसरणारी ती माणसे एकमेकांना कायमची अंतरली. कुणालाच कुणाचा पत्ता नव्हता.

परंतु जगाचे चक्र आपल्या नियमाच्या चाकोरीतून फिरत होते. सूर्य मावळत होता. खाणीतील माणसे त्या सूर्याकडे पहात काम करीत होती. तिथे बळी, उमा, सुभद्रा, लीला ही चौघे नव्हती. त्यांची कुणी चौकशीही केली नाही. सर्व काही पूर्वीप्रमाणे चालू होते. ती म्हातारी त्या तळ्यावर आली होती. तिने काल न धुतलेले आपले अर्धे लुगडे आज धुऊन वाळत घातले होते नि अर्धे नेसून ती सुभद्रा, लीला यांची वाट पाहत होती.

थोड्याच वेळात खाणीला सुटी झाली. कामगार आपापल्या घराकडे पळत सुटले. खाण रिकामी झाली आणि मग सुरुंग पेटल्याचा इशारा देणारी शिटी वाजली. हजारो माणसे ती सुरुंगाची मौज पाहण्यासाठी तळ्याकाठी थांबली.

आणि हातात बत्ती घेऊन बळी कड्याकडे निघाला. त्याच्याबरोबर उमा नव्हता. बळी एकटाच सुरुंग लावण्याचे वेळी अचानक आला होता. तोच झिंगऱ्या धावत आला नि त्याला थांबवून म्हणाला, 'आरे उमा कुटं हाय? आणि आज येणार का? माल नवा काढलाय —'

बळी काहीच बोलला नाही. त्याने पायाशी पडलेला एक नारळाएवढा दगड उचलून एकाच दणक्यात झिंगऱ्याला आडवा पाडला आणि दुसरा एक मोठा दगड उचलून तो त्याच्या डोकीत घातला. त्या दगडाखाली डोके चेचून टाकलेल्या सापाप्रमाणे वळवळत पडलेल्या झिंगऱ्याकडे मुळीच न पाहाता बळी दोराने वर सरकला.

बळीने झिंगऱ्याला ठार मारले हे लोकांनी पाहिले होते. ते त्याचा विचार करीत होते, तोच बळीने सर्व सुरुंगांना बत्ती दिली आणि मग तो तिथेच शांत उभा राहिला. पुन्हा लोकांना धक्का बसला. शेकडो लोक एकदम ओरडले 'बळी, पळ!!!'

बळी मुळीच हालला नाही. तो जागीच उभा होता. त्या लहानशा वातीने आगीचे कण दारूला भिडवले आणि डोंगराला आग लागली. धडाड् धडाड् असे एकापाठी एक स्फोट होऊ लागले. आणि मग बळीच्या पायाखालीच एक धडाका झाला नि तो दगडाप्रमाणे आकाशात उडाला आणि पुन्हा दगडाप्रमाणे खाली आला.

सुरुंग पेटून झाले. लोक पुढे धावले तोच ती म्हातारी मोठ्याने ओरडली. त्या दंगलीत तिकडे कुणीच लक्ष दिले नाही. बळी नि झिंगऱ्या यांच्या प्रेताजवळ लोकांनी गर्दी केली. अधिकाऱ्यांनी पोलिसांना फोन करून खबर दिली.

एवढ्यात त्या म्हातारीने बोंब ठोकली. मग मात्र लोक तिकडे धावले आणि तळ्याकाठी गेले. तेव्हा त्यांना दुसरा प्रचंड धक्का बसला. ते डोळे फाडून तळ्यात पाहू लागले.

सुभद्रा नि लीला ह्यांची दोन प्रेते पाण्यावर तरंगत होती. निळ्या कमळाच्या फुलांनी आणि पानांनी गर्दी केली होती. त्या गर्दीत ते तरुण देह शांत पडले होते, त्यांच्या रसरशीत चेहऱ्यावर त्या फुलांनी प्रेमळ छाया धरली होती. त्यांनी हासरे डोळे निर्मळ आकाशाकडे रोखले होते. पूर्वीइतक्याच निर्भय त्या दिसत होत्या. त्यांना पाहताच शेकडो डोळ्यांत सागर गदगदला. सारी माणसे तिथे आली. स्त्रिया-मुले रडू लागली!

बळी, सुभद्रा, लीला व झिंगऱ्या यांच्या मरणाने त्या वस्तीवर दारुण दु:खाची छाया पसरली. सर्व लोक पोलिसांची वाट पाहू लागले. आणि एका कातोड्याने खबर आणली, की उमाचे मढे एका बिबीच्या झाडाला लटकत आहे. मग सर्वच लोक तिकडे धावत निघाले आणि पुढून पोलिसांची जीप धडधडत आली.

पोलिसांनी तो सर्व प्रकार शांतपणे पाहिला. गंभीर मुद्रा करून पुष्कळ विचार केला. मग सर्वांनी जाऊन उमाचे प्रेत पाहिले. परंतु खरे काय याचा कोणालाही पत्ता लागला नाही. मानवाने पवित्र म्हणून जी नाती निर्माण केली, जी बंधने घातली, त्यांचा भंग होताच त्या चार जिवांनी स्वत:च्या जीवनाचा तो घोर अंत करून घेतला होता. भारतीय संस्कृतीच्या रक्षणार्थ ते बलिदान होते. ते घोर, घोर असे प्रायश्चित्त होते!

परंतु पोलीस मात्र आत्महत्या की खून या विचारात गिरक्या मारीत होते. शेवटी त्यांनी तीन आत्महत्या, एक खून आणि एक अपघात अशी नोंद केली.

त्याच वेळी एक मोठे विमान त्यांच्या डोकीवरून भर्रकन निघून गेले!



# अमृत

तो मांडीएवढा नाग जिवाला कडकडून चावू लागला. एखाद्या पिसाळलेल्या कुत्र्याप्रमाणे त्याचे लचके तोडू लागला. निम्मा साप दोन्ही हातांनी धरून जिवा त्याला हसडू लागला.

माझं काळीज थरारलं. मी हातात फरशी, कुऱ्हाड घेऊन नुसता पाहत राहिलो. माझ्यापुढे अंधार दाटला आणि जिवा एकटाच मरणाशी लढू लागला.

शिवार धुंद भासत होतं. झाडंझुडपं पानांनी बहरली होती. पावसानं झोडपलेली धरणी अजून धापा टाकीत होती. ओल झिरपत पाताळात निघालं होतं. रानात एकूण एक जांभळं पिकली होती. ते जांभळाचे दिवस होते. पोरांना जांभळांची तलफच होत होती. गावची सारी पोरं जांभळावर तुटून पडत होती. साऱ्यांच्या पैरणी डागाळल्या होत्या. कैकांच्या जिभा जड झाल्या होत्या. कैकांचे घसे दोरटले होते.

पाटलाच्या रघूला ह्या जांभळावाचून अन्न खाववत नव्हतं. तो ढेकर येईपर्यंत जांभळं खात होता. भर उन्हात जांभळीवर दगड फेकीत होता. दणक्यात जांभळाची सरकंड लागत होती. मग दगडफेक बंद करून तो जांभळानं तोबरा भरीत होता. पुन: दगड सुरू. त्या नादात तो भान हरपला होता. जांभळीवरच्या त्या प्रचंड नागाला कधी टिप्पीरा बसला हे त्याला कळलं नाही. वरची जांभळं खाली कधी पडतात एवढंच तो पाहत होता आणि बकाणं भरीत होता.

दगडानं खवळलेला नाग चिडला. तो गुमान खाली उतरला, रघूला न दिसता झुडपांच्या आडून तो हळूच त्याच्या मागं आला. अगदी जवळ आला आणि पुढं जांभळांच्या नादाला लागलेल्या रघूवर त्यानं झेप घेतली, कडाडून चावा घेतला आणि पुन: अडचणीत शिरला.

रघूनं बोंब ठोकली — 'मला साप चावला!'

आणि मग सारा पाटीलवाडाच बोंबलू लागला. एकुलता एक रघू निघाला. धावपळ झाली. मांत्रिक आला. रघूला देवळात नेण्यात आले. लिंबाचा पाला वाटून रस पाजला. परंतु काहीच गुण आला नाही. घटकाभरानं रघूनं डोळे झाकले. उभ्या गावाला हादरा बसला.

मला तो हादरा भलताच जाणवला. निरपराध मुलाचा बळी पडला. सर्प म्हणजे मूर्तिमंत मरण, असा विचार करीत मी बसलो होतो, इतक्यात जिवा आला. अंगापिंडानं

सडपातळ, मानेपर्यंत लांब केस, वर शुभ्र ऐटबाज पागोटं, सावळा चेहरा, घारीसारखे तीक्ष्ण डोळे, अंगात पैरण, धोतर, खांद्यावर उपरणं आणि सदा हसतमुख आणि अत्यंत नम्र म्हणून जिवाची ख्याती होती. गोड गळ्यानं भजनं गाणारा, एकदम आवाज चढवून परंतु हसत बोलणारा एक शहाणा माणूस म्हणूनच मी त्याला ओळखत होतो.

जिवाची सासुरवाडी, आजोळ, बहिणीचं सासर एकाच गावी असल्यामुळं तो आठ दिवसात निदान दोन वेळा तरी नक्कीच पाचुंब्रीला जात असे आणि पाचुंब्रीची वाट माझ्या दारावरून गेल्यानं तो आठ दिवसात दोन वेळा तरी नक्कीच माझ्याकडे येत असे. शिवाय पाचुंब्रीची रखवालदारी आमच्याकडे असल्यामुळे नातंही जवळचं लागत होतं. तो मला 'हवायी' म्हणत असे. कारण त्याची मालकीण ही माझ्या गावची लेक. तेव्हा ती माझी बहीण आणि जिवा माझा मेव्हणा हे नातं असल्यामुळं तो मला हवायी म्हणत होता. तो आला की मला आनंद होई. चहा, गांजा, गप्पा झाल्या की जिवा पाचुंब्रीची वाट धरी. कधी मला बरोबर काढी आणि मीही जाई.....

आज जिवा आला. परंतु माझा उतरलेला चेहरा पाहून किंचित नरमला. हसता हसता एकदम गंभीर होऊन त्याने विचारले,

'काय हवायी, काय भानगड?'

'काय न्हाय, बरं हाय नव्हं?'

'मी बरा हाय खरं. पण ह्यो मुकवटा सुकल्यावानी का दिसतोय? का कुठं झंगाझंगी केली?'

'पाटलाचा रघू मेला!'

'आँ? आवं कशानं?' तो चरकला नि उद्गारला.

'त्येला साप चावला!–'

'साप चावला? आवं कवा?'

'मढं वाटं बी लावलं.'

'अरारा! वाईच लौकर आलू आसतो तर बरं झालं असतं. घात झाला!' जिवा मटकन बसला. बराच उशीर बोलला नाही. मग मी विचारलं, 'काय झालं असतं, तुमी असता तर?'

'आवं प्वार मेलं नसतं!' तो उदास होऊन म्हणाला, 'आता वाईच माझ्यासंगं चलता?'

'कुठं चलता?' मी विचारलं. आणि तो घाई करीत म्हणाला,

'त्या जागी! जिथं त्यो साप चावला तिथं!'

'काय करनार तुम्ही?' मी विचारलं.

'मी त्यो साप बघतो, चला.' असं म्हणत त्यानं मला ओढीतच काढलं. आम्ही दोघं त्या जांभळीखाली गेलो आणि जिवा त्या सापाला शोधू लागला. एकादा दागिना

शोधल्याप्रमाणे शोधून थकला. उशिरानं आम्ही परत फिरलो.

घरी येताच त्याने कपडे काढले. पटका खुंटीला लावला. खिशातून एक नवी रेशमी पिशवी काढून जोत्यावर ठेवली. हातात पाण्याचा तांब्या घेऊन तो पाय धुवायला निघाला. परंतु पुन्हा उंबरठ्यात एकदम थांबून म्हणाला,

'ए सोयरं! त्या पिशवीला हात लावू नगा!'

'का? काय हाय त्ये?' पिशवीकडे पहात मी विचारले आणि हसत जिवा म्हणाला,

'आवं, त्यात मरान हाय — मरान.'

'मरान म्हंजी?' मी बिथरलो.

'म्हंजी तीच भानगड.' जिवा म्हणाला, 'मी खिशात मरान घेऊनशान फिरत असतो.'

मला त्याचं बोलणं समजलं नाही. मी पहातच राहिलो. तोच जिवा आला. चुलीवर चढलेला चहा पाहून त्यानं समाधान व्यक्त करीत खिशातून गांजाची कळी काढली नि ती मळीत तो बोलू लागला,

'सगळ्या मरनात सापाचं मरान चांगलं. पटकन जीव जातो. मानसाचं हाल व्हत न्हायती.'

'नव्हं, गांजा ओढायच्या आधीच चढली का काय?'

मी त्याला मध्ये थांबवून विचारलं आणि तो मोठ्यानं हसला —

'आईच्या रक्ताच्यान!' हसं आवरीत गळ्यावर हात ठेवीत जिवा म्हणाला, 'सापाचं मरान सोन्यागत असतं.'

हे ऐकून मी पुन: चिमटा घेतला — 'मग का दम धरलाय? मरू नव्हतं?'

तो पुन्हा हसला. त्यानं चिलीम भरली. नारळाच्या कोयराचा विस्तव वर ठेवून आढ्याकडे पहात तो ओरडला —

'नाऽथ, चल साथ, मार दुस्मनकू लाथ. खिलाव दुधभात, काळभैरवऽऽ' जिवानं छाती ठोकली नि चिलीम तोंडाला लावून झुरका मारला. चिलमीवर जाळ झाला. मग माझ्या रोखानं धुराचा लोंढा सोडीत तो म्हणाला,

'मारा की एक झुरका, मामाची नजर चुकवून!'

माझ्या नाकातोंडात धूर शिरून माझं डोकं गरगरू लागलं. मी चहाचा कप पुढं करीत म्हणालो, 'बरं, त्या बारा भानगडी मला नगा सांगू. त्या पिशवीत काय तेवढं काढा बरं भाईर.'

'आँ: खरंच की!' असं म्हणून त्यानं चहा नि गांजा संपवून मग ती पिशवी घेतली आणि अगदी गंभीर मुद्रा करून जपून त्या पिशवीचं तोंड सोडलं. त्याबरोबर एक दाभणासारखा साप बाहेर आला. त्याला पटकन पकडून तो म्हणाला,

'ह्येला म्हणायचा बच्चा नाग. ह्यो चावला की मानूस पाणी देखील मागत न्हाय.

पटकन मरतं.'

तो साप पाहून मी जरा मागं सरलो. आईच्या कपाळावर आठी उमटली. मी बिचकून पहात प्रश्न केला,

'ह्ये कशाला पाळलंय?'

'कशाला म्हंजी? आवं, हावसेनं वं.' तो गुरकला.

'ही कसल हावस? मरायची?' मी उद्‌गारलो.

'हावसेला मोल नसतं, पाव्हणं.' तो मुंडी डोलवीत बोलला आणि मी तरकटलो –

'ही कसली हावस, खिशात मरान घेऊन फिरायची? एखाद्या दिसी मराल फुकट कुत्र्यावानी.'

जिवा काहीच बोलला नाही. त्यानं तो साप पुन: पिशवीत घातला. मग ती पिशवी उबदार खिशात घालून त्यानं पागोटं बांधलं आणि तो सासुरवाडीला निघाला. त्याला वाटं लावून फिरताना मी हाक मारून सांगितलं, 'पाव्हणं, ती पिशवी सासऱ्याच्या खिशात हळूच घाला. कटकट जाईल!'

त्यावर तो मोठ्यानं हसला आणि गेला. मी परत आलो. आई चिडली होती. ती म्हणाली,

'ह्ये पोरावानी वागणं बरं नव्हं.'

'त्ये कसं? पोरं का खिशात साप घेऊन हिंडत्यात?' मी म्हणालो. पुन: शब्द बदलून आई म्हणाली,

'म्हंजी येड्यावानी रं.'

'आता येडं तरी साप घेऊन फिरतं का?' मी विचारलं. आई निरुत्तर झाली. ती म्हणाली–

'मग ह्या ज़िवाला म्हनायचं तरी काय?'

जिवाला काय म्हणायचं हे मलाही कळत नव्हतं. अत्यंत विषारी, विद्रूप आणि साक्षात मृत्युसमान असलेल्या त्या प्राण्याबद्दल जिवाला भलतंच प्रेम वाटत होतं. कुठंही कधीही साप निघाला की जिवा धावत जात होता. कसलाही साप असो, तो त्याच्यावर डोळे झाकून झडप घेत होता. गरुडाचं नि सर्पाचं जसं पटत नव्हतं तसंच जिवाचं नि सर्पाचं पटत नव्हतं. त्याला पाहून कसलाही सर्प असो, तो जीव घेऊन पळत असे आणि जिवा त्याला ताणून पकडत असे. जसा गावला तसा धरून त्याला फिरवीत असे, मिरवीत असे. मग त्याचा चेहरा फुलत असे. तो विजयी मुद्रा करून त्या मृत्युसमान वाटणाऱ्या प्राण्याला कैद करून त्याची धिंड काढीत असे. ज्याचं नाव ऐकून लोक भयभीत होतात, जो चावण्यापूर्वीच माणसाचा जीव जातो, त्या सर्पाला जिवा चऱ्हाटाप्रमाणे चिलबिलत

असे. परंतु साप त्याला कधीच चावत नसे. यामुळे लोक म्हणत, 'जिवा मागच्या जन्मी मुंगास व्हता.' कोण म्हणत, 'जिवापाशी औषध हाय.' कोण सांगत, 'मुंगास ह्ये सापाला मारतं. त्येचं तुकडं करून एक तुकडा खातं नि परत सारं तुकडं जोडून एक मुळी आणून त्या सापाला परत जिवंत करतं, ती मुळीच जिवाला ठाऊक हाय म्हणून तर त्यो मरत न्हाय.–'

काहींचा कयास होता की, एकाद्या दिवशी हा जिवा साप चावूनच मरणार आहे.

परंतु मला काहीच उमगत नव्हतं. जिवाचं काय होणार? त्याच्याजवळ काय आहे? त्याला साप का चावत नाही? आणि जिवाचा शेवट कसा होणार?

दुसऱ्या दिवशी अंजूला-बहिणीला घेऊन जिवा आला. अगदी हसत आला. जसा गेला होता तसाच आला. अंजू पाणी पिऊन पुढं माहेरी निघाली. जिवानं चहाची टुंग काढली. त्यानं गांजा भरला आणि धुंद होऊन तो निघाला. बोलत बोलत मीही दारात आलो. मी विचारलं,

'पाव्हणं, त्ये कालचं सोनं कुठाय?'

'टाकलं पाचुंब्रीच्या एका वारुळात–'

'आवं त्ये वं का?' मी म्हणालो, 'त्ये सासऱ्याच्या घरात सोडायचं व्हतं–' हे ऐकून ती दोघं बहीणभावंडं हसली. मी बराच पुढं गेलो नि हळूच पुन: म्हणालो–

'पाव्हणं, एक गोष्ट इचारू?'

'इचारा की. एक का, दोन इचारा.'

'नव्हं, तुमास्नी साप चावत न्हाय?'

'त्ये का? चावतो की. मी का दगडी हाय?'

'मग तुम्ही मरत न्हायसा?' मी पुन: त्याला विचारलं.

'माझ्यापाशी औषद हाय,' जिवा गंभीर होऊन म्हणाला, 'न्हाय तर मी काय दगड हाय?'

'मग त्ये औषद मला सांगा.' मी म्हणालो, 'ते औषध मला पायजी. त्येचं नाव सांगा.'

हे ऐकून त्याचा चेहरा खर्रकन उतरला. बराच उशीर तो काहीच बोलला नाही. बिचारमग्न झाला. मग पुन: मी विचारलं,

'काय इचार करताय?'

'सापाच्या औषदाचा.' तो म्हणाला, 'ह्ये बघा, त्यो घोटाळा हाय, म्हंजी असं की, त्ये औषद असं कवाबी सांगायचं नसतं.' त्यानं उडवाउडवी सुरू केली. आणि मी आवाज चढवला.

'त्ये काई लगीन नव्हं', मी म्हटलं, 'औषदाचं नाव सांगाय येळ नि वकूत कशाला?'

'त्येचं असं हाय', तो मला विश्वासात घेत हळू म्हणाला, 'पुनवं दिसीच त्ये सांगावं अशी माझ्या गुरूनं मला ताकीद दिलीया. देवाच्यान!'

'म्हंजी पुनवं दिसी सांगाल म्हणता?' मी म्हटलं.

'आरीच्या! तुमी का कोन परकं हायसा?' असं म्हणून त्यानं पाय उचलला. ती दोघं आपल्या गावी गेली नि मी घरी आलो. पूर्णिमा कधी येते याचा विचार केला.

त्या दिवसापासून मला सर्पदंशावर चालणारी ती दिव्य औषधी समजून घेण्याचा जणू ध्यासच लागला. ते औषध आपणाला माहीत व्हावं नि आपणही कैक माणसांचे प्राण वाचवावेत, असं मला वाटू लागलं. त्याचबरोबर त्या सर्पजातीची मला भलतीच दहशत बसली. आणि चुकून जरी पाय लागला तरी क्षणात माणसाचे प्राण घेणाऱ्या त्या सर्पांना पकडणारा तो जिवा मला एखाद्या महारथीसारखा वाटू लागला. मी मनातल्या मनात जिवाचं कौतुक करू लागलो. धैर्य असावं तर असं. माणूस असावा तर असा.

मी जिवाची वाट पहात होतो. पूर्णिमा कधी येते यासाठी दिवस मोजत होतो. परंतु नेमकं उलटंच घडत होतं. पौर्णिमेच्या दिवशी मला जिवाची आठवण होत नव्हती. कधी मला नकळत पूर्णिमा येऊन जात होती, तर कधी पूर्णिमेच्या दिवशी जिवा येतच नव्हता, पूर्णिमा, जिवा आणि मी याची कधीच गाठ पडत नव्हती. ज्या दिवशी पूर्णिमा असेल त्या दिवशी जिवा येत नव्हता. आणि जिवा येत असे त्या दिवशी पूर्णिमा नसायची. मला ते औषध मिळत नव्हतं नि कळत नव्हतं. माझी आतुरता वाढत होती.

जिवाचा उपद्व्याप चालूच होता. तो मोठमोठाले सर्प धरीत होता. सर्पदंशानं मरणाऱ्या माणसांना वाचवीत होता. दूरदूरचे सर्पपीडित लोक जिवाकडे धाव घेत होते. त्याची ख्याती वाढत होती.

परंतु, 'तुम्ही का कोन परकं हायसा?' असं म्हणून गेलेला तो जिवा मला मात्र ते औषध सांगत नव्हता. चौवीस पूर्णिमा आल्या नि गेल्या. मला त्यानं बेमालून चकवलं. माझं मन दुखवलं. मला त्याचा राग येऊ लागला. 'तुमी का कोन परकं हायसा', असं म्हणणारा हा माणूस मतलबी आहे, अशी माझी खात्री झाली. आणि त्या औषधीचं रहस्य उघडं करण्याचा मीही निश्चय केला. वाटेल ते करायचं, परंतु जिवाच्या पोटातील ते रहस्य बाहेर पाडायचंच असा माझा निर्धार झाला. अगदी सर्प डोई पडावा तसा मीही जिवाच्या डोई पडलो.

एके दिवशी मी पूर्णिमेलाच त्याचे गावी गेलो. परंतु त्याच दिवशी जिवा पंढरीला गेल्याचे मला समजले. आणि मी पुनः निराश होऊन परतलो.

पुढं पुढं तो मला टाळू लागला, चुकवू लागला. अस्सल नागावर घालून घेणारा तो मला पाहताच बिचकू लागला. वाट वळती करून सटकू लागला. माझ्या घरी येणे त्याने

कमी कमी करीत बंद करून टाकले. माझी त्याने दहशत घेतली आणि मीही कुऱ्हाडीत दांडा ठोकून तयार जालो. त्याच्या पाळतीवर पडलो. पाचुंब्रीच्या वाटा मी रोखल्या. जिवाची नाकेबंदी झाली.

पौष महिन्याचं नरम ऊन पारच नरम आलं होतं. सूर्य पश्चिमेच्या बाजूवर कलता झाला होता आणि पौष महिन्यातील चावरी थंडी वाऱ्यावर आरूढ झाली होती. थंडीच्या नाजूक स्पर्शानं शिवार सजला होता. एकूण एक वृक्षाला नवा साज चढला होता. अठराभार तरूवर निःश्वास टाकीत होता. पिकं येऊन झडझीत झालेल्या जमिनी आकाशाकडे तोंड करून निश्चल पडल्या होत्या. रानफुलांच्या परिमळानं वातावरण उजळ झालं होतं.

मी आपलं घोडं लक्ष्मीच्या पांदीनं घराकडे काढलं होतं. घोडं तुर्की चालीवर निघालं होतं. आणि माझ्या घराची वाट वर्जून जिवा त्या पांदीनं पाचुंब्रीला निघाला होता. मला पहाताच तो थांबला नि मी घोडं आवरलं, त्याबरोबर चोरासारखा चेहरा करीत तो हासला नि म्हणाला,

'कसं काय हवाय, वारू कुठं न्हेला व्हता?' त्याचा तो निर्मळ, हसरा चेहरा पाहून मी सारंच विसरलो. घोड्यावरून उतरून मी विचारलं,

'घराकडं न्हाय गेला?'

'न्हाय! उशीर व्हयील नि डोळ्याच्या उजीडानं जावं म्हून आलू झटकन.' जिवा म्हणाला.

'चला घराकडे.' मी म्हटलं.

'नका, आता चलतो.' तो गयावया करीत उद्गारला.

'चला की, मी येतोय पाचुंब्रीला.' मी स्वर चढवला आणि जिवा म्हणाला,

'मग चला की, फिरवा घोडदळ मागं.' मला हसू आलं. मी म्हटलं,

'नगा, मी ह्ये घोडं बांधून चालतो.'

घोडं बांधून कुऱ्हाड घेऊन मी जिवाबरोबर पाचुंब्रीला निघालो. जिवा माझ्या मागं चालत होता. माझ्या डोकीत ते औषध नाचत होतं. ते मला कसं कळेल, हा कसं सांगेल, त्यासाठी काय करावं, याचा मी विचार करीत होतो.

'तुम्ही भलताच नखरा करता!' जिवानं माझी चेष्टा सुरू केली. तो रंगात आला.

'नखरा कसला केला म्या?' मी विचारलं.

'ही कुऱ्हाड कशाला घेतासा?' तो म्हणाला.

'मी संदी सिपाय हाय. नि सरळ बोटानं तूप निघत नसतं; वाईच वाकडं करावं लागतं.'

हे ऐकून तो एकाएकी गप्प झाला नि गुमानच चालू लागला. आम्ही आमची हद्द

मागं टाकून पाचुंब्रीच्या शिवारातून निघालो. माळरान मागं गेलं नि पाचुंब्रीचं कालवट लागलं. मैलभर पुढं पाचुंब्री उरली. त्याबरोबर जिवानं पायांना गती दिली.

'नव्हं, ते औषद तुम्ही सांगणार का न्हाय?' मी आपलं खुरपं पुन: लावलं आणि तो चमकून म्हणाला,

'हे बघा, आवं कृष्णाबाईच्यान, पुनवी दिसीच त्ये सांगायचं असतं- न्हाय तर मी काय खुळा हाय व्हय?'

'आवं पर ती पुनवी यीना नव्हं?' मी एकदम आवाज चढवला आणि तो दबकला. विचारमग्न झाला. पूर्णिमेचा टिप्पीरा बसून मी भडकलो. इतक्यात एकदम जिवा चमकला. ओरडला,

'आवं हवाय, साप—'

आम्हांपासून हात धोंड्याच्या अंतरावर मांडीसारखा प्रचंड नाग मंद गतीनं निघाला होता. पश्चिमेकडे निघालेल्या सूर्याची किरणं त्याच्या अंगावर चमकत होती. त्यामुळे तो नाग लखलखीत तलवारीसारखा भासत होता. तो शांत चालत होता. मंद चालीत स्वत:ला बाक देऊन, कधी सरळ होऊन, कधी एकदम मुरडाण घेऊन तो जात होता.

त्याला पहाताच जिवा हर्षभरित झाला. खांद्यावरचं धोतर फेकून मला न विचारताच तो नागाकडे धावला आणि अगदी चपळाईनं त्यानं त्या सर्पाला हात घातला.

जिवाचा हात लागताच वीज उसळावी तद्वत तो नाग उसळला. लखलखला, वळवळला, ताठ झाला. तरवारीच्या पात्याप्रमाणं सरळ होऊन क्षणात सटकून तो पुढं निसटला आणि त्याच्यात विजेची गती संचारली.

आणि जिवाच्या चेहऱ्यावरचे हास्य निमाले नि नम्रता ढळली. क्षणात तो उग्र झाला. ती चपल वीज जिवा आवरू लागला. गोळा करू लागला. जिकडे फिरेल तिकडे फिरून धरू लागला. नागानं निसटण्याची शिकस्त करून मग गर्दी करून, वाट करून निघण्याचा प्रयत्न तो करू लागला. त्याची प्रचंड फणा उलटू लागली आणि जिवा वाट चुकवीत त्याला ओढू लागला. नागाचा मधला भाग पुढं मोकळा होता. तो क्षणाक्षणाला पुढं उसळून पुन: वळत होता. त्याचा चपळ हल्ला जिवा शिताफीनं चुकवीत होता. परंतु त्याला सोडीत नव्हता, ओढीत होता.

ती भयाण झुंज सुरू झाली होती. ताकदवान सर्प शेवटी उसळून मोकळा झाला, परंतु जिवानं त्याची शेपटी धरून त्याला फर्रकन ओढलं. त्याबरोबर अति कोपित होऊन, अगदी पिसाट होऊन तो नाग उलटला. पण पुन: जिवानं त्याला मिठी मारली. पुन: नागाचा निम्मा भाग पुढं मोकळा राहिला. आणि तो निसटण्याची धडपड न करता जिवावर हल्ला करू लागला. जिवा त्याची मानगुटी धरण्याची शिकस्त करू लागला. परंतु मान सांभाळून तो नाग जिवाचा जीव घेण्यासाठी नेटानं मारा करू लागला.

शेवटी जिवाही पिसाट झाला. त्यानं दोन्ही हातांनी नागाला धरून चाबकाप्रमाणं नम्बरी दगडावर फटकारा मारून त्याला कमजोर करण्याचा विचार केला नि नागानं गर्रकन फिरून जिवाच्या दोन्हीही हातांना वेटोळे घालून ते आवळून टाकले आणि उरलेला भाग पुढं नेऊन जिवाचा कडाडून चावा घेतला. जिवा हटला, निराश झाला. त्यानं स्वरक्षणाचे यत्न आरंभिले आणि -

तो मांडीएवढा नाग जिवाला कडकडून चावू लागला. एखाद्या पिसाळलेल्या कुत्र्याप्रमाणे त्याचे लचके तोडू लागला. निम्मा साप दोन्ही हातांनी धरून जिवा त्याला हसडू लागला. माझं काळीज थरारलं. मी हातात फरशी कुऱ्हाड घेऊन नुसता पहात राहिलो. माझ्या पुढं अंधार दाटला आणि जिवा एकटाच मरणाशी लढू लागला.

नागानं चावा घेतला आणि त्याचे दात जिवाच्या मनगटात अडकून पडले, तेवढीच संधी साधून जिवानं त्याची मान मटकन धरली आणि मी पुढं धावलो नि ओरडलो, 'सोडू नगासा—'

'न्हाय सोडीत भडव्याला.' असं म्हणत दातओठ खात त्यानं दोन्ही हातांनी त्याची मान घट्ट धरली. आणि जिवाच्या लक्षात येण्यापूर्वीच मी त्या नागाचा कुऱ्हाडीनं कापून कर्रकन कंडका पाडला. शेपटीकडचं धड निर्बल होऊन त्या काळ्या मातीत वळवळू लागलं आणि जिवानं बसल्या जागेवरून तो डोकीकडचा कडका दूर फेकला. परंतु लगेच त्याही स्थितीत तो कंडका जिवाकडे सरपटत येऊ लागला. त्याला पाहून जिवा भयभीत होऊन किंचाळला, 'हवाय, त्यो आला—'

मी गर्रकन फिरलो आणि कुऱ्हाडीनं त्याचे अनेक कंडके पाडले. जिवानं निःश्वास टाकला. परंतु सारंच व्यर्थ होतं. त्याला उठताच येत नव्हतं. मी त्याला उठवून वाटेवर आणला आणि तो पुनः मटकन बसला.

'वाईच तंबाखू भरा.' मंद स्वरात जिवा म्हणाला.

मी घाईनं चिलीम भरून त्याला दिली. काडी लावली. दोन झुरके मारून जिवा पुनः केविलवाणा चेहरा करून हसला. मला भडभडून आलं. मी विचारलं,

'आता काय करायचं?'

'आँ? मला ऐकू यीना!' तो खिन्न स्वरात म्हणाला. विष चढू लागल्याची ती खूण होती. त्याची गात्रं बधिर होत होती. त्याला पाठीवर घेऊन पळण्याचा विचार माझ्या डोकीत आला आणि जिवा म्हणाला,

'आता वाऱ्यावानी पळा, आनी— ' असं म्हणून तो पुनः थांबला. मी कंबर बांधून त्याला पाठीवर घेण्यासाठी तयार झालो. मी विचारलं,

'बोला की, काय करू?'

'आता माझ्या अंगातला जीव गेला. तुम्हीच त्ये औषद आणा. पळा.' तो म्हणाला.

आणि दोन वर्षं जी गोष्ट, जे रहस्य त्यानं दाबून ठेवलं होतं ते आता जवळ आलं. मी आतुर होऊन विचारलं,

'कंचं औषद आणू म्हणता?'

मग तो क्षीण स्वरात माझ्याकडे निरखून पहात म्हणाला—

'आराटीच्या मुळ्या. पळा, मला वाचवा—'

पिवळ्या फुलांचं बारीक चिंचेच्या पानासारखी पानं असलेलं ते लहानसं आराटीचं झाड माझ्या चक्षूपुढं उभं राहिलं आणि कुऱ्हाड घेऊन मी धावलो.

आराटीच्या बचकभर मुळ्या घेऊन जेव्हा मी परत आलो तेव्हा जिवा उशाला पटका घेऊन आडवा झाला होता. त्याला दरदरून घाम सुटला होता. मी त्याला उठवून बसवला, तेव्हा त्याची हालचाल खुंटली होती. त्याला दिसत नव्हतं, ऐकू येत नव्हतं. त्याच्या हृदयाचे ठोके जोराने वाजत होते. मी मुळी पुढं केली, तेव्हा त्यानं ती चाचपत घेतली आणि आधाशाप्रमाणं चावू लागला लगेच मी दगडानं मुळ्या चेचून देऊ लागलो.

हळू हळू त्याला दिसू लागलं, ऐकू येऊ लागलं. मग त्यानं ढेकर दिला. त्याची झापड उतरली. समोरच्या त्या मुळ्या बघून तो म्हणाला,

'एवढ्यानं न्हाय भागायचं.'

मी पुन्हा जाऊन मुळ्या आणल्या. पुन: त्यानं त्या गिळून टाकल्या. उशिरानं त्याला एक ढाळ झाला. मग तो माझ्याकडे पाहून हसला. पुन: आम्ही तंबाखू ओढली. माझ्या उरावरलं मोठं ओझं दूर झालं. इतक्यात तो घाबरा झाला नि मला म्हणाला, 'हवाय, परत चढतंय. मुळ्या आणा.' पुनः मी त्या मुळ्या आणल्या. पुन: त्या जिवानं चावून गिळल्या. थोड्या वेळानं तो पूर्ववत झाला आणि हसला. स्वत:चा पटका स्वत:च बांधून तो उठला नि चालू लागला. ओढ्यात जाऊन त्या जखमा त्यानं धुऊन टाकल्या आणि तो निघाला. अगदी काहीच घडलं नाही अशा थाटात चालू लागला.

सूर्य बुडत होता. त्याची कोवळी किरणं भूमंडळावर रेंगाळत होती. थंड वारा भिरभिरत होता. जिवाला नवा जन्म आला होता. त्याचंच मला समाधान झालं होतं. त्या दिव्य औषधीची प्राप्ती मी पार विसरलो होतो. जिवा मला म्हणाला,

'कळाली का औषधी?'

'कळाली की. पण पुनीव न्हाय कळाली.' मी टोमणा मारला. जिवा पुन: हसत म्हणाला,

'त्या भडव्यानं घात केला वं—'

'म्हंजी एका महिन्यात दोन पुनवा आणल्या?' मी हसत म्हणालो, 'हवाई, ह्ये औषद तुमास्नी कुणी सांगितलं?' हे ऐकून तो नम्र झाला. तो आकाशाकडे नजर झुगारीत म्हणाला,

'ह्ये औषद मला ज्ञानदेवानं सांगितलं.' हे ऐकून मला पुन: चीड आली. हा स्पष्ट सांगायची टाळाटाळ करीत आहे असं वाटलं. मी गुरमीत म्हणालो,

'तुमास्नी त्येनी का कारीट धाडलं?'

'तसं वाकडं बोलू नका,' जिरा गुरकला, 'त्या ज्ञानदेवानं आपल्या ज्ञानेसरीत त्या आराटीचं नाव लिहून ठिवलंय. पण मी त्या आराटीला अमृत म्हणतो.'

ज्ञानेश्वरांच्या ज्ञानेश्वरीचं नाव ऐकून मी गप्प झालो नि चालू लागलो. ते औषध समजल्यानं मला भलताच आनंद झाला होता आणि आश्चर्यही वाटत होतं. एका झुडपाच्या मुळीत साक्षात अमृत असू शकतं, यानं मी दिपलो होतो. ज्ञानेश्वरीचे उपकार मानीत आम्ही दिवस घेऊनच सुखरूप पाचुंब्रीत पोहोचलो.

---

# जोगीण

सर्वत्र भीषण अंधार भरला होता. राणी एकटीच महालात निजली होती. आणि भर मध्यानरात्रीला ती भयंकर आकृती महालात आली नि राणीला उचलून त्या घोर अरण्याकडे निघाली.

हा मजकूर वाचून नंदाबाई भयभीत झाली. तिने ते पुस्तक दूर ठेवून दिले नि ती विचारमग्न झाली.

तेव्हा दुपार झाली होती. जखिनवाडी गाव निर्जन भासत होता. नंदा एकटीच घरात होती. सासू-सासरे मळ्यात गेले होते. एका मित्राला तार करून येतो, असं सांगून रामराव तालुक्याला गेला होता, आणि फक्त अंतूच तेवढा दारात बसून पेंगत होता.

बाबाजी पवाराचा रामराव लष्करात नोकरी करीत होता. तो मोठ्या हुद्यावर होता. चारच महिन्यांपूर्वी नंदाबरोबर त्याचं लग्न झालं होतं आणि परवाच तो रजेवर आला होता. तो दिल्लीत असतानाच त्याची नंदाशी ओळख झाली होती आणि तिकडेच लग्न करून तो तिला जखिनवाडीला घेऊन आला होता.

आणि इथं आल्याबरोबर नंदाचं मन रमलं होतं. शिकलेली सून म्हणून तिला कोणी काम सांगत नव्हतं, नि काम काही म्हणून ती पुस्तक वाचत होती. जखिनवाडीला आल्यापासून आजच ती प्रथम उदास झाली नि तिनं अंतूला हाक मारली –

'अंतूबाबा–'

'जी.' दारात पेंगणारा अंतू घरात आला. काळजीच्या स्वरात नंदा म्हणाली,

'मालकांना उशीर झाला.'

'येतील आता.' अंतू म्हातारा म्हणाला, 'आज पुष्कळ दिवसांनी रामराव गावाला आल्याती. ते श्यामराव भोसल्याला तार करून येणार हायती.'

'तोपर्यंत आपण मळ्यात जाऊ', असं म्हणून नंदा उठली, ती अंतूबरोबर बोलत गावदरीला आली तेव्हा शिरलूप पडलं होतं. ती चालता चालता थांबली. गावाशेजारी असलेलं ते घनदाट जंगल पाहून ती विस्मयचकित झाली.

आठ-दहा मैल चौरस जमिनीवर ते दाट जंगल उभं होतं. घाणेरी, चिल्लारी, करवंदी, बोरी यांनी दाटी केली होती नि त्यात बाभळी, ऐन, लिंब, जांभूळ, आंबा अशी झाडं उभी होत. तसू न् तसू जागा झाडाझुडपांनी व्यापली होती. गांजणीच्या गवतानं तर मोठमोठाल्या वृक्षांशी स्पर्धाच आरंभली होती. त्या जंगलात ऐन मध्यावर एक प्रचंड

वटवृक्ष दिसत होता. त्यामुळे प्रचंड डोकीवर शेंडी दिसावी तसा तो महावृक्ष त्या अरण्याच्या डोकीवर दिसत होता.

तिथं आत शिरायला जागा नव्हती.

त्या रानात पाखरांनी कोलाहल केला होता. घारी तळपत होत्या. मोठमोठी गिधाडं त्या वटवृक्षावर उतरत होती. त्यांचा आकार तर गाढवाएवढा दिसत होता. चिमण्या, चिवळ, राघू, कावळे यांनी एकच दंगा केला होता. वटवृक्षावर वटवाघळं चिरकत होती.

ते जंगल पाहून नंदा स्तंभित झाली आणि समोर पाहत म्हणाली,

'अंतूबाबा, हे जंगल कसलं?'

'हा जोगीणहिरा म्हणायचा.' अंतू म्हणाला.

'हे भयाण जंगल गावाशेजारी कसं?' नंदा पलीकडे दिसणाऱ्या डोंगराकडे पाहत म्हणाली, आणि अंतू विचारात पडला. त्याचा चेहरा गंभीर झाला. त्या जोगीणहिऱ्याचा पूर्वेतिहास त्याच्या मस्तकात जागा होऊन तो नंदाला सांगू लागला —

'फार दिवसांपूर्वीची गोष्ट. एक जोगीण या खोऱ्यात आली होती. ती वयानं तरुण अन् रूपानं देखणी होती. तशीच ती श्रीमंत होती. कारण तिच्याबरोबर हजारो मेंढरे होती, पंचवीस घोडे होते, पंचवीस गडी होते नि कित्येक गायी, म्हशींची खिल्लारं होती. शिवाय तिच्याजवळ एक हिरा आहे अशी बोलवा होती. ती आपला तो प्रचंड संसार घेऊन हिंडत होती. जिथं तिचं मन रमेल तिथं ती राहत होती.

परंतु जोगिणीचा तो हिरा हस्तगत करण्यासाठी बिलंदर चोर टपून बसले होते. कित्येकांनी तयारी करून जोगिणीच्या वस्तीवर हल्लेही चढवले होते; परंतु प्रत्येक वेळी ते चोर पराभूत होऊन गेले होते. आणि त्यामुळेही तिचं माहात्म्य वाढलं होतं. तिला दैवी शक्ती प्रसन्न आहे म्हणूनच ती लुटली जात नाही अशी लोकांची समजूत झाली होती.

एकदा त्या जोगिणीचा तो तांडा जखिनवाडीजवळ उतरला होता. तेव्हा जखिनवाडीत गणू चाळका नावाचा एक बलिष्ठ माणूस होता. त्यानं तो हिरा पळवण्याचा बेत केला होता; पण त्याला यश येत नव्हतं. तो पुनःपुन्हा प्रयत्न करीत होता.

परंतु एके दिवशी भयंकर वादळ नि पाऊस आला. तो पाऊस मुसळधार होता. वीज, वारा यांनी तर कहरच केला होता. पाऊस तर तीन दिवस सारखा पडत होता. आणि...

आणि त्या भयंकर प्रलयातच गणू चाळका त्या तळावर गेला. तेव्हा तीन दिवस पावसात तडफडून मेंढरं मरत होती. घोड्यांनी अंगं टाकली होती. वीज पडून चाकर ठार झाले होते. आणि तो सर्वनाश पाहून जोगीण आकान्त करीत होती.

आणि त्याच वेळी गणू चाळका तिथं गेला. त्यानं त्या जोगीणबाईचा खून करून ती सर्व संपत्ती लुटली.

परंतु जिथं जोगिणीचा संसार बुडाला त्याच जागी मोठं अरण्य उगवलं नि त्यात

बाईचा आत्मा पिशाच्च होऊन वस्ती करू लागला असं गावाचं मत होतं.

कारण गावची गुरंढोरं त्या जंगलात गेली की परत येत नसत. वटवृक्षावरची गिधाडं त्यांना फाडून फस्त करीत असत. ही गिधाडं म्हणजे जोगिणीच्या मेंढरांचा अवतार आहे असं लोक म्हणत.

दुसरी गोष्ट, त्या जोगिणीच्या भुतानं गावात एकोपा ठेवला नव्हता. दोन फळ्या पाडल्या होत्या. चाळक्याविरुद्ध गाव असा बेबनाव घडून आला होता. रोज मारामाऱ्या होत होत्या. कुणाचं कोण ऐकत नव्हतं.

पुढे पुढे गावाची दुफळी भलतीच वाढली आणि वीस वर्षांपूर्वी मळू चाळका नावाच्या एका वीस वर्षांच्या पोरानं भर दिवसा गुरवाचा खून केला. परंतु तो मळू कुणाला सापडला नाही. तो बेपत्ता झाला. पण त्याला जोगिणीच्या भुतानं नष्ट केला असावा असं जखिनवाडीच्या लोकांचं मत होतं.

दुसरं असं की, आजपर्यंत गावची वीस माणसं एकाएकी नाहीशी झाली होती आणि ती सर्व जोगीणहिऱ्यात जाऊन मेली होती. त्या गिधाडांनी त्यांना खाऊन टाकलं होतं. माणूस जोगीणहिऱ्यात गेला की त्याची आशाच नसे. ती गिधाडं तळपत, त्या घारी गिरक्या घेत, कावळे कावकाव करीत नि ते सर्व पाहून गावकरी रडत, भयभीत होत.

जोगीणहिरा म्हणजे हिऱ्यासाठी जोगिणीचा खून झाला. ती मेली. तिथं जंगल उगवलं आणि लोकांनी त्या जंगलाला 'जोगीणहिरा' असं नाव दिलं. असा तो जोगीणहिरा जखिनवाडीच्या मानेवर लटकती तलवार झाला होता.

ही कथा ऐकून नंदाला पुन्हा भीती वाटली. रामराव येईपर्यंत ती त्याचाच विचार करीत होती. आपण या गावात एक महिना राहणार आणि याच दरम्यान ते भूत गावात शिरलं तर? — असं तिला वाटू लागलं. ती भूत, जोगीणहिरा याच विचारात गुरफटून गेली.

दिवस बुडला, जखिनवाडीवर कडुसं पडलं नि एकाएकी गावात भीतीचं वातावरण पसरलं. शिवारातून येणारी माणसं घाबरी दिसत होती. ती दबक्या आवाजात काहीतरी बोलत होती. एकूण एक माणसाचा चेहरा पडला होता.

रामराव दुश्चित झाला होता. त्या बुजऱ्या हालचालीचा त्याचा अर्थच लागत नव्हता. नंदाचं तर ऊरच धडधडत होतं. सर्व काही उदास, भकास नि ओसाड दिसत होतं.

शेवटी बाबाजी पवार मळ्यातून आला. तो केविलवाणा चेहरा करून म्हणाला, 'आज घात झाला. किशाला दुर्बुद्धी सुचली नि त्यानं लखू चाळक्याशी भांडण केलं. आता तो विनाकारण मरणार.'

हे ऐकून रामरावाला आश्चर्य वाटलं. तो म्हणाला, 'किशा मरणार म्हणजे? त्याला कोण मारणार?'

'त्याला जोगीणहिऱ्यातील भूत मारणार!' बाबाजी दबक्या आवाजात म्हणाला,

'चाळक्याशी कलागत करील त्याला ते भूत ठार करीत असतं. अशी वीस माणसं आतापर्यंत जिवाला मुकली आहेत. आता किशाची बारी.'

'किशाला कुणी वाचवणार नाही का?' रामरावानं विचारलं.

तसा बाबाजी घाबरून म्हणाला, 'तसं करणं गुन्हा आहे. भुताची करणी अगाध आहे. आम्ही या गावात जीव मुठीत घेऊन दिवस काढीत आहोत. आज ना उद्या ते भूत गावात शिरणार नि किशाला घेऊन जाणार!'

तो प्रकार ऐकून रामराव विचारात पडला. परंतु या भुताची पाठ धरायची नि किशाला वाचवायचा असा रामरावानं मनात निश्चय केला. तो जेवण होताच आपलं अंथरूण अंगणात टाकून पडला. भरलेलं पिस्तूल त्यानं तयार ठेवलं.

किशाचं घर समोरच होतं. त्याला मरणकळा आली होती. पोरंबाळं दु:खी झाली होती. गावकरी येऊन धीराच्या गोष्टी सांगून जात होते. परंतु जो तो मनात भेदरला होता नि हळू बोलत होता. आपण चूक केली म्हणून किशा स्वत:ला दोष देत होता.

थोड्या वेळानं चारपाच तरुण रामरावाकडे आले आणि म्हणाले,

'तुम्ही सावध असा नि किशाला वाचवा. आम्हीही गल्लीत बसतो.' असं सांगून ते गेले आणि रामराव भुताची वाट पाहत बसला. त्यानं आपलं पिस्तूल सरळ धरलं होतं — परंतु भूत या कल्पनेवर त्याचा विश्वास नव्हता. ते येईल नि किशाला घेऊन जाईल असं त्याला वाटत नव्हतं. परंतु गावातील ती घबराट पाहूनच तो दारात पहारा करीत होता. तो एकटाच जागत होता. तेव्हा मध्यरात्र होती. सर्वत्र भीषण शांतता प्रस्थापित झाली होती. त्याची नजर किशाच्या कवाडावर स्थिर होती.

परंतु एकाएकी त्याचे डोळे झाकू लागले, पापण्या जड झाल्या. आली आली म्हणत त्याला झोप आली आणि गप्पकन तो एका भयंकर स्वप्नात बुडाला. कोळ्याच्या जाळ्यात माशी अडकावी तसा तो त्या स्वप्नात गुरफटून पडला. तो त्या स्वप्नात पाहत होता — एक काळी धिप्पाड आकृती मंदगतीनं गावात आली. ती रामरावाच्या पायशाला किंचित थांबली. नंतर पुन्हा पुढे किशाच्या दारात गेली. तेव्हा दार बंद होतं म्हणून ती आकृती थांबली नाही. तिने एकाच धक्क्यात घराची चौकट मोडून आत प्रवेश केला आणि पुन्हा किशाला घेऊन ती बाहेर आली व आल्या मार्गानं पुन्हा तशीच मंदगतीनं परतली. अगदी रामरावाच्या जवळून ती किशाला घेऊन दूर दूर गेली.

तेव्हा रामराव चडफडत होता. उरावर दगड रचल्याप्रमाणे धडपडत होता. उठून किशाला मदत करावी, हातातील हत्यार चालवून त्या आकृतीच्या चिंध्या कराव्या म्हणून तो कळकळत होता — परंतु तो जागचा उठत नव्हता. त्याला हलताच येत नव्हते नि त्याची वाचाही बसली होती. डोळ्यांवरची झापड दूर होत नव्हती.

आणि तो जेव्हा जागा झाला तेव्हा नंदा त्याला उठवीत होती, 'अहो, उठा ना! किशाला

भुतानं पळवला —' असं ती म्हणत होती. गावात सर्वत्र गलका माजला होता. जो तो किशाला भुतानं नेला म्हणून हळहळत होता, आणि किशाच्या घरात आक्रोश सुरू झाला होता.

रामरावानं उठून काही माणसं बरोबर घेऊन दूरपर्यंत दौड मारली. सर्वत्र किशाचा शोध केला — परंतु त्याचा पत्ता लागला नाही. सकाळी जोगीणहिऱ्याजवळ किशाचं एकच पायताण सापडलं, आणि तो त्या जंगलात गेल्याबद्दल सर्वांची खात्री झाली.

जेव्हा रामराव निराश होऊन घरी परतला तेव्हा भुताच्या अस्तित्वाखाली तो संपूर्ण चिरडला होता. जोगीणहिऱ्यात भुते आहेत नि ती महाभुतं आहेत असं त्याच्या मनानं मान्य केलं होतं. या गावात राहणं अशक्य आहे असं त्याला वाटत होतं.

आणि तो घरी आला तेव्हा सर्वच लोक रडत होते. रामरावानं भुताचा पाठलाग का केला म्हणून बाबाजी ऊर बडवून घेत होता. नंदा रडत होती. किशा गेला, आता रामराव जाणार अशी गावाची खात्री झाली होती. आपणाला स्वप्नात गुंतवून भुतानं किशाला उचलला यावरून भुतं आता आपलाही काटा काढणार म्हणून रामराव मनात खचला, आणि स्वरक्षणार्थ काहीतरी करायचे म्हणून विचार करू लागला. परंतु ती भुताची कल्पना इतकी वाढली की तो संपूर्ण गांगरून गेला.

परंतु त्याच दिवशी दुपारीच श्यामराव भोसले हा शिकारीला जायच्या तयारीनं जखिनवाडीत आला. त्याला पाहून रामरावाला धीर आला. कारण तो त्याचा जिवाचा मित्र होता. तसाच तो तरुण नि धाडसीही होता. ते दोघे एकाच जागी लष्करात नोकरी करीत होते नि दोघेही एकाच वेळी रजेवर आले होते. रामरावानं त्याला भूत, जोगीणहिरा, किशा, रात्रीचं स्वप्न ही सर्व कथा सविस्तर सांगितली, नि ती ऐकून श्यामराव गंभीर झाला. नंतर त्या दोघांनी किशाची चौकट पाहिली. ती धक्क्यानं मोडणारी शक्ती मोठी प्रबल असली पाहिजे अशी त्यांची खात्री झाली — आणि त्यांनी रक्षणाची सर्व तयारी केली. दोन बंदुका सज्ज केल्या. सर्व दारं नीट करून घेतली. पॅट्रोमॅक्सच्या बत्त्या लावल्या नि लष्करी पोषाख करून ते दोघे गस्तीसाठी तयार झाले.

ती रात्र त्यांनी खडा पहारा करून काढली, पण त्या रात्री भूत आले नाही. दिवस उजाडताच श्यामरावने आपली बंदूक खुंटीला लटकवली आणि नंदा धावत येऊन म्हणाली, 'आपल्या परसात काहीतरी पडलं आहे.'

तसे ते दोघे तिकडे धावले. जाऊन पाहतात तो परसात एक गाठोडं पडलं होतं. त्यात किशाचा पटका, पैरण आणि एक पायताण होतं. ते सर्व पाहून ते दोघे स्तंभित झाले.

रामराव म्हणाला, 'याचा अर्थ असा की भूत स्वस्थ नसून त्याची नजर माझ्यावर आहे.'

'आणि याचा अर्थ असा की आम्ही सावध असणं जरूर आहे.' श्यामराव म्हणाला.

परंतु त्यानंतर काहीच चमत्कार घडला नाही. रोज पहारा नि जाग्रण करून ते दोघे जेरीला आले होते. बेसावध राहिल्यास अचानक भूत दगा देईल या दहशतीनं त्यांचा जीव गुदमरला होता. नंदाला तर त्या गावाची किळसच आली होती.

बाबाजी, अंतू आणि थोडीशी माणसं भुताला भीत नव्हती. ती कुऱ्हाडी घेऊन रामरावाला मदत करीत होती. बाबाजी तर आज बारा दिवस क्षणभरही निजला नव्हता.

तेराव्या दिवशी किशाची तेरावी झाली. त्या दिवशी नेहमीप्रमाणे रामराव आणि श्यामराव हे जागत होते. ते लष्करी गणवेषात तयार होते. रात्र झिरपत होती.

रामराव माचावर उताणा पडला होता — श्यामराव बंदूक नीट धरून पहारा देत होता. सर्वत्र कंटाळवाणं वातावरण पसरलं होतं. एक बत्ती उगीचच भपकत होती. त्यामुळे एक भयंकर डोळा मिचकावल्याचा भास होत होता. अंगणात अंधार नि उजेड यांची लढाईच जणू सुरू झाली होती. 'आपण थोडं फिरून येऊ या—' असं म्हणून रामराव उठला, नि दोघे सावधपणे चालू लागले. तो दोघे जोगीणहिऱ्याकडे जात होते; त्यामुळे श्यामराव अस्वस्थ झाला. हा रामराव एकाएकी उठून या भयाण वनाकडे का निघाला? का यातही काही भुताचा चमत्कार आहे? अशी शंका येऊन तो सावध झाला. त्यानं आपल्या बंदुकीचा टाळा उघडला तोच रामराव थांबला. समोर जोगीणहिऱ्याकडे पाहत म्हणाला,

'श्याम, ती आकृती मोठी बलिष्ठ, प्रभावी आहे. बाकी तुझा नेम तसा अचूक आहे म्हणा.'

'तुम्ही ती स्वप्नात पाहिली—' श्यामराव बंदूक उभी करून म्हणाला, 'पण तिचा चेहरा कसा आहे? नि भुताचं भूतपण म्हणजे तसं लक्षण काही दिसतं का?'

तो प्रश्न ऐकून रामराव काळजीच्या स्वरात म्हणाला,

'तसं काहीच सांगता येत नाही.' असं बोलून तो एकदम थांबला. इतक्यात मागून कुणीतरी आल्याचा भास झाला नि ते दोघेही आपल्या बंदुका फिरवून गर्रकन फिरले. परंतु तो केवळ भासच होता.

'आपण चलू या परत', असं म्हणून श्यामराव परत चालू लागला.

ते गावदरीला आले आणि गावात ओरड झाली. 'धावा, पळा' अशा आरोळ्या उठल्या नि लगेच बोंब ठोकली गेली. वातावरण थरथरलं नि रामरावाचं काळीज फाटलं. कारण ती बोंब बाबाजीची, त्याच्या बापाची होती. त्यांनी गाव गाठला. तेव्हा बाबाजी बोंब ठोकीत होता. गावकरी जमले होते. गलका वाढला होता.

'बाबा, काय झालं?' रामरावानं विचारलं.

'नंदाबाईला भुतानं पळवली.' बाबाजी म्हणाला — आणि रामरावाच्या तोंडचं पाणी पळालं. 'परंतु कशी पळवली?' पुन्हा त्यानं विचारलं. आणि बाबाजी म्हणाला,

'परसदार मोडून भूत आत आलं.'

भुतानं अखेर दगा दिला होता. रामराव नि श्याम भोसले यांची पाचावर धारण बसली. त्यांनी माणसं बरोबर घेऊन पळापळ केली — परंतु व्यर्थ! नंदाचा पत्ता लागला नाही. मग ते सर्व जोगीणहिऱ्याजवळ आले. रामराव म्हणाला, 'श्याम, किती वाजले?'

'पाच.' श्याम म्हणाला, 'तुम्ही आता माझं ऐका. आपण आत शिरू या.'

'हो, आता या जंगलात शिरलंच पाहिजे.' रामराव घाबरा होऊन म्हणाला, 'नंदाला वाचवणे नाहीतर मरून जाणे हे दोनच मार्ग माझ्यापुढे आहेत—' असं म्हणून त्यानं आपलं घड्याळ बरोबर लावलं. आणि पुन्हा म्हणाला, 'श्याम तू पश्चिमेकडून आत शीर, मी पूर्वेकडून शिरतो. आपण दोघांनी त्या वटवृक्षापाशी सात वाजेपर्यंत पोहचायचं. तू पूर्वीच पोहचलास तरी माझी वाट पाहायची आणि जर मध्येच ते भूत भेटलं तर जे सुचेल ते करायचं.'

'ठीक आहे.' श्याम म्हणाला, 'जिकडे गोळीबार होईल तिकडे तुम्ही या किंवा मी येईल.'

असं म्हणून तो त्या जंगलात शिरला. नंतर आत गोळीबार सुरू झाला की या जंगलाला आग लावा, असं बाबाजीला सांगून रामरावही त्या जंगलात शिरून दिसेनासा झाला.

ते दोघे त्या भयंकर वनातून मार्ग काढीत पुढे सरकत होते. दोघांनी दोन दिशांनी त्या वटवृक्षाकडे आक्रमण आरंभले होते. त्यांच्या मुठीतील बंदुकात भयाण मृत्यू विश्रांती घेत होता — आणि ते स्वत:चा देह मृत्यूकडे लोटीत होते. एक भयंकर क्षण जवळ येत असावा असं त्या दोघांनाही वाटत होतं.

सकाळचे सात वाजले होते. रामराव त्या वटवृक्षाखाली, एका देवळापुढे दाखल झाला होता. श्याम कुठे आहे याचा त्याला मुळीच अंदाज नव्हता. एक पडकी भिंत त्याच्यापुढे होती. तो किंचित पुढे सरकला आणि एकदम गांगरला.

त्या देवळापुढे एक धिप्पाड माणूस बसला होता. त्यानं आपली बंदूक जवळच ठेवली होती आणि त्याच्या पुढे नंदा बसली होती. तिची शुद्धी गेली होती. ती प्रेताप्रमाणे बसली होती. तो माणूस तिला हलवून शुद्धीवर आणीत होता. तो हलवील तशी ती हलत होती, कलंडत होती...

आणि तो तिला जागं करीत होता. लगेच रामरावानं आपली बंदूक सरळ केली. पण दुसऱ्याच क्षणी त्याच्या लक्षात आलं, नंदा पुढं होती. तिला टाळून त्या माणसाला गोळी घालणे अशक्य होतं. त्याचा नाइलाज झाला. तो नंदा बाजूला सरकण्याची वाट पाहत बसला.

तो माणूस क्रूर दिसत होता. त्याचे डोळे निखाऱ्यासारखे जळत होते. त्याच्या मिश्यांनी तो पिसाट वाटत होता. त्याचा रंग काळा होता. नंदाला एका दगडावर बसवून

तो तिला उठवीत होता.

त्या वेळी श्यामराव डाव्या बाजूवर झाला होता. त्यालाही नंदा दिसत होती — परंतु तो माणूस एका दीपमाळेच्या आड होता. त्यामुळे त्याचेही काही चालत नव्हते. शिवाय डावीकडून उजवीकडे येणे शक्यच नव्हते. तोही आपली बंदूक रोखून बसला.

थोड्याच वेळानं नंदा शुद्धीवर आली आणि गर्भगळित होऊन चित्रासारखी त्याच्या पुढे बसून राहिली. तो माणूस रखरखीत आवाजात म्हणाला,

'आज वीस वर्षं मी असा देह पाहिला नाही. तू इथं राहा. मला नकार देऊ नको. नाहीतर मी तुला ठार मारीन; परंतु प्रथम तुझी ही काया चिरडून नंतर. चल, उठ.'

तशी ती उठली आणि तोही जागचा उठला. मग त्यानं तिला हळूच धरली, पुढे ओढली. तिचा देह चाचपून पाहिला नि पुन्हा म्हणाला, 'खाली बस.' तशी ती मटकन बसली. रामरावानं बंदूक उचलली; पण तोही खाली बसला नि पुन्हा नंदा आड आली. चापावरचं बोट तसंच राहिलं.

त्या माणसावर दोन बंदुका रोखल्या होत्या. परंतु त्याला त्याची कल्पना नव्हती. नंदाच्या नादात तो भान हरपून बसला होता. त्याच्या अंगात रक्त कढत होत होतं नि डोकं भणभणत होतं. त्याला फक्त नंदा, तिचं तारुण्य एवढंच दिसत होतं. शेवटी तो म्हणाला, 'चल देवळात.' तशी नंदा उठली आणि रामराव निर्भान झाला. त्यानं वर नळी करून एक गोळी झाडली. एक प्रचंड धडाका झाला नि जोगीणहिरा दणदणला. एक मोठा गिधाड धाडकन अंगणात पडून धडपडू लागला. पण त्याच वेळी त्या माणसानं नंदाला गपकन पुढे केली. तिच्या खांद्यावर आपली बंदूक ठेवून त्यानं रामरावावर आपला नेम धरला.

पुन्हा रामराव बेहिंमत झाला. पण त्या माणसानं धडाधड चार गोळ्या झाडून आपणही तयार आहोत याची घोषणा केली.

श्याम तसाच बसून होता. त्याला तो अजूनही दिसत नव्हता. मात्र त्यानं आपला मोर्चा सोडला नव्हता. तो सज्ज होता.

आता रामरावाची अवस्था केविलवाणी झाली होती. वाळूच्या पोत्याप्रमाणे नंदाला पुढे करून तो माणूस त्याच्या पुढे बसला होता नि रामराव हताश होऊन जीव वाचवीत होता. त्याला काहीच करता येत नव्हते. थोड्या वेळानं तो माणूस गरजला,

'ए, तू आपली बंदूक माझ्याकडं टाकून चालता हो, नाहीतर मी या पोरीचा जीव घेईन!'

हे ऐकून रामराव दचकला. काय करावं हेच त्याला सुचेना. तोच तो पुन्हा ओरडला, 'आटप!'

आता आपण जीवनाची लढाई निश्चित हरलो. हा बंदूक घेऊन आपला प्राणही घेणार.

नंतर नंदाही त्याचीच होणार, अब्रूला मुकणार. एवढाच विचार करून त्यानं हातातील बंदूक अंगणात फेकून दिली. ती बंदूक पुढे पडताच त्या माणसानं जागा सोडली. तो आपली बंदूक रोखून पुढे सरकला. रामरावानं सर्व आशा सोडून अंगच टाकलं. तो माणूस बंदुकीजवळ आला आणि बाजूला श्यामची बंदूक कडाडली. एकाच दणक्यात श्यामनं लढाई जिंकली, आणि दुसऱ्याच क्षणी तो रामरावाकडे धावला. रामरावानं त्याला मिठीच मारली. तेव्हा तो माणूस कड्यावरून पडलेल्या रेड्याप्रमाणे धडपडत होता.

त्या दोघांना पाहताच नंदानं हंबरडा फोडला. तेव्हा वटवृक्षावरचे गिधाड सैरावैरा पळत होते. कावळे भेदरले होते... आणि एका बाजूनं तो जोगणहिरा जळत होता.

त्या दोघांनी ते प्रेत जेव्हा ओढत बाहेर आणले तेव्हा जंगलाबाहेर जमलेले गावकरी पुढे धावले. भुताचं मढं पाहण्यासाठी सर्वांनी गर्दी केली. पण ते प्रेत पाहताच सर्व चकित झाले.

'आरं, ह्यो तर मळू चाळक्या!' असा एकच आवाज उठला. गुरवाचा खून करून फरारी झालेला तो मळू चाळका वीस वर्षं त्या जंगलात भूत होऊन वावरत होता.

# लाडी

दुपार टळली होती. सूर्य कलता झाला होता. म्हणून सर्व सावल्या तिरप्या होत्या. ती मुंबईची झोपडपट्टी शांत भासत होती. जवळच्या डोंगरातून येणारा वारा त्या झोपड्यांच्या गर्दीत शिरत होता. त्यामुळे जुनी बारदाने फाटत होती. कुजके पत्रे करकरत होते. तिथे दारिद्र्याचे भांडार भरले होते.

उघडी पोरं खेळत होती. हसत होती. त्यांना दुःख म्हणजे काय याचं भान नव्हतं. दुःख नि सुख यातील तफावत त्यांना उमजत नव्हती. जगणं एवढंच ती जाणत होती. आणि जगत होती.

कामकर्ती माणसं कामावर गेली होती. बेकार भिकेच्या पाठी पळत होती. त्यांना फक्त आता मरणाची गरज होती.

बाया सांजंच्या जेवणारी तयारी करीत होत्या. त्यांचे धनी येणार म्हणून त्यांची आतुरता वाढू लागली होती.

घळीच्या तोंडी एखादा वाघ पडावा तसा संपतराव आपल्या झोपडीच्या दारात पालथा पडला होता. त्याने आपले गुडघे पोटाशी धरले होते. नि तो सर्व वस्तीवरून आपली तीक्ष्ण नजर फिरवीत होता. त्याने अंगात एक जुना फाटका कोट घातला होता. त्याच्या डोकीवर प्रचंड टक्कल पडले होते. ते उजळलेल्या तव्यासारखे लकाकत होते. त्याचे सर्व दात पडले होते. त्याचा चेहरा रुंद नि रागीट होता. त्याचे डोळे खोल होते. त्याने आपली दाढी भरपूर वाढविली होती. ती त्याच्या चेहऱ्याची उग्रता वाढवीत होती.

हा संपतराव पूर्वी रेल्वेत नोकर होता, पण वय झालं म्हणून त्याला कामावरून दूर केला होता. आता तो या वस्तीत भांडखोर म्हणून प्रख्यात होता. तो दरिद्री होता, म्हणून काही लोक त्याला सावकार म्हणून हाक मारीत होते. तो आज भयंकर बिथरला होता.

शेजारीच त्याची बायको—रंगूबाई खुशाल पाय पसरून बसली होती. एका पोराला सर्व शक्ती एकवटून थोपटीत होती. तिचेही सर्व दात पडले होते. म्हणजे ते संपतरावानं दर भांडणात एकदोन अशा हिशोबानं निखळून टाकले होते. आता ती दाढांवरच काम भागवीत होती.

समोरच किशा आणि अंकुशा ही बेरकी पोरं एकमेकांच्या पाठीला पाठ लावून खेळत होती. ती वानराप्रमाणं एकमेकाला धरून चेलमाडीत होती. बोचकारीत होती. आणि दोघेही 'भाँ' करून रडत होते.

परंतु संपती तिकडं लक्षच देत नव्हता. त्याची मन:स्थिती दग्ध झाली होती. त्याची लाडकी लेक लाडीबाई त्याच्या नजरेपुढं उभी होती. म्हणून तो तळमळत होता. या सर्व लोकांनी — या रंगीनं आपल्या लाडक्या लेकीचा राग राग केला. तिला डोळ्यात धरली म्हणूनच ती आपल्यापासून दूर गेली, असं तो मनात म्हणत होता.

लाडीबाई ही संपतरावाची लाडकी होती. म्हणूनच त्यानं तिचं नाव लाडीबाई ठेवलं होतं. तिला शाळेत घातलं होतं. परंतु खट्याळ लाडी शाळा शिकली नाही. वयाच्या अठराव्या वर्षांपर्यंत तिच्या शिक्षणाची गाडी पाचवीपासून बाहेरच निघाली नाही. मात्र ती रोज शाळेत जात होती. घरी आली की पुस्तकं फेकून देत होती. नि गोल पातळ, दोन वेण्या, पावडर, काजळ असा थाट करून उगीचच त्या वस्तीत हिंडत होती. तिच्या पायात भोवरा बांधला होता.

लाडीच्या त्या नाजूक हालचालीनं कित्येक मवाली तिच्या नादी लागले होते. त्या सर्वांना लाडी भडकवीत होती. पहाणाऱ्याकडं ती टक लावून पहात होती. आणि गपकन कुणी डोळा मारला की ती तोंडाला पदर लावून खुदकन हसत होती. नि कासवाप्रमाणं मान आत ओढून भर्रकन सटकत होती.

लाडीबाईसाठी कित्येक मवाली वेडावले होते आणि लाडीवरचा मालकी हक्क प्रस्थापित करण्यासाठी एकमेकांचा मुडदा पाडण्याची तयारी करीत होते. रोज रात्री संपतरावाच्या घराला वेढा पडत होता. काही वेळा तर दारातच हाणामारी जुंपत होती.

लाडी मिळावी म्हणून कित्येकांनी हाजी मलंगावर भार घातला होता. कित्येकांनी तर संपतरावाशीच दोस्ती जोडली होती.

परंतु बेरकी लाडी कुणाला सापडत नव्हती. हातातून मासा सटकावा तशी ती सळकन निसटत होती. आणि त्यामुळेच मवाली अधिक पिसाट झाले होते.

त्याचबरोबर शेजारी हैराण झाले होते. लाडीच्या खोडीनं त्यांची नीज हराम झाली होती. दररोज ते संपतीला म्हणत, 'सावकार, तुमच्या पोरीचं बरंवाईट करा. ह्यो किराणा नासका हाय. जाऊ द्या तिकडं.' आणि रंगूबाई तर हातघाईवरच आली होती. लाडी रात्री उशिरा आली की रंगूचं डोकं भडकत होतं. इरसाल शिवीचा पाऊस पाडून तिच्या मनाचं समाधान होत नव्हतं. मग ती लेकीच्या वेणीलाच हात घाली. हाहाकार उसळे. मग शेजारी जमत, हसत, चेष्टा करीत.

नंतर संपतराव येई. आणि लेकीला मारलं म्हणून बायकोची कणीक तिंबी. पुन्हा दंगल उठे. ती आरडाओरड ऐकून लोक म्हणत, 'ह्या भडव्यानं पोरीचं फाजील लाड करून तिचं वाटुळं केलं. आता माणसातनं उठलाय.'

थोडे दिवस गेले. लाडीनं आईचा मार खाल्ला. आईनं बापाचं दणकं खाल्लं. आणि बापाची भर मिळताच तिनंही आईचा प्रतिकार आरंभला. आईनं झिपरी धरताच तीही

आईच्या झिंजीला धरू लागली. आणि त्या दोघी एकमेकींची कापडं फाडीत चामडी काढू लागल्या. या भयंकर झुंजीनं संपतराव भानावर आला. आणि तो लाडीसाठी नवरा शोधू लागला, परंतु मुंबईच्या सर्व झोपड्या पालथ्या घालून लाडीला नवरा मिळाला नाही. जे मिळाले ते लाडीचा तो अवतार पाहून पळाले. काहींना मवाल्यांनी परस्पर तंब्या देऊन उधळून लावले. मग संपतराव गावी गेला आणि एक नवरा बरोबरच घेऊन आला. हा परशा सामता म्हणून प्रख्यात होता. त्याच्याही खोडीला जोड नव्हती. तो अंगापिंडानं भक्कम होता. भरपूर उंच, रुंद छाती, बेडर वृत्ती नि तो जबरा बोलका होता. परंतु दिसण्यात मात्र तो दुबळा दिसत होता. शिवाय त्यानं भली मोठी शेंडी राखली होती.

परशा सामत्याची ती शेंडी पाहून लाडी चमकली, परंतु संपतनं घाईत घाई करून एकाच दिवसात लग्न उरकून टाकलं. लगेच दुसऱ्या दिवशी चुलीचं लाकूड चुलीत जळू दे म्हणून लाडीला परशाबरोबर सासरी पाठवून दिलं.

तेव्हा साऱ्या वस्तीनं सुटकेचा निःश्वास टाकला. सर्वात अधिक आनंद रंगूबाईला झाला. परंतु लाडी गेल्यापासून आज दोन दिवस संपतराव बेचैन होता. त्याला अन्न गोड लागत नव्हतं. तो सारखा 'लाडी, लाडी' करीत दारात बसत होता.

रंगूकडं गर्रकन वळून संपती म्हणाला, 'रंगे, लाडी जाऊन किती दिस झालं?'

'आज चवथा दिवस —' रंगू उत्तरली.

'चौथा कसा?' संपत्ती गुरकला.

आणि रंगू तारीखवार बोलू लागली, 'आठ तारखीला लगीन, नऊला गेली, दहाला पोचली, काल अकरा तारीख व्हती. नि आज बारा हाय. चार दिस झालं की!'

एवढ्यात लाडी दारात आली. तसे किशा, अंकुशा हरकले. संपतनं उडीच मारली. नि लाडीबाई बापाच्या गळ्यात पडून हंबरू लागली.

'अग लाडे, काय झालं?' संपतनं विचारलं.

'लाडे, कशी आलीस?' रंगूनं प्रश्न केला.

'मी पळून आले.' लाडी तोंडाचा चंबू करून म्हणाली, 'मला भयंकर त्रास दिला त्यानं.'

'मला वाटलंच.' संपतराव डोळे पुशीत म्हणाला, 'ह्यो शेंडीवाला पोरीला बरं बघणार न्हाय.'

'ए खजाळे, नीट बोल.' रंगूबाई एकदम बिथरून म्हणाली, 'तू नऊ तारखेला गेलीस, दहाला तिथं पोचलीस, अकराला निघून आज बाराला हातं येऊन पोचलीस, मग तुला तरास कवासा झाला?'

'ते तुला नाही कळायचं.' लाडीबाई रुसका चेहरा करून म्हणाली, 'तू नांदाय गेली असतीस म्हणजे कळलं असतं!'

'बराबर हाय—' संपतरावानं मध्येच तोंड घातलं, 'पोरीचं खरं हाय. साले रंगे, तू बोलू नको. आणि लाडीबाई, आता त्यो नवरा यील त्याचं काय करायचं?'

'मले नवरा पुरं.' लाडी मटकन बैठक मारून म्हणाली, 'मी नांदणार नाही. त्यानं मले फार छळलं. माझं काहीच तो ऐकत नाही. मी म्हटलं, ती शेंडी काढ. तर म्हणं माझ्या शेंडीचं काय तुला वझं व्हतंय?'

एकदम वातावरणानं कलाटणी घेतली. संपतराव आनंदीत झाला. सर्व दारातून घरात आले.

आणि अचानक परशा सामता दारात आला. त्यानं 'रामराम मामा' म्हणून रामराम ठोकला. आणि पुन्हा घरात दहशत भरली. रंगू चमकली. संपती दचकला. पोरं बावरली. आणि लाडीबाई भेदरलेल्या उंदराप्रमाणं पटकन कोपऱ्यात सरकली. परशानं सासऱ्याजवळ बैठक मारली.

लाडीच्या पाठोपाठ तिचा नवराही आला, ही बातमी कळताच आजूबाजूचे शहाणे आले. संपतच्या दारात गर्दी वाढली.

'का पाव्हणं, का आला?' संपती निर्विकार चेहरा करून म्हणाला, 'असं पळत्यापाठी पळू नये.'

'काय करणार — मला बायकू मिळाली भुताच्या पोटची — म्हणून पळतोय.'

'ए सरळ बोल—' संपती चिडला, अन् नाक उडवीत म्हणाला, 'जावया, ऐक. ही रंगी माझी बायकू. ती नुसती गोमाशीवाणी उडत व्हती. पर म्या गब्रूनं हिचं सारंच दात पाडलं. एका दमात नव्हं — चावटपणा केला की दणका! नि दणक्यात दातांचा निकाल — असं करून तिची सारी बचाळी म्यां रिकामी केली—' पुढं संपती बोलला नाही. फक्त त्यानं समोर बसलेल्या रंगूची मोकळी बचाळी पाहून घेतली. तोच परशा शांतपणे व हळूहळू बोलू लागला—

'मग मामा, एवढ्या पावटी लाडीला पाठवा आणि बघा आठच दिवसात तिचं सारं दात पाडून हिसाब चुकता करतो. एक शिल्लक राह्यला तर ही सामत्याची अवलाद नव्हं—'

हे ऐकून लाडीला तिरिमिरी आली. तिच्या काळजाचं पाणी झालं. परंतु संपती तरकटला. तो आवाज चढवून म्हणाला,

'दात पाडणारा असतास तर असा दात उचकीत बसला नसता! म्हणे हिसाब चुकता करतो! ते काई न्हाय. माझी ही लाडी आता नांदणार न्हाय!'

'म्हंजी तुम्ही लाडीला पाठवत न्हाय?' परशानं सवाल केला. आणि नकारार्थी मोकाट मान हलवीत संपती म्हणाला,

'आपल्यावाणी येडी बायकू करून नांद जा. मी लाडीला पाठवणार न्हाय!'

'मग मी दुसरी बायकू कशी करू?' पुन्हा परशानं प्रश्न केला. आणि संपती भडकला—

'ते मला इचारू नगं, तुझा मी बाप नव्हं!' या बोलानं परशा चिडला. तो म्हणाला,

'तू माझा बाप असतास तर म्या तुझी सालं काढून वाळत घातली असती. म्या तुझ्या लेकीसंगं लगीन लावलंय हेचं काय?'

'तेचं काय, आपला खर्च घेऊन जा.' संपती म्हणाला, 'कायदेशीर घे खर्च.'

'मला खर्च नगं,' परशा खाली पहात म्हणाला, 'त्यो खर्च तुलाच असू दे. तूच दुसरी बायकू कर. आणि मी मामीला घेऊन जातो.'

'मामीला घेऊन जातो.' म्हणताच रंगू किंकाळली.

संपत ओरडला, 'ए ए जावया, लेका, सरळ बोल.'

'आता सरळ बोलणार न्हाय.' परशा ओरडला, 'मी तुला दारात नेऊन तुडवणार हाय – पालथा घालून – कुंभाराच्या चिखलावाणी.'

क्षणात वातावरण तापलं. उंदरावर मांजरीनं झडप घ्यावी तशी परशानं संपतवर झडप घेतली. तसा 'आरं आरं, जावया—' असं संपती ओरडला. आणि रंगूनं बोंब ठोकली.

लगेच लाडीही बोंबलली. किशा, अंकुशा रडू लागले. दारातील बघे घरात शिरले. त्यांनी जावई सासऱ्याचं युद्ध थांबविलं. 'ऐका', 'राहू द्या', 'व्हा बाजूला', असा सर्वत्र गलका झाला. आणि परशाच्या हातून मुक्तता होताच संपतरावाला जोर चढला. तो बचावाचा पवित्रा घेऊन म्हणाला, 'लेका जावया, मार मला, पर याद राख. फासावर चढवीन तरच बापाचं नाव...'

एक पंजाबी सरदार परशावर बिथरला. तो म्हणाला,

'तू काहीही कर, परंतु कायद्यानं कर. जा. पोलिसात वर्दी दे. पळ—'

'पोलिसात जा' म्हणताच परशा नाक्यावर पळत गेला. नाक्यावरचा पोलीस तणकटून उभा होता. त्यानं मिश्या पिळून आकडे केले होते आणि हातातील काठी सरळ धरली होती. परशाला पहाताच त्यानं अधिकच उग्रता धारण केली. परशा बाण मारून म्हणाला,

'शिपाईदादा, एक भानगड—'

'कसली, बोल?' पोलीस ठिसकला, 'काय पाहिजे, बोल?'

'बायकू...' परशानं 'बायकू' हा शब्द उच्चारला, पण पोलिसानं त्याला पुढं बोलूच दिलं नाही. हा बायको मागतो आहे असा समज होऊन त्याचा सरकारी पारा एकदम चढला,

'काय रे, बायको पाहिजे? कुठं देऊ? डोकीत का पाठीत?' पोलिसानं हातची लाठी वर उगारली आणि परशा चार पावलं माघार घेऊन म्हणाला,

'माझी बायकू नांदत न्हाय—'

तेव्हा पोलिसानं नाक उडवीत उलट प्रश्न केला —

'मग मी काय करावं असं मत आहे तुझं?'

'नव्हं, माझी फिर्याद हाय सरकार.' परशानं बचावाचा पवित्रा घेऊन हात जोडले.

पोलीस मान ताठ करून म्हणाला,

'मी पोलीस आहे. मॅजिस्ट्रेट नव्हे. तू कोर्टात जा. पळ—'

तसा परशा पळत सुटला. त्यानं वळूनही पाहिलं नाही.

रात्रीचे अकरा वाजत होते. सर्वत्र सामसूम झाली होती. माणसं निजली होती. कित्येकांना उद्याचा घोर लागला होता. काही तळमळत होती. तिथं जरी सर्व काही शांत शांत भासत होतं तरी तिथं भयंकर अशांतताच नांदत होती. त्या लहानशा झोपड्यांतून भयंकर दावेदारी, नंगी क्रूरता, तशीच ईर्षा धगधगत होती.

'कसंही, कर पण आपली बायको घेऊन जा.' असं कित्येकांनी परशाला सांगितलं होतं आणि त्याला धीर आला होता. परंतु त्याचवेळी 'सावकार, पोरीला पाठवू नको,' असा काही मवाल्यांनी संपतीला आधार देऊन ठेवला होता. त्यामुळं त्याला जोर चढला होता. परंतु जर का जावयाशी लढाई करण्याची वेळ आली तर आपण टिकाव धरू शकणार नाही याची संपूर्ण कल्पना असल्यानं तो मनात खचला होता. आणि त्याच्या घरात भीतीचं वातावरण भरलं होतं. तो परशाला कसा मारावा याचा विचार करीत होता.

रंगूबाई तान्हं बाळ पोटाशी धरून निजली होती. तिच्या पाठीमागे किशा अंकुशा ही जोडी एका सुरात गात होती — 'रुक जा, ओ जानेवाली—' लाडीबाई देव्हाऱ्यापुढे आडवी पटली होती. आणि मधल्या मेढीला उसं लावून संपतराव उताणा पडला होता. त्यानं दाराकडं पाय केलं होतं, नि मनात भयभीत झाला होता. काय करावं, या विचारानं तो हैराण झाला होता, नि उगीचच आपली प्रचंड दाढी कुरवाळीत होता. लाडीचंही काळीज लुकलुकत होतं.

थोड्या वेळानं परशा घरात आला तेव्हा सर्व काही थरारलं. लाडी देवाकडे दचकून सरकली. रंगूबाई बावरली. गाणारी पोरं गप्पकन मुकी झाली. आणि संपतनं जावयाकडं निखाऱ्यासारखी नजर फेकली. तो उशाच्या मेढीला पाठ टेकून बसत म्हणाला,

'हं, का आलाय? काय ईच्चार हाय?'

'काई न्हाय.' परशा म्हणाला, 'लाडीला पाठवा. उगाच डोस्कं फिरवू नगा.'

'न्हाय पाठवत. काय करणार तू?' संपती एकदम एकेरीवर आला.

परशा शांतपणे म्हणाला, 'मामा, मी तुझं पाय धरून तुला कुतऱ्यावाणी दारात न्हेऊन तुडवीन—'

'मला तुडवणार?' संपतनं पसरलेलं पाय हळूच आखडून घेत प्रश्न केला. आणि

परशा त्याच्या दाढीचं केस निरखीत म्हणाला, 'आता पोटात पाय घेऊन काय व्हणार न्हाय, नि मी पायावाचून दुसरं काय धरणार न्हाय. न्हायतर लाडीला पाठवा.'

'न्हाय पाठवणार!' संपती गुरकला.

'मग जाऊ मी?...' परशानं विचारलं.

'हो हो, जा.' संपती खेकसून म्हणाला, 'पर खाली भेटलास तसा वर सरगात भेटू नगं.'

आता परशा जात आहे, असं वाटून संपतनं बेगुमान पाय पसरलं, नि मेढीला उसं लावलं. तोच परशा उठला. त्यानं चौफेर नजर फिरवली. आणि त्याचवेळी संपतच्या लक्षात आलं की, हा आडदांड माणूस कदाचित आपले पाय धरून ओढील. तो चटकन उठून बसला. परशापेक्षा स्वत:चे पाय त्याला अधिक घातक वाटू लागले. आपण कुडाला टेकून बसावं, की मेढीला याची भयंकर फिकीर पडून तो भकास झाला. अखेर कुडापेक्षा मेढच त्याला भक्कम आधार वाटून तो मेढीला टेकून बसला. मनात खचला, चिडला नि वैतागून म्हणाला,

'तू घरातून चालता हो. आमची वाट सोड. फुकट मरू नको. शिर सलामत तर पगडी पचास!'

'ते मला सांगू नकं.' परशा गुरकला.

'मग काय तू पोरीला ओढून न्हेणार?' संपतनं विचारलं आणि परशा म्हणाला,

'न्हेणार, तरच सामत्याची अवलाद.'

'कसं न्हेणार? न्हे बघू?' संपत चिरकला आणि नकळत पाय पसरून सरळ बसला. आणि परशानं पटकन त्याचं पाय धरलं नि लगेच त्याच्या दोन तंगड्या आपल्या काखेत घेऊन हिसका दिला. 'अशी न्हेणार' असं म्हणून त्यानं दाराकडं तोंड फिरवलं. घोड्यानं टांगा काढावा तद्वत संपतला ओढू लागला.

परंतु त्याच वेळी संपतनं चपळाई करून ती उशाची मधली मेढ मजबूत धरली. परशा त्याच्या तंगड्या ओढीत होता. आणि तो मेढीला मिठी मारून पडला होता. मेढ नि जावई यात तो लबराप्रमाणं तणकटून लांबवला जात होता. मेढ सोडली तर हा सैतान जावई आपणाला बाहेर नेऊन खरंच तुडवून मारील, या भीतीनं तो गांगरला होता. आणि मेढ सोडायची नाही, असं ठरवून तो लांबवला जात होता.

परशा क्षणाक्षणाला हिसके देत होता. प्रत्येक हिसका पहिल्यापेक्षा जोरदार ठरत होता. संपतच्या मिठीतील मेढ हिसक्याला झोका घेत होती. त्यामुळं पाखाड्यांनी धीर सोडला होता. पत्रे करकरत होते. आणि घराचा अंतकाळ समीप आला होता.

आता घर गारद होणार. संपती मेढ सोडीत नाही, परशा त्याच्या तंगड्या सोडीत नाही, नि घराचं भवितव्य धोक्यात आहे हे लक्षात येताच रंगूबाईनं बोंब ठोकली, 'घर

मोडलं. पळा...'

'धावा, धावा, घर मोडलं.' लाडीनं पण बोंब ठोकली. परंतु बिचारा संपतराव किती संकटात आहे, याची त्या दोघींना कल्पनाच नव्हती. तेव्हा संपती मोठ्यानं ओरडला, 'अग, तुटलो न्हवं का!'

पुन्हा त्या मायलेकी ओरडू लागल्या, 'सावकाराचा खून, घर मोडलं, पळा पळा.'

त्या दंगलीनं निजलेली माणसं उठून आली. दारात गर्दी वाढली. आणि त्याच वेळी मधल्या मेढीनं अंग टाकलं. मेढीसह संपती ओढला गेला आणि त्याच वेळी घरानं बसकण मारली. कुडांनी पाय पसरलं आणि पडक्या कुडांतून वारा घरात शिरून दिवा पळाला. सर्वत्र अंधार झाला.

एकाएकी हल्लकल्लोळ शांत झाला. लोकांनी कंदील आणून चौकशी केली, तेव्हा संपती उरावर मेढ धरून पडला होता. तिथं परशा नि लाडी दोघंही नव्हती.

लाडीला परशानं पळवली हे लक्षात येताच संपतीनं पुन्हा बोंब ठोकली.

परंतु त्यावेळी परशा लाडीला पाठीवर घेऊन नाक्यावर पोचला होता. त्याच्या पाठीवर लाडी किंचाळत होती — 'मला वाचवा.'

'कोण रे तो?' नाक्यावरचा पोलीस ओरडला.

परशा म्हणाला, 'मी परशा, बायकू हाय ही माझी.'

'मग ओरडतीय का?' पोलिसानं विचारलं.

'डोस्कं फिरलंय.' परशा म्हणाला, 'तवा दवाखान्यात नेतोय.'

नवऱ्याच्या पाठंगुळी बसलेली लाडी कान फाडून ऐकत होती. 'डोस्कं फिरलंय' हे ऐकून ती पुन्हा भडकली. नि 'नाही, नाही' म्हणून ओरडली. तोच परशानं तिला जोराचा चिमटा घेतला. तशी ती पुन्हा हो, हो' म्हणून ओरडली.

पोलीस म्हणाला, 'अरे, मग उभा काय? पळव तिला.'

तसा परशा अंधारात पळाला.

दोन वर्षे होऊन गेली. एके दिवशी संपतीला परशाचं पत्र आलं की, 'तुमची लाडकी लेक बरी आहे. पहिलं मूल खुशाल असून दुसरं पोटात आहे. तिच्या दातांना अजून हात लागलेला नाही. तशी पाळी येणार नाही असं वाटतं...'

हे वाचून संपतीनं उडी मारली. त्याला आनंद झाला. तो रंगूला म्हणाला, 'रंगे, लाडीच्या खोडीला औषध मिळालं.'



# तमासगीर

वर्मी बाण लागलेल्या पाखराप्रमाणं बकुळा तळमळत होती. बकुळानं आजपर्यंत कैक तमाशांच्या फडांत आपल्या नेत्रांच्या गोड हालचालीनं हजारो लोकांवर मोहिनी टाकली होती. पण आज तिच्या नेत्रांपुढून उमाची मूर्ती बाजूला होत नव्हती. तिच्या तरुण मनाला कसली तरी ओढ लागली होती. तिनं उमाला तसा कधीच पाहिला नव्हता. परंतु त्याची ख्याती तिच्या कानावर होती. तो उमा तिला भेटणार होता. पण मैदानावर भेटणार होता. कारण सुपे गावच्या जत्रेत ती गंगारामाला घेऊन उमाबरोबर बारी देणार होती. आणि तो बारीचा दिवस अगदी परवावर येऊन ठेपला होता.

नदीचा प्रवाह संथ थांबावा तशी रात्र निघून जात होती. नवे क्षण परवाचा दिवस जवळ आणीत होते. गंगारामाच्या घरात नि:शब्दता पसरली होती. खुंटीवरची सनगं आपल्या पोटात सप्त स्वर घेऊन शांत पडली होती. गंगाराम व त्याचे साथीदार, बकुळा आणि सर्व मंडळी परवाच्या बारीचा विचार करीत होती. जय का पराजय, हा प्रश्न त्यांच्या डोळ्यांपुढं तराजूप्रमाणं हेलकावे देत होता.

सुपे गावच्या सर्व लोकांनी वर्गणी जमवून गंगारामाला तमासगीर केला होता. त्याला कशाचंही कमी पडू दिलं नव्हतं. फक्त त्यानं तमाशा करीत दूर दूर जावं. सुपे गावचा लौकिक वाढवावा. आणि दर वर्षी सुपे गावच्या जत्रेत येऊन गावाची करमणूक करावी. देवापुढं हजेरी लावावी. गंगारामाकडून गावाची एवढीच अपेक्षा होती.

आणि गंगाराम हा अलिखित करार काटेकोरपणे पाळीत होता. बकुळाला घेऊन वर्षभर तो तमाशा करीत दूरवर जात होता. आणि गावच्या जत्रेला नियमितपणे हजर रहात होता. यंदाही तो आपला संच घेऊन आला होता.

गंगाराम बकुळासह आल्याची बातमी लागताच गाव चावडीवर जमला. सर्वांना आनंद झाला. पाटलानं माणूस पाठवून गंगारामला चावडीवर बोलावणं केलं. सुपे गावचा चंद्रू पाटील जाजमावर बसला होता. आपला पटका कपाळावर आणून, डोळे झाकून तो हत्तीप्रमाणं झुलत होता. त्यानं या वर्षी जत्रेला पाचशे रुपये देऊन गावाच्या शेंडीवरून पाणी घालवलं होतं. नाम्या तेली आपल्या मिशीबरोबर चाळा करीत होता. तर कुलकर्णी टोपी पाटलापुढं ठेवून आपली शेंडी गोंजारीत बकुळाचा विचार करीत होता. सावळा धनगरानं आपल्या मांडीवर ढोलक्याचा ठेका धरला होता. गुरव पाटलाच्या समोर बसून त्याच्या शब्दांची वाट पहात होता. तराळ, सनदे वगैरे गावकामगार तयार होते. आणि

सर्वच जण गंगारामची वाट पहात होते. तोच गंगाराम आला.

गंगाराम चावडीवर येताच सर्व मंडळी एकदम जागी झाली. प्रत्येकानं काहीतरी हालचाल केली आणि गंगारामानं सर्वांना एकदमच रामराम केला. सर्वांनी छाताडाला हात लावून त्याचा स्वीकार केला. गंगारामला पाहाताच कुलकर्ण्याला बकुळाची आठवण झाली. त्यानं आवाज चढवून विचारलं,

'कसं काय गंगाराम? बकुळाची प्रकृती ठीक आहे ना? दोन दिवस तिच्यावर मोठं ओझं पडणार आहे म्हणून म्हणतो.'

कुलकर्ण्याच्या बोलण्यात काहीतरी खोच असावी असा संशय येऊन गंगारामानं पाटलाकडं पाहिलं. पाटलानं पागुटं मागं सारून गुरवाकडं पाहिलं, आणि गुरव बोलता झाला.

'म्हंजी असं. तुझ्यासंगं झुंजाया आमी दांडगा बैल आननार हाय!' त्यानं मध्येच थांबून पाटलाकडं तिरप्या नजरेनं पाहिलं. आणि पुन्हा आपल्या व कुलकर्ण्याच्या बोलण्याचा अर्थ सरळ केला.

'म्हंजी तुझ्याबरोबर बारी देण्यासाठी आमी मोठा तमासगीर आननार हाय.'

'आननार नव्हं,' पाटील डोळे उघडून खेकसला, 'लेका, सारं ठरलं.'

एवढंच बोलून पाटलानं पुन: डोळे झाकले आणि तंबाकूत चुना कालवीत काळीचा पाटील म्हणाला,

'पांढरीचं नाव राख! लौकिक वाढला पाहिजे गावाचा!'

काळीच्या पाटलानं दाढेला तंबाकू धरली आणि कुलकर्णी चटकन उठून प्रत्येकाला खात्री देत बोलू लागला,

'मंडळी, गावचा लौकिक नक्की वाढेल. कारण गंगारामाच्या पाठीशी बकुळा आहे आणि बकुळाच्या जिभेवर सरस्वती, आणि तिच्या तारुण्यात अमृत आहे.' कुलकर्णी मध्येच थांबला. त्याला काही तरी आठवलं आणि पुन: त्यानं सुरवात केली, 'कनकलताच सौदामिनी। की चंद्रकळा तनुधारिणी। सुगंध केतकी पात्र वर्णी। ...' पुढचे आठवेना तेव्हा कुलकर्णी खाली बसला.

बकुळेची ही स्तुती ऐकून सर्वांच्या डोकीत बकुळा नाचू लागली. धनगर चेकाळून ओरडला,

'मग बकुळाला म्हणावं, झालं पायजे!'

'मी आपलं सारं कसब फडात ओतून गावचं नाव राखीन', गंगाराम शांतपणे उद्गारला. सर्वांनी गंभीरपणे त्याच्याकडे पाहिले. 'पण बारीला कोन येणार?' गंगारामानं नम्रपणे प्रश्न केला आणि पाटील म्हणाला,

'पळशीचा उमा येनार हाय.'

'पर उमा म्हंजी लेचापेचा नव्हं!' धनगरानं इशारा देण्याचा आविर्भाव चेहऱ्यावर आणून सांगितलं. पण एकदम स्वर चढवून गंगाराम म्हणाला, 'कोण बी येऊ द्या. माझ्या घरात गाण्यानं पेव भरलेलं हाय. मी कुनाला डरत न्हाय!'

या वेळी सर्वांना आनंद झाला. परवा आपल्या गावच्या जत्रेत आपल्या गावचा तमासगीर गंगाराम उमाबरोबर बारी देणार, मोठा चुरशीचा सामना होणार, भरपूर तमाशा पहायला मिळणार, या जाणीवेनं सर्व लोक आनंदित झाले. सर्वांचे लक्ष त्या दिवसाकडे लागले.

आणि 'परवा सुप्याच्या फडात आपण उमाबरोबर बारी देणार', असं छातीला हात लावून बोलून गंगाराम घराकडं आला होता. त्यानं परवा आपली उमाबरोबर बारी आहे, अशी खबर आपल्या साथीदारांना दिली होती. आणि तेव्हापासून सर्वचजण त्या बारीचा आणि उमाचा विचार करीत बसले होते.

इकडे पळशीतही तीच स्थिती होती. 'परवा आपल्या उमाची बारी', हेच शब्द प्रत्येक माणसाच्या ओठांवर खेळत होते. सर्वांच्या डोळ्यांपुढं सुपं गावचा फड दिसत होता. आपण तमाशाला नक्की जाणार, असा जो तो स्वत:च्या मनात निश्चय करीत होता.

कारण पळशीचे लोक उमाच्या कवित्वाला आणि कलेला देवाइतकेच पवित्र मानीत होते. जणू काय उमाचा तमाशा म्हणजे पळशी गावच्या लोकांची दौलतच होती!

उमाला कळत नव्हतं तेव्हाच तो पोरका झाला होता. त्याला गावानं जतन केला होता. गोरा गोड मुलगा म्हणून सर्व गाव त्याला जपत होतं. पुढं जेव्हा उमाला कळू लागलं तेव्हा त्याला गाण्याचा नाद लागला. जे ऐकावं ते त्यानं पाठ करावं आणि मोठ्यानं गावं. लोकांनी त्याचं गाणं ऐकावं. त्याच्या पाठीवरून हात फिरवावा. त्याच्या नादी स्वभावाची स्तुती करावी. यामुळं उमाचा गाण्याचा नाद वाढत गेला.

एकदा पळशीच्या जत्रेला एक तमाशा आला आणि उमानं त्या तमासगीराशी दोस्ती जोडली. त्यांना गाणी म्हणून दाखविली. तमासगीरही त्याच्यावर खूष झाले आणि जेव्हा हे तमासगीर परत निघाले तेव्हा गावातील काही बड्या मंडळींनी त्या तमासगीरांना आपल्याबरोबर उमालाही घेऊन जाण्याचा सल्ला दिला. नादी उमाही त्या तमासगीरांबरोबर आपला गाव सोडून दूर निघून गेला. परंतु त्या दिवसापासून गावात गाण्याचे सूर नाहीसे होऊन लोकांना उमाची आठवण होऊ लागली.

दहा वर्षे गेली. दहा पावसाळे झाले, त्यांनी उमाचं घर पाडून मातीला मिळवलं. तुळयांची लाकडं किडीनं खाल्ली. कौलं फुटून नाहीशी झाली. पण उमाची आठवण लोकांना होतच होती!

आणि अकराव्या वर्षी एकाएकी उमाचा तमाशा पळशीच्या जत्रेत येऊन दाखल झाला. एकाएकी उमा परत आल्याची बातमी ऐकून गाव उमाकडे धावला. लोकांनी त्याला

डोळे भरून पाहिला; परंतु त्यावेळी उमा पहिला राहिला नव्हता. तो पार बदलला होता. तो त्या तमाशात नाच्याचं काम करीत होता. एवढंच नव्हे, तर तो हजरजबाबी तमासगीर झाला होता. त्याला सुंदर स्त्रीच्या वेषात पाहून तमाशाचे शौकिन धुंद होत होते. सुंदर स्त्रिया तर त्याचा हेवा करीत होत्या. मोठमोठे तमासगीर त्याच्या कवित्वाने पार पळून जात होते. कैकांना त्याचा मत्सर वाटत होता. उमा ज्या तमाशात होता तो तमाशा केवळ उमाच्या कलेवर चालत होता. उमाच्या कीर्तीची घोडदौड नुकतीच सुरू झाली होती.

जेव्हा पळशीत उमाचा तमाशा उभा राहिला तेव्हा सारा पोर न् थोर नागाप्रमाणं डोलू लागला. वेळोवेळी त्याच्या गाण्याच्या शेवटी होणारा पळशीचा उल्लेख ऐकून पळशीकरांच्या माना अभिमानानं ताठ झाल्या.

तमाशा संपला. तमासगीर बिऱ्हाड बांधून निघाले तेव्हा उमाही सर्वांचा निरोप घेऊन निघाला. सर्व लोक पुन्हा दु:खी झाले. उमा निघाला यामुळे ते बैचेन झाले. परंतु क्षणात 'उमा जाणार' या विचाराची जागा 'त्याला जाऊ द्यायचा नाही' या विचारानं घेतली. तमासगीरांचं बिऱ्हाड चावडीपुढं लोकांनी अडवलं. जो तो उमाला सांगू लागला,

'उमा, जाऊ नगं.'

उमाचे तमासगीरही उमावर आपली मालकी सांगू लागले. बाचाबाची वाढली, बाबा शिंदा पुढं येऊन म्हणाला,

'उमा, हातच ऱ्हा. हातंच तमाशा कर!'

पोलीस पाटलानं उमाला उपदेश केला,

'उमा, हातंच तमाशा कर! इनामाचा लिलाव करून पैसा पुरवतो.'

'असं बोलू नगा.' तमाशाचा पुढारी उठून म्हणाला, 'आमचा नाच्या घेऊ नगा.'

'तू कंच्या रं गावचा?' रामा म्हारानं त्या तमासगीराला प्रश्न विचारला, 'आमचा मानूस तू रं का नेनार?'

'पर आमच्या पोटावर पाय मारू नगा.' तमासगीर जरा जोरात बोलला.

महार म्हणाला,

'आता जास्ती बोलू नगं. न्हायतर पाठीवर पाय बसंल, गुमान जा.'

तो लहान पोरांचा गराडा, तो आग्रह, ती माया, ते गावचं अलोट प्रेम हे सर्व पाहून उमाचं अंत:करण भडभडू लागलं. त्याचा आत्मा गावाबाहेर जाण्याला कचरू लागला. पण, नाच्याला घेऊन जाऊ, या तमासगीरांच्या निर्धारानं तो भ्रमिष्ट झाला. त्यानं क्षणभर विचार केला. आणि चटकन उठून तो एका घरात गेला आणि सर्व तमासगीरांनी चावडीपुढं बैठक मारली. ते म्हणू लागले, 'नाच्या घेऊनच जानार!'

थोड्या वेळानं उमा परत आला. लोक त्याच्याकडे पहात होते. तोच त्याने हातातला आपला आंबाडा त्या तमासगीरांच्या अंगावर फेकून देत म्हटलं, 'हा आपल्या नाच्या

घ्या आणि जावा बरं! मी माझं गाव सोडनार न्हाई!'

उमाच्या त्या वागण्याने तमासगीर थंडगार पडले. गावाला आश्चर्य वाटले. क्षणात सारा गाव उठून उभा राहिला. लोकांनी उमाला खांद्यावर घेऊन त्याची मिरवणूक काढली. पागुटी, घोंगडी हवेत उडवून आनंद व्यक्त केला. त्या दंगलीत ते तमासगीर केव्हा कुठे गेले त्याचा पत्ता लागला नाही. त्या दिवशी रात्रभर लोक झोपलेच नाहीत. त्यांनी रात्रभर विचार करून उमाचं घर बांधायचा विचार नक्की केला.

आणि दुसऱ्या दिवशी माळाला वडारानं सुरूंग लावून दगड काढायला सुरवात केली. गाड्या भरून ते दगड आणू लागले. कुणी मोट जुंपून पाणी आणलं. आणि कुणी मातीचा ढीग लावला. गावचे सुतार, लोहार, गवंडी कामाला लागले. आपोआप सारी चक्रे फिरू लागली. मानवाच्या सामुदायिक शक्तीनं विराट स्वरूप धारण केलं. उमाचं घर नेस्तनाबूद करायला ज्या काळाला दहा वर्ष लागली त्या काळावर माणसांच्या श्रमशक्तीनं मात केली. दुसऱ्याच दिवशी, एकादा कोंब उगवावा तसं उमाचं घर उगवून आलं. त्या घराकडं पाहून उमाच्या डोळ्यात आनंदाश्रू तरळू लागले. आपल्या कल्पनेने वेगळी सृष्टी निर्माण करणारा उमा चकित झाला. त्या सत्यसृष्टी निर्माण करणाऱ्या महाशक्तीपुढं त्यानं मान नम्र केली.

तिसऱ्या दिवशी आणखी एक चमत्कार घडला. उमाच्या आजोबानं ज्या सावकाराकडं आपली जमीन गहाण टाकली होती, त्याच्या नातवाला गावकऱ्यांनी पंचात बोलावून उमाची जमीन परत करायला भाग पाडलं. आणि ज्या दिवशी उमा आपल्या घरात गेला त्या दिवशी पोलीस पाटलानं तमाशाची सर्व सनगं आणून त्याच्या पुढं मांडली. ती पाहून उमाला कळून चुकलं की हे जे सर्व काही झालं ते केवळ तमाशामुळंच झालं.

लौकरच उमाच्या घरात गाण्याचे सूर उमटू लागले. पुन्हा त्याच्या घरात ढोलकं, तुणतुणं एका सुरात निनादू लागले. पुन्हा त्याच्या प्रतिभेला बहर आला. केवड्याच्या कणसाचा सुगंध जसा दूर जावा तसा उमाच्या कवित्वाचा परिमल दूर पसरू लागला. आजूबाजूच्या गावचे लोक त्या सुगंधानं धुंद होऊ लागले. परंतु तो सुगंध फैलावणारा काव्य-वृक्ष पळशीत होता. त्याच्यावर सर्व पळशीकरांची मालकी होती. म्हणूनच उमा, पळशी आणि तमाशा ही तीन नावं एका धाग्यात ओवली जात होती.

अशा ह्या उमाच्या तमाशाची सुपे गावच्या फडावर बारी होती. म्हणूनच सारी पळशी त्या बारीचा विचार करीत होती. जणू पळशीची सारी इभ्रत सुप्याच्या फडात ईर्षेलाच पडली होती.

सुप्याची जत्रा भरली होती. सर्व गाव माणसांनी फुलून निघाला होता. देवाची पालखी निघाली होती. बारा बलुती धावपळ करीत होती. मशालीच्या उग्र प्रकाशात कुऱ्हाडी लखलखत होत्या. देवळात देव पोचवून उमाला उभा करायची सर्वांना घाई झाली होती. उमा पळशीकर येऊन पोचल्याची वंदता सर्वत्र पसरली होती. कोणी बकुळाच्या नावाचा

जप आरंभला होता.

शेवटी एकदाची पालखी देवळात गेली. लोक घासभर पोटात रेटून पाराखाली पुन्हा एकत्र झाले. तरुणांनी तोपर्यंत फड करून ठेवला होता. दोन्ही बाजूंनी तमासगीर आपल्या सर्व तयारीनिशी हजर झाले होते.

पाटलानं पागुटं मागं सारून सर्वत्र नजर फिरवली आणि हुकमी आवाज काढला.

'हं, करा गा सुरू!' आणि लगेच त्यानं चांभाराकडं कुऱ्हाड रोखून आज्ञा केली, 'ए, वाईच उजेड करा की!'

चांभारांनी तेलाच्या बुधल्या मशालीच्या डोकीवर उताण्या करून प्रकाश वाढवला. पाटील पुन्हा ओरडला,

'मंडळी, खाली बसा!'

'आरे, हा पोलीस कुठं गेला?' कुलकर्ण्यानं पोलिसाच्या नावानं हाकाटी पिटली. आणि हाडकुळा पोलीस कमरेचा पट्टा वर ओढीत, छडी हालवीत गर्दीत शिरला. 'बसून घ्या! बसून घ्या!' त्यानं लोकांना दाबून बसवायला सुरुवात केली. थोड्याच वेळात गोंगाट शांत झाला. खाली बसलेले लोक आपापल्या माना वर करून तमासगीरांना निरखू लागले. तोच गंगाराम फडात येऊन नम्रपणे उभा राहिला. बकुळाही जवळच उभी होती. तिला पाहून नि:शब्दता निर्माण झाली.

ढोलकं, तुणतुणं, झांज, हालगी यात प्राण आला. गंगारामानं आपला कंठ त्यांच्या सुरात मिळवून गणपतीची करुणा भाकली –

'करी करुणा एकदंता। गिरजेच्या नंदना।' हे पालुपद पुन्हा पुन्हा आळवून गंगारामानं सर्व वातावरण गंभीर केलं आणि गण संपवून गवळणीला प्रारंभ केला. स्वत: गंगाराम कृष्ण होऊन पुढं आला. त्यानं मथुरेची वाट रोखली आणि बकुळा राधा होऊन पुढं आली. तिच्या नाजूक हावभावातली दाहकता श्रोत्यांच्या उरी झोंबू लागली. तिच्या गोड गळ्यानं सर्वत्र अस्थिरता आणली. रसरंगाचा प्याला तोंडातोंड भरून गंगारामानं आपली हजेरी संपवली. पुन्हा क्षणभर लोकांत चलबिचल सुरू झाली. आणि उमा फडात येऊन उभा राहिला.

उमा फडात येताच सर्व नजरा त्याच्यावर स्थिर झाल्या. त्याचा शुभ्र-पोशाख, डौलदार उभं रहाणं वगैरे पाहून लोक जरा पुढंच सरकून बसले. आणि उमानं आपली सनगं रसभंग होऊ नये म्हणून, गंगारामनं ज्या सुरात लावली होती त्याच सुरात लावली होती. तोच ताल ढोलकीत घेऊन गण सुरू केला. रंगाची लाट वर उडवून गण संपवला आणि गवळण सुरू केली.

'या मथुरेच्या मार्गानं ग राधा निघाली झोकान' हे गवळणीच ध्रुपद धुमाळीनं सुरू झालं. त्यानं त्याचा सूर गगनाला भिडवला. उमाची थाप हालगीवर पडू लागली. वातावरण

थरथरू लागलं. रंगाची लाट झेप घेऊ लागली. थोड्या वेळापूर्वी लोकांच्या हृदयावर ठसलेली बकुळा दूर झाली. बाबा शिंदा बेभान होऊन उठून उभा राहिला. त्यानं समोर असलेल्या कुलकर्ण्यांच्या भिंतीकडं बोट करून गर्जना केली.

'हां उमा, हालगीच्या थापेनं हे भिंताड पडलंच पायजे आज.'

ही भयंकर सूचना ऐकून कुलकर्णी आ वासून त्या आपल्या भिंतीकडे पाहू लागला आणि खरोखरच सर्व गाव उमाच्या हालगीनं दणाणू लागला. श्रोते गुंग होऊन उमाचा तमाशा पहात होते. बकुळा त्याचं सर्व कौशल्य पारखून घेत होती. ती वैर विसरली होती. आज प्रत्यक्ष उमा तिच्यापुढं कलेचं इंद्रधनुष्य निर्माण करीत होता. परीक्षेच्या वेळी घणाच्या घावाखाली ऐरणीत बुडणाऱ्या हिऱ्यासारखा तो तिला भासत होता. गंगारामानं निर्विकार मुद्रा केली होती. त्याच्या कपाळावरच्या आठीत हालाहलाची बरोबरी करणारा कलावंतातील मत्सर तळपत होता.

उमानं आपली बारी संपवली. लोक उठले. उद्याच्या झटापटीची नुसती सलामी झाली. या विचाराचा आधार देऊन सुपे गावच्या लोकांनी स्वत:ची समजूत घातली, 'आणि आपला उमाही काही कमी नाही, उद्या खरी लढत होणार,' असं म्हणून उद्यावर भरंवसा टाकला. इतर गावचे लोक न्यायाधीशाच्या भूमिकेत होते. त्यांच्या दृष्टीनं कोणीही कमी नव्हतं. सर्व लोक सकाळपर्यंत विश्रांती घेण्यासाठी निघून गेले.

दुसऱ्या दिवशी सूर्योदयाला गावाशेजारच्या आंबराईत तमाशाचा फड पडला. सकाळच्या आल्हाददायी वातावरणात हजारो लोक बसले होते. गंगारामाची बारी उभी होती. त्यानं हास्यरसाचं वादळ उठवलं होतं. श्रोते हासत होते...

गंगाराम खापऱ्या चोर होऊन चोरीला निघाला. त्याला त्या दिवशी काहीच लाभ झाला नाही. तो शेवटी एका श्रीमंताच्या घरी गेला. त्याचवेळी त्या श्रीमंताची पत्नी एका परपुरुषाबरोबर पळून जाणार होती. पहाटे पळून जाण्याचा बेत त्यांनी नक्की केला होता. परंतु तो इसम येण्यापूर्वीच खापऱ्या चोर तिथं आला आणि हाच आपला प्रियकर समजून श्रीमंत पत्नी त्याच्याकडं धावत आली. चोरानंही प्रियकराचं सोंग करून तिला पळविली. परंतु पुढं त्या स्त्रीला घोर यातना भोगाव्या लागल्या. असा तो खापऱ्या चोराचा फार्स करून गंगारामानं रंगभरणीची सीमाच ओलांडली आणि आपली बारी समाप्त केली. ती सीमा ओलांडणं त्यानं उमाला अशक्य करून ठेवलं. तमासगीरांचा कठीण पेच घातला!

उमाची बारी उभा राहिली. परंतु फासेपारध्यानं लावलेल्या सापळ्यात स्वत:च जाऊन अडकणारा उमा नव्हता! प्रेमरसाचा परिपोष करून श्रोत्यांना प्रेमरसात बुडविण्याची त्यानं तयारी केली. गंगारामाचा मार्ग सोडून आपला स्वत:चा निराळा मार्ग धरला. त्यानं बटावाच्या वगाची सुरुवात केली. तुणतुण्याचे स्वर चढवले. दोन तुणतुणी कोयलाचा

नाद काढू लागली. उमाच्या मुखातून उंच स्वरात बटावाची कडवी बाहेर पडू लागली. क्षणात उमानं श्रोत्यापुढं एक कल्पनारम्य सृष्टी उभी केली. दिल्ली शहर सुपे गावच्या आंबराईत अवतरलं! श्रोते स्वत:ला विसरून त्या नव्या सृष्टीत गेले. त्या सृष्टीत बकुळाही गेली. ती त्या सृष्टीत वावरू लागली. ती सृष्टी उमाच्या प्रतिभेनं निर्माण केली होती. त्या दुनियेत जन दिल्ली शहर होतं. त्या शहरात एक बटावू नावाचा देखणा, रंगेल, श्रीमंत तरुण राहात होता. त्याचे नोकरचाकर शंभर बैलांवर माल लादून व्यापार करण्यासाठी अहमदनगरला गेले. त्यांनी अहमदनगरात खरेदी विक्री केली. आणि निघण्यापूर्वी ते सर्व वाणी अंबाबाईच्या दर्शनासाठी गेले. तिथं अहमदनगरची मोहना अचानक त्यांच्या दृष्टीस पडली. तिचं रूप पाहून वाणी बेभान झाले. त्यांनी मोहनासारखी सुंदर स्त्री कधीही पाहिली नव्हती. मोहनाचा पती दूरदेशी स्वारीवर गेला होता. ती एकटीच घरी होती. ती तारुण्यानं रसरसली होती. तिनं त्या वाण्यांना वेडच लावलं.

अशा त्या मोहनाची मूर्ती हृदयात घेऊन ते वाणी दिल्लीत परत आले. त्यांनी बटावापुढं मोहनाच्या रूपाची तारीफ केली. आणि जिची ख्याती दिल्लीपर्यंत आली ती मोहना कशी असंल, असं वाटून बटावालाही मोहनाचं वेड लागलं. वाटेल ते झालं तरी मोहनाला पाहावयाची, या निर्धाराने बटावूनं निघण्याची तयार केली. बटावू नगरास निघाला...

उमानं सत्यसृष्टी अदृश्य केली. बटावू वाणी, मोहना, दिल्ली याचंच तिथं अस्तित्व प्रस्थापित झालं! उमाचे साथीदार वगाची कडवी मोती पेरल्याप्रमाणे पेरू लागले. उमा स्वत: बटावूच्या वेशात पुढं आला आणि रसरंगाच्या सरितेला महापूर येऊन बकुळाचं मन त्या महापुरात उडी घेण्यासाठी बावरलं.

उमानं समोरच्या बकुळाकडं एक कटाक्ष फेकून कडवं सुरू केलं,

'दिल्लीचा बटाव झोरा बावरा। हजारात हिरा, लाखामध्ये मोहरा। चंद्र गगनात मारितो लहरा। वय पंचवीस कोवळा चेहरा। शब्द जणू त्याचा मंजुळ वारा। मस्तकी शोभे मोत्यांचा तुरा। दंडात दंडपेट्या रेशमी दोरा। मुखी पानाचा विडा रंगला। पायामध्ये नामी पठाणी जोडा। गोप करगुटा शिंदेशाही तोडा। कडं सोन्याचं पवित्र लेला ॥'

तमासगीर कलेचं मंदिर उभारू लागले. लोक स्थिर होऊन बटावू पाहू लागले, आणि बकुळाच्या कानात तिचं मन बोलू लागलं, 'जर आपण या बटावाची मोहना झालो असतो तर किती छान झालं असतं?'

परंतु गंगारामाचं मन लटपटलं होतं. आपला कडेलोटच होत आहे असं त्याला वाटलं. त्यानं चंदू पाटलाकडं धाव घेतली. पाटील, कुलकर्णी, तेली, गुरव वगैरे मंडळी गुंग झाली होती. गंगारामानं पाटलाला खूण केली आणि उमाचा घोडा सजू लागला. कडवं सुरू झालं,

'अबलख घोडा सजवला छान। त्याच्यावर ठेवलं जीन सामान। कुमाईत काळा

त्याचा वान । खटापटा गेंद मानेवर दोन । सोनेरी सडका चार बाजूनं । मोत्यांच्या लडी दिल्या सोडून । अंकुशीरूप खेळविलं जुनं । कोयल्याच्या माळा गळ्यामध्ये दोन । माथ्यावर कलगी पिवळं सोनं । चोख चांदीचे वाळे दोन । नाद त्यांचा उठला । त्याच्या गळ्यात बोरमाळा । पंख चौखाला गोंडा शोभला । त्याने वारूला शृंगार केला ।'

बटावाच्या घोड्याच्या पायातील वाळ्यांचा नाद श्रोत्यांच्या कानात निनादू लागला. बटावू मोहनाकडे निघाला. आणि चंदू पाटील नाक फेंदारून ओरडला,

'मंडळी, आता ही बारी मोडू या.'

'न्हाय न्हाय! बटाव कडंल गेला पाहिजे!' लोकांनी ओरड केली.

'आता उमाचा तमाशा पुरं. आता बकुळाचा सुरू व्हनार.' आपली कुऱ्हाड वर धरून गर्दीतून पुढे येऊन तेली म्हणाला.

सुपे गावच्या लोकांनी दंगल सुरू केली. आणि पळशीकरांनी आपल्या कुऱ्हाडींना दांडे ठोकले. हाणामारीला तोंड लागले. सर्व लोकांशी सुपे गाव लढू लागले.

दगडांचा वर्षाव होऊ लागला. ती भयंकर दंगल ओटा ओलांडून गावात शिरली. सुपेकरांनी बोळांतून मारा सुरू केला. इतर गावच्या लोकांनी दुसरे बोळ दाबून धरले. त्या दोन्ही बोळांच्या मध्ये असलेल्या चौकात भयंकर कत्तल व्हायची वेळ जवळ येऊ लागली. चंद्रू पाटील ओरडत होता.

'आरं, माझी बंदूक आणा!'

त्या उग्र दंगलीत शिरून तो ज्वालामुखी शांत करण्याची उमा शिकस्त करीत होता. त्याचे शब्द लोकांच्या कानापर्यंत जातच नव्हते. तो पुढं पुढं सरकत होता. त्याच्या पाठोपाठ बकुळा धावत होती. ती आपोआप धावत होती.

'पाटील, ही बंदूक घ्या!' गुरव ओरडला. पाटलानं बंदूक घेऊन समोरच्या लोकांवर नेम धरला आणि उमा मधल्या चौकात येऊन उभा राहिला. क्षणात सर्वांना आश्चर्याचा धक्का बसला. तोच बकुळा उमाच्या पाठीशी येऊन थांबली. उमा मोठ्याने म्हणाला,

'हा तलवारीचा तमाशा थांबवा आणि माझा तमाशा पाहा!'

सर्व हत्यारं खाली आली. कुऱ्हाडी धरणीवर टेकल्या. शब्दांना वाव मिळाला. चंद्रू पाटील बंदुकीची नळी बाजूला करून म्हणाला,

'आमास्नी बकुळाचा तमाशा पायजे.'

'न्हाय... आदी बटावू पुरता झाला पायजे.' समोरच्या बोळातून आवाज आला. आणि बकुळा पुढं होऊन म्हणाली,

'उमा आणि बकुळा यांचा एक तमाशा होनार, उमा बटावू होनार आनी मी त्याची मोहना होनार. मग तर झालं?'

'मग काय दुधात साखर! आंधळं डोळंच मागतं!' चंद्रू पाटील बंदूक खांद्याला

लावीत म्हणाला.

सागराला सरिता मिळाली. द्वेषाची आग शांत झाली.खड्गावर कलेनं मात केली. लोक शांत होऊन चौकात येऊन बसले. उमाचे साथीदार येऊन पोचले. पुन्हा वातावरण निर्मळ झाले. पुन्हा सर्वांच्या मुखावर हास्य तरळू लागले. बकुळा मोहना होऊन बटावाच्या स्वागतार्थ सज्ज झाली. आणि उमा बटावू दिल्लीस निघाला.

पुढचे कडवे सुरू झाले —

'फाल्गुन मासी उनाळ्यात ऊन। घोडा लाविल त्यानं रस्त्यानं। लागलं पुढं भयासूर वन। गवत-काडीची आत अडचण। दौना मारवेल डोईच्या वर गेली गांजीण। कुंदा-पौन्याची झाली कापण। होता हराळीचा चोप बाजूनं। व्यापिलं रान खारं शिंपीनं। बाभळ, बोर, चिंच, जांभूळ, आंब्याचं वन। पळस, पांगीरा न्यारा त्याचा वान। करंजी पान घोडा भोकरं छान। हुंबर टेंबर पिकून झाली घाण। झाडावर पिकली कवटं गोंदनं। कलाचे बेट भारी शोभिवान। बी त्याला येते फार दिवसानं। आल्यावर बी जातं वाळून। होतं मग ज्योतिषाला पावन। मूर्ती बटावून काठी देवाला। धावशीला वेल उनाळी। कावळीची झाडावर जाळी गोड दिसण्याला।

अनंत वनराजीनं भरलेल्या अरण्यातून उमाचा बटावू मोहनाकडे निघाला होता. तमाशा पुन्हा रंगला होता. लोकांचा रुद्रावतार शांत होऊन ते तमाशा पहात होते. तमासगीरांनी कलेच्या किमयेनं सर्वांची मनं भारली होती.



# काडीमोड

दिवस उगवून वर आला. त्याची सोनेरी किरणं नांदगावाकडं धावली. गावाच्या मध्यभागी असलेल्या देवळावरचा सोनेरी कळस झळाळला. तसा गावचा जुना गावगाडा जुन्या चाकोरीतून धडपडत निघाला. माणसं उठली. त्यांची श्रमशक्ती कार्यक्षम झाली.

औताड्याची सखूबाई देवळात जाऊन परत पाराखाली आली तेव्हा शंकर जंगम काखेत पंचांग दाबून निघाला होता. तो सखूला पाहताच म्हणाला,

'तुझ्या मुलाची रास चांगली आहे. या वर्षी त्याच्यावर तांदूळ टाकून मोकळी हो. योग बरा आहे.'

हे ऐकून सखूला आनंद झाला. 'करावी खटपट', असं म्हणून ती पुढे निघाली. तोच कोंडिबा डंगारना आडवा आला. त्यानंही तोच प्रश्न काढला. म्हणाला,

'प्वाराचं लगीन कर, सुनेच्या हातचं चार घास खा नि मग मर खुशाल!' या शब्दांनी तर सखूवर अमृतवर्षावच केला. ती हर्षभरित होऊन पुढं सटकली. आपल्या भीमाचं लग्न लवकर व्हावं, त्याची देखणी बायको घरी यावी, आपण तिला पाहावी, या विचारानं तिचा जीव वारंवावडी झाला – नि ह्या वर्षी भीमाचं लग्न करायचंच, असा तिनं निश्चय केला.

सखूला भीमाच्या लग्नाचं वेडच लागलं होतं. मांडव, ती सून, त्या मुंडावळ्या हेच तिच्या स्वप्नात येत होतं आणि रोज सनईचे गंभीर स्वर तिच्या कानात गुंजत होते. आज वीस वर्षे दुःखाच्या डोंगराखाली चिरडलेलं तिचं मन सुखासाठी हपापलं होतं, चरफडत होतं – नि भीमाचं लग्न म्हणजेच आपल्य जीवनाचं साफल्य नि आपल्या आत्म्याचं मंगल सुख अशी तिची समजूत होऊन बसली होती.

ज्या दिवशी सखूचा नवरा एकाएकी मेला तेव्हा तिच्यावर आकाश कोसळले होते. तेव्हा ती अवघी वीस वर्षांची होती, नि तिच्या हृदयाशी दोन वर्षांचा भीमा होता. नखाएवढ्या मुलावर आयुष्यभर वैधव्याच्या वणव्यात जळण्याचं खडतर कर्म दैवानं तिच्या वाट्याला आणून दिलं होतं. या गावात विधवा म्हणून जगायचं कसं नि अब्रूदार म्हणून मरायचं कसं, हा एकच प्रश्न तिला भेडसावीत होता.

आणि त्याच वेळी भाऊबंदांनी उठावणी केली होती. झिंग्याएवढं मूल आज ना उद्या मरंल नि बुडता हिस्सा मोकळा होईल असं सर्व औताडे म्हणत होते. परंतु त्याच वेळी सखूनं जगण्याचा निश्चय केला होता. या पोराला मरू द्यायचं नाही. हे मूल आहे तर

हे गाव, हे घर, हे शेत, हे सारं आहे. हे मूल मेलं की आपण मरू. भीक मागावी लागेल या गावात. या घरात क्षणभरही राहता येणार नाही. या शेतावरचा हक्क क्षणात नाहीसा होईल नि हे भाऊबंद आपणाला हाकून देतील अशी भीती वाटून ती जगण्यासाठी धडपडत होती. कसंही करून जगायचं, हा एकच विचार ती करीत होती — आणि त्या विचारानं तिचं मन बलिष्ठ केलं होतं. नि ती मनात म्हणत होती, मी मुलाला मरू देणार नाही!

थोड्याच दिवसात सखू नवऱ्याचं दु:ख विसरली. भावी सुखासाठी भयंकर दु:ख तिनं गिळून घेतलं आणि सर्व शक्ती एकवटून ती जगू लागली.

दोन वर्षांचा भीमा पाठीशी बांधून ती कष्टाचा डोंगर उलथू लागली, शेताचं सर्व काम करू लागली. ते मूल पाठीला बांधून डोकीवर घागर घेऊन ती पाणी भरीत होती नि पाठीशी मूल बांधून बाजाराला जात होती. तिला त्याचं ओझं होतंच नव्हतं. उलट आपलं भवितव्य आपल्या पाठीवर सुरक्षित आहे असं समाधानच तिला वाटत होतं.

पुढे भीमा अकरा वर्षांचा झाला. तो पोरांत खेळू लागला तेव्हा सखूला धडकीच भरली. कोणीतरी पोराला विष घालील या भीतीनं ती त्याला डोळ्याआड होऊ देत नव्हती. आणि जर का तो नजर चुकवून दूर गेला तर ती त्याला घरात आणून बडवीत होती नि विचारीत होती,

'बोल, जाशील का?'

आणि भीमा तोंड पसरत नकारार्थी मानेनं 'नाही' म्हणत होता. मग सखू अगतिक होऊन म्हणत होती, 'मेल्या! तू आपल्या मरणानं मरशील — पण मला किडं पडतील, नरकात जावं लागेल! हे भाऊबंद माझी राख करून ती कपाळाला फासून बसतील!' असं म्हणून पुन्हा त्याला मारीत होती.

नंतर ती शांत होत होती. अगतिकता निवळून तिच्या आईच्या हृदयात मायेचे तरंग उठत होते नि ती त्याला पोटाशी धरून हंबरत होती.

अगदी अशा तऱ्हेनं सखूनं आपल्या भीमाला रडवीत बडवीत वाढवला होता. कुंभार मनासारखी माती आणून ती तुडवून तिंबतो, मग त्या चिखलाचं मनाप्रमाणं गाडगं घडवतो. तसाच तिनं भीमाला मनासारखा घडवला होता. कडव्या शिस्तीचा रंधा फिरवून त्याच्या मनाचे सर्व खोंबार तासून गुळगुळीत केले होते. तो बस म्हटले की बसत होता, उठ म्हटले की उठत होता.

आता भीमा वीस वर्षांचा तरणाबांड गडी झाला होता. नाकीतोंडी तरतरीत दिसत होता. परंतु तो तासून, घोळून काढलेल्या लाकडाप्रमाणे सलंग होता. आईच्या कडक शिस्तीत त्याच्या मनावर काळजीची पुटं चढली होती. तो हसताना दिसत नसे. तो फार कमी बोले. त्याच्या मनाविरुद्ध एखादी गोष्ट घडली तर तो फक्त 'भले' एवढेच म्हणे नि चालू लागे. त्याच्या मनावरचा आईचा दरारा किंचितही कमी झाला नव्हता. तो काम कर

म्हणताच कामाला जुंपून घेई नि पुरं कर म्हणावे तेव्हाच ते पुरं करी. 'आता दिवस मावळला. पुरं कर की भीमा', असं सखूबाई म्हणताच तो तिच्याकडे मुळीच न पाहता म्हणे,

'भले! मग मघाशीच न्हाय का सांगायचं?' भीमा न बोलता, न दमता सर्व शेती करीत होता; परंतु तो स्वभावानं मऊ निपजला होता. रेड्याचं बळ अंगात असून त्याच्या चेहऱ्यावर आनंद नव्हता, म्हणूनच सखूचा आत्मा जळत होता. पोराच्या ओसाड जीवनात आनंद फुलवण्यासाठी ती त्याच्या लग्नाच्या मागं लागली होती. गावोगाव हिंडून नवरी पाहत होती; परंतु मनासारखी नवरी जुळत नव्हती. गोरी, देखणी, वयात आलेली नवरी असावी म्हणून सखू जिवाचं रान करीत होती.

अखेर सखू कंटाळून गेली. चैत्र संपत आला होता. त्याच दरम्यान पांढरवाडीची भैरूबाची जत्रा आली. आणि सखू पांढरवाडीत जाऊन भैरूबापुढे उभी राहिली. तिनं हात जोडून त्या देवाला नवस केला,

'देवा, माझ्या मुलाचं लगीन जुळू दे. म्होरच्या वर्सी मुलगा नि सून ह्यास्नी गाठ मारून त्येंची वावरजत्रा तुझ्या दरबारापातुर आणीन.'

आणि त्याच महिन्यात भीमाचं लग्न जुळलं, पाडळीची नवरी ठरली. सूनही सखूला मनासारखीच मिळाली. ती मनात म्हणाली, भैरूबा खरा हाय. मला पावला.

भीमाचं लग्न झालं आणि हरणा सासरी आली. तेव्हा भीमा नि सखू यांच्या जीवनात मोठा चमत्कार घडला. त्यांच्या रुक्ष जीवनाला मुगारा आला. विटलेलं भांडं घासून स्वच्छ करावं तसा त्यांच्या संसाराला उजाळा आला. सखूच्या डोळ्यांचं पारणं फिटलं आणि खडकात पाझर सापडावा तसा भीमाच्या चेहऱ्यावर आनंद फुलला.

सखूची सून हरणा फुलानं डवरलेल्या वेलीसारखी दिसत होती. तिचा गोरा रंग, हरिणीसारखे डोळे, मोत्यांसारखे स्वच्छ दात, मंजुळ हसणं यानं सारा गाव तारीफ करू लागला तेव्हा सखूला अंगावर मूठभर मांस चढल्यासारखं वाटलं.

परंतु त्याच वेळी सखूला भैरूबाच्या नवसाची आठवण झाली नि एकदम तिच्यापुढे पेच निर्माण झाला. देवापुढे आपण काय बोललो याची ती आठवण करू लागली. जर आपण आपला शब्द पाळला नाही तर देव कोपेल नि पोराचा संसार कडेला जाणार नाही, असा विचार ती करीत होती.

तेव्हा श्रावण महिना संपत होता. वाऱ्यात एकरूप झालेला पाऊस गावावर वर्षत होता. जीवनाचं रूपच त्यानं बदललं होतं. धरणी हिरवळीनं नववधूचं रूप धारण करून मुसमुसत होती. तिच्या पाटवाच्या पदराप्रमाणे झाडांची पानं फडफडत होती. दारातील मांडवावर लोंबणारी पिवळी कारली तिच्या कानातील झुब्यांची उणीव भरून काढीत होती. त्या श्रावणानं सृष्टीचं सौंदर्य द्विगुणित केलं होतं. उत्साह ओसंडत होता. शेतकऱ्यांच्या

आशा त्यांच्यासमोर फुलत होत्या. ते आता निवांत बसून कष्टाला येणाऱ्या फळाची वाट पाहत होते.

भीमालाही काम नव्हतं. त्यातच हरणा घरात आली होती. त्याचा आत्मा उगीचच घरात घोटाळत होता. चुलीपुढे हरणाच्या हातातील चुडा खणखणताच तो बावरून हळूच आत पाहत होता. त्याच्या संसाराचं सुख त्याच्या हातात वावरत होतं.

परंतु याच वेळी सखूला पेच पडला होता. तिच्यापुढे भैरूबाची उग्र मूर्ती सारखी नाचत होती. वावरजत्रा काढायची आहे. उष्टं फळ देवाला चालणार नाही. भीमाला आवरला पाहिजे असं तिनं ठरवलं. आणि एकदा भीमाला बाजूला घेऊन ती हळूच म्हणाली,

'भीमा, म्या भैरूबाला नवस केला म्हणून तुझं लगीन झालंय. तवा देवाच्या पाया पडल्यावाचून तू हरणाला शिवू नगं का बोलू नगं — न्हायतर देव कोपंल.'

'मग देवाच्या पाया कवा पडायचं?' भीमानं विचारलं. आणि सासूबाई बोटांवर महिनं मोजून म्हणाली, 'ह्यो श्रावण. आता काय आठ महिनं उरंल.'

ते ऐकून भीमा गंभीर झाला. खर्रकन त्याचा चेहरा उतरला. काही बोलावं म्हणून तो चुळबूळ करू लागला; पण शब्द घशात येऊन थांबले. आणि पुढे तो कधीच बोलला नव्हता. तशी त्याची हिंमतच कधी झाली नाही. परंतु त्याच्या चेहऱ्यावरचा भाव एकदम पालटला. अखेर 'भले!' म्हणून तो गप्प बसला. पण सखूबाई चिडली. ती डोळे वटारून म्हणाली,

'बिथरू नगं. तुझ्या बऱ्यासाठीच म्हंत्ये मी. त्यो देव वंगाळ हाय. त्याला वावगं खपत नसतं. वाटुळंच करील त्यो.'

'मग काय करू?' भीमानं भीतियुक्त स्वरात विचारलं. आणि त्याला विश्वासात घेत सखू म्हणाली,

'बायकूच्या अंगाला हात लावू नगं का बोलू-चालू नगं. नि ही गोष्ट कुणालाच सांगू नगं.'

भीमाच्या जीवनात नुकतीच उमलणारी कळी भैरूबाच्या दराऱ्यानं एकदम करपली. आठ महिने बायकोशी बोलायचं नाही, हसायचं नाही की तिला शिवायची नाही, ही आईमार्फत देवाची आज्ञा ऐकून तो उदास झाला — नि चटकन उठून देवळात जाऊन बसला, तो रात्रीच परत आला; आणि भाकरी खाऊन पुन्हा परत गेला.

त्या दिवसापासून पुन्हा त्या घरात कुंद वातावरण दाटलं. तरंग उठलेल्या पाण्यात रेडा शिरावा तसं झालं.

रोज भीमा देवळात जाऊन पडत होत; आणि सकाळी परत आला की सखू त्याच्याकडे संशयानं पाहत होती. आई पाहत आहे म्हणून भीमा हरणाकडे पाहण्याचे टाळीत होता, नि हरणानं पाहताच आजारी माकडाप्रमाणे पापण्या पाडून भुई टोकरीत

होता. आणि त्याचा तो अवतार पाहून हरणा बुचकळ्यात पडली होती.

एकाएकी घरात झालेला हा बदल हरणाच्या लक्षात येत होता. ती मनातल्या मनात त्याचा अर्थ लावीत होती. घरात माणसं अवघी तीन. त्यांपैकी या दोन माणसांच्या मनात कसला बेत रचला जात आहे, ही अशी का आवंदळी आहेत, ही हात राखून बोलतात, एकमेकांकडे बुजऱ्या दृष्टीनं पाहतात याचा अर्थ काय — याचाच हरणा रोज विचार करीत होती. त्या विचारानं ती करपत होती. तीही मनात कुढत होती. दोन महिने तिनं तसेच रेटले. आणि एके दिवशी नवऱ्याला एकान्तात गाठून त्या घुम्या वर्तनाचं कारण विचारलं.

परंतु त्या वेळीही भीमा काहीच न बोलता गुमान चालता झाला; आणि हरणाला त्याचा संताप आला. त्या दिवशी ती खूप रडली.

चार महिन्यात हरणाला त्या घरातील वातावरणाचा वीट आला. आपली काडीभर चूक नसता ही माणसं अशी फटकून का वागतात? यांना आपली गरजच नाही. आता या घरात राहण्यात तरी काय अर्थ आहे, असा विचार करून ती एके दिवशी कुणालाही न सांगता आपल्या माहेरी गेली; आणि भीमाची बायकू पळाली, असा गावभर बभ्रा झाला. जो तो सखूबाईला कारण विचारू लागला तेव्हा मात्र सखू हादरली. ती कुणाशीच काही बोलली नाही.

हरणा गेली तेव्हा भीमाला वाईट वाटलं. तो मनात चरफडला. त्याला या वेळी किंचित राग आला; पण आई आणि भैरूबा यांच्या दोन उग्र मूर्ती त्याच्यापुढे गप्पकन आल्या नि तो गप्प बसला. दुसऱ्या दिवशी सखूबाई भीमाला म्हणाली,

'भिम्या, आता बसू नगं. पाडळीला जाऊन आपल्या बायकूला घेऊन ये. जा बरं.'

तसा भीमा उठला आणि पाडळीची वाट चालू लागला. त्यानं एका दमात चार मैल वाट तुडवली नि भर दुपारी तो सासरवाडीत दाखल झाला. तेव्हा दोनशे घरांचा तो जमाव भर्रकन त्याच्याभोवती जमला नि त्यांनी क्षणात बाजार भरवला. गावची इरसाल, बोलकी नि शहाणी माणसं तयारीनं पुढं आली. बायका-पोरांनी सोपा भरला आणि सर्वांनी मिळून भीमावर सारखा भडिमार आरंभला. 'का म्हून पोरीला बोलत न्हाय? काय अनेव केला तिनं? तिच्या पाठीवर कुणी न्हाय असं वाटतं काय तुमास्नी?' जिकडून तिकडून अशा ललकाऱ्या उठू लागल्या — आणि पावसात रेडा खुशाल चरतो तसा भीमा खुशाल ऐकू लागला. त्याला त्याचं काहीच वाटत नव्हतं. कारण त्यानं जन्मभर तसला भडिमार रात्रंदिवस ऐकला होता.

लोक नाना प्रश्न विचारीत होते. गलका सारखा वाढत होता. एकूण एक माणूस हरणाची बाजू घेऊन भीमाला धमक्या देत होतं. कोणी जाब विचारीत होतं. भीमा शांतपणे ऐकत होता. त्यानं आपला चेहरा भलताच मख्ख करून ठेवला होता. मूळच्या अबोल

भीमाची तर त्या वेळी वाचाच बसली.

परंतु हा मुळीच बोलत नाही हे त्या सर्वांना कळून आलं, तेव्हा त्यांना भीमाचा राग आला नि ते सर्व हळूहळू शांत झाले. डोळे तांबारून सर्वांनी त्यांच्याकडे पाहिले तेव्हा भीमाची मुद्रा निर्विकार दिसत होती. तेव्हा म्हातारा भलताच चिडला आणि ओरडला,

'ए पाव्हण्या, तू का किवंडा हायीस?'

'भले! मला ऐकू येतंय की.' भीमा हळूच उत्तरला. त्या वेळी हरणा चौकटीत येऊन ऐकू लागली. सर्वांनी नवऱ्याला वेढलेला पाहून तिला त्याची दया आली होती – पण आता ती बोलू शकत नव्हती.

परंतु तो म्हातारा पुन्हा जोरदार आवाज काढून म्हणाला, 'आमच्या पोरीचं काय चुकलं का?'

'न्हाय बा!' भीमा चटकन उत्तरला, तोच दुसरा म्हातारा सरकला, 'कुणाच्या घरीदारी जाती का?'

'न्हाय बा!' भीमानं तेच शब्द पुन्हा उच्चारले.

'मग तुम्ही पोरीसंगं बोलत का न्हाय?' त्या दोन म्हाताऱ्यांनी एका सुरात नि एकदम प्रश्न केला. आणि भीमाच्या पुढे बाका प्रसंग येऊन ठेपला.

देवाचा नवस, वावरजत्रा यांची त्याला आठवण झाली. तो चुळबूळ करू लागला. 'चैत्रापर्यंत बायकोशी बोलू नको,' ही गोष्ट त्याच्या नरड्यात वळवळू लागली. परंतु लगेच 'हे कुनाला सांगू नको' हा आईचा हुकूमही त्याच्या कानात ओरडू लागला नि तो भयभीत झाला. त्यानं डोळे झाकले तोच भैरूबा नि आई अशा दोन उग्र मूर्ती त्याच्यापुढे तरळू लागल्या. त्यामुळे तो पुन्हा गप्प झाला नि भुई टोकरू लागला.

'पोरीसंगं का बोलत नाही ह्येचा आमास्नी जबाब पाहिजे. हं, बोला.' त्या म्हाताऱ्यांनी भीमाच्या पाठी तगादाच लावला, तेव्हा भीमा कण्हत म्हणाला,

'त्ये आईला ठावं हाय.'

'आईला काय ठावं हाय?' तिसरा शहाणा ओरडला, 'त्ये आमास्नी ठावं न्हाय. तुमचं म्हणणं काय त्ये बोला!'

त्या तिसऱ्या शहाण्याचा तो भयानक चेहरा नि बोंदकरलेला आवाज ऐकून भीमाची पाचावर धारण बसली. तो कावराबावरा होऊन सर्वत्र पाहू लागला. ते हरणाला वाईट वाटून तिनं आईला डिवचलं, तेव्हा हरणाची आई म्हणाली,

'बरं, त्ये ऱ्हाऊ द्या. आता म्होरं काय करायचं ते इचारा.'

तेव्हा चौथा आवाज उठला, 'बरं, म्होरं काय करायचं सांगा.'

'त्ये तुम्हीच सांगा.' भीमा केविलवाणा चेहरा करून म्हणाला.

पण त्याच वेळी पहिल्या म्हाताऱ्याला एकदम चेव आला. तो मान तिरपी करून

म्हणाला,
'आम्ही सांगू – तू बायकू सोड. सोडतोस?'
'हो, सोडतो की.' भीमा हळूच उद्‌गारला, तसे सर्व लोक भडकले. वातावरण तरकटले. हा उर्मट, आडदांड आहे असा त्यांचा पक्का समज झाला. आग्यामोहोळाप्रमाणे माणसं चवताळून उठली. 'ह्यो दांडगा हाय', 'द्या दणकं', 'आडवाच बोलतोय', 'दे सोडचिठ्ठी', असा एकच गिल्ला झाला. कित्येकांनी तर चढाईच आरंभली. कित्येक एकमेकांना ओढू लागले.
तो सर्व प्रकार पाहून भीमाचे धाबे दणाणले. तो भयभीत होऊन पळण्याचा विचार करू लागला. भीक नको पण कुत्रा आवर, अशी त्याची अवस्था झाली.
घरात हरणा रडत होती. भीमा भोळा आहे हे तिला ठाऊक होतं. त्याच्यावर आलेला तो घोर प्रसंग पाहून तिला कापरं भरलं होतं.
भीमा ओठांवरून जीभ फिरवीत सर्वांच्या तोंडाकडे पाहत होता. इतक्यात एका म्हाताऱ्यानं कुडाची काडी ओढून ती भीमापुढं टाकून म्हणाला,
'घे ती काडी नि दे काडीमोड, आनि जा.'
त्या दंग्यात भीमा गुदमरला होता. जा म्हणताच त्याला धीर आला. काडी मोडून आपण जाऊ शकतो हे लक्षात येताच त्याला आनंद झाला. त्यानं चटकन ती काडी घेऊन मोडली तसा घरात हरणानं हंबरडा फोडला.
मग तो म्हातारा म्हणाला, 'ही अर्धी काडी घेऊन जा!'
भीमाला हायसं वाटलं. त्यानं ती काडी घेऊन एकदम घर गाठलं.
दिवस बुडताना तो घरी पोहोचला तेव्हा सखू त्याचीच वाट पाहत होती. पण जेव्हा तो एकटाच आलेला तिनं पाहिला तेव्हा ती चरकली नि म्हणाली,
'भीमा, हरणा कुठाय?'
'भले!' भीमा वैतागून म्हणाला, 'सारा गाव मला मारीत व्हता, मरत व्हतो!'
'आनि रं काय?' सखूबाईनं भयभीत होऊन विचारलं. आणि हातातील ती काडी तिच्यापुढं टाकून भीमा म्हणाला,
'काडी मोडून दिली तवा सुटलो मी.'
भीमानं हरणाला काडीमोड दिली हे लक्षात येताच सखूबाई ऊर बडवीत उठली; आणि तिनं जोरदार बोंब ठोकली, तसा गाव थरारला आणि सखूबाईच्या घराकडे धावत आला. कोंडिबा डंगारना ओरडला,
'सखूबाई, काय झालं?
तेव्हा हुंदके देत सखू उत्तरली, 'भीमानं हरणाला काडीमोड दिली' असं म्हणून ती पुन्हा रडू लागली.

तेव्हा जंगम बोलला, 'अग, पर का?'

तेव्हा सखूबाई म्हणाली, 'त्या भैरूबाचं मडं गेलं! त्येच्या नवसापाई माझी सोन्यावाणी सून गेली!' असं म्हणून वावरजत्रा, नवस, भीमाला दिलेली ताकीद हे सारं तिनं लोकांना सांगितलं, तेव्हा लोक विचारमग्न झाले.

इतक्यात हरणा आणि तिचा बाप, दोघं अंगणात आली. हरणाला पाहताच सखूचा जीव भांड्यात पडला. पण हरणाचा बाप कडाडला,

'माझ्या पोरीला काडीमोड देऊन जावई पळून आला त्येचं नाव काय?'

तेव्हा कोंडिबा हसला व म्हणाला,

'आवं, हतं भात कमी नि वराण फाजील हाय! म्हंजी अक्कल कमी नि शहाणपण फाजील!'

' तोच सखू पुढे आली नि तिनं सर्व प्रकार पाव्हण्याला सांगितला. तेव्हा पाव्हणा एकदम हसू लागला. हरणा हसत होती, सखू हसत होती... सारा गाव हसत होता.



# कादंबरीकार
# अण्णा भाऊ साठे

**डॉ. सुभाष सावरकर**

अण्णा भाऊ साठे यांचे चरित्रलेखक, प्रकाशक तथा संशोधक-अभ्यासक यांच्या नोंदींवरून अण्णांच्या कादंबऱ्यांची संख्या ४० भरते; परंतु उपलब्ध झालेल्या कादंबऱ्या मात्र (पुनरावृत्ती वगळून) ३२ च आहेत.[१] त्यांच्या वैशिष्ट्यांचा धावता आढावा येथे घ्यावयाचा आहे.

अण्णा भाऊंच्या कादंबरीलेखनाला सन १९४८च्या सुमारास प्रारंभ झाला. त्याकाळी त्यांचे वास्तव्य मुंबईत होते. तेथील कामगार चळवळी व कम्युनिस्ट पक्ष यांच्याशी संबंध आल्याने त्यांच्यातील मूळच्या क्रांतिकारी सत्त्वाला जसा उजाळा मिळाला तशी त्यांच्या विचार-चिंतनालाही निश्चित दिशा मिळाली. वाटेगाव परिसरातल्या निसर्गाची रौद्रगंभीरता, त्या पहाडी ग्रामजीवनातल्या बेगुमान अशा बलदंड पुरुषांचे व कमनीय बांध्याच्या रूपयौवनसंपन्न तरुणींचे जीवनसंघर्ष - सारेच त्या अभिनव दृष्टीतून संस्कारित होऊन अण्णा भाऊंच्या कथा-कादंबऱ्यांतून उतरत गेले. सांगली-सातारा-कोल्हापूर सीमांवरील परिसराच्या त्या चित्रांतच अण्णा भाऊंमधला बंडखोर, जिद्दी पण नीतिधर्मी पुरुषही बेमालूमपणे मिसळून गेला आहे.

सन १९४५-५० दरम्यान मराठी साहित्यात नवकविता-नवकथायुग अवतरून गाडगीळ, गोखले, भावे, माडगूळकर आदींचे नवकथालेखन भरात येऊ लागले होते. पूर्वकालीन कथा-कादंबऱ्यांची टिंगल करीत करीत या 'नव' युगातील कथाकादंबरी पुन्हा आपला संसार वेगळ्या पद्धतीने (पण त्याच पांढरपेशी दालनात!) मांडू लागली होती. पारंपरिक भारतीय साहित्यशास्त्र व पाश्चात्त्य साहित्य यांच्या प्रभावातून नव्याने घडत गेलेली उच्चवर्गीय अभिरुची व मर्ढेकरांनी डोहारून आणलेली साहित्य-सौंदर्यमूल्ये

---

१. (१) वारणेच्या खोऱ्यात (२) मंगला (३) चित्रा (४) अग्निदिव्य (५) वैजयन्ता (६) अलगुज (७) रानगंगा (८) चंदन (९) आवडी (१०) माकडीचा माळ (११) वैर (१२) गुलाम (१३) कुरूप (१४) मास्तर (१५) तारा (१६) मूर्ती (१७) रूपा (१८) मयूरा (१९) फकिरा (२०) वारणेचा वाघ (२१) केवड्याचं कणीस (२२) चिखलातील कमळ (२३) आघात (२४) आग (२५) पाझर (२६) धुंद (२७) अहंकार (२८) रत्ना (२९) फुलपाखरू (३०) संघर्ष (३१) रानबोका (३२) डोळे मोडित राधा चाले.

यांच्या बऱ्यावाईट संकरातून साहित्याचे आस्वादन व आकलन हे पांढरपेशांच्या दुनियेत वहिवाटीनुसार सुरूच होते. अशातच अण्णा भाऊंच्या कथा-कादंबऱ्या प्रसिद्ध होऊ लागल्या व त्यांतील नवे कोरे विषय, अस्पर्शित जीवनस्तर आणि अभिनव जीवनदृष्टी यांनी केवळ प्रस्थापित अभिरुचीला किंवा रूढ साहित्यमूल्यांनाच नव्हे, तर 'नवसाहित्य' दृष्टीलाही नवे आव्हान दिले. प्रारंभी हे आव्हान कोणीही फारसे गांभीर्याने घेतले नाही. पण जसजसे अण्णा भाऊ सातत्याने लिहीत गेले, प्रकाशित होत गेले, राजमान्यता-लोकमान्यता प्राप्त करीत गेले, तसतसे हे आव्हान अधिकाधिक निर्णायक होत गेले आणि अण्णा भाऊंच्या मृत्यूनंतर (१९६९) तर ते मराठी साहित्यविश्वातील असे एक दुर्दम्य वादळ ठरले ज्याचा पुढील दोन दशकांत प्रचंड विस्तार होत जाऊन क्रमाक्रमाने पारंपरिक साहित्यमूल्ये मोडीत निघत गेली.

अण्णा भाऊंच्या कथात्म साहित्यातील परिसर, त्यांचे घनघोर निसर्गसान्निध्य व त्यावरचा ग्रामीण-पहाडी जीवनस्तर हे अत्यंत वैशिष्ट्यपूर्ण असून जीवनचित्रणाचा कालखंड स्वातंत्र्यपूर्व आहे. तमाशा/वाघ्यामुरळी यांसारख्या विपरीत सामाजिक प्रथा, भिकाऱ्यांची भटकी पाले, दऱ्याखोऱ्यांतील दरोडेखोर-बंडखोर नायक, गावगाडा, पोलीसचौकी, तुरुंग यांचे अनुभवपूत अंतरंगदर्शन आणि महानगरीय झोपडपट्टी परिसर, गुन्हेगार वस्त्या व त्यांमधील मानवी जीवनाची विकृत-भयावह दर्शने — हे सारेच घटक आधुनिक मराठी साहित्याची कक्षा रुंदावण्यास व साहित्यदृष्टीची व्यापकता वाढविण्यास कारणीभूत झाले आहेत. 'स्थायी पाप, स्थायी क्रौर्य, स्थायी वासना व विकृती हीसुद्धा जनजीवनाचीच अपरिहार्य अंगे आहेत ही जाणीव तुरुंगांमधील अमानुष व्यक्तिरेखा, चिरागनगरची भुतावळ व ग्रामीण परिसरातील रानदांडगी माणसे यांना तटस्थ साक्षीभूत दृष्टीने चितारत — अण्णा भाऊंनी मराठी साहित्य चिरस्थायी केलेले आहे.

अण्णा भाऊंच्या कथात्म साहित्यातून उमटून दिसणारी सत्तू भोसला, फकिरा, निळू मांग, सावळा, नरसू, रामू म्हारुगडा, हिंदुराव आदी पात्रे 'जननायक' म्हणून सर्वत्र मान्य होणारी अशीच असली तरी मंजुळा, रंगू, आबी, फुला — अशा जननायिकांचे दर्शन ही मात्र अण्णा भाऊंची खास अशी उपलब्धी आहे. शीलरक्षणासाठी मराठमोळ्या स्त्रीने धारण केलेले महिषासुरमर्दिनीचेच हे वास्तव असे रूप होय.

अण्णा भाऊंनी मार्क्सवादी प्रेरणेतूनच लिहिण्यास प्रारंभ केला असला तरी एतद्देशीय सांस्कृतिक परंपरा मात्र त्यांनी पूर्णतः नाकारली नाही.[२] देव, दैव आणि दैववाद तथा धर्मपंथांमधील भाकड कल्पना तेवढ्या नाकारून विज्ञानदृष्टी अंगीकारलेल्या या साहित्यकाराने अस्सल मराठमोळ्या संस्कृतीचे संचितच आपल्या कादंबरी-लेखनाद्वारे

२. "अखेर ज्ञानेशाची, तुकयाची, तीन कोटी मराठी जनतेची जी मराठी भाषा, तिचं भंडार लुटून 'फकिरा'वर उधळून त्या दोन ओंजळींची फेड करण्याचा मी प्रयत्न केला आहे..." (कैफियत, 'फकिरा')

अभिव्यक्त केल्याचे दिसून येते. इतकेच नव्हे तर प्राप्त काळ व परिसर यांची विकृत बैठक बदलविण्याचा प्रयत्न साहित्याद्वारे करीत असताना प्रचारात्मतेप्रमाणेच कलात्मतेचीही बूज राखून जनजीवन समृद्धीची स्तोत्रेही त्यांनी गायिली. अशा प्रकारे विचार व भाषा यांची सांगड घालून वाङ्मयामधून जनजीवनमूल्ये अभिव्यक्त केल्यामुळे ते जनसामान्यांचे शाहीर-कलावंत बनले. जनआंदोलन आणि वाङ्मय यांच्यामधील द्वंद्व अनुभवताना अण्णा भाऊंना ऐतिहासिक द्वंद्वात्मकतेच्या मार्क्सवादी दर्शनाची जशी जोड मिळाली तशीच लोकपरंपरांची संचित ठेव आणि तमाशा क्षेत्रातील अनुभवांची जोडही त्यांना मिळाली व या सर्वांच्या एकत्रित प्रभावाखाली अण्णा भाऊंची कादंबरी आकारास आली.

अण्णा भाऊंनी वास्तवानुभूतीला सदैव कल्पनारम्यतेहून वरचे मानले व त्या अनुभूतीस सहानुभूतीची जोड देत स्वत:च्या असामान्य प्रतिभाबळाने साहित्यप्रांती जनजीवनदर्शन घडविण्याचा प्रामाणिक प्रयत्न केला. त्यामुळे हरिभाऊ आपटे यांच्यानंतर व्यापक वास्तवाची सातत्याने कलापूर्ण अभिव्यक्ती करणारे लेखक म्हणजे अण्णा भाऊ साठे हेच होत – असे अभ्यासाअन्ती मान्य करावे लागते. अर्थात प्रस्थापितांचे पूर्वग्रह व वर्गीय अभिरुची हे त्या मान्यतेच्या मार्गातील अडसर आहेत.

अण्णा भाऊ साठे यांच्या कादंबरीलेखनाच्या प्रारंभकाळी मराठी साहित्यात ग्रामीण, प्रादेशिक, मार्क्सवादी, स्त्रीवादी – अशा समाजाभिमुख प्रेरणा धारण करणाऱ्या तुरळक कादंबऱ्यांची नोंद असली तरी प्रमुख प्रवाह हा फडके-खांडेकर-माडखोलकर-कवठेकर-बेडेकर-मर्ढेकर या मार्गे विकसित होत आलेल्या अभिजनवादी कादंबऱ्यांचाच मानला जातो. नाही म्हणायला माडगूळकर-दाण्डेकर यांच्या कादंबऱ्या मध्यमवर्गीय जाणीवांमधून ग्रामीण वास्तवाचे दर्शन घडवू पाहणाऱ्या होत्या. तसे पाहता भा. वि. वरेरकर, श्री. म. माटे, विभावरी शिरूरकर यांच्या कादंबऱ्यांमधून उपेक्षितांच्या जीवनाचे स्पष्ट-अस्पष्ट हुंकारही शब्दबद्ध होत आले होतेच; परन्तु अण्णा भाऊ साठे यांनी ज्या सातत्याने, निकराने व निर्णायक रीतीने उपेक्षितांचे जीवनसत्य त्यांच्या कादंबऱ्यांमधून रंगविले/गौरविले त्याला तोड नाही. 'फकिरा', 'माकडीचा माळ', 'चिखलातील कमळ', 'वारणेचा वाघ' – या कादंबऱ्या याची निश्चित साक्ष देतील.

जननिष्ठेच्या सूत्रानुरोधाने शोध घेऊ गेल्यास अण्णा भाऊंच्या कादंबरीविश्वाची काही ठळक वैशिष्ट्ये हाती लागतात – एक म्हणजे, परिसरविशिष्ट ग्रामीण वातावरण व दऱ्याखोऱ्या यांच्या पार्श्वभूमीवर त्यांच्या बहुसंख्य कादंबऱ्या उभारल्या गेल्या असून उर्वरित शहरी वातावरणातील त्यांच्या कादंबऱ्या प्राय: झोपडपट्टी वा कामगारवस्त्यांच्या पार्श्वभूमीवर उभ्या आहेत. दुसरे, या कादंबऱ्यांपैकी जनसामान्यांच्या स्वातंत्र्यलढ्याचा विषय हा 'वारणेच्या खोऱ्यात', 'मंगला', 'मास्तर', 'वारणेचा वाघ' आणि 'फकिरा' यांमधून मांडण्यात आला असून त्याखालोखाल महत्त्वाचे (सामाजिक अरिष्टनिवारणाचे,

स्त्रियांच्या कुचंबणेचे, प्रेमप्रणयाचे) संघर्षप्रसंग हे प्रत्येकी किमान डझनभर तरी कादंबऱ्यांमध्ये आलेले आहेत. भटक्या विस्थापित समाजगटाची दैना दाखविणारी 'माकडीचा माळ', कामगार अबलांची ससेहोलपट दाखविणारी 'चंदन', वाघ्यामुरळी प्रथेवर प्रकाश टाकणारी 'चिखलातील कमळ', तमाशाजीवनावर प्रकाश टाकणारी 'वैजयन्ता' व वेश्याव्यवसायास लागलेल्या अगतिक स्त्रियांवर प्रकाश टाकणारी 'फुलपाखरू' — या कादंबऱ्या समकालीन वाङ्मयप्रवाहांशी नाते सांगणाऱ्या आहेत. मात्र संघटित कामगारलढ्याचा प्रसंग 'चित्रा' या एकमेव कादंबरीत ठळकपणे आला असून दलित अस्मितेचा सुस्पष्ट व उदात्त असा हुंकारसुद्धा 'फकिरा' या एकमेव कादंबरीत ठळकपणे उमटून आला आहे.

अण्णा भाऊ साठे यांच्या एकंदर ३२ उपलब्ध कादंबऱ्यांपैकी डझनभर तरी कादंबऱ्या अशा आहेत ज्यांमध्ये आशय व आकृतिबंध हे एकजीव झाले आहेत. अशा यशस्वी कलाकृतींची प्रतवारी ही त्यांनी जनसंस्कृतीला देऊ केलेल्या समृद्धीच्या निकषावर पुढीलप्रमाणे लावता येईल — १) वारणेच्या खोऱ्यात, २) वारणेचा वाघ, ३) फकिरा, ४) अग्निदिव्य, ५) चित्रा, ६) आघात, ७) आवडी, ८) रत्ना, ९) चंदा, १०) रानगंगा, ११) फुलपाखरू व १२) वैजयन्ता.

अण्णा भाऊंचे कादंबरीविश्व हे जनजीवननिष्ठ दृष्टीतून सुखदु:ख, आशा-आकांक्षा, ईर्षा-संघर्ष, आदर्श-अध:पात — या साऱ्यांचे व्यापक दर्शन घडविणारे असे जिवंत, गतिशील विश्व आहे. या विश्वामागची (मानवी जीवनश्रेयाचा वेध घेणारी) अन्वेषकदृष्टी ही जननिष्ठ साहित्यदृष्टी असून तिला समाजपरिवर्तनाची विलक्षण आस लागलेली आहे. व्यापक मराठी जनतेच्या ग्रामीण, दलित, स्त्रीजन, गुन्हेगार — या अध:स्तराच्या जीवनदर्शनाचे लेणे अण्णा भाऊंनी या कादंबऱ्यांच्या रूपाने मराठीच्या साहित्यविश्वाला बहाल केले आहे. या अध:स्तरीय जनजीवनाची चित्रे निष्ठापूर्वक तन्मयतेने रेखाटताना अण्णा भाऊंनी पारंपरिक भारतीय साहित्यशास्त्र, पाश्चात्त्य साहित्यशास्त्र किंवा समकालीन रूपनिष्ठ सौंदर्यशास्त्र यांपैकी कोणाचाही बंदिवास न पत्करता मानवनिष्ठेच्या ध्रुवताऱ्याला साक्षी ठेवून या कादंबरीविश्वाची निर्मिती केलेली आहे. केवळ सखोल व व्यापक जननिष्ठा उरी बाळगून जनजीवनातील नवे जिव्हाळ्याचे विषय, नवे संघर्ष व नवी आव्हाने जागरूकपणे रूपबद्ध करीत 'समाजपरिवर्तनाचे अमोघ साधन — म्हणून मोठ्या ईर्षेने अण्णा भाऊंनी ही साहित्यरूपे घडविली आहेत. स्वत:च्या निष्ठांचा तडजोडशून्य आग्रह धरून अण्णा भाऊंनी स्वत:च्या राजकीय मतांचा हिरिरीने प्रचार करण्यासाठी / प्रतिपक्षावर टीका करण्यासाठीही साहित्यकृतींना 'वापरून घेतले', त्यामुळे तेवढ्यापुरती तरी त्यांची आवाहकता मर्यादित/शबलित झाली. प्रचंड आवाक्याच्या या साहित्यिकाला आयुष्याच्या संध्याकाळी तत्त्वशून्य-रंजनवादी अशा निकृष्ट कादंबऱ्यांवर आपली सारी

साहित्यिक कौशल्ये पणास लावण्याची नामुष्कीही स्वीकारावी लागली हे विशेष. विशिष्ट विचारप्रणाली वा पंथपक्ष प्रचारासाठी लेखणीचे सामर्थ्य वापरण्याचा अट्टाहास काय किंवा जननिष्ठेशी फारकत घेऊन व्यावसायिक दृष्टीने कलासामर्थ्य वापरणे काय, — दोन्ही सारखेच गर्हणीय होत. दुर्दैवाने अण्णा भाऊंच्या वाट्याला दोन्ही अतिरेक आलेले दिसतात.

अण्णा भाऊंची भाषा प्रसन्न, नेमकी, नेटकी व संवेदनगर्भ असून अभिजाततेबरोबरच स्वच्छंदतेच्या स्पर्शाने आणि प्रमाणभाषेबरोबरच लोकभाषेच्या मोडणीने ती लवचीक व समृद्ध झाली आहे. निवेदन आणि संभाषण यांमधील संतुलन साधत ती प्रसंग व व्यक्तित्वांची मनोहारी गुंफण करीत जिवंतपणी गतिमान होत जाते. अण्णा भाऊंचा निवेदक हा वाचकाच्या जिव्हाळ्याच्या वाटाड्याची भूमिका निभवीत रिक्त स्थानांमध्ये लोकलकबींची रंगत भरत जातो. सवंग बोध वा रंजनाच्या प्रेरणेवर बेतलेल्या कादंबऱ्या बाजूला सारल्यास, त्यांच्या बहुतेक सर्वच कादंबऱ्यांचे आकृतिबंध हे आवाहक, संप्रेषक व प्रेरक म्हणता येतील असे उतरले आहेत. जमेस असलेल्या लोककलांच्या जडणघडणीचा स्पर्श देऊन अण्णा भाऊंनी कथात्म साहित्यात — विशेषत: कादंबरीत — निवेदनाची वैशिष्ट्यपूर्ण भाषा उपयोजिली; आशयसमृद्ध असे रूपबंध घडविले आणि परिवर्तनाच्या ऊर्मीला क्षितिज दिले. या सर्व आशयाकृती जनांना थेट आवाहन करणाऱ्या ठरल्या असून मनामनांत क्रांतिकारी जाणीवा संक्रमित करण्याच्या कार्यातही त्या सफल ठरल्या आहेत. अण्णा भाऊंच्या कादंबरीलेखनातील या यशाचाच परिणाम म्हणून साठोत्तरी आकार शोधू पाहणारी दलित साहित्यप्रेरणा ही पुढली दोन दशके आत्मविश्वासपूर्वक मराठीच्या साहित्यप्रांतात घोडदौड करीत आलेली दिसून येत आहे.

अर्थात ज्वलंत जननिष्ठा व परिवर्तनाची दुर्दम्य आंतरिक तळमळ यांतून उपलब्ध साधनसामग्रीच्या बळावर अण्णा भाऊंनी मराठी कादंबरी वाङ्मयाची जी निर्मिती केली, ती परंपरांना (अंशत:) झुगारूनदेखील अस्सल आवाहक, संप्रेषक व प्रेरक ठरली हे विशेष.



## अनुक्रम

# चित्रा

१

सूर्य उगवून कासराभर वर आला होता. वारणा नदीचा खोरा उजाळला होता. सर्वत्र आल्हाद देणारे वारे भिरभिरत होते. सर्वत्र गार झाडी सुंदर दिसत होती. ती आज सकाळच्या निर्मळ वातावरणात खुलली होती. जिकडे तिकडे आनंदीआनंद वाटत होता. पाखरे चिवचिवत उडत होती. कावळे ओरडत होते. राघूंचे कळप उडत दूर जात होते. कुपाटीवरच्या चिमण्या आपली चिमुकली डोकी नाचवीत होत्या. समोर पन्हाळगड निश्चल खडा होता. त्याची भव्य आकृती त्या खोऱ्यात आपले श्रेष्ठत्व गाजवीत होती. गडावरची घरे दिसत नव्हती. धुराने झाकली होती.

पन्हाळ्यावरून गडबडत आलेला ओढा सातव्याला वळसा घालून सातवे गावापासून दोन मैलांवर जवळच वारणा नदीत लवंडत होता.

सातवे गावापासून जवळच गावपाणवठा होता. त्याच्या दुतर्फा हिरवळ नि हिरवी झाडी दिसत होती. जवळच सातवे गाव गप्पचिप्प खडे होते. आज सकाळी पाणवठ्याला लोकांची गर्दी झाली होती. पुरुष कावडी घेऊन जात होते. त्यांच्या कावडीचे करकरणे त्यांच्या चालण्याच्या ठेक्यावर तालबद्ध चालू होते. स्त्रिया आपल्या घागरी भरून जात होत्या. झऱ्याच्या सभोवती गर्दी झाली होती. चित्रा उभी होती. तिला घरी जाण्याची घाई झाली होती.

चित्राचा सासूसासरा वृद्ध अवस्थेत मरायला टेकलेले होते. ते तिची वाट पाहत होते, आणि तिचा नवराही आज पंधरा दिवस भयंकर स्थितीत पडून होता. त्यामुळे ती खिन्न होऊन उभी होती. तिचा चेहरा उदास दिसत होता. जणू जन्मात तिला कधीच आनंद माहीत नव्हता.

चित्रा आपल्या आईच्या पोटात होती तेव्हा तिचे वडील मरण पावले. मग तिच्या आईनं—सखुबाईने—आपली मुलगी सोना हिला कडेवर घेऊन माहेरची वाट धरली. बिन धन्याचे, बिन अन्नाचे, दारिद्र्यात तडफडत राहण्यापेक्षा माहेरी आपल्या भावाकडे जाऊनच राहावे, तिथेच कोणाकडे तरी दळणकांडण करून जगावे, छोटी सोना मोठी होईपर्यंत आणि आपल्या पोटातील बाळ जन्मेपर्यंत आपण माहेरीच राहून दिवस काढावे,

नाही तरी ते आपले जन्मगाव आहे, तिथे आपला भाऊ आहे, तो आपणाला दूर लोटणार नाही, असा विचार करून सखुबाई पारगावला आली.

पारगावकर कृष्णा म्हणजे मोठा असामी होता. त्याच्या दोन बायका. सहा पोरं. ढोरं, गुरं, मोठा प्रपंच. त्यातच त्याची बहीण सखुबाई आली. काही दिवस एकत्रच सर्व जण राहिले. पण पुढे जमेना. मग घरासमोरच एक सपार बांधून दिले आणि सखुबाई त्या सपरात राहू लागली.

त्या सपरातच बाळंतीण झाली. तिला मुलगी झाली. लोक तिला चित्रा म्हणून हाका मारू लागले. कारण ती मुलगी एखाद्या सुंदर चित्रासारखी देखणी दिसे. तिचे नावच चित्रा पडले.

पुढे सोना आणि चित्रा एकीपाठी एक अशा वाढू लागल्या. दिवसापाठी दिवस जाऊ लागले. सखुबाई दोन मुली घरात ठेवून लोकांचा रोजगार करू लागली. कुणाचे दळण, कुणाचे घर सारवावे, कुणाच्या शेतात भांगलावे, जे मिळेल ते काम करून ती मुलींना घासभर अन्न देऊ लागली. परंतु एकटीच्या मजुरीने तीन पोटे भरणे कठीण होत होते. दोन मुली अन्न अन्न करून सखुबाईला हैराण करू लागल्या. ती वैतागून गेली, तिने शेवटी भावाला सांगितले : "मला ह्या दोन पोरींना पोसणं कठीण झालंय. मला हात लाव."

काही दिवस कृष्णाने तिला मदत केली. पण तो तरी काय करणार? तो स्वत: कधीच काम करीत नसे. त्याच्या दोन बायका राबराबून त्याला आणि सहा मुलांना पोसत होत्या. आपला नवरा ऐतोबा बसून खातो तो खातो, वर बहिणीलाही देतो, हे जेव्हा त्यांच्या लक्षात आले तेव्हा त्या पिसाळल्या, आणि घरात हमरीतुमरी सुरू झाली.

सखुबाई दोन पोरींवर रांडपण घालू लागली. परंतु तिची मेहतन तीन पोटांना अपुरी पडून त्यांचे हाल होऊ लागले. एकटीने मिळवून मिळवायचे तरी किती? स्वत:चे धडूत कापड, मुलींना झगा-परकर, तेलपाणी, आणि पोटाला अन्न. ती हैराण झाली. घरात नाचारपण नाचू लागले. कापडाची गाठ पडणे कठीण झाले. पोरींनी मातीत धुरळ्यात लोळत बसण्यापरास त्यांनी शाळेत जाऊन बसावे म्हणून सखुबाईने सोनाला आणि चित्राला शाळेत घातले आणि आपण मजुरी करू लागली.

आठ वर्षांची सोना आणि चार वर्षांची चित्रा शाळेच्या येरझारा घालीत होत्या. सखुबाई कष्टाचे डोंगर उलथीत होती. आणि दिवस येत होते आणि जात होते.

दिवस जात होते. महिने जात होते. वर्षे जात होती. सोना वयात आली. ती केळीच्या कोंबाप्रमाणे रसरसली. लोक तिच्याकडे पाहत राहू लागले. आणि चित्राही तारुण्याच्या चौकटीत उभी होती. सोनाचे आणि चित्राचे तारुण्य त्या दारिद्र्याच्या खाईतही फुलत होते.

आणि सखुबाई दु:खाच्या वणव्यात सापडली होती. ती चित्राच्या जन्मापासून आज

अठरा वर्षे कष्ट करीत होती. आता तिला कष्ट करणे जड जात होते. ती मधून मधून आजारी होत होती. तिला दमा लागला होता. ती क्वचित, बरे वाटले तर, रोजगाराला जात होती. वृद्धापकाळामुळे तिच्यावर निरनिराळे रोग झट्या घालीत होते. म्हणून पोटाची सर्व जबाबदारी सोनावर आणि चित्रावर येऊन पडली होती.

आता त्या बहिणी लोकांचा दळाकांडा करीत होत्या. त्यांचे तारुण्य, सुंदरता, दारिद्र्याच्या चाकाखाली चेंगरली जात होती. आणि गावगुंड तर त्यांच्या मागे हात धुऊनच लागले होते. बहिरी ससाणा चिमणीवर झडप घालण्याची वाट पाहतो तसे ते सोनावर झडप घालण्याची वाट पाहत होते. रोज कुरापती, घालून पाडून बोलणे, डोळे मिचकावणे, हे चालू झाले होते.

आणि आळीतील लोक सखुबाईला दोष देत होते. "काय बाई! पोरींची उमर जळू लागली. त्यांच्या तोंडाकडं बघवंना. पोरींना तट् करून नजर लागंल. अशा पोरींस्नी हिनं न्हाय का कुठंतरी देऊन टाकावं? माणूस खात्या गवाणीला जनावर बांधतं तसं एकादी चांगली जागा बघून जर ह्या सखुबाईनं पोरी दिल्या तर काय होईल? जातील एकाद्या दिसी कुनाचा करी हात धरून तवाच डोळं उघडतील हिचे. तंवर आपलं तिला दोन गडी राबायला सापडल्यात झालं!" असे लोक काय वाटेल ते बोलत होते. सखुबाईला हे कळत होते. आणि तीही मनात झुरत होती. मुलींची लग्ने व्हावी, त्यांनी सुखात नांदावे, त्यांना मुलेबाळे व्हावी, असे तिला फार फार वाटत होते. आपल्या तरण्याताठ्या पोरी रातइंदारच्या कामाला जात्यात, कुणी तरी हात धरील, आपली अब्रू जाईल, जन्मभर मिळवलेली अब्रू मातीत मिसळेल, असे तिला वाटत होते. पण वाटून काय करायचे? तिचे कुणीच कर्ते माणूस नव्हते. येऊन जाऊन कृष्णाच कर्ता माणूस. परंतु अलीकडे त्याचा मोठेपणा शिगेला पोहचला होता. त्याची दोन पोरे कर्ती झाली होती. त्याला पैशाअडक्याकडून बरीच ऊब आली होती. पानाचे तोबरे चघळत साऱ्या गावाची उचापत करीत बसण्यापलीकडे त्याला काम नव्हते. तो आता सखुबाईच्या भानगडीत मुळीच लक्ष घालीत नव्हता. "अरं कृष्णा, ह्या पोरी वयात आल्या आता. कुठं तरी जागा बघून देऊन टाक मर्दा!" आळीतील शेजारी त्याला म्हणत, तेव्हा तो म्हणे, "माणसानं जळंल तसं तापावं. मी काय करू? माझ्याच डोस्क्यावरचं ओझं माझ्या मानंत बसलंय, आनी दुसरं कुठं घेऊ?"

कृष्णाने पुष्कळ दिवस अशी उडवाउडवी केली. तो सखुबाईवर चिडला होता. सखूने लोकांचा रोजगार करण्यापेक्षा आपल्या घरात काम करावे, दोन पोरींनी आपले पाणी भरावे, त्यांनी आपले ऐकावे, आपण सांगू तसे वागावे, असे त्याला वाटत होते. लवकरच सखू पार चिखलात रुतेल तेव्हाच ती आपले ऐकेल; तेव्हाच त्या दोन पोरी आपले ऐकतील. म्हणून तो सखू संकटात सापडण्याची वाट पाहात होता.

एकदा त्याची आणि गोंदाची गाठ पडली. "काय किस्ना! बरं हाय न्हवं?" गोंदाने विचारले.

"नाना! आता माझं लई चांगलं हाय." कृष्णा उत्तरला.

"अरं पर त्या भनीचं काय? ती आता म्हातारी झालीया. आनी तिच्या पोरी थोरल्या झाल्यात्या. तवां म्हनलं तू काय तरी करून त्या पोरींचं धडभलं कर." गोंदाने सखूच्याबद्दल विचारले.

"नाना! ती माझी थोरली भन हाय. पन आज तिचं चालत न्हाय हे मला दिसतंय." कृष्णा म्हणाला.

"हो, हो. म्हनूनच म्हनलं कुठं तरी बरीवाईट जागा बघून त्या पोरी टाक होगडून. घाल डोकं!"

"मी दिवस उगवल्यापासनं मावळतंपतूर पोरींचं लगीन जमवीन. पन ही भनच माझं ऐकंना. मग मी तरी काय करू?" कृष्णाने सखुबाईच्या विरोधी तक्रार केली.

"नव्हं, सखूनं काय करावं असं तुला वाटतं?"

"मला वाटतं, तिनं आता माझ्या बायका-पोरांसंगं भांडू नये. भाईरचं काम करन्यापरास आमचं करावं." त्याने आपल्या पानाच्या थुंकीने तांबड्या झालेल्या मिश्यांवर ताव देत सांगून टाकले.

"तसं न्हवं किस्ना. तुझ्या बायकाबी काय कमी हायत्या! अरं भांडान व्हनार. चालायचंच. म्हसरापसी म्हसरू बांदलं तर शिंग मारतं. आनी ही तर बायकांची जात. तू तिकडं बघू नगं मर्दा. कर या वरसी पोरींचं चांगलं. न्हाय तर हे वरीस गेलं की बरं न्हाय व्हनार." गोंदा त्याला समजुतीच्या गोष्टी सांगत होता.

"बरं तर तुम्हा समद्यांचं असं मत हाय, तर करतु मी समदं." असे म्हणून कृष्णा घराकडे गेला.

सखुबाई वाकळेच्या आळ्यांत खोकत बसली होती. तिचे अंग थरथरत होते. खोकल्याचे हादरे तिला सहन होत नव्हते. ती कण्हत होती. चित्रा चुलीपुढे बसून आपल्या आईसाठी पाणी तापवीत होती. बानवशीवर दिवा ढणढण होता. लोटक्यांच्या तीन उतरंडी कुडाला टेकून उभ्या होत्या. एक तडा गेलेली काटवट पडली होती. आणि बूड नसलेला तवा तोंड पसरून पडला होता. घरात सर्वत्र शुकशुकाट दिसत होता. सोना अजून कामावरून आली नव्हती. आई आजारी म्हणून चित्राला घरी ठेवून ती एकटी कामाला जात होती. म्हातारीने तिच्या वाटेला डोळे लावले होते. तिला चैन पडत नव्हते. सोनाला उशीर का झाला म्हणून ती चित्राला पुन्हा पुन्हा प्रश्न करीत होती. आणि "येईल की आता" असे चित्रा उत्तर देत होती. अंधार पडत होता. दारात कुणाची तरी पावले वाजली. सखुबाईने कान टवकारले. "कोन हाय?" तिने विचारले.

"मी हाय किस्ना."

"किस्ना, ये. अजून सोना आली न्हाय."

"एकादा गडी कामाला धाडल्यागत पोरीला रातची धाडतीयास! यील की आता." कृष्णाने डाफरून म्हटले.

"मग काय करू? माझं चालंना आता. माझं हातपाय बसलं. मग पोट कसं भरू? कुणाच्या जिवावर जगू?" सखुबाईला रडू आले.

"ते तुझं रडनं न्हाऊ दे. मी अशापाई आलोय की आता तुझं नि तुझ्या पोरींचं करायचं काय? पोरी काय हेंगडमुस्क्या न्हवत्या. त्या टग्यांच्या डोळ्यात मुसळावानी सलू लागल्यात. आणि तू आपलं डोळं झाकूनशान बघीत बसलीयास हेचं नाव काय?"

"मग आता मी काय करू? मला फिरता हिंडता येत न्हाय. कुठं जाऊ आणि नवरा बघू? तुला सांगू, तर जीव बेजार झाला, तुझा डोळा उघडंना. आता काय करू सांग." सखुबाई गयावया करीत म्हणाली.

"मग आता म्होरं काय करायचं?" कृष्णाने विचारले.

"आता काय मी सांगू? तू माझा पाठचा भाऊ हाइस. तुला बरं दिसंल तसं कर." सखुबाई म्हणाली.

"गावात मानूस माझ्या तोंडात शेण घालतय म्हनून मी या भानगडीत पडनार हाय. अन् तू नि पोरींनी माझं ऐकलं पाईजी. मी करीन त्ये मानलं पाइजी. कबूल हाय?" कृष्णानं डोळे वटारून सवाल केला.

"किस्ना, तू कुनी परका हाइस? माझा भाई न्हवं? मला दूर लोटू नकं. मी तुझं म्हननं मोडनार न्हाय. माझी दोन लेकरं, माझी अब्रू, मी तुझ्या पायांवर घालत्ये. तुझ्या पायां पडत्ये. माझ्या पोरींचं बरं कर." सखुबाईने पदर पसरला आणि हळूच आपले डोके टेकले. तिच्या डोळ्यातून अश्रू वाहत होते. चित्राने अंग मुरडून आईकडे पाहिले आणि तिच्याही डोळ्यातून अश्रुधारा झरझरू लागल्या.

"बरं तर, मग मी बघतो चार गाव आणि चित्रीचं मी करून टाकतो. काय ग, हाइस का तयार?" त्याने चित्राकडे रोखून पाहत विचारले. चित्राने लाजून मान खाली घातली. आणि आपल्या मांडीवर फाटलेले लुगडे जुळवून उघडी मांडी झाकली.

"हो, हो, कर बाबा. हे घे पदरात." म्हातारी काकुळतीने म्हणाली.

"हितं घुंगूरबांदिवड्यात एक नवरा हाय. त्यो बघतो."

"हो, हो. बघ." म्हातारी आसू पुसून म्हणाली.

"बरं जातू मी." असे म्हणून कृष्णा उठून बाहेर पडला.

दारात वैरणीचे ओझे टाकून सोना घरात आली. सखुबाईला आनंद झाला. चित्रा सोनाच्या जवळ येऊन बसली. आईचे रडवे तोंड पाहून सोनाला वाईट वाटले.

"आई, अशी का झालीस?" सोनानं आईला विचारले.

"न्हाय बाळ! काय न्हाय."

"न्हाय कसं? मामा कां आला हुता?"

म्हातारीने सर्व काही तिला सांगितले. नंतर त्यांनी घासभर खाऊन अंथरुणे टाकली. सखुबाई पडल्या पडल्या विचार करीत होती. आज तिला बरे वाटत होते. आता सोनाचं लग्न होणार. ती नांदून येणार. आता आपल्या मागची एक चिंता दूर होणार. चित्राचं काय, ती अजून लहान आहे, या वर्षी नाही तर पुढच्या वर्षी होईल. मग दोघींचीही लग्नं होतील. मग आपण दोघींच्याही घरी जाऊ, चारचार रोज राहू, मग आपल्या पाठीशी लागलेलं हे दरिद्रीपण नाहीसं होईल. आणि पोरींचंही चांगलं होईल. दिव्याच्या ज्योतीला देखील लाजवणारी माझ्या मुलींचीं रूपं फाटक्या चिंध्यांत कुठवर दडवू? आता तसं नाही करावं लागणार. आपापल्या घरी जातील. मग माझ्या मागची काळजी दूर होईल, असा विचार करीत करीत ती निजली.

कृष्णाने नवरा पाहून सोनाचे लग्न ठरविले. लग्नाचे दिवस आले. तिथी ठरल्या. आणि वऱ्हाड निघाले. आळींतील काही माणसे, कृष्णा, त्याची बायकापोरे, नवरी, आणि चित्रा एवढी मंडळी लग्नाला गेली. सखूला जाता आले नाही. आपल्या मुलीचे लग्न आपण पाहावे अशी तिची फार इच्छा होती. परंतु तिच्या आजाराने घात केला. तीन दिवस ती एका जागी पडून होती.

"कसलं हे माझं नशीब! जन्मात एकदा होणारं मुलीचं लग्न आपण पाहू नये! आज माझ्या सोनाला हळद लागली असंल. ती नव्या कपड्यांत अति सुंदर दिसत असेल. तिला दृष्ट लागत असेल. ती लाजेनं लाल झाली असेल. आज काय? आज माझ्या सोनाचं लग्न! आज तिच्या कपाळी बाशिंग झगझगत असेल. त्याचे गोंडे वाऱ्यानं हलत असतील. आणि मी मात्र सोनाच्या कपाळीचं बाशिंग पाहू शकत नाही! आज माझी सोना नवरी होऊन परत येईल. आनंदात हसत हसत येईल. कधी बरं ती येईल?" असे नाना विचार करीत सखू पडली होती.

सोना लग्न होऊन परत आली. सखूला आनंद झाला. पंधराच दिवसात तिचा नवरा तिला नेण्यासाठी आला. सर्वत्र लोक म्हणू लागले : "सोनाचा नवरा आला." सोनालाही नवरा पाहावा असे वाटू लागले. नवरा मामाच्या घरी होता. म्हणजे कृष्णाच्या घरी बैठक मारून बसला होता.

दुसऱ्या दिवशी चित्राने त्याला जेवणासाठी बोलावले. तो लाजत लाजत आला. सोनाने त्याला लग्नात पाहिला नव्हता. ती चोरून पाहू लागली. त्याच्या टाचेपासून गुडघ्यापर्यंत कसले तरी औषध लावले होते. आणि त्याने पटक्याचा शेमला आपल्या नाकाभोवती लपेटून घेतला होता. त्याला पाहून सोनाच्या डोळ्यातून आसू टपटपले.

पाहुणा जेवून बाहेर गेला. आणि थोड्याच वेळाने गावपाटलाचा तराळा आला.

"आ किस्ना हऽऽ!" त्याने हाक मारली.

"काय गा? का काय हाय?" कृष्णाने विचारले.

"तुम्हाला, तुमच्या भनीला, नि नवरीला पाटील बोलावत्यात."

कृष्णाचे काळीज चरकले. ही काय भानगड आहे? आम्हांला पाटलानं का बोलावणं केलं? वगैरे प्रश्न तो स्वत:लाच विचारू लागला. शेवटी ती दिंडीच्या दिंडी चावडीवर पोहचली.

पोलीस पाटील चावडीत बसला होता. त्याने रुपायाएवढा गंधाचा टिळा लावला होता. आणि दाढेत तंबाकू घट्ट धरली होती. एका खांबाला टेकून पाहुणा बसला होता. त्याला पाहून कृष्णाच्या काळजाने उफराटी उडीच मारली. "ही काय भानगड?" तो आश्चर्याने चकित झाला.

"या किस्नापराव." पाटील म्हणाला.

"राम राम." कृष्णा हळूच बसला. सखुबाई दूर उभी राहिली.

"रामराम खरं, पन हे पावनं काय म्हनत्यात ते ऐका."

"काय म्हनत्यात ते?" कृष्णानं विचारले.

"हं, पावनं, करा सुरू." पाटलाच्या तोंडातून तंबाखूची लाळ घरंगळली. पाहुणा उठून उभा राहिला. त्यानें नाकाभोवती लपेटून घेतलेला पटक्याचा शेवट काढला. त्याचे नाक बसले होते.

"मी हाय रोगी. मला हाड्यावरन झालाय. माझं नाक सडून चाललंय. माझं पाय आदू हायती. म्या म्हनलं, माझ्या गरीबीला, मला सोभेल असी बायकू असावी. पन किस्नानं मला फसवून ही देखणी बायकू माझ्या गळ्यात बांधली. तवां माझं म्हननं हाय की ही इस्त्यावानी बायकू माझ्याजोगी न्हाय. माझ्या नाकाची घान सुटलीया. तवा माझा सपसेल राजीनामा घ्या. मला लगीन पुरं." पाहुणा खाली बसला.

"हं, बोला किस्नापराव." पाटील गुरगुरला.

"आता काय बोलू?" कृष्णा कावऱ्या बावऱ्या होऊन म्हणाला. लोक जमा झाले. सर्वत्र चर्चा सुरू झाली. जो तो म्हणू लागला : "किस्नानं सोनाचं वाटुळं केलं..." शेवटी गावातील चार बडी धेंडे जमवून सोनाची सोडचिठ्ठी झाली. आणि पाहुण्याने मुंडासे झाकून तो चावडीवरून जो निघाला तो सरळ आपल्या गावाला गेला. त्याने मागची धूळ देखील पाहिली नाही.

पुढे एके दिवशी एक मारक्या रेडकाने धडक देऊन कृष्णाचे चारीच्या चारी दात पाडून त्याच्या तोंडाचे बेलटे केले. आणि ते दात बसवायला स्वारी आपल्या मेहुणीकडे मुंबईला रवाना झाली.

कृष्णा मुंबईहून जो आला तो सोनाला नवराच बघून आला.

"एकदा बरं कराया गेलो नि पोरीचं वाईट झालं. आता मातर मी तिचं बरं करनार." असे तो म्हणू लागला. मुंबईत सोनाला नवरा ठरल्याचे बढाई मारीत तो फिरू लागला. सखुबाईला आड आणि विहीर झाली होती. पोरीला घरी ठेवूनही बरे नव्हते आणि कृष्णा जे करील ते चांगलेच करील असा विश्वास नव्हता. परंतु शेवटी तिला दुसरा कोणाचाच आधार नव्हता.

आणि एके दिवशी कृष्णा सोनाला घेऊन एकटाच मुंबईला गेला. आणि चार रोजात परत आला. येतेवेळी लुगड्यांचे दिंड, सर्व पोरांना कापड, स्वत:ला जरीचा रुमाल, मलमलचे पंजी, जरीचे उपरणे, तकतकीत चपला, अगदी मरणाचे ओझे घेऊन आला.

आणि मग जरीचा रुमाल कपाळावर ठेवून, गुडघ्यापर्यंत लांब कोट घालून, व मलमलचे पंजी नेसून तो पान खात ऐटीत फिरू लागला.

त्याला येऊन पाचच दिवस झाले तोच पोष्टमनने पाचशे रुपयांची मनीऑर्डर आणून दिली. आणि मग सुरुवातच झाली. दर आठ दिवसांनी मनीऑर्डर येऊ लागली. गावाला आश्चर्य वाटू लागले. हे कसे झाले? ही पैशाची धार कोठून येते? कशी येते? का येते? लोक नाना तऱ्हेचे तर्क करू लागले. आणि कृष्णा डौलात फिरू लागला. खरेदीसाठी जमिनी विचारू लागला.

सखुबाई आणि चित्रा त्या खोपटात होत्या. अन्नाला वस्त्राला त्या महाग झाल्या होत्या. म्हातारी 'सोना! सोना!' करून तळमळत होती.

कृष्णाच्या मुलाने एकदा येऊन सांगितले की, "आबा म्हनतोय, तुम्हांला पाइजी ते मागून घ्या." त्याचा अर्थ काय हे सखुबाईला की चित्राला मुळीच समजले नाही. असे सहा महिने गेले.

एके दिवशी छकड्यात बसून सोना आली. अंगावर तलम पातळ, पायात जरीच्या वहाणा, हातात सोन्याच्या बांगड्या, कानात मोत्याच्या कुड्या, डाव्या मनगटावर पावट्याच्या डाळीएवढे घड्याळ, सर्व नखांना लाल रंग, काखेत इंग्रजी चालीची पर्स. सहा महिन्यांत सोना पार बदलून गेली होती. शिवाय फोनो, पैसाअडका, पातळांचे ओझे. सोना खरेच एखाद्या संस्थानी राजकुमारीसारखी आली.

कृष्णाची एकच धांदल झाली. आंघोळीला पाणी, चहा, कॉफी, अंडी, मांस रोज निरनिराळी जेवणे होऊ लागली. कृष्णाच्या बायकांनी सोनाला तळहातावर घेतले.

लेक नांदून आली, पण सखुबाई तिच्यासाठी काहीच करू शकत नव्हती.

दुसऱ्या दिवशी सोना आईच्या घरी आली. तेव्हा तिने सर्व काही निरखून पाहिले. सर्व वस्तू त्याच होत्या. काडीचाही बदल झाला नव्हता. सोनाला पाहून सखुबाईला आनंद झाला. नंतर कृष्णाला सोनाने विचारले : "मामा! आईला, चित्राला, कापडं का दिली नाहीत?"

"तेचं असं झालं! मी आल्याबराबर — बायकांनी दोनाऐवजी तीन तीन पातळं घेतली. आनि माझं काहीच चाललं न्हाय." कृष्णा गयावया करून म्हणाला.

"पैसं किती दिलं आईला?" सोनाने विचारले.

"ते बघ, पैसं कसं देनार? चोराचिलटाचं भ्या हाय न्हवं?"

"आणि आईला घरासाठी दिल्याले पैसे?" सोनाने रागाने विचारले.

"ते समदं हायती. पर आता घराला सुरवात करून पाऊस सुरू झाल्यावर काय करावं?" कृष्णा म्हणाला.

"मग घर कधी बांधनार?"

"उनाळ्यात."

"आई उपाशी मरतीया. तुम्ही तिला किती रुपयं दिलं?"

"म्या तिला सांगून ठेवलं की पाइजे ते माझ्याकडनं मागून घ्या. पन त्येंचा डोळाच उघडंना." कृष्णाने सर्व जबाबदारी सखुबाईवर टाकून आपली सुटका करून घेतली.

"बरं, आता पुढं मी आईच्या नावावर पैसे पाठवणार." सोना म्हणाली. त्या बरोबर कृष्णाचे काळीज चरकले.

"नकं. नकं. पैशाचा लोभ लई वंगाळ. एकदा चोर म्हातारीच्या मानंवर पाय दील नि जाईल घेऊनशान." हे कृष्णाचे म्हणणे सोनालाही पटले. शिवाय मामाला दुखवून तिचे नुकसान होणार होते ते दोन्हीकडचे. म्हणून ती स्तब्ध झाली. नंतर आपण उद्याच जाणार असे तिने सांगितले. आणि हवा तेवढा हुंडा देऊन एकादा सुंदर मुलगा शोधून चित्राचे लग्न करा, असेही जातेवेळी तिने सांगितले.

सोना निघून गेली. पुन: सखुबाई झुरत बसली. पुढे कृष्णाने चित्राचे लग्न जुळवले. आणि हुंडा, नवऱ्याला पोषाख, अहेर, संबीर असे सर्व मिळून आठशे रुपये सोनाकडून घेतले. आणि एके दिवशी चित्राचेही लग्न करून टाकले.

आणि आपल्या आईला टाकून मोठ्या दु:खाने चित्रा सासरी गेली.

एका पडक्या घराच्या ढिगाऱ्यात एकच भिंत उभी होती. त्या भिंतीच्या डोकीवर वासे ठेवून वर उसाचा पाला घातलेले एक एकमाळी घर होते. आणि पडक्या भिंतीतील एका देवळीत एक लामना ठेवला होता. दळून झिजलेले जाते, एक तवा, एक काटवट, अर्धे उलथने, एक तांब्या असा संसार सर्वत्र पसरला होता. त्यांत एक म्हातारा व एक म्हातारी खोकत बसलेली होती. हे चित्राचे सासू-सासरा. चित्राने आल्याबरोबर त्यांचे पाय धरले.

"सीता सावित्री हो, नि सोन्याचे चुडे ले!" म्हाताऱ्याने सुनेला आशीर्वाद दिला. आळीतील लोकांनी गर्दी केली होती. एक इसम धावतच आला. त्याचा चेहरा उमाऱ्या घामाऱ्या झाला होता.

"आबानाना! आबानाना! चंदूच्या कानात गोम शिरली." त्याने भयंकर बातमी सांगितली.

म्हातारा आणि म्हातारी यांना रडू कोसळले. त्यांनी कोयाळ मांडला. लोक हळूहळू लागले. कुणी कपाळावर मारून घेऊ लागले.

"पंधरा दिस न्हाय झालं लगीन हुनशानी!" कुणी म्हणाले. "जन्मभर दुसऱ्याची चाकरी केली, आता कुठं त्येचं रेघंरूपंला लागनार, तर हे काय देवानं केलं!"

कुणी म्हणू लागले : "बिचाऱ्यानं कर्ज काढून लगीन केलं. बायकूनं घरात पाय ठेवला नि हे काय झालं?" सर्वत्र नाना तऱ्हेची कुजबूज सुरू झाली.

चित्रा भेदरलेल्या हरिणीप्रमाणे कान टवकारून ऐकत होती. हे काय चालले आहे याचा तिला मुळीच उलगडा होत नव्हता. आपलेही नशीब अक्कासारखेच फुटके आहे की काय? तिने मनालाच प्रश्न केला. आपली आई रडत बसली असेल, तिला पाणी, तिला जेवण कोण देत असेल? ती कण्हत असेल, ती खोकत असेल. ती रडत असेल. आईला शेवटी वनवास आला. अशा विचाराने चित्रा तळमळत होती. तिच्या हृदयाची होळी पेटली होती.

आणि ज्याच्या नावाने ती कुंकू लेली होती तो माशाप्रमाणे तडफडत होता, रडत होता. तो क्षणाक्षणाला आपले मस्तक आपटीत होता. तो आपल्या कानावर बडवीत होता, किंचाळत होता. आणि चित्रा पाहत होती.

म्हातारी ओरडत होती, "माझं जहाज बुडू लागलं. कुणी तरी वाचवा!" म्हणून टाहो फोडीत होती.

चित्राचा सासरा बसल्या बसल्या आपल्या जीर्ण छातीला बडवीत हाणून घेत होता.

चित्रा त्या आक्रोशाच्या डोहात बुडत होती. जणू तिच्या सभोवती दुःखाचा वणवाच पेटला होता. जन्मल्यापासून दुःख आणि सासऱ्यात पाय ठेवल्यापासून आक्रोश. याशिवाय तिला काहीच माहीत नव्हते. दुःखाने जणू तिची पाठच घेतली होती. आणि पंधरा दिवस ती रात्रंदिवस रडे ऐकत होती. आणि स्वतः रडत होती. तिला पाणी भरून घरी जाण्याची घाई झाली होती. तिने घागर भरली. आणि ओढ्याचे टेकड चढून ती वर आली. एकदम तिला आश्चर्य वाटले. "कोण मामा? आई कशी आहे?" तिने थांबून विचारले. माहेराचा सांगावा, आईची खुशाली आणि आपला कर्ता मामा आलेला पाहून चित्राला आनंद झाला. तिच्या टपोऱ्या डोळ्यातच तो लखलखला.

तिच्या चेहऱ्याकडे रोखून पाहत मामा म्हणाला : "आई खुशाल हाय. तू आणि तुझा नवरा कसा हाय? कालच मला कळलं, म्हनून आलूया."

"मामा! अक्काची गत तीच माझी, असं दिसतंया."

"पर मी गोम निघतीया का न्हाय?"

"नाही. ती आत, पार आत गेली."

"मग वाचायचा बेत हाय का पावन्याचा?"

"मी कसं सांगू?" चित्रा मामाशी बोलत उभी राहिली. क्षणभर ती सर्व दुःख विसरली. कुणीतरी आपले आले असे तिला वाटले. तिच्या डोकीवरची मातीची फुटकी घागर डगडगत होती. आणि ते झिरपते पाणी चित्राच्या कपाळावरून चिंचोळ्या नाकाच्या शेंड्यावरून टपकत होते. ते तिच्या कपाळीचे कुंकूच जणू धुऊन काढीत होते. कृष्णा व चित्रा बोलत बोलत घरी गेली.

कृष्णाला पाहताच म्हातारा म्हातारी जोरजोराने ओरडू लागली. पुन्हा त्यांनी आक्रोश मांडला. आपण आलो नसतो तरी बरे झाले असते असेच कृष्णाला वाटले. त्याला तिथे क्षणभरसुद्धा बसवेना. आता आपण आजची रात्र इथे कशी तरी काढायची आणि पहाटे उठून वाटेला लागायचे असे मनात म्हणून तो बसला. चारदोन धीराच्या गोष्टी सांगू लागला.

संध्याकाळी नखाच्या शेंड्याने दोन तुकडे खाऊन व घोटभर पाणी पिऊन तो दारात आडवा झाला. देवळीत लामना मिनमिनत होता. चित्रा भिंतीला टेकून बसली होती. चंदू धडपडत पडला होता. म्हाताऱ्याने आपले कपाळ भुईला टेकून ठेवले होते. म्हातारी डुलक्या घेत होती.

मध्यान्ह रात्र उलटून गेली होती. रातकिडे चिरचिरत होते. दूर कुठे तरी पिंगळा किलबिलत होता. दारात कृष्णा घोरत पडला होता. सर्वत्र भेसूरता भासत होती. रात्र तर जणू दीर्घ धापा टाकीत होती.

चित्राच्या पुढ्यात चंदूचे डोके इकडून तिकडे गडबडत होते. त्याच्याकडे पहात चित्रा बसली होती. तिच्या डोळ्यात ताठा भरला होता. ती झोपेने गुरमळली होती. तिची मान कलंडली. तिने ती आवरून घेतली. तिला झटका बसला. तिला जाग आली.

पुढे चंदू शांत पडला होता. त्याची हालचाल बंद झाली होती. तो निपचित पडला होता. जणू काय त्याला आज पंधरा दिवसानंतर गोड नीज लागली होती.

चित्राने न्याहाळून पाहिले. पार पार निरखून पाहिले. शेवटी तिने आपले डोळे पुढे नेले.

"आत्या!" चित्रा मोठ्याने ओरडली.

म्हातारा म्हातारी जागी होऊन पहातात तो त्यांचा चंदू तिथे नव्हता. त्यांचा वृद्धापकाळचा आधार, त्यांची आंधळ्याची काठी, मोडून पडली होती. आणि पुढे वाढून ठेवलेली दुःखे त्यांना दिसू लागली. एका क्षणात त्यांच्या किंकाळ्या साऱ्या खोऱ्यात धावू लागल्या. सारा गाव जागा झाला. कृष्णा चुकचुक करीत दारात बसला. लोक जमले. सूर्योदयाच्या वेळी प्रेत तिरडीवर घातले. आणि ते आकाशाकडे डोळे लावून निघून गेले.

सर्व शेजारी पाजारी स्त्रिया जमल्या. त्यांनी म्हातारीला म्हाताऱ्याला समजावण्याचा प्रयत्न केला. आणि रीतशीर आपले काम सुरू केले.

त्यांनी चित्राच्या गळ्यातील मंगळसूत्र तोडले. तिच्या हातातील हिरवा लग्नचुडा फोडून टाकला. आणि चित्राने कपाळीचे कुंकू पुसून टाकले. तिचे सौभाग्य संपले. तिचे हात बुच्चे दिसू लागले तिचे कपाळ भकास दिसू लागले. जणू ती तिच्यावर कोसळलेल्या दु:खाची खूणच होती.

चंदूला दफन करून लोक आले.

कृष्णा जाण्याची घाई करू लागला.

''जावा खरं, पन आपली मुलगी बी घेऊन जावा. आता तिला कोन धनी हाय!'' म्हातारा रडत म्हणाला. कृष्णाला काहीच बोलता येत नव्हते. तो गप्प झाला.

चित्राने आपल्या लुगड्याचा पिळा काखेत घेतला, कोणाशी, कोणाशी न बोलता ती मामाच्या मागोमाग चालू लागली. तिने आपली दृष्टी खाली आपल्या पायात लावली होती. पंधरा दिवसांपूर्वी ती याच वाटेवरून आनंदाने आली होती. पुढची कैक स्वप्ने बरोबर घेऊन आली होती. आपण नांदू, आपले घर आपण नीट करू, आणि मग आपण आपल्या आईलाही इकडे बोलावून घेऊ आणि दु:खाने मिळवून सुखात खाऊ. असे कित्येक विचार ती उराशी घेऊन आली होती. परंतु आज तिची निराशा, भयंकर निराशा झाली होती.

ती अश्रू ढाळीत निघाली होती. तिने एकदाही परत पाहिले नाही. जणू त्या गावाची तिला भीतीच वाटत होती. जणू त्या शिवाराची, त्या प्रकाशाची, त्या खोऱ्याची, तिला भीती वाटत होती. फक्त तिला त्या वाटेची भीती वाटत नव्हती. कारण ती तिला आपल्या आईच्या भेटीला घेऊन जात होती. ती वाट तिला आपल्या आईच्या प्रेमळ गंगेकडे नेत होती. आपल्या आईच्या मायेच्या सावलीला निघाली होती. ते सर्व आकाश तिच्या मस्तकावर जणू भयंकर तापत होते. तिच्या सभोवती अंधारच अंधार पसरला होता. परंतु पारगावात एका पडक्या सपरात तिच्या आईच्या रूपाने एक आशाकिरण चमकत होता. म्हणूनच जणू ती तिकडे ओढली जात होती. आईला पाहून आठ-पंधरा दिवस झाले नसून कित्येक वर्षे झाल्यासारखे तिला वाटत होते. ती मामाच्या मागून धावतच होती. आपली आई मी जाताच कडकडून भेटेल, मला मिठी मारील, तिच्या डोळ्यांतून अश्रू येतील, ती माझ्या पाठीवरून हात फिरवील, तेवढाच आपला आनंद, तेवढाच आपला आधार. चित्रा विचाराच्या वावटळीतून आईकडे धावत होती. परंतु पुढे दुसरेच काही तरी वाढून ठेवले असले तर काय? या विचाराने तिचे मन चरकले.

## २

''बने! माझं काम तू केलंस तर बरी गोष्ट हाय. न्हाय तर काम बिघडंल. चित्री आठ

दिवसात माझ्या हाताखाली आलीच पाइजी.'' बाप्या पवार आपल्या मिशीची एक बाजू वर करून फणकाऱ्याने म्हणाला. बापूला सारा गाव बापू म्हणून कधीच बोलवीत नव्हता. बाप्या याच नावाने लोक त्याला बोलवीत. त्या बोलवण्यात कडवटपणा भरलेला होता. बाप्या सर्व गावात रोगासारखा वाटत होता. त्याची लोकांना भीतीच वाटे.

बनी आपल्या पदराचा शेवट दाताने कुरतडत ऐकत होती.

''पर म्या काय करावं म्हनतोस?'' बनीने दातातील पदराच्या दोऱ्याचा तुकडा थुंकून विचारले.

''काय वाटंल ते कर. हो.'' बाप्या गुरगुरत म्हणाला.

''पर त्येच सांग.'' बनी म्हणाली.

''हे बघ, चित्रीला कुठं तरी रानात घुलवून घेऊन ये, म्हंजी झालं.'' बाप्याने युक्ती सांगितली.

''न्हाय रं बाबा. तू जाशीला पळून नि माझं वाटुळं व्हयील.'' बनीने सरळ सरळ सांगून टाकले.

''अग, मी पळाय काय बायकू हाय? कवा भी पळून गेलोय का?'' बाप्याने ठासून विचारले.

''हे बघ, तुझं तू बघून घे. मला न्हाय जमायचं!'' बनी म्हणाली आणि निघून गेली.

बाप्याला तिचा राग आला. तो विचार करीत गावाकडे निघाला.

बाप्या एकदा पेटत्या चुलवणात पडला आणि त्यातूनही चपळाई करून बाहेर पडला. परंतु त्याचे सर्वांग जळाले, जागोजाग आकसून गेले. परंतु तो मेला मात्र नाही. पुढे तो बरा झाला तेव्हा तो विद्रूप दिसू लागला. त्याला मिशी नव्हती. त्याला भुवयाही नव्हत्या. काळ्या गाडग्याला कृत्रिम चुन्याचे डोळे काढल्याप्रमाणे त्याचे डोळे दिसत. परंतु तो हाडाने दणकट होता. त्याची सर्व मुलांना, मुलींना भीती वाटे. तो मात्र कोणालाही भीत नसे. त्याने कित्येक तंटे काढले. सर्व लोकांनी त्याला मारण्याचा बेत केला. एकदा एका शेतकऱ्याने त्याच्या पाठीत कुऱ्हाड घातली. ती कुऱ्हाड बाप्याच्या फऱ्यात अडकून बसली. ती निघालीच नाही. मग बाप्या ती तशीच घेऊन तालुक्याला गेला. येतेवेळी बरा होऊनच परत आला. तेव्हापासून त्याला कसा मारावा हा सर्वांपुढे मोठा प्रश्न पडला होता.

आणि बाप्या शेफारला होता. त्यात आजकाल त्याला चित्राचे वेड लागले होते. तो रोज चित्राच्या दारातून येतजात होता. कधी उगीच दारात उभा राहात होता. त्यामुळे शेजाऱ्यापाजाऱ्यांना आश्चर्य वाटत होते.

''बाप्या जर ह्या चित्राच्या पाठी लागला तर मातर पोरीचं वाईट व्हईल.'' असं ते म्हणत होते. चित्रा सातव्याहून आल्यापासून आईला संभाळीत होती. आता तिला बाहेरचे

काम असं काही नव्हतेच. फक्त सकाळी संध्याकाळी मामाच्या घरी जाऊन दाणे घ्यायचे आणि दळून जेवण करायचे. आईला पाणी द्यायचे. धुऊन यायचे. पाणी भरायचे. एवढीच कामे ती करीत होती. आणि सोना जरी दूर असली तरी चित्रा आपल्याजवळ आहे असे समजून सखुबाईही निर्धास्त होती. दोन्ही मुली एकदम गेल्यामुळे तिची कंबर बसलेली आत सरळ झाली होती.

सोना मुंबईला गेल्यापासून कृष्णाच्या घरावर पैशाचा पाऊस पडत होता. तो आठ पंधरा दिवसाला मुंबईची फेरी करीत होता. आणि प्रत्येक वेळी तो नव्या पोषाखात झुलत येत होता. त्याने दोन हजारांची जमीन खरेदी केली होती. घरात सर्व गोष्टींची भरभराट झाली होती. त्याच्या बायका बसून खात होत्या. आता कोणीही मजुरीवर जात नव्हते. कृष्णा तर रोज मुंबईच्या मनीऑर्डरची वाटच पहात बसत होता. तो रात्रंदिवस पैशाचा व जमिनीचा विचार करीत होता. जरी ती सर्व जमीन सोनाच्या नावाची असली तरी सोना काही परत येत नाही. ती आपला संसार सोडून येणार नाही. तिला तिकडे काय कमी आहे. जे इथे आहे ते शेवटी आपलेच होणार. म्हातारी आज ना उद्या डोळे झाकणार. आणि तिने डोळे झाकले की मग कोण? चित्रा. पण जर चित्रालाही आपण मुंबईला नेले तर मग कोण आहे इथे? मग मात्र सर्व जे काही आहे ते आपलेच होणार. आणि एकट्या सोनामुळे जर आपण आज सर्व गावात श्रीमंत होत आहोत तर चित्रा मुंबईला गेल्याने काय होईल? कृष्णा हाच प्रश्न स्वत:ला विचारीत होता. त्याला वाटत होते, जर चित्राही मुंबईला गेली तर नक्कीच आपण सोन्याचीच कवले घालू, सोनाचे जे काही आहे, ते तर आपले होईलच, पण चित्राकडूनसुद्धा आपली श्रीमंती वाढेल. दौलत आपल्या घरी चालत येईल. लक्ष्मी आपल्या घरी पाणी भरील. आपण या खोऱ्यात मोठे श्रीमंत मानले जाऊ.

कृष्णा अशा विचारात असताना एकदा मुंबईला गेला. सोनाला आनंद झाला. तिने आईची विचारपूस केली.

"आई कशी काय?" सोनाने विचारले.

"झ्याक!" कृष्णाने आनंदात उत्तर दिले.

"आणि माझी चित्रा?"

कृष्णाने एकदम चेहरा पाडला. कपाळावर आठ्या आणल्या. दु:खी होऊन नकार दर्शवीत मान हलवीत म्हणाला : "न्हाय बरं."

"का? काय झालं तिला?" सोनाने आतुर होऊन विचारले. तिचे काळीज चरकले. आता हा काय सांगणार म्हणून ती अधाशी नजरेने त्याच्याकडे पाहू लागली.

"झालंबिलं न्हाय, पन पोरीचं डोकं फिरलं."

"काय करती ती?"

"तीऽ, ती आता अब्रूनं ऱ्हाईल असं दिसंना."

"मामा! माझी चित्रा गरीब..." सोनाला धक्काच बसून ती उद्गारली. तिला वाईट वाटले.

"सोनाबाई! मानसाची बुद्या पावलाला बदलतीया." कृष्णाने शहाणपणाने सांगितले.

"मग आता काय होणार?" सोना म्हणाली.

"आता आपुन काय तरी केलं पाइजी. न्हाय तर चित्रा हातची जाईल." कृष्णाने सोनाला विश्वासात घेऊन सांगितले.

"काय करावं म्हनता तुम्ही?"

"मला वाटतं, चित्राला हाकडंच आनावी." कृष्णा म्हणाला.

"मामा! काय म्हणता हे?" तिला पुन्हा धक्का बसला. तिने कपाळावर आठ्या आणून तिरस्कारयुक्त नजरेने कृष्णाला विचारले. तिच्या हृदयात कालवाकालव झाली. तिचे डोळे पाण्याने भरले.

"हो! म्या म्हटलं तेच खरं." कृष्णा आवाज चढवून म्हणाला.

"कसं?" सोनाने आश्चर्याने विचारले.

"असं. चित्रा कुनाचायी हात धरून जाईल. मग हातचं जाईल नि तोंडचं बी जाईल."

"मग आता काय करू या?" सोनाने विचारले.

"तिला इकडं आणू या. आपुन हातचं सोडून पळत्याच्या पाठी लागू नये." कृष्णा म्हणाला. आणि मग सोनाला काहीच बोलता आले नाही. चित्राने परागंदा होऊन भीक मागण्यापेक्षा इथे येऊन सुखाने तरी खावे असेच तिला वाटले. आणि म्हणून तिने मामाच्या विचारापुढे मान तुकवली होती.

कृष्णा सोनाचा विचार काढून आला होता. तो चित्राच्या बारीक सारीक हालचालींवर लक्ष ठेवून तिला पेचात पकडण्याची वाट पहात होता.

सखुबाईही आनंदात होती. आता तिच्यापुढे एकच अडचण होती. ती म्हणजे चित्राला एकादा चांगला नवरा बघून तिला वाटेला लावणे आणि आपण दोघी लेकीच्या घरी उरलेले दिवस काढणे, एवढाच ती विचार करीत होती. परंतु तिच्या सभोवती काय चालले आहे हे तिला मुळीच कळत नव्हते. तिचे दारिद्र्य तिला ते कळू देत नव्हते. तिचे अज्ञान तिला ते दिसू देत नव्हते. तिला वाटत होते, आपण दोन मुलींवर हयात गुदरली. आपण अब्रूने जगलो आणि अब्रूनेच मरावे. आपण कोणाची थुंकी ओलांडली नाही. आता एका मुलीने आपले तोंड उजळ केले. असेच एवढी चित्रा आपल्या घरी गेली आणि नांदू लागली की मग कधी वाटेल तेव्हा मरण यावे. आपण तयार आहोत.

पावसाचे अगदी शेवटचे दिवस होते. तो जणू आचकेच घेत होता. मधून एकादी सर येत होती वा मध्येच ऊन पडत होते. सर्वत्र चिखल पसरला होता. त्याची चिरफाडच

चालली होती. ऊन त्याला वाळवीत होते. आणि पाऊस त्याला पुन्हा पुन्हा जिवंत करीत होता.

सकाळीच घरोघर चुली पेटल्या होत्या. लोक उठून आपापल्या उद्योगाला लागले होते. चित्रा आज रोजच्याप्रमाणे सूप घेऊन कृष्णाच्या घरी गेली. कृष्णा चहा पीत बसला होता. त्याने चित्राकडे भेदक दृष्टीने पाहिले. त्याच्या नजरेत अलीकडे तिरस्कार भरला आहे, हा आपणाला बोचेल असेच बोलतो, आपणाला पाहताच याच्या कपाळावर आठ्यांचे जाळेच पसरते, हे तिला जाणवत होते. त्यामुळे याच्या पुढे आपण उभे राहू नये, त्याच्या घराकडे जाऊ नये, एवढेच काय, पण त्याचे तोंडसुद्धा पाहू नये, असे तिला वाटत होते. परंतु तिला रोज देवपूजेला गेल्याप्रमाणे त्या घरला जावेच लागत होते. त्याचे रोज तोंड पहावेच लागत होते. जर एकादे दिवशी तो गावात गेला तर त्याच्या बायका तो येईपर्यंत चित्राला थांबवीत आणि तो येईपर्यंत दळण मळण चूल सर्व काही थांबत होते. हे सर्व तिला आवडत नव्हते. परंतु ते ती बोलून दाखवीत नव्हती.

''हं, या. दाणं'' कृष्णा कुर्‍यात उद्‌गारला आणि चहा फुंकू लागला. चित्रा मलूल, खिन्न होऊन स्तब्ध उभी राहिली. कृष्णाने सावकाश चहा संपवला. नंतर मापटे घेतले. दाण्याचे पोते सोडले आणि चित्राच्या सुपात दाणे घातले. दाणे सुपात पडताच चित्राने सूप उचलले व ती मुकाट्याने बाहेर निघाली. तिने सुटकेचा नि:श्वास सोडला.

''ए, थांब जरा.'' कृष्णा मागून गुरगुरला. ती जागच्या जागी मेख ठोकल्यासारखी उभी राहिली. तिचे हृदय धडधडू लागले. क्षणभर वाट पाहून ती परत फिरली.

''काय मामा?'' तिने भेदरून विचारले.

''काय न्हाय. ऐतं खावा, पन आब्रूनं.'' तो बिथरून फुसफुसला.

''म्हणजे, मला कळलं न्हाई.'' ती हळू आवाजात उद्‌गारली. तिच्या डोळ्यात दीनपणा गच्च भरला. हा एकेरीवर आला आहे हे चित्राने जाणले होते. यापेक्षा थोडासुद्धा आपला अपमान आता होऊ नये असे तिला वाटू लागले.

''कळलं न्हाय? बरं, कळंल. मानसाला गळतं तवा कळतं.'' त्याने आवाज चढवून म्हटले.

चित्राचे बोलणे बंद झाले. तिने आपले ओठ मिटून घेतले. पाठ भिंतीला टेकली. क्षणभर भेदरून डोळ्यांची उघडझाप केली. ''हो.'' तिने गोंधळून मान हलवली.

''हो तर मग जा आता.'' तो ठसक्याने म्हणाला.

चित्रा गर्रकन फिरली. क्षणात त्याच्या दृष्टिआड झाली. तिला त्याच्या दृष्टीचीसुद्धा भीती वाटत होती.

तिने मान खाली घालून दाणे नीट केले. मान खाली घालून ते दळले. मान खाली घालूनच ती भाकरी करू लागली. पुढ्यातील पिठात तिचे आसू गळत होते.

एकाएकी चित्रा गप्प झाली आहे हे सखुबाईच्या लक्षात आले होते. हिला कोण काय बोलले? की कृष्णा काय बोलला? काय झाले? हे काही तिला कळत नव्हते. ती विचार करीत होती. तोच बाप्या आला.

"द्या वाईच इस्तू." त्याने आज एकदम घरात शिरून बैठकच मारली. सखुबाईला त्याचे नवल वाटले. तो कधीच न येणारा आज इकडे कसा आला? तिचे काळीज हलले. चित्राने परत न पहाताच एक निखारा त्याच्या रोखाने फेकला. तो घेऊन त्याने चिमटीत घातला आणि तो बाहेर पडला.

"आज बाप्या कसा आला?" सखुबाई पुटपुटली. आणि "आज ह्यो बाप्या कसा आला?" कृष्णा गर्जला आणि सरळ आत येऊन सखुबाईच्या पुढे बसला. त्याचा उग्र चेहरा पाहून सखुबाईची पाचावर धारण बसली. ती गोंधळून गेली. तिला काहीच सुचेना. चित्रा घाबरली. आता हा काय बोलणार या भीतीने तिचे काळीज करपू लागले.

"का आला कोण जाणं." सखुबाई शांतपणे म्हणाली.

"कोण जाणं? ह्ये बघ, म्हवा असल्याशिवाय माशी उडत न्हाय." त्याने विलक्षण हातवारे करीत म्हटले.

"मला काही समजलं नाही." सखूने पुन्हा सांगितले.

"न्हाय समजायचं. पन जवा पार अब्रू निकालात निघंल तवा मातर माझ्या नावानं बोंबलत बसशील." तो बळेच ओरडू लागला.

"अरं पर काय झालं तरी काय, सांग की."

"ऐतं म्हमईचं पैसं येत्यात. ऐती लुगडी येत्यात. ऐतं सुपात दाणं पडत्यात. ऐतं दळून खाताय. तवा अब्रूनं खावा." कृष्णा धापा टाकीत बोलला. त्याचा चेहरा लालेलाल झाला.

"आता मी तरी काय करू? बाप्या कधीच नाही नि आज आला." सखू गयावया करीत म्हणाली.

"हे बघ, मी डोळं झाकून फिरत न्हाय. मी रोज बघतोय. त्यो रोज गिरक्या घेतोय. सारखा हाकडंच गुंगतोय."

"मग आता त्याला मी काय करू ते सांग." सखूने विचारले.

"बाप्या कसला हाय त्ये तुला ठावं हाय का न्हाय?" कृष्णाने विचारले.

"हो, मला हाय ठावं."

"मग त्यो का बरं येत असावा?"

"ते मी कसं सांगू?"

"का? तेवढंच का सांगता येत न्हाय? वाईच पोरीला सांग." तो गुरकून म्हणाला. आणि चटकन उठून बाहेर पडला.

घरात सर्वत्र शांतता पसरली. फक्त चित्रा मुसमुसत होती. बराच वेळ कोणीच बोलले नाही.

"चित्रा! बाप्या का आला?" सखूने शांतपणे विचारले.

"आई! मी कसं सांगू?" चित्राचा कंठ दाटून आला.

"मग कोण सांगणार?" सखुबाईने गंभीर स्वरात विचारले.

"आई? मी तरी कसं सांगू?" असे म्हणून ती थांबली, तिला पुढे बोलवेना. कुठे तरी आपला आवाज अडल्यासारखे तिला वाटले. तिच्या पाठीत कळ आली. ती चटकन उठली आणि सखुबाईच्या गळ्यात पडली. तिने आपल्या आईला मिठी मारली आणि मोठ्याने टाहो फोडला. कित्येक दिवसाचे दु:खच जणू ते बाहेर पडले. कित्येक दिवस गिळलेल्या अपमानाचा भडका झाला. कित्येक दिवसांची लाचारी ओरडतच जणू बाहेर आली.

तिने आईच्या गळ्याची मिठी सोडून कपाळावर मारून घेतले. आणि कितीतरी उशीर तव्यात तापलेली भाकरी करपून जळू लागली.

"चित्रा, आता काय होणार?" सखुबाई गहिवरून म्हणाली. तिच्या डोळ्यातून पाण्याच्या धारा वाहू लागल्या.

"आता माझं दिवस भरलं." चित्रा वैतागून म्हणाली.

"नको, नको. तसं म्हणू नको. फक्त अब्रू संभाळ." सखुबाईने चित्राला जवळ घेतले. तिचे आईचे विशाल अंत:करण कळवळून आले.

"आई, माझ्यावर मामा आळ घेतोय." चित्रा हुंदके देत म्हणाली.

"घेऊ दे. पण माणसानं जिवाच्या मोलानं अब्रू जपावी. आणि तू आपली अब्रू त्याच मोलानं जप. लग्न करून घे. एवढंच कर." सखुबाईने तिला लहान मुलाप्रमाणे पोटाशी धरून सांगितले.

त्या दिवशी चित्रा दिवसभर खिन्न होती. तिला मुळी करमले नाही. तिला राहून राहून कशाची तरी भीती वाटे. एकाएकी काळजात धस्स होई. सर्वत्र ओसाड दिसे. आपले जगात कोणीही नसून आपल्याला दारोदार भीक मागावी लागणार. आपण इथे राहून आपल्यावर कसले तरी संकट कोसळणार असे तिला वाटे. तो सुपीक समृद्ध प्रदेश आपल्याला उजाड वाळवंटासारखा रखरखतो आहे असे तिला वाटे. थंड पावसाच्या झडी तिला उष्ण कडक उन्हाच्या लहरीप्रमाणे चटके देऊ लागल्या. सारा दिवस तिने अबोल स्थितीच काढला.

संध्याकाळी जेवण झाले आणि चित्रा व सखुबाई अंथरुणावर पडल्या होत्या. दिवा ढणढणत होता. चित्रा आकाशाकडे नजर लवून विचार करीत होती. तिचे ऊर वरखाली होत होते. आणि अतिवेगाने धडधड चालू झाली होती. तिने गळ्यापर्यंत अंगावर लपेटून

मुसकटून घेतले होते. फक्त तोंडच तेवढे बाहेर होते. आपण आजपर्यंत किती चांगल्या वागलो! कोणीही आपणाकडे नुसती वाकडी दृष्टी करूनसुद्धा पाहिले नाही. आणि आता हा बाप्या खरंच इकडे रोज येतो आहे. तो उगीच कधी येणार नाही. त्याच्या मनात नक्कीच काही तरी आहे. आणि तेही माझ्याविषयीच आहे. आता त्याला आपण कसे तोंड देणार? शिवाय मामाने तर आकाशपाताळ एक करायला आताच सुरवात केली आहे. आणि जर बाप्याने आपणाला कुठं तरी गाठलं, जर अंगाला हात लावला, तर गावभर दंगा होईल. सर्व आपली चेष्टा करतील. आपली अब्रू जाईल. आईला भयंकर दु:ख होईल. ती ऐकूनच जीव सोडील. मग मामा काय करील? तो तर वेळेची वाट पाहत आहे. तो आपले वाटोळे करील. पण बाप्याचे कोण काय करणार? त्याला कोणीही काहीच करू शकत नाही. माझ्या अब्रूचा कोण सूड घेणार? आपले कोण आहे? जर कुणी असते तर तो इकडे फिरकलाच नसता. तिच्या मनात विचारांची माळका सुरू झाली होती. ती संपत नव्हती.

सखुबाई मधून मधून खोकत होती. रात्र स्थिर झाली होती. सर्वत्र शांतता नांदत होती. रातकिडे चिरचिरत होते. आणि मध्येच उकिरड्यात बेडक्या गोंगाट करीत होत्या. दारातील चिखल एकाएकी 'चर्र चर्र' करू लागला. कोणी तरी आल्याचा भास झाला. तिने कान टवकारले. ती सर्व लक्ष लावून ऐकू लागली. चिखलाच्या करकरण्याचा आवाज बंद झाला होता. जणू कोणी तरी आपल्या वळचणीला आले आहे असे तिला वाटू लागले. ती जीव तोडून ऐकण्याची खटपट करीत होती. तिला रातकिड्यांची चीड आली. ते आचकत चिरकत होते. एक थांबत होता तरी दुसरा सूर धरीत होता.

सर्व प्रदेश अंधारात लुप्त झाला होता. सर्वत्र अंधारच अंधार दाटला होता. सारे जग त्यात गडप झाले होते. जणू जगात अंधाराशिवाय दुसरे काहीच नाही. परंतु अंधारालाही सीमा असते. अंधारानंतर प्रकाश येतो. रात्रीनंतर सूर्योदय होतो. दिवस येतात नि जातात. हे सर्व जगाचे नियम चित्रा पार विसरून गेली. तिची भीतीने गाळण उडाली. तिच्या मनश्चक्षुंपुढे बाप्याचा करपलेला भेसूर चेहरा उभा राहिला आणि क्षणात कृष्णाची तापट तिरस्कारयुक्त नजर तिच्यावर रोखली गेली आणि मग तिच्या कानात 'माणसानं आपली अब्रू जिवाच्या मोलानं जपावी' हे सखुबाईचे बोल घुमू लागले. ती हळूच आपल्या आईकडे सरकली. आणि तिच्या धक्क्याने सखुबाईला जाग आली. सखुबाई जागी झाली. आणि खोकू लागली.

''चित्रा, तू अजून निजली न्हाय?' म्हातारी खोकत म्हणाली.

''हं, नाही. आता जाग आली.'' चित्रा हळूच म्हणाली.

सखुबाई जागी झाली. आणि बाहेर कोणाचा तरी पळण्याचा आवाज आला. चिखलात वाजणारी पावले दूर गेल्याचा भास झाला. सखुबाई चकित झाली.

"कोण हे पळालं?" तिने हळूच विचारले.

"हो. कोण तरी पळालं." चित्राने उत्तर दिले. ती भेदरून गेली होती. तोच छपरावरून दुरून कोठून तरी दगड येऊ लागले. एक, दोन, तीन. सारखा वर्षाव सुरू झाला. हे काय होत आहे, आता काय होणार, याचा त्या दोघींनाही पत्ता लागेना. आता रडावे की बाहेर पळावे की कोणाला मदतीला बोलवावे, याचा गोंधळ उडून त्या भेदरून गेल्या. सखुबाई वेड्यासारखी जमीन चाचपू लागली. ती थरथर कापू लागली. दगड येतच होते. सारे घर हादरत होते, चुरम खात होते. चित्रा स्तब्ध होऊन इकडे तिकडे पाहत बसली. तोच म्हातारीचा थरथरता हात लागून एक उतरंड ढासळून दिव्यावर पडली. सर्वत्र अंधार झाला.

"धावा, धावा, धावा!" सखुबाई मोठ्याने ओरडली.

लोक जागे झाले. कोण खडबडून उठले. आळी जागी झाली. "आलो, आलो, आलो!" एकच गिल्ला झाला. उघडे बोडके लोक जे मिळेल ते घेऊन धावत सुटले. क्षणात गाव उठून बसला.

"आँ? सखुबाई! काय झालं?"

"अरं कोण शिरलं घरात?" जो तो प्रश्न विचारू लागला.

सखुबाईच्या दारात एकच गर्दी झाली. परंतु काय झाले आहे हे कोणालाच समजत नव्हते. जो तो आपसातच विचारीत होता : "काय झालं" आणि "कुणाला ठावं?" असा जबाब मिळत होता. घरात चोर शिरला की साप शिरला का आणि काही तरी झाले, कोणाला काहीच कळत नव्हते.

"सरा गा म्हागं." कृष्णा कंदील घेऊन पुढे आला.

चित्रा आपल्या आईला मिठी मारून बसली होती. त्या दोघींचीही बोबडी वळली होती.

"का भेदरलाया?" कृष्णाने दरडावून विचारले. त्याला पाहून सखुबाईला धीर आला. तिने निःश्वास टाकून म्हटले : "घरावर दगाड पडलं." आणि बाहेर सर्वत्र चर्चा सुरू झाली : "दगड पडलं." "सखुबाईच्या घरावर दगड पडलं." सखुबाईने दिवा लावला. सर्व लोकांनी चिलमी भरल्या. चारचौघांनी सखूला धीर दिला. सर्वांनाच मोठे आश्चर्य वाटले.

"पण हे दगड कुणी मारलं?" एकाने प्रश्न केला.

"कुनी म्हंजी? अरं त्या बाप्यानं!" एक जण उत्तरला.

"तसं कसं? धरला तर चोर, न्हाय तर साव." कोणी तरी म्हणाले.

"त्ये कशापाय? कालच त्येनं आमच्या बनीला आडवून सांगितलं." एका शेतकऱ्याने खात्रीपूर्वक सांगितले.

"काय सांगितले?" दुसऱ्याने सरकून विचारले.

"अरं त्यो चित्राच्या म्हागं लागलाय."

''बाप्या चित्राच्या म्हागं लागलाय. त्येनंच दगड मारलं.'' सर्वत्र लोक बोलू लागले. तो शेवटचाच बोल बरोबर घेऊन घरोघर परतले. कृष्णा बसला होता.

''आता काय करायचं किस्ना?'' सखूने भीत भीत विचारले.

''आता तूच सांग काय करावं ते?'' कृष्णाने उलट सवाल केला.

''माझी अब्रू गेली. मला काळूखी लागली.'' सखू रडत म्हणाली.

''हो. ते सारं खरं. पन म्होरं काय?'' कृष्णाने विचारले.

''आता मला काय सुचंना. तूच सांग.'' सखुबाई म्हणाली.

''हे बघ, आता घाबरू नको.'' कृष्णाने आपलेपणाने म्हटले.

चित्राला फार नवल वाटले. या प्रकाराने मामा भडकून जाईल, आपणाला वेडेवाकडे वाटेल ते बोलेल, आधीच तो आपणाला रोज टोचून बोलतो आहे, तो या गोष्टीनं फारच भडकेल. परंतु सारेच निराळे झाले. तिला वाटू लागले हा माणूस जसा दिसतो तसा नसून दयाळू आहे. आणि किती केले तरी तो आपला मामा आहे. त्याच्यावाचून आम्हाला तरी कोण आहे? त्यानंच तर अक्काचं बरं केलं, तिला किती सुखात ठेवली आहे. तिचं पुन्य बांधून घेतलं आहे. तिला खात्या गवाणीला लावली आहे. म्हणून तर आज आम्ही बसून खात आहो. नाही तर –

''मग मी काय करू?'' सखुबाई गहिवरून म्हणाली.

''म्या चित्राचं बरं व्हावं म्हणं लगीन केलं. पन ते तसं झालं. आता सोनाबाईचं जसं म्या केलं तसंच मी करणार हाय.'' कृष्णा हळू आवाजात म्हणाला आणि म्हातारीवर नजर रोखून पाहू लागला. आणि सखुबाईला ते ऐकून आनंद झाला. तिने चटकरून चित्राकडे पाहिले.

''हो, हो, कर बाबा एवढं. माझ्या चित्राला लाव अन्नाला.'' सखुबाई आर्जवून म्हणाली.

''परवा म्या सोनाला इचारलं तवा तिनं बी कबूल केलं. म्हनती आणा हाकडं तिला. एक जागा हाय हातं.'' कृष्णाने कुर्‍यात म्हटले.

''हाय? जागा हाय?'' सखूने आनंदून विचारले.

''हो, हो, हाय! मी काय उगाच बसलोय? नुसती सोन्यानं मढवून निघेल आपली चित्रा. आणि येवढं हार हार झालं की मग तू बी जाऊन ऱ्हा झालं तिकडंच. दोन लेकींच्या घरात चारचार दिस ऱ्हाशील तर ...''

कृष्णा पाणी लावून सांगू लागला आणि म्हातारी आनंदाने भारली. ती सर्व दु:ख विसरून गेली. थोड्याच वेळापूर्वी झालेला प्रकार ती विसरली.

''मग हे करून टाक. कवा जाता?'' सखुबाईने विचारले.

''सकाळी. माझी तयारी हाय.'' कृष्णा म्हणाला.

"बरं तर. निघा उद्याच्या गाडीनं. मग हतं पोरीची अब्रू गेली. जाऊ दे भनीकडं."
सखूने सांगितले.

"बरं तर, सकाळ तयारी करा, दोपारनं निघतो मी."

"हो, हो, निघा." सखू म्हणाली. आणि कृष्णा उठून गेला.

रात्र उलट दिशेने फिरली होती. आता तिच्यातील भेसूरता विरघळत होती. रातकिड्यांची किरकीर मंदावली होती. किंवा ती जाणवत नव्हती. पूर्वेला नवा तजेला आला होता. आकाश तांबूस तांबूस झाले होते. अधून मधून कुठे तरी काळ्या ढगाचे डाग दिसत होते. डोंगरांच्या आकृती अंधुक दिसत होत्या. पहाटेचे वारे आनंदाने नाचत खेळत भराऱ्या मारीत होते. जणू शांत वृक्षांना ते धक्के देऊन जाग आणीत होते. पावसाने आपला हात आखडल्यामुळे त्या लाल आकाशाच्या खालून पाखरांचे कळप भिरभिरत जात होते. जणू काय त्यांच्या पिंजऱ्यांचे दारच कोणी तरी उघडले होते. मळीला कुकुड कोंबड्याची 'धुक धुक' हाक चालू झाली होती. मध्येच कोयळ काहीतरी गात होते. कोंबडे प्रथम पंखांची फड फड करून नंतर दीर्घ आरोळी ठोकत होते. जणू सूर्योदयाच्या सुखकर आगमनाची ते इमानाने ललकारी देऊन निद्रिस्त मानवांना जागृत करीत होते. आणि आपण या रात्रीच्या दुष्ट अंधारातून मुक्तीच्या उजेडात प्रवेश करणार याचा त्यांना आनंद झाला होता.

चित्राचे हृदय विशाल मुंबई शोधीत होते. तिच्या त्या सुंदर टपोऱ्या डोळ्यात झोपेचा ताठा भरला होता. परंतु तिचे मनश्चक्षू मुंबई पाहण्यासाठी उतावीळ झाले होते. मुंबई कसली असेल? कुठे असेल? ती नक्कीच सुंदर असेल, म्हणून तर सर्वच लोक मुंबई-मुंबई करीत आहेत. तिथं काम लागतं. तिथं पैसा मिळतो. तिथं सुख मिळतं. सारं मिळतं. जे इथं या खेडेगावी नाही ते सर्व मुंबईत मिळतं. आपली अक्का इथं होती तेव्हा कशी होती? एक लुगडं आम्ही दोघी नेसलो. एक चोळी दोघींनी घातली. मरमर काम केलं. परंतु सुख मिळालं नाही. पण ती त्या दिवशी आली तेव्हा कशी आली? तिला एखाद्याची नजरच लागली असेल. एकदम बदलून आली. जरीची लुगडी; रेशमी चोळ्या; पैसे — त्याचा तर मामाच्या घरावर पाऊसच पडला. मग नक्कीच मुंबई सुंदर, सुखी असणार. आपणही आता तिथं जाणार. आपलंही लग्न होणार. अक्कासारखंच आपलं होणार. मग आपण आईला तिकडे बोलवून घेऊ. मग संपलं. मग इकडे कोण आहे आपलं? मामा आहे. तर त्याची मुलंबाळं, घर आहे. जमीन आहे. तो इथंच राहील. आणि आज असा आपल्या घरावर दगडांचा पाऊस पडला तसा पुन्हा पडणार नाही. आपण मुंबईला जाणार. उद्याच जाणार.

चित्राला त्या विचाराने गुंगी आलीच आली. आणि त्या विचारात ती कधी झोपली हे तिलाच समजले नाही.

आणि झोपेतून जागी होताच प्रथम नदीला जाऊन धुऊन आली. दाणे दळले, भाकऱ्या केल्या. आणि मुंबईसाठी ती तयार झाली.

कृष्णाही आपला गुडघ्यापर्यंत लांब कोट घालून गळ्याभोवती उपरण्याचा तिढा टाकून वर जरीचा रुमाल बांधून तयार झाला. सर्व मंडळी त्या दोघांना घालवीत निघाली. नुसती गर्दी झाली. सखुबाईही निघाली होती.

''पोरगी शेवटी चालली. अब्रूनं दिस काढलं तिनं.'' बाया आपसात चित्राची तारीफ करीत होत्या. कोण मध्येच ''बरं चित्रा, जा.'' असा निरोप घेऊन परत फिरत होत्या. कोण ''जावा, जावा.'' असे केकटून म्हणत होत्या. आणि सखूबाईचे काळीज धडधडत होते. ते गिरक्या घेत होते. तिचा एकुलता एक आधार नाहीसा होत होता. परंतु इथे राहाण्यापेक्षा आपल्या बहिणीकडे जाऊन आपले स्वत:चे धडभले करून घेणेच चांगले या विचाराने ती स्वत:ला धीर देत होती. वेशीपर्यंत सर्व लोक परत फिरले आणि चित्रा, कृष्णा, सखुबाई ही तिघेच पुढे निघाली.

''चित्रा! जपून. चित्रा! घाबरू नकं. चित्रा! मुंबईत फिरू नकं. चित्रा! माझी काळजी करू नकं.'' अशी ती अनेक वेळा चित्राला म्हणत होती. आणि चित्रा मुंडके हलवून ''होय'' म्हणत होती. बोलत बोलत ती पार गावाबाहेर गेली आणि पुढे माळ लागला.

''बरं अक्का, आता तुम्ही जावा म्हागं.'' कृष्णा उभा राहून म्हणाला. आणि एखादी सारंगीची तार एकदम पिळली जाऊन तिची तुटण्याची वेळ यावी तशी सखुबाईच्या हृदयात एकदम ओढ लागली. भयंकर ओढ लागली. क्षणात तिचा चेहरा बदलला. कृष्णाच्या त्या शब्दाने तिच्या हृदयाची चिरफाड झाली. तिला भयंकर कळा येऊन आपोआप तिच्या डोळ्यातून आसू टपटपले. गळा भरून आला. शब्द संपले. विचार पळाले. सखुबाई दीनदुबळी झाली. ''चित्रा! जा.'' एवढे शब्द ती आठवू लागली. चित्रा काखेत लुगड्याचा पिळा घेऊन खिन्न दृष्टीने आईकडे पाहत होती. तिच्या हृदयात टाचण्या टोचत होत्या.

''चित्रा.........'' सखुबाई ओरडली.

''आ....ई......'' चित्राने टाहो फोडला. आणि क्षणात त्यांनी एकीमेकींना मिठी मारली. रड्याने आकाश भरले. जन्मभर दारिद्र्य, दु:ख, अपमान यांनी पिचलेली दोन मने आज मनसोक्त रडत होती. जन्मभर एकमेकाला सोडून क्षणभरही दूर न झालेली, जन्मभर आनंदाला पारखी झालेली मने पुढच्या भयंकर प्रसंगांना भिऊन रडत होती. जणू क्रूर क्रूर दारिद्र्याने त्यांची ताटातूट सुरू केली होती. ज्याने सोनाला दूर केली तेच दारिद्र्य चित्राला दूर नेत होते. आणि आईजवळ बाळ हा एवढाच जो आनंदाचा कण होता तोही आज नष्ट होत होता. आणि त्याच कणासाठी ते दोन जीव घसा फोडून रडत होते. सखुबाईपुढे आपले पुढचे दिवस, पुढची संकटे नाचत होती. आणि आपण गेल्यावर

आईचे काय होणार या भीतीने चित्रा गांगरून गेली होती. त्या वेळी ते सारे शिवार जणू रडत होते.

"काय लावलंय हे?" कृष्णा जोराने खेकसला. आणि चित्राने आपल्या आईला मारलेली मिठी सैल केली. ती हळूच दूर झाली. सखुबाई हुंदके गिळू लागली. तिच्या आसवांनी चित्राची पाठ ओली झाली होती.

"बरं बाळ, जा, पत्र पाठव." सखुबाई अडखळत म्हणाली. चित्राने मानेनेच "हो" म्हटले. आणि ती मागे सरली.

"चित्रा! लवकर मला तिकडं ने." सखुबाई हळूहळू रडत म्हणाली. आणि चित्रा मान हलवीत होती.

"हं चल चित्रा. अक्का, जा तू." कृष्णा म्हणाला.

"न्हाय न्हाय, मी म्होरं येत न्हाय." असे म्हणून सखुबाई तिथेच खाली बसली. जणू तिच्या डोकीवर भयंकर भार झाला होता. तिला क्षणभरसुद्धा उभे राहणे शक्य नव्हते. चित्रा परत फिरली आणि जबरीने चालू लागली. तिचे पाऊल पुढे पडत नव्हते. तिला भयंकर ओढ लागली होती. क्षणाक्षणाला ती परतून पाहत होती. आणि वर हात करून "आई, जा, जा." म्हणत होती. तिचे कोमल ओठ थरथरत होते. ती रडत होती. तिचे अंत:करण रडत होते. सखुबाईचा गळा दाबल्यासारखा बंद झाला होता. ती आपला हात वर करून पालवीत होती. चित्रा माळ ओलांडून पलीकडे गेली. ती आईच्या प्रेमळ दृष्टीच्या पलीकडे गेली.

सखुबाई बावरली. वेड्यासारखी चहूकडे पाहू लागली. "माझी चित्रा गेली. दूर गेली." असे म्हणून तिने हंबरडा फोडला. डोळे फाडून पाहिले. परंतु काहीच दिसत नव्हते. तिची निराशा झाली. ती खिन्न होऊन खाली पाहू लागली. एकदम तिला आनंद झाला. तिची दृष्टी चित्राच्या चिखलात उमटलेल्या पावलावर खिळली. ती तिथे हळूच खाली बसली. तिने ते पाऊल डोळेभर पाहिले. पोटभर पाहून घेतले. आपले गत आयुष्य आठवून ती पोटभर रडली. आणि त्या पावलावर तिने अश्रू ढाळले. त्याला आशीर्वाद दिला. "माझी बाळ चित्रा." असे म्हणून तिने त्याला हळूच स्पर्श केला. आणि तिला चित्राच्या लहानपणाची आठवण झाली. तिचे आईचे आतडे हळहळले. आईची वेडी माया कळवळली. तिने हळूच आपले ओठ त्या चिखलावर उमटलेल्या पावलावर ठेवले. "माझी चित्रा!" तिने एक दीर्घ श्वास टाकला. तिच्या डोकीवरून एक चिमण्यांचा कळप उडत गेला. दूर गेला. "माझ्या दोन चिमण्या अशाच गेल्या. दूर गेल्या... त्या मला दिसणार का?" ती पुटपुटली.

सूर्य मावळत होता. तो पश्चिमेला अगदी अस्ताला गेला होता. जणू तो त्या पन्हाळगडाच्या बुरुजावर खिन्न होऊन बसला आहे. आणि कित्येक वर्षे निष्क्रिय झालेला

तो बुरूज त्याला डोकीवर घेऊन उगीच उभा होता. सखुबाईही बावरून उभी होती. तिला सर्वत्र अंधार दिसत होता. समोर गाव उभा होता. सखुबाई त्या गावाकडे परत फिरली. तिची कंबर बसली होती. तिची शक्ती नाहीशी झाली होती. ती गावाकडे निघाली. तिथे तिचे पाल्याचे खोपट होते.

आपले आता कोण आहे गावात? आपण दळणार कसे? चूल पेटवणार कशी? पाणी आणणार कसे? आपल्या जिवाभावाला कोण आहे? आपल्या काळजाचे दोन तुकडे तुटून पडले. आता आपण कसे जगणार? असा विचार करीत ती गावात आली. घरात भेसूरता बसली होती. ते मोडके सपार तिला गिळायला उठले. तिला त्याची भीतीच वाटली. ती घरात शिरली. तिने दिवा लावला. तो तिचा सोबती जळू लागला. परंतु तिचा दुसरा सोबती — चित्रा — तिथे नव्हता. ती काटवट शांत पडली होती. तो तवा करपून बसला होता. चूल रडत होती. जणू ते सर्वच रडत होते आणि सखुबाईही रडत होती आणि तिच्यापुढे बसून रडेच जणू आक्रोश करीत होते.

''माझ्या दोन पोरी मला दिसतील का?'' ती पुटपुटली. तिच्या डोळ्यांतून दोन अश्रुधारा गळल्या आणि ........

## ३

कऱ्हाड स्टेशनमध्ये मुंबईला जाणाऱ्या लोकांनी गर्दी केली होती. सर्वत्र वाटसरू पसरले होते. कोणी आडवेतिडवे पडून गाडीची वाट पाहत होते. कोणी खुशाल घोरत होते. काही भिकारी खुरमुंडी घालून मुरटा होऊन निजले होते. आणि त्या वसाड भकास स्टेशनामध्ये वारा शिरत होता. आणि निजलेल्या लोकांना लाथा देत तुडवीत जात होता. उपाशी चोरटी कुत्री गठडी शोधीत वास घेत रापत होती. अर्ध्या भिंतींना लावलेल्या डांबरी रंगात ढेकूण टपले होते. ते हळूच रक्तशोषण करीत होते. चित्रा स्तब्ध बसली होती. जवळच कृष्णा पान चघळत पिचकाऱ्या टाकीत बसला होता. एक शिपाई आला.

''साहेब, गाडी कवा येनार?'' कृष्णाने विचारले.

''साडेबारा वाजता.'' त्यानं आपली ढोलक्याएवढी बत्ती फिरवली.

''म्हंजी किती वकूत हाय?'' कृष्णाने विचारले.

''अजून दीड तास. निजा.'' मी उठवीन मग.'' असे म्हणून तो पुढे गेला.

''हो, चित्रा, तू नीज.'' आदल्या रात्रीच्या जाग्रणामुळे पेंगत असलेल्या चित्राला कृष्णा म्हणाला.

''नाही मला नीज येत.'' ती बळेच म्हणाली.

"नकं, नकं. तू नीज." कृष्णाने तिच्या पाठीवरून हळूच हात फिरविला. त्याबरोबर त्याच्या अंगात विद्युत संचार झाला. एक भयंकर विचार त्याच्या मनात चमकला. त्याचे हृदय वेगाने धडधडू लागले. त्याने पुन्हा पुन्हा तिच्या पाठीवर हात फिरवीत तिने निजावे म्हणून आग्रह चालविला. त्याचे सर्वांग शहारले. जसजसा तो चित्राच्या अंगाला स्पर्श करीत होता तसा त्याचा विचार खंबीर होत होता.

आणि चित्राच्या अंगाला काटा शिवरला. तिला कसेसेच वाटले. तिने सर्वत्र पाहिले. निरखून पाहिले. जिकडे तिकडे अंधार होता. कोणीही जागे नव्हते. शेजारचा माणूस तालबद्ध घोरत होता. तिजे काळीज धडधडू लागले. तिचे ऊर जड झाले. तिचा श्वास जड झाला. कृष्णाने पुन: आग्रह केला : "तू नीज बरं." तिला काहीच करता येईना. जोराने बोलणेही तिला बरे वाटेना. ती गोंधळून गेली. तोच कृष्णाने तिला दोन्ही हातांनी हळूच निजवली. ती उशाला लुगड्याचा पिळा घेऊन निजली.

हा असा का करीत आहे? आता आपलं काय होणार? इथे तर एक माणूस जागे नाही. जर त्याने...... तिला तो भयंकर विचार असह्य झाला. तिची छाती उशा घेऊ लागली. मामा मला का निजवीत आहे? समोरच्या मंद अशा दिव्याचा अंधुक प्रकाशही तिला दिसेनासा झाला.

कृष्णा चुळबूळ करीत होता. त्याचे डोळे कशाने तरी भ्रमिष्ट केल्यासारखे झाले. आपण ही नाजूक कळी मुठीत घेऊन मुंबईला जाणार आणि एखाद्याला देऊन टाकणार. आणि जर आपणच तिला सुगंध घेतला तर काय होईल? का घेऊ नये? त्याच्या अघोरी विचाराची गडबड उडाली.

"मामा! मला झोपायचं नाही." चित्रा उठून बसली. आणि 'टण् टण् टण' घंटी वाजली. त्याबरोबर कृष्णाचे दुष्ट विचार दूर पळून गेले. तो हिरमुसला. सर्व लोक जागे झाले. आपली पागोटी सावरीत ते उठून बसले.

"ए, तिकटं सुरू झाली." हवालदार ओरडला. लोकांनी तिकटीच्या बोक्शावर गर्दी केली.

"ए, रांगा लावा." शिपाई खेकसला.

"साहेब! आता कसली गाडी येनार?" कृष्णाने विचारले.

"आता आगगाडी येणार. तुला काय वाटलं बैलगाडी?" त्या बिळकातून तो कर्नाटकी मास्तर गुरगुरला.

"किती पैसे?" कृष्णा म्हणाला.

"पाच रुपये पंधरा आणे." मास्तर उत्तरला.

"आबाबा. एवढं?" कृष्णा उद्गारला.

"अरे मेल आहे." मास्तर ठसकला.

कृष्णाने तिकिटे काढली, तोच एम.एस.एम.ची गाडी हळूच स्टेशनमध्ये शिरली. क्षणभर सर्वत्र धडपड, आरडाओरड सुरू झाली. कितीक लोक इकडून तिकडे धावले. शेवटी स्थिर झाले. कृष्णानेही एका डब्यात शिरकाव करून घेतला. चित्रा बाकाच्या शेजारी खाली बसली. तिचा मुरटा झाला होता. माणसाला माणूस खेटून बसले होते. कृष्णा एका बाकावर जागा मिळवून ऐटीत बसला होता. रेटारेटी, 'मागं सर,' 'पुढं सर,' 'ए, सरून बस,' असा गोंगाट चालला होता. तोच शिटी वाजली. क्षणात कर्कश आवाजात इंजीन किंचाळले आणि हळूहळू गती घेऊ लागले. चित्राच्या काळजात धस्स झाले. आपण निघालो. दूर निघालो. आपल्या जन्मभूमीला सोडून, आपल्या आईला सोडून, निघालो. बाहेर काळोख गच्च भरला होता. तो सर्व प्रदेश त्या अंधारात अदृश्य झाला होता. बाहेरचे वस्तुजात, जीवजंतू दिसत नव्हते. ती सातारा जिल्ह्याची सुपीक काळीभोर धरणी दिसत नव्हती. तो मराठ्यांचा सुंदर देश आता अंधारात मागे मागे सरत होता. न कळत, न दिसता मागे जात होता. त्या सह्याद्रीच्या राशीच्या राशी गिरक्या घेत त्या अंधारातून कुठे तरी दूर जात होत्या. त्याच्या पाठीवरचे ते विशाल अरण्य अंधारातून मागे पळत होते. ती कृष्णा आणि कोयना. त्याही कुठे तरी जात होत्या. सर्व काही जात होते. जणू ते सारे अंधाराच्या महापुरात वहातच होते. 'कशासाठी पोटासाठी, खंडाळ्याच्या घाटासाठी.' इंजीन म्हणत होते. जणू ते सांगत होते की आपण हे एवढे मोठे धूड घेऊन जे आज पळत आहोत ते त्या खंडाळ्याच्या घाटासाठी. आणि तो घाट फोडून ज्यांनी वाट केली त्यांच्या पोटासाठीच आपण हे काम करीत आहोत. आपल्यावर किती भारी कामगिरी आहे! त्या विशाल डोंगराचे – सह्याद्रीचे पोट फाडून ज्यांनी बोगदे केले, ज्यांनी मुंबईत अठराशे चौपन साली गिरण्या सुरू केल्या, त्यांच्या पोटासाठी आपण धावत आहोत. जणू असेच ते ओरडून म्हणत होते. आणि धुराचे काळेभोर लोट सोडीत ते धावत होते. मध्येच किंकाळत होते. जणू ते इंजीन त्या घाटात अठराशे त्रेपन साली बोगदे पाडून त्याला वाट करून देणाऱ्या त्या भांडवलशाहीचा जीव तोडून जयजयकार करीत होते, आणि धावत होते. पुन्हा पुन्हा म्हणत होते : 'कशासाठी पोटासाठी, खंडाळ्याच्या घाटासाठी.'

'रहिमतपूर.......'

'कोरेगाव........' गाडी स्टेशनमध्ये शिरताच पोर्टर दीर्घ आरोळी ठोकून स्टेशनचे नाव सुचवत होते. जणू ते त्या उतारूंना तुम्ही आपापल्या गावांपासून किती दूर आला आहात याची कल्पना करून देत होते. आणि स्टेशनापाठी स्टेशन झुगारीत गाडी पळत होती. गाडीत ठासून बसलेले उतारू पेंगत होते. त्यांना त्याही स्थितीत निद्रेने घेरले होते. माना कलंडत होत्या. त्या एकमेकांवर आदळत होत्या. झोपेमुळे त्यांच्या मानेचे कळस ढळले होते.

कृष्णा जागा होता. त्याचे अंत:करण दग्ध झाले होते. त्याला पश्चात्ताप झाला होता. आपण कऱ्हाडात जे करीत होतो ते बरे नव्हते. आपल्याकडून ते झाले नाही ते बरे झाले. त्याला आनंद वाटत होता. परंतु आपण चित्राला आधी कुठे न्यावी? एकदम सोनाकडे जावे की आधी आपल्या मेहुणीकडे जावे? जर मेहुणीकडे गेलो तर — तर सोना रागवेल. ते बरे नाही. आपण सरळ सोनाकडे जावे. मग पुढे काय करायचे ते करावे. तिला तरी का दुखवा? तिने आपले बरे केले आहे. ती आपल्या मनाप्रमाणे वागली म्हणूनच आज आपण एवढे श्रीमंत झालो आहो. मग सोनाकडेच जावे. तो एकसारखा पान खात होता व मधून मधून खिडकी वर करून बाहेर थुंकत होता.

चित्रा त्या कोपऱ्यात बसली होती. अगदी मुरटून ती बसली होती. तिने आपले गुडघे पोटाशी घट्ट धरले होते. आणि आपले कपाळ त्यावर टेकले होते. ती जागीच होती. मध्येच ती मान वर करून पाहत होती. तिने आपले अंग चोरून घेतले होते. त्यामुळे मराठी 'क्षु' अक्षरासारखी ती बसली होती. आणि तिचे डोळे अश्रू ढाळीत होते. तिच्या हृदयाने पारगावावर तारा धरला होता. ते तिथे घारीसारखे तळपत होते आणि आपली आई काय करीत आहे? ती कुठे आहे ते शोधीत होते. आई, आपली आई, काय करीत असेल? आपण आता मुंबईला निघालो. आता अक्का भेटेल. पण आपल्या आईला पाणी कोण देणार? तिला भाकरी कोण आणून देणार? ती एकटीच त्या घरात बसेल. खोकत बसेल. रडत बसेल. तिला आता मुळी चैन पडणार नाही. ती आसवांचे घोट घेत राहील. ती रडत निजेल. तिच्या अंगावर कोण घालणार? अरेरे! शेवटी आईचे हाल झाले! या सर्व आठवणींनी चित्राचे अंत:करण पेटत होते. आणि त्या आगीने तापलेले अश्रू तिच्या डोळ्यांतून गळत होते. परंतु आपण लवकरच आईला मुंबईला बोलावून घेणार या एकाच विचाराने ती स्वत:ला धीर देत होती.

गाडी बेभान पळत होती. तिची वाट सरळ होती. तो मार्ग लोखंडी, दणदणीत मार्ग होता. याच मार्गाने मुंबईला सर्व वस्तू जात होत्या. कापूस, भुईमूग, हळद, तंबाकू, गूळ, जात होता. आणि पार निकामी झालेली शेरडे, मेंढरे, बैल, म्हशी यांनाही याच मार्गाने वांद्रा दिसत होता. आणि ज्यांचे खेड्यावर पोट भरत नाही अशी माणसेही याच वाटेने मुंबईला जात होती. त्याच वाटेने ती मेलगाडी पळत होती. सातारा जिल्हा केव्हाच मागे गेला होता. आता गाडी आळंदीचा घाट मागे टाकीत होती. ती एखाद्या नागासारखी त्या नागमोडी मार्गाने निघाली होती. जेवढी पुढे जात होती तेवढीच ती पुन्हा मागे जाऊन पुढे निघत होती. वळणे घेत, अंतर तोडीत ती जात होती. ती दमली होती आणि मोठमोठ्याने ठसकत होती. ती पुणे जवळ करीत होती. आणि रात्र मागे उलटून निघाली होती. गाडी घोरपडीला येऊन थांबली.

"घोरपडीऽ......" एका माणसाने आरोळी दिली. लोक जागे झाले. आणि "पुणे

आले,'' ''पुणे आले,'' असे एकमेकाला सांगू लागले. कोणी जांभया देत आळसटपणे परस्परांकडे रोखून पाहू लागले. कोणी संडास कुठे दिसतो का याचा तपास सुरू केला. कित्येकांपुढे पुणे नाचू लागले. बिरकाच्या डब्यात असलेल्या डालग्यांतील कोंबड्यांनी आपले ओरडणे सुरू केले. रोज सकाळी लोकांना उठविण्याचे काम करणारे ते परोपकारी प्राणीसुद्धा मुंबईला निघाले होते. परंतु कामाला नव्हे, की चैन करण्यासाठी नव्हे. तर तिथे एखाद्या हॉटेलवाल्याच्या हंडीत डुबायला आणि एखाद्याच्या पोटात गडप व्हायला.

पुन: गाडी निघाली.

उजाडले होते. झंजुरकातच गाडी पुणे स्टेशनमध्ये शिरली. आणि सर्वत्र गोंगाट सुरू झाला. लोक उतरून मोकाट धावत होते. जिकडे तिकडे सैरावैरा पळत होते. विजेच्या दिव्यांचा झगझगाट झाला होता. गर्दीतून कृष्णा दोन नंबर फलाटाकडे धावत होता आणि त्याच्या मागोमाग चित्राही लगबगीने चालत होती. अंगात लाल कुडती घालून डोकीला लाल मुंडाशी बांधलेले हमाल लोकांवर नुसते तुटून पडले होते. कोणा कोणाचे गटले हिसकून घेत होते. थोडा वेळ ही गडबड झाली आणि पुन: सर्व काही शांत झाले. मुंबईला जाणारे लोक पुढच्या गाडीत जाऊन बसले.

''चहा गरम!'' चहावाला किटली व कपबश्या घेऊन ओरडत होता. आणि लोक चहा घेऊन पीत होते.

''पान बिडी सिगरेट!'' पोटावर खोमच्या घेतलेला भय्या बेंबीच्या देठापासून ओरडून लोकांचे लक्ष वेधीत होता. जो तो आपापल्या मालाची जाहिरात करीत होता.

''ए चाईवाला! हाकडं याव!'' कृष्णाने आपल्या गावठी हिंदीत चहावाल्याला बोलावले.

''हं, किती कप बाबू?''

''दोन देव.'' कृष्णाने हात पुढे करीत म्हटले. कप चित्राच्या पुढे केला. ती नको नको म्हणत असता त्याने ''घे की आता. हे बी शीक.'' असे म्हणत तिच्या हातात कप दिला. आता त्यांना खिडकीशेजारी जागा मिळाली होती. दोघांनी चहा घेतला. कृष्णाने पानाचा तोबरा भरला आणि लटकत असलेल्या घड्याळाचा लांब काटा आठ पंचावन्नवर सरकला. आणि फुर्र फुर्र शिट्या वाजू लागल्या. त्याबरोबर नवीन विजेचे इंजीन घूत्कारले आणि मुंबईकडे निघाले. ते कऱ्हाडपासून आलेले गावठी इंजीन धूर सोडीत उभे होते. जणू ते दमून रवंथच करीत होते. पुणे सोडून विजेची गाडी निघाली. चित्रा खिडकीपाशी बसून बाहेर पाहू लागली.

खडकी मागे टाकून गाडी धावू लागली. कुत्रे मागे लागलेल्या खोकडाप्रमाणे मोकाट ती पळत होती. जागोजाग शिग्नली मान मोडल्याप्रमाणे उभ्या होत्या. त्यांना मागे टाकीत वाऱ्यालाही मागे फेकीत ती मुंबईकडे पळत होती. आजूबाजूचा पालापाचोळा उडवीत

खडखडाट करीत गाडी निघाली होती. सर्व काही हादरत होते. काही ऐकू येत नव्हते.

चित्राचे हृदयही हादरत होते. आपण मुंबईत जाणार. आपले चांगले होणार की वाईट होणार? आपणाला सुख मिळणार की दु:ख मिळणार? आपल्या आईची भेट होणार की नाही होणार? अशा अनेक विचारांचे तिच्या मनात काहूर उठले होते.

गाडीनेही काहूर निर्माण केले होते. बाण निघाल्याप्रमाणे ती निघाली होती. ती थांबत नव्हती. जणू तिला मुंबईला जायची घाईच झाली होती. तिने खंडाळा मागे टाकला. त्या राक्षसी बोगद्यात ती क्षणाक्षणाला गडप होऊन वाट काढीत होती. एकातून दुसऱ्यात प्रवेश करीत ती निघाली होती. जणू ती त्या विशाल सह्याद्रीच्या पाठीवरून गरुडाप्रमाणे भरारीच घेत होती. दोन्ही बाजूला अक्राळ विक्राळ दरे दिसत होते. चित्राची दृष्टी तरळत होती. हिरवीगार झाडी, मोठमोठे वृक्ष, मागे जात आणि दृष्टिआड होत होते. जिकडून तिकडून पाण्याचे शुभ्र प्रवाह उंचच्या उंच कड्यांवरून मंद गतीने खाली झेपा घेत होते. जणू शुभ्र रेशमी तुरे त्या पर्वतराजाच्या मस्तकावर लोळत आहेत असा भास होत होता. त्याच्या मस्तकावरून ती गाडी दौड घेत होती. तिने विजेप्रमाणे घाटातून घसरून कल्याण मागे टाकले आणि दोन प्रहरी ती मुंबईच्या प्रसिद्ध बोरीबंदर स्टेशनमध्ये शिरली.

स्टेशनवर झकपक माणसे, अलोट गर्दी पाहून चित्रा चकित झाली. ती बावरलेल्या हरणीसारखी टवकारून पाहू लागली. तिच्या दृष्टीला ते सर्व नवखेच दिसत होते. सर्वत्र आनंद दिसू लागला. लोकांची शुभ्र वस्त्रे, ऐटबाज चेहरे. कोणी पान खात आहे, तर कोणी सिगरेट फुंकीत आहे, कोणी काळाकरंद चुरूट तोंडात गच्च आवळून धरला आहे, तर कोणी नाकावर चष्मा ठेवून चालले आहेत. सर्वत्र जणू यंत्राप्राणे हालचाल सुरू होती. कृष्णा कुर्ऱ्यात निघाला होता. आणि चित्रा चौफेर पाहत चालत होती. आपण भलतीकडेच चुकून जाऊ या भीतीमुळे ती कृष्णाची पाठच सोडीत नव्हती. समोरच इंग्रजी सिनेमांचे पोस्टर पाहून ती खाली रस्त्यावर आली. मोटारींची तर मुंगीच्या रिवणासारखी माळच लागली होती. मध्येच बसचे दुमजली धूड दिसत होते. तर ट्रामचे घरघर करणारे डबे पळत होते. टांग्यांची दौड सुरू होती. चित्रा मुंबई पाहत होती. मोकाट येणारे माणूस चुकवीत ती मामाच्या पाठीमागून चालत होती. आता मात्र क्षणभर ती सर्व काही विसरून मुंबई पाहत होती. अधून मधून एखादा भिकारी चोरून चुकून बसलेला दिसत होता. तर बटने, फण्या, टाचण्या यांनी भरलेली डबडी घेऊन पोरं फिरत होती. समोरचा म्युनिसिपल हॉल दिसत होता. परंतु चित्राला ते कसे कळणार? हे सर्व दिसते आहे ते काय आहे हे तिला कळणे शक्यच नव्हते. तिला मनातून फार फार वाटू लागले की हे जे दिसते आहे याची नावे आणि हे कोणाचे वगैरे सर्व आपणाला कळावे, त्याची माहिती मिळावी. परंतु तसे कसे शक्य होते?

"चित्रा! आपुन टांग्यानं जाऊ या." कृष्णाने म्हटले. आणि एका टांग्याला खूण

केली. टांगा येताच तो आत बसला. चित्राही बसली.

"किदर जाना?" टांगेवाला म्हणाला.

"काळा घोडा का पास." कृष्णा म्हणाला.

आणि घोड्याच्या पाठीवर चाबकाचा फटकारा उडाला. टप् टप् टप् टप् टांगा गडगडू लागला.

"कशी हाय म्हमई?" कृष्णाने चित्राला आनंदून विचारले.

"पण मामा हे गा काय?" चित्राने समोरच्या कॅपिटॉल सिनेमावर आपले सुंदर बोट रोखून विचारले.

"ते काय हाय कुनाला ठावं?" कृष्णा हिरमुसल्याप्रमाणे होऊन डोके खाजवीत म्हणाला.

"आणि हे काय?" चित्राने त्या चौकात असलेल्या मुत्रीकडे हात केला. एक चष्मेवाला इसम बाहेर आला.

"हे ऑफीस हाय." त्याने ठोकून दिले आणि वेळ मारून नेली.

टांगा चालला होता. चौफेर मोटारींची चिरचीर चालू होती. चित्रा इकडे तिकडे पाहत बसली होती. कृष्णा पान खाऊन पिचकाऱ्या मारीत होता.

मुंबई राज्यातील जनतेला न्यायनिवाडा करणाऱ्या हायकोर्टापासून तो टांगा पुढे गेला.

"आणि हे काय मामा?" चित्राने विचारले.

"ह्योच बघ त्यो काळा घोडा." कृष्णा उत्तरला. आपल्या पाठीवर बसलेल्या इंग्रजी साम्राज्यशाहीच्या वारसाऐवजी स्वतःच्या नावानेच प्रसिद्धी पावलेला; परंतु भारतात दोनशे वर्षे दुष्ट अंमल गाजवणाऱ्याला पाठीवर घेऊन तो तीनच पायांवर उभा होता, त्याला चित्राने डोळेभर पाहून घेतले.

टांगा मुरगळून एका भव्य इमारतीपुढे थांबला: कृष्णा उतरला. चित्राही उतरून त्याच्या पाठी चालू लागली. दोनतीन मजले वर गेल्यावर त्याने एक बटन दाबले. चित्रा उगीच पाहत होती. तोच दार उघडले गेले, आणि.....

"माझी चित्रा!"

"अक्का!"

सोनानं चित्राला मिठी मारली. ती बहिणीबहिणींची मिठी किती तरी वेळ तशीच होती. दोघींच्या डोळ्यांतून आनंदाचे नि दुःखाचे अश्रू वाहत होते. चित्राला आवंढा आला होता. तो तिने दाबून धरण्यासाठी आपला ओठ दातात आवळून धरला होता. ती दोन हृदये परस्पराला बिलगून धडपडत होती. त्यांचे ठोके मात्र वेगवेगळ्या गतीने पडत होते. ती दोन्हीही आसू ढाळीत होती. परंतु दोन मुखे दोन दिशेला होती. चित्राचे घराकडे होते तर सोनाचे बाहेर होते. त्याच स्थितीत चित्राने डोळे पुसले आणि दृष्टी साफ केली व

घरात नजर फेकली.

तिच्याकडे दोन डोळे रोखले होते. ते एखाध्या बुभुक्षित लांडग्यांच्या दृष्टीसारखे चित्रावर तीव्र रोखले होते. त्यात लालचीपणा, क्रूरता, निर्दयता सर्व काही चिक्कार भरले होते. त्या नजरेला नजर भिडताच चित्राच्या हृदयात धस्स झाले. उरावर वीज पडल्यासारखे तिला वाटले. त्या दोन डोळ्यांची तिला भीती वाटली. तिची मिठी सैल झाली. ती सोनाला सोडून बाजूला झाली. कृष्णा खिन्न होऊन उभा होता. आणि एक हिरव्या पट्ट्यांची लुंगी नेसलेला इसम चित्राकडे पाहत होता. त्याने नुसते एक गंजीफराक घातले होते. त्याच्या डोकीचे केस लाल रंगाचे होते. आणि ते खिळ्यासारखे ताठ खडे होते. त्याचे नाक फेपटे होते. त्याचा चेहरा रुंद होता. आणि त्याचे डोळे मोठे होते. त्यात लालचीपणा भरला होता. त्याची मान जाड होती व त्याच्या पोटाचा नगारा झाला होता. त्यामुळे त्याने घातलेले ते गंजीफ्राक त्याच्या पोटावर तरंगत होते. त्याने आपली विषारी दृष्टी चित्रावर लावून तो तिचे सर्व शरीर न्याहाळीत होता. क्षणात तिचे रसरशीत गाल, तर क्षणात तिचे भरदार ऊर, लगेच तिचे पाणीदार सुंदर डोळे आणि लगेच तिचे राघूसारखे नाक आणि हळूच तिचे पाय, पोटऱ्या, मांड्या, की लगेच तिची कंबर! जणू काय त्याला तिच्या ओतीव बांध्याचे वेडच लागले होते.

आणि सोनाला आनंद झाला होता. तिने चित्राला घरात आणली. तिचे दोन्ही हात आपल्या हातात घेऊन आनंदित होऊन विचारले, ''चित्रू! आई कशी आहे?''

''आई बरी आहे.'' चित्राने हसत उत्तर दिले.

''मामा! सर्व माणसं कशी आहेत?'' सोनाने आपल्या टपोऱ्या डोळ्यांची उघडझाप करीत प्रश्न केला.

''झकास हायती समदी.'' कृष्णा उत्तरला.

''बरं चित्रू! तू आधी आंघोळ कर. ए राहीबाई! तू पाणी ठेव चुलीवर.''

सोना झटपट बोलू लागली. तिला अतिशय आनंद झाला होता. चित्राला कुठे ठेवू नि कुठे नको असे तिला झाले होते.

''आणि आमच्या पोटाचं बी बघा.'' कृष्णाने सूचना केली.

''हो हो. होईल ना. लालिया! तुम्ही का वेड्यासारखे बघीत उभे आहात? जा.'' सोनाने त्या लाल केसांच्या माणसाला जाण्यासाठी सांगितले. तो एकदम शुद्धीवर आल्याप्रमाणे हळूहळू निघून दुसऱ्या खोलीत गेला.

चित्रा चौफेर निरखून पाहू लागली. चकचकीत उच्च प्रतीचे फर्निचर रेखीव तऱ्हेने मांडले होते. प्रत्येक दारावर लाल, हिरवे, पिवळे, निळे असे रेशमी पडदे झोके घेत होते. त्यांच्या आतल्या बाजूवर रंगीबेरंगी मण्यांच्या माळा खुळखुळत लोंबत होत्या. प्रत्येक खोलीत एक पलंग सजवून तयार होता. जागोजाग ऐने, त्यांच्या शेजारी

निरनिराळी सुगंधी तेले, फण्या, वगैरे साहित्य जय्यत होते. ते सर्व ऐश्वर्य पाहून चित्रा क्षणभर सर्व काही विसरून दंग झाली. पण इथे हा लाल माणून कोण असावा? तिला त्या माणसाची आठवण झाली.

"चित्रू! तू आंघोळ करून घे आधी." सोना म्हणाली.

आंघोळीची तयारी झाली होती. चित्रा आंघोळीला गेली. सर्व काही यंत्राप्रमाणे होत होते. जेवणाची तयारी झाली. चित्रा आंघोळ करून येते तोच सुगंधी तेल, नवीन रेशमी पातळ तयार होते. जेवणे होतात न होतात तोच पातळांचे दिंड घेऊन दुकानदार हजर झाला. मग उलथापालथ करून दोन पातळे पसंत झाली. आणि जेव्हा शुभ्र जरीचे पातळ नेसून चित्रा उभी राहिली तेव्हा सोनाने स्वत:चे डोळेच झाकले. जणू एकोणीस वर्षे केरात पडलेली ही हिरकणी आज ढाळ मारीत होती. चित्रा एवढी सुंदर आहे हे सोनाला आजच दिसत होते. तो दिवस मोठा आनंदाचा दिवस होता. चित्रालाही आयुष्यात आजच थोडासा आनंद झाला होता.

सर्वांची जेवणे झाली. आणि पुष्कळ उशीर ती सर्व जणे इकडच्या तिकडच्या गप्पा मारीत बसली. नंतर कृष्णालाच नीज आल्यामुळे तो लालियाच्या खोलीत गेला. आणि भुईवर आडवा झाला. परंतु चित्रा आणि सोना खूप खूप बोलत बसल्या. चित्राने आपली घराकडची सर्व हकीकत सांगितली. मामाने कसा दरारा बसवला, बाप्याने दगडे कशी मारली, शेवटी आपण इकडे कसे आलो, आता आईचे काय होत असेल, ते सर्व चित्राने सांगितले. ती आईची आठवण होताच त्या दोघी पुष्कळ रडल्या आणि लवकरच तिला मुंबईला बोलवण्याचे ठरले. आणि मग सोनानं चित्राला जवळ घेतले. "चित्रू! तुला खरं सांगू?" सोना म्हणाली.

"काय, सांग की."

"तुला माझी नजर लागेल."

"हे काय?" चित्रा लाजली.

"नाही, खरंच, तू मुंबईत जपून वाग." सोना उद्‍गारली. परंतु लगेच ती चपापली. तिचा चेहरा फिक्का पडला.

"पण अक्का! हा मोठा माणूस कोण ग?" चित्राने विचारले. तिला जणू त्या माणसाची भयंकर धास्तीच पडली होती.

"हो, हो. तो माणूस फार दुष्ट आहे. तू तो असला म्हणजे एकटी घरात राहू नको." सोनाने तिला इशारा दिला.

जन्मभराची सर्व सुखदु:खे बोलत बोलत त्या दोघी पडल्या होत्या. रात्रीच्या जाग्रणाने चित्राला नीज लागली. परंतु सोना मात्र जागीच होती. तिला फार फार आनंद झाला होता. आपण ज्या दुष्ट चक्रातून फिरत फिरत येथे आलो त्या चक्रातून आपली चित्रा आली

नाही. ती सरळ इथे आली. नाही तर जे आपले झाले ते या कोवळ्या पोरीचे झाले असते. आपण इथे येईपर्यंत आपणाला काहीच कळले नाही. मामा पैसे घेऊन गेला. त्याच्या पदरात पैसे पडले, पण आपल्या पदरात हा राक्षसी लालिया पडला. आपणाला हे सुंदर घर देऊन त्या मालकाने लालियासह आपणाला इथे आणले, त्या भयंकर रात्री लालियाने आपल्या देहाची कुतरफाड केली, त्याला हवी तशी घडी केली, आपली लुटालूट केली. आणि त्याला आपण आपला नवरा समजून तसे करू दिले. पण दुसऱ्या दिवसापासून आपली सर्वच जण लूट करू लागले. आपल्या शीलाची लूट सुरू झाली. आणि तसाच प्रसंग आपल्या चित्रावर आला असता. तो टळला.

तिचे कान तिच्या अश्रूंनी भरले होते. ती रडत होती.

आपली आणि जनरलची गाठ पडली म्हणून तरी हा लालिया आपल्या मागचा टळला. त्या दिवशी जनरलने त्याला पिस्तूल दावले, तेव्हापासून हा वाघ मांजर होऊन वागतो आहे. नाही तर आज त्याने चित्रावर सुद्धा झडप घातली असती. मग आपण काय केले असते?

तिने निःश्वास टाकला आणि एका बगलेवर होऊन चित्राच्या अंगावर हात टाकून ती झोपेची वाट पाहू लागली.

आणि शेजारच्या खोलीत तो भयंकर माणूस — लालिया — अंधारात बसून विचार करीत होता. त्याच्या तोंडातील सिगारेट जळून ओठाला भिडली होती. पण त्याला शुद्धच नव्हती. त्याच्या दुष्ट डोळ्यांपुढे जरीचे शुभ्र पातळ नेसून चित्रा उभी होती. आणि तो तिच्याकडे जणू पाहत होता. त्याला सकाळपासून चैन पडत नव्हती. सारखी हुरहूर लागली होती. आपण या देखण्या तरुण पोरीला केव्हा एकदा पकडतो आणि तिची ऐट, तिचा रुबाब, खतम करतो, याचा तो विचार करीत होता. आता ज्यादा वेळ न लागता ती लवकर आपणाला मिळावी, मग केव्हा तरी नक्कीच मिळणार, पण प्रथम मला मिळावी, आपण तिची बहार लुटावी, आपणच आधी तिला आवळून कवटाळून तिचे हालहाल करावे, आणि हे असेच झाले पाहिजे. वेळ नाही. उद्या. परवा. बस्. जास्त दिवस आपण तिच्या तोंडाकडे पाहत बसणे म्हणजे काय? हा आपला अपमान आहे. तो विचारांची मनोरीच्या मनोरी खडी करू लागला. कृष्णा खुशाल घोरत पडला होता आणि लालिया जागत बसला होता. चित्राचे सौंदर्य त्याच्या डोळ्यात सलत होते. म्हणूनच तो जागत होता. जणू चित्रावर येणारे क्रूर संकटच जागत होते.

लालियाने एकदा सोनाविरुद्ध आपल्या मालकाला कळविले की सोना माझ्याशी नीट वागत नसून ती जनरलबरोबर रोज फिरत असते. तेव्हा त्याला उत्तर मिळाले : ''तू मूर्ख आहेस. तिला तुझ्या स्वाधीन केली आहे याचा अर्थ तू आमच्या वतीने तिथे राहून येणारा पैसा इकडे पाठव. तुझे तिच्याशी आम्ही लग्न करून दिले नाही. शिवाय ते जनरल साहेब

म्हणजे आमचे मोठे गिऱ्हाईक आहे. ते पैसे देते, आणि माल घेते. तू लुडबुड करू नये. फक्त दुकानदाराप्रमाणे मालाची विक्री करणे. यापुढे तू आम्हाकडे तक्रार करू नये.''

या तंबीमुळे लालिया फारंच चिडून गेला. तो सोनावर सूड घेण्यासाठी टपून होता. पण ती जनरल त्याला आडवा येऊन नुसती धोंड होऊन बसला होता.

लालिया पाय पसरून बसला होता. त्याला आजच नाही तर कित्येक दिवस झोप येत नव्हती. आज त्याला सोनाचा फार संताप आला. मी इथे असून ही दूर निजली आहे. शिवाय आपली बहीणही जवळ घेऊन निजली आहे. मूर्ख आहे साली. दयाच नाही. त्या दिवशी कशी गोगलगाय होती. त्या दिवशी आपण हिला माणूस वाटत होतो. पण तो जनरल इथे आल्यापासून ही मला माणूस समजत नाही. जर आपण हिला काही करावे तर मालक म्हणतो, 'तू दुकानदारासारखा वाग' आणि हरामखोर जनरल म्हणतो, 'गोळ्या घालीन, ठार मारीन.' आणि म्हणे, 'तुझे पाय बांधून तुला डेकवर नेईन आणि बुडवून मारीन!' जसा काय मी एकादा दानवच आहे. — समोरच्या भिंतीवर घड्याळ गुरगुरून टणाणले — त्याने बत्ती लावली. पाच वाजले होते. अरे बापरे! पाच! तो पुटपुटला. आपण आखी रात जागतो आहोत आणि सर्व मूर्ख खुशाल निजले आहेत! तो पुन्हा अंथरुणावर पडला! आपण भडकून चालणार नाही. दमानेच घेतले पाहिजे. या नव्या पोरीला आपलीशी करायला हवी. म्हणजे मात्र सोनाचा इंगा जिरेल. आणि जर ती तिची बहीण सुखासुखी नाही बधली तर मग आपण काय करणार? मग मात्र आपणाला काही तरी नक्कीच केले पाहिजे. आपण संधी साधून तिला पकडणार. जे हवे ते करणार. मग काय वाटेल ते होवो. मग आपण डरणार नाही.

## ४

नियमाप्रमाणे सूर्य उगवून वर आला होता. तो मुंबईवर आपली सोनेरी किरणे उधळीत होता. फोर्टमध्ये असलेली उंच गोपुरे सुशोभित दिसत होती. ती तळपत होती. सर्वत्र वातावरण आनंदी वाटत होते. मुंबईचे वरिष्ठ व्यवहार सुरू झाले होते. सर्वत्र सभ्य लोक दिसत होते. सुंदर फ्रेमचे चष्मे, उंची चिरूट, साहेबी टोप्या, सर्वत्र दिसत होत्या. मोटारींची रीघ लागली होती. कानात वारे शिरल्यासारखे सर्वच धावत होते. सर्व काही यंत्राप्रमाणे फिरत होते. दिवस शांततेचे होते. नुकतीच १ मे १९४५ रोजी विजयी रशियन सेना बर्लिनमध्ये शिरल्यामुळे व तिने हिटलरचा चक्काचूर केल्यामुळे अँग्लो-फ्रेंच साम्राज्यवाद्यांच्या पाठी लागलेला भस्मासुर नष्ट झाला होता. सर्व जगाने सुटकेचा निःश्वास टाकला होता. सर्वांना आनंद झाला होता. जाड बूट घातलेले व खाकी पोशाख केलेले

रिक्रूट, नेव्हीचे शिपाई, झुंडीच्या झुंडींनी फिरू लागले होते. जाड ओठांचे नीग्रो सैनिक आपले आकुंचित डोळे फिरवीत हॉटेलात शिरत होते. लालभडक युरोपियन अधिकारी आपली फटफटी तकाटीत होता. त्याच्या शेजारी डुबुळक्या बसलेल्या मडमेच्या झिपऱ्या वाऱ्यावर भुरभुरत होत्या. सर्व काही आनंदी दिसत होते.

सोनाच्या घरीही गडबड चालू झाली होती. सोनाने स्नान केल्यानंतर चित्रा आंघोळीला गेली होती. कृष्णा चहा पीत बसला होता. लालिया ओठात सिगारेट धरून धूर गिळत बसला होता. घरातील नोकर कामाला लागले होते. सोना आपले केस पुसत होती आणि आज आपल्या चित्रासाठी काय काय खरेदी करायचे याचा विचार करीत होती. दुसरी तिला कशाचीच चिंता नव्हती. ऐश्वर्य तिच्या चरणी लोटांगण घेत होते.

युद्ध संपून गेले होते. देशी परदेशी सैनिक व सेनाधिकारी भारतीय किनाऱ्याला म्हणजे मुंबईत आले होते. आणि इंग्रजांनी हिंदी मालाची लूट करण्यासाठी मुद्दाम केलेल्या चलनवाढीमुळे सर्वत्र कमी किंमतीच्या नोटा भटकत होत्या. त्यामुळे जिकडे तिकडे पैसा दिसत होता. सर्व वस्तूंच्या किंमती वाढल्या होत्या. पण सोनाच्या धंद्यावर त्याचा परिणाम मुळीच झालेला नव्हता. उलट तिच्या धंद्याला फारच भरभराट आली होती. ती योजील ते क्षणात होत होते. ती इच्छील तेवढे पैसे तिला मिळत होते. कारण बडे लष्करी अधिकारी, नेव्हीचे कर्नल, पोलीस सी.आय.डी., नामवंत धनिक, अशी तिची गिऱ्हाइके होती. ते तिच्यावर रुपयांचा पाऊस पाडीत होते. शिवाय जनरल नायरसाहेब तिच्या पाठी सदैव तयार होते. ते वाटेल त्या वादळातून तिची नाव यशस्वी हाकारायला तयार होते. त्यामुळे ती कोणालाही भीत नव्हती. तिला कशाचीच पर्वा नव्हती. आपल्या चित्राने जन्मभर दु:ख काढले असून अब्रूचे रक्षण केले आहे. तिचे चांगले व्हावे यासाठी आपण वाटेल ते करू. तिला सुखी करण्यासाठी वाटेल ते करू, या विचारात सोना दंग होती.

खाली भुईवर बसून कृष्णा चहा घोटीत होता. बशीतील चहा जिभेनं ओढून घेण्याची त्याला घाई झाली होती. तो मनात काही तरी योजीत होता. आपण एकदा मूर्खपणा केला तसा पुन्हा होऊ नये. हे मुंबईचे लोक आम्हां गरीबांना फसवतात. आणि मीही येडगळ फसलो. त्या सटवीला आपली मेहुणी म्हणून सांगितले, सोनाला नवरा बघ! तिने हो म्हणून आपणाला एकीकडे नेले. त्याने दुसऱ्याकडे. त्यानंही तिसऱ्याकडे. असे आपणाला पाच जागी नेले नि त्याने एक हजार कबूल करून आपण सोनाला आणून दिली. आणि त्या भडव्यांनी चौघांनी आपापली वाटणी घेऊन आपल्या हातात चारशेच दिले. त्यांनी मला फसवले. आता काय, आता आपण त्या मधल्या चार वळणांना चुकवून सरळ आलो आहोत. पण आता सोनाबाई आपल्या हातावर किती रुपये देणार कोण जाणे! जे काय मिळणार असतील ते लवकर मिळून आपण इथून लवकर जावे, असेच त्याला वाटत होते.

आणि समोरच्या खोलीत लालिया रखरखीत दृष्टीने सोनाकडे पाहत बसला होता.

चित्रा आंघोळ करून आली. नंतर सोना आणि चित्रा चहा पीत बसल्या. जवळच कृष्णा बसून ऐटीत सिगरेट ओढू लागला होता. तो सोनाला काही तरी सांगणार तोच दाराची घंटी घणघणली आणि जनरल साहेब आले. आणि कृष्णाचे विचार परत त्याच्या पोटात पळाले. आणि तो मोकाट धूर सोडीत पाहू लागला.

''हॅलो सोना!'' जनरलने कुऱ्यांत उभे राहून म्हटले.

''बरं आहे साहेब.'' सोनाने गोड स्मित करीत त्याचे स्वागत केले. चित्रा उठून उभी होती. ती पलंगाला टेकून त्याच्याकडे बारीक नजरेने पाहत होती.

''आणि ही मंडळी कोण?'' जनरलने विचारले. स्वारी खुशीत होती. त्याने कृष्णाचा रुमाल-कोट न्याहाळून घेतला.

''ही माझी चित्रा. बहीण आहे. आणि हे माझे मामा.'' सोनाने त्यांची ओळख करून दिली. जनरलने आपली खुजी मान नमवून नंदीबैलासारखे केले. आणि हातातील सिगारेटचा डबा, काड्याची पेटी, चष्मा, आपली चामड्याची पिशवी, वगैरे सामान ठेवून तो एका खुर्चीवर विराजमान झाला. त्याने चित्राच्या पाठीवरून पार मांड्यापर्यंत लोंबणाऱ्या केसांकडे पाहून आपल्या भुंड्या चकचकीत डोक्यावर हात फिरवला. त्या बरोबर सोना मोठ्याने हसली. आणि जनरल चमकला.

''का? का? हसता का? सोना?'' त्याने विचारले.

''नाही म्हटलं. तुम्ही चित्राचे केस पाहून आपले केस चाचपून पहाता.''

''मग त्यात हसायला काय झालं? जेव्हा मी शाळेत होतो तेव्हा माझी हातभर शेंडी होती.'' जनरलने खुलासा केला.

''तेव्हाची शेंडी आता पहाता?'' सोना म्हणाली.

''तसं नाही. पण मला लांब केस फार आवडतात. हो. मी सर्व जग फिरलो. मी सारा सागर पालथा घातला. पण आमच्या मद्रासमध्ये जसे स्त्रियांना केस असतात तसे मुळीच पाहिले नाहीत. ज्या ज्या देशात आमचे जहाज गेले, त्या देशात पुष्कळ पोरी माझ्या मागं लागल्या. पण त्या मला मुळीच पसंत नव्हत्या. का? तर त्यांना केस नव्हते. जर त्यांना मी इकडे आणलं असतं तर एक जहाज भरलं असतं. हो, एक पलटण झाली असती.'' असे म्हणून हा ऽ हा ऽ हा ऽ करून मोठ्याने हसू लागले.

''कसं काय, मग बरं आहे ना आता?'' सोना हसत म्हणाली.

''खरं सांगू का? तसं म्हणाल तर मुळीच बरं नाही. मी म्हणतो, ती लढाई सुरू असती तर बरं झालं असतं.'' जनरल गंभीर चेहरा करून म्हणाला.

''का बरं साहेब?'' कृष्णा आश्चर्याने म्हणाला.

''का म्हणजे काय? ते आमचं काम आहे.'' जनरल उत्तरला.

"कसलं? माणसं मारायचं?" कृष्णाने विचारले.

"हो. आमचं काम माणसं मारायचं नि माणसांचं काम मरायचं. त्यासाठी आम्हाला पगार मिळतो." जनरल पटवून देण्याच्या तळमळीने म्हणाला.

"पण साहेब, माणसांनी तरी का बरं मरावं नि तुम्ही त्यास्नी का बरं मारावं?" कृष्णा दडपून बोलला.

"का मारावं? मामा, आम्ही सरकारी हुकूम पाळतो; म्हणजे हुकूम देतो. ते तुम्हाला नाही समजणार." जनरलने मामाला मामाचे नाते लावले. स्वारी आज आनंदून बोलत होती.

"म्हणून तर तुम्हा लष्करी लोकांची मौज आहे." सोनाने पुन्हा त्याला मूळ मुद्यावर आणला.

"कशाची मौज! सारेच आता रडत आहेत. आमचे नेव्ही आताच कुरकुरू लागले आहे."

"का हो? काय झालं?"

"दुसरं काय? पगार, अन्न कपडे, यासाठी." जनरल म्हणाला.

"मग भानगड हाय तर." कृष्णा उद्गारला.

"चालायचंच. लष्करी डिपार्टमेंट आहे." जनरल म्हणाला.

"लढाई संपली त्यामुळंच हा प्रकार झाला आहे. फ्रान्स, इंग्लंड, ट्युनिशिया सर्वत्र आम्ही फिरलो. पण कोणीही कधी कुरकूर केली नाही. आणि आता इथं परत किनाऱ्यावर येताच जो तो काही ना काही कुरापत काढून आपल्यावरच्या वरिष्ठाला धमकावतो. तो त्याच्या वरच्याला डाफरतो; तर तो त्याच्याही वरच्या अधिकाऱ्यावर गुरगुरतो." जनरल मन सोडून बोलला.

"आणि मग तो वरचा अधिकारी काय करतो?" सोनाने प्रश्न केला.

"तो ना?" जनरल म्हणाला. "तो खालच्या अधिकाऱ्याला एक लाथ देतो. मग तो खालचा आपल्या खालच्या कर्नलला दोन लाथा देतो. मग कर्नल त्यात एक पदरची घालून मेजरला तीन लाथा देतो, मग मेजर त्या तिनीत आपली एक घालून खाली चार लाथा देतो. आणि मग खालचे सर्वच लोक लाथा झाडू लागतात." असे म्हणून जनरल हसू लागला. त्याने सिगारेट काढून एक कृष्णाला दिली. आणि एक स्वत: शिलगावली. हे गृहस्थ जसे हुद्याने मोठे होते तसेच ते अंगापिंडानेही मोठे होते. आणि त्यांचं काळीजही दांडगे होते. परंतु नेहमी विनोदी बोलणे त्यांना आवडत होते.

"ही मंडळी आली आहे यांना मुंबई दाखवायची आहे." सोनाने हळूच विषय काढला.

"हो. दाखवा ना! काय हरकत आहे?" असे म्हणून त्या जनरलने आपली

चामड्याची पिशवी सोडली आणि करकरीत नोटांचे पुडके सोनाला दिले. तो अधून मधून चित्राकडे चोरट्या नजरेने पाहत होता. चित्रा स्तब्ध उभी होती. ती त्याच्या बाता शांतपणे ऐकून घेत होती.

"अरे हो! तो लालिया कुठं आहे?" जनरलला एकदम आठवण होऊन तो म्हणाला. आणि आतल्या खोलीत किती तरी वेळचा कान पाडून ऐकत बसलेला लालिया पोटाचा नगारा पुढे करून आला.

"काय लालिया! ठीक?" जनरल गुरकला.

"होय, ठीक." लालियाने हत्तीप्रमाणे मान ओवाळली.

"अरे हे पाहा, ही सोना, तू तुझी आई समज व ही चित्रा तुझी मावशी. काय समजलं? नाही तर पिस्तुलातील सर्व गोळ्या तुझ्या पोटात जातील. जा." जनरल फुसफुसत म्हणाला. मघापासून शांत विनोदी बोलणारा माणूस एकदम भडकला. त्याच्या भुवया खालवर होऊ लागल्या. आणि त्याचे कान थरथरू लागले. त्याची मुद्रा उग्र झाली.

लालिया काहीच न बोलता आपल्याच मानेवर आपले हात ठेवून मंद गतीने पुन: आत गेला.

नंतर, पाहुण्यांना मुंबई दाखवा, चित्राला कपडे करा, ती किती दिवस रहाणार, आपण दोन दिवस येणार नाही, वगैरे विचारपूस करून जनरलसाहेब निघून गेले. नंतर त्या सर्वांची जेवणे झाली. आणि संध्याकाळी चित्राला मुंबई दाखवायचे ठरले व थोडा वेळ सर्वच जण विश्रांती घेत पडले.

"चित्रा! तुला एक गोष्ट सांगू?" सोनाने पडल्यापडल्या म्हटले. त्या दोघीच एका खोलीत पडल्या होत्या.

"हो. सांग की."

"माझं जे काय आहे हे बरं नाही."

"का? कसं?" चित्राने आश्चर्याने विचारलं.

"मला मामानं इथं विकलं आहे."

"कसं? लग्न की केलं तुझं." चित्रा म्हणाली.

"नाही. मामा फसला. नि मीही फसल्ये."

"कशी?"

"मी फार वाईट करीत आहे." सोना रडू लागली.

"मग आता?"

"आता? आता काहीच करता येत नाही. पण तूही बरं केलं नाहीस." सोना म्हणाली.

"मी? मी काय केलं?" चित्राने विचारले.

"तू तिकडं नीट वागली नाहीस."

"काय केलं?"

"तू कोणाच्या तरी नादाला लागलीस."

"कोण म्हणतं?"

"मामानं सांगितलं मला."

"खोटं आहे हे. विचार त्याला." चित्रा आता मात्र थोडी चिडली. तिला मामाचा राग आला. त्याने अक्काला विकली, आणि मलाही त्याच कामासाठी इथं आणली आहे, असे तिला वाटू लागले.

"मग तुला इकडे का आणली त्यानं?" सोना म्हणाली.

"तेही तू त्यालाच विचार." चित्रा रागाने म्हणाली. सोना गप्प झाली. आपल्याला इथं देऊन पैसे घेऊन गेला आणि आता चित्रालाही हा घेऊन आला आहे. आपली आई एकटी पडली. आता तिचे काय होत असेल? हे सारे मामाने का केले? सोनाला त्याचा फार राग आला. तिला वाटले, त्याच्या मुसकडीत देऊन त्याला हाकलून लावावा. परंतु, तिला तसे करता येत नव्हते. आपण त्याला दुखवून घालवला तर तो आईला छळील. आईचे हाल होतील. आपली आई इथे येईपर्यंत, चित्राला एकादी जागा मिळेपर्यंत आपण त्याला दुखवू नये हेच बरे. सोना विचार करीत पडली, तिने पुष्कळ पुष्कळ विचार केला.

चित्राला मामाने केलेली बदनामी ऐकून व सोनाला विकलेली बातमी ऐकून फारच वाईट वाटले. जो तो आपले काळीजच कापणार आहे. आपण गरीब आहोत म्हणून आपला कोणीही धनी नाही. आपली आई म्हातारी आहे म्हणून हे सर्व चालले आहे. हे किती दिवस चालणार? जर आता आपणालाही विकले तर मग आपले काय होणार? आपले लग्न करतो म्हणून मामाने आपणाला इकडे आणले. आपली आई वनवाशी केली. आणि इथे सर्वच काही निराळे आहे. हा लालिया भयंकर माणूस कसासाच पाहत आहे. तो जनरल का कोण तोही जिभळ्या चाटीत आहे. आणखी असे किती येतील कोण जाणे. मग आईने सांगितलेले त्याचे काय? ती तर म्हणत होती जिवाच्या मोलानं अब्रू जप. इथं तर आपण वाघाच्या दाढेखाली आहोत. मग अब्रू कशी जपावी? चित्राचे हृदय धडपडत होते. ती विचार करीत होती. तिला मामाची चीड आली होती.

पाच वाजले. आणि सोना उठली. आणि फिरायला जाण्यासाठी तयार झाली. चित्राला नवीन कपडे करून स्वत: टापटीपशीर पोशाख करून ती कृष्णाला म्हणाली : "मामा! मी चित्राला मुंबई दाखवून आणत्ये. तुम्ही नि लालिया घरी राहा किंवा सिनेमाला जा."

"आम्ही करतो काय तरी खरं, पण मला घरला चालवायचं करा." कृष्णा म्हणाला. त्याला आपणाला किती पैसे मिळणार याची हुरहूर लागली होती. आणि त्या लालियाचा भेसूर चेहरा त्याच्या कपाळात बसला होता. आज दोन दिवस रोज उठून तो त्याच्याशीच बोलत बसत होता.

"दोन दिवसात तुम्हाला पाठविते." सोना म्हणाली.

"बरं हो. पाठवाच मला." कृष्णा केविलवाणा चेहरा करून म्हणाला.

सोना व चित्रा बाहेर गेल्या. लालियाने घड्याळाकडे रागाने पाहिले. जणू त्याला वाटत होते - ह्याने लवकर आपले काम करावे. त्याची मंद गती त्याला नकोशी झाली होती. त्याला दिवसाचा प्रकाश नकोसा झाला होता. त्याला रात्र हवी होती. तो अंधाराची वाट पाहत होता. चित्रा त्याला गोड दिसायच्या ऐवजी ती त्याला जालीम विषाप्रमाणे भासत होती. म्हणून तो आज बेचैन झाला होता. त्यात त्याला त्या जनरलने सकाळी चित्रासमक्ष टाकून बोलून त्याचा अपमान केला होता. म्हणून काही का होईना, आज आपण आपले काम करायचेच असे त्याने मनाशी निश्चित केले होते. म्हणून तो वारंवार घड्याळाकडे पाहत होता. आज रात्री चित्राचे काय होणार याच्या विचारात तो बसला.

सोना व चित्रा मोटारीत बसून फिरत होत्या. मोटार रबरी चेंडू धावल्याप्रमाणे धावत होती. बोरीबंदरहून पुढे भेंडीबाजार, भायखळा, आणि मग दादरला मुरगुळा घेऊन ती टिळक पुलावरून माहिमला गेली. आणि पुन्हा मागे फिरून परत निघाली. मोटार धावत होती. जागोजाग थांबून सोनाला चित्रा याचे नाव काय, त्याचे नाव काय असे विचारीत होती. सोना सांगत होती. चित्रा बारीक दृष्टीने सारी दिसेल तेवढी मुंबई पाहत होती. पण येतेवेळी गाडीत दिसलेले गबाळे लोक तिला कुठेच दिसत नव्हते. त्या पानाच्या पिशव्या, ती मळकी लुगडी, पोटासाठी धावपळ, शेंबडी उघडीनागडी पोरे, गाठी बांधून साधलेली धोतरे, हे सारेच कुठे गडप झाले होते. का ते सर्व लोक इथे आल्याबरोबर असेच आपल्याप्रमाणे जरीचे कपडे घालून मोटारीत बसून मुंबईत विलीन झाले, याचा ती विचार करीत होती.

माणसांनी गजबजलेली मुंबई. विजेच्या दिव्यांची गर्दी. निरनिराळ्या पोशाखातील लोक. मोठमोठ्या इमारती, डांबरी रस्ते. हे सर्व पाहत मोटार पाथे सिनेमापुढून ऑपेरा हाऊससमोर थांबली. आणि पुन्हा चौपाटीकडे भिरभिरत निघाली. जिकडे तिकडे सहल करणाऱ्या लोकांची गर्दी झाली होती. लोक पाय ओढीत इकडून तिकडे जात होते. भेळवाल्यांनी गोंगाट केला होता. आणि त्याच गर्दीत लोकमान्य टिळकांचा उंच पुतळा खिन्न होऊन उभा होता. आणि समोर मुंबईचा पुरातन शेजारी लाटांचे डोंगर उधळीत होता. जणू त्याने तो भयंकर खेळच सुरू केला होता. सागराला भरती आली होती. वारे जोरात येत होते. चित्राने क्षणभर त्या सागराकडे पाहिले, आणि ओठांवरून जीभ फिरवली आणि ती चौफेर पाहू लागली. टिळक पुतळ्यापासून ते चर्चगेटपर्यंत समुद्राच्या कडेने बाकदार अशी दिव्यांची रांग लागली होती. जणू एखाद्या सुंदर स्त्रीच्या गळ्यात रत्नमालाच रुळत होती.

चित्राला आनंद झाला. आपण आज सारी मुंबई पाहिली. अफाट मुंबापुरीचे विशाल

वैभव पाहिले. किती सुंदर मुंबई आहे ही! आपल्या गावात आणि मुंबईत किती निराळेपणा आहे! सर्व आनंदीआनंद आहे. चित्राला आनंद झाला. नंतर सोना आणि चित्रा एका बाकावर बसल्या. बाकावर बसून त्या दोघी समोर त्या प्रचंड सागराकडे पाहत होत्या. गार वारे भरभरत होते. शुभ्र लाटा धावत येत होत्या. आणि किनाऱ्यावरच्या वाळूवर थांबून परत जात होत्या. जणू त्या किनाऱ्यावर दम घेऊन 'सुस्' असा निःश्वास टाकून निराश होऊन परत फिरत होत्या. सागरही आपली हालचाल हळूहळू करीत होता. तो लखलखत होता. जणू पुष्कळ दौड मारून तोही दमला होता. आणि समोर लोकमान्य टिळकांचा पुतळा उभा होता. त्याची काळी आकृती अचल खडी होती. जणू तो महाराष्ट्राचा वीरपुरुषही चालून चालून दमला होता. पाठीमागून मोटारींची रीघ लागली होती. त्या आपल्या दिव्यांचा प्रचंड झोत भिरकावीत कुरकुरत निघाल्या होत्या.

चित्रा स्थिर बसून विचार करीत होती. ही मुंबई किती किती सुंदर आहे. पण इथे माणसं विकतात! माणसं माणसांना विकत घेतात. जर तसेच आपले झाले तर मग — तिचे काळीज चरकले. नंतर त्या दोघी उठून घराकडे निघाल्या. घरात कृष्णा व लालिया हे दोघे आणि शेठ कांतीलाल नावाचा एक सोन्याचा व्यापारी असे तिघेजण बसून सोनाची वाट पाहत होते. कांतीलाल हा वयाने पन्नाशीच्या आत होता. तो नाकातोंडाने नावाप्रमाणेच देखणा होता आणि त्याच्या सुखवस्तू जीवनामुळे त्याचे वय पन्नास आहे असे मुळीच वाटत नव्हते. त्यात तो आज नवीन पाहुणा म्हणून आलेला नव्हता. तो फार दिवसांचा जुना पाहुणा होता. आज तो सोनाची वाट पाहत बसला होता. त्यात सोनाची बहीण आल्याचे समजताच त्याला बसणे भाग पडले होते. एकदा ती कसली आहे हे डोळ्यांनी पाहून मगच जावे या हेतूनेच तो तिष्ठत बसला होता.

पण त्या तिघांपैकी कोणीच कोणाशी बोलत नव्हते. जो तो आपापल्या मनात कसला तरी विचार करीत होता. सोनाचे आपणाला चारशेच मिळाले. आता चित्राचे आठशे तरी नक्की मिळावे या विचारात कृष्णा होता. आणि आता हा कांतीलाल चित्राला घेऊन जाणार, सोना चित्राला त्याच्या ताब्यात देणार आणि आपण जे योजून ठेवले आहे ते सारेच ढासळून पडणार, त्यासाठी काय करावे या विचारात लालिया खिन्न होऊन बसला होता.

बरोबर नऊ वाजले आणि सोना आली. त्या तिघांच्याही क्षणभर विचारमालिका तुटल्या. कांतीलालला पाहून सोनाला आनंद झाला. तिने त्याची प्रथम विचारपूस केली. आणि आम्ही जेवून घेतो, मग बोलू, असे सांगून ती जेवणासाठी गेली. जेवणे झाली तेव्हा "चित्रा! तू त्या खोलीत जाऊन नीज. मामा! तुम्ही उद्या गावी जाण्याची तयारी करा. लालिया 'तुम्ही जाऊन निजा.' असे सांगून ती कांतीलालकडे जाऊन बोलत बसली.

"हं, बोला शेट, तुम्हांला फारच त्रास झाला आज." सोना दिलगिरी व्यक्त करीत

म्हणाली.

"नाही. काय पर्वा नाही. मला समजलं की तुमची बहीण आली आहे, तेव्हा म्हटलं जावं पाहूनच. थांबलो." शेटजीने स्मित करीत म्हटले. आणि आपली खुर्ची पुढेच सरकावली.

"माझ्या बहिणीला काय पाहता शेट? ती शंभर नंबरी सोनं आहे." सोना स्वाभिमानपूर्वक चित्राची तारीफ करीत म्हणाली.

"वा वा! हे काय! असणारच की. अहो, याच सोन्याचा तो एक तुकडा असणार. मग तो काय नकली असू शकतो थोडाच!" असे म्हणून शेटजीने सोनाला मोठेपणा दिला.

आणि सोनाला आनंद वाटला. ती गोड हसत म्हणाली : "मग तुमचं काय म्हणणं आहे?"

"तुम्हीच सांगा मी काय करू ते." शेठ अगदी हळू स्वरात म्हणाला आणि कान टवकारून ऐकू लागला.

"हे पाहा शेटजी. मी तिला माझ्यासारखी वेश्या म्हणून इथं ठेवणार नाही. मी तिला एकदा कायमचा नवरा करून देणार आहे. तिच्या देखणेपणाविषयी पाहण्याची मुळीच गरज नाही. तेव्हा तुम्हाला झेपेल का?" सोनाने स्पष्ट सांगितले. शेटजी मुंडी डोलवीत ऐकत होता.

"न झेपाय काय झालं? मला पण तसंच करायचं आहे." कांतीलाल मोठ्या आनंदाने कबूल करून म्हणाला.

"मग काय देणार ते सांगा." सोनाने विचारले.

"ते मी नाही सांगणार. तुम्हीच सांगा. कितीही सांगा. हजार, दोन हजार, बोला." कांतीलालला घाईच झाली.

"परंतु थोडे थांबा. मला हे सर्व जपून करायचं आहे. प्रथम काही दिवस तिला इथंच ठेवावं लागणार आहे. आणि तुम्ही इथं येऊन तिची ओळख करून घ्यायची आणि हे सर्व तिच्या मनानंच होत आहे असं करायचं. हे तुम्हाला मान्य आहे?" सोनाने पुन्हा प्रश्न केला.

"अरं बाबा! सर्व कबूल!" कांतीलालने मनगटावरच्या घड्याळात पाहिले आणि तो म्हणाला : "आता अकरा वाजले. मी जातो. मी रोज नाही तर एकदोन दिवसात येत राहीन. आणि आता हे आठशे रुपये ठेवा तुम्हांकडे. जाऊ मी?" असे म्हणून तो उठला. सोनानेही मान हलवीत त्याला संमती दिली आणि शेठ कांतीलाल निघून गेला.

सोनाने क्षणभर चहूकडे पाहिले. सर्वत्र शांत होते. लालियाच्या खोलीतून घोरण्याचे बेसूर स्वर ऐकू येत होते. नंतर तिने चित्राच्या खोलीकडे पाहिले. तिकडेही अंधार होता. नंतर ती खोलीत जाऊन पलंगावर पडली. बरे झाले, चित्राचे बरे होईल. ती सुखी होईल.

कांतीलाल केवढा मोठा श्रीमंत माणूस आहे. शिवाय तसा तो वाईटही नाही. आज किती तरी दिवस तो माझ्याकडे येतो, पण एकदासुद्धा त्याने आपल्या अंगाला हात लावला नाही. तसा तो फारच सज्जन आहे. आणि इथे आलेल्या कोणत्याच माणसाने असे वर्तन केले नाही. पण हा माणूस काही निराळाच आहे. शिवाय पैशाची तर त्याला किंमतच वाटत नाही. माझ्यासाठी तो काय वाटेल ते करील. जर असा माणूस आता माझ्या चित्राला मिळतोय तर मग तिचे नशीबच मोठे नाही तर काय? परंतु चित्राला हे पसंत पडणार का? चित्राला हे नक्कीच पसंत पडणार आणि मग आईलाही इकडे आणून आम्ही सर्वच इथे राहू. तिचे चांगले होईल. फक्त माझेच चांगले नाही. शेवटी माझे वाटोळे झाले. हे जर आईला समजले तर तिला किती वाईट वाटेल! परंतु काय करायचे! तिने एक नि:श्वास टाकला.

दिवसभर गोंगाटाने भरलेली मुंबई शांत निजली होती. जणू सर्वच यंत्रे आपली घरघर बंद करून निजली होती. अगदी जरा देखील आवाज होत नव्हता. फक्त लालियाच्या खोलीतून भेसूर घोरणे ऐकू येत होते. आता आपणाला सोना नवरा करून देणार, मग आपण आपल्या आईला बोलावून घेणार, आणि या सुंदर मुंबईत संसार करणार, अशा गोड गोड कल्पनांची मनोरींच्या मनोरी रचीत, व जर आपलेही अक्कासारखे झाले तर मग काय, मग आईची आपली भेट होणार नाही, मग आपणही बाजारात बसून स्वत:ची विक्री करू, या भीतीने धडधडत्या अंत:करणाने विचार करीत करीत चित्राही निजली होती.

शेजारी असलेल्या गोदीतील रखवालदाराने बाराचे टोले दिले. त्यांचा आवाज एकापाठी एक येऊन सोनाच्या घरात शिरला. आणि लालिया उठून बसला. त्याने कानोसा घेतला. तिन्हीही बाजूंनी त्याला घोरण्याचे तीन स्वर ऐकू आले. तो उठून बसला. त्याला आता फारच आनंद झाला होता. आज आपण आपलेसे करून घेणार, मग पाहू पुढे काय होते ते. तोच त्याला जनरलची आठवण झाली. त्याची ती उग्र मूर्ती त्याच्या डोळ्यापुढे उभी राहिली. क्षणभर तो भ्याला. पण उद्या तो येथे येईपर्यंत पुष्कळ करता येईल. वाटेल ते करून आपण त्याचा बंदोबस्त करू. नाहीतर इथून जाऊ सुद्धा. एकदा का आपले आपणाला मिळाले की मग काय हवे ते होऊ दे. इथे कोण असे आहे की आपणाला अडवील! आपणच या सर्वांची वाट लावून टाकू शकतो. पण जे काही करावे लागणार ते नंतर करावे लागले म्हणजे मिळवली. बस्स. असा विचार करून तो उठला. प्रथम तो सरळ चित्राच्या खोलीकडे जाण्याऐवजी तो सोनाच्या खोलीकडे वळला. त्याने बाहेरून कानोसा घेतला. सोना घोरत होती. त्याला आनंद झाला. तो हळू पावलांनी परत फिरला आणि चित्राच्या खोलीपुढे गेला. आत दार कसे उघडावे असा त्याला प्रश्न पडला. त्याने धडधडत्या अंत:करणाने आपला हात पुढे करून चाचपून पाहिले. दार बंदच नव्हते. फक्त झिरझिरीत पडदा हालत होता. त्याला पुन्हा आनंद झाला. त्याचे हृदय

जास्तच वेगाने व मोठ्याने धडधडू लागले. आपली शिकार आपल्या मुठीत आहे असे त्याला वाटू लागले. तो देहभान विसरला. आज आपली इच्छा तृप्त होणार या आनंदाने तो शुद्धी हरला. त्याने हळूच हात पुढे करून पडदा दूर केला तेव्हा त्याचा राक्षसी हात थरथरा कापत असल्याचा त्याला भास झाला. त्याने दिव्याचे बटन चाचपून दाबले. सुंदर जरीच्या पातळात चित्रा निर्धास्त निजली होती. तिच्या अंगावरचा पदर दूर झाला होता. त्यामुळे तिचे विशाल वक्ष:स्थळ सुंदर दिसत होते. ते दमदार गतीने खाली वर करीत होते. तिच्या चोळीचे बटन निघाले होते. आणि तिच्या उराचा शुभ्र भाग स्पष्ट दिसत होता. त्याकडे निरखून पाहून लालियाला आनंद झाला. जणू काय आजचीच रात्र, अंधार, सर्वांना लागलेली नीज, उघडा दरवाजा आणि चित्राच्या चोळीचं हे उघडे बटन, हे सर्व आज आपल्या पाठीवर असून आज आपले आपल्याला मिळत आहे, पण ते कसे घ्यावे? त्याने आपली तीक्ष्ण दृष्टी झर्रकन खाली घेतली. तिचे पातळ चोळामोळा होऊन ते तिच्या मांड्यांच्या वर झाले होते. त्यामुळे केळीच्या लुसलुशीत कोंबांप्रमाणे त्या दिसत होत्या. त्याने ते सर्व क्षणभर पाहून घेतले आणि मग आपली दृष्टी तिच्या मुखावर रोखली. ती निजली होती. तिचे सुंदर डोळे झाकले होते. तिच्या नोकदार नाकाच्या नाकपुड्या लखलखत होत्या. तिचे ओठ थरथरत होते. एकूण तिचा कोणीही स्पर्श न केलेला देह त्या पलंगावर एकटाच पडला होता. आणि त्याच्यावर किती मोठे दारुण संकट आले आहे, ते अगदी उशाला भिडले आहे, याची त्याला गंधवार्ताही नव्हती.

लालिया गोंधळून गेला. त्याला घाई झाली. आपण असे मूर्खाप्रमाणे नुसते पाहत उभे राहणे चुकीचे आहे असे वाटून त्याचे हृदय वेगाने, अति वेगाने धडधडू लागले. जणू त्यालाही अती घाईच झाली होती. आपण आता दिवा घालवून दार बंद करावे असा विचार करून तो फिरला. तोच त्याला एकदम कसली तरी आठवण झाली. त्याने कंबर चाचपून पाहिली. त्याचा चाकू विसरला होता. तो चपळाईने दिव्याच्या बटणाकडे गेला. क्षणात सर्वत्र अंधार दाटला. आणि त्याला चित्राचा देह दिसेनासा झाला.

लालिया हळूच परत आपल्या खोलीत आला. कारण जर चित्राने प्रतिकार केला तर — तर मग चाकू हा हवाच. त्याचा एकेक क्षण युगाएवढा जात होता. त्याला दरदरून घाम फुटला होता. त्याचे पाय थरथरत होते. पुढच्या विचाराने तो धुंद झाला होता. त्याने हळूच आपला चाकू काढला. तो घट्ट मुठीत धरला. आणि पुन्हा कानोसा घेतला. सर्वच दुर्दैवी प्राणी निजले होते. त्यांना काळझोप लागली होती. जणू चित्राच्या शरीरावर खुशाल दरोडा पडावा म्हणूनच ते सर्व निजले होते. त्याने चाकू घेऊन क्षणभर विचार केला. चाकू आताच खोलून घ्यावा. नाही तर पुन्हा तिथे अडचण पडेल. तसे होणे बरे नाही. तो चाकूचे पाते चाचपू लागला.

परंतु कोणालाही पुढच्या घोर प्रसंगाची कल्पना नव्हती. कृष्णा तर जोराजोराने घोरत

होता. आता आपणाला कोणीही अडविणार नाही. आपल्या सभोवती कोणीही नाही, कोणीही जागे नाही, असेच त्याला वाटू लागले. त्याच्या कानाची गात्रे बंद झाली होती. त्यानं पाऊल टाकण्यापूर्वी चाकू उघडला. आणि 'टर्र्र्' असा मोठा आवाज झाला. आणि एकदम सोना धडपडून उठली. तिची भीतीने गाळणच उडाली. तिने एकदम दिव्याच्या बटनावर झेप घेतली आणि दिवा लावला, आणि अंगावरचा पदर ओढीतच ती बाहेर आली. तिने चित्राच्या खोलीकडे धाव घेतली. दार उघडे होते. तिला घेरीच आली. तिचे काळीज धडपडू लागले. तिचे सर्वांग थरथरू लागले. आता काय झाले असेल या कल्पनेने ती भांबावून गेली. तिने कानोसा घेतला.

ज्या दिवशी लालियाने सोनावर असाच प्रसंग आणला होता त्या दिवशी तिने त्याचा प्रतिकार करण्याची शिकस्त केली होती. परंतु त्या वेळी लालियाने शेवटी हाच आपला चाकू उघडला होता. त्याचा तो दुष्ट आवाज ऐकूनच सोना निष्प्राण झाली आणि मग त्याने आपले कार्य उरकले होते. तो आवाज ती कधीच विसरली नाही. सोनाला त्याची सारखी आठवण होत होती. ज्या ज्या वेळी ती लालियाकडे पाही त्या त्या वेळी सोनाला त्या आवाजाची आठवण होत होती. आणि भीतीने तिची गाळण उडत होती. आजही तो आवाज झोपेत ऐकून ती भ्याली. तिने दिवा लावला. चित्रा सुखरूप निजली होती. तिथे कोणीही नव्हते. क्षणभर तिने चौफेर पाहून घेतले. कोणीही नव्हते. तिने समाधानाचा श्वास घेतला. चित्राच्या अंगावर घातले. आणि ती खुर्चीवर बसली. ती लाल झाली होती. दोन्ही हातांनी तिने आपले तोंड चोळले. तिची दृष्टी दाराकडे गेली. ती चटकन उठली आणि तिने दार बंद करून घेतले आणि ती पुन्हा बसली. आवाज तोच तो चाकूचा. आणि तोही लालियाच्या. परंतु इथे तर काहीच नाही. मग काय आपणाला तो भास झाला? की आपण झोपेतच दचकून उठलो? ती पुन्हा उठली. दार उघडून ती लालियाच्या खोलीपाशी आली.

''मामा!'' सोनाने हाक मारली.

''ओ.'' कृष्णा उठून बसला.

''इकडे या जरा.''

कृष्णा उठून बाहेर आला. ती दोघेही चित्राच्या खोलीत आली.

''हं मामा! तो लालिया काय करीत होता?''

''सोना! त्यो रात्रभर जागा हाय. सारखा आत भाइर करतो.''

''आत वाजलं काय?''

''त्यो आधी भाईर आला. मग परत आला. नि खिशात काय तरी घेतलं. उशीर हतं उभा ऱ्हायला आनी मग वाजलं.'' कृष्णाने सांगितले.

''तुम्हाला जाग कधी आली?''

''मी रातभर जागाच हाय. पण उगाच मेल्यावानी पडलोय नव्हं का!''

''बरं जा, तुम्ही निजा. आमचं दुसरंच बोलणं झालं म्हणावं गावचं.''

''बरं, पण माणूस मोठा खवीस दिसतोय.'' असे म्हणून कृष्णा उठला. आणि आपल्या अंथरुणावर जाऊन पडला.

सोनाने दरवाजा बंद करून घेतला आणि तीही चित्राच्या जवळच निजली.

आज अन्याय झाला असता. हिने दरवाजा बंद न करता तसेच निजून घात करून घेतला होता आज. पण पुढे काय करायचे? पुढे किती दिवस जपायचे? असाच एकादे दिवशी जर घात झाला तर काय करायचे? आणि हा राक्षस...

सोना विचार करीत पडली होती. चित्राला काही माहीत नव्हते.

लालिया स्वत:ला हजारो शिव्या देत होता. तोंडावर मारून घेत होता. तो कढत होता. पेटला होता. स्वत: मूर्खपणा करून आलेली सुवर्णसंधी दवडली म्हणून त्याचा हिरमोड झाला होता. जर आपण आपला चाकू विसरलो नसतो तर, आणि तो जर उघडला नसता तर, किती बरे झाले असते! पण साल्या चाकूने दगा दिला. लालिया विचारमग्न पडला होता. कृष्णाही विचार करीत होता. सोनाही विचार करीत होती. त्या शांत रात्री तीन निरनिराळे विचार सुरू होते. चित्रा मात्र बिनघोरी निजली होती. तिच्या तोंडाकडे पाहून सोना पुटपुटली : ''अशा दुष्ट निद्रेनंच ही आपलं वाटोळं करून घेईल वाटतं.''

## ५

कृष्णाला जाऊन आज एक महिना झाला होता. तो गेल्या गेल्या आईच्या खुशालीचे पत्र पाठविणार होता. पण एकही पत्र आले नाही. तो डोहात बुडल्याप्रमाणे झाला होता.

चित्रा आज आंघोळ करून आपल्या खोलीत बसून केस विंचरीत बसली होती. तिला रोज केस विंचरताना आपल्या आईची आठवण येई. तशी आजही तिला आईची आठवण झाली होती. तिचे मन एकाएकी बेचैन झाले. आईचे पत्र नाही. आपले अजून जे होणार होते ते — ते म्हणजे लग्न — होत नाही. त्यामुळे आपण आपल्या आईला इकडे आणू शकत नाही. जर आपले लग्न न होताही आईला इकडे आणावी तर अक्काचे हे सर्व पाहून आई जीव देईल. तिला अक्का इथे वेश्या होऊन बसली आहे हे जर समजले तर नक्कीच ती मरण पत्करील. पण आपले लग्नही होत नाही, ते कधी होणार आणि आईला आपण कधी आणणार, असा विचार करीत ती बसली होती.

एका महिन्यात तिला पुष्कळ गोष्टी कळू लागल्या होत्या. तिला कांतीलालबद्दल बरे वाटत होते. तो रोज ठरल्याप्रमाणे येत होता. आणि चित्राला व सोनाला घेऊन जात होता.

तो पैशांची तर मुळीच पर्वा करीत नव्हता. दागदागिने, जरीची सुंदर पातळे, जे हवे ते तो पुरवीत होता. रोज स्वत:ची मोटार आणून चित्राला फिरवीत होता. काही दिवस सोना बरोबर येत होती. पण पुढेपुढे जनरलची स्वारी नियमित येऊ लागली, त्यामुळे तिला चित्राबरोबर येणे अशक्य होई. आणि चित्रा एकटीच कांतीलालबरोबर जाई. अगदी रात्री अपरात्री तो तिला घेऊन फिरत होता. पैसा तर नुसता उधळीत होता. सर्वोच्च घड्याळ चित्रासाठी. उत्तम पातळ चित्रासाठी. किंमती हिऱ्याची आंगठी चित्रासाठी. रोज नव्यानव्या वस्तू तो आणी. आणि चित्राला खूष करी. कित्येक दिवस जात होते. रात्री जात होत्या. काही वेळा दोघेच बॉक्समध्ये बसून सिनेमा पहात. पण कांतीलालने एकदाही चित्राच्या अंगाला स्पर्श केला नाही. त्यामुळे तिला त्याचा स्वभाव आवडू लागला होता. म्हणून ती त्याच्याबरोबर एकटी फिरावयास जात होती. तिला त्याची आता मुळीच भीती वाटत नव्हती. ती मुंबईत सर्व काही रोज पाहत होती. त्यामुळे शहरातील जीवन तिच्या अंगवळणी पडू लागले होते. ती नवीन नवीन तऱ्हेची माणसे, त्यांचे पोषाख, चालीरीती, सर्व काही पाहत होती. शिवाय तिला कशाचीच कमतरता नव्हती. सोना आणि कांतीलाल तिला काहीच कमी पडू देत नव्हते. तीही बदलत होती. परंतु घरातील प्रकार तिला मुळीच आवडत नव्हता. कारण तो लालिया उंदरावर मांजर टपून बसते तसा तिच्यावर टपून बसला होता. नव्हे, नव्हे, तो अगदीच पिसाट होत होता. एकही संधी दवडायची नाही असे त्याने ठरवून ठेवले होते. परंतु रोज निजतेवेळी सोना तिला मुद्दाम दार बंद करण्याविषयी सांगत होती. त्यामुळे त्याचे काहीच चालत नव्हते. शिवाय दिवसा एकटीला टाकून सोना कुठेच जात नव्हती. म्हणून तो चरफडत दिवस मोजीत होता. आणि एखादे दिवशी चित्राला चकित करण्याची वाट पाहत होता. त्याचे लांडग्यासारखे बघणे, ते कुऱ्यात चालणे, गुरगुरणे, तिला नकोसे झाले होते. त्याची तिला भीती वाटत होती आणि ती सारखी वाढत होती. कारण त्याच्याबद्दल सर्व काही सोनाने तिला सांगून ठेवले होते.

त्यात भरीला भर म्हणजे तो जनरल साहेब रोज येत होता. नेहमी येतेवेळी दारू पिऊन तर्र असाच येत होता. आणि घरात पाय ठेवताच मोठमोठ्याने आरडाओरड सुरू करीत होता. "कुठं आहे तो साला लालिया? बोलवा त्याला." असे म्हणून तो आपले पिस्तूलच काढी. आणि मग त्याला शांत करण्यासाठी सोनाची त्रेधा उडत होती. शिवाय जनरल एकादे दिवशी "चित्रा कुठं आहे? आण इकडे तिला?" असे म्हणून ओरडे. आणि तिची भीतीने गाळणच उडत होती. त्याला शांत करता करता सोनाला घामच फुटत होता. तो जेव्हा घोरू लागे तेव्हात त्या घरात शांतता प्रस्थापित होई, आणि सर्वांना झोप लागे. एकादे दिवशी जनरल साहेब शुद्धीवर असले म्हणजे चित्राशी लगट करीत. तेव्हा सोनाला त्यांचा राग येई. पण करणार काय? बोलून चालून तो जनरल होता. त्याला दुखवावे तर लालियाची भीती होतीच. जेव्हा जनरल घरात येई

तेव्हा सारे घर थरथरे. आणि एका हाडासाठी दोन कुत्री जशी गुरगुरू लागतात तसे ते पिसाळून गुरगुरू लागत. जणू दोन वाघ एकमेकाला फाडून खाण्यासाठी परस्परांवर झडप घेण्याची तयारीच करीत होते. त्यामुळे सोना हैराण झाली होती.

चित्राला रात्रीचा प्रसंग आठवला. तो भयंकर प्रसंग तिच्या डोळ्यांपुढे उभा राहिला. एके दिवशी जनरलला उशीर झाला होता. सर्व जण जेवणे आटपून निजले होते. चित्रा आपल्या खोलीत निजली होती आणि जनरल आला. तो दारूने झिंगत होता. झुकांड्या खात खात तो घरात आला आणि रोजच्यासारखाच बडबडू लागला. ''मला कुठंच समाधान नाही. ते कुठंच मिळत नाही. मिळालं नाही. लढाईच्या पाच वर्षांत जर्मन लोकांनी मिळू दिलं नाही. आता इथं हे साधे शिपाई मला समाधान मिळू देत नाहीत. रोज रोज तक्रारी, असंतोष, बंडाची भाषा. इथं यावं तर हा हरामखोर लालिया मला चैन पडू देत नाही. मी त्याला ठार मारीन!'' त्याने सोनाला जवळ ओढून तिचे तोंड आपल्या दोन्ही हातात धरून तो म्हणाला, ''मी, मी त्याला ठार मारीन. मी पुष्कळ लोक मारले आहेत. शत्रूचे मारले आहेत आणि आपलेही मारले आहेत. आणि तुम्ही दोघांनी माझ्याशी नीट वागलं पाहिजे. जशी तू वागतेस तसंच चित्रानं वागलं पाहिजे.'' असे म्हणून त्याने सोनाला सोडली आणि एकदम चित्राच्या खोलीकडे धाव घेतली. दार बंद होते. चित्रा आत भीतीने चूर होऊन थरथरत बसली होती.

''चित्रा! उघड दार. दार उघड. मी दार मोडीन.'' आणि सोना धडपडत त्याच्यामागून धावत आली. तिने त्याचा हात धरला आणि त्याला ती विनवू लागली. काकुळतीला येऊन आर्जवू लागली. ''नाही. असं नका करू. चला माझ्याकडे. माझ्या खोलीत चला.''

''नाही. नाही. आज तुझ्या खोलीत नाही. मी इथं या खोलीत, चित्राच्या शेजारी, तिच्या पलंगावर निजणार.'' जनरल बेपर्वा होऊन म्हणाला, त्याने सोनाच्या हातांतील आपला हात झटका देऊन सोडवून घेतला आणि दाराला थाप मारली.

''नका, नका. मी नाही तसं करू देणार.'' सोना हळू आवाजात म्हणाली. तिच्या पातळाचा पदर भुईला लोळत होता. तिची घाबरगुंडी झाली होती. तिला 'नका', 'नका' यापेक्षा काहीच सुचत नव्हते.

''नाही. नाही. मी इथंच आज निजणार.'' जनरल म्हणाला.

''नका. नका. माझ्या खोलीत चला.'' सोनाने पुन्हा आर्जवले.

''मी तिकडे निजलो तर तो साला इथं येऊन निजेल त्याचं काय?'' त्याने सोनावर खेकसून विचारले.

''नाही. चित्रा दार बंद करून निजली आहे.'' सोना म्हणाली. त्याची खात्री करण्यासाठी तिने त्या दाराला धक्का दिला. आत चित्रा धडधडत्या अंतःकरणाने ते ऐकत होती. आता आपले काय होणार, आपल्यावर कसला प्रसंग गुदरणार, याचा

ती विचार करीत होती.

तोच जनरल परत फिरला. आणि मुकाट्याने सोनाच्या खोलीत येऊन स्तब्ध बसला. थोडा वेळ घरात शांतता झाली. क्षणात तो पुन्हा भडकून उठला. त्याने आपले तोंड चोळले आणि लष्करी ऐटीत उभा राहून तो म्हणाला : "मी सर्वत्र गेलो. मी सर्व वेश्या पाहिल्या. मी लंडनमध्ये पाहिल्या. मी रोममध्ये पाहिल्या. मी पॅरिसमध्येही पाहिल्या. परंतु असं काही पाहिलं नाही. जी जी माझ्या मनात भरली तिला मी पैसे दिले आणि समाधान मिळवलं. पण इथं काही निराळंच आहे. शेजारच्या खोलीत एक सुंदर तरुण स्त्री आहे. तिच्यावर माझं मन गेलं आहे. मी लागेल तेवढे रुपये देण्यास तयार आहे. परंतु ती मला मिळत नाही. का ?"

"ती वेश्या नाही. ती माझ्याकडे आली आहे. आणि माझ्या आईनं पाठवली आहे. मी तिला वेश्या होऊ देणार नाही." सोना एक श्वास सोडून म्हणाली.

"मला हे पटत नाही." जनरल म्हणाला. "मलाही माझ्या आईनं सांगितलं होतं तू वेश्यांच्या घरी जाऊ नको म्हणून. परंतु इथं आल्याशिवाय मी जगू शकत नाही. दारू, स्त्री आणि मरण हेच आम्हासाठी आहे. मी खराखुरा जनरल नाही. आणि असणंही शक्य नाही. नेव्हीत मुळी जनरल ही पदवीच नसते. जनरल होण्याला ज्या गोष्टीची गरज असते तीही माझ्यात नाही. पण. . . पण लोक, तू, सारे लोक मला जनरल म्हणतात. कारण माझा रुबाबच तसा आहे. मला भिऊन, माझा चेहरा पाहून लोक मला जनरल म्हणत आहेत. जनरल नसूनही लोक मला जनरलची पदवी देतात. मग मी मोठा आहे की नाही ?" नंतर तो पुष्कळ उशीर काय वाटेल ते बडबडत राहिला आणि नंतर निजला.

परंतु सारी रात्र चित्राने जागूनच काढली. ती एक रात्र तिला भयंकर वाटली. ती तिच्या डोळ्यांपुढून जात नव्हती. सारे घर तिला उदास, भकास वाटत होते. आणि त्यात तिला आईची आठवण झाली होती, 'अशा या कठीण सापळ्यात आपली चित्रा सापडली आहे हे आईला कळलं नसेल. तिला वाटत असेल चित्रालाही नवरा मिळाला असेल. ती नांदत असेल. मामानं तसंच तिला सांगितलं असेल. परंतु. . .' क्षणोक्षणी तिचे डोळे पाण्याने भरत होते. ती ते पुसून टाकीत होती. त्या घरात क्षणभरसुद्धा तिला बसवत नव्हते. परंतु आज रोजच्याप्रमाणे कांतीलाल येणार असून आपण मुंबादेवी पाहण्यासाठी जाणार या विचाराने ती आपल्या मनाचे समाधान करीत होती. दिवसभर तिचा वेळ फिरण्यात जात होता. पण रात्री तिला आपले मरण दिसत होते. चित्राने आपले केस करून आंबाडा बांधला. आणि समोरच्या आरशात तोंड पाहिले. तिचे डोळे लाल झाले होते. त्यात ताठा भरला होता. म्हणून तिने ते चोळले.

"चित्रा! झालं का तुझं?" सोनाने येऊन म्हटले.

"हो, झालं." असे म्हणून चित्रा फिरली.

सोनाचे डोळे पाण्याने भरले होते. रात्रीच्या प्रसंगामुळे तिला फार वाईट वाटत होते. तिला शरम वाटत होती. आपण काय केले आहे? आपण होतो कसे आणि आता काय आहोत? याबद्दल तिला वाईट वाटत होते. आणि आपल्यामुळे आपल्या बहिणीवर किती कठीण प्रसंग येत आहेत, याची तिला लाज वाटत होती. रात्री तर जनरलने कळसच केला होता. त्यामुळे सकाळपासून तिने चित्राला तोंड दाखवले नव्हते. परंतु शेवटी तिला राहवेना म्हणून ती चित्राकडे आली होती. कारण आता कांतीलाल येणार होता. लवकरात लवकर कांतीलालने चित्राला घेऊन जावे आणि त्या दोघांनी आनंदात राहावे, म्हणजे आपण सुटलो. पुढे आपले काहीही होवो. एकदाची चित्रा कांतीलालबरोबर गेली की आपल्या गळ्याचे पेंडे पडले. मग या दोन वाघांच्या कळवंडीत आपला प्राण जरी गेला तरी हरकत नाही. लवकर तो प्रसंग येणार. एकादे दिवशी तर तो जनरल पिऊन आला आणि लालियावर तुटून पडला तर तो सैतानही काही कमी नाही. तोही त्याला ठार मारायला कमी करणार नाही. म्हटले तर दोघांपैकी एकाचा नक्कीच मुडदा पडणार. आणि मग आपल्या नशिबी काय आहे कोण जाणे. जे काही असेल ते असो. ते आपण पाहून घेऊ. नाही तरी काय असणार नशिबात. आपण कसला तरी गरीब नवरा करू. इथे पोट भरू. काम करू आणि माणसासारखे जगू म्हणूनच आईनं पाठवले. आणि इथे आपल्या नशिबी हे जिणे होते. हे असले दुष्ट जिणे चित्राच्या पदरात पडू नये एवढेच. अशा विचारात सोना होती. आज तिच्या डोळ्यांत अश्रू आले होते. तिचे मन रडत होते.

"अक्का! तू रडतेस?" चित्राने आश्चर्याने विचारले.

"हो. मी रडते आहे. आणि रोज रडत्ये. पण चोरून."

"कां रडतेस?" चित्राने पुन्हा विचारले. तिला उत्तर देणे सोनाला अशक्य झाले. तिने चित्राच्या गळ्याला मिठी मारली. ती मुसमुसून रडू लागली. जणू तिला मोठ्याने रडण्याची भीतीच वाटत होती. ती पुष्कळ रडली. चित्राही रडली. थोड्या वेळानं ऊर हलके वाटू लागले.

"चित्रा! ही मुंबई दिसते तशी नाही. ती वाईट आहे. माझं वाटोळं झालं. मी माणसातून उठल्ये. माझी अब्रू गेली. आईनं जन्मभर कष्ट करून जो देह वाढवला तो मी विकीत आहे. म्हणून मला लाज वाटते. आणि . . . . ." ती एकदम थांबली.

"मग आता काय करायचं?" चित्रा गोंधळून म्हणाली.

"काहीच करता येत नाही."

"कां? आपण परत जाऊ या."

"कुठं जाऊ म्हणतेस?"

"आपल्या आईकडे."

"कशाला?"

"कशाला? काम करू पहिल्यासारखं. रोजगार करून आईला पोसू. अब्रूनं जगू. आईनं मला येतेवेळी सांगितलं आहे."

"काय सांगितलं आईनं?" सोनाने डोळे पुशीत विचारले.

"आई म्हणाली : 'चित्रा! लग्न करून आनंदात राहा. आणि जिवाच्या मोलानं अब्रू जप.'"

"हो. हो. म्हणून तू आपली अब्रू जप. जिवाच्या मोलानं जप. माझं काय आता? पिचकलेलं कांकण आहे मी. माझा नाद गेला आहे. माझी अब्रू गेली आहे. फक्त तूच आईचं म्हणणं लक्षात ठेवून आपली अब्रू जप. मलाही आईनं असंच सांगितलं होतं. पण मला इथं कोणीही धनी नव्हता. मी फसल्ये, भ्याले, तू मात्र भिऊ नको. मी तुला आधार आहे. चांगला वाईट नवरा करून माणसासारखं जिणं जग. मुंबईत प्रत्येक पाऊल जपून टाक." सोना आज मन मोकळं करून चित्राला सांगत होती. आणि चित्रा शांतपणे ऐकून घेत होती.

"इथं येणारा प्रत्येक माणूस तुझ्यावर झडप घालण्यासाठी आसुसलेला आहे. प्रत्येक जण किरण साधीत आहे. रात्री त्या जनरलनं काय काय केलं? तो दिवसा कसा साधा भोळा दिसतो. आणि तो रात्री कसा झाला होता हे लक्षात ठेव." सोनाने असे म्हणून आवंढा गिळून टाकला.

"मग आता मी कसं करू?" चित्रानं विचारले.

"तुला जो पसंत पडेल त्याच्याशी लग्नच कर. पण फसू नकोस. आणि माझ्यासारखी होऊन बसू नको. मुळूमुळू रडून भिऊन वागू नको. तर असं कर की तुझीच भीती दुसऱ्यांना वाटू दे." सोना म्हणाली.

त्या दोघी पुष्कळ दिवसांत आज बोलत बसल्या होत्या. तोच कांतीलालची मोटार गुरगुरल्याचा आवाज आला. आणि त्या आपला पोषाख करून बाहेर जाण्यासाठी बाहेर पडल्या. आणि लालियाही कुठे तरी भटकून आला.

कांतीलालने मोटारीचे दार उघडून ठेवले होते. सोना, चित्रा आत बसताच मोटार सुरू झाली. त्याने मनगटावर पाहिले. दोन वाजले होते. मोटार निघाली. ती मुंबादेवीकडच्या रोखाने धावत होती. माणसांनी गजबजलेल्या रस्त्यातून ती हळूहळू निघाली होती. जिकडे तिकडे माणसे आपापली कामे करीत होती. जो तो आपल्या कामात दंग झाला होता. चित्रा पाहत होती. तिला थोडे निराळे वाटत होते. सर्व लोक थोडे मळके वाटत होते. काही देशी गावठीही दिसत होते. कोणी डोकीवर मोठमोठ्या पाट्या घेऊन हेलपाटी करीत होते. कोणी बैलाप्रमाणे हातगाडी ओढीत होते. कोणी हातात काटा घेऊन धावत होते. तांबापितळेच्या दुकानात शेठ आपले मोठे पोट सावरीत गिऱ्हाइकांशी बोलत होते. तर नोकर पिवळे कपडे घालून माल काट्यावर

घालून तोलीत होते. त्यांचे चेहरे घामाघूम झाले होते. कोणी नोकरावर खेकसत होते. तर नोकर बाता मारून काही तरी सांगून वेळ मारून नेत होता. काही ठिकाणी चांभार उन्हात बसून फाटके जोडे सांधीत होता. तर हातात वाटी घेऊन कोणी भीक मागत निघाला होता. काही आंधळ्यांची माळच्या माळ तेहतीस कोटी देवांच्या नावाने शंख करीत वाट चालत होती. एखादा कारकून गंभीर चेहरा करून हिशेब लिहीत होता. जो तो काही ना काही पोटासाठी करीत होता. ते सर्व पाहून चित्राला थोडे बरे वाटले. हे जीवन तिच्या ओळखीचे वाटून तिला मुंबईतही दोन भाग आहेत असे वाटू लागले. फक्त माणसाला माणूस खाणारे जीवनच इथे आहे, असा तिचा समज होता तो दूर होत होता. आपल्या गावाकडली, अगदी आपल्यासारखी, पण इथे येताच चांगली वस्त्रे करून न बदललेलीही माणसे आहेत. ती काम करून खातात, ती माणसासारखी जगतात. असेच आपणही जगत होतो, असेच गरीब पण माणूस म्हणून जगत होतो, काम करीत होतो, आपण शेतावर राबत होतो, आणि दु:खाने मिळवून सुखात खात होतो. पण आज आपण भलत्याच सुखात जाऊन पडलो आहोत असेच तिला वाटत होते. मोटारीचा हॉर्न सारखा वाजत होता. परंतु पुष्कळ दिवसांत आजच प्रथम ती आपली आपल्यासारखी माणसे पाहत होती. एकदम मोटार थांबली.

"चित्रा! हीच बघ मुंबादेवी." सोना म्हणाली.

तिने इकडे तिकडे पाहिले. सभोवती नुसता बाजार भरला होता. लोकांनी एकच गर्दी केली होती. जो तो देवळात जाऊन मुंबादेवीला नमस्कार करून बाहेर येत होता. घंटानादाने तर काहीच ऐकू येत नव्हते. आजूबाजूला बसलेले भिकारी देवाच्या नावाने टाहो फोडून पैसा मागत होते. जणू साऱ्या मुंबईचे दारिद्र्य, लाचारी तिथे येऊन बसली होती.

चित्रा, सोना मोटारीतून उतरून वाट काढीत गर्दीतून देवळात गेल्या. थोड्या वेळाने त्या बाहेर आल्या. पुन्हा त्या मोटारीच्या दिशेने निघाल्या. तोच अंगणात चित्रा थांबली. एक म्हातारी हातात नारळ व पेढ्यांचा पुडा घेऊन येत होती. तीही क्षणभर थबकून चित्राकडे निरखून पाहत होती.

"कोण तानूकाकू?" चित्रा आश्चर्याने उद्‌गारली.

"चित्रा! तू कुठं हाकडं?" म्हातारीही चकित होऊन म्हणाली.

"मी इकडंच आल्ये."

"अग कुणीकडं? आता ग बया! किती ग थोरली झालीस तू चित्रा! एवढी एवढीशी हुतीस तवा म्या बघितल्याली." तानू म्हातारी आनंदीत होऊन म्हणाली. चित्रालाही तिला पाहून आनंद झाला होता. आज दहाबारा वर्षांनी ती म्हातारी तिला भेटली होती.

"मी इकडं येऊन आज दीड महिना झाला." चित्रा म्हणाली.

आणि मग म्हातारीने विचारलं, "आँ? अग मग कुठं ऱ्हाया हाइस?"

"मला पत्ता नाही ठावं. पण काळ्या घोड्याजवळ आहे आमचं घर." चित्रा म्हणाली. ती बोलत बोलत सोना गेलेल्या वाटेने पाहत होती. आपण चुकू या भीतीने तिला घाई झाली होती. इकडे तिकडे पाहत बोलत होती ती.

"बरं काकू! तू कुठं राहतीस?" चित्राने विचारले.

"मी? माटुंग्याला लेबर कँपात. ये कवा तरी. किती ग चित्रा तू चांगली झालीस! नजर ठरं ना आता तुझ्यावर. गेल्याबराबर द्रिष्ट काढ बरं का! एकाद्या दिसी ये लेबर कँपात. आता माझा जया बी थोरला झालाय. गिर्नीत काम करतोय." म्हातारी खुशाल बोलत होती, पण चित्राचे चित्त स्थिर नव्हते. सोना कुठे तरी जाईल आणि आपण चुकून जाऊ म्हणून तिला भीती वाटत होती.

"बरं काकू! मी जाते. येईन केव्हा तरी." चित्रा म्हणाली.

"हो. हो. जरूर ये. माटुंगा लेबर कँप. कुनालाबी इचार. मी पुलापाशीच हाय. जा." म्हातारीने चित्राला निरोप दिला.

चित्रा दातात पदर धरून आल्या वाटेने परत गेली. सोना व कांतीलाल तिची वाट पहात उभे होते.

"काय ग चित्रा! कोण ती म्हातारी?" चित्रा जवळ येताच सोनाने आश्चर्याने विचारले.

"अग अक्का, ती आपल्या गावची तानूकाकू." चित्रा म्हणाली. आणि त्या दोघी मोटारीत बसल्या. मोटार सुरू झाली. सोना विचार करू लागली. तानूकाकू कोणाची कोण, तिला काही आठवेना.

"चित्रा! ती तानूकाकू कुणाची?" शेवटी सोनाने विचारले.

"ती आपल्या आळीची. हिची लेक तांदुळवाडीत दिली होती. पुढं तिचा जावई मेला म्हणून ती आपल्या मुलीकडेच जाऊन राहिली. आणि पुढं साप चावून तिची लेकही मेली. मग ती आपला नातू जया ह्याला घेऊन पारगावला आली नाही का? ती बघ ही. इथं मुंबईत आहे आता."

"असं असं. अग तिला इकडं येऊन जवळजवळ बारा वर्षं झाली की आणि तिनं नेमकं तुला ओळखलं. मोठी कावळ्याच्या डोळ्याची आहे ती!" सोना हसत म्हणाली. आणि ती कांतीलालबरोबर बोलू लागली.

चित्राला आज आनंद झाला. आपल्या गावचे एक माणूस भेटल्यामुळे तिला समाधान वाटले, आणि तानू म्हातारीशी बोलावयास मिळाले नाही म्हणून वाईटही वाटले. तिला एकदम आपल्या लहानपणची आठवण झाली. ती एकदम बारा वर्षांपूर्वीच्या पारगावात गेली आणि एकेक प्रसंग तिच्या डोळ्यापुढून जाऊ लागला.

आपली लेक मरताच तानूकाकू छोट्या जयाला आपल्या पाठीशी बांधून पारगावाला आली. त्या दिवशी सर्व बाया जमल्या, आणि म्हातारीची ती दु:खी स्थिती पाहून त्या रडू लागल्या.

नंतर आपल्या आळीतील सर्व मुली आपण एकत्र जमून आपल्या दारासमोरच्या चिंचेखाली खेळत असायचो. एकदा सर्व पोरींनी नवीनच खेळ मांडला. आपापल्या घरातून पीठ, मीठ, चटणी वगैरे आणली. लुटूपुटूचा संसार सुरू केला. सर्व मुलांनी आज लग्नच उभे केले. कोणी वरबापा झाले. कोणी वरमाई झाल्या. कोणी करवला तर कोणी करवली झाली. आणि कोणी मांडव घातला. त्यांनी नवरा जयाला केला आणि नवरी चित्राला बनवली. नवरीला धोतर कांबरून सजवली होती. फुलांच्या मुंडावळ्या बांधल्या होत्या. नवरदेवही लग्नाला तयार झाला होता. मग हळदी लागल्या. एक मुलगा भट झाला. नवरी नवरा लग्नाला उभी राहिली. छोट्या भटाने तोंडाला येईल ते बडबडून लग्न लावले. शेसा भरल्या. लग्न झाले.

हे प्रसंग आठवून चित्रा मनात लाजली. तो जया आता मोठा झाला असून गिरणीत काम करतो आहे असे म्हातारी म्हणाली. ते तिचे शब्द चित्राला आठवले.

आपणही त्याच्याबरोबर खेळलो, वाढलो, पण तो मोठा होऊन काम करीत आहे. आणि नवरा शोधण्यासाठी मुंबईत आलो आहोत. आपल्या मागे अनंत संकटे लागली आहेत. रोज रात्री दार बंद करून हे शरीर जपावे लागत आहे. पुढे काय होणार याचा विचार, आईचे काय होणार याचा विचार, रात्री काय होणार याचा विचार, आणि भीती. भीती तर आपल्या मागे हात धुऊन लागली आहे. आपण जरीचे पातळ नेसून मोटारीत बसून गेलो होतो आणि तानूकाकू पायांनीच आली होती. परंतु आपल्या मागे भीती आहे. आपण दिसतो तसे नसून संकटात आहोत. तर म्हातारी निर्धास्त आली होती. ती काम करून अब्रूने जगत असेल. चित्रा विचार करीत होती.

मोटार गुंगारे घेत निघाली होती. आणि चित्राच्या डोकीत विचारांचे थैमान सुरू झाले होते. मोटार दारात थांबली. आणि तिच्या काळजात धस्स झाले. तिला त्या घराची आता चीड येऊ लागली होती. ते घर सोडून गेलं म्हणजे तिला निर्धास्त वाटे आणि त्या घरात आले की आपण भयंकर संकटात आहोत, आपला जीव कुणाच्या तरी मुठीत असून तो आपला नाही असे तिला वाटे. जणू काय ते घर म्हणजे क्रूर संकटाचे उगमस्थान असून चित्रासाठी सर्व संकटे त्यात निर्माण होत होती. आजही चित्रा त्या घराकडे पाहाताच भ्याली आणि थरथरत्या अंत:करणानेच ती घरात शिरली. लालिया पुढेच उभा होता...

आईला आज बोलवू, उद्या बोलवू, आज पत्र पाठवू, उद्या पाठवू, असे दिवस जात होते.

# ६

ज्या दिवशी चित्रा गेली त्या दिवशी सखुबाई मनसोक्त रडून, डोळे पुसून, अंधार पडता पडता घरी आली. त्या दिवशी सारे घर तिला खाऊ की गिळू करू लागले. तिला त्या घराची भीती वाटू लागली. ज्या दोन जिवांना तिने लहानाचे मोठे केले ते आज तिच्यापासून दूर कुठे तरी गेले होते. तिला आपले म्हणावयास काहीच उरले नव्हते. जे होते ते कृष्णाने दूर नेऊन ठेवले होते. ती त्या दिवशी काहीही न खाता स्तब्ध बसून राहिली. परंतु सर्वच सुने भासत होते. चित्राची हालचाल, दळून येणे, पीठ मळत बसणे, भाकरी करणे, हळूच 'आई ऊठ, खाऊ ये' असे म्हणणे, नाही तर काही तरी बोलून हसणे, काही काही नव्हते. सर्व काही गुप्त झाल्याप्रमाणे दडून गेले होते. त्या ओसाड घरात ती सर्वच विसरली. आपली चित्रा आपल्या बहिणीकडे गेली असून आपणही लवकरच जाणार, हे ती विसरली आणि लहान मुलाप्रमाणे रडू लागली. सोनाचे फाटके पातळ पोटाशी घेऊन रडू लागली. चित्राने ज्या ज्या वस्तूंना हात लावला होता त्या सर्व जमवून ती रडू लागली. तिची शुद्धी गेली. पुष्कळ पुष्कळ रडून झाले तेव्हा तिला एकदम आठवले : 'अरे त्या मुंबईत खुशाल आहेत. माझी सोना तिथं नांदत आहे. आता चित्राला घेऊन कृष्णा गेला आहे. तो तिला नवरा बघून आला आणि तिला घेऊन गेला आहे. चित्राचं लग्न होणार. मग कृष्णा येऊन मला सांगणार. मग मीही आपल्या सोनाकडे आणि चित्राकडे जाणार आणि आज आपण उगीच रडत आहोत!'

ती शुद्धीवर आली. तिने रडे आवरले. परंतु अश्रूंचा बांध फुटला होता. त्यांची अखंड धार वाहत होती.

तिने आज प्रथम आपल्या हातांनी आपली ती फाटकी वाकळ टाकली. आणि ती निपचित पडली. दिवासुद्धा तिला नकोसा वाटू लागला. त्या दिवसापासून तिने रोज रोज वाट पाहिली. आज नाही उद्या कृष्णा येईल, आणि आपल्या चित्राची लग्नाची बातमी सांगेल. मग सोना येईल. हो. तीच येईल. आणि मला मुंबईला घेऊन जाईल. अशा विचारांनी तिने आपल्या मनाला धीर दिला.

पण पुढे कृष्णाही आला. पण त्याने सोना कधी येणार, आपणाला केव्हा नेणार, याबद्दल काहीच सांगितले नाही. तो काही तरी नक्की सांगेल म्हणून सखुबाईला फार फार आशा होती. परंतु कृष्णाने तिची निराशाच केली.

सखुबाई रोज सोनाच्या पत्राच्या वाट पहात होती. आज नाही आले, आता उद्या येईल, उद्या नाही, परवा येईल. दिवसापाठी दिवस जात होते पण सोना येत नव्हती, की तिचे पत्रही आले नाही. तिचे कशावरच चित्त बसेना. ती रोज एक भाकरीपुरते दाणे दळून एकच भाकरी करून कुणाच्या तरी घरचे कोरड्यास मागून आणून खाई, आणि

रोज विचारमग्न बसत होती. तिची सोना येत नव्हती, की तिची चित्रा येत नव्हती.

ज्या दिवशी चित्रा गेली त्याच दिवशी तिची कंबर बसली होती. ती आता आता खालीच घेऊ लागली. रोज उठून, ज्या ठिकाणाहून चित्रा पुढे गेली आणि ती परत येतेवेळी चित्राच्या पावलांकडे पाहत रडत बसली, त्या ठिकाणी जात होती. आणि अश्रुभरल्या डोळ्यांनी ते पाऊल तरी दिसते का म्हणून पाहत होती. पण ते आता तिथे नव्हते. त्याच्यावर अनेक लोक जाऊन ते बुजले होते. परंतु ते दिसेल असे तिची वेडी माया तिला सांगत होती. किंवा तिकडून त्या माळाकडून कदाचित कोणी तरी येईल, सोना येईल किंवा चित्रा येईल, आपणाला भेटेल, असेही तिला वाटत होते. ती आता उघडी पडली होती. तिचे म्हणायला आता कोणीही नव्हते.

ती पत्राची वाट पाहत होती. परंतु सोना रोजच्या रोज जास्तच चिखलात रुतून जात होती. तिचे पत्र येत होते. ते सखुबाईला कसे कळणार! ती आपली वाट पाहत होती. चित्राचे लग्न करूनच आपण आलो असे कृष्णाने सांगितले होते. परंतु मग चित्रा कां येत नाही? ती आपणाला मुंबईला कां नेत नाही? ती एवढी कशी निर्दय झाली की आपल्या संसारात, आपल्या नवऱ्याच्या जाळ्यात सापडून ती आपणाला विसरली? मग असे कसे झाले? जी चित्रा आपल्यावाचून घडीभर कुठे राहायची नाही, ती आज दोन महिने झाले कुठे गडप झाली आहे? तिला आपली आठवण कां होत नाही? माझी म्हातारीची, या आपल्या आईची, त्यांना कां आठवण होत नाही? मी त्यांना किती जपले? मी नेत्राचा दिवा आणि हाताचा पाळणा केला. मी नऊ महिने ओझे बाळगले, रांडपण घातले, पण त्यांना दुर्जन झाले नाही. चिमणी आपल्या पिल्लांना चारा घालते तसा रोजगार करून मी त्यांना घास आणून चारला. त्यांना मी मोठ्या केल्या. त्याच मला शेवटी सरतेवेळी पाणी पाजतील, म्हणून त्यांना मी वाढवले. पण आज त्या मला विसरल्या. मला टाकून तिकडे खुशाल बसल्या आहेत. असे कसे झाले?

अशा विचारांनी ती वेडीपिशी झाली. तिने घडी मोजल्या. दिवस मोजले. आठवडे मोजले. महिने मोजले. पण तिची चित्रा आली नाही. परंतु ती नक्कीच येणार अशी तिला मोठी आशा होती. त्यात सोनाने पैसा पाठविणे बंद केल्यामुळे कृष्णाही चिडला. तोही सखुबाईला चांगल्या दृष्टीने पाहत नव्हता. मग तिने काय करायचे? ती घरोघर जात होती आणि रडत होती. "माझी चित्रा स्वप्नात आली. माझी सोना आल्याचा मला भास झाला," असे आयाबायांना सांगत होती, आणि रडत होती. "सखुबाई! रडू नकं, तुझी चित्रा येईल!" असे म्हणून लोक तिची समजूत घालीत होते. तिच्या हाडांची काडे झाली. तिला चालणे कठीण होत होते. बोलणेसुद्धा कठीण होत होते. परंतु एकाच आशातंतूवर ती जीव धरून होती : "माझी चित्रा येईल." तिची स्थिती पाहून लोकांनाही हळहळ वाटत होती.

सूर्य उदय पावला होता. सारा वारणा नदीचा खोरा त्या सुप्रभाती उजाळ झाला होता. सर्वत्र चैतन्य नाचत होते. उभी पिके बेपर्वा डुलत होती. मळीकडेच्या शेवऱ्या स्थिर खड्या होत्या. मक्याची कणसे कडेवर घेऊन मक्याची ताटे उभी होती. कुंपणे पावट्याच्या वेलाने गुंडाळून टाकली होती. सकाळच्या वाऱ्यावर मक्याचे तुरे लहरत होते. पाणवठ्याच्या पांदीने म्हशी, रेडे गावाकडे येत होते. लोक पाणी भरत होते. सर्वच जण घाई करीत होते. आज सकाळीच सखू पाण्याला गेली होती. हातात काठी व डोकीवर पाण्याचे गाडगे घेऊन ती घराकडे निघाली होती. तिची काठी थरथरत होती. ती पाय ओढीत चालली होती. "कोण चाललंय ते?" पाठीमागून रेडके घेऊन येत असलेल्या गोंदूनानाने विचारले. त्याने घोंगड्याची खोळ केली होती. हातात एक फोक घेऊन तो रेडकांना हाकलत येत होता. "सखू? आरारा! वाईट झालं बरं तुझं. पोरी जाऊन तुझ्यावर कठीण वकत आला." म्हातारा हळहळत म्हणाला.

"दादा! चित्राला नि सोनाला जाऊन लई दिवस झाले पण त्यास्नी माझी सईच होत न्हाय. काय करू?" सखुबाईने विचारले. तिच्या डोळ्यात पाणी भरले. ती रडू लागली.

"काय करायचं? हतं पोट भरत न्हाय म्हणं तिकडं गेल्या. आनं हाकडं आईला इसरल्या. चांगलं न्हाय झालं." त्याने रागाने रेडकाला रपाटा हाणला.

"काय झालं कुणाला ठावं? त्या पाण्यात बुडल्यावानी......" पुढे तिच्याने बोलवेना. तिचा कंठ दाटून आला.

"अग! पर त्यो किस्ना म्हनत हुता त्यांचं लई चांगलं हाय. मग त्यास्नी कसली अवदसा लागली?"

"चांगलं हाय का वंगाळ हाय कुनाला ठावं?" सखुबाईने एक निःश्वास टाकून म्हटले.

"मग आता कसं चाललंय तुझं?" म्हाताऱ्यानं विचारले.

"काय बरं न्हाय. त्येंचा कागुद न्हाय. पोटाचं हाल होत्यात. आता जगायचं बी कठीण झालंया."

"सखू! असं घाबरून कसं भागंल? पोरींचं काय हाय ते बघ. आनी अशी रडत बसू नकं. उद्यापास्नं पोराला सांगून मी पाण्याची केळी दिया लावतो."

नंतर ती बोलत बोलत घराकडे आली. त्या दिवसापासून तिने अंथरूण धरले. तिने फिरणे बंद केले. तिने उठणे बंद केले. ती आळीत दिसेनाशी झाली. शेजारीपाजारी घासभर देऊन तिची विचारपूस करू लागले, आणि ती वेड्यासारखी आल्यागेल्यांना विचारी : "आली का माझी चित्रा?" तिला ताप चढू लागला. मधून मधून तिची शुद्धी जाऊ लागली. त्या बेशुद्धीत ती बडबडत होती : "येईल माझी चित्रा, माझी सोना, येईल. मला मुंबईला नेईल. चित्रा! चित्रा!" तिने चित्राचा ध्यास घेतला. ती ओरडून हाका

मारीत होती : "चित्रा! लवकर ये. मला घेऊन चल. न्हायतर मी अशीच मरंन. आपली भेट होनार न्हाय."

लोक जमून तिला शांत करीत होते : "तुझी चित्रा येनार हाय."

"येनार, पन कवा येनार? मी जिवंत हाय तंवरच ये म्हनावं." सखुबाई कावरीबावरी होऊन म्हणाली. तिने दम दाबून धरून ठेवला होता. तिला भीती वाटत होती. जर हा दम सोडला आणि आपण मेलो तर चित्राची, सोनाची भेट होणार नाही.

सखुबाईचा जीव घाबरला आहे असे कळताच कृष्णा आला. तो पार उशाजवळ जाऊन बसला. "अक्का! अक्का! हे बघ मी आलोय." कृष्णा म्हणाला.

ती शुद्धीवर आली. तिने डोळे गरगर फिरविले. "किस्ना! माझ्या पोरी कुठं टाकून आलास?" तिने मंद स्वरात विचारले. या तिच्या प्रश्नाला त्याच्याजवळ उत्तरच नव्हते. तो तिच्या भकास चेहऱ्याकडे पाहत होता. तिची मोठी मुलगी सोना आज वेश्या होऊन बसली आहे, हे तो सांगू शकत नव्हता. कारण तिचे आपण लग्न करून आलो आहोत असे त्याने गावभर सांगितले होते. आणि तिची लाडकी चित्रा आज भयंकर संकटात लोटली असून तिच्या मानेला कातर लागली आहे असे तो सांगू शकत नव्हता. चित्राचेही आपण चांगले करून आलो आहोत हे त्याने तिला शंभर वेळा सांगितले होते. म्हणून त्याच्याकडे आज जबाब नव्हता.

"अक्का! त्यांचं चांगलं हाय. त्या येनार हायती." तो चाचपडत म्हणाला.

"न्हाय. न्हाय. त्यांचं चांगलं असतं तर त्या मला इसरल्याच नसत्या." तिने आपली मान पडल्या पडल्या हालविली.

"अक्का! तू माझ्यावर इस्वास ठिव. चित्रा खुशाल हाय." कृष्णा धडधडत्या अंत:करणाने म्हणाला.

"मग ती येत का न्हाय?" सखू खिन्न स्वरात उद्गारली. तिच्या त्याही प्रश्नाला उत्तर त्याच्याजवळ नव्हते.

"तू अशी घाबरू नकं ग." तो उद्विग्न होऊन म्हणाला.

"नकं नकं. आता एकदा मला माझी लेकरं भेटीव. मी तुझ्या पाया पडत्ये." असे म्हणून तिने पडून उशीवर आपले कपाळ टेकले. जमलेली बायामुले रडत होती. पुरुषही "बरं झालं नाही" असे म्हणत होते. त्यांची हृदये पिळवटून जात होती.

"बरं मी जाऊन त्यास्नी घेऊन येतो. तू अशी करू नकं." कृष्णाने तिला धीर देण्यासाठी सांगितले.

"लवकर जा. चित्राला, सोनाला घेऊन ये." तिच्या गालांची हाडे बाहेर आली होती. तिचे डोळे आत ओढले होते. तिचा चेहरा पांढराफटक झाला होता. तिचे बोलणे घरघरत येत होते. जणू ती जिवंत मढंच होती. तिने आपला प्राण रोखून धरला होता. कारण

तिची चित्रा येणार होती.

"किस्ना! कवा जातोस?" तिने विचारले.

"उद्याच जातो." कृष्णा म्हणाला.

तिला थोडा आनंद झाला. तिच्या चेहऱ्यावर हास्य चमकले. लोकांनाही बरे वाटले. "आईची वेडी माया" असे म्हणत ते घरोघर गेले. त्यांनी जाताना "किस्ना! तू म्हातारीपाशीच रातभर ऱ्हा." असे सांगितले. कृष्णा कुडाला टेकून बसला होता. रात्र मध्यान झाली होती. सखुबाई पडून होती. ती मधून मधून बडबडत होती. कृष्णा विचार करीत होता. आपण मुंबईला जाऊन चित्राला काय सांगावे? तिला कशी आणावी? आपण तर येतेवेळी आठशे रुपये घेऊन आलो आणि आता लवकरच लग्न होईल असे सर्वांना सांगितले. ते सारेच खोटे आहे. आणि जर चित्राचे बरे असते तर ती नक्कीच आलीही असती. पण आपण होतो तेव्हाच तिथे भानगडी सुरू झाल्या होत्या. आता त्यांचा कळस झाला असेल. त्यामुळेच त्या दोघींपैकी कोणीही आले नाही. शिवाय ही इथे पडून आहे. हिचा घडीचा भरंवसा नाही. आता काय करावे? तो विचार करीत बसला होता. मंद दिवा जळत होता.

"मी कुणाचं वाईट केलं न्हाय. पण माझं वाईट केलंस. माझी दोन लेकरं कुठं टाकून आलास? तू माझा वाद्या"...... सखुबाई बडबडू लागली.......

कृष्णाचे काळीज धडधडू लागले. त्याला अगदी सुया बोचल्याप्रमाणे होऊ लागले.

## ७

"माझं धडभलं होईल, आईला इकडे आणू म्हणून मी इकडे आल्ये आणि इथं रोज फिरायचं. लुगडी नेसून दागिने घालून नटायचं. हे सारं करायचं तरी किती दिवस? जर माझं काही होत नसेल तर मला गावी पाठव. नाहीतर आईला इकडे आण." चित्रा सोनाला म्हणाली. ती आज फिरायला जायला तयार झाली होती. तिने नवी रेशमी इरकली साडी नेसून जरीची चोळी घातली होती. हातात सोन्याच्या बांगड्या, गळ्यात बोरमाळ, कानात मोत्यांच्या कुड्या, नाकात लहानशी फुली, बोटात हिऱ्याची आंगठी, असा तिने साज केला होता. परंतु पोस्टमन येऊन गेल्यामुळे तिची निराशा झाली होती. आईची काहीच खबर नाही म्हणून ती सोनावर भडकून संतापून बोलत होती.

"चित्रा! मी तरी काय करू?" सोना वैतागून म्हणाली.

"काय करू? तू आईला पैसे पाठवले?" चित्रा म्हणाली.

"मी मामाजवळ आठशे रुपये दिले. आईच्या घरासाठी आठशे दिले."

"पत्र पाठवलं?" चित्राने विचारले.

"नाही." सोना उत्तरली.

"का नाही?"

"मामाचं पत्र येईल, मग पाठवू म्हणून."

"मग मामाचं पत्र कां येत नाही?" चित्रा कंपित स्वरात म्हणाली.

"ते मी कसं सांगू, चित्रा?"

"मग तू कां नाही जात?"

"कशी जाऊ? तुझं काय होतं ते पाहावं आणि मग जावं म्हणून वाट पाहत राहिल्ये." सोना शांतपणे म्हणाली. ती चित्राची समजूत घालीत होती.

"तू इकडे वाट पाहत राहिलीस, पण तिकडे आपली वाट पाहून तिचे डोळे झाकतील. आईनं किती वाट पाहिली असेल? तिचा आत्मा काय बोलत असेल?" चित्रा उद्विग्न होऊन म्हणाली. तिच्या डोळ्यातून अश्रू वाहू लागले.

"चित्रा! ते सर्व खरं आहे." सोना म्हणाली. "परंतु माझ्या जिवाला चैन नाही. एक घडी धुऊन पाणी पिऊ का दोन घड्या धुऊन पिऊ अशी मी वाट पाहत बसल्ये आणि इथं तुला टाकून क्षणभरही मला बाहेर जाता येत नाही, मग गावी कशी जाऊ मी? तुला टाकून जावं तर..... तर.... अनर्थ होईल."

"काय होईल ते तरी सांग." चित्राने रागाने विचारले.

"तुला आपली अब्रू जपता येणार नाही. इथं येणारे सर्व लोक माणसं नसून ते सैतान आहेत. ते तुला ठार मारतील. तुला माहीत नाही? एकदा त्या लालियाने काय बेत केला होता? आणि त्या दिवशी जनरलनं काय केलं ते तू ऐकलंस!" सोनाने सर्व सांगितले. चित्राला ते पटले. पण तिचे मन रडत होते. ते आईसाठी झुरत होते. ती आज उदास झाली होती. आपण लवकर इथून जावे, इथे क्षणभरही राहू नये, असे तिला वाटत होते. हे सर्व खरेच मोठे कठीण आहे. इथे जरी पैसा आहे, इथे दागदागिने आहेत, इथे जे जन्मात पाहिले नव्हते ते कापड आपण प्रत्यक्ष नेसून फिरत आहोत, जी मोटार कधीही आपण पाहिली नाही त्या मोटारीत बसून आज आपण सारी मुंबई फिरत आहोत, पण या सर्व ऐश्वर्यात काहीतरी भयंकर संकट असले पाहिजे असे तिला वारंवार वाटत होते.

"अक्का! मग आता पुढं करायचं काय?" चित्राने विचारले.

"आता? ऐक. आज कांतीलाल तुला काही बोलणार आहे ते शांतपणे ऐकून घे. आतापर्यंतच्या त्याच्या वर्तनावरून मला वाटतं इथं येणाऱ्या सर्वच लोकांत तो फार सज्जन माणूस आहे. तेव्हा तू त्याचं ऐकून घेऊन पुढं काय करायचं ते ठरव. ते एकदाचं ठरलं की मग सर्व ठीक होईल." सोना म्हणाली.

"काय बोलणार तो?" चित्राने विचारले.

"आज किती दिवस तू त्याच्याबरोबर फिरतेस. पण एकदाही तू त्याच्याविरुद्ध तक्रार केली नाहीस. म्हणून म्हणत्ये, तो माणूस सज्जन आहे. शिवाय पैसाही आहे त्याच्यापाशी." सोनाने आपले मत सांगितले. चित्राचे हृदय धडधडू लागले. आता तो कांतीलाल काय बोलणार आणि पुढे काय होणार या विचाराने तिला घेरले..

"आणि पुढं काय करायचं?" चित्राने आश्चर्याने विचारले.

"जर तुला पटलं की मग सर्व काही करू आणि आईची काळजी तू करू नको. आता काय, हत्ती गेला असून नुसतं शेपूट अडकलं आहे. शिवाय मी पुष्कळ पैसे मामाला दिले आहेत. तो आईला सांभाळील. तिचे हाल होऊ देणार नाही." सोना म्हणाली.

आता चित्राला पुष्कळच कळत होते. मुंबई तिच्या आडसङ्ड्यात येत होती आणि आपणही माणूस आहोत असे तिला वाटत होते. शिवाय कांतीलालबद्दल थोडा आदर वाटत होता. एक मोठा श्रीमंत माणूस, आणि आपण एवढी देखणी तरुणी असून त्याला कधीच पापवासना झाली नाही. किती तरी वेळा सिनेमात अगदी अंधारात एकटेच आपण त्याच्या शेजारी बसलो होतो, परंतु त्याने आपल्या अंगाला स्पर्शसुद्धा केला नाही. जर तो तसा वाईट माणूस असता तर असे कधीच झाले नसते. अग्नीशेजारी तूप पाघळून गेले असते. त्यात कांतीलालने आजपर्यंत किती पैसा माझ्यासाठी खर्च केला! रोज पातळे आणली. दागिने केले. घेऊन फिरला. पण एकदाही त्याची नियत ढळली नाही. पुरुषासारखा पुरुष असून किती अदबीनं वागला आणि वागत आहे. आजवर ज्याने त्याने आपला अपमान केला. तिरस्कार दृष्टीने आपणाकडे पाहिले. परंतु कांतीलाल नेहमी आदराने बोलतो. पुष्कळांनी आपल्या सौंदर्यावर दरोडा घालण्याचा आटोकाट प्रयत्न केला. परंतु कांतीलालने कधीच तसा यत्न केला नाही. आणि असा हा कांतीलाल आज आपणाला काय ऐकवणार कोण जाणे. चित्रा विचार करीत बसली होती. सोना आपल्या कामाला लागली होती.

लालिया नुकताच येऊन बसला होता. तो अलीकडे रोज एकदोन दोस्तांना घेऊन येत होता. त्यावरून त्याचाही काही तरी वेगळा परंतु भयंकर विचार असावा, तो केव्हा तरी वर्दळीवर येणार, असा रंग दिसत होता. तो आज खूष होता. मलमलचा सदरा घालून वर जाकीट घालून गळ्यात रेशमी रुमाल बांधून तो बसला होता. एखादे दिवशी तो जनरलवर तुटून पडण्याच्याच बेतात आहे, असे सोनाला वाटत होते. म्हणूनच तिने कांतीलालला चित्राने मन वळवण्याबद्दल सांगितले होते. "आपलं जे झालं ते झालं. चित्राचं तसं होऊ नये. ती एकदाची गेली की मग आपलंच जे काय होणार ते होवो," असे तिला वाटत होते. सोना चहा करीत विचार करीत होती. आणि आज तिने ते सर्व चित्राला स्पष्ट सांगितलेही. आणि आनंदाची गोष्ट अशी की चित्राने ते सर्व ऐकूनही घेतले.

त्यामुळे तिला आनंद झाला होता. "माझ्या चित्राचे चांगले होईल," ती पुटपुटली.

आणि बाहेरून मोटारीची घरघर आली. ''नमस्ते!'' कांतीलालने येताच हात जोडून म्हटले. त्याने आज सिल्कचा नेहरू सदरा घातला होता. पायजमा घालून पायात जरीचे काम केलेला जोडा घातला होता. हातात उंची सिगारेटचा डबा होता. आज तोही फारच खुशीत होता.

''या शेट. नमस्ते!'' सोना अदबीने म्हणाली.

''काय चाललं आहे?'' कांतीलाल बैठक मारीत म्हणाला.

''चहा करते आहे. बसा. चित्रा इकडे ये ना.'' तिने चित्राला हाक मारली. नंतर ती तिघे चहा पीत बसली.

''वा! चित्रा! तू तर तयार होऊन बसली आहेस!'' कांतीलाल उद्‌गारला.

''मग तुम्हाला काय वाटलं?'' सोना म्हणाली.

''मला वाटलं आपण जाणार आणि चित्रा तयार नसणार.''

''नाही बरं. आमची चित्रा तयार आहे.'' सोना हसत म्हणाली.

'मग छान. म्हणजे मला ज्यादा वेळ बसावं लागणार नाही.'' कांतीलाल चित्राकडे पाहत म्हणाला. त्याच्या डोळ्यात हर्ष चमकत हता.

''नाही. तुम्ही आमच्या चित्राला आता खेडवळ समजू नका.'' सोना चित्राकडे पाहत म्हणाली. चित्राने लाजून दृष्टी दुसरीकडे वळवली.

''नाही बरं. अशा माणसाला तसं म्हणणं म्हणजे पाप आहे.'' त्याने चित्राकडे हात दाखवला व तो हसला.

''अशा म्हणजे कशा?'' चित्राने प्रश्न केला. तिच्या कपाळावर दोनतीन आठ्या दिसू लागल्या. आणि चेहऱ्यावर लटके हास्य तरळले.

''अशा म्हणजे चित्रासारख्या आणि ज्यांच्यावरून जगातील सर्व सुंदर वस्तू ओवाळून टाकाव्या असं वाटतं त्या.....'' कांतीलाल रंगात येऊन म्हणाला. चित्राकडे आज तो नेहमीपेक्षा वेगळ्या दृष्टीनं पाहत होता. आणि ही स्वारी एकाएकी अशी बदलली कशी याबद्दल चित्रालाही आश्चर्य वाटले. चहा संपला. कांतीलाल निघाला. चित्राही निघाली. तिने आपल्या निळ्या रंगाच्या जरीच्या चपला घालून ती चालू लागली. सोना क्षणभर पाहत राहिली. मागून लालिया कुत्सितपणे खाकरला. आज कांतीलाल चित्राला आपल्या मनातील सर्व सांगून टाकील. परंतु हा लालिया? आणि काय उपद्व्याप करतो कोण जाणे. सोना विचार करीत राहिली.

कांतीलालची मोटार मुंबईत दौडून मुंबापुरीच्या राजरस्त्याने गिरक्या घेत घेत शेवटी एका भव्य सिनेमागृहापुढे थांबली. कांतीलालने प्रथम उतरून दार उघडले आणि चित्रा बाहेर आली. आणि ती एखाद्या उन्मत्त गजाप्रमाणे बेपर्वा चालू लागली. तिच्या पोषाखावरून पहाणारांची खात्री होत होती की ही यौवनाची खाण असून आपल्यासारख्या

गालांच्या बेलटच्या झालेल्या गरीबाने तिच्याकडे नुसते पाहणेसुद्धा गुन्हा आहे. शिवाय तिच्यापुढे चालणार तो भाग्यवान आहे. हे अमोल धन त्याचे आहे.

तिकिटे रिझर्व्ह केली होती. म्हणून मध्ये कुठेच न थांबता ती सरळ आत गेली. गडद अंधार होता. तिकडे कोणीही फिरकत नव्हते. फक्त दोनच माणसे बसू शकतील एवढीच ती जागा होती. कांतीलालच्या शेजारी चित्रा बसली होती. इथे कोणता चित्रपट आहे याची तिला मुळीच कल्पना नव्हती. कांतीलाल सिगारेट पेटवून धूर सोडीत बसला होता.

'टॅण्...टॅण्...टॅण घंटा वाजू लागली आणि क्षणात सर्व दिवे विझले. समोरच्या पडद्यावर प्रकाश नाचू लागला. चित्रपट सुरू झाला. आणि त्या दोघांच्या हृदयात कंप भरला. आज आपण आपले सर्वस्व उघडे करून चित्राला सांगणार. ते तिला पटेल का? जर तिने आपले म्हणणे, आपली इच्छा मान्य केली तर आपण या जन्मात धन्य होऊ. असली सुंदर तरुणी जन्मभर आपल्याला लाभणार. हिच्या सहवासात आपण आपले पुढचे आयुष्य घालवू. सुखी होऊ. ही आपल्या पाठीमागून चालताना आपणाला किती मोठा अभिमान वाटतो! तो पुढेही वाटत राहणार. ही मला, माझ्या श्रीमंतीला शोभते. जशी कोंदणात हिरकणी शोभते तशी ही चित्रा मला शोभते. दारिद्र्यात ही अशी माणसे जन्माला येतात. आपण आज हिला जे बोलणार आहो ते कुठे बोलावे? इथे बोलावे की बाहेर?..... कांतीलाल धुराचे लोटच्या लोट सोडीत विचार करीत होता. सिनेमा सुरू झाला होता. पडद्यावरचे प्रसंग प्रेक्षकांच्या डोळ्यांपुढून लुप्त होत होते. सर्वांचे लक्ष त्या पडद्यावर लागले होते.

चित्राचे काळीज आज निराळ्या गतीने लुकलुकत होते. कांतीलाल आज आपणाला काय सांगणार? अक्का म्हणत होती, तो आज काही तरी सांगणार आहे ते ऐकून घे, मग सर्व काही ठीक होईल; परंतु काय सांगणार? काय निराळे सांगणार? सांगून सांगून लग्नाचे सांगणार. आणिक काय निराळे असणार? आपण ऐकू. आणि निराळेच सांगितले तर मग काय करायचे? मग मात्र आपण ऐकून घेऊन अक्काला सांगून त्याचा सरळ इन्कार करणार. पण निराळे ते आणखी काय असेल? जर त्याला निराळेच काही करायचे असते तर त्याने मागेच केले असते. आणि त्याने तसे केले नाही म्हणून तर आपण त्याच्या संगतीत रात्री अपरात्री खुशाल फिरत आहोत. मग त्याने तो आपले जे आज सांगणार आहे ते मागेच का नाही सांगितले? आणि आजच सांगणार आहे? तिला काही कळेना. तिच्या डोकीत गोंधळ झाला. तिने हळूच वळून त्याच्याकडे पाहिले. तोही तिच्याकडे पाहत असल्याचे तिला दिसले. तिने चटकन नजर पुढे पडद्यावर झुगारली.

एका वेश्येचे एका तरुण शिपायावर प्रेम बसते. ती त्याला आवडते. तिला त्याच्यावाचून क्षणभर करमत नाही. तिची आर्थिक स्थिती वाईट असते. घरची दरिद्रता तिला वेश्या करते. म्हणूनच ती वेश्या होते. पण जेव्हा शिपायावर प्रेम बसते तेव्हा तिला

वाटते आता आपण पुन्हा माणसात येणार. आपला प्रियकर आपणाला मिळणार. परंतु स्वत:च्या बापाच्या खुनाचा तिच्यावर आळ येतो आणि कोर्ट तिला जन्मठेपेची शिक्षा देते. त्या शिपायाशी तिचे लग्न होत नाही. जणू तिचे लग्न झाले असते तर या समाजपद्धतीच्या चिंधड्याच झाल्या असल्या. ते पाप त्या चित्रपटाच्या निर्मात्याने केले असते तर त्याच्या धर्माने त्याला शाप दिला असता!

सिनेमा संपला. कांतीलालची मोटार चित्राला घेऊन निघाली. सर्वत्र अंधार पसरत होता. त्या क्रूर अंधारात विजेचे दिवे डोळे वटारून उभे होते. लोक आरामशीर भटकत होते. हसत होते. आनंदाने बेभान झाले होते. मोटार मुंगीसारखी हळूहळू जात होती. रस्त्याकडेच्या झाडाच्या सावलीत कोणी उभे राहून प्रेम या विषयावर हळूच बोलत होते. कोणी हातात हात घालून आपल्या प्रेमाचे प्रदर्शन करीत खुशाल निघाले होते. चित्रा कांतीलाल शेजारी बसून पाहत होती. तिच्या हृदयात गोंधळ झाला होता. जणू ती मोठा विचार करीत होती.

प्रत्येक माणसाचे जीवन विशाल असते. आणि त्या सर्व जीवनांचे मिळून हे विशाल जग झाले आहे. जीवजंतू, पशुपक्षी, सारे सारे जीवनासाठी जगतात, धडपडतात, लढतात. आणि सर्वश्रेष्ठ मानव तर जग बदलतो आणि आपले नवे सुंदर जीवन निर्माण करतो. तो म्हणजे जीवनमंदिरावरचा सुंदर कळसच आहे. परंतु जुने जग नव्या जगाचा मार्ग रोखून धरते. जुने जीवन नव्या जीवनाचा मार्ग बंद करते. त्यामुळे जगाची प्रगती कोंडली जाते. मानवाच्या जीवनाचा कोंडमारा होतो. मग एक माणूस आपल्या जीवनासाठी दुसऱ्याच्या जीवनाचा बळी देतो. एक माणूस आपल्या सुखासाठी दुसऱ्याच्या सुखाला आग लावतो. एक श्रीमंत. दुसरा गरीब. श्रीमंताच्या जीवनापुढे सर्व सुखाने, ऐश्वर्याने लोळावे आणि गरीबाच्या जीवनाने गुलाम असावे.

हा भांडवलदारी जगाचा नियम आमच्या चित्राला कसा कळणार? मुंबईत आल्यापासून ती पाहत होती. सोनाकडे येणारा प्रत्येक माणूस तिची मागणी करीत होता. जो तो तिच्याकडे एखाद्या उपाशी माणसाला शिजलेली कोंबडी दिसावी तसा पाहत होता. तिच्या संगतीत एक रात्र काढावी या एकाच इच्छेने ते आसुसलेले असायचे. - दौलतीच्या बळावर आपण जगात वाटेल ते करू शकतो अशी त्याची घमेंड असायची. आणि आपण त्याच्यापुढे सुद्धा जात नाही. जाऊच शकत नाही. एका खोलीत बंद, अगदी कोंडून बसतो. का? तर आपण गरीब आहोत. गरीब म्हणूनच आपण मुंबईला आलो. गरीब म्हणून मामाने अक्काला इथे आणून तिचा घात केला. गरीब म्हणून माझी अक्का वेश्या झाली. म्हणून मी तिच्या घरी आल्ये. म्हणून मी म्हणजे सर्वांची मेव्हणी झाल्ये आहे. जो तो मी एक रात्र तरी मिळावी म्हणून वाटेल तेवढा पैसा खर्च करायला तयार आहे. चित्राला याची अंधुक जाणीव होती. अशाच विचारांचा गोंधळ तिच्या डोकीत झाला होता.

ती निश्चल बसली होती.

मोटार थांबली. क्षणभर दिव्याचा प्रकाश मोठा झाला आणि विझला. मोटारीचे नाक दर्याकडे होते. वारे भरभरत येऊन समोरच्या तावदानावर आदळून जात होते, सागर शांत होता. त्याची हालचाल मंद गतीने होत होती. दूर एखादे जहाज तरतरत होते. त्याची त्याला पर्वाच जणू नव्हती. जहाजावरचा दिवा लखलखताना मंद दिसत होता. अंधारातून माणसांच्या आकृती मधूनमधून दिसत होत्या. त्या जवळूनच जात होत्या.

''आपण कुठं आलो?'' चित्राने चमकून विचारले.

''हिंदुस्थानचा दरवाजा हा.'' कांतीलाल उत्तरला.

''तो दिवा कसला दिसतो?'' चित्राने समोर धुक्यातून दिसणाऱ्या दिव्याच्या रोखाने बोट दाखवीत विचारले.

''तो जहाजावरचा दिवा आहे.'' तो एक श्वास टाकून म्हणाला.

''किती वाजले आता?''

''आता? साडेनऊ.''

''जाऊ आता खरं. परंतु चित्रा! मला काही तरी सांगायचं आहे.''

''सांगा ना.'' तिचे हृदय लुकलुकले.

''चित्रा! तू नेहमी माझ्याजवळ असावीस असं मला वाटतं.''

''हं.'' तिने हुंकार दिला.

''तू खरंच सुंदर आहेस. तुझं तारुण्य मुसमुसत आहे. तू आता कुठं तारुण्याच्या अंगणात पाऊल टाकलं आहेस. तू बरोबर असलीस म्हणजे माझं मन सागरासारखं भरून डुलू लागतं आणि.....'' कांतीलाल मध्येच थांबला. त्याने सिगारेट पेटवली. आणि ती अधाशीपणे ओढीत तो म्हणाला : ''माझ्याजवळ सर्व काही आहे. परंतु एकच नाही.''

''काय नाही?'' तिने हळूच प्रश्न केला.

कांतीलाल अडखळला. ''नाही म्हणजे, नाही याचा अर्थ सर्व काही आहे. दौलत आहे, ऐषआराम आहे, भरपूर सुख आहे, पण......''

''पण काय नाही.'' तिने पुन्हा प्रश्न आहे.

कांतीलाल स्तब्ध झाला. त्याच्याने पुढे बोलवेना. तो क्षणात खिन्न झाला. आपल्या जवळ काय नाही हे हिला कसे सांगावे याचा तो विचार करू लागला. थोड्या वेळाने त्याने एक निःश्वास टाकला.

''मी तुला सुंदर बंगला घेऊन देतो. सुंदर कपडे देतो. जे जे म्हणून तुला हवं ते सर्व तुझ्या चरणी हजर करतो. तुला हवे तेवढे नोकर मिळतील. हौस मौज कर. पण....'' पुन्हा तो मध्येच थांबला.

हा असा का पुन्हा पुन्हा 'पण...पण...' करून थांबतो आहे? चित्राला आश्चर्य वाटले.

तिला संशय आला. आणि रागही. तिला वाटले, तुला सर्व देतो, घर, नोकर, कपडे, सर्व काही, पण....पण म्हणजे लग्न नाही. मी रखेली म्हणूनच रहावं असं याला वाटतं.

"पण काय?" ती चटकन म्हणाली.

"तो 'पण' फार वाईट आहे. चित्रा! तो तुला कसा सांगू? तू मला हवीशी वाटतेस. तू संगं असलीस म्हणजे मला मोठा अभिमान वाटतो. तू माझ्या पाठीशी असल्यावर दुसऱ्याला वाटतं ही सुंदर स्त्री या माणसाची आहे, हा खरोखर भाग्यवान आहे. आणि म्हणूनच तू मला मिळावीस अशी माझी इच्छा आहे. परंतु तो 'पण' मध्ये आडवा येतो. तो 'पण' जर तुला समजला तर तू दु:खी होशील, माझी कीव करावीशी तुला वाटेल. तुला माझा राग येईल." कांतीलाल थांबला. त्याने दम घेतला. त्याचा आवाज एकाएकी क्षीण झाला. तो लहान मुलाप्रमाणे हळूच म्हणाला : "चित्रा! तू माझा धिक्कार करशील."

"का? तुम्हाला मुलं आहेत?" तिने विचारले.

"नाहीत."

"तुमचं लग्न झालं आहे?"

"नाही."

"मग काय म्हणणं आहे तुमचं?"

"माझं म्हणणं एवढंच की माझं जीवन सुखी करण्यासाठी तू हवीस."

"कशी?"

"तू म्हणशील तशी."

"तुम्हीच सांगा."

"मी लग्नसुद्धा करीन."

"मग?"

"परंतु त्या लग्नांतर मी सुखी होईन का?" त्याचा आवाज कापू लागला.

"म्हणजे?"

"म्हणजे पुढं.... मला भीती वाटते."

"का? कशाची?" तिचा स्वर चढला.

"तू मला मिळाल्यानं मी सुखी होईन, पण..."

"पण काय ते सांगा."

"सांगू?"

"हो."

"रागावणार नाहीस?" तो लाचार होऊन म्हणाला.

"नाही. बोला."

"कोणाला सांगू नको." त्याने विनंती केली.

"नाही. हं."

"मी आहे, पण मी तुझ्या.... मला.... मला पुरुषत्व नाही." त्याने दीनपणे तिच्या पायाला हात लावला. त्याचे डोळे भरून आले. त्याचे हात थरथरले.

"मग तुम्ही लग्न का करता?" चित्रा गंभीरपणे म्हणाली.

"फक्त तुझ्यासारखी सुंदर तरुण स्त्री संगं असावी म्हणून." तो रडू लागला.

"कशाला?"

"माझं वैगुण्य दडविण्यासाठी. लोकांनी मी पुरुष नाही असं म्हणू नये म्हणून."

"परंतु मी माणूस आहे ना?"

"हो, तर... तर..."

"मला मन, भावना."

"आहेत की."

"मग मी काय करावं?" चित्रा निर्भीड होऊन म्हणाली.

"मी त्या तृप्त करू शकतो ना!" तो गयावया करीत म्हणाला.

"कशा?"

"मी तू म्हणशील तो माणूस नोकरीला ठेवीन." कांतीलालचे काळीज धडधडू लागले. त्याला भीती वाटू लागली.

"आणि मग?"

"तो तू सांगशील ते काम करील." तो खिन्नपणे उद्‌गारला.

"असं?"

"कबूल?" तो आतुर होऊन म्हणाला. "कबूल कर, चित्रा, हे माझं म्हणणं कबूल कर. मी माझी सारी दौलत तुझ्या या पायांवर घालतो. मी तुझा गुलाम होतो." त्याने पुन्हा तिचे पाय धरले. "मला ठोकरू नको. तुझ्या सात जन्मांची दरिद्रता नाहीशी करतो. तुला सोन्यानं मढवून काढतो. एवढं मान्यं कर." त्याने नि:श्वास टाकला. आणि ती आता काय उत्तर देणार याची तो वाट पाहू लागला.

"किती वाजले?" ती उद्‌गारली. त्या उद्‌गारात तीक्ष्णपणा जाणवला.

"मग तुझं म्हणणं काय?"

"मोटार सुरू करा. घरी चला."

"मला उत्तर?"

"नंतर." मोटार सुरू झाली.

'हा सुद्धा राक्षस आहे. परंतु याला हातपाय नाहीत." चित्रा मनात बोलू लागली. याच्याबरोबर रात्रीअपरात्री फिरल्ये. यानं अंगाला हात लावला नाही. याचं कारण याला दात नाहीत, नखं नाहीत, म्हणून यानं मला गिळून टाकलं नाही. म्हणून यानं मला

ओरबाडलं नाही. आणि मी याला भला माणूस समजून बसल्ये आहे. हा भला माणूस नाही. हा सुद्धा दुष्ट आहे. हा आपलं बिंग दडावं म्हणून माझा बळी देण्यासाठी तयार आहे. मी याची बायको होणार, हा मला सुंदर मोटारीतून फिरवणार. दागिने घेणार. घर देणार. लग्न पण करणार. आणि माझं शरीर हा आपल्या मोठेपणासाठी दुसऱ्याच्या हवाली करणार. हा चांडाळ माझ्यासाठी रोज नवा माणूस शोधून आणणार. किती दुष्ट लोक या जगात आहेत! हा माणूस देखील अक्काकडे येणाऱ्यांच्या जातीचाच आहे! शेताआड चोरी आणि नवऱ्याआड शिंदळकी करायची परवानगी देणारा हा माणूस माणूसच नाही.' तिचे डोके सुन्न झाले. तिला काय चालले आहे हे कळेना. नुसतीच ती संतापली. तिला सर्वांचा राग आला. तिला सोनाचा राग आला. स्वतःचाही राग आला. कारण ती गरीब होती तरी अब्रूसाठी जिवाचे मोल द्यायला ती तयार होती. जे तिने कधीही ऐकले नाही ते ऐकून चिडली. हे असे का, याचा तिला उलगडा होईना.

कसा होणार? कारण नीती नीती म्हणून टाहो फोडणाऱ्या भांडवलदारी समाजपद्धतीच्या पोटी ते एक कोडे निर्माण झाले आहे. ते एक सत्य असूनही जिवंत नांदत आहे. ते दुष्ट वाटणारे सत्य या समाजपद्धतीला आपले लेकरू वाटते. त्याची चित्राला चीड वाटू नये काय? जे लोक रोज नीतीच्या गोष्टी सांगतात, जे अशोकाच्या संस्कृतीचा दावा करतात, जे रोज जागृती स्वप्नी प्रतिष्ठा प्रतिष्ठा म्हणून बरळत असतात, त्यांनाही ते दिसत नाही. आणि दिसले तरी त्याची खंत वाटत नाही. मग चित्राने संतापण्याचे कारण काय? आपण पुरुष नाही हे दडवण्यासाठी, आपली प्रतिष्ठा कायम राहाण्यासाठी, आपण एका सुंदरीचे स्वामी आहोत हे जगाला दाखवण्यासाठी कांतीलालने चित्राला सांगितले : 'माझी प्रतिष्ठा राखण्यासाठी तू माझी. आणि तुझ्या भावना-वासना-तृप्तीसाठी दुसऱ्याची! एवढेच नाही तर स्वतः ते मी पुरवीन.' यात बिघडले कुठे? पण चित्रा चिडली, तिला हे पटले नाही. कदाचित ही नीती, ही प्रतिष्ठा तिला कबूल नव्हती. किंवा ती तिची नसावी.

मोटार सुरू होती. वारे भरभरत होते. घडोघडी पडणारा पदर घट्ट धरून चित्रा बसली होती. ती कांतीलालकडे पाहतसुद्धा नव्हती. फणकारून समोर पाहत होती. मोटार भन्नाट धावत होती. आपण कधी एकदाचे घरी जातो असे चित्राला झाले होते. डोक्यात विचारांचे काहूर उठले होते. आपल्या मोठेपणासाठी माझा बळी देणार. मोठा आहे हा.....

चित्रा कांतीलालबरोबर बाहेर गेली तेव्हा सोनाला क्षणभर बरे वाटले. कारण आता ती लवकरच त्याच्याबरोबर राहण्यासाठी जाईल, नि आपण एकदाचे मोकळे होऊ. मग आपण कोणालाही भिणार नाही. मग लालिया नि जनरल खुशाल एकामेकाला फाडून खाऊ देत. तिचे बिचारीचे चांगले झाले की झाले. मग आईला आणून त्या दोघी आनंदाने राहतील. आणि ते आता नक्कीच होणार. चित्रालाही तो कांतीलाल

आवडतो आहे. ती त्याला नाही म्हणून उत्तर देणार नाही. अशा विचारात सोना बसली होती तोच पोस्टमन आला आणि एक तार देऊन निघून गेला. सोनाने धडधडत्या हृदयाने ती वरच्या मजल्यावर शेजाऱ्याकडे जाऊन वाचून पाहिली. झाले. तिची जन्मदाती जगातून गेली होती. सखुबाईने 'चित्रा! चित्रा! सोना! सोना!' करून जीव सोडला होता. आणि ती बातमी ऐकून सोनाला मूर्च्छा आली. तिने एक 'आई' म्हणून हंबरडा फोडला. ती पुष्कळ रडली. ती उशीत तोंड खुपसून रडत पडली होती. तोच चित्रा आली. तिला पाहताच सोनाने हंबरडा फोडला. "चित्रा! आई......"

तो सर्व प्रकार पाहून चित्राच्या हृदयात धस्स झाले. क्षणभर ती गोंधळली. आणि दुसऱ्याच क्षणी तिला समजले की आपली आई या जगातून गेली. तिच्यावर आकाश कोसळले. ती पुष्कळ पुष्कळ रडली. रडण्यापलीकडे ती काहीही करू शकत नव्हती. आपल्या मुली मोठ्या व्हाव्या, त्यांनी सुखाने नांदावे, संसार करावा, म्हणून आपल्या आईने जन्मभर जिवाचे रान केले. तिने आपली वाट पाहून तडफडत प्राण सोडला. हे सर्व आठवून चित्रा रडली. त्या वेळी घरात आक्रोश भरला. कांतीलालने सोनाची व चित्राची पुष्कळ समजूत घातली व मध्यरात्री तो निघून गेला.

त्या दिवशी कोणीच जेवले नाही की बोलले नाही. सोना आपल्या खोलीत पडून होती. आणि चित्रा आपल्या खोलीत मग्न होऊन बसली होती. खाली रस्त्यावर रहदारी आपले पाय आखडत होती. मोटारींची ये-जा तुरळक होत होती. रेडिओला अखेरचा आचका बसत होता. त्याचा आवाज घरघरत होता. रस्त्यावर शुकशुकाट होऊन ते निर्मनुष्य होत होते. मंद दिव्यांच्या प्रकाशात रस्ते चमकत होते. जणू ते दमून धापाच टाकीत होते. साऱ्या मुंबईवर अंधाराचे राज्य प्रस्थापित झाले होते. चित्रा खिडकीत उभी राहून रडत होती. थोड्या वेळाने सर्वत्र निर्जन झाले. ती परत फिरली आणि पलंगावर पडली. रात्र शांत होती. पस्तीस लक्ष आवाज बंद झाले आहेत असे वाटत होते. दूर सागर उसळत होता.

चित्राच्या हृदयात वादळ उठले होते. वाईट झाले. आपण जे योजिले, आपल्या आईने जे योजिले, ते निष्फळ झाले. सुखासाठी जी जी धडपड केली ती वाया गेली. जिथे जावे तिथे दु:खच पदरात पडले. तिचे मन पुन्हा पारगावच्या शिवारात गिरक्या घेऊ लागले. ज्या माळाला आपली आई थांबली, आणि आपण पुढे आलो तो माळ दिसू लागला. आईसाठी ज्या ज्या शेतात तिने रोजगार केला ती सारी शेते तिला दिसू लागली. बिनसाबणाने लुगडे धुतले तो दगड, ती वारणा नदी, तिला दिसू लागली. तिचे ते सपर तिला दिसले. आपली आई त्याच सपरात मरून पडली असेल. मरताना तिथे कोणीच नसेल. कोणी तरी नंतरच पाहिले असेल. मग सर्वत्र कळले असेल. "अरं, सखुबाई मेली." मग लोक धावत आले असतील. आईला बिनधन्याची त्यांनी नेली असेल. थोडे

कोणीतरी रडले असेल. परंतु मी तिथे नाही. मी टाहो फोडून रडणारी तिथे नाही. अक्का नाही. वाईट झाले. फक्त रडण्यासाठी जरी मी असते तरी बरे झाले असते. मी अश्रूंचे स्नान घातले असते आईला. पण तेसुद्धा नाही. हक्काने रडण्याची सुद्धा मला संधी मिळाली नाही. आईला आपले हक्काचे रडे मिळाले नाही. तिच्या सांगाड्यावर माझी आसवे पडली नाहीत. कारण मला चांगले व्हावे म्हणून इथे आणली आहे. पण...पण... इथे माझे काय होत आहे? इथे मी डोहात पडले असून बुडत आहे. आणि ती गरीब आई तिकडे दु:खात बुडून गेली. पण मी..... चित्राला वाटू लागले, आपण मोठ्याने ओरडावे. या खिडकीतून उडी घ्यावी. आणि आपल्या आईच्या मागून जावे. व्हावे एकदाचे मुक्त. दुसऱ्याच क्षणी तिला वाटले, आज तसे केले तर सकाळी लोक म्हणतील, 'एक वेश्या मेली. तिनं आत्महत्या केली.' आणि तो कलंक लागेल. जणू त्या मरणाची तिला भीती वाटली. तिला वाटू लागले, मग आपण इथे राहून काय करणार? इथे येणारा प्रत्येक इसम आपणाला वेश्या समजतोच आहे. आणि आपला बळी घेऊ पाहत आहे. तिकडे ती माउली बळी गेली. आक्का बळी गेली. आता माझी पाळी आहे. आपणाला इथं रहाता येत नाही. मरता येत नाही. गाव नाही. घर नाही. एकुलता एक आधार, माहेर - आपले माहेर उध्वस्त झाले. आता कुठं जाणार? जिथं आपण जाऊ तिथं आपली लूट करायसाठी लुटारू टपून असणार. इथं तोच प्रयत्न झाला. पुढंही होणार. मग काय करायचं? ती स्वत:ला विचारू लागली. तिला त्या घरात आता क्षणभरसुद्धा राहवेना. ते सर्व घर तिला गिळायलाच उठले होते. ती उदास झाली. कुठेही निघून जावे असे तिला वाटू लागले. आपले कोण आहे या मुंबईत? ती आठवण करू लागली. तिला काही आठवेना. तिनं पुष्कळ विचार केला. तिला एकाएकी काही तरी आठवले. 'माटुंगा... लेबर... कँप.' ती मनात पुटपटली. 'हो, तानुकाकू....' ती उठून बसली. तिचे काळीज लखलखू लागले. आपण जाऊ, आपण काम करू. तानुकाकू काम करते. ती मला काम लावील. आपण कुठंही पण अब्रूनं जगू. अब्रूनं मरू. मग जावं का? पण कसं जाणार? कुठं आहे ते कोण जाणे. का? त्यात काय? विचारीत विचारीत जाऊ. मिळेल ते. परंतु जर एखाद्याने भलतीकडेच नेले आणि तेच ये रे माझ्या मागल्या... तर नक्कीच आपण बळी जाऊ. मग मात्र सुटणार नाही. मग काय करावे? एक, दोन, तीनचे ठोके वाजले. 'तीन वाजले की!' ती पुटपुटली आणि निश्चल पडून निश्चय करू लागली. तिने पुष्कळ पुष्कळ विचार केला. ते विचार संपता संपत नव्हते. चार वाजले. बाहेर मोटारी गुरगुरू लागल्या. माणसे जागी होऊन बोलू लागली. सारी मुंबईच जणू जागी होऊन उठून बसत होती. चालत होती. चित्रा ऐकू लगली. टॅप् टॅप टॅप टॅप घोडे मानेवर टांगे घेऊन पळू लागले. उद्योगाला सुरवात झाली. पूर्वेला प्रकाश उमलू लागला होता. आकाश लाल होत होते. पूर्वेकडून आल्हाददायक प्रकाश धावत येत होता. आणि पश्चिमेला रात्र पळत होती. जणू

त्यांची निर्वाणीची झुंजच जुंपली होती. आणि शेवटी रात्रीचा पराजय होऊन ती पळून निघाली होती. प्रकाश तिची पाठलाग करीत होता.

चित्रा उठली. तिने गळ्यातील दागिने काढून पलंगावर टाकले. हातातील सोन्याच्या बांगड्या उपसून काढल्या. त्या कांतीलालने घेतलेल्या होत्या. अंगठी काढली. सर्व दागिने काढून तिने टाकले. रात्री नेसलेली हिरवी इरकली साडी तिनं नीट व्यवस्थित केली. केसांवरून फणी फिरविली. उशीखाली हात घालून थोडे पैसे घेतले. आणि दिवा मालवला. ती हळू पावलाने सोनाच्या खोलीत आली. दिवा जळत होता. सोना निजली होती. तिचे तोंड कोमेजले होते. तिच्या गालांवर अश्रूंचे ओघळ उमटले होते ते स्पष्ट दिसत होते.

चित्राला आवंढा आला. तिचा कंठ दाटला. तिचे ओठ थरथरले. तिने आपले ओठ दाताखाली आवळून धरले. आसू गळू लागले. तिच्यापुढे अंधारी आली. तिने पुन्हा पुन्हा अश्रू पुसून सोनाकडे पाहून घेतले. आपण आलो त्या दिवशी जसे अक्काच्या गळ्यात पडलो तसे आताही पडावे, तिला उठवून तिला मिठी मारावी, खूपखूप रडावे, तिचा निरोप घ्यावा. परंतु मग अक्का आपणाला जाऊ देणार नाही. ती एक पाऊल मागे सरली. जणू तिला सोनाची भीती वाटली. 'अक्का! माझे अक्का! तू निजली आहेस. खुशाल निजली आहेस. आई गेली. तूही आता मला अंतरणार. आपण किती तरी दिवस एकत्र काढले. पण शेवटी आपली ताटातूट झाली. वाताहत झाली. मी निघाले आता... आता... आपली भेट... ना...' तिच्या मनाचा आवाज बंद झाला. हृदयाचे ठोके मंदावत जाऊ लागले. आपल्या कंठात दबलेला टाहो एकदम बाहेर पडून आपली अक्का जागी होईल असे तिला वाटले. 'जिथे अब्रूची राख होते त्या भट्टीत तुला टाकून मी जात आहे. मी पळून जात आहे. अक्का! मी जाते. माझी वाट पाहू नको. मला शोधू नको. माझ्यासाठी रडू नको. मग केव्हा तरी मी तुला भेटेन.' चित्रा रडत होती. तिचा आत्मा रडत होता. तो बोलत होता. सोनाचा निरोप घेत होता. परंतु सोना निजली होती. रात्रभर रडून तिला शीण आला होता.

चित्रा हळूहळू मागे सरली. तिची दृष्टी सोनावरून निघत नव्हती. ती दारात आली. तिने आसू पुसले. आणि सोनाकडे पाहिले. आणि ती दाराआड झाली. ती रस्त्यावर आली. तिने चौफेर निरखून पाहिले. एक टांगा येत होता. टांगेवाला डुलक्या घेत होता. त्याचे घोडे त्याला घेऊन खुशाल निघाले होते. एखाद्या शीड मोडलेल्या जहाजाप्रमाणे तो भरकटत निघाला होता. त्याचे नशीब त्या घोड्याच्या हवाली होते.

"शुक्!" चित्राने आवाज केला. आणि टांगेवाला जागा झाला. त्याने घोडे घाईने लगाम ओढून आपले अस्तित्व शाबीत केले. घोडा थांबला. चित्राने त्याच्याकडे निरखून पाहिले. 'न जाणे, हा कसा आहे? हा कुठं नेतो?' तिला त्याची भीती वाटली.

"काय कुठं जायचं बाई?" त्याने अर्धवट शुद्धीवर येऊन विचारले. तोही निरखून

पाहू लागला.

"मला... मला माटुंगा लेबर कँपला."

"हो हो चला." त्याने टांग्यावरचे कव्हर ओढले. चित्रा आत जाऊन बसली. तिचे काळीज धडधडू लागले. आणि 'चम्' करून घोड्याच्या पाठीत चाबकाचा फटकारा बसला. घोडा धावू लागला. तिने मान वर करून सोनाच्या घराकडे पाहिले. परंतु क्षणात ते आड गेले. सोना गेली. तो लालिया गेला. जनरल गेला. चित्रा आपले नशीब टांगेवाल्याच्या स्वाधीन करून पुढे निघाली.

चित्रा टांग्यात बसताच त्या टांगेवाल्याला चेव आल्यासारखा तो त्या घोड्याला चाबकाचे फटकारे मारीत पळवू लागला. एखाद्या चिमणीवर बहिरी ससाणा आपली दृष्टी रोखतो तशीच त्याने चित्राकडे नजर लावली होती. घोडे उधळत पळत होते. चित्राचे मन धडपडत होते.

"हा आता मला कुठे नेणार?"

## ८

मुंबईच्या सागराला भरती आली होती. संध्याकाळचे दर्यावरचे तुफानी वारे लाटा उधळीत धावत होते. प्रचंड लाटांची घोडदौड सुरू झाली होती. सागर खवळून गेला होता. त्याच्या लाटा उसळून त्या आकाशाला खाली ओढू पाहत होत्या. सभोवती अनेक जहाजे नांगरून पडली होती. ती सर्वच त्या संतप्त सागरावर झोके घेत होती. दर्याच्या विशाल तळहातावर ती चेंडूसारखी उडत होती. सागर डिरकाळी देत होता. त्याच्या त्या भेसूर गर्जनेपुढे मानवतेचा शब्द लटका दुबळा वाटत होता. आज त्याच्या अंगात भलताच जोम, त्वेष, चैतन्य संचार करीत होते. त्याच्या विशाल लाटा निर्माण होत होत्या; आणि त्या अतिवेगाने येऊन 'पंजाब' जहाजावर धडका मारीत होत्या; परत जात होत्या. जणू त्या निराश होऊन जात होत्या व खवळून येऊन पुन्हा टक्करत होत्या. ते प्रचंड लढाऊ जहाज डगमगत होते, डुलत होते. परंतु मगरूरपणे खडे होते. कारण ते पडत नव्हते. खाऱ्या पाण्याचे तुषार उंचच्या उंच उडत होते. डेकवरही जात होते. अवघा सागर उसळ्या मारीत होता.

पंजाब जहाजावर जनरल शून्य दृष्टीने मुंबईकडे पाहत होता. त्याने आपली टोपी काखेत घेतली होती. हात खिशात घातले होते. तोंडात पाईप पेटवून आवळून धरला होता. त्याच्या डोकीत विचारांच्या लाटा निर्माण होत होत्या. त्याचे सर्व लक्ष ताजमहाल हॉटेलवर लागले होते. दर्याची धडपड त्याला काहीच वाटत नव्हती. त्याच्या डोळ्यांपुढे

चित्राची सुंदर मूर्ती उभी होती. तो मनात बोलत होता. 'ती गेली. का गेली? कशी गेली? आज तिला जाऊन किती दिवस झाले?' त्याने आपला हात आपल्या तोंडापुढे आणला आणि बोटांवर महिने मोजले. 'ऑक्टोबर, नोव्हेंबर, डिसेंबर, जानेवारी आणि फेब्रुवारी. अरे बाप रे! पाच महिने. आज तिला पाच महिने झाले. ती गडप झाली. वाघानं गिळल्याप्रमाणं गेली. ती कशाची गेली! काहीतरी दगा झाला. त्या साल्यानं, लालियानंच तिला पळवली असावी, नाहीतर ती कुठं जाणार? किंवा तो कांतीलाल! त्यानंच तिला दडवून ठेवली असेल. किती वाईट आहे हे! माझ्यासारख्या माणसाला ती न मिळता एका भलत्याच इसमाला मिळाली. किती वाईट आहे! आता आपलं चित्त इथं लागत नाही. मी एवढा मोठा असून मला मुळीच शांतता लाभत नाही. माझ्या मनासारखं होत नाही. लुसलुशीत चित्रा त्या गद्ध्यानं नेली. रोज त्या सोनाचा तर कंटाळा आला. मग कुठं जावं? इथं? इथं तरी कुठं आहे शांतता? हे खलाशी साले सुखी आहेत. हे इथं वाटेल त्या भानगडी निर्माण करीत आहेत. म्हणे आम्हाला सुवर म्हणू नका; पगार द्या; जेवण चांगले द्या; अरे, पण का? तुम्ही गुलाम आहात बेट्यांनो आणि इंग्रज हे राजे आहेत. ते राजे म्हणूनच नांदणार. त्यांनी तुम्हाला जावईबुवाप्रमाणं वागवावं हे कसं शक्य आहे? शिवाय मी आहे ना हिंदी! मग, मग का कुरकूर? जर तुम्हाला काही हवं आहे तर मग बंदुकी घेऊन लढा. मरा. परंतु हे काय? उपास? अरे, तो गांधीचा मार्ग आहे. आपला नव्हे. मी लढणारही नाही आणि उपासही करणार नाही. मला त्याचं कारणच नाही. मला सर्व काही मिळत आहे. पण नको आहे तेच मिळत आहे. आणि जे हवं आहे ते पळून जात आहे. माझी चित्रा गेलीच की नाही? जाऊन जाणार कुठं ती? आज आपण सोनाकडे जाऊन तिला बजावणार – काय वाटेल ते कर, पण चार दिवसांत चित्रा आलीच पाहिजे. जर ती माझ्या म्हणण्याप्रमाणे इथं नाही आली तर त्याचा परिणाम वाईट होईल. मग नक्कीच सोना घाबरेल. शिवाय त्या सुवर लालियालाही आपण आज हुकूम करायचा की साल्या तूच चित्राला कुठं तरी नेऊन ठेवली आहेस. लवकर आणून दे; नाहीतर तुझ्या नरड्यावर पाय देऊन तुझा जीव काढीन. मग तो साला घाबरून जाईल. नाहीतर काय करणार तो! आपणाला नेहमीच भीत असतो. आपण सोनाला हात लावू नको अशी ताकीद देताच तो नरम आलाच की नाही? मग आता का नरम येणार नाही?' जनरल भलभलते विचार करीत उभा होता.

सूर्य समुद्राच्या काठावर उभा होता. थोड्याच वेळात तो बुडणार होता. त्याचा मावळता प्रकाश त्या अथांग सिंधूवर पसरला होता. त्यामुळे सर्व पाणी रंगीबेरंगी दिसत होते. थंडगार वारे चेकाळल्यासारखे पळत होते. समोर मुंबापुरी शांत वाटत होती. विजेचे दिवे लखलखत होते. जणू ते मुंबईने आपले सहस्र डोळेच उघडले होते. जनरल पावले मोजीत तालबद्ध गतीने डेकवरून खाली उतरला. आणि खिन्नपणे तो निघाला. बाजूला

एक गार्ड उजव्या खांद्यावर संगिनीसह रायफल घेऊन खडा होता. त्याच्याकडे न पाहताच तो पुढे गेला. चार पावले पुढे जाऊन पुन्हा तो उभा राहिला. आणि गर्रकन परत फिरून उभा राहिला. त्याबरोबर तो गार्ड हुशार होऊन त्याने झटकन आपली बंदूक आपल्या डाव्या खांद्यावर उडवून घेतली आणि उजवा पाय डाव्या पायाच्या टाचेवर आपटून उजवा हात बंदुकीच्या दस्त्यावर ठेवला. जनरलची मान उंच झाली. तो गंभीरपणे म्हणाला, ''मीही विसरलो, नि तूही विसरलास.''

त्या गार्डने होकार दर्शवीत मान डोलवली.

''परंतु तुम्ही तसं करून चालणार नाही.'' जनरल कुर्‍यात उभा राहून म्हणाला. ''आज तुम्ही भडकून काहीच्या काही करीत आहात. होय की नाही?''

''नाही.'' गार्ड शांतपणे म्हणाला, ''नाही. आमच्या सर्व मागण्या रास्त आणि न्याय्य आहेत.''

''काय रास्त नि न्याय्य आहे?'' जनरल डोळे फिरवीत म्हणाला. ''अरे पगार, अन्न वागणूक, वगैरे चांगली असावी हे काही वेळ ठीक आहे. परंतु आजाद हिंद फौजेची सुटका, वाईट अधिकार्‍यांना शिक्षा, हे काय? असे कसे मागता येईल तुम्हाला? आणि यासाठी उपास कशाला?''

''नाही. आता आम्ही उपास नाही करणार.'' तो गार्ड सहज म्हणाला, ''आम्ही आता उपास मोडला आहे.''

''वा! छान. पण काय करणार तुम्ही आता?'' जनरल विजयी मुद्रा करून म्हणाला, ''पाहा ना काय मिळाले. मग एवढे करून तुम्हाला अखेर माघारच ना?''

''नाही. माघार नाही.'' गार्ड अ‍ॅटेन्शनमध्ये उभा राहून म्हणाला, ''आम्ही आता संपावर जाणार.''

''काय संप? काम बंद करणार?'' जनरल आश्चर्याने म्हणाला. ''म्हणजे बंड? रिव्होल्ट?''

''तुम्हीसुद्धा हिंदी आहात,'' गार्ड म्हणाला, ''तुम्हीही आम्हाला मदत करा.''

''नाही. ते अशक्य आहे.'' जनरलने आपल्या मानेला जोराचा झटका दिला. आणि अंगात आल्यासारखे करीत तो म्हणाला : ''मी हिंदी असलो तरी मोठा अधिकारी आहे. शिवाय मला बंड करायची गरजच काय? मला भरपूर अन्न मिळतं. मग मी उपास का करावा? मला कोणीही लाथ मारीत नाही. मग मी कुरकूर का करावी? मला पुरेसा पगार मिळतो. मग संपावर कां जावं? आणि मला सर्व अधिकार आहेत. मग मला स्वराज्याच्या भानगडी कशाला? आँ?''

''मग तुम्ही काय करणार?'' गार्डने विचारले.

''मी? तुम्ही संप कराल तेव्हा तुमचा बंदोबस्त करीन.'' जनरल गुर्मीने म्हणाला.

"ठीक." गार्ड म्हणाला. "आम्ही संपावर जाणार."

"तुम्ही खड्ड्यात जा!" जनरल फुसफुसला. "मला काय? पण जेव्हा तुम्ही बंड कराल तेव्हा मी तुमच्याशी निर्दयपणे लढेन. आलं का लक्षात? गुड नाइट!"

तो गर्रकन फिरून चालू लागला. त्याच्या बुटाच्या ठेक्याबरोबर त्याचे विचार नाचू लागले. 'उद्धट लेकाचे! म्हणे संप करणार!' त्याला चीड आली. त्याला त्या खलाशांचा विचारच करायला नकोसा झाला. त्याने धावून आपला पाईप भरला आणि पेटवून दिला.

जनरल रीगल सिनेमापुढून काळ्या घोड्याकडे वळला. त्याला लालियाची आठवण झाली. 'मूर्ख साला!' त्याने एक शिवी हासडली. आणि तो मनात म्हणाला, 'त्याला एखादे दिवशी असा मारमारीन की त्याची आतडी काढीन. त्याचे दात पाडीन. त्याचे तोंड फोडीन. काय वाटेल ते करीन.'

हे करीन, ते करीन, असा विचार करीत तो सोनाच्या दारात केव्हा आला हेच त्याला समजले नाही. अगदी दारात येऊनच तो शुद्धीवर आला. त्याने विजेचे बटन दाबून घंटी वाजवली आणि सोनाने दार उघडले. तिने जनरलला पाहताच एक बळेच स्मित केले आणि तोही मुद्दाम हसला.

चित्रा गेल्यापासून सोना जे काही करीत होती ते सर्व स्वत:च्या जगण्यासाठीच करीत होती. ती निरनिराळे पोषाख करीत होती ते गिऱ्हाइकाला आपण गोड दिसावे म्हणूनच करीत होती. ती नटत होती तेही दुसऱ्यासाठीच. ती येणाऱ्या पाहुण्याचा सत्कार करीत होती तोसुद्धा एखाद्या दुकानदाराप्रमाणेच करीत होती. तिचे कशातच मन लागत नव्हते. आपण भयंकर दुष्ट चक्रात अडकून पडलो आहोत असेच तिला वाटत होते. चित्रा ज्या दिवशी गेली त्या दिवसापासून रड्याने तिची पाठच घेतली होती. आईच्या मरणाची बातमी, की दुसऱ्या दिवशी चित्राचे बेपत्ता होणे, यामुळे ती दु:खाच्या डोहात बुडाली होती. ती सकाळीच उठून जेव्हा चित्राच्या खोलीत गेली होती तेव्हा तिला पलंगावर चित्राचे दागिने दिसले होते आणि एकदम तिचे काळीज चरकले होते. ते जणू काय पेटून गेले होते. त्या वेळी ती दार बंद करून रडली होती; 'चित्रा! चित्रा!' करून टाहो फोडून ओरडली होती. परंतु तिचे रडणे चित्राला ऐकू गेलं नाही. त्या दागिन्यांवर सोनाने अश्रू ढाळले. ते पोटाशी धरून ती रडली, सर्वत्र चौकशी केली. सर्वांना विचारले. कांतीलालला विचारले. लालियाला विचारले. पण चित्राचा पत्ता कोणीही सांगितला नाही. ती कुठे गेली, कोणी नेली की तिने या दुष्टपणाला कंटाळून आत्महत्या केली? काय, झाले काय? असे विचार तिच्या मनात आले. परंतु चित्राचा शोध लागला नाही. तिला वाटत होते, आपले सर्व काही गमावले. आपली आई गेली. आपली बहीण गेली. आपण आता एकटेच या जगात आहोत. आता जोपर्यंत जिवंत असू तोपर्यंत आपल्यासाठी कोणीच नाही. आई नाही. बहीण नाही. लाज नाही. लज्जा नाही. आपण असेच बाजारात बसून देह विकून

दुसऱ्याला खूष करून खूष राहिले पाहिजे. नाही तर आपण जगूच शकत नाही.

असा विचार करून ती सर्व वेळ खिन्न, दु:खी राहत होती. ती एक क्षणभरही चित्राला विसरत नव्हती! क्षणोक्षणी तिला चित्राची आठवण होत होती. त्यात हा जनरल तर चित्रासाठी वेडा झाला होता. तो रोज येऊन चित्राची आठवण काढीत होता. तिला शोधून आणण्याबद्दल तगादा लावीत होता. कधी ओरडत होता, भांडत होता, काय वाटेल ते करीत होता. किंवा लालियावर चवताळून जात होता. तो लालियासुद्धा जनरलची पर्वा करीत नव्हता. आता तोही त्याला भीत नव्हता. तोही हमरीतुमरीवर येऊन दोघांचे भांडण भलतेच वाढत होते. मग सोनाच मध्ये पडून त्यांचे ते क्रूर भांडण मिटवीत होती. आणि जेव्हा जनरल आणि लालिया समोरासमोर येत तेव्हा सोनाची पाचावर धारण बसत होती. तिचे हृदय कापत होते. आजही लालिया घरात होता. आणि जनरल आला होता. त्यामुळे ती हादरून गेली. त्याला खूष ठेवण्यासाठी तिने लटकेच स्मित केले. आणि जनरलनेही मुद्दाम हसल्याप्रमाणे करून तो आत येऊन खुर्चीवर बसला. त्याने चहूकडे नजर फिरवीत विचारले, ''हं, काय सोना! चित्राची बातमी मिळाली का?''

''कशी मिळणार?'' सोना एक दीर्घ नि:श्वास टाकून म्हणाली. ''जनरल! चित्रा काय मला विचारून गेली आहे? आतापर्यंत पुष्कळ खटपट करून पाहिली. परंतु तिचा पत्ता नाही. अगदी होती की नव्हती झाली आहे.''

''ती होती या जगात.'' जनरल ओरडला. ''आणि आजही आहे व असलीच पाहिजे. म्हणून तिचा शोधही लागला पाहिजे.''

''अहो! परंतु असं कसं?'' जनरल ओरडू लागताच सोना भयभीत होऊन म्हणाली, ''ती मला जर सांगून गेली असती तर निराळी गोष्ट होती. आणि गेली ती काय परत येण्यासाठी गेली नाही. आता ती मेल्यातच जमा आहे!''

''काय मेल्यात जमा?'' जनरलने भुवया वर चढवून मारक्या बैलासारखी मान वाकडी करून म्हटले, ''कशी मेली? जर इथं मेली असती तर बरं झालं असतं. परंतु मी म्हणतो ती मेली नाही. ती आता या क्षणाला जिवंत आहे. आणि पूर्वी होती तशीच आहे. म्हणजे तरुण, देखणी, सुंदर आहे. ती मला दिसलीच पाहिजे. आणि खरं सांगतो, तिला या साल्यानं लपवून ठेवली आहे.'' त्याने आपले आखूड बोट लालियावर रोखले. सोनाचे हृदय उडू लागले.

''हां, हां! नेली आहे.'' लालिया खोलीच्या दारात येऊन नाक फेंदारून म्हणाला. ''मग तू काय करणार, बोल! मी आतापर्यंत तुला भिऊन वागलो. परंतु तू मूर्ख आहेस. मला रोज भीती दाखवू लागलास, पण आता मला तुझी भीती वाटत नाही. मी एके काळी या घराचा मालक होतो. तू गिऱ्हाईक होतास. आता तू इथं येऊन धनी बनला असून मला धमक्या देतोस. मी तुला भीत नाही. बोल, तू काय करणार?'' त्याच्या मिशया ताठ झाल्या.

"काय करणार?" जनरल गुरकला. "मी तुझी आतडी काढीन. तुझे दात पाडीन. तुला गोळी घालीन. तू चोर आहेस. तू चित्राला नेलीस."

"हो, नेली." लालिया म्हणाला. "मग घाल की गोळी. मीही तुला जिवंत मारून दाखवतो बघ."

दोघांचे बोलणे आता चढत जाऊन ते हातघाईवर आलेले पाहून सोना घाबरली. हे दोघे आपसात मारामारी करून दोघांपैकी एक मेला की आपणही त्यात अडकू. आपल्याचमुळे त्यांचे भांडण झाले असे सिद्ध होईल. ती चटकन उभी राहिली. तोच जनरल उसळून उठला. तो बेभान झाला. त्याने खिशात हात घालून पुन्हा काढला.

"काय म्हणालास? मला भीत नाहीस?" जनरल मोठ्याने ओरडून म्हणाला, "थांब. तुझे दात पाडतो." तो लालियाच्या अंगावर धावून गेला. लालियाही हात आखडून तयार झाला.

तोच सोना मध्ये पडली. तिने जनरलची मनधरणी केली. लालियालाही समजावले. ती म्हणाली : "नका, नका. तुम्ही आपसात भांडू नका!"

"भांडू नका तर काय? आम्ही काय करावं?" जनरल ओरडला, "आम्ही भांडणार. नाही तर या साल्यानं मला भ्यालंच पाहिजे. आणि चित्राला आणून दिली पाहिजे. तो म्हणतो, 'हो, नेली आहे.' मी म्हणतो, 'मग आणून दे. नाहीतर तू जगणार नाहीस.' मला चित्रा हवी आहे. जर लालियाला जीव हवा असेल तर त्यानं माझी चित्रा मला दिलीच पाहिजे." त्याने सोनाला बजावले : "आणि तू सुद्धा तिचा तपास कर. मला कळव. ती येत नसेल तर तिचा पत्ता सांग. मी तिला आणीन." आणि मग त्याने आपले तोंड लालियाकडे फिरवले. "ए! तूही ऐक. चित्राला या चार दिवसात घेऊन ये. मी तुला मुदत देतो. आजपासून चार दिवसात, म्हणजे आज तारीख सतरा आहे. मी चार दिवस गप्प बसतो. तू एकवीस तारखेला सकाळी दहा वाजता चित्राला घेऊन ये. नाही तर जा मसणात. मी तुला नक्कीच ठार मारीन. जा. मी तुला हुकूम देत आहे."

जनरल बडबडून खाली बसला. सोनाला बरे वाटले. तिचा जीव भांड्यात पडला. आतापुरता तरी एक मोठा प्रसंग टळला याचे तिला समाधान वाटले. लालिया कुरकुरत आपल्या खोलीत गेला. तो अश्लील शिव्या देत बसला. सोना खिन्न होऊन बसली होती. जनरल गंभीर चेहरा करून कसला तरी विचार करीत होता.

सर्वत्र शांतता प्रस्थापित होत होती. दिवसभर माणसांनी बहरलेली मुंबई आता निर्मनुष्य होत होती. अधून मधून एकादी मोटार भरभरत जात होती. नाच तमाशाला गेलेले श्रीमंत लोक परत आपल्या महालांकडे परतले होते. कोणी प्रेमी जीव बकुट्यात बकुटी घालून तालबद्ध चालत होते. कोणी गळ्यात गळा घालून हळू हळू निघाले होते. ते सर्व आपापल्या विचारात दंग होते. सूर्यप्रकाशासारखा तेजदार दिव्यांचा प्रकाश आता मंद भासत होता.

रस्त्याकडेने हेलपाटीवाले आपल्या पाट्या उशाला घेऊन खुरमुंडी घालून निजले होते. वारा धुरळ्याचे लोट उडवीत आणून त्यांच्या अंगावर झुगारीत होता. सारी मुंबई निद्रेच्या स्वाधीन होत होती. निम्मी निजली होती. ते जागे होते ते सर्व लवकरच निजणार होते. सर्व जगच निजणार होते. जणू ती रात्रसुद्धा निजत होती. सर्वत्र शांतता, अगदी गंभीर शांतता पसरत होती.

परंतु सोनाच्या दारात भेसूरता उभी होती. जनरलचे हृदय अपमानाने पेटले होते. त्याला झोप येत नव्हती. सोना धडधडत्या मनाला धीर देत बसली होती. 'लालियानं माझा अपमान केला. मला तो भीत नाही. मला सर्व लोक भितात, आणि हा साला भीत नाही.' जनरल मनात जळत होता. तो उद्विग्न झाला होता. त्याला वाटत होते, आताच जाऊन आपले पिस्तूल आणावे. आणि लालियाला गोळ्या घालून ठार मारावा. लालिया आपला चाकू मुठीत घेऊन बसला होता. तो मनाला सांगत होता : 'हे पाहा, जर यानं पुन्हा गडबड केली तर बेलाशक धावून जा आणि काढ बेट्याची आतडी. मरून जाऊ दे भडव्याला. मग पाहू पुढं काय होणार आहे ते. काय होणार? फाशीच ना? नाहीतर जगून तरी काय करायचं? कशाला असं जगायचं? या जगण्यापेक्षा मरणच चांगलं. एवढी सुंदर सोना असून मला काय करायची? मला तिला बोलायची चोरी, मारायची चोरी, रागानं पाहायची चोरी, सर्वच गोष्टींची चोरी. मग जगा कशाला? ती पोरगी म्हटलं मिळेल, पण तीही निघून गेली. शेवटी सोना तरी आपल्याशी नीट वागेल असं वाटलं. परंतु हा जनरल पुढे भुतासारखा आडवा आहे. मग त्याचा खून करून स्वतः मरून जाण्यातच फायदा आहे. ही सोना तरी मुक्त होईल. जेव्हा तेव्हा हा दादागिरी करीत आहे. आणि मी हिजड्यासारखा गप्प बसलो आहे. म्हणूनच हा साला चढून गेला आहे. आता कसा जरा पुढे जाताच नरम झाला. आता जर त्यानं आँ केलं तर त्याला ठारच कर.'

सोनाही विचार करीत होती : 'लवकरच या दोघांपैकी एकाचा मुडदा पडणार आणि तो लवकर पडावा. परंतु इथे माझ्या घरात नको. ते दोघेही खाली रस्त्यावर जर लढून मेले तर मी खुशाल दहीभात खाऊन सिनेमाला जाईन. या दोन लांडग्यांच्या भीतीनंच माझी चित्रा कुठं तरी गेली. यांनीच तिला भीती घातली. या दोघांच्या डोळ्यात ती सलू लागली होती.' तिला जनरलच्या पिसाटण्याची आठवण झाली. त्या रात्री जनरल ओरडून म्हणत होता : 'मला इथं निजायचं नाही. मला त्या चित्राच्या खोलीत जायचं आहे.' सोनाने हळूच एक तिरस्कारयुक्त नजर जनरलकडे फेकली. तो टेबलावर डोके टेकून डुलक्या घेत होता. आता सर्वत्र निःशब्दता होती. वरच्या मजल्यावरचे घोरणे खाली ऐकू येत होते. अगदी सामसूम होती. रात्र हळूहळू मागे जात होती. अधून मधून डॉकमध्ये रखवालदार तासातासाला घंटा देऊन रात्रीचा अंदाज देत होता. सकाळी पाचचे ठोके पडले. आणि तो जनरल शुद्धीवर आला. त्याने तळहाताने आपली लाळ पुसून टाकली.

मुंडी हसडून सरळ केली. आणि तो उठून उभा राहिला. "बरं सोना!" जनरल म्हणाला. "मी जातो आता. आता मी तारीख एकवीस रोजी सकाळी दहा वाजता येईन. तोपर्यंत चित्राचा शोध लागलाच पाहिजे. त्या लालियाला सांग की मी येईन तेव्हा चित्रा इथं हजर पाहिजे. नाही तर या घरातून एक मुडदाच बाहेर काढावा लागेल."

सोना पलंगावर पडून ऐकत होती. तिनं मानेनेच होकार दर्शविला. ती मुळीच बोलली नाही. नंतर जनरलने आपला पाईप भरून त्याला काडी लावली आणि तो म्हणाला : "ओ.के. मी जातो." त्याने खिशात हात घालून चुरगळा झालेल्या नोटा काढून टेबलावर ठेवून दिल्या. आणि दमदार गतीने तो परत फिरला व दार एका बाजूला लोटून तो बाहेर पडला. तोच लालियाही दारात आला. त्याने गंभीर मुद्रा करून इकडे तिकडे पाहिले आणि जनरलच्या मागोमाग तोही बाहेर पडला. सोनाला त्याच्या हातात तो चाकू दिसला. तिचे काळीज चरकले. आणि लगेच तिला आनंदही झाला. 'आता या दोन राक्षसांची झुंज होणार.' सोना पुटपुटली. आता काय ऐकायला येणार? तिने कान टवकारले. हा लालिया जनरलला मारायला गेला की चित्राचा शोध करण्यासाठी गेला? तिचे ऊर धडधडू लागले. घरात निर्भयता शिरली. जणू सर्व दु:ख, क्रूरता, भेसूरता, त्या दोघांबरोबर बाहेर गेली आणि सोनाला मोकळे मोकळे वाटू लागले. आनंद झाला. परंतु लालिया कशाला गेला? तो काय करणार? तो जनरलचा खून करणार की चित्राचा शोध करणार? तिचे काळीज उड्या मारू लागले.

## ९

पावणेसहा वाजले होते. प्रचंड गिरणीचे धूड हादरून सोडणारी यंत्रे घुमत होती. अगदी भिंगरीप्रमाणे ती फिरत होती. जणू हातघाईवरच ती आली होती. निरनिराळी यंत्रे एकजिवाने फिरत होती. कपडाखात्यात धोट्यांवर रट्टे बसून ते धावपळ करीत होते. कुबट घाण सर्वत्र तरळत होती. सारी जमीन, भिंती तेलकट झाल्या होत्या. रोहिंग खात्यात साचे किंचाळत होते. त्रासन खात्यात शेवटचा डाफ भरत होता. सर्व यंत्रे बेगुमानपणे गिरक्या घेत होती. अगदी मुकाट्याने चालत होती. गरम वाफेचे भपकारे निघत होते. गोंगाट सुरू झाला होता. त्याबरोबर कामगारांची धावपळही चालू होती. गंभीर सुतकी चेहरे त्या यंत्रांबरोबर फिरत होते. त्यांचे हात आपोआप हालत होते. पायही आपोआप उचलत होते. जणू काय त्या क्षणी तिथे राबणारी मानवता त्या यंत्रांबरोबर एकजीव झाली होती. घामाचे ओघळ येऊन सर्व चेहरे भिजून चिंब झाले होते. त्यावर कापसाचे थर चिकटून बसले होते. वेगाने, अति वेगाने सर्व काही फिरत होते. यंत्रे, माणसे, वारे, वाफ, सर्व

काही फिरत होते. जणू तिथले सर्व वातावरणच फिरत होते. यंत्रांच्या ठेक्यावर कामगार आपली हालचाल करीत होते. त्यांचे डोळे यंत्राच्या बारीकसारीक हालचालींवर करडा पहाराच जणू करीत होते. तेसुद्धा धावत होते. अंगाला चटके देणारी उष्णता तरळत होती. ती कामगारांच्या हाडाला भिडून रक्ताचे पाणी करीत होती. जणू ती सर्व यंत्रे त्या उष्णतेच्या भीतीनेच थरथरत होती. आणि पिसाटाप्रमाणे घरघरत फिरत होती. आणि कामगाराचा जादूगार हात त्यांच्यावर आपली सत्ता गाजवीत होता. कामगारांचे अनंत कर त्या राक्षसी यंत्रांना मानवतेचा नियम शिकवीत होते. जर तिथे कामगार नसता, तर त्या यंत्रांनी विध्वंस निर्मिला असता असा भास होत होता. कामगार त्या यंत्रांना हवे ते वळण लावून अपार दौलत निर्माण करीत होते. त्यांच्या अंगावरची वस्त्रे भिजून चिंब झाली होती. कारण ते त्या यंत्रांबरोबर गिरक्या घेत होते. जणू त्या यंत्रात नि कामगारात काडीभरही दुजेपणा नव्हता. जणू कामगार नि यंत्र एकच आहेत. तिथे कामगारांचे निराळे अस्तित्व नव्हते. एवढे कामगार त्या यंत्रांशी एकरूप झाले होते. आधी यंत्र की आधी कामगार हा प्रश्नच नव्हता. तर यंत्र नि कामगार दोन्हीही त्या गिरणीच्या मालकासाठी? हा प्रश्न होता. म्हणूनच त्यांची धावपळ चालू होती. आणि पावणेसहावरून घड्याळाचा लांब काटा बाराच्या आकड्याकडे हळूच गोगलगाईच्या चालीने निघाला होता. त्या काट्यावर सर्व कामगारांचे लक्ष केंद्रित झाले होते. आणि ते त्या यंत्राशी झटापट घेत होते. परंतु त्यांची मने आपापल्या घरी जाऊन पोहचली होती. कोणाच्या डोळ्यापुढे आपली मुले खेळत होती. कोणाच्या डोळ्यापुढे आपली बायको दिसत होती. कोणाला बाहेर पडायची ओढच लागली होती. त्यांना आता तो ताप असह्य झाला होता. त्यांच्या शक्तीला विश्रांतीची गरज भासत होती. परंतु यंत्रे फिरत होती.

सर्वांच्या वरच्या मजल्यावर वाइंडिंग खात्यात पदर कमरेला बांधून चित्रा फिरत होती. तीही समोरच्या घड्याळाकडे वरचेवर पाहात होती. तिचे मन आपल्या घरी गेले होते. तिला जयाची आठवण झाली होती. वीस वर्षांचा तरुण सुंदर. आणि बाळपणाचा मित्र. अगदी चित्राला जसा हवा होता तसा तो जया तिला दिसत होता. त्याची मूर्ती तिच्या चक्षूंपुढे उभी होती. आणि म्हातारी तानुबाई वईस निवडीत घड्याळाकडे पाहत होती. तिचा जया दुसऱ्या गिरणीत कामाला होता. तो घरी येणार होता. त्याची तिलाही आठवण झाली होती. परंतु गिरण चालू होती. घड्याळाचा काटा सरकत होता. जॉबर डॉफर आरडत ओरडत धावत होते. शिट्या मारून आणि वर हात करून हालवून शेवटचा झाडू मारण्याची खूण करीत होते. आणि पुन्हा पुन्हा घड्याळाकडे पाहात होते. जणू पुढे पुढे सरकणारा काटा एकाच जागेला उभा राहावा असेच त्यांना वाटत होते. परंतु शेवटी एकदम सर्वच यंत्रे बंद झाली. सर्व कामगारांनी सुटकेचा निःश्वास टाकला. कोणी अंग झटकू लागले. कोणी कपडे घालू लागले. आणि सर्वच जण बोलू लागले. जणू

त्या यंत्रांच्या घरघरीने त्यांचे बोलणेसुद्धा बंद झाले होते. तोच दाजी मास्तर ओरडत आला : "उद्या गिरणी चालू आहे. कुणीही घरी राहू नये. जो कोणी खाडा करील त्याची खैर नाही." आणि सर्वच मुकादम ओरडले : "ए, ऐका रं. उद्या संप होणार हाय. तरी कुणी घरात बसून राहू नका. कामावर आलंच पाहिजे."

दाजी मास्तर आपले अवजड शरीर ढकलीत वाइंडिंगमध्ये आला आणि चित्राच्या साच्यापुढे उभा राहिला. त्याने गालात पानाचा तोबरा भरला होता. त्याची एक पिचकारी टाकली. त्याची एक बाही पार खाली लोंबत होती. ती त्याने वर उडवली आणि सर्व शरीराला झटका देऊन तो म्हणाला : "ए! उद्या घरी राहू नको. ऐकू आलं?" चित्राने त्याच्याकडे दृष्टी फेकली व ती म्हातारीकडे निघाली. म्हातारी आणि चित्रा बाहेर पडल्या.

दरवाज्यात एकच गर्दी झाली होती. सर्व कामगार विचार करीत होते. "उद्या संप होणार!" गर्दीतून चित्रा बाहेर पडली. ती तानुबाईला घेऊन घराकडे निघाली होती. हातातील जेवणाचा डबा म्हातारीकडे देऊन चित्रा एक घोळक्यात शिरली. तिथे गिरणी कामगार युनियनचे स्वयंसेवक पत्रके वाटीत होते. त्यांच्या सभोवती कामगारांनी भलतीच गर्दी केली होती. चित्रा एक पत्रक घेऊन आली आणि तानुबाई व ती पुढे निघाल्या. लोक पत्रक वाचत रेंगाळत जात होते. कोणी ती पत्रके घरी जाऊन निर्मळपणे वाचण्यासाठी घडी करून ठेवीत होते. कोणी वाचून विचारमग्न झाले होते. सर्वत्र बोलणे चालू होते. "उद्या खलाशांसाठी एक दिवसाचा संप." चित्रा आणि तानुबाई नायगावची गिरण मागे टाकून ट्रामच्या रस्त्याने पुढे निघाल्या होत्या. दादर पोस्टाजवळ येताच म्हातारी म्हणाली, "चित्रा! काय ग, उद्या कसला संप?"

"खलाशांसाठी." चित्रा म्हणाली. "बंदरात खलाशांनी सरकारला काही मागण्या सांगितल्या, पण त्या सरकारनं नाकारल्या. तेव्हा सर्व खलाशी उद्या संपावर जाणार आहेत. त्यांना पाठिंबा देण्यासाठी गिरणी कामगारांनी एक दिवस संप करावा असं युनियनचं सांगणं आहे." कम्युनिस्ट पार्टीची एक लॉरी स्वयंसेवकांनी भरलेली पुढून आली. ती पत्रकांचा पाऊस पाडीत गेली.

"चित्रा! मग संप होणार?" म्हातारीने विचारले.

"होय. होईलसं वाटतं." चित्रा उद्गारली.

त्या दोघीही पावले उचलून चालू लागल्या.

चित्रा ज्या दिवशी सोनाच्या घरातून बाहेर पडली त्या दिवशी रविवार होता. टांगेवाल्याने तिला न्याहाळून पाहताच तिला भीतीच वाटली होती, परंतु ती नाइलाजास्तव त्या टांग्यात बसली होती. आणि ते कष्टाळू घोडे लेबर कँपच्या रोखाने पळत होते. उगवत्या सूर्याची कोमल किरणे त्या लेबर कँपावर पसरली होती. आणि तिन्ही बाजूंनी

असलेल्या रेल्वेच्या वेढ्यात तो लेबर कँप बसला होता. अजगरासारख्या त्या चाळीच्या तीन ओळी सुस्कारे टाकीत पडल्या होत्या. त्या भकास गंभीर दिसत होत्या. अगदी निर्जीव पडल्या होत्या. त्यांचा तो मळकट रंग उदास वाटत होता. त्यांच्या उशाला एक रेल्वे फाटा धावत होता. आणि पायथ्यास झोपड्यांचा ढीग लागला होता. एका बाजूने साऱ्या मुंबईची घाण कुठे तरी जात होती. उगीचच मध्ये शिरून पुढे गप्प पडलेला रस्ता आज माणसांनी फुलला होता. मुलेबाळे खेळत होती. सुट्टीचा दिवस असल्यामुळे कामगार आपआपल्या दारात बसून काही ना काही करीत होते. भाजीपाला विकणाऱ्या माळणी आपले पाले मांडून बसल्या होत्या. सर्व उद्योग सुरू झाले होते.

तानुबाईच्या घरी जया उठून चहा पीत बसला होता. तो अर्ध्यावर शाळा व गाव सोडून मुंबईत कामगार झाला होता. अवघ्या तीन वर्षांच्या आपल्या नातवावरच तानुबाई आयुष्य कंठीत होती. लेक मरण पावल्यानंतर तानुबाईने जयाला पारगावला आणले होते. तिथे काही दिवस काढले. तिथे आठ वर्षे राहून नंतर ती तांदुळवाडीला जाऊन राहिली. लोकांचा दळाकांडा करून जयाला मोठा केला. जेव्हा तो जया भर जवानीत आला तेव्हा पुढे बेचाळीसची चळवळ सुरू झाली आणि जयाने शाळा सोडली. आणि तो कानात वारे शिरल्याप्रमाणे करू लागला. त्याला वाटू लागले : "खरंच, इथं आमच्या देशाचे आम्हीच मालक असायला हवे. परंतु हे इंग्रज जबरीनं आम्हांवर राज्य करीत आहेत. त्यांना उलथून पाडलंच पाहिजे." तो त्या लढ्यात सामील झाला. आणि तानुबाई घाबरून गेली. तिला वाटू लागले, ही लहान लहान पोरे एवढ्या बलाढ्य सत्तेशी झुंज घेऊ पहात आहेत हे काही बरे नाही. जर जयाला काही झाले, जर सरकारने त्याला पकडून फासावर चढवले तर मग आपण एवढी मेहनत केली ती फुकट जाईल. आपल्या पोटीपाठी कोणीही नाही. फक्त एवढाच आपला आधार तोही मोडून पडेल. असा विचार करून तिने जयाला हळूच फसवून मुंबईला आणले होते. आणि एका गिरणीत तो कामगार म्हणून राबू लागला. परंतु त्याला मुंबईत निराळेच मित्र मिळाले. त्याच्या स्वराज्याच्या पुसट कल्पनेला भरीवपणा येऊ लागला. त्याचा क्रांतिकारकपणा अधिक खंबीर झाला. निरनिराळे वाद त्याला समजू लागले. तो रात्रंदिवस अभ्यास करू लागला. आणि पहिल्यापेक्षाही जोराने तो म्हणू लागला की, "इंग्रजांनी गेलंच पाहिजे." त्याच्या वागण्याने, बोलण्याने, वर्तनाने लोक त्याला मोठा समजू लागले. जया बोलेल ते सत्य मानू लागले. त्याचे विचार, त्याचा आचार, त्याचे स्वरूप सर्व काही सुंदर होते.

त्या दरम्यान जयाचा चुलता लढाईवरून परत आला होता. तो रंगाने काळा होता. त्याचे नाक सरळ होते. परंतु तो भलताच मगरूर होता. तो लढाईवर असताना त्याची बायको मरण पावली होती. तो आता जयापाशीच राहात होता. सरकारने मेहरनजर होऊन त्याला पोलिसाची नोकरी दिली होती. त्याला जयाची सरकारविरोधी भाषा मुळीच आवडत

नव्हती. तो राजनिष्ठ होता, तर जया हा सरकारचा द्वेष करीत होता. दोघांचे रोज खटके उडत होते. तो जयाचा चुलता नुकताच आपल्या कामावर जाण्यासाठी तयार झाला होता. लोक त्याला सुभानराव म्हणत होते.

"जया! तुम्हा पोरांना अक्कल नाही." सुभानराव आजही चिडून बोलत होता. "हे सरकार हाणून पाडणं सोपं नाही. अरे, हे राज्य सात जन्मात मिळणार नाही. आज काठीला सोनं बांधून तुम्ही फिरू शकता. परंतु जर हिंदी लोकांचं राज्य झालं तर माणसाला माणूस खाऊन टिरीला हात पुशील. मग रडाल." तो आपल्या कमरेच्या पट्ट्यात हात घालून मारे ऐटीत उभा राहून बोलत होता. त्याच्या नाकाच्या खाली असलेला हिटलरी फॅशनचा मिश्यांचा पुंजका ताठ खडा होता. तो सवयीप्रमाणे कुर्ऱ्यात उभा होता. तो आपले कावळ्याच्या डोळ्यांसारखे डोळे गरगरा फिरवीत होता. त्याच्या गालावरची संगिनीची जखम सणसणीत दिसत होती. जयाला आज सकाळीच भांडण नको होते. तो मुद्दाम ते टाळीत होता. तो पुढे पाहून चहा पीत होता. जया सुभानरावावर क्वचितच चिडत असे. नाही तर नेहमी त्यांचे बोलणे टाळी. तो मनात म्हणे : "हा लष्करी माणूस आहे. याला कितीही समजावून सांगितलं तरी याचं शेपूट आपलं वाकडंच असणार, शिवाय दोनतीन हजार रुपये स्वारीचे बँकेत आहेत. नवी बायको करून सरकारी नोकरी करून प्रपंच करायची याची हौस भलतीच दांडगी आहे. तेव्हा याला काय? त्यात हा आपला चुलता आहे. वेडंवाकडं बोलावं तर तेही बरं नाही."

परंतु अलीकडे सुभानराव दारूही पिऊन येत असे आणि युरोपात लढाईवर असता आपण काय काय केले ते बरळत असे. अशा गोळ्या सुटत, असे बाँब पडत, असे लोक मरत, आम्ही असे लोकांना मारीत असू, वगैरे त्याचे बडबडणे सुरू होताच जयाचे डोके भडकून जाई आणि त्याला वाटे : "याला मेलेलं कुत्रं ओढून टाकल्याप्रमाणं त्या गटाराकडे फेकून द्यावा." परंतु तानुबाई त्याला सांगत होती : "जया! जाऊ दे. तो कसाही असला तरी तुझा चुलता आहे." मग त्याचा नाइलाज होई. आजही सकाळीच त्याने किरकीर चालू केली होती. इतक्यात एक मुलगा दाराच्या आत मुंडके घालून म्हणाला : "ए आजे! हे बघ कोण आलं!"

म्हातारी चुलीपुढून उठून दारात आली आणि "कोण, चित्रा?" असे आश्चर्याने उद्गारली व चित्राच्या गळ्यातच पडली. चित्राही तिला कडकडून भेटली. तिचे डोळे आसवांनी भरले. दारात काय भानगड आहे हे पहाण्यासाठी हातात चपाती घेऊनच जया दारात आला. सुभानरावही त्याच्या मागे होता. तानुबाईने चित्राला ओढीतच घरात नेली. ती आनंदित होऊन म्हणाली : "चित्रा! ह्यो बघ माझा जया." चित्राने चटकन आपली नजर त्याच्या मुखावर फेकून चटकन जमिनीवर पसरली. तिला क्षणात लहानपणाची आठवण आली. आणि तिच्या कानात एक गोड विचार बोलून पळून गेला : 'आपलं

याच्याशीच मुलांनी लग्न लावलं.' ती लाजली. तिचे सर्व दु:ख क्षणभर दूर झाले. आपले कुणी तरी भेटल्याचे तिला समाधान वाटले. तोच म्हातारी म्हणाली : "आणि हे आमचं जावई सुभानराव. माझ्या गोजाबाईचा दीर. जयाचा चुलता. हे बी हातंच ऱ्हात्याती. आता हवालदार हायती." चित्राने त्याच्याकडे पाहिले तेव्हा त्याचे डोळे तिच्यावरच रोखले असल्याचे तिला दिसले. त्याच्या मिश्यांचा तो पुंजका, तो गालावरचा जखमेचा वण, त्याचे लालची पाहणे, तिला आवडले नाही. उलट तिला त्या लालियाचीच आठवण झाली. तिने बळेच स्मित करून मान डोलवली. जयाही तिच्याकडे पहात होता. आणि सुभानरावही पहात होता. एकट्या चित्रावर त्या वेळी दोन नजरा रोखल्या होत्या. जयाच्या डोळ्यांपुढे ती लहान चित्रा दिसत होती, जी त्याच्याबरोबर शाळेत जात होती, आळीत बसून खेळत होती. आणि आज तिच्याकडे पाहवत नव्हते. तीच ही चित्रा का? तो विचार करीत होता. आणि सुभानरावाची नजर धडपडत होती. नंतर चित्राला आंघोळीला पाणी ठेवून पुन्हा चहा केला. म्हातारी सारखी नाचू लागली. चित्राला कुठे ठेवू नि कुठे ठेवू नको, असे तिला झाले. ती पोटच्या मुलाप्रमाणे चित्राला समजू लागली. जयाला आणि तानुबाईला आनंद झाला. आंघोळ चहा झाल्यानंतर ते सर्वजण बोलत बसले. तेव्हा म्हातारी म्हणाली : "तू कशी आलीस, चित्रा?"

"कशी म्हणजे?" चित्रा खुदकन हासून म्हणाली. "आज म्हटलं जावं. म्हणून आले हुडकीत."

"अग आलीस ते बरं झालं." तानुबाई म्हणाली. "पण सोना कशी काय? बरी हाय नव्हं?" चित्राचे काळीज चरकले. तिला सोनाची आठवण होऊन भडभडून आले. तिचे डोळे पाण्याने डबडबले. त्या दिवशी चित्रा मनमोकळेपणे सर्वांशीच बोलली. तिला आज पुष्कळ दिवसांनी मोकळेपणा वाटू लागला होता. ती मनापासून हसत होती. जणू ते जीवन तिला पुन्हा दिसत होते. ते तिला आपलेसे वाटत होते. जणू त्या पवित्र कामगार जीवनासाठी ती धडपडत होती. त्याच जीवनात तिला समाधान वाटत होते. तेच तिच्यापासून दूर होते. ते तिला आता दिसत होते. जयाचा गोड स्वभाव, त्याचे प्रेमळ बोलणे, तिला आवडत होते. "मग तू आता ऱ्हा चार दिस." म्हातारी म्हणाली. "आणि मग जा."

त्यावर चित्राचा चेहर झर्रकन उतरला. आणि ती हळूच म्हणाली : "काकू! मी आता जाणार नाही. मला कुठं तरी काम लाव. मी तुझ्या वसरीला राहून जगंन." तिच्या डोळ्यातून अश्रू वाहू लागले. ती क्षणात दु:खी झाली. म्हातारी आणि जया यांनाही वाईट वाटले. म्हातारीला वाटले, आपण हिला तेवढे नसतो बोललो तर बरे झाले असते. म्हातारी चटकन उठली. तिने तिचे डोळे पुसले. आणि लहान मुलाला त्याचे लाड पुरवण्यासाठी आई बोलल्याप्रमाणे ती म्हणाली : "बरं, बरं. नकं जाऊ. ऱ्हा तू माझ्यापाशी. मी तुला

जन्मभर पोशीन. तू का परकी हाईस? तुला मी गळ्यात बांधून वागवीन.'' म्हातारीचे हे शब्द ऐकून चित्राला धीर आला. ती पुन्हा हसली.

''बरं जातो मी.'' सुभानराव आपला दंडा घेऊन म्हणाला. ''पाव्हणीला घालवू नका. असू द्या आसऱ्याला आलेलं माणूस.'' तो क्षणभरही न थांबता बाहेर पडला. त्याला आता कामावर जाणे जड वाटू लागले. परंतु सरकारी काम. त्यामुळे त्याचा नाइलाज झाला. तो चित्राचा विचार करीत निघाला. त्याला वाटू लागले : 'ही अगदी निराधार आहे. हिला जगात कोणीही नाही. ही आली हे एक बरं झालं. देव पावला. आता आपण म्हातारीला मथवली की काम भागलंच. लागेना किती का पैसा. करून टाकू. नाही तर असली हिरकणीसारखी बायको आपणाला जन्मात तरी मिळेल का?' अशा प्रकारचे मनोरे रचीत सुभानराव कामावर गेला. आणि चित्रा त्या दिवसापासून तानुबाईच्या घरी राहिली. म्हातारीने खटपट करून चित्राला आपल्याच गिरणीत कामाला लावले. त्या दोघी संगं कामावर जात. आणि संगंच घरी येत. म्हातारी चित्राला क्षणभरसुद्धा विसरत नव्हती. पुढे पुढे जयाची आणि चित्राची ओळख अगदी दाट झाली. अनंत संकटातून पार पडलेले, कित्येक जाळ्यातून वाचलेले तिचे हृदय जयाकडे ओढ घेऊ लागले. त्याला ती थोर माणूस, अगदी देवाप्रमाणे मानू लागली. त्याच्या विचाराने भारली गेली. जयाचे बोलणे ती लक्षपूर्वक ऐकू लागली. त्याचे अनुकरण करू लागली. आणि जन्मभर त्याच्या सहवासात आपणही राहावे असे तिला वाटू लागले. दिवसापाठी दिवस जात होते. चित्रा काम करून आपले घर समजून जयाच्या घरी येत होती. ती सदा आनंदित होती.

परंतु सुभानराव मात्र मनोमनी दु:खी होत होता. चित्राचे आणि जयाचे बोलणे, त्यांचे फिरणे, त्याचे हसणे, हे सर्व त्याला विषाप्रमाणे वाटत होते. ते सर्व बंद व्हावे, हिने आपल्याशी लग्न करावे, आपण एकादी खोली घेऊन सवते राहावे, असे त्याला वाटत होते; परंतु हा जयाच आडवा येत असून ही पोरगी त्याच्यावर फिदा आहे. ही त्याला स्वत:चा धनी मानून वागत आहे. म्हणून आपले काहीच चालत नाही. आता काय करावे? तो मनात तळमळत होता. एकदा चित्रा आपली व्हावी म्हणून त्याने तानुबाईलाही गळ घातली. परंतु तिने त्याची निराशाच केली. त्यामुळे तो चिडून आता तिरसटपणाने वागत होता. तो घडोघडी जयाचा अपमान करी. काही झाले की टाकून बोले. आणि आपण फार मोठे आहोत असे भासवी.

आजही ते दोघे कामावरून आले होते. जया लवकर येऊन चूळ भरून आईची आणि चित्राची वाट पाहात होता. इतक्यात चित्रा आली. म्हातारी मागे होती. चित्रा घरात येताच म्हणाली : ''ऐकलं का? उद्या संप होणार!''

''हो. उद्या संप होणार!'' जया गंभीर चेहरा करून उद्‌गारला.

''कोण म्हणतो उद्या संप होणार?'' सुभानराव आला आणि घरात शिरताच गुरगुरला.

त्याच्या खांद्यावर आज बंदुकीचे धूड होते. तो ती बंदूक कोपऱ्यात ठेवून म्हणाला : ''उद्या संप झाला तर त्याला मोडून काढण्यासाठी सरकारही तयार आहे.'' त्याने कमरेचा पट्टा काढून गळ्यात अडकवला.

''सरकार नेहमीच आम्हांला मोडून काढण्यासाठी तयार आहे. आणि आम्हीही हे सरकार मोडून काढण्यासाठी तयार आहो.'' जया रागात म्हणाला.

''ठीक आहे.'' सुभानराव गुर्मीत म्हणाला. ''उद्या रस्त्यावर दिसेल तो मारला जाईल. त्यासाठीच ही बंदूक तयार आहे.'' त्याने त्या बंदुकीकडे बोट दाखवले आणि तो नळावर निघून गेला.

म्हातारी घाबरून म्हणाली : ''जया, आता तू त्याच्या तोंडाला लागू नकं.'' तिला आज त्याची भीतीच वाटली. तो बंदूक घेऊन घरी आला होता. चित्राही चकित होऊन विचार करू लागली.

जया म्हणाला : ''तुम्ही कुणी भिण्याचं कारण नाही. अशा बंदुकीनं संप मोडून काढता येत नाही.''

''नाही नाही. ही एकच आहे.'' सुभानराव नळावरून येता येता दारातूनच म्हणाला. ''परंतु उद्या मुंबईत 'लष्कर येणार आहे. उद्याची दंगल रोखण्यासाठी सरकार काय वाटेल ते करणार आहे. सरकार आपलं सर्व सामर्थ्य एकवटून लढणार आहे. आणि जया, हे पाहा, मी तुलाच म्हणून सांगतो. सरकार कुणाचीच पर्वा करणार नाही. चहूकडून लष्कर येत आहे. निजामानंसुद्धा आपली गोवळकोंडा फौज रवाना केली आहे. म्हणून म्हणतो, तू—''

''हे पाहा नाना!'' जया सुभानरावाला म्हणाला. ''उद्या जे काही होईल ते नवं नाही. असे फार प्रसंग मुंबईवर आले आहेत. पुष्कळ कामगार मारले गेले आहेत. परंतु पुन्हा पुन्हा कामगार लढतही आला आहे. पंचवीस हजार खलाशी आज संकटात असून इंग्रजांनी त्यांना वेढा दिला आहे. त्यांना दडपून देण्याचा चंग बांधला आहे. त्यांच्या मागण्या कबूल करून नंतर दगा देऊन साहेबांनी खलाशांवर मशीनगन रोखून नीचपणाचा कळस केला आहे. आणि त्यांचा वेढा उठावा म्हणून सर्व खलाशी जिवावर उदार होऊन लढण्याला तयार आहेत. म्हणून आम्ही कामगारांनी एकजुटीनं त्यांना मदत केलीच पाहिजे...''

''कसली मदत?'' सुभानराव जयाला मधेच अडवून म्हणाला. ''आणि कसली एकजूट? काँग्रेसनं संपाला विरोध केला असून मुस्लिम लीगवालेही संपाला विरोध करीत आहेत. मग कोण लढणार?''

''आम्ही लढणार.'' जया उसळून म्हणाला. ''कामगार लढणार. शिवाय कम्युनिस्ट पक्षानं आणि गिरणी कामगार युनियननं उद्याचा संप जाहीर केला आहे.'' तानुबाई

संध्याकाळचं जेवण करीत होती. चित्रा चपात्या लाटीत त्या दोघांचं बोलणं ऐकत होती. परंतु त्या दोघीही मधे तोंड घालीत नव्हत्या. सुभानराव भडकून बोलत होता.

"हे पाहा, एकानं संप जाहीर करून काय होणार आहे?" सुभानराव म्हणाला. "सरकार एकेकाला झोडपून काढील. 'दस की लकडी एक का बोजा' हे कुणालाच कळत नाही. म्हणून माझी खात्री आहे की उद्या कोणीही बाहेर पडून मरू नये. माझं तुला सांगणं आहे की तू रस्त्यावर फिरकू नको. तू माझं ऐकणार नाहीस म्हणा." तो तानुबाईला म्हणाला : "मामी! मुलाला सांगा. नीट सांगा. नाही तर वाईट होईल."

"आमचं काहीही होवो. तुम्ही काही सांगू नका." जया आवाज चढवून म्हणाला.

आणि सुभानराव तिरस्कारयुक्त नजरेने त्याचेकडे पहात म्हणाला : "ठीक. उद्याचं उद्या पाहू. मामी, मला जेवण वाढा." तो बैठक मारून जेवाय बसला. घरात सर्व वातावरण तंग झाले. आणि जया बाहेर निघून गेला. चित्राने हळूच त्याच्याकडे पाहिले. तीही चिडली होती. त्या दिवशी सारी मुंबईच चिडली होती. सर्व पक्षांचे सर्व हिंमतवान लोक चिडले होते. जणू मुंबई एखाद्या निखाऱ्याप्रमाणे धगधगत होती. राखेच्या खाली आग धुमसत होती. लवकरच जणू भडका होणार होता.

मुंबई बंदरात सर्व खलाशांना बेसावध स्थितीत राज्यकर्त्यांनी वेढा घातला होता. एकवीस तारखेला गुरुवारी अरबी सागर लढत होता. रात्रभर कॅसल बराकीसभोवती मराठा लष्कराचा वेढा पडला होता. लवकरच रक्ताची नदी वहाणार असा सर्वांचा अंदाज होता. म्हणूनच खलाशांनी मराठी शिपायांना विचारले होते की, "तुम्ही हिंदी आहात, मग आम्हांवर गोळ्या का झाडणार?" आणि त्याला मराठा लष्कराने उत्तर धाडले होते, "आम्ही कधीच तसं करणार नाही. आम्हांजवळ वायबार आहेत." परंतु तरीही मराठा शिपायांना आपल्यावर हल्ला करण्याचा हुकूम होईल असे सर्वांनाच वाटत होते आणि तसेच झाले. जेव्हा कॅसल बराकीवर हल्ला होणार असे खलाशांना समजले तेव्हा त्यांनी गार्ड-रूम फोडून दारूगोळ्याचे कोठार लुटले आणि सर्वांना शस्त्रे वाटली. नाक्या-नाक्यावर मशीनगन रोखून आपल्या बंदुकीची तोंडे त्यांनी ब्रिटिश सैन्यावर रोखून धरली होती. आणि नर्मदा या जहाजावरून सर्व जहाजांना निर्वाणीचा संदेश दिला गेला होता की, 'मारू किंवा मरू या निर्धारानं लढा.' आणि म्हणून सर्व जहाजे तयार झाली होती. अकबर, तलवार, कॅसल बराक येथील खलाशांनी माऱ्याच्या जागा ताब्यात घेतल्या होत्या. आणि ब्रिटिश सैनिक उंच जागेवर बसून लढाईसाठी तयार होते. तर इन्द्रधनुष्य, चमक, अमला, कलावती, अवंती, आसाम, पंजाब, सर्वच जहाजे थोडी मागे सरून नांगरून पडली होती. त्यांच्यावरच्या सर्व तोफा सज्ज झाल्या होत्या. पंजाब जहाजावरच्या तोफांनी आपली तोंडे ताजमहाल हॉटेलावर रोखून इंग्रजांना दम भरला होता की, 'जर कॅसल बराकीवर हल्ला कराल, तर ताजमहालाची राख करू.' आणि ॲडमिरल गॉडफ्रे

यानं रेडिओवरून डिरकी दिली होती की, ''जर खलाशी शरण आले नाहीत तर आम्ही आमच्या बळावर सर्व आरमारच बुडवून टाकू.'' आणि त्याला जबाब म्हणून एकशे वीस जहाजे बंडावर गेली होती. आणि वीस हजार हिंदी सुपुत्र कंबरा बांधून इंग्रजांपुढे उभे होते. आज कैक वर्षांनी अरबी समुद्र स्वतंत्र होऊन उसळत होता. आज त्याच्या मस्तकावरचे गुलामीचे परकीय निशाण उतरले होते. व एकाच स्तंभावर लाल, तिरंगी आणि हिरवे अशी निशाणे लहरत होती. म्हणून इंग्रज पिसाट होऊन त्यांनी आपली सर्व शक्ती एकवटून लढाईची तयारी केली होती. काही ठिकाणी तोफांचा धडाका चालू झाला होता. त्याला सागर साथ देत होता.

म्हणूनच सारी मुंबापुरी खवळून गेली होती. घरोघर संताप व्यक्त होत होता. अवघी मुंबईच जणू धगधगत होती. आणि तानुबाईच्याही घरी त्याच्या झळा येऊन पोचल्या होत्या. सुभानराव गंभीर चेहरा करून जेवत होता. चित्रा धडधडत्या अंत:करणाने जेवण करीत होती. तानुबाई उद्याचा विचार करीत होती. लेबर कँपही तीच चर्चा करीत होता. आता उद्या काय होणार? सुभानरावाचे जेवण झाले, तो शांतपणे उठला. त्याने आपला पोषाख चढवला. आणि पुन्हा रात्रपाळीला जायला तो तयार झाला. त्याने बंदूक घेतली आणि तो निघाला. तोच पुढून जया घरात आला. सुभानराव क्षणभर थांबून गंभीरपणे म्हणाला : ''जयवंत! तू उद्या दंगलीत जाऊ नको. माझं ऐक आणि गेलास तर मी जिथं असेन तिथं थांबू नको.''

''मी उद्या कुठं जावं नि कुठं जाऊ नये हे मीच ठरवीन.'' जया शांतपणे म्हणाला. ''तुम्ही तुमचं काम करा. कदाचित तुम्ही असाल तिथंच मी येईन.''

''ठीक.'' सुभानराव गुरकला आणि बाहेर पडला. रात्रीचे नऊ वाजून गेले होते. रात्र पुढे येत होती. आणि उद्याची भीती अधिकच क्रूर होत होती. त्यामुळे तानुबाईचे काळीज धडपडत होते. तिला वाटत होते : ''हा जया कोणाचंही ऐकणार नाही. मग उद्या काय होणार? याला कसा रोखावा?'' आणि चित्राही मनात म्हणत होती : ''उद्या काय होणार? आपण आजवर जे जे मनाशी नक्की केलं ते सारं उलटंच झालं आहे. आताही आपण ठरविलं आहे की आपलं सर्वस्व आता हा जयाच आहे. आपण आपलं हृदय त्याला न कळत का होईना, त्याला अर्पण केलं आहे. न कळत का? त्याला ते कळत आहे. आपलं आता त्याच्यावाचून कोणीही नाही. आणि जर उद्या भलतं सलतं झालं तर मग काय होणार?'' नंतर जयाने थोडे जेवल्यासारखे केले. आणि तोही बाहेर पडला. तानुबाई आणि चित्रा उद्याचा विचार करीत झोपल्या. चित्रा मात्र जागी होती. तिचे मन तिला विचारीत होते : 'उद्याही तुझी निराशा झाली तर तू काय करणार?' तिला तो प्रश्न असह्य वाटत होता. तिला नीज लागत नव्हती. आणि उद्याची २२ तारीख पुढे येत होती. 'उद्या काय होणार?' ती पुटपुटत होती. तो उद्याचा अपूर्व दिवस भारतीय जनतेच्या स्वातंत्र्याला

जवळ आणणारा, सारी सृष्टी हादरून सोडणारा तो दिवस. तो चित्राला मात्र भेडसावीत होता. अठराशे सत्तावननंतर पुन्हा एकदा भारतात येत असलेला तो उद्याचा मंगल दिवस. क्रांतिकारकांना स्फूर्ती देणारा, भारतीय जनतेला स्वातंत्र्याचा आशा-किरण दाखवणारा तो दिवस! तो चित्राला विचारीत होता : 'तू ज्याला आपले नाजूक हृदय, पवित्र प्रेम दिले आहेस त्याला, त्या जयवंतला कसा दिसणार? उद्या काय होणार?' चित्रानं अंग बदललं. तिनं हळूच एका बगलेवरून दुसऱ्या बगलेवर होऊन एक नि:श्वास टाकला. सुभानराव असा कां बरं बोलला? त्यानं जयाला कां बरं बजावलं की 'मी जिथं असेन तिथं येऊ नको!' आणि जर जया तिथं गेला तर मग हा सुभानराव काय करणार? तिचे हृदय धडपडू लागले होते. बाहेर रात्र मागे सरकत जात होती. रस्त्यावरचे दिवे मंद होत होते. काही विझण्याच्या बेतात आले होते. लेबर कँपच्या डोळ्यातील निद्रा संपत आली होती. चित्रा जागत होती.

पहाट झाली. सर्वत्र माणसे उठून आपापल्या उद्योगाला लागत होती. कोण खोकत होते. कोण नळावर जात होते. चुली फुंकण्याचा आवाज ऐकू येत होता. काही घरात भाकरी घडण्याचा आवाज होत होता. कोण कोणाला उठवीत होते. कोण गाणे गात होते. रोजच्या नियमानुसार ती कामगार वस्ती जागी होऊन कामाला लागली होती. चित्रानं चूल पेटवली होती. तानुबाई चिंतातुर होऊन बसली होती. तिला काहीच सुचत नव्हते. "चित्रा! जया आला व्हय?" तिने चित्राला विचारले. चित्राने उत्तर दिले नाही.

## १०

"आज खलाशांना पाठिंबा देण्यासाठी आम्ही संप केला आहे." सारी मुंबई हे शब्द उच्चारीत होती. मुंबईच्या मस्तकावर आपली कोमल किरणे उधळीत सूर्य वर येत होता. सकाळचा आल्हाद देणारा वारा मुंबईच्या राजमार्गावर नाचत होता. सर्व इमारतींची शिखरे उजळ झाली होती. जणू सर्वत्र नवा प्रकाश, नवा जोम, नवा निर्धार संचार करीत होता. सर्व रस्ते कामगारांनी फुलले होते. लहानथोर जमून दुतर्फा उभे होते. सर्व वर्गांचे, सर्व धर्मांचे, सर्व जातींचे, सर्व मानव एका रस्त्यावर येऊन उभे होते. त्यांनी आज प्रथमच सर्व जुनी बंधने तोडून टाकली होती. दीड शतकाचे गुलामीचे बंधन तोडण्यासाठीच त्यांनी सर्व मतभेदांचे बांध फोडून चक्काचूर केले होते आणि ते रस्त्यावर उभे होते. त्यांच्या जणू त्या कुशल फौजाच फळी धरून उभ्या होत्या. आणि पहिल्या रांगेला मुंबापुरीचा शूर कामगार खडा होता. त्याच्या डोळ्यात कोपाग्नी धगधगला होता. त्याच्या हृदयात द्वेष वाढत होता. इंग्रजी सत्तेवर तो तुटून पडण्यासाठी

जणू आज उभा होता. मुंबईचे ते ऐतिहासिक कामगार मैदान तरुण कामगारांनी भरून गेले होते. सर्व रस्ते शांत होते. नित्याची धावपळ आज नव्हती. रोज भाकरी बांधून लाचारपणे गिरणीच्या जबड्यात शिरणारा, कारखान्यात जाणारा कामगार आज उगीचच रेंगाळत रस्त्यावरून जात होता. तो हळू हळू त्या कामगार मैदानाकडे जात होता. जणू काय आज लढवय्याच्या सर्व वाटा त्या मैदानाकडेच जात होत्या. पुढे काय होणार हे सांगणे कोणालाही शक्य नव्हते. कामगार मैदानावर सर्व सातारा जिल्ह्यातील कामगार हजर होता. परंतु आज कोणीही काँग्रेस पुढारी व्याख्यान देण्यासाठी त्या ठिकाणी आला नव्हता. कामगार उभे राहून काही तरी चर्चा करीत होते. मंद वारे भिरभिरत होते. मैदानावरचे ते उंच नारळीचे झाड डुलत होते. सूर्याची नाजूक किरणे त्या मैदानावर पसरली होती. सर्व वातावरण आनंददायी वाटत होते. परंतु आज ते उग्र तप्त भासत होते. मैदानावर चिक्कार गर्दी झाली होती. ''ए वाट द्या.'' कोण तरी ओरडले. आणि क्षणभर रेटारेटी होऊन लहानशीच एक वाट निर्माण झाली. एक मध्यम उंचीचा, सडपातळ, परंतु प्रभावी बुद्धिवान इसम मैदानावर येऊन उभा राहिला. त्याला पाहून सर्व कामगार त्याच्याकडे आपल्या अनंत नजरा रोखून पहात उभे राहिले. तो इसम शांतपणे त्यांच्याकडे पहात होता. त्याच्या चेहऱ्यावर अलोट त्याग, झुंजण्याची अफाट हिंमत आणि जनताशत्रूबद्दलचा कडवा द्वेष स्पष्ट दिसत होता. तो क्षणभर स्तब्ध उभा राहिला. त्याने सर्वांना पाहून घेतले आणि स्पष्ट खणखणीत शब्दांत तो म्हणाला : ''तुम्ही आज जे करणार आहात त्याला मी हिंदी कामगारवर्गाच्या वतीनं नि हिंदी कम्युनिस्ट पक्षाच्या वतीनं संपूर्ण पाठिंबा देत आहे.'' असे म्हणून तो इसम आल्या मार्गाने परत निघाला. कामगारांत कुजबूज सुरू झाली. जया जवळच उभा होता. त्याला एका दुसऱ्या कामगाराने हळूच विचारले : ''ए जया, कोण रं हे?''

जया म्हणाला : ''कॉमरेड श्रीपाद डांगे.'' इतक्यात डांगे निघून गेले. कामगारांत नवा जोम संचारला. जणू डांगे यांच्या मुखाने त्यांना हिंदुस्थानच्या कामगाराने लढण्याची हाकच दिली. थोड्याच वेळात ते सर्व कामगार मैदानावरून बाहेर रस्त्यावर आले आणि मिरवणुकीला सुरवात झाली. सर्व बाजूंनी लहान लहान मिरवणुकी फिरू लागल्या. काही ठिकाणी अनेक मिरवणुकीचा संगम होऊन एक प्रचंड मिरवणूक होऊ लागली. आणि गिरण्या कारखाने ओस पडले. सर्व काही शांत पडले होते. वाहतुकीला अडथळा, बेकायदा जमाव, वगैरे शब्दही पुढे करून इंग्रजाने कुरापत काढाय सुरवात केली. आणि मुंबईची जनताही त्या दंडेलीला जबाब देण्यासाठी तयार झाली. हिंदी जनतेचा तो निर्धार पाहून गोऱ्या अधिकाऱ्यांची डोकीच फिरली. त्यांनी आपले लष्कर आणून उपनगरात आसपास सज्ज ठेवले होते.

दहा वाजले. सूर्य तप्त होत वर चढत होता. सर्व वातावरण उष्ण होत होते. दारिद्र्य

आणि वैभव, स्वच्छता आणि अस्वच्छता, पिळणारा आणि पिळला जाणारा, या विसंगतीने भरलेली मुंबापुरी ज्वालामुखीप्रमाणे भासत होती. परेल नाक्यावर एका युरोपियन साहेबाने आपली मोटार एक कोवळ्या मुलावर घालून ज्वालामुखीचा स्फोट घडवून आणला. ज्या ठिकाणी तो मुलगा मारला गेला, त्या ठिकाणी कामगारांनी त्या गोऱ्या माणसाला योग्य शिक्षा दिली. तो अधिकारी पळून गेला. लोकांनी त्या ठिकाणी त्या रक्तात गुलाल पसरून फुलाचा ढीग जमवून कापूर ज्योती पेटवून मोठी आरास केली. आणि वाहतुकीचा रस्ता बंद करून टाकला. थोड्याच वेळात तो पळून गेलेला गोरा इसम परत फिरला तो सशस्त्र पलटणीनिशीच. आणि गोळीबाराला सुरुवात झाली. जिकडे तिकडे लष्करी मोटारी राक्षसी झेपा घेत अग्नी ओकीत धावू लागल्या. दिसेल त्या ठिकाणी, दिसेल त्या व्यक्तीवर बंदुकीचा मारा सुरू झाला. गोरे लष्कर आपला चिलखती लवाजमा घेऊन शहरात घुसले. आणि जनतेचे मुडदे पाडू लागले. सर्वत्र हाहाकार झाला. गोरे अधिकारी सन अठराशे सत्तावननंतर आजच पहिल्यांदा खवळून गेले होते. आज सशस्त्र बंडाला कामगार मदत करण्यासाठी उठला होता. जणू काय इंग्रजी सत्तेच्या काळजालाच हात घातला होता. म्हणून ते भडकून मुंबईच्या राजमार्गावर रक्ताचा चिखल करू लागले होते. ते सहज लीलेने लोकांवर गोळ्यांचा वर्षाव करत होते. दुधासाठी लावलेल्या रांगेवर त्यांनी स्टेनगनचा मारा करून स्त्रिया-मुले यांची कत्तल केली. गच्चीवरचे लोक, गॅलरीतील माणूस, टिपून खाली पडला. जिकडे तिकडे प्रेतांचा खच लागला.

आणि मुंबईचा बहाद्दर कामगार पुढे झाला. त्याला तो अन्याय सहन झाला नाही. त्याने हातात कसलेही शस्त्र नसता रणात उडी घेतली. ठायी ठायी मेढेकोट बांधून वाटा रोखल्या. रस्त्याकडेचा कचरा रस्त्यावर आणून पेटवून दिला. डांबरी पिंपांचा ढीग रचून तारांचे खांब आडवे पाडून त्याने भुईकोट तयार केले. आणि मिळतील ती शस्त्रे घेऊन तो लष्कराशी लढू लागला. शिवाजी पार्कपासून लालबागपर्यंतचा भाग कामगारांनी रणमैदान बनविला. गोळीबार, विषारी धूर आणि हाणामारी यांशिवाय दुसरे तिथे दिसतच नव्हते. जागोजाग कामगार गोऱ्या शिपायांशी लढून त्यांना हैराण करीत होते. हत्यार काढून घेत होते आणि लढत होते. मुंबई लढत होती. आणि परेलच्या भुईकोटावर जया उभा राहून लढत होता. कामगार इंग्रजी रणगाडा रोखून धरीत होता. जया त्यात पुढारी होऊन आपला प्राण पणाला लावून लढत होता. देशासाठी, कामगारवर्गाच्या पवित्र परंपरेसाठी, शूर खलाशांच्या संरक्षणासाठी, जया झुंजत होता.

अरबी सागरावर नाविकांची तोफ गर्जत होती. गोऱ्या उर्मट अधिकाऱ्यांनी आपले सर्व सामर्थ्य मैदानात ओतले होते. विमाने मुंबईवर तारा धरून तळपत होती. रस्त्यावर लष्कर स्वैर धावत होते. ॲडमिरल गॉडफ्रे आरोळी ठोकीत होता : "आम्ही सारं हिंदी

आरमारच बुडवून टाकू.'' आणि म्हणूनच त्याने मुंबईच्या जनतेवर डमडमच्या गोळ्यांची धार लावली होती.

कामगार पुढारी कॉ. डांगे इंग्रजांना बजावीत होते की, "तुम्ही आंतरराष्ट्रीय नियमाचे उल्लंघन करून मुंबईच्या जनतेवर डमडमच्या गोळ्या झाडीत आहात. त्याचा जाब तुम्हांला द्यावा लागेल.''

आणि जया त्वेषाने बेभान होऊन लष्करापुढे लढत होता. सूं सूं करीत गोळ्या जात होत्या. विषारी धुराचे लोट रस्त्यावर तरळत फिरत होते. त्या दिवशी सूर्य भलताच तप्त वाटत होता. तो दिवससुद्धा इंग्रजी कारकीर्दीतील अनेक खुनी दिवसांपैकीच एक होता. मुडद्यांची आणि जखमी कामगारांची दवाखान्यात रांग लागली होती. सर्व रस्ते रक्ताने न्हाऊन निघाले होते.

पाच वाजले. सूर्य जरासा शांत वाटत होता. एका नाक्यावर डांबरी पिंपाच्या मेढेकोटाच्या आड शेपन्नास तरुणांच्या जमावात जया उभा होता. तो आता दमून क्लान्त झाला होता.

सर्व वाहतूक बंद होती. सर्व रस्ते निर्मनुष्य व भकास दिसत होते. सर्वत्र भेसूर वातावरण दाटले होते. कोणी लहान मुले बाहेर पडत नव्हती की कोणी स्त्री वाटेवर दिसत नव्हती. फक्त तरुण लोक निरनिराळ्या भुईकोटाआड दबा धरून बसले होते. मधून मधून लष्करी गाडी खडखडत येत होती. आणि मग सर्व दिशांनी शिळांचा एकच आवाज होत होता. आणि मग त्या लष्करी मोटारीवर सर्व बाजूंनी दगडविटांचा वर्षाव होत होत. डमडमच्या गोळीला दगडांचे उत्तर मिळत होते. इंग्रजांनी सर्व हिंदी शिपाई काढून घेतले होते. किंवा ज्यांना लष्करी अनुभव होता ते अधिकारी व गोरे लष्कर हेच आज मुंबईत जनतेवर गोळीबार करीत होते. ट्रामच्या रस्त्यावरून रणगाडे धावत होते. जणू मुंबईच्या जनतेला दहशत घालण्यासाठीच ते पिसाट होऊन पळत होते व वाटेल त्या बाजूला गोळीबार करीत होते. सारी मुंबई विषारी वायूनं भरली होती. परंतु जनताही खवळून उठली होती. वाटेल ते जरी झाले तरी माघार घ्यायची नाही, असाच जणू मुंबईने निर्धार केला होता.

सूर्य अस्त पावला आणि मुंबई काळोखात गडप झाली. परंतु तिची लढाई मात्र थांबली नव्हती. जया आता शांत होऊन आडोशाला बसला होता. पलीकडे ट्रॅमच्या वाटेकडेला एकच दिवा मिणमिणत होता त्याची अर्धी काच मुद्दाम काळी करून काळोख केला होता. बाकीच्या दिव्यांना काचा राहिल्याच नव्हत्या. त्या कामगारांनी फोडून संपूर्ण काळोख केला होता. त्या गडद अंधारात कामगार बसले होते. सर्वत्र भेसूर शांतता पसरली होती. जयाला दिवसभर कशाचीच आठवण झाली नव्हती. त्याला आईची आठवण झाली नव्हती की चित्राची आठवण झाली नव्हती. त्याचे सारे लक्ष समोरून येणाऱ्या गोऱ्या

सैनिकावर केंद्रित झाले होते.

अखख्या दिवसात त्याला आता घराची आठवण झाली होती. आपण इकडे येतेवेळी फार वाईट केले. आपण आईला किंवा चित्राला सांगून आलो नाही. त्या दोघी आपली वाट पहात चिंता करीत बसल्या असतील; त्यांना आपली बातमीच कळली नसेल. त्या माझी वाट पाहून निराश होऊन बसल्या असतील. आई तर कदाचित रडत असेल आज... इतक्यात शीळ वाजली. सर्वत्र शिळांचा आवाज होऊ लागला. सर्व जण आपापल्या आडोशाच्या जागेवर जाऊन बसले. जयाही आपल्या ठिकाणी जाऊन बसला. आणि आता कसला हल्ला येणार याची वाट पाहू लागला. तोच एक मोटार येऊन समोरच्या त्या मंद दिव्याखाली थांबली. मोटारीचे दार उघडले गेले. आणि चार सशस्त्र शिपाई खाली उतरले आणि लगेच ती मोटर पुढे निघून गेली. ते चार शिपाई बावरून इकडे तिकडे पाहत पहाऱ्यावर उभे राहिले. त्यांनी प्रथम आपल्या बंदुका लोड करून सज्ज आहेत की नाहीत याची खात्री करून घेतली. त्यांचा पहारा चालू झाला. त्यांचा तो कडवा पहारा त्या रस्त्यावर उभा राहिला. जणू सारी मुंबई मुक्त झाली होती. आणि फक्त रस्तेच तेवढे इंग्रजांच्या पहाऱ्याखाली गुलाम होते. आणि आता त्या रस्त्यासाठीच मोठी लढाई होणार होती.

मोटार निघून जाताच जयाने उठून एका पिंपाआडून समोर रस्त्यावर असलेल्या त्या सैनिकाकडे निरखून पाहिले. त्याला एकदम आश्चर्याचा धक्का बसला. 'सुभानराव!' तो मनात पुटपुटला, 'मी जिथं असेन तिथं थांबू नको' हे सुभानरावाचे शब्द त्याला आठवले. आणि त्याच्या डोक्यात विचारांचे काहूरच उठले. चित्रा स्वत:ला मिळावी म्हणून सुभानराव जिवाचे रान करीत होता. परंतु चित्राचे जयावर प्रेम होते, तेच तेवढे त्याच्या वाटेत आड येत होते म्हणून वाटेल ते करून जयाला तिच्या प्रेमातून वेगळा करण्याची तो शिकस्त करीत होता. परंतु त्याला यश आले नव्हते. म्हणून चिडून तो निराळाच विचार करीत होता. चित्रासारखी सुंदर तरुणी स्वत:ला मिळणार असून फक्त जयाच आपल्या सुखाच्या आड उभा आहे. त्याला तेवढा दूर केला की चित्रा आणि तिची ती सुंदर काया आपल्याच पदरात पडणार असे त्याला वाटत होते. म्हणूनच त्याने जयाला ती धमकी दिली होती.

आतापर्यंत जयाला जे विचार आठवले नाहीत ते त्याला आठवत होते. आपण इथं आहोत असे समजताच हा चुलता हटकून आपल्यावर गोळी झाडणार आणि चित्राची लूट करणार. मी इथं आहे हे त्याला अजून समजलं नाही हे एक बरेच झाले आहे. परंतु उद्या उजाडल्यावर नक्कीच तो मला पाहणार. आणि मग... ... बरं, आपली लढाई केव्हा कशी संपणार? आपण हरणार की जिंकणार? की शेवटी मरून जाणार? आणि जर आपण इथं पडलो तर... तर मग आईचे काय होणार? चित्राचे काय होणार? त्याला

स्वत:ची चीड आली. त्याने स्वत:च्या मनाला दरडावून बजावले : 'वाटेल ते होवो; परंतु मी इथून हटणार नाही.' तो उठून मागे आपल्या जागेवर जाऊन बसला. सर्व जण या पहारेकऱ्यांवर हल्ला करण्याची तयारी करू लागले.

रात्र भिरभिरत निघाली होत. ऐन मध्यरात्र झाली. आणि पुन: लष्करी गाडी धडधडत आली. सर्वत्र दंगल सुरू झाली. ती गाडी दगडाच्या वर्षावातून गोळ्या झाडीत पुढे येत होती. जयाच्या नाक्यावर सर्व जण तयार होऊन खडे झाले. आणि ती चिलखती गाडी त्या नाक्यावर येऊन थांबली. मोटारीतील गोरे सैनिक संतापले होते. त्यांना हिंदी लोकांची चीड आली होती. त्यांना वाटत होते, हे मूर्ख लोक या काळोखात दडून आम्हांवर हल्ला करीत आहेत. परंतु दिसत नाहीत. मूर्ख! एका सैनिकाने बंद दारावरंच एक गोळी झाडली. भयंकर धडाका झाला. तो भाग दणाणून गेला. तिसऱ्या मजल्यावर कोणी तरी किंकाळी फोडली. रस्त्यावरच्या मोटारीत सैनिक बसले. ''इंडियन!'' कोण तरी आपसात म्हणाला. सुभानराव बंदूक सज्ज करून उभा होता. साहेब लोक कां हसतात हे काही त्याला कळले नव्हते. तो आपला हुकमाची वाट पहात होता. तोसुद्धा कसलेला सैनिक होता.

इतक्यात शीळ वाजली. आणि त्या मोटारीवर हल्ला झाला. गारांचा पाऊस पडल्याप्रमाणे दगड पडू लागले. मोटारीत गोरे लोखंडी टोप्या पुढे करून मारा थटवू लागले. आणि सुभानराव आणि त्याचे साथीदार यांच्यावर सरळ मारा होऊ लागला. थोड्या वेळाने मोटारीतून बंदुकी गर्जू लागल्या. सुभानरावानेही आपली बंदूक चालू केली. हाणामारीला सुरवात झाली. तो सारा भाग हादरून गेला. गोळीच्या आवाजाने रात्र थरथरू लागली. मोटारीतील ते गोरे अधिकच चिडले. परंतु त्यांना हिंदी माणूस दिसतच नव्हता. आणि त्यामुळे ते खवळून गेले. आणि मोटारीच्या आडोशाने गोळीबार करणारा सुभानराव त्यांना भेकड वाटला. त्याची त्यांना चीड आली. कारण तो हिंदी होता. ''ए! पुढे जाऊन मार त्यांना.'' एक साहेब आपले दात आवळून इंग्रजीत ओरडला. आणि सुभानराव उठून सरळ पुढे धावला. परंतु पुढे होणाऱ्या हल्ल्याने त्याला एकदमच रोखले. मोटारीतील अधिकाऱ्याला सुभानरावाची चीड आली. हा हिंदी असून हा मुद्दाम पुढे जात नाही. हा आपल्या भाईबंदांवर मुद्दाम गोळी धाडण्यात कुचराई करीत आहे. त्याने आपली स्टेन सुभानरावावर रोखली आणि क्षणभर तिरस्कारयुक्त नजरेने त्याच्याकडे पाहिले. सुभानरावाने पुढे नेम धरला होता. त्याच्यापुढे अंधार होता. तरीही त्याची बंदूक आग ओकीत होती. त्याच्या पाठीमागे साहेब ओरडला : ''चला.'' मोटार गुरगुरली आणि आता गती घेणार तोच मोटारीत स्टेनगन मोठ्याने खेकसली नि अंधारात उजेड फेकीत निघून गेली. सुभानराव मोठ्याने ओरडला. आणि कोसळून पडला. त्याची बंदूक त्याच्यापासून दूर फेकली गेली. आणि सर्वत्र शांतता प्रस्थापित झाली. सुभानरावाची पाठ इंग्रजी

गोळ्यांनी छिन्न विच्छिन्न केली. तो हलला नाही की खिलला नाही. त्याचे जोडीदार त्याच्याकडे पहात उभे होते. त्यांनाही माहीत नव्हते की हे असे कां झाले? सुभानराव मेला की जिता आहे याची चौकशी कशी करावी? त्यांनी आपल्या बंदुका तयार ठेवून ते समोर पहात बसले.

आणि पुढे जयाही ते सर्व पहात होता. त्याच्या डोळ्यांदेखत त्याचा चुलता साहेबांनी सहज मारून पाडला होता. परंतु तो आता जिवंत आहे का नाही हे त्याला माहीत नव्हते. सुभानराव जयापासून अगदी जवळच पडला होता. मधे फक्त भुईकोटाचा लहानसा उंच अडथळा होता. सर्व शांत होते. फक्त सुभानरावाच्या देहाखालून रक्ताचा लहानसा अगदी लहान लोंढा डांबरी रस्त्यावरून जयाकडे हळूहळू निघाला होता. जयाला भडभडून आले. त्यांचे रक्तातील नाते एकदम जागृत झाले. आपला चुलता, आपल्या जन्मदात्याचा बंधू, आपण त्याला पाहिलंच पाहिजे. तो आपल्यापुढे आता मरून पडला आहे. जयाने पुढे झेप घेतली. आणि क्षणात त्या आडोशावरून पुढे घालून घेतले. त्याचे सर्व साथीदार त्याच्याकडे पहात राहिले. जया तीर गेल्याप्रमाणे कोटाच्या पलीकडे गेला. त्याने सुभानरावाचे प्रेत उचलून खांद्यावर घेतले आणि तो परत फिरला. त्याने आपला उजवा पाय त्या भुईकोटावर ठेवून डावाही वर घेतला, तोच पाठीमागे बंदुकीचा मोठा आवाज झाला. त्याबरोबर जया जिथल्या तिथे स्थिर झाला. क्षणभर तो डगमगला. त्याच्या खांद्यावरचे सुभानरावाचे प्रेत पुन्हा खाली पडले आणि थोड्या वेळाने जया पुढे त्या कोटाच्या आत पडला. त्याच्या जोडीदारांनी त्याला उचलून दूर नेले. तो स्वतःच्या आणि सुभानरावाच्या रक्ताने न्हाऊन निघाला होता. जया त्या अंधारात निपचित पडला होता. रात्र थोडीच आता शिल्लक होती. जयाने मरू नये म्हणून त्याचे मित्र प्रयत्नांची शिकस्त करू लागले. कोणी त्याच्या काळजावर हात ठेवून त्याची धुगधुगी पहात होते; कोणी त्याचे डोके चाचपून पहात होते; कोणी त्याचे रक्त कोठून येत आहे ते पहात होते; तर कोणी जयाच्या आईला खबर देण्याचा विचार करीत होते. परंतु जया निश्चल पडून होता. दोन बाजूला दोन चुलते पुतणे पडले होते. मध्ये तो भुईकोट होता. सभोवती भेसूरता पसरली होती. सर्व जगाचे व्यवहार जणू शांतपणे होत होते. सर्व काही जणू लढत होते. मुंबई लढत होती. दूर कुठे तरी दंगल, गोळीबार, आरडाओरड ऐकू येत होती, मध्येच रस्ते खवळून उठत होते. पुन्हा स्थिर शांत होत होते. किती मेले असतील, किती जखमी झाले असतील, कोणाला कुठे गोळी लागली असेल, हे कोणालाच समजत नव्हते. आणि जयालाही कुठं गोळी लागली आहे हे कोणला माहीत नव्हते. जया आता मरणार की जगणार हाच प्रश्न त्याच्या साथीदारांपुढे उभा होता.

तेवीस तारखेच्या सकाळचे दहा वाजले होते; सारी मुंबई पुन्हा शांत झाली होती. चोहोकडे इंग्रजी पहारा खडा होता आणि परेलच्या के.ई.एम्. हॉस्पिटलमध्ये डॉक्टर लोकांची धावपळ सुरू झाली होती. नर्स-बाया उंच टाचांचे बूट घालून टकटक असा आवाज काढीत इकडून तिकडे पळत होत्या. कंपौंडर लोक मुडद्यांच्या गाड्या लोटीत पळवीत होते. जिकडे तिकडे माणसे दिसत होती. दवाखाना माणसांनी भरला होता आणि मुडद्यांनीही गर्दी केली होती. सर्वत्र ओरडणे रडणे हेच नाचत होते. सर्वांचे चेहरे गंभीर दिसत होते. तिथे नावालासुद्धा आनंद शिल्लक नव्हता. जखमी कामगार विव्हळत होते; त्यांचे नातलग तळमळत तिष्ठत बसले होते. आणि तिथंही लष्करी अधिकारी मिरवत होते.

हजारो लोकांवर शस्त्रक्रिया केली जात होती; जखमी माणसांच्या शरीरात रुतलेल्या गोळ्या काढून टाकून डॉक्टर दमगीर झाले होते; आणि एका बाजूला तुटलेले हात, पाय आणि मुंडकी यांचा खच लागला होता. डमडमच्या गोळीने उध्वस्त केलेली शरीरे जिवंत माणसाच्या शरीरावर काटा उभा करीत होती. कोणाचे कपाळ फुटले होते; कोणाची छाती फुटून गेली होती. कोणाची पाठ चिंध्या झाली होती; कोणाचे डोळे गेले होते. सर्वच देखावा अति भयानक वाटत होता. त्या गर्दीतून चित्रा व तानुबाई वाट काढीत घाईघाईने निघाल्या होत्या.

एकवीस तारखेला रात्री जया घरातून बाहेर पडला होता. त्याची त्यानंतर तानुबाईला मुळीच बातमी नव्हती. कालचा सारा दिवस तिने आणि चित्राने त्याची वाट पाहिली. परंतु कोणीही काहीच सांगितले नव्हते. ज्या काही बातम्या आल्या त्या खुनाखुनीच्या, दंगलीच्या, गोळीबाराच्याच आणि आज सकाळी ती भयंकर खबर आली की जया अतिशय जखमी होऊन पडला असून त्याला दवाखान्यात नेला आहे.

गोळीची जखम म्हणजे भयंकर जखम. त्यातून कोणीही उठूच शकत नाही अशी त्या दोघींची समजूत होती. शिवाय त्या दोघींच्या जीवनाचा तो एकच आधार होता आणि त्यालाच धक्का बसल्याची ती बातमी ऐकून त्यांच्या शिरावर आकाश कोसळले. म्हातारीने तर टाहोच फोडला. तिचे सर्वांग थरथर कापू लागले. चित्राला चक्कर मारू लागली. तिच्या डोळ्यांपुढे अंधेरी आली. आपल्या शिरावरचा सूर्य अस्त झाला, आपण या जगात उघडे पडलो, आता पुन्हा आपल्या जन्माची तीच पहिली परवड पुढे चालू होणार, या जाणीवेने चित्रा घाबरून गेली. परंतु आपण जयासाठी रडतो आहोत हे कोणाला दिसू नये म्हणून तिने आसू गिळून टाकायला सुरवात केली. आणि ज्याने ती खबर आणली होती, त्यानेच ''तुम्ही आताच दवाखान्यात जा'' असे सांगितले. आणि ''रडू नका. तो

जिवंत असून तुम्ही त्याला मेला हे समजून रडू नका,'' असेही त्याने सांगितले.

मग तानुबाई आणि चित्रा यांनी दवाखान्याची वाट धरली होती. दवाखान्यातील त्या गर्दीतून वाट काढीत चित्रा पुढे, तानुबाई मागे, अशा त्या निघाल्या होत्या. चित्राच्या हातात एक चिठ्ठी होती. ती घेऊन त्या दोघी सारख्या धावत होत्या. मध्येच एक शुभ्र कपडे केलेला माणूस उभा होता. त्याच्याजवळ चित्रा थांबली. तिने आपल्या हातातील ती चिठ्ठी त्याला दाखविली. ''वॉर्ड पाच खाट नं. सोळा.'' तो इसम पुटपुटला आणि म्हणाला : ''असंच पुढं जाऊन डाव्या बाजूला वळा आणि वर जिन्यावरून जा.'' चित्रा पुढे निघाली. ती इकडे तिकडे पहात झपझप निघाली होती. तिचे ते टपोरे डोळे जयाला शोधीत होते. ते ओले झाले होते. ती आपल्या डोळ्यांची उघडझाप मंद गतीने करीत होती. पण जलद चालत होती. ती एकदम खटकन थांबली. आणि तिने निरखून पाहिले. तिथे ऑपरेशन चालू होते. एका इसमाची आतडी बाहेर काढून ठेवली होती. त्याचे पाय उचलून वर बांधले होते. जणू त्या मनुष्यदेहाशी कसला तरी खेळच चालला होता. तो इसम तिला ओळखीचा वाटला. ती पुढे गेली आणि एकदम पुन्हा थांबून तिने कोपऱ्यात पाहिले. तिथे एक नग्न मुडदा पडला होता. ती चकित होऊन पाहू लागली. त्या मुड्याचे कपाळ फुटले होते. अगदी ताजी जखम होती. त्याचे लाल केस स्पष्ट दिसत होते. ती भेदरून उद्गारली : ''लालिया!'' आणि पुन्हा त्या उंच टेबलाकडे तिने पाहिले त्याबरोबर तिच्या मुखातून ''जनरल'' असे शब्द पळाले. तोच एक इसम पुढे येऊन म्हणाला : ''कोण पाहिजे?'' त्याबरोबर चित्रा भानावर येऊन तिने ती चिठ्ठी पुढे केली. ''त्या बाजूला जा. हे पोस्ट मॉर्टम रूम आहे.'' तो इसम म्हणाला. आणि चित्रा धडधडत्या अंत:करणाने बाहेर पडली. तिच्या नेत्रापुढे जनरल आणि लालिया यांची ती प्रेते तरळू लागली.

आणि लगेच तिला आपल्या अक्काची-सोनाची आठवण झाली. पुन्हा तिच्या नेत्रातून अश्रू ठिबकले. तिने पदराने डोळे पुसले व ती पुढे निघाली. ते कशाने मेले असतील? एवढा मोठा लालिया, तो आडदांड जनरल, यांना कोणी बरे मारले असेल? ती आपल्या मनालाच प्रश्न विचारीत निघाली होती.

वर नं. पाचची अक्षरे असलेली पाटी लोंबत होती. चित्रा व तानुबाई आत शिरली. दोन्ही बाजूंनी माणसांची पसर पडली होती. सर्व जखमी कामगार शुभ्र वस्त्रात पडले होते. कोणाला फणफणून ताप भरला होता; कोणाच्या जखमेतून रक्त वहात होते; कोण भयंकर वेदनांनी तळमळत पडले होते. चित्रा त्यांच्यामधून पहात निघाली होती. तानुबाई बावरून सर्वत्र पहात होती. १६ नंबरच्या खाटेजवळ येताच त्या थांबल्या. जया शांत पडला होता. त्याला नुकताच ताप येऊन गेला होता. आपली ही खबर आईला आणि चित्राला कोण सांगणार? याचा तो विचार करीत होता. तोच चित्रा आणि तानुबाई त्याच्या पुढे दत्त म्हणून उभ्या. त्यांना पहाताच त्याला आनंद झाला. त्याला पाहून तानुबाईला

हायसे वाटले. चित्राचा धीर परत आला. नाही, आपणाला जसे वाटत होते, तसे काही होणार नाही. जयाच्या चेहऱ्यावरून तरी तो आपणाला सोडून जात नाही असे दिसते. तिच्या मनात नाना तऱ्हेचे विचार घोळू लागले. त्याला त्या स्थितीत पाहून चित्राला तो अधिकच जवळचा वाटू लागला. आपले अगदी जवळचे कोणी तरी पुष्कळ दिवसांनंतर आज पुन्हा भेटल्याप्रमाणे तिला वाटले. आणि काय काय तिला वाटले कोण जाणे! "आई! चित्रा!" जयाने मंद स्वरात एक हाक मारली. आणि त्या दोघीही पुढे गेल्या. त्याने पुष्कळ वेळ त्यांना न्याहाळून घेतले. त्याने त्या दोघींचे डोळे पाहिले, तेव्हा त्या चार डोळ्यांतून चार अश्रूंच्या धारा गालावर मंद गतीने उतरत होत्या.

"छे! असं का?" जया मानेला हिसडा देऊन म्हणाला, "आई! चित्रा! रडायचं का? मी मरणार नाही. मला खांद्याला गोळी लागली आहे. मला काहीच होणार नाही. मला मुळीच मरता येणार नाही. मी जर मेलो तर मग तुला कोण आहे? आणि माझी चित्रा काय करणार?"

चित्राच्या नेत्रात सागर उसळून आला होता. त्याने मुळीच असे बोलू नये असेच तिला वाटत होते. आणि त्या बोलण्यामुळे तिला धीर येत होता. तो तसेच बोलत राहावा असेही तिला वाटत होते. म्हातारी त्याच्या डोकीवरून हात फिरवीत बसली होती.

"तसं द्राडवानी काय बोलू नकं." म्हातारी म्हणाली. थोड्या वेळाने चित्राही त्याच्या उशाला बसली.

"आई! चित्रा!" जयाने हाक मारली. "काय?" त्या दोघींनी प्रश्न केला व त्या त्याच्याकडे पाहू लागल्या.

जया म्हणाला : "मला एक दिवस नि एक रात्र गोळी लागली नाही. पार माझ्या केसातून गोळ्या गेल्या. मी अगदी पुढं उभा होतो पण रात्री..." तो क्षणभर थांबला आणि म्हणाला : "काका म्हणत होता मी असंन तिथं थांबू नको. परंतु चित्रा! जिथं मी होतो तिथंच त्याच्या कर्मानं त्याला आणून सोडलं. परंतु मी त्याला दिसलो नाही."

"त्येनं तुला गोळी घातली?" म्हातारीनं प्रश्न केला.

"नाही." आपली मान उशीवर नकारार्थी डोलवीत जया म्हणाला, "मला दुसऱ्याची गोळी लागली; पण ती काकामुळेच लागली."

"कशी?" त्या दोघींनीही प्रश्न केला.

जया म्हणाला : "गोऱ्यांनीच त्याला गोळी घातली. तो मरून पडला. त्याचं मढं घेऊन येत असता पाठीमागून मला कोणी तरी गोळी घातली."

"म्हंजी सुभानराव मेलंत?" म्हातारी केविलवाणा चेहरा करून म्हणाली.

"हो. मेला. पण मी पडल्यानंतर तो कुठं पडला कोण जाणे." असे म्हणून त्याने डोळे झाकले. नर्सबाई टिटवीप्रमाणे ढेंगा टाकीत आली आणि म्हणाली : हे पाहा! त्याच्या

अंगात रक्त नाही. तरी त्याला बोलून शीण देऊ नका.'' असे म्हणून ती बाई दुसरीकडे गेली. म्हातारी, चित्रा गप्प बसून त्याच्याकडे पाहू लागल्या. त्या दोघी स्तब्ध बसून जयाकडे पाहू लागल्या तोच डॉक्टर आला. ''असं करा.'' डॉक्टर म्हणाला : ''त्याला रात्रभर नीज नाही आणि तो फारच जखमी आहे. तरी तुम्ही आता घरी जा. त्याला निजू द्या. पुन्हा संध्याकाळी या! त्याची काळजी करू नका. त्याला काही होणार नाही.''

चित्राला आनंद झाला. म्हातारीने आसू पुसून टाकले. त्या दोघीही त्याला त्या स्थितीत टाकून वॉर्डाच्या बाहेर पडल्या आणि घराकडे निघाल्या. पुन्हा चित्राला जनरलची आणि लालियाची आठवण झाली व लगेच सोनाची मूर्ती तिच्या डोळ्यापुढे उभी राहिली. तिचे काय झाले असेल? ते दोघे इथं मरून पडले आहेत आणि माझ्या अक्काचे काय झाले असेल? असा विचार करीत ती निघाली होती. पुढून एक हातगाडी येत होती. त्या गाडीवर जखमी पेशन्ट कण्हत पडला होता. तो बडबडतही होता. ती गाडी पुढून येऊन चित्राच्या पाठीमागे गेली. परंतु त्या आजाऱ्याचे कण्हणे तिला ऐकू येऊन ती क्षणभर थांबली. तो आजारी कण्हत होता. आई... चित्रा.. असा नुसता ध्यासच त्याने घेतला होता. चित्राचे नाव चित्राने ऐकताच तो आवाज ओळखला. ती गर्रकन मागे फिरली. ''अक्का!'' असा तिने हंबरडाच फोडला. ती गाडी उभी राहिली. आणि चित्रा तिकडे धावली. सोना 'चित्रा! चित्रा!' करीत पडली होती. तिने डोळे उघडून चित्राकडे पाहिले. आणि पडूनच वर उसळी घेतली. तिच्या बाहूत चित्राची मान गडप झाली. दोघी खूप खूप रडल्या. वॉर्डर बावरून पहात राहिला.

''अक्का तुला काय झालं हे?'' चित्रा रडत म्हणाली. सोनाला आनंद झाला. शेवटी तिची इच्छा पूर्ण झाली होती. तिची लाडकी चित्रा तिला भेटली होती. तिने तिला पुष्कळ दिवसांनंतर आज गोड मिठी मारली होती. म्हातारी तानुबाई चकित होऊन उभी होती. सोना बोलत नव्हती. ती फक्त चित्राकडे डोळे भरून पहात होती. ''बाई, वॉर्डात चला,'' तो कंपौंडर म्हणाला. आणि चित्रा सोनापासून वेगळी झाली. गाडी पुढे चालू लागली व चित्रा आणि तानुबाई गाडीपाठी चालू लागल्या.

गाडी स्त्रियांच्या वॉर्डात थांबली. चित्रा सोनाच्या उशाला बसली. आपली जगात अगदी जवळची दोन माणसे या दवाखान्यात आज मिळाली. आजचा दिवस खरंच आनंदाचा दिवस असे तिला वाटले. ती पुष्कळ वेळ स्तब्ध बसून राहिली. नंतर सोनानेच हळू स्वरात बोलायला सुरवात केली. तिने सर्व हकीकत सांगितली.

त्या दिवशी जनरल सकाळी दहा वाजता बरोबर ठरल्या वेळी आला. आणि लालियाने चित्राला आणली का म्हणून विचारू लागला. परंतु तेव्हा लालियाही आला नव्हता. नाही तर त्याच वेळी दोघांची जुंपणार होती. लालिया आला नाही हे समजताच जनरल रागाने लाल झाला. त्याने दरडावून सांगितले की लालियाला सांग आज रात्री घरी रहा, नाही

तर काम बिघडेल, असे म्हणून तो त्या वेळी घाईघाईने निघाला. सोनाने त्याला शांत करण्यासाठी पुष्कळ प्रयत्न केला. परंतु व्यर्थ! त्याला भलतीच घाई झाली होती. त्याच्या जहाजावर खलाशांनी बंड पुकारले होते. आणि त्या बंडखोराशी लढण्यासाठी जनरल तयार झाला होता. त्याने कमरेला भरलेले पिस्तूल लावले होते व लष्करी पोषाख केला होता. त्याचा चेहरा उग्र दिसत होता. तो अतिनिर्दय, बेभान वाटत होता.

आणि थोड्याच वेळाने लालिया आला. तोही आज भलताच गुर्मीत होता. त्याने आणखी एक मोठा इसम बरोबर आणला होता. तो इसम एखाद्या हत्तीप्रमाणे दिसत होता. जेव्हा सोनाने त्याला जनरलचा तो निरोप सांगितला तेव्हा त्याने बेपर्वा हसून घेतले. आणि तिरस्कारयुक्त स्वरात तो म्हणाला : "तो जनरल माझ्याजवळ चित्रा मागतो आहे तेव्हा मीही त्याच्यासाठी चित्राच आणली आहे." असे म्हणून त्याने त्या इसमाकडे बोट दाखवले. तो गंभीर चेहरा करून लालियाचे बोलणे ऐकून घेत होता.

सोनाला त्याची भीती वाटली. ती तत्काळ परत फिरली. नंतर त्या घरात नि:शब्दता झाली. अगदी दिवसभर त्या घरात ओसाड शांतता बैठक मारून बसली. सोनाला त्या घरात मुळीच बसवत नव्हते. परंतु तिला बाहेरही जाता येत नव्हते. बाहेर बंड लढत होते. तिच्या डोकीवरच असलेले ते घड्याळ मात्र एकसारखे धावत होते. सोना विचारमग्न बसली होती. "आता जनरल आला की मग काय होणार? आपण ज्या घराचे मालक आहोत त्याच घरात हे दोन क्रूर प्राणी एकमेकाला फाडून खाणार. त्यांचे मुडदे पडणार. आणि मग पोलीस येऊन आपणाला अटक करून घेऊन जाणार. मग मात्र आपण कोण, काय करतो हे जगाच्या चवाठ्यावर येणार. मी वेश्या हे जगजाहीर होणार."

तिला तो विचार सहन होत नव्हता. तर लालिया आपल्या त्या मित्राशी पुढील कार्यक्रम नक्की करीत होता. कोणी कसे मारायचे, जनरलला कसा हाणून पाडायचा, कसे निघून जायचे, याचाच ते विचार करीत होते. नऊ, दहा, अकरा, बारा. बारा वाजले तरी जनरल आला नाही. आता मात्र सोनाला थोडे बरे वाटू लागले होते. देव करो आणि तो न येवो आणि तो प्रसंग टळो, असे ती म्हणत होती. शेवटी तिने दार बंद करून घेतले. आणि ती आपल्या बिछान्यावर जाऊन पडली. एक वाजून गेला. सोनाला थोडी झोप लागते तोच दारावर थाप पडली. ती दचकून जागी झाली. तिने भीतभीतच दार उघडले, तो जनरल लाल भडक चेहरा करून आत आला. त्याच्या खांद्याला बंदूक होती. तो पिसाट दिसत होता. आणि धापा टाकीत होता. त्याने आत येताच मोठ्याने ओरडून विचारले : "सोना! लालिया आला आहे का?"

"हो. आला आहे." सोना घाबरून म्हणाली.

जनरल घाईने म्हणाला : "चित्रा. चित्राला आणली त्यानं? का मोकळाच आला आहे?"

"नाही जनरल. शांत व्हा. चित्रा नाही." सोना त्याला शांत करीत म्हणाली.

परंतु जनरल मात्र शांत होण्याऐवजी अधिकच भडकला. त्याने मागे पुढे पाय देऊन एक डिरकीच फोडली. एखाद्या वळू बैलाने डिरकी फोडावी तसा तो म्हणाला : "ए हरामखोर भडवा! चित्रा कुठाय? चल बोल." आणि त्या पलीकडच्या अंधारातून आवाज आला : "तू हरामखोर साला!" तो आवाज लालियाचा होता. तो आपल्या खोलीत अंधार करून बसला होता. जनरल भेदरण्याऐवजी भडकूनच गेला. त्याने एकदम उसळीच घेतली. क्षणात तो त्या अंधारात गडप झाला. आणि हाणामारीला सुरवात झाली. त्या अंधारातून आरडा ओरड आणि दणक्याचे आवाज तेवढे बाहेर पडू लागले. त्याबरोबर अश्लील शिव्या आणि रेटारेटी ऐकत सोना मात्र बाहेर उभी राहिली. सर्व इमारत हादरू लागली. सर्व लोक जागे झाले. सोनाच्या घरात दंगल माजली. परंतु ती सोनाला दिसत नव्हती. शेवटी एकदम जनरल पुन्हा धावतच त्या अंधारमय खोलीतून बाहेर उजेडात आला. आणि त्याच्या पाठोपाठ लालिया आणि त्याचा तो मित्रही खवळूनच धावत बाहेर आला. आणि लगेच सोनाच्याच खोलीत त्या तिघांची पुन्हा झटापट सुरू झाली. जनरलने लालियाचे मानगूट दोन्ही हातांनी आवळून धरले होते. त्याच्या खांद्यावरची बंदूक निकामी लडबडत होती आणि लालियाचा मित्र पाठीमागून जनरलला चेचून काढीत होता. परंतु जनरल काही केल्या खाली पडत नव्हता. आणि लालियाची गर्दन मोकळी होत नव्हती. घरात हैदोस चालू होता. सोना भेदरून गेली होती. हे भांडण सोडवावे असे तिला वाटत होते. परंतु शिकारी कुत्र्याने डुक्कर पकडल्याप्रमाणे जनरलने लालियाला पकडले होते. सोना विचार करू लागली. इतक्यात लालियाने आपली मान त्या मगरमिठीतून मोकळी करून घेतली. लालिया निसटून जाताच त्याचा मित्र पाठीमागे सरून पवित्र्यात उभा राहिला. आणि जनरलने बंदूक काढली आणि बंदुकीच्या दस्त्यानेच लालियाला ठार करायचा विचार करून तो पुढे लालियावर धावला तोच पाठीमागून त्याच्या पाठीत खुर्ची बसली. तो पाठीमागे फिरून लालियाच्या मित्रावर बंदुकीचा दणका देणार तोच लालियाने लोखंडी शीग आणून जनरलचे डोके फोडून काढले. जनरल बेभान झाला. तो रक्तानं न्हाऊन निघाला. आणि डोळे झाकून वाटेल त्या बाजूला बंदुकीचा दस्ता मारू लागला. दोन्ही बाजूंनी त्याच्यावर मारा होत होता आणि जनरल सर्वत्र दस्ता मारीत होता. त्याने सर्व काही फोडून चक्काचूर करून टाकले. त्याचे कपाळ फुटून रक्त वहात होते. त्याला काहीच दिसत नव्हते. तो अंदाज करून दस्ता मारीत होता. त्याने सोनाच्या बाजूकडे झेप घेऊन एका घावात प्रथम तिला खाली लोळवली. आणि मग डोळ्यावर येणारे रक्त पुसून त्याने लालियावर

झपाटा मारला. तो त्याने चुकवून घेतला. लालिया पुन्हा त्या अंधारात दिसेनासा झाला तोच त्याच्या पाठीत एक वार झाला. त्याच्या हातातील बंदूक खाली पडली. त्याने गुडघे टेकले आणि पुन्हा स्वत:ला सावरून घेतले. आणि चटकन त्याने आपले पिस्तूल काढले. तोच लालिया त्याच्यावर धावून आला आणि जनरलने गोळी झाडली. लालियाचे कपाळ फुटून गोळी पार गेली. लालिया खाली पडला. आणि लालियाच्या मित्राने झडप घेऊन जनरलच्या पोटात सुरा मारला. जनरलची आतडी सर्वत्र विस्कटली गेली आणि त्याने पडूनच त्या इसमावर धड् धड् धड् आपल्या सर्व गोळ्या झाडून घेतल्या.

सोनाने चित्राला घरात झालेल्या त्या भयंकर मारामारीची हकीकत हळूहळू सांगितली. ती ऐकून चित्राला भीतीच वाटली. तिने सोनाला कुरवाळीत सांगितले: ''बरं झालं. आता तू घाबरू नको. धीर धर. मी जिवंत आहे. मी तुला मरू देणार नाही. तू मात्र मरू नको.'' सोनाने डोळे झाकले. त्याबरोबर तिच्या डोळ्यातून अश्रूंच्या धारा घरंगळून खाली कानाकडे धावल्या. तानुबाईलाही रडूच कोसळले. तो सोना डोळे उघडून मंद स्वरात म्हणाली : ''चित्रु, तुझं लग्न झालं?''

''नाही अजून.'' चित्रा डोळे पुशीत म्हणाली.

''कधी होणार?'' सोनाने प्रश्न केला.

''होईल लवकरच.'' चित्रा उद्गारली

''कोणाशी होणार?'' पुन्हा सोनाने प्रश्न केला.

आणि चित्रा लाजली. तिच्या दु:खी चेहऱ्यावर लाज तरळू लागली.

आणि मध्येच तानुबाई म्हणाली : ''आमच्या जयाबरुबर तिचं लगीन होणार हाय.'' हे ऐकून सोना हसली. ''जया चांगला मुलगा आहे.'' सोना म्हणाली. ''बरं झालं. तू मात्र आईचं बोलणं ऐकून त्याप्रमाणं वागलीस. मी मात्र वाईट केलं. मी माणसांतून उठली. आता मी कशी तोंड दाखवू? तू मला जग म्हणून सांगत आहेस कशाला?''

चित्राला भडभडून आले. ती सोनाच्या खाटेच्या जवळ गेली. पार जवळ जाऊन म्हणाली : ''अक्का! अक्का! तूच माझी आई! तूच माझी बहीण! तू जग. आता ते दुष्ट घर जळून राख झाली त्याची. आता मी, जया, तू, आपण कष्ट करू. माणसासारखं जगू. अगदी माणसासारखं. कुणाची एक नको की कुणाची दोन नको. तू सुखासाठी मुंबईला आलीस नि त्या घाणीत गेलीस. मीही स्वत:साठी नि आईच्या सुखासाठी त्याच उंबऱ्यात शिरले. पण शेवटी दगडासारखं मन करून तुला सोडून काकूकडे गेले. म्हणून मी वाचले. माझी अब्रू वाचली. आता तू मरून मला सोडून जाऊ नको. पुन्हा या जगात तुला अब्रूनं जगता येईल.''

म्हातारी म्हणाली : ''सोनाबाई, तुला ह्यो अपघात झाला. तू घाबरू नको!''

चित्रा काकुळतीला येऊन म्हणाली : ''तू जे केलंस ते करावं म्हणून केलंस का?'' सोनाने नकार दर्शवीत मान हलविली. ''मग भितेस का म्हणून? मी म्हणते तू जग. नि तुझ्या अब्रूची होळी करणाऱ्या जगाची होळी होईपर्यंत जग. एवढंच माझं तुला सांगणं आहे.''

हे ऐकून सोना हसली. तिच्या चेहऱ्यावर आनंद चमकला. आणि नर्सने येऊन त्यांना जाण्याबद्दल सांगितले. चित्रा नर्सला म्हणाली : ''बाईसाहेब, माझी बहीण आहे ही.'' दोघीकडे आणि म्हातारीकडे पाहून नर्स म्हणाली : ''ही तुमची आई वाटतं?''

''होय.'' चित्राने मान डोलवली.

नर्स म्हणाली : ''बाई, घाबरू नका. तिला भीती नाही. ती जगेल!''

चित्राला आनंद झाला. आपली अक्का मरणार नाही. आपला जया मरणार नाही. आपण आता आनंदात दिवस काढू. असा तिने मनाला धीर दिला आणि ''मी रोज तुला भेटायला येईन,'' असे सोनाला सांगून चित्रा व तानुबाई उठल्या. दोघीही हासतच बाहेर पडल्या.



# माकडीचा माळ

## १

वैशाख महिन्याला आरंभ झाला होता. काळगावच्या अफाट फोंड्या माळावर दर वर्षाप्रमाणे यंदाही एक एक भिकारी येऊन स्थायिक होत होता. एखाद्या महावृक्षावर पाखरांचा कळप उतरावा, तद्वत रोज दहापाच भिकारी येऊन तो माळ गजबजत होता. वारणा खोऱ्यात वावरणाऱ्या अनेक जाती-जमाती त्या माळावर येऊन आपापली पालं ठोकीत होत्या. अस्थिर वाऱ्यासारखं जीवन जगत असलेले फिरस्ती दरवर्षी वैशाखात या माळावर येऊन स्थिर होत. पावसाळा कंठीत आणि पावसाळा संपला की जिकडे सुगी लागेल तिकडे जात.

एक एक जमात येत होती. माळावर पालं उभी करीत होती. शेकडो पालं उभी झाली होती. अजून लोक येत होते — येणार होते.

डवरी, डोंबारी, दरवेशी, माकडवाले, सापगारुडी, तुरंवाले, भानामतीवाले, गोसावी, फासेपारधी, नंदीवाले, शिकलदार अशा अनेक जमातींनी तो माळ व्यापीत आणला होता.

प्रत्येक जमात दुसरीशी फटकून तळ देऊन बसली होती. तिथं प्रत्येकाचा धर्म वेगळा होता, कर्म वेगळं होतं, नि जगण्याची रीतही निराळी होती. त्यांची दैवतं वेगळी होती. त्यांची ठिकाणं वेगळी होती. प्रत्येक देवस्थानापुढं निरनिराळ्या पताका फडफडत होत्या.

माळावर गर्दी वाढत होती, तसतसा तो माळ गजबजत होता. हर्षभरित होऊन हसत होता, खेळत होता, नाचत होता. जुन्या ओळखींना नवा मुगार येत होता. वर्षानंतर ते भिकारी एकमेकांना भेटत होते, नि आनंदित होऊन गळ्यात पडत होते.

अगदी शेवटी यंकू माकडवाला आला. त्याला पाहून पूर्वी आलेले सैदू दरवेशी, सख्या माकडवाला, बाळ्या डोंबारी यांना परमानंद झाला. बाळ्यानं तर धावत जाऊन यंकूला मिठी मारली. माहेरी आलेल्या लेकीला बाप भेटतो तसा तो यंकूला कडकडून भेटला. गांज्याची चिलीम हाती घेऊन सैदू दरवेशी पुढं आला आणि यंकूला सलाम करीत म्हणाला, ''सलाम आलेकुम''.

यंकू पुढं आला. पर्बती डवऱ्याच्या पालापुढून तो निघाला. पर्बती आपल्या अंगणात बसला होता. यंकूला पाहून त्याच्या कपाळावर आठ्या चढल्या. पर्बतीच्या पुढच्याच

पालातला हिकम्या गारुडी तिरस्कारानं थुंकला. त्यांना यंकूचं येणं आवडलं नव्हतं. कारण यंकूचा धिप्पाड देह, अपार बळ नि त्याचा सज्जनपणा यांचा त्यांना हेवा वाटत होता.

यंकू अंगापिंडानं मजबूत होता. अंगात रेड्याचं बळ होतं. त्यानं नुकतीच पस्तिशी ओलांडली होती. तो स्वभावाने गरीब होता. सर्वांशी जुळतं घेणारा होता. कोणाशी भांडणं त्याला नकोसं वाटे. पुढं येणाऱ्याला रामराम करणं हा त्याचा स्वभाव होता. त्यामुळंच इतर भिकारी यंकूला मान देत होते. सैदू दरवेशी, बाळ्या डोंबारी, सक्या माकडंवाला आणि इतर त्याला आपला मित्र मानीत होते.

यंकू जुन्या दोस्तांना भेटत भेटत पुढं निघाला. त्यानं भेटणाऱ्यांची चौकशी केली. बायको मेल्याचं दु:ख त्यांना सांगितलं. ते ऐकून दोस्त हळहळले. पोरक्या झालेल्या देखण्या कांडेदार दुर्गाची कीव करू लागले.

गेल्या आषाढात त्याची बायको मेली आणि अकरा वर्षांच्या दुर्गाला सांभाळण्याची जबाबदारी त्याच्या शिरावर पडली. बायको मेल्यानंतर काही काळ तो उदास होता. पण उदास राहून भागणार नाही — दुर्गाला जगवलं, वाढवलं पाहिजे, हे त्याने जाणलं व तो उद्योगाला लागला.

त्यानं एक माकड घेतलं. त्याचं नांव गंग्या ठेवलं. गंग्या माकडाचा खेळ करीत यंकू आपलं पोट भरू लागला. दुर्गाला जिवापलीकडे जपू लागला.

यंकूनं माकडंवाल्यांच्या बगलेवर आपलं पाल उभं केलं. दुर्गाला आनंद झाला. मापट्याएवढा गंग्या माकड नाचू लागला. दुर्गाचे केस सोडून उवा वेचू लागला.

सरत्या वैशाखापर्यंत सर्व भिकारी माळावर येऊन दाखल झाले. अनेक फिरस्त्या जाती येऊन स्थिर झाल्या. ओसाड माळावरचं वातावरण आनंदानं भरलं. माळाचा पांग फिटला. तो गजबजू लागला.

ज्येष्ठ गेला. आषाढ निघाला. उभा पाऊस वर्षू लागला. नेहमीप्रमाणे भिकारी हैराण झाले, परंतु सवयीनुसार त्यांनी त्या प्रसंगाला पाठ दिली. मिळेल ते पोटात भरून दिवस रेटले.

श्रावणात चमत्कार घडला. महीला नवा रंग आला. हिरवा मुलामा चढला. ती सुखाचे नि:श्वास टाकू लागली. शिवार बहरला. पिकं डोलू लागली; गिरक्या घेऊ लागली. जागोजाग भाजी पिकली. मुबलक भाजी, भरपूर पाणी, सर्पण यामुळे माळावरचे भिकारी सुखी झाले. उभी पिकं पाहून देवाला हात जोडू लागले. लोकांची पिकं, लोकांचा शिवार पण त्यांना आनंद होता. जग सुखी तर आपण सुखी असा त्यांचा व्यापक जिव्हाळा होता. भाद्रपदात पावसानं हात आखडला. मातीत मोती पिकवून तो निघून गेला. भिकाऱ्यांना आनंद झाला. ते सर्व नव्या जोमाने उद्योगाला लागले. डवरी, डोंबारी, दरवेशी, सांपगारुडी, तुरेवाले, भानामतीवाले, गोसावी, फासेपारधी, नंदीवाले, माकडंवाले एकूण

एक तयार झाले. डवरी डमरू घेऊन डवर घालू लागले. यंकू आपल्या गंग्या माकडाला घेऊन दारोदार हिंडू लागला. सैदू दरवेशी आपलं अस्वल खेळवू लागला नि 'अस्वलापेक्षा दरवेशाचा दंगा मोठा' ही म्हण सार्थ करू लागला. बाळ्या डोंबारी आपल्या तरुण पोरींचा तांडा घेऊन तमाशाचा फड पाडीत होता. सापवाले साप खेळवीत होते. भानामतीवाले भानामतीचा चमत्कार दाखवून लोकांना दिपवीत होते. माकडंवाल्यांनी आपली पोटं माकडावर लादली होती. रावणाची लंका जाळणारा तो प्राणी त्यांचा हुकमात होता. नाच म्हणेल तसा नाचत होता, नि शेतकऱ्यांपुढं डोकं टेकून भीक मागत होता.

माळावर सैदू दरवेशी, यंकू माकडंवाला, बाळ्या डोंबारी आणि पर्बती डवरी ही जबरी कर्ती नि शहाणी माणसं म्हणून ओळखली जात होती.

यंकू अंगानं, बळानं मोठा होता. रुंद चेहरा, रुंद गर्दन, भरपूर पिळदार मिश्या, अंगात गोल पैरण, डोकीला भलंमोठं पागोटं, हातात लांबलचक काठी नि खांद्यावर गंग्या माकड असा त्याचा थाट होता.

सैदू दरवेशी भयंकर गांजा ओढणारा म्हणून प्रख्यात होता. बंदुकीत गोळी भरून हिंडावं तसा तो चिलमीत गांजा भरून हिंडत असे. त्यानं गुलछबू मिश्या राखल्या होत्या. सिंहाच्या आयाळीसारखी दाढी वाढवली होती. भुवया रेखीव नि दाट होत्या. रोज दारादारापुढं अस्वलाशी कुस्ती खेळून त्याचा देह पिळदार झाला होता. त्याच्या आवाजात पोलादाचा नाद निघत होता. तो तापट होता. सर्व भिकारी त्याला वचकत होते.

बाळ्या डोंबारी हा रंगेल माणूस होता. त्याचं पोट किंचित पुढं आलं होतं. देह दबदबीत झाला होता. रंग काळा होता. पण चेहरा पाणीदार होता. त्यानं कपाळावर भरपूर टाळू राखली होती. कमरेला करगोटा, त्याला लंगोटी, डोकीला लहरी पटका असा त्याचा वेष होता. घोड्याच्या टाळूप्रमाणं कपाळावर टाळूला गाठ मारून व पटका ठेवून उघडाबंब बाळ्या दिसेल त्याला मुजरा करीत होता. त्याचा तो ऐटबाज पटका नि खालची लंगोटी पाहून लोक हसत. पण बाळ्याला त्याचं काही वाटत नसे. तो आपल्या दोन देखण्या पोरी घेऊन तमाशा करीत असे. त्यानं खूण केली की, त्या पोरी रंग भरीत नि पुढं बसलेल्या रंगेल माणसाचा खिसा गारद करून मोकळ्या होत.

पर्बती डवरी हा नावाप्रमाणे पर्वतासारखा होता. पण लोक त्याला पाऱ्या म्हणत. त्या कंगाल वस्तीत तो कुबेर समजला जात होता. तो भलताच रागीट होता. त्यात तो रोज दारू पीत असे. त्यामुळे त्याचं नाव काढणं पाप झालं होतं. त्यानं पाच शिकारी कुत्री पाळली होती. नाबदा नि आबदा या त्याचा दोन बायका खरडं मोती, कुंकू, मेण, काळी पोत यांचा व्यापार करीत. पाऱ्या घरात दारूची भट्टी लावी. पहिल्या धारेची दारू पोटभर पिऊन तो दिवसभर आडवा पडलेला असे. त्याच्या चार देखण्या तरुण लेकी दारूचे डबे गावोगाव पोहोचवून पैसा गोळा करीत. दूरदूरचे दारू पिणारे लोक पाऱ्याच्या घरी

येत नि दारू पिऊन जात.

अशी ती माणसं त्या माळावर जगत होती. जगण्याविषयी त्यांना अपार प्रेम होतं. जगात त्यांच्या मालकीचं काहीही नव्हतं. पण सृष्टीवर त्यांचं प्रेम होतं. सर्व दिशांनी लोक येत. तिथे येऊन ती माणसं त्या वैराण माळावर नांदत होती.

काळगावचा तो माळ भुताचा माळ म्हणून त्या खोऱ्यात प्रख्यात होता. गावदरीपासून डोंगरापर्यंत चार मैल रान त्यानं व्यापलं होतं. त्यापैकी अर्ध्या माळावर कुठं तरी एखादं झाड दिसत असे. अर्ध्या माळावर घनदाट झाडी बसली होती.

त्या गर्द झाडीत चोर, खुनी, दरवडेखोर यांचा बारा महिने तळ पडलेला असे. ते चोर रात्री खेडी लुटीत, खून पाडीत, बायका पळवीत नि त्या माळावरच्या जंगलात उडी मारीत. आज काय, तर त्या माळावर खून पडला! कुणाची लेक पळवली! कुणाचा तरी हाडांचा सापळा पडला आहे! अशा रोज भुमका उठत. काळगावची बायकापोरं भयभीत होत. चारआठ दिवसांनी त्या माळावर काही तरी भयंकर नि विपरीत प्रकार नक्कीच होत असे. म्हणूनच लोक त्या माळाला भुताचा माळ म्हणत.

दोन वर्षांपूर्वीची गोष्ट.

गल्या आणि बल्या हे दोन भाऊ काळगावात शिरजोर झाले होते. त्यांना गाव कस्पटासमान वाटत होता. ते कुणाला भीत नव्हते, जुमानीत नव्हते. दिसेल त्या लेकीबाळीला छेडीत होते. एक एक गावकरी गाठून मारीत होते. त्यांना काळीजच नव्हतं. ते कुणाच्याही घरात शिरत होते. या दोघांना काय करावं या एकाच विचारात गाव होता.

एकदा सकाळीच गल्या नदीवरून आंघोळ करून येत होता. गावच्या बायका घागरी भरून येत होत्या. काही नदीकडे जात होत्या. सकाळचं वातावरण मनाला भुरळ घालीत होतं.

प्रत्येक माणूस उल्हासानं भारला होता. येणाऱ्या जाणाऱ्या बायकांकडे करड्या नजरेनं पहात गल्या पावलं उचलीत होता. तरुण बाई दिसली की खाकरत होता. मिशीला पीळ भरीत होता. काही पोरींना डोळे मारीत होता.

समोरून गुंडा तेल्याची सून-गीता येत होती. तिला एका चिंचोळ्या पांदीत अडवून गल्या उभा राहिला नि दोन्ही हात पसरून म्हणाला, ''काय वयनी, पोरीला निजू देणं म्हंजी गुन्हाच हाय! देवाच्यानं तुझ्यावाणी करकरीत पोरीला रातभर सारखी पोळीवाणी उलथी पालथी करीत बसलं पायजी. तरच तिचा पीळ निघणार...'' असं म्हणून तो मोठ्यानं हसला आणि बेगुमानपणे गावाकडे गेला.

गीतानं ती आगळीक सासऱ्याला सांगितली. गुंडा तेली भडकला. त्यानं गाव

जमवला. नाथा पाटलाला हे समजताच त्याचं डोकं फिरलं. पाटील आळीनं काठ्या काढल्या आणि सरळ गल्याच्या घरावर चढाई करून त्याला भरपूर चोप दिला. अगदी रक्त ओकेपर्यंत मारमारून गाव शांत झाला.

चार दिवस गेले, आणि एका रात्री गल्या नि बल्या यांनी तेल्याच्या घरी प्रवेश केला. त्या दोघांनी गुंडा तेल्याचं डोकं तोडलं. त्याचा खून करून ते दोघे फरारी झाले. त्या दिवसापासून ते दोघे भुताच्या माळावर त्या जंगलात दबा धरून बसले होते. आज दोन वर्षे ते त्या कीर्र झाडीत बसून काळगावला हैराण करीत होते. दूरदूरचे एकजात गुन्हेगार त्यांनी गोळा केले होते. रोज कुठं ना कुठं तरी दरोडा घालून पुन: त्या रानात येऊन दडत होते. त्यामुळे काळगाव हैराण झाला होता. गल्या-बल्याच्या अस्तित्वानं त्या माळाची क्रूरता वाढली होती.

परंतु अर्ध्या माळावर उतरलेल्या भिकाऱ्यांच्या पालामुळे गावाला धीर आला होता. नाथा पाटील सरकारी मदत घेऊन गल्या-बल्या यांना पकडण्याची शिकस्त करीत होता. मोठमोठे सरकारी अधिकारी येऊन पराभूत झाले होते. गल्या-बल्या त्यांना झुकांडी देऊन जात होते. त्यांचा उपद्व्याप कायम होता. ते माळावर राजे होऊन मिरवत होते. त्यांची दहशत सारखी वाढत होती.

परंतु ''आपलं काय लुटणार ते?'' असं म्हणून माळावरचे भणंग लोक खुशाल त्या माळावर नांदत होते.

दिवस मावळत होता. त्याची सोनेरी किरणं धरणीला कुरवाळीत होती. थंड वारा धावत होता. माळावरची पालं डगमगत होती. निरनिराळ्या देवस्थानांपुढील फरारे फडफडत होते.

माणसं परतत होती. सर्व दिशांनी लोक येत होते. कित्येक भीक मागून येत होते, तर कित्येक शिकार करून येत होते. ससा, मुंगुसं, कोल्हे, मांजर, वानर जे मिळेल ते मारून त्यांनी आज पोटभर जेवणाचा विचार केला होता. आपापल्या माणसांना ओळखून कुत्री नाचत होती. काही भुंकत होती. पोरं चेकाळली होती. मध्येच एखादं गाढव भुंकून माळ डोकीवर घेत होते. सर्वत्र आनंदी वातावरण खेळत होतं.

बाळ्या डोंबारी डोकीचा पटका मागं सरकावून नि आपल्या प्रचंड तंगडीखाली ढोलकं धरून डोळे झाकून बडवीत होता.

पाऱ्या दारू पिऊन बडबडत होता. पोरींना शिव्या देत होता. त्याच्या पोरी दारू विकून गोळा केलेला पैसा मोजत होत्या.

सैदूनं आज लांडोर मारून आणला होता. त्याचं कडान लौकर कर, म्हणून त्यानं

आपली बायको सकीना हिंच्या मागे तगादा लावला होता. तो गांज्याचा झुरका मारीत एकसारखा चुलीकडे पहात होता.

यंकूच्या पालापुढं दुर्गा उभी होती. ती बापाची वाट पहात होती. रसरशीत नाकातोंडाची दुर्गा आज भलतीच उदास झाली होती.

थोड्या वेळानं यंकू आला. त्याच्या खांद्यावर गंग्या ऐटीत बसला होता. बापाला पाहताच दुर्गाला आनंद झाला. ती धावली नि यंकूला बिलगली. यंकूनं गंग्याला खाली ठेवून दुर्गाला खांद्यावर घेतली. पण ते गंग्याला खपलं नाही. तो चटकन उडी मारून दुर्गाच्या खांद्यावर बसला. खांद्यावर दुर्गा नि तिच्या खांद्यावर गंग्या अशी उतरंड घेऊन यंकू पालाकडे चालू लागला. ते पाहून बाळ्या ढोलकं बाजूला सारून घोडं खिंकाळावं तसा भयंकर हसला.

यंकूनं झोळी पसरली. पाण्याचा तांब्या भरून घेतला. दुर्गाला पुढ्यात घेऊन भाकरी खाऊ लागला. अनेक घरची भाकरी, अनेक घरची चटणी, लोणची, निरनिराळं कोरड्यास, खरडा, घोलाणा — असे एक एक पदार्थ दुर्गा मिटक्या मारीत खाऊ लागली. यंकूनं दिलेली भाकरी गंग्यानं एकदम तोबऱ्यात भरून तो ती हळुहळू काढून चावून खाऊ लागला.

इतक्यात हिकम्या गारुड्याचा नवा नाग पेटाऱ्यातून पळाला. हिकम्याची पोरगी ओरडली, ''बापा, साप गेला — हिकम्या उठला नि सापामागं धावू लागला. पण ते नवं जनावर सापडलं नाही.

तो नाग सरळ यंकूच्या पालात शिरला. तशी दुर्गा किंचाळली, ''साप, बापा—''

गंग्यानं बिचकून उडी मारली, आणि यंकूनं काठीच्या एकाच दणक्यात तो साप मारला. इतक्यात सापाचा पाठलाग करीत हिकम्या गारुडी तेथे येऊन पोहोचला. आपला साप मारलेला पाहून तो खवळला. त्यानं जोरदार बोंब ठोकली, ''पळा, पळा, साप मारला!'' कोणी तरी दुधाची गाय मारावी तसा त्यानं टाहो फोडला, ''गारुड्यांनो हो पळा, माझा देवासारखा नाग ह्या माकडंवाल्यानं ठार मारला. आता मी काय करू?''

तसे गारुडी चिडून उठले. काठ्या घेऊन यंकूच्या पालाकडे धावत निघाले.

प्रसंग बाका आहे हे लक्षात येताच यंकूनं भाकरी दूर सारली. आपली काठी घेऊन तो दारात आला. पंचवीस सापवाल्यांपुढं तो एकटाच उभा राहिला. पक्या, सख्या, बक्या हे माकडंवाले यंकूच्या मदतीला आले, आणि वातावरण तंग झालं. काठ्या डोकीवर उगारल्या गेल्या. दणकादणकी जवळ आली. पोरंबाळं घाबरली. बायका दचकून पाहू लागल्या. सापवाले नि माकडंवाले यांची मारामारी, आपलं काय जातंय — असं म्हणून काही जण गंमत पहात दूर उभे राहिले.

यंकू पुढे होत ओरडला, ''डोस्की सांभाळा. तुम्ही सर्वांनी मला दिवसभर मारलं तरी

मी चार दिवस मरणार नाय. पण जर का माझी एकच काठी बसली तर तुम्ही थेट सरगाला जाल ह्येचा विचार करा नि या. चला – कुणाकुणाला मरायचं हाय?''

यंकूची ती गर्जना ऐकून सापवाले नरमले. त्यांनी हळूच माघार घेतली. ''बघू, बघू'' असं म्हणत ते आपापल्या पालात शिरले. हिकम्याचा नाइलाज झाला. शेवटचा उपाय म्हणून त्यानं पाऱ्याच्या पालाकडे धाव घेतली. पाऱ्याला उठवून तो म्हणाला, ''सरकार, अन्याय झाला. यंक्यानं माझा नाग मारला. मी बुडालो. ठार झालो.''

हे ऐकून पाऱ्या तरकटला. तो धडपडत उठला, काठी ओढली नि यंकूकडे निघाला. पण त्याच्या चार लेकींनी शिकस्त करून त्याला आवरला. दोन बायकांनी हातापाया पडून त्याला शांत केलं. पुढं जाऊच दिलं नाही. घरात नेऊन निजवला.

परंतु बिथरलेला पाऱ्या उठून पळत होता. यंकूला इरसाल शिव्या देत होता; ऊर बडवीत ओरडत होता, ''यंक्या, तू आता जगणार न्हायीस – मरणार! मारणार!!''

त्या दिवशी रात्रभर पाऱ्या यंकूला हाका मारीत शिव्या देत होता; आणि यंकू आपली काठी घेऊन अंगणात बसला होता.

सूर्योदय झाला. नवी सकाळ अवतीर्ण झाली. भिकारी उठले नि पोटामागे धावत निघाले. कोणी कुत्री सोडली. कोणी माश्यांचे गळ घेतले. कोणी आपली जनावरं घेतली नि चालू लागले. आपली जगण्याची साधनं घेऊन ते पळत सुटले. भीक नि शिकार एवढंच त्यांना ठाऊक होते.

यंकूनं तिरकमठा घेतला. काही तरी शिकार करावी, सांजला खारटवणी करावं, असा विचार करून तो डोंगरात शिकारीला निघाला.

एवढ्यात ''कुत्रं पिसाळलं, पळा–'' असा एकच गिल्ला झाला. पाऱ्याचं एक शिकारी कुत्रं पिसाळलं होतं. ते भरधाव धावत होतं. माणसांवर झेपा घेत होतं. माणसं भिऊन पळत होती. दारं नसलेल्या पालात हे कुत्रं शिरून पोरांना खाऊन टाकील या भयानं ती वस्ती हादरली होती.

काही तरणी पोरं काठ्या घेऊन कुत्र्याच्या मागं लागली होती. ''आलं! गेलं – पळा!!'' असा हलकल्लोळ उसळत होता. मग ते कुत्रं पळत पळत गावात शिरलं. गावची पोरं उठली. त्यांनीही पाठलाग आरंभला. दंगल वाढली. पुन: ते कुत्रं माळावर आलं तेव्हा पाऱ्या दारू पिऊन तर्र झाला होता. हातात काठी घेऊन मैदानात नाचत होता. आपल्या कुत्र्याचा तो पराक्रम पाहून त्याला आनंद झाला होता. तो काठी हवेत उंच धरून गिरक्या मारून ओरडत होता, ''खबरदार – सरा! ते कुत्रं नव्हं, माझा वाघ हाय. त्येला हात लावू नका. न्हाय तर एकाएकाचा हात कलम करीन. न्हाय तर मी बापाचं नाव सांगणार न्हाय.''

कुत्रं कुणालाच सापडत नव्हतं. लोक दमले होते. शिकारीला निघालेला यंकू

वेताळबाच्या वडाखाली आला. तोच पुढून कुत्रं सरळ त्याच्या अंगावर आलं. कुत्र्यामागून काठ्या घेऊन धावणारी पोरं ओरडली, ''यंकू, सांभाळ — कुत्रं पिसाळलंय!'' तसा यंकूनं तिरकमठा सरसावला नि एकाच बाणात ते कुत्रं ठार मारलं.

आपलं कुत्रं यंकूनं मारलं हे कळताच आगीत तेल ओतलं गेलं. पाऱ्याचा पारा चढला. काठी घेऊन तो धावला. वेताळाच्या वडाखाली आला. यंकूला अडवून ओरडला, ''का रं भडव्या, माझं कुत्रं मारलंस?''

''ते पिसाळलं व्हतं.'' यंकू उत्तरला नि पाऱ्यानं एकदम त्याच्यावर झडप घेतली. तो यंकूचा गळा धरून म्हणाला, ''चल! कुत्रं भरून दे. कुत्रं तरी दे, न्हाय तर शंभर रुपये तरी दे. मी सोडणार न्हाय.''

प्रकरण हातघाईवर आलं. लोकांनी मध्ये पडून पाऱ्याला धरलं नि ते सर्व लटांबर परत माळावर आलं. हिकम्या गारुड्याची भावकी पाऱ्याच्या मागं उभी झाली, नि पुन: पाऱ्याला चेव आला. त्यानं चढाई केली नि यंकूला काठी मारली. यंकूचं डोकं फुटून तो रक्तानं न्हाला नि क्षणात तोही भडकला. त्यानं तिरकमठा ठेवून काठी घेतली. सख्या, बक्या हे माकडवाले त्याच्या मदतीला धावले. यंकूनं सरळ जाऊन पाऱ्याला दणका दिला. फटकन पाऱ्याचं डोकं फुटलं. तो गर्रकन फिरला तोच यंकूनं दुसरा झपाटा दिला, तसा पाऱ्या खाली कोसळला. मग यंकूनं पायापासून डोकीपर्यंत त्याला भरीव मार देऊन चेचून काढायला सुरुवात केली.

यंकू पाऱ्याला हुरडा चोपावा तसा चोपत होता. खाली पडलेला पाऱ्या माशासारखा तडफडत होता. पाऱ्याच्या दोन बायका नि चार लेकी एका सुरात बोंब ठोकीत होत्या. माणसं भयभीत झाली होती. कुत्री भुंकत होती. माळ दणकत होता. यंकू पिसाळून मारीत होता.

आता पाऱ्या जगत नाही अशी सर्वांची खात्री झाली. सर्व डवरी एका जिवानं ओरडत पुढं झाले. त्यांनी धीर करून यंकूच्या त्या माराखालून पाऱ्याला ओढून बाजूला काढलं.

ती दंगल ऐकून गावकरी चकित झाले. माळावर काही तरी भयंकर प्रकार घडत असावा असं वाटून जो तो माळाकडे पळत होता. हां हां म्हणता माळावर गर्दी वाढली. गप्पकन नाथा पाटील पुढं आला. त्याला पाहून दंगल शांत झाली. पाटील काहीच बोलला नाही. तो सर्व दंगलखोरांना घेऊन लगेच चावडीवर गेला. भिकाऱ्यांचा खटला उभा राहिला. गाव जमला. लोक ऐकू लागले. नि पाटील म्हणाला,

''हं, बोला रं — कशापाई ही झगाझगी पेटली. नि रंगपंचमीवाणी हे रक्ताचं शिंपणं का खेळला बोला. फडाफड बोला. न्हाय तर एकाएकाची चमडी लोळवतो.''

"सरकार, माझं गरीबाचं ऐका." पाऱ्या कण्हत हात जोडून म्हणाला, "ह्यो यंक्या माकडंवाला आम्हा गरीबात दांडगा झालाया. माझं कुत्रं मारलं, शंभर रुपये किमतीचं. मी पार बुडालो. यंक्या कुणाला बी मारतोय."

"काय रं यंक्या, काय भानगड हाय सांग." पाटील यंकूवर बिथरून म्हणाला, "सांग कुत्रं कां मारलंस?"

"सरकार, माझं बी ऐका." यंकू डोकं टेकून म्हणाला, "ह्या पाऱ्याचं कुत्रं पिसाळलं होतं. सारा गाव त्याच्या मागं लागला व्हता. इचारा गावाला. ते कुत्रं माझ्या अंगावर आलं म्हणून म्या मारलं."

हे ऐकून पाऱ्या भडकला. दातओठ खात म्हणाला, "धनी, ह्यो लबाड हाय. हेचं काही ऐकू नगा. माझं कुत्रं देवावाणी होतं. हेनं इनाकारण मारलं."

"अस्सं." पाटील विचार करून म्हणाला, "ऐक, तुझं कुत्रं देवावाणी होतं, मग पिसाळलं का सांग? सरळ बोल. ही चावडी हाय."

"सरकार–" पक्या हात जोडून म्हणाला, "पाऱ्यानं पाच कुत्री पाळल्याती."

"का रं, ए डवऱ्या, ही कुत्र्यांची फौज का म्हणून पाळलीस? का कुत्री तुला दूध देतात? काय सांग बघू."

"माझी कुत्री शिकार करत्यात." पाऱ्यानं उत्तर दिलं. नि पाटील आवाज चढवून म्हणाला, "शिकार कशाची करत्यात? सश्याची का माणसांची? आरं, तू तर बारा तास दारू ढोसून तर्र असतोस, मग शिकारीला कोण जातं?"

पाऱ्या कण्हू लागला. आजारी माकडाप्रमाणं डोळे झाकून बसला. धाप लागल्यासारखं करून पुन: म्हणाला,

"ही कलागत कुत्र्यासाठी झाली. पण ह्या – ह्या यंक्याला चरबी आलीया. ह्यो दिसंल ते बडवतोय. कुणाचंच ऐकेना."

"खरं हाय, तू भारी साळसूद." पाटील कडक आवाजात म्हणाला, "हे बघा, तुम्ही तिकडं काय बी करा. पण एकमेकांचे मुडदे पाडू नका. आरं, तुम्ही गरीब माणसं सरळ नांदा. भांडू नका. आणि एकमेकांची टकुरी फोडू नका. तुम्ही लेकानू एकमेकांचं जीव घेशीला नि मला कोडी काढावी लागतील. परत कबावती करू नका."

इतका वेळ ऐकत बसलेला नाना नागरा चिडला. पाटलावर डोळे वटारून म्हणाला, "पाटील, तुम्ही पांढरीचं धनी हायसा. नि हे बिलबिलत का बोलता? आवं, ही माणसं नव्हती. भुतं हायती भुतं. ही भुतं भुताच्या माळावर ऱ्हावून फाजीलपणा करत्यात. हेस्नी हाकून द्या बरं. नकं ती कटकट."

नाना नागऱ्याच्या बोलानं बाळ्या डोंबारी दचकला; नि उघड्या टिरी खाजवीत म्हणाला, "आम्हास्नी देवानं शिंगं नि शेपटं दिली असती तर बरं झालं असतं. पण

देवाचं चुकलं म्हणून आम्ही असं भांडतोय.''

हे ऐकून लोक हसले, नि हिकम्या गारुडी पुढं सरकला. डोकीचं पागोटं काढून खाली ठेवून हात जोडून म्हणाला, ''आम्ही उगाच भांडत न्हाय सरकार. कालच ह्या यंक्यानं माझा साप मारला. आता मी बघा उपाशी मरतोय. आता काय खाऊ?''

हे ऐकून नाथा पाटलानं यंकूकडे पाहिलं, आणि यंकू नम्रपणे म्हणाला, ''त्यो साप माझ्या पालात शिरला व्हता. माझ्या पोरीला चावला असता म्हणून म्या मारला.''

''खोटं, खोटं!'' हिकम्या किंचाळला. ''सरकार, माझ्या सापाला दातच नव्हतं. म्या ते पाडलं व्हतं. माझा साप गरीब अल्लाची गाय व्हता.''

''काय दात नव्हतं?'' पाटील तरकटला. म्हणाला, ''पर तुझ्या सापाला दात न्हायती हे ह्या यंक्याला रं कसं कळावं? का त्यो साप ह्येच्या घरात शिरताना दात इचकीत शिरला व्हता? आरं काय हे! काय बी पाळतोय! काय बी खातोय! आरं नीट वागा!''

''एवढा गुन्हा माफ करा.'' बाळ्या डोंबाऱ्यानं पुन: फोडणी दिली.

आणि नाना नागरे म्हणाला, ''काय रं माफी करा? तू पोरीची फलटण घेऊन तमाशाची धमाल करतूस. ह्यो पाऱ्या दारूचं बेरलं काढून गावची पोरं येडी करून पैसा खोऱ्यानं ओढतोय, नि म्हणे गुन्हा माफ करा. आरं, हे पाप हाय पाप—''

''चला जावा—'' पाटील डिरकत म्हणाला, ''परत कलागत करू नका. नीट वागा. कुत्र्या-मांजरासाठी मरू नका — जा.''

पाटलाच्या हुकमानं सर्वांच्या गळ्याचं पेडं पडलं. सर्व भिकारी उठून माळाकडे निघाले.

पाऱ्याला त्याच्या चार लेकींनी धरलं होतं. हातात काठी घेऊन पराभूत पाऱ्या एक एक पाऊल टाकीत होता. दर पावलागणिक यंकूला शिवी देत होता. तो कण्हत होता. कसा तरी चालत होता. त्याच्या दोन बायकाही रडत रडत यंकूला शिव्या देत होत्या. बाळ्या डोंबारी, सैदू दरवेशी हे त्या माळावरचे शहाणे पाऱ्याला व त्याच्या कुटुंबाला शांत करीत होते. ते सर्व गावाबाहेर पडून वेताळाच्या वडाजवळ येताच एकाएकी पाऱ्या खुलला. उभा राहिला. दातओठ खात म्हणाला, ''लेका माकडंवाल्या, आज त्वां मला हाग्या मार दिलास. पण याद राख, मी सूड घेणार हाय. तुझं वाटोळं करीन तरच मी एका बापाचा, न्हाय तर हजार बापाचा व्हयीन!''

हे ऐकून यंकूही पेटला. म्हणाला, ''पाऱ्या, तू कवा बी ये. माझी तयारी हाय. माझी काठी तयार हाय. तुला ठार मारूनच मीबी मरणार हाय.''

पुन: वातावरण तंग झालं. बाळ्या-सैदू मध्ये पडले. दोघांनी त्यांना आवरलं. पुन: भडकणारी हाणामारी त्यांनी रोखून धरली.

त्या दिवसापासून पाऱ्या वेडावला. यंकूवर सूड घेण्यासाठी चरफडू लागला. तो रोज

पोटभर दारू पीत होता, उठता बसता यंकूला शिव्या देत होता, आणि रोज सकाळी साणेवर कुऱ्हाडीला धार लावीत होता.

सैदू, बाळ्या यांच्यामार्फत यंकूला सांगावे देत होता. ''बेटा हुशार अस. एका दिवशी तुझी खांडोळी करीन — तरच मी पाऱ्या! मी तुझी पोरगी पळवीन, तिला मुंबईला नेऊन विकीन, कसबीण करीन, काय वाटंल ते करीन. पण तुझा सत्यानाश करीन.''

## २

यंकू आणि पाऱ्या डवरी यांना मारामारीत झालेल्या जखमा भरून आल्या तरी भुताच्या माळावरचं वातावरण तसंच धगधगत होतं.

यंकू आणि पाऱ्या एकमेकांवर झडप घेण्यासाठी टपून बसले होते. सारखे गुरगुरत होते, गरजत होते, नि संधीची वाट पहात होते. समोरासमोर आलेल्या वाघाप्रमाणे ते रोज पवित्रा बदलून वार करण्यासाठी सज्ज होते.

सर्व गारुडी पाऱ्याच्या फळीत एक झाले होते, तर सर्व माकडवाले यंकूच्या मागं उभे होते. फक्त ठिणगी पडण्याचाच अवकाश होता.

बाळ्या डोंबारी आणि सैदू दरवेशी रक्तपात टाळण्याची शिकस्त करीत होते. मारामारी निश्चित पेटणार आणि दोन हत्तींच्या झुंजीत आपला चुराडा उडणार या भीतीनं ती वस्ती थरथरत होती.

या कलागतीत यंकूला सुख नव्हतं. कलागत व्हायला नको होती. आपण पाऱ्यावर हात टाकून वैराची आग विनाकारण पदरी बांधली, आपलंच चुकलं असं त्याला वाटत होतं. पाऱ्या डोकेफिरू आहे. गावोगावचे टगे, मारके त्याच्या ओळखीचे आहेत. चोर, खुनी, दरोडेखोर त्याच्या घरी येतात. तो एखादे दिवशी आपला घात करील, आपल्यावर मारेकरी घालील, कुणाला तरी सांगून दुर्गाला पळवील, आपल्या अब्रूवर घाला घालील. आपण काय करणार?...

गेल्या आषाढात काशी मेली. तिनं जीव सोडताना दुर्गाला जपा म्हणून सांगितलं होतं. प्राण सोडताना दुर्गाकडे ती एकटक पहात होती. तिच्या डोळ्यात चिंता दिसत होती. बायांनी तिचा शेवटचा मळवट भरला नि तिरडीवर घातलं, तरी ती दुर्गाकडेच पहात असावी असं वाटत होतं. जर पाऱ्यानं दुर्गाला पळवलं तर काशीचा आत्मा काय म्हणेल? लोक काय म्हणतील? अब्रू जाईल, दुर्गा जाईल, नि काशीचा आत्मा आपणाला शाप देईल...

आपण उगीच पाऱ्याशी वैर केलं. वैरापोटी वाईटच पदरी पडतं. पण त्यात आपलं

तरी काय चुकलं?... पाऱ्या डांबीस आहे. त्याला अक्कल, काळीज, माणुसकी काहीच नाही. आपण त्याचं ते कुत्रं मारलं, पण ते तर पिसाळलेलं होतं.

जाऊ दे. जे व्हायचं ते होऊ दे. आता घाबरून चालणार नाही. येईल त्या प्रसंगाला तोंड देणं भाग आहे.

यंकू विचारांच्या वावटळीत गिरक्या घेत होता. रोज भीक मागण्याकरिता जाताना दुर्गाला बरोबर घेऊन जात होता. दुर्गाला, गंग्याला घेऊन तो दारोदार फिरत होता. खांद्यावर दुर्गा, तिच्या खांद्यावर गंग्या, हातात काठी, असा यंकूचा तो अवतार पाहून लोकांना त्याची दया येई. ते दुर्गाचं नि गंग्याचं कौतुक करत, हसत. आया-बाया साव सांधणीतून लोणचं, चटणी, भाकरी आणून दुर्गाला देत, आणि यंकूच्या पोटाची सोय होई.

एकदा दिवसाबरोबर यंकू घरी आला होता. भाकरी खाऊन दातात काटूक घालून दात टोकरीत दारात बसला होता.

पलीकडे गारुड्यांच्या पालात गडबड सुरू होती. पोरं पुंगी वाजवीत होती. बाळ्या डोंबारी आपला कर्कश आवाज चढवून 'अत्तराचा फाया माझ्यासाठी आणा राया' ही ओळ घोळीत होता.

डवऱ्याच्या पालाकडे पाऱ्याचा आवाज चढत होता. गोसावी दिवसभर भीक मागून आले होते. येताना त्यांनी वाटेश्वराच्या बागेत जाऊन एक वानर मारून आणलं होतं. त्यांचं ते वानर चुलीवर शिजत होतं.

कुत्री, माणसं, पोरं यांनी ती वस्ती दणाणून सोडली होती. सर्वत्र चुली पेटल्या होत्या. धूर वर चढत होता. जिकडून तिकडून भिकारी येत होते. आल्या आल्या आपल्या पोराबाळांना भेटत होते.

थोड्या वेळनं बाळ्या डोंबाऱ्यानं 'अत्तराचा फाया' थांबवला आणि तो यंकूकडे आला. हळूच त्याच्या शेजारी बसत म्हणाला,

"यंकू, आता या माळावर राम उरला न्हाय. पाऱ्यानं सारी डाळ नासली. त्यो खंडीच्या वरणात मुतणारा माणूस हाय. तुझी कलागत झाल्यापासनं येडा झालाय. मुलखाची माणसं जोडतोय."

"म्हंजी कोण? —" यंकूनं चमकून विचारलं, आणि बाळ्या म्हणाला, "काळगावचे गल्या आणि बल्या हे जबरं गडी त्येनं मैतर जोडल्याती. ते दोघं एका तेल्याचा खून करून आज दोन वरसं ह्याच माळावर फरारी हायती. पाऱ्यानं त्येस्नी दारू पाजून मैतर जोडून तुझ्यावर घाला घालायचा इचार केलाय. राती गल्या नि बल्या आपली माणसं घेऊन पाऱ्याकडे आले व्हते. पाऱ्यानं त्येस्नी पोटभर दारू पाजली, अंडी चारली आणि तुझी कागाळी सांगितली. ते तुझ्यावर रागावलं हायती."

"पर म्या काय केलंय त्येंचं?" यंकू वैतागून म्हणाला, "मी गरीब हाय—"

"मग हतं कोण समरत हाय?" बाळ्या म्हणाला, "आम्ही सारं गरीब हाय. पण पाऱ्या गरीब नव्हं. तुला ठार मारण्यासाठी त्यानं बल्या नि गल्या हे दोघं मैतर जोडलंय. तू सावध अस. त्येनं आपल्या दोन तरण्या पोरी म्होरं करून हे बळ उभं केलंय. त्या पोरी सांगतील तसं हे दोन वाघ करणार. खून कर म्हणताच खून करणार. तू आपला जीव वाचव."

"बरं, पर मी कसं करू?—" यंकूनं विचारलं, आणि बाळ्या दबक्या आवाजात म्हणाला, "आज राती बल्या आणि गल्या आपली माणसं घेऊन येणार हायती. पाऱ्यानं एक डबा तयार ठेवलाय. पोरी हाईतच दिमतीला. शिवाय मला तमाशाची सुपारी दिलिया. तमाशा संपला की ते सारे तुझ्यावर चढाई करणार हायती. हे सारं मला पाऱ्यानंच सांगितलंय. तू सावध अस."

यंकू कावराबावरा झाला. त्यानं सर्वत्र पाहिलं. झांजड पडली होती. काहीच दिसत नव्हतं. पालापुढं पेटलेल्या चुली विझत होत्या. गलका कमी झाला होता. कुत्री खुरमुंडी घालून बसत होती. गाढवं निवांत उभी होती. काळोख मी म्हणत होता. गावात तुरळक माणसं बोलत होती. सर्व काही हळूहळू शांत होत होतं. वातावरण भेसूर बनत होतं.

माळ शांत झाला. तरी गोसाव्याच्या पालांकडे गडबड सुरू होती. त्यांचा वानर अजून शिजत होता. त्याला पोटात घालून गोसावी अंग टाकणार होते.

आज रात्री गल्या नि बल्या माणसं घेऊन येणार या भीतीनं यंकूचं काळीज फुटत होतं. ते दोन खुनी दारू पिऊन पाचपन्नास लोक घेऊन आपल्यावर चालून आले तर आपला निभाव लागणार नाही. आपण लढून लढून किती लढणार? लगेच आपण धुळीला मिळू. माणसं मारणं आपलं काम नव्हं. ते गल्या, बल्या या डाकूंचं काम. त्यांना सराव आहे. ते मला ठार मारतील. मी मारला गेलो की पाऱ्याला आनंद होईल. पण मग दुर्गाचं काय? तिला कोण संभाळणार? ती कशी जगणार? भयंकर वाईट होईल. असा प्रसंग वैऱ्यावरही नको.

यंकूला काही सुचेना. तो बाळ्याला म्हणाला, "बाळू, मला काय सुचंना. आता मी काय करू तेवढं सांग."

"तू माझं ऐक—" बाळ्या म्हणाला, "तू दुर्गाला माझ्या पालात निजव आणि काठी घेऊन यताळबाच्या वडाखाली जाऊन बस. वकूत बाका हाय. त्येला बगल दे. चल—"

"खरं हाय तुझं." यंकू चटकन उठला. तोच बाळ्याची धाकटी पोरगी गुल्ली घाबऱ्या घाबऱ्या पळत येऊन हुंदके देत म्हणाली,

"ए बापा, आरं बसलास काय? चल, आपली थोरली भुकाळी टुंगली."

तसा बाळ्या खिन्न झाला. तो दु:खी सुरात शांतपणे म्हणाला, ''यंकू, आज वंगाळ झालं. माझी म्हातारी गाढव मेली. तिचा पायगुण लई चांगला होता. ती माझ्या दावणीत आली नि मग माझी दावण भरली. बारा गाढवांचा मी मालक झालो. ती माझी देवावाणी गाढव मला सोडून गेली.''

यंकू काहीच बोलला नाही. मुकाट्यानं दोघेही गाढव पडलं होतं तिथं गेले. यंकूनं गाढवाचे चारी पाय एकत्र बांधले आणि भिस्त्यानं खांद्याला पखाल लावावी तसं ते गाढव खांद्याला लावून वेताळाच्या वडापुढील पडक्या जागेत नेऊन टाकलं.

परत येताच त्यानं घाई केली. दुर्गाला उचलून बाळ्याच्या पालात आणून झोपवली. तिच्या उशाला गंग्याला बांधलं, नि काठी घेऊन तो त्या वटवृक्षाच्या ओलसावलीत जाऊन बसला.

सर्वत्र शांतता होती. माळावरचं वातावरण मुकं झालं होतं. तो अफाट माळ यंकूला भयाण भासू लागला.

एकाएकी शांतता भंगली. कुत्री एकदम उठून भुंकू लागली. माणसं धडपडून उठली, बावरली. पण नाथा पाटील आलेला पाहून निर्भय झाली. बाहेर येऊन उभी राहिली.

आज दिवस बुडताना भिकाऱ्यांनी देवाच्या बागेत शिरून वानर मारला. महापाप केलं. वानर म्हणजे मारुतीच्या अवतार नि त्या मारुतीला मारून खाणारे हे भिकारी राक्षस आहेत. त्यांना शिक्षा झाली पाहिजे, अशी गावातील भाविकांनी पाटलाकडे जोरदार तक्रार केली होती. आणि त्यांचं समाधान करण्यासाठी गल्या नि बल्याच्या पाळतीवर निघालेला नाथा पाटील खांद्याला बंदूक लावून नि पन्नास गडी बरोबर घेऊन मुद्दाम माळावर आला होता. पाटलाच्या लोकांनी गोसाव्यांची पालं वेढली. गोसावी अपराध्याप्रमाणं ओळीनं उभे राहिले. त्या सर्वांवर करडी नजर रोखून पाटील म्हणाला, ''हं, सरळ बोला, तुम्ही कोण लोक?''

''आम्ही गोसावी, सरकार.''

''कुणाची भगती करता?''

''आम्ही राम भगत हाय, मालक.''

''राम कोण?''

''राम, दसरथी राम.''

''मारुती रामाचा कोण?''

''त्यो पण राम भगत, धनी.''

''वानेर, मारुतीचं कोण?'' पाटलाचा आवाज एकदम चढला. गोसावी दचकले. एक म्हातारा गोसावी पडक्या सुरात म्हणाला, ''वानेर मारुतीचा अवतार, सरकार.''

''मग त्या मारुतीला कापून खाणारी तुम्ही माणसं की रावणाची औलाद? बोला.''

पाटलानं 'बोला' या शब्दावर जोर दिला. तशी ऐकत उभी असलेली माणसं पांगली. कोणी काहीच उत्तर देईना म्हणून पाटील भडकला. दोन पावलं पुढं सरकून म्हणाला, "बोला की."

"स—र—का—र!" एक गोसावी कण्हत म्हणाला,

"वानेर खायाचा आम्हास्नी रामानंच वर दिलाय. म्हणून आम्ही वानर खातो."

"कसला वर दिलाय?" पाटील वैतागून म्हणाला, "काय वर दिलाय तुमास्नी रामानं? मारुतीला कापून खावा म्हणणारा त्यो राम कुठाय? आणा पुढे."

"माफी करा सरकार." म्हातारा गोसावी पुढं आला. त्याच्या अंगावर चिंधी नव्हती. त्याची हाडं लुकलुकत होती. त्याच्या भुवया पिकल्या होत्या. त्याच्या डोकीचे शुभ्र केस भुरभुरत होते. तो आपल्या पोटावर मारून घेत म्हणाला, "हे पोट ऐकत न्हाय. आम्हास्नी वानेर खा म्हणून वर देणारा राम म्हंजी हे पोट. हे भरत न्हाय. आज गुन्हा घडला खरा, पण पोटासाठी."

"काय करावं तुमास्नी?" पाटील शांत होत म्हणाला, "आरं, तुम्ही मानसावानी मानसं असून काय बी मारताय. काय बी करताय. वानेर, मुंगसं, माकडं, मांजरं, कोल्ही, खारुट्या, जे मिळेल ते मारून खाताय आणि वर देवाचा हवाला देऊन देवाला सुळावर देताय."

"मान हजर हाय." असं म्हणून म्हाताऱ्यनं पाटलापुढं गुडघे टेकले, मान वाकवली, नि म्हणाला, "ऐंशी वरसं असाच जगतोय. मिळेल ते खाऊन दिवस रेटतोय. आमचं जगणं नि मरणं आमास्नीच ठावं. ते इतरास्नी उमजणार न्हाय. फिरत फिरत जगणं भारी कठीण असतं. माझी पाच पोरं कर्ती व्हवून काय बी खाऊन मरून गेली."

हे ऐकून पाटील दुःखी झाला. म्हणाला, "गोसाव्या, तुझं खरं हाय. पण पचंल ते खावं, नि साजेल ते ल्यावं, असा वडलांचा बोल हाय. मी परत निघालो. पर परत देवाच्या बागेत शिरून वानेर मारू नका.'''

सर्व गोसाव्यांनी हात जोडले, आणि नाथा पाटील आपली माणसं घेऊन गावाकडे गेला. माळ शांत झाला. गोसाव्यांनी आपली शिकार पोटभर खाल्ली.

माळावरची वस्ती थंडगार पडली होती. माणसं घोरत होती. सर्वत्र निःशब्दता नांदत होती. त्या भयाण माळावर माणसांचं अस्तित्व जाणवत नव्हतं. सर्व काही त्या भयाण अंधारानं गिळून घेतलं होतं. फक्त एकच आणि तोही मानवांच्या घोरण्याचा आवाज ऐकू येत होता. त्यांच्या तोंडाची मचमच ऐकू येत होती. काही पालात कोणी चाळवत होते. कुठं कोण बरळत होते. दिवसभर जे बोलले होते ते ते रात्री झोपेत बोलत होते. उद्या कशी भीक मागायची याचा विचार करून झोपलेले झोपेत तोच विचार घोळीत होते. ते सर्व आपली दुःखं, आपल्या सर्व विवंचना विसरून झोपले होते. त्यांची दुःखं

त्यांच्यापासून काही वेळ दूर झाली होती.

आकाश काळवंडलं होतं. चांदण्या मलिन झाल्या होत्या. त्या जिवावर उदार होऊन कशा तरी लुकलुकत होत्या. वेताळाच्या देवस्थानाजवळच्या त्य वटवृक्षावर घुबडं घुमत होती.

त्या वटवृक्षाच्या सावलीत यंकू आपली काठी पोटाशी धरून बसला होता. त्याची नजर त्या माळावर सारखी तळपत होती. गल्या नि बल्या ही दोन भयंकर माणसं त्या जंगलातून निघून वस्तीवर कशी येतात हे पाहण्यासाठी तो उत्सुक झाला होता. त्याची तीक्ष्ण नजर त्या भयानं अंधाराचा ठाव घेत होती. त्यानं कान टवकारले होते. खुस् होताच तो चमकून उठत होता. काठी सावरून बसत होता.

मध्यान्ह रात्र उलटली आणि डवऱ्यांच्या पालाकडे गडबड उडाली. पाऱ्याची कुत्री भुंकू लागली, तसा पाऱ्या बाहेर आला. त्यानं हाड् हाड् करून कुत्र्यांना शांत केलं. एक राकेलाचा दिवा दारात धूर ओकू लागला. नंतर एक दिवटी ढणढणू लागली. तिचा कापरा प्रकाश त्या जीर्ण पालावर थरथरू लागला. गल्या-बल्या येऊन पोचले होते. पाऱ्यानं गल्या नि बल्या यांना मुजरा केला. घोंगडं अंथरलं. दोघेही घोंगड्यावर ऐसपैस बसले. त्यांची माणसं पांगून बसली.

गल्या नि बल्या यांची नुकतीच पंचविशी उलटली होती. कोवळ पोरं पण सरकारी दहशतीनं नि जंगलात वावरून त्यांचे चेहरे क्रूर झाले होते. मनं बेडर झाली होती. त्यांना जगण्यामरण्याची मुळीच पर्वा वाटत नव्हती. ते दिवसा स्वत:ला दडवीत होते, नि रात्री राजासारखे मिरवत होते. रात्री त्यांच्या अंगवळणी पडल्या होत्या. भीती त्यांना भेडसावीत नव्हती. त्यांनी इरसाल गुन्हेगार, खुनी यांना जवळ करून त्यांची कटून मरणारी एक फौजच उभी केली होती. ते सर्व बेदरकार जीवन जगत होते. त्यांना उद्याची फिकीर नव्हती. गल्या नि बल्या यांची टोळी म्हणजे एक मृत्युदलच त्या खोऱ्यात वावरत होतं.

पाऱ्यानं डाव साधला होता. गल्या-बल्या या दोन झुंजार माणसांशी संबंध जोडला होता. आता ते दोन भयंकर मारेकरी यंकूचा खून करायला तयार झाले होते. पाऱ्या त्या दोघांना यंकूवर लोटून मोकळा होणार होता. सूड घेऊन शांत होणार होता. फक्त सूडासाठी तो वेडा झाला होता. यंकूच्या घातासाठी तो वेडावला होता. त्यासाठी त्यानं आपली अब्रू पणाला लावली होती.

दिवटीचा हिल्लाळ डगमगत होता. प्रकाशानं मैदान उजळलं होतं. पाऱ्यानं जाऊन बाळ्याला उठवला. कण्हत, कुंथत बाळ्या उठला. दोन्ही पोरींना तयार व्हायला सांगून मैदानात आला.

बाळ्यानं ऐटबाज लहरी पटका बांधला. ढोलकं घेतलं. सूर सुरकंडी घेऊ लागले. ढोलकी-पेटीच्या सुरानं माळ जागा झाला.

भिकारी जागे झाले. बिचकून दूर बसले. आज तमाशा पहायला मिळणार याचा त्यांना आनंद झाला होता.

पाऱ्याच्या पोरींनी जादू केली. दारूचे कप फडात फिरवले. माणसं तर्र झाली. मूळची बेडर माणसं दारूनं बेबंद झाली. त्यांची नाकं फेंदारली. डोळे तारवटले.

ढोलकं वाजू लागलं. बाळ्याच्या जुन्या ऑरगननं माळ भारून टाकला. दोन तरण्या पोरी घुंगरं बांधून नाचू लागताच माळावर एक अप्रतिम संगीत अवतीर्ण झालं. तारुण्य, रूप, कंठ नि कला यांचा संगम होऊन तिथं नवी दुनिया निर्माण झाली. माणसं निर्भान होऊन कानात प्राण आणून नि डोळ्यांचे पदर पसरून ते सूर कानात साठवू लागली. बाळ्याच्या ढोलक्याच्या ठेक्यानं त्या ओसाड माळाचं हृदय भरून आलं. नूपुरांच्या झणझणाटानं नि संगीताच्या लहरींनं माळ दुमदुमला.

भीक मागून, शिकार करून, कष्ट करून, मिळेल ते खाऊन, अंधारात निपचित पडणारी दरिद्री माणसं मशालीच्या प्रकाशात तल्लीन झाली होती. त्यांचा आत्मा संतुष्ट होत होता.

यंकू त्या वटवृक्षाखाली बसून हे सर्व पहात होता. बाळ्या रंगात आला होता. त्याच्या दोन्ही पोरी ढोलकीच्या ठेक्यावर गिरक्या मारीत होत्या. 'लाजाळू मी नार माझा हात सोडा राया...' ही लावणी घुमत होती. ढोलाच्या ठेक्यानं, गोड कंठानं, पायातील नूपुरांनी तिथं सप्तसुरांचं इंद्रधनुष्यच निर्माण केलं होतं.

बल्या नि गल्या दारूच्या नशेनं बेबंद झाले होते. पाऱ्याच्या पोरी वरचेवर त्यांना दारू देऊन त्यांची धुंदी उतरू देत नव्हत्या. पाऱ्या यंकूच्या खोपटाकडे आणि गल्या-बल्याकडे आलटून पालटून पहात होता.

"चल, तमाशा पुरं—" बल्या एकाएकी ओरडला. आणि माणसं दुचमटली. बाळ्या आपलं ढोलकं काखोटीला मारून मागं सरकला. त्याच्या पोरी नूपुरांचे पाय आपटीत पालाकडे पळाल्या. हैराण झालेली माणसं चिंध्या सावरीत पालात शिरली. आणि बल्या ओरडला, "यंक्याला भाईर काढा आणि रानात घेऊन चला. उठा."

तशी ती निर्दय माणसं यंकूच्या पालाकडे धावली. त्यांनी पाल वेढलं. मशालीच्या प्रकाशात यंकूचा शोध केला. पण यंकू सापडला नाही, तसं बल्याला येऊन सांगितलं, "यंकू फरारी!"

यंकू पळून गेल्याचं कळताच पाऱ्या निराश झाला. तो पागल झाला. आपला वैरी फरारी झाल्याचं दु:ख त्याला आवरेना. तो खवळला. कुऱ्हाड घेऊन यंकूच्या पालाकडे धावला. डोळे झाकून घाव घालू लागला. पाल उध्वस्त करूनच तो शांत झाला.

"आज गेला, उद्या सापडंल. पाण्यात बुडाला तरी आम्ही त्याला सोडणार न्हाय. त्याची गर्दन मारूनच दम घेऊ." असं पाऱ्याला सांगून गल्या-बल्या जंगलाकडे गेले.

पाऱ्याला आनंद झाला. "आजचा घाव चुकला, उद्या चुकणार न्हाय. माझा वैरी मला भिऊन पळाला. माझा जय झाला." असं म्हणून तो हातात कुऱ्हाड घेऊन नाचू लागला.

सकाळ झाली. समोरच्या डोंगरावर सूर्य आला. पाऱ्या जागा झाला. त्यानं प्रथम यंकूच्या पालाकडे पाहिलं, तसा त्याला धक्काच बसला. तो बराच वेळ तसाच पालाकडे पाहत राहिला. यंकूचं पाल जसंच्या तसं उभं होतं. दुर्गा दारात बसून भाकरी खात होती. गंग्या उड्या मारीत होता. इतक्यात यंकू आंघोळ करून घागर भरून आला. त्यानं पूजा केली. दुर्गाला उचलून खांद्यावर घेतलं. चटकन गंग्या दुर्गाच्या खांद्यावर जाऊन बसला. यंकूनं कुऱ्हाड घेतली, आणि तो गावाकडे निघाला.

तो सर्व प्रकार पाहून पाऱ्याचा आत्मा चरफडला. धडधडून पेटला. त्यानं धडपडून उठत पोरींना सांगितलं, "बघा, बघा, त्यो माझा वैरी आता कुऱ्हाड घेऊन तयार झालाय. माझ्या छातीवर नाचतोय. त्यो फरारी झाला न्हाय. त्यानं मागं सरून घाव चुकवला. आताच तुम्ही रानात जावा. गल्या नि बल्या हेंची गाठ घ्या. सांगा की, माकडंवाला परत आला. कुऱ्हाड घेऊन हिंडतोय. आजच रात्री तुम्ही परत या."

## ३

सूर्य कासराभर वर आला होता. त्याच्या किरणांनी माळावरची कुसळं झळझळत होती.

गाव आणि माळ यांमध्ये वेताळाचं देऊळ उभं होतं. मोठमोठे दगड ओळीनं उभे होते. त्यांच्यापुढं नारळाच्या कवचांचा ढीग पडला होता. एका प्रचंड वटवृक्षानं त्या देवस्थानावर सावली धरली होती.

देवळाच्या डाव्या बाजूला दोन झुडपं जवळजवळ उभी होती. त्या झुडपांपासून जवळच बाळ्या डोंबाऱ्याचं मेलेलं गाढव पडलं होतं. ते लाकडासारखं ताठलं होतं. त्याच्या पोटाचा नगारा झाला होता. चार कावळे त्या गाढवावर धडपडत होते. परंतु त्याचं दडदडीत चामडं त्या कावळ्यांना तुटत नव्हतं.

दहाबारा गिधाडं गाढवापासून फटकून उभी होती. ती वरचेवर आकाशात पहात होती. मग उगीचच आपले पंख झटकून साफसूफ करीत होती. काही गिधाडं शांतपणं गाढवाचा देह पहात होती — आणि पुन: पुन: आकाशात पाहून चीत्कारत होती. ती कुणाची तरी आतुर होऊन वाट पहात होती.

जवळच्या त्या झुडपात भिकाऱ्यांची चार पोरं दबा धरून बसली होती. त्यांनी त्या

मृत गाढवाच्या शेपटीखाली फास लावला होता. फासाची दोरी गाढवाच्या एका पायाला बांधली होती. ती पोरं गंभीर होऊन आकाशात पहात होती.

नाथा पाटील राधानगरीला लेकीकडे निघाला होता. त्याची मुलगी राधानगरीत रंगराव पाटलाला दिली होती. जावई रंगराव हुंडा दिला नाही म्हणून भडकला होता. त्या हूड पोराला चार गोष्टी सांगून मार्गावर आणावा या हेतूनं आज नाथा पाटील सकाळीच घराबाहेर पडला होता. तो वेताळाच्या देवळाजवळ येताच ती चार पोरं पाहून तो गपकन थांबला. पोरं काय करताहेत हे त्याला कळेना. ही पोरं कावळे धरणार का गिधाडांची शिकार करणार, हे पाहण्यासाठी तो त्या वटवृक्षाच्या आड उभा राहिला.

माळावरचे भिकारी म्हणजे काळगावला एक पीडाच होऊन बसली होती. त्यांचं वागणं, करणं, शिकार, काहीही खाणं, हत्या करणं हे गावातील लोकांना पसंत नव्हतं. पंढरीचा वारकरी नाना नांगरा, नुकतीच काशीयात्रा करून आलेली कुलकर्ण्यांची यमूताई, जैन धर्माचा पाईक अण्णा डरके ही भाविक माणसं पाटलावरच ख्रिथरली होती. बाळकू जोशी तर पाटलाला फिर्यादीची धमकीच देत होता. पाटील अडकित्त्यात सापडला होता. आज ही भिकाऱ्यांची पोरं कसला पराक्रम करणार हे पाहण्यासाठी तो त्या वटवृक्षाआड उभा होता.

पाटील पोरांकडे पाहत होता आणि पोरं आकाशाकडे पाहत होती. ती गुडघे पोटाशी धरून बारीक नजरेनं आकाश धुंडाळीत होती. मध्येच ती गपकन त्या गाढवाकडे पाहत होती. परत त्यांच्या नजरा गगनाला गवसणी घालीत होत्या.

एकाएकी पोरं बावरली. त्यांनी अधिकच दडी मारली. ती मुरून एकमेकांकडे पाहून हसली. कावळे उठून दूर झाले. गिधाडांनी जागीच पंखांची फडफड करून दोन पावलं माघार घेतली. किंचित सरकून त्यांनी आकाशात पाहिलं.

मग नाथा पाटीलही गगनात पाहू लागला. एक काळा ठिपका अति वेगानं जमिनीकडे येत होता. त्याची गती सारखी वाढत होती, नि त्याचबरोबर त्याचा आकारही वाढत होता. तो डाग तीरासारखा खाली येत होता. त्याला पाहून ती पोरं सारखी मुरत होती, दडत होती. हरकली होती, हसत होती. त्यांना आनंद झाला होता. ती एकमेकांना डिवचत होती.

तो डाग क्षणाक्षणानं खाली येत होता, तसतसा त्याचा आकारही वाढत होता. आकाशातून दगड फेकावा तसा तो धरणीकडे येत होता. हा काय प्रकार आहे या विचारानं नाथा पाटील आतुर झाला. त्यानं पागोटं काढून काखेत घेतलं नि आ वासून तो आकाशात पाहत राहिला.

थोड्या वेळानं करकराट ऐकू येऊ लागला; आणि मग एक प्रचंड गिधाड त्या गाढवाजवळ येऊन उतरला. आपले पंख अंगाशी आवळून तो खाली येताच कावळे

पंख पसरून दूर पळाले. गिधाडांनी त्याला नमस्कार केला. मग तो गीध डुलत डुलत पुढं गेला. त्यानं गाढवाला पाहून घेतलं. तो रक्तासारखा लाल दिसत होता. त्याच्या खांद्यापासून चोचीपर्यंत त्याला पंख नव्हते. तो एखाद्या जाकीट चढविलेल्या श्रीमंतासारखा दिसत होता. तो नाचत नाचत पुढं गेला. त्यानं ते गाढव निरखून पाहिलं आणि एक ललकार ठोकली. त्याबरोबर इतर गिधाडांना आनंद झाला. त्यांनी पंखांची फडफड करून आपला आनंद व्यक्त केला.

मग तो नवा राजगीध पुढं सरकला. त्यानं चौफेर नजर फिरवली. गाढवाच्या मागे जाऊन त्यानं पुन: सर्वत्र पाहिलं. आणि गपकन गाढवाच्या शेपटीखाली आपली पल्लेदार चोच खुपसली. तो खांद्यापर्यंत गाढवात शिरला. पुन: परत मागे सरकला. तसे इतर गीध पुढं झाले. पण त्याच वेळी तो लाल रंगाचा राजगीध संकटात सापडला. त्याची मान बाहेर येताना पोरांनी लावलेल्या फासात पूर्ण अडकली होती. त्या गिधाडानं जोराचा हिसका दिला. परंतु त्याची मान फासात अधिकच गुंतली. तसा तो प्रचंड राजगीध धडपडू लागला. केविलवाणा चीत्कारू लागला.

त्यासरशी ती चार पोरं धावली. त्यांनी काठीनं त्या राजगीधाचा चुराडा केला. बघता बघता त्याला झोडपून ठार केला, नि त्याचा मृत देह घेऊन ती हसत खिदळत ओढ्यात उतरून माळाकडे पळाली.

तो प्रकार पाहून नाथा पाटील चकित झाला. जो प्राणी नजरेला सापडत नाही, त्याला जिता मारून ही पोरं पळाली, याचंच त्याला नवल वाटलं. त्या भिकारी पोरांनी कुठं फास लावला नि तो आकाशात राहणारा प्राणी कसा येऊन त्या फासात अडकला? 'जावं त्याच्या वंशा तेव्हा कळे' ही तुकारामाची ओळ आठवून तो विचारमग्न होऊन पाहतच राहिला.

"राम राम पाटील—" यंकूनं रामराम केला. पाटील भानावर आला. त्यानं वळून यंकूकडे पाहिलं. यंकूच्या खांद्यावर दुर्गा होती. दुर्गाच्या खांद्यावर गंग्या ऐटीत बसला होता. आणि हातात फरशी कुऱ्हाड घेऊन यंकू पाटलापुढं उभा होता.

नाथा पाटील यंकूला पाहून हसला. म्हणाला, "ही उतरंड घेऊन कुठं निघालास?"

"पोट न्हील तिकडं." यंकू खिन्न सुरात म्हणाला. "पर धनी, माझं मराण लांब न्हाय. ते मला हुडकीत फिरतंय. राती म्या मरणाला बगल दिली म्हणून आज आपली भेट झाली. न्हाय तर..."

"मला समजलं न्हाय. यंकू, नीट सांग." पाटील चमकून म्हणाला, "मी पाटील हाय. मला कळू दे. ही काय भानगड हाय. कसलं मराण..."

"पाऱ्यानं माझ्यावर मारेकरी घातल्याती, सरकार."

यंकूनं सुस्कारा सोडला.

"कुठलं हायती त्ये?" पाटलानं विचारलं.

"तुमच्याच गावचं, त्या डोंगरातलं."

"कोण ते सरळ सांग..."

"बल्या अन् गल्या." यंकू उत्तरला.

"कोण म्हणतं?" पाटील उद्‌गारला. ती दोन नावं ऐकून त्याचा चेहरा गंभीर झाला.

यंकू शांतपणे म्हणाला, "राती ते दोघं माळावर आले व्हते. पाऱ्यानं त्येस्नी दारू पाजली. बाळूचा तमाशा झाला. मग त्येंनी माझ्या घरावर चाल केली. पाल मोडलं. मी पोरगी नि माकड बाळूकडे ठेवून दडी मारली म्हणून वाचलो. न्हाय तर माझा राती खून झाला असता."

"आज राती ते परत येणार का?" पाटलानं विचारलं. आणि यंकू म्हणाला, "आज नक्कीच ते येणार. ते वाघ हायती. त्यास्नी कुणाचं भ्या हाय?"

"ठीक. नसू दे. आणि ते वाघ बी असू देत. ह्या वाघांची आजच शिकार करायची."

"तुम्ही कुठं निघालाय?" यंकूनं विचारलं.

"मी राधानगरीला जाणार व्हतो. मग आता न्हाय जात. आज गल्या-बल्याचा निकाल लावूनच मोकळा व्हतो. चल."

पाटील मागं फिरून यंकूबरोबर गावाकडे चालू लागला. चालता चालता म्हणाला, "आज दिवसभर गावात ऱ्हा. सांजला माळावर जा. भाकरी खा. अंधार पडला की पोरगी नि हे माकड बाळयाकडे ठिवून तयार ऱ्हा. मी बी तयारी करतो. येऊ देत ते वाघ. मी बी हैराण झालोय. माझा बी जीव टांगणीला लागलाय! काळजात सुई घेऊन मी दिवस काढतोय."

यंकूला धीर आला. त्याची हिंमत दुणावली — आपण एकटे नसून आपल्याही मागं जबर बळ आहे याची जाणीव होऊन त्याच्या अंगातील अपार बळ जागं झालं. त्याचा आत्मा झुंजेला तयार झाला. त्यानं सहज आकाशात दिवसाकडे पाहिलं. जणू तो म्हणत होता, 'बा सूर्यनारायणा, तू लौकर मावळ. अंधार पडू दे. रात्र होऊ दे, आणि ते वैरी माळावर येऊ देत. मग तू उद्या उगव आणि बघ तो रक्तपात!'

दिवस मावळला होता. अंधाराच्या थराखाली ती माळावरची दुनिया झाकली होती. पालात जळणाऱ्या दिव्यांचा प्रकाश पालांच्या लहानशा दारातून अंगणात आडवा पडला होता. काही पालांपुढं चुली पेटल्या होत्या. वारा पळत येऊन चुलीतील जाळ बाहेर लोटीत होता. त्या जाळाच्या उजेडात ती पालं उग्र दिसत होती.

यंकू आपल्या दारात शांत बसला होता. त्याला पाहून कित्येक भिकाऱ्यांना धडकीच भरली होती. आज हा नाहक मरणार असं कित्येकांना वाटत होतं. कित्येक भिकारी मनात हळहळत होते. यंकू आपली कुऱ्हाड मांडीवर घेऊन शेजाऱ्यांची हालचाल पाहत होता. पाऱ्याच्या पालात चोरटी हालचाल होत होती. पाऱ्या अंगणात बसला होता. त्याच्या

हातातील कुऱ्हाड अधून मधून चमकत होती.

पाऱ्याची थोरली लेक हातात तांब्या घेऊन जवळच्या ओढ्यात गेली होती. ती पुष्कळ उशीर झाला तरी परतली नव्हती. तेव्हा आपण घरी आहोत, ही खबर त्या पोरीनं डोंगरात नक्कीच पोचवली असणार. आता लौकरच गल्या नि बल्या येणार, अशी यंकूची खात्री झाली. परंतु आपणाला काही कळलेलं नाही अशा आविर्भावात तो निवांत बसला होता.

यंकू अजून ही वस्ती सोडून दूर जात नाही म्हणून बाळ्या डोंबारी चिडला होता. सख्या, पक्या, बक्या हे माकडवाले हादरून गेले होते.

सैदू दरवेशानं गांजाची चिलीम भरली. नारळाच्या शेंडीचा नरम विस्तव चिलमीत भरून दाबला. आपल्या वाघासारख्या पिंजारलेल्या मिश्या चापून चोपून बसवीत देवाचं नाव घेतलं नि मोठा आवाज काढून, ''बाणी पर बाणी, तुझं भुस्काट मी ताणी. तशीच फिर गलथानावाणी, नाथ चल साथ, खिलाव दुधभात, मार दुस्मनकू लाथ, कालभैरव!'' अशी पल्लेदार आरोळी ठोकून त्यानं जोरदार झुरका मारला. सर्व धूर पोटात कोंडून, ठसकत बायकोला म्हणाला, ''सकीना, आज रातकू यंक्या माकडवाल्याचा नक्कीच मुडदा पडताय देख.''

''क्या— ?'' सशाचं मांस रांधीत बसलेली सकीना गर्रकन फिरून म्हणाली, ''गरीब बिचारा यंक्या. उस्की पिछे ह्यो झुटिंग माटिमिल्या पाऱ्या कायकू पडताय?''

''उस्कू चरबी चढ्या.'' सैदू पुन: झुरका मारून म्हणाला, ''दारूका धंदा करताय. छोऱ्यांको म्होरं करके ऐता रायता वरपताय. नि कताय मैं बाशा हाय. पर मैं कताय आता आपनेकू ह्यो माळ पुरं, सकाळी इधरसे हाटऱ्याका!''

पूर्वेकडून चंद्र वर सरकला. अंधार वितळला. काळोखात दडलेली सृष्टी पुन: आपलं रूप धारण करून उभी राहिली. माळ उजाळला. माळावरची ती पालं आकारली.

चंद्रबिंब वरवर सरकत होतं. रुपेरी रंग पालावर वर्षत होता. चांदण्याचा झगझगाट झाला होता. कोणी तरी त्या चांदण्या घासून पुसून पुन: आपापल्या जागी बसवल्या आहेत असा भास होत होता.

यंकू दारात तसाच बसला होता. आता गल्या, बल्या येणार, मग मोठी मारामारी होणार. त्यात कोण मरणार नि कोण जगणार — या विचारानं त्याच्या मनाची अस्वस्थता सारखी वाढत होती. तो जागीच बसून दूरवर पाहत होता, कानोसा घेत होता.

थोड्या वेळानं बाळ्या डोंबाऱ्याचा जावई गुलब्या आला. तो तुरकाटीसारखा झडझडीत होता. त्यानं फक्त लंगोटी लावली होती नि डोकीची हजामत घोटून केली होती. त्याच्या तुकतुकीत डोकीवर चंद्राचा प्रकाश चमकत होता. उन्हात तांब्या चमचमावा तसं त्याचं डोकं दिसत होतं.

''का आलास गुलब्या?'' यंकूनं विचारलं.

"बाळ्यानं बोलिवलंय." गुलब्या म्हणाला.

यंकूनं आपल्या पालात पाहिलं. दुर्गा घोरत होती. तिला गंग्या बिलगला होता. यंकूनं हळूच दुर्गाला उचलून पोटाशी घेतली. मग गंग्याला बगलेत घेऊन तो बाळ्याकडे गेला. एका कोपऱ्यात दुर्गाला झोपवून म्हणाला, "काय हुकूम हाय बाळू?"

"पाऱ्याची थोरली पोरगी डोंगरात गेलीया ती अजून आल्याली न्हाय." बाळ्या गुडघ्यावर ठेका वाजवीत म्हणाला, "तू पालात थांबू नकं. मरशील. आजबी ते बोकं परत येणार हायती. येताळबाकडं जा."

"येऊ दे." यंकू उद्विग्न होऊन म्हणाला. "पण बाळू, ही तरवार मानेवर घेऊन ह्या माळावर आणि किती दिवस ऱ्हावू मी?"

"तू हतं ऱ्हावू नगं." बाळू गंभीरपणे म्हणाला, "तू आजची रात कशी तरी काढ नि सकाळी कासार खोऱ्यात जा. तुला जबर धोका हाय."

"पण कसा जाऊ? पोरगी नि पाल कसं न्हेवू?" यंकू भुई टोकरीत म्हणाला, "दोन गाढवं व्हती, ती बायकू मेली तवा इकून टाकली. दुर्गा माझ्याबरोबर किती मजल मारणार? दमंल ती."

"मग असं कर." बाळ्या म्हणाला, "मी तुला याक गाढव देतो. जा घेऊन नि म्होरल्या वर्साला आपली गाठ पडली म्हंजी मला तू पैसे दे."

"मग काय देव पावला!" यंकूला आनंद झाला. यंकूला बाळ्या डोंबारी डोंगराएवढा दिसू लागला. हा लंगोटी नेसून तमाशा करणारा बाळ्या माणूस नसून देव आहे असं वाटून यंकूनं बाळ्याचे पाय धरले. म्हणाला, "बाळू, मी सकाळी जाईन, पण आजची रात आणीबाणीची हाय. जगलो तर जाईन. पण मेलो तर माझ्या दुर्गाला जतन कर. माझ्यावर उपकारांचा डोंगर रचून ठीव. मी हजार जन्म घीन नि तुझं उपकार फेडीन."

"काळजी करू नगं. वक्ताला पाठ दे —" बाळूनं यंकूच्या पाठीवर थाप मारली. मग यंकूनं दुर्गाला जागी केली. तिला पोटाशी धरून पुनः थोपटून निजवली. तिच्या गालाचा एक मुका घेतला. गंग्याच्या पाठीवरून हात फिरवून कुऱ्हाड घेऊन तो बाहेर पडला. म्हणाला, "बाळू, मी जातो."

"जा, जवळ थांबू नको." बाळू हुंकारला आणि यंकू जलदीनं वेताळाच्या देवळाजवळ येऊन वटवृक्षाच्या ओलसावलीत उभा राहिला. त्यानं दूरचा कानोसा घेऊन एक दीर्घ निःश्वास टाकून ऊर रिकामा केला. चांदण्यांच्या प्रकाशात सर्व माळ पाहून घेतला आणि मग गावाकडे पाहिलं. त्याला आनंद झाला. पंचवीस माणसं घेऊन नाथा पाटील येत होता.

त्यानं कडेकोट तयारी केली होती. डोकीचं पागोटं घट्ट बांधून कंबर बांधली होती. डबर बॅरलची दुजरबी बंदूक त्यानं खांद्याला लावून गळ्यात काडतुसांची माळ घातली

होती. लढाईवर निघालेल्या योद्ध्यासारखा तो सज्ज झाला होता. त्याच्यामागं गावची हिंमतवान पोरं तयार होती. त्यांनीही हत्यारे घेतली होती. पंचवीस माणसांत पाच बंदुका दिसत होत्या. कुऱ्हाडी लखलखत होत्या. बरचे जिभल्या चाटीत होते. यंकूला आनंद झाला. त्यानं पाटलाला मुजरा केला. नाथा पाटील हळूच म्हणाला, ''काय खबर माळावरची?''

''अजून सामसूम हाय.'' यंकू म्हणाला, ''पाऱ्याची थोरली पोरगी डोंगरात गेलीया, अजून आली न्हाय, तीबी आता येणार..''

''येऊ देत.'' नाथा पाटील बंदुकीच्या दस्त्यावर ठेका धरून म्हणाला, ''चला, — आपली बी तयारी करा. दोन बंदुकी खाली ओढ्यात तयार ठिवा. थोडी माणसं नाक्यावर उभी करा. आणि माऱ्याच्या जागंवर हत्यारं तयार असू द्यात. गल्या-बल्या नि त्येंची माणसं आत घेऊन मग मारा करा. पण जपून! एकादा भिकारी मरंल — काळजी घ्या. मातर त्या दोघांस्नी सोडू नका. कटून मरा, जावा.''

क्षणात सर्व लोक पांगले. नागरे, डरके नि पाटीलआळीची माणसं आपापल्या जागी जाऊन उभी राहिली. त्या हत्यारी माणसांनी पालांच्या भोवती कडं केलं. सामसूम झाली.

पाटील आणि यंकू चार माणसं घेऊन वटवृक्षाखालीच उभे होते.

काही क्षण गेले नि भिकाऱ्यांची कुत्री भुंकू लागली. तसा पाटील तयार झाला. त्यानं बंदूक काढून हाती घेतली. तिचा ढाळा काढून टायगर मोकळा केला. कुत्र्यांनी माळ डोकीवर घेतला. रात्र हादरू लागली. भिकारी घाबरले.

गल्या नि बल्या आपली माणसं घेऊन माळावर दाखल झाले. त्यांच्या माणसांजवळची हत्यारं झगझगत होती. पाऱ्याची थोरली लेक बल्याला बिलगून चालत होती. ती फौज पाऱ्याच्या दारापुढं येताच पाऱ्या पुढे झाला. त्याला आनंद झाला.त्यानं लेकीच्या पाठीवरून हात फिरवला. भुंकणाऱ्या कुत्र्यांना दम देऊन शांत केलं.

पाटील सावधपणे पुढे सरकत म्हणाला, ''हं, चला. शिकार सापळ्यात आली. आता येडा आवळा. पिसू भाईर जाऊ देऊ नका. बल्या, गल्या हेस्नी हेरून दणका द्या.''

माणसांनी चोरटी हालचाल केली. त्यांनी फरा धरला आणि आधीच दिलेला वेढा आवळीत आणला. मुस्कटीत हत्यारं घेऊन ती जागोजाग दबा धरून बसली.

पाऱ्यानं घाई केली. दारात घोंगडी अंथरली. दारूच्या बाटल्या ओळीनं मांडल्या. दिवटी पेटवली. चार कोंबड्यांच्या मांसाची परात अंगणात आली. पोरीनं चपळाई केली. कप भरले, आणि माणसं तर्र होऊ लागली. पाऱ्या गल्या-बल्यांना हात जोडीत म्हणाला,

''सरकार, माझा वैरी यंक्या जिवंत हाय. त्यो गव्हूभर बी नमला नाय. मला वाचवा—''

तशी ती माणसं भडकली. 'यंक्या-यंक्या—' करू लागली. भिकारी घाबरले. पाऱ्या

म्हणाला, "सरकार, तमाशा—"

"नकं." बल्या गरजला. "आधी त्या यंक्याला ठार मारा. चला."

गल्या-बल्याची माणसं उठली. त्यांनी यंकूच्या पालाकडे दौड मारली. पण यंकू तिथं नव्हता. सर्वांची निराशा झाली.

बल्यानं हुकूम सोडला, "चला परत." आणि पाऱ्याच्या पोरीचा हात धरून तो डोंगराकडे चालू लागला. पाऱ्या गांगरला. म्हणाला, "माझ्या पोरीला रातची कुठं न्हेता?"

"तुझी लेक सासरी जातीया. बाजूला हो." बल्या खेकसला आणि लगेच गल्यानं दुसऱ्या पोरीचा हात धरून तिला बाहेर ओढली. तशी पाऱ्यानं बोंब ठोकली. एक काठी त्याच्या पाठीत बसून तो खाली कोसळला.

बल्या नि गल्या पुढं झाले आणि नाथा पाटलाची बंदूक कडाडली. रात्रीचं ऊर फाटलं. दाही दिशा दणाणल्या. लगेच दुसऱ्या बंदुका आग ओकू लागल्या. झपाट्यानं बल्याची दोन माणसं पडली. यंकूला चेव आला. तो पुढं धावला. गावकऱ्यांनी कडं आवळलं. हाणामारी पेटली. कुऱ्हाडीवर कुऱ्हाड आदळू लागली. ठिणग्या उडू लागल्या. प्रसंग बाका आहे हे जाणून बल्या डोंगराकडे मुसंडीनं निघाला. पण नाथा पाटलानं एक गोळी घालून त्याला पाडलं. तेल्याच्या गोळीनं गल्या कोसळला. दंगल शांत झाली.

गावकरी धावत आले. त्यांच्या मशालींनी माळ उजाळला. गल्या नि बल्या जखमी होऊन पडले होते. त्याची दोन माणसं घायाळ झाली होती. भिकारी बिचकत पुढे येऊन तो प्रकार पाहत होते. पाऱ्याच्या दोन्ही पोरी धडकी भरून निपचित पडल्या होत्या. पाऱ्याच्या दोन्ही बायका पुढे झाल्या. त्यांनी आपल्या पोरी उचलून घरात पळवल्या नि त्यांचा जीव मोकळा झाला.

नाथा पाटील जखमी माणसांना घेऊन चावडीकडे गेला. माळावर शांतता प्रस्थापित झाली. ती रात्र सर्वांनाच काळरात्र वाटली. कोणालाही त्या रात्री नीज लागली नाही. भिकाऱ्यांनी त्या माळाची दहशत घेतली नि त्यांनी सकाळी पळून जाण्याची तयारी केली.

पहाट होत होती. रात्रीचा काळा काळा पडदा विरविरीत होऊन दूर होत होता. नवा प्रकाश भूगोलावर उतरत होता. भिकारी आपली पालं मोडून गाढवावर लादीत होते. त्यांना तो माळ नकोसा झाला होता.

बाळ्यानं दिलेल्या गाढवावर यंकूनं आपलं पाल मोडून लादलं होतं. त्यावर दुर्गा बसली होती. दुर्गाच्या खांद्यावर गंग्या बसला होता आणि हातात कुऱ्हाड घेऊन यंकू तो माळ सोडून दूर निघाला होता.

सर्व भिकारी एकाच वेळी एकाच भीतीनं गांगरून माळ सोडून निघाले होते. गावदरीची

पांद त्यांच्या तांड्यानं भरली होती. तो प्रचंड तांडा स्तब्धपणे काळगावची हद्द सोडीत होता. पोरंबाळं गाढवावर बसली होती. मोठी माणसं गाढवांना हाकीत होती. कित्येक माणूस वळून वळून त्या माळाकडे पाहत होती.

गाढवांवर लादलेल्या खुराड्यात कोंबडे बांग देत होते. पूर्वेला सूर्योदय होत होता. भिकाऱ्यांच्या पायाखालची पायवाट उजळत होती.

माळ ओस पडला तरी पाऱ्याचं एकच पाल उभं होतं. हट्टी पाऱ्यानं जागा सोडली नव्हती.

दिवस मावळला. रात्र झाली. लोक पळाले. पाऱ्याला दु:ख झालं. आपणही हा माळ सोडला पाहिजे, असं त्याला वाटू लागलं. याच गोष्टीचा विचार करीत तो अंगणात पडला होता.

मध्यान्ह रात्र उलटली होती. सर्वत्र भयाण वातावरण दाटलं होतं. पाऱ्या जागाच होता. तळमळत होता. गल्या-बल्या पकडले गेल्यावर आपला कोणी वाली नाही. आता इथे राहण्यात अर्थ नाही. उद्या सकाळीच हा माळ सोडायचा असा निश्चय करून त्याने कूस बदलली. तोच पाचपन्नास लोकांनी पाऱ्याला गराडा दिला. त्याला खेचला, आणि फरपटत ओढीत मैदानात नेला. एक जण त्याचा पाय ओढीत म्हणाला, "तूच गल्याबल्यांना पकडून दिलंस. एवढ्यात दुसऱ्यानं मांडीजवळ कुऱ्हाड हाणली. पाऱ्या सर्व शक्ती एकवटून ओरडला, आणि बेशुद्ध पडला.

पाऱ्याचा एक पाय मांडीपासून वेगळा झाला होता.

बायकांनी बोंब ठोकली. पोरींनी टाहो फोडला. एक इसम पुढं झाला. त्यानं थोरल्या पोरीला पुढं ओढली, "हिनंच दगा दिला. हीच बोलवाय आली होती." असं म्हणत त्यानं खसकन तिचं नाक कापलं.

पाऱ्या जन्मातून उठला. गारद झाला. त्याच्या बायका-लेकींनी जोरदार बोंब ठोकली, पण ती ऐकायला माळावर कोणीही नव्हतं.

## ४

यंकूची जीवनयात्रा सुरू होती.

दुर्गी, गंग्या, बाळ्या डोंबाऱ्यानं दिलेलं गाढव, एक तांब्या, एक पाल, एक अंथरूण — असा आपला संसार घेऊन तो कासार खोऱ्यात संचार करीत होता. जिथं दिवस मावळेल तिथं पाल ठोकून मुक्काम करीत होता. भिकेची भाकरी खात होता. दुर्गीला पोटाशी घेऊन रात्र कंठीत होता. उजाडलं की भीक मागत गंग्याचा खेळ करीत मजल

मारीत होता. त्याच्या हातापायांना विश्रांती नव्हती.

दिवस उगवून मावळत होते. रात्री येऊन जात होत्या. आठवड्याचे महिने होत होते. महिने वर्षात विलीन होत होते. पाठीमागे सकाळ, डोकीवर दुपार आणि पुढं संध्याकाळ घेऊन यंकू दौड मारीत होता. त्याचं मूळचंच अस्थिर जीवन वाऱ्यासारखं पळत होतं.

नकळत दुर्गा वाढत होती. कळी उमलून फूल व्हावं तद्वत तिच्या देहात बदल घडून येत होते. अशीच सात वर्षे गेली.

दुर्गा अठराव्या वर्षात दाखल झाली. तिचा चेहरा रसरसू लागला. छाती रुंदावली. उरोजाची उंची वाढली. कमरेपासून खालचा भाग फुगीर फासू लागला. डोकीचे केस पोटऱ्यांना कुरवाळू लागले. टपोऱ्या डोळ्यात नवं तेज तळपू लागलं. नजरेत तरलता आली. रंगानं गव्हाळी, रूपानं आगळी दुर्गा जुन्या नि फाटक्या वस्त्रातही अप्रतिम दिसू लागली. अंगावरच्या थिट्या कापडात तिची काया मावेनाशी झाली. तिच्या प्रत्येक हालचालीतून मोहकता ओसंडू लागली. ती धनुष्याच्या कमानीसारखी लवू लागली. ती हसली की रुपयांची ओंजळ खडकावर ओतल्याचा भास होऊ लागला. ती बोलली की सारंगीच्या तारा छेडल्याचा साक्षात्कार होऊ लागला. फुटक्या, पारा उडालेल्या आरशात आपला सुंदर चेहरा पाहून दुर्गा स्वतःवर संतुष्ट होत होती. तिला स्वतःच्या तारुण्याबद्दल, देहाबद्दल नि देखणेपणाबद्दल अभिमान वाटू लागला.

यंकूची जबाबदारी वाढली होती. तो दुर्गाला काळजाप्रमाणे जपत होता. तिला सुखी करण्यासाठी जिवाचं रान करीत होता. त्याला पाऱ्याच्या त्या शब्दांची आठवण सारखी होती. तो म्हणाला होता, "मी पोरीला पळवून नेईन. मुंबईत विकीन. कसबीण करीन." आणि ते शब्द आठवले की यंकूचं काळीज फाटत होतं. देवासारखी दुर्गा जर कोणी पळवून नेली तर — त्याला ती कल्पनाच सहन होत नव्हती. तो चरफडून ते विचार झटकून टाकीत होता, नि दुर्गाला क्षणभरही विसरत नव्हता की नजरेआड होऊ देत नव्हता.

अजूनही यंकू चालत होता. दिवसभर भीक मागत, गंग्याचा खेळ करीत पैसा जमवीत होता. रात्र झाली की कुठंही रानात माळाला, गावदरीला पाल उभं करीत होता. बारा घरचे बारा पदार्थ दुर्गापुढं ठेवीत होता. दुर्गा जेवली की रात्री एका अंथरुणावर तिला जवळ घेऊन अंग टाकीत होता. एका बाजूला गंग्याला घेऊन तो झोपत होता. पुनः सकाळी त्याच्या भ्रमणाला आरंभ होत होता.

यंकूच्या संसारालाही भरती आली होती. तो सारखा वाढत होता. त्याच्या एका गाढवाची दोन झाली होती. त्यानं एक माकडाची मादी घेऊन गंग्याचा संसार सुखी केला होता. एक दाढीवाला काळा बोकड घेऊन त्याचं नाव दगडू ठेवलं होतं. गंग्याला रंगी माकडीण मिळाली होती. शिवाय दगडू बोकडाला तो घोडा म्हणून राबवीत होता. यंकूनं

चार कोंबडीही पाळली होती. एकूण यंकू सुखी झाला होता.

गंग्या, रंगी नि दगडू बोकड, यंकू कर म्हणेल ते करीत. त्याचा खेळ पाहून लोकांना आनंद होत होता. मुकी जनावरं पण माणसासारखी वागतात, हालचाल करतात याचं लोकांना नवल वाटत होतं. त्यांची दया येत होती; आणि संतुष्ट होऊन माणसं यंकूला सढळ हातानं भीक वाढीत होती. एकाच गावात यंकूची झोळी भरत होती. चार पैसे जमत होते.

यंकू पैशाला पैसा जोडीत होता. दुर्गाचं लग्न करायचं, सर्व खर्च आपण करायचा, तिला कशाचंच उणं पडू द्यायचं नाही, या एकाच विचारानं तो पैसा जोडीत होता.

एके दिवशी दुपारी यंकू एका मळ्यात पोचला. थंडगार सावलीत भाकरी खाऊन पुढं जावं असा विचार करून त्यानं गाढवं थांबवली. दुर्गा गाढवावरून उतरली. पाटाकडेला एक म्हातारी बसली होती. तिनं यंकू आणि दुर्गा यांच्याकडे आळीपाळीनं पाहिलं नि ती हसली. त्या म्हातारीनं गंभीरपणे दुर्गाला पायाच्या नखापासून ते डोकीच्या केसांपर्यंत न्याहाळून घेतलं आणि यंकूकडे पाहत बोलू लागली, "चुकलास रं बाबा. तुझं वय आता निम्मं झालं. माणसानं साजेल ते ल्यावं नि पचेल ते खावं. पण तुला तेच उमजलं न्हाय. त्वां ही एवढी देखणी, इतकी तरणी बायकू करून चूक केलीस. आरं बाबा, हत्ती काबूत ऱ्हातो, पण तरणी बायकू हत्तीपरास वंगाळ. ही बायकू तुला झेपणार न्हाय..."

म्हातारीची ती बडबड ऐकून यंकू गोंधळला. दुर्गाची नजर चर्रकन वाकली. चकित होऊन ती म्हातारीकडे गेली. म्हणाली, "आजीबाई, ह्यो माझा नवरा नव्हं, माझा बाप हाय. अजून माझं लगीन झालं न्हाय."

म्हातारी दुमचटली. तिनं हळूच तोंडात मारून घेतल्यासारखं केलं नि दुर्गाच्या पाठीवरून हात फिरवीत ती यंकूला म्हणाली, "मला निराळं वाटलं. राग मानू नका. बस, खा भाकरी."

यंकू हसला.

यंकू गाढव हाकीत चालत होता. दुर्गा एका गाढवावर बसली होती. यंकू विचार करीत होता. खरंच दुर्गा मोठी झाली आहे. लोक तिला माझी बायको समजू लागले आहेत. याचाच अर्थ माझी दुर्गा आता बायको शोभेल. ती ज्याची बायको होऊन जाईल त्याचं घर सुखी होईल. तो संसार सोन्याचा होईल. आता दुर्गाचं लग्न झालं पाहिजे. ती आणखी किती दिवस अशी राहणार? लग्न करून सासरी जाणं जरूर आहे. तिला मन आहे. तिला भावना आहेत. त्या किती दिवस काबूत ठेवू शकेल? शिवाय बायकोची जात.

बायकोचा जन्म अगदी कांकणासारखा असतो. कांकण पिचलं की त्याचा नाद जातो. पुन: त्यात नाद निपजत नाही. माझी दुर्गा माझे कांकण आहे. ते पिचू नये म्हणून खटपट केली पाहिजे. एकादा चांगला नवरा पाहून तिचं लग्न केलं पाहिजे. नाही तर लोक असं काहीही म्हणत राहतील.

यंकू चालत होता. त्याच्यापुढं गाढवं पळत होती. पाठीमागून दगड्या बोकड येत होता. दुर्गा एका गाढवावर बसली होती. तिच्या मागं गंग्या माकड तिला बिलगून बसला होता. गंग्याच्या पेकटाला रंगी चिकटली होती. आणि असा तो आपला तांडा घेऊन यंकू झेपावत पुढं निघाला होता. तो दमत नव्हता, नमत नव्हता. तो वाऱ्यासारखा पळत होता.

दिवस बुडता बुडता यंकूचा तांडा चांदोली गावाच्या गावदरीला आला. पुढील प्रदेश डोंगराळ होता. रात्र काळोखी होती. पुढं जाणं धोक्याचं होतं. आजची रात्र चांदोलीत मुक्काम करून सकाळी डोळ्याच्या उजेडात पुढं जावं असा विचार करून यंकू चांदोली गावात शिरला आणि कुठं उतरावं याचा विचार करू लागला.

दिवेलागणीलाच गावात सामसूम झाली होती. सर्व दारं लागली होती. माणसं बोलत नव्हती की पेठेत ती दिसत नव्हती. गावावर मरणकळाच जणू पसरली होती. कोणीही माणूस बाहेर दिसत नव्हता. हा काय प्रकार आहे याचं यंकूला कोडं पडलं. अजून दिवेलागण नाही झाली तर या लोकांनी दारं का लावली? हा विचार करीत तो पेठेत आला, आणि गावाच्या दुसऱ्या टोकाला जाऊन एका घरापुढं उभा राहून त्यानं घरमालकाला हाक मारली, तेव्हा आतून एक म्हातारा म्हणाला, ''कोण हाय? काय पायजी तुला?''

''मी एक माकडवाला हाय. मी तुमच्या दारात आज उतरतो. सकाळी पुढं जाईन.'' यंकूनं विनंती केली आणि तो म्हातारा म्हणाला, ''नकं, नकं, पुढं जा.''

यंकू पुढं गेला नि दुसऱ्या घरापुढं उभा राहून म्हणाला, ''वाइच दार उघडा. मी माकडवाला हाय. मला पाणी द्या. मी तुमच्या दारात रात काढणार हाय. सकाळी पुढं जाईन.''

तशी एक तरुण बाई दारात येऊन म्हणाली, ''बाबा, गावात रोज रात्री वाघ शिरतो. तू आपलं बिऱ्हाड घेऊन पुढं जा.''

''आता कुठं जाऊ?'' यंकू म्हणाला, ''मला जरा पाणी द्या. मी अंगणात रात काढतो नि सकाळी जातो.''

ती बाई बिळात नागीण मागं सरावी तशी घरात गेली. दोन तांबे पाणी देऊन तिनं

दार लावून घेतलं, आणि तिच्या अंगणातल्या झाडाखाली यंकूनं आपलं बिऱ्हाड उतरलं.

दुर्गानं नि यंकूनं भाकरी खाल्ली. जनावरांना चारा घातला. पाल उभे करून दुर्गाला अंथरूण करून देऊन यंकू तिरकमठा घेऊन बसला.

गावात सामसूम झाली होती. सर्व दारं बंद झाली होती. कुठंही हूं की चूं होत नव्हतं. दुर्गा अंथरुणावर पडली होती. ती जागीच होती. यंकू तिच्या पायथ्याला जागत बसला होता. वातावरण भकास नि भेसूर भासत होतं. दुर्गाला झोप लागत नव्हती. वाघाचं नाव ऐकल्यापासून ती भ्याली होती. आणि वरचेवर उठून यंकूकडे पाहत होती. गाव निजला होता. सर्वत्र नि:शब्दता नांदत होती. सर्व काही निर्जन भासत होतं. दुर्गा नि यंकूला ती दोघंच त्या गावात आहेत असं वाटत होतं.

दुर्गा जागी होती. यंकू जागा होता. रंगीच्या पाठीला डोकं टेकून गंग्या निजला होता. दोन्ही गाढवं उभ्या उभ्या आराम करीत होती. दगडू बोकड रवंथ करीत होता.

मध्यान्ह रात्र उलटली, आणि एक माणूस हळूच आला नि त्या बाईनं दार उघडून त्याला घरात घेतला. ते पाहून यंकूचं मन अस्वस्थ झालं. त्यानं चौफेर नजर फिरवली. रंगी, गंग्या, दगडू बोकड नि दोन गाढवं यांनी डोळे झाकले होते. दुर्गा झोपेनं गुरमळली होती. तिचा तो तरुण देह यंकूच्या जवळ निश्चल पडला होता. यंकूनं तिरकमठा खाली ठेवून हळूच पांघरूण ओढून दुर्गाच्या अंगावर घातलं. तशी ती म्हणाली, "तू बी झोप की. मला झोप लागत न्हाय. तू किती जागणार?"

हे ऐकून यंकूचं मन अधिकच बावचळलं. तो तिरकमठा बाजूला ठेवून तसाच तिच्या शेजारी कलंडला. तशी दुर्गा पुढं सरकून त्याला बिलगली. त्याच्या हृदयाला भिडून निजली. मग अधिकच पुढं सरकली नि निपचित पडली. तिच्या नाकातून ये-जा करणारे नि:श्वास यंकूच्या कानात घुमू लागले. ते मंद नि:श्वास उन्माद पेरू लागले. त्यानं दुर्गाला ओढून जवळ घेतली. हृदयाशी घट्ट धरली. मग तो जग विसरून दगडासारखा निश्चल पडला. आणि ती दुर्गा आपल्या जन्मदात्याला भिडून लगेच घोरू लागली.

बाप जवळ असला की तिला लगेच झोप लागत होती. ती तिची जन्माची सवयच होती. आणि ती यंकूला ठाऊक होती. पण आता दुर्गा लहान नाही. तिनं दूर निजावं असं त्याला वाटत होतं. पण दुर्गाला तसं वाटत नव्हतं.

मध्याह्न रात्र संपली. यंकू जागाच होता. दुर्गा त्याला तशीच बिलगली होती. त्या भरदार देहाच्या स्पर्शानं त्याचं मन विकारवश होत होतं. तो मनाचा दुष्टावा त्याला विषासारखा वाटत होता. त्यानं हळूच तिच्या पाठीवरून हात फिरविला. ती रुंद पाठ, ते सोजीच्या पिठासारखं मऊ शरीर नि तो तेजोमय चेहरा. तो हळूच बाजूला सरकून उठला, तशी दुर्गा जागी झाली. तिनं यंकूला ओढून जवळ निजवला. स्वत: सरकून निजली. यंकू बावरला होता. त्याला ती रात्र कठीण वाटत होती. तो मनात खचत होता.

यंकूचं मन वेडावलं होतं. ते बावचळलं होतं. ते वेडावलं होतं. ते यंकूच्या कानात सांगत होतं, "ही तुझी दौलत आहे. हिच्यावर फक्त तुझी मालकी आहे. तू हा मळा केला आहेस. जपला आहेस. तो आज ना उद्या लोकांचा होणार. मग तुला काय मिळणार आहे? उठ—"

आणि त्या विचारानं यंकू पिसाट झाला. तो चटकन उठला. त्यानं हळूच दुर्गाच्या अंगावरचं पांघरूण सरळ केलं. तशी ती म्हणाली,

"बापा नीज, मला थंडी वाजतीय."

"तू नीज. हाय मी." यंकूनं हळूच तिच्या कपाळाचा मुका घेतला. तशी ती गालात हसली. यंकू बाजूला सरकला, नि मग तिला लहान मुलाप्रमाणे थोपटीत बसला.

दुर्गा घोरू लागली. तेव्हा यंकूचा जीव शांत झाला. त्यानं फडाफड तोंडात मारून घेतलं नि पुन: तिरमकठा घेऊन समोर अंधारात पाहत बसला. माणसाचं मन धोकेबाज आहे. त्याचा भरंवसा करू नये. मन काहीही सांगतं नि माणसाला गारद करतं. दुर्गा आपली आहे. आपण तिला वाढवली आहे. पण तिचं लग्न होऊन सासरी जाणं नि संसार करणं हा देवाचा मार्ग आहे. तो बदलणं पाप आहे. चुलीचं लाकूड चुलीलाच जळावं, तसंच लेकीनं सासरी नांदावं हा रिवाज आहे. मी माझ्या दुर्गाचं लग्न करून देणार नि तेही लौकर करणार. आता दुर्गा लहान नाही. ती मला जन्मभर साथ देणार नाही. आणि ती जन्मभर माझ्याबरोबर राहिली तरी आपणच खटपट करून तिला गुदरली पाहिजे. मुलीची जात लाजाळू असते. ती तोंडानं बोलत नसते. ती आपलं लग्न कर असं कधीही म्हणणार नाही. अंतरीची कळ सांगणार नाही. भावनांची धग कळू देणार नाही. परंतु ती भयंकर धग ती किती दिवस काबूत ठेवणार? दुर्गा भावनेच्या आहारी गेली नि तिचा पायच घसरला तर....

शिवाय आपण गरीब, बारा गावं फिरणार. रोज नवी माणसं भेटणार. कुणी तरी तिच्यावर नजर ठेवील. भुरळ घालील. नाही तर ही तरणी दुर्गा कुणाला तरी भाळून स्वत:ला हरपून बसेल. मग? ही आग आहे. हसरी, लाजरी, खेळकर दुर्गा खरंच आग आहे. ती आपल्या पदरात ठरणार न्हाय. आपला पदर मुळातच फाटका. त्यात ही आग कशी ठरणार? पदर जळून जाईल.

परंतु ते काही का असेना, दुर्गा माझी आहे. ती माझं मन मोडणार नाही. मी सांगेन ते ती ऐकेल. तिचं जे काय करायचं ते मी करणार. आपल्या जातीतील एखादा सुंदर मुलगा पाहून मी स्वत:च तिचं लग्न करणार नि मरेपर्यंत तिचं रक्षणही करणार.

यंकूचं विचारचक्र सारखं फिरत होतं. त्याचं मन त्या विचारचक्रात गुरफटलं होतं. ते बाहेरच पडत नव्हतं. विचारांतून विचार उत्पन्न होत होते. एक विचार दुसऱ्या विचाराचा पदर धरून पुढं येत होता. मध्येच त्याला पाऱ्या-डवऱ्यांची आठवण होत

होती. 'मी तुझ्या पोरीला मुंबईला पळवून कसबीण करीन' असं एकदा पाऱ्या म्हणाला होता. जर तसं झालं तर....

पण तसं कसं होईल? आज सात वर्षं पाऱ्याची गाठच नाही. गाठ नाही याचं कारण आपणच पाऱ्याला टाळीत आहोत. एखाद्या गावात पाऱ्या असल्याची बातमी कळताच आपणच त्याला बगल देत आहोत. मध्येच गाढवं धडपडून उठली नि यंकू त्या विचारातून मुक्त झाला. त्यानं तिरकमठा घेऊन सभोवार पाहिलं. रात्रभर त्याचं काळीज कुरतडणारे ते सर्व दुष्ट विचार दूर पळाले.

पूर्वेला लाली मोहरली होती. पाखरं जागी होती. घनदाट वनराजी डोलत होती.

यंकूनं दुर्गाला उठवलं. आवराआवर केली. गाढवावर बिऱ्हाड लादलं नि तो पुढं निघाला. त्याची भ्रमंती सुरू झाली.

दुपार टळली होती. दुर्गा एका ओढ्यावर आंघोळ करून केस मोकळे सोडून गाढवावर बसली होती. तिचे ते केस गाढवाच्या खुरांपर्यंत खाली लोंबकळत होते. तिरपा सूर्य दुर्गाच्या गालाला चटके देत होता. ती आपला उजवा गाल चोळीत म्हणाली, ''अजून किती लांब जायचंय बापा?''

''त्या खिडीपल्याड.'' यंकूनं समोरच्या खिडीवर बोट रोखून उत्तर दिलं. आणि दूर दिसणारी खिड पाहत दुर्गा खिन्न झाली. रुसका चेहरा करून म्हणाली, ''ती खिड लई लांब हाय की.''

''बरं तर! आपून ह्या म्होरच्या आंबराईत ऊन खाली करू या नि मग पुढं जाऊ.'' यंकू म्हणाला. तशी दुर्गा खुद्कन हसली. यंकू पुढं जाऊन तिच्या पाठीवरून हात फिरवीत म्हणाला,

''माझ्या बाईला ऊन लागतंय, मग कोण म्हौरं जाणार? चला. आंबराईत खुशाल बसू.'' दुर्गा हसली. यंकूच्या खांद्यावर बसलेला गंग्या चटकन उडी मारून दुर्गाच्या खांद्यावर बसला नि दुर्गाचे केस धरून उवा पाहू लागला.

रंगी माकडीण दुसऱ्या गाढवावर बसली होती. तिच्यापुढं कोंबड्यांचं खुराडं लादलं होतं. त्यात चार कोंबड्यांनी चार अंडी घातली होती.

आंबराईत येताच यंकूनं गाढवं थांबवली. सामान उतरलं नि गाढवांना कळावे घालून सोडून दिलं. दुर्गाला घोंगडं अंथरून दिलं. कंटाळलेली दुर्गा त्या घोंगड्यावर कलंडली आणि यंकू तिरकमठा घेऊन गेला व लगेच दोन व्हले मारून परत आला. त्यानं काटकं जमवली. जाळ केला. त्यावर ते दोन व्हले खरपूस भाजून दुर्गापुढे ठेवीत म्हणाला, ''हं! चल ये, खाऊन टाक हे.''

दुर्गा उठली. व्हल्याचं भाजलेलं मांस खाऊ लागली. गंग्या नि रंगी यांनी दुर्गाचे विपुल केस विस्कटून उवांची शिकार सुरू केली.

दुर्गानं व्हल्याची एक तंगडी यंकूला दिली. तिचं लक्ष रंगीकडे गेलं. ती म्हणाली, "रंगीचं पोट मोठं कां दिसतंय?"

"तिच्या पोटात बाळ हाय." यंकू हसत म्हणाला, "आता गंग्याचा संसार वाढला."

या उत्तरानं दुर्गा लाजली. तिनं मान खाली घातली. नजर भुईवर अंथरून म्हणाली, "ऐकावं ते नवलच—"

यंकू हसत उठला. विहिरीवर जाऊन पाणी घेऊन आला.

ऊन उतरलं. सूर्यकिरणातील धग थंडावली. थंड वारा वाहू लागला. यंकूनं गाढवं लादली. एका गाढवावर दुर्गा बसली नि यंकू पुढे निघाला. चालता चालता यंकू विचार करून म्हणाला,

"दुर्गा, एक गोष्ट बोलू?"

"हो, बोल की."

"मी तुझं लगीन करणार हाय."

"नको रं बाबा." दुर्गा भेदरलेल्या हरिणीसारखी दचकून म्हणाली, "लगीन झालं की लोकांच्या घरी जावं लागंल. मग तुला कोण? तू एकटा काय करणार? मला तुझ्यावाचून चैन पडणार न्हाय."

"तसं नव्हं बाळ." यंकू सद्गदित होऊन म्हणाला, "तू मुलगा असतीस तर मला जन्माची जोड लाभली असती. पण तू मुलगी. तुला लगीन करून आपल्या घरी गेलंच पायजी."

"नकं मला लगीन." दुर्गा म्हणाली, "माझं लगीन झाल्यावर तू काय करणार? तुला भाकरी कोण वाढणार? मला लगीन नकं."

दुर्गाचे डोळे भरून आले. चेहरा कोमेजला. पापण्यांनी अश्रूंची माळ कातरली. आणि देखणी दुर्गा अधिकच सुंदर दिसू लागली. यंकूला वाईट वाटलं. आपण लग्नाचं बोलणं उगीच काढलं असं म्हणून तो पुढं गेला. त्यानं तिच्या पाठीवरून हात फिरवला. दुर्गानं डोळे पुसले.

एवढ्यात पाठीमागून बाळ्या डोंबाऱ्याचा तांडा आला. त्याला पाहून यंकूला आनंद झाला. आईला पाहून लहान मूल नाचावं तसा तो नाचला. धावत जाऊन त्याच्या गळ्यात पडला. एक उपकारकर्ता, बाजू राखणारा माणूस कित्येक वर्षांनी भेटला याचा त्याला आनंद होऊन यंकूनं डोळे टिपले. म्हणाला,

"बाळू, कसं काय? बरं हाय का?"

"बेस हाय! तू कसा?" बाळूनं विचारलं.

''मी बी बरा हाय. इकडं कुठं निघालास?''

''राधानगरीला. तिकडं सुगी लागणार हाय भाताची.'' बाळ्या डोंबारी लंगोटीचा सोगा सावरीत म्हणाला, ''बरं झालं, आपली भेट झाली. चल तू बी तिकडे.''

दोघेही खूप खूप बोलत चालू लागले. बाळ्या डोंबाऱ्याचा आठ गाढवं, चार लेकी, चार जावई, पाचवी लेक गुल्ली, तिचं तमाशाचं सामान, चार नातवंडे, कोंबडी, डुकरं असा प्रचंड संसार वाढला होता. यंकूची दोन गाढवं, दोन माकडं, एक बोकड, दुर्गा नि कोंबडी या सर्वांनी ती पांद भरली होती. दुर्गा बाळ्याच्या पोरीत लगेच मिसळली. नखरेबाज देखणी गुल्ली दुर्गाचं रूप नि तारुण्य पाहून चकित झाली.

''माझ्या दुर्गाबरूबर बोल की!'' यंकू बाळूला म्हणाला. तसा बाळू लाजला. म्हणाला, ''तुला बघून मी तुझ्या लेकीला इसरलो.''

तो दुर्गाकडे गेला. तिला त्यानं गाढवावरून खाली उतरवलं. जवळ घेतलं. तिच्या पाठीवरून हात फिरवीत म्हणाला, ''मी बाळ्या डोंबारी. तुझ्या बापाचा मैतर. तू तवा नखाएवढी व्हतीस.''

दुर्गा काहीच बोलली नाही. ती खाली पाहून हसत होती.

क्षणभर थांबलेला तो तांडा पुन्हा चालू लागला. चालता चालता यंकू म्हणाला, ''पाऱ्याची काय खबर?''

''वाटोळं झालं त्याचं.'' बाळ्या म्हणाला, ''त्या राती तुझ्यावर आल्याली पीडा पाऱ्यावर घसरली. गल्या नि बल्या हेस्नी अटक झाल्यावर त्येंच्या लोकांस्नी वाटलं, पाऱ्यानंच दगा करून घात केला. त्येंनी दुसऱ्या दिवशी राती येऊन पाऱ्याची एक तंगडी तोडून बाजूला केली. एका पोरीचं नाक कापलं. आता पाऱ्या काखेत कुबडी घेऊन उड्या मारीत चालतो.''

ही भयंकर बातमी ऐकून यंकू गंभीर झाला. म्हणाला, ''करावं तसं भरावं. बिब्बा आपल्या तेलानं जळतो, त्येला कुणी काय करावं!''

यंकू आणि बाळ्या डोंबारी यांचा तो तांडा दिवसाबरोबर वारणा नदीच्या काठावर येऊन दाखल झाला. परंतु नावेला भलतीच गर्दी होती. नावेचा आंबकरी हताश होऊन म्हणाला, ''आता दिवस बुडेल. आता तिन्हीसांजचा मी नाव सोडणार न्हाय. वाईच धोका हाय. तुम्ही आता एवढी रात काठावर गुजारा. सकाळी मी तुमास्नी पहिल्या नावेनं पोचवतो.

यंकू-बाळ्याचा नाइलाज झाला. त्यांनी नदीकाठावर पालं उभी केली. त्या रात्री तिथेच मुक्काम करणं त्यांना भाग पाडलं.

भाकरी खाऊन बाळ्या नि यंकू बोलत बसले आणि बऱ्याच रात्री आपापल्या पालाकडे परतले. हवेत गारठा भरला होता. थंड वारा नदीकाठानं थैमान घालीत होता. सर्वत्र सामसूम

झाली होती. एखादं कोल्हं हुक्की देऊन पळत होतं. एखादं पाखरू विचित्र आवाज काढीत होतं. तो नदीकाठ गंभीर, निर्जन, नि:शब्द भासत होता. तिथं माणसाचं अस्तित्व मुळीच जाणवत नव्हतं.

यंकू पालात येताच दुर्गा उठली नि चिडून म्हणाली, ''किती वाट बघायची? वाईच लौकर न्हाय का यियाचं? मला एकटीला भीती वाटत व्हती.''

''तू का जागलीस? निजायचं न्हाय का?'' यंकू दुर्गाला जवळ घेऊन म्हणाला. दुर्गा रागानं म्हणाली, ''मला झोप यीना. थंडी वाजतीया आणि तू तिकडं निवांत बसलास. मग मी काय करू? नीज आता.'' असं म्हणून ती यंकूला बिलगली. त्याच्या पोटाशी बिलगून गप्प पडली.

यंकू काहीच बोलला नाही. उगीच वाद नको म्हणून त्यानं आपली चूक कबूल केली आणि दुर्गाला पोटाशी घेऊन तो गप्प पडला. एवढी थोरली दुर्गा, हिला कसं सांगावं, काय सांगावं, याचा तो विचार करू लागला.

वारणा नदी संथपणे वाहत होती. तिचा अफाट किनारा थंड पडला होता. काठावरची गर्द झाडी नम्रपणे उभी होती.

दुर्गा निवांत निजली होती. तिच्या नाकातून निघणारे नि:श्वास निर्भय ये-जा करीत होते. यंकू जागा होता. त्याला झोप येत नव्हती. त्या भयाण नदीकाठावर घनदाट जंगलात एखादं तरस येऊन दगा करील, गाढव मारील, बोकड पळवील, या भीतीनं तो कानोसा घेत होता.

आणि रात्र सरकत होती.

५

पहाट झाली होती. नदीकाठच्या कीर्र झाडीत पाखरं बोलत होती.

रात्रभर माशासाठी दावणी, गळ टाकून बसलेले भोई दावणी ओढून मोकळे झाले होते. त्यांचे कष्ट त्यांच्या पुढं जाळ्यात धडपडत होते. चांदीच्या रंगाचे मासे पाहून त्यांच्या आशा फुलत होत्या.

वारणा नदी जागी होत होती. घनदाट किंजाळात मोर केका देत होते. कुकुड कोंबडे बोलत होते.

सकाळचा वारा उठला. काठावरच्या दाट झाडांना धक्के देऊ लागला. त्या धक्क्यानं वारणा डोलू लागली.

पूर्वेची किनार तलम रेशमासारखी दिसू लागली. अनंत रंगांनी रंगली. गडद काळोखात

दक्षिणेला एक पोलादी रंगाचा पट्टा उमटला. मग हळूहळू क्षितिज रंग पालटू लागलं. काळे ढग निरनिराळ्या आकृती धारण करून आकाशात भ्रमण करू लागले. एक राख्या रंगाचा ढग किरमिजी रंगात बुडाला आणि त्याच वेळी काही ढगांना गुलाबी मुलामा चढला. मग एक अलौकिक चमत्कार झाला. सप्तरंग पूर्वेला उधळले गेले नि एक अनंतरंगी गालिचा तयार झाला. त्या अनंतरंगी पायघड्या तुडवीत रविराज अवतीर्ण झाला.

वारणा नदी दुथडी वाहत पूर्वेला जात होती. पाण्यावर नजर ठरत नव्हती. डोंगर कनगरांतून वाहत निघालेल्या त्या नदीकडे पाहून छाती धडधडत होती. पहाटेपासून एकेक वाटसरू येऊन नदीकाठावर गर्दी वाढत होती. राधानगरीला सुगी लागणार ही खबर ऐकून कासार खोऱ्यातील सर्व भिकारी तिकडे पळत होते. तिकडे जाण्यासाठी झाडून भिकारी उठला होता. त्यांची घोडी, गाढवे, पालं, पोरं, कोंबडी, डुकरं, शेळ्या, माकडं यांनी काठावर एकच झुंबड केली होती.

त्या गर्दीत आणखीन भर पडली. राधानगरीचा इनामदार विलासराव आपल्या प्रचंड मित्रपरिवारासह नदीवर येऊन दाखल झाला. तो आपल्या दत्तक आईला पंढरी दाखवून आला होता. दोन गाड्या, चार घोडी नि पन्नास माणसं असा त्यांचा तो तांडा होता. त्या मातब्बर माणसाला दुखवायचा नाही असा दूरचा विचार करून आंबकऱ्यानं प्रथम इनामदाराला मुजरा केला आणि त्याचं बिऱ्हाड काळजीपूर्वक तो पलीकडे पोचवीत होता. दर फेऱ्याला दोन मैल तिरपा जाऊन तितकंच अंतर कापीत परत येत होता. आंबकरी अगदी हांबकुटी आला होता.

इनामदाराच्या आगंतुक येण्यानं इतर वाटसरूंची कुचंबणा झाली होती.

गरीब भिकारी मनातल्या मनात इनामदाराला शिव्या देत झाडाखाली लोळत होते. इनामदाराचं बिऱ्हाड जाईपर्यंत आपणाला नाव मिळणार नाही अशी सर्वांची खात्री झाली. तोपर्यंत दुपारची भाकरी इथंच खावी, म्हणून त्यांनी चुली पेटविल्या.

यंकू नि बाळ्या दोघे डोंगरात गेले. यंकूनं तिरकमठा घेऊन दोन लांडोर मारले नि परत आला. दोन्ही पालात कडणाची तयारी झाली. मग जेवणाची वाट पाहत बाळ्या नि यंकू बोलत बसले.

दुपारी जेवणं झाली. सर्वांनी भरपूर कडाण खाल्लं नि मग ते सर्व नावेची वाट पाहू लागले. अजूनही एक भिकारी येतच होता. तो यंकू नि बाळ्या यांना रामराम करून तळ देत होता.

यंकू आणि बाळ्या यांची पालं एकमेकांपासून बरीच फटकून होती. त्या दोन्ही पालांमधून एक वाट नदीत उतरली होती. यंकू आणि बाळ्या आपापल्या पालापुढं बसले होते, आणि मधल्या वाटेनं येणाऱ्या भिकारी मित्रांची विचारपूस करीत होते.

दुपार कलती झाली, आणि पाऱ्याचं बिऱ्हाडं नदीवर आलं. पुढ्यात दोन कुबड्या

घेऊन पाऱ्या एका गाढवावर बसला होता. आता त्याच्या मिश्यात करड झाली होती. तो अधिकच तापट दिसत होता. त्याचा पीळ कायम होता. यंकूकडे पाहताच त्याच्या भुवया चढल्या. त्यानं क्षणभर त्याला रोखून पाहिलं. मग त्यानं वळून बाळ्याला पाहिला नि त्याच्या कपाळावर आठी उमटली.

त्यानं गाढव उभं केलं. दोन्ही बायका पुढं आल्या. पोरींनी गाढव धरलं नि बायकांनी पाऱ्याला गाढवावरून उतरवला. तो काखेत कुबड्या घेऊन उड्या मारीत बाळ्याकडे गेला. ऐटीत उभा राहून त्यानं सर्वत्र नजर फिरविली. पाऱ्याच्या जीवनाची नि संसाराची दाणादाण झाली होती, तरी पाऱ्या होता तसाच होता. आता तो सरळ अंगावर चालून जाऊ शकत नव्हता, एवढंच. पण पोटात शिरून काळीज कापण्याची त्याची तयारी अजूनही होती. यंकूबद्दल त्याच्या मनात कायमची अढी होती. तो आज सात वर्षं यंकूला शोधीत होता आणि त्याच्याशी लढण्यासाठी एका पायावर तयार होता. परंतु त्याच्या लढाईचं तंत्र आता निराळं होतं.

यंकूच्या पालात पाहून पाऱ्यानं डोळे आकुंचित केले, नाक फुगवलं.

तसा बेरकी बाळ्या म्हणाला, ''हं! रामराम, पर्बतराव.''

''रामराम.'' पाऱ्या नाक उडवीत म्हणाला, ''पण आता मी पर्बत नव्हं. पर्बत म्हंजी डोंगर. पण मी आता मुंगी झालोय. नि मला मुंगीला मुताचा पूर झालाय. ह्या यंक्यानं माझं वाटोळं केलं.''

''जाऊ द्या की! आता झालं गेलं इसरा.'' बाळ्या म्हणाला, ''पायाच्या वाटेनं पाय गेला. आता वैर कशाला करता? तुम्ही आपल्याला मुंगी म्हनता, तर मुंगी व्हवून साखर खावा. हत्ती व्हवून लाकडं नका फोडू.''

पाऱ्या खवळला. आपल्या तुटक्या पायाच्या मांडीवर खडकन थाप मारून एका पायावर एक उडी घेऊन म्हणाला,

''मी — मी पाऱ्या हाय. मी गोरीपातूर वैर वागवीन, तरच ही बापाची औलाद —''
असं म्हणून त्यानं गर्रकन एक गिरकी मारली आणि मटकन खाली बसला, नि मग शांत झाला.

''कुठं निघाला आता?'' बाळ्यानं विचारलं.

''राधानगरीच्या खोऱ्यात. तिकडं भाताची सुगी लागलीया.'' पाऱ्या म्हणाला, ''तुम्ही कुठं जाताय?''

''आम्ही बी तिकडंच.'' बाळ्या उत्तरला.

''यंक्याच्या पालात ही बाई कोण?'' पाऱ्यानं विचारलं नि बाळ्या म्हणाला, ''ती यंकूची लेक नव्हं का?''

पाऱ्या चकित होऊन दुर्गाकडे पाहू लागला. कसलं तरी समाधान त्याच्या चेहऱ्यावर

तळपू लागलं. त्याच्या भुवया चढउतार करू लागल्या. मानेला झोके देत तो म्हणाला, "सणंग चांगलं निपजलं. नुसता ऐना. मला वाटतं, ह्या नगाला अजून काटा टोचला नसावा. करकरीत कोरी घडी हाय म्हणीनास! बरं झालं. बघू आता राधानगरीच्या खोऱ्यात!'' एवढं बोलून तो उठला आणि उड्या मारीत आपल्या बिऱ्हाडाकडे गेला. बाळ्या डोंबारी आ वासून पाहतच राहिला. तो मनात म्हणाला, 'हा पाऱ्या सापाची औलाद आहे. हा यंकूला नक्की दगा करणार. पण त्यानं यंकूला गारद करण्यासाठी दुर्गाचं बरंवाईट केलं तर भयंकर वाईट होईल. दुर्गा जन्मातून उठेल, नि यंकूला वेड लागेल. हा पाऱ्या काटा आहे, आणि तो यंकूच्या हृदयात निश्चित जखम करणार आहे...'

दिवस मावळतीकडे वळला, आणि मग यंकू नि बाळ्या यांना नाव मिळाली.

राधानगरीच्या सभोवती सह्याद्रीनं वेढा दिला आहे. त्या वेढ्यात तो सुंदर प्रदेश चित्रासारखा अंथरला आहे. नाना जातींच्या वृक्षांनी त्यावर सावली धरली आहे. आणि कासारी नदी त्या खोऱ्यातून पूर्वेकडे भरधाव धावत गेली आहे.

सुगीचा दिवस अगदी तोंडाशी आला होता. धरणीचा कण न् कण बहरला होता. भाताची शेतं फुलून ताल मारीत होती. दाण्यांनी भरलेल्या भाताच्या तवऱ्या टचटचीत दिसत होत्या, नि त्या आपल्याच ओझ्यानं वाकल्या होत्या. वरण्यानं बांध झाकले होते. त्यांच्या फुलांवर भुंगे भिरभिरत होते. कष्टाला फळ येऊन मातीचं सोनं झालं होतं.

सुगी, सुगी असा एकच शब्द उच्चारीत सर्व दिशांनी भिकारी त्या खोऱ्यात शिरत होते. आणि राधानगरी गावाच्या पूर्वेला गावाजवळच असलेल्या माळावर उतरत होते. त्यांनी अर्धा माळ व्यापीत आणला होता. जे पुढं आले होते ते जागा अडवून बसले होते. मागून येणारे आपल्या सोयीनं घरटं घालीत होते. माळ कोणाचा, याचा कोणीच विचार करीत नव्हते, डवरी, डोंबारी, दरवेशी, गारुडी, घिसाडी, शिकलदार, व्हलार, माकडंवाले, गोसावी, पारधी, नंदीवाले अशा अनेक जातींचा त्या माळावर संगम होत होता. प्रत्येक फिरस्ता आपल्याच जातीच्या ओळीला आपलं पाल मांडीत होता.

पाऱ्यानं आपलं पाल मुद्दाम माकडंवाल्यांच्या पालामागं उभं केलं होतं. आंबकऱ्याचे पाय धरून तो सर्वांपुढं त्या माळावर येऊन पोचला होता.

सैदू दरवेशी तर सर्वांआधी तिथं उतरला होता आणि गांजाची चिलीम हातात घेऊन येणाऱ्या आपल्या जुन्या दोस्तांना रामराम करीत भेटत हिंडत होता.

सूर्य मावळत होता. तो एका डोंगरावर थांबल्याचा भास होत होता. माळाला लागून असलेल्या घनदाट झाडीत पाखरांनी कलकलाट आरंभला होता. डोंगरी वारा लहान मुलाप्रमाणे खेळत होता.

यंकू आणि बाळ्या डोंबारी माळावर येऊन पोचले. येता येता यंकूनं कुरणात दोन ससे मारले होते. त्यांची गाढवं सरळ पाऱ्याच्या पालाजवळ येऊन थांबली नि माती फुंकू लागली. तिथं पाऱ्या आहे हे लक्षात येताच यंकू नि बाळ्या यांनी आपली गाढवं नेऊन एका बाजूवर आपली पालं ठोकली.

यंकू आल्याची खबर कळताच प्रथम येऊन पोचलेले माकडंवाले धावले. त्यांना आनंद झाला. बक्या, तुक्या, पक्या हे माकडंवाले यंकूच्या गळ्यात पडले. सक्याला तर भलताच आनंद झाला. त्यानं यंकूला मिठी मारली, नि टिरी खाजवीत विचारपूस केली. त्या गर्दीत सक्याचा येमू दूर उभा होता. तरुण, देखणा, मजबूत देहाचा येमू दुर्गाला पाहून चकित झाला होता. लहानपणी गरीब दिसणारी दुर्गा इतकी सुंदर कशी झाली याचं त्याला नवल वाटत होतं.

येमूला राहवलं नाही. तो पुढं गेला नि दुर्गाला म्हणाला, ''दुर्गा, मला वळीखलंस का?''

''व्हय की!'' दुर्गानं मान तिरपी केली.

''कोण मी?'' येमूनं प्रश्न केला.

''तू येम्या–'' दुर्गा उत्तरली.

येमूला आनंद झाला. त्या दोघांनाही लहानपणी आठवण झाली नि ती हसली.

''मला वाटलं, तू इसरला असशील मला!'' दुर्गा म्हणाली.

एकदम गंभीर चेहरा करून येमू म्हणाला, ''तसं कसं बरं! मी तुला कसं इसरंन?''

''का बरं?'' ती उद्‌गारली.

येमू म्हणाला, ''एकदा आपून खेळत व्हतो. म्या तुझं कांकण फोडलं तशी तू माझी शेंडीच उपटलीस! तवापास्नं डोक्याला हात लावला की मला तुझी आठवण व्हत असती.''

दुर्गा मोठ्यानं हसली.

पाऱ्या दारात उभा होता. डोळे आकुंचित करून दुर्गाकडे पाहत होता.

दुर्गानं तीन दगड मांडून चूल केली. यंकूनं सशाचं मांस करून दिलं नि दुर्गा सैंपाकाला बसली. ''आधी कोरड्यास कर आणि मग भाकरी टाक.'' असं म्हणून यंकू घागर घेऊन नदीकडे गेला.

दुर्गाच्या चुलीवर ससा शिजत होता. ती जाळ घालीत होती. यंकू सुपारी कातरीत होता. गंग्याला भूक लागली होती. तो दुर्गाच्या हाताकडे एकटक पाहत होता नि मध्येच भुवया चढवून तिच्यावर बिथरत होता. दात विचकीत होता. घडीघडी तोंड वासून जांभया

देत होता.

दुर्गानं चुलीवरचं गाडगं उतरलं. तवा ठेवून पीठ मळू लागली. तसा गंग्या चेकाळला. त्यानं जागीच एक उलटी उडी मारली.

दुर्गानं भाकरी भाजून बुटीत टाकताच गंग्यानं झडप घातली. भाकरी घेऊन तो दूर पळाला नि दुर्गाकडे पाहत त्यानं ती ऊन ऊन भाकरी तोंडात कोंबली. दुर्गाला त्याचा राग आला. ती खालचा ओठ दातात धरून मान डोलवीत म्हणाली, "बरं, ये परत आता." नंतर तिनं दुसरी भाकरी भाजून काढली नि डोळ्याच्या कोपऱ्यातून गंग्याकडे पाहिलं.

गंग्या हळूच पुढं आला. अगदी जवळ येऊन दुर्गाकडे पाहत त्यानं भाकरीवर टप धरला. दुर्गानं हळूच कोलीत घेऊन गर्रकन गंग्याच्या ढुंगणाला चरका दिला. तसा गंग्या किरकिर करीत पळाला, आणि यंकूच्या पैरणीत शिरून दडून बसला. दुर्गा मोठ्यानं हसली.

भाकरी भाजून होईपर्यंत गंग्या तसाच दडून बसला. मग त्यानं हळूच तोंड बाहेर काढून दुर्गाकडे पाहिलं. पुन: दुर्गानं जळतं कोलीत काढून त्याला दाखवलं, तसा गंग्या पुन्हा दडला.

पाऱ्या आपल्या पालापुढं एका पायावर उभा होता. त्याची क्रूर नजर बाळ्या, त्याच्या देखण्या पोरी, त्यांची गाढवं, यंकू यांच्या डोक्यावरून येऊन दुर्गावर स्थिरावली. दिव्याच्या ज्योतीसारखी दुर्गाला पाहून तो देहभान हरपला. एकाग्र चित्तानं तो दुर्गाकडे पाहू लागला. तोच मागं घोड्याच्या टापा वाजल्या. पाऱ्या भानावर आला नि गर्रकन फिरला.

इनामदार विलासरावांना पाहून पाऱ्या दचकला, नि चटकन् लवून त्यानं मुजरा ठोकला. "हे पाहा", विलासराव म्हणाला, "तुम्ही गरीब लोक आहात. पोट भरण्यासाठी आमच्या खोऱ्यात आला आहात. तुम्हाला मागून मिळेल ते खुशाल घ्या. मात्र कुणी चोरीमारी करू नका. त्याचा परिणाम वाईट होईल. आमच्या राज्यात तुम्हाला भरपूर भीक मिळेल. ती मिळवून रामाचं राज्य करा. पण पुंडाई करू नका. आलं का लक्षात? जर बेबंद वर्तन कराल तर आम्ही तुम्हाला घोड्याच्या टापाखाली तुडवून मारू हेही विसरू नका."

"सरकार, एक आर्ज—" पाऱ्या हात जोडून म्हणाला, "मी गरब लंगडा हाय! माझं कोण ऐकणार? हातं एका जातीची माणसं न्हायती. थोडी गरीब हायती तर थोडी माजोरी हायती. ती कुणाचंच ऐकणार न्हायती."

"गैरवर्तन करणारे जे असतील त्यांची नावं सांगा." विलासराव रोखून पहात म्हणाला, "आम्ही त्यांचा जरूर बंदोबस्त करू. आलं लक्षात?"

"लांब कशाला?" पाऱ्या लाचार सुरात हात जोडून म्हणाला, "आजचीच गोष्ट.

एका माकडंवाल्यानं तुमच्या कुरणात शिरून दोन ससे मारून आणले.''

''कोण आहे तो?'' विलासराव भडकला आणि पाऱ्या म्हणाला, ''तो यंक्या माकडंवाला. भारी डांबीस हाय तो.''

''चल दाखव.'' विलासरावानं हुकूम केला, आणि पाऱ्या उड्या मारीत यंकूच्या पालापुढं गेला. इनामदाराचं घोडं पाहून भिकाऱ्यांची कुत्री उठली. पण ज्यानं त्यानं आपली कुत्री आवरली. विलासराव यंकूच्या पालापुढं आला.

यंकू दचकला. दुर्गा बावरली.

विलासराव म्हणाला,

''तू आमच्या कुरणात शिरून दोन ससे मारलेस, खरं का?''

''खरं हाय धनी. पण मला आपली हद्द ठावं नव्हती.'' यंकू म्हणाला, ''एवढा गुन्हा माफ करावा.''

''अशी आगळीक पुन्हा करू नको.'' विलासराव गुरकला नि यंकू नम्रपणे म्हणाला, ''कवाच करणार न्हाय.''

''ही तुझी कोण?'' विलासराव दुर्गाकडे पहात म्हणाला.

''ही माझी लेक हाय धनी.'' यंकू उत्तरला.

''लग्न झालं का हिचं?''

''न्हाय सरकार.''

''ठीक, लौकर करून टाक.''

''व्हय सरकार.''

''ठीक.'' विलासरावानं टाच मारताच त्याचं घोडं उसळून पुढं धावलं — आणि त्या घोड्याबरोबर उड्या मारीत पाऱ्या पळू लागला. पालाच्या बाहेर पडताच तो विलासरावाला हात जोडून म्हणाला,

''सरकार, ह्यो माकडंवाला सैतान हाय. नि ती पोरगी त्येची लेक. नुसती नागाला गुंगवणारी पुंगी हाय. आजून तिला काटा टोचला न्हाय धनी.''

''उगीच बडबडू नको. सकाळी वाड्याकडे ये.'' असं म्हणून विलासराव गावाकडे गेला.

पहिल्याच दिवशी इनामदाराला आपल्या पालाकडे आणून पाऱ्यानं सलामी दिली.

इनामदार आला. त्यानं दुर्गाकडे रोखून पाहिलं. अशी आगळीक पुन: करू नको, म्हणून धमकी दिली. तेव्हा पाऱ्याच्या चेहऱ्यावर आनंद दिसला होता.

यंकू चरफडत होता. पाऱ्या स्वस्थ बसणार नाही, तो आपल्या भोवती वणवा पेटवणार. त्यात आपण जळून राख होणार की काय? मी मेलो तर पर्वा नाही. पण माझ्या दुर्गाचं वाईट होता नये. यंकूच्या मागे विवंचना लागली.

दुर्गाचा सैंपाक झाला. यंकू गप्पपणे जेवला. पुन: विचारमग्न होऊन बसला.

बाळ्या डोंबाऱ्याच्या पालात आनंद होता. सशाचं कडाण खाऊन पोरंबाळं खिदळत होती. गुल्ली, "राजसा सहज बोला रे, मंदिरी चला..." या लावणीची चाल घोळीत होती. बाळ्या ढोलकं बडवीत होता.

यंकू गंग्याला जवळ घेऊन गोंजारीत म्हणत होता, "गंग्या, प्रसंग बाका हाय. लेका सावध ऱ्हा. आणि दुर्गाबाईला वाचव!"

रात्रभर यंकूनं डोकं टेकलं नाही. त्यानं ती सारी रात्र डोळ्यात काढली. विलासरावानं दुर्गावर रोखलेली नजर यंकूच्या काळजाचा ठाव घेत होती.

परंतु भोळ्या दुर्गाला कसलीच कल्पना नव्हती. ती नवा गाव, नवा प्रदेश पाहून आनंदित झाली होती.

## ६

सकाळीच यंकूनं राधानगरीच्या पाराखाली आपला खेळ मांडला. गावकरी गर्दी करून उभे होते. गंग्या माकड माणसासारखं करीत होता. रंगी आपलं बाळ पोटाशी धरून यंकूच्या हुकमाप्रमाणं वागत होती. दगडू बोकड पळ म्हणताच रिंगण धरून पळत होता.

गावकरी आश्चर्यचकित होऊन पहात होते. गंग्याच्या प्रत्येक हालचालीसरशी हसत होते. टाळ्या पिटीत होते.

यंकू म्हणाला, "गंग्या, लेका, तुला लष्कराचं बोलावणं आलंय. तू लढाईवर जा. चल, आटप." तसा गंग्या बंदूक घेऊन लढाईवर निघाला. जाता जाता रंगीकडे गेला. तिचा निरोप घेऊ लागला. पण रंगी रुसली. तिला लढाई पसंत नव्हती. ती मुरके मारू लागली. परंतु गंग्यानं पर्वा केली नाही. तो 'जा उडत' अशा थाटात निघून गेला. लढाई सुरू झाली. गंग्या गोळीबार करू लागला. एक गोळी लागून तो जखमी झाला, आणि लंगडत परत आला. तो सासरवाडीला रंगीकडे गेला. पण रंगी भडकली. लंगड्या नवऱ्याबरोबर नांदायला तिनं विरोध केला. गंग्याचं डोकं फिरलं. तो चाकू घेऊन रंगीचं नाक कापायला धावला. तशी ती यंकूच्या मागं दडली. गंग्यानं काठी घेतली नि यंकूलाच तो बडवू लागला. लोकांना आनंद झाला. त्यांनी टाळ्या वाजवून गंग्याचं कौतुक केलं, आणि कित्येकांनी कनवटीचे पैसे काढून गंग्यावर फेकले, तर कोणी भाताची सुपं आणून यंकूची झोळी भरली.

पाऱ्या गर्दीत उभा होता. त्याला यंकूचा हेवा वाटला. तो कुबड्या घेऊन उड्या मारीत इनामदाराच्या वाड्यापुढं आला. चिरेबंदी जोतं धरून त्यानं दम घेतला.

तो वाडा म्हणजे एक प्रकारची गुहाच होती. घडीव चिऱ्याला चिरा जडून तो वाडा उभा झाला होता. त्या प्रचंड वाड्यात ऐंशी वर्षांची एक आंधळी म्हातारी आणि तरुण विलासराव ही दोनच माणसं राहत होती. ती म्हातारी आणि विलासराव या दोघांचं त्या वाड्यातलं अस्तित्व म्हणजे एखाद्या पेटीतील झुरळासारखं होतं.

म्हाताऱ्या इनामदारणीनं दत्तक घेतला आणि विलासराव इनामदार झाला.

या करारी आणि धूर्त इसमाची त्याच्या रंगेलपणाबद्दल त्या खोऱ्यात भरपूर ख्याती होती.

त्यानं दोनदा लग्न केलं. दोन्ही बायका सहा महिन्यांपेक्षा जास्त काळ वाड्यात नांदल्या नाहीत. दोघीही नाहीशी झाल्या. कुठे गेल्या, काय झाल्या याचा पत्ता कोणासही नव्हता. वाड्यात लटकत असलेल्या पूर्वजांच्या तलवारीसमोरच रात्री रंगेल बैठकी रंगत होत्या. तबला-सारंगीच्या सुरावर नर्तकी नाचत होत्या. गाण्याच्या मैफली उठत होत्या. उन्मादक मोहक हालचालींवर पैसे उधळले जात होते. एखाद्या रात्री एखाद्या तरुण स्त्रीची आर्त किंकाळीही वाड्याच्या कुसवाबाहेर येत होती.

तरीही विलासरावाचा रंगेल आत्मा असंतुष्टच होता.

काल दुर्गाला पाहिल्यापासून विलासराव बेचैन झाला होता. भिकाऱ्याची इतकी देखणी लेक त्याने पाहिली नव्हती. 'नागाला गुंगवणारी पुंगी हाय! अजून तिला काटा टोचला नाय' हे पाऱ्याचे शब्द त्याच्या डोकीत नाचत होते. थैमान घालीत होते.

सकाळी उठल्यापासून विलासरावाच्या डोक्यात दुर्गाच होती. त्यानं त्याच नादात स्नान केलं, न्याहारी केली आणि चौफळ्यावर बसून मोठमोठ्यानं झोके घेऊ लागला. एवढ्यात एक चाकर येऊन म्हणाला, ''एक लंगडा भिकारी दारात आलाय.''

सूर्य मावळतीकडे फिरला आणि भिकारी पालाकडे परतले. वस्ती गजबजली.

यंकू घरी आला होता. दुर्गा उल्हासानं सैंपाक उरकीत होती. गंग्या तिच्या अंगाला बिलगून भाकरीकडे पहात होता. दगडू दिवसभर खाल्लेला चारा परत परत दाढेखाली आणून रवंथ करीत होता. यंकू जळण, पाणी यांचा बंदोबस्त करीत होता. तो पाण्याची घागर घेऊन आला. इतक्यात इनामदाराचं घोडं पालापुढं येऊन थांबलं. यंकूनं घागर ठेवून मुजरा केला. पाऱ्याही उड्या मारीत येऊन बाजूला उभा राहिला. विलासरावानं दुर्गाच्या डोळ्यात रोखून पाहिलं. पाऱ्याकडे नजर वळवून तो म्हणाला, ''ए लंगड्या, तू मोठा धोकेबाज आहेस. घातकी आहेस. तू जितका गरीब दिसतोस तितकाच विषारी आहेस. आम्ही तुझं काहीही ऐकणार नाही. तू या गरीबाच्या कागाळ्या सांगत असतोस; पण आम्हाला नादान समजू नको. आम्ही तुझ्या ओंजळीनं पाणी पिणारे नाही;

जा.''

इनामदाराच्या दरडावणीनं पाऱ्याचा चेहरा पडला. तो खिन्न झाला. हात जोडून उभा राहिला. यंकू आनंदित झाला. विलासराव शांतपणे म्हणाला,

''तुझं नाव काय?''

''यंकू माकडंवाला, सरकार.''

''यंकू—''

''जी.''

''तू दिवसाआड आमच्या कुरणात जाऊन दोन ससे मारून वाड्यात पोचवायचे.''

''जी सरकार.''

''हवा तर तू तुझ्यासाठीही एक मारावा.''

''जी धनी.''

''आम्ही तुझ्या कष्टाची कदर करू.''

''देव पावला, सरकार.''

''सकाळी ससे घेऊन ये.''

''जरूर.''

विलासरावानं घोड्याला टाच मारली. घोडं उसळून धावत निघालं. यंकूला अंगावर मूठभर मास चढावं तसा आनंद झाला. त्यानं पाऱ्याकडे जळजळीत नजर फेकली, नि दुखावलेला पाऱ्या लंगडत पालाकडे गेला.

इनामदारानं ससे मारण्याची कामगिरी दिली नि आपल्यासमोर पाऱ्याचा अपमान केला. खरंच इनामदार देवमाणूस आहे. न्यायी नि शहाणा आहे. अशी न्यायी माणसं या जगात आहेत म्हणूनच हे जग चाललं आहे. आता आपण दिवसाआड कुरणात जाऊन दोन नव्हे तर तीन ससे मारणार. एक घरी ठेवणार नि दोन इनामदारसाहेबांना देणार. या कामगिरीबद्दल तो न्यायी माणूस आपणाला आणखीही काही तरी देणार. या विचारानं यंकूची छाती फुगली. त्याला आनंद झाला.

हळूहळू वस्ती शांत होत होती. चार घास पोटात रेटून माणसं आडवी होत होती. एक एक दिवा विझत होता. हळू हळू वातावरण मुकं होत होतं.

यंकू अंगणात उताणा पडला होता. दुर्गा पालात जागीच होती. गंग्या नि रंगी झोपा काढीत होती.

अंधारात पावलं वाजली, तसा यंकू चमकला. त्यानं तिकडे पाहिलं नि येमू येऊन बसला. शांतपणे म्हणाला, ''काय मामा, भाकरी खाल्ली का?''

''व्हय, खाल्ली की.''

''दुर्गा निजली वाटतं?''

"व्हय, निजली."

तोच पालात दुर्गाची कांकणं खळखळली आणि येमू बावरून म्हणाला, "ती जागीच हाय."

"येमू, त्वा अजून लगीन का न्हाय केलंस?" यंकूनं विचारलं.

येमू हसत म्हणाला, "आपून जन्मात लगीनच करणार न्हाय."

"आर पर का?" यंकू उठून बसला.

"तेचं असं हाय–" येमू म्हणाला, "भल्या माणसानं लगीन करू नये. बायका वंगाळ असत्यात."

"वंगाळ असत्यात?" यंकू म्हणाला, "त्या काय करत्यात? का खात्यात?"

"खाल्लं तरी बरं!" येमू म्हणाला, "पण बायका शेंडीच उपटून टाकत्यात."

दुर्गा ऐकत होती. हसत होती. 'पण बायका शेंडीच उपटून टाकत्यात' हे ऐकताच तिला हसू आवरलं नाही. ती मोठ्यानं हसत बाहेर आली नि येमू पळाला.

थोड्या वेळानं सख्या माकडवाला आला नि यंकूजवळ बसला. दुर्गा सरकून बापाच्या मागं बसली. सख्या म्हणाला,

"यंकू, एक गोष्ट बोलू का?"

यंकू हुंकारला.

"तुझी दुर्गा माझ्या येम्याला देतोस का?"

"लगीन कवा करणार?"

"येत्या वैशाखात."

"कुठं करणार?"

"काळगावच्या माळाला."

"कसं करणार?"

"तू सांगशील तसं."

"काय देणार?"

"फुटकी कवडी देणार न्हाय."

"मग?"

"मग तूच काय देणार ते सांग लेकीसाठी."

"लगीन करून देतो." यंकू उत्तरला.

सख्याला आनंद झाला. म्हणाला, "सकाळी भावकी जमवतो."

"बरं, जमव." यंकूनं दुर्गाचं लग्न नक्की केलं आणि सख्या हरकून आपल्या पालाकडे गेला.

आता दुर्गाचं लग्न होणार या विचारानं यंकूचं मन आनंदित झालं. त्यानं बोटावर

महिने मोजले नि स्वत:शीच तो म्हणाला, ''अवघं नऊ महिनं.''

अचानक आपलं लग्न जुळलेलं पाहून दुर्गाला मनातून आनंद झाला. तरुण, देखण्या, उमद्या, हसऱ्या येमूकडे तिचं मन धाव घेऊ लागलं. ती उगीचच लाजली आणि लटका राग आणून म्हणाली,

''बापा, तू माझं लगीन करणार?''

''व्हय, करणार.''

''कां करणार?'' दुर्गा म्हणाली, ''तुला कोण?''

''माझा देव.''

''पण मी तुला सोडून जाणार न्हाय.''

''मीच तुला सोडून कुठं जाणार न्हाय.'' यंकू खिन्न होऊन म्हणाला, ''माझी बाई जिकडं जाईल तिकडं मी यीन, मग तर झालं?''

दुर्गा गालात हसली नि सरकून तिथंच बापाशेजारी कलंडली.

सकाळीच यंकू कुरणात गेला. दोन ससे मारून ते इनामदाराच्या वाड्यात पोचवून परत आला. आता दुर्गाचं लग्न होणार, हा एकच विचार त्याच्या डोकीत तरंगत होता. आणि लग्नात दुर्गाला दागिने किती करायचे याचा हिशेब तो करीत होता.

सख्यानं घाई केली. भावकी जमवली. दुर्गाचं लग्न पक्कं केलं. तिला पंचांनी कुंकू लावलं नि जाहीर केलं की दुर्गा वैशाखात येम्याची बायको नि सख्याची सून होणार. आता यंकू नि सख्या यांना शब्द मोडता येणार नाही.

यंकूच्या आनंदाला सीमा राहिली नाही.

परंतु परिस्थिती यंकूच्या विरुद्ध होती. पाऱ्याचे उपद्व्याप सुरूच होते. तो दारू विकता विकता जिथं तिथं यंकू आणि दुर्गाविरुद्ध फुणग्या टाकीत होता. आसपासच्या गावची जबरी माणसं, राधानगरीतील भुरटे टगे, दुर्गाला पाहण्यासाठी, तिला हाताखाली घेण्यासाठी पाऱ्याकडे दारू पिण्याच्या निमित्ताने गर्दी करीत होते. दुर्गा हाताखाली यावी म्हणून प्रयत्न करीत होते. पाऱ्या त्यांना मदत करीत होता. दुर्गा मिळवून देतो, असं सांगून अनेकांकडून पैसे उकळीत होता.

राधानगरीचा पोलीस पाटील रंगराव आणि त्याचे चाकर रावा ढेकणा व बंडू तडाखे यांनी दुर्गाला उचलण्याचा चंग बांधला होता.

पाटील-इनामदारापासून तो गावातील भुरट्या टग्यांपर्यंत दुर्गा मिळविण्यासाठी चाललेल्या प्रयत्नांची यंकूला मुळीच कल्पना नव्हती. तो दिवसाआड कुरणात जात होता. दोन ससे मारून वाड्यात हजर करीत होता. गंगू, रंगी, दगडू यांना घेऊन फिरतीवर

जात होता नि झोळी भरून येत होता.

यंकू गेला की दुर्गा घरी एकटीत असे. येमू लौकर येई. दुर्गाला जळण, पाणी आणून देई. बोलत बसे. येमू जवळ असला की दुर्गा निर्भय होई. एका सकाळी यंकू ससे घेऊन वाड्यात गेला. इनामदारापुढं ससे ठेवून त्यानं मुजरा केला आणि परत फिरला तेव्हा विलासराव म्हणाला,

''यंकू, थांब. एक ससा आम्हाला पुरे. एक तू घेऊन जा.''

यंकूला बरं वाटलं. तो ससा घेऊन निघाला तोच विलासराव म्हणाला,

''तुझी पोरगी घरीच असते ना?''

''व्हय, धनी.'' यंकूनं होकार दिला.

''मग असं कर,'' विलासराव म्हणाला, ''एक चाकर बाई आजारी झाली आहे. त्यामुळं आमच्या आईसाहेबांची कुचंबणा होत आहे. तेव्हा तुझ्या पोरीला चार दिवसांसाठी आईसाहेबांच्या तैनातीला पाठव. फक्त त्यांच्याशी बोलत बसायचं. त्यांना दिसत नाही. आम्ही तुला पैसे देऊ.''

यंकू काहीच बोलला नाही. त्यानं मान डोलवून मान्य केलं.

दुसऱ्या दिवसापासून दुर्गा इनामदाराच्या वाड्यात जाऊ लागली. रोज सकाळी यंकू भिकेला गेला की दुर्गा वाड्यात जात होती. संध्याकाळी घरी येत होती. येमू तिला मदत करीत होता. ती सैंपाक उरकून यंकूची वाट पाहत राही.

पाच दिवस येऊन गेले. दुर्गाला एकदाही विलासराव वाड्यात दिसला नव्हता. सहाव्या दिवशी तो अचानक आला. म्हणाला,

''दुर्गा, आमचं काय झालंय, नोकरबाई आली आहे. तू उद्यापासून येऊ नको. आणि हे घे—'' असं म्हणून त्यानं एक सुंदर पातळ दुर्गाच्या हाती दिलं. ते घेऊन दुर्गा घरी आली. त्याच दिवशी संध्याकाळी विलासरावानं यंकूला बोलावून घेऊन आठ पायल्या भात दिलं. यंकूला भलताच आनंद झाला.

दुसऱ्या दिवशीच यंकू भिकेसाठी एका दारात उभा राहिला. एक म्हातारी चतकोर भाकरी घेऊन आली नि रागानं पहात म्हणाली,

''मेली भिकारडी जातीला लाज बी न्हाय. भिकारी असलं म्हणून काय झालं. लाज सोडू नये.'' असं म्हणून तिनं भाकरी यंकूच्या झोळीत टाकली नि ती भाकरी काढून हातात घेऊन यंकू म्हणाला, ''आई काय झालं?''

''काय व्हायचंय?'' म्हातारी म्हणाल, ''एका भिकाऱ्यानं म्हणं आपली लेक त्या इनामदाराच्या घरात घातलीय नि गमजा करतोय मेला.''

यंकूच्या काळजाचं पाणी झालं. म्हणाला, ''पण आई, ती पोरगी तिथं कामाला जाते. पाप कराय जात न्हाय.''

"आरं जा! म्हणं पाप कराय जात न्हाय." म्हातारी भडकली. म्हणाली, "त्या घरात गेल्याली तरणी बाई नरकातच जाती."

"पण त्या पोरीनं पाप केलं असं कोण म्हणतं? आई, सरळ सांगा." यंकू म्हणाला.

म्हातारी कडाडली, "सारा गाव म्हणतो जा."

म्हातारी घरात गेली, आणि यंकू दिवसभर त्याच विचारात हिंडला. संध्याकाळी घरी आला. कसे तरी दोन घास खाऊन दारात विचार करीत बसला.

इनामदार खरंच इतका वाईट असेल का? त्यानं दुर्गाला फसवलं असंल का? पण माझी दुर्गा फसणार नाही. मग तिला त्यानं पातळ का दिले? नि कामावर येऊ नको म्हणून का सांगितलं? कदाचित त्याचं काम त्यानं उरकलं असंल. दुर्गा काही तरी दडवीत असावी. तरुण मन वाऱ्यासारखं असतं. या विचारानं तो अस्वस्थ झाला. त्यानं दुर्गाला हाक मारली. ती जवळ येऊन बसली. यंकू म्हणाला,

"दुर्गा, इनामदार कसा माणूस हाय?"

"ते मी कसं सांगू?" दुर्गा निर्विकार चेहरा करून म्हणाली, "त्यो मला चार दिवस दिसलाच न्हाय. कालच दिसला."

"काय म्हणाला?" यंकूनं मध्येच विचारलं.

"उद्यापासनं येऊ नकं म्हणाला." दुर्गा उत्तरली आणि यंकूचा आत्मा शांत झाला.

चार दिवस गेले नि पुन: दुर्गाला वाड्यात पाठव, असा इनामदाराचा निरोप आला. त्यामुळे यंकू चरकला. नक्कीच काही तरी भानगड असावी असं त्याचं मन बोलू लागलं. परंतु दुर्गाला पाठवीत नाही, असं म्हणणं त्याला अशक्य होतं. तो चरफडला नि दुर्गा पुन्हा नियमानं वाड्यात जाऊ लागली.

यंकू फिरतीवर गेला की दुर्गा इनामदाराच्या वाड्यात जात होती. आंधळ्या म्हातारीजवळ बसत होती, नि सांज झाली की घरी येत होती.

सुगीची हातघाई उसळली होत. शिवार गजबजला होता. गावकरी आणि भिकारी शिवारात धान्याचा कण न् कण वेचीत होते.

यंकूचं संशयानं घेरलेलं मन शिवारात लागत नव्हतं. चार खळ्यावर कसे तरी चार खेळ करून तो गपकन गावात येत होता. वाड्यात येऊन दुर्गाला पहात होता. सुखरूप नि आनंदी दुर्गाला पाहून त्याचा जीव भांड्यात पडत होता. तो वाड्यापुढं पोचला की प्रथम गंग्या उडी मारून सरळ वाड्यात शिरून दुर्गाला मिठी मारीत होता. गंग्या आलेला पहाताच दुर्गाला आनंद होई.

संध्याकाळी दुर्गा घरी आली की यंकू संशयी दृष्टीनं पहात, "काय म्हणाला इनामदार?" असा प्रश्न विचारी आणि "आज तो वाड्यात दिसलाच न्हाय," या उत्तराने तो शांत होई.

आणखी चार दिवस गेले. विलासराव वाड्याबाहेर जात नव्हता. तो तासन् तास माडीवर झोपत होता. मध्येच काही तरी निमित्त काढून खाली येत होता. त्याला पाहून दुर्गा लाजत होती. हसत होती. बावरत होती. आपल्या छातीवर पदर सावरून उगीचच स्वत:ला दडवीत होती. मान खाली घालून उभी राहत होती. विलासराव तिला पाहून गालात हसत काहीही न बोलता जात होता.

दुपार झाली होती. गल्लीबोळ निर्जन झाले होते. सर्वत्र नि:शब्दता नांदत होती. वातावरण मरगळलं होतं. विलासराव माडीवर एकटाच पडला होता. दुर्गासाठी काय करावं याचा विचार करीत होता. ती गरीब आहे, भोळी आहे, आपण एवढं भ्यायचं कारण नाही, हे त्याला पटलं होतं. तिला जबरीनं नमवली तरी काहीच देणार नाही. या वाड्यात अनेक तरुण देहांनी आत्मसमर्पण केलं आहे. मग दुर्गाचा काय दिमाख? पण जबरी नकोच. तिच्या बाबतीत बळाचा प्रश्नच उद्‌भवणारी नाही. मात्र तिच्याच कलानं व्हायला हवं. ती सुतासारखी सरळ आणि लोण्यासारखी मऊ आहे. आणि हे लोणी निश्चित वितळणार आहे. त्या दिवशी पाऱ्या म्हणत होता की, अजून काटा टोचलेला नाही. घडी करकरीत आहे. नि ते खरंही आहे.

ही घडी विस्कटता कामा नये. ती हळूच मोडली पाहिजे. जर तसं झालं तर ती या वाड्यातून कधीच जाणार नाही. गुंतलेलं सूत आणि लालचावलेली स्त्री हे सारखंच असतं. दुर्गाला फक्त चटक लागली पाहिजे. ती लालचावली पाहिजे.

विलसराव चट्‌कन उठला. दुर्गाला तोलून पाहायची असा निश्चय करून तो माडीवरून खाली आला. आंधळी म्हातारी चौफळ्यावर बसून झोके घेत होती. तिला पाहून विलासरावाची निराशा झाली. त्यानं चौकटीत उभं राहून दुर्गाकडे पाहिलं. तशी दुर्गा लाजली. तिची तरल नजर नम्र झाली. छाती धडधडू लागली. एवढ्यात म्हातारी म्हणाली,

''दुर्गा, तू जा घरी. सकाळी ये.''

दुर्गा चटकन उठली. पडत्या फळाची आज्ञा मिळताच ती वाड्याबाहेर पडून माळाकडे झपाट्यानं निघाली. गावाबाहेर पडल्यानंतर विलासरावाच्या नजरेनं गुदमरलेला तिचा जीव शांत झाला. मग ती गालात हसली नि मनात म्हणाली, खरंच मी देखणी आहे. म्हणूनच इनामदारासारखा मातब्बर माणूस मला डोळे भरून पहातो.

दुर्गानं सैंपाक उरकला. दिवस घसरला. सांज झाली. भिकारी परतले. यंकू आला. दुर्गाला टवटवीत पाहून त्यानं सुस्कारा टाकला.

नकळत सांज रात्रीत विलीन झाली. यंकूच्या पालातला रॉकेलचा दिवा जळत होता. त्याची ज्योत डगमगत होती. पिवळा प्रकाश दुर्गाच्या चेहऱ्यावर थरथरत होता.

ती म्हणाली,

"बापा, गप्प का? बोल की!"

"बोलतो की!" यंकू तिच्या पाठीवरून हात फिरवीत म्हणाला, "पण कसं बोलावं हे उमजंना मला."

दुर्गा चमकली. म्हणाली,

"तसाच बोल."

"मग ऐक."

"काय?"

"दुर्गा, तू फसशील."

"कोण फसवंल?"

"इनामदार."

"काय करील?"

"ते कसं सांगू?"

"तसंच सांग."

"आब्रू कांकणावाणी असती. कांकण फुटलं की त्येचा नाद जातो."

"खरं हाय बापा."

"मग संभाळ. इनामदार वंगाळ माणूस हाय."

"पर त्यो मला कवाच बोलत न्हाय, बापा."

"दुर्गा, त्यातच दगा हाय."

"मग काय करू मी बापा?" दुर्गा दु:खी सुरात म्हणाली, "तूच मला वाड्यात जा म्हणतोस."

"मग मी काय करू दुर्गा? तो इनामदार मोठा माणूस हाय. मला न्हाय म्हणता येतच न्हाय."

"तसंच माझं बी व्होतंय." दुर्गा म्हणाली, "तो मला दिसला की काळजात धडकीच भरती. जीव पांगळतो."

"म्हणूनच मला भीती वाटते, दुर्गा." यंकू म्हणाला, "पांगळून जाऊ नकं. एवढी सुगी झाला की आपुन जाऊ. पण तंवर आब्रूला जप. धीरानं घे."

दुर्गाला झोप आली. ती यंकूच्या अंथरुणावर पडली. इनामदाराचा विचार करू लागली.

वस्ती निपचित पडली होती. दिवे विझले होते. बाळ्या डोंबारी आपला फड घेऊन गावात गेला होता. त्याचं पाल मुकं झालं होतं. सैदू दरवेशी खोकत होता.

आकाशात चांदणं फुललं होतं. नवलक्ष चांदण्यांच्या झगझगाटानं वस्ती उजळली होती. यंकू दुर्गाच्या शेजारी निजला होता. त्यानं हळूच दुर्गाकडे पाहिलं. दुर्गाचा सुंदर

चेहरा चांदण्याच्या प्रकाशाशी स्पर्धाच करीत होता. यंकूनं तिच्या गालावर आलेली केसांची बट दूर केली नि हळूच तिच्या कपाळाचा मुका घेतला. तशी दुर्गा म्हणाली,

''बापा, मला भीती वाटतीय.''

सुगीच दिवस संपत होते. भरला शिवार भणंग होत होता. खळ्यावरच्या धान्याच्या राशी गावाकडे गेल्या होत्या.

भिकाऱ्यांची मनं उठली होती. सुगी उलघडली. आता हे खोरं सोडून जावं असा ते विचार करीत होते. आजचा एकच दिवस पाहू नि उद्या जाऊ असं सर्व भिकारी म्हणत होते. परंतु त्यांचा मोह त्यांचा मुक्काम वाढवत होता. त्यांचा 'उद्या' उगवून मावळत होता. परंतु त्या खोऱ्यातून त्यांचा जीव निघत नव्हता. ते एकएक दाणा गोळा करीत होते.

कित्येक भिकाऱ्यांनी कुदळी घेतल्या होत्या. ते भाताच्या वावरात जात होते नि उंदरांचे उकीर उकरत होते. त्यात त्यांना मुबलक भात मिळत होतं. बिचाऱ्या उंदरांनी रात्रंदिवस खपून जमिनीत साठे करून ठेवले होते, आणि ही कंगाल माणसं त्या साठ्यावर धाडी घालून त्यांची लूट करीत होती. त्यांना आता शिवारात हिंडण्याची गरजच उरली नव्हती.

काही फिरस्ते गावात शिरून दारोदार भीक मागत होते. खेळ करीत होते.

बाळ्या डोंबाऱ्याची सद्दी जोरावर होती. त्याचा तमाशा गाजत होता. गुल्ली भिंगरीसारखी फिरून माणसांना गुंगवीत होती. तिच्या नावाचा डंका सर्वत्र वाजत होता. विलासरावाच्या कानावर गुल्लीचं नाव गेलं होतं. आणि काय कसब आहे पाहावं म्हणून त्यानं एकदा वाड्यात गुल्लीचा तमाशा केला आणि त्या दिवसापासून इनामदार 'गुल्ली-गुल्ली' करू लागला.

अलीकडे दुर्गा नियमानं वाड्यात जात नव्हती. पण चारसहा दिवसांनी अचानक इनामदाराचा निरोप येत होता, आणि दुर्गाला वाड्यात जाणं भाग पडत होतं. वाड्याकडे जातेवेळी ती आपलं मन कठिण करीत होती. वाड्यात गेली की पांगळत होती. स्वत:च स्वत:ला भीत होती.

दरम्यान पाऱ्या डवऱ्यानं फुणग्या सोडल्या होत्या. 'यंक्याची दुर्गा इनामदाराची रखेली आहे,' अशी त्यानं भुमका उठवली होती. आपली ती बातमी तो आगीसारखी सर्वत्र पसरवीत होता. ''इनामदारानं दुर्गाचा काटा काढला बरं!'' असं जो भेटेल त्याला तो सांगत होता. एकदा तर त्यानं ती बातमी सख्या माकडंवाल्याच्या कानात, सुरुंगाची दारू ठासावी तशी ठासली, नि धडाका उडवून दिला.

''माझी होणारी सून यंक्या भडव्यानं बाटवली! असं म्हणत सख्या खवळला, त्याचं टाळकं फिरलं.

यंकूचं ढोलकं झालं. ते दोन्हीकडून बडवलं जाऊ लागलं. दुर्गाला वाड्यात पाठव असा इनामदाराचा निरोप येताच त्याला नकार येणं यंकूला कठिण होत होतं, तर इकडे सख्या आणि भावकी बिथरली होती.

काही लोक यंकूची चेष्टा करीत होते. हसत होते. आणि इनामदाराचा सासरा म्हणून एकमेकांना खुणावीत होते. यंकू सारं कान पाडून ऐकत होता. तो हताश झाला होता. आपण आणि आपली दुर्गा संकटात आहोत असं म्हणून मनात जळफळत होता.

दुपार ढळून गेली होती. आंधळी म्हातारी चौफाळ्यावर पडली होती. तिला झोप लागली होती. दुर्गा एका खांबाला पाठ लावून बसली होती. वरच्या मजल्यावर विलासराव होता, नि वाड्यात शांतता पसरली होती.

विलासराव पलंगावर उताणा पडून दुर्गाचा विचार करीत होता. बाळ्या डोंबाऱ्याची गुल्लीही त्याच्या चक्षूंपुढं तरळत होती. तो चटकन उठून खाली आला. त्यानं दुर्गाला वर येण्याची खूण केली.

दुर्गा चमकली. पदराची चाळवाचाळव करीत उठली आणि भ्रमिष्टासारखी माडीवर गेली. तिनं डोळ्याच्या कोपऱ्यातून सर्वत्र पाहिलं. विलासराव पलंगावर शांत बसला होता. त्याला पाहताच दुर्गा पांगुळली. तिनं पापण्या पाडल्या. तिची तरल नजर जमिनीवर अंथरली गेली, आणि त्या नजरेच्या पायघड्या तुडवीत विलासराव दुर्गाजवळ आला. म्हणाला,

"दुर्गा, खरंच तू देखणी आहेस."

तशी तिची मान लाजेनं खाली गेली. दाताखाली ओठ धरून दगडासारखी उभी राहिली. तिचा चेहरा लालेलाल झाला. धीर करून तिनं वर पाहिलं. तिचे स्वप्नाळू डोळे विस्फारले. विलासराव म्हणाला,

"दुर्गा, बोल ना. दूर का उभी?"

मग तिला यंकूच्या शब्दांची आठवण झाली — "इनामदार वाईट आहे. तू जपून पाऊल टाक!" तशी ती चपापली. कावरीबावरी झाली. तो एकांत, विलासरावाची ती उन्मादक नजर, त्याची ती अस्वस्थ मन:स्थिती, ती मनात खचली. पण धीर धरून स्वत:ला सावरून म्हणाली,

"मी काय बोलू?"

"तू नको बोलू. तुझे डोळे बोलताहेत." विलासराव तिच्या डोळ्यात पहात म्हणाला, "हे डोळे जगाचे सर्वोच्च स्वरूप घेऊन या सृष्टीत आले आहेत. इतके सुंदर डोळे कुठंही पाहिले नाहीत मी!"

दुर्गा कसंनुसं हसली. म्हणाली, "डोळ्यास्नी का वाचा असती?"

"इतरांच्या नसते." विलासराव बेबंद होऊन म्हणाला, "पण तुझ्या या नेत्रांना

नियतीनं वाणी दिली आहे. नि हे – उरोज –''

दुर्गा चरकली. स्वत:च्या छातीकडे पाहून तिनं भर्रकन पदर सावरला आणि उगीचच पुन: हसली.

विलासराव म्हणाला, ''आणि हे काळजाचं पाणी करणारं सुंदर रेखीव शरीर–'' त्याच्या तीक्ष्ण नजरेनं तिच्या देहाला वेटोळं घातलं.

दुर्गा बावरली. म्हणाली, ''तुमचं बोलणं मला कळत न्हाय–''

''नाहींच कळणार–'' विलासराव म्हणाला, ''सुगंधमय कस्तुरी घेऊन वणवण भटकणाऱ्या सुवर्णमृगा, तुझी महती तुला समजणार नाही.''

तरीही दुर्गाला काहीच समजलं नाही. ती हसली आणि विलासरावानं हळूच तिच्या रेखीव ओठाला चिमटा घेतला. दुर्गा पार गोंधळली नि अधिकच मोहक दिसू लागली. विलासराव धुंद झाला. तिला जवळ ओढावी असा विचार त्याच्या मस्तकात उठला. त्याचं मस्तक बधिर झालं. दुर्गाचं आत्मसमर्पण जवळ आलं आहे असं वाटून त्याचं मन बावचळलं. त्यानं तिचा हात धरला. एक चुंबन घ्यावं असा मोह होऊन त्यानं तिच्या भुजा धरल्या.

दुर्गाला त्याचा हेतू समजला. पण ती पांगुळली होती. कशी तरी दोन पावलं मागं सरकली. प्रतिकार, नकार किंवा पळ यांपैकी काहीच तिला सुचत नव्हतं. त्यानं तिच्या भुजा घट्ट धरल्या, तोंड पुढं केलं – तोच गंग्या माकड भरधाव आला आणि दुर्गाच्या खांद्यावर बसला.

एकाएकी दुर्गाला धीर आला. बळ आलं. ती गर्रकन फिरली आणि माडीवरून खाली धावली. दारात यंकू उभा होत. बापाला पाहताच ती त्याच्याकडे धावली आणि तिनं त्याला घट्ट मिठी मारली.

ती भेदरली होती. थरथर कापत होती. ओठ सुकले होते. दुर्गाची ती अवस्था पाहून यंकूच्या काळजानं ठाव सोडला. आज नक्कीच काही तरी विपरीत घडलं असावं असं वाटून तो गांगरला.

गावाबाहेर येताच ओठावरून जीभ फिरवीत ती म्हणाली,

''बापा, खरंच इनामदार वंगाळ हाय.''

''दुर्गा, त्येनं काय केलं, खरं सांग.''

''त्येनं माझा हात धरला.''

''आणखी काय केलं?''

''माझ्या ओठास्नी चिमटा घेतला.''

''आणखी काय केलं?'' यंकू ओरडला. त्याच्याही घशाला कोरड पडू लागली.

''माझ्या तोंडात तोंड घालीत होता. गंग्या आला म्हणून बरं झालं. आता चल. मला

ह्यो गाव नकं. ही सुगी नकं.''

''आणि काय केलं त्येनं दुर्गा? यंकू वेडावला.

''काई न्हाय केलं.'' दुर्गा रडत म्हणाली, ''पण त्यो काही तरी विपरीत करणार व्हता.''

या उत्तरानं यंकूचा पेटलेला आत्मा शांत झाला. त्यानं लहान मुलाप्रमाणं दुर्गाला पोटाशी धरून हंबरडा फोडला. एका ओघळीत बसून ती दोघं मग खूप रडली.

दिवस अजून बराच वर होता. यंकूचं मन धगधगत होतं. दुर्गा काही तरी दडवीत आहे, तिला एवढं करून इनामदारानं सलामत सोडलीच नसेल, असा संशय त्याला आला आणि आपल्या मनाचं समाधान कशानं होईल याचा तो विचार करू लागला. मग म्हणाला,

''दुर्गा, लवकर जाऊन आंघोळ करून ये.''

दुर्गा आंघोळ करून आली. यंकू तिला घेऊन देव्हाऱ्याकडे गेला. देवापुढं तिला बसवून म्हणाला,

''दुर्गा, खरं सांग, आज त्वा पाप केलं का न्हाय?''

''न्हाय, बापा.'' ती उत्तरली.

''त्या माणसानं तुला बाटवली की न्हाय?'' यंकू दबक्या आवाजात म्हणाला, ''देव सुमरून सांग.''

''न्हाय बापा, म्या पाप केलं न्हाय.'' ती पुन: उत्तरली. हुंदके देत म्हणाली, ''तो पाप करणार व्हता. पर तू आलास, गंग्या आला आणि मी वाचल्ये.''

''मग मार देवाच्या टाळूवर हात!'' यंकूनं हुकूम केला. दुर्गानं चटकन देवावर हात ठेवला. तसा यंकू आनंदानं वेडावला. ''माझी दुर्गा — माझी तुळसीवाणी दुर्गा. तिनं पाप केलं न्हाय.'' असं म्हणून त्यानं तिला झरकन ओढून पोटाशी धरली. हर्षभरित होऊन त्यानं मटामट तिच्या गालाचे मुके घेतले. मग तिचे पाय पुढं ओढून त्याचे मुके घेऊन तो वेड्यासारखा रडू लागला, बडबडू लागला, ''दुर्गा, आज जर तुला त्येनं बाटवली असती तर म्या काय केलं असतं? तू पाप करून नरकात गेली असती. म्या तुला ठार मारली असती आणि येडा झालो असतो. त्यो जबर माणूस हाय. मी गरीब हाय. त्येचं म्या काय केलं असतं? तू माझी लेक. शेणी लेक. तू वाचलीस. पाप केलं न्हाय. तू नखाएवढी व्हतीस तवा तुझी आई मेली. मरताना तिनं मला सांगितलं की माझ्या दुर्गाला जपा. नि म्हणून म्या तुला जगवली, वाढवली.''

यंकूला रडू कोसळत होतं. त्याच्या मांडीवर डोकं ठेवून दुर्गा अश्रू ढाळीत होती.

रात्र झाली. खोरं शांत झालं. राधानगरी शांत झाली. तो माळ नि त्यावर वस्ती करणारी ती भिकारी माणसं शांत पडली. एकूण एक माणूस आडवं झालं.

गंग्या पेंगू लागला. रंगी डुलक्या घेऊ लागली. दुर्गा निश्चिंत झाली होती. यंकू विचार करीत होता. उशिरानं त्यानं आपलं अंथरूण अंगणात टाकलं आणि दुर्गाला म्हणाला,

"दुर्गा, इकडं ये."

दुर्गा चटकन उठून बाहेर आली. म्हणाली,

"बापा, काय?"

"ह्या अंथरुणावर नीज." यंकू म्हणाला. आणि दुर्गा निजली. यंकूनं तिच्या अंगावर पांघरूण घातलं. आणि आपणही शेजारी निजला. नुकतंच जन्मलेलं बाळ आईनं पोटाशी धरावं तद्वत दुर्गाला कुणी पाहू नये, पळवू नये, तिला बाटवू नये, म्हणून हृदयाशी घट्ट धरून तो आकाशात पाहू लागला. आणि ती देखणी, तरुण दुर्गा आपल्या बापाच्या कुशीत निर्भय होऊन नि:श्वास घेऊ लागली.

यंकूला झोप लागत नव्हती. तो दुर्गाकडे पहात म्हणत होता, "आज घात होत होता. या माझ्या दुर्गाला इनामदारानं आज बाटवली असती तर पाऱ्याचं खरं झालं असतं. इनामदाराचं ते पाप नऊ महिन्यांनी जगासमोर आलं असतं. भावकीत तोंड वर करणं कठिण झालं असतं. सख्यानं लढाई पुकारली असती. मी एकटा काय करणार होतो? मी बाटलेल्या लेकीचा बाप, मला बोलताच आलं नसतं. पण माझं नशीब मोठं आहे..."

त्यानं हळूच दुर्गाकडे पाहिलं. ती शांत निजली होती. तिच्या केसांनी तिचा चेहरा झाकला होता. यंकूनं ते केस मागं सारले. चंद्रप्रकाशात दुर्गाचा चेहरा उजळला.

सकाळ झाली. नवा सूर्य उगवला. दुर्गा उठून घरकाम उरकू लागली. यंकूचं हृदय शांत झालं होतं. रात्रीचं तुफान शांत झालं होतं. आता त्या खोऱ्यातून बाहेर पडण्याचा तो विचार करीत होता. त्यानं हळूच दुर्गाकडे पाहिलं. ती पूर्ववत टवटवीत दिसली नि यंकूनं समाधानाचा दीर्घ नि:श्वास सोडला.

दुर्गा भाजी खुडीत होती. गंग्या तिचे केस सोडून उवा पहात होता.

इतक्यात सख्या माकडवाला आला. यंकूपुढं तो चवड्यावर बसला. त्याचा चेहरा बिथरला होता. त्यानं अंगात दंडकं घालून फक्त लंगोटी लावली होती. त्याच्या डोकीचे केस भुरभुरत होते. तो रागावला होता. यंकूला तो म्हणाला,

"यंक्या, त्वा पाप केलंस?"

"काय केलं म्या?"

"त्वा माझी सून बाटवली."

"कशी रं भडव्या?"

"शिवी देऊ नकं! न्हाय तर मरशील."

"कोण मारणार मला?"

"मी—मी. सख्या." सख्यानं धमकी दिली.

"आरं, पण का?" यंकू ओरडला.

"तू माझ्या सुनेचं वाटोळं केलंस." सख्या चिडून म्हणाला, "सरळ सांग लेका, पाप केलंस. तिला इनामदाराच्या वाड्यात धाडलीस, आणि त्या दांडग्यानं तिला बाटवली."

"कोण म्हणतं सख्या?" यंकू वैतागून म्हणाला.

तसा सख्या चेव येऊन म्हणाला, "भडव्या, इनामदाराचा पैका घेऊन माझं त्वा वाटोळं केलं! पण याद राख! माझा येम्या ही उष्टी पत्रावळ चाटणार न्हाय."

दुर्गाला उष्टी पत्रावळ म्हणताच यंकूचं डोकं तरकटलं. म्हणाला,

"दुर्गाला इनामदारानं बाटवली असं कोण म्हणतं? सरळ बोल."

"मी म्हणतो. अलम दुनिया म्हणती."

सख्या एकेरीवर आला. यंकूनं रागानं सर्व शक्ती एकवटून सख्याच्या डोकीवर एक जोरदार दणका दिला, आणि लगेच सख्यानं यंकूला धरून चेलमडला. दणकादणकीला आरंभ दिला. दोघे एकमेकांना मारू लागले. दंगल वाढली. आरडाओरडीनं ती वस्ती थरथरली. दुर्गा किंचाळली. गंग्यानं सख्याचा चावा घेतला. यंकू नि गंग्या सख्यावर तुटून पडले. भावकी पुढं आली.

मग यंकूनं सख्याला दूर भिरकावून काठी घेतली, आणि दिसेल त्याला झपाटा देऊ लागला. माणूस नाही सापडला तर त्याचं पाल दणक्यात भुईसपाट करू लागला. ज्या पालावर दणका बसला त्या पालातील माणसं बोंब ठोकू लागली.

येमू मात्र दूर होता. तो पहात होता. पिळदार देहाचा येमू आपल्या बापाच्या-सख्याच्या पाठीवर उठेल असं वाटत होतं. पण येमू पुढं आलाच नाही. तो निवांत उभा राहिला.

यंकू पिसाळला होता. माणसं सैरावैरा पळत होती. माळावर बोंबाबोंब उसळली होती. वातावरण हादरत होतं.

अखेर सैदू दरवेशी आणि बाळ्या डोंबारी पुढं झाले. त्यांनी यंकूला धरला, तेव्हा तो शांत झाला. यंकूचा तो पिसाटपणा पाहून पाऱ्या डवरी घाबरला होता.

सख्या पुढं आला. म्हणाला, "यंकू, माझं ऐक."

"मी कुणाचं ऐकणार न्हाय." असं ओरडून यंकूनं सख्याचा हात गप्पकन धरला. म्हणाला,

"चल इनामदाराकडं, त्याचंच तू ऐक."

यंकू सख्याचा हात धरून त्याला फरफटीत गावाकडे निघाला. मग बाळ्या डोंबारी, सैदू दरवेशी आणि बरेच माकडंवाले यंकूमागोमाग गावात गेले.

दारातील गडबड ऐकून विलासराव बाहेर आला. सर्वांवर नजर रोखून पाहत म्हणाला,

"काय रे भिकाऱ्यांनो, काय आहे?"

यंकू खवळून म्हणाला,

"त्वा माझ्या दुर्गाला बाटवलीस का?"

"कोण म्हणतो?" विलासराव म्हणाला, "यंकू, मला त्याचं नाव सांग."

"ह्यो म्हणतोय!" असं म्हणून यंकूने सख्याला पुढे लोटला आणि म्हणाला, "माझी लेक इनामदाराची रांड हाय म्हणतोय ह्यो!"

"काय रे, तुला कोणी सांगितलं?" विलासराव म्हणाला.

सख्या हात जोडून म्हणाला, "सरकार, मला पाऱ्यानं सांगितलं."

लगेच विलासरावानं चाकर पाठवून पाऱ्याला बोलावून आणला. आल्याबरोबर पाऱ्यानं काखेतील कुबड्या टाकून प्रथम डोकं टेकलं. इनामदारापुढं लोटांगण घालून म्हणाला,

"मी खोटं बोललो, सरकार! आता मारा, न्हाय तर तारा. मान हजर हाय."

"तुला मुरदाडाला काय मारायचं!" विलासराव संतापून बोलला. आणि "जा, चालते व्हा." असं खेकसून आत गेला.

सर्व भिकारी परत माळावर आले. यंकूला आनंद झाला. पाऱ्याच्या कबुलीनं तो संतुष्ट झाला. पण सख्याचं समाधान झालं नव्हतं. तो आपल्या पालापुढं येताच हाताचं कुडबुडं हलवीत ओरडला,

"यंक्या, मला फसवू नकं. आरं, पाप करणारा पापाची कबुली देत नसतो."

"मग तुझं म्हणणं काय हाय?" यंकूनं विचारलं.

"सख्या म्हणाला, "माझी सून बाटलीया. मी दैवकाशी जमवणार. तू देवाम्होरं ये नि जाब दे."

जातकाशीचं नाव ऐकून यंकू वरमला. तो मटकन पालापुढं बसला.

सख्यानं खोऱ्यातील सर्व जातकाशी जमवली. मोठमोठे माकडंवाले, श्रीमंत, बोलके, शहाणे असे कित्येक जातवाले राधानगरीच्या माळावर बघता बघता येऊन दाखल झाले.

दुपार टळून गेली होती. माळावरचे भिकारी लौकर परतले होते. सुगी संपवून त्यांना आता श्रीमंती आली होती. ते जिभेचे चोचले करीत होते. प्रत्येकजण शिकार करून आला होता. मासे, खेकडे, मुंगूस, मांजरं, ससे, कोल्हे जे जे मिळेल ते मारून आणून त्यांनी खारवटण्याची तयारी केली होती.

डोंबाऱ्यांनी डुक्कर मारलं होतं. ते डुकराचा तो प्रचंड देह जाळावर धरून होरपळीत होते. बाळ्या डोंबारी आपण डुक्कर खात नाही, असं म्हणून दोन कोंबड्या मारून त्यांची पिसं उपटीत बसला होता. सैदूनं एक मोठा कोंबडा मारला होता. पलीकडे गोसावी खारुट्या मारून आले होते. पाऱ्या डवरी दारू पिऊन खेकडा भाजत होता.

डोंबाऱ्यांच्या डुकराचा किरमट वास वस्तीत शिरला होता. पाऱ्याची दारू कित्येकांना

चढली होती. जो तो आवाज चढवून बोलत होता.

बाजूच्या आंबराईत माकडंवाल्याची दैवकाशी जमली होती. हेकट, तापट, कर्ते, बोलके असे अनेक माकडंवाले एकत्र बसून दुर्गा बाटली की नाही याचा न्याय-निवाडा करीत होते.

यंकू गंभीर चेहरा करून बसला होता. पंचांच्या दृष्टीनं तो गुन्हेगार होता. परंतु त्याला एकदम गुन्हेगार ठरवणं पंचांना कठीण झालं होतं. प्रत्येक पंच तोलून बोलत होता. चार गाढवं, दोन शिकलेली माकडं, एक बोकड नि अंगातील अपार बळ यामुळं यंकूला टोचून बोलण्याची पंचांना भीती वाटत होती. तर काही पंच त्याचा उग्र चेहरा पाहूनच मनात टरकले होते.

येम्या दूर बसला होता. ऐकत होता. आपली होणारी देखणी बायको-दुर्गा आज पापी ठरली तर वाईट होईल, म्हणून तो काळवंडला होता. तो दुर्गा पापी ठरू नये म्हणून देवाला हात जोडीत होता.

सख्या रणभैरी झाला होता. तो आक्रमक भाषा बोलत होता. दोन्ही बाजूंनी शब्दांचा तोफखाना सारखा पेटत, दणकत होता. गलका वाढत होता, नि त्यामुळे हळूहळू गर्दीही वाढत होती. सैदू दरवेशी आपली सिंहासारखी दाढी कुरवाळीत बसला होता. बाळ्या डोंबारी कोंबडी चुलीवर चढवून, ऐटबाज पटका बांधून लंगोटी नेसून यंकूजवळ उघडाच बसला होता.

माकडंवाले पंच बोलत होते. एक पंच सूर्याकडे पाहून आवाज चढवून म्हणाला, ''दैवानूं, बचकत पाणी धरून बसू नका. भडाभड बोला. दु:ख हाय तिथं डाग द्या.''

पंच चमकले. दुर्गा बाटली आहे हे सिद्ध करणे कठिण होतं. तरीही एक पंच यंकूकडे वळून म्हणाला,

''यंकू, तुझ्या लेकीनं पाप केलं हे खरं का?''

''न्हाय. ती तुळशीवाणी हाय.'' यंकू उत्तरला.

''आरं, पर त्याला पुरावा काय?'' दुसऱ्या एका पंचानं मध्येच प्रश्न केला.

यंकू म्हणाला, ''मग माझ्या लेकीनं पाप केलं ह्येला तरी काय पुरावा हाय? आणा पंचांत.''

''खरं हाय! खरं हाय!'' एक पंच मोकाटपणं मान डोलवीत म्हणाला, ''पोरीनं पाप केलं ह्ये कुणी बघितलं? काय रं सखारामा — ती दुर्गा बाटली तवा तू कुठं व्हतास? ते पाप घडलं त्या जाग्यावर व्हतास का?''

''न्हाय बरं, म्या बघितलं न्हाय! मी पालात व्हतो. दैवानूं,'' सख्या हात जोडून म्हणाला, ''पण ती दुर्गा रोज इनामदाराकडे जात व्हती.''

''पर ती कामाला जात व्हती.'' यंकू मध्येच बोलला.

''यंकू, तू बोलू नको.'' तो पंच ओरडला. नि सख्याला म्हणाला, ''तुझी लेक भीक मागाय जाती का न्हाय?''

''व्हय, जाती की!'' सख्या उत्तरला.

''मग ती बी पाप करती का?'' पंचानं प्रश्न केला. सभा शांतपणे ऐकू लागली.

सख्या म्हणाला, ''माझी लेक पाप करीत न्हाय दैवा.''

''मग दुर्गानंच पाप केलं कसं?'' त्या पंचानं आवाज चढवला.

तसा सख्या रबरी चेंडूप्रमाणं जागीच उडत ओरडला, ''दुर्गानं पाप केलं – केलं.''

''न्हाय, न्हाय!'' यंकूही ओरडू लागला. गोंगाट वाढला. दोन्हीकडची माणसं, पंच केकटू लागले. हातघाई जवळ आली.

सर्वांनी एकमेकांवर ओरडून दंगल शांत केली. मग सख्या पडक्या आवाजात म्हणाला,

''ऐका, दैवकाशी, मी दुर्गाला सून करीन, पण तिनं कढत्या तेलातला पैसा काढून दिला पायजी. जर तिचा हात भाजला तर ती पापी आणि जर तिचा हात न्हाय भाजला तर ती तुळस!''

''ही तोड बरी हाय.'' सर्व ओरडले. सख्या पळत पालात गेला. तेलाची बाटली, तवा, काडी घेऊन आला. त्यानं लगेच चूल केली. आणि तव्यात तेल ओतून खाली जाळ केला.

सर्व लोक गंभीर होऊन पाहू लागले. तव्यात तेल कढत होतं. जाळ वाढत होता. लोक भयभीत होऊन पाहत होता. यंकू गांगरला. तो केविलवाणा चेहरा करून सर्वांकडे पाहू लागला. आणि एक पंच म्हणाला, ''दुर्गाला आणा.''

एक इसम पळत गेला आणि दुर्गाला घेऊन आला. दुर्गा पंचात आलेली पाहून यंकू रडकुंडीला येऊन बोलला, ''पंचानू ऐका, लोकांनी सांगितलं न् कानानं ऐकलं खोटं असतं. आगीत वलं, वाळलं जळतं ह्येचा विचार करा.''

दुर्गा निर्भय होती. ती गंभीर होऊन पंचात आली. तिनं तव्यात कडकडून कढणारं तेल एकदाच पाहिलं, आणि ती पुढं झाली. सभा दुचमटली. ती तव्यात कढणाऱ्या तेलाकडे निघाली नि येमू उठला. हात जोडून म्हणाला,

''दैवकाशी, ऐका. माझा बाप येडा हाय. त्यो म्हणतोय, दुर्गानं पाप केलं, तर मी म्हणतो त्येनंच त्यो तेलातला पैसा काढावा. जर बापाचा हात भाजला तर दुर्गानं पाप केलं न्हाय. नि जर त्येचा हात जळला न्हाय तर दुर्गा पापी, बाटलेली!''

सख्याचे डोळे पांढरे झाले. पंचांना कोलदांडा बसला. भर सभेत येम्यानं आपल्या बापाच्या तंगड्या त्याच्या गळ्यात घातल्या. यंकूचे पंच चढाईनं उठले आणि सख्याला म्हणाले,

"चल सख्या, काढ त्यो तेलातला पैसा."

सख्या बिथरला. लाल झाला. त्या कढत तेलाकडे पाहत डाव अंगावर आल्याचं जाणून त्याची भंबेरी उडारी. तो येम्याकडे रागानं पाहू लागला. तोच येम्या पुन: म्हणाला,

"दुर्गा तेलातला पैसा काडणार न्हाय. दुर्गा कशी का असंना, मला परवडली."

"मग लेका भडवीच्या चालता हो!" सख्या भडकला. म्हणाला, "माझ्या घरात येऊ नको. मी तुला मेलो. आता सरगीच आपली भेट!" असं म्हणत सख्या ऊर बडवीत पालाकडे पळाला. पंचकी उठली. यंकूचा जय झाला. दुर्गा पवित्र ठरली. आणि ऐन वेळी येमूनं बाजू राखली, म्हणून दुर्गा येमूच्या कौतुकानं हरखून गेली.

येम्यानं आपल्या बापाला वेडा ठरवला म्हणून अनेक माकडंवाले येम्याला दोष देऊ लागले. माझ्या पोराला — येम्याला — यंक्यानं भानामती केली म्हणून सख्या ऊर बडवू लागला. "यंक्या, तुझं वाटोळं व्हयील." असं म्हणून लोळू लागला.

यंकूला सख्या हा एक नवा वैरी निर्माण झाला.

७

सुगी उलघली होती. शिवार झडझडीत झाला होता. उघडी पडलेली वानरं ऊन खात होती. धान्याच्या राशी माणसांनी पळवल्या होत्या. झडून पडलेले दाणे पाखरांनी वेचले होते. भिकाऱ्यांनी उंदरांचे उकीर खणून त्यांना भिकारी केलं होतं!

बाळ्या डोंबाऱ्याची ढोलकी सारखी वाजत होती. त्याची गुल्ली गिरक्या मारून हौशी माणसांची मनं पोखरीत होती. ती नाचून पैसा जमवीत होती. बाळ्याचं नशीब दुणावलं होतं. एकदोन दिवसांनी विलासराव बाळ्याचा तमाशा वाड्यात करीत होता. तो गुल्लीच्या रूपावर, तारुण्यावर नि मोहक हालचालींवर फिदा झाला होता. तो दुर्गाला विसरू शकत नव्हता. एका भिकाऱ्याची सुंदर पोरगी जवळ येऊन दूर झाली याचं त्याला दु:ख होत होतं. परंतु दुर्गाकडे आपलं लक्ष नाही असं तो काळजीपूर्वक भासवीत होता.

यंकू त्या खोऱ्यातून पळ काढण्याचा विचार करीत होता. दुर्गा प्रत्येक पाऊल जपून टाकीत होती. येमू रोज नियमानं दुर्गाकडे येत होता. तिची काळजी घेत होता. पाणी, जळण आणून देत होता. नि ती सैंपाक करीत बसली की आपण गप्पा मारीत बसत होता.

सख्या घाबरला होता. कर्ता पोरगा हातचा जाईल म्हणून तो यंकूशी अलीकडे जुळतं घेऊन वागत होता. "पाण्यावर काठी मारली म्हणून पाणी तुटत नसतं," असं तो इतरांना सांगत होता.

सख्या नरमला असला तरी यंकूचे बाकीचे वैरी गप्प बसले नव्हते.

मग अशीच एक सुंदर संध्याकाळ अवतरली. दिवसाचं रात्रीत रूपांतर होत होतं. निखारे उधळावेत तद्वत रक्तरंगी ढग क्षितिजावर सर्वत्र विसकटले होते. वारा स्वैर वाहत होता. त्याच्या धक्क्यानं सर्व वनराजी थरथरत होती. आकाशात पाखरांनी सुरकंडीचा खेळ आरंभला होता.

आज इनामदाराच्या वाड्यात गुल्लीचा तमाशा नक्की झाला होता. बाळ्या तयारी करीत होता. गुल्ली उत्साहानं भरली होती. तिच्या पायातील चाळ आतापासून झणझणत होते. ढोलकं बोलत होतं.

यंकूला उशीर झाला होता. येम्याही आला नव्हता. घरात पाणी नव्हतं. दुर्गा घागर घेऊन नदीला निघाली. माळापासून ती नदी दोन फर्लांग दूर होती. मध्ये वस्ती नव्हती. अंधार हळूहळू दाटत होता. दुर्गा पाय उचलीत होती. ती दोन लवणं ओलांडून गेली. एका ओघळीत उतरली आणि पुढून येमू आला. त्याला पाहून ती लाजली. घाबरल्यासारखं करून ती बाजूला उभी राहिली.

येमू म्हणाला, ''दुर्गा —''

''काय?''

''रात केलीस.''

''बाप अजून आला न्हाय.''

''तू एकटीच?''

''व्हय. का?''

''नदीला चिटपाखरू न्हाय.''

''नसंना! मला का कुणी खुडून घेतंय?''

''दुर्गा, ऐक. हेका करू नकं.''

''अजून लगीन व्हणार हाय. तू मालकी सांगू नकं.''

''बरं, जा. लौकर ये घागर भरून. मी उभा हाय.''

''न्हाय येणार. तू काय करणार?''

''मी खुडून घेणार न्हाय. गिळून टाकीन.'' येमू हसून बोलला.

''अग बाई! तू का राकूस हायीस?''

''ते लगीन झाल्यावर कळेल!''

''बरं, मी येत्ये.'' दुर्गा हातात पदर धरून नदीकडे पळाली.

नदीवर सामसूम होती. फक्त बेडक्या कर्कश आवाज काढीत होत्या. कुठे तरी पाणी

खळखळत होतं. दुर्गानं घागर भरून काठावर ठेवली. हातपाय धुण्यासाठी वाकली. तोच दोघा बलिष्ठ माणसांनी तिच्यावर झडप घातली. तिला हूं का चूं करू दिलं नाही. काही क्षण तिला काहीच कळलं नाही. मग तिला उमजलं की कोणी तरी आपल्याला उचलून पळवीत आहे.

ती दोन जबर माणसं तिला घेऊन नदीकाठच्या दाट शेवऱ्यात गडप झाली.

येम्या ओघळीत दुर्गाची वाट पाहत उभा होता. दुर्गा आली नाही म्हणून तो नदीवर गेला आणि दुर्गाची भरली घागर पाहून चरकला. चडफडला. धावत माळावर आला. यंकूला घाबऱ्या घाबऱ्या म्हणाला,

"दुर्गा नदीवर एकटी गेली, पण घात झाला. तिला कुणी तरी पळवली वाटतं. तिची घागर नदीवर हाय! चला."

यंकू धडपडून उठला. त्याच्या काळजाचं पाणी पाणी झालं. त्यानं तिरमकठा घेतला. गंग्याचं दाव सोडलं आणि तो नदीकडे धावत निघाला. त्याच्यामागून येमू नि गंग्या धावू लागले.

नदीवर येताच यंकूनं दुर्गाची घागर पाहिली. आणि सर्व शक्ती एकवटून हाक मारली, "दुऽऽऽर्गा."

ती हाक त्या शांत रात्री नदीकाठी घुमत दूरदूर गेली.

परंतु दुर्गाची 'ओ' आली नाही. यंकू निराश झाला. घागरीला गोंजारीत म्हणाला, "येमू, गंग्या, माझ्यावर उपकार करा. माझ्या दुर्गाला आणा —"

तसा गंग्या चिरकला, आणि एकाएकी ज्या दिशेनं दुर्गाला पळवली होती त्या दिशेनं तो पळत निघाला. येमूनं तिरकमठा घेऊन तिकडे धाव घेतली. त्या दोघामागून यंकू पळू लागला.

धनुष्यावरून तीर सुटावा तसा गंग्या पळत होता. त्याच्या मागं त्याच वेगानं येमू पळत होता आणि यंकू त्या दोघांना दूर जाऊ देत नव्हता.

गंग्या पळत होता. यंकू जवळ येताच गंग्या नाचत होता. पुन: पळत होता. गंग्याच्या हालचालीनं यंकूला धीर आला. दुर्गा दूर गेली नसून लौकरच सापडेल अशी त्याला आशा वाटत होती.

गंग्या, येमू नि यंकू धावत होते. ते कशालाच थटत नव्हते. त्यांचा वेग वाढत होता. पळ वाढत होता.

गंग्याच्या मागून ते दोघे गावात येऊन रंगराव पाटलाच्या वाड्यापुढं थांबले. पण गंग्या थांबला नाही. तो ताडकन उडी मारून कुसवावरून आत पडला आणि लगेच परत येऊन यंकूचा हात धरून नाचू लागला. गुरकू लागला. उड्या मारू लागला. यंकूला गंग्याची भाषा समजली. दुर्गा याच वाड्यात आहे, याबद्दल खात्री होऊन तो दरवाजाला भिडला.

त्यानं कानोसा घेतला.

दरवाजा आतून बंद होता. वाड्यात सर्वत्र शांतता होती. येम्यानं तो प्रचंड दरवाजा बाहेरून लोटून पाहिला. पण त्याला आतून आडणा होता. त्याचा नाइलाज झाला. दोघेही अंधारात दबा धरून बसले.

गंग्या पुन: उडी मारून कुसवाच्या आत गेला.

त्या प्रचंड वाड्यात सामसूम होती. लगेला टांगलेला कंदील मंद जळत होता. माणसांचं अस्तित्व भुईसपाट झाल्यासारखं वाटत होतं.

बाहेरच्या बाजूला सोप्यात काळगावचा नाथा पाटील दाढेला सुपारीचं खांड धरून विचार करीत बसला होता. त्याची मुलगी सारजाबाई रंगराव पाटलाला दिली होती. तिचा तातडीचा सांगावा आला म्हणून नाथा पाटील राधानगरीत येऊन दाखल झाला होता.

रंगराव अजून आला नव्हता. जेवणवेळ टळून गेली होती. रंगरावाचे दोन चाकर रावू ढेकणा आणि बंडू तडाखे या दोघांनी रंगराव आणि विलासराव यांच्या सांगण्यावरून आज दुर्गाला पळवून आणून माडीवर बांधून टाकलं होतं. आणि आपण काम फत्ते केलं हे रंगरावाला सांगण्यासाठी ते विलासरावाच्या वाड्याकडे गेले असतानाच इकडे नाथा पाटील आला होता.

विलासरावाच्या वाड्यात गुल्लीचा तमाशा आज लौकरच उभा राहिला होता. गाव आडवा झाला की दुर्गाला वाड्यात आणून ओरबाडायची, असा विलासरावानं निश्चय केला होता.

नाथा पाटील रंगरावाची वाट पाहत होता. ती भयाण शांतता त्याला असह्य झाली होती. त्यानं मन उदास झालं होतं. एवढ्या मातबर माणसाच्या वाड्यावर ही अशी अवकळा का आली आहे? लेक बोलत का नाही? जावई अजून घरी कसा आला नाही? चाकरमाणसं कशी दिसत नाहीत? हा काय प्रकार आहे? याचा विचार करीत तो गप्प होता.

माडीवर गंग्या दुर्गाच्या हातापायाच्या दोऱ्या सोडण्यासाठी धडपडत होता. त्याला पाहून दुर्गाला आनंद झाला होता.

बाहेर दबा धरून बसलेले येमू नि यंकू अस्वस्थ झाले होते. वाड्यात गेलेला गंग्या परत येत नाही, दुर्गा दिसत नाही, आणि रात्र वाढते आहे. त्या दोघांच्या काळजाचं पाणी होत होतं.

आपली मुलगी सारजाबाई बोलत नाही म्हणून नाथा पाटलाचं काळीज तुटत होतं. शेवटी त्यानं हाक मारली, ''सारजाऽऽ, भाईर ये.'' तशी ती चौकटीत आली. दाराचा आडणा पाडून बापाजवळ बसली. आणि नाथा पाटील म्हणाला,

''बाळ, ह्या घराला घर कसं म्हणायचं? मला काई लक्षण बरं दिसत न्हाय.''

"बरं नसल्यावर बरं कसं दिसणार?" सारजा दबक्या आवाजात बोलली.
"मग मला कळू दे." नाथा पाटील म्हणाला, "तुझ्या मालकाचं कसं चाललंय?"
"ते रामायण सांगून संपणार न्हाय." सारजा म्हणाली, "तुझा जावई इनामदाराच्या नादी लागून लोकांच्या लेकीबाळींच्या आब्रूला चूड लावून आपल्या घरादाराचं वाटोळं करणार हाय."
"सरळ सांग." नाथा गुरकला. आणि सारजा हळूच म्हणाली, "आबा, एका भिकारणीचं त्येना याड लागलंय. तिला वाडा बांधून देणार म्हणं."
"हे सारं खरं कशावरून?" नाथा पाटलानं प्रश्न केला.
सारजा म्हणाली, "लांब कशाला! आता या घडीला या वाड्यात माडीवर जाऊन बघ म्हंजी खरं वाटंल तुला."
"चल दाखव." पाटील उठून माडीवर गेला आणि जखडून टाकलेल्या दुर्गाला पाहून चकित झाला. त्याचं डोकं भणाणलं. त्यानं दोऱ्या सोडून तिला मोकळी केली आणि विचारलं, "कुणाची पोर तू?"
"मी यंकू माकडंवाल्याची लेक." दुर्गा उत्तरली.
यंकूचं नाव ऐकून नाथा पाटलाला आनंद झाला. तो म्हणाला,
"यंकू तर माझा मैतर, कुठाय तो."
"त्यो भाईर असंल." दुर्गा रडू लागली.
"आता रडू नकं. तुला कोणी आणली?"
"मला दोन माणसांनी पळवून आणली."
"ती दोन माणसं म्हणजे, राव्या आणि बंड्या." सारजा म्हणाली.
"चल खाली." नाथा पाटील दुर्गाला घेऊन खाली आला. दरवाजा उघडताच यंकू नि येमू पुढं धावले. यंकूनं नाथा पाटलाला ओळखलं नि पटकन पाय धरले. मग त्यानं दुर्गाला पोटाशी धरून हंबरडा फोडला.
नाथा पाटील खिन्न झाला. त्याचे डोळे भरून आले. यंकूचा हात हातात घेत तो म्हणाला,
"यंकू, गरिबा, अजून तुझ्या मागची पीडा टळली न्हाय. ही तुझी लेक का?"
"व्हय, धनी." यंकू गहिवरला.
"आता झालं गेलं इसर. तिची आब्रू वाचली ह्यातच नशीब समज!" पाटील शांतपणे म्हणाला. "पण ही उद्या वाचणार न्हाय. ह्या गावात माणसाच्या आकाराची जनावरं हायती. त्येंच्या तोंडाला रगात लागलंय. ती तुझ्या ह्या पोरीचा चाफलूनच दम घेतील. तवा तू ह्यो गाव सोड नि काळगावला ये. मग ह्या पोरीकडे डोळा वर करून बघणाराची मी बोटानं बुबुळं काढीन."

''आता तसंच करतु, धनी.'' यंकूनं हात जोडले.

पाटील म्हणाला, ''पोरीला घेऊन आता पळ. पर आज राती तिला घरात ठिवू नकं. रानात ठिव. न्हाय तर ती भुतं तुझ्या घरावर घाला घालून तिन्ला परत पळवतील. जा!''

यंकू, दुर्गा, येमू, गंग्या यांनी माळाकडे पळ काढला. गंग्या यंकूच्या खांद्यावर बसला होता. पालात येताच यंकूनं गंग्याचा मुका घेतला. आनंदानं वेडावला. दुर्गाच्या गळ्यात पडून लहान मुलाप्रमाणे रडला आणि मग येमूला म्हणाला,

''येमू, मी घर राखतो, दुर्गाला घेऊन रानात जा. दूर जा. रात तिकडंच काढ, नि सकाळी पहिल्या कोंबड्याला ये. पण जपून.''

येमू चटकन उठला. तिरकमठा, विळा, घोंगडे घेऊन तो तयार झाला. दुर्गाला घेऊन तो कीर्र झाडीत धावत निघाला.

विलासराव इनामदाराच्या वाड्यात बाळ्या डोंबाऱ्याच्या देखण्या गुल्लीचा तमाशा रंगला होता. गुल्ली कहर करीत होती. तिच्या उन्मादक हावभावानं नि पायातील नूपुरांनी पुढं बसलेल्या माणसांच्या मनात विकाराचा डोंब उसळवला होता.

गुल्लीची रुंद छाती, हरिणीसारखे डोळे, त्यांची नाजूक उघडझाप, रसरशीत पोटऱ्या, पायातील गती पाहून माणसं निर्भान होत होती. गुल्ली प्रत्येकाच्या उरात बाण रुतावा तद्वत रुतली होती.

रंगराव पाटील स्वत:ला विसरून बसला होता. माणूस एकदाच जन्माला येतो. एकदाच मरतो. त्याचं मागं काहीच राहत नाही. आपण ही तरणीबांड गुल्ली घरात घालावी, असा विचार त्याच्या डोकीत नाचत होता. आपला हा हेतू रंगरावानं गुल्लीला सांगूनही टाकला होता. पण उभा वाडा आणि अर्ध्या दौलतीचा कागद पाहूनच मी उत्तर देईन, असं गुल्लीनं उत्तर दिलं होतं.

गुल्ली नाचत होती. पण विलासरावाचं मन त्या तमाशात लागत नव्हतं. 'दुर्गाला आणली आहे,' ही खबर समजल्यापासून त्याचं मन 'दुर्गा, दुर्गा' करीत होतं. हा तमाशा मोडावा. दुर्गाला इथं आणावी आणि तिच्या त्या उफाळत्या जवानीचा चक्काचूर करावा या विचारानं तो पागल झाला होता.

अखेर विलासरावानं तमाशा मोडला. लोक उठून घरोघर गेले. वाडा मोकळा झाला. विलासराव रंगरावाला म्हणाला,

''हं! पाटील, गाव थंड पडला. जावा आणि ती भानगड इकडं पाठवा.''

रंगराव, राव्या-बंड्या यांना घेऊन घरी आला आणि सोप्यात बसलेल्या नाथा पाटलाला पाहून चरकला. पण लटकाच आनंद व्यक्त करीत म्हणाला,

"आरे! मामासाहेब, तुम्ही केव्हा आला. कशी काय, सर्व मंडळी ठीक आहेत?"

"सारं ठीक हाय." नाथा पाटील तीक्ष्ण सुरात म्हणाला, "पण ह्ये तुमचं घर कैदखाना कसं झालं?"

"कैदखाना?" रंगराव चमकून म्हणाला, "मामा, माझ्या डोकीत नाही आलं."

"मग ऐका तर. हे घर नेक औलादीचं हाय. त्येचा तुम्ही कुंटणखाना केलाय." नाथा पाटील तरकटून म्हणाला, "मेंढरावाणी लोकांच्या पोरीबाळी तुम्ही आणता, या घरात कैद करून ठेवता नि लांडग्याच्या औलादीचं पाप करून घराण्याच्या लौकिकाला काळं फासता, याचं नाव काय?"

"कोणाच्या पोरी कोणी आणल्या?" रंगरावही भडकला.

"माकडंवाल्यांची पोरगी कुणी आणली होती?" पाटलानं दम भरला.

"कुठाय ती?" रंगराव किंचाळला.

नाथा पाटील उत्तरला, "म्या सोडली तिला."

"कोणी आणली होती?" रंगरावानं गर्रकन वळून सारजाला विचारलं.

"राव्यानं आणि बंड्यानं." सारजा उत्तरली. तसा रंगराव धावला. खुंटीचा चाबूक घेऊन त्यानं बंड्यावर झडप घेतली. तो त्या दोघांना चाबकानं खडाखड मारू लागला. पाठीव मार घेत राव्या आणि बंड्या दोघेही मागं सरत सरत अंधारात शिरून पळत सुटले. रंगराव त्यांचा पाठलाग करीत धावला. वाडा शांत झाला.

रंगराव, राव्या व बंड्या हे तिघे विलासरावाच्या वाड्यात आले, तेव्हा बंड्या पाठ चोळीत म्हणाला,

"पाटील, सासऱ्याची डोळंफोडवाण करण्यासाठी तुम्ही आमची पाठ फोडून काढली की!"

रंगरावाने विलासरावाला घडलेला सर्व प्रकार सांगितला. ते ऐकून विलासरावाचं डोकं पेटलं. तो म्हणाला,

"ते काहीही असो. आता वेळ दौडू नका. माणसं घेऊन माळावर चला. आणि हजारो लोकांच्या डोळ्यादेखत दुर्गाला जबरीनं ओढून आणा — चला."

बंड्या, राव्या पळाले. त्यांनी आपली माणसं जमवली. कुऱ्हाडी ठोकल्या, कंदील पेटवले आणि पन्नाससाठ लोकांनी ती माळावरची खोपटं वेढली. बंड्या-राव्या यांनी पालाला वेढा दिला. लखलखीत चांदण्यात हत्यारं चमकू लागली.

यंकू गंग्याला जवळ घेऊन बसला होता. नाथा पाटलाचे शब्द त्याच्या कानात घुमत होते. त्यानं घर वेढणाऱ्या लोकांना रामराम केला.

"का बसलास? नीज येत न्हाय वाटतं?" बंड्यानं विचारलं.

यंकू म्हणाला, "कसा निजू? माझी पोरगी नदीला गेलीया ती अजून आली न्हाय."

"कुठं गेली ती?" राव्या खेकसला.

"देवाला ठावं!" यंकू उत्तरला. राव्यानं यंकूच्या घरात मुरकुंडी दिली, चारी कोपरे शोधले नि बाहेर आला. तोच बंड्यानं यंकूचं पाल ओढून आडवं केलं. तसं गंग्या बिथरला. नि यंकू हात जोडून म्हणाला,

"सरकार, मी गरीब हाय –"

"मग तुझी पोरगी कुठाय?" राव्यानं विचारलं.

यंकू म्हणाला, "तिला कुणीतरी पळवलीया."

"सर्व पालांची झडती घ्या." विलासराव गरजला. हत्यारी लोक प्रत्येक पालाची झडती घेऊ लागले. सर्व भिकारी उठले. कुत्री भुंकू लागली. पोरं रडू लागली. बायका ऊर बडवून घेऊ लागल्या. रंगराव ओरडला,

"पहारा कडक ठेवा. ती दुर्गी दूर गेली नाही."

झडतीला आरंभ झाला. हत्यारी लोक घराघरात शिरत होते. निजलेल्या बायांना उठवून पाहत होते. लोक घरात शिरताच पोरं किंचाळत होती. बायका ओरडत होत्या. कुत्री भुंकत होती. पालात शिरून ते लोक निजलेल्या तरुण पोरींच्या तोंडावरचं पांघरूण दूर करून पाहत होते. सर्वत्र हलकल्लोळ झाला होता.

शिकाऱ्यांनी नीर काढून शिकार शोधावी तद्वत त्या लोकांनी दुर्गाला पालापालांत शिरून पाहिली. दुर्गा सापडली नाही. विलासराव संतापला. म्हणाला,

"याचा अर्थ ती अजून घरी आली नाही. ती एक तर रानात दडी मारून बसली असावी किंवा बंड्यानं तिला दडविली असावी. नाही तर ती जाणार कुठं?"

बंड्याचं धाबं दणाणलं, तो हात जोडून म्हणाला, "सरकार, तसं म्हणू नका. मी बेईमान न्हाय. मी आणभाक करीन–"

"मला आणभाक नको." विलासराव बंदूक सरळ करून म्हणाला, "मला ती पोरगी पाहिजे. प्रथम ती आण, मग मी पाहीन तुझं इमान." हे निर्वाणीचं मत ऐकून बंड्याचे हातपाय गळाले. तो दगडासारखा काळजाचा माणूस विलासरावापुढं गांगरला. विलासरावानं हुकमी आवाजात सर्व भिकाऱ्यांना बजावले की, "दुर्गाला हजर करा नाही तर माळावरून कोणालाही पाल मोडता येणार नाही. जो कोणी पाल मोडून पळून जाऊ पाहील त्याचे हातपाय मोडले जातील."

विलासराव गावाकडे परतला. राव्या नि बंड्या एका झाडाखाली दुर्गाची वाट पाहत दबा धरून बसले. त्यांना खात्री होती की रानात दडलेली दुर्गा मध्यान्ह रात्री परत येणार.

चंद्र डोक्यावर आला होता. त्याचा रुपेरी प्रकाश गर्द वनराजीच्या मस्तकावर वर्षत

होता. दवबिंदूंच्या सिंचनानं मोठमोठे दगड नि झाडांची पानं भिजून चिंब झाली होती.

दवावर चंद्रप्रकाश एकरूप होऊन त्या डोंगराला चंदेरी रंगाचा मुलामा चढल्याचा भास होत होता. अनंत रानवेलांना बहर आला होता. त्यांच्या फुलांचा सुगंध घेऊन डोंगरी वारा अठरा भार वनस्पतींच्या मस्तकावरून दौड मारीत होता. सर्व शांत, नि:शब्द नि निर्जन वाटत होतं.

दुर्गा येमूचा खंबीर हात धरून चालत होती. येमू खांद्याला तिरकमठा लावून दमदार पावलं टाकीत होता. घनदाट झाडीच्या ओलसावलीनं ती दोघं निघाली होती. कीर्र झाडीत झाडांच्या पानांतून सुंदर चांदणं त्यांच्या डोकीवर झिरपत होतं.

ती दोघं एका झाडाखाली थांबली. पलीकडेच नदीचं पात्र दाठकं होऊन वाहत होतं. समोर भव्य सह्याद्री उभा होता. गाव दूरवर दिसत होता. ती दोघं निर्भय झाली. दुर्गा खाली बसली.

"दुर्गा, दमलीस?" येमूनं विचारलं.

"व्हय. आता हथंच बसू या." दुर्गा स्वत:चे पाय चेपीत म्हणाली, "माझे पाय ताठले. लांब आलो आपून."

येमू हसला. त्यानं घोंगडं अंथरलं, आणि दुर्गा त्यावर बसली.

"येमू —"

"काय?"

"आता कसं व्हायचं?"

"कशाचं?"

"माझ्या जिवाचं."

"काय बी न्हाय. तू घाबरू नकं."

दुर्गानं चटकन त्याच्या तोंडाकडं पाहिलं. त्या सुंदर चांदण्यात येमूचा चेहरा उजळला होता, नि त्यावर निर्धार व आनंद यांचं मिश्रण तळपत होतं. ती मान खाली घालून हसत म्हणाली,

"आपून कुठं ऱ्हायचं?"

"इथंच."

"पण खायचं काय?" असं म्हणून तिनं जांभई दिली.

"तुला भूक लागलीया?" येमूनं विचारलं.

तिनं मानेनं होकार दिला. येमू बावरला. त्यानं सर्वत्र निरखून पाहिलं. दुर्गाला उठवून एका झाडाच्या फांदीवर बसवली. कमरेचा विळा तिच्या हाती दिला, तिरकमठा तिच्या गळ्यात अडकवला, आणि म्हणाला,

"दुर्गा, भिवू नकं. मी आता येतो." एवढंच बोलून तो वाऱ्यासारखा पळत निघाला,

आणि माळावर आला. अगदी मांजरासारखा येऊन तो यंकूच्या पालात शिरला. तेव्हा सर्व काही शांत होतं. यंकू जागाच होता. तो म्हणाला, ''येमू, दुर्गा?''

''रानात.''

''तिला टाकून कां आलास?''

''तिला भूक लागलीया.''

यंकू उठला. त्यानं एका फडक्यात भाकरी बांधली. चटणी, मीठ नि भुईमुगाच्या शेंगा बांधल्या. एक लोटकं दिलं आणि दबक्या आवाजात म्हणाला,

''दुर्गाला सांग, वकूत बाका हाय. आताच इनामदार, रंगू पाटील ह्यांनी सारी पालं धुंडाळली. चार माणसं पाळतीवर बसल्याती. दुर्गाला हजर केल्याशिवाय कुणी पाल मोडू नये, असा हुकूम केलाय. तवा तुम्ही सकाळी येऊ नका. माझी काळजी करू नका. येमू, तू असाच नजर चुकवून येऊन मला भेटून जात जा. म्हंजी म्होरं काय करायचं ते ठरवू.''

येमूनं ते सर्व लक्षपूर्वक ऐकून घेतलं, आणि पुन: तो वाऱ्यासारखा दुर्गाकडे गेला. त्याला पाहताच दुर्गानं फांदीवरून उडी मारली. येमूची ती दौड पाहून ती मनात दिपली.

ती दोघं एका उघड्या जागेत बसली. शुभ्र चांदण्यात बसून त्या दोघांनी भाकरी खाल्ली. नदीला जाऊन पाणी प्याली.

दमलेल्या दुर्गानं घोंगड्यावर अंग टाकलं नि आकाशात पाहत गप्प पडली.

येमू बाजूला बसला. दुर्गानं विचारलं, ''बाप काय म्हणाला?''

येमूनं माळावर घडलेली सर्व हकीकत तिला सांगितली. ती ऐकून दुर्गा चमकली. चटकन उठून म्हणाली,

''मेली पीडाच झाली. आता माझं काय व्हणार?''

''काय बी व्हणार नाय.'' येमू म्हणाला, ''तू आता नीज.''

दुर्गानं अंग टाकलं. गगनात लुकलुकणाऱ्या चांदण्यांच्या थव्याकडे पाहत नकळत ती विचारात गुंतली. आज वाईट झालं असतं. बहिरी ससाण्यानं चिमणी पळवावी तशी मेल्यांनी मला पळविली. मला कळूही दिलं नाही. जर गंग्यानं माझा माग काढला नसता तर बाप नि येमू आले नसते. मग त्या रानग्यांनी माझं वाटोळं केलं असतं. पिळून काढली असती. भयंकर पाप घडलं असतं. आता या घडीला जर मी त्यांच्या कबज्यात असती तर आजची रात्र त्यांनी मला वैऱ्याची रात्र करून सोडली असती. सकाळी बापानं जीव दिला असता. पण मी जगले वाचले. येमू खरंच चांगला आहे. माणूस असावा तर असा असावा. तिनं किलकिले डोळे करून येमूकडे पाहिलं.

येमू गप्प होता. त्यानं तिरकमठा उभा धरला होता. गुडघे पोटाशी धरले होते आणि गुडघ्यावर हनुवटी टेकून तो दूर पाहत होता. दूरचा कानोसा घेत होता. एखादं जनावर

येईल या भीतीनं तो सावध होता.

आता वैशाख येईल. लग्न होईल, नि हा आता दूर बसलेला येमू माझ्यासाठी जीव देईल. आज त्यानं मला वाचवली. केवढी मदत केली. या रानात आणली. इथं कुणीच नाही. मी एकटी आहे. पण कसा दूर बसला आहे. मी त्याचीच होणार आहे. येमू वैशाखात माझा मालकच होणार आहे. त्यानं आतापासूनच मालकी सांगाय आरंभ केला तर – ? पण माझा येमू शहाणा आहे.

दुर्गा विचार करीत असतानाच झोपेनं तिच्या अंगावर पांघरूण घातलं.

## ८

दिवस उगवला. त्याची पिवळी किरणं डोंगरावर उतरली. दवानं भिजलेली फुलं स्नान घातलेल्या मुलाप्रमाणं दिसू लागली. सह्याद्री जागा झाला. पाखरं फांदीफांदीवर गाऊ लागली.

दुर्गानं डोळे उघडले. येमू जवळच बसला होता. तो आंघोळ करून आला होता. येता येता त्यानं दोन पाणकोंबड्या मारून आणल्या होत्या, आणि जाळ करून तो त्या भाजत बसला होता. कोंबड्या जाळावर तरतरत होत्या. त्या खरपूस भाजल्या जात असलेल्या कोंबड्यांकडे पाहून दुर्गा गालात हसली. उठून नदीवर आंघोळीला निघाली.

पाठीमागून येमून हाक दिली, "ए, लौकर ये."

तसं दुर्गानं वळून पाहिलं आणि येमू पुढं म्हणाला,

"हे बघ, उशीर करशील नि कोंबड्या माझ्या पोटात जातील."

"जाऊ दे." दुर्गा उत्तरली.

"मग तू काय खाणार?" येमूनं विचारलं.

"मी? मी तुलाच खाईन." दुर्गा म्हणाली. आणि ती दोघं मोठ्यानं हसली.

हसत हसत दुर्गा मंद गतीनं नदीकडे निघाली. येमूची नजर तिच्या पाठीवर स्थिर झाली. दुर्गाची ती पाठमोरी आकृती पाहून येमूचं मन धुंद झालं.

दुर्गा आणि येमू त्या घनदाट जंगलात आज चार दिवस राहत होती. एका झाडाच्या दोन फांद्यावर आडवी लाकडं टाकून येमूनं एक माळा तयार केला होता. रोज दुर्गाला त्या माळ्यावर बसवून तो यंकूकडे जात होता. यंकूला भेटून भाकरी घेऊन येत होता. रोज चटणी, खरडा, शेंगा नि नव्या बातम्या आणीत होता.

यंकू तर जवळजवळ नजरकैदी झाला होता. विलासरावाचा एक माणूस त्याच्या पाळतीवर होता. राव्या नि बंड्या हे दोघे तर इरेलाच पडले होते. 'तुम्हीच दुर्गाला

दडवलीत – ' असा इनामदारानं त्यांच्यावर आरोप केला होता, म्हणून ते खवळले होते. काय वाटेल ते करायचं, पण ती पोरगी पकडून इनामदारापुढे हजर करायची, असा त्यांनी निर्धार केला होता.

एकाही भिकाऱ्यानं पाल मोडून जायचं नाही – ज्याला जायचं असेल त्यानं प्रथम दुर्गाला हजर करावी, असं रंगराव पाटील म्हणत होता. त्या सक्त हुकमानं सारे भिकारी हैराण झाले होते. आडकित्त्यात सुपारी सापडावी तशी त्यांची अवस्था झाली होती. त्यांना दुर्गा कुठं तरी गेली एवढंच ठाऊक होतं. पण ती कुठं आहे हे कोणालाच कळत नव्हतं. दुर्गा लौकर सापडावी, आपली सुटका व्हावी म्हणून काही भिकारी प्रयत्न करीत होते.

पाऱ्या डवऱ्याला तर चेवच आला होता. तो यंकूवर सूड घेण्यासाठी राव्या नि बंडू यांना मदत करीत होता. तो दिवसभर झोपत होता, आणि रात्रभर यंकूच्या पालावर पहारा देत होता.

आणि येमू त्या सर्वांना चकवीत होता.

दुर्गा आंघोळ करून आली तेव्हा ती टवटवीत फुलासारखी दिसत होती. तिचा रसरशीत चेहरा उजळला होता. पोटऱ्यांवर रुळणारे आपले लांबसडक केस तिनं गोळा करून छातीशी धरले होते. तिच्या देहातील प्रत्येक अवयव हसत होता. अंगावरचं जुनं पातळ भिजून तिच्या अंगाला चिकटलं होतं. नि त्यामुळं ती अधिकच मोहक दिसत होती. तिला पाहून येमू भानच हरपला. त्यानं तिला न्याहाळून गपकन नजर बाजूला वळवली. तो मनात लाजला. पण लगेच त्याचं लाजरं मन बेडर झालं.

आणि असं का पाहतोस असा भाव दुर्गाच्या चेहऱ्यावर तरळला. ती त्याच्याजवळ बसली. येमूनं भाकरी नि भाजलेल्या कोंबड्या तिच्यापुढं ठेवल्या. मग ती दोघं जेवू लागली. पण येमू चोरट्या नजरेनं तिला पाहतच होता. तेव्हा ती म्हणाली,

"येमू, काय बघतोस?"

"तुला बघतो."

"का?"

"कुठं दडवावी म्हणून."

"मग कुठं दडवणार?" दुर्गाने पापण्यांची जलद उघडझाप करून विचारलं.

येमू गंभीर होऊन म्हणाला, "दुर्गा, वैशाख आला की आपलं लगीन व्हणार. आता आपून का कुणी परकं हाय? मी आपली ही दुर्गा काळजात घालून ठिवीन."

या उत्तरानं दुर्गा मोहरली. तिनं आपल तरल नजर भर्रकन येमूकडे भिरकावली.

येमू तिच्यापुढं शांत होता. त्याच्या मागे सह्याद्री उभा होता. आणि त्या पार्श्वभूमीवर येमूही तितकाच भव्य दिसत होता. दुर्गा उगीचच लाजली. तिची नजर गर्रकन परतली

आणि नम्र झाली. मग ती खाली पाहत भाकरीचा घास मोडून हळू आवाजात म्हणाली,
"एक गोष्ट बोलू?"
"हो. बोल की!"
"खरंच, तू माझ्यासंग लगीन करणार?"
दुर्गानं विचारलं आणि येमू स्वतःच्या गळ्यावर हात ठेवून म्हणाला, "खरंच. देवाच्यान."
दुर्गा खुदकन हसली नि घाबरल्यासारखं करीत म्हणाली, "ए बाबा, लगीन कर, पर माझ्या अंगाला हात लावायचा न्हाय. आधीच सांगू ठेवत्ये."
"मग लगीन कशाला करायचं?" येमू म्हणाला, "तुझ्या अंगाला हात लावायचा न्हाय तर काय मांजर उंदराकडं बघतं तसं नुसतं बघीत बसायचं?"
तशी दुर्गा वरमली. जीभ चावून म्हणाली, "तसं नव्हं रं, हात लावायचा न्हाय म्हंजी त्वा मला मारायचं न्हाय. कळलं का?"
"मी तुला जलमात कवा मारमार न्हाय." येमू म्हणाला, "लगीन झाल्यावर मी तुला तळहातावरच्या फोडावाणी जपीन."
"मला टाकून कुठं कुठं जाणार न्हायीस?" दुर्गानं संतुष्ट होऊन विचारलं.
येमू म्हणाला,
"मी तुला टाकून कुठं जाणार न्हाय."
"आणि माझ्या बापाला अंतर देणार न्हायीस?" पुनः दुर्गानं प्रश्न केला.
येमू उत्तरला, "त्येला बी जपीन."
"अगदी खरं?"
"व्हय, देवाच्यान."
"मग घे परमाण."
येमू पुढ्यातील भाकरी चटकन उचलून धरून म्हणाला, "खोटा पडलो तर ही भाकरी मला कुठं मिळणार न्हाय."
येमूच्या त्या शब्दांनी दुर्गा पुलकित झाली. लग्न, नवरा, संसार, मुलं ही मालिका तिच्या डोळ्यापुढं तरंगली. ती लाजली. मग ती मोठ्यानं हसून येमूकडे पाहत राहिली.
येमूनं दुर्गाला माळ्यावर बसवलं. कमरेचा विळा नि तिरकमठा तिच्याकडे देऊन तो गावाकडे निघाला. तेव्हा दुर्गा म्हणाली,
"येमू, लवकर ये. बापाला सांग, म्हणावं, मी बरी हाय. नि गंग्याला बी सांग. अन् उशीर करू नकं. लवकर ये."
येमू हसला नि "आत्ता येतो" म्हणून त्यानं धूम ठोकली. दोन मैलांचा वळसा घेऊन तो माळावर आला.

येमूला पाहून यंकूला आनंद झाला.

कालपासून राधानगरी गावात वातावरण तंग झालं होतं. गावापासून जवळच असलेल्या धामणदऱ्यात एका तरुण बाईच्या मृत देहाचा सांगाडा सापडला होता. कोल्ही नि तरसं यांनी ते प्रेत संपूर्ण खाऊन टाकलं होतं. फक्त डोक्याचे केस आणि हातातील कंकण एवढ्यावरून ती बाई होती, असं म्हणता येत होतं आणि तो खुनाचाच प्रकार असावा असं लोक बोलत होते. तपासासाठी उद्याच फौजदार गावात येणार होता. ती मृत बाई दुसरी कुणी नसून दुर्गाच असावी असं अनेकांचं मत झालं होतं. गावातील लोक नाना तर्क करीत होते. हळूच बोलत होते. त्यानं रंगराव पाटील आणि विलासराव इनामदार यांची नावं वारंवार निघत होती.

राव्या ढेकणा मात्र कोणाचंही ऐकत नव्हता. दुर्गा मेली नसून जिवंत आहे, ती कुठं तरी दडी मारून बसली असावी, असा त्याचा दावा होता. तो हातात भाला घेऊन शोधाला लागला होता आणि त्या बेडर ढेकण्याला धोकेबाज पाऱ्या मदत करीत होता. उद्या सकाळी गावात फौजदार, मोठमोठे सरकारी अंमलदार येणार, ही बातमी माळावर भिकाऱ्यांना समजली होती. त्यामुळे भिकारी आनंदात होते. उद्या फौजदार आला की आपण या गावातून पळ काढायचा, असा सर्वांनी विचार केला होता.

आज सकाळीच रंगराव विलासरावाकडे गेला होता आणि त्या दोघांनी उद्या काय होईल याचा विचार केला होता.

''हं! या रंगराव.''

''विलासराव, प्रसंग बाका आहे. उद्या सकाळीच सरकारी लवांड गावात येणार. तसं टपालही आलं आहे. खरं सांगायचं म्हणजे मी हबकलो आहे. जर तो यंक्या माकडंवाला सरकारी अंमलदारापुढं उभा राहिला आणि माझ्या मुलीचा खून झाला अशी त्याने तक्रार गुदरली, तर हे प्रकरण तुमच्या आणि माझ्या अंगलट आल्यावाचून राहणार नाही.''

''रंगराव, तुमचं म्हणणं संपूर्ण नसलं, तरी थोडं खरं आहे. कसं ते ऐका. ती पोरगी त्या रात्री तुमच्या वाड्यातून पळून धामणदऱ्यात गेली असावी आणि तिला जनावरांनी ठार मारली असावी. हे खरं असलं तरी हा प्रकार लोकांना मुळीच माहीत नाही. बाकी त्या रात्री आपण माळावर गर्दी करून भिकाऱ्यांच्या पालांची जी झडती घेतली, तोच आपला मूर्खपणा झाला आहे. आपण तसं करून गुन्हेगार म्हणून स्वत:च जाहीर झालो आहोत. आता प्रश्न आहे तो हा की, जर एखाद्या वैऱ्यानं अंमलदाराचे कान भरले तर थोडी बेअब्रू होईल.''

"नाही विलासराव, तसं नाही." रंगराव म्हणाला, "परिस्थिती किती गंभीर आहे हे आपण जाणलेलं नाही. अहो, ती पोरगी प्रथम माझ्या वाड्यात डांबली होती, ही बाब मामुली नाही. कारण त्या रात्री माझा सासरा हजर होता. त्यानं तो सर्व प्रकार पाहिला आहे. त्यानंच त्या पोरीला सोडवली. आणि आता या घडीला सासऱ्याशी आमचा बेबनाव झाला आहे. आम्ही बदफैली असून मुलीला छळतो, असं त्याचं मत होऊन तो आपली मुलगीही घेऊन गेला आहे. जाताना 'तुमचं तरी वाटोळं करीन, नाही तर मी तरी बरबाद होईन,' अशी झणझणीत धमकीही देऊन तो गेला आहे. जर आम्ही या प्रकरणी गुंतणार आहोत हे त्याला समजलं तरी तो स्वत:च येऊन आमच्या गळ्याचा फास अधिकच आवळण्याची शिकस्त करील."

"रंगराव, हे जर खरं असेल तर मात्र आपल्या गळ्याला निश्चित तात लागणार यात मुळीच संशय नाही." असं म्हणून विलासरावानं एक दीर्घ सुस्कारा टाकला. नंतर म्हणाला, "मग या संकटातून बाहेर पडण्याचा मार्ग सांगा."

"मला काहीच सुचत नाही." रंगरावानं नाक फुगवलं.

विलासराव म्हणाला, "मग असं करू या की, आज रात्रीच माळावरचे सर्व भिकारी, तो यंक्या, सक्या, बाळ्या डोंबारी, लंगडा पाऱ्या या साऱ्यांना हाकून देऊन माळ स्वच्छ करू या. जर तो यंक्याच इथं नसेल तर फिर्याद कोण करणार? तुम्ही गुल्ली जाणार म्हणून वाईट वाटून घेऊ नका. जाऊ द्या तिला. ही परिस्थिती निवळली की गुल्लीला परत आणू."

"हे मला एकदम मान्य." रंगराव हसला, आणि लगेच त्यानं बंड्या तडाखेला बोलावून हुकूम दिला, "आज दिवस बुडाला की माळावरचे सर्व भिकारी हाकून दे, आणि माळ मोकळा कर. आमचाही जीव मोकळा होऊ दे."

आणि त्याच क्षणी बंड्या आपल्या कामगिरीवर रवाना झाला. हातात कुऱ्हाड घेऊन तो दिवस मावळण्याची वाट पाहत एका झाडाखाली बसला.

सूर्य मावळतीच्या कड्यावर जाऊन थांबला. थंड झालेली पिवळी किरणं सह्याद्रीला कुरवाळू लागली. डोंगरी वारा गिरिकंदरात थैमान घालू लागला. दोन दिवसात गावात घडलेल्या सर्व घडामोडी यंकूनं येमूला सांगितल्या होत्या. आणि त्या ऐकून येमू रानाकडे निघाला होता. गंग्या माकड गुडघ्यात मान घालून बसला होता. दुर्गा गेल्यापासून तो अन्न खात नव्हता. यंकूचं ऐकत नव्हता आणि खेळतही नव्हता. उलट घडोघडी यंकूवर बिथरत होता.

भाकरी, शेंगा, चटणी यांचं गाठुडं बांधीत बांधीत यंकू म्हणत होता,

''येमू, आज राती मी बिऱ्हाड घेऊन निघणार. तू दुर्गाला घेऊन जमंल त्या उताराबर नदी ओलांड नि पारगावात येऊन मला भेट. दुर्गाला सांग, म्हणावं घाबरू नकं.''

येमूनं ते सर्व लक्षपूर्वक ऐकून घेतलं आणि तो भर्रकन जंगलात शिरून दौड मारू लागला.

आपल्या पालापुढं पान्या उभा होता. तो येमू नि यंकू यांची हालचाल पाहत होता. येमूची सर्व हालचाल पान्यानं हेरली नि चटकन उठून काखेत कुबड्या घेऊन राब्या ढेकण्याकडे गेला. विजयी मुद्रा करून म्हणाला,

''हं! चला पैलवान. दुर्गा जिवंत हाय. जवळच हाय. आताच सख्याचा पोरगा येमू भाकरी घेऊन डोंगरात गेला.''

ती खबर ऐकून राबबा ढेकणा धडपडून उठला. भाला घेऊन धावत माळावर आला. समोरच्या घनदाट झाडीत नजर रोखून पाहत म्हणाला,

''पान्या, कंच्या बाजूला येम्या गेला?''

पान्यानं काखेतील कुबडी येम्या गेलेल्या दिशेला रोखली. म्हणाला,

''ह्याच बाजूनं गेला. पळ.''

आणि मग ते दोघे त्या दिशेने पळत धावत निघाले. राब्या पुढं पळत होता आणि पान्या त्याच्यामागून एका पायावर उड्या मारीत होता.

हळूहळू झांजड पडत होती.

येमू आलेला पाहताच दुर्गाला आनंद झाला. तिनं माळ्यावरून उडी मारली. येमूनं घोंगडं अंथरलं आणि येमू माळावरच्या बातम्या सांगू लागला. दुर्गा आतुर होऊन ऐकत होती. गंग्यानं अन्न टाकल्याचं ऐकून दुर्गा कावरीबावरी झाली. क्षणात कोमेजली. तिचे डोळे भरून आले. अश्रूंचे दोन थेंब खळकन निखळून पडले. बाप आजच माळावरून पळ काढणार असून, आपण सकाळीच त्याला पारगावात भेटणार हे ऐकून तिला अतिशय आनंद झाला. क्षणात ती टवटवीत झाली. तिच्या गालावर स्मित उमटलं. बापाच्या भेटीची ओढ तिच्या काळजात जागी झाली. ती हळूच उठली आणि जवळच्याच एका दगडावर बसली.

दुर्गाची नजर हिरव्यागार गर्द झाडीवरून समोरच्या माळावर भिरभिरत होती. आकाशात लाल रंगाचा एक ढग रेंगाळत होता. त्या ढगाखाल पाखरं सुरकांडीचा खेळ खेळत होती. दुर्गा एकाग्र चित्तानं तो पाखरांचा खेळ पाहत होती. बाजूला सागवान, धावडी, माकडी, जांभळ, पांगिरा आणि देवकळकीची बेटं डोलत होती.

दुर्गा भान हरपून तो देखावा पाहत होती. जवळच येमू बसला होता. पण त्याच्याशी

तिला विसर पडला होता. माणसाची करणी खोटी असते. आपण पाण्याला गेलो. रंगरावानं आपणाला पळवलं, डांबलं, आपली अब्रू जबरीनं लुटण्याचा प्रयत्न केला. मी गरीबाची लेक. मला ओरबाडावी म्हणूनच सर्व काही घडलं. या विचारानं तिचं काळीज कठोर झालं होतं.

इतक्यात दोन ससेमोरांग्या आकाशातून खाली उतरल्या. त्यांनी गांजणीच्या गवतात खोप करून बसलेल्या एका सशावरच झडप घातली. तसा तो ससा जीव घेऊन वाऱ्यासारखा पळू लागला.

ससा पळत होता. अगदी रबरी चेंडूप्रमाणे तो उड्या घेत होता आणि भात्यातील बाण सरासर सोडावेत तशा त्या सशावर सूर मारीत होत्या.

अखेर एका ससेमोरांगीनं आपल्या बळकट नखांत तो ससा धरून गगनात झेप घेतली. त्यांची लढाई संपली. पण ससा धडपडत होता. तो मध्येच त्या नखांतून सुटला नि पुन: जमिनीकडे येऊ लागला. तोच दुसऱ्या ससेमोरांगीनं सूर मारून त्याला मध्येच धरला. त्याच वेळी येमूनं भर्रकन् एक बाण सोडला नि एकाच बाणात तो ससा आणि ससेमोरांगी खाली पाडली.

तो प्रकार पाहून दुर्गा स्तंभित झाली. करुण हसली आणि विचारात पडली.

त्या दिवशी आपण नदीवर गेलो. दोन माणसं अशी आली. त्यांनीही आपणाला त्या सशाप्रमाणे उचललं. पण येमू आला. बाप आला. माझा गंग्या धावला आणि त्यांनी माझा जीव वाचवला. माझीही त्या सशाप्रमाणेच अवस्था झाली. दोन मोरांग्यांनी मला त्या वेळी उचलली. पण येमूनंच सशाप्रमाणं मला मध्येच खाली आणली. पण आता येमू काही मला भाजून खाणार नाही. तो आपला मालक आहे... असं म्हणून ती गालात हसली.

येमूनं जाळ केला होता. तो त्या सशाला त्या जाळात खरपूस भाजीत होता. आपण माळ सोडला तेव्हा राव्या ढेकणा आपल्या मागावर धावत आहे याची त्याला कल्पना नव्हती. तो ससा भाजण्यात दंग झाला होता. दुर्गा अधिक संतुष्ट व्हावी असं त्याला वाटत होतं.

दुर्गा येमूची ती धडपड पाहत होती.

अंधार वाढत होता. त्या कभिन्न काळोखाला तुडवीत ढेकणा धावत होता. पुढे धावताना मध्येच थांबून येणाऱ्या पाऱ्याचा कानोसा घेत होता. एका पायावर दौडणारा पाऱ्या घामानं उफाळला होता.

पळून पळून राव्या दमला. एका उंच झाडावर चढून त्यानं दूरदूर नजर टाकली नि त्याला कपारीत जाळ दिसला. त्याला आनंद झाला. तो भर्रकन झाडावरून खाली आला. तोच पाऱ्या त्या झाडाखाली येऊन पोहोचला. पाऱ्याला पाहून राव्या म्हणाला,

"पाऱ्या, लेका झाडीत जाळ दिसतोय."

"मग शिकार दिसली. आनंद झाला." पाऱ्या चेकाळून म्हणाला.

"पैलवान, आता जावा म्होरं. एका पायावर दौड मला जमंना. मी दमलो. मी हतं वाईच इसावा घेऊन परत जातो. तुमीच बघा आता त्या पोरीकडं. येम्याला लाथा घाला आणि त्या पोरीचा पीळ काढा." असं म्हणून पाऱ्यानं काखेतील कुबड्या टाकून घाम पुसला आणि जाळाच्या रोखानं राव्या ढेकणा धावत निघाला.

येमू ससा भाजून जाळ विझवला. दुर्गाला घोंगडं अंथरून दिलं. भाकरी, चटणी, सशाचं मांस पुढं घेऊन ती दोघं जेवत बसली.

दुर्गा जेवत होती. सभोवती सर्व काही सामसूम झालं होतं. वाऱ्याची मंद झुळूक येत होती. झाडं करकरत होती. काळोख मी म्हणत होता. वातावरण भयाण भासत होतं. सर्व काही अंधारानं गिळंकृत केलं होतं.

पूर्वेला चंद्रोदय झाला. वाळूत पाणी दडावं तद्वत अंधार दडला, नि जागोजाग झाडाच्या बुंध्याला दडी मारून बसला. वातावरणात नवा तजेला आला. वाऱ्याचा वेग वाढला. तो गिरक्या घेऊ लागला. झाडंझुडपं अंगात आल्याप्रमाणं डोलू लागली. दुर्गाला आनंद झाला. तिनं येमूकडे पाहिलं. तो निवांत बसला होता. सकाळी वारणा नदी कुठं ओलांडावी याचा तो विचार करीत होता.

आपण लग्न करणार, तुला मारणार नाही, तुझ्या बापाला अंतर देणार नाही, अशी सकाळीच येमूनं आणभाक घेतली होती. त्यामुळं दुर्गाला धीर आला होता. येमू आता परका नाही, तो लौकरच आपला धनी होणार आहे, ही भावना तिच्या मनात सारखी जागत होती. शिवाय या जंगलात आल्यापासून येमूची ती धावपळ, तो घेत असलेली काळजी, तो करीत असलेली राखण यानं ती भारावली होती. एवढंच नव्हे तर, सकाळपासून एका नव्या आनंदात तिचं मन निर्भान झालं होतं. येमू आपला आहे. येत्या वैशाखात तो आपल्या मांडीला मांडी लावून बहुल्यावर बसणार आहे, या भावनेनं तिच्या काळजात घर केलं होतं.

तिनं हळूच घोंगड्यावर अंग टाकलं. आपल्या आंबाड्याचं उसं करून ती आकाशात पाहत म्हणाली,

"येमू, कसला इचार करतोस?"

"सकाळी वारणाआई पल्याड जाण्याचा." येमू शांतपणे म्हणाला आणि दुर्गानं विचारलं,

"कसं जायचं — नावंत बसून?"

"बाप म्हणत व्हता, नावेची वाट बघू नका. काय बी करा नि नदी पार करून पारगावात या. मला वाट बघाय लावू नका."

ती चमकली नि म्हणाली, "येमू, मग कसं करायचं?"

"आपून नदीत पडायचं नि माशावाणी पल्याड जायचं." येमू उत्तरला.

"पर मला जास्त पवता येत न्हाय." तिनं आपली अडचण सांगितली.

"पर मी हाय न्हवं!" येमू तिच्या केसांवरून हात फिरवीत म्हणाला,

"मी तुला फुलावाणी पल्याड न्हेतो."

दुर्गा आनंदित होऊन हसली, मग येमूच्या हिंमतीचं कौतुक करीत चांदण्या मोजल्यासारखं करीत म्हणाली, "येमू, मला झोप येत न्हाय."

"अग, मी हाय न्हवं. डोळं झाकून गप्प पड. नीज."

"न्हाय बाबा. मला भ्या वाटतंय."

"अग मी हाय की!"

"न्हाय बरं – मग तू बी नीज."

"कुठं – ?"

"हातं. माझ्या शेजारी नीज." दुर्गानं आपल्या शेजारची जागा दाखवली आणि येमूचं काळीज धडधडू लागलं. तो गोंधळला. दुर्गाला आश्चर्य वाटलं. ती चटकन उठली. त्याचा दंड धरून तिनं त्याला ओढून आपल्या शेजारी निजवलं नि शांतपणे ती म्हणाली,

"उद्या आपून जाणार. नीज आता."

येमूचं मन पुन: बावचळलं. तो तिच्या शेजारी निश्चल पडला. पण दुर्गा पुढं सरकली. तिचा स्पर्श होताच यमूचं हृदय एकदम पेटलं. एक विद्युत लहर त्याच्या काळजातून पार झाली. डोकं बधिर झालं. हृदयाची धडपड अधिक वाढली; पण तो स्वत:ला सावरण्याचा प्रयत्न करू लागला. एक वाऱ्याची झुळूक येऊन त्या दोघांवरून झेप घेऊन गेली, तशी दुर्गा हालली. तिचं कांकण खळकन वाजलं. येमूच्या हृदयात भावनांचं काहूर उठलं. काळीज विरघळू लागलं आणि गवताकडे वणवा सरकावा तशी दुर्गा त्याकडे सरकली नि येमूचं मन बेबंद झालं. त्यानं आपल्या बळकट हातांनी दुर्गाला जवळ ओढली. काळजाशी घट्ट धरली आणि मग हृदयाशी धरून कवटाळली.

"माझा येमू –" दुर्गा पुटपुटली. तिनं आपल्या हातांनी त्याचं तोंड आपल्याकडे वळवलं. हळूच आपले सुंदर ओठ पुढं नेऊन ते त्याच्या ओठांना भिडविले. नि त्या ओठांशी एकरूप होऊन ती शांत पडली. जग विसरली. स्वत:लाही विसरली.

काही क्षण भुर्रकन गेले. येमूचं मन अधिकच उतावळं होत होतं. हृदयाशी बिलगलेल्या दुर्गाला तशीच कवटाळून तो गोंजारू लागला. त्याच्या मनानं पुढची पायरी गाठली. त्याची दुसरी भूक जागी झाली. दुर्गा शांत होती. कसलाही प्रतिकार करीत नव्हती. ती धुंद झाली

होती.

येमू चटकन उठला. त्यानं मनाला आवरलं. स्वत:ला सावरलं. 'हे गैर आहे, लग्न झाल्याशिवाय, देव पुजल्याशिवाय आपण असं वर्तन करणं पाप आहे. देव कोपतील. लग्न कडेला जाणार नाही. दुर्गा उष्टी होईल. मग ती कशी पुजणार? तशी दुर्गा देवांना रुचणार नाही. जर या वेळी इथं कुणी नसलं तरी देव हा जागा असणार. तो सर्व काही पहात असंल. आता वैशाख येईल. मग आपलं लग्न होईल. मग ही दुर्गा आपल्यापासून क्षणभरही दूर जाणार नाही. मग आताच ही घाई का?' अशी त्यानं स्वत:ची समजूत घातली आणि तो बाजूला सरकून बसला.

एका विलक्षण धुंदीनं बेभान झालेली दुर्गा मंजुळ स्वरात म्हणाली,

"येमू, कां उठलास?"

"मी जागत बसतो. एखादं जनावर यील." येमू म्हणाला, "तू नीज."

दुर्गा काहीच बोलली नाही. ती एकटक येमूकडे पहात राहिली. तिच्या मनात उठलेलं ते भावनांचं वादळ हळूहळू शांत झालं. वरून तिच्यावर रुपेरी रंग वर्षत होता. त्या शुभ्र प्रकाशात ती केळीच्या कोंबासारखी दिसत होती. तिला पाहून येमूच्या मनाची अस्वस्थता वाढत होती. त्याच्या काळजात एक दारुण संघर्ष उद्‌भवला होता.

रात्र चोरपावलांनी सरकत होती.

## ९

रात्र नकळत झिरपत होती. चांदणं फुललं होतं. डोंगराच्या मस्तकावर दंवबिंदूचं अखंड सिंचन होत होतं. दवानं भिजून चिंब झालेले दगड, झाडांची पानं दवानं न्हाली होती. त्यात चांदण्याचा चंदेरी प्रकाश एकरूप झाला होता. आणि त्यामुळं जणू सारी सृष्टीच रुपेरी रंगात बुचकळून नियतीनं पुन: बसवली होती. सर्व काही लकाकत होतं. सर्व शांत, नि:शब्द होतं. ती निर्जन वनराजी हूं की चूं करीत नव्हती.

पाऱ्या डबरी त्या ओघळीत विसावा घेऊन उठला. राव्या लवकर येणार नाही, तो येम्याचा खून करून यंक्याच्या पोरीच्या अंगाच्या घड्या करून तिला चेलमडीत बसणार आणि डोकं ठिकाणावर आलं म्हणजे त्याला घरची आठवण होणार... या भयाण जंगलात आपण कां म्हणून बसायचं? एखादं जनावर येऊन आपल्याही मानेवर बसेल... असा विचार मनात येऊन पाऱ्या उठला. काखेत कुबड्या घेऊन माळाकडे चालू लागला.

राव्या ढेकण्या उलट बाजूनं जाळाच्या दिशेनं पळत होता. तो निर्भान झाला होता. झाडांच्या ओलसावलीत ठेचकाळत होता. धडपडत होता. पण त्याचा वेग वाढत होता.

राव्याच्या मनात विचारही पळत होते... तो जाळ येम्यानंच केला असावा. तिथंच ती पोरगी असणार... हेही एकपरी ठीक झालं. इनामदार मूर्ख आहे. म्हणे, मीच त्या पोरीला पळवली. ठीक. खरं आहे. आता मीच तिला पळवतो. आज ती प्रथम मलाच सापडणार. तो येम्या काय करणार?... मी दिसताच तो जीव घेऊन पळणार, नाही तर ठार मरणार. मी येम्याला ठार मारीन आणि मग ती पोरगी घेऊन मी डोंगरात राहणार... तब्बल आठ दिवस डोंगरात तळ देणार... धडूत पिळून काढावं तशी तिला पिळून काढणार. घोळून बेजार करणार. आणि मग... मग मी तिला इनामदारापुढं उभी करणार. मग घेऊ दे त्याला ती उष्टी पतरावळी नि बसू दे चाटत. म्हणे मी बेईमान!...

विचारांच्या वावटळीतून राव्या भुतासारखा पळत होता. आणि खरंच त्या भयाण जंगलात तो सुपाएवढ्या छातीचा राव्या अगदी भुतासारखाच पिसाट दिसत होता. आज दुर्गा सापडणार या कल्पनेनं तो वेडाच झाला होता.

एका कीर्र जागी झाडीत येऊन राव्या थांबला. आपण बरोबर आलो आहोत का, याचा अंदाज घेण्यासाठी त्यानं नजर चौफेर फिरविली. मग तो खाली बसला. खाली बसून पाहिल्यावर रात्रीचं दूरचं दिसतं हे त्याला ठाऊक होतं त्याची तीक्ष्ण नजर दूरची दौड मारून परत फिरली नि एकदम तो आश्चर्यचकित झाला. अगदी जवळच त्या शुभ्र चांदण्यात येमू दगडासारखा बसला होता. त्यापुढं दुर्गा निजली होती. शेजारीच निखारे फुलत होते. राव्यानं चटकन उठून पुन: बैठक मारली. कंबर बांधून, भाला सरळ धरून तो तयार झाला. हळूच जाऊन येम्यावर हल्ला करायचा, त्याचा मुडदा पाडायचा नि मग... एक भयंकर विचार त्याच्या मस्तकात उठला. आणि मग राव्या झाडाच्या ओल सावलीनं वाघाप्रमाणं दडत, लपत येमूवर चाल करू लागला. पण तो दोन पावलं पुढं गेला आणि घात झाला. त्याच्या पायाखाली सुकलेलं सागवानाचं पान चर्रकन कुस्करलं गेलं. त्या आवाजानं तो स्वत:च चरकला नि धडपडून बाजूला झाला. पण पुन्हा घात होऊन तो जीर्ण पानांच्या ढिगात शिरला. मोठी खसपस झाली.

त्या आवाजानं येमू चरकला. सावध झाला. तिरकमठा सरळ धरून त्यानं त्या दिशेला निरखून पाहिलं. एक प्रचंड रेड्यासारखी आकृती आपल्याकडे दबा धरून येत आहे हे लक्षात येताच त्यानं धनुष्याला बाण जोडला. ती भयंकर आकृती म्हणजे वाघ नाही तर एखादं तरस असणार असा कयास करून त्यानं दुर्गाला जागी केली. म्हणाला,

"दुर्गा उठ. जागी हो. ते बघ काय!"

दुर्गा चटकन उठली. समोरची ती आकृती पाहून भयभीत झाली. येमूच्या मागे सरकून बसली आणि डोळे फाडून समोर पाहू लागली.

ती आकृती हळूहळू पुढं येत होती. ते जनावर असंच हळूहळू पुढं येऊन आपल्यावर एकदम झडप घालणार, या विचारानं येमूचं काळीज हाललं. आकृती तशीच पुढं येत

होती. तिच्यावर चार डोळे खिळून राहिले होते. येमू गोंधळला. पण त्यानं स्वत:ला सावरलं. ते जनावर जवळ येऊन आपल्यावर तुटून पडण्यापूर्वीच त्याच्यावर मारा करावा असा बेत करून येमूनं धनुष्याचा नेम धरला. नि:श्वास रोखून धनुष्याची दोरी कानापर्यंत ओढली आणि भर्रकन बाण सोडला. नेमाचा ताबेदार बाण विजेच्या वेगानं भरारला, नि खसकन राव्याच्या काळजात शिरला. क्षणात त्यानं राव्याचं काळीज फोडलं. ''मेलोऽऽऽ'' राव्यानं कर्कश किंकाळी फोडली. रात्र गदगदली. धडपडली. थरारली.

येमूनं दुसरा बाण सोडला.

राव्या उरात बाण घेऊन एकाच जागी धडपडत होता. उठून आदळत होता. कड्यावरून रेडा खाली पडावा तशी त्याची अवस्था झाली होती. त्याचं नरडं घरघरत होतं. त्याचा तो भेसूर आवाज त्या शांत रात्री सर्वत्र घरघरत होता.

येमू नि दुर्गा ती भयंकर धडपड पहात होती. दुर्गाला तर कापरंच भरलं होतं. ती येमूचा दंड धरून समोर पहात होती.

थोड्याच वेळात राव्याची शक्ती संपली. मग त्याची धडपड थंडावली. त्याला धाप लागली. तो शांत पडला. येमू हळूच त्याच्याजवळ गेला. त्यानं निरखून पाहिलं, आणि राव्याच्या उरातील बाण खसकन उपसला. तसा राव्या पुन: ओरडला. धडपडून उठला, आणि जखमी डुकराप्रमाणं किंचाळत पळत सुटला... ''मेलो, मेलो, वाचवा...'' त्याच्या आक्रोशानं डोंगर दणाणला.

राव्या ओरडत पळत होता. त्याचा आवाज दूर दूर जात होता. येमू आणि दुर्गा त्या दिशेनं पहात होती, नि:श्वास रोखून आवाज ऐकत होती. राव्या किंचाळत दूर गेला आणि एकदम नदीत दगड टाकावा तसा पाण्याचा आवाज झाला. त्याच क्षणी राव्याची ओरड बंद झाली.

''येमू, कोन व्हता त्यो?'' दुर्गानं विचारलं.

''त्यो इनामदाराचा माणूस व्हता.'' येमूनं उत्तर दिलं.

दुर्गा घाबरली, नि हुंकारली ''मग आता?''

''आता आपून पळू या.'' येमू गडबडीनं म्हणाला, ''त्यो माणूस जगणार न्हाय. त्यो ओरडत गेला. त्येची माणसं जवळच असणार. ती आता येतील नि मग आपली शिकार व्हयील. मला ठार मारून तुला पळवतील. दुर्गा आज वंगाळ झालं. माझ्या हातानं एक माणूस मेला. अग, खून झाला. पळू या.''

''कुठं पळू या?'' दुर्गानं विचारलं.

''नदी पल्याडला-पारगावला. तिथंच तुझा बाप येणार हाय.'' येमू म्हणाला.

''मग चल तर!'' दुर्गा तयार झाली.

येमूनं तिला जवळ घेतली. पाठीवरून हात फिरवीत धीर दिला. म्हणाला,

"घाबरू नकं. आपून गरीब हाय. वारणाआई आम्हास्नी मारणार न्हाय."

दुर्गा काहीच बोलली नाही. ती तशीच येमूला बिलगून नदीकडे चालू लागली.

नदीकाठी येताच येमूनं आकाशात पाहिलं. चांदण्या दमल्यासारख्या दिसत होत्या. चंद्र मावळतीची उतरण उतरत होता. त्याचा कलता प्रकाश वारणा नदीच्या अफाट पाण्यात झगमगत होता. त्याचं तेजोमय प्रतिबिंब नदीत गटांगळ्या खात होतं.

दुर्गाची मलूल नजर त्या पाण्यावरून तरंगून आली. ती कास घालून सज्ज झाली. तिनं पाठीवरचा पदर कमरेशी करकचून आवळला. अंबाडा सोडून पुन: बांधला. दुर्गाचं एक लुगडं, घोंगडं, शेंगा, भाकरी हे सर्व सामान एकत्र बांधलेलं गाठोडं डोकीवर आवळून येमूनं पाय उचलला.

मग ती दोघं नदीत उतरली. ओंजळीत पाणी घेऊन ते कपाळाशी धरून ती दोघं मनात म्हणाली, 'आई वारणाबाई, आम्हा गरीबांवर दया कर! आम्हाला पलीकडे जाऊ दे.' एवढं बोलून त्या दोघांनी पाण्यात झेपा घेतल्या. हळूहळू पाणी कापीत ती पुढं पुढं सरकू लागली. दुर्गा दमदार गतीनं पोहू लागली.

येमू उभा पोहत होता. तो डोकीवरचं गाठुडं सांभाळून दुर्गाचा पाठपुरावा करीत होता. तिच्या गतीशी आपली गती जुळवून निघाला होता. नदीचा मध्यभाग जवळ येत होता. मुख्य धारेच्या खळखळाटाचा आवाज वाढत होता. येमू म्हणाला,

"दुर्गा, घाई करू नकं. हळूहळू चल."

तरी दुर्गानं एकदम गती वाढविली, आणि ती तीरासारखी पुढं निघाली.

येमू ओरडला,

"धार जवळ आली; दमानं चल. दमलीस की येऊन मला धर."

दुर्गानं आपली गती आवरली आणि येमूबरोबर ती संथपणे पोहू लागली. तरीही धार जवळ येताच ती दमली. तिचे हातपाय भेंडाळले. ती धाप टाकून म्हणाली,

"येमू, मी दमल्ये!" ती भर्रकन येमूकडे सरकली नि त्याच्या खांद्याला धरून निघाली.

वारणा वरून शांत दिसत होती; परंतु तिच्या पोटातील धार हत्तीच्या बळानं धावत होती. जणू सारं जग लोळवण्याचं सामर्थ्य त्या धारेत एकवटलं होतं.

धार जवळ येताच येमू अंदाज घेऊन म्हणाला, "दुर्गा, मला सोडू नकं. धार आली."

आणि त्याच क्षणी ती दोघे त्या धारेत शिरली. त्यांना हिसका बसला. झपाट्यात दुर्गा येमूपासून दूर झुगारली गेली. "येमू, मी गेल्ये—" दुर्गा ओरडली.

भर्रकन येमू तिच्याकडे सरकला. तिला जवळ ओढून तिचे हात आपल्या पाठीवरच्या तिरकमठ्यात अडकवून म्हणाला,

"आता मला सोडू नकं."

ती दोघं त्या अवखळ पाण्याशी झुंजत होती. मरणाला हुलकावण्या देत होती.

पाण्यातून वहात येणाऱ्या झाडाझुडपांना चुकवीत होती. पाण्याबरोबर एक मैल खाली जाऊन त्यांनी मृत्यु टाळला. धारेची साखळी ओलांडली आणि पुन ती दोघं पोहत पुढं निघाली.

समोर किनारा दिसत होता. दुर्गा हर्षभरित झाली होती. तिची जगण्याची आशा दुणावली होती. ती वारणा नदीचे आभार मानीत होती.

आला आला म्हणता किनारा आला. दुर्गा वाळवंटात येताच मट्कन बसली. तिच्या मांड्या भेंडाळून आल्या होत्या. तिला धाप लागली होती.

येमूही तिच्याजवळ बसला.

नदीकाठचा चावरा वारा भरभरत होता. भिजलेल्या दुर्गाला थंडी वाजू लागली. तिचे दातावर दात वाजू लागले. येमूनं कापडाचं गाठोडं सोडून दुर्गाला लुगडं दिलं. म्हणाला,

"दुर्गा, उठ. लुगडं बदल."

दुर्गा तशीच उठली. अंगातील थंडीचा कंप आवरीत म्हणाली, "ए, असं तुझ्या म्होरं लुगडं कसं नेसू? मला लाज वाटतीय."

"मग मी तिकडे लांब जाऊ?" येमूनं विचारलं नि दुर्गा घाबरल्यासारखं करीत म्हणाली,

"नकं नकं. मला भीती वाटतीय."

"मग नेस तर लुगडं."

"तू आपलं डोळं झाक."

"हे बघ झाकलं."

"तिकडं तोंड कर."

"बरं बाबा." येमूनं दुर्गाकडे पाठ केली.

लुगडं बदलून दुर्गा म्हणाली,

"हं! बघ आता."

येमू गर्रकन् फिरली. दुर्गा हसली. चंद्राचा तिरपा प्रकाश तिच्यावर वर्षत होता. अंगावरचं पातळ तिच्या देहाशी एकरूप झालं होतं. तिची रुंद छाती, टचटचीत उभार उरोज चंद्रप्रकाशात स्पष्ट दिसत होते. तिनं आंबाडा सोडून आपले विपुल केस पाठीवर सोडले होते. तिचं अप्रतिम रूप पाहून येमूचं मन पुन: बावचळलं. तो वेड्यासारखा तिला न्याहाळू लागला.

"काय बघतोस?" दुर्गा खेकसली. एक गोड स्मित तिच्या गालावर उमटून त्या शुभ्र चंद्रप्रकाशात विलीन झालं. मग तिनं अंगाची चोळी काढून आपली छाती पदरात दडवली. दोन्ही हातांची घडी छातीवर धरून, डोळ्यात प्राण आणून येमूकडे ती पाहू लागली.

येमू मनात लाजला. तो आपली आणि दुर्गाची कापडं घेऊन नदीत उतरला. मग त्यानं ती कापडं धुऊन एका झुडपावर वाळत घातली.

चंद्र मावळला. अंधारात जग बुडालं. अशा अपरात्री पारगावात जाणं बरं नाही, असा विचार करून त्या दोघांनी एका झाडाखाली मुक्काम केला. येमूनं जळण गोळा करून जाळ पेटवला. थोडी शेकोटी घेऊन त्यांना ऊब आली. मग दुर्गाला झोप येऊ लागली. तिचे डोळे झोपेनं भरले. येमूनं घोंगडं अंथरलं. दुर्गा जाळाशेजारी त्या घोंगड्यावर कलंडली. परंतु तिला अजून थंडी वाजत होती. ती जाळाकडे पहात हळूच म्हणाली,

''येमू, तू बी नीज.''

''नकं, एखादं जनावर येईल.''

''आता काई काई येणार न्हाय.'' दुर्गा शांतपणं म्हणाली, ''तू गुमान नीज.''

मग येमूनं अंग टाकलं. तशी ती त्याच्या कुशीत शिरली. स्वत:च त्याला हृदयाशी धरून शांत झाली. तिच्या नाकातून येणारे नि:श्वास येमूच्या गालावर फुंकर घालू लागले. त्या उन्मादक फुंकरीनं, त्या स्पर्शानं येमूचं मन पुन: अस्थिर झालं. त्यानं हळूच तिला पुढं ओढून पोटाशी धरली. दोन देह एक झाले. ऊब वाढली. येमूनं तिचे विसकटलेले केस गोळा करून तिला अधिकच जवळ घेतली. आणि हळूच त्यानं तिच्या फुलासारख्या गालाचा मुका घेतला. तशी ती खुदकन हसून म्हणाली,

''ये, नीज की!''

''मला नीज येत न्हाय दुर्गा.''

''का?'' ती उद्गारली.

''तू जवळ असलीस की नीज पळून जाती.''

''अग बाई!'' ती चमकून म्हणाली, ''मग हे बरं न्हाय. तू माझ्यासंगं लगीनच करू नकं. न्हाय तर तुला कवाच नीज येणार न्हाय.'' असं म्हणून तिनं तिचं तोंड आपल्याकडे ओढून त्याच्या कपाळाचा पटकन एक मुका घेतला नि मंद आवाजात म्हणाली,

''मला बी तू जवळ असलास की नीजच लागत न्हाय. तवा आपलं लगीन झालं की आपून असंच जागत ऱ्हाऊ, आँ?''

पहाट होत होती. नदीकाठचा वारा उठला होता. काठावरची झाडं डोलत होती. हिवळ वास सर्वत्र दरवळत होता. किंजाळात मोर केका देत होते. पाखरं गात होती. ती आपले पंख झाडून सज्ज झाली होती.

पूर्वेला प्रकाश फुलत होता. पोलादी रंगानं काळ्या रंगावर आक्रमण आरंभलं होतं. दक्षिणेकडची ती निळी किनार झगझगत होती.

भोई आले. त्यांनी गळ ओढले. दावणी ओढल्या. कष्टाचं फळ कबज्यात घेतलं.

दुर्गा जागी झाली. तिनं आंघोळ केली. रानफुलं जमवून ती वारणाबाईला अर्पण करून म्हणाली, ''आई, आम्हास्नी सुख दे.''

मग येमू आणि दुर्गा दोघं पारगावाकडे निघाली. दुर्गा उल्हासानं भारली होती. ती येमूचा हात धरून हरिणीप्रमाणं उड्या घेत होती. यंकू, गंग्या, रंगी, तिचं बाळ, दगडू बोकड या सर्वांना पाहण्यासाठी ती आतुर झाली होती.

पारगावच्या वाटेवर येताच येमू म्हणाला,

''दुर्गा, बाप अजून पारगावात आला नसंल. तवा आपण हातंच बसून त्येची वाट बघू या.''

दुर्गानं मान्य केलं. आणि ती दोघे वाटेकडेला एका झाडाखाली बसली. दुर्गाला भूक लागली हे लक्षात येताच येमू तिरकमठा घेऊन जवळच्या आंबराईत गेला नि दोन व्हले मारून आला. ते भाजून खाऊन त्यांनी न्याहारी केली.

दिवस कासराभर वर आला, आणि त्याच वाटेनं यंकू येताना दिसला. त्याला पाहून दुर्गा आनंदानं वेडी झाली. लहान मुलाप्रमाणं धावत पुढं जाऊन बापाच्या गळ्यात पडली. यंकूनं आनंदित होऊन तिच्या कपाळाचा मुका घेतला, नि आनंदाश्रू पुसले.

गंग्या चेकाळला. त्यानं दुर्गाला मिठी मारली. चटकन उडी मारून तो तिच्या खांद्यावर बसला.

दुर्गाला आनंदाचं भरतं आलं. तिनं गंग्याला कुरवाळला. रंगीला जवळ घेतली. तिच्या बाळाचा मुका घेतला. नंतर दगडू बोकडाचं डोकं आपल्या कपाळाला घासलं. गाढवं, कोंबडी, सर्व सर्व पाहून घेतलं. आणि आपला तो संसार पाहून ती आनंदानं मोहरली. यंकूकडे डोळे भरून पहात म्हणाली,

''बापा, बरं हाय का?''

''मी बरा हाय. तू कशी हायीस?'' यंकूनं विचारलं, आणि दुर्गाला हुंदका आला. तिचे डोळे भरून आसू ढाळू लागले. ती पदरानं डोळे पुशीत खाली पाहू लागली. यंकू म्हणाला, ''आला वकूत गेला, आता मनाला लावून घेऊ नकं. घाव गेला, आता कळ कशाला आठवायची? मला येमूनं कुमक दिली म्हणून मला माझी लेक दिसली. बाकी त्येनं माझ्यावर कायी उपकार केला न्हाय. आपली बायकू वाचवली. आता परवा तुझं लगीन झाल्यावर माझी कोण दाद घेणार हाय?''

तसा येमू दु:खी होऊन म्हणाला, ''बापा, तसं बोलू नकं. मी तुला दुर्जन म्हणणार न्हाय. आता तिघं कुठं बी जगू.''

हे ऐकून दुर्गा हसली. यंकूला आनंद झाला. त्यानं येमूला जवळ घेऊन त्याची पाठ थोपटली. ती तिघं त्या झाडाखाली बसली. मग येमूनं रात्री घडलेला सर्व प्रकार यंकूला

सविस्तर सांगितला. यंकू चकित झाला.

थोड्या वेळानं बाळ्या डोंबाऱ्याचा तांडा त्याच वाटेनं आला. सात गाढवं, चार लेकी, तीन जावई, चार नातवंडं, पंधरा डुकरं, दोन कोंबड्यांची खुराडी, चार कुत्री आणि सर्व बिऱ्हाडापुढं बाळ्या डोंबारी खांद्याला ढोलकं लावून ऐटीत चालत होता. त्याच्या त्या संसारानं ती पांद भरली होती. तो काळगावाकडे निघाला होता. गुल्ली एका पांढऱ्या गाढवावर बसली होती. यंकूला पाहताच बाळ्याला आनंद झाला. बाळ्यानं आपला तांडा हो हो करून थांबवला, आणि दुर्गाला पाहून लहान मुलाप्रमाणं तो नाचू लागला. त्यानं दुर्गाला जवळ घेतली. पाठीवरून हात फिरवला. तिच्या गालांना दोन्ही हात लावून त्यानं स्वत:ची बोटं आपल्या कपाळावर कडकन मोडली. आलाबला घेतली नि डोळे पुशीत यंकूला तो म्हणाला,

"आता चलू या लौकर. हतं थांबणं बरं न्हाय."

बाळ्यानं यंकूला तिथं बसू दिलं नाही. ते लगेच पुढं निघाले.

एका गाढवावर दुर्गा बसली होती. एका गाढवावर रंगी आपल्या बाळाला घेऊन बसली होती. गंग्या दुर्गाला चिकटला होता. दगडू बोकड दुडक्या चालीवर पळत होता. दुर्गा आपला तो संसार पाहून हसत होती.

तो तांडा मार्ग क्रमीत होता. वाटेत एक एक भिकारी येऊन त्यात मिळत होता. पांद भरत होती. गर्दी वाढत होती. पोपट, मोर, पारवे, डुकरं, कबुतरं, कुत्री, कोंबडी आणि पोरं गाढवावर लादून ती फिरती दुनिया काळगावच्या माळाकडे सरकत होती.

दुर्गा सुखावली होती. आता काळगाव येईल, मग वैशाख येईल, आपलं लग्न होईल नि मग येमू...

ती मनात लाजली. तिची नजर चटकन रंगीच्या बाळाकडे गेली. आणि स्वत:चा ओठ तिनं हळूच चावला. दुर्गा लाजून चूर झाली.

## १०

चैत्र महिना संपत आला होता. चैत्र-पालवीनं झाडाझुडपांना श्रीमंती आली होती. अक्राळविक्राळ ढग आकाशात एकमेकांवर धडकत होते. ते धरणीला भेटण्यासाठी आतुर झाले होते; आणि ऊन खात पडलेली धरणी आकाशाकडे पहात होती. तीही मेघांची वाट पहात होती. कुशीत अंकुर रुजविण्यासाठी ती अधीर झाली होती. कधी कधी वावटळीच्या झोपाळ्यावर बसून तीही मेघराजाकडे झेप घेत पहात होती. परंतु तिला ती दौड झेपत नव्हती.

एखाद्या रात्री वीज उठत होती. गगनात ढगांचे चौघडे वाजवीत होती. वारा ढगांना रेटीत होता. गडगडाट होत होता. तो ऐकून सृष्टी हर्षभरित होत होती. आपण सृष्टीकडे येत आहोत अशी मेघानं दिलेली ती वर्दी ऐकून वातावरणात चेव येत होता.

दुर्गाची मन:स्थितीही तशीच झाली होती. तीही वैशाखाची वाट पहात होती. आता तिला येमूवाचून चैन पडत नव्हतं. तो दृष्टिआड होताच ती कावरीबावरी होत होती.

आज कित्येक वर्षांनी भुताच्या माळावर गजबजाट झाला होता. तळ्यात शुभ्र कमळांनी गर्दी करावी तद्वत त्या माळावर पालाला पाल खेटलं होतं. प्रत्येकानं पूर्वीच्याच आपापल्या जागा हेरून पालं ठोकली होती. जुने मित्र, जुने जिव्हाळे, जुने सगेसोयरे तिथं एकत्र आले होते; आणि जुने हेवेदावे, जुनं ऐक्य नि जुनी वैरंही तिथं नांदत होती. अगदी समोरासमोर ठाण मांडून बसली होती.

बाळा डोंबाऱ्यानं आपलं पाल यंकूच्या शेजारीच उभं केलं होतं. पाऱ्या, सैदू दरवेशी हे आपापल्या पूर्वीच्याच जागी स्थायिक झाले होते.

सैदू दरवेशी आता थकला होता. त्याला खोकला लागला होता. खोकल्याची उबळ आली की तो भरपूर गांजा ओढीत होता. खोकला, गांजा, कष्ट, म्हातारपण यानं त्याचा चेहरा उग्र भासत होता. कल्लेमिश्या, चेहऱ्यावरील सुरकुत्या यानं तो म्हाताऱ्या वाघासारखा दिसत होता.

'वैरी असावा, पण सुखी असावा' ही म्हण पाऱ्याला कबूल नव्हती. आपला वैरी यंक्या अजून जिवंत असावा, सुखी असावा, यानं तो चरफडत होता. अगतिक होऊन यंकूला शिव्या देत होता. ज्याच्याशी वैर करून आपण आपली तंगडी गमावली, तो वैरी जिवंत रहावा हे त्याला पटत नव्हतं.

रंगराव, इनामदार, राव्या ढेकणा, गल्या, बल्या ही सर्व दळगी माणसं. त्यांनी आपलं ऐकलं नाही. त्यांनी यंकूचं वाटोळं केलं नाही. म्हणून त्यांना तो रोज तळमळत शिव्याशाप देत होता.

गल्या नि बल्या दिसले की पाऱ्याचं डोकंच फिरत होतं.

''ह्या भडव्यांनी माझी दारू पिऊन, माझी अंडी खाऊन मलाच बेइमान ठरवलं. माझी एक तंगडी तोडली. एका पोरीचं नाक कापलं. या जगात न्याय नाही. ही खऱ्याची दुनिया नाही...'' असं म्हणून तो कपाळावर हात मारून घेत होता.

माळावर भिकारी आल्याचं समजताच, नाथा पाटील माळावर आला. त्यानं सर्वांची विचारपूस केली. यंकूला धीर दिला. बाळ्याच्या पाठीवर थाप मारून म्हणाला, ''तुझ्या पोरीला माझा जावई नादावला होता. तिला वाडा बांधून देणार होता. पण तू खरा माणूस, तू दौलतीला भाळला न्हायीस.''

कधी तरी गल्या माळावर येत होता. पाऱ्याच्या पायाकडे पहात होता. हसत होता.

पाऱ्याची पोरगी गल्याला पाहून मुरके मारीत होती. जुन्या ओळखीला नवा मुगारा यावा असं तिला वाटत होतं. पण गल्या तिच्याकडे लक्षच देत नव्हता.

गल्या नि बल्या सात-सात वर्षांची कैद भोगून आता उघड्या माथ्यानं गावात नांदत होते. त्यांच्या जुन्या खोडी कायम होत्या. पाऱ्याला पाहताच त्यांना जुनी आठवण होई. त्या रात्री या माणसानं आपणाला बोलावून पाटलाच्या जाळ्यात लोटलं. दगा दिला. आपल्या लोकांनी त्याचा पाय तोडला. अशा माणसाला अशीच शिक्षा हवी, असं म्हणत ते पाऱ्याच्या पायाकडे पाहून हसत.

चैत्र संपला. दोन दिवसांवर काळगावची जत्रा आली. गावात आरास झाली. जागोजाग कमानी उभारल्या गेल्या. बोळांच्या डोकीवर तोरणं भिरभिरू लागली.

दूरदूरहून दुकानं गावात आली. पेढ्याच्या पराती मांडल्या गेल्या. मेव्याचे भोत उभे राहिले. गावातील वातावरण आनंदानं भरलं. सासरी गेलेल्या लेकी माहेरी आल्या. नवी धडुतं लेवून, दागिने घालून वावरू लागल्या.

बाळ्या डोंबाऱ्याचा तमाशा जत्रेत नक्की झाला होता. स्वत: नाथा पाटलानं येऊन बाळ्याची पाठ थोपटली. म्हणाला, ''बाळ्या, मर्दा, झालं पायजी. तुझ्या गुल्लीचा तमाशा बघून लोकांस्नी तिरमिरीच आली पायजे.''

पाटलाच्या बोलानं बाळ्याला जोर चढला होता. गुल्ली जत्रा कशी गुंग करायची याचा विचार करीत होती.

जत्रेच्या आदल्याच दिवशी यंकू नि सख्या काशेगावला गेले. त्यांनी लग्नाचा बाजार केला. कापडाचा बस्ता बांधला. दुर्गाच्या लग्नाला येणाऱ्या खर्चाचा विचार झाला नि वैशाखातील पहिल्या सोमवारी येणारी तीथ धरली गेली.

ती नवी धडुतं, ते दागिने — ते सर्व पाहून दुर्गाचा आनंद दुणावला. ती वैशाख महिन्यात आपल्या लग्नाची तीथ घेऊन येणाऱ्या सोमवारची आतुर होऊन वाट पाहू लागली. मनातल्या मनात दिवस मोजून हैराण होऊ लागली.

येमूच्या धावपळीला तर सीमाच नव्हती. तो दोन्ही घरचं पाणी भरीत होता. जळण आणीत होता. आता वैशाख येईल. तो सोमवार येईल. आपलं लग्न होईल. मग दुर्गा नि आपण संसार करू. या एकाच विचारानं त्याचं मन भारावलं होतं.

काळगावच्या जत्रेचा दिवस उगवला, आणि राधानगरीचा रंगराव पाटील नाथा पाटलाच्या दारात येऊन उभा राहिला. सासऱ्याचा राग शांत करावा, दोन दिवस जत्रा पाहावी आणि आपल्या बायकोला घेऊन परत फिरावं, असा हेतू धरूनच रंगराव आला होता. परंतु त्याला दारात पाहताच नाथा पाटलाचं डोकं तरकटलं. पण राग गिळून तो

म्हणाला,

"कसं येणं केलं सरकार?"

"कसं म्हणजे?" रंगराव चमकून म्हणाला, "माणसाकडे माणूस जातो, तसंच."

"खरं हाय ते." नाथा पाटील कडवट सुरात म्हणाला, "माणूस माणसाकडे येतं, पण कारणानं येतं. दगड दगडाकडे जातो. पण त्याची भेट घराच्या भिंतीत व्हती. डोंगरात नव्हं."

रंगराव खिन्न झाल्यासारखा चेहरा करून नमतं घेत म्हणाला,

"मामासाहेब, मी आपला जावई म्हणूनच आलो आहे. जत्रा करावी नि जाताना सारजाला घेऊन जावं एवढाच हेतू आहे. पण तुमच्या बोलण्याचा अर्थ मला कळत नाही."

"न्हायच कळणार!" नाथा पाटील म्हणाला. "वढाळ जनावराचं पोट दावणीला न् गन्हाणीला भरत नसतं. ते लोकांच्या कुवाडीत त्वांड घालून खातं."

रंगराव दिलगीर होऊन म्हणाला, "गुन्हा पदरात घाला. आम्ही रंगढंग केले. तुमच्या मुलीला दुःख दिलं. तरीही मी माणूस आहे. वढाळ जनावराची उपमा देऊन माझा अपमान करू नका."

"तुमचे ते रंगढंग म्हणजे पापाचे डोंगर." नाथा पाटील चिडून म्हणाला, "लोकांच्या लेकीबाळी पळवून त्येंची अब्रू घेणं ह्याला तुम्ही रंगढंग म्हणता. तुम्ही त्या माकडवाल्याच्या पोरीला घरात डांबली व्हती. खाका वर करू नका. ती पोरगी ह्या घडीला माइयाच माळावर जिवंत हाय."

दुर्गा जिवंत आहे, हे ऐकून रंगरावाला आश्चर्याचा धक्का बसला. पण तसं भासू नये याची काळजी घेऊन तो म्हणाला, "मामासाहेब, तो प्रकार मला मुळीच माहीत नव्हता. किंवा चाकरांना 'तसं करा' म्हणून मी सांगितलंही नव्हतं."

"म्हंजी बकऱ्याला काळीजच नव्हतं." नाथा पाटील गुरकला.

"मामा, झालं गेलं विसरून मला क्षमा करा. आता पुढं मी सरळ वर्तन करीन." रंगराव हात जोडून म्हणाला.

जावयानं हात जोडताच नाथा पाटील शांत झाला. त्यालाही ओढून धरायचं नव्हतं. थोडीशी समज देऊन आपल्या लेकीचा संसार सावरायचा होता. "दोन दिवस जत्रा बघा नि जाताना आपली बायकू घेऊन जावा." असं म्हणून तो उठला आणि जत्रेची देखरेख करण्यासाठी गावात गेला.

नाथा पाटील वाड्याबाहेर गेला. वाडा शांत झाला. ती माकडवाल्याची पोरगी जिवंत कशी? नि ती गावच्या माळावर म्हणे आहे. मग राव्या ढेकणा कुठं गेला? हा काय प्रकार आहे? या विचारानं रंगरावाची पाठ घेतली. मग हा काय प्रकार आहे याची चौकशी

करायची, ती पोरगी खरंच हयात आहे का, याची खात्री करून घेऊन नंतरच जायचं, असा त्यानं निश्चय केला. त्या पूर्वी सारजाची मनधरणी करून तिचा राग शांत करायचा असं ठरवून त्यानं सारजाला गोड गोड बोलून आळवून वचन देऊन काबूत घेतली, आणि खांद्याला बंदूक लावून मिशीला पीळ भरून तो पेठेत गेला.

दर वर्षाप्रमाणे यंदाही काळगावात भोवतालच्या लोकांची रीघ लागली होती. रंगीबेरंगी पागोट्यांनी पेठ भरली होती. पिवळे लंगोट खांद्यावर टाकून दुधाच्या बादल्या हाती घेऊन पहिलवानांनी टोळी तमाशाच्या फडाकडे सरकत होती. त्यांच्या मिश्यांचा पीळ निघत नव्हता. छात्या फुगत होत्या. त्यांना पाहून तरण्या पोरी नटून थटून कासार आळीकडे जात होत्या. त्यांना पाहून कित्येकांना खोकला येत होता. कोणी खाकरत होता, तर कोणी डोळे मिचकावीत होता. आणि त्या देखण्या पोरी अंग चोरून वाट काढीत होत्या. हाती आलेली मासोळी सळकन निसटून जावी तशा त्या पोरी गर्दीतून जात होत्या.

पाराखाली बाळ्या डोंबाऱ्याचा तमाशा उभा राहिला होता. त्याचं ढोलकं तालांचे इमले बांधीत होतं. आणि त्याची ती गुल्ली इरसाल लावणी घोळून रंग भरीत होती. माणसं वेडावत चालली होती. काही कनवटीचे पैसे गुल्लीवर उधळीत होती.

गुल्ली, तिचं तारुण्य, रूप नि कोमल कंठ, पायातील नूपुरांचा उन्मादक झनझनाट यानं फड बावचळला. ती नाचत होती. गात होती. समोरच्या माणसाला गप्पकन डोळा मारीत होती. आणि 'राया माझ्या मंदिरी चला—' हे कडवं परत परत आळवीत होती. पैशांचा पाऊस पडत होता. बाळ्या डोंबारी पैसे गोळा करीत होता.

काळगावची जत्रा म्हणजे माळावरच्या भिकाऱ्यांना एक पर्वणीच लाभली होती. सर्व भिकारी आपापलं कसब दाखवीत होते. पेठेत जागोजाग त्यांचे खेळ होत होते. सापगारुडी नागांना खेळवीत होते. माकडंवाले माकडांना नाचवीत होते. सैदू दरवेशाच्या म्हाताऱ्या अस्वलानं गाव दणाणून सोडला होता. मारुतीच्या देवळापुढं तुरेवाल्यांनी भानामतीचा खेळ रंगात आणला होता. भानामतीचे चमत्कार पाहून लोक स्तंभित झाले होते.

भिकाऱ्यांची पोरं सर्वत्र संचार करीत होती. ती सशाची पिल्ली, पोपट, भोरड्या, ल्हाव, चिमूर विकत होती.

जत्रेला आगळं रूप आलं होतं. लोक धुंद झाले होते.

दुपारी दुर्गा गावात आली. जत्रा पहात पहात ती कासार आळीला गेली. हिरवीगार कांकण भरून परत फिरली. कुंभाराच्या बोळात शिरून पुढं निघाली. तोच पुढून रंगराव आला. दुर्गाला ओळखून वाट अडवून उभं राहावं तसं थांबला. बंदुकीचा दस्ता धरून त्यानं दुर्गाच्या डोळ्यात नजर कोंबली. तिनं क्षणात त्याला ओळखलं.

रंगराव म्हणाला,

"तू? अग, ह्या तुझ्या डोळ्यांसाठी राधानगरी खुळी झाली आहे. आणि तू इकडे

निवांत आहेस. तुला सुखी पाहून मला आनंद झाला.''

''आनंद कसला?'' दुर्गाने भुवया चढवल्या.

''दुर्गा, तुला खरं सांगू?''

''काय?''

''ही रुंद छाती, हे असे केस, ही हळदीच्या कोंबासारखी काया—''

''म्हणणं काय?''

''मला एवढंच म्हणायचंय की तुझ्यासारखी देखणी पोरगी माझ्या खोऱ्यातून सहसा सलामत सुटत नसती. पण तू! तू नशीबवाली आहेस नि दुर्दैवीही!''

''कशी?''

''दुर्गा, तू माझ्या खोऱ्याचं अन्न खाल्लंस. पण पाणी चाखलं नाहीस. जर तसं घडलं असतं तर तुला कळून आलं असतं की कासारी नदीच्या काठची माणसं पोलादी असतात. पण तू वेडी—''

''मी? नि वेडी?''

''हो. देवाशपथ. जर तू माझ्यासारख्याची परीक्षा घेतली असतीस तर तुला जन्मभर विसरच पडला नसता.''

दुर्गानं शांतपणं ऐकून घेतलं. मग म्हणाली, ''तू फाजील गांजा ओढतोस वाटतं?''

''कुणी, मी गांजा ओढला?''

''व्हय! म्हणूनच ही बडबड करतोस. मला आधी हे कळू दे की तू कोण?''

''मी? मी राधानगरीचा रंगराव.''

''ते मला ठावं हाय. मी इसरणार न्हाय. मला तू पळवलं व्हतंस. पण काय करू? मी गरिबाची लेक पडल्ये. न्हाय तर—''

'नाही तर काय?''

''मी तुला ठार मारलं असतं.''

''मला?''

''व्हय, तुला.''

''वेडी—''

''वेडी मी?''

''ते जाऊ दे. दुर्गा, राव्या कुठाय?''

''नरकात.''

''सरळ सांग.''

''माझी वाट सोड.''

''नाही तर का करशील?''

"खेटरानं पूजा—"

रंगराव चरकला. त्यानं आजूबाजूला पाहिलं. दंगा झाला तर बेअब्रू होईल. सासरा भडकेल, असा विचार करून जणू काहीच घडलं नाही अशा थाटात तो पुढं गेला.

दुर्गा माळाकडे गेली.

रंगराव तमाशाच्या फडात जाऊन बसला. मांडीवर कुऱ्हाड घेऊन गल्या पुढंच बसला होता. त्याच्या शेजारीच तुटका पाय हलवीत पाऱ्या तमाशा पहात होता. तमाशा रंगात आला होता. गुल्ली कबुतरासारखी गिरक्या मारीत होती. रंगरावाला पाहताच पाऱ्या चेकाळून म्हणाला,

"रामराम, राधानगरीचं सरकार! कसं काय बरं हाय का? बघा, ही बाळ्याची ल्हावर कशी गुंगतीया. तुम्ही ह्या ल्हावरीला फास लावला, पर कच्चा राव!"

रंगराव जागीच अंग घुसळून बसला. 'तुझं खरं आहे—' असा भाव त्याच्या चेहऱ्यावर तरळला.

पाऱ्या पुन: बोलला, "सरकार, खऱ्याची दुनिया न्हाय."

"कशामुळं खरं बुडालं?" रंगरावानं गुल्लीकडे नजर फेकली. पाऱ्या किंचित सरकून गल्याकडे बोट दाखवीत रंगरावाला म्हणाला,

"ह्यो गडी भलताच मारका हाय. मागं ह्यो फरारी व्हता. एका राती माझ्याकडं आला. चांगला दारू प्याला. पाटलास्नी कुणकूण लागली. गावकऱ्यांनी फरा धरून ह्येला बंदुकीनं दणका दिला. पर झालं भलतंच. म्याच दगा दिला. म्हणून ह्येच्या लोकांनी माझंच तंगडं तोडलं. आता सांगा, ह्यो काय न्याय झाला?"

गल्यानं वळून पाहिलं नि हसला. त्याच्याकडे पहात 'बरं, हस बाबा!' अशा आविर्भावानं पहात मुंडी डोलवीत पाऱ्या म्हणाला,

"तुमच्या इनामदाराला म्यां सांगितलं की यंक्याची पोरगी रानात हाय, पर माझं मुक्याचं कुणी कानावर घेतलं न्हाय. तेवढं रावबा ढेकण्यानं माझं ऐकलं, पर म्होरं काय झालं, देवाला डोळं. आता ती यंक्याची भोरडी माळावर गुंगतीया. आरं बाबा, आम्ही बी तरणं व्हतो. तेवा सारंच येगळं होतं. जर का एखादी पोरगी आमच्या डोळ्यात भरली तर आम्ही दिवस उगवून मावळंपातूर तिला अंगाखाली घेत व्हतो. ती अशी निसटून जाण्याचं नाव कशाला? नंग्या तरवारीला आम्ही डरत नव्हतो. पण आजकालची तरणी पोरं म्हणजे खिरीत खराटा. नुसती बुळग्यावाणी वागतात. आणि पोरी मर्दावाणी छाताड काढून चालत्यात. त्या राती म्या, रावबा ढेकण्याला बराबर वाट दाखवली. डोंगरात जाळ दावला. पण—"

"पण पुढं काय झालं?" रंगरावानं विचारलं.

खालचा ओठ उलटा करून पाऱ्या स्वत:ला झोके देत म्हणाला,

“देवाला डोळं. ती पोरगी बापाकडं हाय.”

“आणि राव्या ढेकण्या?” रंगराव उद्‌गारला.

“त्यो असल आपल्या घरात.” पाऱ्या उत्तरला.

रंगराव अस्वस्थ झाला. म्हणाला,

“नाही. राव्या बेपत्ता हाय.”

“मग त्या पोरीनं त्येला भाजून खाल्ला असंल. न्हाय तर जाणार कुठं?” असं म्हणून पाऱ्या हसला. रंगराव विचारात पडला. जराशानं म्हणाला,

“पाऱ्या, राव्याचं काय झालं असंल?”

“ते मी कसं सांगू?” पाऱ्या म्हणाला, “बाकी आता त्या यंक्याच्या पोरीचं लगीन व्हणार हाय. तिच्या लग्नासाठी यंक्या तीन हजार रुपये कमरेला बांधून बसलाय.”

यंक्याच्या कमरेला तीन हजार रुपये आहेत हे ऐकून गल्या चमकला. तसाच ढुंगणानं मागं सरकून रंगरावाशेजारी बसला. हसत म्हणाला, “रंगराव, बरं हाय का जावईबुवा?”

तोच कुस्त्यांची वेळ होऊन तमाशा मोडला. माणसं उठून गावदरीला कुस्त्या बघायला निघाली. रंगराव रेंगाळला. पुढून गुल्ली आली. तिरपी नजर रोखून रंगरावापुढं थांबली नि छाती फुगवून म्हणाली,

“काय सरकार, बरं हाय का?”

“कसं सांगू तुला—” रंगराव दुःखी स्वरात म्हणाला, “देवानं तुला तारुण्याची दौलत दिली आहे, म्हणून अशी माणसांची कत्तल करीत फिरते आहेस.”

“तेच मेलं रडगाणं!” असं म्हणून गुल्ली पुढं सरकली नि गर्दीत दडली.

रंगराव, पाऱ्या आणि गल्या हे तिघे निघाले होते. रंगरावाच्या डोळ्यात गुल्ली नाचत होती. गल्या मनात यंक्याचे तीन हजार रुपये मोजून घेत होता आणि आता कसली फुणगी टाकून आग लावावी याचा पाऱ्या विचार करीत होता.

कोणी कोणाशी बोलत नव्हतं. ते गावाबाहेर येऊन एका झाडाखाली बसले. रंगराव किंचित गंभीर होऊन म्हणाला, “डोळ्यात गेलेलं कुसळ हे मुसळासारखं वाटू लागतं तशी ही बाब आहे. दुर्गा आणि गुल्ली या भिकाऱ्यांच्या दोन पोरींनी आम्हाला टांग मारली आहे. दुर्गानं तर इनामदारांना वेड लावलं आहे. मनाला वाटतं. आमची इभ्रत मातीमोल झाली. कारण जर ह्या पोरी कुणा मातबरांच्या असत्या तर सरळ मागणी घालून लग्न करता आलं असतं. पण तसंही करता येत नाही. तुपात सरळ बोट घालून तूप निघत नसतं. थोडं वाकडं बोट घातलं तर तूप निघतं. म्हणून मला वाटतं. आता बोट वाकडं करणं हा एकच उपाय शिल्लक आहे.”

“माझं वाईच ऐकता का?” पाऱ्या चिडक्या स्वरात म्हणाला, “आवं घान जात, तिला तुम्ही तूप म्हणता हे मला पटत न्हाय. मी म्हणतो, त्या दोन्ही पोरी नुसत्या मादरचोद

हायती. त्या यंक्याच्या पोरीला त्यो येम्या रंगदार पोरगा पटलाय, आणि ती गुल्ली भटकभवानीच हाय. पोरं भुलवून बाळ्याचं घर भरतीया.''

''बरं, मग म्हणणं काय तुझं? सरळ बोल!'' गल्यानं बिथरून म्हटलं. आणि पाऱ्या वाकडी मान करून म्हणाला,

''म्हणणं एकच की तुमास्नी माझ्यासारख्या गरीबाचा पाय तोडता येतो, पण ह्या पोरींची नांगी मोडता येत न्हाय, ह्येचं नाव काय? द्या जाब.'' पाऱ्यानं आपला मोडका पाय उचलून दाखवला.

गल्या म्हणाला, ''एकाच रातीत नांगी मोडू. जर रंगरावाचं तसं मत असलं तर तुम्ही सांगाल तवा आमची तयारी हाय. एकदोन मुंडकी तुटून पडली तरी आम्ही मागं म्होरं बघणार न्हाय. पर—''

''पर काय?'' रंगराव बोलला, ''स्पष्टच बोला. तुम्हाला पैसाच पायजे ना? मग किती घेणार ते सांगा. मात्र त्या पोरी राधानगरीत पोच झाल्या पाहिजेत.''

''खरं हाय. बोला गलाजीराव.'' पाऱ्या म्हणाला.

''ही दोन सनगं घरपोच करून किती पैसे घेणार सांगून मोकळा हो.''

''ए पाऱ्या, पैसे म्हणू नकं, रुपये म्हण!'' गल्या गुरकला नि रंगरावाकडे वळून म्हणाला,

''ती दोन सनगं घरपोच करतो. मातर रुपये पाचशे मोजून ठिवा. कबूल?''

''कबूल करा, घ्या पटवून.'' पाऱ्याला घाई झाली. वैऱ्यांच्या पोरींचा सौदा पटत आलेला पाहून त्याच्या चेहऱ्यावर आनंद फुलला. तो रंगरावाला विनवीत म्हणाला,

''सरकार, घ्या पटवून आणि ह्या दोन कालवडी राधानगरीच्या बाजारात येऊ द्या.''

''बरं तर कबूल.'' रंगरावानं कबुली दिली.

गल्याला आनंद झाला. पाऱ्या तुटका पाय जोरात हलवीत चेकाळून म्हणाला, ''देव पावला. सौदा पटला. खरं सांगू, त्या पोरीस्नी बघताच माझ्या तोंडाला पाणी सुटतं. पण माझं झालंया म्हाताऱ्या वाघावाणी. पोटात भूक हाय, पण तोंडात दात न्हायीत.'' असं म्हणून तो हसला. दुर्गाचं लग्न मोडलं, गल्यानं तिला पळवली, इनामदारानं बाटवली, यंक्या वेडा झाला, अशा कल्पना करून त्याचा वेडा आत्मा संतुष्ट झाला.

नंतर ते तिघे कुस्तीच्या फडाकडे गेले. तिथं गल्याला बल्या भेटला. मग गल्यानं एका बाजूला नेऊन बल्याला सर्व हकीकत सांगितली आणि म्हणाला, ''शिवाय यंक्याकडं तीन हजार रुपये हायती. नशीब उघडलं आपलं.''

''ते रुपये कवा बी घेऊ.'' बल्या चिंतातुर होऊन म्हणाला, ''पर पोरी कशा पळवायच्या? आणि ते काम चांगलं न्हाय—''

''त्येचा मग इचार करू.'' गल्यानं बोलणं थांबवलं आणि ते कुस्त्या पाहत बसले.

सूर्य बुडाला. अंधार दाटला. जत्रा करून सर्व भिकारी आले. दिवसभराची मिळकत किती झाली याचा हिशेब करू लागले. सापवाल्यांनी पेटाऱ्यांतून साप बाहेर काढून त्या पेटाऱ्यातील पै-पैसा मोजून कनवटीला लावला.

यंकूचा गंग्या माकड आणि सैदूचं अस्वल यांनी आपल्या मालकांना बरीच मिळकत करून दिली होती. बाळ्या डोंबारी रंगला होता. ती वस्ती आनंदात होती.

पाऱ्या आला तो झिंगतच आला. दारात येऊन एका पायावर उभा राहून दोन्ही हात आकाशात उंचावून ढगाकडे पाहत मोठ्यानं म्हणाला,

"हे आभाळातल्या साऱ्या देवांनू, मला पावा आणि ह्या दोन कालवडी राधानगरीचा जाऊ द्या." ही त्याची ओरड ऐकून भिकारी चकित झाले.

पाऱ्या घरात गेला. बकऱ्याचं मांस मिटक्या मारीत खात बायकांना सांगू लागला, "आज मी सुखात हाय. माझं ऐका. कुणाला सांगू नका. यंक्याची दुर्गा आणि बाळ्याची गुल्ली लौकरच राधानगरीला जाणार. हतं ऱ्हाणार न्हाय त्या. त्या रंगराव पाटील नि इनामदार सरकार ह्यांच्या रांडा व्हनार. सारं नक्की झालं. पण हे कुणाला बोलू नका. न्हाय तर जिभा कापीन तुमच्या..." असं म्हणून तो उताणा पडला आणि घोरू लागला.

मग सर्व काही शांत झालं. पाऱ्याची बायको नाबदा उठली. सकीनाकडे गेली आणि आश्चर्य व्यक्त करीत म्हणाली, "दरवेशीणबाई, ऐकावं ते नवलच. ह्या नशिबाला काय म्हणाल? ही यंक्याची दुर्गा लगीन टाकून म्हणं आपल्या याराकडं राधानगरीला जाणार—"

सैदूची सकीना आ वासून ऐकतच राहिली. नंतर म्हणाली, "असं कोण म्हणतंय?"

"आमचं मालक." नाबदा म्हणाली. आणि सकीनाला संताप आला. नाबदा गेल्यावर ती उठली आणि यंकूकडे गेली. म्हणाली, "यंकूदादा, माटीमिल्या, माझ्या कानावर निराळंच आलंय. दुर्गा म्हणं हाटणार हाय."

"तसं का म्हणता वयनी?" यंकू चमकून म्हणाला, "येत्या सोमवारी माझ्या दुर्गाचं लगीन हाय. ती कशी जाईल? तसं म्हणू नका."

"पाऱ्याची बायकू म्हणाली म्हणून मी आल्ये." सकीना म्हणाली, "दुर्गाला सांभाळा." एवढंच बोलून ती परतली.

यंकूचं डोकं भ्रमिष्ट झालं. तो कुऱ्हाड घेऊन दारात बसला. आणि दुर्गा जाणार, कुठं कशी जाणार? पाऱ्यानं ही भुमका का उठवली, याचा तो विचार करू लागला. आज कित्येक दिवस तो सावध होता. गंग्याचं दावं सोडून रात्रीच्या रात्री जागत होता. गंग्या नि यंकू यांना झोप नव्हती.

यंकू चातकाप्रमाणं त्या पहिल्या सोमवारची वाट पाहत होता. तो सोमवार लौकर यावा, दुर्गाचं लग्न व्हावं, आपण एका जबाबदारीतून मुक्त व्हावं, या एकाच विचारानं

त्याचा आत्मा खंगत होता.

आला, आला म्हणत वैशाखातील तो पहिला सोमवार आला. यंकू आणि सख्या यांच्या दारी दोन मांडव उभारले गेले. दूरदूरचे माकडंवाले पाव्हणे आले. जिव्हाळ्याची माणसं येऊन पोहोचली.

सकाळी हळदी लागल्या. दुर्गाला मुंडावळ्या बांधल्या. हळदीनं पिवळी झालेल्या दुर्गाला दृष्ट लागू लागली. येमू हळदीनं पिवळा धमक झाला. दुर्गाला चोरून पाहू लागला. वेड लागल्यासारखा तो आपल्या नवरीला न्याहाळीत होता. आणि नवरी झालेली दुर्गा लाजून चूर होत होती.

दुपारी वीरपूजन झालं. बक्या माकडंवाला वीर होऊन, मळवट भरून देवापुढं बसला. मग त्याच्या अंगात आलं नि हातात काठी घेऊन वीर खेळू लागला. दहा गडी हातात काठ्या घेऊन बक्याचा मारा रोखू लागले. वातावरण धडधडून पेटू लागलं. लग्नातील मंगल क्रिया घडू लागल्या. वीर शांत झाला. मग देवपूजन झालं.

सूर्य मावळतीकडे झुकला आणि लग्नघटी समीप आली. माणसं गोळा झाली. तांदूळ वाटले. तांदळाची परात घेऊन यंकू वेड्यासारखा धावू लागला. सर्वांना तांदूळ वाटले.

सर्व काही शांत होतं. मंगलाष्टकं सुरू झाली. दुर्गा येमू यांच्यावर तांदूळ पडू लागले.

नवरा नवरी बहुल्यावर चढली. दुर्गानं येमूला बाशिंग बांधलं – येमूनं दुर्गाला बांधलं. मग नवरा-नवरी बहुल्यावर बसली. बेगडी मुंडावळ्यांच्या बाशिंगांनी झगझगाट केला. नवरी होऊन बसलेल्या दुर्गाला पाहून यंकूचे डोळे आनंदाश्रूंनी भरले.

मग पंगती पडल्या. लोकांनी हू म्हणून अन्नाचा फडशा पाडला. आणि हळूहळू त्यांची धावपळ शांत झाली. दिवसभर दमलेली माणसं जागा मिळेल तिथे आडवी झाली. आनंदाच्या भाराखाली घोरू लागली.

नवी नवरी नियमाप्रमाणं पहिल्या रात्री येमूच्या घरी जाऊन देव्हाऱ्यापुढं निजली.

यंकू आपल्या दारात निवांत बसला होता. गंग्या त्याची सोबत करीत होता. वस्ती निपचित पडली होती. अंधार दाटला होता. डोळ्यात बोट घातलं तरी काहीही दिसत नव्हतं. सर्व काही शांत झालं होतं. एखादीच चांदणी काळ्या ढगात लुकलुकत होती. मध्येच काळ्या ढगात वीज लवलवत होती. वळिवाचा पाऊस उठला होता. वारा धावत होता. त्याच्या धक्क्यानं माळावरची पालं डगमगत होती, करकरत होती.

पाऱ्या आपल्या दारात उताणा पडला होता. तो डोळ्यातली झोप झटकीत होता. आज काही तरी विपरीत घडणार या विचारानं त्याची पाठ धरली होती. गल्या नि बल्या कधी येणार आणि माकडंवाल्यांच्या पालावर हल्ला कधी करणार याची तो वाट पाहत

होता. तो हल्ला पाहण्यासाठी त्याचा पिसाट आत्मा आतुर झाला होता. हळूहळू तो झोपेच्या अधीन होत होता.

आणि त्याच वेळी गल्या-बल्या हे आपली दहा माणसं घेऊन पालांना भिडले होते. त्या बिकट काळोखात बल्या दबक्या आवाजात म्हणाला,

''ए! ऐका रं, पोरीला पळवायची भानगड करू नका. आधी यंक्यावर चढाई करून त्येच्या कमरेची ती रुपयांची कन्याळी काढा नि मग बघू पोरीचं.''

''पर हात आवरून मारा.'' गल्यानं दुसरी सूचना केली.

एक इसम म्हणाला, ''पर जर यंक्याच भडकून मारू लागला तर काय करायचं?''

गल्या दरडावून म्हणाला, ''त्येला जखमी करा. खून व्हणार न्हाय अशी काळजी घ्या. नखाच्या कामाला कुऱ्हाड नकं. चला.''

माळ शांत होता. त्यावर अंधारानं पडदा टाकला होता. त्या अंधारात गल्या नि बल्या आपली माणसं घेऊन सरकत होते.

पाऱ्या दारात उताणा पडून घोरत होता. जंगलाकडून दहाबारा माणसं हत्यारं घेऊन आली. एकानं पाऱ्याचा पाय धरून पुढं ओढला, आणि दुसऱ्यानं कुऱ्हाडीचा घाव घालून त्याचा तो पाय धडावेगळा केला. तसा पाऱ्या किंचाळला. त्याच्या बायका बाहेर आल्या. त्यांनी पाऱ्याला जागा केला. पाऱ्या म्हणाला,

''काई न्हाय. मला सपान पडलं.''

पुन: सर्वत्र शांतता पसरली.

आणि गल्या-बल्यांनी यंकूवर हल्ला चढवला. सावध यंकू चटकन उठला. कुऱ्हाड घेऊन मारेकऱ्यांवर तुटून पडला. हाणाहाणीला आरंभ झाला. त्याची कुऱ्हाड वीज होऊन तळपू लागली. कुऱ्हाडीवर कुऱ्हाड आदळून ठिणग्या उसळू लागल्या. क्षणात दंगल वाढली. कुत्री उठली. माणसं भयभीत झाली. सर्वत्र हलकल्लोळ उसळला. सर्व माकडवाले काठ्या घेऊन धावले. पाव्हणे गोंधळले. कित्येकांना काही सुचेनासं झालं.

यंकू निर्भान होऊन मारीत होता. गल्या नि बल्या व त्यांची माणसं यांनी यंकूला वेढा दिला होता. चहू बाजूंनी यंकूवर घाव बसत होते. गंग्या खवळला होता. तो डोकीत दगड घालावा तसा उडून वैऱ्यावर आदळत होता. कडाडून चावा घेऊन नंतर तो दुसऱ्यावर झेप घेत होता. कित्येकांना त्यानं जखमी केलं होतं, आणि त्याच वेळी गल्या-बल्या यांना माकडवाल्यांचा वेढा पडला होता.

दुर्गा कावरीबावरी झाली होती. ती डोळे फाडफाडून आपल्या पालाकडे पाहत होती. तिची नजर आपल्या बापाला शोधीत होती.

येमू, सख्या, बक्या, तुक्या हे माकडवाले यंकूची पाठ राखण्यासाठी पुढं सरकत होते. परंतु दरोडेखोरांनी आपल्या टोळीचे दोन भाग केले होते. त्यांपैकी एक यंकूला

मारीत होता आणि दुसरा इतर माकडंवाल्यांना मागे रेटीत होता. फक्त रुपये घेऊन पळून जाण्याचा त्यांचा इरादा आता फसला होता.

स्वत:च्या प्राणासाठी यंकूला ठार मारण्यावाचून त्यांना गत्यंतर नव्हतं. म्हणूनच ते यंकूवर घाव घालीत होते.

नवी नवरी दुर्गा भेदरून गेली होती. गर्दीत नि अंधारात ती पाहत होती. टाहो फोडून रडत होती. येमू, सख्या हत्यारं घेऊन पुढं पुढं जात होते.

धुमश्चक्रीत यंकू रक्तबंबाळ झाला होता. गल्या-बल्या नि त्यांचे लोक त्याला लोळवण्याची शिकस्त करीत होते. पण यंकू घाव बसताच धुमाळीनं धावून वार करीत होता.

यंकूला चेव आला. तो गल्यावर धावला. तोच मागून बल्या पुढं धावला. त्यानं एक जबर घाव यंकूच्या डोक्यात घातला. यंकूचं डोकं फुटलं. तो गप्पकन थांबला. त्यानं आपली कुऱ्हाड भुईवर टेकली. मग हळूच गुडघे टेकून तो जमिनीवर कोसळला.

त्या गडद अंधारात मृत्यूनं यंकूवर मात केली. गल्या-बल्या त्याच्या कमरेची रुपयांची कन्याळी घेऊन अंधारात पळाले.

माळावरच्या दंगलीनं गाव जागा झाला होता. नाथा पाटील बंदूक नि माणसं घेऊन माळाकडे धावला आणि भिकाऱ्यांची मारामारी म्हणून उठलेले लोक पुन: अंथरुणावर निजले.

नाथा पाटलानं पळता पळता दोन बार काढून माळ गाठला. तो माळावर आला. तेव्हा यंकू शांत निजला होता. मृत्यूनं त्याचा आत्मा हरण केला होता. दुर्गा त्याच्या प्रेतावर पडून आक्रोश करीत होती. जखमी येमू, सख्या, बक्या हे यंकूजवळ बसून रडत होते. पाटील येताच त्यांचा आकांत वाढला.

सारा गावच माळावर जमा झाला. पंचनामा झाला. रातोरात माणूस तालुक्याला रवाना झाला.

सकाळीच सरकारी अंमलदारांनी माळावर गर्दी केली.

यंकूच्या खुनामुळं नाथा पाटलाला धक्का बसला होता. अगदी जवळचा माणूस हरपावा असं वाटून तो सरकारी अधिकाऱ्यांत वावरत होता.

स्वत: डी.एस.पी. फौजदारासह मोठी फौजच घेऊन आला होता. चौकशीची चक्रं फिरत होती. अंमलदार बारीकसारीक धागेदोरे जुळवून खून कुणी केला असावा याचा मागोवा घेत होते.

रात्री गल्या-बल्याच्या मागं गेलेला गंग्या पहाटे येऊन एका झाडावर चढून बसला होता. बऱ्याच वेळानं तो झाडावरून खाली उतरला आणि सरळ डी.एस.पी.कडे जाऊन त्याचा हात धरून त्याला ओढू लागला. नाचू लागला. भुवया चढवून जागीच उड्या

मारून काही तरी सांगू लागला. पुन: पुन: डी.एस.पी.ला ओढू लागला. डी.एस.पी.ला संशय आला. तो गंग्याबरोबर चालू लागला. तसे सर्वच सरकारी अधिकारी चालू लागले. ते सर्व लोक गंग्यामागून गावाकडे चालू लागले.

गंग्या पुढं पळत होता. परत येत होता. आणि डी.एस.पी.चा हात धरून पुन: पुढं पळत होता. गंग्याच्या मागून सर्व अधिकारी चालत होते. गाव चालत होता. पोरंबाळं चालत होती. आता हे माकड गुन्ह्याचा शोध कसा लावणार, या एकाच विचारानं सर्व उत्सुक झाले होते. डी.एस.पी. गंभीर होऊन गंग्याची हालचाल पाहत होता. गंग्या त्या सर्वांना घेऊन गावात शिरला. तेव्हा यंकूचा खुनी आपल्याच गावात आहे, अशी सर्वांची खात्री झाली. तो खुनी कोण हे पाहण्यासाठी सर्वजण आतुर झाले.

गावात शिरताच प्रथम गंग्या सरळ गल्याच्या घरात शिरला. सर्व शक्ती एकवटून त्यानं गल्याच्या अंगावर झेप घेतली; नि गल्याचा एक कान त्यानं दातानं ताडकन तोडला.

पोलिसांनी पुढं होऊन गल्याला अटक केली.

नंतर गंग्या बल्याच्या घरात गेला. माकड घरात शिरलेलं पाहून तो कावराबावरा झाला. दारातील अंमलदारांची गर्दी पाहून पळण्याचा विचार करू लागला. तोच गंग्यानं झडप घेऊन त्याची मान कडकडून चावली. पुन: पोलीस पुढं धावले. त्यांनी बल्यालाही अटक केली.

पुन: गंग्या सर्व लोकांना घेऊन एका झाडाखाली गेला. एक जागा दाखवून तो तिथं नाचू लागला. पोलिसांनी गल्या-बल्या यांना पुढं लोटलं. त्यांनी तिथं उकरून पुरून ठेवलेले यंकूचे रुपये काढून दिले, आणि गुन्हा कबूल केला. आपल्या सर्व साथीदारांची नावं सांगितली. त्यात पाऱ्याचंही नाव नोंदलं गेलं.

नंतर गंग्या पिसाळला. तो केकटू लागला नि धावत माळाकडे येऊन एका झाडावर चढून बसला.

सरकारी अंमलदार यंकूचं प्रेत नि आरोपी घेऊन निघून गेले. गंग्या झाडावर तसाच बसून होता. तो खाली येत नव्हता. दुर्गा, सर्व माकडवाले नि गावकरी त्याला 'खाली ये,' म्हणून विनवीत होते. पण कोणाचेही ऐकत नव्हता. अगतिक होऊन ती किंचाळत होता. रडत होता. कोणाकडेही पाहत नव्हता.

दुसऱ्या दिवशी तालुक्याहून यंकूचं प्रेत परत आलं. लोक जमले. पुन: दुर्गानं आक्रोश आरंभला. येमू, सख्या यांनी माळावरच एक गोर खणली नि यंकूचं प्रेत तिकडे नेलं. तसा गंग्या अधिकच वेडावला आणि मोठमोठ्यानं किंचाळू लागला. यंकूचं मढं त्या गोरीत घालून वर माती ओढली गेली आणि गंग्यानं त्या झाडावरून उडी घेतली. तो जमिनीवर जोरानं आदळला, आणि क्षणात प्राण सोडून त्यानंही जगाचा निरोप घेतला.

गंग्या माकड झाडावरून पडून मेलेला पाहून लोकांना हादरा बसला. दुर्गानं पुन:

टाहो फोडला. गंग्या ऽ गंग्या ऽ करीत ती धावली. गंग्याचा मृतदेह पोटाशी धरून रडत पालाकडे आली आणि गंग्याचा तो मृतदेह पाहून रंगी माकडीण वेडीपिशी झाली. तिनं स्वत:चा देह जमिनीवर आदळून जीव दिला.

तो दारुण प्रसंग पाहून नाथा पाटील, सैदू दरवेशी, बाळ्या डोंबारी यांनी आसू ढाळले. लोक हळहळले. बायका-पोरं रडू लागली. कित्येकांचे कंठ दाटले. दुर्गाला शांत करणाऱ्या बाया स्वत: रडू लागल्या. माळावर दु:खाचा डोंगर कोसळला.

मग लोकांनी यंकूशेजारी दुसरी एक गोर खणली आणि तिच्यात गंग्या नि रंगी या दोन इमानी माकडांना मूठमाती दिली. त्या दिवसापासून त्या माळाचं नाव बदललं. लोक त्याला माकडीचा माळ म्हणू लागले.

यंकू दृष्टिआड झाला. गंग्या नि रंगी मातीत गाडली गेली आणि दुर्गाचं मन उठलं. ती कोमेजली. तिला त्या माळाचा, त्या जीवनाचा तिरस्कार वाटू लागला. तिनं तो माळ सोडून दूर जाण्याचा हट्ट घेतला.

मग येमूनं आपलं पाल मोडलं, गाढवावर लादलं. तसे सर्वच भिकारी उठले नि तो माळ सोडून निघाले.

येमू दुर्गाला घेऊन दूर दूर जाण्याचा विचार करून निघाला होता. बाजूनं दगड्या बोकड एका गाढवाबरोबर चालत होता. कुठं जायचं हे कुणालाच ठाऊक नव्हतं.

पण दुर्गाचा आत्मा यंकूच्या गोरीभोवती घुटमळला. ती म्हणत होती, "बापा, मी जात्ये. मी सासरी निघाल्ये. तू आता मला दिसणार न्हायीस. तुझी दुर्गा तुला दिसणार न्हाई. माझा सुखी संसार पाहायला तू दोन दिवसही जगला नाहीस. माझ्या लग्नापर्यंत जगला नाही. माझ्या लग्नापर्यंत जगायचं म्हणून तू सर्व काही करीत होतास. गंग्या नि रंगी ही नशीबवान, इमान ठरली. त्यांनी तुझं इमान राखलं. तुझ्या अन्नाला ती जागली. ती दोघं चिरंतन तुझ्याजवळ राहणार. तुझ्या हाडांबरोबर त्यांचीही हाडं मातीला मिळणार—

— पण तुझी दुर्गा सासरी जात आहे. तिला आशीर्वाद दे!"

अखेर येमूनं तिला धरून तिची समजूत घातली. आणि मंद पावलं टाकीत दुर्गा निघाली. पुन: पुन: ती मागं परतून पाहत होती. यंकूची गोर पाहून तिचा आत्मा पेटत होता.

पण आता त्या गोरीत यंकू चिरनिद्रा घेत होता. तो कष्टातून, संकटातून, साऱ्यातून मुक्त झाला होता.

# संघर्ष

## १

कोल्हापूरचा बिंदू चौक श्रावणातील रेशमी पावसात भिजत होता. ऊन, वारा नि पाऊस यांना चेव आला होता. बिंदू चौकापासून न्यायमंदिराकडे गेलेला रस्ता अंगावर पाऊस घेत लोळत होता. त्याच्या अंगावरचे सर्व मांस पावसाने खरवडून काढल्यामुळे तो रस्ता खडबडीत झाला होता; आणि एक टांगा त्या मार्गानं निघाला होता. एक हाडाचा सांगाडा झालेले घोडे त्या दुर्दशा झालेल्या रस्त्याने आपला टांगा ओढीत होते आणि जुनाट टांगा करकरत होता.

टांगेवाला नुसताच हा ऽ हू करीत होता. तो आपल्या घोड्याला दबवीत नव्हता की मारीत नव्हता.

परंतु सुलभाला ते सर्व असह्य झाले होते. तिला लवकर जाऊन शेवटची एस. टी. गाठायची होती. परंतु ते घोड्यासारखे घोडे गाढवाप्रमाणे गुदमरत होते. त्यामुळे ती अस्वस्थ झाली होती.

सुलभाला आज सकाळीच तिच्या वडिलांची - बाबा पाटलांची — तार आली. त्या तारेत 'सुलभा लवकर नीघ' एवढाच मजकूर होता. तार वाचून ती बेचैन झाली होती. असे अचानक काय झाले असेल या विचाराने तिचा जीव वाराहुरा झाला होता आणि 'मी शेवटच्या एस.टी. नं येत आहे', अशी तिनं उलट तार करून 'मी नक्की येत आहे, कासेगाव स्टँडवर कुणीतरी यावं' असं कळवले होते. नंतर तिने कॉलेजची सुट्टी काढून आपली तयारी केली होती. आपल्या सर्व मैत्रिणींना भेटून ती गावी निघाली होती. तिला घरी जायची घाई झाली होती. ती मनात चरफडत होती.

परंतु ते घोडे पळत नव्हते. त्याला कसलीच काळजी नव्हती. ते पावसात भिजत खुशाल हळूहळू चालत होते. शेवटी ती वैतागून म्हणाली,

''मला लवकर जायचं आहे. शेवटची एस. टी. मला मिळालीच पाहिजे!''

आणि टांगेवाल्यानं चाबकाचा दांडा चाकावर खडाखडा वाजवीत उत्तर दिले, ''बाईसाहेब, काळजी करू नका. एस. टी. चा बाप मिळेल!''

''म्हणजे काय?'' ती आश्चर्यानं उद्गारली.

"म्हंजी काळजी करू नका." टांगेवाला म्हणाला, "एस. टी. मिळणार."

असं म्हणून तो बेदरकार समोर पाहू लागला. एक रोडकी म्हैस पुढं आली तिला तो टांगेवाला ओरडला, "ए ऽ ऽ मावसे, तुला दिसत नाही का? अग माझी तुफान मेल येतीया... चल ऽ ऽ"

ते ऐकून सुलभाला हसू आले, परंतु ते दडवून ती म्हणाली, "पण या वेगानं मला शेवटची एस. टी. कशी सापडणार?"

"म्हंजी असं हाय बाई", टांगेवाला म्हणाला, "हे घोडं हाय गंजेडी, म्हंजी तऱ्हेवाईक, याला दणका दिला की ते पुढं जायच्या ऐवजी, मागं पळत सुटतं. पण काळजी करू नका. एस. टी. मिळणार."

"अहो, एस. टी. मिळून काय, मला बसायला जागा मिळाली पाहिजे." सुलभानं तक्रार केली आणि टांगेवाला गंभीरपणे म्हणाला, "अहो एक जागा काय, शंभर मिळतील."

"अहो मोटारीत शंभर जागा नसतात." सुलभाला राग आला.

"अवं तुमास्नी शंभर जागा काय करायच्या — एक शीट मिळाली म्हंजी बस झालं!" टांगेवाला म्हणाला.

मग सुलभा काहीच बोलली नाही नि टांगेवाल्यानं घोड्याच्या ढुंगणावर एक दणका दिला. त्या बरोबर त्या घोड्यानं दुडकी चाल धरली. ते पळू लागताच सुलभाला बरे वाटले. पुन्हा तिचे मन घरी गेले नि घरी काय झाले असेल याचा ती विचार करू लागली.

आता टांगा चांगला पळत होता. पाऊस थांबला होता. पण वारा तिच्या पदराशी झोंबत होता.

"तुमास्नी कंची एस. टी. पायजी?" टांगेवाल्याने वळून विचरले.

"कोल्हापूर — कऱ्हाड" सुलभाने उत्तर दिले.

स्टँडवर येताच टांगेवाल्याने दणकन उडी टाकली नि घोड्याच्या पाठीवर थाप मारीत म्हणाला,

"हं बाईसाहेब, घ्या बरं आपली एस. टी. बघा कशी निवांत हाय. जणू गोट्या म्हैस."

सुलभानं टांग्याचं भाडं दिलं नि मोटारीत चढली. बॅग खाली ठेवून तिनं सर्वत्र नजर फिरवली. दहाबारा माणसं मोटारीत बसली होती. त्यापैकी काही विड्या फुंकीत होती. काहींनी पानाचे तोबरे भरले होते आणि खिडकीतून पिचकाऱ्या मारीत होती. सुलभाला पाहाताच ते सर्व प्रवासी बावरले. कित्येक डोळे स्थिर झाले नि पायाच्या नखापासून ते डोक्याच्या केसापर्यंत तिला न्याहाळू लागले.

ती चपापली. मग तिच्या कपाळावर एक आठी उमटून मावळली नि एका सीटवर खिडकीपाशी ती शांत बसली आणि पदर सावरीत तिने आपला देह झाकून घेतला.

तिच्या पाठीमागच्या सीटवर एक मजबूत नि भरदार देहाचा माणूस बसला होता. त्यानं डोकीत पांढरी टोपी घातली होती. पैरण लाल मातीनं मेंचटली होती नि तो काळा होता – अगदी सह्याद्रीच्या काळ्या खडकासारखा दिसत होता. त्याचे डोळे तांबडे नि रखरखीत होते. तो एकटाच सुलभाकडे पाहत होता.

आणि त्याची ती पाहण्याची तऱ्हा पाहून सुलभा मनात भ्याली. हा भयंकर माणूस मला का निरखीत आहे, याची ही नजर माझ्या अंगावर निखाऱ्याप्रमाणे का धगधगत आहे याचा ती विचार करत होती.

मग त्याची ती नजर तिच्या विशाल अशा अंबाड्यावर स्थिरावली नि तो तिचे केस किती लांब असतील याचा विचार करावा तसा तिचे केस पाहू लागला.

सुलभानं सहज मागे वळून पाहिले. तो आपले रुंद खांदे, रसरशीत दंड नि गोरापान देह पाहण्यात दंग झाला आहे असे तिला वाटले आणि तिने समोर पाहिले. पुढे एक काच होती नि त्या काचेत तो माणूस तिला दिसू लागला. ती मनात म्हणू लागली, आता आपण मुळीच वळून पाहायचं नाही. मेली पीडाच झाली! असेना का, तो काय करणार आहे, असं म्हणून ती खिडकीबाहेर पाहू लागली. परंतु त्या माणसाविषयीचा विचार तिची पाठ सोडीत नव्हता, पण मी त्याला का भ्यावे? अशी माणसं जगात असतील. तो मला काहीच करू शकणार नाही आणि तो कासेगावलाच उतरणार नाही. तो पुढं जाईल किंवा मध्येच उतरून आपल्या घरी जाईल आणि जरी तो कासेगावला उतरला तरी काय, काशीनाथ गाडी घेऊन येणारच आहे...

सुलभा विचार करीत होती.

पण जर ही मोटार उशिरानं कासेगावला पोहोचली आणि काशीनाथ वाट पाहून परत गेला तर?...

तर मी पुढं कशी जाणार? दोन मैल मी एकटी कशी जाणार?...

बरं, कासेगावात वस्ती करावी, तर कुणाच्या घरात? मी एकटी ही रात्र कशी काढणार?...

आता यातून मार्ग कोणता?

आणि समजा, मी एकटी पुढं निघाले आणि हा माणूसही माझ्याबरोबर येऊ लागला तर त्याला मी कशी टाळू शकेन?...

हळूहळू प्रवासी येऊन मोटार गच्च भरली नि नंतर एक हडकुळा कंडक्टर मुरकंड देऊन गाडीत शिरला. त्यानं सर्व प्रवाशांच्या टाळक्यावरून नजर फिरवली; आणि धनगरानं आपली मेंढरं मोजावी तद्वत सर्व प्रवाशांची गणती केली नि खुशीत येऊन

घंटीच्या दोरीला एक जोराचा हिसका दिला.

तशी मोटार टरटरली नि चालू लागली आणि कंडक्टरने ओरडून सामुदायिक सवाल केला, "हं बोला ऽ ऽ तिकीट घ्यायचं कोण बाकी आहे का?"

"मी ऽ" सुलभानं हात उंचावला.

"हं बोला, कुठं ऽ" कंडक्टरने विचारले.

"कासेगाव ..." सुलभा बोलली.

"मग द्या तर कोरी करकरीत दोन रुपयांची नोट आणि वर पन्नास एन. पी. म्हणजे पन्नास नवे पैसे ..." कंडक्टर किंचाळला. तो सुलभाचं रूप, तारुण्य पाहून भलताच रंगात आला होता. त्यानं हाताचा अंगठा जिभेवर ओला करून एक तिकीट उपटलं नि सुलभाकडे पाठवलं. नंतर प्रवाशांच्या हाताहातावरून सुलभाचे पैसे कंडक्टरला पोहोचले. ते पिशवीत टाकून कंडक्टर एका प्रवाशाला म्हणाला, "हं, बोला पाव्हणं, तुमची तिकीट कुठली उपटू ..."

"धुनकी –" तो प्रवासी उत्तरला.

नंतर कंडक्टर दुसऱ्या प्रवाशाकडे वळून आवाज चढवून म्हणाला, "हं सांगा सरकार, तुमची कुठली फाडू तिकीट?"

कंडक्टरचा भयंकर विनोद ऐकून काही प्रवासी मोठ्याने हसले.

नंतर कंडक्टर त्या पैलवानाकडे मोर्चा फिरवून म्हणाला, "अहो पाव्हणं ऽ ए पाव्हण्या."

कंडक्टरनं दोनचार हाका मारल्या, पण पैलवान आपल्याच नादात होता. त्याने ऐकले नाही. मग मात्र कंडक्टर चिडला. म्हणाला, "ये पांढरी टोपी घातलेल्या देखण्या पाव्हण्या."

पांढरी टोपी म्हणताच पैलवान भानावर आला. परंतु क्षणात त्याचं डोकं फिरलं. तो नाक फुगवून रागानं म्हणाला, "का गा, सरळ बोलायला काय घेशील?"

"तुझ्याजवळ काय आहे?" कंडक्टर हसत म्हणाला, "सरळ बोलून झाल्यानंतरच थोडंसं वाकडं बोलणं भाग पडलं. काय हातभट्टी मारलीय वाटतं?" कंडक्टरनं शेवटी हाताचा आंगठा तोंडाला लावून मोठ्यानं प्रश्न केला.

"आम्ही कायबी मारू?" पैलवान डोळे वटारून म्हणाला, "आणि आमास्नी बी वाकडं बोलता येतं बरं का?"

"मग बोला की!" कंडक्टर गुरकला.

"मग काय करशील?" पैलवानानं विचारलं.

त्याची खुरट्याएवढी छाती अधिकच रुंदावली. सर्व प्रवासी ऐकू लागले. त्या दोघांची बाचाबाची वाढू लागली नि सुलभा गंभीर झाली.

कंडक्टर म्हणाला, ''मी काय करीन ते तुला नाही कळायचं, बरं का माझ्या वासरा!''

''आता तोंड आवरून बोल.'' त्या हाडाच्या सापळ्यानं वासराची उपमा दिल्यामुळे पैलवान खवळला नि म्हणाला, ''तुझा जीव चिलटावाणी हाय, हे डोस्क्यात घे.''

''आरं, मग बघ आता माझा चिलटाचा हिस्का -'' असं बोलून त्या रागीट कंडक्टरनं ठणकन एक घंटी मारली आणि गप्पकन मोटार थांबवली. तिला कर्रकन ब्रेक लागला. सर्व प्रवासी बावरले नि आता नक्कीच रात्र होणार असं आपापसात बोलू लागले. सुलभा मनात भ्याली.

''टपावर पेटी कुणाची आहे?'' कंडक्टरने विचारले.

''माझी हाय. का?'' पैलवान उत्तरला.

''तिचं वजन केलंस का?'' कंडक्टरने दुसरा प्रश्न केला.

''न्हाय -'' पैलवान बोलला.

''मग उतर पेटी आणि जाऊन तिचं वजन करून ये. पळ -'' कंडक्टरने पळ या शब्दावर जोर दिला.

''आता चार मैल पळत जाऊ?'' पैलवानानं विचारलं.

''मला विचारू नको.'' असं बोलून कंडक्टर मोटारीतून खाली उतरून एका बाभळीच्या झाडाखाली बसून आरामशीर विडी फुंकू लागला.

आणि ड्रायव्हर हातातील चाकावर डोकं टेकून निवांत विश्रांती घेऊ लागला

परंतु गाडीतील प्रवाशांचे धाबे दणाणले. सर्वांच्यापुढे अंधार दाटला नि त्या अंधारात प्रत्येकापुढं भुते नाचू लागली! काहींना चोर दिसू लागले. काहीजण स्टँडपासून आपले गाव किती दूर आहे, किती मैल आहे याचे मोजमाप करू लागले आणि आज वेळेवर घरी जात नाही अशी सर्वांची खात्री झाली.

नंतर सर्व लोक पैलवानावर घसरले, ''काय पैलवान, कशासाठी हा तमाशा?''

''काय मिळवलं वं पैलवान?''

''आता आम्हाला रात्र होईल त्याचं काय?''

सर्व प्रवासी एकदम ओरडू लागले आणि त्या भडिमारानं पैलवानाची पुरती भंबेरी उडाली नि तो खजील झाला.

नंतर प्रवाशांचे एक शिष्टमंडळ कंडक्टरकडे झाडाखाली गेले. त्यांनी याची क्षमा मागितली - हात जोडले, पैलवानाला शिव्याशाप दिले.

तेव्हा कुठं कंडक्टरचं डोकं शांत झालं. मग तो उठला. त्यानं ढुंगणाला चिकटलेली कुसळं झाडली नि मोटारीत आला. म्हणाला,

''काय पैलवान, मी काय करू शकतो ते समजलं का?''

''व्हय. समजलं रं बाबा — समजलं.'' पैलवान म्हणाला, ''खरं हाय. तुझाच रेडा

हंडाभर दूध देतो आणि आमची म्हैस अंडी घालते. आता चल.''

''गाव कोणतं?'' कंडक्टरनं दाबात विचारलं.

''तिकडं कृष्णा खोऱ्यात मानगाव म्हणत्यात आणि या पिंडाला दामू दाभाडे म्हणत्यात.'' पैलवान बोलला, त्यावेळी न कळत दाभाड्याची छाती फुगली, पण तो पुढं बोलला नाही.

''तिकिटं कुठली देऊ?'' कंडक्टरनं रुबाबात विचारलं.

''द्या कासेगाव.'' दाभाडे बोलला.

आणि सुलभाच्या काळजात धस्स झाले. अग ऽ बाई! असं ती ओठात उद्गारली आणि बाहेर पाहू लागली.

ती मोटार वेगानं पळत होती. सूर्य मावळत होता. त्याची किरणं धरणीला गोंजारून निरोप घेत होती नि समोर सह्याद्री शांत उभा होता. हिरवीगार घनदाट झाडी पिवळ्या किरणात न्हाऊन निघाली होती. ती डोळे दिपवीत होती. आडव्या सावल्या हळूहळू काळ्या होऊन अंधाराचं रूप धारण करीत होत्या. झाडाझुडपाखाली काळोख गोळा होत होता.

सुलभाचं हृदय धडधडत होतं. ती स्वत:लाच विचारीत होती. काशीनाथ गाडी घेऊन आला असेल का? आणि तो शेवटच्या मोटारीची वाट पाहील का? जर तो वाट पाहात थांबला नाही तर विपरीत होईल. मग मी काय करू? शिवाय ही पीडा पाठीमागे आहेच!

सूर्य आपल्या वेगानं बुडाला नि त्या खोऱ्यात अंधार झाला. मग कडुसं पडलं, नि वातावरण भयाण भासू लागलं. काळोखानं आपली पकड वाढवली.

आणि कासेगाव आलं, कंडक्टर ओरडला -

''च ऽ ऽ ला कासेगाव —''

तशी सुलभा धडपडून उठली आणि आपली बॅग घेऊन मोटारीतून उतरून धडधडत्या अंत:करणानं काशीनाथला पाहू लागली.

कंडक्टर उतरून चहाच्या हॉटेलपुढं गेला. एक सिगारेट पेटवून झुरके मारू लागला आणि दाभाडे आपली पेटी घेऊन त्यामागं जाऊन त्यानं कंडक्टरच्या कमरेत एक जोरदार लाथ घातली, तसा कंडक्टर चेंडूप्रमाणे उडून दूर जाऊन पडला. दाभाडेनं पेटी खाली ठेवली आणि पुन्हा तो धावला. लोक पुढे झाले. राहू द्या, राहू द्या, असा गलका वाढला. काही लोकांनी दाभाडेला आवरला नि कंडक्टरनं आता हाडकं मोडणार हे जाणलं नि त्यानं जोरदार पळ काढला. तो मोटारीत शिरून दार बंद करून घंटी वाजवीत म्हणाला, ''रामभाऊ, गाडी पळवा!''

तशी गाडी भुर्रकन निघून गेली.

"सुलभा—" काशिनाथ हॉटेलातून येऊन त्यानं तिला हाक मारली. त्या बरोबर ती धावत पुढं गेली. तिचा जीव डोंगराएवढा झाला. तिच्याजवळची बॅग गाडीत टाकून काशिनाथानं बैलाचे कासरे हाती घेतले. सुलभा गाडीत चढताच बैल चालू लागले आणि दाभाडे ओरडला, "आवं पाव्हणं, कंच्या गावची गाडी हाय?"

"शेवरवाडीची—" काशिनाथ उत्तरला. आणि दाभाडे खांद्यावर पेटी घेऊन म्हणाला,

"मग काय देवच पावला. मला त्या तांबखडीपातुर घेऊन चला, कारण म्होरल्या पांदीत चिखुल हाय—"

असं म्हणत दाभाडेनं आपली पेटी गाडीत टाकून स्वत:ही काशिनाथ जवळ चढून बसला. म्हणाला, "मी मानगावचा दामू दाभाडे—"

घरच्या ओढीनं बैल चालू लागले. एक समाधानाचा सुस्कारा टाकून दाभाडे चंची काढून पान खाऊ लागला.

"ही गाडी कुणाची?" दाभाडेनं विचारलं.

"शेवरवाडीच्या बाबा पाटलांची." काशिनाथ उत्तरला.

सुलभा ऐकत होती.

"मग काय, आमचीच हाय गाडी. दाभाडेला काशिनाथानं ओळखलं नि ते दोघं पान खाऊ लागले. तेव्हा सुलभा हसली नि निर्भय झाली. ती मनात म्हणाली 'मी उगीच भ्याले होते.'

ती गाडी एक चढण चढली नि दाभाडे म्हणाला, "हो ऽ ऽ उभी करा गाडी. आता मी झोकात जातो. रामराम—"

गाडी थांबली. दाभाडे उतरला, नि पुन्हा रामराम करून आपली पेटी घेऊन माळानं ढांगा टाकीत चालू लागला.

त्या ओसाड माळानं दाभाडेची ती प्रचंड आकृती दूर दूर जात होती नि सुलभा पहात होती. दाभाडे दूर गेल्यावर — पार दिसेनासा झाल्यावर ती म्हणाली, "दादा, घरची माणसं कशी आहेत."

"सारी खुशाल."

"मग मला तार का केली?"

"ते तू घरी जाऊन आबास्नी इचार—"

"परंतु मी किती भ्याले याची तुम्हाला कल्पना आहे का?"

"पण त्येला कुणी काय करायचं! आबांचा हेकट स्वभाव तुला ठावं न्हाय का?" काशीनाथ बोलला. सुलभाचं मन चिंतामुक्त झाले. तिला आनंदाची आठवण झाली; आणि आता घरी जाताच आनंदाची भेट होईल या विचारानं ती पुलकित झाली नि मग

आनंदाचा विचार करू लागली. तिच्या डोळ्यापुढं आनंदाची मूर्ती तरळू लागली.

सुलभा धावतच घरात गेली नि आईच्या — शेवंताबाईच्या गळ्यात पडली. हसली नि मग तिनं आपल्या धाकट्या बहिणीला — जाईला उचलून घेतली नि सोप्यात येऊन म्हणाली, "आबा, बरं आहे का?"

"ह्याक आहे." बाबा पाटील सोप्यात निवांत बसला होता. तो म्हणाला, "आता माझी चिंता दूर झाली."

"कसली चिंता?" सुलभानं विचारलं, "आधी हे सांगा — की मला तार का केली?"

"खुळा म्हणून!" बाबा पाटील हसला. सुलभा त्याच्याजवळ बसली नि तिच्या पाठीवरून हात फिरवीत पाटील म्हणाला,

"सुलभा, उद्या श्रावणातील सरता सोमवार आहे. उद्या सारा कृष्णा खोरा कृष्णाबाईकाठी सागरूबाच्या घाटावर जमणार आणि आजपर्यंत मी दरसाल आपली मुलंबाळं घेऊन नियमानं कृष्णाकाठी जाऊन कृष्णामाईचं दर्शन घेत आलो आहे. आणि या वर्षी एक लेकरू कोल्हापुरात टाकून मी सागरूबाला कसा जाणार बरं!"

"परंतु आबा, मी फार भ्याले की!" सुलभा बोलली नि बाबा पाटील शांतपणे म्हणाला,

"तुम्ही आजकालची पोरंच तशी निपजता. स्वत:च विचार करून स्वत:च गांगरता. अग, आम्ही जुनी माणसं, आमचा धोपटमार्ग. आम्ही आपली चाकोरी कधीच सोडत नाही. आम्ही वर्षातून एक दिवस कृष्णाकाठी जाऊन स्नान केले, की आमचा आत्मा शांत होतो नि मग वर्षभर तो कृष्णाकाठ डोळ्यांपुढून हालत नाही.

"पण या वर्षी मी एकटी नसते तर काय बिघडलं असतं?" सुलभाने विचारले आणि नकारार्थी मान हलवीत आबा पाटील म्हणाला,

"तसं नाही — एकदा आमचा करार झाला की कधीच मोडीत नाही, आणि कधीच मोडणार नाही. माणसानं कसं खडकासारखं असावं असं आमचं मत आहे."

"परंतु मला आज आठ दिवसांची सुट्टी काढून जीव मुठीत घेऊन पळत यावं लागलं." सुलभा बोलली.

"आठ तर आठ — काही बिघडत नाही" पाटील म्हणाला. नंतर सुलभा काहीच बोलली नाही. ती आईला घेऊन बाहेर पडली आणि आळीतील आपल्या आप्तांना भेटली. बरोबरीच्या मुलींच्या गळ्यात पडली. आणि आनंदच्या अंगणात येऊन थांबली. घरातील कानोसा घेऊन ती जाईला हळूच म्हणाली, "जाई, घरात जाऊन आनंद आहे का ते

पाहून ये, पळ—''

तशी जाई धावत जाऊन आली — म्हणाली, ''आनंददादा मास्तरांच्या घरी गेलाय.''

''तू काय विचारलंस?''

''मी कृष्णाबाईला म्हटलं, आनंददादा कुठाय, त्याला आमची ताई बोलवतीया.'' जाई उत्तरली.

''अग ऽ असं विचारलंस?'' असं बोलून सुलभाने जीभ चावली नि म्हणाली, ''मग कृष्णाबाई काय म्हणाली?''

''तिनं तुला घरात बोलवलंय.'' जाई उत्तरली.

आणि सुलभा जाईला घेऊन घरात गेली. तिला पाहताच कृष्णाबाई चटकन उठली. तिनं सुलभाच्या दोन्ही गालाला दोन हात लावून तिची अलाबला घेतली, मग बसायला पाट दिला, आणि लगेच ताट वाढलं. नि सुलभा आनंदची वाट पहात एकएक घास घेऊ लागली. ती बाहेरचा कानोसा घेत जेवत होती. पण तिचे डोळे आनंदच्या वाटेकडे लागले होते. नि ती गालात हसत होती. समोर भिंतीवर सुभेदार दादासाहेब पाटील यांचा लष्करी पोषाखातील एक भव्य फोटो लावला होता आणि त्या फोटोच्या खाली असलेल्या देवळीत एक दिवा जळत होता, त्याचा कापरा नि तांबूस प्रकाश सुलभाच्या चेहऱ्यावर थरथरत होता. त्यामुळे प्रकाश नि हास्य यांचा गोड संगम तिच्या गोऱ्या गालावर झाला होता नि ती अधिकच मोहक, आकर्षक भासत होती. तिच्या हृदयात एक गोड हुरहूर सारखी वाढत होती.

कृष्णाबाई एकटक सुलभाला न्याहाळत होती. मला या सुलभासारखीच सुंदर सून मिळावी हा विचार तिला सुखवत होता.

सुलभाचं जेवण संपलं. आनंद आला नाही यामुळे तिची निराशा झाली. ती अस्वस्थ होऊन घरी जायचा विचार करू लागली नि कृष्णाबाई म्हणाली; ''सुलभा, तू कशी आलीस?''

''तार आली होती सागरुबाला जाण्यासाठी—'' सुलभा बोलली.

''एक गोष्ट बोलू?'' कृष्णाबाई म्हणाली.

''बोला की!'' सुलभा हसली.

''हे बघ सुलभा, मुलीचा जन्म सोन्यासारखा असतो, आणि सोन्याचा साज घडवला जातो. पण सोन्यात लोखंड हे कधीच मिसळत नाही.''

''मला हे समजले नाही.'' सुलभा बोलली.

''म्हणजे मला असं म्हणायचंय, की तू हा सोन्यासारखा जन्म घेऊन आली आहेस तेव्हा सावध राहा, आणि हे सोनं कुणा घिसाड्याच्या पदरात टाकू नको.'' कृष्णाबाईनं खुलासा केला.

आणि एकाएकी सुलभा गंभीर झाली. नंतर कृष्णाबाईच्या बोलण्यातील अर्थ ध्यानी येताच ती हसली आणि जाईला घेऊन घरी आली.

मध्यान रात्र झाली होती. पण सुलभाला झोपच लागत नव्हती. तिच्या हृदयात एक वादळ उठले होते. ती अंथरुणावर पडून आढ्याकडे पाहात विचार करीत होती. आनंदचे प्रेम, नि कृष्णाबाईची माया, आणि माझे सुंदर स्वप्न या सर्वांचे काय होईल– मला आनंदचे प्रेम चिरंतन मिळेल का? ते जर मिळाले तर कृष्णाबाईची माया द्विगुणित होईल नि मी खरोखर सुखी होईन...

सुलभाचं मन पाखराप्रमाणे भूतकाळातील आठवणींचे कण टिपायला लागले.

सुलभा अकरा वर्षांची होती. आनंदला बारावं पूर्ण झालं होतं. दोघांच्या वयात फक्त एक वर्षाचं अंतर होतं.

दोघांची घरं जवळ जवळ होती. दोन घरात अंतर नव्हते. फक्त एक भिंतच होती.

ती दोन घरं उभ्या गावात सुखी नि मातब्बराची म्हणून मानली जात होती. कष्टाळू आणि अब्रूदारांची घरं म्हणून लोक तिकडे बोट दाखवीत होते.

आनंदचे वडील सुभेदार दादासाहेब पाटील हा मोठा करारी होता; त्यानं सारी हयात लष्करात काढली होती नि मोठा लौकिक मिळवला होता. त्यासाठी त्यानं आपला देह रणमैदानावर ठेवला होता.

त्यावेळी दुसरे महायुद्ध अंतिम पर्वात आले होते जपानी फौजा आराकान आघाडी फोडून भारतामध्ये मुसंडी मारू पाहत होत्या नि त्या आघाडीवर सुभेदार दादासाहेब पाटील लढत होते, शत्रूला इंचभरही पुढे येऊ देत नव्हते.

पुढं युद्धाचा शेवट जवळ आला. एकोणीसशे चव्वेचाळीस साल उगवले आणि एका रात्री हातघाईच्या लढाईत दादासाहेब कामी आले. त्यांना वीरमरण प्राप्त झाले. त्यांनी भारताच्या सीमेवर लढता लढता आपला देह ठेवला.

त्यावेळी आनंद अवघा दोन वर्षांचा होता. त्याच्याकडे पाहूनच कृष्णाबाईनं पती-निधनाचे दु:ख गिळले नि एका मुलासाठी जगायचे म्हणून तिने कंबर बांधली ... हा राळ्याएवढा आनंद मी मेरूएवढा करीन असा तिने निर्धार केला.

सुलभाचे वडील बाबा पाटील गावचे पोलीस पाटील होते; आणि तो एक मोठा

असामी म्हणून ओळखला जात होता. उभा गाव बाबा पाटलाच्या शब्दाला मान देत होता. शिवाय तो भलताच तापट नि हेकट स्वभावाचा होता. त्यामुळे लोक त्यांना भीत होते. गावची नि परगावची बेरकी माणसं त्याला बिचकत होती.

परंतु सुलभाची आई शेवंतीबाई ही एक प्रेमळ, दयाळू बाई म्हणून गावात नावाजली होती. लोक तिला काकू म्हणत होते नि तीही गोरगरीबांची गरज करत होती. तिच्या दारी आलेला गरीब रिकाम्या हाताने कधीच जात नसे. ती पैशानं दान करीत नव्हती ... ती सुपानं भीक घालीत होती!

सुलभा आणि आनंद ही दोघं त्यावेळी शाळेत जात होती आणि एकाच वर्गात शिकत होती. ती दोघे घरातून जाताना बरोबर जात होती. नि शाळा सुटली की बरोबरच घरी येत होती. त्यांना एकमेकांचा क्षणभरही विसर पडत नव्हता.

भर दुपार झाली होती. गावातील वातावरण मुकं झालं होतं. तापलेलं वारं बोळाबोळानं पळत होतं. त्या धगीनं कोंबडी पांगुळली होती. कुत्र्याच्या जिभा त्यांच्या तोंडात ठरत नव्हत्या. लहान पोरं सावली पाहून खेळत होती.

बाबा पाटलाच्या सोप्यात शेवंताबाई आणि कृष्णाबाई बोलत बसल्या होत्या.

आनंद आणि सुलभा शाळेतून आली. आपापल्या घरी गेली. आई येऊन जेवण वाढील याची वाट न पाहता स्वत:च वाढून घेऊन आनंदा सोप्यात जेवू लागला. आमटी, भाकरी, दही, गूळ, चटणी, कांदा, पाणी याचा त्यानं सोप्यात पसारा मांडला होता नि तो एक एक पदार्थ उचलून मोठ्या चवीनं खात होता. त्याच्यापुढे एक काळं कुत्रं त्याचे घास मोजीत बसलं होतं.

थोड्या वेळाने सुलभा जेवून हुशहुश करीत आनंदच्या सोप्यात आली. चटणीनं तिचं तोंड भाजलं होतं. ती वरचेवर उलटी मूठ नाकावरून फिरवीत होती. नि मग ती मूठ परकराला घासीत होती नि सारखी नाक ओढीत होती.

''सुलभा, काय खाल्लंस?'' आनंदने गुळाचा खडा तोंडात टाकून विचारले.

''चटणी...'' सुलभा शेंबूड ओढून उत्तरली नि आनंद म्हणाला, ''मग बस की नि वाईच दही, गूळ नि भाकर खा, ये.''

''नगं बाबा.'' तिनं सर्रकन नाक ओढले.

''अग बघ तरी दही नि गूळ.'' आनंद बोलला. त्यानं परकर धरून तिला पुढं ओढली.

''अग दोन घास.'' आनंद तिला खाली बसवत म्हणाला, ''सुलभा अग, बे एके बे.''

सुलभा नाकाची फुरकी वाजवून हळूच खाली बसली नि जेवू लागली आणि मग

दही, गूळ भाकरी दडपू लागली.

उशिरानं आनंदनं सुलभाच्या पोटाकडे पाहिले नि हाताने तिचे पोट दाबून तो म्हणाला,

"अग सुलभे, ही तुझी पोटाची टमकी फुटंल की... मी सांगितलं बे एके बे. तू सुरू केलंस बारा एके बारा, भऽले."

सुलभानं लाजून हात आखडला. ती हिरमुसली नि मागे सरली. म्हणाली, "नगं मला, पुरं."

"अग तुझं पोट फटकन फुटंल म्हणून म्हटलं." आनंद म्हणाला, "अग म्या थट्टा केली सुले..."

ती खुदकन हसून म्हणाली, "खरंच, नको मला..." आणि उठून घराकडे पळाली.

एकदा ती दोघे शाळेतून घरी येत होती. आनंद सुलभाच्या खांद्यावर हात ठेवून चालत होता आणि चालता चालता ती दोघे बोलत होती.

"आनंद"

"काय-?"

"तुला एक सांगू?"

"सांगा गुरुजी..."

"थट्टा करू नको."

"नाही सरकार!"

"आमचा आबा मला डॉक्टर करणार आहे."

"आणि ग?"

"मग मी औषध देणार."

"कुणाला ऽ?"

"साऱ्या गावाला. तुला सुद्धा..."

"मला..."

"हो हो, तुला..."

"मला औषध देणार! पण कसलं?"

"कसलं म्हणजे?"

"म्हणजे जगायचं का मरायचं?"

"तुला माझं खरंच वाटत नाही."

"कसं ग खरं वाटणार? चौथीतच बोंबलल्या बाराखड्या नि म्हणे डॉक्टर होणार! मी खरं सांगू का, तू डॉक्टर झालीस की माणसं पटापट मरणार..."

ते ऐकून सुलभा चिडली. ''जा मी येत नाही'', असं म्हणून तिनं मरगळ घेतली नि रुसून बसली.

''बरं नको!'' असं म्हणून आनंद पुढं चालू लागला. तेव्हा ती त्याच्या मागून हळूहळू चालू लागली.

सुलभा घरी येताच तिने दप्तर देवळीत कोंबलं नि बाहेर पडली.

आनंद जेवला आणि मळ्यात गेला. मळ्यात जाऊन पाहतो तो विहिरीजवळच्या एका पेरूच्या झाडावर सुलभा चढली होती नि ती पेरू तोडून ओटीत भरीत होती नि त्याचबरोबर काही पेरू खात होती.

आनंदने ते सर्व दुरून पाहिले आणि मग तो पुढे गेला. त्याने विचारले, ''ए सुलभे, हे काय चालले आहे?''

तशी ती घाबरली आणि खाली उतरून अपराध्याप्रमाणे उभी राहिली.

आनंदने विचारले, ''सुलभा, काय हे?''

''मी-मी पेरू तोडले.'' सुलभा बोलली.

''का तोडलेस?''

''डॉक्टर झाल्यावर माणसं मारीन असं तू का म्हणालास?'' सुलभाने विचारले.

आनंदने तिच्या डोकीत एक टपली मारली तशी ती त्रागा करून थयथय नाचू लागली आणि मोठ्याने ओरडू लागली. त्यामुळे आनंद घाबरला. म्हणाला, ''सुलभे, मी थट्टा केली. चल, आपून पेरू खाऊ...''

तशी सुलभा शांत झाली. ती म्हणाली, ''तू मला गरीब कां समजतोस?''

''तू गरीब नाहीस ग...'' आनंद म्हणाला नि मग ती मळ्यातील घरात बसून तोडलेले पेरू खात बसली. ती म्हणाली,

''तू मला मारणार?''

''मुळीच नाही...''

''बघ, मला मारू नको.''

''नाही.''

''आणि कधी भांडू नको.''

''नाही भांडणार.''

''कधीच भांडणार नाही.''

''आणि मी जे बोलेन ते तू ऐकून घ्यायचं.''

''ब ऽ रं बाबा ऽ!''

''आणि मी रुसले तर तू रुसायचं नाही.''

''हे बी कबूल आहे.''

हे ऐकून सुलभा हसली...
आणि मग ती दोघं हसत घरी आली.

आणि एकमेकांचे हात धरून ती दोघं परीक्षेची एक-एक पायरी चढू लागली.

त्या दोघांचे देह वाढत होते; नि त्यांचे विचारही वाढत होते. आणि त्या दोघांच्या हृदयात एकमेकांबद्दल आदर वाढत होता. निष्ठा दृढ होत होती.

आणखी काही दिवस उगवून मावळले.

आणि सुलभाचा देह हळदीच्या कोंबाप्रमाणे फुलारला– तिला बहर आला. तर आनंदच्या शरीराला तुफान भरती आली. त्याच्या पिळदार देहाला नि रुबाबाला दृष्टच लागत होती.

आणि हळूहळू त्या दोघांच्या बालपणीच्या मैत्रीला नि:सीम प्रेमाचा गुलाबी रंग चढला! ती दोघं एकमेकाला क्षणभरसुद्धा विसरत नव्हती. परस्पराला पाहिल्याशिवाय ती दोघं अन्न खात नव्हती. आता प्रेम म्हणजे काय याची त्यांना कल्पना आली होती. त्या दोघांत नवे नाते निर्माण झाले होते, नवी ओढ वाढली होती.

पुढे त्या दोघांच्या पायाखालील एका वाटेला फाटा फुटला. सुलभा कोल्हापूरला मावशीजवळ राहून कॉलेजात शिकू लागली नि आनंद साताऱ्यात कॉलेजमध्ये दाखल झाला – त्यांचे प्रेम दुभंगले. परंतु ती दोघं मनानं एक होती. पत्रानं ती आपले प्रेम जोडत होती, नि कॉलेजला सुट्टी पडली की मग एकाच दिवशी घरी येत होती आणि गावी आले की मग ती दोघं कित्येक दिवसांचं बोलत होती. एकमेकांना पाहत होती नि फिरत होती.

बाबा पाटील हे सर्व पाहत होता, पण बोलत नव्हता. किंवा सुलभाला आनंदकडे जायला तो बंदी करीत नव्हता.

आता महिना होईल नि सुलभा परत जाईल असं तो स्वत:ला सांगत होता.

पुढे आनंद बी.ए. ला पहिला आला तर सुलभा इंटरला पहिली आली. परंतु आनंदच्या पुढील शिक्षणाला कृष्णाबाईंनी विरोध केला. ती म्हणाली, "आनंद, आता तुझे शिक्षण पुरे... तू कोठेतरी नोकरी पाहा."

आनंद काहीच बोलला नाही. त्यानं त्याच घडीला कॉलेज सोडले नि घरी येऊन नोकरीसाठी अर्ज करू लागला.

आनंदनं कॉलेज सोडलं तेव्हा बाबा पाटलाला बरं वाटलं.

सुलभा कोल्हापुरात शिकत होती आणि आनंदला घरी पत्र लिहीत होती नि वरचेवर येऊन भेटून जात होती.

दिवस उगवला की आनंद पोस्टाची वाट पाहत होता. सुलभाचं पत्र आणि अर्जाचं उत्तर यापलीकडे तो कसलाच विचार करीत नव्हता. टपाल येईपर्यंत पोस्टात जाऊन वाट पाहत बसत होता. तो घरी होता, पण त्याचा आत्मा कोल्हापुरात घुटमळत होता.

सुलभाचा डोळा लागला आणि पहिला कोंबडा आरवला, तसा बाबा पाटील धडपडून उठला. मग त्यानं सर्वांना उठवलं आणि कृष्णाकाठी सागरूबाच्या घाटावर जाण्याची तयारी केली. काशिनाथानं गाडी जुंपली.

२

वाळूत पाणी मुरावे तद्वत रात्र प्रकाशात विरघळत होती.

पूर्वेला एक शेंदरी रंगाचा ढग पसरला होता नि त्या ढगात चैतन्याचा नवा फुलोरा फुलत होता. कृष्णाकाठचा गारठा उठला होता नि त्याला वाऱ्यानं पाठंगुळीवर घेतले होते... नि मग सर्वत्र गारठाच गारठा झाला होता!

बाबा पाटलाची गाडी झुंजुरकाच्या थराखालून पळत होती. बैलांच्या गळ्यातील चाळ वाजत होते. चाकांची धडधड नि त्या चाळांचा नाद यातून एक नवे संगीत निर्माण झाले होते.

बाबा पाटील अंगावर घोंगडं पांघरून बसला होता. सुलभा, शेवंती, जाई या एकमेकींना बिलगून बसल्या होत्या. नि काशिनाथ गाडी हाकीत होता.

सुलभा डोळे विस्फारून आजूबाजूला पाहत होती.

ती गाडीवाट माणसांनी भरून कृष्णाबाईकडे जात होती. तरुण, म्हातारे, मुले, स्त्रिया, सर्वच कृष्णाबाईचा जयघोष करीत सागरूबाकडे जात होते. बैलगाड्यांच्या धडधडाटाने वातावरण हादरत होते.

तांबडे फुटले. कृष्णाकाठ उजाळला. फलाफुलांनी गजबजलेला तो प्रदेश पाहून सुलभाचे मन आनंदाने भारावले.

काशिनाथने बैलाचे कासरे ओढले नि गर्दीपासून थोड्या अंतरावर आपली गाडी उभी केली, तशी सुलभा गाडीतून उतरली नि दोन्ही हातांची घडी छातीवर धरून ती समोर

पाहू लागली.

कृष्णा नदी दुथडी भरून संथ वाहत होती. तिच्या प्रवासात कधीच खंड नव्हता. ती दोन्ही काठची धरणी फुलवीत, पिकवीत आपला तो प्रवास करीत होती. त्या पाण्यावर नजर ठरत नव्हती. त्या पाण्यात हजार हत्तींचे बळ असूनही ती कृष्णा नदी शांत शांत भासत होती. ती महाबळेश्वराची कन्या दूरदेशी... आपल्या सासरी जात होती. तिच्या दोन्ही काठांवर असलेली औदुंबर, किंजाळ, जांभळी हे वृक्ष डोलून तिला निरोप देत होते.

हळूच विशाल सूर्यबिंब वर आले आणि त्याच्या दिव्य प्रकाशानं ती नदी उजाळली आणि ते अपरंपार पाणी सोनेरी भासू लागले.

घाटावर भाविकांची गर्दी झाली होती. मेवा-मिठाईच्या मालाच्या रांगा लागल्या होत्या. एक लाकडी पाळणा मध्यभागी फिरत होता.

माणसं कृष्णाकाठी स्नान करीत होती. काही लोक पूजा करीत होते तर कित्येक हात जोडून म्हणत होते, ''आई, आवुक्ष दे, जगलो-वाचलो तर पुढल्या वर्षी येईन.''

बाबा पाटलानं घाई केली नि पूजेचे साहित्य काढले. शेवंता, जाई आणि काशिनाथ यांना घेऊन तो नदीकडे गेला. इतक्या लोकांसमोर मी आंघोळ करणार नाही, असं म्हणून सुलभा गाडीत बसून राहिली. तिची नजर त्या हजारो लोकांवर भिरभिरत होती. इतक्यात 'सुलभा' अशी हाक कानी आली नि ती चमकली. तिने गर्रकन वळून पाहिले नि आनंदला पाहून ती हर्षभरित झाली. पटकन तिने गाडीतून उडी टाकली नि त्याच्याजवळ जाऊन त्याला निरखू लागली. धोतर, सदरा, कोल्हापुरी वहाणा अशा साध्या पोशाखात तो सायकलीवरून परत आला होता. सुलभा डोळे विस्फारून म्हणाली,

''आनंद, मी रात्री तुझी फार वाट पाहिली. कुठं गेला होतास?''

''हे पाहा, तू येणार असं जर मला आधी समजलं असतं तर मी थेट कोल्हापूरलाच आलो असतो.'' आनंद हसत म्हणाला.

''उगीच कौतुक करू नको.'' ती मोठ्यानं हसली.

आणि मग ती दोघं एका झाडाखाली बसली.

''कोण कोण आलं आहे?'' आनंदने विचारलं.

''सारं घरदार.'' सुलभा उत्तरली.

''म्हणजे आढं, पाखाडं-कवलं.'' आनंदनं विचारलं.

''तसे नव्हे रे, घरदार म्हणजे मी, आबा, आई, दादा, जाई.'' सुलभा म्हणाली, ''पण तू इकडं कसा?''

''कसा म्हणजे?'' आनंदने विचारले.

''म्हणजे असं, तू पत्रात लिहिलं आहेस की, 'सुलभा, तू गेलीस तेव्हापासून इकडे

अंधार झाला आहे.' तेव्हा मी म्हणते की तुला अंधारात वाट कशी सापडली?'' सुलभानं खवचटपणे विचारले.

''बाईसाहेब, त्याचं असं झालं,'' आनंद म्हणाला, ''इकडे अंधार होता हे अगदी खरं आहे. परंतु रात्री एक चमत्कार झाला. म्हणे एक चांदणी – म्हणजे शुक्राच्या चांदणीसारखी – ती शेवटच्या एस.टी.ने इकडे आली नि आम्हा पामरांची अडचण दूर झाली! आणि दुसरा चमत्कार हा की, आजच सूर्य उगवला आहे.'' आनंदने समोरच्या सूर्यबिंबाकडे बोट रोखले.

आणि त्याच वेळी सुलभानं आनंदवर बोट रोखून विचारले, ''तो सूर्य की हा सूर्य...''

आणि ती दोघं मोठ्यानं हसली.

''हे पाहा आनंद, आता मी आठ दिवस राहणार आहे.'' सुलभा हसत नि त्याच्या डोळ्यात पाहत म्हणाली, ''मला तुझ्याशी फार फार बोलायचं आहे. तू सांगशील तेव्हा नि तू म्हणशील तेथे येऊन मी तुला भेटेन.''

आनंद काहीच बोलला नाही. तो तिच्याकडे एकटक पाहत होता.

आनंद बोलत नाही, नुसताच पाहत आहे, हे लक्षात येताच सुलभा भुवया चढवून हसत म्हणाली, ''आनंद, तू मला हे किती दिवसांचं पाहून घेत आहेस?''

''सुलभा...'' आनंद उद्गारला.

''आनंद, मला सारं समजतं.'' ती बोलली, ''परंतु आपण थोडी वाट पाहिली पाहिजे.''

''कुणाची?'' त्याने विचारले.

''त्या घडीची...'' ती उत्तरली.

''किती दिवस?'' आनंदाने विचारले.

''फार नाही...'' सुलभा विषयांतर करून म्हणाली, ''तुझ्या नोकरीचे काय झाले?''

''सर्वत्र अर्ज करून आता उत्तराची वाट पाहत आहे.'' तो बोलला.

''किती अर्ज केलेस?'' तिने विचारले.

''गणती नाही...'' तो उत्तरला, ''थेट मुंबईपासून बंगलोरपर्यंत...''

''बंगलोरला?'' सुलभानं विचारलं, ''बंगलोरला कुणाला अर्ज केलास?''

''लष्करात, लष्करी कमिशन मिळावं म्हणून एक अर्ज मी केला आहे.'' आनंद म्हणाला.

''लष्करात–?'' ती गंभीर झाली.

''का? लष्करी नोकरी वाईट असते?''

''तसं मी कधी म्हटलं–'' सुलभा विषण्णपणे हसत म्हणाली, ''तुझे वडीलही लष्करातच नोकरी करीत होते. परंतु तू शिकायचे सोडून नोकरीसाठी अर्ज करीत

बसणे मला सहन होत नाही.''

''मग तुझं काय मत आहे?'' त्याने विचारले.

''काही नाही — आता मिळेल ती नोकरी कर,'' सुलभा खिन्न सुरात म्हणाली, ''आणि मला वाटतं तुला नक्कीच कमिशन मिळेल—''

''कारण?''

''कारण, लष्करी कमिशन मिळण्यासाठी लागणारे सर्व गुण तुझ्या ठायी आहेत.'' सुलभा म्हणाली, ''म्हणजे - शरीर, बळ, वय नि मन—''

बाबा पाटील स्नान, पूजा आटोपून आला. तो आनंदाला पाहून म्हणाला, ''काय आनंदराव, कधी आलात, झाली का आंघोळ?''

''होय, झाली की—'' आनंद उत्तरला.

''अहो, पण आमच्या सुलभाताई लाजल्या. त्यांनी स्नान केले नाही!'' बाबा पाटलांनी तक्रार केली नि सुलभाला म्हणाला, ''सुलभा, जाऊन कृष्णाबाईला हात तरी लावून ये—''

सुलभा उठली. आता येते अशी आनंदाला खूण करून, जाईला घेऊन नदीकडे गेली नि तोंड धुऊन परत आली नि बाबा पाटलानं परत निघायची घाई केली. मुलांना खाऊ घेऊन गाडी जुंपली.

''आनंद तूही चल. गाडी बरोबर तुझी सायकल येऊ दे...'' असं म्हणून सुलभा गाडीत बसली. काशिनाथनं बैलांना चुचकारताच बैल निघाले.

तोच पुढून दामू दाभाडे आला. डोकीला रेशमी पटका, अंगात नवी पैरण, खांद्याला बंदूक नि बरोबर दहा-बारा माणसं अशा थाटात तो गाडीपुढे दोन्ही हात पसरून उभा राहून म्हणाला -

''सरकार, मला ओळखलं का—?''

''काय दाभाडे, काय भानगड?'' बाबा पाटील हसत बोलला.

''भानगड बिनगड ऽ काय न्हाय.'' दाभाडे सुलभाकडे नजर टाकून म्हणाला, ''तुमच्या मेव्हण्याचा — म्हंजी मारुतीराव पाटलाचा तुमास्नी सांगावा हाय.''

''सांगा — कसला सांगावा आहे?'' बाबा पाटील बोलला.

''सांगावा असा हाय, की शेवरवाडीत जेवला असाल तर हात धुवायला मानगावला या—'' दाभाडे बोलला नि त्यानं आपल्या गळ्यातील तळहाताएवढी पेटी सरकवून सरळ केली.

बाबा पाटील विचारात पडला. म्हणाला, ''परंतु एवढा तातडीचा सांगावा देण्याचे कारण तरी काय?''

''ते तुमीच येऊन विचारा-'' दाभाडे हसला.

''ठीक आहे. तुम्ही पाव्हण्यांना सांगा की उद्याच हजर आहे.'' बाबा पाटील बोलला.

"भऽले. मी बी निघालो –" असं म्हणून दाभाडे एखाद्या राजासारखा डुलत चालू लागला. सुलभा त्याला पाहत होती.

आणि बाबा पाटलाची गाडी चालू लागली.

दुसरे दिवशी सकाळीच बाबा पाटील मानगावला गेला आणि सुलभाला हवी असलेली संपूर्ण मोकळीक मिळाली.

काशिनाथ सकाळीच मळ्यात गेला होता. जाई शाळेत गेली होती आणि शेवंताबाई काशिनाथची न्याहरी घेऊन मळ्यात जायची तयारी करीत होती.

सुलभा शांत बसून सर्व काही पाहत होती.

मग शेवंताबाई न्याहारीची पाटी भरून रानात गेली.

सर्व गावकरी शिवारात गेल्यामुळे गावातील वातावरण मुके झाले होते. आणि सुलभाचे काळीज धडधडत होते. ती थोडीशी थांबली. नंतर तिने दाराला कडी लावली आणि आनंदच्या घरी गेली.

आनंद एकटाच बसला होता. दोन्ही हातांची घडी करून नि छातीवर धरून ती आनंद पुढे उभी राहिली. म्हणाली, "हं, बोला सरकार, काय हुकूम आहे आपला? सेवक हजर आहे. ऑर्डर..."

आनंद म्हणाला, "पहिली ऑर्डर, पुढे ये."

तशी ती पुढं गेली आणि त्याच्या गळ्याला मिठी मारून त्याचा हृदयाशी बिलगली आणि भावनावश होऊन उद्गारली, "आनंद..."

उशीर ती तशीच त्याला बिलगून राहिली; नि नंतर मागे सरून हसली नि मग ती दोघं समोरासमोर बसली. आनंद म्हणाला, "सुलभा, आता एकच प्रश्न आहे नि तो म्हणजे आता पुढं काय?"

"मग तूच त्याचं उत्तर दे." ती हसत म्हणाली.

"मी काय उत्तर देऊ!" आनंद म्हणाला, "मात्र आता काहीतरी मार्ग काढलाच पाहिजे."

"म्हणजे लवकरच बोहल्यावर चढले पाहिजे, असंच ना?" असं म्हणून सुलभा हसली. म्हणाली, "पण मी म्हणते एवढी घाई का? मी का कुठे पळून जाणार आहे? शिवाय तुला नोकरी लागू दे. सर्व काही ठीक होईल. नाहीतर तू स्वतःच माझ्या वडिलांना विचार की..."

"काय? मी विचारू?" तो चमकून म्हणाला.

"का? काय हरकत आहे..." सुलभा म्हणाली.

"पण सुलभा, तुझ्या वडिलांनी मला नकार दिला तर?"... त्याने विचारले.

"शक्यच नाही." सुलभा म्हणाली, "माझ्या वडिलांचा स्वभाव माझ्या सुखाआड

कधीच येणार नाही. आणि माझी आईही तुझ्यावर फार माया करते. ती वडिलांना सांगेल.''

''पाहा बरं.'' आनंद बोलला.

''पाहायचं काय? माझी आई नक्कीच बाबांना सांगून हे लग्न जुळवील.'' सुलभा म्हणाली.

''पण तुझ्या वडिलांपुढं कुणाचंच काही चालणार नाही.'' आनंद म्हणाला, ''तू विचार कर.''

''परंतु हे खरं कशावरून?'' सुलभा म्हणाली, ''आणि आनंद, माझ्या वडिलांविषयी तू गैरसमज करून घेतला आहेस याचं कारण काय?''

''फार मोठं कारण आहे,'' आनंद बोलला.

''मला ते कारण कळू दे ना!'' सुलभा म्हणाली.

''ऐक ते कारण...'' आनंद बोलला,

''हा आजचा आमचा मळा तुझ्या वडिलांकडे एक हजार रुपये कर्जात गहाण होता. ते कर्ज माझे आजोबा नि वडील यांना दहा वर्षे फिटले नाही. नंतर त्यांनी एक हजाराची रक्कम जमवली नि तुझ्या वडिलांना दिली. पण एक हजार रुपये घेऊन तुझ्या वडिलांनी मळ्याचा कब्जा दिला नाही. उलट कोर्टात जा, असं सांगितलं.''

''पुढं काय झालं?'' सुलभाने विचारले.

''मग माझ्या वडिलांनी लष्करात आपल्या वरिष्ठांकडे तक्रार केली आणि त्याचा परिणाम व्हायचा तो झाला.'' आनंद म्हणाला, ''वरून हुकूम सुटला, लष्करी अधिकाऱ्याची जमीन परत केलीच पाहिजे, त्यामुळे प्रांतापासून फौजदारापर्यंत सर्वांची धावपळ झाली आणि आमची जमीन आम्हाला परत मिळाली. म्हणजे तुझ्या वडिलांना ती जमीन सोडावी लागली. पण तेव्हापासून त्यांच्या मनात आमच्याविषयी एक प्रकारची अढी निर्माण झालेली आहे. त्यावरूनच मी म्हणतो की, आपल्या लनाला ते नक्कीच नकार देणार नि दिला तर पुढं काय?''

''तर...'' सुलभाचा स्वर कंपित झाला. ती म्हणाली, ''तर अनर्थ होईल. आनंद, माझं मन तसं फारच दुबळं आहे, ते बंड करू शकणार नाही. मला आई-वडिलांना दुखवून सुखी व्हायचे नाही. मला माझं सुख आनंदानं मिळायला हवं आहे आणि मला नाही वाटत की माझे वडील माझा सर्वनाश करतील.''

''मग?'' आनंद हुंकारला.

''मग काय, थोडी वाट पाहा.'' सुलभा म्हणाली, ''थोडी वाट पाहायला काय हरकत आहे?''

''थोडी का?'' आनंद म्हणाला. ''मी जन्मभर वाट पाहीन. सुलभा, माझी मुळीच घाई नाही. उलट त्या क्षणाची वाट पाहण्यातच मी समाधान मानीन...''

''आणि हे पाहा, मी तुला वाट पाहा म्हणते याचा अर्थ तू भलता समजू नको. मी दगड नाही.'' सुलभा म्हणाली, ''तुझ्या नावाचं कुंकू ल्यावं नि तुझ्याशी संसार करावा यासाठी मी झुरत आहे. अगदी दिव्याच्या ज्योतीप्रमाणे मी जळत आहे नि पुढंही निरंतर अशीच जळत राहीन!'' तिचा कंठ दाटून आला. तिनं डोळे टिपले नि ती रडू लागली.

आनंदनं तिला जवळ घेतली; म्हणाला, ''सुलभा, तू माझ्या जीवनाचा सुकाणू आहेस, हे विसरू नकोस. जर हे सुकाणू मोडलं तर माझी नाव कुठं जाईल आणि कोणत्या खडकावर ती धडकून फुटेल याचा नेम नाही.''

''नाही! नाही! आनंद, नाही...'' सुलभा कळवळून म्हणाली, ''राजा, मी तुला दगा देणार नाही. तुझ्या जीवनाचं हे सुकाणू कधीच मोडणार नाही. त्याची तू चिंता करू नकोस.'' आणि तिनं त्याला मिठी मारली. त्याच्या ओठाला ओठ भिडवून ती पुढे म्हणाली, ''मी, मी तुझी आहे, नि तुझीच फक्त, सांभाळून घे. जरी आज मी दुबळी असले तरी उद्या मी काय करीन ते मी सांगू शकत नाही.''

ती उठली. डोळे पुसून निघाली. आनंदनं विचारलं, ''कधी येणार?''

''रोज येईन...'' ती उत्तरली नि बळेच हसत घरी गेली.

दिवसभर सुलभा एकच विचार करीत होती... की माझ्या अंतरीची कळ माझ्या आई-बापाला समजेल का... नि मी आज कित्येक दिवस जे स्वप्न पाहत आहे ते साकार होईल का? जर माझ्या मनाविरुद्ध झाले तर? माझे तर सर्वस्व नष्ट होईल. मी मरून जाईन... आणि इच्छेप्रमाणे झाले तर मला इतका आनंद होईल, की त्या आनंदानं मी वेडी होईन. मला वेड लागेल... मग इतर मुलींना माझ्या सुखाचा हेवा वाटेल. पण...

पण जर माझ्या मनाविरुद्ध झाले तर माझा दगड होईल! मग माझं मरण अटळ... आणि मला कसलं मरण येईल ते आई-बापांना त्याच वेळी कळून येईल.

चार दिवसांनी बाबा पाटील आला; तो हसतच आला. त्याला कसलं तरी समाधान झालं होतं नि त्याचा तो आनंदी चेहरा पाहून सर्वांना आश्चर्य वाटलं. शेवंता नि सुलभा त्यांचेजवळ बसल्या. शेवंतानं माहेरची खुशाली विचारली, ''कशी काय तिकडची सारी माणसं...?''

''अगदी आनंदात आहेत.'' बाबा उत्तरला.

''मग त्यांनी तसा सांगावा का दिला?'' सुलभानं विचारले आणि बाबा म्हणाला, ''त्याचं असं आहे सुलभा, आम्ही ही खेड्याची माणसं. आम्हाला उभं नि आडवं सारखंच असतं. त्याला इलाज नाही.''

''बरं, पण काम तरी काय होतं?'' सुलभानं पुन्हा विचारलं आणि बाबा पाटील म्हणाला, ''तुझ्या मामानं आपली एक जमीन विकायला काढली आहे. तेव्हा तिचा सौदा

नीट सुरळीत व्हावा म्हणून त्यांनी मला सांगावा दिला होता.''

बाबा पाटलाचा तो खुलासा कुणालाही पटला नाही. हा निश्चित काही तरी दडवीत आहे अशी सुलभाची खात्री झाली. परंतु ती पुढं काहीच बोलली नाही.

बाबा पाटील मानगावाहून आल्यापासून कसला तरी विचार करीत होता... तो मनात काही तरी ठरवीत होता. पण तो काय करणार आहे हे कुणालाच कळत नव्हते.

तो बाहेरून आला की प्रथम सुलभाची चौकशी करीत होता. ''सुलभाची आई, सुलभा कुठं गेली?'' हा प्रश्न तो शेवंताबाईला विचारीत होता. यापूर्वी तो सुलभाची इतकी चौकशी कधीच करीत नव्हता.

आणि क्षणाची जरी सवड सापडली तरी तेवढ्या वेळात सुलभा आनंदला भेटून येत होती.

एकदा बाबा पाटील बाहेरून आला आणि त्याचवेळी सुलभा घराबाहेर पडली. पाटलानं शेवंताबाईस विचारलं, ''सुलभा कुठं गेली?''

''कुलकर्णीबाईकडं.'' शेवंता म्हणाली, ''एक गोष्ट बोलू का?''

''बोला की! परवानगी का मागता?''

''सुलभा उपवर झाली—''

''मग म्हणणं काय?''

''लग्नाचा विचार आपण का करू नये?''

''परंतु विचार करून लग्नं होत नसतात.'' बाबा पाटील म्हणाला, ''त्यासाठी स्थळ यावं लागतं. ते पसंत पडावं लागतं. नवरामुलगा पाहावा लागतो नि मगच लग्नं होतात—''

''ते खरं आहे, पण मी म्हणते, कृष्णाबाईचा आनंद काय वाईट आहे?'' शेवंताबाई धीर करून म्हणाली, ''ती दोघं एकत्र वाढली, शिकली नि त्यांचा जोडा दृष्ट लागावी असा आहे—''

''ते सर्व खरं आहे; परंतु मी स्वत:च त्यांना विचारावं का, की कसंही करून माझी लेक पदरात घ्या म्हणून! बोला, काय करावं मी?'' बाबा पाटलानं कडवट सुरात विचारलं. नि शेवंताबाई हळूच म्हणाली, ''आपण स्वत: विचारण्याची गरज नाही. कालच कृष्णाबाईनं मला विचारलं आहे. नि त्यांना सून पसंत आहे. तेव्हा—''

''पुढं बोला—'' पाटील शांतपणे हुंकारला.

''आणि मला जावई पसंत आहे.'' शेवंताबाई बोलली.

''आणि जर तो जावई मला पसंत नसेल तर?'' पाटलानं शेवंताला डोक्यात दगड घालावा तद्वत सवाल विचारला नि म्हणाला, ''वळचणीचा साप नि शेजारचा पाव्हणा हे सारखेच असतात, हे लक्षात ठेवा आणि आमची मुलगी अजून शिकत असून आम्हाला

तिच्या लग्नाची घाई नाही–'' क्षणात पाटलानं शेवंताबाईचा हेतू मोडून काढला.

''मग बोलणंच खुंटलं–'' असं म्हणून ती घरात गेली.

दिवस मावळतीकडे फिरला आणि कुलकर्णीबाईकडून सुलभा घरी आली; तिला बाबा पाटील म्हणाला, ''चला, मळ्यात जाऊन येऊ–''

सुलभा काहीच बोलली नाही. ती गुमान त्यांच्यामागून चालू लागली. आता हा मळ्यात मला काही तरी विचारणार आहे की काय याची तिला भीती पडली. परंतु पाटील बोलत नव्हता. ती दोघं पांदीनं पुढं निघाली होती. पुढून कृष्णाबाई आली. तिला पाटील म्हणाला, ''कृष्णाबाई, थोडं थांबा–''

''हं, बोला.'' ती गपकन थांबली. ती मनात म्हणाली, आनंदच्या लग्नाविषयी आपण शेवंताला विचारलं होतं ते शेवंतानं यांच्या कानावर घातलं असावं नि त्याबद्दलच हा आता बोलणार असावा.

आणि कृष्णाबाईचा तो अंदाज बरोबर होता. पाटील शांतपणे म्हणाला, ''आम्ही आमची मुलगी तुमच्या घरी द्यावी असं तुम्ही म्हणता हे खरं का?''

''होय, खरं आहे.'' कृष्णाबाई उत्तरली.

''मग ऐका, तुमचा आनंद तसा वाईट नाही; आणि घरदारही ठीक आहे, परंतु–'' पाटील पुढं बोलला नाही.

''जे काय बोलायचं ते स्पष्ट बोला.'' कृष्णाबाई म्हणाली.

''स्पष्ट नि सरळ बोलतोय मी. माणसानं शोभेल ते ल्यावं, नि पचेल ते खावं, अशी म्हण आहे नि या म्हणीचा अर्थ तुम्ही समजून घ्यावा–'' बाबा पाटील बोलला.

ते ऐकून सुलभा दचकली. तिच्या काळजात धडकी भरली नि कृष्णाबाई म्हणाली, ''यांत न शोभण्यासारखं काय आहे? तुम्ही मुलीचे मालक आहात.''

''म्हणूनच म्हणतो, मी मुलीचा बाप आहे. म्हणून काय कुणीही बोल टाकावा! माझा आंबा पाडाला आला आहे म्हणून काय कुणीही दगड मारावेत? मला ते खपणार नाही–''

''राहिलं. कुणीही दगड मारणार नाही.'' कृष्णाबाई कपाळाला आठ्या घालून म्हणाली, ''तुमचा पाडाचा आंबा एखादा कावळा उचलील याची काळजी घ्या. आणि जो झारून पाणी पितो त्याला गाळ लागतो हे लक्षात ठेवा.''

''झारून पाणी पिण्याचे कारण आम्हाला आमची योग्यता कळते.'' पाटील म्हणाला, ''परंतु तुम्हाला तुमची पायरी कळत नाही... आणि ती का कळत नाही?''

पाटलाच्या शब्दांनी सुलभाच्या तोंडचं पाणी पळालं. ती बावरली. कृष्णाबाई संतापून म्हणाली, ''माझी योग्यता तुम्हापेक्षा काडीभरही कमी नाही आणि हेही लक्षात ठेवा, माझं घर म्हणजे खेकड्याचं बीळ नसून ते सुभेदार दादासाहेबांची वाघाची घळ आहे.''

"तसं नाही कृष्णाबाई. माझी सुलभा अजून शिकणार आहे." पाटलानं सारवासारव केली.

"शिकवा की! नाहीतर एखाद्या राजाला देऊन टाका." कृष्णाबाई तीक्ष्ण सुरात म्हणाली, "मी परत बोलणार नाही. परंतु वेळ येईल तेव्हा याचं उत्तर देईन."

नंतर कृष्णाबाई थांबली नाही. ती संतापून गावाकडे गेली. तिचा आत्मा त्या अपमानानं पेटला होता.

"आबा, याला काय म्हणायचं? तुम्ही त्या भोळ्या बाईचा असा अपमान का केलात?" सुलभा संतापून म्हणाली, "काय मिळालं तुम्हाला?"

"यात तिचा अपमान कसा झाला?" पाटील म्हणाला, "माणसानं मर्यादा सोडून वागू नये नि तिची आणि आमची बरोबरी आहे का? शिवाय आमची मुलगी शिकत आहे यात मी वावगं काय बोललो?"

सुलभा काहीच बोलली नाही. ती मळ्यातून घरी आली, पण मुळीच जेवली नाही. ती मासळीप्रमाणे अंथरुणावर चरफडत होती. तिला झोपच लागत नव्हती. कृष्णाबाईचा अपमान झाला. माझ्या लग्नाला वडिलांचा विरोध आहे. आता जे काही होईल ते माझ्या मनाविरुद्ध होणार आहे. परंतु आमची मुलगी शिकत आहे, असं जे सांगितलं आहे याचा अर्थ काय... आनंदला विरोध का? मी शिकत आहे म्हणून, की पूर्वीचा कसला सूड घ्यायचा आहे... उद्या आनंद काय म्हणेल, नि त्याने मला विचारले तर मी काय सांगू? तो भडकेल... मग मी त्याला कसा शांत करू? आणि आता यातून मार्ग कोणता?

सुलभा शांत पडून विचार करीत होती. ती अंधारात पाहत स्वत:शी प्रश्न विचारीत होती, नि त्याची उत्तरं शोधीत होती. पण तिला एकही उत्तर मिळत नव्हतं.

तुमचा आनंद वाईट नाही, घरदार बरे आहे, पण आमची मुलगी शिकत आहे, आम्हाला लग्नाची घाई नाही, याचा अर्थ काय? तुम्हाला तुमची पायरी कळत नाही या बाबा पाटलांच्या शब्दांचा अर्थ लावीत होती. आणि हे मला काहीच कळत नाही असं तिचा आत्मा बोलत होता

रात्रभर ती विचारांच्या भयाण वणव्यात जळत होती.

ती सकाळी तशीच जळत उठली आणि आपण किती विचार केला याचा हिशेब करू लागली.

सुलभा खिन्न होऊन बसली होती. शेवंताबाई मळ्यात गेली होती. नि जाई शाळेत गेली होती. परंतु बाबा पाटील सोप्यातून उठत नव्हता. त्यामुळे सुलभा अस्वस्थ झाली होती. कारण ती उद्याच कोल्हापूरला जाणार होती आणि जाण्यापूर्वी तिला आनंदाची

भेट घ्यायची होती.

परंतु काहीच इलाज नव्हता. ती बाबा पाटील बाहेर जायची वाट पाहत होती.

परंतु थोड्याच वेळानं भाऊ रामोशी पंजी वर धरून पळत आला. म्हणाला, "पाटील, रानात मुडद्यांचा खच लागलाय आणि तुम्ही निवांत बसलाय! चला..."

"अरं पर काय झालं ते सरळ सांग." पाटील गुरकला.

"अवं शिवारात सारंच वाकडं झालंय नि सरळ कसं सांगू?" भाऊ रामोशी म्हणाला, "चला, नाईकडं नि ठोमरं कटून मरू लागल्याती. माझ्यासमोर दोन मुडदं पडलं व्हतं."

"अरं पर कशासाठी?" पाटील उठला.

"बांधावरच्या एका झाडासाठी!" भाऊ रामोशी बोलला, "चला बरं..."

"बरं चल..." डोकीवर पागुटं ठेवून सुलभाला हाक मारून म्हणाला, "सुलभा, मी रानात जाऊन येतो." आणि तो भाऊ रामोशीमागून ढेंगा टाकीत चालू लागला.

बाबा पाटील जाताच सुलभानं सुटकेचा निःश्वास टाकला. दाराला कडी लावली आणि ती आनंदच्या घरात गेली.

सुलभा समोर येताच आनंद हसला. पण ती उगीचच चमकली. म्हणाली, "कालचा तो विपरीत प्रकार तुला समजलाच असेल. आईचा अपमान झाला त्याबद्दल मला फार वाईट वाटले. परंतु त्यासाठी तू मला दोषी ठरवू नको."

असं म्हणत ती पुढे गेली नि त्याच्या हृदयाला बिलगली नि टाचा उंच करून त्याच्या कानात म्हणाली, "पुन्हा जन्म घेता आला असता तर मी अनेक जन्म तुझ्यावर प्रीत केली असती." पुन्हा ती थांबली – भावनावश झाली नि धुंद होऊन पुन्हा म्हणाली, "उमज पडताच मी तुला आपले सर्वस्व अर्पण केले आहे. माझ्या या देहावरील मालकी हक्क मी बहाल केला आहे, हे तू विसरू नकोस. जर मला आधीच मरण आले तर माझा आत्मा तुझ्याभोवती फिरत राहील आणि तू ज्या मार्गानं जाशील त्या मार्गानं तुझ्या मागोमाग येईल नि मी जिवंत असले तरी मी तुझ्याच मार्गानं येणार याबद्दल खात्री असू दे!"

"सुलभा, तू मला सांगत होतीस वाट पाहा– परंतु आता तू स्वतःच धीर सोडीत आहेस!" आनंद बोलला.

"नाही रे राजा." सुलभा म्हणाली, "मी उद्या कोल्हापूरला जात आहे. तुला बंगलोरचं पत्र आलं की तू कोल्हापूरला येशील?"

"येईन." तो उत्तरला.

"नक्की?"

"नक्की."

"पाहा हं – मी वाट पाहीन."

"विश्वास ठेव माझ्यावर."

"पुष्कळ ठेवला आहे, पण..."

"पण काय?"

"आता माझाच माझ्यावर विश्वास नाही..."

"मग?"

"मग काय? कोल्हापुरात भेट—"

"भेटेन..."

आणि मग ती सुंदर सुलभा शांत झाली. घर शांत झाले. वातावरण शांत झालं. नंतर ती दार उघडून अंगावरील वस्त्र सरळ सावरून घराबाहेर पडली. तेव्हा तिच्या गालावर चांदणं फुललं होतं.

दुसऱ्या दिवशी सुलभा कोल्हापूरला गेली.

## ३

सुलभाला कोल्हापूरला जाऊन चार दिवस झाले होते. आज नक्कीच तिचे पत्र येणार... आणि नोकरीसाठी जे अर्ज केले आहेत त्यापैकी एकदोन तरी उत्तरं येतील असा विचार करीत आनंद पोस्टात गेला. गावचे पोस्ट ऑफीस म्हणजे शाळामास्तरचे घर आणि आपल्या घरी बसूनच मास्तर शाळा नि पोस्ट अशी दोन खाती सांभाळीत होते.

आनंदला पाहताच मास्तरांनी दोन पत्रं त्याच्या हातात दिली. ती पाहून आनंदला आनंद झाला. त्या दोन पत्रांपैकी एक पत्र बंगलोरचं—" लष्करी कचेरीचं होतं; नि दुसरं पत्र सुलभाचं होतं... आनंदनं ती दोन्ही पत्रं तिथंच वाचली.

बंगलोर लष्करी कचेरीनं लिहिलं होतं की, पत्र मिळताच बंगलोर लष्करी कचेरीवर हजर व्हा—"

आणि सुलभानं लिहिलं होतं —

*प्रिय आनंद यांस —*

*मी आज इथं आले, पण इथं मन लागत नाही. हृदयाची हुरहूर सारखी वाढत आहे नि एकटेपणाची जाणीव होत आहे. आपला जीव आपल्याबरोबर नसून तो कुठेतरी दुसरीकडं गुंगला आहे असं वाटतं. तू दिसावास यासाठी माझे डोळे तडफडत आहेत आणि मन तुझ्याचसाठी तळमळत आहे. तुझ्या मनाची मला कल्पना आहे. तू माझ्या पत्राची वाट पाहत असशील याची मला पूर्ण कल्पना आहे. बंगलोरचे पत्र आले की नीघ, नि जाता जाता मला भेटून पुढं जा. मी तुझी वाट पाहत आहे. पत्राचे उत्तर पाठव*

*नि ये —लवकर ये.*

*जन्मोजन्मी तुझी*
*सुलभा*

दोन्ही पत्रांच्या घड्या करून आनंदनं खिशात कोंबल्या नि तो गंभीर झाला. त्याला बंगलोर दिसू लागले. त्याच्या डोळ्यांपुढं हजारो बंदुका तळपू लागल्या — हजारो संगिनी लखलखू लागल्या — नि त्या डोळ्यात घेऊन तो उठला.

तोच बाबा पाटील आला. त्यानं आता कोट घातला होता. डोकीला केशरी पटका बांधला होता. तो दारातच थांबून म्हणाला, ''मास्तर, आमचं काय आहे का?—''

''का ऽ ही नाही!'' मास्तर हाताचं कुडबुडं वाजवीत म्हणाला, ''पाटील ऽ आज कशावर?''

''एका गावाला जाऊन येतो —'' असं म्हणून बाबा पाटील डुलत डुलत पुढं गेला. आणि आनंद घरी जाऊन बंगलोरला जायची तयारी करू लागला. आवश्यक त्या सामानाची बांधाबांध केली नि उद्याची वाट पाहू लागला.

दिवस मावळतीकडे वळला. रानात गेलेली माणसं गावात आली आणि 'उद्या आनंद बंगलोरला जाणार, त्याला लष्करात बोलावणं आलं आहे—' अशी बातमी सर्व गावकऱ्यांच्या कानावर गेली नि मग माणसांनी कृष्णाबाईचा सोपा भरला. तरुण पोरं येऊन आनंदाला निरोप देऊन जात होती. नि म्हातारी माणसं येऊन आनंदला शहाणपणाच्या गोष्टी सांगत बसली होती नि त्यात गणू चौगुल्याला भलताच आनंद झाला होता. तो आवाज चढवून बोलत होता. तो जुन्या आठवणी सांगत होता.

परंतु कृष्णाबाईचा चेहरा उतरला होता. तिला दादासाहेबांची आठवण झाली होती नि त्या आठवणीनं तिच्या काळजात कळ उठली होती. पण ती कळ कुणाला कळू नये याची कृष्णाबाई काळजी घेत होती. ती धडपडत होती. माझा आनंद परदेशी होणार— त्याला गरम जेवण आता मिळणार नाही — म्हणून ती आज पुरणपोळीचं जेवण करीत होती. आनंदचे वडील दादासाहेब रजेवर येऊन परत जातेवेळी ती असाच पुरणपोळीचा स्वैंयपाक करायची नि आता तिला ती आठवण झाली होती. त्यावेळीही अशी गावातील माणसं येत असत. नि सोप्यात बसत.

आणि आज कित्येक दिवसानं आनंद लष्करात जात आहे समजताच पुन्हा गावातील लोक जमलेले पाहून ती मनातल्या मनात देवाला आळवीत होती, ''देवा, माझ्या आनंदला आयुष्य दे! जसं बापाचं झालं तसं मुलाचं होऊ देऊ नको!''

याच वेळी गणू चौगूला म्हणाला, ''आनंदराव डरायचं न्हाय. सुभेदार दादासाहेब म्हटलं की मोठमोठी सायबं टरकत व्हती. बहाद्दर लढत लढत गेला. तसं नाव कर —''

चौगुल्यांचे ते शब्द कानी पडताच कृष्णाबाईच्या ह्रदयात कालवाकालव झाली. तिनं

गर्रकन वळून चौगुल्याकडं पाहिलं. — पण ती काहीच बोलली नाही.

आणि पुन्हा चौगुला म्हणाला, ''आणि एक काम कर. तुझ्या वशिल्यानं गावातली सारी उंडगी पोरं घाल लष्करात — म्हंजी त्येंची टकुरी जाग्यावर येतील. म्हंजी काहीतरी चांगलं काम करतील—''

आनंद ऐकत होता; पण त्याचे लक्ष बंगलोरवर केंद्रित झाले होते.

दिवेलागणी झाली. तिरपा चंद्र क्षितिजाची चढण चढू लागला. त्याच्या प्रकाशानं सारी धरणी उजाळली. वातावरणात आल्हाद भरला. पोरं चेकाळून गल्लीबोळानं खेळू लागली.

आणि सकाळी गेलेला बाबा पाटील सुलभाला घेऊन आला. दारात गाडी थांबली नि सुलभा घरात गेली. तिला पाहून शेवंताबाई आश्चर्याने थक्क झाली. ती सुलभाचे दोन्ही दंड धरून म्हणाली, ''सुलभा, हे ग काय! तू कशी आलीस?''

''म्हणजे तुला काहीच माहीत नाही आई?'' सुलभानं विचारलं.

''मला काहीच माहीत नाही सुला-'' शेवंताबाई उत्तरली.

सुलभा म्हणाली, ''मग आई फार मोठं आश्चर्य आहे हे. मला आबानं आणलं आहे -''

''कशासाठी — ?'' शेवंतानं विचारलं.

''मला माहीत नाही.''

''तुला काय सांगितलं?''

''काहीच नाही. घरी चल — एवढंच!''

''आणि मग?''

''मग काय! मी निघाले.''

''नवल आहे!''

''आई—''

''काय?''

''कोल्हापूरला जातो असं तुला आबानं सांगितलं नाही?'' सुलभानं विचारले.

''मुळीच नाही—'' शेवंताबाई म्हणाली.

''आणि दादा गाडी घेऊन कासेगावला आला तेही तुला माहीत नाही?'' सुलभा बोलली.

''सुलभा, अग शप्पथ मला काऽही माहीत नाही.'' शेवंतानं गळ्यावर हात ठेवला.

''आई, मग यात आश्चर्य नसून काही तरी कपट आहे.'' सुलभा गंभीर झाली.

''कपट करायला ते का कुणी तुझे वैरी आहेत?'' शेवंताबाई बोलली.

''मग हा काय प्रकार आहे?'' सुलभा संतापली.

"काहीही असू दे - काऽही बोलू नको." शेवंता म्हणाली.

"म्हणजे याचा अर्थ काय?" सुलभा म्हणाली, "नाही आई, तू आजच विचार आणि आताच विचार —"

"ठीक आहे, विचारते—" असं म्हणून शेवंता सोप्यात गेली. पण तिथं बाबा पाटील नव्हता. तो आणि काशिनाथ गाडी घेऊन मळ्यात गेला होता, शेवंता परत घरात जाऊन विचारमग्न बसली आणि सुलभा हातपाय धुऊन आली. एकाएकी आठवण होऊन शेवंताबाई म्हणाली, "उद्याच आनंद बंगलोरला जाणार आहे."

"म्हणजे त्याला बोलावणं आलं?" सुलभानं हर्षभरित होऊन विचारले.

"होय नि तो उद्याच जाणार आहे." शेवंताबाई म्हणाली. सकाळपासून गावातील लोक येऊन त्याला भेटून जात आहेत."

"अय्या! आता आनंद जाणार?" सुलभा म्हणाली.

"आई, तो सकाळी लवकर जाईल नि माझी भेट होणार नाही. मी त्याला भेटून येऊ? अग, तो पुन्हा कधी भेटेल कोण जाणे!"

"अग मग जा की! तुला कुणी नको म्हटलं आहे . जा —" शेवंताबाई बोलली आणि सुलभा हसत पळाली नि कृष्णाबाईच्या सोप्यात जाऊन तिनं हाक मारली, "आनंद ऽ ऽ "

"कोण सुलभा!" आनंद धावत सोप्यात गेला. तिनं गप्पकन त्याचे दोन्ही दंड धरले आणि त्याच्या छातीवर मस्तक ठेवून ती म्हणाली,

"होय आनंद, मी सुलभाच आहे. मी आले आणि तू जाणार आनंद?" ती त्याच्या छातीवर मस्तक ठेवून रडू लागली. आता आपल्या कंठातून हंबरडा बाहेर पडेल अशी भीती वाटून ती मागं सरकली नि पदराचा बोळा तोंडात धरून ती हुंदके देऊ लागली.

"सुलभा, काय झालं?" आनंदनं तिला जवळ घेऊन तिचे डोळे पुसले.

"अजून काही झालं नाही. आई कुठं आहे?" सुलभा बोलली.

"आई स्वैंपाकघरात—" आनंद उत्तरला.

"मग चल — आपण तुझ्या खोलीत बसू या!" ती म्हणाली आणि ती दोघं घरात जाऊन आनंदच्या खोलीत बसली. आनंदनं कंदिलाची वात उंच करून प्रकाश वाढवला. नि विचारलं, "तू कशी आलीस?"

"मला आणलं आनंद."

"कशासाठी— ?"

"ते मला माहीत नाही. ते एक गुपित आहे." सुलभा हुंदके देत म्हणाली, "आणि ते गुपित फक्त वडिलांना ठाऊक आहे. चल म्हणताच मी कैद्याप्रमाणे आले आहे."

आनंद गप्प झाला. सुलभाला कशासाठी आणलं आहे नि पुढं तिचं काय करायचा

त्यांचा विचार आहे या विचारानं त्याच्या डोक्यात काहूर उठलं.

"आनंद, तू सकाळी बंगलोरला जाणार?" तिने विचारलं.

"होय—"आनंद म्हणाला, "सुलभा, इकडे जे काही घडेल ते मला कळवशील?"

"कळवीन—" तिनं डोळ्याला पदर लावला.

"सुलभा—"

"काय?"

"तू खुळी आहेस—"

"कशी—?"

"अग, माहेरी आलेल्या मुली हसतात आणि तू रडतेस!" आनंद म्हणाला, सुलभा हसली नि म्हणाली,

"आनंद, तू कधी भेटणार पुन्हा?"

"सुलभा, मी नोकरीवर जात आहे." आनंद म्हणाला.

"मी तुला फार लौकर भेटेन—"

कृष्णाबाई आनंदाच्या खोलीत चौकटीत आली नि सुलभाला पाहून चकित झाली. पण ती काहीच बोलली नाही. तशीच परत जाऊन पुन्हा येऊन म्हणाली, "चला ताटं वाढली आहेत."

सुलभा गडबडीनं उठून घरी निघाली. पण कृष्णाबाईनं तिला ओढून पाठीशी धरली नि तिच्या कपाळाचा मुका घेऊन म्हणाली, "कुठं निघालीस? तुला काय वाटलं मी तुझ्यावर रागावले आहे? खुळी ग माझी बाई! तुझ्या वडिलांनी माझा अपमान केला म्हणून मी तुला दोष देणार नाही. चल—"

सुलभा घरात गेली आणि वाढलेली दोन ताटं पाहून तिला भडभडून आले. ती शांतपणे जेवू लागली. परंतु कृष्णाबाईंनी वाढलेलं दही पाहून ती हसू लागली. तेव्हा आनंदनं विचारलं, "सुलभा, का हसतेस?"

"काही नाही! मला एक जुनी आठवण झाली." सुलभा हसत म्हणाली, "तू एकदा सोप्यात दही खात होतास तेव्हा फारच जेवले आणि—"

"आणि मग टमकी फुटेल की असं म्हणून मी तुझं पोट दाबलं ना?"

आणि ती दोघं मोठ्यानं हसली.

सुलभा जेवून निघाली तेव्हा आनंदही तिच्याबरोबर सोप्यात आला. सोप्यात अंधार होता. सोप्यात सुलभा थांबली. तिनं कृष्णाबाईंचा कानोसा घेतला. आणि गपकन आनंदला बिलगली. त्याचे एक दीर्घ चुंबन घेऊन म्हणाली,

"हे शेवटचं. आता याचीही आठवण ठेव. कोण जाणे कधी भेटणार तू. जाते मी—" आणि ती वाऱ्यासारखी निघून गेली.

सकाळीच आनंद बंगलोरला निघाला होता. गावातील पुष्कळ लोक त्याच्याबरोबर चार पावलं निघाले होते. पोराबाळांनी त्याच्याभोवती गर्दी केली होती.

सुलभा सोप्यात उभी होती. बाजूला बाबा पाटील निवांत बसला होता. शेवंताबाई आनंदशी बोलून आली होती. पण बाबा पाटील जागचा उठला नव्हता. आनंद सुलभाच्या दारापुढं येऊन निघाला. तशी सुलभा पुढं गेली आणि आडवी उभी राहून म्हणाली,

"आनंद निघालास?"

"होय—" तो खिन्न सुरात उद्‌गारला.

"जा, पत्र पाठव—" एवढं बोलून ती परत सोप्यात जाऊन उभी राहिली आणि डोळ्याची पापणी न हलवता त्याची पाठमोरी आकृती पाहू लागली. न कळत तिचे डोळे भरले. तिच्या डोळ्यापुढे एक पडदा निर्माण झाला. तिची नजर कोंडली गेली. अश्रू पुसायचं तिला भान नव्हते. आनंदची ती आकृती तिच्या आसवात बुडाली.

आणि सुलभानं जेव्हा डोळे पुसले तेव्हा आनंद दूर गेला होता. तो दिसत नव्हता नि कृष्णाबाई एकटीच डोळे पुसत परत येत होती.

सुलभाला घरी येऊन आज पंधरा दिवस झाले होते. त्या पंधरा दिवसात तिची मन:स्थिती अत्यंत नाजूक झाली होती. फाशीचा हुकूम झालेल्या कैद्याप्रमाणे दिवस काढीत होती. तिच्या जीवनात एक दारुण संघर्ष निर्माण झाला होता नि तिच्यापुढं गडद अंधार दाटला होता! नि तिच्या त्या तेजस्वी सुंदर डोळ्यांत कसल्या तरी भीतीचा भाव भरला होता. पिंजऱ्यात कोंडलेल्या पाखरासारखी तिची अवस्था झाली होती. मला का आणले आहे हा विचार तिचं काळीज पोखरीत होता आणि तो एकच विचार करीत ती तासन्‌तास बसत होती. कुणी जवळ आले तर ती विषण्णपणे हसत होती. ते हास्य तिच्या गालावर चरफडून लगेच मावळत होते. या जगात आपलं कुणी नाही. आपणाला कुणाचा आधार नाही असं तिला वाटत होतं.

आनंदची आठवण झाली की, ती ज्या दिशेने गेला त्या दिशेला नजर टाकून दूर दूर पाहत होती. मग ती बोटावर दिवस मोजून म्हणत होती, खरं आहे! काळ हा सर्वशक्तिमान आहे!

तिला आनंदचं एक पत्र आलं होतं. त्या पत्रात त्यानं लिहिलं होतं,

*प्रिय सुलभा,*

*मी सुखरूप पोहोचलो नि खुशाल आहे. चिंता करू नको. मला तुझा क्षणभरही विसर पडत नाही. परंतु तू कशी आहेस याची काळजी वाटते. तू कोल्हापूरला कधी जाणार? का जाणार नाहीस ते कळव. आणि जर गेलीस तर कोल्हापुरातून पत्र पाठव.*

*आईला माझा नमस्कार सांग.*

*तुझा*

*आनंद*

या पत्राची आठवण होताच ती अस्वस्थ होत होती नि मनात म्हणत होती, राजा, माझी आठवण तुला होताना तुला माझा विसर कधी पडणारच नाही हे सर्व खरं आहे; पण माझ्या जीवनातील आनंद, आनंद — चंद्राप्रमाणेच हळूहळू मावळत आहे. त्याला मी काय करू? मलाही तुझा विसर पडत नाही नि कधीच पडणार नाही.

त्या दरम्यान बाबा पाटलाच्या पायांना विश्रांती नव्हती. तो दोनदोन दिवस कुठंतरी जात होता आणि परत आला तरी कुणाशी बोलत नव्हता. त्याची ती धडपड नि धावपळ पाहून हा नक्कीच काहीतरी उपद्व्याप करीत आहे अशी सुलभा नि शेवंता यांची खात्री झाली होती.

शेवंताबाई तर मनात कढत होती. सुलभाला कशासाठी आणली आहे. नि तुम्ही तिचं काय करणार आहात असं विचारण्यासाठी ती टपली होती. परंतु बाबा पाटील संधीच सापडू देत नव्हता. एक तर तो उशिरा येत होता आणि तरीही उगीचच आरडाओरडा करीत होता.

सुलभा एकटीच विचार करीत जोत्यावर बसली होती. कधी सूर्य मावळला आणि कधी कडुसं पडलं हे तिला मुळीच समजलं नाही. उशिरानं शेवंताबाई बाहेर येऊन म्हणाली,

"सुलभा, अंधार झाला; घरात चल की! हे ग काय धरून आणल्यागत बसून राहतेस?

"आई, कुठं तरी बसायचंच ना. घरात काय नि दारात काय?" सुलभा हळूच म्हणाली, "आई, मला बसून बसून कंटाळा आला आहे."

"अगं, मग फिरून यावं." शेवंताबाई बोलली आणि सुलभा म्हणाली,

"आई, फिरायला जायचं म्हणजे कुणाच्या तरी घरी जाऊन बसायचंच ना?"

"चल घरात." शेवंतानं तिला उठवली.

"थांब आई, मी कृष्णाबाईकडं जाऊन येते." असं म्हणून ती कृष्णाबाईकडं गेली. कृष्णाबाई एकटीच बसली होती. त्या प्रचंड घरात तिचं अस्तित्व शून्यावर गेलं होतं... सुलभा आलेली पाहून तिला बरं वाटलं. म्हणाली,

"सुलभा, बस."

सुलभा भिंतीला टेकून बसत म्हणाली, "जेवण झालं का?"

"सुला, कसलं जेवण! एक भाकरी करून कशीतरी पोटात रेटायची." कृष्णाबाई म्हणाली, "माझा आनंद आता कुठं जेवत असेल आणि काय जेवत असेल कोण जाणे!"

ते ऐकून सुलभाच्या जखमी काळजात कळ उठली. तिनं दादासाहेबांच्या

फोटोशेजारी लावलेल्या फोटोकडे पाहिलं आणि विचारलं,

"आनंदचं पत्र आलं का?"

"होय. आजच आलं." असं म्हणून कृष्णाबाईनं आनंदचं पत्र सुलभाला दिलं नि म्हणाली, "बघ वाचून."

सुलभा ते पत्र वाचू लागली ...

*तीर्थरूप आईस, शि. सा. नमस्कार,*

*पत्रास कारण की मी इकडे खुशाल आहे. माझी काळजी करू नको. मी इथं आनंदात आहे. मला लवकरच एक परीक्षा द्यावी लागणार आहे. तू आपल्या प्रकृतीला जप. उगीच धावपळ करू नको. जर मी पास झालो तर मला लवकर घरी येता येणार नाही.*

*आणि आई जर सुलभा घरी आली तर तिला सांग की मी तुला पत्र लिहायचं मुद्दाम टाळीत आहे. कारण मी तुला पत्र लिहिलेलं तुझ्या वडिलांना खपणार नाही.*

*आणि आई, सुलभा कशी आहे, तिची प्रकृती कशी आहे आणि ती कोल्हापूरला गेली का हे सारं तू न विसरता कळव. तिला माझा नमस्कार सांग.*

*तुझा*

*आनंद*

ते पत्र वाचून सुलभा रडू लागली. तिचे ओठ थरथरू लागले नि हुंदका कंठात आला आणि उठून निघाली. तेव्हा कृष्णाबाईनं तिला हात धरून खाली बसवली. नंतर त्या दोघी पुष्कळ उशीर बोलत बसल्या आणि सुलभा निघाली तेव्हा कृष्णाबाई म्हणाली,

"उद्या फिरत फिरत मळ्यात ये आणि आमची पेरूची बाग बघ. येशील?"

"हो, येईन." सुलभा उत्तरली. त्याचक्षणी आपण लहानपणी आनंदच्या मळ्यात चोरून पेरू तोडीत असताना आनंदनं पकडलं, ही आठवण होऊन ती मनात खिन्न झाली. ते दिवस का गेले असं तिला वाटू लागलं नि त्याचाच विचार करीत ती घरी गेली.

गावात सामसूम झाली होती. दिवे विझले होते. कवाडं लावली होती नि माणसांनी अंथरुणावर अंगं टाकली होती.

बाबा पाटील जेवून सोप्यात बसला होता. तो दात टोकरीत ढेकर देत होता. काशिनाथ मळ्यात गेला होता. जाई झोपली होती. सुलभा भिंतीला पाठ लावून बसली होती. शेवंताबाईनं अंथरूण टाकलं आणिच सोप्यात जाणार तोच बाबा पाटीलच घरात येऊन सुलभाच्या पुढं बसला. तशी सुलभा कावरीबावरी झाली. आता काय ऐकायला मिळणार या भीतीनं धडकीच भरली. पण त्याचवेळी शेवंताबाई येऊन सुलभाजवळ बसली. त्यामुळे तिला धीर आला.

बाबा पाटील म्हणाला, "सुलभा, मी तुला घरी का आणली आहे ते ऐक... आता आम्हाला शिक्षण पुरं झालं. कारण आता मी तुझं लग्न करणार आहे."

'मी तुझं लग्न करणार आहे' या शब्दांनी सुलभाच्या काळजाला आग लावली. ती कावरीबावरी होऊन पाहू लागली. शेवंताच्या तोंडाकडे तिनं पाहिलं नि मग बाबा पाटलाकडे वळून म्हणाली,

''तुम्ही पंधराच दिवसांपूर्वी म्हणालात की, आमची मुलगी शिकणार आहे नि आता म्हणता मी तुझं लग्न करणार आहे. हा काय प्रकार आहे! आणि मी म्हणते, माझ्या लग्नाची एवढी घाई का?''

''ते तुला समजणार नाही.'' पाटील म्हणाला, ''मुलीच्या लग्नाची घाई का करावी लागते ते फक्त मुलीच्या आई-बापालाच समजते.''

सुलभाच्या तोंडाला कोरड पडली. डोकं बधिर झालं.

शेवंताबाई ऐकत होती. ''मला अजून शिकायचं आहे.'' सुलभा कसंतरी बोलली.

''मुलांचं शिक्षण त्यांच्या मर्जीवर अवलंबून नसतं, ते त्यांच्या आई-वडिलांच्या हाती असतं.'' बाबा पाटील शांतपणे पण दाहक सुरात म्हणाला... ''तू लग्नाला तयार आहेस की नाही याचंच उत्तर मला हवं आहे.''

सुलभा भयभीत झाली. तिला बाबा पाटील कृतांत काळाप्रमाणे भासू लागला. ती आईकडे सरकली नि मोठ्यानं ओरडली,

''आ ऽ ई, मी काय उत्तर देऊ ऽ?''

शेवंता संतापली होती. म्हणाली, ''हे तुम्ही काय आरंभलं आहे? आधी म्हणालात माझी लेक शिकणार. मग तिला कोल्हापूरला पाठवली. नंतर लगेच जाऊन तिला आणली नि मग घरातील कुणाला न कळू देता धावपळ केली आणि आता म्हणता मी तुझं लग्न करणार आहे. हे नाटक का केलेत?''

''डोकं शांत ठेव!'' पाटील डोळे वटारून म्हणाला, ''अचानक स्थळ चालून आले आहे. नवरा शिकलेला आहे. तो सरकारी नोकर आहे. त्याला मोठा पगार आहे आणि स्पष्ट सांगतो, हे स्थळ तुझ्या भावाने आणले आहे नि ते मला पसंत आहे.''

''परंतु ते सर्व मला पसंत आहे की नाही याचा तुम्ही विचार केला आहे का?'' सुलभा आवाज चढवून म्हणाली, ''ज्याचं तोंड मी जन्मात कधी पाहिलं नाही त्याच्याशी लग्न कशी करू?''

''नवरा हा मुलीनं पाहिलाच पाहिजे असं तुला कुणी सांगितलं?'' बाबा पाटील भुवया चढवून म्हणाला, ''आम्ही जे करू ते वाईट करू असं तुला का वाटतं आणि तुझ्या या आईनं लग्नापूर्वी मला कधी पाहिलं होतं? विचार तिला.''

सुलभा गोंधळली. पण शेवंता मध्येच म्हणाली, ''मग हा आनंद वाईट होता का? माझी लेक माझ्या नजरेच्या सावलीत नांदली असती. पण तो तुम्हाला पसंत पडला नाही. म्हणे वळचणीचा साप आणि शेजारी पाव्हणा नसावा. मग हा दूरचा नाग कसा

परवडला?''

''सुलभाच्या आई, दळलेलं दळण पुन्हा दळू नका... मला तो आनंद पसंत नाही आणि हा जो मी पसंत केला आहे तोच मुलगा माझा जावई होईल हे लक्षात ठेवा. ही काळ्या दगडावरची रेघ आहे.'' पाटील शब्दाऐवजी निखारे उधळीत म्हणाला, ''आणि हे लग्न जर झालं नाही तर मुलगी जगेल नाहीतर मी जगेन नि लग्न झालं तर मग दोघांनाही जगता येईल.''

''म्हणजे तुम्ही मुलीचा खून करणार आहात की काय...?'' शेवंतानं विचारलं.

''आडवं आलेलं मूल कापून काढतात!'' पाटील बोलला आणि सुलभा म्हणाली,

''जर तुम्हाला असंच करायचं होतं, मला जनावराप्रमाणे विकायचं होतं, तर मग मला वाढवलं कशाला नि शिकवलं कशाला? लहानपणीच नाही गाडायचं?'' असं म्हणून तिनं आपलं तोंड बडवून घेतलं. सुलभाचा तो संताप लक्षात येताच पाटलाचा आवाज खाली आला. पण त्यातील धग कायम होती. तो म्हणाला,

''हे लग्न तुझ्या मामानं नि मी ठरवलं आहे. आमचा शब्द वाया जाणार नाही. तरी तू थोराच्या लेकीसारखं वर्तन कर आणि शेंबडासाठी नाक कापून टाकणाऱ्यांची आमची औलाद आहे हे लक्षात ठेव.''

''तुम्ही काहीही करा. पण मला विचार करावाच लागेल.'' सुलभा कडाडली, ''आणि मी विचार करूनच उत्तर देईन.''

''आम्ही सर्व विचार केला आहे.'' बाबा पाटील म्हणाला, ''आता फक्त तू बोहल्यावर चढायचाच विचार कर!''

''ते मी पाहते. मी बोहलं चढायचं की सरणावर चढायचं याचाच विचार करीन...'' सुलभा बोलली आणि ते ऐकून शेवंताबाई मोठ्यानं रडायला लागली. तिनं रडत रडत विचारले, ''हा नवरदेव कोणत्या गावचा तुम्हाला सापडला?''

''दूर तिकडं शिखरापूर.'' पाटील उत्तरला.

''मग हे सारं मला का कळू दिलं नाही?'' शेवंताबाईनं विचारलं.

''ते तू आपल्या भावालाच विचार.'' बाबा पाटील खेकसून म्हणाला, ''तुला आधी कळलं असतं तर काय झालं असतं?''

''मी स्वत: जाऊन नवरदेवाला पाहिला असता.'' शेवंताबाई म्हणाली.

''असं बोलून आपल्या लेकीचं भडकलेलं डोकं अधिक भडकवू नको!'' पाटील बोलला.

''पण या लेकीवर माझाही हक्क आहे.'' शेवंताबाई म्हणाली, ''आई-बापानंच मुलीच्या लग्नाचा विचार करायचा असतो, तर मग मी आई होते की नाही? आणि मला का विचारलं नाही?''

"त्याचं कारण मी लग्नानंतर तुला सांगेन." पाटील बोलला.

सुलभा काहीच बोलत नव्हती. ती आईच्या कुशीत तोंड खुपसून हुंदके देत होती नि ऐकत होती. तिला ती लग्नाची कल्पनाच सहन होत नव्हती. जर हे लग्न झाले तर आनंद काय म्हणेल हा विचार तिच्या मस्तकात उठताच तिने टाहो फोडला.

बाबा पाटील सुलभाला म्हणाला, "उगीच ओरडू नको, तू लग्न करणार की नाही एवढंच मला सांग आणि पुढं काय होईल तेही ऐकून घे. जर हे लग्न झालं नाही तर मी तुला घराबाहेर काढून मी, तुझी आई, जाई, काशिनाथ आणि स्वत: आम्ही चार माणसं कोंडून मी स्वत:च या वाड्याला आतून आग लावणार आहे. मग तू कुठेही कुणाशीही लग्न करून सुखाचा संसार कर. खुशाल कुठंही नांद."

सुलभाची जीभ कोरडी पडली. ती मोठ्यानं रडू लागली. शेवंताबाईनं आक्रोश मांडला. रडण्यानं घर भरलं, पाटील उठला. मागे-पुढे पाय ठेवून म्हणाला,

"उद्याच तुझा साखरपुडा आहे. नवरामुलगाही येणार आहे. पाव्हणे येणार आहेत. तेव्हा तू रडायचं नाही. हसत हसत साखरपुडा झाला पाहिजे. माझी लेक धुतल्या तांदळासारखी स्वच्छ आहे असंच सर्वांना वाटलं पाहिजे. म्हणून तू तसंच वर्तन कर. नाहीतर परवाच लोक म्हणतील, याच जागी बाबा पाटलाचा वाडा होता. हे लक्षात असू दे."

आणि मग पाटील सोप्यात अंथरुणाकडे निघाला तेव्हा त्याच्या पाठीवर शेवंताबाईचे शब्द धडकले, "माझ्या मुलीचं वाईट झालं तर मी पायरीवर टक्कर देऊन प्राण देईन."

परंतु पाटील काही बोलला नाही. त्यानं आपले डोळे घट्ट मिटून घेतले नि त्याला सुलभाचं बोलणं आठवलं. तिनं उत्तर दिलं होतं, 'बोहलं चढायचं की सरणावर चढायचं याचा विचार करूनच मी उत्तर देईन.' तो चटकन उठला नि हळूच परसदारी जाऊन बाहेरून कुलूप लावून परत येऊन अंथरुणावर पडला.

सुलभा आणि आनंद यांचं लग्न होऊ द्यायचं नाही, हा आपला निर्धार बाबा पाटलानं खरा करीत आणला होता. त्याला सुभेदार दादासाहेबांवर जन्मभर मात करता आली नव्हती, म्हणून त्यानं आनंदवर सूड घेतला होता. वैरी मरतात-त्यांची हाडं कुजतात-पण वैर कधीच मरत नाही, हे बाबा पाटलाला आपल्या कृतीनं सिद्ध करायचं होतं.

पण...

## ४

रात्र भयभीत होऊन पळत होती. तिच्या मागं प्रकाश धावत होता. अंधार मी म्हणत होता.

त्या भेसूर रात्रीच्या टाचेखाली सारी धरणी रगडली जात होती. सर्व चराचर निपचित पडले होते. कुठंही हूं की चूं होत नव्हते. पण रातकिडे आपल्या सहस्त्र कंठाने चिरचीर करीत होते. कुठंतरी मध्येच एखादं घुबड घूत्कार करीत होतं नि मग ती काळरात्र थरथरत होती. बाबा पाटलाचा वाडा अंधारात उभा होता नि त्या वाड्यात सर्व काही गतप्राण झाले होते. बाबा पाटील सोप्यांत पडला होता. पण तो जागाच होता. तो उद्याची वाट पाहत होता. त्याला उद्याची निकड लागली होती.

सुलभा अंधारात निश्चल पडून होती. ती गडद अंधारात डोळे फाडून पाहत होती. नि आज चमत्कार झाला होता. अंधारात दिसत नव्हतं. पण आज तिला आपल्या जीवनात काय काय घडलं आणि पुढं काय काय घडणार याचं चित्र स्पष्ट दिसत होतं. ती रडत होती. तिच्या डोळ्यांतून अश्रूंच्या धारा वहात होत्या नि त्यांनी तिचे कान भरून नंतर तिची उशी भिजत होती. ती सरळ आढ्याकडे पाहत होती. तिचे स्वतंत्र जीवन सकाळीच संपणार होतं. तिचं प्रेम, तिची आशा, तिचे सुख नि त्या सुखाविषयी तिनं केलेल्या कल्पना या साऱ्यांना उद्या सूर्योदय होताच मूठमाती मिळणार होती. म्हणून तिचा आत्मा धडधडून पेटत होता.

तिने तरुणपणाच्या धुंदीत आनंदवर अपार प्रेम केले होते. परंतु सकाळी ते निष्फळ होणार होते. अगदी कापराच्या वडीप्रमाणे भर्रकन पेटून नाहीसे होणार होते.

ती विसरली होती की दवणा वाळून गेला तरी दरवळतो. तो आपला सुगंध सोडत नसतो. तद्वत आपली प्रीत सदा सर्वदा दरवळत राहणार आहे, याचा तिला परिस्थितीनं विसर पडला होता. ती आठवत होती, काय तर आनंदचं प्रेम, त्या भेटी, ती वचने, आणि ते दिवस-सुंदर दिवस! ती मनात म्हणत होती, आता ते दिवस पुन्हा उगवणार नाहीत, ते प्रेम मला पुन्हा मिळणार नाही. आनंद कधीच दिसणार नाही. वचनभंग केला म्हणून या जन्मात माझे तोंड पाहणार नाही.

सकाळी लोक जमणार आहेत आणि ते माझ्या सर्वस्वाची साखरपुड्याच्या समारंभात विधिपूर्वक राखरांगोळी करणार आहे आणि ती जमणारी माणसं माझ्या हृदयाला अग्नी देऊन स्वतःच्या जीवनाचे सार्थक मानणार आहेत आणि स्वतःला धन्य समजणार!

तिचा निःश्वास कोंडला होता. तिचे ओठ बोलत होते. उद्या मी परक्याची होणार नि माझे प्रेम मातीला मिळणार. मी ज्याला बालपणीच आपला देह अर्पण केला, आपली मालकी बहाल केली, तो परका ठरणार नि ज्याला मी कधीच पाहिला नाही तो माझ्या देहाचा मालक होऊन माझ्यावर आपला मालकी हक्क सांगणार! केवढी ही माझी क्रूर विटंबना!...

नाही-मला हे सहन होणार नाही! मला बोहलं चढायचं नाही-मी सरणावरच चढणार, असं म्हणून ती उठली. हळूच परसदारी गेली. तिच्या डोळ्यापुढं आनंदची विहीर दिसू

लागली. तिनं दाराला हात लावला. पण दाराला टाळा होता. तिची निराशा झाली. ती पुन्हा येऊन अंथरुणावर पडली. तिने डोळे मिटले.

आणि एकाएकी तिच्या बंद डोळ्यांपुढं बाबा पाटलाचा वाडा धडधड पेटू लागला. त्याच्या ज्वाला आकाशाला चाटू लागल्या. त्यांनी सारा गाव उजाळला-लोक खडबडून उठले. गावकऱ्यांनी त्या जळत्या वाड्याभोवती गर्दी केली-सर्वत्र हल्लकल्लोळ उसळला-

"आरं, पाणी आणा!" लोक ओरडू लागले.

"अरं, दरवाजा फोडा!" बाहेर गलका झाला. "बाबा पाटील नि त्यांची माणसं आतच हायती."

परंतु दरवाजा आतून बंद होता. वाडा संपूर्ण आगीनं वेढला होता. धाकटी जाई जळत होती. काशिनाथचा जळून कोळसा झाला होता. त्याच्या जवळच शेवंताबाई प्राण सोडीत होती आणि बाबा पाटील पिसाट होऊन चहूकडे पळत होता. अंगावर पडणारी जळती लाकडं तो चुकवीत होता. एक तुळई जळून कोसळत होती. उभे खांब धडाधडा अंग टाकीत होते.

शिकस्त करूनही आग आटोक्यात आली नाही-लोक हतबल होऊन बोलू लागले, "अरं हे असं कसं झालं! बापाने ठरवलेला नवरा लेकीला पसंत पडला न्हाय. तिनं आपल्या मनानं नवरा केला म्हणून पाटलानं वाडा जाळून आपून जळून गेला!"

"वाईट लेका बायकाची जात-" कोण तरी बोलले.

सुलभा धडपडून उठली नि ती आग अंधारात गडप झाली. ती वेडावली नि अंथरूण चाचपू लागली. नंतर ती पुन्हा झोपली आणि मग तिचा आत्मा 'आनंद, आनंद, आनंद' करून टाहो फोडू लागला. आनंद, पाहा माझ्याभोवती ही आग पेटली आहे आणि त्या आगीत ही तुझी लाडकी सुलभा जळून राख होत आहे. आनंद, तू या वेळी कुठं आहेस? मी म्हणत होते की जर पुन्हा जन्म घेता आला असता तर मी पुन्हा जन्म घेऊन तुझ्यावरच प्रीत केली असती. पण पाहा ना हा केवढा प्रसंग माझ्यावर गुदरला आहे! आता सकाळीच माझा साखरपुडा आहे नि मी मरणार आहे. परंतु माणसाचं सोंग घेऊन परत जिवंत जगणार आहे. अगदी माणसाप्रमाणे. आता मला मरून जिवंत राहायचं आहे आणि रडत हसायचं आहे. किती कठीण कामगिरी आहे! मला काय-हे माझं दुर्दैव!

तिची सर्व गात्रं शिथिल पडली होती, पण ती विचारचक्राबाहेर पडत नव्हती. ती म्हणत होती, सकाळी विधिपूर्वक माझ्यावर दरोडा घातला जाणार आहे. तिनं कोरड्या ओठावरून कोरडी जीभ फिरवली. तिच्या काळजात विंचू डसला. ती म्हणाली, "नाही, नाही, हे मुळीच शक्य नाही. आई ऽ ऽ" तिनं हाक मारली.

"सुलभा, काय झालं?" आईनं उठून विचारलं. दिवा लावला. शेवंता हळूच पुढं गेली. सुलभा रडत पडली होती. तिची उशी भिजली होती.

"सुलभा..."

"आ ऽ ई ऽ ऽ"

"काय झालं?"

"का ऽ ही नाही आई."

"नाही कसं?"

"तुला सा ऽ रं ठाऊक आहे आई."

"पण..."

"मला पाणी दे!"

शेवंतानं तिला पाणी दिलं. ते पिऊन सुलभानं निःश्वास टाकला. शेवंता म्हणाली,

"सुलभा, धीर सोडू नको."

"आई, रात्रीच माझा धीर मोडून पडला आहे."

"सुलभा, तू शहाणी आहेस."

"माझं ऐक आई."

"तुला माहीत होतं की नाही?"

"हो... होतं."

"आणि आबांना?"

"होय, त्यांनाही."

"मग हे असं का केलं? कसला सूड घेतला?"

"ते जुने वैर उकरून काढलं तुझ्या वडलानं. तरीही मी आनंदविषयी बोलणं काढलं होतं."

"मग उत्तर काय दिलं?"

"जे रात्री दिलं तेच!"

"मग मी काय करू?"

"जे काय करायचं ते आमच्यासाठी कर."

"काय काय करू? मी स्वतः रडूही नको?"

"तसं कोण म्हणतं? काळजाला कळ लागली तरच रडू येतं."

"मला काळीज आहे की नाही?" सुलभानं भिंतीला धडक घेऊन विचारले.

शेवंतानं तिला मिठी मारली आणि मग त्या दोघी रडत बसल्या.

त्या रडारडीतच दिवस उगवला. रात्रभर रडून लालतंबर झालेले डोळे उघडून सुलभा म्हणाली, "आता मला लौकर उठले पाहिजे...तयार झाले पाहिजे....कारण आता लोक जमून माझी तिरडी बांधतील!"

"असं बोलू नये सुलभा..." शेवंताबाई गहिंवरून म्हणाली आणि तिनं कपाळावर

हाणून घेतलं.

बाबा पाटील लौकर उठला होता नि तो आपल्या कामाला लागला होता. त्याची सारी भावकी एकवटली होती. आज पाव्हणं येणार म्हणून सुलभाच्या साखरपुड्याच्या मोठ्या जेवणाची तयारी चालली होती. अंगणात नुसती लगीनघाई उसळली होती.

आणि सुलभाच्या साखरपुड्याची बातमी ऐकून गावातील लोकांना आश्चर्य वाटत होतं. कारण सुलभाचं लग्न आनंदशीच होणार असं कित्येकांनी पूर्वीच भाकीत केलं होतं. परंतु आज बाबा पाटलानं ते भाकीत उलटंच्या पालटं करून, भलतंच केलं होतं!

हां ऽ हां म्हणता चर खणला. डाळीचं हांडं चढलं. कणीक तिंबली जाऊ लागली. भात शिजू लागला. गावातील आयाबाया येऊन तापल्या तव्यावर पुरणपोळ्या चरचरू लागल्या.

गावातली कर्ती, कारभारी, शहाणी म्हणून घेणारी माणसं म्हणजे अंगचुकार माणसं ती उगीचच धावपळ करू लागली व एकमेकांवर खेकसू लागली. आपणच फार काम करीत आहोत असं भासविण्यासाठी ओरडू लागली. जो तो फर्जी झाला.

समोरच्या सोप्यात गाद्या टाकल्या, लोड उभे केले. पानसुपारीची ताटं जागजागी ठेवली. अगदी समोरच नवरदेवाची बसण्याची खास व्यवस्था करण्यात आली. कारण बाहेरून येणाऱ्याला आपला जावई चटकन दिसावा म्हणून बाबा पाटलाने ती व्यवस्था केली होती.

बाबा पाटील वाघागत डिरकी देत होता.

शेवंताच्या चेहऱ्यावर तिळभर उजाळा नव्हता. परंतु आपण या लग्नाविरुद्ध आहो असं लोकांना दिसू नये, म्हणून ती काळजी घेत होती नि ती उगीचच रेंगाळत होती. सुलभा अचानक आत्महत्या करील अशी तिला भीती होती, म्हणून ती सुलभावर नजर ठेवून सावध होती.

सुलभा एकाच जागी बसली होती. ती गुडघे पोटाशी धरून नि त्यावर हनुवटी ठेवून बाहेरचा सर्व प्रकार पाहत होती. ती मनानं जळत होती. तिचं हृदय विदीर्ण झाले होते. नि तिला स्वतःच्या त्या दुबळेपणाची किळस आली होती. आपणाला विरोध करता येत नाही. नाही तर याच वेळी, याच जागी निराळे दृश्य दिसलं असतं.

नंतर ती उठली नि परसदाराला जाऊन एकटीच बसली.

अकराच्या सुमाराला मानगावचा मारुती पाटील दोन गाड्या भरून माणसं घेऊन आला. त्याला पाहून बाबा पाटलाचा आनंद गगनाला भिडला. त्यानं अंगणात मारुती पाटलाच्या गळ्याला मिठी मारली. नंतर मारुती पाटील मोठ्या ऐटीत घरात जाऊन बहिणीला-शेवंताला-भेटला आणि हरकून म्हणाला,

"आका, खरंच तुझं नशीब लई दांडगं! पन्नास गावात तुला उजवा जावई मिळाला!

आता तू बघशीलच म्हणा! झकास झालं तुझ्या लेकीचं नि माझ्या भाचीचं!''

शेवंता काहीच बोलली नाही. ती मनात म्हणाली, या घरात काय घडत आहे आणि पुढं काय घडणार याची तुला काय कल्पना आहे.

मारुती पाटलाचं ते बोलणं ऐकून सुलभाच्या अंगाचा तिळपापड झाला. तिनं स्वत:च्या गुडघ्यावर डोकं आपटलं. तिचे विचार डिवचलेल्या नागासारखे खळवळून उठले. एक भयंकर कल्पना सुचली, काही का होईना, पण सर्वांच्या आनंदाचं भयंकर आक्रोशात रूपांतर करायचं. या सर्वांनी हसता हसता ऊर बडवीत पळत सुटावं. ती चटकन उठली, तिनं जवळची विहीर लक्षात आणली आणि ती कावरीबावरी झाली.

शेवंताचं सुलभावर लक्ष होतं. ती उठलेली पाहताच ती धावत गेली. तिनं सुलभाचा तो भयंकर चेहरा पाहिला नि सुलभा कसला तरी विपरीत विचार करीत असावी अशी तिची खात्री पटली.

एवढ्यात गावातील मुली जमून आल्या. सुलभाभोवती बसल्या. तेव्हा सुलभा विषण्णपणे हसत त्यांच्याशी बोलू लागली.

आता बाबा पाटलाचं सर्व लक्ष नवरदेवाच्या वाटेकडे लागले होते. तो का येत नाही, याचा तो विचार करीत होता आणि जो कोणी भेटेल त्याला विचारीत होता आणि 'कुणाला ठावं' असं म्हणून माणसं खालचा ओठ उफराटा करीत होती. परंतु त्याला फार वेळ वाट पाहावी लागली नाही. एका खास मोटारीत बसून नवरदेव येऊन दाखल झाला. त्याला अलग नेऊन गादीवर बसवला नि मग पुढारी मंडळींनी त्याच्याभोवती कोंडाळं केलं; आणि मग पानसुपारीच्या ताटाचा बुकणा उडू लागला.

आला. सुलभाचा नवरा आला...अशी एकच आरोळी झाली. बाबा पाटलाच्या गळ्याचं पेडं पडलं.

परंतु सुलभाच्या गळ्याला तात लागली. ती हसत हसत रडू लागली. बावचळली... चौफेर पाहू लागली. हरणीप्रमाणे पळून जायला मार्ग शोधू लागली.

नवरदेव ऐटीत बसला होता. तो रंगानं गोरा, दिसायला बरा होता. त्याचा चेहरा हसरा होता. तो बोलत होता नि बोलता बोलता गंभीर होत होता. तो तरुण होता. कोट, पँट, बूट असा त्याचा सायबी पोशाख होता. तो वरचेवर सिगरेट फुंकत होता. गावचे पुढारी त्याला पाहून दिपले होते. आणि म्हाताऱ्या बाया येऊन नवरा पाहून म्हातारपणी मानेत कंप शिरावा तद्वत नकारार्थी माना हलवीत... नाही नाही, असं म्हणत शेवंताकडे जाऊन बोलत होत्या, ''कशापाई एवढी घाई केलीस नि हळकुंडाच्या गळ्यात शेळकुंड बांधलंस!''

एक म्हातारी म्हणाली, ''मला वाटलं, आनंदापरीस देखणा असंऽल, पर न्हाय. आनंदाच्या पासंगाला ह्यो बसत न्हाय !''

ती बोलणी ऐकून शेवंताच्या काळजाला डागण्या बसत होत्या. ती काहीच बोलत नव्हती.

शेवंतानं सखू म्हातारीला विचारलं,

"आत्या, कसा काय आहे नवरदेव?"

"रुपयात चार आणं!" सखू म्हातारी रोखठोक म्हणाली, "आंबा, आंबाट हे त्याच्या वासावरून कळतं; तसंच माणूस गरीब हाय का माजुरी हे त्याच्या डोळ्यात दिसतं. तुझा आंबा आंबाट हाय ग बाय!"

शेवंताचा चेहरा पडला नि बाबा पाटील गडबडीनं घरात येऊन शेवंताला म्हणाला,

"काय, पाहिला आपण जावई?"

"काय पाहायचं त्याला?" शेवंता उत्तरली.

"म्हणजे?" पाटील गुरकला.

"म्हणजे जावई हा लग्नाआदी पाहायचा असतो. आता काय पाहायचं आहे त्याला!" शेवंता म्हणाली, "घोडं आणि मैदान दूर नाही."

"ठीक. सुलभा कुठं आहे?" पाटील बोलला.

"परसदारी-" शेवंता उत्तरली. पाटील परसदारी गेला नि सुलभा रडत असलेली पाहून म्हणाला,

"सुलभा, रडायला काय झालं?"

"माणूस कां रडतं?" सुलभानं विचारलं.

"रात्री मी काय सांगितलं होतं?" पाटील.

"तुम्ही मला धमकी दिली होती म्हणून मी अशी जळत मरते आहे." सुलभा बोलली.

शेवंता मारुती पाटलाला घेऊन परसदारी आली.

"सुलभाऽ" पाटील ओरडला.

"आता उगीच ओरडू नका." सुलभा निर्भान होऊन म्हणाली, "आणि माझ्या पुढं येऊ नका – नाही तर..."

"नाही तर काय?" पाटलानं विचारलं. सुलभा निकरावर आली आहे हे त्याच्या लक्षात आलं. तो म्हणाला, "सांग की–"

"आता कसं सांगू. तुम्ही मला छळू नका. नाही तर मी तुम्हाला जळून मरायला लावीन-"

"पाटील हे तुम्ही काय मिळवताय? चला–" मारुती पाटील बोलला.

"हा असा पोरीचा छळ मांडलाय!" शेवंताबाई म्हणाली. पाटलाला घेऊन मारुती पाटील परत फिरला तेव्हा सुलभा किंचाळून म्हणाली –

"आज तुम्ही माझ्यावर सूड घ्या, परंतु लौकरच मीही तुमच्यावर सूड घेऊन दाखवते.

फक्त ते पाहायला जिवंत राहा—''

आणि सुलभाच्या त्या बोलण्यानं बाबा पाटलाच्या उरात धडकीच भरली. शेवंता कुलकर्णीबाईला बाजूला घेऊन म्हणाली —

''बाई, एक काम करा. माझ्या सुलभाला तुम्ही तुमच्या घरी घेऊन जा आणि तिच्यावर नजर ठेवा. नाही तर ती आपल्या जीवाला काही तरी करून घेईल.''

नंतर सर्व मुली नि सुलभाला घेऊन कुलकर्णीबाई घरी गेली आणि शेवंताचा जीव भांड्यात पडला.

स्वैंपाक तयार झाला. दिवस वरती फिरला नि सर्व पाव्हणे येऊन बाबा पाटलाचा वाडा भरला. सर्व पाव्हण्यांनी साखरपुडा उरकून घ्या अशी मागणी केली. ज्यांना फारच भूक लागली होती त्यांनी तर साखरपुडा, साखरपुडा असा एकच दंगा आरंभला.

उशिरानं सुलभा मुलींच्या घोळक्यातून आली. आपल्या अंगणात थांबली. आपोआप तिची नजर कृष्णाबाईंच्या अंगणाकडे गेली नि कृष्णाबाई अंगणात उभीच होती. तिला पाहताच सुलभा तिकडं गेली नि कृष्णाबाईला घरात नेऊन तिच्या गळ्यात पडली. ती म्हणाली,

''आई, माझा घात झाला. मी आज मरणार. मला कुणाचाच आधार नाही.''

''आता गप्प बस. काहीच बोलू नको.'' कृष्णाबाई म्हणाली, ''तुझा खून करून तुझ्या बापानं आनंदवर सूड घेतला आहे. परंतु माझा हिरा आहे. तो कुठंही ढालच देणार. पण तुझं काय! पण धीर सोडू नको आणि एवढी तार वाच...''

सुलभानं ती तार वाचली.

''आई, कालच माझी सेकंड लेफ्टनंट या हुद्यावर नेमणूक झाली...''

तार वाचून सुलभा तशीच त्या कागदाकडे पाहत राहिली. तिचे डोळे भरले. अश्रूंचे दोन बुंद त्या कागदावर ठिबकले. ती म्हणाली,

''आई, आनंदाला मोठी नोकरी मिळाली.''

''बरं जा आता. संचिती होतं ते घडलं.'' कृष्णाबाई म्हणाली.

''जाते. तिकडं माझी तिरडी बांधली असेल. आई, आनंदाला सांगा, म्हणावं, सुलभा मेली...'' असं म्हणून तिनं हुंदका दिला.

''तसं म्हणू नको...देव जागा आहे. जा...'' कृष्णाबाई बोलली आणि सुलभा डोळे पुसून घरी गेली.

सुलभा घरात एका कोपऱ्यात बसली. गुडघे पोटाशी धरून स्तब्ध बसली आणि ओठातल्या ओठात आनंदशी बोलू लागली. तिनं पापणीच्या कातरीनं आसवांची माळ कातरली नि मनात म्हणाली, 'आनंद, खरंच तू भाग्यवान आहेस! तुझी पहिलीच गरुडभरारी गगनाला भिडली नि तुझी ही सुलभा आज गाडली जात आहे. ज्या दिवशी

तू कर्तृत्वाच्या शिखरावर झेप घेतलीस त्याच दिवशी तुझी सुलभा क्लेश, अपमान, दुःख यांच्या नरकात लोटली जात आहे. हा विलक्षण योगायोग आहे! मी दुबळी आहे. मी तुझं अभिनंदन करू शकत नाही. कारण मी आजपासून गुलाम आहे. तरी पण मी मनातल्या मनात तुझे अभिनंदन करीत आहे. दुसरे काहीच करू शकत नाही.'

साखरपुड्याची तयारी झाली. सर्व मंडळी जमली. मुलींनी सुलभाला सजवली. भरजरी पैठणीनं नि सोन्याच्या अलंकारानं ती कोमेजलेली सुलभा ढगातून चंद्र बाहेर पडावा तशी भासली. तिला पाहून शेवंताचे डोळे दिपले. ती म्हणाली, "थोडं थांबा, तिला बाहेर नेऊ नका, मी तिची दृष्ट काढते."

सुलभा विषण्णपणे हसत म्हणाली, "आई, नवं कफन घातलेल्या मढ्याची कोण दृष्ट काढतात का! जाऊ दे त्याला तिरडीकडे!"

हे ऐकून शेवंता भयभीत झाली. तिनं फडाफडा तोंडात मारून घेतले.

आणि साखरपुड्यासाठी नवरी पुढील सोप्यात जाऊन दाखल झाली. सोपा शांत झाला; नि नवरी दिसावी म्हणून नवरदेव धडपडू लागला.

साखरपुड्याचा समारंभ पार पडताच जेवणाच्या पंगती पडल्या. वाढपे बादल्या घेऊन धावधावून वाढू लागले.

"मंडळी पोचलं का!" कुणीतरी आरोळी दिली नि हो...हो पोचलं. मग म्हणा तर 'पुंडलीक वरदे हरी विठ्ठल... श्रीज्ञानदेव तुकाराम.' आणि मग हातातोंडाची झटापट सुरू झाली.

मग सर्व मंडळी सोप्यात जमली नि लग्न कधी या मुद्यावर चर्चा सुरू झाली.

नवरीकडील मंडळींनी विचारलं, "हं, बोला मंडळी, लग्न कधी?..."

काहींनी सूचना केली की कार्तिक पौर्णिमेपर्यंत थांबा. तेव्हा नवरदेवाकडची कर्ती मंडळी भडकली. एकजण म्हणाला, "हे पाहा, नवरा शिकलेला आहे. नवरीही शिकलेली असं सांगण्यात येतं. मग हा तिथीमिथीचा वाद कशाला?"

"मग माझं ऐका..." बाबा पाटील म्हणाला.

"आमची उद्याची तयारी आहे... बोला!"

"ठरलं! चला, उद्याच लग्न उरकू!" नवऱ्याकडचा कारभारी म्हणाला, "पहाटेला एक ट्रक वऱ्हाडासाठी आणि एक टुरिंग नवरीसाठी येईल. तयारी करा. उद्याच..."

"ठरलं, फोडा सुपारी..." कोण तरी म्हणालं आणि सुलभाचं लग्न दुसऱ्याच दिवशी उरकायचा विचार निश्चित झाला.

बैठक उठली. नवऱ्याकडील पाव्हणे पांगले. उद्याच लग्नाला जायचं म्हणून मूळ

वऱ्हाडी मूळ धरून बसले.

पहाट झाली. अंधाराचा थर विरविरीत झाला. गावातले कोंबडे आरवले नि बाबा पाटील उठला. वाड्यात एकच गडबड सुरू झाली...

आणि ते पहाटेचे शांत वातावरण चिरडीत एक ट्रक गावात शिरला आणि लगेच एक टुरिंग मोटार येऊन दाखल झाली. दोन मोटारी वाड्यापुढं थांबताच बाबा पाटलानं आरडाओरडा केला.

शेवंतानं सुलभाच्या दंडाला धरून तिला मोटारीत बसवली. एका बाजूला जाई नि दुसऱ्या बाजूला शेवंता नि मधे सुलभा बसली. तेव्हा बाबा पाटील म्हणाला, ''हं, चला.''

आणि सुलभाला घेऊन ती मोटार पळत सुटली. तिनं शिखरापूरचा मार्ग धरला. तेव्हा सुलभा आईला म्हणाली,

''आता मी जिवंतपणी मरणाचा अनुभव घेणार. आता आपली कुणाची भेट होणार नाही. आई आबानं मला आज नरकात लोटायला बाहेर काढले आहे. पण आई, मी तुमचा काय अपराध केला होता?''

शेवंता म्हणाली...''मी तरी काय करू!''

''तू काय करणार!'' सुलभा बोलली.

''पण सुलभा...''

''काय?''

''दिल्या घरी सुखी हो...''

''नाही तर काय!''

''मुलीला दिलं घर किंवा व्यालं घर हे लक्षात ठेव.''

''मी काहीच विसरणार नाही.'' सुलभा तीक्ष्ण स्वरात म्हणाली, ''पुढे... माझे माझेही दिवस येतील. पण देवानं माझ्या या बापाला आयुष्य द्यावं एवढीच इच्छा आहे. कारण तो जिवंत राहिला तरच त्याला ते दिसणार आहे म्हणून म्हणते.''

## ५

दिल्लीचे भव्य रेल्वे स्टेशन प्रवाशांनी फुलले होते. सर्वत्र गजबजाट झाला होता. प्रवासी आपले सामान डोकीवर घेऊन पळत होते. त्या पळापळीला नि आरडाओरडीला सीमाच नव्हती. सर्वत्र हलकल्लोळ उसळला होता नि त्यानं स्टेशनचं छत हादरत होतं.

पंजाब मेल ही प्रसिद्ध गाडी आपल्या प्लॅटफॉर्मवर शांत उभी होती. तिची

मुंबईपर्यंतच्या प्रवासाची जय्यत तयारी झाली होती आणि तिच्या भ्रमणाला आता थोडासाच अवधी उरला होता.

हमालांच्या अंगात महाकाळ संचारला होता. ते आपल्या वज्रकरांनी गाडीच्या डब्यात सामान ठासून भरत होते. खड्ड्यात लोटावे तद्वत माणसांना खिडकीतून आत लोटून आपले खिसे भरीत होते.

एक हमालानं जोरदार धाव घेतली नि एका पहिल्या वर्गाच्या डब्यात कॅप्टन आनंदचं सामान चढवलं. ते व्यवस्थित ठेवलं.

खाली उडी मारली...डोकीचं पागुटं काढून त्यानं आपलं टाळकं खाजवलं.

कॅप्टन आनंद खाली उभा होता. त्यानं एक रुपयाची नोट हमालाच्या हाती देताच त्यानं आनंदाला सलाम ठोकला नि पुन्हा पळ काढला.

कॅप्टन आनंद गाडीत चढला. त्यानं सर्व प्रवाशांच्या डोकीवरून नजर फिरवली, तसं पाहिलं तर डब्यात गर्दी नव्हती. परंतु पहिल्या वर्गात बसलेले सर्व प्रवासी पहिल्या दर्जाचे होते, तसेच ते पहिल्या दर्जाच्या प्रतिष्ठेचेही होते. त्यामुळे ते ऐसपैस बसले होते. काही तर घरी पाटावर बसावं तसं आसन ठोकून बसले होते. काहींच्या गप्पा रंगात आल्या होत्या. कोणी आपण मुंबईस कधी पोहचू असं शेजाऱ्याला विचारीत होते.

आनंद पुढं येताच सर्वांनी त्याच्याकडं टवकारून पाहिलं. उंच, देखणा, उमदा नि एक लष्करी अधिकारी अशा आनंदाला पाहून त्यांना बरं वाटलं. पुन्हा ते सर्व प्रवासी आपल्या नादात गढून गेले.

परंतु एक इसम आनंदाकडे एकटक पाहत होता. त्याची नजर हलत नव्हती. तो आनंदाला निरखीत होता. परंतु आनंदाचं तिकडं लक्षच नव्हतं.

शिटी वाजली नि गाडीनं हळूच गती घेतली. मग तिची गती हळूहळू वाढू लागली. क्षणोक्षणी तिचा वेग वाढू लागला. आता आपण कुठं तरी बसलंच पाहिजे असा विचार करून आनंद रिकामी जागा पाहू लागला. एवढ्यात तो इसम स्वत:च आनंदकडे धावत आला नि नम्रपणे म्हणाला, ''आपले नाव...आनंद-''

''कोण आपण? बाळासाहेब-'' आणि बाळासाहेबानं आनंदाला मिठी मारली. दोघंही मोठ्यानं हसले. बाळासाहेब म्हणाला,

''किती दिवसानं भेटत आहेस आनंद? कसं काय बरं आहे ना?''

''मी अगदी आनंदात आहे.'' आनंद म्हणाला. ''हा मी तुझ्यापुढं उभा आहे यावरून तुला कल्पना येईल बंब्या.''

बाळासाहेब आणि आनंद हे दोघे पूर्वी साताऱ्यात एकाच कॉलेजात शिकत होते. दोघांची फारच दोस्ती होती. त्यावेळी कॉलेजातील बाळासाहेबांच्या सर्व मित्रांना एक समारंभ करून बाळासाहेब मल्हारराव बावडेकर हे नाव बदलून त्याच्या बंब्या हा नामकरण

विधी पार पाडला होता आणि तेव्हापासून त्याला सर्व मित्र बाळासाहेब म्हणायच्या ऐवजी बंब्या म्हणत!

"आनंद, आता कुठं आहेस तू?"

"अरे लष्करात! हा युनिफॉर्म तरी पाहा. च्यायला दिसून आंधळा कसा!" आनंद हसत बोलला, "परंतु तू कुठं आहेस?"

"आनंद, मी – मी खुशाल आहे." बाळासाहेब म्हणाला, "मी आता इन्कम टॅक्स डिपार्टमेंटमध्ये ऑफिसर आहे. माझे सर्व ठीक चालले आहे."

"अरे, परंतु बिऱ्हाड कुठं आहे?" आनंदानं विचारलं आणि बाळासाहेब म्हणाला,

"आता मी आग्र्यात आहे आणि–"

आनंद आश्चर्यानं म्हणाला,

"काय आग्र्यात?... अरे, मीही आग्र्यातच असतो! बाळासाहेब, काय हे?"

"भ ऽ ले!" बाळासाहेब म्हणाला, "किती दिवस झाले तुला आग्र्यात?"

"एक वर्ष–" आनंद उत्तरला.

"मला तीन वर्षं पूर्ण झाली. आपण एका शहरात असून आपली भेट नाही! आश्चर्य आहे." बाळासाहेब म्हणाला, "बाकी तेही खरं आहे. तुम्ही लष्करी लोक! बंदुकीच्या नळीला एक डोळा तर, दुसरा झाकून दूरचं पाहणार? तुम्हाला पायाखाली काय आहे दिसणारच नाही."

"तसं नाही रे बाळासाहेब, तू आग्र्यात आहेस हे समजलं असतं तर मी तुला रोज भेटलो असतो." आनंद बोलला.

"ठीक आहे. आज भेट झाली." बाळासाहेब म्हणाला, "म्हणतात ना की दगडाला दगड भेटतो."

"म्हणजे आपण दगड काय रे!" आनंदानं विचारले.

"आनंद, तू इकडं कुठं?"

"मी रजेवर गावी गेलो होतो." आनंद म्हणाला, "परंतु गावाला करमेना म्हणून रजा संपण्यापूर्वीच निघालो. दिल्लीत येऊन एका मित्रांकडे दोन दिवस मुक्काम केला तरीही रजा संपेना! मग हा आता दोन दिवस आधीच जात आहे नोकरीवर–"

"भ ऽ ले–" ...बाळासाहेब म्हणाला, "म्हणजे दोन दिवस रजा शिल्लक आहे?"

"होय, खरंच." आनंद उत्तरला.

"मग आता एक कर–" बाळासाहेब बोलला.

"काय करू? ऑर्डर–" आनंद म्हणाला.

"ऑर्डर नाही रे बाबा! एक विनंती आहे, की दोन दिवस मला दे." बाळासाहेब म्हणाला, "म्हणजे तू दोन दिवस पाव्हणा म्हणून राहायचं. कबूल?"

"कबूल-कबूल—" आनंद मोठ्यानं हसला.

गाडीने आता तुफान वेग घेतला होता. चाकांचा खडखडाट नि तिची गती एक झाली होती. ती आपल्या भरारीनं पंजाब मेल हे नाव सार्थ करीत होती. तिच्या धडधडाटानं प्रवाशांना एकमेकांपुढं किंचाळावे लागत होते. प्रत्येक प्रवासी मद्याप्रमाणे हलत होता. सुपात घेऊन दाणे पाखडावे तसे सर्व प्रवासी पाखडले जात होते. बोलताना सर्वांना ओरडावे लागत होते. काहींनी आपली वाचा बसवून घेतली होती. काहींनी डोळे झाकून झोपेचे सोंग घेतले होते. कित्येक डोकी झुंजेच्या कोंबड्याप्रमाणे डुलत डुलत जाऊन दुसऱ्याच्या डोकीवर आदळत होती नि डोक्यावर डोकं आदळून टक्कर झाली की ते दोन प्रवासी एकमेकांवर बिथरत होते. परंतु लगेच आपण सभ्य आहोत हे त्यांच्या लक्षात येऊन ते 'सॉरी' या शब्दात उच्चार करून पुन्हा डोळे झाकत होते.

बाळासाहेबानं विचारलं,

"कॅप्टन आनंद, लग्न केलंस— ?"

"नाही."

"का रे, काय झालं, का म्हातारपणी तू लग्न करणार?" बाळासाहेब बोलला.

"म्हणजे, मी सेवानिवृत्त झाल्यावर लग्न करणार आहे." आनंद बोलला.

"म्हणजे?" बाळासाहेबाला आश्चर्य वाटलं.

"म्हणजे — मला वर्षातून महिन्याभराची रजा मिळते. तेव्हा वर्षातून एक महिना संसार करायसाठी लग्न करून काय फायदा आहे! म्हणून मी ठरवले आहे की, नोकरी संपवून जेव्हा मी पेन्शनवर जाईन तेव्हाच लग्न करीन—" आनंदानं खुलासा केला.

"भ ऽ ले! मार टांग-" बाळासाहेब बोलला आणि ते दोघं मोठ्यानं हसले.

दुपारच्या आतच आग्रा स्टेशन आले. बाळासाहेबानं टॅक्सी केली आणि आनंदाला घेऊन तो घरी गेला.

बाळासाहेबाचं घर म्हणजे तो एक लहानसा बंगला होता. अगदी राजमार्गाला लागून एक कंपाउन्ड होतं नि आत एक लहानशी बाग होती नि पुढं तो बंगला होता. कंपाउन्ड ओलांडून आत जाताना समोर एक कमान दिसत होती नि त्या कमानीवर 'राधा निवास' ही अक्षरं दिसत होती. व्हरांड्यात एक नोकर भिंतीला टेकून बसला होता. त्याला बाळासाहेबानं हाक मारली, "भोलाराम, चल, हे सामान उतर—"

भोलाराम टॅक्सीकडे धावला. त्यानं टॅक्सीतील सर्व सामान बाहेर काढलं.

बाळासाहेब आनंदाला घेऊन घरात गेला नि त्यानं हाक मारली — "अहो बाईसाहेब - जरा बाहेर या पाहू. पाव्हणे आले आहेत."

आनंद लष्करी गणवेशात शांत उभा होता. थोड्या वेळानं एक तरुणी स्वैंपाकघरातून गपकन बाहेर आली आणि तिला पाहून आनंद चकितच झाला. त्याच्या ओठावर ती

तीन अक्षरं चरफडली — सुलभा. आणि आनंदला पाहताच सुलभा विस्मयचकित झाली. तिची नजर गर्रकन वाकली. पुन्हा तिनं वर पाहिलं नि हुंदका कंठात अडवून ती हसली.

"सुलभा, माजा मित्र कॅप्टन आनंद—" बाळासाहेब म्हणाला, "आणि कॅप्टन आनंद, ही सुलभा बावडेकर बरं का?"

आनंदच्या डोळ्यावर विश्वासच बसत नव्हता. आपण या सुलभाला स्वप्नात पाहत होतो असं त्याला वाटत होतं. त्यानं दोन्ही हात जोडून नमस्कार केला आणि बाळासाहेबाकडे वळून म्हणाला, "बाळासाहेब, मी यांना ओळखतो. आम्ही दोघं एकाच गावचे आहोत आणि आमची घरं अगदी शेजारी शेजारी आहेत."

सुलभाचं हृदय धडधडत होतं. ती काहीच बोलत नव्हती. ती फक्त आनंदाला पहात होती.

बाळासाहेब हसत म्हणाला, "म्हणजे ज्या गावच्या बोरी त्याच गावच्या बाभळी - असंच ना!"

"होय तसंच—" आनंद बोलला नि ती तिघं हसली.

सुलभाला तिथं थांबणं अशक्य झालं. 'मी आल्ये' असं म्हणून स्वैंपाकघरात पळाली नि तिच्या हृदयाचा बांध फुटला. परंतु पदराचा बोळा तोंडात कोंबून तिनं त्याला अडवला नि भिंतीला डोकं टेकून ती रडू लागली. नंतर तो आवंढा दूर झाला तेव्हा तिला बरं वाटलं. कित्येक दिवसांपूर्वी तिच्या गालावरचं मावळलेलं लाजरं हास्य पुन्हा उगवले. ती मोहरली नि तिच्या हृदयात आनंद मावेनासा झाला. तो आनंद, ते हास्य घेऊन पुन्हा ती मुख्य दालनात आली तेव्हा ती आनंदात वेडावली होती. म्हणाली,

"आनंद, कुठे आहात तुम्ही?"

"अग, हा याच आग्रा शहरात असतो—" बाळासाहेब मध्येच म्हणाला, "आणि हा लष्करात झक्कपैकी कॅप्टन आहे."

"अय्या ऽ आनंद तुम्ही आग्र्यातच आहात?" सुलभा आश्चर्यानं म्हणाली, "आणि कधीपासून इथं आहात?"

"एक वर्ष झालं की—" आनंद उत्तरला.

"आणि आता हा रजेवर गावी जाऊन आला आहे." बाळासाहेबानं सांगून टाकले नि सुलभा आनंदच्या डोळ्यात पहात म्हणाली,

"कशी काय आहेत आमची माणसं? आई, बाबा, जाई, दादा नि कृष्णाई—"

"सर्व ठीक आहेत—" आनंदानं उत्तर दिलं.

सुलभाचे शब्द संपले. काय बोलावे, कसे बोलावे, याचा विचार करीत ती आनंदाकडे पाहत उभी राहिली तेव्हा बाळासाहेब म्हणाला,

"ए पाहतेस काय, मी याला पकडून आणल्याबद्दल चहा आण."

"बस्? फक्त चहाच?" ती हसली.

"आणि संध्याकाळी कोंबडी दे–" बाळासाहेब बोलला.

"कोंबडी नि तीही एकच?" सुलभा मान तिरपी करून हसत म्हणाली आणि बाळासाहेब म्हणाला,

"जर तशी तयारी असेल तर दहा कोंबड्या आण. आज हा धडधडीत कॅप्टन माझ्या जोडीला आहे. आम्ही दहा कोंबड्यांचा सहज निकाल लावू. काय कॅप्टन आनंद?"

"म्हणजे लष्करी लोक फार कोंबड्या खातात असा तुझा समज आहे की काय?" आनंदनं विचारलं नि बाळासाहेब हसला.

एवढ्यात सुरेश आला. त्याला सुलभा म्हणाली, "सुरेश, हे आनंद काका, यांना नमस्कार कर-" सुरेशने आपले चिमुकले हात जोडून नमस्कार केला. सुरेश अवघा पाच वर्षांचा होता; पण तो फारच हुशार नि बोलका होता. तो आपल्या आईचे सर्व गुण नि रूप घेऊन तिच्याच पोटी जन्माला आला होता. आनंदानं त्याला उचलून घेतला नि सुलभाकडं नजर टाकली.

सुलभा पूर्वीसारखी होती. तिच्या देहात कसलाच बदल झाला नव्हता. ती एका मुलाची आई आहे असे सांगूनसुद्धा पटण्यासारखे नव्हते. तिच्या तारुण्याची कमान चढतच होती. ती पूर्वीप्रमाणेच मोहक नि आकर्षक होती.

सुलभा चहा करायला स्वैंपाकघरात गेली. परंतु तिचं लक्ष बाहेर आनंदकडे लागले होते. ती त्याचा शब्द कानी पडावा म्हणून आसुसली होती. पण बाळासाहेबाचं बोलणं तिला ऐकू आलं. तो आनंदला म्हणाला, "कॅप्टन आनंद, हा आमचा सुरेश म्हणजे पहिली अल्प कष्टात झालेली निर्मिती आहे. परंतु नंतर पुष्कळ खटपट केली; पण व्यर्थ! दुसरी निर्मिती नाही-" असं म्हणून तो स्वतःच मोठ्यानं हसला.

सुलभानं बाळासाहेबाचं ते बोलणं ऐकलं. तिला मेल्याहून मेल्यासारखं झाले. ते शब्द तिच्या काळजाला भिडले. तिला किळस आली. ती संतापली. कित्येक वर्षांनी आलेल्या आनंदला आता काय वाटेल असं वाटून तिनं स्वतःच्या तोंडात फडाफडा मारून घेतलं.

तो आवाज आनंदानं ऐकला. त्यानं चटकन स्वैंपाकघराकडं पाहिलं नि या घरात सुलभा सुखी नाही अशी त्याची खात्री झाली आणि जेव्हा सुलभा हसत बाहेर आली. तेव्हा आनंद आश्चर्यानं थक्क झाला.

सुलभा टेबलावर चहा ठेवून परत स्वैंपाकघरात गेली नि भिंतीला पाठ टेकून शांत उभी राहिली. तिने डोळे मिटले नि मनात म्हणाली, 'काय हा योगायोग! हा आनंद पूर्वी कसा भेटत होता आणि तोच आनंद आज कसा भेटत आहे!' पुन्हा ती बाहेर आली तेव्हा आनंद कपडे बदलून पलंगावर बसला होता. त्याला पाहून तिला बरं वाटलं.

जेवणं झाली नि ती तिघं बोलत बसली. एकाएकी बाळासाहेब गंभीर झाला. म्हणाला,

"कॅप्टन आनंद, मला क्षमा कर. मी पार विसरून गेलो. मला आताच्या आता ऑफीसला जाणे भाग आहे. तू विश्रांती घे. हे घर आपलंच समज. कसलाच संकोच करू नकोस; आणि सुलभा लक्षात ठेव. आनंदची कसलीच गैरसोय होऊ देऊ नकोस. मी आता आलोच-" असं म्हणून तो कपडे बदलून लगेच निघून गेला.

बाळासाहेब जाताच घरातील वातावरणानं कलाटणी घेतली आणि आनंद सुरेशला घेऊन बागेत गेला. परसदारी कपडे धुऊन गंगू घरात आली. तिला सुलभा म्हणाली, "गंगू, आता काही करू नको. आता तू बाजारात जा आणि दोन कोंबड्या घेऊन ये— पण कशी वाऱ्यासारखी ये. अग गंगू, आज माझ्या घरी माझा देव आला आहे! पळ—"

तिचा शब्द नाचत होता. ती नाचत होती. तिचा आनंद तिच्या हृदयात मावत नव्हता. गंगू निघाली आणि ती म्हणाली, "आणि हे पाहा गंगू, त्या कोंबडीवाल्या माणसाला सांग की, उद्या दोन कोंबड्या घेऊन घरी ये. जा—"

गंगू पिशवी घेऊन बाजारात गेली आणि सुलभानं सुरेशला हाक मारली, "सु ऽ रेश ऽ"

तसा सुरेश आनंदपासून पळत गेला नि पुन्हा पळत आला. म्हणाला, "आनंदकाका, आई म्हणते आंघोळ करणार ना?"

"नाही. सकाळी केली आहे." आनंद उत्तरला.

आणि पुन्हा सुरेश जाऊन पळत आला. म्हणाला, "आई म्हणते संध्याकाळी काय जेवणार?"

"जे पुढं येईल ते—" आनंद म्हणाली आणि पुन्हा सुरेशने धूम ठोकली नि परत धापा टाकीत म्हणाला,

"काका, आई म्हणते घरात येऊन बसा." आनंद घरात जाऊन पलंगावर बसला नि सुरेश बागेत गेला.

घर शांत होते. सुलभा स्वैंपाकघरात शांत उभी होती. तिच्या हातातील काकणंच फक्त बोलत होती. फार वेळ ती स्वत:ला आवरू शकली नाही. तिनं धावत जाऊन आनंदचे पाय धरले. म्हणाली, "आनंद! आनंद मी कसं सांगू—?"

"सुलभा, मी या घरात एक पाव्हणा आहे." आनंद म्हणाला, "तू सांगशील ते ऐकून मी काय करणार आहे!"

"तसं म्हणून नका आनंद." ती दूर सरून भिंतीला पाठ लावून उभी राहिली.

दाटलेल्या कंठानं बोलण्याचा प्रयत्न करू लागली. तिच्या थरथरत्या ओठावर शब्द ठरत नव्हते. हृदयातून येणारे शब्द आवेगाच्या, दु:खाच्या वरवंट्याखाली चिरडले जात होते. उशिरानं ती म्हणाली,

"आनंद, जो चंद्र मी सतत एकोणीस वर्ष पाहिला नि जो मध्यंतरी अस्त पावला

होता, तो आज पाच वर्षं, नऊ महिने आणि सात दिवसानं पुन्हा माझ्या सुदैवानं उदय पावला आहे! आणि मी त्याला आज पाहत आहे. हा केवळ योगायोग नसून नियतीलाच माझी दया आली आहे. तशीच तुम्हालाही माझी दया येऊ द्या नि हे कसे घडले, ते ऐका–''

"परंतु मी ते ऐकून आता काय होणार आहे सुलभा?'' आनंद कळवळून बोलला नि सुलभा म्हणाली.

"फार फार काही होणार आहे. तुम्ही मला विश्वासघातकी, दुष्ट म्हणा, थिल्लर म्हणा, कसलीही विशेषणं लावा. परंतु माझं थोडं ऐका. कारण त्यामुळे माझा आत्मा संतुष्ट होईल. माझं हृदय मोकळं होईल. मी निरपराधी आहे असं वाटेल नि थोडीशी सुखाची झोप लागेल. एक भयंकर बोचणी दूर होऊन कदाचित तुम्ही मला क्षमाही कराल!'' सुलभाची ती दारुण मन:स्थिती पाहून आनंदला दया आली. म्हणाला,

"बरं सांग – काय म्हणतेस?''

तिला आनंद झाला. ती तिथेच खाली बसली नि त्याच्याकडं एकटक पाहत मग तिने करुणार्द्र स्वरात साखरपुड्यापासून लग्नापर्यंतची सर्व कथा सविस्तर सांगितली. नंतर किंचित दम घेऊन म्हणाली,

"साखरपुड्यापासून लग्नापर्यंत जे जे घडले तसेच पुढेही माझ्या मनाविरुद्ध घडले. लग्नानंतर मला माहेरी जाऊ दिले नाही. माझ्या इच्छेविरुद्ध मला सासरी ठेवली आणि इच्छेविरुद्ध मला नांदणे भाग पडले आणि आजही मी हा संसार इच्छेविरुद्ध करीत आहे.

"मी अनेक वेळी आत्महत्येचा प्रयत्न केला, पण यांनी मला मरूनही दिले नाही. मरणालासुद्धा माझी किळस आली नि मरणंही मला पाहून पळू लागले...

"आणि सुरेशनं घात केला. त्याला कुशीत घेऊन मरणे मला कठीण झाले. मी आई होणार हे मला समजलं नि आईनं बाळाचा खून करू नये असा माझ्या मनानं मला उपदेश केला. मला जगणं भाग पडलं. नि आता आपली भेट झाली. हे...''

सुलभाचं दु:ख अनिवार झाले. ती उठून स्वैंपाकघरात गेली आणि रडू लागली. खूप रडली नि पुन्हा येऊन आपल्या जागी बसली. आनंद ऐकत होता नि पहात होता. ती म्हणाली,

"कॅप्टन आनंद, उमज पडताच मी आपले सर्वस्व तुमच्या पायावर ठेवले. पण माझ्या दुर्दैवानं त्यावर दरोडा पडला. मी काय करू? तुम्ही मलाच गुन्हेगार ठरवणार आहात याची मला कल्पना आहे. बरं, मी इथं तरी सुखी आहे का? मुळीच नाही. माझे प्रेम, माझ्या आशा-आकांक्षा यांची होळी झाली आहे.

"आणि आताही मी दु:खात आहे. मी मुळीच सुखी नाही. माझ्या जन्माची परवड संपलेली नाही. माझी, माझ्या आत्म्याची घोर विटंबना आजही सुरू आहे. या पतिदेवाचं

पुराण निराळं आहे. तो तुमचा मित्र आहे. तेव्हा त्याचे प्रताप तुम्हाला पटणार. तुम्ही मला गुन्हेगार ठरवणार याची मला कल्पना आहे. ही स्वारी बोलण्यात, वागण्यात भलतीच सभ्य दिसते; पण तसा इसम भयंकर आहे. दूर कशाला माझ्या सुरेशची ओळख करून देताना त्याच्या जिभेला काही हाड होतं? एका परक्या पुरुषाजवळ असं बोलून आपण आपल्या पत्नीची मानहानी करीत आहोत याची त्यानं पर्वा केली का? पुढील एकएक प्रकार मी सांगू शकत नाही. आठवण झाली की मला ओकारी येते. तुम्हाला माहीत नाही हा माणूस लाच घेतो - हजारो रुपये लाच घेतो. हा माणूस दारू पितो. हा माणूस रोज वेश्यांच्या घरात पडलेला असतो. रात्री दोन दोन वाजता घरी येतो. कधी मला मारतो. मी काय करू. मी विरोध करायचा नाही नि केला तर उत्तर मिळतं की मी लग्न करून बायको आणली आहे. मालक आणलेला नाही. मी स्वत: मालक आहे.

"याचा अर्थ या माणसाला एक सुंदर दासी हवी होती. दुसरे काऽही नाही आणि बापानं तुमचं जुनं वैर उकरून काढून त्याचा माझ्यावर हा भयंकर सूड घेतला आहे; नि त्या वैराच्या आगीत मी अशी जळत आहे.

"या माझ्या तारुण्याची, स्वरूपाची, माझ्या शिक्षणाची, साऱ्यासाऱ्याची राखरांगोळी झाली आहे! माहेर आबात रहावं म्हणून मी माझ्या प्रीतीला सरणावर चढवून हे दिवस पाहत आहे, मी म्हणते, मला मरण का येत नाही?"

बाहेर गंगूची पावलं वाजली आणि सुलभा शांत झाली. ती स्वैंपाकघरात गेली.

ती सुलभाची भयंकर कहाणी ऐकून आनंदचं डोकं सुन्न झालं. तोच सुरेश येऊन म्हणाला,

"आनंदकाका -"

"काय, बोल ..."

"तुम्हाला मोटार चालविता येते!"

"होय, येते -"

"आणि जीप -"

"तीही चालवतो."

"मग छान आहे. आणि विमान- ?

"तेही चालवतो."

"बरं पण सायकल?"

"होय -"

"मी पण सायकल चालवतो. परंतु मला सायकल नाही हो ..." सुरेश म्हणाला, "मी पप्पांना रोज सांगतो. पण ते मला सायकल आणीत नाहीत - विसरतात. तुम्ही मला सायकल घेऊन द्याल का?"

"जरूर देणार." आनंद बोलला.

"कधी देणार?" सुरेशनं विचारलं.

"आत्ता देणार ..." आनंद म्हणाला आणि सुरेश टाळ्या पिटीत नाचू लागला. तो धावत धावत स्वैंपाकघरात जाऊन म्हणाला,

"आई, आई! आनंदकाका मला सायकल घेऊन देणार."

सुलभा गालात हसली नि सुरेश पुन्हा आनंदकडे गेला ... म्हणाला,

"मग चला."

तोच सुलभा आली आणि म्हणाली,

"हा सुरेश तुम्हाला त्रास देईल बरं."

"काही नाही. आम्ही आत्ता येतो." आनंद म्हणाला नि सुरेशला घेऊन बाजारात गेला. एक तीनचाकी सायकल घेऊन आला तेव्हा सुरेशच्या आनंदाला पारावार नव्हता!

सुलभा स्तंभित होऊन म्हणाली,

"तुम्ही त्याला सायकल घेऊन दिली?"

"होय. का?"

"काही नाही."

"सुलभा ..."

"जी!" ती नम्र झाली. त्याचे पुढील शब्द ऐकायला तिचे कान आतुर झाले. तो तिला आज कित्येक दिवसांनी भेटला होता नि त्यानं पूर्वीप्रमाणे सुलभा हे शब्द उच्चारले होते.

आनंद म्हणाला, "पूर्वी तू मला अरे-तुरे म्हणत होतीस आणि आता तू मला अहो-जाहो म्हणत आहेस याचा अर्थ काय?"

"याचा अर्थ तुम्ही कर्तृत्वाच्या शिखरावर चढला आहात; नि मी एका भयाण दरीत कोसळले आहे." सुलभा शांतपणे म्हणाली.

आनंद शांत झाला. तो तिला पाहत होता. ती त्याला पाहत होती. सुरेश सायकल घेऊन मधे उभा होता. उशिरानं सुलभा म्हणाली, "हा सुरेश तुम्हाला आवडतो?"

"फार फार आवडतो."

"त्याचे डोळे कुणासारखे आहेत?" सुलभानं हसत विचारले.

"ते ... ते तुझ्यासारखे आहेत." आनंद म्हणाला, "सर्व काही तुझे आहे."

"मुळीच नाही." ती बोलली.

"तर काय?" आनंद उद्गारला.

"माझ्या सुरेशचे डोळे तुमच्यासारखे आहेत." ती म्हणाली.

"कशावरून?" त्यानं विचारलं.

"ते मलाच माहीत." असं म्हणून जीभ चावून ती भर्रकन स्वैंपाकघरात गेली नि चहा घेऊन परत आली तेव्हा सुरेश बागेत सायकल फिरवीत होता. तिनं सुरेशला हाक मारली, तेव्हा तो म्हणाला, "मला चहा नको. आनंदकाकांना दे ..." तिनं आनंदकडं पाहिलं तेव्हा तो वर्तमानपत्र वाचीत होता. त्याचं सुलभाकडं लक्ष नव्हतं. तेव्हा ती खिन्न झाली नि दग्ध सुरातच म्हणाली,

"आनंद हे काय?"

"काय झालं?"

"एवढा तिरस्कार करू नको माझा!"

"कोणी केला तुझा तिरस्कार?"

"मग हे असं का?"

"कसं?"

"एके काळी मी भेटावी म्हणून तुम्ही वेडावत होता नि आता असं वागता की, जणू आपली पूर्वी ओळखच नव्हती! आनंद, मला अधिक दु:ख देऊ नका. नाही तर मी मरून जाईन."

"सुलभा, या घरात मी चुकून आलो आहे." आनंद म्हणाला.

"नाही, नाही. माझे नशीब थोर म्हणून आला आहात." ती बोलली.

"ऐक. मलाही फार दु:ख दिलं आहेस तू. आता माझ्या सहनशक्तीचा अंत पाहू नको. तू आपली दु:खं मला सांगितली तशी मला सांगता येणार नाहीत." आनंद म्हणाला, "कारण माझी दु:खं सांगून संपणार नाहीत. आता माझ्या ह्दयात दु:खाला मुळीच जागा नाही. त्यात तू भर घालू नको, नाही तर माझ्या ह्दयाचा स्फोट होईल, सुलभा..."

"नाही, नाही, तसं म्हणू नका आनंद. मी तुम्हाला फार दु:ख दिलं..." सुलभा डोळे पुशीत छताकडे पाहू लागली आणि आनंद म्हणाला,

"मला असं सांग, की माझ्या आईचा अपमान झाला की नाही?"

"होय. झाला." ती उत्तरली.

"आणि माझ्या प्रेमाचा?" त्याने विचारले.

"तेही खरं आहे..." तिने ओठावरून जीभ फिरवली.

"आणि हेही सांग, की तू आज एक परस्त्री आहेस की नाही?" त्यानं विचारले.

"माझी चूक झाली कॅप्टन आनंद." ती पायाच्या अंगठ्याकडे पाहत म्हणाली, "मी जन्मभर चुकाच केल्या आहेत आणि आपण मला क्षमा केली आहे."

एवढं कसं तरी बोलून ती स्वैंपाकघरात रडत बसली.

आनंद बागेत जाऊन बसला.

थोड्या वेळानं सुरेश आला. म्हणाला, "काका, आई रडत बसली आहे."

"आई रडत आहे, पण का?" आनंदनं विचारलं.

"चला, दाखवतो." सुरेश आनंदचा हात धरून ओढीत म्हणाला, "चला, दाखवतो" म्हणून घरात घेऊन गेला... आणि आनंद मोठ्यानं म्हणाला, "सुलभा..."

आणि तिनं कंठात प्राण घेऊन उत्तर दिलं, "जी-आले-"

ती धावत बाहेर आली. तिच्या गालावर चंद्रज्योती फुलल्या होत्या... ती म्हणाली, "तुम्ही मला हाक मारली?"

"होय, मी हाक मारली." आनंद बोलला.

"का? तुम्हाला काय हवं आहे?" तिने नम्रपणे विचारले.

"काही नाही. परंतु तू रडतेस का?"

"कोण म्हणतं?" ती हसली.

"हा सुरेश म्हणतो." आनंदने हसत हसत सुरेशकडं बोट दाखवलं.

सुलभाच्या उत्तरानं सुरेश हिरमुसला झाला. तो सुलभाकडे पाहत कपाळावर आठ्या घालून म्हणाला,

"आनंदकाका, ही आई लबाड आहे!" पुन्हा ती दोघं मोठ्यानं हसली आणि सुरेश काय ही माणसं मूर्ख आहेत असा चेहरा करून बाहेर पळाला.

## ६

घड्याळाचा काटा सहाकडे सरकला होता. दुपारी आत्ता येतो म्हणून गेलेला बाळासाहेब अजून आला नव्हता. आनंद पलंगावर पडून वर्तमानपत्र वाचीत होता.

सुलभा आणि गंगू स्वैपाक उरकीत होत्या. गंगू पोळ्या लाटीत होती आणि सुलभा त्या तळून काढीत होती. तिच्या मस्तकात सर्व जुन्या आठवणी जाग्या झाल्या होत्या. त्यामुळे ती अस्वस्थ झाली होती. ती मध्येच बाहेर येऊन आनंदपुढं उभी रहात होती आणि काय हवं आहे का? असं विचारीत होती नि पुन्हा स्वैपाकघरात जात होती.

अखेर स्वैपाक संपला नि ती मोकळी झाली नि बाहेर येऊन आनंदजवळ एका खुर्चीवर शांत बसली. गंगूनं दोन कप कॉफी आणली तेव्हा आनंद उठला नि कॉफीचा कप हातात घेऊन म्हणाला, "बाळासाहेब कसलं काम करीत असतो? सहा वाजत आले तरी याचा पत्ता नाही. याच्याएवढं काम एखादा मंत्रीसुद्धा करीत नसेल."

सुलभा गालात हसत म्हणाली, "आनंद, तुमची रजा किती दिवस आहे?"

"आज नि उद्या–" आनंद उत्तरला.

"म्हणजे तुम्हाला परवा हजर व्हायचं आहे?" सुलभा बोलली.

"होय. परवा सकाळी—" आनंद म्हणाला.

"मग माझी एक विनंती आहे." ती बोलली.

"कसली—?" आनंदनं विचारलं.

"कृपा करून तुम्ही उद्याही राहायचं." सुलभा म्हणाली, "आजपर्यंत तुम्ही माझे फार फार ऐकले आहे. आता तेवढे शेवटचे ऐका आणि उद्या जाऊ नका—"

"परंतु कारण काय?" आनंदनं विचारलं.

"कारण मी उद्याच सांगेन—" सुलभा म्हणाली.

"साडेसात वाजले नि बाळासाहेब आला. तो धुंद नि गंभीर दिसत होता. त्याबरोबर भोलाराम होता. आल्या आल्या बाळासाहेबानं आनंदचा हात धरला नि म्हणाली, "सॉरी कॅप्टन आनंद, अचानक कामात काम निघाले नि मला लवकर घरी येता आले नाही." त्यानं दिलगिरी व्यक्त केली. सुलभानं जेवण वाढलं. बाळासाहेब कपडे बदलून आला आणि ते दोघे जेवू लागले. सुलभा पुढं बसून त्यांना वाढू लागली.

सुरेश कधीच जेवून झोपला होता. आनंद व बाळासाहेब जेवत होते. सुलभा आनंदच्या ताटात एक एक पदार्थ टाकीत होती. ताटात पदार्थ पडताच आनंद तिच्या तोंडाकडे चटकन पाहत होता. दोन नजरा टकरत होत्या नि सुलभा गालात हसत होती. काही वेळा आनंदनं वर पाहताच ती त्याच्या डोळ्यांत पाहत होती. बाळासाहेब रंगात आला होता. तो काही तरी विचार करीत होता. म्हणाला, "कॅप्टन, आज या सुलभानं स्वैपाकात कमाल केली आहे. मी असं जेवण या माझ्या जन्मात कधीच जेवलो नाही."

"खरं आहे तुझं—" आनंद बोलला.

"म्हणजे मी उगीच तारीफ करीत आहे असं तुला म्हणायचं आहे का?" बाळासाहेबानं विचारलं.

"हो. कारण तिचा नि माझा सहवास अवघा पाचसहा वर्षांचा आहे." बाळासाहेब म्हणाला, "आणि तू तर तिच्या माहेरचा आहेस; म्हणजे तू तिला चांगला ओळखतोस."

"होय, खरं आहे." आनंद बोलला.

"जाऊ दे ते कॅप्टन आनंद. एक गोष्ट विचारू?"

"अरे, विचारू काय? विचार!" आनंद म्हणाला, "बंब्या—"

"आँ! हे बंब्या काय?" सुलभाने विचारले आणि बाळासाहेब म्हणाला, "मी सांगतो ते! या कॉलेजातील कारट्यांनी बंब्या म्हणजे बाळासाहेब मल्हारराव बावडेकर या माझ्या नावाचा खिमा करून यांनी बंब्या केला."

हा खुलासा ऐकून सुलभा पोट धरून हसू लागली.

"एक गोष्ट विचारू का?" आनंद म्हणाला.

"हो, विचार ना." बाळासाहेब बोलला.

"आज तुला उशीर का झाला?" आनंदने विचारले नि बाळासाहेब म्हणाला, "आनंद, तू कधी प्रेम केले आहेस?"

"हो, केले की!" आनंद उत्तरला.

"कोण रे ती? का आपल्या कॉलेजात होती ती हेमा का शालिनी?" बाळासाहेबानं विचारलं.

"ती त्यापैकी नाही रे बाळासाहेब." आनंद म्हणाला, "ती निराळीच आहे. त्या दोघी म्हणजे तिच्या पायाची धूळ होत्या."

"असं! बरं, पुढं काय झालं?" बाळासाहेब म्हणाला, "ती कुठं गेली?" असं म्हणून बाळासाहेबानं कोंबडीची तंगडी तोंडात धरली.

"ती एकाएकी गेली." आनंद बोलला.

सुलभा गंभीर होऊन ऐकू लागली. बाळासाहेब म्हणाला, "ती गेली म्हणजे कुठं गेली?"

"अरे, गेली म्हणजे माझा प्रेमभंग झाला! समजले!" आनंद बोलला.

"काय! तुझा नि प्रेमभंग झाला!"... बाळासाहेब जवळ जवळ किंचाळला.

"मला ते मुळीच पटणार नाही."

"त्याला माझा नाईलाज आहे!" आनंद म्हणाला, "मी खरं आहे ते सांगितले."

"अरे आनंद, त्या दोन पोरी तुझ्यासाठी जीव टाकीत होत्या. त्यांना तू टांग मारलीस नि हे तिसरे पात्र पसंत केलेस? हे इब्लिस पात्र कोण रे?"

"ते इब्लिस पात्र नव्हते." आनंद म्हणाला, "ती केळीच्या कोंबासारखी नाजूक होती... ती चंद्रासारखी शीतल होती... नि विजेसारखी चपळ होती."

"बरं, पुढं बोल–" बाळासाहेब म्हणाला, "पुढं बोल..."

"पुढं काय बोलू! ती मेघासारखी गंभीर होती." आनंद बोलला.

सुलभाच्या हृदयात कालवाकालव झाली. आपणाला रडू येईल की काय असं वाटून ती स्वैंपाकघरात गेली आणि भिंतीला पाठ टेकून उभी राहिली.

केळीच्या कोंबासारखी, चंद्रासारखी शीतल, विजेसारखी चपळ नि मेघासारखी गंभीर हे शब्द तिच्या ओठावर नाचू लागले. मग ती पुन्हा बाहेर आली आणि पुढं बसली. बाळासाहेब म्हणाला, "आनंद, त्या तुझ्या प्रेयसीचं नाव काय?"

"आता त्या नावात रस नाही!" आनंद हसून म्हणाला, "आता कोंबडीचा रस घे. नि जेव -"

"बरं, आता प्रेमसंन्यास का?" बाळासाहेबानं विचारलं.

"मुळीच नाही–" आनंद बोलला.

"आता या नव्या प्रेयसीचं नाव काय?" बाळासाहेबानं विचारले.

"तिचं नाव सांगू?" आनंद बोलला. सुलभा कानात प्राण आणून ऐकत होती. आता हा आनंद आपल्या प्रेयसीचं नाव काय सांगणार हे ऐकण्यासाठी ती आतुर झाली.

"तिचं नाव सांगू?" आनंद म्हणाला,

"हो-हो अरे, सांग ना!" बाळासाहेबानं तगादाच लावला.

"माझ्या प्रेयसीचं नाव आहे बंदूक!" आनंद बोलला नि सुलभा मोठ्यानं हसली.

जेवणं झाली नि ती तिघं मुख्य दालनात येऊन बसली. त्या दोघांपुढं बसून सुलभा त्यांचं बोलणं ऐकू लागली. कित्येक दिवसांनी आजच ती हसत होती नि आळीपाळीनं त्या दोघांकडे पाहत होती. सुपारी चघळत बाळासाहेब म्हणाला,

"कॅप्टन आनंद, पुन्हा एकदा ये. आपण सर्वजण ताजमहाल पाहायला जाऊ."

"मी एकदा ताजमहाल पाहिला आहे." आनंद म्हणाला, "पण मला त्यात काहीच वाटलं नाही. मी म्हणतो, ताजमहालापेक्षा कुतुबमिनार श्रेष्ठ आहे."

"ते कसे काय?" बाळासाहेबाने डोळे वटारून विचारले आणि आनंद म्हणाला,

"एका ऐश्वर्यसंपन्न राजानं आपल्या प्रेयसीचं थडगं म्हणून निर्माण केलेला ताजमहाल; नि एका गुलामानं आपल्या सामर्थ्याचं, कर्तृत्वाचं नि पराक्रमाचं उभारलेलं स्मारक- कुतुबमिनार; यात फार मोठे अंतर आहे. त्याची तुलनाच होऊ शकत नाही."

"पण तुलना का करता येत नाही?" बाळासाहेबानं विचारलं आणि आनंद म्हणाला,

"एक नेत्रांना सुखवते, तर दुसरे कर्तृत्वाची जाणीव देते! एक, प्रेमाची महती गाते, तर दुसरे कर्तृत्वाचा पोवाडा गाते; नि मला तो पोवाडा आवडतो."

"त्याचं कारण आहे कॅप्टन आनंद." बाळासाहेब खवचटपणे म्हणाला, "तुझा प्रेमभंग झाला आहे, त्यामुळे तू प्रेमाचा द्वेष करीत आहेस."

"मुळीच नाही बाळासाहेब—" आनंद कळवळून म्हणाला, "मी प्रेम केले आहे नि माझा प्रेमभंग झाला आहे—"

"आता थांबू नको—" बाळासाहेब बोलला,

"मी असं म्हणतो की प्रेमभंगाचं दुःख किती भयंकर असतं याचा मी अनुभव घेतला आहे." आनंद म्हणाला, "ते दुःख फार मोठं असतं."

"होय रे — याचाच अर्थ असा, की त्या पोरीवर तुझं प्रेम नव्हतं—" बाळासाहेब हसत बोलला नि आनंदचा आत्मा दुखावला. तो म्हणाला,

"नाही बाळासाहेब — तसं नाही. मी तिच्यावर अपार प्रेम केलं. तिच्या देहातील एकूण एक अवयव परिचयाचा झाला होता. तरीही ती गेली, तरी मी आपली जागा सोडली नाही."

'तुझं त्या मुलीवर खरं प्रेम नव्हतं' या शब्दानी आनंदच्या काळजावर डागणी बसली.

तो म्हणाला,

"बाळासाहेब, मी जनावर नाही - माणूस आहे. परिस्थितीनं मला दगा दिला. आपला प्रेमभंग झाल्यानंतर आपण मुळीच जगणार नाही असं मला वाटत होतं. एकदा मी तिला सांगितलं होतं की, तू माझ्या जीवनाचं सुकाणू आहेस. हे सुकाणू जर मोडले तर माझी नाव कुठं जाऊन कोणत्या खडकावर आदळून फुटेल याचा नेम नाही. तरीही ती गेली आणि आता मी हृदयात एक आग आणि हातात बंदुकीची आग घेऊन जगत आहे –"

सुलभाच्या डोळ्यांत सागर खवळला. त्या शब्दांनी तिचे हृदय विदीर्ण झालं. तिला रडू आलं. तिनं विचारलं,

"आता आईची प्रकृती कशी आहे?"

"ती आता फार थकली आहे." आनंद म्हणाला, "माझ्यामुळं ती फार दु:खी आहे."

"कॅप्टन आनंद, माझं ऐक." बाळासाहेब म्हणाला, "म्हणजे मला गुरू करून घे नि प्रथम एक चांगलीशी पोरगी पाहून तिच्याशी लग्न कर नि माझ्यासारखा सुखी हो."

"धन्य गुरुदेव!" आनंद मोठ्यानं हसला. सुलभानं बाळासाहेबाकडं पाहिलं. काय हलकट माणूस आहे असा भास तिच्या चेहऱ्यावर तरळून लुप्त झाला आणि त्याचवेळी भोलाराम उंबऱ्यात येऊन म्हणाला,

"बाबूजी, आपण बाहेर जाणार आहात ना? नाही तर विसराल–"

"अरे हो! खरंच की, मी विसरलो होतो." बाळासाहेब घड्याळाकडे पाहत म्हणाला, "काय साडेनऊ? कॅप्टन आनंद, मी आता येतो. मला क्षमा कर." त्याने कपडे बदलले नि तयार होऊन पुन्हा म्हणाला, "तुम्ही बसा बोलत. मी हा आत्ता आलोच पाहा."

आणि तो भोलारामला घेऊन चालू लागला.

सुलभा नि आनंद यांनी एकमेकांकडं पाहिलं. नि मग त्यांनी बाहेर पाहिलं. क्षणात दोन आकृती अंधारात एकरूप झाल्या होत्या आणि त्यांच्या पायातील बुटांचा आवाज तेवढाच ऐकू येत होता. खट् खट् खट् ... काही काही वेळाने तो आवाजही दूर दूर गेला नि सर्व काही शांत झाले.

घरात शांतता पसरली. सुलभानं चौफेर नजर टाकली. तिच्यासमोर आनंद बसला होता. पलीकडे सुरेश शांत झोपला होता आणि भिंतीवर घड्याळ टिक् टिक् करीत होतं.

एकाएकी सुलभा अस्वस्थ झाली. तिच्या हृदयाची धडधड वाढली.

आनंद स्तब्ध बसला होता. त्याने सुलभाकडे नजर टाकली आणि पाण्यात तरंग उठावे तसे झाले. सुलभाच्या मनात तरंग उठले नि ते गिरक्या घेऊ लागले. तिनं दार पुढं लोटलं नि सरळ ती स्वैंपाकघरात गेली आणि पुन्हा आनंदपुढं येऊन जमिनीवर बसली.

"सुलभा, हा बाळासाहेब कुठं गेला असेल?" आनंदने विचारले.

''आज कुठं तरी संगीत मैफल असेल.'' ती म्हणाली.

''कुठं तरी म्हणजे?'' आनंदने विचारले.

''कुठं तरी म्हणजे कुठंतरी!'' सुलभा हसली. म्हणाली, ''या मैफली वेश्यांच्या घरी होतात.''

''तुला कुणी सांगितलं?'' आनंदनं विचारलं.

''मला भोलाराम सर्व काही सांगतो.'' सुलभा म्हणाली.

''हा भोलाराम कोण आहे?'' आनंदनं विचारलं.

सुलभा म्हणाली, ''हा भोलाराम महा हलकट माणूस आहे. हा फक्त माझ्याशीच खरं बोलतो. हा भोलाराम त्यांच्याबरोबर सावलीसारखा हिंडत असतो. साहेबानं लाच ठरवायची नि या भोलारामनं ती घरी आणायची.'' ती उठून स्वैंपाकघरात गेली आणि दोन कप कॉफी घेऊन आली. एक कप आनंदला देऊन म्हणाली,

''मग काय कॅप्टन साहेब! ठरलं ना?''

''कशाविषयी?'' आनंदनं विचारलं.

''उद्या तुम्ही राहणार ना?'' सुलभानं रोखून प्रश्न केला.

''कशाला? हा बाळासाहेब असा रात्रभर हिंडायचा नि मी हा असा कैद्यासारखाच.''

''मुळीच नाही. कैदी म्हणून नव्हे, तर माझे पाव्हणे म्हणून राहायचं...'' सुलभा हसत म्हणाली, ''आनंद, मी हात जोडते.''

''परंतु कारण काय?'' त्यानं विचारलं.

''कारण मी उद्याच सांगीन म्हटलं ना!'' ती बोलली आणि आनंद म्हणाला, ''ठीक आहे मी राहीन.''

एवढ्यात बाळासाहेब आला आणि दिलगिरीच्या सुरात म्हणाला, ''सॉरी बरं का कॅप्टन आनंद! मला उशीर झाला.''

आनंद फक्त हसला.

सुलभानं आपलं अंथरूण स्वैंपाकघरात टाकलं. बाळासाहेब नि आनंद मुख्य दालनात झोपले नि बोलता बोलता त्यांना झोप लागली.

सकाळी सात वाजताच बाळासाहेब ऑफीसला निघाला. त्याला आनंद म्हणाला,

''बाळासाहेब, आज मी जाणार.''

''नाही हं.'' सुलभा मध्येच म्हणाली. ''आज जायचं नाही. आज माझ्या आग्रहास्तव एक दिवस राहिलं पाहिजे.''

मध्येच सुरेश म्हणाला, ''आनंदकाका, हे पपा रात्री येतात नि ही आई लबाड आहे. तुम्ही जाऊ नका.''

सुरेशचं बोलणं ऐकून सर्व हसली. बाळासाहेब म्हणाला,

"आनंद, या दोघांचा आग्रह आहे तर मग राहा ना, नि सकाळी जा. कुठं दूर जायचं आहे?"

आनंद नंतर काहीच बोलला नाही. त्याने सुरेशच्या डोक्यावर एक टपली मारली आणि तो डोकं चोळीत आपली सायकल घेऊन बागेत गेला.

नंतर 'आनंदची सर्व व्यवस्था नीट ठेव' असं सांगून बाळासाहेबानं घर सोडलं.

आनंद आंघोळ करून बाहेर बसला होता.

सुलभा आज स्वच्छ नि शुभ्र पातळ नेसली होती. तिनं अंगात पांढरे तंग ब्लाऊज घातले होत. तिच्या पाठीवर तिचे लांबसडक केस मोकळे रुळत होते आणि ती इकडून तिकडे ये-जा करीत होती. तिच्या चालीत एक प्रकारची तालबद्धता आली होती. तिच्या गालावरचे गोड स्मित मावळता मावळत नव्हते. ती आज भलतीच आनंदात होती.

आनंद तिला पाहत होता. ही सुलभा आज कसला तरी निराळा विचार करीत आहे अशी त्याची खात्री झाली होती.

आणि सुलभा आज प्रफुल्लित दिसत होती. दुःख, क्लेश यांचा लवलेशही तिच्या चेहऱ्यावर दिसत नव्हता. ती त्या शुभ्र पातळानं अप्रतिम आकर्षक नि मोहक दिसत होती. निळ्या पाण्यावर शुभ्र कमळ फुलावं-डोलावं तद्वत ती त्या घरात वावरत होती.

ती स्वैंपाकघरातून बाहेर येऊन आनंदपुढून बाहेर गेली. बागेत खेळत असलेल्या सुरेशला पाहून परत फिरली आणि आनंद पुढे येताच गप्पकन थांबली नि त्याच्या डोळ्यात पाहत म्हणाली,

"कॅप्टनसाहेब, असे गप्प का?"

"मग काय करू?" आनंद बोलला.

"काही तरी बोला ना!" ती हसली.

"काय बोलावे हा एक प्रश्नच आहे." आनंद म्हणाला, "तरीही काही तरी बोलायचं म्हणून बोलतो, की मला असं सांग, आज मला ठेवून घ्यायचं कारण कळेल का?"

"अवश्य कळेल. परंतु आता नाही." सुलभा गंभीर चेहरा करून म्हणाली, "ते कारण आज रात्री समजेल आणि आज तुम्ही माझे पाव्हणे आहात. तेव्हा कसलीच तक्रार करायची नाही हे लक्षात ठेवा."

"म्हणजे कसं काय?" आनंद बोलला.

"आता दुपारी गोड जेवण." सुलभा म्हणाली, "आणि संध्याकाळी कोंबडी आणि—" ती पुढे बोलली नाही.

"आणि-आणि काय?" आनंदने विचारलं.

"आणि? तुमच्या आणिचं रात्री उत्तर मिळेल."

सुलभा किंचित आवाज चढवून म्हणाली,

"आता काय हवं आहे का?"

"मला थोडं पाणी दे!" आनंद म्हणाला. सुलभानं धावत जाऊन पाणी आणले, ग्लास आनंदला देऊन ती म्हणाली,

"कॅप्टनसाहेब, घशाला कोरड पडली वाटतं!" असं म्हणून ती हसली आणि एक खुर्ची ओढून ती त्याच्यापुढं शांत बसली.

"बाईजी-" भोलारामनं दारातून हाक मारली.

"काय रे भोलाराम?" सुलभानं विचारलं.

भोलारामनं तिच्या हाती एक चिठ्ठी दिली. ती चिठ्ठी बाळासाहेबाची होती-

*प्रिय सुलभा,*

*दुपारी मला घरी येता येणार नाही. तुम्ही जेवून घ्यावे. वाट पाहू नये आणि एका खास कामासाठी मी आताच दिल्लीला जात आहे आणि मला रात्री येता येणार नाही. आनंदला म्हणावे - क्षमा कर.*

*- बाळासाहेब*

ती चिठ्ठी वाचून सुलभानं आनंदला दिली नि ती वाचून आनंदच्या कपाळावर आठी उमटली. म्हणाला,

"हा बाळासाहेब भलताच विलक्षण माणूस आहे. जर असं होतं, तर त्यानं मला घरी आणलं का?"

"झालं! दीड दिवसातच कंटाळा आला! मग मी इतके दिवस कसे काढले असतील?" सुलभा म्हणाली, "जेव्हा मला मुळीच न पाहता हा लग्नाला तयार झाला तेव्हाच मी समजून चुकले, की याला पत्नीची गरज नसून याला सुंदर दासी हवी आहे आणि तो माझा अंदाज खरा ठरला आहे. पण आता काय उपयोग आहे!" आणि ती रडू लागली.

सुरेश धावत आला. तो सायकल फिरवून दमला होता. तो आनंदशेजारी बसून म्हणाला -

"काका, तुमचं घर कुठं आहे हो?"

"याच शहरात आहे." आनंद बोलला.

"अहो, पण कुठं ते सांगा ना?" सुरेश बोलला.

"मिलिटरी कॅम्पात..." आनंद उत्तरला.

"किती लांब आहे येथून?" सुरेशनं विचारलं.

"असेल की मैल दीड मैल..." आनंद उत्तरला.

"असं का?" सुरेश विचारात पडला.

रात्रीचे अकरा वाजत होते. सारे आग्रा शहर शांत झाले होते. सर्वत्र निःशब्दता पसरली

होती. सर्व रस्ते निर्जन झाले होते. कुठंही कसलाही आवाज होत नव्हता. सुरेश घोरत होता. आनंद पलंगावर बसला होता; आणि समोर सुलभा खुर्चीवर बसली होती. ती पाठीवरचे केस पुढं छातीवर घेऊन त्यांची हातानं गुंत काढीत बोलत होती. त्या केसाच्या थराआडून तिचे भरदार उरोज अधिकच भरदार नि उभार भासत होते नि तिच्या गालावर हसू तरळत होतं. तिच्या मनात एक निराळंच काहूर उठलं होतं; परंतु ती तसं भासू देत नव्हती.

उशिरानं ती व्हरांड्यात गेली नि तिनं सर्वत्र नजर फिरवली. आकाशात चंद्र धावत होता... आणि वारा शांत उभी असलेली झाडं हलवीत होता. ती नंतर परत फिरली. तिनं दार बंद केलं नि पुन्हा आनंदपुढं खुर्चीवर बसत म्हणाली,

"खडकाआड पाझर दडलेला असतो हे खरं आहे का, कॅप्टनसाहेब."

"होय, खरं आहे ते." आनंद उत्तरला.

"खडकातील पाझरासारखंच प्रेमाचंही आहे." सुलभा मंद स्वरात म्हणाली, "याचा मलाही अनुभव आला आहे... येत आहे..."

"झोप येत नाही..." आनंद उत्तरला.

"येईल आता." सुलभा म्हणाली, "तुम्ही मला चंद्रासारखी शीतल, विजेसारखी चपळ आणि मेघासारखी गंभीर म्हणता... याचाच अर्थ तुमच्या हृदयरूपी खडकात प्रेमाचा पाझर दडलेला आहे. पण त्या तुमच्या चंद्राचा कोळसा झाला आहे. ती तुमची वीज गटारात कोसळली आहे. आणि मेघांनी काळं केलं आहे. तुमचे दोस्त म्हणतात त्या मुलीवर तुझे खरे प्रेमच नव्हते. परंतु मी मेले तरी असं कधीच बोलणार नाही. कारण त्या अपार प्रेमाचा मी अनुभव घेतला आहे. ते माझे प्रेम कृष्णानदीप्रमाणे पवित्र होते. आणि ते अमर राहणार आहे."

"आणखी काय?" आनंदनं विचारलं.

"आणखी काय? तुम्ही एक आग हृदयात आणि दुसरी मुठीत घेऊन जगता आहात. पण मी एकच आग उरात घेऊन जगत आहे हे तुम्ही कबूल करीत नाही." सुलभाचा कंठ दाटून आला... ओठ थरथरू लागले. ती म्हणाली, "मीही नि:सीम प्रेम केलं. माझाही प्रियकर सूर्यासारखा प्रकाशमान होता, तो सागराप्रमाणे निर्मळ आहे आणि आजही तो आपल्या जागी अचल आहे. तो आज दारुण यातना भोगीत आहे याची मला संपूर्ण कल्पना आहे."

"सुलभा..." आनंद उठून बसला.

"जी..." सुलभाच्या हृदयाची धडधड वाढली. ती त्या हाकेनंच पुलकित झाली. चटकन उठून त्याच्या गळ्याला मिठी मारावी. असं तिला वाटू लागलं. परंतु तिला तशी हिंमतच झाली नाही.

"तुला माझ्या मनाची कल्पना आहे का?" आनंदनं विचारलं.

"तुमच्या मनाची माझ्याइतकी कल्पना कुणालाच नाही." सुलभा म्हणाली, "तुम्ही मला आपल्या जीवनाचा सुकाणू समजत होता. ते सुकाणू मोडले, पण माझ्या सुदैवानं तुमची नाव सलामत आहे यातच मी आनंद मानत आहे आणि आज मी पुन्हा तुम्हाला पाहात आहे. मला फार फार भीती वाटत होती . मला वाटत होतं की, आपली पुन्हा भेटच होणार नाही. पण तुम्ही दुःख पचवलंत. नि आता ह्रदयात एक आग नि हातात एक आग घेऊन जगत आहात. तुम्ही मला माणूस समजा एवढीच माझी तुम्हाला विनंती आहे कॅप्टन आनंद!"

"सुलभा..." आनंद उद्‌गारला.

"जी..." ती हुंकारली.

"मला तुझ्या मनाची कल्पना आहे. पण..." तो मध्येच थांबला.

"झोप आली...?" तिनं विचारलं.

"नाही. आज कित्येक दिवस मला झोप लागत नाही." आनंद दग्ध सुरात म्हणाला, "कदाचित आज मला झोप लागेल..."

"मग झोपा!" सुलभानं उठून सर्व दिवे मालवल नि पुन्हा ती त्या खुर्चीवर येऊन बसली. आनंदनं उठावं, मला ह्रदयाशी धरावी नि मी जे सुख पूर्वी अनुभवीत होते ते मला आज परत मिळावं असा ती विचार करू लागली. परंतु पुन्हा ती स्वतःला म्हणाली, 'सागर आपली मर्यादा कधीच सोडत नसतो. नदीच त्याला जाऊन भेटते. पण कशी जाऊ मी?...'

ती विचार करीत बसली आणि आनंदला झोप लागली.

पहाट झाली... उजाडलं. आनंदनं डोळे उघडले तेव्हा सुलभा त्याच्या पायांवर मस्तक ठेवून शांत बसली होती. ती रडत होती नि तिच्या आसवांनी त्याचे पाय धुऊन काढले होते. तो चकित होऊन म्हणाला,

"सुलभा, तू जागीच आहेस! हे काय, तू रात्रभर अशी बसून आहेस! तुला वेड लागले आहे की काय?"

"नाही... ते का लागत नाही नि मी मरत का नाही याचंच मला फार दुःख वाटतं! चला, तुमची तयारी करा." ती डोळे पुशीत स्वैंपाकघरात गेली आणि आनंदची न्याहारीची तयारी करू लागली.

सात वाजले. आनंदनं आपली बांधाबांध केली आणि तो आपला युनिफॉर्म घालू लागला. त्यानं सहज वळून पाहिले आणि तो चकित झाला.

सुलभा डोकीवरच्या पदरानं आनंदचे बूट स्वच्छ करीत होती.

"सुलभा, काय करतेस हे?" त्यानं विचारलं.

"काऽही नाही. तेवढंच समाधान!" तिनं ते बूट त्याच्या पुढे ठेवले. ते पायात घालून आनंद तिच्या पुढं उभा राहिला. आणि पटकन सुलभानं त्याच्या पायांवर डोकं ठेवलं; तेव्हा ती रडत होती. ती उठली तेव्हा आनंदनं तिच्या तोंडाकडे पाहिलं. तेव्हा तिच्या कपाळी तिचे कुंकू नव्हतं. मग त्याने आपल्या बुटाकडे पाहिले. त्या कुंकवाचा ठसा त्याच्या बुटावर उमटला होता. तो म्हणाला, "सुलभा, आरशात पाहून ये–"

ती आरशापुढं जाऊन आली. आपले कुंकू कपाळी नसून बुटावर उमटले आहे हे पाहून म्हणाली,

"आता ही आठवण घेऊन जा. पूर्वी कोल्हापूरला जातेवेळी किंवा त्या दिवशी तुम्ही बंगलोरला निघालात तेव्हा जसा मी तुम्हाला निरोप दिला तसा आता देऊ शकत नाही आणि तुम्हाला ते आवडणार नाही नि त्यातच माझा मोठेपणा आहे. कारण माझा प्रियकर उथळ नाही. थिल्लर नाही. तो पोलादासारखा कणखर आहे नि त्यातच मला आनंद आहे."

"मी निघालो..." आनंद सद्‌गदित होऊन बोलला.

"जा. पण हा बुटावरचा माझ्या कुंकवाचा ठसा लक्षात ठेवा. तो उद्या नाहीसा होईल पण काळजावरचा ठसा जपून ठेवा..." ती रडू लागली. अश्रूंची धार तिच्या गालावरून उतरू लागली. आनंदनं पुढं जाऊन तिचे डोळे पुसले आणि त्या स्पर्शानं ती आनंदित झाली. तिनं पुन्हा त्याच्या पायाला हात लावला. तिला बोलणे अशक्य झाले. पण मध्येच सुरेश म्हणाला,

"आनंदकाका, आता कधी येणार?"

"जरूर येईन; पण मरण्यापूर्वी एकदाच!" आनंद उत्तरला आणि सर्व शक्ती एकवटून सुलभा ओरडली, "आनंद... आनंद! हे काय बोलता आहात? असं बोलू नका. तुमच्या आधी मी मरणार आहे."

नंतर आनंद सुरेशला घेऊन टॅक्सीकडे गेला नि टॅक्सीत बसून म्हणाला, "सुलभा-सुरेश, मी निघालो..."

"तुम्ही निघाला, पण कधी भेटणार?" सुलभानं विचारलं.

"ते नक्की सांगू शकत नाही, पण जिवंत असेन तर जरूर भेटेन." आनंद बोलला.

"नाही... तुम्ही मला भेटणार नाही; परंतु मी स्वतःच तुम्हाला भेटेन." सुलभा निर्धारयुक्त स्वरात म्हणाली.

आणि ती टॅक्सी आनंदला घेऊन निघाली, नि हां हां म्हणता दृष्टिआड झाली.

सुलभा घरात जाऊन बावचळली. ती हाताच्या ओंजळीत तोंड घेऊन मोठ्यानं रडू लागली. स्वतःला म्हणाली, "आनंद, आनंद, आता तुम्ही मला कधीच भेटणार नाही हो..."

## ७

ते पंधरा दिवस सुलभाला फारच वाईट गेले. तिची मन:स्थिती सारखी बिघडत होती. ती तासन्‌तास एकाच जागी बसून एकच विचार करीत होती. आनंद आता भेटेल का? सुलभा शांत बसली की सुरेश येऊन तिला विचारीत होता, "आई, आनंदकाका कधी येणार?" आणि मग ती आनंदच्या विचारात गुरफटत होती.

बाळासाहेबांचा खाक्या तोच होता. तो आपली चाकोरी सोडत नव्हता आणि ती बाळासाहेबांची तऱ्हा सुलभाला अगतिक करीत होती.

सुलभा स्वैपाक आटोपून बसली होती. तिला कृष्णाबाईच्या शब्दांची आठवण झाली होती.

ती म्हणाली होती, "सुलभा, तू सोन्यासारखी आहेस. पण हे सोनं कुणाच्या पदरात पडते कोण जाणे! सोन्यात सोने मिसळून त्याचा साज होतो. सोनं हे लोखंडात कधीच मिसळत नाही." असं काही तरी कृष्णाबाई म्हणत होती, पण आता इलाज नव्हता! कृष्णाबाईंचं म्हणणं खरं ठरलं होतं .. माझं सोनं खरं होतं, पण त्याला आता हिणाच्या शेजारी बसायची पाळी आली आहे.

आनंद स्वप्नात यावा तसा येऊन परत गेला. तो याच शहरात आहे. परंतु आज पंधरा दिवसात परत आला नाही आणि तो पुन्हा कधीच भेटणार नाही.

सुरेश बागेत सायकल ठेवून धावत आला नि म्हणाला,

"आई... आई, आनंदकाका कधी येणार?" सुलभा चिडली. म्हणाली,

"आता आनंदकाका कधीच येणार नाहीत."

सुरेश काहीच बोलला नाही. तो बागेत जाऊन आपली सायकल चालवू लागला.

थोड्या वेळानं बाळासाहेब आला. सुलभानं त्याला जेवण वाढलं नि सुरेश कुठं आहे हे पाहायला ती बागेत गेली.

बागेत सुरेश नव्हता. मग तिनं शेजाऱ्यांकडे चौकशी केली. नंतर ती धावत सरस्वतीबाईंकडे पळाली नि म्हणाली,

"बाई, माझा सुरेश आला होता?"

"नाही." सरस्वतीबाई म्हणाली नि सुलभाची पाचावर धारण बसली आणि घरी येऊन ती मोठ्यानं रडू लागली. म्हणाली, "सुरेश कुठंच नाही." तसा बाळासाहेब धडपडून उठला. त्यानं माणसं पाठवली नि स्वत:ही पळत सुटला. पोलिसाला खबर दिली गेली नि गल्लोगल्ली माणसं धावली.

सुलभाचा आत्मा पेटला होता. ती सुरेश ऽ सुरेश करीत एकाच जागी बसली होती. सुरेशला कुणी तरी पळवला अशी तिची खात्री झाली होती. ती रडत बोलत होती, 'सुरेश मी तुझ्यासाठी जगले. पण तूही मला टाकून गेलास-' ती घड्याळाकडे एकटक पाहत होती. जसा वेळ जाईल तशी ती अस्वस्थ होत होती. मी उगीचच त्याच्यावर रागावले आणि तो परत गेला.

सुरेशला शोधायला गेलेली माणसं परत येऊन 'सुरेश आला का' असं विचारीत होती.

आणि जेव्हा सुरेशला जाऊन चार तास झाले. तेव्हा सुलभा वेडावली. ती घड्याळापुढं उभी राहिली नि मोठ्यानं ओरडली, "सुऽरेश ऽ ऽ तू कुठं आहेस ऽऽ"

आणि त्याच वेळी बाहेर मोटारीचा हॉर्न वाजला तशी ती बाहेर धावत गेली.

दारात एक जीप उभी होती. तिच्यात दोन सैनिक होते. त्यापैकी एकानं सुरेशला अलगद उचलून खाली ठेवला. मग त्याची सायकल खाली ठेवली. सुलभानं सुरेशला पोटाशी धरला. म्हणाली, "सुरेश! सुरेश, अरे कुठं गेला होतास?"

"आनंदकाकांकडं –" सुरेश म्हणाला.

"काय आनंदकाकांकडं?" सुलभा रडत रडत हसू लागली. म्हणाली, "मग भेटले का आनंदकाका?"

"होय–"

"मग काय म्हणाले आनंदकाका?" तिने विचारले.

"तुम्ही सुरेशच्या आई का?" एका सैनिकानं विचारलं.

"होय, मी सुरेशची आई आहे." तिने डोळे पुसले.

"हे पाहा, साहेबांचा निरोप आहे की तुम्ही सुरेशवर लक्ष ठेवा–" एक सैनिक म्हणाला.

"बरं बरं आणि काय म्हणाले ते साहेब?" सुलभानं विचारलं.

"काही नाही!" तो सैनिक म्हणाला आणि सुलभाची निराशा झाली. ती जीप आली तशी परत गेली नि सुलभा सुरेशला घेऊन घरात गेली. म्हणाली, "आनंदकाका काय म्हणाले?"

"त्यांनी मला उचलून घरात नेलं, दूध, बिस्किटं दिली–" सुरेश बोलला.

"बरं, पुढं काय झालं?" ती बोलली.

"मग आम्ही बोलत बसलो." सुरेश म्हणाला, "आणि मग जीपगाडीत बसवून पाठवले–"

"अरे चोरा!" ती बोलली.

"मी म्हटले, काका आमची आई फार फार रडते. तुम्ही का येत नाही?" सुरेश

बोलला.

आणि सुलभानं त्याला पोटाशी धरले. तेव्हा सुरेश म्हणाला, ''आई, आनंदकाका म्हणाले की, मी उद्याच दुसरीकडे जाणार आहे – आता इकडे येऊ नको–''

''ते दुसरीकडे जाणार?'' सुलभा शून्यात पाहत म्हणाली, ''ते म्हणत होते, सुलभा, तू माझ्या जीवनाचं सुकाणू आहे नि हे सुकाणू मोडलं तर माझी नाव कोणत्या खडकावर आदळून फुटेल याचा नेम नाही! आणि आता तसेच झाले आहे– सुकाणू मोडलं आहे. आता ती नाव थांबणार नाही.''

''आई?''

''काय? बोल ना!''

''काका रडत होते.'' सुरेश म्हणाला, ''त्यांनी माझा पापा घेतला–''

सुलभाचे हृदय गहिवरले नि ती रडू लागली. म्हणाली– ''तुझे काका कुठंही असोत, पण ते सुखी असावेत असं आपण दोघं देवाकडं मागणं करू या.''

त्या दिवसापास्न सुलभा सुरेशला क्षणभरही विसरत नव्हती. ती डोळ्यात तेल घालून त्याची काळजी घेत होती.

दोन महिने झाले.

पावसाळा आला. ढगावर ढग धडाका देऊ लागले. वीजांनी कडकडाट केला नि संततधार पाऊस पडू लागला. सृष्टीनं रंग बदलला.

नवी फुलं फुलली. धरणीला नवा साज चढला. ती थंडगार झाली.

सुलभा व्हरांड्यात उभी होती. बागेत पाऊस पडत होता. पाण्यात पाणी नाचत होते. बुडबुडे फुटत होते नि तरंग उठत होते. सुलभाचं अंत:करण धगधगत होते. तिला गारवा द्यायचं सामर्थ्य कोणत्याही मेघात नव्हतं. ती स्वत:लाच विचारीत होती. . . ती चंद्रासारखी शीतल, विजेसारखी चपळ नि मेघासारखी गंभीर ती मीच का?

एवढ्यात भोलाराम आला. काखेतील थैली सांभाळीत त्याने छत्री मिटली. नि ''हरे राम काय हा पाऊस!'' असं म्हणत ती थैली सुलभाकडे दिली नि पाय झाडले.

''काय रे हे?'' सुलभानं विचारलं.

''ते पाच हजार रुपये आहेत. हवे तर मोजून घ्या.'' भोलाराम म्हणाला.

''आणि साहेब कुठं आहेत?'' तिनं विचारले.

''बाईजी, ते आपल्या कामात आहेत.'' भोलाराम उत्तरला.

''भोलाराम, एवढे रुपये कुठून आणलेस?'' सुलभानं पुन्हा प्रश्न केला.

''बाईजी, ही साहेबांची कमाई आहे. मी गरीब एवढे रुपये कोठून आणणार!''

भोलाराम म्हणाला, ''मी स्वत: लिलाव जरी करून घेतला तरी मला कोणी पाचशे पैशाला विकत घेणार नाही!'' असं म्हणून तो स्वत:च मोठ्यानं हसला.

''बरे पण, असली ही रक्कम तू उघड उघड घेऊन येतोस याचा अर्थ काय?'' तिनं विचारले. ''लाच घेणे गुन्हा आहे हे तुला माहीत आहे का?''

''होय बाईजी, सरकार लाच घेणं गुन्हा म्हणतं.'' भोलाराम म्हणाला, ''परंतु या गुन्ह्यात जर लाच घेणारांना कैद केलं तर अर्धा हिंदुस्थान तुरुंगात जाईल...''

''बरं, आता हे सांग की साहेब कधी येणार आहेत?'' सुलभानं विचारलं.

''बाईजी, मी खोटं बोलत नाही.'' भोलाराम गंभीर होऊन म्हणाला, ''साहेबांची गाडी रोजच्याच वेळेवर घरी पोहोचणार...''

''मला समजले नाही.'' सुलभा बोलली.

''म्हणजे बाई, आज एक बडी मैफल होणार आहे.'' भोलाराम म्हणाला, ''आज बडे बडे लोक मैफलीत सामील होणार असून ती गुलशनबानू त्यांच्यापुढं नाचणार आहे.''

''बरे, या गुलशनची नि तुझ्या साहेबांची ओळख तरी आहे का?'' सुलभानं विचारलं.

''हे काय विचारता बाई! त्या गुलशनची आईदेखील साहेबांना ओळखते. मग गुलशन ओळखील यात कसलं नवल!'' भोलाराम ऐटीत म्हणाला, आणि जेवढ्या नाचणाऱ्या बाया या शहरात आहेत त्या सर्वच साहेबांना चांगल्या ओळखतात.''

''असं का...?'' सुलभा उद्गारली.

''बरं... मी चलतो...'' असं म्हणून भोलारामनं सुलभाचा निरोप घेतला नि पंजी वर धरून तो पावसात शिरून चालू लागला.

रात्रीचे दोन वाजले होते. सुलभा शांत बसली होती. तिची झोप उडाली होती. बाहेर पाऊस पडत होता. वरचेवर वीज लखलखत होती... क्षणोक्षणी आग्रा शहर उजाळून पुन्हा अंधारात दडी मारीत होते.

तीन वाजले नि बाळासाहेब आला. त्याला भोलारामनं आपल्या छत्रीतून धरून आणला होता. तो भिजून चिंब झाला होता. व्हऱ्हांड्यात येताच बाळासाहेबाला सोडून भोलारामनं पाय काढला.

सुलभानं दार उघडलं तेव्हा बाळासाहेबांच्या अंगातून पाणी गळत होतं. तो दारूनं धुंद झाला होता. म्हणाला, ''तुला किती हाका मारायच्या—''

ती काहीच बोलली नाही. सरळ स्वैंपाकघरात जाऊन तिनं जेवण वाढलं.

बाळासाहेब कपडे बदलून ताटावर बसला. आणि तिच्याकडे निरखून पाहात म्हणाला, ''आज मला तुझा चेहरा फारच सुंदर दिसतो आहे—''

''किती वाजले आता?'' सुलभानं तीक्ष्ण सुरात विचारलं.

''पुष्कळ वाजले असतील.'' बाळासाहेब म्हणाला, ''परंतु माणसानं घड्याळाच्या

काट्यात आपली मान अडकवून घेऊ नये.''

''पण किती वेळ जागायचं?'' ती बोलली.

''कोण म्हणतो जागत बस. झोपत जा ना!'' तो गरजला.

''म्हणजे?'' ती संतापली

''म्हणजे. मी येईपर्यंत झोपायचं आणि मी आलो की उठायचं—'' त्यानं खुलासा केला.

''असं किती दिवस?'' तिनं विचारलं.

सुलभा काहीच बोलली नाही. बाळासाहेब जेवून सिगारेट ओढीत पलंगावर बसला आणि सुलभानं आपलं अंथरूण स्वैंपाकघरात टाकलं. तेव्हा तो अधिकच संतापला. म्हणाला, ''सुलभा, इकडे ये—''

''कशाला-काय म्हणणं आहे?'' तिनं विचारलं.

''तू स्वैंपाकघरात का अंथरूण टाकलंस?'' बाळासाहेब म्हणाला.

''मला वाटलं म्हणून—'' ती उत्तरली.

''नाही — तू तिकडं झोपू नको.'' तो चिडून म्हणाला, ''तू इथं झोप—''

''नाही — मी तिकडेच झोपणार.'' असं म्हणून ती स्वैंपाकघरात जाऊन झोपली.

आणि बाळासाहेब ओरडला — ''सुलभा—''

''काय?''

''इकडे ये—''

''कशाला—?''

''तू इकडे ये. सांगतो.''

''नाही — सकाळी ऐकेन मी.''

''नाही, तू आत्ताच ये. नि इथं झोप माझ्याजवळ-''

''मी येणार नाही—'' ती म्हणाली.

''सुलभा, तुला यावंच लागेल—'' तो मोठ्यानं ओरडला नि सुरेश उठून बसला. त्यानं हाक मारली, ''आऽ ईऽऽ''

''आल्ये—'' ती धावत गेली.

''आई, तू कुठं झोपतेस-?'' सुरेशनं विचारलं.

''स्वैंपाकघरात-'' ती म्हणाली.

''मीही तिकडे येतो. हे पपा ओरडतात.'' सुरेश म्हणाला.

''बरं, चल तर—'' सुलभा सुरेशला स्वैंपाकघरात घेऊन गेली नि आतून कडी लावून निवांत झोपली.

बाळासाहेबांच्या मस्तकात डोंब उसळला होता. तो एकटाच बोलत होता.

"तुझा हा अहंकार नि घमेंड मी मुळीच चालू देणार नाही. तू घमेंडखोर आहेस असं मला लग्नापूर्वीच समजलं होतं आणि तरीही मी तुझ्याशी मुद्दाम लग्न केलं, कारण मला तुझी घमेंड गाडून टाकायची आहे आणि मी ती गाडीन तेव्हाच राहीन-"

तो उशीर बडबडत होता.

सकाळी सुलभा उठली तेव्हा तिच्याबरोबरच सुरेशही उठला. बाळासाहेबानं फणफणतच आंघोळ केली नि न्याहारी करून तो म्हणाला-

"रात्री तू तशी कां वागलीस- का तुझं डोकं फिरलं होतं?"

"नाही. माझं डोकं ठिकाणावर आहे." तिनं उत्तर दिलं.

"मग माझंच डोकं ठिकाणावर नव्हतं काय?" त्यानं विचारलं.

"ते ज्याचं त्यानं पाहावं आणि जर कळत नसेल तर आपलं डोकं जाग्यावर नाही असं खुशाल समजावं—" सुलभा बोलली.

"सुलभा, आता हद्दीबाहेर जाऊ नको." तो ओरडला.

"तुम्ही हद्दीबाहेर जाऊ नये — माणसासारखं वर्तन करावं म्हणून फार फार सहन केलं." सुलभा दाहक स्वरात म्हणाली, "परंतु आता सारंच व्यर्थ आहे. सरणावरचं मढं सारंगी कशी वाजवणार?"

"सुलभा, याचा परिणाम भयंकर होईल." बाळासाहेब ओरडला नि चटकन उठला आणि त्याचवेळी सरस्वतीबाई घरात आली. तिला पाहून बाळासाहेब पुन्हा बसला. सरस्वतीबाई म्हणाली,

"सुरेशच्या आई, आम्ही सर्व मुलं-बाळं घेऊन मथुरेला जात आहोत. स्टेशन वॅगन केली आहे आणि भरपूर जागा आहे, तेव्हा तुम्ही येऊ शकाल का?"

"असं? मीही अजून मथुरा पाहिली नाही. माझी इच्छा आहे, पण पण-" सुलभा बोलली.

"पण काय- जायचं आहे तर जा ना!" बाळासाहेब म्हणाला, "विचार कसला करत्येस. चल, तयारी कर आणि काकू, ती येणार—"

"मग काय आनंद झाला. गोळामेळ्यानं जाऊन येऊ आम्ही." सरस्वतीबाई म्हणाली, "आज जाऊन परवाच परत फिरायचं. तयारी करून बसा. आम्ही गाडी घेऊन इकडे येऊ—"

सुलभानं लगेच तयारी केली. कपड्यांची पेटी भरली. पैसे घेतले आणि सुरेशला घेऊन ती मथुरेला गेली.

पाऊस उघडला होता. आकाश उजळलेल्या भांड्याप्रमाणे लखलखीत झाले होते.

फुटपाथवरची झाडं अंग टाकीत उभी होती. रस्ते धापा टाकीत होते.

दहाच्या सुमारास सुलभा मथुरेहून आली ती सरळ घरात. बाळासाहेब ऑफीसला जायची तयारी करीत होता. तो आज उशिरानं उठला होता म्हणून त्याला घाई झाली होती. गंगुबाई कामावर रुजू होती. तिनं न्याहारी तयार केली होती.

सुलभा आली. परंतु बाळासाहेबाशी मुळीच बोलली नाही. तिनं प्रथम आंघोळ केली नि आरशापुढं गेली. समोर ओलणीवर एक पातळ लोंबत होतं ते पाहून तिला आश्चर्य वाटलं, कारण ते पातळ तिचं नव्हतं. त्या पातळाचा विचार करीत तिनं फणी उचलली आणि ती पुन्हा दचकली; त्या फणीत केसांची गुंत अडकली होती ते केस तिचे नव्हते. ती फणी घेऊन गंगूकडे जाऊन तिच्यापुढं फणी धरून म्हणाली,

"गंगू, हे केस कुणाचे?"

"मला माहीत नाही बाई!" गंगू बोलली.

सुलभाचं मन संशयात गुरफटलं. ती म्हणाली, "आणि ते पातळ कुणाचं आहे?"

"ते पण मला ठाऊक नाही!" गंगू म्हणाली.

"बाई, तुम्ही गेला त्याच दिवशी साहेबांनी मला रजा दिली नि सांगितले की, बाई घरी नाही. मी दोन दिवस बाहेर जेवणार आहे. तेव्हा तू परवा बाई आल्यानंतर कामावर ये. त्याप्रमाणे आजच मी कामावर आले आहे."

सुलभा विचारमग्न झाली. या दोन दिवसांत या घरात कोणीतरी बाई नक्कीच आली होती. अशी तिची खात्री झाली.

तोच बाळासाहेब आला नि म्हणाला, "काय बाईसाहेब, मला वाटतं, पूर्वी आपली ओळख असावी. तुमचं काय मत आहे."

"होय होती ना आणि आजही आहे." सुलभा शांतपणे म्हणाली, "परंतु ते ओलणीवर जे पातळ आहे ना, त्याची माझी ओळख नाही."

"सुलभा, तुला वेडबिड तर लागले नाही?" बाळासाहेब तिची कीव करीत म्हणाले, "ते पातळ तुझे नाही तर काय मी पातळ नेसत असतो? काय झाले आहे तरी काय तुला?"

"हे माझ्या प्रश्नाचे उत्तर होऊच शकत नाही." सुलभानं भुवया चढवल्या नि बाळासाहेब म्हणाला,

"तुला भांडणाची हुक्की आली आहे. परंतु तू अजून विचार कर आणि आपल्या या मुजोरीला आळा घाल."

"म्हणजे हा तुमचा नंगानाच असाच मी पाहायचा की काय?" तिने कडाडून विचारले.

"कसला नंगानाच?" तो बिथरला आणि सुलभाचा तोल सुटला. ती भडकून म्हणाली,

"आणि वर मलाच विचारता? मी दोन दिवस बाहेर जाताच घराचा कुंटणखाना करता? रात्र रात्रभर वेश्यांच्या घरी लोळता. रात्री दारू ढोसून येता. लाच घेता. हे जे तुम्ही करता ते सर्व बरोबर करता का?"

"मी वेश्यांच्या घरी लोळत असतो असं कोण म्हणतो?" बाळासाहेबानं खवळून विचारलं, "हे तुला कोणी सांगितलं?"

"मी म्हणते, सांगायला कशाला पाहिजे?"

"तू महामूर्ख आहेस—"

"मी मूर्ख नाही. भोळी आहे आणि माझ्या भोळेपणाचा गैरफायदा घेत आहात." सुलभा वैतागून म्हणाली, "मला स्पष्ट सांगा, या घरात मी कोण म्हणून दिवस काढायचे?"

"मी तुला ग्रामीण भाषेत बायको म्हणत नाही. सौभाग्यवती म्हणतो नि सौभाग्यवतीसारखंच तू या घरात नांदायचं." बाळासाहेब म्हणाला, "आणि सौभाग्यवतीची सर्व कर्तव्यं पार पाडायची."

"ती कोणती?" सुलभानं विचारलं.

"घर सांभाळायचं, मुलांची काळजी घ्यायची, पती म्हणजे- मी आलो की जेवण वाढायचं. अंथरूण टाकायचं नि पती सांगेल तसं वागायचं. समजलं का?" बाळासाहेबानं उत्तर दिलं.

"आणि पतीनं कसं वर्तन करायचं?" सुलभानं प्रश्न केला.

बाळासाहेब म्हणाला,

"पतीनं नोकरी करायची आणि पैसा आणायचा आणि काय ग, तू स्वत:ला फार शिकलेली समजतेस, परंतु नवऱ्याशी कसं वागावं, त्याच्यावर प्रेम कसं करावं हे तरी तुला कळतं का? तुझी आई तुझ्या बापाला कारभारी म्हणते आणि तू मला हलकट समजतेस? मी वेश्यांच्या घरी लोळतो असं माझ्या तोंडावर म्हणतेस? माझ्या जागी दुसरा असता तर त्यानं तुझ्या तोंडाला कायमचं कुलूप ठोकलं असतं आणि तू ही अशी का वागतेस हे मला माहीत आहे."

"काय माहीत आहे?" तिनं विचारलं.

"तुझा आपल्या लग्नाला विरोध होता. कारण काय तर म्हणे तू फार देखणी नि शिकलेली!

"माझा लग्नाला विरोध होता हे माहीत होतं तर मग लग्न कां केलंत?" तिनं विचारलं.

"तुझी घमेंड नष्ट करावी, तुझा अहंकार धुळीला मिळवावा एवढ्यासाठी मी तुझ्याशी लग्न केलं आहे." बाळासाहेब पिसाट होऊन म्हणाला, "आणि तुझ्या त्या हावरट नि वेडगळ बापानं माझी लेक कराच म्हणून माझे पाय धरले होते. अगदी

नासका माल गिऱ्हाइकाच्या पदरात बांधणाऱ्या हलकट व्यापाऱ्यासारखं केलं त्यानं. आलं का लक्षात?''

''आलं–'' सुलभा शांतपणे म्हणाली, ''माझ्या बापानं तुमचे पाय धरले, त्यानं नासका माल तुमच्या पदरात बांधला, तो हावरट आहे, तो हलकट आहे हे सर्व खरं का?''

''खरं वाटत नसेल तर जाऊन विचार त्या आपल्या विद्वान जन्मदात्याला!'' बाळासाहेब कडाडून बोलला.

''कधी जाऊ?'' सुलभानं विचारलं.

''कधीही जा. उद्या जा, परवा जा, नाही तर आता जा.'' बाळासाहेब बोलला आणि सुलभा निर्धारयुक्त सुरात म्हणाली.

''मग मी आजच जाणार. माझी तयारी करा.''

''आज तर आजच जा. चल, चालायला लाग.'' बाळासाहेबानं भोलारामला हाक मारली. तो पुढं येताच त्याला पैसे देऊन म्हणाला, ''तू आत्ताच्या आता स्टेशनवर जाऊन पहिल्या वर्गाची दीड तिकिटं घेऊन ये. आणि थांब मी लिहून देतो- नि तूही सांग- कऱ्हाडपर्यंतची नि येते वेळी एक टॅक्सी घेऊन ये.''

भोलाराम पळाला.

सुलभाने कसे तरी दोन घास खाल्ले. सुरेशला जेवण वाढून आवराआवर केली. कपड्यांची पेटी भरली.... दागिने पेटीत भरले आणि ती पेटी भरीत असतानाच बाळासाहेब उठला नि त्यानं पाच हजार रुपये तिच्या पेटीत घातले.

सुरेशनं आपली सायकल व्हरांड्यात नेऊन ठेवली.

भोलाराम तिकिटं नि टॅक्सी घेऊन आला. म्हणाला, ''बाबूजी, पंजाब मेल एक तास लेट येत आहे. जरा लौकर गेल्यास ती मिळेल.''

''मग ते सामान टॅक्सीत भर आणि चल.''

भोलारामनं सामान टॅक्सीत भरले आणि सुलभानं गंगूला बाजूला घेतली. म्हणाली,

''गंगू, मी काही दिवसांसाठी माहेरी जात आहे. तू मला वरचेवर पत्र लिहून जे काय होईल ते कळवायचं. काय, कबूल?''

''बाई, मला सर्व कबूल आहे.'' गंगू बोलली.

आणि सुलभा सुरेशला घेऊन त्या टॅक्सीत बसली.

गाडीला वेळ होता. सुलभा गाडीची वाट पाहत होती. आता तिचं लक्ष माहेरी लागलं होतं. ती कशाचाच विचार करत नव्हती. ती बाळासाहेबाशी मुळीच बोलत नव्हती. ती दिल्लीकडे एकसारखी पाहत होती. आता याच्याबरोबर काहीच बोलायचं नाही असं तिनं ठरवलं होतं.

आणि बाळासाहेब मनात म्हणत होता. आपण इतके भडकलो नि सुलभाला नको

ते बोललो. हे बरोबर नाही. ती आता दुखावली आहे. ती परत बोलणार नाही.

आणि आता काहीच बोलायचं नाही असा सुलभानं विचार केला आणि बाळासाहेब मनात म्हणत होता, आपली चूक झाली. आपण सुलभाला इतकं बोलायची गरजच नव्हती.

नंतर बाळासाहेब सुलभाजवळ गेला नि हळू स्वरात म्हणाला,

''सुलभा, मी तुला भांडण करून पाठवीत नाही. रागाच्या भरात मी नको ते बोलून मी चूक केली. आता मला क्षमा कर आणि फार दिवस तू माहेरी राहू नको. सुरेशला जप नि लौकर परत ये. माझ्यावर भलताच सूड घेऊ नको.''

सुलभा हूं का चूं करीत नव्हती. ती फक्त ऐकत होती. तिचे सर्व लक्ष गाडीकडे लागले होते.

''घरी पोचताच पत्र पाठव.'' बाळासाहेब बोलत होता, ''माझं बोलणं मनावर घेऊ नको. मी काहीतरीच बोललो.''

आणि गाडी आली. भोलारामनं सुलभाचं सामान गाडीत चढवलं... सुलभा सुरेशला घेऊन गाडीत बसली आणि गाडी सुटायची वाट पाहू लागली.

आणि जेव्हा गाडी निघाली तेव्हा तिच्या जिवात जीव आला. बाळासाहेबानं हात उंचावून हलवला, पण सुलभाचं तिकडे लक्षच नव्हतं. आज आपण एका भयंकर जाचातून मुक्त होत आहोत या आनंदानं ती सर्व काही विसरली.

गाडी जंगी भरारी घेत होती! आता तिला मुंबई जवळ करायची होती. सुलभा खिडकीत बसून बाहेर पाहत होती. तिच्या पुढं झाडंझुडपं गिरक्या घेऊन दूर जात होती. एखादी नदी दिसताच तिला कृष्णानदीची आठवण होत होती आणि ती आठवण तिच्या दग्ध मनाला शांत करीत होती. तिचा जीव त्या आठवणीनं माहेरी जाऊन परत येत होता. तिचा आत्मा शेवरवाडीच्या शिखरावर पाखराप्रमाणे भरारी मारीत होता. ती तांबखडी, ते मुसळ्याचे टेक नि ती लक्ष्मीपाद ही स्थळं तिच्या डोळ्यांपुढं उभी राहिली होती. ती विचाराच्या कृष्णेतून वाहत होती. रात्रीचे बारा वाजले. मनगटावरील घड्याळात पाहत ती मनात म्हणाली, 'आता बारा तासात मुंबई नि मग ते माझे कऱ्हाड –'

पुण्याहून निघालेली ती गाडी मिरजेकडे पळत होती. ती गाडी माळाने खोकड पळावे तशी पळत होती. ती साताऱ्याची धरणी पाहून सुलभाचा आत्मा शांत झाला होता. पाऊस पडतच होता.

आता कऱ्हाड येईल. पण या पावसात मी घरी कशी जाणार! सुलभा विचार करीत होती नि कऱ्हाड जवळ येत होतं.

गाडीनं शिरावडं मागं टाकलं आणि लगेच ती कऱ्हाड स्टेशनवर थांबली.

''कऽऱ्हाऽड'' प्रवाशांनी गलका केला. सुलभा उठली. त्या धरणीवर पाय ठेवायला आतुर झाली होती. ती सुरेशला घेऊन खाली उतरली. तिच्या गालावर आनंदाश्रू घरंगळले.

"बाई, कुठं जायचं?" एका हमालानं विचारलं.

"सामान घेऊन आधी बाहेर तरी चल." सुलभा बोलली. या पावसात मी घरी कशी जाणार या विचारानं ती गोंधळली होती. स्टेशनबाहेर येत ती खिन्न होऊन उभी राहिली. तोच काशिनाथ पुढं आला. त्याला पाहून ती स्तंभित झाली. म्हणाली, "दादा, इकडे कसा?" तिला रडू आले.

"तू निघालीस अशी भावजींची तार आली." काशिनाथ म्हणाला, "अग आईनं मला बसू दिलं नाही. मी कालच इथं आलो आहे. आता चल लौकर, बैल भिजत आहेत."

काशिनाथनं पेटी उचलली.

आईच्या मायेला मोल नसतं असं म्हणून सुलभा गाडीत बसली.

काशिनाथनं येते वेळी गाडीवर तट्ट्या बांधून पावसाचं पाणी आत येऊ नये म्हणून बंदोबस्त केला होता आणि दोन घोंगड्या बरोबर आणल्या होत्या.

सुलभा सुरेशला पोटाशी धरून बसली नि गाडी चालू लागली.

दिवेलागण झाली आणि गाडी दारापुढं उभी राहिली. दारात गाडी करकरताच घरात गडबड झाली. शेवंताबाई नि जाई दारी धावत आल्या.

जाईनं आपल्या ताईला मिठी मारली. मग सुलभा आईच्या गळ्यात पडून हुंदके देऊ लागली. उशिरानं तिच्या कंठात कोंडलेला हंबरडा बाहेर पडला. मग शेवंताही रडू लागली.

उशिरानं घर शांत झाले आणि सुलभाने आपली ती कथा आईला सविस्तर सांगितली नि ती ऐकून शेवंतानं कपाळावर मारून घेतले आणि जळजळीत नजरेनं बाबा पाटलाकडे पाहिलं. तो दुचित होऊन ऐकत होता. त्याला शेवंता म्हणाली,

"काय, ऐकली का लेकीच्या जन्माची कथा?"

"होय, ऐकली. वाईट झालं लेकीचं." बाबा पाटील खिन्न सुरात म्हणाला, "मी विचार केला नाही. माझ्या अविचाराचं फळ लेकीला भोगावं लागलं. आता बोलून काय फायदा!"

"माझं ऐकलं असतं तर आज माझी लेक सुखी असती. तिचा सोन्याचा संसार झाला असता-" शेवंताबाई डोळे पुशीत म्हणाली, "पण त्यावेळी तुम्हाला वैर आठवलं आणि त्या वैरासाठी तुम्ही मुलीचं वाटोळं केलं."

"आता माझ्या शिरी खापर फोडून तुम्हाला काहीच मिळणार नाही." बाबा पाटील म्हणाला, "जे काही झालं ते कृष्णार्पण करा..."

हे ऐकून सुलभाला बरं वाटलं.

आज सुलभा आईच्या कुशीत झोपली होती. लहानपणी जशी आईला बिलगून झोपत होती तशी आज बिलगली होती आणि एक एक गोष्ट आठवून आईच्या कानात सांगत होती. ती हसत होती नि एकाएकी रडत होती.

सुरेश आज जाईमावशीजवळ झोपला होता. तो तिला आग्रा शहराचं वैभव सांगत होता. त्या घरात आज कित्येक दिवसानं आनंद परत आला होता.

सुलभा आईच्या कानात म्हणाली,

"आई, आनंद आग्र्यात घरी आला होता."

"असं..."

"होय, दोन दिवस राहिला माझ्या घरी."

"काय म्हणत होता...?" शेवंतानं विचारलं.

"काही नाही. आई, त्याचं मन दुखवलं आहे. तो फार फार दुःखी आहे." सुलभा बोलली.

"फार सज्जन मुलगा, आम्ही हातचा घालवला." शेवंता म्हणाली. "परवा तो रजेवर आला होता. पण इथं त्याचं मन लागलं नाही. रजा संपण्यापूर्वीच तो परत गेला..."

"आणि आई सुरेशला आनंदनं सायकल घेऊन दिली." सुलभा म्हणाली.

"माझा सुरेश आनंदला फार फार आवडतो." असं म्हणून ती हसली.

आणि नंतर सुलभा बोलत बोलत झोपली.

सुलभा सकाळी उठताच प्रथम अंगणाकडे पळाली. अंगणात उभं राहून तिनं सर्वत्र पाहिलं. रिमझिम पाऊस पडत होता. सारा शिवार हिरवागार दिसत होता. भिंतीवर उगवलेली गवतं वाऱ्यानं डोलत होती. घराघरावर भोपळीच्या वेलाची जाळी पसरली होती. त्यांची पिवळी फुलं डोळ्यात भरत होती नि पिवळे भोपळे हिरव्या पानात विश्रांती घेत होते. दारात उभ्या असलेल्या गाडीच्या साठीवर उभं राहून एक कोंबडा बांग देत होता आणि एक झिपरं कुत्रं त्या कोंबड्याचा रुबाब पाहत होतं.

सुलभाला राहवलं नाही. ती तशीच कृष्णाबाईच्या घराकडं पळाली नि तिच्या मागोमाग सुरेशही पळाला, कृष्णाबाई सुलभाला जवळ घेऊन म्हणाली,

"सुलभा, कशी आलीस, आणि एकटीच?"

"मी आणि सुरेश दोघं आलो." सुलभा सुरेशला पुढं करून म्हणाली, "हा माझा सुरेश आणि सुरेश, या तुझ्या आनंदकाकाच्या आई. यांना नमस्कार कर..."

सुरेशनं कृष्णाबाईला नमस्कार केला तेव्हा कृष्णाबाईला बरं वाटलं. तिनं सुरेशला उचलून घेतला नि घरात गेली नि सद्‌गदित होऊन म्हणाली,

"सुलभा, माझ्या आनंदचं लग्न झालं असतं तर आज मला एवढाच नातू असता. हे घर भरल्यासारखं वाटलं असतं. पण..."

ते ऐकून सुलभा दुःखी झाली. ती काहीच बोलली नाही. तिनं उगीचच चौफेर नजर फिरवली. समोरच्या भिंतीला दादासाहेबांच्या फोटोशेजारी आनंदचा लष्करी वेशातील

एक फोटो लावला होता नि त्या फोटोखालीच निरांजनं तेवत होती. तो फोटो पाहून सुलभाचे डोळे भरले.

कृष्णाबाईनं सुरेशला दूध दिले.

"आई, मला आनंद भेटले होते." सुलभा म्हणाली, "दोन दिवस माझ्या घरी राहिले होते."

"माझ्या आनंदचा तुझ्यावर फार जीव होता, नि अजूनही आहे." कृष्णाबाई म्हणाली, "परंतु ते तुझ्या बापाला कळलं नाही. त्यानं कस्तुरी टाकून हिंग पत्करला–"

नंतर कृष्णाबाईनं सुलभासाठी चहा केला नि मग त्या दोघी उशीर बोलत बसल्या.

शेवंताबाई स्वैंपाक करीत होती. सुलभा येऊन तिच्याजवळ बसली तेव्हा शेवंताबाई गंभीर होऊन म्हणाली,

"सुलभा, मी सहज विचारते. पण तू त्याचा भलतात अर्थ लावू नको. विचारू...?"

"विचार की! पण कशाविषयी?" सुलभा बोलली.

"तू परत जाण्याविषयी काय ठरवलं आहेस?" शेवंतानं विचारलं नि सुलभा म्हणाली,

"आई, आता मी परत जाणार नाही. आता मला त्या घराचं तोंड पाहायचं नाही."

"मग काय करणार?" शेवंतानं प्रश्न केला.

"मी काय वाटेल ते करीन. मी माझं नि बाळाचं पोट कसंही भरीन." सुलभा कळवळून म्हणाली, "मी नोकरी करीन. नाही तर चार घरं भीक मागेन–"

"भीक का मागणार तू!" शेवंताबाई म्हणाली, "मी जिवंत आहे नि तुझं माहेर आबाद आहे."

आणि दुसऱ्याच दिवसापासून सुलभा नोकरीसाठी अर्ज करू लागली. 'मी गुलाम नाही. आता मी मुक्त आहे. मी कुठंही जगू शकते' या जिद्दीनं ती पेटली. पाच वर्षं आपण जेवढ्या यातना भोगल्या – जे दु:ख सोसलं – ते एक विद्रूप स्वप्न आता संपलं आहे असं ती स्वत:ला सांगत होती.

माहेरच्या वातावरणात सुलभाचं मन एकरूप झालं होतं. कोळपलेलं रोप मृग नक्षत्रात पुन्हा मूळ धरते तशी ती माहेरात रमली होती.

आपले लग्न झालं आहे. आपण पाच वर्षं संसार केला आहे हे ती विसरली होती आणि नव्या फुलाप्रमाणं हसत होती आणि टचटचीत कळीप्रमाणे डोलत होती.

सुलभाला घेऊन त्या गाडीनं आग्रा स्टेशन सोडले त्यावेळी बाळासाहेबानं हात उंचावून हलवला. पण सुलभानं तिकडे मुळीच पाहिलं नाही. तिने असे कां केले याचा विचार करीत बाळासाहेबानं घरची वाट धरली. तो लांब लांब ढेंगा टाकीत होता; आणि भोलाराम त्याच्या मागून पळत होता. पुष्कळ चालून गेल्यावर भोलाराम म्हणाला, ''साहेब, टॅक्सी बोलवू?''

''मग बोलव ना!'' बाळासाहेब बोलला.

भोलारामनं टॅक्सी केली आणि ते दोघं घरी गेले.

घर शांत होतं. तिथं सुलभा नव्हती आणि सुरेशचा दंगा नव्हता, त्यामुळं तिथं स्मशानशांतता पसरली होती. बाळासाहेब अस्वस्थ झाला. त्याने कपाटातली एक बाटली काढली नि एकापाठोपाठ एक असे दोन ग्लास पोटात ओतले तेव्हा त्याला बरं वाटलं. त्या ओसाड घरात त्याला आनंद भरल्यासारखे वाटू लागले. पुन्हा त्यानं एक ग्लास रिकामा केला नि भोलारामनं सूचना करताच गंगूने अंडी तळून पुढे ठेवली.

बाळासाहेब आता निर्धास्तपणे दारू पीत होता. उशिराने तो म्हणाला,

''भोलाराम, ही गंगुबाई सात वाजले की पळून जाणार नि रात्री आम्हाला जेवण कोण वाढणार? मग उंदराप्रमाणे आम्हाला रात्री स्वैंपाकघरात धडपडावे लागणार आहे याचा आता बंदोबस्त केला पाहिजे.''

''मग काय करू?'' भोलारामनं विचारलं.

तो दोन्ही हात जोडून रामापुढं मारुती उभा राहावा तसा उभा राहिला.

''काही तरी बंदोबस्त कर!'' बाळासाहेब बोलला.

''ठीक आहे. मी निघालो.''

भोलाराम निघाला तेव्हा बाळासाहेब म्हणाला, ''आणि हे पाहा, तू जा; परंतु कबरस्तानाकडे जाणारी बाई आणू नको.''

''ते का? अगदी कळी आणतो! भोलाराम म्हणाला, ''अगदी बोहल्याकडं निघालेली... मग तरी झालं ना?''

''जा पळ.'' बाळासाहेबानं दुसरा ग्लास भरला. आणि भोलाराम पळाला.

थोड्या वेळानं भोलाराम परत आला तो एक अठरा वर्षांची सुंदर पोरगी घेऊन आला होता. त्याने बाळासाहेबाला सलाम ठोकला नि ती मुलगी पुढं केली. तिला पाहून बाळासाहेब थक्कच झाला. म्हणाला,

"जीते रहो भोला! हिला काम समजावून सांगितलं आहेस ना?"

"जी बाबूजी. पण पगार नाही सांगितला." भोलाराम बोलला.

"पगाराचं सोड रे, पगार ती मागेल तेवढा दिला जाईल-" बाळासाहेब त्या मुलीकडं पहात म्हणाला.

"तुझं नाव काय?"

"माझं नाव झिलू." तिचा स्वर सारंगीसारखा निघाला आणि तिच्या पाणीदार टपोऱ्या डोळ्यांची पलकं पडली.

"झिलू! अरे वा–"

बाळासाहेबानं गंगूला हाक मारली. ती पुढं येताच म्हणाला, "गंगू, तुला एकटीला त्रास होऊ नये म्हणून हिला तू संभाळून घे. काम समजावून सांग. तू घरी गेलीस की झिलू नोकरीवर रुजू होईल." गंगूनं मान डोलवली.

त्या दिवसापासून बाळासाहेबाचं ठीक चाललं होतं. तो कधीही घरी येत होता. तो जर लौकर आला तर झिलू त्याला जेवण वाढून स्वत: जेवून खरकटी भांडी घासून घरी जात होती. तोपर्यंत तिच्या घरचे कुणीतरी बाहेर वाट पाहत बसत होते.

आणि बाळासाहेब उशिरानं आला तर झिलूला तिथंच राहावं लागत होतं आणि सकाळी गंगू आली की ती घरी जात होती.

रात्रीचे बारा वाजले होते. सर्वत्र सामसूम झाले होते. बाळासाहेब आणि भोलाराम दोघं चालत होते. दोघंही गुमान ढेंगा टाकीत होते. ते एका मैफलीतून परतले होते. त्या मैफलीतील गाण्यांचे स्वर बाळासाहेबाच्या मस्तकात दंगा करीत होते आणि त्या नादात तो चालत होता. ती तरुण गुलशनची मूर्ती त्याच्या डोळ्यापुढून हालत नव्हती!

बाळासाहेब घरी आला तेव्हा ज्या जागेवर सुलभा बसत होती त्याच जागेवर झिलू बसली होती! ती वरचेवर घड्याळ्याकडं पाहत होती. आज आपण घरी जात नाही; आणि आज आपल्याला भावंडात झोपता येणार नाही, या विचारानं ती दु:खी झाली होती.

बाळासाहेब येताच झिलूनं गडबडीनं जेवण वाढलं. बाळासाहेब जेवला नि ती स्वत: जेवली आणि पदराला पिळा घालीत म्हणाली,

"मी घरी जाऊ का?"

"पण एकटी कशी घरी जाणार?" बाळासाहेबानी विचारलं.

"माझा भाऊ बाहेर बसला आहे." झिलू बोलली.

"मग जा ना!" बाळासाहेब म्हणाला, आणि झिलू 'उद्या येते' असं बोलून पळाली आणि भोलाराम बाळासाहेबांपुढे हात जोडून नम्रपणे म्हणाला,

"सरकार, मी या वर्षी माझ्या मुलीचं – नीलादेवीचं लग्न करावं असे म्हणतो."

"अरे, भोलाराम तुझी नीलादेवी आता मोठी झाली असेल की!" बाळासाहेब बोलला.

"होय ना साहेब! ती आता वयात आली आहे." भोलाराम हात जोडून म्हणाला. "आता तिच्यावर नजर ठरत नाही. ती म्हणजे माझ्या गळ्याला एक फास होऊन बसला आहे! तिचं तेवढं लग्न झालं म्हणजे मी मोकळा होणार आहे."

"मग करून टाक ना—" बाळासाहेब बोलला, "मुलगा आहे का कुठं?"

"सर्व ठरले आहे. मुलगा दिल्लीत आहे." भोलाराम म्हणाला, "पण तो पाचशे रुपये मागतो आहे."

"भोलाराम, पाचशे रुपयांचा प्रश्न नाही. तू तयारी कर. मी तुला पाचशे रुपये देईन." बाळासाहेब म्हणाला, "एकदा तू नीलादेवीला घेऊन ये. तिला पाहून फार दिवस झाले."

भोलारामला बाळासाहेबाच्या दिलदारपणाची कल्पना होती. थोरल्या मुलीच्या लग्नाला त्यानं उदार हातानं मदत केली होती. एकदा त्याचा होकार मिळाला की नकार मिळणे शक्य नव्हते! तो त्या होकाराची वाट पाहात होता. नि आज त्याला तो होकार मिळाला होता. त्यामुळे त्याला आनंद झाला. तो म्हणाला, "मग मी लग्नाची तयारी करू?"

"हो, हो, कर. पाचशेच ना? मी देईन!" बाळासाहेब हसत म्हणाला.

"पण बाबूजी—" भोलानं हात जोडले.

"तू निर्धास्त राहा. पाचशे रुपये मी देईन." बाळासाहेब म्हणाला. आणि दोन्ही हातांची जुडी कपाळावर लावून भोलाराम म्हणाला,

"मग काय देव पावला! मी सकाळीच नीलादेवीला घेऊन येतो, पाहा तर तिला."

आणि दुसऱ्याच दिवशी भोलाराम नीलादेवीला घेऊन हजर झाला. सावळा रंग, सरळ नाक, रसरशीत चेहरा, टपोरे डोळे, नाजूक ओठ आणि भरदार शरीर नि उभार टचटचीत उरोज, चंचल नजर, आणि लाजरा स्वभाव! अशी ती नीलादेवी बाळासाहेबापुढं येताच तो चकित झाला.

"नीलादेवी, बेटा नमस्कार कर साहेबांना." भोलाराम म्हणाला, नीलादेवीनं नमस्कार केला. तिचं ते तारुण्य पाहून बाळासाहेब दंग झाला. भरकन एक खुर्ची ओढून पुढं केली. म्हणाला,

"बैस. अरे तू एवढी मोठी झालीस! फारच सुंदर आहेस!" आणि नीलादेवी त्याच्यापुढं खुर्चीवर शांत बसली. भोलाराम म्हणाला,

"बाबूजी, ही नीला जेवढी तुम्हाला गोड दिसत आहे ना, तेवढीच मला कडू भासते आहे! कारण अशा मुलीची शोभा सासरी असते. ही लोकांची अनामत— मी गरीब किती दिवस सांभाळू..."

"तू काही काळजी करू नको. मी हिचे सारेच लग्न करून देईन." बाळासाहेब म्हणाला, आणि खिशातून पैसे काढून भोलारामला देऊन, बाहेर घेऊन गेला नि त्याच्या

कानात काहीतरी बोलला— तसा भोलाराम हसत हसत निघून गेला आणि बाळासाहेब पुन्हा येऊन नीलादेवीपुढं बसला. तिच्या डोळ्यातील अपार उन्माद पाहून घेतला नि मग तो तसाच पाहात राहिला.

आणि नीलादेवी त्याच्या डोळ्यात पाहू लागली. त्यांच्या चार डोळ्यांच्या पापण्या हलत नव्हत्या. डोळे बोलत होते नि ती हसत होती. नि ती त्याच्या नजरेत नजर घालून पाहत होती— त्याच्या नजरेचा पाठलाग करीत होती.

गप्पकन त्याची नजर खाली उतरून तिच्या टचटचीत छातीवर स्थिरावली आणि नीलादेवीनं गपकन खाली पाहिलं. ती आपल्या उरोजाकडं पाहून त्याच्या डोळ्यांकडे पाहू लागली. ती लाजली नि हसली. मग तिनं मान फिरवली.

आणि चटकन त्याची नजर तिच्या पायाकडे पडली नि तिच्या रंगवलेल्या नखांवर बसली आणि मग हळूहळू झुरळाप्रमाणे वर वर सरकू लागली नि तिच्या पुष्ट मांड्यांवर स्थिर झाली.

ती नायलॉनचं पातळ नेसली होती. त्याची घडी तिच्या दोन्ही मांड्यात पडली होती.

किती तरी उशीर तो एकाच जागी पाहत होता. तो तल्लीन झाला होता.

गंगूनं चहा पुढं ठेवला तेव्हा तो भानावर आला. म्हणाला,

"नीलादेवी, चहा घे. पण तू येत का नाहीस?"

"आता येईन ना—" ती हसून बोलली.

"कधी येशील?" ती हसून बोलली.

"तुम्ही सांगाल तेव्हा येईन—" ती म्हणाली नि गप्पकन तोंडाला पदर लावून हसू दडवले.

आणि भोलाराम आला. त्यानं आणलेली बाटली कपाटात ठेवली नि हसला.

नीलादेवी घरी निघाली. ती उठून म्हणाली, "तुम्ही घरी कधी असता?"

"सकाळी नऊ वाजेपर्यंत आणि रात्री नऊनंतर." बाळासाहेब बोलला.

"मग मी येईन..." असं म्हणून ती निघाली. बाळासाहेबानं एक दहाची नोट काढून तिच्या हातात दिली नि म्हणाला...

"मी तुझ्या लग्नासाठी पाचशे रुपये देणार आहे. परंतु ते मी तुझ्याच हाती देणार आहे. तू कधीही येऊन घेऊन जा. लौकर लग्न करून या माझ्या भोलारामची पाठ सोड..."

ते ऐकून भोलारामला आनंद झाला आणि नीलादेवीनं एक गोड मुरका मारला.

बाळासाहेबाचं सर्व ठीक चाललं होतं. परंतु सुलभाचं पत्र येत नव्हतं. त्यामुळे तो

काळजी करीत होता. तो रोज लौकर येत होता. दिवसभर गंगू नि रात्री झिलू या दोघी सुलभाची जागा चालवीत होत्या.

रात्री तो आला की झिलू खुदकन हसत होती नि तो आपले दु:ख विसरत होता. कारण तो आला की सुलभा कधीच तशी हसत नव्हती.

एके दिवशी रात्री एक वाजता बाळासाहेब घरी आला आणि त्याची पावलं ऐकून झिलूनं दार उघडलं नि खुदकन् हसली. तिचे झोपेने भरलेले डोळे नि तिचे ते हसणे पाहून तो आनंदित झाला. कपडे बदलून जेवला. तो भरपूर दारू पिऊन आला होता.

झिलूनं दार बंद केलं आणि आपलं अंथरूण घेऊन ती स्वैंपाकघराकडे निघाली. तेव्हा बाळासाहेब म्हणाला, "झिलू, तू कुठं चाललीस?"

"झोपायला..." ती उत्तरली.

"कुठं झोपणार?"

"स्वैंपाकघरात..." ती बोलली.

"स्वैंपाकघरात का?" तो म्हणाला.

"मग कुठं झोपू? तुम्ही सांगाल तिथं झोपेन..." झिलू बोलली.

"झिलू, तू भोळी आहेस!" त्याला झिलूची दया आली. म्हणाला, "तू फार सुंदर आहेस, परंतु माझ्या त्या सुलभासारखी दुबळी आहेस. जा स्वैंपाकघरात झोप. माणसानं कसं त्या नीलादेवीसारखं असावं."

झिलू गुमान जाऊन स्वैंपाकघरात झोपली.

आज नऊ वाजताच बाळासाहेब घरी आला. तेव्हा नीलादेवी येऊन बसली होती. ती झिलूशी बोलत होती. बाळासाहेबाला पाहताच त्या दोघी उठल्या. झिलू स्वैंपाकघरात पळाली आणि नीलादेवी खाली पाहत हसली.

"नीलादेवी, तू कधी आलीस?" त्यानं विचारलं.

"मी आठ वाजता आले आहे." ती उतारली.

"भोलाराम कुठं आहे?" त्यानं विचारलं.

"तो घरात आहे." ती बोलली.

"का? तो कां आला नाही?" त्यानं प्रश्न केला.

"त्याचं डोकं दुखतंय." ती म्हणाली.

"माझंही आज डोकं फार दुखतंय." असं म्हणत त्यानं कपडे बदलले नि कपाटातील बाटली काढून भरपूर पिऊन मग बाहेर आला नि नीलादेवीपुढं बसला.

"किती वाट पाहायची?" नीलादेवी म्हणाली.

"नीला, तू फार शहाणी आहेस." असं म्हणून तो हसला. म्हणाला, "चल... आपण जेवून घेऊ या..."

मग ती तिघं जेवली आणि झिलू आपल्या घरी पळाली. नीलादेवी नि बाळासाहेब दोघंच बोलत बसली.

"नीलादेवी, तू का आली होतीस?" त्यानं विचारलं.

"सहज. त्या दिवशी येईन म्हटलं होतं." ती गालात हसली.

"तुझं वय काय?"

"हे अठरावं चालू आहे."

"अरे! तरीच लग्नाची घाई झाली आहे." बाळासाहेब हसत म्हणाला, "पण नवऱ्यानं तुला पाहिली आहे का?"

"नाही..." ती उत्तरली. "त्याने मला नि मी त्याला कधीच पाहिलेले नाही."

"मग ही घाई कुणाची?" त्यानं विचारले.

"मला ठाऊक नाही." ती हसली.

उशीर ती बोलत बसली. अकरा वाजले. बाळासाहेब म्हणाला,

"नीलादेवी, दार बंद कर. रात्र झाली." तिने उठून दार बंद केले नि पुन्हा येऊन खुर्चीवर बसली. बाळासाहेबानं पलंगावर अंग टाकले.

"डोकं फार दुखतंय का?" तिनं विचारले.

"होय ना, फारच." तो बोलला.

"मग चेपू का?" ती चटकन पुढं जाऊन पलंगावर बसली नि त्याचं डोकं चेपू लागली. तिचे नाजूक हात कपाळावर तरतरू लागले. त्याच्या हृदयात एक कंप उठला. म्हणाला, "नीलादेवी—"

"काय?"

"दिवा घालव."

तिने उठून दिवा मालवला. घरात अंधार झाला नि ती पुन्हा त्याच्याशेजारी बसून त्याचं डोकं चेपू लागली.

"नीलादेवी, तू कुठं झोपणार?" त्यानं तिला विचारलं.

"सांगाल तिथं." ती हसली.

"असं!" तो हसला. सर्व शांत झालं. मग पातळ झटकल्याचा आवाज झाला. नंतर काकणं कुणकुणली, अंथरूण सळसळलं आणि पुन्हा सर्व काही शांत झालं.

सकाळी पाचशे रुपये घेऊन नीलादेवी घरी निघाली तेव्हा ती म्हणाली, "आजही मी येणार आहे. लौकर या."

एवढ्यात गंगू आली. तिनं तो सर्व प्रकार जाणला आणि त्याच दिवशी सुलभाला पत्र लिहिलं.

भोलारामनं नीलादेवीच्या लग्नाची तयारी केली. सर्व बाजार केला. तीथ नक्की करून

तो त्या दिवसाची वाट पाहू लागला.

नीलादेवी रोज बाळासाहेबाकडे जात होती. नि रात्रभर तेथे राहून सकाळी पैसे घेऊन येत होती.

एके दिवशी नवऱ्याकडील मंडळींचं पत्र आले की, नवरा मुलगा मोटरखाली सापडून जखमी झाला आहे. त्याचा एक पाय मोडला असून तो दवाखान्यात आहे. त्याच्या पायाचे प्लास्टर निघाल्याशिवाय तो लग्न करणार नाही.

भोलारामची निराशा झाली. तो पुन्हा वाट पाहू लागला.

आणि त्याच महिन्यात नीलादेवी मनात चरकली. तिची मासिक पाळी चुकली; ती त्याचा विचार करू लागली आणि रोज रोज दिवस मोजू लागली. लग्नाचा विचार करण्याऐवजी ती आपल्या पाळीचाच विचार करत बसू लागली.

दुसरा महिना आला आणि नीलादेवीचे संकट नक्की झाले... ती घाबरी झाली.

आणि नवऱ्याकडचं पत्र आले... आणखी एक महिना प्लास्टर निघत नाही. मग मात्र नीलादेवीचा थरकाप झाला. ती दडवादडवी करू लागली, पण तिला ओकाऱ्या येऊ लागल्या आणि तिची आईही अंधारात उंदीर पकडणाऱ्या मांजराच्या औलादीची होती. तिनं तो सर्व प्रकार हेरला आणि नीलादेवीला एकांतात घेऊन म्हणाली,

"तुझी पाळी का टळली?" आणि नीलादेवी रडू लागली.

"नीलादेवी, हे पाप कुणाचं?" आईने विचारले.

"हे बाळासाहेबाचं—" नीलादेवीनं स्पष्ट कबुली दिली आणि तिची आई तोंड बडवून घेऊ लागली.

नंतर नीलाच्या आईनं नवऱ्याच्या मागं तगादा लावला. पण प्लास्टर निघाल्याशिवाय मी लग्न करणार नाही असं उत्तर आलं.

आणि जेव्हा तो प्रकार भोलारामला समजला तेव्हा तो वेडापिसा झाला. त्यानं अन्नपाणी सोडले नि जखमी पाखराप्रमाणे झुरू लागला. त्यानं बाळासाहेबावर सूड घ्यायचा विचार केला. पण आपणाला नीलादेवीची भानगड समजली असं त्यानं बाळासाहेबाला मुळीच कळू दिले नाही.

त्याच दरम्यान नीलादेवीनं बाळासाहेबाची भेट घेऊन त्याला तो सर्व प्रकार सांगितला. तेव्हा तो म्हणाला, "तू काळजी करू नको. मी एका डॉक्टरला सांगून तुला मोकळी करीन—"

ते ऐकून नीलादेवीला बरं वाटलं.

परंतु त्याचवेळी भोलारामनं भयंकर कारस्थानं रचलं. पोलिसांना कळवून खुणा केलेल्या पाच हजारांच्या नोटा घेऊन तो बाळासाहेबाकडे गेला. ते पाहून बाळासाहेब म्हणाला,

"भोलाराम, हा काय प्रकार आहे?"

"ही पाच हजारांची रक्कम आहे." भोलाराम म्हणाला, "आणि ही आपली आहे–"

"ठीक आहे. जा घरात ठेव–" बाळासाहेब म्हणाला. भोलारामनं ते पाच हजार रुपये कपाटात ठेवले आणि त्याचवेळी पोलिसांनी घर वेढून छापा घातला. बाळासाहेबाला अटक केली नि भोलाराम माफीचा साक्षीदार झाला.

सकाळी वर्तमानपत्रानं मोठ्या मथळ्यात ती बातमी छापली, की प्राप्तीकर वसूल करणारा एक बडा अधिकारी बी. एम. बावडेकर यास लाच घेताना अटक झाली आहे.

अटक होताच बाळासाहेबाची धुंदी उतरली. त्यानं सुलभाला पत्र लिहिलं–

*प्रिय सुलभा,*
*कालच मला अटक झाली आहे. मी आता तुरुंगात आहे.*
*तरी हे पत्र मिळताच ये आणि माझ्या बचावाची व्यवस्था कर.*

*तुझा*
*बाळासाहेब*

आणि त्याच दिवशी गंगूचंही सुलभाला पत्र आलं. त्यात नीलादेवी अन् बाळासाहेब यांचं प्रेमप्रकरण नि नीलादेवीचं गरोदर राहणं वगैरे सर्व सविस्तर मजकूर होता.

एकाच दिवशी तो दोन पत्रं सुलभाला मिळाली आणि ती भडकली. तिनं तटकन गळ्यातील मंगळसूत्र तोडलं. नंतर तिनं ती दोन्ही पत्रं आईबापांना वाचून दाखवली आणि त्याच दिवशी बाळासाहेबाला पत्र लिहिलं–

*मिस्टर बाळासाहेब, आपलं पत्र मिळालं. वाचून आनंद झाला. तू जे पाप केलंस, त्याचं तुला प्रायश्चित्त मिळालं आहे नि ते तू भोगलेच पाहिजेस. तुझा नि माझा काडीचा संबंध नाही. आत्ताच मी मंगळसूत्र तोडलं. ते हवं तर पाठवीन आणि उद्याच वकिलामार्फत फारकतीचा अर्ज करीत आहे. आता खुशाल राहा तुरुंगात!*

*–सुलभा पाटील*

## १०

सारंगपूर येथील लष्करी दवाखान्यात निःशब्दता नांदत होती. वातावरण शांत नि उत्साहपूर्ण असंच होतं. फक्त परिचारिकांच्या पायातील बुटांचाच आवाज कानी पडत

होता आणि खिडकीत वारा शीळ घालीत होता. पाच नंबरच्या वॉर्डमध्ये तशी रोग्यांची गर्दी नव्हती. फारच थोडे रोगी होते. त्यात सर्दी, खोकला नि मामुली ताप असलेले लष्करी सैनिक होते.

एक सुंदर परिचारिका त्या वॉर्डमध्ये लयबद्ध हालचाल करीत होती. ती रोग्यांच्या रांगेतून शांतपणे या टोकापासून त्या टोकाला जात होती. मध्येच थांबून खाटेवरची सरकलेली शुभ्र चादर सरळ करीत होती.

ती आपल्या शुभ्र नि तंग पोशाखात मोगरीच्या भरीव कळीसारखी दिसत होती.

एक लष्करी शिपाई खाटेवर शांत पडला होता. तो त्या नर्सकडे एकटक पाहत होता. ती जवळ आली की मान वर करीत होता. तो काहीतरी बोलायला चुळबूळ करीत होता.

ती परिचारिका जवळ येऊन पुढं निघाली आणि त्या सैनिकानं हिंमत करून हाक मारली, "सिस्टर..."

"काय पाहिजे?" ती गप्पकन थांबली. दोन पावले पुढं गेली.

"मला काय नकं. मला तुमच्याशी जरा बोलायचं हाय." तो शांतपणे म्हणाला नि त्याच्या बोलण्यावरून हा सातारकडचा आहे अशी तिची खात्री झाली. ती पुन्हा चार पावलं पुढं जाऊन म्हणाली, "बोला ना! काय म्हणणं आहे?"

"म्हणणं तसं काय न्हाय. मला वाटतंय मी तुमास्नी कुठंतरी बगितलंय."

असं म्हणून तो तिला निरखून पाहू लागला.

"काय... मला पाहिलंत!" ती आश्चर्यानं उद्गारली आणि हसली.

"हो हो, तुमास्नी..." तो पुन्हा म्हणाला.

"बरं... बरं, कुठं पाहिलंत मला?" ती बोलली.

"आधी तुमचं गाव कंचं तेवढं सांगा." तो सरळ बसत म्हणाला, "म्हंजी जिल्हाचं सांगा नि मग बघा..."

"माझं गाव आहे फार दूर... तिकडं सातारा जिल्ह्यात कृष्णाकाठी..."

"मग पटलं." तो धडपडत अधिक सरळ होऊन म्हणाला, "आता ऐका. सांगू..."

"हो-हो सांगा ना..." ती हसत बोलली.

"मी तुमास्नी दोनदा पाहिलंय." तो आत्मविश्वासानं म्हणाला, "एकदा कोल्हापूर-कऱ्हाड एस.टी.त, एकदा कृष्णाबाईकाठी सागरूबाच्या घाटावर जत्रेत, पटलं का?"

"अय्या! खरंच की!" ती डोळे विस्फारून हसत म्हणाली, "अगदी खरं आहे तुमचं!"

"आता मी कवाच चुकणार न्हाय." तो रंगात येऊन म्हणाला, "त्या दिवशी रात्र झाली नि कंडक्टरनं मध्येच एस.टी. उभी केली —"

"अय्या! अगदी बरोबर! तुम्हाला आठवण आहे?" ती पुन्हा हसत म्हणाली, "मी शेवरवाडीची बाबा पाटलाची सुलभा—"

"नका सांगू आता. तुमच्या आधीच ते मला कळलंय." तो म्हणाला, "माझं असं हाय बघा, मी डोंगर बघून इसरतो, पण तुमच्यासारखी बाई बघितलेली कधीच इसरणार नाही. म्हंजी मला तशी खोडच हाय. माझं नाव दामू दाभाडे. मी मानगावचा."

"ते लक्षात आलं. पण तुम्ही इकडे कसे?" सुलभाने विचारलं.

"आवं, जसं तुम्ही तसं आम्ही." दाभाडेला आनंद झाला. तो हसत म्हणाला, "आज मला लई आनंद झालाय बघा, अगदी कृष्णाबाई दिसावी तसा बघा! या लांबच्या मुलखात आम्ही दिवस काढतोय. जर का असं आपल्या भागाचं कुणी भेटलं तर काळजात कालवाकालव व्हती. आपल्या घरचंच कुणी भेटलं असं वाटतं नि मग मन साताऱ्याकडं पळतं." बोलता बोलता त्याचे डोळे भरले.

"तुम्ही लष्करात कधी दाखल झालात?" सुलभानं विचारलं नि दाभाडे आठवण करून म्हणाला,

"झाली की पाच, साडेपाच वर्सं. म्हंजी त्या दिवशी एस.टी.त त्या कंडक्टरनं माझ्याशी हुज्जत घातली. कारण मी तुमच्याकडं बघत व्हतो. त्यामुळं त्याची हाक म्या ऐकली न्हाय नि तो चिडला. मी एस.टी. त व्हतो म्हणून तो वाचला. तरी कासेगावात दोन लाथा घातल्याच."

सुलभा हसली. म्हणाली, "मला माहीत आहे."

"त्या दिवशीच मी नाव दाखल करून आलो बघा."

"असं का?" सुलभा हुंकारली.

"सिस्टर, तुम्ही ही नोकरी कवापासून पत्करली?" दाभाडेनं विचारलं.

"झाले की दहा महिने! मी नवीन आहे." सुलभा गंभीर होऊन म्हणाली, "तुमची भेट झाली, मलाही फार फार आनंद झाला आहे. कारण या शहरात मी एकटीच आहे."

"सिस्टर—" दाभाडे भावनावश होऊन म्हणाला, "मी एक लष्करी माणूस हाय. मला मारायची नि मरायची फिकीर न्हाय. पण कृष्णाबाई शपथ मगाशी तुम्हाला बघून माझं ऊर भरून आलं नि तुम्ही तर बायमाणूस हायसा. गावापासून इतक्या पावलावर हायसा— तुम्हाला काय वाटत असेल ते सांगायची काय गरज हाय? आता एकच सांगणं हाय की तुम्ही घाबरू नका. मी असं का म्हणतो ते बी ऐका. आम्ही सात भाऊ हाय नि सात भावात आम्हांला एकच भन हाय आणि कृष्णाबाई शपथ ती आगळी उगळी अशी तुमच्यावाणीच हाय बघा. मातर ती खेड्यावरची येडी हाय. तुम्हावाणी शिकलेली न्हाय. मात असंच नाक, असंच डोळं, हेच बोलणं नि तुमावाणी चालणं... त्या दिवशी एस.टी. त तुमास्नी उशीर बघत होतो. तवा मला माझी राजीबाई दिसत होती. मी लष्करात

नाव दाखल केल्याचं समजताच तिनं नोकरीच सोडली.''

दाभाड्याचं बोलणं ऐकून सुलभाचं काळीज विरघळलं. दुधात साखर विरघळावी तसं झालं आणि एक नवा आनंद तिच्या डोळ्यात चमकू लागला. म्हणाली,

''आता तुम्ही कुठं असता?''

''सारंगपूर लष्करी कँपात.'' दाभाडे म्हणाला, '' मराठा रायफलीत मी नाईक हाय आता.''

''आपल्या भागातील किती लोक आहेत तिथं?'' सुलभानं सहज विचारलं.

''आवं, मायंदाळी माणसं हायती आपल्या भागाची.'' दाभाडे चेकाळून म्हणाला, ''म्हंजी आमची एक तुकडीच आपल्या कृष्णाकाठची हाय आणि आमचा कॅप्टन साहेब आपल्याच भागातला हाय. आता बोला–''

''काय म्हणता? कोण ते?'' सुलभाने विस्मयचकित होऊन विचारलं

''त्येस्नी कॅप्टन आनंदसाहेब म्हणतात.'' दाभाडे म्हणाला आणि ते नाव कानी पडताच सुलभाच्या डोळ्यांत श्रावणी सकाळ अवतरली. ती आश्चर्याने थक्क झाली. उजव्या हाताची दोन बोटं हनुवटीवर ठेवून आणि एक पाऊल पुढे जाऊन म्हणाली,

''कोण? कॅप्टन आनंद इथं आहेत म्हणता?''

''खरंच की, कॅप्टन आनंद हतंच हायती.'' दाभाडे म्हणाला. ''म्हनून आमचं झकास येटाक जमलंय. म्हंजी कॅप्टन बी तसाच नि त्याच्या हाताखालची आम्ही माणसं बी तशीच–नुसती खणखणीत! माणूस पर माणूस. तशी कॅप्टन मोप असतील–पर कॅप्टन आनंदसाहेबासारखा इरळा! कामाच्या येळी नुसतं पोलाद नि एरव्ही लोणी–''

''म्हणजे कॅप्टन आनंद इथंच आहेत म्हणता?'' सुलभानं भांबावून पुन्हा तोच प्रश्न केला.

''भ ऽ ले ऽ'' दाभाडे हसून म्हणाला, ''मी मगापासनं काय सांगतोय? वा! रातभर रामायण ऐकून शेवटी रामाची सीता कोण–?''

''तसं नाही हो–'' सुलभा लाजली नि म्हणाली, ''मला इथं येऊन चार महिने झाले, परंतु ते मला एकदाही भेटले नाही म्हणून म्हणते–''

''कसं भेटणार?'' दाभाडे म्हणाला, ''तुम्हाला भेटायचं म्हंजी आजारी पडून इथं येऊन तुमच्या पुढं आडवं पडलं पायजी! तरच तुमची भेट व्हणार–''

''नको-नको-नको. त्यांनी कधीच आजारी पडू नये–'' सुलभानं डोळ्यांची उघडझाप जलद केली. आपली वाट बरोबर आहे. ज्या वाटेने कॅप्टन आनंद जात आहे त्याच वाटेवर आपणही आहोत आणि तसं अंतरही फार नाही. तिला एक तंतू सापडला होता आणि त्या सुतावरून तिचं मन स्वर्गाची वाट चालत होतं. ती

म्हणाली,

"साहेबांची ड्यूटी कोणती आहे?"

"आता साहेब इथं न्हायती." दाभाडे बोलला.

"तर?" सुलभाचं मन पुन्हा चरकलं.

"ते गावाला गेल्यात."

"का?"

"आई आजारी हाय, अशी तार आली व्हती." दाभाडे म्हणाला, "तेव्हा आठ दिवसांची रजा काढून गेल्यात."

"किती दिवस झाले. त्यांना जाऊन?" तिनं विचारलं.

"झालं की आठ दिवस." दाभाडेनं जीभ चावली नि म्हणाला, "हे बघा, आमचं असं चुकतं. म्हंजी आनंदसाहेबाला रजेवर जाऊन आज आठ दिवस झाले. हे माझ्या डोस्क्यात आलंच न्हाय. आज उद्या त्यांनी आलं पायजी—"

"बरं, त्यांचा पत्ता सांगता का?" सुलभा म्हणाली.

"आवंऽ कॅप्टन आनंदसाहेब, मिलिटरी कँप, सारंगपूर—" दाभाडे म्हणाला, "एवढं लिवलं की पोस्टमन तंगडं तोडत येतोय बघा."

"मला त्यांना पत्र लिहायचं नाही." सुलभा म्हणाली, "मला त्यांना भेटायचं आहे! किती दूर आहे तुमचा कँप?"

"आवं, ह्या हिथं नव्हं का!" दाभाडेनं खिडकीकडे हात केला. सुलभानं तिकडे पाहिले आणि समोर दिसणारा डोंगर पाहून ती म्हणाली,

"अहो, दाभाडे तिकडे डोंगर आहे!"

"मग सिस्टर, मला भाईर गेल्याशिवाय सांगता येणार न्हाय." असं म्हणून दाभाडे एकटाच हसू लागला. सुलभालाही हसू आवरलं नाही. ती हसत म्हणाली,

"मी एकदा तिकडं येऊन साहेबांना भेटणार आहे."

"कवा बी या. मी आहे तिथं. नुसतं दाभाडे म्हणून हाक मारा की मारुतीवाणी एकाच उडीत येतो मी ..." दाभाडे बोलला.

"जरा थांबा मी आले..." असं म्हणून सुलभा पुढं निघाली तेव्हा दाभाडे म्हणाला,

"सिस्टर, तुम्ही जाऊन या, पर मला जाऊ द्या की! आवं, नुसतं पडसं आलं नि मला इथं आणून खुशाल आडवं केलंय.."

"ते डॉक्टरांना विचारलं पाहिजे—" असं बोलून सुलभा पुढं गेली आणि दुसऱ्या बाजूने डॉक्टर वॉर्डमध्ये आले. त्यांना दाभाडे म्हणाला,

"साहेब, मला सोडा की! जाईन आपल्या उद्योगाला..."

"होय दाभाडे, तेच सांगायला मी आलो आहे—" डॉक्टर हसत म्हणाले. त्यांनी

केसपेपरवर नोंद करून दाभाडेला जायला परवानगी दिली. तशी दाभाडेने ताडकन उडीच मारली आणि कपडे बदलून उभा राहिला तेव्हा तर तो डोंगरासारखा दिसू लागला आणि सुलभा पुढं येताच टाचेवर टाच मारून त्या खाडकन तिला लष्करी सॅल्यूट केला. त्याचा धिप्पाड देह, वाघासारखे डोळे नि रुंद छाती पाहून तिला सह्याद्रीची आठवण झाली. ती म्हणाली,

''माझ्यापुढं असं उभं राहायला मी काही कॅप्टन आनंद नव्हे–''

''सिस्टर, आम्ही फौजी माणसं. जो माणूस आम्हाला जवळचा नि मोठा वाटतो त्याच्या पुढं आम्ही असं उभं राहतो–'' दाभाडे बोलला.

''दाभाडे, मी थट्टा केली.'' सुलभा म्हणाली.

''तुम्ही निघाला. आता मी एकटीच इथं राहणार आहे–''

''ते काय म्हणून?'' दाभाडे चटकन म्हणाला.

''सिस्टर, मी वरच्यावर येऊन तुम्हाला भेटून इचारपूस करून जाईन. माझी राजीबाई इथं हाय ते विसरणार न्हाय–''

दाभाड्याच्या शब्दांनी सुलभाचं हृदय भरलं. तिच्या डोळ्यात पाझर फुटला. घडीभरच्या परिचयानं युगाचं अंतर तोडून एक नवं नातं जोडलं याचं तिला नवल वाटलं. तिनं दाभाड्याला निरोप दिला आणि तो आपल्या लयबद्ध चालीत गेला नि दृष्टिआड झाला तेव्हा सुलभाला चुकल्यासारखं वाटलं. ती त्याचाच विचार करू लागली. हाच दाभाडे मला प्रथम भेटला तेव्हा मी दुबळी होते. मी त्याला किती भ्याले होते. तो माझ्याकडं पहात होता. कारण मी त्याला त्याच्या बहिणीसारखी दिसत होती. मी त्याचा भलताच अर्थ घेतला.

पाच वाजले आणि दाभाडे परत आला. सुलभा चकित होऊन त्याच्याकडे पाहत राहिली.

दाभाडे हसत म्हणाला, ''सिस्टर, कॅप्टन साहेब आल्यात–''

''कधी?'' सुलभाला आनंद झाला.

''सकाळी!''

''बरं, मग?''

''आणि मग काय मी, जाऊन सॅल्यूट ठोकला.''

''आणि?''

''आणि साहेबांस्नी सारं सांगितलं.''

''काय सांगितलंत– ?''

''मी म्हटलं, आपल्या भागाची एक सिस्टर दवाखान्यात हाय नि तुमची भेट पायजी,

असं म्हनाली.''

''काऽय! असं सांगितलं तुम्ही?''

''मग काय खोटं सांगितलं?'' दाभाडे बोलला.

''बरं, मग काय म्हणाले ते?'' सुलभानं विचारले.

''मग साहेब इचार करू लागले. डोकं खाजवून खाजवून औदाण आणावं-डोकं खाजवून आठवण आणू लागले. पण काई जमंना!'' दाभाडे बोलला.

''खरं आहे. मी ही नोकरी पत्करीन याची त्यांना मुळीच कल्पना नाही.'' सुलभा म्हणाली, ''बरं, पुढं ते काय म्हणाले?''

''मग त्यांनी मलाच इचारलं, तिचं नाव काय?''

''आणि—''

''आणि याच जागी माझ्या डोक्यानं मला टांग मारली!''

''म्हणजे हो—''

''म्हंजी, मी तुमचं नाव इसरलो आणि आपला सिस्टर.. सिस्टरच करू लागलो.''

''अहो पण, मी तुम्हाला माझं नाव सांगितलं होतं.''

''खरं हाय की, पण ते नाव माझ्या टाळक्यात न्हायलं न्हाय. मग साहेब म्हणाले, दाभाडे, दवाखान्यात हजार सिस्टर असत्यात. आता परत जा नि तिला नाव विचारून ये आणि वेळ असेल तर तिला घेऊन ये.''

''बरं, मग?'' सुलभा हसली.

''मग काय, धावत आलो नि दवाखान्याच्या पायरीवर पाय ठिवताच तुमचं नाव डोसक्यात आलं.'' दाभाडे बोलला आणि ती दोघं हसली. सुलभा घड्याळाकडे पाहून म्हणाली,

''दाभाडे- फक्त पाचच मिनिटं थांब. मी आलेच.''

''बरं, मी भाईर बागेत थांबतो.'' असं म्हणून दाभाडे दवाखान्याचे बागेत जाऊन सुलभाची वाट पाहत उभा राहिला. त्यानं खिशातून चिरूट बाहेर काढून पेटवला नि झुरका मारू लागला.

सुलभानं घाई केली नि पांढरं पातळ नेसली. तिनं आपला पांढरा पोलका घातला. पायात सॅन्डलही पांढऱ्याच होत्या नि हातात शुभ्र रंगाची पर्स घेऊन आली नि दाभाड्याचा तो चिरूट पाहून हसत म्हणाली,

''दाभाडे, हे कधीपासून?''

''मागं एकदा एक मोठा साहेब असलेच तोंडात धरून बसला व्हता. तवा मला वाटले ह्या बहाद्दरानं लाकडाचा कंडकाच तोंडात धरलाय. तवा आपून बी गंमत बघावी म्हणून एकदा हे घेतले नि तवापासून मला बी सवयच लागली.'' दाभाडे म्हणाला आणि सुलभा

मोठ्यानं हसली.

मग ती दोघं कॅप्टन आनंदकडे निघाली. दाभाडे लयबद्ध चालत चिरूट ओढीत होता. सुलभा धावत होती. कधी एकदाची आनंदला पाहते असं तिला झाले होते. ती मनात म्हणत होती, स्वप्नात घडावं तसं आज घडले आहे! आग्र्यातून गेल्यानंतर मला आनंद पुन्हा भेटेल असं मुळीच वाटलं नव्हतं. पण ते भेटावेत ही एक माझी आशा होती. पण ती कोरडी आशा होती. पण...

पण आज केवढा चमत्कार झाला आहे! कसलीही कल्पना नसताना दाभाडेची भेट झाली आणि त्याच्याकडून आनंदचा पत्ता मिळाला आणि आता मी त्यांना भेटायला जात आहे. आता मला नक्कीच आनंद भेटणार.

आपण किती चालत आहोत याची तिला कल्पना नव्हती. तिच्या हृदयात नवीन ओढ वाढत होती नि तिच्या आशेला नवा फुलोरा आला होता.

आता मला पाहून आनंद चकित होईल. मी इतकी दूर आलेली पाहून तो माझं कौतुक करील नि मला क्षमाही करील. ती मनाशी बोलत चालत होती.

पुढं दोन वाटा आल्या तेव्हा तिनं विचारलं, ''दाभाडे, कोणती वाट?''

''लेफ्ट टर्न.'' असं म्हणून दाभाडे डावीकडे वळला. पुढं एक फाटक लागलं. तिथंच पुढून दलपत आला. त्याच्याबरोबर आणखी दोन शिपाई होते. दलपतनं दाभाडेला सलाम केला; आणि सुलभाकडे जळजळीत नजर टाकली. ती पाहून दाभाडेला राग आला. त्यानं आपला चिरूट गटारात फेकला.

## ११

सुलभा पुढं येताच आनंद स्तंभित झाला. तो चटकन उभा राहिला आणि तिला पाहू लागला. ''सुलभा!'' तो उद्गारला. सुलभा त्याच्यापुढं शांत उभी होती. ती त्याच्या चेहऱ्यावरचे भाव निरखीत होती. आनंदानं, आवेगानं नि अगतिकतेनं तिच्या मस्तकात एक काहूर उठवलं होतं नि तिच्या सुंदर डोळ्यांत सागर खवळला होता!

उशिरानं आनंद हसत म्हणाला,

''यावे-यावे-सुलभा बावडेकर!''

''नव्हे-मी सुलभा पाटील आहे!''... तिनं पदर बाजूला करून गळा दाखवला.

''अरे! ते सौभाग्यचिन्ह कुठं गेलं?'' आनंदनं विचारलं.

''सौभाग्यचिन्ह नव्हे, तो गळफास होता!'' सुलभा म्हणाली, ''आणि तो गळफास मी कृष्णार्पण केला आहे.''

"म्हणजे? सुलभा सरळ सांग ना!" तो म्हणाला.

"तेच मी सांगणार आहे. फार सुंदर कथा आहे ती. जर ऐकणार असाल तर कमीत कमी मला बैस तर म्हणा!"

"अरे हो! सॉरी हं सुलभा!" आनंद म्हणाला, "तुला अचानक पाहून मी गोंधळून गेलो आहे. बैस. पाणी हवं आहे?"

"मग ती दोघं बसली. सुलभानं त्याला किती दिवसांचा पाहून घेतला. नोकरानं पाणी आणून टेबलावर ठेवले. त्या दोघांमध्ये एक टेबल होतं. नि ती दोघं समोरासमोर बसली होती. ती मान खाली घालून म्हणाली, "घरी जाऊन आलात?"

"होय. परंतु सुलभा, तू इकडं कुठं ते प्रथम सांग नि मग घराकडील कथा ऐक. बोल."

सुलभा विचारात पडली. तिनं आनंदकडं पाहून नजर परत घेऊन ती टेबलावर स्थिरावीत खिन्नपणे हसत म्हणाली,

"आपल्या जीवनाची क्रूर विटंबना पुन:पुन्हा तुम्हाला सांगावी याची आता मला लाज वाटू लागली आहे. परंतु माझ्यावर होणारे अन्याय, मला होणारे दु:ख मी फक्त दोनच जिवांपुढे सांगू शकते. मला तिसरे ठिकाण नाही! ते दोन जीव म्हणजे एक माझी आई आणि दुसरे तुम्ही. तुम्हा दोघांपुढंच मी आपले हृदय काढून ठेवते. त्यासाठी मला अनंत खटपटी कराव्या लागतात. तुम्ही घरी येऊन गेल्यानंतर पतिराजानं शेवटचं टोक गाठलं. त्याच्या वर्तनाला धरबंध राहिला नाही! रोज भांडणं होऊ लागली. एके दिवशी दारू पिऊन त्यानं मनातली सारी मळमळ ओकून टाकली. तो म्हणाला, 'तुझा अहंकार नष्ट करावा या एकाच उद्देशाने मी तुझ्याशी लग्न केलं आहे.' आणि एके दिवशी भांडण करून मला माहेरी पाठवलं."

सुलभा एकाएकी स्तब्ध झाली. दोन्ही कोपरं टेबलावर टेकून डोळे पुसले आणि नंतर नीलादेवी प्रेम-प्रकरणापासून तुरुंगापर्यंत सर्व कहाणी सांगून म्हणाली,

"हे गंगूचं पत्र वाचा." आणि ती उठून तोंड धुण्यासाठी मोरीत गेली.

आनंदनं ते पत्र वाचलं नि हसला. कारण ते पत्र गंगूचं नव्हतं; तर ते सुलभा कोल्हापूरला असताना तिला ते पत्र आनंदनं लिहिलं होतं.

सुलभानं परत येऊन विचारलं,

"वाचलं ते पत्र?"

"वाचलं! पण ते गंगूचं नाही."

सुलभानं ते पत्र उचलून पाहिलं नि जीभ चावली म्हणाली,

"सॉरी, हे वाचा—"

तिनं गंगूचं पत्र दिलं; ते वाचून त्यानं खाली ठेवलं. तोच तिने बाळासाहेबानं तुरुंगातून

पाठवलेलं पत्र दिलं. ते वाचून होताच तिने कोर्टाने दिलेला फारकतीचा हुकूम पुढं ठेवला नि आनंद म्हणाला,

"बरं. पुढं काय केलंस?"

"काही नाही."

"बाळासाहेबाचं काय झालं?"

"त्याला अडीच वर्षांची शिक्षा झाली आणि मला जन्मपेठेची शिक्षा माफ झाली! म्हणजे मला घटस्फोट मिळाला."

"सुलभा–"

"जी–"

"हे पाहा, मी आग्र्यात घरी आलो तेव्हा तू मला पुष्कळ सांगितलंस. पण त्यावेळी माझी मन:स्थिती द्विधा झाली होती. माझं मन बाळासाहेबाला दुर्वर्तनी ठरवीत नव्हतं नि तू लबाड आहेस म्हणत नव्हतं. काय आहे तेच मला कळत नव्हतं. परंतु आता सर्व काही स्पष्ट झालं आहे."

एवढ्यात चहा आला. सुलभा चटकन उठली. तिने दोन कपात साखर टाकून चहा ओतला नि चमचा घेऊन हलवू लागली.

एकाएकी आठवण होऊन आनंद म्हणाला,

"पुढं त्या भोलारामचं काय झालं?"

"तो निर्दोष सुटला. कारण पोलिसांना कळवून त्याने बाळासाहेबाला पकडला होता. शिवाय तो पोलिसांचा माफीचा साक्षीदार होता." सुलभाने सांगितलं.

"आणि ती नीलादेवी?"

"तिला मुलगी झाली." सुलभा म्हणाली.

"गंगून लिहिलं होतं की, एका रात्री भोलाराम आपलं कुटुंब घेऊन कुठं तरी दूर गेला आहे."

नंतर ती दोघं चहा प्याली.

"तू रडत का असतेस?" त्याने विचारले.

"मला विनाकारण यातना भोगाव्या लागल्या म्हणून." ती उत्तरली.

"आणि आता?" त्याने विचारलं.

"आता मी फार दु:खी आहे." सुलभा म्हणाली, "दु:ख भोगल्यावाचून सुखाची गोडी कळत नाही. ती आता मला कळली आहे."

"वडिलानं मूर्खपणा केला व तुमचं वैर म्हणून त्यांनी माझ्या सोन्यासारख्या प्रेमाला आग लावली. त्याचंच मला आज दु:ख वाटत आहे. ते माझे प्रेम मला परत मिळणार नाही अशी माझी खात्री आहे नि तशी मी अपेक्षाही करीत नाही. जर माझं लग्न झालं

नसतं तर माझ्या सुखाला मोलच नसतं.''

''मग तुला सुरेशचं मातृपद मिळालं नसतं.'' आनंदनं मुद्दाम चिमटा घेतला. सुलभानं चटकन त्याच्या तोंडाकडं पाहिलं नि म्हणाली,

''तसं म्हणू नका आनंदा, प्रत्येक स्त्री जन्माला येते ती आई व्हायचा आपला हक्क पदरी घेऊनच येते. तिचा मातृत्वाचा हक्क सुरक्षित असतो.''

''अग थट्टा केली सुलभा!''... तो हसला. मग तीही हसली. आनंद म्हणाला, ''बरं, तुझी ती रडकथा संपली ना? मग माझी घराकडची कथा ऐक. आई आजारी आहे अशी तार मिळताच मी गावी गेलो–''

''हो हो, तेच सांगा...'' सुलभा मध्येच बोलली, ''माझा सुरेश कसा आहे?''

''तेच ऐकून घे.'' आनंद म्हणाला.

'' बरं सांगा.'' ती लाजली नि आनंद म्हणाला.

''मी घरी पोहोचलो तेव्हा मला प्रथम सुरेश भेटला, मला पाहून तो आनंदानं नाचू लागला. मी त्याला उचलून घेतला नि घरी घेऊन गेलो. आईची त्याची फार ओळख झाली आहे. नंतर मला समजले की तो दिवसभर आमच्याच घरी असतो. आईशी बोलत बसतो नि माझा विषय काढून काही तरी सांगतो. मी त्याला घेऊन भटकत होतो.

''मी घरी जाताच आईला बरं वाटू लागलं. सुरेश मला सोडतच नव्हता. तो माझ्याकडे जेवून माझ्याजवळच झोपत होता. एकदा आम्ही दोघं मळ्यात गेलो. तिथं पेरूची बाग पाहून तो हर्षभरित झाला. मग मी त्याला एका झाडावर चढवला.''

''काय! झाडावर चढवलात?'' सुलभा मध्येच उद्गारली. उगीच भ्याली.

''तुला काय वाटलं तो पडला?'' आनंद म्हणाला, ''तू कशी लहानपणी चोरून पेरू तोडायला झाडावर चढली होतीस? तसाच तोही चढला नि त्यानं खूप पेरू तोडले; मग आम्ही ते खाल्ले. तेव्हा तो मला म्हणाला, 'काका, तुम्ही कधी जाणार?' मी म्हटलं, 'दोन दिवसांनी!' तेव्हा तो गंभीर होऊन म्हणाला, 'काका, नका जाऊ. आपण आईला बोलावू नि मग तिघं खूप पेरू खाऊ.''

सुलभा ऐकत होती. ती निरांजनाच्या ज्योतीप्रमाणं आनंदपुढं स्थिर बसली होती नि तिच्या डोळ्यांत आसवांनी गर्दी केली होती. सुरेश कुठं जेवत असेल, कुठं झोपत असेल नि कसा बोलत असेल! आई नाही, बाप नाही आणि दोघंही जिवंत असून तो पोरका झाला आहे, या विचारानं तिचं काळीज फोडलं. विजेनं ढग फोडावा तसं झालं नि तिच्या डोळ्यांत मेघानं फळी धरली नि रडू लागली. तिच्या कंठात हुंदका धडका घेऊ लागला. आनंद पुढं म्हणाला,

''एके दिवशी मी सुरेशला चुकवून इस्लामपूरला जाऊन आलो तेव्हा तो जोत्यावर उभा होता. तो सरळ कासेगावकडं एकटक पाहत होता. मी जवळ गेलो तरी माझ्याशी

बोलला नाही मग मीच विचारले, 'सुरेश, का उभा आहेस?' तेव्हा तो म्हणाला, 'मी माझ्या आईची वाट पाहत आहे. ती याच वाटेने येणार आहे!' —''

''सुरेश ऽऽ'' सुलभानं उशीर आवरलेला हुंदका शेवटी बाहेर पडला. ती टेबलावर डोकं ठेवून रडत बोलू लागली, ''सुरेश, तू माझी वाट पाहत आहेस, परंतु अशी किती दिवस वाट पाहणार ! मी तुझी आई आहे, पण मी फार दुर्दैवी आहे।'' ती उशीर रडली नि मग तिनं तो आवंढा आवरला नि म्हणाली,

''तुम्ही सांगा... थांबू नका. मला रडू द्या.''

''मग मी त्याला उचलून घरी नेला. मी त्याला टाकून इस्लामपूरला गेलो होतो. तो रागावला होता. पण थोड्या वेळानं पाहतो तो हसू लागला.

''माझी रजा संपली. मी निघालो. गाडी जुंपली, माणसं जमली, तेव्हा सुरेश ओठ मिटून अश्रू ढाळीत होता. मला वाईट वाटलं. काळजाचं पाणी पाणी झालं. मी त्याला उचलून घेताच त्यानं हंबरडा फोडला. मग आईही रडू लागली. नंतर तो म्हणाला, 'काका, तुम्ही लौकर या; नि येतेवेळी आईला घेऊन या आणि जर तुम्हाला रजा नाही मिळाली तर आईला पाठवा.' मी त्याला 'बरं' असं उत्तर दिलं आणि निघून आलो.''

सुलभानं टेबलावर डोकं आपटलं. तिच्या हृदयात प्रक्षोभ झाला. तिचं आईचं हृदय हंबरडा फोडू लागलं. ती म्हणाली,

''सुरेश, सुरेश, मी कशी येऊ? तू माझी वाट का पाहतोस. माझी वाट पाहू नको. नाही तर तू मरून जाशील. सुरेश, तू मरून जाशील; मग मी काय करू?''

''सुलभा, शांत हो. ऐक...'' आनंद बोलला.

''बरं, बोला. परंतु माझ्या सुरेशचं वाईट झालं आहे हो.'' ती हुंदके देत म्हणाली.

''सुलभा, मी म्हणतो हे तुला आधीच समजले नाही!'' आनंद म्हणाला, ''आपलं मूल लाडकं आहे ते रडेल, ते वाट पाहील याचा विचार का केला नाहीस? आणि तुला जर नोकरी करायची होती तर तिकडे जवळची दुसरी करायची होती.''

''ते मी तुम्हाला कसं सांगू?'' सुलभा दग्ध स्वरात म्हणाली, ''मला क्षमा करा आनंद, मी एकदा म्हणाले होते की मी जर मध्येच मेले तर माझा आत्मा तुझ्याभोवती फिरत राहील आणि तू ज्या मार्गाने जाशील त्याच मार्गानं तुझ्या मागोमाग येईल आणि जिवंत असले तरी तुझ्याच मार्गानं येईन. ते मी उगीच काहीतरी बोलले नव्हते. जितकं दुःख तुम्ही सोसलं आहे, तितकं मलाही सोसायचं आहे.''

ती उठली... पुन्हा तोंड धुऊन आली, तेव्हा तिनं आनंदच्या दुसऱ्या टेबलावर चांदीची फ्रेम केलेला स्वतःचा फोटो पाहिला. म्हणाली,

''हा फोटो कुणाचा?''

''माझ्या प्रेयसीचा.'' आनंद गोंधळून उत्तरला.

"आता कुठं आहे ती? की कैलासवासी?" तिनं विचारलं.
"नाही. माझ्या टेबलावर आहे." तो बोलला.
"मी कोल्हापूरला असताना तुम्ही आला होता तेव्हा काढलेला ना?" तिनं विचारलं.
"होय." आनंदनं उत्तर दिलं.
"म्हणजे खडकात पाझर असतो." ती खिन्न स्वरात बोलली.
"खरं आहे!" आनंद म्हणाला.
पुन्हा चहा झाला. दोघांनी चहा घेतला आणि सुलभा जायला निघाली.
"बरं... मी जाते." ती म्हणाली.
"ठीक आहे!" आनंद उठला.
"परंतु एक विनंती आहे." ती म्हणाली.
"काय ते सांग ना!" तो म्हणाला.
"मी इथं एकटी आहे आणि आज आपली भेट झाली आहे."
"हो...हो. सांग, काय हवं आहे सुलभा तुला?"
"मला काऽही नको. माझी मन:स्थिती बरी नसते. एकादे वेळी मला इकडं यावंसं वाटलं तर येईन. पण परवानगी..."
"हे पाहा सुलभा, तू कसलीच काळजी करू नकोस. तू एकटी आहेस असं समजू नको. तुला वाटेल तेव्हा ये. मात्र मी कामात नसेन तेव्हा!"
"परंतु तुम्ही कामात आहात हे मला कसं समजणार?"
"सर्व समजेल... ही शेवरवाडी नव्हे. हे सारंगपूर आहे." आनंद म्हणाला नि ती दोघं मोठ्यानं हसली. सुलभा म्हणाली.
"मग कधी कळवाल तुमची वेळ?"
"हे पाहा सुलभा, यावेळी मी घरी असतो. तू कधीही ये. घाबरू नको आणि मीही तुझ्याकडे येईन. मग तर झालं?"
"काऽय! तुम्ही माझ्या घरी याल?"
"हो... हो, येईन."तो गंभीरपणे म्हणाला आणि ती खाली पाहू लागली. अपराध्याप्रमाणे चेहरा करून म्हणाली,
"एवढंच करा. आपण एक गावचे म्हणून का होईना, फार दिवस एकत्र काढले आहेत, कॅप्टन आनंद..."
"तुला इथं येऊन किती दिवस झाले?" त्यानं विचारलं.
"चार महिने..." ती उत्तरली.
"चार महिने?" आनंद आश्चर्याने म्हणाला, "तू चार महिने या सारंगपुरात असून तुझा पत्ता लागला नाही! नि आज भेटतेस."

''आणि तेही दाभाडे देवमाणूस होऊन आले म्हणून! नाही तर किती वर्षेही माझा कुणाला पत्ता लागला नसता.'' सुलभा म्हणाली.

आणि ती दोघं अंगणात येऊन थांबली तेव्हा दाभाडे पळत आला. आनंदपुढे ताठ उभा राहिला नि सॅल्यूट करून हुकुमाची वाट पाहू लागला. आनंद हसत म्हणाला, ''दाभाडे!''

''जी साहेब!''

''ही सुलभा तुम्हाला देव म्हणते बरं का?''

''काय! मला देव म्हणत्यात?'' दाभाडे पुटपुटला.

''हो ना! लोक तुम्हाला सैतान समजतात हे तिला माहीतच नाही.'' आनंद बोलला नि ते दोघं मोठ्यानं हसले. पण सुलभाला काहीच समजले नाही. तेव्हा आनंद म्हणाला,

''या सुलभाताई, यांना घरी पोचवा आणि वेळ मिळाला की जाऊन त्यांची भेट घ्या. त्या तिथं एकट्या आहेत.''

''पण एकट्या कशा?'' दाभाडे म्हणाला, ''काय हो सिस्टर, अहो हितं मराठा इन्फंट्रीच हाय नव्हं का? चला...''

सुलभा हसली. निघाली तेव्हा दाभाडे तिच्याबरोबर वाघासारखा चालू लागला. आनंदनं तिला फाटकापर्यंत पोहोचवली आणि दृष्टिआड होईपर्यंत तीन वेळा तिनं वळून पाहिलं.

सुलभा येऊन गेली; परंतु तिच्या त्या अचानक झालेल्या भेटीत आनंद भलताच अस्वस्थ झाला होता. त्याला झोपच लागत नव्हती. तो मनात म्हणत होता, सुलभा स्वप्नात यावी तशी आली. ती खरोखर पोळली आहे. बाबा पाटलानं माझ्यावर सूड घ्यायचा म्हणून तिचं वाटोळं केलं आहे. तिनं आतापर्यंत जे काही सांगितलं ते सर्व खरं आहे. ज्या मार्गानं तू जाशील त्याच मार्गानं मी येईन असं ती पूर्वी म्हणाली होती. आता ती आपलं सुंदर मूल हजारो मैलांवर टाकून इथपर्यंत येऊन पोहोचली होती. फक्त माझा पाठलाग करीत ती आली आहे. तशी ती फारच जिद्दी आहे. आता तिला दुखवून चालणार नाही. तिच्याशी सहानुभूतीनं बोलून तिला संतुष्ट ठेवता येईल. नाही तर ती मरेल! नि मग सुरेशचं काय? परवा तो म्हणाला, काका लवकर या आणि आईला घेऊन या...

सुलभा म्हणजे एक गूढ आहे. ती काय करील याचा नेम नाही आणि आता तर ती सोडचिठ्ठी घेऊन मोकळी झाली आहे. ती सुखी झाली तरच सुरेश सुखी होईल, परंतु त्यासाठी उपाय कोणता...?

आनंद चटकन उठून बसला. नंतर त्याला झोपच आली नाही.

दिवस मावळत होता. अंधार हळूहळू पडत होता आणि रस्त्याकडेचे दिवे डोळे वटारून अंधाराकडे पाहत होते. दिवसभर कामावर गेलेली माणसं परतली होती-घरच्या ओढीनं पळत होती. पुढं हळू चालणाऱ्यांचा त्यांना राग येत होता.

दाभाडेनं आपला चिरूट पेटवला होता. नि त्याचे झुरके घेत ते शांतपणे निघाला होता; आणि पुढून येणारे लोक त्याला बगल देऊन जात होते, पुढं तो एका मैदानात जाऊन थांबला. मग त्यानं आकाशात पाहिलं. एक बगळ्यांचा थवा त्याच्या डोक्यावरून उडत होता.

दाभाडेला घरचं पत्र आलं होतं. त्याच्या भावानं त्याला लिहिलं होतं की या वर्षी राजीबाईचं लग्न उरकायचं आहे, तेव्हा आमची तार मिळताच तुम्ही आलं पाहिजे.

आणि ते पत्र वाचल्यापासून तो बेचैन होता. आता वैशाख महिना येईल आणि राजीबाईचं लग्न होऊन ती सासरी जाईल. परंतु त्या वेळी मला रजा मिळेल का? आणि जर नाही मिळाली नि लग्नाला नाही गेलो तर ती फार रडेल. जन्मभर माझ्याशी भांडण करीत राहील. असा विचार करत तो कॅंपकडे निघाला होता.

पाठीमागून दोनतीन माणसं बोलत आली. ते तिघंही खूप दारू पिऊन बोलत होते नि कोण कुणाचं ऐकून घेत नव्हता. त्यात दलपत होता. त्याचा तर जमिनीवर पाय ठरत नव्हता. त्यानं दाभाडेला निरखून पाहिलं नि पुढं म्हणाला,

"नाईक दाभाडे, मी तुला हाक मारली- तू बोलला कां नाहीस? बोल, मला जबाब दे."

"न्हाय बोललो-मग काय म्हणणं हाय?" दाभाडे कडक आवाजात म्हणाला, "आता गुमान जाऊन आराम कर."

"आज आमची सुट्टी होती. आम्ही मजा करून आलो आहोत. आराम करणार नाही."

दलपतची ती बडबड ऐकून दाभाडेचं डोकं तापलं आणि तो गुमान चालू लागला. पण दलपत खवळला. म्हणाला,

"दाभाडे, परत ये. माझा हुकूम आहे—" तसा दाभाडे परत फिरला नि दलपतपुढं उभा राहिला. तेव्हा दलपतला बरं वाटलं नि त्याला भलताच चेव आला. तो म्हणाला, "दाभाडे, ती बाई कोण होती? अरे वा! दाभाडे, अरे तू दिसतोस सैतानासारखा-पण बाई घेऊन फिरतोस ती देवासारखी! जीते रहो! आणि काय रे, मी तुला तो सॅल्यूट केला नव्हता, मी त्या जवानीला सॅल्यूट ठोकला! बरं का—"

आणि अचानक दाभाडेचा एक जोरदार ठोसा दलपतच्या गालावर बसला! त्यामुळं तो तीन गिरक्या घेऊन खाली कोसळला आणि लगेच दाभाडेनं एक ठोकर त्यांच्या ढुंगणावर मारली!

"बस-बस! दाभाडे, आता खात्री झाली. आता मारू नको." दलपत खाली पडून बोलला; आणि त्या दोन दोस्तांनी दाभाडेवर हल्ला केला; परंतु दाभाडेनं एक एक तडाखा मारून त्यांना पंधरा पंधरा दिवसांची शिक्षा झाली. त्याच दिवशी दलपत दाभाडेला म्हणाला,

"दोस्ता, तुझ्या एका ठोकरीची फेड मी दोन काडतुसं खर्ची घालून करणार आहे बरं का!"

## १२

रात्र संपली आणि सकाळ झाली. रात्रपाळीच्या परिचारिकांचे काम संपले. दुसऱ्या दिवसपाळीच्या परिचारिका येऊन त्यांनी आपापल्या कामाचा ताबा घेतला. सुलभा आपला टापटीपशीर पोषाख करून घरी निघाली. आता तिनं वेणी घातली होती. ती तिच्या पाठीवर रुळत होती. पाठीमागून येणाऱ्या मुली तिची ती वेणी पाहून मनातल्या मनात कौतुक करीत होत्या. "अहो सुलभाताईऽ" पाठीमागून ललिता देशमुखनं हाक मारली, तशी सुलभा थबकली नि वळून हसली. ललिता तिच्याजवळ गेली. अगदी तिला भिडली नि म्हणाली,

"गुड मॉर्निंग सिस्टर—"

"गुड मॉर्निंग ललिता—" सुलभा हसली. म्हणाली, "चल ना—"

"आता घरीच जायचं ना सुलभाताई?" ललितानं विचारलं.

"आता घरीच— नाहीतर कुठं जाणार?" सुलभा पुन्हा हसत बोलली.

"नको— आपण चहा घेऊन जाऊ." ललिता आग्रह करीत म्हणाली, "चल ना सुलभाताई! एकदा तरी दुसऱ्याचं ऐकावं."

"परंतु चहा कुठं घ्यायचा?—" सुलभानं विचारलं आणि ललिता लहान मुलाप्रमाणं मान तिरपी करून म्हणाली,

"या इथं एक सुंदर हॉटेल आहे. जाऊ या ना! का मेलं तिथं फक्त पुरुषांनीच जाऊन आपली खळगी भरायची आणि आम्ही एखादेवेळी गेलो तर का भूकंप होणार आहे?"

"नाही! नाही, नाही, चल—" सुलभा हसत परत फिरली नि ललिताला आनंद झाला.

त्या दोघी हॉटेलात जाऊन स्त्रियांच्या खास रूममध्ये बसल्या. कानात वारं शिरलेल्या कोकराप्रमाणे ललिता करीत होती. एक पाय जागीच हलवीत तिनं कानोसा घेतला. शेजारच्या खोलीत दोन पुरुष बोलत बसले होते. त्यांचा आवाज ऐकून ती गंभीर

झाली. पण क्षणात पूर्ववत हसू लागली. मग तिनं वेटरला पाव, लोणी, अंडी, चहा आणायला सांगितलं. सुलभानं विचारलं, "आज ही कसली मेजवानी?"

"पोटाची!" ललिता हसली आणि वेटरनं न्याहारीचे सर्व पदार्थ मांडून टेबल भरून काढलं आणि बोलत बोलत त्या न्याहारी करू लागल्या.

पलीकडच्या स्पेशल रूममध्ये कॅप्टन आनंद नि तळेगावकर बोलत होते. त्या दोघांमध्ये टेबलावर एक वर्तमानपत्र होतं आणि— त्याने मोठ्या टाइपात मथळा दिला होता, 'भारतीय सीमेवर पाकिस्तानी सैन्याची प्रचंड जमवाजमव' आणि त्यावरच आनंद नि तळेगावकर बोलत होते.

पाकिस्तानी राज्यकर्ते आता एकेरीवर येऊ लागले होते. कारण त्यांना अमेरिकेनं सहाशे पॅटन रणगाडे दिले होते आणि अनेक सुपरजेट विमानं पुरवली होती. शिवाय दारूगोळा आणि आधुनिक शस्त्रास्त्रांचे भरपूर दान केले होते.

कारण त्यात अमेरिकेचा एक डाव होता तो असा, की पाकिस्ताननं काश्मीर जिंकायचं नि त्या काश्मीरमध्ये अमेरिकेनं आपले विमानतळ बांधून मॉस्को आणि पेकिंगच्या बरगडीला आपल्या संगिनी भिडवायच्या! नि त्यासाठीच अमेरिकन मदतीचा महापूर कराचीत शिरत होता!

आणि त्यामुळेच पाकिस्तानी पुढाऱ्यांची डोकी फिरली होती! ते दिवसेंदिवस अधिकच पिसाट होत होते. ते दोन दिवसात दिल्ली सर करू अशा वल्गना करीत होते नि सीमेवर ते उचापती, कुरापती वाढवीत होते आणि संघर्षाची बीजं पेरीत होते.

आणि सोळाशे चाळीस मैल लांबीच्या भारतीय सरहद्दीचे रक्षण करायची महान कामगिरी भारतीय सैन्याच्या शिरावर होती. त्यांच्यापुढं चीन आणि पाकिस्तान हे दोन शत्रू दबा धरून बसले होते.

आणि अशावेळी जॉन्सन आणि विल्सन हे डोळ्यावर कातडी ओढून पाकिस्तान दिल्ली कधी सर करते ते पाहण्यासाठी आतुर झाले होते!

परंतु त्या काळी भारताच्या पाठीशी एकच नेक नि महान दोस्त उभा होता—आणि तो म्हणजे सोविएत संघराज्य.

उशिरानं चहा पीत पीत तळेगावकर म्हणाला, "कॅप्टन आनंद, या पाकिस्तानी पुढाऱ्यांना झाले आहे तरी काय? हा भुत्तो तरवारीचीच भाषा करीत असतो— याचा अर्थ काय?"

"त्याचा अर्थ तो भुत्तो आपल्या जिभेनं पाकिस्तानचा दफनविधी पार पाडीत आहे." आनंद म्हणाला, "मर्कटा हाती कोलीत दिलं आहे!"

"पण त्यांना काय हवं आहे, काश्मीर— ?" तळेगावकरानं विचारलं आणि आनंद

म्हणाला, ''त्यांना संघर्ष हवा आहे. परंतु त्यांनी तघलक, घोरी, खिलजी यांच्यापासूनच कसलाच धडा घेतलेला नाही आणि भारताकडून तो धडा शिकायची त्यांना घाई झाली आहे!''

पुन्हा ते वर्तमानपत्र वाचू लागले.

''सुलभाताई, एक गंमत सांगू का?'' ललितानं पावाचा तुकडा दाढेखाली घालून विचारले.

''गंमत सांगायला परवानगी नाही.'' सुलभाच्या पापण्या फडफडल्या नि ललिता म्हणाली,

''एक भला मोठा माणूस आहे. तो लष्करात आहे. तो असाच अधून मधून दवाखान्यात येतो आणि माझ्याकडं पाहत असतो—''

''कदाचित त्याचं—'' सुलभानं जीभ चावली.

''समजले मी.'' ललिता हसत म्हणाली! ''तसं काही एक नाही. तो फारच उग्र आहे. तो दोन वेळा तुमचीच चौकशी करून गेला म्हटलं!''

सुलभाला चटकन दाभाडेची आठवण झाली. तोच आला असावा असं वाटून ती म्हणाली—

''तो होय? मी त्याला ओळखते—''

''काय म्हणता?''

''खरंच—''

''अशा माणसाशी बोलणं तुम्हाला आवडतं?'' ललितानं विचारले.

''तुला आश्चर्य वाटलं?'' सुलभानं विचारलं.

''आश्चर्य नाही तर काय! मी बाई— कोणत्याच पुरुषाशी मैत्री केली की काही तरी भानगडी निर्माण होतात!''

''म्हणून तू दूर राहातेस— नाही का?''

''हो, खात्रीनं.''

''एक प्रश्न विचारू?''

''तुझं वय काय?''

''आता बावीस...''

''तू कधी कुणावर प्रेम केलंस?''

''मुळीच नाही...'' ललिता अंगावर पाल चढावी तशी अंग झाडीत बोलली आणि सुलभा म्हणाली.

''मग याचा अर्थ असा, की तू लौकरच कुणाच्या तरी प्रेमात पडणार आहेस!''

''मुळीच नाही.'' ललिता बोलली आणि सुलभा हात पुढं करून म्हणाली, ''चल, लाव पैज...आहे तयारी?''

''अग ऽ बाई! तुम्ही तर पैजेवर बोलता की!'' ललिता म्हणाली आणि त्या दोघी मोठ्यानं हसल्या.

आणि सुलभाचा आवाज ओळखून आनंद म्हणाला,

''अरे! कोण सुलभा का?''

''कोण आनंद? आले हं!'' असं म्हणून सुलभा आनंदकडे गेली आणि चोरासारखी पाहू लागली. आनंदनं खुर्ची पुढं सारली. म्हणाला,

''कॅप्टन तळेगावकर, ही सुलभा. आम्ही एकाच गावचे नि एका वर्गात शिकलो आहोत. आणि सुलभा, हे माझे मित्र कॅप्टन तळेगावकर...बैस ना.''

''माझी एक मैत्रीण तिकडे आहे.'' सुलभा बोलली.

''मग बोलव त्यांना इकडे...'' आनंद बोलला.

''बोलवा...आणि तुमचे तिकडचे राज्य आता बरखास्त करा...'' तळेगावकर म्हणाला नि ती तिघं हसली. सुलभा जाऊन ललिताला घेऊन परत आली. म्हणाली, ''ही माझी मैत्रीण ललिता देशमुख...आणि ललिता, हे कॅप्टन आनंद नि हे कॅप्टन....''

''तळेगावकर'' आनंद बोलला.

ललिता बुजली होती. ती आळीपाळीनं त्या दोघांकडे पाहत होती.

ती चौघं बोलत बसली होती. सुलभा म्हणाली, ''ही ललिता. हिच्याविषयी एक सांगायचं राहून गेले आहे नि ते म्हणजे हिला पुरुषांशी ओळख करून घेणं आवडत नाही...''

ललिता पोटात टाचणी जावी तशी चमकली आणि तळेगावकर गंभीरपणे म्हणाला,

''का हो? काय झाले? का पुरुषांनी तुमचं मांजर मारलं आहे? तुम्ही आमचा हा असा द्वेष कां करता? तरी हरकत नाही. आम्ही मात्र तुमचा द्वेष करणार नाही नि याची खात्री पटावी म्हणून हा आमचा चहा घ्या...चला...''

पुन्हा तिथं हशा पिकला. ललिता लाजली होती, पण उगीचच हसत होती.

सुलभानं आनंदला विचारलं, ''आज आपण मोकळे कसे?''

''आज मला सुट्टी आहे—''

''दोन वाजता मी येणार होते.''

''मग फकीर मशिदीत नक्कीच सापडला असता!'' आनंद म्हणाला, आणि तोंडाला पदर लावून सुलभानं हसू दडवलं.

''सिस्टर, आपले नाव ललिता देशमुख नाही का?'' तळेगावकरानं विचारलं.

''होय...''

"लग्न झालं?"

"नाही..."

"तरीच, तरीच!" तळेगावकर गंभीर झाला.

"तरीच काय?" ललिता गोरीमोरी झाली.

"तरीच म्हणजे— ती पुरुषांच्याविरुद्ध ज़िहाद करायची पाकिस्तानी भाषा हो!" तळेगावकर बोलला आणि ललिता वरमून म्हणाली,

"अय्या! अहो, नाही हो— मी सुलभाताईंकडे सहज थट्टेनं बोलले, पण त्यांनी ते वेशीला टांगलं!"

"अहो सिस्टर, मीही थट्टेनंच बोलत आहे." तळेगावकर म्हणाला आणि ती सर्वजण हसली. तळेगावकर म्हणाला, "आज मी आपल्या भावंडात बसून हसावं तसा हसत आहे. सिस्टर देशमुख, सॉरी, मनावर घेऊ नका, गंमत केली! आज अचानक भेट झाली! अशी परत होणार नाही..."

नंतर ती चौघं उठली नि बाहेर आली.

"कॅप्टन आनंद, दुपारी मी येऊ का?"

"ये ना!... नाही तर मी येईन." आनंद बोलला.

"काय? तुम्ही याल?" ती आश्चर्यानं उद्गारली.

"हो, येईन मी..." आनंद म्हणाला.

"मला नक्की सांगा. कारण मी वाट पाहीन नि जेवणारही नाही." सुलभा बोलली.

"ठीक आहे...मीच येईन." आनंद म्हणाला.

"परंतु काही खास काम आहे का?"

"तुम्ही या तरी खरं...मग सांगते." ती हसली.

पानपट्टीच्या दुकानापुढं दाभाडे उभा होता. त्यानं एक पानपट्टी दाढेला धरली होती आणि त्याच्या हातात चिरूट पेटत होता. आनंद आणि तळेगावकर यांना पाहताच तो अटेन्शनमध्ये उभा राहिला आणि तळेगावकरानं त्याच्या तोंडाकडे निरखून पाहत विचारलं, "काय नाईक दाभाडे, तोंडात कसला तोबरा भरला आहे? पानाचा का हरबऱ्याचा... का राखेचा...?"

आणि ते ऐकून पुन्हा हास्याचा स्फोट झाला. नंतर कॅप्टन आनंद नि तळेगावकर चालू लागले. नि सुलभा नि ललिता आपल्या घराकडे वळल्या नि दाभाडेही त्या दोघींबरोबर निघाला तेव्हा सुलभा हसत हसत म्हणाली,

"दाभाडे, तुम्ही दवाखान्यात आला होता?"

"हो... तुमच्याकडंच आलो व्हतो मी." दाभाडे बोलला नि सुलभा हसली.

"असं? मग या सिस्टरकडं का पाहात होता?" सुलभानं पुन्हा ललिताचा पंचनामा

मांडला आणि ललिता लाजून चूर झाली. तिनं सुलभाला एक चिमटा घेतला. दाभाडे म्हणाला, "सिस्टर, मी हर्येच्याकडं व कशाला बघू? मी आपल्या हर्येच्या पायाकडं पहात होतो..."

"म्हणजे...?" सुलभा चकित झाली. आणि दाभाडे म्हणाला,

"म्हंजी, या सिस्टरचा एक पाय जमिनीला टेकतच नव्हता नि ह्या आपल्या बेडकुळीगत उड्या मारीत व्हत्या!" दाभाडेनं ललिताला बेडकुळीची उपमा देताच सुलभानं हसत ललिताकडे पाहिले, तेव्हा ललिता म्हणाली,

"होय खरंच! त्या दिवशी माझा पाय मुरगळला होता... मला चालता येत नव्हतं."

सुलभा म्हणाली, "ललिता, हे नाईक दाभाडे, हे माझे मावसभाऊ आहेत बरं का... आणि दाभाडे, या सिस्टर ललिता बरं का..."

"चांगल्या हायती..." दाभाडेनं मुंडीला आडवे तिडवे झोके दिले नि तो थांबला आणि त्या दोघी पुढं निघाल्या.

ललिता घाबऱ्या सुरात म्हणाली, "सुलभाताई, आज तुम्ही कहर केला बाई! अहो, मी तुम्हाला सहज बोलले, पण मला ठारच केलंत!"

"तुझ्या मनात उगीच संशय राहू नये म्हणून मी दाभाडेला विचारलं." सुलभा म्हणाली. "आता शंका दूर झाली की नाही?"

"खरं हो, मी उगीच शिष्टपणा करते, पण ती किती मोठी माणसं आहेत नि किती चांगलं बोलतात!" ललिता म्हणाली, "ते तळेगावकर म्हणाले, 'आज मी आपल्या भावंडात बसून हसावं तसा हसत आहे!' हे ऐकून फार बरं वाटलं."

"परंतु तू पैज लावली नाहीस?" सुलभा म्हणाली, आणि तिच्या गालावर हळूच चापट मारून विचारले, "अय्या! किती हो चिमटा काढणार!"

सुलभा जेवण तयार करून आनंदाची वाट पाहात होती. आनंद आला की जेवायचं असा तिनं विचार केला होता. पण आनंद येईल यावर तिचा विश्वास बसत नव्हता. इतका दुखावलेला आनंद एवढ्यात सर्व काही विसरेल याची तिला शंका होती. ती मनात म्हणत होती, तो मुळीच विसरणार नाही. केवळ सहानुभूती म्हणून माझ्याशी असा वागत असावा. कदाचित मी इथं एकटी आहे याची त्याला दया येत असावी.

तिनं घड्याळाकडं पाहिलं. अडीच वाजले होते नि त्या वेळी दार वाजले. तो येताच तिचे डोळे भिरभिरले नि ती लटकाच राग चेहऱ्यावर आणून म्हणाली,

"किती वाट पाहायची हो!"

"असं! मग काय दिलगिरी व्यक्त करू?" आनंद खुर्चीत बसत म्हणाला, "परंतु मी कधीच दिलगिरी व्यक्त करणार नाही."

"नाही? का बरं?" तिनं विचारलं.

"कारण मी इथं प्राप्तीकर वसूल करीत नाही." आनंदनं उत्तर दिलं नि ते ऐकून सुलभा पोट धरून हसू लागली. लबाड बाळासाहेबांची मूर्ती तिच्या पुढं उभी राहिली. ती हसून म्हणाली,

"अगदी बंदुकीची गोळी मारावी तसं उत्तर दिलंत त्याबद्दल प्रथम अभिनंदन. बाकी ती तुमची चावरी भाषा आजची नाही. एकदा लहानपणी मी म्हटलं की आमचे आबा मला डॉक्टर करणार आहेत, तेव्हा तुम्ही काय उत्तर दिलंत आठवतं का? तुम्ही म्हणालात, च्यायला! चौथीत बाराखड्याची बोंब नि म्हणे मी डॉक्टर होणार!"

"मग तू उशीर झाला अशी तक्रार कां केलीस?" आनंदनं विचारलं.

"आनंद... ती माझ्या स्वभावाची चूक झाली असं समजा..." ती म्हणाली.

"सुलभा ती चूक नव्हे."

"तर मग काय?"

"खोड!"

"म्हणजे उशीर झाला तरी भांडण आणि लवकर आले तरी भांडण! म्हणजे बाळासाहेबांशी भांडण करून तुला ती सवय झाली आहे."

"म्हणजे आज तुम्हाला उशीर झालाच नाही?" सुलभा म्हणाली, "महाराज! अडीच वाजले!"

"बाईसाहेब-"

"काय हो?"

"आपलं ते घड्याळ प्रथम कानाला लावा आणि ते काय सांगते ते ऐका."

सुलभानं आपलं घड्याळ कानाला लावलं ते रात्री कधी बंद पडलं होतं ते पाहून ती हिरमुसली आणि आनंदनं आपलं घड्याळ तिच्यापुढं केलं तेव्हा दीड वाजला होता.

आणि एकाएकी ती रडू लागली.

"अरे! हे काय झालं?" त्यानं विचारलं.

"काही नाही कॅप्टन आनंद-"

"तरी पण,"

"कॅप्टन आनंद, तुमचं बोलणं ऐकू यावं म्हणून माझे कान आसुसले होते. परंतु माझ्या सुदैवाने तुमची भेट झाली आणि मी आता पुन्हा तुमचं बोलणं ऐकून हसत आहे. मी फार फार रडले आहे."

''मग आता हास ना...'' तो म्हणाला... आणि तो खुदकन हसली नि म्हणाली, ''चला आपण जेवू या.''

आनंद आणि सुलभा टॅक्सीत बसून बाजारात निघाली होती. सुलभा आनंदशेजारी बसली होती. तिला आज कापड खरेदी करायचे होते. ती आज काय खरेदी करायचं याचा विचार न करता आज आपण कॅप्टन आनंदशेजारी टॅक्सीत बसून सारंगपूरच्या राजपथाला जात आहोत याचाच ती पुन:पुन्हा विचार करीत होती. जे अशक्य होतं ते शक्य कसं झालं याचं तिला कोडं पडलं होतं.

''सुलभा... कसला विचार करतेस?''

''अं... असाच आपल्या नशिबाचा!'' ती विचारचक्रातून बाहेर पडली.

''नशिबाचा? का बरं! का ते कुठं गेलं आहे?'' आनंदनं विचारलं.

''ते गेलं होतं. पण आता पुन्हा जवळ आलं आहे.'' ती हसत उत्तरली.

''मग विचार का करतेस?'' तो बोलला.

''आता पुन्हा त्यानं कुठं जाऊ नये म्हणून.'' तिनं उत्तर दिलं.

टॅक्सी मंडईत गेली. सुलभाने कपडे खरेदी केले आणि परत फिरण्यापूर्वी ती दोघं एका हॉटेलात गेली. एकाएकी आनंद अस्वस्थ झाला. त्याचा तो उदास चेहरा पाहून सुलभाच्या काळजाला चरका बसला. तिने काळजीच्या सुरात विचारलं,

''काय झालं कॅप्टन आनंद?''

''काही नाही सुलभा.''

''नाही कसं! काही तरी नक्की झालं आहे.''

''मग हे पत्र वाच...'' त्यानं कृष्णाबाईचं पत्र तिच्या हाती दिलं नि तिनं ते वाचलं.

*चि. आनंद, घर, संसार, शेती हे सारं आजपर्यंत मी सावरलं. पुढंही ते मलाच पाहावं लागणार आहे. परंतु मला तुझी काळजी लागली आहे. एवढं मोठं घर याकडे मी फक्त पाहात कुठवर बसायचं. तरी मी या वर्षी तुझ्या लग्नाचा विचार नव्हे तर बेत नक्की केला आहे. आता तुला टाळाटाळ करता येणार नाही. काय ते कळव नि लग्नाला तयार राहा...*

*दुसरी गोष्ट तू सुरेशची काळजी करू नकोस. तो खुशाल आहे. तो दिवसभर माझ्याकडे असतो. रात्री जेवून आपल्याच घरी झोपतो. मग त्याची आजी येऊन त्याला घेऊन जाते. ज्याचं मूल ते घेऊन जातात. मी कोण? माझी काय सत्ता आहे सुरेशवर! परंतु सकाळीच त्याची सायकल आपल्या घरी येते आणि मला बरं वाटतं.*

*आणि सुलभा कुठं आहे, कशी आहे ते तिचे आई-बाप कळू देत नाहीत. तेव्हा*

*तू लग्नाची तयारी कर.*

*तुझी आई*

ते पत्र वाचून सुलभा दु:खी झाली. परंतु सुरेशची खुशाली वाचून तिला आनंद झाला. ती म्हणाली,

''कॅप्टन आनंद ही, बाब फार लहान आहे. इतकं बेचैन व्हायचं कारण नाही.''

''सुलभा!''

''जी—''

''ही लहान बाब आहे?''

''हो-''

''मग मी काय करू?''

''सरळ आईंना लिहा की मी लग्नाला तयार आहे म्हणून.''

''सुलभा, मग तुला माझं मन समजलंच नाही.''

''मला पूर्ण कल्पना आहे आनंद. मी आजच आईला लिहिते की सुरेशला कृष्णाबाईकडून उचलून आणू नका.''

''ते झाले ग पण...''

''पण काय कॅप्टन?''

''माझी आई घाबरली आहे.'' आनंद म्हणाला, ''माझे वडील एका युद्धात मारले गेले आहेत. तसंच माझंही होऊ नये असं तिला वाटतं.''

''पण आईचं मन पोळलं आहे. आणि त्याच एका काळजीनं तिनं हे पत्र लिहिलं.'' आनंद म्हणाला. ''माझे वडील मारले गेले तेव्हा माझ्याकडे पाहून जगली. पण माझ्यानंतर ती कशी जगणार, सुलभा?''

''आनंद तो विषयच सोडा ना!'' सुलभाचा स्वर कंपित निघाला. ती म्हणाली, ''तुम्ही उगीच भलत्या कल्पना करू नका. मला फार भीती वाटते आनंदसाहेब.''

''तू एक करशील?'' त्यानं विचारलं.

''काय करू तेवढं सांगा.'' सुलभा डोळे पुशीत म्हणाली, ''आनंद, आता मी स्वतंत्र आहे. तुम्ही सांगाल तेव्हा नि दाखवाल त्या जागी आपले प्राण मी देईन—''

''प्राण देण्याची गरज नाही सुलभा.'' आनंद म्हणाला, ''माझ्या आईची माझ्यावर जेवढी माया आहे तेवढीच माया तुझ्यावर आहे. तेव्हा तू आणि सुरेश तुम्ही दोघांनी अखेरपर्यंत आईला सोबत करायची. कबूल?''

''मी तिळमात्र चुकणार नाही.'' ती बोलली.

''सुलभा—''

''जी—''

"मला जेव्हा जेव्हा जे वाटतं ते पुढं खरं ठरतं आणि तू म्हणतेस की मी भलत्या कल्पना करतो."

"काय ठरलं आहे कॅप्टन?"

"हे पाहा, तू कोल्हापूरहून घरी आलीस नि मी बंगलोरला निघालो तेव्हाच मला वाटलं..." आनंद बोलता बोलता थांबला आणि सुलभा म्हणाली,

"मला वाटलं, आता सुलभा अंतरणार आणि आपणाला दारुण यातना भोगाव्या लागणार आणि तसंच झालं... कॅप्टन आनंद, मी तुमच्या पायांवर डोकं टेकून सर्व काही सांगितलं आहे." ती रडू लागली.

"ठीक आहे... आता एकच कर."

"काय करू?"

"तू सुरेशला आईच्या ओटीत घाल. मीही तिला लिहितो की तू सुरेशला दत्तक घे. माझी वाट पाहू नको. मी लग्न करणार नाही. आणि सुलभा, मी लग्न करून मुळीच सुखी होणार नाही..."

"तुम्हाला आज काय झाले आनंद! आज तुम्ही हा भलता विचार का करता?" सुलभा कळवळून म्हणाली, "मी जवळ आहे. काही काळजी करू नका..."

"फक्त आईच्या समाधानासाठी मी हा विचार करीत आहे सुलभा."

"मला त्याची कल्पना आहे." सुलभा खिन्न सुरात म्हणाली, "उमज पडताच मी आपलं सर्वस्व तुमच्या पायांवर ठेवले. पण ऐनवेळी त्यावर दरोडा पडला, त्याला मी काय करू! आता तुम्ही म्हणता ते सर्व काही होईल."

मग ती दोघं हॉटेलाबाहेर पडून पुन्हा टॅक्सीतून घरी निघाली. टॅक्सी परत फिरली होती. एके ठिकाणी रस्तादुरुस्तीचे काम चालू होते त्यामुळे वेग मंदावला होता; नि ती रबरी चेंडूसारखी उड्या घेत होती. त्यामुळे सुलभाची भुजा आनंदच्या भुजेवर आदळत होती आणि त्यामुळे ती पुलकित झाली होती. जो आनंद दिसायला दुर्मिळ होता तो आपल्याला खेटून बसला आहे याचा तिला आनंद वाटत होता.

पुढं शेकडो कामगार रस्ता दुरुस्त करीत होते. काही खणीत होते, तर काही डांबर ओतीत होते नि रोलर मागंपुढं ये-जा करीत होता. गलका वाढला होता. सुलभा त्या कामगारांची धावपळ पाहात होती नि एकाएकी बावरली आणि उद्गारली, "हा तर भोलाराम!"

मग तिनं टॅक्सी बाजूला उभी केली आणि आनंदला घेऊन त्याच्याकडे गेली. सुलभाला पाहून भोलाराम मातीनं बरबटलेले हात झटकीत म्हणाला,

"बाईजी, नमस्कार!" त्याचा चेहरा लाचार झाला नि त्याच्या डोळ्यात केविलवाणा भाव तरळला! सुलभानं विचारलं,

"भोलाराम, तू इकडं कुठं?"

"माझं दैव उलटलं आणि साहेबानं मला माणसांतून उठवलं! मी हातानं निर्माण केलेला भस्मासुर माझ्याच घराला आग लावून मोकळा झाला. त्यानं माझं नि माझ्या नीलादेवीचं वाटोळं केलं." भोलाराम म्हणाला.

"आता त्या साहेबाचा नि माझा काहीच संबंध नाही." सुलभा म्हणाली, "मी लग्न केलं आहे — हे माझे पती —" असं म्हणून तिनं आनंदकडे बोट दाखवले नि भोलारामनं आनंदला नमस्कार केला.

नंतर भोलाराम सुलभा आणि आनंद यांना घेऊन एका झाडाखाली गेला. तिथं भोलारामचं कुटुंब उतरलं होतं. एका फांदीला एक झोळी झोके घेत होती. आणि त्या झोळीत नीलादेवीची बेबी आराम करीत होती.

भोलाराम, नीलादेवी नि तिची बेबी यांच्यावर बोट रोखून म्हणाला, "ही माझी नीलादेवी आणि हे त्या बाळासाहेबांचं पाप..." त्याचं हे पत्र आलं म्हणून मी इथं आलो आहे. वाचा हे पत्र..."

सुलभानं ते पत्र वाचलं :

*'प्रिय नीलादेवी मी लवकरच सुटणार आहे. मी बाहेर आलो की, सर्व काही ठीक होईल. बेबीला घेऊन ये. मी तिला पाहाणार आहे.'*

ते पत्र वाचून ते सुलभानं आनंदला दिलं आणि त्यानं वाचल्यानंतर ते पत्र घेऊन सुलभानं दहा रुपयांची एक नोट नीलादेवीला देऊन म्हणाली, "हे पत्र मी घेऊन जाते."

आनंदनं वीस रुपये काढून त्या लहान मुलीच्या मुठीत कोंबले.

सुलभा म्हणाली, "भोलाराम, तू काय नक्की ठरवलं आहेस?"

"काही नाही बाईजी, तो सुटला की ही नीला त्याच्या हवाली करून मोकळा होणार आहे." एवढंच तो म्हणाला.

"मी निघाले." असं म्हणून सुलभा आनंदला घेऊन मोटारीत बसली आणि ती मोटार पुन्हा चालू लागली.

टॅक्सी पुढं निघाली होती. आनंदचं डोकं सुन्न झालं होतं. त्याच्या डोळ्यापुढं नीलादेवीच्या बेबीची मूर्ती तरळत होती. सुलभा विचारात पडली होती.

"काय सरकार! कसला विचार करीत आहात?" आनंदनं विचारले.

"मी आपल्या कर्माचा विचार करीत आहे!" ती म्हणाली.

"का तो बाळासाहेब याच शहरात आहे; यामुळे आपण भयभीत झाला आहात?" त्यानं विचारलं.

"मुळीच नाही..." ती बोलली.

"बरं सुलभा, तुझी ड्युटी कोणती आहे?" त्यानं विचारलं.

"का ऽ य—कारण काय?" ती बोलली.

"सहज विचारलं—" तो बोलला.

"मी रात्री बाराला जाते नि आज सुट्टी आहे" ती म्हणाली.

"आणि दिवसभर झोपा काढतेस ना?" आनंदनं विचारलं.

"मग काय करू!" ती बोलली.

रात्रभर सुलभा विचारच करीत होती. रात्रभर तिला झोप लागली नाही आणि रात्र कधी संपली हेही तिला समजलं नाही. खिडकीतून सूर्यकिरण खोलीत शिरले तेव्हा ती उठली.

तिला आज सुट्टी होती. तिला चटकन आनंदची आठवण झाली आणि ती हर्षभरित झाली.

## १३

सुलभानं आंघोळ, न्याहारी आटोपली आणि त्याचवेळी पोस्टमननं एक पत्र घरात फेकलं. ते तिनं घेऊन वाचलं :

*चि. सुलभा तुला अनेक आशीर्वाद.*

*पत्रास कारण आम्ही इकडे सर्व खुशाल आहोत. काही काळजी करू नको. तुझा सुरेश मजेत आहे. आपली खुशाली कळव.*

*तुझी आई*

*— शेवंता*

*ता.क. : — सोबत बाळासाहेबांचं पत्र आहे ते वाच —*

मग सुलभानं बाळासाहेबाचं पत्र वाचलं. त्यानं ते सारंगपूर जेलमधून लिहिलं होतं...

*सौ. सुलभा, खरं म्हणजे मी तुला पत्र लिहिणार नव्हतो. पण तू माझी लग्नाची बायको आहेस, म्हणून हे पत्र लिहीत आहे. मी तुला तुरुंगातून एक पत्र लिहिलं होतं. पण व्यर्थ! एक सिंह जाळ्यात सापडला असताना एका उंदरानं ते जाळे कुरतडून त्याची सुटका केली. हा धडा शाळेत शिकवला जातो, पण तरीही मी तुला क्षमा करतो. मी लौकरच सुटणार आहे.*

*तुझा*

*बाळासाहेब एम्. बावडेकर*

ते पत्र वाचून सुलभा हसली आणि तिनं आईला पत्र लिहिलं...

*ती. आईस अनेक दंडवत —मी खुशाल आहे. माझी काळजी करू नको. कॅप्टन आनंद इथंच आहेत. ते मला वरचेवर भेटतात. माझी काळजी घेतात. पूर्वी कधी नव्हते इतकी मी सुखी आहे. मी घरी येईन तेव्हा कदाचित निराळी होऊन येईन. पण ते आताच लिहित नाही. सुरेश कृष्णाबाईकडे गेला तर त्याला काही बोलू नको. तो जर तिकडेच झोपला तर झोपू द्या. तुला, बाबांना, दादांना नमस्कार. जाई नि सुरेश यांना आशीर्वाद.*

*तुमची*

*— सुलभा*

एवढ्यात ललिता आली. "ललिता कसं येणं केलंस?" सुलभानं विचारलं.

"तुमच्याकडं आलं म्हणजे बरं वाटतं," ललिता हसत म्हणाली, "म्हणजे चांगली इस्त्री होते? आणि खरं सांगाचं म्हणजे, मला आता आपल्या एकलकोंडेपणाचा कंटाळा आला आहे."

"असं!" मग सुलभा डोळे विस्फारून म्हणाली, "मग त्यावर एकच उपाय आहे नि तो म्हणजे लग्न..."

"इश्श हे हो काय सुलभाताई?" ललिता हसत म्हणाली, "पोटदुखीपासून डोकंदुखीपर्यंत एकच औषध नि ते म्हणजे लग्न!"

"बरं, का आली होतीस?" सुलभानं विचारलं.

"आजची सुट्टी कशी घालवावी हा एक कठीण प्रश्न आहे!" ललिता म्हणाली, "तेव्हा म्हटलं प्रथम तुमच्याकडे जावं; मग बाजारात जाऊन यावं नि नंतर सिनेमाला पळावं. परंतु एकटी कशी जाणार!"

"मग त्यावरही तोच उपाय" सुलभा बोलली नि त्या दोघी मोठ्यानं हसल्या. मग ललिता हळूच म्हणाली, "चला ना, आपण बाजारात जाऊन येऊ." सुलभालाही बाहेर जायचं होतं. आईला लिहिलेलं पत्र पोस्टात टाकून काहीतरी बाजार करून यावं. असा विचार करून ती तयार झाली नि त्या दोघी निघाल्या.

त्या हॉटेलजवळ येताच ललितानं पाय गाळले. तळेगावकर नि आनंद यांची भेट झाल्यापासून ती त्यांचाच विचार करीत होती. एकदा तिला तळेगावकर भेटला होता, पण ती त्याच्याशी बोलली नव्हती. त्याबद्दल तिला फार वाईट वाटत होते.

"सुलभाताई, चहा घेऊन जाऊ या!" ललिता हसत बोलली. सुलभानं होकार दिला आणि त्या दोघी पायऱ्या चढून हॉटेलात गेल्या. ललितानं त्या खोलीकडे नजर टाकली आणि—

"या, या सुलभाताई सरळ या—" तळेगावकर हसले. सुलभाच्या मागेच ललिता बिचकून उभी होती. सुलभा हसत म्हणाली,

"आम्ही आल्याचे तुम्हाला स्वप्न पडले की काय?"

"ते या आनंदसाहेबांना विचारा!" तळेगावकर म्हणाला, "यांनी खाली वाकून तुमचे पाय पाहिले नि मला सांगितले नि तुम्हाला हाक मारली. आता तुम्हीच सांगा? हे गृहस्थ पायावरून माणूस ओळखतात हे आश्चर्य आहे की नाही?"

सुलभा नि ललिता बसल्या नि आनंद म्हणाला, "तळेगावकर, पोराचे पाय पाळण्यात दिसतात अशी एक म्हण आहे." आणि ती चौघं हसली. आणि एकाएकी सुलभा गंभीर झाली तेव्हा तळेगावकरनं विचारलं, "का हो सुलभाताई, गंभीर का झालात?"

"काही नाही." ती उत्तरली.

"काही नाही कसं? मी सांगू?" तळेगावकर बोलला.

"बरं, सांगा पाहू..." सुलभा बोलली, आणि तळेगावकर म्हणाला,

"तुम्ही विचार करीत आहात की या गृहस्थाने माझे पाय कसे ओळखले! काय हा विलक्षण प्राणी आहे! हेच ना?"

ते ऐकून सुलभा हसली. म्हणाली, "अय्या! हे तुम्ही कसं ओळखलंत?"

"आमचा अंदाज कधीच चुकत नाही." तळेगावकर बोलला.

ललिता आळीपाळीनं त्या तिघांकडे पाहत होती. आनंद म्हणाला, "आता हे पायाचं पुराण पुरे आणि ए सुलभा, सुट्टीच्या दिवशी या हॉटेलात येऊन बसायचं हा आमचा रोजचा कार्यक्रम ठरलेला आहे, तसा तुम्ही दोघींनी ठरवला आहे की काय!"

"मुळीच नाही." सुलभा म्हणाली, "या हॉटेलपुढं येताच या ललिताला चहाची लहर लागते..."

"अरे, अहो! सिस्टर ललिता, एक गोष्ट विचारू? पण नको..." तळेगावकर हसला.

"विचारा ना!" सुलभा म्हणाली.

आणि तळेगावकर म्हणाला, "अहो, या ललिताबाई दोन वेळा माझ्या पुढून गेल्या...पण कशा, सांगू? अगदी वाघाच्या पिंजऱ्यापासून जावं तशा!"

"खरंच, त्या दिवशी माझी चूक झाली!" ललिता म्हणाली.

"अहो चेष्टा केली सिस्टर ललिता!" तळेगावकर हसत म्हणाला, "चला आता ही सभा बरखास्त करा!"

हॉटेलाबाहेर येताच सुलभा आनंदला घेऊन म्हणाली,

"आनंद, हा काय चावटपणा आहे?"

"कसला बरं?"

"म्हणे पाय ओळखले..."

"मग खरंच ना..."

"अहो, पण त्यांना काय वाटेल..."

"काय वाटेल ते सांग पाहू?"

"ते म्हणतील, या बाईचे पाय जर याच्या ओळखीचे आहेत तर...जा मी नाही पुढं सांगत!" सुलभा लाजली आणि आनंद म्हणाला,

"ते काय म्हणतील यांचं प्रेम आहे! होय ना?"

"होय. तसंच ते समजतील." सुलभा हसली.

"अग मग त्यात खोटं काय आहे?" आनंद म्हणाला, "एकेकाळी आपले प्रेम होते ना..."

"इश्य..."

"बरं, मी चलतो..."

"बरं, मग कधी भेटणार?"

"दुपारी येईन मी..." आनंद म्हणाला, "जेवण काय करणार?"

"तुम्ही सांगाल ते..."

"ते तूच ठरव...मी येईन."

"नक्की?"

"नक्की..."

सुलभा स्वयंपाक करीत होती आणि तिचं मन तिच्याशी बोलत होतं. एकदा आनंदला स्पष्ट बोलावं नि इथं नोंदणीपद्धतीनं लग्न उरकावं नि मगच रजेवर घरी जावे. पण आनंदला हे मान्य होईल का? तो होकार देईल का? का नकार देईल? आणि त्यानं नकार दिला तर वाईट होईल. पण तो नकार देणारच नाही...जर त्यानं कबूल केलं तर मग माझ्याइतकी मीच सुखी ठरेन नि मग मी सरळ आपल्या घरी जाईन नि कृष्णाबाईला जन्माची सोबत करीन; पण

पण आनंदला काय वाटेल? त्याला माझे म्हणणे पटेल का? तो ऐकून घेईल का? की आणखी काही दिवस थांबावे नि तो स्वतःच लग्नाचे बोलणे काढतो का याची वाट पाहावी.

तिच्या मस्तकात या विचारांचं काहूर उठलं होतं आणि ती स्वतःच लाजून हसत होती. तिनं त्याच नादात स्वैंपाक उरकला नि सहज दाराकडे पाहिलं आणि दारावर टिक् टिक् झाली, तशी ती धावली. तिनं दार उघडलं नि विस्मयचकित झाली. तिच्यापुढं आनंद उभा होता. ती एक पाऊल मागे सरली नि म्हणाली,

"काय सरकार! आज अगदी ठरल्या वेळेच्या आधी आलात..."

"बाईसाहेब, प्रथम घड्याळ कानाला लावा नि मग पाहा." आनंद बोलला.

सुलभानं घड्याळात पाहिलं नि म्हणाली, "आता साडेबारा झाले. याचा अर्थ तुम्ही दीड तास आधी आला आहात..."

"माझी पाठ थोपट नि जेवण वाढ..." आनंद म्हणाला, आणि कोट काढून ताटावर बसला. सुलभानं दोन ताटं वाढली नि ती दोघं जेवली.

जेवण करून आनंद खाटेवर बसला नि एकाएकी गंभीर झाला. त्याच्या तोंडाकडं पाहून सुलभा म्हणाली, "काय कॅप्टनसाहेब, इतका सुंदर चेहरा असा बिघडवलात याचं कारण?"

"सुलभा, अशी माझ्यासमोर बैस..."

"बरं..." ती एक खुर्ची घेऊन बसली. "सांगा काय हुकूम आहे."

"हुकूम नाही." आनंद म्हणाला, "आता मला लग्न करायचं आहे. आणि तेही या दोन दिवसात! मला एकलकोंड्या जीवनाचा कंटाळा आला आहे."

"अय्या!–" सुलभा डोळे विस्फारून म्हणाली, "म्हणजे सारं नक्की झालं!"

"होय. सर्व काही ठरलं आहे." आनंद बोलला.

"मुलगी पाहिलीत?" तिनं विचारलं.

"पाहिली." तो उत्तरला.

"कोण आहे ती–" तिनं प्रश्न केला.

"ती मलबारी आहे–" आनंद म्हणाला.

"तिचा बाप आमच्यावरचा अधिकारी आहे आणि तळेगावकरानं सर्व काही नक्की केलं आहे."

ते ऐकून सुलभाचे डोळे भरले. ती मनात चरकली. पण तसं तिनं भासू दिलं नाही. ती उगीचच हसत म्हणाली, "तिचं नाव काय?"

"सुभद्रादेवी–" तो उत्तरला.

"मला एकदा दाखवाल–" ती बोलली.

"नाही–"

"का–"

"कारण वाण नाही लागला तरी पण गुण लागतात!"

"म्हणजे? माझे गुण तिला लागतील?"

"होय–"

"कसले–"

"ऐनवेळी दुसऱ्याशी लग्न करायचे." आनंद म्हणाला, "आता तिला लग्नात तू पाहा–"

"बरं–" ती म्हणाली, "पुढं सांगा–"

अखेर आनंद कायमचा अंतरणार. उद्या-परवा दुसऱ्याचा होणार, या विचारानं तिचं हृदय करपले नि तिच्या गालावर दुबळे हसू चरफडू लागलं. आनंद म्हणाला–

"कपडे करून माझ्याबरोबर बाजारात चल. मला नवरीसाठी काही कपडे खरेदी करावयाचे आहेत नि ते तुझ्या पसंतीनं. चल, वेळ करू नको. तळेगावकर हॉटेलात वाट पाहत बसले आहेत..."

सुलभा काहीच बोलली नाही. ती कपडे बदलून तयार झाली आणि आनंदबरोबर चालू लागली. हॉटेलात तळेगावकर बसला होता. तो सुलभाला पाहताच हसला... म्हणाला, "सुलभाताई, पाहिलंत का या साहेबानं कसा डाव केला. चला..."

नंतर ती तिघं बाजारात गेली. सुलभानं लग्नाचा बाजार केला. कपडे घेऊन नंतर दागिने घेतले. त्यात एक मंगळसूत्र नि पाच सोन्याच्या बांगड्या खरेदी केल्या नि ती तिघं परत फिरली. तेव्हा आनंद म्हणाला,

"सुलभा, ते सर्व सामान तुझ्या घरी घेऊन जा आणि आजपासून चार दिवसांची रजा घे आणि माझ्या लग्नाचं आमंत्रण आपल्या सर्व मैत्रिणींना दे. त्यांना सांग की परवा पाच वाजता अमरमहल या हॉटेलात यायचं..."

सुलभा घरी जाऊन खूप रडली आणि जर तो सुखी होत आहे तर आपण त्यातच समाधान मानले पाहिजे असं म्हणून ती कामाला लागली. तिने चार दिवसांची रजा घेऊन सर्व मैत्रिणींना आनंदच्या लग्नाचं निमंत्रण दिलं आणि शेवटी तो लग्नाचा दिवस येऊन ठेपला. तेव्हा सुलभाचा जीव कंठात आला होता. परंतु ती हसत होती. आपल्या हृदयात काय होत आहे हे कुणालाच कळू देत नव्हती.

त्या दिवशी सकाळीच आनंद सुलभाकडे गेला नि म्हणाला, "सुलभा, पुन्हा घोटाळा झाला. कारण नवरीची कापडं आपण घेतली आणि तिकडं नवरीच्या बापानंही आपल्या पसंतीनं तिला कपडे घेतले आहेत. कारणाशिवाय मला खर्च आला..."

"मग आता ती कापडं परत करायची! काय हरकत आहे?" ती बोलली.

"परत का करायची?" आनंद म्हणाला, "आज माझ्या लग्नाला येतेवेळी ते पातळ तू नेसून ये. माझा तुला तो लग्नाचा अहेर समज. एवढीच माझी शेवटची विनंती. कबूल– ?"

"कबूल!" ती म्हणाली, "आणि ते दागिने–"

"ते आपण घेऊन जाऊ, बरोबर पाच वाजता. तो रजिस्ट्रार तिथं येणार आहे." आनंद म्हणाला, "तू उशीर करू नको. वेळेवर तयार राहा."

तो हॉल चिक्कार भरला होता. मोठमोठे लष्करी अधिकारी आले होते. एका बाजूला सर्व महिला बसल्या होत्या. तळेगावकरनं सर्व व्यवस्था चोख केली होती. दोन मोठे हार आणले होते. तिथं दाभाडे कारभारी होता.

आणि त्या जरीच्या पातळात सुलभाला पाहून सर्व लोक हीच नवरी असावी असा अंदाज करीत होते आणि हे लोक आपल्याकडे कां पाहत आहेत, असं मनात म्हणत

ती नवरी कधी येते याची वाट पाहत होती. रजिस्ट्रार येऊन बसला होता. त्याच्यापुढं आनंद बसला होता. परंतु नवरीचा पत्ता नव्हता. त्यामुळे तळेगावकर भलताच अस्वस्थ झाला होता. तो घडीघडी बाहेर जाऊन पुन्हा निराश होऊन येत होता आणि त्याची ती धावपळ सुलभा पाहात होती. घड्याळाचा काटा पाचाकडे सरकत होता. शेवटी सुलभाने तळेगावकरला बाजूला घेऊन विचारलं, "अहो तळेगावकर, ही नवरी मुलगी येणार तरी कधी—"

"अहो सुलभाताई, तोच तर गोंधळ झाला आहे!" तळेगावकर म्हणाला.

"त्यात तो नवरीचा बाप आहे बिनडोक नि दारू पिणारा. आत्ता पाच वाजतील नि आम्हा दोघांची भयंकर बेअब्रू होणार असं वाटतंय—"

"अय्या! मग हो?" सुलभा आश्चर्यानं उद्‌गारली आणि तळेगावकर म्हणाला,

"जर तो माणूस मुलीला घेऊन आला नाही तर आमच्या फजितीला सीमाच राहणार नाही आणि हा नवरदेव तर गुडघ्याला बाशिंग बांधून बसला आहे!"

"अहो पण हे लग्न तुम्हीच ठरवलं आहे—" सुलभा म्हणाली, "आणि त्या मुलीच्या बापाचा स्वभाव तुम्हाला माहीत होता—"

"अहो ते सर्व खरं आहे." तळेगावकर म्हणाला, "तो आहे एक मोठा अधिकारी नि त्याने स्वत: लग्नाचे बोलणे काढले आणि मग मला काही म्हणता आले नाही."

इतक्यात पाच वाजले नि रजिस्ट्रार म्हणाला, "—चला, मुलीला बोलवा!" तसा तळेगावकर उठला नि सुलभाला एका बाजूला घेऊन म्हणाला, "सुलभाताई घात झाला!"

"आणि हो, मग?" ती स्तंभित झाली.

"आता आमच्या अब्रूचा पंचनामा होणार!"

"आणि हो, मग—" ती उद्‌गारली.

"आता काही तरी मार्ग काढला पाहिजे!"

"आणि हो, मग?" ती पुन्हा बोलली, "आणि हो मग काय?"

"मग सांगा ना, मी काय करू? काही तरी उपाय सांगा!" तळेगावकर म्हणाला.

"अय्या! मी हो काय सांगू?" ती घाबरली.

"आता एकच करा—"

"काय करू?"

"तो मॅड माणूस येत नाही." तळेगावकर म्हणाला, "त्यानं दगा दिला."

"मग हो?"

"आता मी सांगतो तसं करा आणि आम्हा दोघांची अब्रू वाचवा—"

"अहो, पण काय करू?"

"आता फक्त नवरी म्हणून तुम्हीच पुढं चला—"

"अय्या!"
"आता चला हात जोडतो."
ती गोंधळली आणि आता आनंदशी आपलं लग्न होणार याचा तिला आनंद झाला. या आनंदाच्या भरात आपले हृदय बंद पडेल की काय याची तिला भीती वाटली. ती सरळ जाऊन आनंदच्या शेजारी बसली. ती पुलकित झाली होती—मोहरली होती. तिचे गाल त्या आनंदानं लाल झाले होते.
आणि आनंद शांत होता— हसत होता.
"सुलभा बाबा पाटील तुम्हीच ना?" रजिस्ट्रारनं विचारलं.
"होय. मी—" ती उत्तरली.
नंतर प्रतिज्ञापत्रक वाचले गेले आणि रजिस्ट्रार म्हणाला,
"करा सह्या—"
आनंदनं सही केल्यानंतर सुलभानं सही केली आणि तळेगावकरानं त्या दोघांकडे दोन हार दिले. सुलभानं आनंदला हार घातला. मग आनंदनं तिला हार घातला नि हॉल टाळ्यांनी निनादला!
मग ते दागिने तिला घातले. ते मंगळसूत्र तिच्या गळ्यात रुळू लागले. नंतर तिच्या लक्षात आले हे आनंदचे नाटक आहे. त्यावेळी तिचा आनंद तिच्या हृदयात मावत नव्हता. ती बेभान झाली होती नि डोळ्याच्या कोपऱ्यातून ती आनंदकडे पाहत होती. जो आनंद दुर्मिळ होता तो आज माझा पती झाला यावर तिचा विश्वासच बसत नव्हता. ती मनात म्हणत होती, हे असं कसं घडलं, हे एक स्वप्न तर नाही ना!
एक टॅक्सी भरेल एवढ्या अहेराच्या वस्तू आल्या.
आणि लग्न सोहळा संपला. परत येताना तळेगावकरानं विचारलं—"सुलभाताई, आता सासरी की माहेरी?"
"आता माझं सासर नि माहेर एकाच ठिकाणी आहे. आता पतिदेव सांगतील ते—" सुलभा म्हणाली.
"मग आता तुमचं तुम्ही पाहा!" असं म्हणून तळेगावकर पुढं गेला आणि सुलभा आनंदला म्हणाली,
"सरकार या, नाटकाचा पहिला अंक सुंदर झाला. पण पुढील अंकासाठी या पामरानं सासरी यावं की तुम्ही माझ्या माहेरी येणार?"
"चल, तुझ्याच घरी जाऊ—" आनंद म्हणाला.
"आता तूच माझं सुकाणू आहेस—"
"आनंदसाहेब—"
"ऑर्डर सर—"

''नाही, मी म्हणते, सुभद्रादेवी कुठं गेली असेल?''

''ती आपल्या घरी असेल!''

''मला हे सर्व का कळू दिलं नाही?''

''अग गंमत केली—''

''दोन दिवसात आपण रजेवर गावी जायचं!'' आनंद म्हणाला.

''कारण सुरेशला मी त्याची आई भेटवणार आहे—''

''आणि स्वत: वडील म्हणून भेटणार आहात!'' सुलभा म्हणाली, आणि मोठ्यानं हसली.

तिला आनंद झाला होता. तिच्या आनंदाला पारावार नव्हता. तिच्या जीवनातील एक स्वप्न साकार झालं होतं. एक संघर्ष संपला होता नि खरोखर ती सुखी झाली होती.

आनंदनं दोन दिवसात तयारी केली. रजा काढली आणि सुलभाला घेऊन तो गावी गेला, तेव्हा त्या दोघांना पाहून सुरेश टाळ्या पिटीत नाचू लागला. आनंदनं त्याला उचलून घेतले नि सुलभा सरळ कृष्णाबाईकडे गेली नि पटकन तिच्या पायांवर डोकं ठेवलं. वर उठली तेव्हा तिच्या डोळ्यांतून आनंदाश्रूंची धार वहात होती.

''आई, ही सुलभा आता तुझी सून होऊन आली आहे—'' आनंद बोलला.

''काय म्हणतोस! आनंद, तुम्ही लग्न केलं?'' कृष्णाबाई आश्चर्यानं म्हणाली, ''मग थांब—''

नंतर तिनं लिंबलोण उतरले. सुलभाला घरात नेऊन बसविली नि पुन्हा म्हणाली, ''आनंद, तू माझा शब्द खरा केलास. आता तू कुठंही राहा. आता माझी सून नि आम्ही आनंदात राहू—''

नंतर सुलभा आईकडे गेली तिनं शेवंताबाईच्या गळ्याला मिठी मारली नि मागं सरून गळ्यातील मंगळसूत्र दाखवून म्हणाली,

''आई, मी लग्न केलं—''

''कुणाशी?'' शेवंता चकित झाली.

''आनंदशी?'' सुलभा उत्तरली.

''आणि ग—''

''आणि काय, आता कोण कोण जळून मरते ते पाहायला आले आहे.''

आणि जेव्हा ही गोष्ट बाबा पाटलाला समजली तेव्हा तो म्हणाला, ''सोन्याहून पिवळं झालं. आता ही गोष्ट गावाला समजली पाहिजे—'' आणि तसाच तो उठून कृष्णाबाईकडं गेला. हात जोडून म्हणाला,

''मी एक चूक केली होती, ती मुलांनी दुरुस्त केली. उद्या मी गावजेवण घालीत

आहे. झालं गेलं कृष्णाबाईला अर्पण करा—''

"आता काहीच काळजी करू नका.'' मी तुम्हाला एकदा सांगितले आहे, की दादासाहेबाचे घर म्हणजे खेकड्याचे बीळ नसून वाघाची घळ आहे!'' कृष्णाबाई म्हणाली, "आणि त्या घळीत तुमची लेक सुखरूप आहे, असं समजा—''

आणि दुसऱ्या दिवशी बाबा पाटलानं सुलभा-आनंदच्या लग्नाचं गावजेवण घातलं.

## १४

ते पंधरा दिवस सुलभाचे आनंदात गेले. आता ती कृष्णाबाईकडे— आपल्या सासरीच राहात होती.

आनंद, सुलभा, सुरेश नि कृष्णाबाई यांच्या अस्तित्वानं ते घर गजगजीत भरल्यासारखं वाटत होतं.

आणि खरोखर सुलभाच्या त्या सुखाचा गावातील मुलींना हेवा वाटत होता.

आनंद, सुलभा, नि सुरेश ही तिघं मळ्यात जात होती. सुरेश पेरू काढीत होता नि मग ती तिघं झाडाखाली बसून खात होती.

आणि माझं कुटुंब किती मोठं आहे, मी आता एकटी नाही, या विचारानं कृष्णाबाई समाधानाचा नि:श्वास टाकीत होती.

बाबा पाटील वैर विसरला होता. शेजारचा पाव्हणा नि वळचणीचा साप हे वाईट असतात हे त्याचं म्हणणं आता त्यालाच पटत नव्हते व 'आता जर तो बाळासाहेब पुन्हा आला तर मी त्याला गोळी घालीन' असं तो म्हणत होता.

आणि एके दिवशी आनंद नि सुलभा यांना वरून हुकूम आला की ताबडतोब आपल्या कामावर हजर व्हा... नि ते हाती पडताच त्यांनी तयारी केली आणि आनंद सुलभाला घेऊन निघाला तेव्हा सुलभानं आईला सांगितलं...

"आई, आता माझा सुरेश माझ्या घरी राहील. त्याला वाटेल तिथं तो राहील.'' त्यावर शेवंताबाई काहीच बोलली नाही.

आणि आनंद नि सुलभा रवाना झाली. त्यांना सारंगपूरला जावं लागलं.

भारत-पाकिस्तान सरहद्दीवर पाकचा उपद्‌व्याप वाढत होता. साध्या पोशाखातील सैनिक काश्मिरात मुरकंड देत होते आणि त्यामुळे संरक्षणमंत्र्यापासून सरसेनानी नि सर्व सैनिक कार्यक्षम झाले होते नि भारतीय फौजा आपल्या सीमेकडे सरकत होत्या. आता तो महान संघर्ष अटळ होता.

हाजीपीर खिंडीत बंदुका दणदणत होत्या. दिसेल त्या हल्लेखोराला गोळी घाला असा

लष्कराला हुकूम मिळाला होता.

आनंद आपल्या कामावर हजर झाला आणि त्याच दरम्यान दाभाडेवर एक कठीण प्रसंग गुदरला.

शस्त्रागारापुढं दलपत पहारा करीत होता. दाभाडेला पाहताच त्याचे डोके फिरले आणि 'मी दोन ठोकरीची किंमत दोन काडतुसं खर्ची घालून परत करीन' या स्वत:च्या शब्दांची त्याला आठवण झाली. त्याच्याजवळ बंदूक काडतुसानं भरलेली होती. आतापर्यंत दलपतने दाभाडेला ठार मारायचा फार विचार केला होता. परंतु जेव्हा दाभाडे दिसायचा तेव्हा त्याच्याजवळ बंदूक नसांयची नि जेव्हा बंदूक असायची तेव्हा दाभाडे भेटत नसायचा. पण आज सर्व जमून आले होते.

दाभाडेला पाहाताच दलपतनं बंदूक सरळ धरली नि दाभाडेचं कर्ज फेडायचा विचार केला. त्यानं भर्रकन दाभाडेवर आपली बंदूक रोखली नि म्हणाला,

"दाभाडे, थांब. आपले कर्ज घे!" आणि त्यानं बंदुकीचा सेफ्टी कॅच मोकळा केला. झाला... मृत्यू मुक्त झाला.

दाभाडे दचकला. नि पुन्हा स्वत:ला सावरून उभा राहिला. तो क्षणात निर्भान झाला नि सरळ दलपतवर चालून निघाला. अगदी दबा धरून चालणाऱ्या वाघाप्रमाणे चालू लागला. "मी एवढ्यासाठीच या लष्करात दाखल झालोय. तू गोळी घाल!" असं ओरडू लागला.

दाभाडेची ती प्रंचड मूर्ती पुढं पुढं येऊ लागताच दलपतचा निर्धार सैल झाला आणि याचा भावी परिणाम वाईट होईल याची जाणीव होऊन त्याचं बोट बंदुकीच्या चापावर थरथरू लागलं. त्यानं भरकन बंदूक खांद्याला लावून म्हणाला, "नाईक, मी तुमची हिंमत पाहिली..."

"हट् लेका! ती खंदकातच बघ..." असं म्हणून दाभाडे बेगुमान चालत पुढं निघून गेला.

आणि ऑगस्ट महिना पुढं आला नि पाकिस्तानी तोफांची तोंडं उघडली. त्या दणदणू लागल्या. त्यांचे पॅटन रणगाडे धडपडत भारतात शिरू लागले. सुपरजेट विमानं भारतावर आग ओतू लागली. पाच ऑगस्टला पाकिस्ताननं भारताविरुद्ध युद्ध जाहीर केले आणि मराठा इन्फन्ट्री पुढं निघाली. कच्छ, भुज, फिरोजपूर, लाहोर आघाडीवर युद्धाला प्रारंभ झाला. सर्व सीमेवर भडका उडाला.

आनंदला लाहोर आणि फिरोजपूर आघाडीवर जायचा हुकूम झाला. आणि "लाहोर" ही एकच गर्जना भारतीय फौजेत निनादू लागली.

लाहोर जवळ आलं होतं. दिसत होतं. इच्छेगिल कालव्याच्या अलीकडे भारतीय सैन्यानं आपला मोर्चा लावला होता आणि भारतीय सैन्य बंदुकांच्या दस्त्यानं लाहोरचे दार ठोठावीत होते. सर्वत्र एकच धुमश्चक्री सुरू झाली होती. भारतीय सैन्याला पाकिस्तानी नागरिकांशी लढायचं नव्हतं. त्यांना फक्त पाकचं लष्करी बळच खच्ची करायचं होतं. ते मोडून काढायचं होतं.

आणि पाकिस्तानी सैन्याच्या अंगात चंगीजखानाचं भूत संचारलं होतं. ते कुठंही बॉंबहल्ला करीत होतं नि त्याला दिल्ली सर करायची भलतीच घाई झाली होती. आणि त्यांच्याशी भारतीय सैनिक तिन्ही आघाड्यांवर झुंजत होते. भारताची तिन्हीही दल रणांगणात उतरली होती. भारताचा तोफखाना अखंड गरजत होता आणि विमानं आकाशाला हादरे देत होती.

आणि भारतीय फौजा इंच इंच जमीन लढवीत लाहोरकडे सरकत होत्या. आणि पाकिस्तानी सैन्याला नेस्तनाबूद करीत होत्या नि अमेरिकेने दिलेल्या पाकिस्तानी पॅटन रणगाड्यांचा चुराडा उडत होता.

कॅप्टन आनंद आणि तळेगावकर दोघेही फिरोजपूर-लाहोर आघाडीवर लढत होते आणि त्यांच्याबरोबर दाभाडे, दलपत, शिंदे, पवार, निकम, भोसले अशी किती तरी हिंमतबाज आणि हिकमती माणसं होती.

कॅप्टन आनंद फिरोजपूर, लाहोर आघाडीवर सतलजच्या परिसरात एका खंदकात होता. परंतु त्याचा आत्मा कृष्णाकाठी वावरत होता. तो मध्येच सुलभाचा विचार करीत होता. आता ती कुठं असेल, आता ती संपूर्ण निराश होईल, तिला पत्र... त्यानं छातीवरचा खिसा चाचपला. त्यानं आईला एक आणि सुलभाला एक अशी दोन पत्रं लिहून ठेवली होती.

रात्र झाली होती. डोळ्यात बोट घातले तरी दिसत नव्हते. त्या आघाडीवरचे तप्त वातावरण किंचित शांत भासत होतं. परंतु मध्येच तोफांचा गडगडाट होत होता नि रात्र थरारत होती.

थोड्या वेळानं कामगिरीवर गेलेला निकम परत आला. त्याला आनंदनं विचारलं...

"आता कोठून आलास...?"

"पाकिस्तानच्या लष्करी कँपातून." निकम उत्तरला.

"काय केलंस तिथं...?"

"जेवलो..."

"काय खबर आहे...?"

"जवळच उसाच्या शेतात बरेच पाकिस्तानी रणगाडे शिरलेले आहेत..." निकमने ती बातमी दिली. आणि आनंद विचारात पडला आणि चटकन म्हणाला,

"निकम, दाभाडे, दलपत, तुम्ही आणखी थोडे जवान घेऊन जा. आणि कालव्याचं दार उघडून त्या शेतात कालव्याचं पाणी सोडा. उशीर करू नका नि शिकार सोडू नका..."

तसे ते तिघे उठले आणि त्यांनी बरोबर जाऊन कालव्याचं दार उघडून त्या शेतात पाण्याचा लोंढा सोडून दिला.

थोड्याच वेळात त्या शेताची दलदल झाली नि त्या चिखलात ते सर्व रणगाडे रुतून बसले नि एकाच जागी ते धडपडू लागले. अगदी जाळ्यात मासे सापडावेत तशी त्यांची अवस्था झाली! आणि नंतर भारतीय वीरांनी त्यांचा बुकणा करायला सुरुवात केली. पाकिस्तानी सैनिकांनी ते रणगाडे जसेच्या तसे टाकून पोबारा केला.

पाकिस्तानची सारी मदार बलुची रेजिमेन्टवर होती. धाडसी आणि युद्धात तरबेज,. म्हणून त्या बलुची पलटणीचा बराच बोलबाला होता म्हणून पाकिस्तानी अधिकारी प्रत्येक कठीण प्रसंगी त्याच पलटणीला पुढं लोटीत होते.

रात्रीचे दोन वाजले आणि ती बलुची रेजिमेन्ट कालव्याच्या एका चिंचोळ्या पुलावर आली.

आणि त्याच वेळी मराठा नि जाट या दोन पलटणी पुढं धावल्या नि घनघोर युद्धाला तोंड लागलं. रणांगणावर हलकल्लोळ उसळला. त्या आघाडीवर डोंबाळ झाला. भारतीय लष्कराचे सर्व वरिष्ठ अधिकारी आपल्या सैनिकांच्या खांद्याला खांदा भिडवून लढत होते.

आनंद या युद्धात दर्दी होता, तो त्या गर्दीत लढत होता. त्याच्या शेजारी तळेगावकर दमदार मारा करीत होता. पलीकडे दाभाडे, निकम, दलपत, भोसले असे झुंजत होते. आता माघार नाही... या एकाच जिद्दीनं ते तळपत होते.

तिथं शौर्य लढत होतं. ज्यांच्या हृदयात कृतांत काळ हुंकार देत होता ते तिथं लढत होते. तिथं माणसं बेबंद होऊन लढत होती. ज्यांनी अंगणात पहिलं पाऊल टाकताच ज्यांना सह्याद्रीचे दर्शन झाले होते ते लढत होते. जो कृष्णानदीकाठी वाढला तो सतलजकाठी जिवावर उदार झाला होता. सह्याद्रीतील अवखळ वाऱ्यानं ज्यांचे निःश्वास घडवले होते ते निःश्वास लढत होते.

पाकिस्तानी फौजेला भारतीय जवान रेटीत होते नि कुटीत होते. आनंद लढत होता.

*हृदयात तेवती देशभक्ती ज्योती*
*अन् बाहूत स्फुरली महाकाळची शक्ती*
*शब्दांनी भिडवली तोफखान्याला बत्ती*
*बेबंद जहाले धुंद रणावर गर्दी*
*त्या ठाऊक होते स्वातंत्र्यासाठी लढणे*
*त्या ठाऊक होते स्वातंत्र्यासाठी मरणे*

*अन् ठाऊक नव्हते मरण कोणते येते*
*तो जाणत नव्हता घोडे कुणीकडे जाते*
*इमान तेथे झाले तेव्हा तलवारीचे पाते...*

दाभाडेनं तर कहरच केला होता. पन्हाळगडचा बुरूजच सचेतन होऊन धावत सुटावा तसा तो रणमैदानात तळपत होता. त्याचा तो आवेश पाहून दलपत स्तंभित झाला होता नि तो त्याच्यापासून दूर होत नव्हता.

आणि अखेर घात झाला! शत्रूची एक गोळी येऊन ती कॅप्टन आनंदच्या छातीत गडप झाली नि आनंद कोसळला!

''अरे! कॅप्टन आनंद पडले...'' तळेगावकर ओरडला. दाभाडे नि दलपत पुढं गेले आणि त्यानी कॅप्टन आनंदला उचलून मागे नेले आणि रेडक्रॉसच्या स्वाधीन केले नि मग कॅप्टन आनंदचे स्ट्रेचर पिछाडीकडे निघाले.

पाकची लढाऊ फौज म्हणून बलूची रेजिमेन्टचा लौकिक आहे आणि पाकने तीच फौज त्या रात्री रणात लोटली आणि भारताच्या मराठा आणि जाट फौजा पुढं धावल्या.

दवाखान्यातील वातावरण शांत होते. पण ते भेदरले होते. आघाडीवर गरजणाऱ्या तोफांचे आवाज तिथं ऐकू येत होते. अधूनमधून जखमी सैनिकांना घेऊन मोटारी धडपडत येत होत्या नि जखमींची मोटार आली की दवाखान्यात एकच धावपळ होत होती.

सुलभाचं हृदय धडधडत होतं. आनंद आघाडीला आहे, आता त्याचं काय होणार या विचारानं ती कोमेजली होती आणि ती मनात म्हणत होती, आनंद तुम्ही स्वतःला संभाळा हो-

आणि रेडक्रॉस पथकानं कॅप्टन आनंदचे स्ट्रेचर वाऱ्यासारखं पळवीत दवाखान्यात दाखल केले आणि ''कॅप्टन आनंद जखमी...'' अशी एकच आरोळी झाली.

ललिता पळतच सुलभाकडं गेली आणि घाबऱ्या घाबऱ्या म्हणाली,

''सुलभाताईऽऽ कॅप्टन आनंद जखमी झाले आहेत...''

''आनंदऽऽ...'' सुलभानं टाहो फोडला.

आणि ती विजेसारखी धावली. खंदकातील चिखल आणि अंगातील रक्त याने लडबडलेला आनंद पाहून ती भयभीत झाली, तेव्हा त्यानं डोळे झाकले होते. तो शुद्धीवर नव्हता. त्याची ती व्यवस्था पाहून सुलभा पुढं गेली आणि त्याला मिठी मारून म्हणाली, ''कॅप्टन आनंद, काय केलंत हे! शेवटी मला हे दृश्य दाखवलंत का? आता मी हे कसं सहन करू...?''

''चला... आनंदचं ऑपरेशन...'' मोठा डॉक्टर बोलला... नि पुन्हा ते स्ट्रेचर

ऑपरेशन थिएटरकडे वळवण्यात आले. तिथं जाताच आनंदच्या अंगातील कोट कापून काढण्यात आला. त्या कोटाच्या खिशात दोन पत्रं आणि एक सुलभाचा फोटो होता. तो पाहून ती म्हणाली, "हा माझा फोटो आहे आणि हे पत्र त्यांनी माझ्या सासूबाईंना लिहिलं असून हे दुसरं त्यांनी मलाच लिहिले आहे..."

सुलभाचा तो फोटो रक्ताने भिजला होता. तो हृदयाशी धरून ती रडत होती. 'आनंद काय केलेत हे! शेवटपर्यंत तुम्ही प्रतिमा वागवलीत आणि नंतर स्वत:च्या रक्तात भिजवून दूर केलीत. कसले हे तुम्ही प्रेम केलेत! आता मी कशी जगू?'

मग ती अधिक पुढं जाऊन आनंदचे पाय धरून म्हणाली, "मी...मी तुमची सुलभा आहे. पाहा ना... जरा डोळे उघडा नाऽ" ती ओरडली आणि एकाएकी तिची शुद्ध हरपली. ललिता आणि इतर मुलींनी तिला शेजारच्या वॉर्डमध्ये नेऊन खाटेवर झोपवली.

सकाळी सुलभा शुद्धीवर आली नि धडपडून उठून आनंदकडे धावत निघाली. परंतु डॉक्टराने तिला तिकडे जाऊ दिले नाही. तो म्हणाला,

"सिस्टर, तुम्हीही सिस्टर आहात हे विसरू नका. कॅप्टन आनंदची स्थिती चिंताजनक आहे आणि अशा स्थितीत तुम्ही त्यांच्याकडे जाणे धोक्याचे आहे..."

"डॉक्टर, ते शुद्धीवर आले आहेत का?" सुलभानं हुंदके देत विचारले.

"नाही. फक्त नाडी चालू आहे एवढेच!" डॉक्टरानं उत्तर दिलं.

"डॉक्टर हे सौभाग्य मिळावं म्हणून मी कष्टाचे डोंगर उलथले आहेत." सुलभा सद्‌गदित कंठानं म्हणाली, "आणि माझं सौभाग्य आज तुमच्या हाती आहे, ते संभाळा नि माझे कुंकू पुसलं जाऊ नये याची काळजी घ्या!"

"सिस्टर, आम्ही शिकस्तीचे प्रयत्न करीत आहोत." डॉक्टर म्हणाला, "शस्त्रक्रिया यशस्वी झाली आहे. गोळी निघाली आहे. परंतु ते शुद्धीवर का येत नाहीत. हा प्रश्न आहे."

"डॉक्टर..." सुलभा उद्‌गारली.

"सिस्टर, तुमचं घरी कोण आहे?" डॉक्टरने विचारले. "म्हणजे आई, वडील, सासू?"

"आई, वडील, एक बहीण, भाऊ नि सासू-" सुलभा ओंजळीत तोंड धरून उत्तरली- "आणि एक मुलगा-"

"मग सिस्टर एक करा-"

"काय करू?"

"तुमची मन:स्थिती ठीक नाही." डॉक्टर म्हणाला,

"तेव्हा तुम्ही आपल्या घरी जा-"

"काय म्हणता डॉक्टर?" सुलभाचे ओठ थरारले. कंठ दाटला. शब्द कोंडले नि ती वेड्यासारखी सर्वत्र पाहू लागली आणि उशिराने म्हणाली, "डॉक्टर, त्यांना या अशा अवस्थेत टाकून जाऊ? मुळीच जाणार नाही. कारण मीही नर्स आहे. मी अखेरपर्यंत त्यांच्याजवळ रहाणार-"

"ठीक आहे. आपण नंतर बोलू!" असं बोलून डॉक्टर निघून गेला आणि सुलभानं दोन पत्रं काढली नि वाचू लागली आनंदनं पहिल्या पत्रात लिहिलं होतं —

*ती. आईस अनंत प्रणाम!*

*पत्रास कारण की मी इथं खुशाल आहे. माझी कसलीच काळजी करू नको. धीराने घे. सुरेशला सांभाळ. अचानक मला आघाडीवर जाणं भाग पडल्यामुळं सुलभा कोठे आहे हे अजून मला कळलं नाही. तिलाही मी आताच पत्र लिहिलं आहे. सर्वांना माझा नमस्कार सांग.*

*तुझा*
*— आनंद*

आणि आनंदनी सुलभाला लिहिलं होतं —

*'प्रिय सुलभा... आता फिरोजपूर-लाहोर आघाडीवर सुखरूप आहे. काही काळजी करू नको. आता हा संघर्ष उग्र रूप धारण करीत आहे आणि लवकरच हा संघर्ष भयानक रूप घेईल असा संभव वाटत आहे. कारण पाक राज्यकर्ते हा संघर्ष सारखा वाढवीत आहेत. कारण त्यांना शस्त्रबलाने आमच्या मातृभूमीला भ्रष्ट करायची आहे. परंतु आम्ही तसूभरही माघार घेणार नाही. आम्ही लाहोर जवळ करीत आणले आहे. ते आम्हाला आता दिसत आहे.*

*परंतु सुलभा, ही लढाई आहे. जरी आम्ही जिंकणार हे खरं असलं तरी आम्हांपैकी काहींना तरी स्वत:चं बलिदान करावं लागणार आहे —*

तिच्या डोळ्यांत आसवांनी गर्दी केली आणि तिला अक्षरं दिसेनाशी झाली. ती मनात म्हणाली, 'काय झालं हे! इतकं भयानक काहीतरी होईल याची कल्पना तरी होती का? आनंद, तुमच्या अंगाला माती लागेल म्हणून कृष्णाबाईनं तुम्हाला अंगणात खेळू दिलं नाही हो! आणि आता तुम्ही रक्तानं नि चिखलानं माखला आहात की-'

पुन्हा ती पत्र वाचू लागली —

*म्हणून सुलभा मी तुला सांगून ठेवीत आहे की या संघर्षात जर माझं बरंवाईट झालं*

*तर माझं प्रेत गावी न्यायचं नि त्याची पुढील व्यवस्था कृष्णाकाठी करायची आणि सारं तूच करावं. सुरेशला मोठा कर. माझ्यासारखा मोठा कर नि आईला सोबत कर. बस.*

*पुन्हा सांगतो की आता माघार नाही. जयहिंद!*

*तुझा*

*— आनंद*

ते पत्र वाचून सुलभा वेडावली. माझं प्रेत गावाला न्यायचं नि त्याची पुढील व्यवस्था कृष्णाकाठी करायची ही अक्षरं वाचून ती कावरीबावरी झाली नि तिनं मोठ्यानं हंबरडा फोडला-आऽनंऽदऽ

आणि त्याचवेळी डॉक्टर येऊन तिच्यापुढे उभा राहिला म्हणाला,

"सिस्टर सुलभा, काय हे! अशानं तुम्ही जगणार नाही—"

"डॉक्टर— तुम्हाला कसं सांगू डॉक्टर?" अगतिक होऊन नि त्या पत्रातील अक्षरं पुढं करून ती म्हणाली, "डॉक्टर ही अक्षरं वाचा."

डॉक्टरनं ती अक्षरं वाचली नि त्यांच्या गालावर स्मित चमकले. तो म्हणाला,

"सिस्टर, काळजी करू नका—"

"डॉक्टर!" सुलभा उद्गारली.

"सिस्टर, कॅप्टन साहेबांना शुद्ध येऊ लागली आहे—" डॉक्टर म्हणाला.

"डॉक्टर! डॉक्टर, तरच मी जगणार आहे." सुलभा खिन्न स्वरात म्हणाली, "आता माझं जगणं-मरणं तुमच्या हाती आहे हो!"

"शांत राहा-" डॉक्टर म्हणाला, "हे पाहा, या घडीपासून परिस्थिती कलाटणी घेऊ लागली आहे आणि मला वाटतं, तुम्हाला मरावं लागणार नाही!"

डॉक्टरचे ते शब्द ऐकून सुलभाला जरा धीर आला. ती हळू आवाजात म्हणाली,

"मी त्यांना पाहू का?" दुरून पाहते."

"पाहा ना-चला." डॉक्टर म्हणाले आणि ती त्यांच्या मागोमाग वॉर्डात गेली. दूर उभी राहिली आणि डोळे भरून आनंदला पाहिला. त्याच वेळी त्यानं एक हात उचलून छातीवर ठेवला आणि ती त्याची हालचाल पाहून तिला आनंदाचं भरतं आलं. "डॉक्टर, तुम्ही देव आहात! मी बाहेरच थांबते" असं म्हणून ती परत फिरली आणि एका खाटेवर दाभाडे पडलेला पाहून पुन्हा तिला कापरं भरलं. ती पुढं जाऊन हळूच म्हणाली, "दाभाडे—"

"कोण? सिस्टर!" त्यानं डोळे उघडून पाहत विचारलं— "आनंदसाहेब?"

"ते आताशी शुद्धीवर येत आहेत." सुलभा म्हणाली, "परंतु तुम्ही— ?"

"मला दंडात गोळी लागलीया." दाभाडे बोलला आणि त्याचवेळी कॅप्टन तळेगावकर आला नि सुलभाला पाहून शांत झाला.

त्यानं सुटकेचा नि:श्वास टाकला. म्हणाला, "सुलभाताई, कॅप्टन आनंदची प्रकृती?"

"आतापासून सुधारण्याच्या मार्गावर आहे." सुलभा म्हणाली नि तळेगावकरांनी दाभाडेला विचारलं—

"दाभाडे, तुम्ही कसे काय आहात?"

"साहेब, मला काई एक व्हायचं न्हाय." दाभाडे म्हणाला, "तुम्ही तेवढं आनंद साहेबाला जपा—"

"ठीक आहे" असं म्हणून कॅप्टन तळेगावकर सुलभाला घेऊन डॉक्टरकडे गेला. आणि आनंदला पाहून पुन्हा तो परत निघाला, तेव्हा दाभाडेनं विचारलं, "साहेब, आता काय चाललंय तिथं?"

"तिथं सर्व काही ठीक चाललं आहे." तळेगावकर म्हणाला, "आनंदसाहेब नि तुम्ही पडल्यानंतर शत्रूला जबर मार देऊन हाकून दिलं. आणि आता तुम्ही नि आनंदसाहेबांनी चिखलात गाडलेले दुष्मनांचे रणगाडे काढायचं काम चालू केलं आहे—"

"साहेब, आता आपला डिफेंस कुठं लागलाय?" दाभाडेनं पडून विचारलं.

"पुष्कळ पुढं. तुम्ही काळजी करू नका. लवकर बरे व्हा—" तळेगावकर म्हणाला. सुलभा ऐकत होती.

"बरं हाय. आता कराचीलाच आपला डिफेंस लावतो!" दाभाडे बोलला आणि ती तिघं मोठ्यानं हसली.

नंतर तळेगावकरानं सुलभाला धीर देऊन तिचा निरोप घेतला.

तीन डॉक्टर आणि सुलभासह तीन नर्सेस यांची आनंदच्या खाटेभोवती सतत धडपड चालली होती. बरोबर पाच दिवसांनंतर आनंदनं डोळे उघडले नि सर्वत्र पाहिलं. त्यानं डोळे उघडताच सुलभा पुढं गेली नि तिला पाहून आनंद क्षीण स्वरात बोलला,

"सुलभा—"

"जी—"

"तू इथं—"

"होय."

"अभिनंदन! कॅप्टन आनंद!" डॉक्टर बोलला.

"अभिनंदन नि ते का?" आनंदनं विचारलं.

"लाहोर आघाडीवर पराक्रमाची शर्थ केल्याबद्दल—आणि मृत्यूच्या जबड्यातून परत आल्याबद्दल—" डॉक्टर म्हणाला.

"थँक्यू डॉक्टर—" आनंद उद्‌गारला.

सुलभा ऐकत होती. ती त्याच्या डोळ्यात पाहत होती. त्यानं आपल्याकडं पाहावं नि आपल्याशीच बोलावं असं तिला वाटत होतं. आनंद म्हणाला, "डॉक्टर, तुम्हीही मला वाचविण्याची शर्थ केली आहे—"

"ते काही प्रमाणात खरं आहे." डॉक्टर म्हणाला, "परंतु आमच्या कष्टाला सिस्टर सुलभाताईच्या आत्म्यानं जोड दिली आहे."

"खरं आहे ते—" आनंदने पुन्हा डोळे झाकून घेतले नि पुन्हा तो सर्वांकडे पाहू लागला. तेव्हा डॉक्टर म्हणाला,

"कॅप्टन आनंद, तुमची जखम फार मोठी आहे. ती गोळी एक इंचाने बाजूला गेल्यामुळे हृदय वाचले. आता एक विनंती—"

"डॉक्टर, विनंती करू नका, हुकूम सांगा." आनंद म्हणाला.

"आता मुळीच हालचाल करायची नाही." डॉक्टर म्हणाला, "नाही तर धोका आहे."

"प्लीज डॉक्टर! मी सर्व काही पाहते." सुलभा म्हणाली, "मी अशी इथे बसते."

"आता तुम्ही तुमचं कुंकू सांभाळा—" डॉक्टर बोलला नि आनंद मंद हसला.

डॉक्टर गेले. सुलभा आनंदच्या खाटेजवळ बसली होती. उशिराने आनंदने विचारलं, "सुलभा, आईला पत्र लिहिलंस—?"

"नाही—"

"का?"

"अहो, ही बातमी वाचून त्यांनी जीव सोडला असता ना!"

"खरं आहे—"

"तळेगावकर आले होते का?" आनंदनं विचारलं.

"ते येऊन तुम्हाला पाहून गेले. पण—" ती बोलली.

"पण काय?"

"दाभाडे आले आहेत—"

"कसे—?"

"त्यांच्या दंडात गोळी लागली आहे." सुलभाने उत्तर दिले आणि दाभाडे आनंदजवळ येऊन म्हणाल, "साहेब, मी बरा हाय. पण दाभाडीचा निकम अमर झाला!"

"अरेरे! मग घात झाला. पण तुम्हाला हे कसं समजलं?" आनंदने विचारले.

"दलपतनं सांगितलं. त्यो बी त्याच दिवशी जखमी होऊन आलाय—" दाभाडेनं उत्तर दिले.

"मग फारच वाईट झालं." आनंद कळवळून म्हणाला, "भारतीय सैन्य एका

दिलदार सैनिकाला अंतरले—''

"कृपा करून तुम्ही बोलू नका ना—'' सुलभा म्हणाली आणि आनंदनं डोळे झाकून घेतले.

कॅप्टन आनंदचे जीवित तराजूत हेलकावे घेत होते. अचानक त्याची शुद्ध जात होती आणि पुन्हा तो शुद्धीवर येत होता. एखादेवेळी त्याच्या तोंडातून रक्त पडत होतं आणि त्यामुळे सुलभाच्या गळ्याला तात लागला होता.

## १५

जेव्हा भारत देश परवशतेच्या चिखलात खितपत पडला होता नि इंग्रज इथं राज्य करीत होते आणि पाकिस्तानचा जन्म झाला नव्हता त्या काळी उर्दूचे एक प्रख्यात कवि इक्बाल यांनी आपल्या एका काव्यात म्हटलं होतं,

*गुलामीमें न काम आती आहे तदबीर न शमशीर।*
*जो हो यकीं पैदा तो कट जाती है जंजीरे॥*
*सितम है मशवरे ये हो रहे आसमानोमें।*
*हमे बरबाद कर डाले हमारे आशीयनोमें...॥*
*वतन की फिक्र कर नादां, मुसीबत आनेवाली है।*
*तेरी बरबादीयोंके मशवरे है आस्मानोमें...॥*
*न समजोगे तो मिट जावोगे ऐ हिंदोस्तानवाले।*
*तुम्हारी दास्तां तक थी न होगी दास्तानोमें...॥*

परंतु पाकिस्तानी धर्मांध पुढाऱ्यांना डॉ. इक्बालचा कधीच विसर पडला होता. ते भारत-पाक युद्धाची व्याप्ती वाढवीत होते. त्यांनी पिसाट होऊन द्वारकेवर तोफा डागल्या. जोधपूरवर बाँबहल्ला केला. मंदिरे, मशिदी नि शाळा यांवर ते आकाशातून आग ओतू लागले. त्यांनी जो संघर्ष भारतावर मुद्दाम लादला होता त्यात त्यांचा एक अघोरी अंदाज होता. आपण चढाई करताच भारतातील सर्व मुसलमान बंडाळी करतील, भारताची पिछाडी झोडून काढतील. नि मोडतोड करून भारतीय फौजांचे पायच तोडतील आणि मग आमचे पाय दिल्लीला लागतील!

पण उलट झाले. त्यांच्या दुर्दैवानं त्यांना दगा दिला. त्यांचे सर्व मनसुबे व्यर्थ ठरले. भारताच्या पिछाडीवर काहीच घडले नाही. भारत एकजीव होता...एकरूप होता...आणि संघटित होता. "कारण वतन की फिक्र कर नादां मुसीबत आनेवाली है'' हे भारतीय जनतेला, तिच्या महान कामगारवर्गाला, शेतकऱ्यांना नि सैनिकांना माहीत होतं नि म्हणून

भारताची आघाडी नि पिछाडी पोलादाप्रमाणे कणखर झाली होती.

आणि पाक सैन्यावर कठीण प्रसंग गुदरला होता. ते मार खात माघार घेत होते. जखमी लांडग्यासारखी त्यांची अवस्था झाली होती. ते स्वतःच्या जखमा चाटीत पळत होते. परिस्थितीनं त्यांच्यावर सूड घेतला होता.

फिरोजपूर-लाहोर आघाडीवर घनघोर संग्राम चालू होता.

कॅप्टन तळेगावकर आपल्या मोर्चावर सह्याद्रीप्रमाणे अचल उभा होता. त्याची भरलेली स्वयंचलित बंदूक नि त्वेषाने पेटलेली नजर आता लाहोरवर रोखली गेली. परंतु एकाएकी कॅप्टन आनंदची आठवण होत होती. तो मनात म्हणत होता, 'कॅप्टन आनंद, दाभाडे, निकम, दलपत फार लढले! ते सर्व जवळ होते तेव्हा वाटत होते मृत्यू आपल्या थाऱ्यालासुद्धा उभा राहणार नाही.

पण आता ते दुरावले आहेत. अगदी शेवटच्या क्षणापर्यंत ते आपल्या कर्तव्यापासून रतीभरही ढळले नाहीत की चळले नाहीत. आज आनंद दवाखान्यात मृत्यूशी झुंज घेत आहे. निकम तर कधीच गेला. तो दलपत आता खंदकात उतरू शकणार नाही आणि दाभाडेचा हात मोडला आहे. तरीही तो निर्भय आहे. तो त्या दिवशी सहज म्हणाला, "आता आलो की कराचीलाच आपला डिफेंस लावणार आहे!" केवढा हा दाभाडेचा दुर्दम्य उत्साह! माणसानं असंच असावं...!

'आता एकच सद्भावना आहे नि ती म्हणजे सुलभाचं आनंदविषयी विपरीत पत्र येऊ नये! नाही तर माझ्या मस्तकावर वज्राघात होईल. तो माझा बहादूर दोस्त जगावा नि तो जगलाच पाहिजे. कारण या देशाला त्याची फार गरज आहे.'

एकाएकी आकाश काळवंडले. आकाशात ढगांनी गर्दी केली नि सूर्य ढगात शिरला. रणभूमीचं भेसूर वातावरण अधिकच भेसूर झालं आणि पाकिस्तानी तोफखाना पेटला.

त्याबरोबर भारतीय सैन्यात एकच आरोळी झाली — हल्ला ऽ ऽ

आणि त्याच क्षणी हिंदुस्थानी तोफखाना दणाणू लागला. त्यामुळे धरणीकंप झाल्याचा भास झाला. आस्मान डगमगले, वारा कोंडला आणि दोन्हीकडून एकमेकांवर अग्निवर्षाव होऊ लागला. आकाशात विमानावर विमानं मारा करू लागली. कित्येक जळत...गिरक्या घेत खाली येत होती. तर कित्येक पेटत, जळत...पळत होती.

कॅप्टन तळेगावकर आपले जवान घेऊन आपला मोर्चा पुढं पुढं रेटीत होता. त्यांच्याभोवती ईर्षेचा सागर खवळला होता. तिथं एकच गर्जना गगनाला भिडत होती.

'शिवाजीमहाराज की जय...'

आणि त्या रणनादात भारतीय सैनिकांची मनं पोलादासारखी कणखर होत होती. तीनतीन पॅटन रणगाडे उध्वस्त करून धारातीर्थी पतन पावणाऱ्या अब्दुल

हमीदसारखे एक एक आगळे, रणधुरंधर प्राण पणाला लावून आपल्या मातृभूमीचे उपकार फेडीत होते.

पाकिस्तानची दोस्त म्हणविणारी काही पक्षपाती राष्ट्रे तो संघर्ष पाहत होती. सुरुवातीस त्यांना वाटत होतं, की लवकरच पाक सैन्य दिल्लीच्या राजपथावर विजयी परेड करील. परंतु आता लाहोर धोक्यात आलेलं पाहून, ती राष्ट्रे युद्धबंदीचा विचार करीत होती. नाही...पाकिस्तानची अब्रू धुळीला मिळेल अशी त्यांची खात्री झाली होती.

दोन दिवसात युद्धबंदी होणार, अशी बातमी पाकिस्तान लष्करात प्रथम पसरली होती. त्यामुळे त्यांच्या जीवात जीव आला होता आणि युद्धबंदी होईपर्यंत भारतात करता येईल तेवढा विध्वंस करायचा असा पाकिस्तानी सैन्याचा विचार झाला होता नि ते आपले उरलेले सर्व सामर्थ्य रणात लोटीत होते.

आणि त्याच वेळ युद्धबंदी होणार ही खबर भारतीय सैन्याला समजली होती आणि युद्धबंदी होईपर्यंत शत्रूला जेवढे बडवता येईल तेवढे बडवायचे असा भारतीय सैन्यानं निश्चय केला होता.

रणधुमाळी अंतिम पर्वात पोहोचली होती.

आणि... तो दिवस उगवला.

राष्ट्रसंघाच्या सुरक्षामंडळानं एकदाची ती युद्धबंदी जाहीर केली. दोन्हीकडील फौजा जिथं होत्या तिथं थांबल्या. तोफांची तोंडं बंद झाली आणि तो भीषण संघर्ष शांत झाला!

कॅप्टन तळेगावकर छावणीकडे निघाला होता. सुलभानं आनंदची खुशाली कळवली नाही, त्याचे काय झाले असेल, जर त्याची प्रकृती ठीक असती तर आतापर्यंत एक–दोन तरी पत्रं आली असती. मग सुलभानं पत्र कां लिहिलं नाही? पुढील विचार त्याला असह्य झाला आणि त्याचवेळी पत्र वाटणारानं दोन पत्रं त्याच्या हातात दिली. त्यात एक सुलभाचं होतं. ते पाहून कॅप्टन तळेगावकराच्या काळजाचं पाणी झालं. त्यानं घाईघाईनं प्रथम ते पत्र वाचले.

सुलभानं लिहिलं होतं,

*प्रिय कॅप्टन तळेगावकर यांना,*

*स.न.वि.वि.*

*आता कॅप्टन आनंदर बंगलोर येथे लष्करी दवाखान्यात खुशाल आहेत. त्यांची पुष्कळच प्रकृती सुधारली आहे नि जखमही भरत आहे. ते आता माझ्यापुढं बसले आहेत आणि ते तुम्हाला म्हणत आहेत की, एकदा तुम्हाला भेटावं असं वाटत आहे. तरी कृपा करून भेटा. मी एक-दीड महिन्यात घरी जाणार आहे. कारण माझ्याबरोबर माझा घरचाच डॉक्टर आहे. कधी भेटणार ते लवकर कळवा. फिरोजपूर –लाहोर आघाडीवरील संघर्ष*

*संपला. नि त्याचबरोबर माझ्या जीवनातील सर्व संघर्ष संपले आहेत. आता एकदा तुम्हाला भेटावं, खूप बोलावं ही एकच इच्छा उरली आहे.*

*आणि कॅप्टनसाहेब, मी सुलभा तुम्हाला एक विनंती करीत आहे की, आपण आपली एक महिन्याची सुट्टी माझ्या घरी घालवावी.*

*आपली*

*— सुलभा आनंद*

ते पत्र वाचून तळेगावकरला फार आनंद झाला. त्याचं हृदय भरून आलं. मग त्यानं दुसरं पत्र फोडलं. ते ललिताचं होतं. तिनं लिहिलं होतं—

*प्रिय कॅप्टन तळेगावकर यांसी —*

*स.न.वि.वि.*

*मी आज फार मोठं धाडस करून 'प्रिय' ही दोन अक्षरं लिहिली आहेत. त्याचं कारण आता मला आपल्या एकलकोंड्या जीवनाचा कंटाळा आला आहे. मी इथं एकटीच आहे. कॅप्टन आनंद आणि सौ. सुलभाताई यांचा गोड सहवास नि तुमचं निर्मळ बोलणं याला मी अंतरले आहे. तुम्ही सर्व दुरावल्यामुळे मी फारच अस्वस्थ मन:स्थितीत दिवस काढीत आहे. आता इथं फक्त नाईक दाभाडेच आहेत आणि एक विनंती करीत आहे, की आपण एकदा मला भेटावं. तरी मी आपल्याकडे येऊ की आपण इकडं याल, लवकर कळवा.*

*आपली नम्र,*

*— ललिता देशमुख*

ती दोन पत्रं वाचून तळेगावकरच्या हृदयात आनंद मावेनासा झाला, त्यानं त्याचवेळी कॅप्टन आनंदला पत्र लिहिलं—

*प्रिय कॅप्टन आनंद नि सौ. सुलभाताई यांना —*

*जरी फिरोजपूर आघाडीवरील संघर्ष संपला, तरी आपल्या खुशालीचं का कळत नाही हा एक संघर्ष माझ्या हृदयात कायम उरला होता, तोही आज तुमचे पत्र मिळताच संपला आहे. आज मला किती आनंद झाला आहे ते मी लिहू शकत नाही. मला रजा मिळताच मी एक महिना आपल्या घरी मुक्काम ठोकून बसणार आहे. तो दिवस कधी येतोय याची मी वाट पाहात आहे.*

*आज ललिताचेही पत्र आले आहे. तिला मी स्वत:च जाऊन भेटणार आहे. दाभाडेही खुशाल आहे. त्यालाही मी भेटणार आहे. आणि तुमच्या घरी येत आहे. तुम्हां उभयतांना प्रणाम.*

*तुमचा स्नेही*

*— तळेगावकर*

कॅप्टन आनंदला पत्र लिहून तळेगावकर ललिताचा विचार करीत शांत पडला.

हवाईदलाचं एक विमान कॅप्टन आनंद आणि सुलभा यांना घेऊन आपल्या जंगी भरारीनं कऱ्हाडकडे निघालं होतं. आनंदला दवाखान्यातून रजा मिळाली होती आणि वरून पत्र आलं होतं की, 'आपल्या आघाडीवरील कर्तबगारीची नोंद घेण्यात आली आहे. आपण भरपूर विश्रांती घ्यावी. गरज पडेल तेव्हा कळवू.' यामुळे आनंद निर्धास्त झाला होता. आता त्याला आई नि सुरेश यांना भेटायची ओढ लागली होती.

आणि सुलभा कधी नव्हती इतकी आज सुखावली होती. तिच्या हृदयातील एक मोठा संघर्ष नाहीसा झाला होता नि तिच्या डोळ्यापुढं आता कृष्णाबाई, सुरेश, शेवंताबाई, जाई, बाबा पाटील, काशिनाथ यांच्या मूर्ती तरळत होत्या. ती हसत होती आणि एकाएकी गंभीर होऊन मनात म्हणत होती—मी किती भयाण संकटातून मुक्त झाले. केवढे हे आश्चर्य—

आणि विमानानं एक प्रचंड झेप घेऊन कऱ्हाड विमानतळावर पाय टेकले.

काशिनाथ गाडी घेऊन आला होता. त्याच्याबरोबर दुसऱ्या पाच गाड्या भरून गावकरी आले होते. त्यांनी दारातच आनंद नि सुलभा यांना हार घालून त्यांचं स्वागत केलं.

आणि आनंदची गाडी वेशीत आल्याबरोबर बँड, ताशा, हलगी या वाद्यांनी वातावरण दुमदुमू लागले. गावात आरास केली होती. सर्वत्र तोरणं भिरभिरत होती. जागोजाग केळीचे खुंट उभे केले होते. एक मांडव घालून सभेची तयारी केली होती.

आनंदला पाहून कृष्णाबाई आनंदाश्रू ढाळू लागली. सुरेश आईच्या गळ्यात पडला. शेवंता, बाबा पाटील, जाई यांना आनंद झाला.

कृष्णाबाईनं मीठमोहऱ्या उतरून सुलभाला घरात नेली नि तिला पोटाशी धरून म्हणाली,

"शहाणी माझी बाई! आपलं कुंकू घेऊन आली."

आनंदला येऊन दोन दिवस झाले आणि तिसऱ्या दिवशी कॅप्टन तळेगावकर नि ललिता ही जोडी आनंदच्या दारात येऊन दाखल झाली! आनंदनं तळेगावकरला मिठी मारली; आणि सुलभानं ललिताला कवटाळून घरात नेली. मग तिच्या गळ्यातील मंगळसूत्र पाहून आश्चर्यानं विचारलं—

"ललिता, हे ग काय?"

"हा तुम्ही सांगितलेला एकलकोंडेपणावरचा जालीम उपाय!" ललिता हसून म्हणाली, "मग काय करू? साहेबांना शरण गेले नि बांधला हा गंडा—"

"चांगलं केलंस!" सुलभा तिला मिठी मारून म्हणाली, "आता तू निश्चित सुखी होशील—"

त्या दिवशी कृष्णाबाईचं घर आनंदानं भरलं होतं.

दोन बैलगाड्या कृष्णानदीकडे निघाल्या होत्या. पहिल्या गाडीत कृष्णाबाई, सुलभा, ललिता बसल्या होत्या आणि दुसऱ्या गाडीत शेवंताबाई आणि जाई यांना घेऊन बाबा पाटील बसला होता.

आनंद मोटारसायकल चालवीत होता आणि त्याच्यामागे तळेगावकर बसला होता. ती सर्व मंडळी कृष्णानदीच्या घाटाकडे निघाली होती.

घाटावर भाविकांनी गर्दी केली होती. तिथं जाताच सुलभाचे डोळे भरले आणि ती रडू लागली. सर्वांनी आंघोळी केल्या आणि सुलभानं कृष्णाबाईची पूजा केली आणि तिच्या डोळ्यात अश्रू पाहून आनंदनं विचारलं—

"सुलभा, काय झाले, का रडतेस?"

सुलभानं आनंदचं पत्र काढून त्याला दाखविले. 'या संघर्षात जर माझे बरे-वाईट झाले तर माझे प्रेत गावी न्यायचे नि त्याची पुढील व्यवस्था कृष्णाकाठी करायची आणि हे सर्व तूच करावे' ही अक्षरं दाखवून तिनं डोळे पुसले आणि मग ते पत्र हळूच कृष्णानदीच्या पात्रात सोडून दिलं.

आणि त्याचवेळी दाभाडेनं येऊन आनंद नि तळेगावकर यांना सॅल्यूट ठोकला त्यावेळी त्यानं अंगात मलमलचा सदरा घातला होता. डोकीला रेशमी पटका बांधला होता, नि हातात कुऱ्हाड घेतली होती. त्याला पाहून सुलभा, आनंद, तळेगावकर नि ललिता यांना आनंद झाला. आनंदनं दाभाडेला मिठी मारली. सुलभा नि ललिता डोळे विस्फारून त्याचा तो थाट पाहू लागल्या. तळेगावकर त्यांच्यापुढं ताठ उभा राहून म्हणाला,

"काय नाईक, कराचीला डिफेंस लावायचा सोडून इकडं कुठं?"

"माझ्या एका राजीबाईचं लग्न केले!" दाभाडे सुलभावर बोट रोखून म्हणाला, "आता दुसऱ्या राजीबाईचं लग्न हाय. ते मी करून परत जाणार हाय. नि परत पाकिस्ताननं गडबड केली तर माझी डिफेंस कुठं लागंल ते बघा! पर माझ्या राजीबाईच्या लग्नाला तुम्ही आलंच पाहिजे—"

"दाभाडे, तुम्ही आज माझ्या घरी यायचं. चला—" सुलभा बोलली आणि बोलत बोलत दाभाडेनं चिरूट पेटवला नि आनंदबरोबर शेवरवाडीची वाट चालू लागला.

आकाशात चांदणं फुललं होतं. अनंतकोटी चांदण्यांच्या गर्दीतून चंद्र निघाला होता. त्याच्या चंदेरी प्रकाशात सृष्टी उजळली होती. वातावरणात एक आगळा उल्हास भरला होता.

अंगणात कृष्णाबाई, आनंद, सुलभा, तळेगावकर, ललिता, सुरेश नि दाभाडे ही मंडळी बोलत बसली होती.

तिथं जुन्या आठवणींना नवा उजाळा आला होता. तिथं हास्याच्या चंद्रज्योती उजळत होत्या. त्या सर्वांची मनं आनंदानं भरली. आता कुणाच्याही मनात कसलाच संघर्ष उरला नव्हता.

सुलभा वरचेवर कॉफी करून आणीत होती आणि दाभाडे चिरूट पेटवून बोलत होता. तो म्हणाला,

"तुमी सारी शाणी माणसं हायसा. आता माझं वाईच ऐका. मी फिरोजपूर आघाडीवर जाऊन परत तुमच्या अंगणात येऊन बसेन असं मला कधीच वाटलं नव्हतं—"

"दाभाडे, तुम्ही फिरोजपूर आघाडीवर जाऊन आलात आणि कॅप्टन आनंद कुठं जाऊन आले आहेत?" तळेगावकरानं विचारलं.

"छा! छा! त्यांनी दांडगा पल्ला मारला!" दाभाडे म्हणाला, "आनंद साहेबानं थेट सरगात जाऊन परत सातारा गाठलाय!"

आणि ते ऐकून ती सर्व मंडळी मोठ्यानं हसली.



# फकिरा

१

सूर्य मावळला होता. त्याचा किंचित प्रकाश पश्चिमेच्या किनारीवर राहून गेल्यामुळं एक गुलाबी धांदोटी पसरली गेली होती. त्याखाली लख्ख पोलादी रंग दिसत होता. तिथं ती सूर्य बुडाल्याची खूण उमटली होती. बाकी अंधाराची चढाई सर्व जग, तो खोरा व्यापीत होती. वारणेपासून कृष्णेपर्यंतचा तो सलग सुपीक प्रदेश अंधकारमय होत होता. सूर्यानं सर्व कलांनी जग जितकं लखलखीत केलं, तितकंच अंधार काळं करू लागला. प्रकाशामागं अंधार नि अंधारामागं प्रकाश हे चक्र गतिमान होत होतं.

वाटेगावचं अस्तित्व नाहीसं झालं. ती एका जागी बसलेली बाराशे घरं अंधाराच्या लाटांनी गडप केली. त्या गावाच्या आजूबाजूचे माळ, तो सात दरे असलेला सह्याद्रीचा प्रचंड डोंगर अंधारात बुडाला. गावाच्या अस्तित्वाला अदमासाची गरज भासू लागली. तांबखडीवरून आलेली ती गाडीवाट गावात शिरली होती. ती विष्णुपंत कुलकर्ण्यांच्या भव्य वाड्यापुढून चावडीकडे वळून मग शंकरराव पाटलाच्या वाड्याला वळसा घालून महारांच्या थळात सरळ झाली होती. तसंच पुढं जाऊन मांगवाड्याच्या जवळ असलेल्या प्रचंड चिंचेखाली गेलं, की मांगांच्या घराकडे वळावं लागत होतं. तेथून ती गाडीवाट उगवतीला जाऊन माळानं, पांदीनं नागमोडी वळणं घेत शिगावात शिरली होती. वाटेगाव ते शिगाव हे चार मैलांचं अंतर त्या गाडीवाटेनं सहा मैलांची कैक वळणं घेऊन संपवलं होतं. ती वाट आज अंधारानं पुसून काढली होती.

हळूहळू पावसाळी वारं उठलं आणि भन्नाट धावत सुटलं. आकाशात काळ्या ढगांनी गर्दी केली. पाण्यात मासा पोहावा, तशी ढगात वीज सळसळू लागली. विजेच्या प्रखर प्रकाशात आकाश कोसळण्याच्या बेतात आल्यासारखं दिसू लागलं. अक्राळविक्राळ आकृत्या करून ढग गिरक्या घेऊ लागले. वारा त्या ढगांना चेंडूप्रमाणे टेपलू लागला.

गावात सामसूम झाली. सर्व गल्ल्या निर्जन भासू लागल्या. मिणमिण जळणारे दिवे हळूहळू डोळे झाकू लागले. कुत्री मुकी झाली. सर्वत्र नि:शब्दता नांदू लागली. भित्रं वातावरण उदास होऊन उभं राहिलं. गाव हूं का चूं करीनासं झालं.

शंकरराव पाटील एकटाच जोत्यावर बसला होता. कोणी तरी यावं आणि आपल्याशी

बोलत बसावं, असं त्याला वाटत होतं; पण किती तरी वेळ कोणीच येत नव्हतं, म्हणून तो चिडला होता. त्यानं आपले दोन्ही गुडघे पोटाशी आवळून धरले होते आणि स्वत:ला मंद झोके देत तो समोरच्या वाटेकडे टक लावून पाहत होता. येणारा-जाणाराचा सासुंद घेण्यासाठी त्यानं आपले कान टवकारले होते, पण पाटलाशी बोलत बसायला कोणीही येत नव्हतं. दारं बंद करून लोक केव्हाच अंथरुणावर आडवे झाले होते. त्याचीच पाटलाला चीड आली होती. जन्मभर कष्ट करून शेवटी मरायचं, हे त्याला पसंत नव्हतं. माणसानं कसं आनंदात असावं, खेळावं, बोलावं आणि राबावं, असं त्याचं मत होतं. उद्याच आषाढ निघत होता. उद्या शिगावात जोगणीची जत्रा भरणार होती. शिगावच्या बाजीबा खोताचा त्याला हेवा वाटत होता.

शिगावची ती जोगणीची जत्रा त्या खोतानं भरवली होती. आपल्या तरुणपणी त्यानं काळगावच्या जोगणीदिवशी उभ्या गावाशी कलागत करून ती जोगणी जबरीनं आणली. त्या दिवसापासून काळगावची जोगणी जत्रा बंद पडून ती शिगावात सुरू झाली होती. जर बाजीबा काळगावच्या लोकांना सापडला असता, तर त्याचं त्यांनी शिर कापून वेशीला बांधलं असतं; पण बाजीबा जबर माणूस. म्हणून तर शिगावची सारखी भरभराट होत आहे. लोक एका वर्षात तीन जत्रा करीत आपला संसार चालवीत आहेत आणि —

— आणि हे आपलं गाव! इथं काहीच नाही. दिवस बुडाला, की शब्द ऐकू येत नाही. माणूस दिसत नाही. खेळ नाही, तमाशा नाही, काही नाही! बारा महिन्यात एक जत्रा — आणि तीही मढ्याला माणसं जमावी, तशी. एवढा मोठा गाव असून काय कामाचा?

पाटील विचारांच्या तंद्रीत सापडला होता आणि मग पुन्हा भानावर येऊन ते विचार झटकीतही होता. एवढ्यात समोरच्या वाटेवर घोड्याच्या टापा वाजल्या. पाटील कानोसा घेऊ लागला, तोच ते घोडं मोठ्यानं खेकाळलं. त्याचा आवाज त्या शांत रात्री दूरदूर गेला आणि लगेचच पाटलाचं घोडंही खेकाळलं. पाटील रोखून पाहत म्हणाला, ''कोण चाललंय ते?''

''मी हाय, राणूजी मांग.'' राणोजी घोड्यावरून खाली उतरून म्हणाला.

पाटलानं आग्रहाच्या सुरात उद्देशून त्याला म्हटलं, ''ये की, पान खाऊन जा. रात केलीस?''

''वाईच रात झाली.'' आकाशात पाहत राणोजी तक्रारीच्या सुरात म्हणाला, ''आबा, पाऊस उठलाय.''

''ये, वारा सुटलाय. पाऊस येत नाही.'' पाटलानं निर्वाळा दिला आणि लगाम ओढीत राणोजी जोत्याजवळ येऊन एका दगडावर बसला.

''अजून निजला न्हाय? का जागताय?'' राणोजीनं विचारलं.

"काय करू? नीजच लागंना!"

"का? काय झालं?"

"काही नाही. उदास वाटतंय. गावात रग नाही." पाटील मनातले विचार बोलू लागला. "गावात जीवच उरला नाही. दिवस बुडाला, की गाव जाग्यावर नसतो."

"मग काय करावं त्यानं? दमूनभागून निजतोय."

"इतर कोण काय दमत नाही? का त्यांचा संसार नाही?" पाटील म्हणाला, "त्या शिगावची माणसं का दमत नाहीत? पण एका वर्षात तीन जत्रा करून संसार करतायत ती."

"त्यांच्या गावात जत्रा हायत्या, म्हणून ते करत्यात. आपुन काय करावं?"

"जत्रा काय आपोआप भरत नसत्यात. त्या भरवाव्या लागत्यात. उद्या आपुन जत्रा भरवली, तर का कोण नको म्हणणार आहे? का कोण हात धरणार आहे?"

"मग का भरत न्हाई?"

"कशी भरणार?" पाटील मधेच म्हणाला, "दिवस बुडाला, की कुत्रं फिरत नाही गावात. मग जत्रंचा विचार कोण करणार? आजूबाजूच्या इंग्रजी हद्दीत लोक रंगलाल आहेत. त्या शिगावात उद्याच जोगण्या निघणार. बाजीबा खोतासारखा एखादा बहाद्दर आमच्या गावात निपजत नाही, तोपर्यंत इथं जोगण्या भरणार कशा? जोगणी त्यानं भरवली."

"बाजीबानं? ती कशी?"

"बाजीबानं काळगावच्या जोगण्यात जाऊन दंगल केली आणि जोगणीच्या हातातली वाटी पळवून आणून आपल्या गावची जत्रा वाढवली. तसा वीर आमच्या गावात कोण आहे?"

"का न्हायती? पंतावानी नि तुमच्यावानी मानसं वाघाला दावं लावतील की!"

"वाघाला दावं लावणं सोपं आहे, पण उभ्या गावाशी लढत देऊन जोगणी आणणं सोपं नाही. त्यासाठी डोंगराएवढं काळीज हवं आणि ते माझ्याजवळ नाही. ते विष्णुपंत— ते कायद्याच्या कोपरखळ्या देण्यात पटाईत आहेत. जीव गेला, तरी ते चाकोरी सोडणार नाहीत."

"मी उद्या जोगण्या बघाय शिगावला जाणार हाय." राणोजी मधेच म्हणाला, "तुमचा काय बेत?"

"मी कधीच कुणाच्या जत्रंला जात नाही." पाटील खिन्न स्वरात म्हणाला, "लोकांच्या आरतीनं ओवाळून घेणं मला बरं वाटत नाही. आपल्या घरात अंधार नि आपण उजेडात मिरवायचं, हे मला रुचत नाही." असं म्हणून पाटलानं राणोजीला पान दिलं.

दोघांनी पान खाल्लं आणि राणोजी उठण्याचा विचार करू लागला, तो पाटील

म्हणाला, "या पांढरीला बाजीबा खोतासारखा माणूस पाहिजे, तरच या गावची भरभराट होईल. लौकिक वाढेल. बाजीबानं शिगावावर उपकार केले, तसे या गावावर उपकार करणारा माणूस इथंच जन्मला पाहिजे."

हे ऐकून राणोजी एकाएकी गंभीर झाला. त्याचं मन उगीचच बावरं झालं. हातातील लगाम पिरगाळीत तो अंधारात पाहू लागला. वाटेगाव ते शिगाव यांच्यामधील असलेला माळ, ती नागमोडी वळणं, ती पांद, मधे असलेले निवडुंगाचे डवंगे — सारं सारं त्याच्या डोळ्यांपुढं तरळू लागलं आणि पाटील म्हणाला,

"जा आता. दौलती वाट बघत असंल."

राणोजी उठून उभा राहिला. तो तसाच विचार करीत निघाला. घोडं त्याच्यामागून चालू लागलं. तो थळात आला. कोंडिबा महार अंधारात बसून भजन म्हणत होता. तो दिसत नव्हता. फक्त त्याचा घोगरा आवाज आणि त्याचा तो ताऱ्या एवढंच ऐकू येत होतं. त्या भजनानं राणोजी भानावर आला. त्यानं समोर मांगवाड्याकडं पाहिलं आणि घोड्यावर उडी घेतली.

गावापासून एका हाकेच्या अंतरावर असलेला मांगवाडा निपचित पडला होता. पाच पुरुष उंच निवडुंगानं त्या पन्नास घरांना वेढा घातला होता. त्या निवडुंगाची दोन टोकं त्या गाडीवाटेजवळ त्या चिंचेच्या झाडाखाली येऊन जुळत होती. तिथंच मांगवाड्यात जाण्याची वाट होती.

त्या निवडुंगात ती घरं कशीबशी उभी होती. ती उसाच्या पाल्याची घरं भेदरल्यासारखी भासत होती. त्यांच्या डोकीवरचं आकाश आता काळवंडलं होतं, त्यामुळं त्यांचं धाबं दणाणलं होतं. मधूनच एखादं घुबड घूत्कारत होतं. मधेच पिंगळा किजबिजत होता. अस्सल नाग व्हला पक्ष्याची शिकार करण्यासाठी सरपटत होते, तर त्यांच्याशी हाडवैर बाळगणारी मुंगसं त्या नागावर रापत होती. काही ठिकाणी त्यांच्या झटापटीही सुरू झाल्या होत्या. सापाचं गुरगुरणं आणि मुंगसाचं चिरकणं ऐकून मांगांची पोरं गर्भगळित होऊन आयांच्या कुशीत अधिकाधिक शिरत होती. पसरलेले पाय पोटाशी घट्ट धरीत होती. मृत्यू त्यांच्या उशापायथ्याला वळवळत होता.

तिथं किती माणसं आहेत, याची गावाला माहिती नव्हती. ती काय खातात, याची कोणाला काळजी नव्हती. मात्र मांगवाडा त्या निवडुंगात आहे, हे सर्वांना माहीत होतं. ते सर्व सनदशीर शिपाई आहेत, गावाच्या राखणदारीची धुरा त्यांच्या मानेवर असून ते गावाचे नोकर आहेत, हे कायद्यानंही मान्य केलं होतं. गावात नि रानात जे काही होईल, त्याची जबाबदारी त्या मांगांवर होती. एक जरी पेंढी इकडची तिकडे गेली, तरी सनदशीर

शिपाई म्हणून त्यांना जाब विचारला जात होता. ते दर दसऱ्याला मानाची तलवार पुजत. त्या वस्तीत दारिद्र्य आणि तलवार यांचं ऐक्य जगावेगळं झालं होतं.

ज्या वेळी त्यांना इनाम म्हणून जमीन दिली, त्या वेळी अवघी तीन घरं होती; पण आता ती पन्नास झाली होती. जमीन पुरत नव्हती. सनदशीर शिपाई हा शिक्का कायम होता. शेतकीची अवजारं नव्हती आणि मांग पिचत होते.

आकाशातून पावसाच्या धारा लागल्या, की मांगाच्या डोळ्यातून आसू गळू लागत. मजुरीची दारं बंद होऊन भुकेची आग पेटे. पोरं रडू लागत. म्हातारी टाचा घासू लागत. तरणी कंबर बांधून पाणी पिऊन दिवस रेटीत. जुलमानं जगत. भीक मागणं अपमान मानणारी ही जात खुशाल भुकेकडे पाहत विचार करी. विचार करकरून दमे आणि मग तिच्यापुढं एकच मार्ग स्पष्ट होई.

सर्वजण एकत्र जमून हत्यारं काढीत आणि भर पावसात, भर मध्यान्ह रात्री घराबाहेर पडत. दूरदूर दुसऱ्याच्या शिवारात शिरत आणि जे हाती लागेल ते ओरबाडून अगदी जिवावर उदार होऊन लुटत नि परत येऊन त्या भुकेच्या जबड्यात लोटीत. ही तिथं वहिवाट पडली होती. एक दिवस नव्हे, तर दर वर्षी सुगी येईपर्यंत पावसाळ्यात दररोज त्यांना चोर बनावं लागत होतं. काहींचा सवयीनं तो धंदाच बनला होत. दारिद्र्यात वाईटाखेरीज दुसरं काय जन्मणार?

पण त्या निवडुंगात माणसं मात्र दणदणीत निपजत. एकाआगळी एक. बळानं, शरीरानं, हिंमतीनं तराजूत घालून जोखून घ्यावी, अशी ती माणसं निपजत. निर्जीव कोळशाचा निखारा फुलावा किंवा पडीक जमिनीत एखादं चंदनाचं झाड उगवावं, तशी ती वस्ती वाढत होती. दौलती मांग, आप्पा मांग, बहिरू मांग अशी वयानं पोक्त झालेली किती तरी माणसं त्या वस्तीत कर्ती होती. ते मांगवाड्यात आणि गावातही ढाण्या वाघासारखे गरजत. मी मी म्हणणारे त्यांना वरमत. त्याचप्रमाणे दौलतीचा राणोजी, बळी, पांडू, दगडू, निन्या, सावळ्या, गोंदा अशी तरणी पोरं तलवारीच्या पात्यासारखी वावरत.

दौलतीच्या वयानं आता पन्नाशी गाठीत आणली होती. त्याच्या रुबाबदार मिशीत आता पांढरे केस चमकत होते, पण त्याचा दणदणीत पीळदार देह टणक होता. त्यातील जुना वळ कायम होता. शिवाय आता त्याचा राणोजी हा कर्ता सवरता झाला होता. घर आणि सरकारी चाकरी तोच पाहत होता.

बायको राहीबाई, सून राधा, फकिरा आणि सहदेव हे दोन नातू आणि मुलगा राणोजी यांमुळं दौलतीचं घर आनंदानं भरलं होतं. तो आयुष्याचे उरलेले दिवस बेफिकीरपणे काढीत होता.

परंतु आज राणोजीला भलताच उशीर लागल्यानं तो बेचैन झाला होता. राहीबाई उदास होऊन बसली होती. फकिरा, सहदेव हे बापाची वाट पहात होते व तो अजून का येत

नाही, म्हणून बाहेर पाहत आज्याला विचारीत होते. त्यांना देवाच्या गोष्टी सांगून राहीबाई वेळ मारून नेत होती. राधाबाई चुलीपुढं बसून कण्या शिजवीत होती. कण्या रटरटत होत्या आणि दौलतीचे कान घोड्याच्या टापा ऐकण्यासाठी आतुर झाले होते. दहा वर्षांचा फकिरा केविलवाणा चेहरा करून म्हणाला,

"बाबा, गबऱ्या का यीना?"

"गबऱ्या आता पळत यील — तुज्या बापाला घिऊन."

एकदा पेंढार लोकांची टोळी गावदरीला उतरली होती. त्यांपैकी एका पेंढारानं आपल्या घोडीचं शिंगरू दौलतीला दिलं होतं. त्या शिंगराचा दौलतीनं प्रचंड घोडा केला होता. लहानपणापासून त्याला पोराप्रमाणं जपून त्याचंच नाव गबऱ्या असं ठेवलं होतं. तो गबऱ्या साऱ्या गावाच्या ओळखीचा झाला होता. फकिरा आणि सहदेव हे 'बाप कधी येणार' असं विचारण्याऐवजी 'गबऱ्या कधी येणार', असं विचारीत. त्यांचा जन्मदाता खरंच त्या गबऱ्याच्या हवाली असे. रोज गबऱ्या त्या चिंचेखाली येऊन घराकडे वळताच मोठ्यानं खिंकाळे. त्याबरोबर पोरं आनंदून उड्या मारीत. गबऱ्याचं खिंकाळणं म्हणजे त्यांचा बाप येणं असं समीकरण झालं होतं. गबऱ्याच आपल्या बापाला घेऊन जातो आणि सांजेला घेऊन येतो; म्हणून त्यांचं लक्ष राणोजीच्या ऐवजी गबऱ्याच्या वाटेकडे लागून राहत असे.

राहीबाईच्या गोष्टी 'हूं' म्हणून ऐकत बसलेली पोरं उगीचच 'हूं' म्हणत होती. त्यांचं सारं लक्ष गबऱ्याच्या खिंकाळण्यावर होतं.

एवढ्यात गबऱ्या चिंचेखाली येऊन वळण घेताना खिंकाळला : 'आलो आलो आम्ही!'

पोरांनी उठून उड्या मारल्या — आला गबऱ्या — आणि दारात येऊन गबऱ्या फुरफुरला. दौलतीनं लगाम धरून त्याला दावं लावलं. राणोजीनं तलवार पाखाडीत खोचली आणि पोरं बरगडीला बिलगली. राहीचा जीव भांड्यात पडला. राधा लाजली. चोरून पाहून मान फिरली. दौलतीनं गबऱ्याची खंदाडी घरात आणली. अमाप मक्याची कणसं चुलीकडं पळाली आणि दौलती म्हणाला,

"उशीर केलास?"

"झाला वाईच. पाटलानं थांबवलं."

"इजंवाऱ्याचं लवकर यायाचं." राहीबाई म्हणाली.

राधानं टवकारून पाहिलं. भाजलेली मक्याची कणसं घेऊन फकिरा व सहदेव बापाच्या दोन्ही मांड्यांवर बसून ऐकू लागले.

राधानं जेवणं वाढली. जेवता जेवता दौलतीनं बोलणं काढलं.

"काय म्हणीता पाटील?"

"काई न्हाय. शिगावच्या जोगण्याची कथा निघाली व्हती."

"पंतांची गाठ पडली का?"

"न्हाय. पर ही जोगणीची काय भानगड हाय, आबा?"

"भानगड कसली? त्यो बारा बलुत्यांचा खेळ हाय." दौलती सांगू लागला,

"— दोन बैती नवरानवरी व्हयाची नि त्येंची वरात काढायची. नवरीपाशी खोबऱ्याची वाटी असती. ती पिवळ्या फडक्यात असती. जर ती वाटी कुनी पळवली, तर त्या गावची जत्रा बंद व्हयाची आणि ज्या गावात ती वाटी जाईल, त्या गावात जोगणीची जत्रा भरायची, असा रिवाज हाय. पर वाटी पळवनारा आपल्या हद्दीत घावला, तर त्याचं डोस्कं मारायचा बी रिवाज हाय."

"खोबऱ्याच्या वाटीसाठी डोस्कं मारत्यात?" फकिरानं दौलतीकडे रागानं बघत विचारलं आणि दौलती म्हणाला, "ती नुसती वाटी न्हवं; ती त्या गावाची अब्रू असती."

ते ऐकून फकिरा राणोजीकडे वळून म्हणाला, "आन की गा, ती वाटी हिसकून!"

हे ऐकून सर्वच हसू लागले. राधा तर सर्वात मोठ्यानं हसली आणि मग हळूच म्हणाली, "बराच की हाईस. ती खोबऱ्याची वाटी खासील का?"

"हो हो. दे आणून. त्यात काई जड न्हाय." फकिरा गुरकला.

"आरं, पर वाटी हिसकनाराचं डोस्कं मारत्यात!" दौलती म्हणाला.

फकिरा कपाळावर आठ्या आणून बोलला,

"आबा, मारू दे डोस्कं — तू ये वाटी हिसकून."

फकिराचं हे बोलणं ऐकून पुन्हा घर हास्यानं भरलं. हा पोर आपला जाति-धर्म बोलत आहे, हे ऐकून राहीबाईला फारच आनंद झाला. ती हसत हसत म्हणाली, "दीस बुडला, की मुताय जायला ह्येची लंगुटी सैल व्हतीया नि म्हणं, मारू दे डोस्कं — घेऊन ये वाटी."

मग फकिरा वरमला. मुतायची भानगड म्हातारीनं चव्हाट्यावर आणली म्हणून तो नरम आला. राधा म्हणाली, "मग जा की. आण जा ती वाटी."

"थांब..." कणसाचा मका चावून तो म्हणाला, "मी आबाएवढा झालो, की आणूनच दावतो तुला."

राणोजीनं फकिराला जवळ ओढून पोटाशी धरलं. हसत हसत त्या सर्वांनी अंथरुणावर अंगं टाकली. फकिरा, सहदेव हे दोघे राणोजीच्या बरगड्यांना बिलगून झोपले. राणोजी मात्र जागाच होता. त्या दोघांवर दोन हात टाकून निश्चित पडून उद्याचा विचार करीत होता तो. त्याचं मन बेबंद त्याला घाबरवत होतं. ते कधी उठून पळत होतं, तर लगेच शिवारात शिरून भर जत्रेत हाणामारी करीत होतं. तर मध्येच गबऱ्यावर बसून भरधाव धावत होतं. घटकेत ते गप्प बसून विचार करू लागे :

जर आपण ती जोगणी आणली, तर या गावावर अनंत उपकार होतील. जे बाजीबानं केलं, ते एका मांगानं केलं, असं लोक म्हणतील. आपल्या गावात जत्रा भरेल. भोवतालचे लोक जत्रेत येतील. प्रत्येक माणूस म्हणेल — 'राणोजीनं ही जत्रा भरवली.' शंकरराव पाटील 'शाबास' म्हणेल. जग, जगलो तर पाठ थोपटील. आणि जर आपण... तर, तर नाव होईल. डंका वाजेल. गावासाठी गेला म्हणतील. मरण कधी तरी येणारच. ते जर जोगणी आणीत असता आलं, तर गावावर उपकार होतील. आपल्या अंगावरच्या जखमा गावाच्या काळजावरच्या मोहरा ठरतील. गबऱ्याच्या टापा कोरल्या जातील.

पण मग आई, आबा, फकिरा, साधू, राधा यांचं काय? ती कशी जगणार? म्हातारपणी त्यांना कोण? पोरं मोठी व्हायला दहा वर्षं हवीत. तोवर हे पाच जीव कसे जगणार?

काय होतंय त्यांना? जगतील ती! आपण नव्हतो, तेव्हाही माणसं जगतच होती की. पुढंही जगणार. आणि गावावर उपकार करणारा माणूस इथं जन्मला, याची पाटलाला खात्री वाटेल. विष्णुपंताला आनंद होईल.

राणोजी डोळे झाकून विचार करीत होता. हळूहळू अंधार निघून गेला. पहाट झाली. निवडुंगात पाखरं जागी झाली. त्यांनी किलबिलाट करीत पंखं झाडली. पूर्वेला अनंत रंगांच्या लकेरी उमटल्या. पाऊस घेऊन आलेल्या काळ्या ढगातून तेजोमय अरुण डोकावू लागला. त्याला पाहून कोयल हर्षभरित झालं — कुहू ऽ ऽ ऽ ते ऐकून आल्हाददायी वारा भिरभिरला आणि निवडुंग उजाळलं.

सृष्टीच्या गालावर स्मित तरळलं. वारणेपासून कृष्णेपर्यंत सारा खोरा प्रकाशमय झाला. गावाच्या पश्चिमेला असलेला तो सातदरा पर्वत छाती काढून उभा राहिला. सर्वत्र हालचाल सुरू झाली. निर्भयता अवतीर्ण झाली आणि आज शिगावची जोगणी आणायचीच, असा निर्धार करून राणोजी उठला.

दुपार फिरली. राणोजी शिगावला निघाला. फकिरा, सहदेव यांना काखेत घेऊन गाडीवाटेपर्यंत येऊन चिंचेखाली थांबला. दौलती तलवार आणि गबऱ्याला घेऊन आला. पोरांना खाली ठेवून राणोजीनं तलवार घेतली. सहा बोटं रुंदीचं ते लखलखीत पल्लेदार पातं, वजनदार मूठ, मुठीला वीतभर बरच्याचं फाळ. माशी बसली असती, तर ती कटून पडावी, अशी धार — अशी ती जंगी तलवार हातात येताच राणोजी भरकन उडून गबऱ्यावर बसला आणि दौलती म्हणाला,

"कुनासंगं भांडानतंटा करायचा न्हाय. दिसावर परतायचं."

राणोजीनं होकारार्थी मान हलवली आणि पूर्वेकडे तोंड केलं. गबऱ्या ढेंगा टाकीत

ओढीनं निघाला. पाठीमागून फकिरा, सहदेव एका आवाजात ओरडले,

"आबा -- आमाला पेढं आण ऽ ऽ"

राणोजीच्या पोटात कालवाकालव झाली आणि त्यानं नकळत गबऱ्याला टाच मारली. एकदम धडपडून गबऱ्या तुर्की चालीवर आला आणि निघाला. त्याच्या मानेला धनुष्याकृती बाक येऊन मयूरमस्तकीच्या तुऱ्याप्रमाणं त्याचं मस्तक नाचू लागलं.

सूर्य पश्चिमेला मंद गतीनं निघाला होता आणि राणोजी पूर्वेला निघाला होता. दोघांनाही परत फिरण्याची घाई झाली होती. राणोजीचा नजर आपल्या शिवारावर भिरभिरत होती. मेहनती खाऊन पडलेल्या जमिनीतून आता कुऱ्या फिरत होत्या. ओढ्या बांधून शेतकरी पेरणी करीत होते. ते काळ्या वावरात बी पेरीत होते; पण त्यांना खात्री होती, की याच मातीत हे बी जीव धरून उगवणार आणि काळ्याची जागा हिरवीगार पिकं शोभविणार. पुढल्या वर्षी याच जागी आपली मेहनत साकार होऊन उभी राहणार, म्हणून माणसं कष्टत होती. त्यांना पाहून राणोजी स्वत:शी म्हणाला, 'जे पेरावं ते उगवतं!'

शिगावची जोगणी वाजतगाजत निघाली होती. बारा बलुती झुलत होती. गावच्या गल्ल्या माणसांनी भरल्या होत्या. बायकापोरं थव्याथव्यानं उभी होती. पोळ्या खाऊन ढेकर देत गडीमाणसं धावपळ करीत होती. जोगणी भरली, की गावाचं दु:ख-दारिद्र्य टळतं, अशी श्रद्धा असलेली ती माणसं जोगणीला नमस्कार करून आऊक्ष मागत होती. आज जोगणी फिरून जाताच तमाशा उभा राहणार होता. उद्या सकाळी कुस्त्यांसाठी परगावची मंडळी येऊन आधीच दाखल झाली होती. खांद्यावर पिवळे लंगोट टाकून पहिलवान मिरवत होते. सर्वत्र माणसंच झाली होती. जागोजाग जोगणी आणि जोगा थांबत, लोक नमस्कार करीत आणि मग पुढं निघत.

गावातील ताकदवान माणसांनी जोगणीभोवती हाताला हात धरून कडं केलं होतं. त्यांच्या आसपास नंग्या तलवारी धरून धारकरी चालत होते. त्यांची करडी नजर सर्वत्र फिरत होती. तलवारीच्या सावलीतच ती जोगाजोगणीची मिरवणूक चालत होती. पुढं सर्व वाद्ये एका तालात वाजत होती. पिवळ्या कापडात गुंडाळलेली ती वाटी घेऊन जोगणी मंदगतीनं निघाली होती. तिच्या शेजारी न्हावी झडपीण होऊन सूप फिरवीत होती. चांभार लाकडी घोड्याला बोराटीचा काटा बांधून माणसं हाकीत होता. तो बोराटीचा काटा लागला, तर अशुभ असतं, ही भीती असल्यामुळं कोणीही पुढं येत नव्हतं.

बाजीबा खोताचा लेक-बापू-हातात नंगी तलवार घेऊन थोड्याच अंतरावर आपलं अवखळ घोडं दौडीत उगीचच भराऱ्या मारीत होता. बहिरी ससाण्याप्रमाणे सुरकांड्या मारून तो आपल्या चपळाईचं प्रदर्शन करीत होता. हेतू हा, की कोणीही जोगणीकडे गैरहेतूनं बघू नये.

दुसऱ्या बाजूनं गज्या माळी आपली अवखळ घोडं लगाम ओढून आवरीत होता. अशी कैक घोडी त्या जोगणीच्या आसपास घिरट्या घालून कडवा पहारा देत होती.

काखेत तलवार दाबून राणोजी त्या गर्दीत वावरत होता. पेढ्यांचा पुडा कमरेत खोचून तो पुढील योजनेत गर्क झाला होता. त्यानं गबऱ्याला वाटेगावच्या बाजूला एका ओढ्यात बांधून ठेवला होता. कुठून जोगणीवर झडप घालून कुठपर्यंत जायचं आणि मग गबऱ्याला घेऊन कसं पुढं निघायचं, याची सारी जुळणी मनात करून तो त्या जोगणीबरोबर चालत होता. जसजशी ती जागा जवळ येत होती; तसतसा तो अधिक बेभान होत होता. त्याची गात्रं बधिर होऊन दौलती, राही, राधा, फकिरा, सहदेव यांना तो विसरला होता. एका नव्या जगातच जणू तो वावरत होता. त्याच्या मनाची, त्याच्या विचारांची वेगळीच हालचाल सुरू झाली होती. जोगणीभोवती असलेल्या कड्यात राम्या लोहार हा सर्वात दांगट होता. त्याचे डोळे तांबारले होते. तो कोणालाही आसपास येऊ देत नव्हता. आणि राणोजीनं त्याच्यावरच आपली नजर रोखली होती. कैकाड्याच्या अंगणात जोगणी गेली, की एका दणक्यात लोहार उतरायचा, असा त्यानं विचार करून ठेवला होता. कुठला धारकरी कुठं मारायचा, हे सारं ठरवूनच तो चालत होता.

जोगणी पेठेत आली आणि भैरू रामोशी भेटला. तो जवळ येऊन म्हणाला,

"राणूदा, तू कवा आलास, गा?"

"उशीर आलोय. तू वाईच भाईर ये." राणोजीनं त्याला जवळ जवळ ओढीत गर्दीतून बाहेर नेलं.

"राणूदा, काय भानगड?"

"तू आत्ताच्या आता गावाकडं जा."

"आन् काय करू?"

"शंकरराव पाटील आणि पंत ह्येस्नी सांग—"

"काय सांगू?"

"सांग, राणूजी जोगणी घेऊन निघाला. आडवं या."

"म्हंजी?"

"म्हंजी काई न्हाय. भैरू, तू पळ! हत्यारबंद माणसं आडवी आली पायजेत. मी निघालोच बघ."

"पर तू एकटा कसा लढणार?"

"बघ कसा लढतो, त्ये!"

"मग मी बी थांबतो. तू जोगणी घेऊन नीघ — मी वाटा रोखून धरतो. पिस्सू पुढं—"

"नगं, भैरू, ही थटून लढण्याची वेळ नव्हं. तू जा, पळ!"

रामोशी निरुत्तर झाला. त्यानं आडाला जाऊन पंजी आखडलं आणि तो धावत निघाला. घुमेनं निघाला. राणोजी जोगणी घेऊन निघायच्या आत गावात कसं पोहोचायचं, याचा विचार करीत तो निघाला. एक एक क्षण त्याला युगासारखा वाटू लागला.

एका चिंचोळ्या बोळात शिरून जोगणी कैकाड्याच्या अंगणात आली. उथळ जागा, पुढं गाडीवाट. पलीकडे ओढा. तिथंच गबऱ्या राणोजीची वाट पाहत उभा होता. त्या मैदानात येताच गर्दी पांगली. पहारा सैल झाला. जो तो लघवी करायला पांदीकडे व वावरात पळत गेला. कुणी चंची सोडली, कुणी चुन्याच्या डब्यात बोट घालून तंबाखू चोळू लागले, कुणाच्या तोंडात विडी पेटली.

आणि राणोजीनं भर्रकन झेप घेऊन एका वारात राम्या लोहार आडवा केला नि दुसऱ्याच क्षणात ती जोगणीची वाटी हिसकली; तोच एक तलवार त्याच्यावर आली. क्षणात ती खाली पडली. लगेच दुसरी तळपली. तिलाही खाली लोळवून डोळ्याचं पातं लवतं न लवतं, तोच राणोजी पांदीकडे धावला. एखादा बाण जावा, तसा तो गेला आणि ओरड झाली : 'जोगणी गेली!'

जोगणीचे धारकरी पुढं आले, तेव्हा गर्रकन फिरून राणोजी ओरडला,

"म्होरं याल, तर मुंडकं मारीन!"

एकच हलकल्लोळ उडाला. जिकडे तिकडे माणसं सैरावैरा धावत सुटली. सर्वत्र एकच ओरड घुमली — जोगणी गेली! जोगणी गेली!!

अंगावर येईल त्याच्या अंगावर जाऊन, कुणाला चालवून, तर कुणाला लोळवून, कुणाला हुलकावणी देऊन, तर कुणाचा वार चुकवून राणोजी दोन पुरुष पुढं उडून पांदीत पडला आणि गबऱ्याच्या दिशेनं धावला. आता त्याला अधिकच चेव आला.

'जोगणी गेली' असं ओरडत पळणाऱ्या माणसांनी पळत पळत दंगल माजवली. त्या दंगलीत शिगावकरांची घोडी बावचळून गेली. पळणाऱ्यात जोगणी घेऊन कोण पळत आहे, कोणाच्या लक्षात येईना. त्यात बापू खोताचं घोडं एका दिडक्या गल्लीत अडकून पडलं. पुढून येणारे लोक त्याला वाट देईनात. तेव्हा खोत चिडला. त्यानं तलवार चालवून लोकांना परत फिरवून स्वत:ची वाट करून घेतली आणि घोडं पुढं केलं.

बापू खोतानं माणसं जखमी केल्यामुळं अधिकच दंगल वाढली, पण त्याची मुळीच पर्वा न करता खोत कैकाड्याच्या पटांगणात आला. म्हणाला,

"कुणी नेली जोगणी?"

परंतु पळती माणसं बोलली नाहीत. गज्या माळी आला. काही आणखीही घोडी आली. त्यांना ओढ्यातून गबऱ्यावर बसून दरडीनं वर आलेला राणोजी दिसला आणि शिगावच्या सहा घोड्यांना टाचा मारल्या गेल्या.

"धरा', 'मारा', 'जाऊ देऊ नका'—" पुन्हा दंगल वाढली.

गाडीवाटेनं सहा मैलांची दौड मारण्याऐवजी माळानं सरळ चार मैलात आपली शीव गाठावी, असा विचार करून राणोजीनं आपलं घोडं माळाला लावलं. सपाट माळावर येऊन त्यानं पाठीमागची ओरड वळून पाहिली व एकदम पुढे झेपावून, गबऱ्याचा लगाम काढून फेकून, हातातील वाटी कमरेत खोचून, त्यानं तलवार सरळ धरली. गबऱ्याच्या कानाजवळ तोंड नेऊन ओरडला, "गबऱ्या, मला घेऊन लवकर चल. मला टाकून जाऊ नगं. आपली शीव गाठ. चऽ लऽऽ"

बेलगाम गबऱ्या भन्नाट निघाला. त्याच्या पायात विद्युतगती संचारली. टापांचा खडखडाट करीत गबऱ्या निघाला. वाऱ्यावर आरूढ व्हावं, तसं ते घोडं निघालं. त्याचा देह गतिमान झाला. टाच मारण्याची गरज निकामी झाली. 'गती' या शब्दातील अर्थ दुबळा झाला. गबऱ्या आपली शीव जवळ करू लागला. उलट येणारं वारं कापीत गबऱ्या धावत होता आणि निवडुंगात निपजलेलं धैर्य हातात फरडी तलवार घेऊन लगामाशिवाय त्याच्यावर बसून धुंद झालं होतं. त्याची विजयाकडे दौड निघाली होती.

मागून खोत धावत होता. तलवार उंचावून गर्जत होता. टाच मारीत होता. त्याचं घोडं ताशावर टिपरू पडावं, तशा टापा टाकीत पीछा करीत होतं. गज्या माळ्याचं घोडं त्याच घुमेत होतं. ती सारी घोडी कानाला कान लावत झेप घेत होती.

पाठीमागच्या टापा राणोजीच्या कानात वाजू लागल्या आणि गबऱ्याची भिंगरी झाली.

शिगावची हद्द संपली.

वाटेगावची हद्द लागली.

— आणि बापू खोत अधिकच भडकून पुढं निघाला. त्याला पाहून राणोजीनं विचार केला, ह्यानं वाटी परत नेऊ नये. तो कमरेची वाटी काढून चावून खाऊ लागला, गिळू लागला.

गबऱ्या दमण्याऐवजी अधिकच दौडत होता. त्याच्या नाकातून कण्र्यासारखा आवाज येऊ लागला. इतक्या वेगानं तो पूर्वी कधीच धावला नव्हता.

"राणोजी जोगणी घेऊन निघाला!" ही खबर भैरूनं गावात पोचवली आणि गावात एकच गडबड उडाली. हां हां म्हणता साऱ्या गावात बातमी खेळली. सारा गाव शिगावच्या गाडीमार्गानं धावत निघाला. हत्यारानं वाट गच्च भरली. ती बातमी जेव्हा मांगवाड्यात आली, तेव्हा दौलती चरकला. राहीबाई भांबावली. राधा धावत दारात आली नि थांबली. फकिरा चिंचेवर चढून आपल्या झुंजार बापाला शोधू लागला. सहदेव रडू लागला. मांगांनी कुऱ्हाडी ठोकल्या. महार धावत निघाले. शंकररावानं खोगीर न घालताच घोडं दामटलं. पंतांनी आपला घोडा दुडक्या चालीवर लावला, गाव राणोजीला आडवा निघाला.

परंतु राणोजी त्या गाडीमार्गानं येत नव्हता. त्यानं माळानं येऊन शीव गाठली होती, तरीही खोत मागे फिरला नव्हता. तो अधिकच चिडून पुढं येत होता. पीछा करणारी घोडी

ऊर फुटून धावत होती. ती कधी जवळ भिडत होती, तर कधी मागं राहत होती. माळाचा आरडाओरडा वाढला होता. गज्या माळी राणोजीला भिडून होता, तोच खोत ओरडला,

"गज्या, भाला फेक, लेका!"

गज्यानं झुकांडी घेऊन पुन्हा लगट केली आणि आपला भाला जुमानून फेकला. तो वजनदार भाला राणोजीच्या पाठीत खपकन शिरला. त्याच्या बधिर अंगात आधीच कळ मेली होती, ती किंचित वळवळली. तो रक्तानं न्हाला. त्यानं पाठीत भाला घेऊन गज्यावर रोख धरला. खोत पुढं येऊन बाजूला झाला. आणि पुन्हा गज्या माळी जवळ आला. राणोजीनं खसकन वार मारला. पागोटं तोडून तलवार नाकाच्या शेंड्यापर्यंत खाली आली उतरली आणि गज्या घोड्याखाली कोसळला.

पडलेला गज्या पाहून खोत चिडला. ओरडू लागला. गाडीवाटेनं निघालेले लोक ती ओरड ऐकून चकित झाले आणि सारा लोंढा माळाकडे धावत निघाला; पण आडवाटेनं माळ जवळ करणं कठीण होतं.

गज्या खाली पडताच बापूनं आपला घोडा राणोजीच्या जवळ नेला आणि मागं उसण घेऊन भाला फेकला. तो गबऱ्याच्या चौकात खसकन शिरला. त्याबरोबर पळून दम उखडलेला गबऱ्या पुढच्या दोन पायावर कोसळून पडला. त्याचं ऊर फुटून तो रक्त ओकू लागला. राणोजी उठून सरळ होईपर्यंत त्याच्यावर मुरकुंड पडली. त्याला अवसर मिळण्यापूर्वीच त्यावर वार झाले. पुन्हा पुन्हा झाले. मग तो मर्द मांग मुठीत तलवार घट्ट धरून त्या आपल्या इमानी गबऱ्यावर कोसळला.

खोतानं वाटी शोधली. ती मिळाली नाही. मग राणोजीचं शिर घेऊन तो परत फिरला.

— आणि वाटेगावचे लोक तिथं आले. तो देखावा पाहून गाव स्तंभित झाला. एक मैल हद्दीत शिरून खोतानं केलेली आगळीक पाहून गाव चिडला, भडकला. शिगावकरांनी रिवाज मोडला होता.

दौलती प्रेतावर अंग टाकून ऊर बडवू लागला. राही, राधा एका वावरात लोळू लागल्या. पोरं दीनवाणी होऊन रडू लागली. गाव जमला. लहानथोर रडू लागले. बायांनी राहीबाई नि राधा यांना आवरलं.

विष्णुपंत आले. त्यांनी शिराशिवाय राणोजी पाहिला. त्यांचा चेहरा उग्र झाला. सर्व लोक त्यांच्या तोंडाकडे पाहू लागले — आता पंत काय सांगणार?

पंत दाटल्या कंठानं म्हणाले,

"खोतानं अपराध केला आहे. एक मैल हद्दीत शिरून आमचं शिर नेलं आहे. ते परत आल्यावाचून या प्रेताला अग्नी देता येत नाही. आणि ते शिर परत येईपर्यंत या हद्दीत मी पाणी पिणार नाही. शिर आणीन वा शिर देईन!" असं म्हणून पंतांनी घोड्याला टाच मारली. काळापांढरा तो घोडा उसळून शिगावकडे निघाला. राणोजीच्या मुठीतली

तलवार काढून घेऊन शंकरराव पाटील ओरडला, ''मी शिगाव बेचिराख करीन, नाहीतर वाटेगावला आग लावून मीही जळून मरेन! चला ऽ ऽ''

पुन्हा तो मानवलोंढा निघाला. भैरू रामोशी कुऱ्हाड घेऊन धावत होता. मारुती चव्हाण पट्टे चढवून झेपा घेत होता. तायनू महार भाला परजीत सर्वांना मागं टाकायचा प्रयत्न करीत होता. कुऱ्हाडी लखलखत होत्या. तरवारी झळझळत होत्या. दौलती दुःख विसरून त्यातून पळत होता. दुलाजी ढेकणा, नाना डोंगरा, पांडू नांगरा, बळी मांग, आप्पा मांग, सावळा मांग - एकूण एक म्हातारा नि तरणा माळानं पळत होता.

राणोजीचं शिर घेऊन आणू, नाहीतर आपलं शिर देऊ, हा सर्वांचा निर्धार झाला होता. फक्त भैरू रामोश्याचा विचार वेगळा होता. तो म्हणत होता —

''एका शिराची किंमत मी पन्नास शिरं घेणार!''

त्यानं गावासाठी शिर दिलं, म्हणून गाव त्याच्यासाठी शिर द्यायला सज्ज झाला.

## २

ईर्ष्येचा डोंब झाला होता. वाटेगावचे लोक भान हरपले होते. आपल्या हद्दीत शिरून, नियमाला मोडून बापू खोतानं आगळीक केली होती; त्याचा सूड घ्यायच्या हेतूनं लहानथोर धावत होते.

त्वेषानं बांध फोडला होता. तो कंठावाटे बाहेर पडून आकाश दणाणीत होता. मारण्यामरण्यासाठी सज्ज झालेल्या माणसांचे बाहू स्फुरण पावत होते. गोफणीचे पागुरे तयार झाले होते. सर्व लोक ओरडत होते :

''शिगाव जाळून बेचिराख करा!''

शिगावात वातावरण भयभीत झालं होतं. जत्रेत उडालेली दाणादाण आवरत आली होती. दंगलीत चुकलेली पोरंबाळं आपापल्या घरी आल्यामुळं आनंद झाला होता; पण भीती गेली नव्हती. राणोजीच्या एकाच घावात रामज्या लोहार जागच्या जागी ठार झाल्यामुळे लोहाराची आळी रडत होती. गज्याचं मढं वाटेगावच्या हद्दीत पडल्याचं ऐकून सुताराची घरं आक्रोश करीत होती. परगावचे जत्रेकरू काखेत पागोटी दाबून आपापल्या गावाकडे भन्नाट पळत सुटले होते. जो तो म्हणत होता, '... पळा लेका. गव्हासंगं किडा रगडंल.' कैक घोंगडी माळाला पडली होती. कैक पायताणांची ताटातूट झाली होती. किती काठ्या, किती कुऱ्हाडी बेवारशी झालेल्या दिसत होत्या.

त्यात बापू खोतानं राणोजीचं शिर आणून वेशीला टांगलं होतं आणि तो तसाच रक्तानं न्हाऊन घरी गेला होता. त्याच्या पराक्रमानं बाजीबा खोत खूष होऊन गावकऱ्यांना धीर

देत गावात फिरत होता : 'घाबरू नका. माझ्या बापूनं जोगणी पळविणाऱ्याचं शिर आणलं. आपली जोगीण गेलेली नाही. या बाहेर. पुन्हा जत्रा भरवू या. चला. आता सर्व काही शांत झालं आहे.'

परंतु कोणीही बाहेर पडत नव्हतं. बाजीबाला मात्र भान नव्हतं. बापू जेव्हा राणोजीचं शिर घेऊन आला, तेव्हा बाजीबानं त्याला विचारलं होतं,

"कोण होता तो?"

"राण्या मांग - वाटेगावचा."

"कुठं सापडला?"

"माळाला."

"आपली किती माणसं दगावली?"

"चार हातं नि दोन माळाला."

"सहा? मग जबरा होता, तर!"

"म्या त्याचं मुंडकं मारून येशीला टांगलं."

"शाब्बास!" असं म्हणून बाजीबा उडी मारून बाहेर पडला होता. त्याला चेव आला होता. तो ओरडत होता,

"आपली जोगणी गेली नाही. बाहेर या!"

तोच रघू मान्या घोडं तकाटीत आला. बाजीबाजवळ येताच त्यानं खसकन लगाम ओढून घोडं थांबवलं आणि म्हटलं,

"वाटेगावची माणसं माळावर आली. लढाईची तयारी हाय त्येंची. माळाला माणूस माईना."

"किती माणूस आहे?"

"दाद न्हाय."

"आपली माणसं बाहेर काढा. हत्यारं घ्या." बाजीबा ओरडला, "त्यांना गावात शिरू देऊ नका. गावाबाहेर रोखा."

एवढ्यात बापू घोड्यावर बसून धावत आला, त्यानं बाजीबाचा घोडाही बरोबर जीन घालून आणला होता. घोडा येताच बाजीबा झेप घेऊन वर बसला आणि उभ्या पेठेनं दौडत निघाला : "बाहेर पडा, वाटेगावकरांना गावात शिरू देऊ नका, नाही तर गाव बेचिराख होईल!"

शिगावकरांनी प्रसंग जाणला. म्हातारा बाजीराव पुन्हा मैदानात आलेला पाहून त्यांनाही चेव आला. ते बाहेर पडले. शिगावच्या गल्ल्या माणसांनी भरल्या. कडवी, तडफदार माणसं पुढं निघाली. काहींनी नाकी रोखली. जागोजाग दगडांचे ढीग लावले. गोफणी सज्ज झाल्या. बायकांनी घरं लढवायची तयारी केली आणि मावळतीच्या डोंगराआड

सूर्यानं उडी घेतली.

हळूहळू अंधारानं सृष्टी झाकली. खाचखळगे, ओढे, ओघळी, सर्व काही सपाट झालं. वाटेगावचे लोक थांबले. माळावर त्यांनी तळ दिला. विष्णुपंतानं सल्ला दिला, "सूर्योदयापर्यंत शांत राहा, रात्री परक्या गावात शिरणं चूक होईल. सूर्योदय होताच आपण आपल्या कार्याला लागू, तोपर्यंत शिगावकरांचं मत काय आहे, तेही अजमावता येईल. कोणीही चढाईची भाषा करू नका!"

हे ऐकून लोक शांत झाले. त्यांनी सूर्योदयापर्यंत शांत राहण्याचं ठरवलं. त्याचबरोबर त्यांचा रागही हळूहळू मावळत गेला. भडकलेली डोकी जरा शांत झाली. राणोजी आणि त्याचा गबऱ्या यांची ती दोन प्रेतं पाहून जो त्वेष चढला होता, तो लुप्त झाला आणि विचारांना पाय फुटले; पण अन्यायाची चीड नि लढण्याची धमक कायम होती. 'राणोजीचं शिर नेऊ किंवा आपलं शिर देऊ,' अशी भाषा कैक बोलत बसले. 'जर आपण पन्नास शिरं घेऊ, तरच रामूशांची अवलाद' असं भैरू म्हणत होता. ज्या मांग जमातीबद्दल कोणीही कधीही विचार केला नव्हता, त्या निवडुंगात काय वास करतं, कोण जन्मतं, कोण मरतं, हा कोणाचा मुलगा, हा कोणाचा नातू, याची कोणी कधी कल्पनाही केली नव्हती, त्या जमातीतील एका माणसानं गावासाठी — गावाच्या जत्रेसाठी — स्वत:चा प्राण देताच शतकानुशतकाचं अंतर संपुष्टात आलं. अगदी घरातल्या माणसासाठी जसं चिकाटीनं झटावं, तसं वाटेगाव झटू लागलं. प्रत्येक माणूस हळहळला, चिडला.

— आणि आता तर नवाच प्रश्न निर्माण झाला होता. सारा गावच शिगावला राणोजीचं शिर आणायला गेला होता. तिथं काय होणार? जर लढाई झाली, तर कोण मरणार आणि कोण जगणार? या एकाच विचारानं गावात जे उरले होते, ते व बायकापोरं विचार करीत होती. सर्वांचे डोळे शिगावकडे लागले होते.

शिगावची सहा माणसं कामी आली होती, कैक जखमी झाली होती.

परंतु इंग्रजी सत्ता शांत होती. पाहात होती. ती काहीही करू शकत नव्हती.

कारण कोणत्याही धार्मिक बाबीत आम्ही ढवळाढवळ करणार नाही, असा राणीचा जाहीरनामा होता. त्या वचनाला ती बांधली गेली होती. जोगणी ही धार्मिक बाब आहे, असं म्हणून सरकार स्वस्थ होतं. शिवाय हे लोक आपासात लढून मरत होते, हाही काही थोडाथोडका फायदा नव्हता त्यांचा.

शिगाव आणि वाटेगाव या दोन्ही गावचे लोक ओढ्याच्या काठावर समोरासमोर बसले होते. ते सूर्योदयाची वाट पाहत होते. त्यांची हत्यारं विश्रांती घेत होती. रात्र मी म्हणत होती, पावसाचे ढग आकाशात गडगडत होते. अक्राळविक्राळ आकृत्या करून लोंबकळत होते. मध्येच चांदण्या लखलखत होत्या. तेवढ्याच त्या प्रकाशात माळावरची

हत्यारं जिभल्या चाटीत होती.

नि:शब्द शांतता पसरली. निद्रेनं डोळ्यावर झापडी घातल्या. सर्वांच्या शरीरात शिथिलता निर्माण झाली. कुणी बसल्या जागी पाय लांबवले. काही देह आडवे झाले. शांत, अगदी शांत वातावरण निर्माण झालं. इतक्यात एक खणखणीत आरोळी घुमत उठली :

"ऐका, हो, वाटेगावकर मंडळी ऽऽ"

तो बाजीबाचा आवाज सर्वांनी ओळखला. विष्णुपंतानं उलट आरोळी दिली,

"... काय म्हणणं आहे?"

सर्व लोक खडबडून उठले. हत्यारं सज्ज झाली.

"आमचं म्हणणं असं, की तुम्ही गुमान परत जा."

"ते काय म्हणून? आमच्या हद्दीत शिरून आमचा माणूस तुम्ही मारला आहे!"

"याला पुरावा काय?" असं म्हणत बाजीबा पुढं पुढं येऊ लागला.

त्याबरोबर एल्गार झाला.

"खबरदार — पुढं येऊ नका!" भैरू खेकसला.

"न्हाय; परंतु आम्ही तुमच्या हद्दीत शिरलो, असं कोण म्हणतं?" बाजीबानं प्रश्न केला.

"हातच्या काकणाला आरसा कशाला?" शंकरराव पाटील खेकसला आणि बाजीबा म्हणाला, "मग सकाळ चौकशी करू. जर तुमचं म्हणणं खरं ठरलं; तर शिर परत करू. ठरलं?"

"ठरलं ऽ ठरलं ऽऽ ठरलं ऽऽ" सर्वांचा एकच आवाज उठला.

सकाळ उजाडली. दोन्हीकडचे पाच पंच नेमले गेले आणि चौकशीला सुरुवात झाली. बाजीबा, विष्णुपंत, शंकरराव ही मंडळी पुन्हा वाटेगावला गेली. त्यांनी प्रेतं पडलेली जागा पाहिली. आसपासची जागा पाहूनच राणोजी आपल्या हद्दीत दूरवर गेला होता. पण बापू खोतानं आगळीक करून पुढं जाऊन त्याचं शिर मारून रिवाज मोडला, असं सर्वांचं मत झालं. वाटेगावचा विजय झाला.

बाजीबानं परत शिगावला जाऊन राणोजीचं शिर परत केलं. शिर हाती येताच वाटेगावकरांना आनंद झाला. त्यांनी परत जाऊन राणोजीच्या प्रेताला अग्नी दिला. त्याच्या शेजारीच घोड्यालाही माती दिली. तो वाटेगावचा प्रचंड विजय होता. दु:ख आणि आनंद या दोन्ही भावनांनी गाव एका वेगळ्याच भावनेनं धुंद झाला. कधी नव्हतं, ते आता गावात घडणार होतं. आजपासून बरोबर बारा महिन्यांनी गावात जत्रा भरणार होती आणि चंद्र-सूर्य असेपर्यंत भरणार होती. एका राणोजीच्या आत्मसमर्पणानं गावात एक जुना रिवाज, नवा नियम सुरू होणार होता. म्हणून सर्व लोक राणोजीचं कौतुक करीत नि हळहळत. ते राणोजीचे गुण गात आनंदात नाचत होते आणि रडतही होते.

मांगवाड्यात मनं भुईसपाट झाली होती. दौलती, राहीबाई, राधा, फकिरा, साधू यांच्या डोळ्यांपुढं अंधार झाला होता. आकाश त्यांच्या डोकीवर कोसळलं होतं. त्यांची भावकी आक्रोश करीत होती, कारण त्यांचा आघाडीचा मोहरा पडला होता. दौलतीचं जहाज फुटलं होतं. आता तो उरलेल्या आयुष्यात नुसता भरकटत राहणार होता किंवा बुडून मरणार होता.

गावकऱ्यांनी मांगवाड्यात येऊन दौलतीसह सर्वांना धीर दिला; चार दमाच्या गोष्टी सांगितल्या. 'सर्व मिळून आता राणोजीच्या दोन पोरांना जगवू या, जपू या; त्यानं वाटेगावावर अनंत उपकार केले आहेत, त्याची फेड करू या. गाव मांगांना अंतर देणार नाही!'

तिसऱ्या दिवशी स्वतः विष्णुपंत मांगवाड्यात आले. शिंदेशाही जोडा, धोतराचा पायघोळ, डोकीला जरीचा रुमाल, करारी पण देखणा चेहरा, पाणीदार डोळे, नोकदार नाक, दाट भुवया, पल्लेदार काळ्या मिश्या, असा तो कुलकर्णी पूर्वी कधीच मांगवाड्यात आला नव्हता. इंग्रज अधिकारी ज्याला खडी ताजीम देत, तो राजासारखा माणूस आलेला पाहून सर्व मांग दौलतीच्या दारात जमले. दौलतीनं पळत जाऊन पटकूर आणून पसरलं.

"धनी, का तसदी घेतली?"

"शिर देण्याइतकी ही तसदी नाही, दौलूनाना." हे पंतांचे शब्द ऐकून दौलती लहान मुलासारखा डोळे पुसू लागला. त्याला पाहून पंतांचं ऊर भरून आलं.

"नाना, रडायचं नाही. हा राणोजी जिवंत आहे, असं समजून चला."

"ह्या पटकुरावर त्यो बसत व्हता."

"मी त्यावर बसतो-" पंत त्या पटकुरावर बसत म्हणाले आणि सर्वांना आश्चर्याचा धक्काच बसला. "त्याची दोन पोरं जगलीच पाहिजेत" पंत निर्धारवाणीनं म्हणाले.

पंतांचे ते आपुलकीचे शब्द ऐकून आणि त्यांच्या डोळ्यांचं पाणी पाहून दौलतीला धीर आला. त्याचे आसू आटले. अनंत अश्रूत ते गडप झाले.

शंकरराव पाटीलही येऊन दौलतीला पंतांप्रमाणेच सांगून गेले. मग मात्र त्याचं काळीज फुगलं.

राधाचं कपाळ फटफटीत झालं. केवळ फकिरा, साधूकरिताच जगायचं, असं म्हणून ती जिवंत राहिली. राहीबाई या वयात एकुलत्या एका मुलाच्या मृत्यूचा आघात कशी सहन करू शकली, याचं गावाला कोडं पडलं. तिला एकाच भावनेनं जीवदान दिलं— आणि ती म्हणजे सूड!

फकिरा मात्र उदास झाला. आपला बाप आपल्या म्हणण्याप्रमाणे वागला. 'मारू दे मुंडकं. ये वाटी हिस्कून!' हे बापानं ऐकलं, असं त्याला वाटत होतं. आता बाप दिसणार नाही, खाऊ आणणार नाही, मांडीवर घेणार नाही! आणि तो आपला गबऱ्या

खेकाळणार नाही!

फकिरा गबऱ्याचं दावं घेऊन आसवं ढाळीत होता. साधू मात्र राधाला सारखा रडवीत होता. तो बापाला विसरत नव्हता.

राणोजीचं शिर देऊन बाजीबा घरी गेला, तेव्हा बापू खोत लालेलाल झाला. त्याच्या हातापायांची आग झाली. तो बापावर ओरडला,

''तुम्हाला अवदसा आठवली नि तुम्ही शिर परत करून माझा अपमान केला! गावाचा अपमान केला!''

''तू गैर वागलास!'' बाजीबा खेकसला. ''मूर्खासारखा त्यांच्या हद्दीत शिरलास आणि त्या राणोजीचं शिर घेऊन आलास! लाज वाटत नाही पुन्हा बोलाय?''

''कोण म्हणतो मी गैर वागलो?''

''मी म्हणतो. मी जागा सांगते. तिथं मेलेला गज्या सांगतो. बिनडोक! लेका येताना संगंच्या माणसाचं मढंदेखील तुला घेऊन येता आलं नाही. तू जगावंस का? मोठा बहादूर होतास, तर त्याला आपल्या हद्दीतून पार कां होऊ दिलास? बोल?''

''खोटं आहे. मी त्याला माझ्या हद्दीत गाठलं.''

''बोलू नको. तू एकटा असतास, तर तुझं मुंडकं त्यानं कापून पुढं नेलं असतं; पण—''

''पण मी त्याचंच कापलं. ते तुम्ही परत केलं!''

''तेच बरोबर केलं. मी ती जोगणी आणली होती, त्या वेळी जर त्या लोकांनी या गावात शिरून माझं शिर मारलं असतं, तर? पण तसं झालं नाही. कारण एक रिवाज आहे नि होता. तो त्यांनी पाळला; पण तू पाळला नाहीस, म्हणून मी ते परत केलं, आणि ते चांगलं झालं!''

''काही चांगलं केलं नाही! लोक शे...''

''बाप्या!'' बाजीबानं बापूच्या खाडकन तोंडात भडकवली. त्याचे हातपाय थरथर कापू लागले. तो बेभान होऊन म्हणाला, ''एवढी ईर्ष्या असेल आणि तू जर माझ्या वंशाचा असशील, तर ती जोगणी माझ्या हयातीत परत आणशील. जा!''

शिगावकरांची मनं आपोआप पोळून निघाली होती. आता पुढं त्यांच्या गावात फक्त जोगाच निघणार होता. रंडका जोगा मिरवत जाणार, जोगणी वाटेगावात निघणार, ही कल्पनाच त्यांना सहन होत नव्हती. आपल्या गावाचं वैभवच गेलं, असं त्यांना वाटत होतं. आता आपली जत्रा मोडली.

— आणि तसंच झालं. गावोगाव वार्ता पसरली. शिगावची जोगणी वाटेगावला गेली.

आता वाटेगावला जोगण्या भरणार. आता शिगावला काय आहे? तिथं एक रंडका जोगा फिरणार. त्याला काय पाहायचा? खरा मर्द माणूस तो राणोजी! त्यानं एकट्यानं शिगाव लोळवला नि जोगणी पळवून नेली.

ज्यांनी प्रत्यक्ष राणोजीची ती तडफ पाहिली होती, ते सर्व आपापल्या गावी राणोजीचे पोवाडे गाऊ लागले. त्या खोऱ्यात वाटेगावच्या मांगांचा मोठा बोलबाला झाला. हे जोगणी प्रकरण भलतंच गाजलं.

पावसानं आखडलेले पाय पसरले. आकाशातून मुसळधार पाऊस वर्षू लागला. विजेचा लखलखाट नि मेघांचा गडगडाट यानं सृष्टी हादरली. बियांचे कण मातीत रुजले आणि लहान अंकुर वर आले. हळूहळू काळी वावरं हिरव्या शालीत गेली. एक न्यारी सृष्टी अवतरली. नवा सुगंध दरवळू लागला. एक नवी ऊब दुनियेला आली. माणसांच्या आशा नजरेच्या आटोक्यात आल्या. पाऊस गेला आणि सुगी आली. पावसाच्या तडाख्यातून मुक्त झालेलं ऊन नवं नवं भासू लागलं. दमट जमीन उसासे घेऊ लागली, आकाश निरभ्र झालं. निळ्या आसमानात चपळ पाखरं भिरणीस लागली. शिवारात सुगीची हातघाई सुरू झाली. दौलती रानात फिरू लागला. काढणी, मोडणी, खळी धुंडाळू लागला. त्याला पाहून राणोजीची आठवण होऊन गावकरी त्याच्यापुढे कणसांची रास लोटू लागले. गावानं हात सैल सोडल्यानं दौलतीचं घर भरू लागलं. राही दोन शेळ्या घेऊन निवडुंगात फिरू लागली. फकिरा, साधू यांना दूध मिळावं, म्हणून ती खटपट करीत होती. ती पोरंही आजीला मदत करीत होती. दौलती पंढरीला जाऊन आला. गबऱ्यासाठी फकिरा रडतो, म्हणून येताना एक पांढरं शुभ्र शिंगरू आणलं होतं. त्याला फकिरा एक एक मूठ गवत आणून घालीत होता. नवा गबऱ्या अजून खेकाळत नव्हता. पोरांनी त्या नव्या शिंगराचं नावही गबऱ्याच ठेवलं.

राधा आयाबायांतून लोकांच्या मोडणीला जात होती. दिवसभर कामात गुंतल्यानं तिला उरातील कळीचा विसर पडत होता, म्हणून ती सारखं काही ना काही काम करीत होती. कुंकवाशिवाय सारं आयुष्य कंठण्याची भयंकर जबाबदारी तिच्या शिरावर पडली होती.

रोजच्याप्रमाणं ती रानात निघाली होती. बरोबरीच्या बाया पुढं गेल्या होत्या. पोरं राहीबरोबर माळाला गेली होती. दौलती शिवारात गेला होता आणि राधा डोक्यावर पाटी घेऊन चौघुल्याच्या शेताकडे लगबगीनं निघाली होती. मागंपुढं कोण नव्हतं. आता ती दोन पोरं आणि स्वतःचा देह याची काळजी घेत होती. कारण अजून तिच्या देहातली तरुणपणाची ताण नमली नव्हती.

पुढं एक गाडी आली. ती कोणाची असेल बरं, असा एक विचार तिच्या डोकीत

येऊन गेला. गाडी ओढ्यातून वर येऊन गाडीमार्गानं गावाकडे येऊ लागली. धुंद बैल डुलत येत होते. राधा बाजूनं चपापून पुढं जात होती. गाडी जवळ आली. आणि ती चमकली. — गाडी पाटलाची.

एकदम कासरं ओढून पाटील म्हणाला, "राधा, कुठं?"

"मोडणीला."

"कुणाच्या?"

"चौधुल्याच्या."

"चल मागं—" असं म्हणून त्यानं बैलांना चमकावलं आणि गाडी चालू लागली. राधा आपोआप गाडीमागून परत निघाली. चिंचेखाली येईपर्यंत शंकररावानं एकदाही मागं वळून बघितलं नाही. चिंचेखाली गाडी करकरली नि थांबली. राधाही गपकन उभी रहिली. ती नुसती पाहतच राहिली. पाटील म्हणाला, "दौलती आहे का घरात?"

शिंगरू रानात नेण्यासाठी परत आलेला दौलती पुढं आला. पाटील, राधा यांना पाहून तो एकदम तरातरा पुढं येऊन म्हणाला,

"मी आताच सोनाटकीतनं परत आलो शिंगरू न्यायला."

"ठीक. दौलती, पण हे बरं नाही—" पाटील गंभीर चेहरा करून म्हणाला, "राधा मजुरी करीत आहे, हे जर कळालं, तर तो राणोजी परत खाली येऊन माझं शिर मारील. हिला रोजगाराला कधीच पाठवू नको. तुला दाणे हवेत - हे घे." असं म्हणून पाटील गाडीतील दाण्यांची पोती खाली लोटू लागला.

"एक, दोन, तीन — ही सारी गाडी इथं रिकामी करतो की काय, असं वाटून दौलती म्हणाला, "गावकर, पुरं, पुरं."

"पुरं? तर ऐक. राधाला कष्ट देऊ नको. तिच्या कुंकवानं डोंगराएवढं कष्ट भोगलं — आणि ते माझ्याच शब्दावर भोगलं. मी पाटील! मी आपल्या गावच्या जत्रेत मिरवावं, इथं या पांढरीत जत्रा भरावी, गावावर उपकार करावा, म्हणून तो दोन पोरं आणि ही राधा मागं टाकून गेला. त्याच्या त्या उपकाराची फेड जर अशी झाली, तर आम्ही सारे नरकात जाऊ. जे पेरावं ते उगवतं!'

"पाटील, असं कसं म्हणता?"

"बरोबर म्हणत आहे मी. दाण्याची पोती देणं आणि शिर कापून देणं याची बरोबरी करता येणार नाही. दाणं शेतात पिकतात - शिरं पिकत नाहीत, दौलती! खोताशी झटून झगडत ज्यानं प्राण दिला, त्याची ही अब्रू आहे. ही जगाच्या मोलाची आहे. माझं इमान तिच्या पासंगालाही पुरणार नाही."

"म्हणूनच मी जगलो!" दौलती भरल्या डोळ्यांनी पाहत थरथरत्या ओठांना थांबवीत म्हणाला, "नाही तर मी मेलो असतो. पण तुमच्या-पंतांच्या बोलानं मला तारलं.

आजपासनं राधाला मी कुठं पाठवनार न्हाय!''

"एवढंच कर." असं म्हणून पाटलानं समोर पाहिलं नि बैल चालू लागले. राधा घरात गेली. तिनं उशीर आवरलेला हुंदका बाहेर पडला.

दौलतीनं दोन माणसं बोलावून पोती घरात नेली. शिंगराचं दावं सोडून तो निघाला. तोच फकिरा हिरव्या गवताची पेंडी घेऊन आला. दौलती घोडं घेऊन निघालेला पाहून तो दरडावून म्हणाला, "ये म्हाताऱ्या, कुठं नेतोस त्येला?''

"रानात चरायला - का?''

"नकं, घरातच बरं हाय त्ये.''

"अरं, पर का? चाराय का नकं?''

"नकं. त्यो गबऱ्या आबानं शिगावला नेऊन मारला आनि तू ह्या गबऱ्याला रानात येऊन मारशील. काय नेम तुझा!''

हे ऐकून दौलती गालात हसला. हसऱ्या नजरेनं पाहत तो म्हणाला, "खरं हाय तुझं. सांभाळ आपला गबऱ्या. मी जातो रानात.'' असं म्हणून तो गेला.

राधानं फकिराला हाक मारली आणि विचारलं, "आज्याबरं का भांडलास?''

"त्यो गबऱ्याला रानात नेत व्हता.''

"म्हणून काय झालं? काय बिघडलं?''

"आगं, म्या थट्टा केली त्येची.''

"म्हाताऱ्या माणसाची थट्टा करू नये.'' असं म्हणून ती हासली आणि पटकन त्याला तिनं कडेवर घेतलं. तो दहा वर्षांचा कांडेसूध उंच फकिरा आपल्या आईच्या काखेत बसला, तेव्हा त्याला गगन गिड्डं वाटलं; परंतु लगेच त्याला बापाची आठवण झाली.

"आई!''

"काय?''

"आबाला खोतानं मारलं?''

"हो — मारलं.''

"आपला गबऱ्या मोठा झाला, की मी खोताला मारीन.''

"तवर त्यो म्हातारा होईल.'' तिनं त्याला घरात नेलं आणि साधू आला. साधू अंगानं गुबगुबीत असून त्याचे गालही गुबगुबीत होते. तो कमी बोले.

दुपार झाली. भाकरी खाऊन फकिरा व साधू घराबाहेर पडले. राधा कामात गुंतली.

सूर्य डोकीवर आला. सावल्या पायात घोटाळू लागल्या. हिरवं शिवार उन्हाच्या मुलाम्यानं सोन्यासारखं दिसू लागलं. ते सोनेरी खोरं मनाला भुरळ घालू लागलं. चिंचेखाली

फकिरा नि साधू यांनी खेळ मांडला. फकिरा म्हणाला,

"आपून कुरघोडी खेळू या."

"खेळू या." साधूनं मुंडीनं होकार दर्शविला. फकिरा चिंचेच्या बुडख्याआड गेला आणि दोन मुठी झाकून पुन्हा परत आला. एकीत शेळीची लेंडी नि दुसरीत चिंचोका होता. त्या दोन मुठी साधूपुढे धरून तो म्हणाला,

"लेंडी, का चिंचुका?"

"चिंचुका." साधूनं फकिराची डावी मूठ धरली नि त्यानं ती पटकन उघडली आणि तो आनंदून ओरडला, "लेंडी; हा बघ चिंचूका." असं म्हणून त्यानं उजवी मूठ उघडून चिंचोका दाखवला. साधूवर डाव आला. तो वाकला. फकिरा त्याच्या पाठीवर बसला. कुरघोडीचा खेळ सुरू झाला.

"आर घोडी - पार घोडी, तुणतुण्याची तार तोडी, सायबाच्या बंगल्यात किती आंडी? बोल!" असं म्हणून फकिरानं साधूच्या पाठीवर बसून आपल्या उजव्या हाताची तीन बोटं सरळ धरली आणि साधू खाली वाकून तिरपडत फकिराचा भार आवरत म्हणाला, "पाच-पाच!"

फकिरानं खाली उतरून त्याला ती तीन बोटं दाखवली. पुन्हा साधू वाकला आणि फकिरा चटकन त्याच्या पाठीवर बसून म्हणाला, "आर घोडी - पार घोडी, तुणतुण्याची तार तोडी, सायबाच्या बंगल्यात किती आंडी? बोल!" या खेपेला त्यानं एकच बोट धरलं होतं आणि साधू ओरडला, "तीन ऽ तीन ऽ तीन."

फकिरानं खाली येऊन त्याला एक बोट दाखवलं. ते पाहून साधू हिरमुसला, नि पुन्हा वाकला.

पुष्कळ उशीर त्यांचा खेळ चालला होता. साधूवरचा डाव फकिरावर येत नव्हता. साधू घामानं भिजला होता. त्याची कंबर दुखायला लागली होती. तो खेळ टाकून पळून जायच्या विचारात होता; पण फकिरा त्याला सोडीतच नव्हता. साहेबाच्या बंगल्यावरची अंडी साधूला ओळखता येत नव्हती आणि फकिरा पुन्हा पुन्हा त्याच्या पाठीवर उड्या मारून बसत होता. साधू रडकुंडीस आला आणि राधा बाहेर आली. फकिरा साधूच्या पाठीवर बसला होता. साधू तिरपडत त्याला आवरीत होता. फकिरा अंडी सांगत होता. हे सारं पाहून तिला राग आला.

"आर घोडी - पार घोडी, तुणतुण्याची तार तोडी, साहेबाच्या बंगल्यात किती आंडी? बोल!" फकिरानं चार बोटं धरली आणि मेटाकुटीला आलेला साधू म्हणाला, "सात ऽ सात ऽऽ"

राधा पुढं येऊन रागात म्हणाली, "फकिरा, त्येला बोटं किती, ह्ये कळंना, तो सायबाच्या बंगल्यातली आंडी रं कशी सांगणार? दिवसभर त्याच्या पाठीवर बसून तू

का त्याला मारनार? बघ की त्यो घामानं उपळून निघाला.''

''मग माझ्यावर डाव आल्यावर मी निघालो असतो, म्हंजी?''

''त्ये का? तू शहाना हाईस. त्येला कळत न्हाय.''

''आनि माझ्या पाठीवर बसला, तवा?''

''मग काय झालं? तू तरी सांगशील का किती आंडी?''

''हो – हो. सांगीन!''

''मग सांग तर. वाक!'' राधा इरेला पडली.

''ह्ये बघ वाकतो.'' तोही ईर्ष्येला पेटला.

''बस रं साधू त्येच्या पाठीवर. बघू कसा सांगतोय, त्ये!'' राधा म्हणाली.

फकिरा खाली उतरून वाकला आणि साधू त्याच्या पाठीवर बसला. मग तोही म्हणाला, ''आल घोडी ऽ पाल घोडी ऽऽ तुनतुन्याची ताल तोडी ऽ सायबाच्या बंगल्यात किती आंडी? बोल!'' असं म्हणून त्यानं बोटं उंच धरली, तेव्हा फकिराची नजर भुईवर होती. साधूच्या हाताची सावली त्याच्या पुढ्यात पडली होती. त्यानं किती बोटं धरली आहेत, हे फकिराला दिसत होतं. तो पटकन म्हणाला, ''दोन ऽ दोन ऽऽ! उतर खाली.''

राधाला नवल वाटलं. तिनं साधूला ओढून पोटाशी धरलं. ती म्हणाली, ''नको, रे बाबा असला खेळ. तू मोठा धोरणी हाईस.''

''मग माझा डाव दे की!''

''न्हाय डाव आता.''

''न्हाय – माझा डाव दिलाच पायजी!''

''नकं – त्यो रडकुंडीला आलाय.''

''न्हाय. माझा डाव!'' फकिरा संतापला. त्याचे डोळे भरून आले. आई आपल्यावर अन्याय करून साधूला वाचवीत आहे, याची त्याला चीड आली. तो पाय आपटून म्हणाला, ''आई ऽऽ, माझा डाव!''

ती गर्रकन फिरली. फकिरा रडत होता. साधूला खाली ठेवून ती मटकन खाली बसली नि फकिराला पाठीवर घेऊन म्हणाली, ''मी तुझा डाव देते. बस.'' ती तशीच त्याला घेऊन घराकडे गेली.

सूर्य आपल्या दारात जाऊन उभा होता. पश्चिमेला सातदऱ्यांच्या डोंगरावर किरणांचा झगमगाट झाला होता. सूर्याच्या खाली तपकिरी रंगाचा एक प्रचंड ढग पसरला होता. त्या ढगात गालिच्यावर बसल्यागत सूर्य दिसत होता. डोंगरातील कीर्र झाडीनं शिरण्यासाठी अंग आवळून घेतलं होतं.

दिवसभर शिवारात गेलेली माणसं परतत होती. गुरं हंबरत येत होती. बैल डिरक्या फोडीत पांदीनं चालले होते. गावचे कष्टच जणू फळाला आले होते.

राधा चुलीपुढं स्वयंपाकात गुंतली. साधू काटक्या मोडून चुलीत घालू लागला. रुसका चेहरा करून फकिरा कोपऱ्यात पाहत होता. राहीबाई नि शेरडं आली होती. राधा साधूशी बोलत होती, ''तू आपल्या आजोबासारखा हाईस. आन् ह्यो फकिरा आपल्या वडलावानी हाय. आजोबा म्हनत, 'आम्ही तलवार घेऊन, भीक मागून जमात जगवली.' ते ऐकून तुझं वडील हासत. खरं म्हंजी त्येंना रागच येई, पण हासून दाखवीत.''

''आमच्या आबाला शिव्या देऊ नकं!'' फकिरा रडक्या आवाजात गुरगुरला, आणि राधा हसली. ती काही तरी बोलणार, तोच राहीबाई म्हणाली, ''फकिरा! ती का शिव्या देतीया! किती आगस्ताळा तू?''

''आमच्या आबाचं नाव का काढतीय?''

''मग काय झालं? सारखी धुसफूस करू नये.'' असं म्हणून तीच राधाला म्हणाली, ''बाई, तू बी त्याला चिडवू नकं. खोडीला औषध नसतं.''

राधा हसली. तिनं फकिराला जवळ घेतलं, ''मी थट्टा केली तुझी.''

तो हळूच तिच्या मिठीतून निघाला आणि दारात गेला. पुन्हा ती स्वयंपाकात दंग झाली. एवढ्यात दौलती आला. चूळ भरून त्यानं पाय सरळ केले आणि विचारलं, ''फकिरा कुठंय?''

''भाईर गेला मगा.'' राही उत्तरली. दौलती घरातून हाका मारू लागला; पण फकिरा आला नाही. मग घाबऱ्या स्वरात दौलती म्हणाला, ''आगं, प्वार कुठं दिसंना की.''

हे ऐकून राधाच्या उरात धस्स झालं. तिनं दारात येऊन चौफेर पाहत हाक मारली : ''फकि ऽ ऽ रा ऽ ऽ ह ऽ ऽ''

ती दीर्घ हाक दूर दूर गेली आणि शांत झाली; पण उत्तर आलं नाही. मग तिच्या हृदयात कालवाकालव झाली. तिनं चटकन पश्चिमेकडं पाहिलं. सूर्य निम्माच उरला होता. आता अंधार पडणार, मग मी फकिराला कुठं शोधू, या विचारात ती वेडी झाली. हुंदका कंठात येऊन टकरा घेऊ लागली.

दौलती, राही निवडुंगात धावपळ करू लागली. आळीतील माणसं गोळा झाली. काही दिसेल त्या वाटेनं पळत सुटली. बळी, मुरा, इशा, किशा हे फकिराचे जोडीदार सैरावैरा झाले. निवडुंगाचे डवंगे धुंडाळू लागले. राधा मेख रोवल्याप्रमाणे दारात उभी राहिली. साधू रडू लागला. सावल्यांची चित्रं अंधार पुसू लागली. सर्वांचं धाबं दणाणलं.

''हाय! आरं, बघा दिसतोय का न्हाय? आंधार पडायच्या आत बघा.'' बहिरू मांग ओरडला, ''म्होरं व्हा नि ती हीर बघा.''

विहिरीचं नाव ऐकताच राधानं हंबरडा फोडला. तिला ती कल्पनाच विषारी वाटली

आणि बळी एकदम चरकला, "आगा, हाय!"
"कुठं हाय?"
"हे बघा. चिंचंच्या शेंड्याला जाऊन बसलाय."
मग एकदम ओरड झाली : "हाय. या, या—"
सर्व लोक चिंचेखाली जमून वर पाहू लागले. फकिरा पार शेंड्याला जाऊन खुशाल बसून खालचा तो सर्व प्रकार पाहत होता आणि एका पायाला झोके देत होता. राधा रडत वर पाहू लागली. दौलती नरमाईच्या स्वरात म्हणाला,
"आरं, चोरा! मारलं व्हतंस आमास्नी."
फकिरानं खाली पाहिलंही नाही. मग राहीबाई म्हणाली,
"ये खाली – रात व्हतीया."
सर्वच लोक आग्रह करू लागले, "फकिरा, खाली ये. अंधार होतोय."
पण फकिरा हूं की चूं न करता तसाच बसून होता. मग बहिरू म्हणाला,
"पोरांनू, व्हा रं वर, नि आना त्येला खाली."
हे ऐकून तो एकदम ओरडला,
"वर येऊ नका, न्हाय तर मी उडी मारीन!"
फकिराच्या या दरडावणीनं सर्वांची पाचावर धारण बसली. त्यांच्या तोंडचं पाणी पळालं. राधानं डोकीवरचा पदर ओढून तो त्या वाटेवर पसरला –
"मी पदर पसरत्ये – पाया पडते – तू खाली ये."
दौलतीनं गुडघे टेकून म्हटलं,
"उडी टाकू नगं, फकिरा-बाब्या, ये-ये."
राहीबाईच्या हातापायांना कापरं भरलं. मग तो शांतपणे खाली आला आणि राधानं त्याच्यावर झेप घेतली. त्याला पोटाशी धरून ती रडू लागली. सर्वांचा जीव सुळावरून उतरला आणि कडुसं पडलं.
बहिरू म्हणाला,
"त्येला काई म्हनू नका."
तरीही दौलती म्हणाला,
"फकिरा, असं का? आमास्नी मारू नकं."
"आई, मला वाईट म्हनतीया." फकिरा फुसफुसला.
"ती खुळी हाय. आता तुला वाईट म्हनंल, त्येचं डोस्कंच फोडतो. मातर तू डोस्कं फिरवून घेऊ नकं."
मग कोणीच काही बोललं नाही. प्रत्येक माणूस मग फकिराशी जपून बोलू लागला. राधाला तर जन्माची अद्दलच घडली.

हिवाळा आला नि गेला. मग उन्हाळा आला. चैत्राचं चावरं ऊन धगधगू लागलं. ते पोलादाच्या रसाप्रमाणं ओसंडू लागलं. निळ्या तलम वस्त्राचा रंग आकाशाला आला. चैत्रपालवीनं झाडं नटली. नवे मुगारे लुसलुसू लागले. तारुण्यात विद्रूपताही फिकी पडते, तद्वत झालं. काराट्याबोराट्यांनाही बहर आला. नव्या फण्या येऊन निवडुंगाची मान अधिकच उंचावली. टचटचीत लाल बोंडं डोळ्यात भरू लागली. फण्यांचे काटे सणसणू लागले.

मांगवाड्यात मोठी धडपड सुरू झाली होती. आपापल्या दारात मांगांनी वाख लावून चऱ्हाटं वळायचं काम सुरू केलं होतं. मोठी माणसं दारात सावलीला बसून पड सोडीत होती. लहान लहान पोरं चाकं फिरवीत त्या उन्हात डोकीवर चिंध्या घेऊन मागं सरत होती. ती वैतागली होती. तापलेली चक्रं कुईकुई आवाज काढीत होती. वाखाच्या बट्या आणि बुरकूल सर्वत्र उडत होता.

काही आंगचुकार पोरं निवडुंगात दडून आईबापांना गुंगारा देऊ पाहत होती. ती मुंगसाप्रमाणे त्या निवडुंगात शिरून दडत होती. दौलतीच्या चिंचेखाली फकिरा आणि साधू यांनी विटीदांडूचा खेळ मांडला होता. कुरघोडीच्या खेळाला राधानं मनाई केल्यामुळे सावलीला ते विटी कोलीत होते. दौलती चावडीवर गेला होता. राहीबाई शेळ्या घेऊन रानात गेली होती. राधाचा बसल्या जागीच डोळा लागला होता.

हळूहळू चोरटी पोरं जमली. इशा, किशा, भिवा, बळी, मुरा आले आणि डाव रंगू लागला. तोच सावळा मांगाचा घम्या आला. त्यानं एक नवी खबर आणली होती. ती त्यानं पोरांत सोडली. सारी पोरं एकत्र आली. आतुर होऊन घम्याभोवती जमली. घम्या मध्ये बसला.

हा घम्या लांबट चेहऱ्याचा, गोरा व उंच होता. त्याचं नाकही लांबट होतं. मान लांब होती. त्याची शेंडीही तशीच होती. पण ती सदैव ताठ असे. तो बापासारखाच बिलंदर होता. घमेंडखोर सावळानं आपल्या लाडक्या मुलाचं नाव घमांडी ठेवलं होतं. आसपासच्या सर्व महत्त्वाच्या बातम्या प्रथम सावळाकडे येत आणि मग घमांडी त्या आळीत घरोघर पेरी. आजही एक नवी बातमी घेऊन तो आला होता. पोरं जमली आणि घमांडी गंभीरपणे म्हणाला, "राजेवाडीच्या माळावर, सरकारी बंगल्याजवळ लस्कर आलंया. बघाय चलता का?"

"ए, लस्कर कसलं असतं, रं?" इशानं विचारलं. आणि घम्या म्हणाला, "गोऱ्या लोकांचं असतं. दांडगं असतं."

"पर त्ये गोरं लोक कसलं असत्यात?" मुरानं विचारलं. घम्या बुचकळ्यात पडला.

फकिरा म्हणाला, ''सांग की, गोरं लोक कसलं असत्यात?''

''त्ये मला ठावं नाय.'' घमांडीनं सांगून टाकलं आणि बळी म्हणाला, ''मग आपुन त्ये लवकर बघू, चल.''

''राजेवाडी लांब हाय रं.'' फकिरा माळानं पूर्वेला पाहत म्हणाला.

''आरं, अवघं तीन मैल. चला की.'' घम्या चेकाळून बोलला आणि सारीच पोरं राजेवाडीला निघाली. फकिरा साधूला म्हणाला, ''साधू, तू येऊ नकं. पाय भाजतील. मीच बघून येतो नि तुला सांगतो.''

''लौकर ये!'' साधू गंभीरपणे म्हणाला.

''मी लौकर येतो, पण आईला सांगू नकं.'' फकिरानं धोक्याची सूचना केली आणि पोरं गाडीवाटेनं धावत निघाली. ती सात पोरं गावदरीचा ओढा ओलांडून पुढं गेली आणि पळू लागली. आईबापांना आपली आठवण होण्याआधीच लष्कर बघून परत यायचं, असा विचार करून ती पळत होती.

ऊन मी म्हणत होतं. माळाची वाट फोफाट्यानं भरून बिलबिलीत झाली होती. ऊन्हानं तो फोफाटा तापला होता. उष्ण वाऱ्याच्या लाटा माळाच्या कुसळावरून मंद गतीनं येऊन गरम धूळ डोकीवर घेत होत्या. त्या धुळीतून ती पोरं पळत होती. घामानं भिजली होती. धुळीचे लोट उडवीत ती राजेवाडीची शीव गाठीत होती.

त्यांनी पहिल्या दमात राजेवाडीचा माळ गाठला आणि समोरच्या सरकारी बंगल्याच्या सभोवती तळ देऊन पडलेल्या गोऱ्या लष्कराला ती पाहू लागली. आतुर नजरा भिरभिरू लागल्या. त्या अफाट माळावर सर्व काही तापलं होतं. वाटेकडेला फक्त एकच बाभळीचं झाड होतं, पण त्यालाही विस्तार नव्हता. पाय होलपटलेली पोरं त्या झाडाजवळ गेली आणि एकदम थबकली. समोरच्या वाटेगावचा चंदू आत्तार आपलं करड्या रंगाचं घोडं दुडक्या चालीवर दामटीत येत होता. त्यानं कल्हई रंगाचा भला मोठा पटका बांधला होता. त्याचं रुंद कपाळ, दाट भुवया, भोऱ्या-पिळून आकडे वळलेल्या मिश्या आणि भोरी रुंद दाढी, आखूड गर्दन, मजबूत छाती, वर इंग्रजी जॅकेट अशा अवतारात तो कुणाचंही लक्ष वेधून घेत असे. तो सारखी घोड्याला टाच मारीत होता. त्या माळाची त्याला चीड आली होती. त्याला वाटेगाव जवळ करायचं होतं.

आत्ताराला ओळखून पोरांचे पाय मंदावले. त्यांनी त्याला बाजू देण्यासाठी वाट रिकामी केली; पण जवळ येताच चंदूनं लगाम ओढून घोडं उभं केलं. पोरंही मग उभी राहिली. आत्तारानं एक एक पोर निरखायला सुरुवात केली. डोळे वटारून तो पाहू लागला.

सर्वांच्या पुढं फकिरा होता. त्यानं अंगात गोल पैरण घातली होती. खाली लंगोट नेसला होता. त्याच्या रसरशीत चेहऱ्यावर घाम डबडबला होता. त्याच्या डोकीचे केस विस्कटून डोकीतून पाणी मानेवर झिरपत होतं. त्याचा सावळा रंग, घारे डोळे, सरळ

नाक, रुंद कपाळ आणि चेहऱ्यावरचा तरतरीत भाव पाहून चंदूनं बळीकडे नजर वळविली. बळी उंचीनं गिड्डा वाटत होता. त्याचं नाकतोंड देखणं दिसत होतं. त्यानं पैरण घालून खाली लंगोटी लावली होती. जवळच मुरा काखेत हात धरून उभा होता. त्यानं एक खेंडं डोकीला गुंडाळलं होतं. त्याच्या अंगातील जुनी पैरण फाटून तिच्या चिंध्या झाल्या होत्या. तो बिचकून उभा होता. त्याच्या मागं तो किडकिडीत किशा बुजून उभा होता. त्यानं फक्त लंगोटी लावली होती. त्या लंगोटीचा मागचा उरलेला शेव शेपटीसारखा लोंबत होता. त्यामुळं तो वानरीच्या पिलाप्रमाणे दिसत होता. बहिरू मांगाचा इशा अंगातली पैरण खांद्यावर टाकून घेऊन पळ काढण्याच्या विचारात होता. सावळा मांगाचा घम्या एका पायावर उभा होता. पाय भाजत आहेत, असं भासवण्यासाठी तो तोंड वाकडंतिकडं करीत होता आणि आप्पा मांगाचा भिवा आत्ताराला मनातल्या मनात शिव्या देत होता.

ही सारी पोरं नीट बघून मग आपली मान उंचावून, भुवया उंचावून चंदू म्हणाला, "'ए बिरमुटेकी फौज, किदर भागताय, रं? दरुडा करनेकू? बोलो ना. वाचा बैठी क्या, रं?'' त्यानं घम्याला पुढं बोलावीत विचारलं, "तू सावळा मांग का ना, रं? मग लेका नक्कीच दरुडा पडनार, तर.''

कोण काहीच उत्तर देत नव्हता. ते डोळे रोखून आत्ताराची दाढी पाहत असल्यासारखे नुसते पाहत होते. मग त्यानं फकिराला विचारलं,

"तू राणोजी का ना, रं?''

"हं!'' फकिरानं होकार दिला आणि आत्तार एकदम नरमाईनं बोलू लागला,

"आरं, उन्हाच्या रनक्यात दगडाची लाही व्हतीया नि तुम्ही कुठं रं, पळताय?''

"आम्ही लस्कर बघाय जातूया...'' फकिरा म्हणाला आणि आत्तार पुन्हा चिडला, तो म्हणाला, "काय बघताय रं, लस्कर? त्याच्या वाटणीचं त्या इठूबाच्या बागेत जाऊन वानरं का न्हाय बघीत?''

"आमचं पाय भाजत्यात.'' फकिरा आवाज चढवून म्हणाला.

"मग मी काय करू?'' आत्तार गुरकला.

"आमास्नी जाऊ द्या.''

"मग जा की!'' आत्तारानं घोड्याचा लगाम सैल सोडून पुन्हा टाच मारली. घोडं दुडक्या चालीनं निघालं.

— आणि ती पोरं फासक्यातून पाखरं सुटावी, तशी भरधाव धावत निघाली. त्यांनी राजेवाडीची ती सडक गाठली. सडकेच्या दुतर्फा असलेल्या वडाच्या झाडांच्या थंड सावलीत जाऊन त्यांनी दम घेतला. कुणी आंग टाकलं.

सडकेच्या बाजूलाच तो सरकारी बंगला होता आणि त्या बंगल्याच्या सभोवती शुभ्र छावण्या पडल्या होत्या. आंबराईत गोरे लोक लोळत होते. मोठमोठ्या घोड्यांच्या दावणी

पडल्या होत्या. जागोजाग गोरे गार्ड बंदुकी घेऊन पहारा देत होते. त्यांचा तो विचित्र पोशाख, खाली गुडघ्यापर्यंत घागरे, लांब हाताचे डगले, लालभडक रंग, बसकी नाकं, गुबगुबीत गाल, चमत्कारिक आवाज - हे सर्व ती पोरं झाडाखाली बसून पाहू लागली. त्यांचा सारा शीण दूर झाला. ती हसू लागली.

एवढ्यात शिगावचा बापू खोत घोडा उडवीत आला. त्याच्या घोड्याला पाहून लष्करी घोडी खेकाळली; काही दुगाण्या झाडू लागली. लष्करी शिपायांनी किंचित वळून त्याच्याकडे पाहिलं. तो छावणीत गेला. उशीर परत आला नाही. बड्या साहेबाला जेवणाचं आमंत्रण देण्यासाठी तो आला होता.

बापू खोताला ओळखून घम्या म्हणाला,

"ह्यो बघ, त्यो शिगावचा बापू खोत. ह्येनंच राणूनानाला मारलं."

त्याचे हे शब्द ऐकून फकिरा गंभीर झाला. त्याच्या कपाळावर आठ्या उभ्या राहून त्याचे डोळे स्थिर झाले. तो हळू आवाजात म्हणाला, "आबाला मारलं—" त्याच्या आवाजात दु:ख, चीड यांचं मिश्रण झालं — "आन् आमचा गबरू बी मारला!"

वडाच्या मुळीवर बसत घम्या म्हणाला,

"नुसता भुताच्या पोटचा हाय भडवीचा!"

"आनि ह्यो त्या सायबाचा मैतर हाय वाटतं?" बळी म्हणाला.

"मग ह्ये लस्कर बी खोताच्याच जातीचं असंल." घम्यानं शंका प्रदर्शित केली आणि किशा म्हणाला, "आरं, असंल कसलं, हाईच!....."

"मग नगं आमास्नी ह्ये लस्कर. निघू या!" फकिरा त्रागा करीत म्हणाला.

इतक्यात खोत त्या मोठ्या सायबाशी बोलत बोलत त्यांच्या दिशेनं येऊ लागला. आडदांड घम्यानं विचार केला आणि जवळच पडलेला दगड उचलून हातात घेतला. सारी पोरं भयभीत झाली.

सात पोरं एकाएकी गडप झाल्याचं लक्षात येताच मांगवाड्यात गोंधळ माजला. जो तो पोरांना शोधण्यासाठी पळत सुटला. त्यांचे आईबाप रडत ओरडत धावू लागले. गलबला ऐकून राधा बाहेर आली. एकटा साधू पाहून तिनं विचारलं, "साधू... फकिरा कुटंय?" त्यावर त्यानं फक्त ओठ उफराटा केला. तो काहीच बोलला नाही. राधाचंही काळीज हाललं. ती हाका मारीत निघाली. तोच दौलती आला. पोरं गेली — कुठं गेली — गलका वाढला. पोरांचे आईबाप दौलतीच्या दारात जमले. सावळा मांगही हातात कुऱ्हाड घेऊन आला.

हा सावळा मध्यम उंचीचा, सडपातळ व मजबूत होता. हेकट, रागीट आणि

सापासारखा डूख धरणारा, म्हणून 'डाखैल सावळा' असं त्याला लोक म्हणत. तो बिलंदर, चोरटा, तसाच धाडसी पण होता. अंमलदार त्याला पाण्यात पहात आणि तो त्यांना. आसपासच्या सर्व डागीळ माणसांशी त्याची मैत्री होती. गुन्हेगार लोकांत त्याला बराच मान होता. चोरी ही पोटासाठी आणि पोटापुरतीच करावी, असा त्याचा बोल असे. ऐट त्याला आवडत नसे. पण स्वत: मात्र तो फारच घमेंडखोरी करी. म्हणूनच त्यानं आपल्या लाडक्या पुत्राचं नाव घमांडी असं ठेवलं होतं आणि हा घरात जे जे करी, ते ते सारं मांगवाड्यात फिरून घमांडी सांगे. घमांडी नाहीसा झाला, तो फकिराच्या नादानं कुठं गेला असावा, असं वाटून सावळा फकिरावर आणि दौलतीवर चिडला. भुवया चढवून, डोळे वटारून तो दौलतीला म्हणाला,

"नाना, तुमच्या पोरानं आमची पोरं बिघडवली बघा."

हे ऐकून दौलतीही चिडला. इतक्या चढ्या आवाजात त्याला कुणीच बोलत नव्हता; पण आज सावळा बोलला, तेव्हा दौलती म्हणाला, "तुझं चालीचं बाळ मला ठावं हाय. त्येच्या पायाला दावं बांधून लावून टाक. आरं, मूळचाच नायटा, त्येला बिघडाय कशाला पायजी?"

सावळ्याचं डोकं हे उद्गार ऐकताच अधिकच फिरलं. तो तावातावानं पुढं सरसावला आणि मोठ्यानं म्हणाला, "असं बोलू नका. माझं पोर देवावानी हाय. माझ्या पोरानं काय चाल केली?"

"मग आमच्या पोरानं तुझं पोर बिगडवलं कसं?" दौलती म्हणाला.

"हे कसं – कुटं परागंदा झालं?"

"मग त्याला फकिरानं न्हेलं, हे खरं कशावरनं?"

"तुम्ही त्येचा लाड करता–"

"आम्ही आमच्याचा लाड करतो." दौलती भडकला.

"तू तंडू नगं–"

एवढ्यात कोंडी महार महारकीतून परत आला. त्यानं तो गलका ऐकून घेतला आणि तो शांतपणे म्हणाला, "थांबा. एकमेकांवर येऊ नगा. मघाशी पाच-सहा पोरं माळानं पळत गेली. त्यात घम्या साऱ्यांच्या पुढे उड्या मारीत व्हता."

"ऐकलंस?" दौलती खेकसला आणि सर्व लोक माळानं धावत निघाले. आपण दौलतीवर उगाच गुरकलो, याची लाज वाटून सावळा हिरमुसला. तो गुमान चालू लागला. पण मनातून घम्यावर संतापला.

राधाचे भरलेले डोळे फकिराला धुंडू लागले. त्या अफाट माळानं येत असलेला फकिरा दिसावा, आपण त्याला उचलून पोटाशी धरावा, त्यानं आता उशीर करू नये- तिचं मन वेडं झालं. आईची वेडी माया, वेडे विचार करू लागली. ती तुपाप्रमाणे वितळली.

तिची नजर तिच्यापुढं दूर जाऊ लागली आणि पुन्हा निराश होऊन परत येऊ लागली. फकिरा लौकर दिसावा, म्हणून ती चरफडू लागली. ती एकदम थबकून त्या तापलेल्या धुळीत उमटलेली फकिराची पावलं पाहू लागली. तिनं ते पाऊल ओळखलं आणि ती एकदम ओरडली,

"आतू ऽ ऽ, हे बघा माझ्या फकिराचं पाऊल. तो हकडंच गेलाय."

"राधा, धीर धर. फकिरा कुठं जानार न्हाई." राहीनं तिची समजूत काढली.

त्या सर्वांनी पहिलं लवण ओलांडलं. इतक्यात पुढून चंदू आत्तार आला. त्याला पाहून सर्व उभे राहिले. आत्तारानं विचारलं,

"आरं, का धडपडताय? कुठं निघाला?"

"दुपारच्यानं पोरं कुठं गेल्याती..." दौलती म्हणाला.

"कुठं जात्याती? गेल्याती लस्करी छावणीवर." चंदू हातातील लगामाशी चाळा करीत म्हणाला, "मला आढळली ती. आता परतली असतील."

"परतली, म्हंजी बरं झालं!" दौलती सुटकेचा निःश्वास टाकीत म्हणाला आणि चंदू मध्येच म्हणाला, "मग कुटं जात्याती? दौलूनाना, तो तुझा नातू वाटतं? चांगलं पोर निपजलं बघ, बापासारखंच. आन् ही रडतीय, ती त्येची आई वाटतं? आँ? रडाय काय झालं? त्यो काय छावणीवर हल्ला कराय गेलाय? नाना – पोराला जपा. वाघ व्हईल, वाघ! वाघाच्या पोटी वाघ जन्मतो, कोल्हा न्हाय. आणि, ए सावळा, ते शेंडीवालं रत्न तुझंच का? इयाक हाय तुझ्यावानीच मरीआई!" हे ऐकून सारेच हसले. आत्तार पुढं गेला आणि सावळा चिडला.

त्यांनी तो माळ ओलांडला आणि ते राजेवाडीच्या माळावर आले. एकदम त्यांची गती मंद झाली. ती सात पोरं पुढं भन्नाट धावत येत होती. त्यांना पाहून सर्वांना आनंद झाला. चेहऱ्यावरची काळजी दूर झाली. मग सर्वांनी माळाला बैठक दिली. तंबाखूच्या चंच्या सुटल्या.

पण राधा थांबली नाही. ती तशीच धावत पुढं गेली. अगदी धावत – वाऱ्यासारखी. फकिरा वरमून जवळ आला. त्याला मटकन उचलून तिनं पोटाशी धरला. त्याचा मुका घेऊन पदरानं त्याचा घाम पुसला. त्याच्या पायांची धूळ झटकली. तिचे ओठ थरारले, "फकिरा, कुठं गेला व्हतास?"

"लस्कर बघाय." फकिरानं आईकडे न बघताच उत्तर दिलं.

घम्या जवळ येताच सावळानं नारळाएवढे दोन दगड उचलले. तो डोकीचं पागोटं मागं सरकवून म्हणाला, "ये लेका, तुला जिवंत मारतू."

"आरं, आरं-थांब!"

"सोडा, बहिरूदाजी. या भडवीच्याच्या आंगात सारी गोम हाय!"

"आरं, पर मारून काय व्हनार!" आप्पानं खेकसून विचारलं आणि सावळा रडकुंडीला येऊन म्हणाला, "ह्येच्यापायी मी आज दौलूनानाला टाकून बोललो. मी आज ह्येला पुरूनच टाकणार! मला सोडा गा–"

"गप बस." दौलती डोळे वटारून म्हणाला, "पोर नि ढोर सारखं असतं."

या दाबानं सावळा शांत झाला. पोरं जवळ आली. राधाकाकू आपल्याला मारू देणार नाही, याची त्या सर्वांना खात्री होती. मग सारे वाटेगावाकडे निघाले. घम्या मात्र हातधोंड्याच्या अंतरानं पाय ओढीत येत होता.

अंधार पडला. घरी आल्याबरोबर राधा स्वयंपाकाला लागली. पहिली ऊनऊन भाकरी घेऊन फकिरा व साधू घरात येऊन खात बसले. राहीबाई सुनेला मदत करू लागली. दौलतीकडे शिपाईगिरीची नोकरी आली होती. तो चावडीवरून अजून आला नव्हता.

सर्वत्र सामसूम होती. भाकरी आणि चटणी चावीत चावीत आणि नाक फुरफुरवीत साधू हळूच म्हणाला, "लस्कर बघितलंस?"

"हो-बघितलं, मर्दा."

"कसलं काय त्ये?"

"समदी गोरी मानसं. बंदुकी, तलवारी, घोडी–"

"ती नेसत्यात काय?"

"आरं, तुमानी-नि वर बुटावानी टोप्या."

"मला न्हाय न्हेलंस! टाकून गेलास."

"साधू, लई पाय भाजलं. फोड आलंत पायाला माझ्या."

"जवातवा असंच म्हनतोस. रातचं काटं – दिवसाचं फोड. मग आमास्नी–"

"आता न्हाय – आता न्हाय तसं म्हननार."

"ते सायब लोक मानसावानीच हायती का?"

"आरं, हो. मानसावानीच, पर माकडावानी करत्यात."

"म्हंजी? झाडावर उड्या मारत्यात?"

"उड्या न्हाय रं, पर कसंच बोलत्यात."

"किंचाळत्यात?" दोघेही मोठ्यानं हसले. फकिरा म्हणाला, "गिचमिड गिचमिड, रं. आन् मग तितं त्यो शिगावचा खोत आला–"

"आबाला मारलं, त्यो?" साधूनं मध्येच विचारलं.

"आरं, हो–" फकिराचा 'हो' लांबला.

त्यांचं हे बोलणं राधा व राही दोघी आतून ऐकत होत्या. खोताचं नाव ऐकून त्या

दाराजवळ येऊन ऐकू लागल्या. फकिरा पुढं सांगू लागला, "त्यो सायबासंगं बोलत बोलत आमच्या जवळ आला. घम्याला राग आला नि त्येनं दगडच उचलला. म्हनला, 'ह्येनंच आमच्या राणूनानाला—' पण म्याच त्येचा हात धरला — न्हाय तर—"

"का धरलास?" साधू चिडक्या आवाजात म्हणाला, "मारू दियाचा भडव्याला."

"आरं, पर समदं लस्कर आमच्या मागं लागलं असतं की!" फकिरा चिंतायुक्त स्वरात म्हणाला.

"आरं हो, मी इसारलूच." साधूला आपली चूक कळून आली.

"समदी सायबं खोताची मैतर हायती—" फकिरा म्हणाला.

"मग वंगाळ हायती. नगं आमास्नी ती." साधू नाराजीच्या स्वरात म्हणाला, "मी आता न्हाय येनार ती सायबं बघाय—"

"आनि मी बी न्हाय जानार—" फकिरा म्हणाला.

"आई लई रडली." साधू पुटपुटला.

"तू सांगितलंस?"

"न्हाय."

"शाब्बास! असं सांगू नये."

"का सांगू नये?"

"आई मला वाईट म्हनंल — म्हनून, रं."

"मग ती रडली का?"

"मी तिचा हाय, म्हनून!"

राधाला राहवेना. ती बाहेर आली. तिनं दोघांना मांडीवर घेतलं. हृदयाला प्रचंड भरती आली. डोळ्यातील थेंब त्या दोघांच्या मस्तकावर ठिबकले. तिनं तळहात फिरवून फकिराचे पाय पाहिले. त्यांना फोड आले होते. तिचा कंठ दाटून आला. "बाळा, मी तुला वाईट म्हननार नाही — कधीच म्हननार नाही."

नकळत आकाशात रंग बदलला. पावसाळी वारा भरलेले ढग डोकीवर येऊन गगनात वावरू लागले. आल्म आला म्हणत आषाढ आला. अगदी उद्यावर येऊन ठेपला.

पुन्हा राणोजीचं नाव सर्वांच्या जिभेवर खेळू लागलं. वाटेगावच्या जोगण्या उद्यावर आल्या. जिकडे तिकडे तयारी सुरू झाली. घरोघर सणाची जुळणी झाली. अमावास्येच्या दिवशी वाटेगावच्या जोगण्या जाहीर झाल्या, तशा गावोगाव पाट्या फिरल्या. एका नामांकित तमाशाला सुपारी दिली गेली. कुस्त्यांसाठी मोठी रक्कम जाहीर झाली.

जोगण्यादिवशी बापू खोत स्वस्थ बसणार नाही, याची कल्पना असल्यामुळे

शंकरराव पाटील सावध होता. गावातील तरणी माणसं जमवून त्यानं तयारी केली. जीव द्यायचा, पर जोगणी जाऊ द्यायची नाही, असा त्याने निर्धार केला. मांगवाड्यात मांग तलवारी घासू लागले. भैरू नाईक आपली कुऱ्हाड साणेवर लावून तयार झाला.

— आणि अमावास्येचा दिवस उगवला. गावात त्या दिवसाबरोबर आनंदही उगवला. प्रत्येक घरात पोळी चरचरू लागली. झकपक कपडे करून पोरंबाळं मिरवू लागली. घराघरावर आनंदाचा धूर तरळू लागला. पै-पाव्हणं येऊन गाव गजबजला. सकाळी न्हावी लुगडं नेसून झडपीण झाला आणि दारोदार फिरू लागला. प्रत्येक दारात त्याला खोबऱ्याची वाटी आणि एक पैसा मिळू लागला. पुढचं वर्ष सुखाचं जावं, म्हणून कोणीही मागं पाहिलं नाही. त्यात तो दिवस गावच्या इतिहासात प्रथमच तसा उगवत होता. नवा पायंडा पडत होता. नव्यानं जत्रा भरत होती. त्या धुंदीत लहान-थोर धुंद झाले होते. फक्त एकच रुखरुख होती. ती म्हणजे बापू खोत दंगल करून जोगणी परत नेणार की काय?

सकाळीच दौलतीच्या घरात थोडी रडारड झाली. आज एक वर्ष झालं. याच दिवशी राणोजीला मरण आलं होतं. पण घरोघर आनंद आणि आपण रडत बसणं बरोबर नाही, असं म्हणून दौलती, राही, राधा यांनी स्वतःला धीर दिला आणि तेही त्या आनंदात मिसळले. राणोजीच्या नैवेद्यासाठी म्हणून संस्थान सरकारनं सव्वा मणाचा खर्च मंजूर केला होता. त्याप्रमाणे सकाळीच राधानं डोळे पुशीत पोळ्या लाटल्या आणि एका पितळीत नैवेद्य घेऊन दौलती, फकिरा, साधू हे त्या माळाला गेले. फकिरानं हिरव्या गवताची एक पेंडी गबऱ्यासाठी घेतली होती. कारण त्या गबऱ्यानं राणोजीच्या आधी प्राण दिला होता. त्याचं इमान तो फकिरा विसरला नव्हता.

दौलतीनं आसू टिपीत नैवेद्य दाखविला. कंठात आलेला हुंदका आवरला आणि तो म्हणाला, ''हं, पोरांनू, आपल्या बापाच्या पाया पडा!''

मग फकिरा, साधू यांनी डोकी जमिनीवर टेकली. जिथं राणोजी कत्तल होऊन मेला होता, त्या ठिकाणी त्यांनी कपाळं टेकली. 'तुझं बळ, तुझी कीर्ती, तुझी हिंमत आम्हाला येऊ दे' असं ते दोघे म्हणाले नाहीत, परंतु त्या जागेची ती मैदानी माती नकळत त्यांच्या भाळी चिकटली. त्या धरणीनं जणू त्या दोघांचं मळवटच भरलं. दौलतीनं पाहिलं, पण ती माती पुसून टाकण्याचं धैर्य त्याला झालं नाही. मग ते तिघे आजा, नातू घरी आले. राधानं त्यांची कपाळं पाहिली आणि तिला रडू कोसळलं. ती माती तिनं ओळखली. ती पाहत राहिली. टक लावून पाहत राहिली. तेव्हा दौलती म्हणाला,

''ती त्या जाग्याची माती हाय.''

''हो. हो. म्या ओळखलीय.''

''ती लावली न्हाय. लागली पाया पडताना. पेढ्यांचा पुडा कमरंत खोवून तलवार फिरवली त्या मातीनं, ती त्या दोघास्नी कशी इसरंल?'' दौलती पुढं बोलला नाही. राहीनं

गंभीर चेहरा केला. तिचे आसू केव्हाच संपले होते.

राधानं त्या दोघांना घरात नेलं आणि विचारलं, ''बापाच्या पाया पडला?''

''हो — इचार बाबाला.''

''काय मागितलं त्यांच्यापाशी?''

''काईच न्हाय!'' फकिरा म्हणाला आणि राधा त्याच्या कपाळाकडे पाहत म्हणाली, ''पण तुम्ही न मागता तुमच्या वडलानं तुम्हास्नी सारं देऊन टाकलं. ती माती तुमास्नी इसरत न्हाय. तुम्ही या मातीला इसरू नगा. त्या मातीवर खोतानं आगळीक केली — ती इसरू नका. आनी मरू नका. मोटं व्हा. बापासारखं मोटं व्हा. तुम्ही मोटं होईतोवर मी मरनार न्हाय.''

राधा वेड्यासारखी बोलत होती. हृदयात पुष्कळ दिवस तुंबलेले ते शब्द त्या वेळी बाहेर पडले, तिनं पदरानं तोंड पुसलं. मग फकिरा, साधू, दौलती व राही यांच्याजवळ जाऊन बसले. फकिरा दौलतीचं तोंड आपल्याकडे फिरवीत हळूच म्हणाला, ''बाबा!''

''काय?''

''आई मरनार न्हाय. तू?''

''मी बी मरनार न्हाय.''

''आन् थोरली आई?''

''तिला बी आपून मरू दियाची न्हाय.'' दौलती म्हणाला.

दुपार झाली. सव्वा मणाची पंगत मांगवाड्यात उठली. 'जोगणी निघायची वेळ झाली — लौकर या,' असा पंतांचा निरोप आला. परगावच्या पाव्हण्यांसह ढीम - हालगी लावून वाजत मांगांच्या तलवारी गावात निघाल्या. तलवारी, कुऱ्हाडी, भाले या हत्यारांनी गल्ली भरली. पन्नास जवान कडेकोट तयारी करून जिवावर उदार झाले होते. बारीकमोठं शे-दोनशे माणूस तलवारीबरोबर चालत होतं. हालगीच्या निनादानं हवेत जोम आणला. गाव भरल्यासारखा दिसू लागला. सनदशीर शिपाई म्हणून दौलती मांग गर्दीत खंबीर चालत होता.

शंकरराव पाटील जरीचा पटका बांधून आपल्या ताणबाज घोड्यावर बसला होता. भरदार मिश्यांना पीळ भरून त्यानं हातात नंगी तलवार घेतली होती. त्याच्या दाट भुवया चढल्या होत्या आणि त्याचा रुंद चेहरा आज उग्र झाला होता.

विष्णुपंत आपल्या करड्या घोड्यावर जीन घालून बाहेर पडले होते. त्यांनी आज कंबर बांधली होती. त्यांनी जोगणीच्या मिरवणुकीची स्वत:च सर्व तयारी केली होती. वाटा रोखून धरण्यासाठी घोडी नेमली होती. सर्व वाटा बरोबर रोखल्या की नाही, हे

ते स्वत: घोडदौडीनं पाहत होते. आज बामणाच्या अंगात राणोजी मांग शिरला वाटतं, असं लोक म्हणत होते.

सूर्य पश्चिमेकडे झुकला आणि जोगणी निघाली. एकदम सर्व वाद्यांनी गजर केला. एका सुरात गावानं 'हरहर महादेव' अशी गर्जना केली. जोगणी वाट चालू लागली. तरुण दिनू गुरव जोगा झाला होता आणि तसलाच देखणा रुंगा सुतार जोगणी झाला होता. ते दोघे तलवारीच्या छायेत निघाले होते. गल्ल्या, बोळ, पडकी भिंताडं माणसांनी फुलली होती. लोकांच्या गर्दीतून जोगा आणि जोगणी पुढं सरकत होती. भाविक लोक श्रद्धेनं हात जोडीत होते. जोगणी पुढं येताच राणोजीचं नाव त्यांच्या ओठावर नाचत होतं.

एका दगडाच्या खिळ्यावर राधा आणि राही या सासवासुना उभ्या होत्या. फकिरा आणि साधू आईचे हात धरून उभे होते. जोगणी येऊन त्यांच्या पुढून जाणार होती. जवळून दिसावी, म्हणून राधा उशीर तिथं उभी होती. मनात अनंत विचारांचे तरंग उठले होते. -- बारा महिन्यांपूर्वी एक जीव कायमचा गेला; पण त्यानं या गावात कायमचा आनंद निर्माण केला. ही प्रचंड जत्रा त्याच्या रक्तानं भरत आहे. त्या रक्ताचं आणि आपलं अगदी जवळचं नातं आहे. म्हणजे हे सर्व आपल्यामुळेच होत आहे. ही माणसांची धावपळ, ही आरास, ही तोरणं, हे बाजे, ह्या तरवारी - ह्या साऱ्यांत आपला आत्मा संचारला आहे.

राधा स्वत:ला विसरली. विचारांच्या चक्रात सापडून भलतीकडे निघाली. तोच वाद्यांचा गजर जवळ येऊ लागला. तो ऐकून ती भानावर आली.

जोगणीच्या पुढं सावळा मांग कुऱ्हाड वर धरून चालत होता. त्यानं दोनटांगी धोतर नेसून डोकीला टापर बांधली होती. त्याच्या जोडीला भैरू रामोशी दिसत होता. त्याचा धिप्पाड देह आज भलताच फुगला होता. रामोशी राक्षसासारखा भासत होता. 'पुढून येऊन जोगणीवर कोणी झडप घेईल, त्याला परत फिरू देऊ नका,' असा पंतांचा त्यांना हुकूम होता. सखूजी महार हातात विळा घेऊन गर्दी दूर ठेवीत होता. पंत आणि पाटील जोगणीच्या मागेपुढे होते.

जोगणी राधाच्या जवळ आली. पुढे निघाली. इतक्यात पंत ओरडले,

"जोगणी तिथंच थांबवा!"

सर्व गपकन थांबले. पंत घोड्यावरून उतरून जवळ गेले नि म्हणाले, "ह्या जोगणीवर मालकी हक्क या जिवाचा आहे. त्यांना दर्शन घेऊ द्या!" असं म्हणून पंत राहीबाई, राधा यांच्याजवळ जाऊन म्हणाले, "हं, काकू, पाया पडा. ही तुमची जोगणी!"

राही व राधा गोंधळून गेल्या. काय बोलावं, हे त्यांना सुचेना. मग पुन्हा पंत पुढे झाले. त्यांनी फकिरा, साधू यांना जोगणी दिसावी, म्हणून हातानं धरून पुढं आणलं. मग दोघांनी हात जोडले आणि 'चला' अशी पाटलानं हाक दिली. पुन्हा सर्व वाद्यं वाजू

लागली. आळीपाळीनं जोगणी फिरत फिरत दिवस बुडता बुडता परत आली आणि विसर्जन पावली. विष्णुपंत आणि पाटील यांच्या शिरावरचा बोजा हलका झाला. गावानं सुटकेचा निःश्वास टाकला. बापू खोत आला नाही किंवा आला असला, तरी त्याचं काही चाललं नसावं. जोगणीत विघ्न आलं नाही. 'पहिली जोगणी सुखरूप पार पडली. आता पुढचं कुणी पाहिलं?' असं म्हणत लोक घरोघर परतले.

आपल्यासाठी पंतांनी जोगणी उभी केली, या विचारानं राधा पुलकित झाली. त्या प्रसंगानं ती सर्व दुःख विसरली.

पंतांच्या शब्दांनी राहीबाईला धीर आला. मुलगा मेला, पण चीज झालं, असं तिला वाटलं. गोड शब्दांनी मनाला फुलोरा येतो.

— आणि दौलतीनं तर एक वर्षानंतर आजच मिशीला पीळ भरला होता.

## ४

आषाढाच्या मध्यावर पावसानं भलताच ज़ोर धरला. मांग उपाशी मरू लागले. दौलतीच्या बाबतीत गावानं हात सैल सोडला होता; परंतु बाकीचे नादार होते. त्यांना कोणीच धनी नव्हता. त्यांची ती उपासमार सावळा मांगाला बघवेना. तो भर पावसात बाहेर पडला. भैरू रामोशी आणि सावळा दोघांनी आसपासच्या रानात उत्पात मांडला. त्यांनी शिगावावर करडी कमान धरली. या लुटालुटीत खोत हैराण झाला. चार महिन्यात तो हंबकुटीला आला आणि सातारला गेला. त्यानं प्रांतसाहेबांची भेट घेऊन सावळा मांगाचं नाव दाखल केलं.

सावळाची ख्याती प्रांताच्या कानावर आली होती. त्यानं विष्णुपंत कुलकर्ण्यांना पत्र देऊन शिपाई वाटेगावला दामटला. पत्रात लिहिलं होतं :

'तुमच्या गावचा सावळा दाजी मांग यास साताऱ्यास पाठवावे. आम्हाला त्याच्याशी काही बोलायचे आहे.'

हे पत्र ऐकून सावळा चरकला. 'दगाफटका होणार, मी साताऱ्याला जात नाही' असं तो पंतांकडे म्हणाला. पण 'बोलावयाचे आहे, धरावयाचे नाही' असं पत्र आहे, तेव्हा तू जा! जर काही वाईट झालं, तर मी साताऱ्यास येईन! असं पंतांनी सांगितलं, तेव्हाच सावळा साताऱ्याला गेला. कचेरीत खोताला पाहून त्याला संशय आला, की प्रांताचं पत्र खोताच्या गाऱ्हाण्यामुळं आलं असावं.

प्रांतानं सावळ्याला नीट पाहून घेतला. त्याचा थाटमाट, कुऱ्हाड हा नक्कीच चोर असावा, अशी त्याची खात्री झाली; पण हा भलताच बोलका आहे, हे त्याला नंतर उमजलं. भेटीत प्रांतानं पहिलाच सवाल केला,

"तुमच्या गावाशेजारी इंग्रजी हद्दीत भाटवाडी येथे परवा खून झाला आहे, त्याची आम्हाला माहिती हवी आहे." हे ऐकून सावळा हसत म्हणाला, "जर रोज दोन कोंबड्या खानाऱ्या तुमच्या अंमलदार लोकांस्नी त्या खुनाची बातमी लागत न्हाय, तर ती माझ्यावानी पाला खानाराला कशी कळनार? आनी त्यो खून काय मला सांगून कुनी केला न्हाय—"

"तू जास्त बोलतोस." प्रांत मध्येच म्हणाला, "जेवढं आम्ही विचारू, तेवढंच बोल."

"मला मोजकं बोलता येत न्हाय, सरकार—"

"म्हणजे बेलगाम बोलता आणि वागता येतं— असंच ना? तो खून तुम्ही मांगांनी केला आहे."

"असं कोन म्हनतं?" सावळा तापून म्हणाला, "मांग कधीच कुनाचा खून करीत न्हाय! कनसं खुडून प्वाट भरतं, तसं मुंडकं मारून भरत न्हाय, मुंडकी मारायचं काम ह्या खोतावानी दांडगेसराचं, आमचं नव्हं!" सावळानं खोताकडे बोट दाखवून म्हटलं आणि खोत गोरामोरा झाला! परंतु गप्प बसला. प्रांत भडकून म्हणाला,

"आपला गुन्हा दडावा, म्हणून दुसऱ्याचं नाव घेऊ नको. तुला अटक करीन!"

"करा की अटक!" सावळा दाबात बोलला, "गुन्हा माझ्याजवळ काढा. तुम्ही साप म्हून भुई थोपटायला लागला, सरकार, पर मी मिशी काढून दीन — मांग खून करीत न्हाय. मानसं मारून आमचं प्वाट भरत न्हाय. उलट मानसं जगावी, त्येंनी शेती पिकवावी आन् आम्ही शेंडागोंडा आनून जगावं, असंच आमास्नी वाटतं!"

"म्हणजे तुम्ही उभ्या पिकांची लूट करता?"

"हो — हे मातर खरं हाय!"

"तुम्ही शिगावचं रान बेचिराख केलं!" प्रांतानं आपली सरबत्ती सावळ्यावर सुरू केली, "एका मांगाचं जोगणी पळवीत असताना खोतानं शिर मारलं, त्याचा सूड म्हणून तुम्ही शिगावची पिकं ओरबाडून घेत असता. खरं ना हे?"

"आता तुम्ही खरं बोलला." सावळा लटकेच हसत म्हणाला, "खोतानं गाऱ्हानं घातलं, म्हणून तुम्ही मला बोलावनं केलंया, हे आता उघड झालंय. आम्हाला रानूजीचा सूड घियाचा असता, तर खोताचं डोस्कं काय कुलपात नव्हतं. कुटंबी मारलं असतं. आनी—"

"आणि काय?"

"आनी अजून बी खोतानं आमची जोगणी परत न्हीयाला यावं, जाग्यावरच मुंडकं न्हाय मारीन, तर मांगाची अवलाद न्हवं! आनी अवलादीला हेच सांगून मी मरनार!"

"तू घमेंडखोर आहेस!"

"खरं हाय, सरकार!"

'प्रांताची वेळ झाली. उद्या बोलू,' असं सांगून प्रांत आपल्या कामाला गेला आणि

खोताकडे तिरप्या नजरेनं पाहत सावळा धर्मशाळेत वस्तीला गेला.

त्या रात्री शिगावहून खास माणूस एक खबर घेऊन आला, की खोताचा साराच्या सारा ऊस जळून राख झाला. सकाळी खोताचा ऊस जळाल्याची बातमी ऐकून दक्षिण साताऱ्यात होत असलेल्या लुटालुटीशी सावळ्याचा संबंध नसून दुसरंच कोणी तरी आहे, अशी खात्री होऊन प्रांतसाहेबानं सावळ्याला जाण्याचा हुकूम दिला आणि मिशीला पीळ मारीत सावळा गावात आला.

सावळ्याला अटक होणार, अशी सर्वांची खात्री झाली होती. त्यांना सावळ्याला पाहून आनंद झाला. सावळा आला, तो थेट पंतांना भेटायला चावडीवर गेला. सांज होत होती. दिवसभराचं काम आटोपून पंत वाड्याकडे निघाले आणि सावळ्यानं मुजरा ठोकला. मग दोघे बोलत बोलत वाड्याकडे निघाले. चालता चालता प्रांत काय म्हणाला, आपण काय बोललो, हे सारं त्यानं पंतांना सांगितलं. ते ऐकून पंत म्हणाले,

"मग तुला सातारचं बोलावणं करण्याचं कारण काय?"

"कारन बिरन काय न्हाय—" सावळा वाड्यापुढं थांबून म्हणाला, "खोतानं कागाळ्या सांगून सरकारचं डोस्कं उठवलंया."

"असं कशावरून?"

"खोतानं रानूजीचं डोस्कं मारलं, म्हनून आम्ही सूड घेतोय, असं प्रांत म्हनीता, म्हनून म्हनतो."

"ठीक आहे. तिथं राणोजीचं नाव निघालं होतं?"

"नाव न्हाय, पर एका मांगाचं डोस्कं मारलं, म्हनून तुम्ही लुटालूट करता, असा म्हनीता प्रांत!"

"बरं. तू जा आता आणि आता सावध राहा! परक्या हद्दीत सापडू नको!" पंतांनी गंभीर चेहरा करून सूचना दिली. पंत वाड्यात गेले आणि सावळा घराकडे निघाला. वाटेत भैरू रामोशी भेटला. सावळाला पाहून तो म्हणाला, "सावळा, हात मोडल्यावानी वाटत व्हतं, बघ!"

"पर, भैरू, आता हात मोकळं व्हातील, असं वाटंना रं!"

"का रं? काय भानगड झाली?"

"सरकार जागं झालं. खोतावानी बडी मानसं सरकारकडं गाऱ्हानी गात बसल्याती. काय तरी यडंवाकडं व्हनार, असा रंग दिसाया लागलाय!"

"पंतांनी काय सांगितलं?"

"हद्दीच्या भाईर जायचं न्हाय नि सापडायचं न्हाय!"

"असं जर पंत म्हनत्यात, तर नक्कीच भानगड हाय!"

बोलत बोलत ते मांगवाड्यापाशी येऊन पोचले, तेव्हा भैरू सावळ्याच्या कानात

हळूच पुटपुटला, ''खोताचा ऊस म्याच फुकून दिला!'' ते ऐकून सावळा हसला आणि म्हणाला, ''बरं केलंस. म्हनूनच माझी मान मोकळी झाली!'' असं म्हणून तो गडबडीनं घराकडे निघाला.

आणखी पंधरा दिवस उलटले नाही, तोच संस्थानी सरकारचा हुकूम घेऊन इंग्रजी पोलीस गावात दाखल झाला. तो हुकूम पाहून पंत, पाटील आणि गाव चकित झाला. मांगवाड्यावर पुन्हा संकटच आलं. पंतांनी तो हुकूम चावडीत जरा मोठ्यानं वाचला :

> ''तुमच्या गावच्या मांग जमातीनं इंग्रजी हद्दीत शिरून जो उत्पात मांडला आहे, त्यामुळे शांतता आणि सुव्यवस्था राखणेसाठी हा हुकूम रवाना होत आहे. या हुकुमान्वये सावळा दाजी मांग यास बेळगाव येथे स्थानबद्ध करण्यात येत आहे. तरी त्वरित हुकुमाची अंमलबजावणी व्हावी व आरोपीस हा हुकूम घेऊन येणाऱ्या सरकारी नोकराचे स्वाधीन करावे. जर आरोपी आपली बायकामुलंही बरोबर घेऊ इच्छीत असेल, तर त्याला सरकारची आडकाठी नाही—''

हा हुकूम वाचून पंतांनी चावडीत बसलेल्या सर्व प्रतिष्ठित मंडळीचे चेहरे निरखले आणि तो कागद शंकरराव पाटलांकडे भिरकाविला.

''पन गुन्हा काय मांगाचा?'' पाटील रेखीव आवाजात म्हणाला आणि समोर पडलेल्या त्या कागदाकडे बोट करून पंत म्हणाले,

''त्या हुकमाला विचारा.''

''हे सरकारी धोरन माझ्या डोस्क्यात येत नाही.''

''येण्यासारखं नाहीच मुळी ते. माणूस म्हणजे दगड नव्हे. त्याला त्याच्या इच्छेविरुद्ध केव्हाही आणि कुठेही नेऊन ठेवणं हा अन्याय आहे आणि तो अन्याय या हुकमात आहे. आज सावळा, उद्या दौलती, परवा बहिरू—''

''परंतु याचा परिणाम?''

''परिणामाची पर्व सरकार करीत नाही, हे स्पष्ट झालं आहे. मात्र परिणाम होणार, यात शंका नाही! गावगाडा मंदावेल, गावचे कारभार थंडावतील, प्रांतातील मांग लोक उठावणी करतील आणि ती—'' शब्द पंतांनी परत गिळून टाकले.

मांगवाड्यात शिपाई गेला आणि सावळा आला. तो हुकूम ऐकून त्याच्या डोळ्यात पाणी आलं. तो खिन्न झाला. तो कापऱ्या आवाजात म्हणाला,

''मी काय करू? पांढरीचं मत काय?''

''तू जा आता या घडीला. मी काहीच सांगत नाही,'' पंत उत्तरले नि सावळा म्हणाला,

''निघायची तयारी करून येतो.''

''कर जा!''

सावळा उठून निघाला. तो पोलीसही त्याच्यामागं चालू लागला. तेव्हा शंकरराव बिथरला,

"ए, मागं फिर! तू कुठं निघालास? सावळा परत येणार आहे. धडपडू नको. घाई करू नको!"

"आणि हे पाहा—" पंतानं सल्ला दिला, "बेळगावपर्यंत तू त्याच्याशी नीट वाग. आडवंतिडवं बोलू नको. तो माणसाळलेला वाघ आहे. तुला फाडूनही टाकू शकेल. लक्षात ठेव!"

पोलीस पुन्हा हबकून बसला. सर्व तयारी करून सावळा आला. तो ऐटबाज पटका बांधून, एक गठलं काखेला अडकवून आणि हातात एक वजनदार काठी घेऊन जत्रेला निघाल्याप्रमाणं निघाला. हां हां म्हणता सर्वत्र बातमी गेली. लोक जमले आणि त्याला वाटेला लावण्यासाठी त्याच्याबरोबर निघाले. मांगाची बायकापोरं डोळे टिपू लागली. घम्यानं हंबरडा फोडला. मांगाचा आघाडीवरचा तो चिराच निखळून निघाला होता.

माळापर्यंत लोक आले. त्यांनी सावळ्याला निरोप दिला. सावळ्यानं पंतांचे पाय धरले आणि दाटल्या कंठानं म्हटलं,

"गावकर, माझी भाकरी पोरकी व्हतीया. वाईच नजर असू द्या. मी जातू, पर जर कमीअधिक झालं, तर मी न्हाय - तुम्हीच हायसा!"

"तू जा, काळजी करू नको!" पंत उद्गारले.

सावळा सर्व मांगांना ओरडून म्हणाला, "जावा, जावा. मी जातू. घाबरू नका. मी हाय. जर काय भानगड पैदा झाली, तर मी गोरीतनं परत येनार हाय. जावा, दाबात असा!" त्यानं दौलतीचे पाय धरले. भैरूला मिठी मारली. घम्याला पोटाशी धरलं. बायकोला धीर दिला आणि पुढा फिरवला. तो बेळगावची वाट चालू लागला.

आज आपण आपल्या जन्म दिलेल्या गावाला, मातीला सोडून निघालो; आता आपण उपरा म्हणून दुसऱ्या गावात जगणार; आपली मुलंमाणसं, गाव दिसणार नाही; वतनदार असून परदेशी, घर असून वनवासी — आपलं कोण असणार तिथं? या विचारानं त्याचं हृदय करपू लागलं आणि दगडासारख्या काळजाचा तो सावळा लहान मुलाप्रमाणं ढसाढसा रडू लागला.

ज्या कायद्यानं सावळा बेळगावला गेला, त्याच कायद्याचा वरवंटा प्रांतभर फिरला. हजारो मांगांना त्यानं वनवास दिला. हजारो पोराबाळांना नादार केलं. वतनापेक्षा जातीलाच महत्त्व प्राप्त झालं. मांग हा लायक असूच शकत नाही, असा नियम झाला. लायकी हा शब्द मांग जातीपासून अलग करून कैक मांगांना गावांपासून, घरांपासून, पोराबाळांपासून अलग करून टाकण्यात आलं. मांग जातीतील झुंझार वृत्ती नमावी, नाहीशी व्हावी, त्यांनी लाचार व्हावं, हाच त्या कायद्याचा हेतू होता.

परागंदा केलेले मांग परगावात जे मिळेल ते काम करू लागले. कैकांनी आपली गावं सोडून, जमिनी सोडून बायकापोरं बरोबर नेली. ते फिरस्ते म्हणून फिरू लागले. त्या कायद्यानं आपला फास इतका आवळून टाकला, की मांग ही जात सांगणंही कठीण झालं. मांग म्हणाला की क्षमा नाही, हा अंमलदार लोकांचा खाक्याच ठरला. फिरते मांग स्वत:ला मांग सांगण्याऐवजी जात चोरू लागले. कैक मांगांचे गारुडी बनले. महाराष्ट्राचा आदिवासी मांग इंग्रजांनी तरवारीच्या धारेवर धरला.

सावळानं बेळगावात जाऊन वडाराचं दगड फोडायचं काम सुरू केलं; पण गावाकडची त्याची ओढ भलतीच वाढत होती. तो बेचैन होत होता. जोगणी निघेल. बापू खोत येईल नि ती घेऊन जाईल — मग नाव जाईल, राणोजीचं बलिदान फुकट होईल. ती कल्पना सहन न होऊन त्यानं एकदा आपल्यावर नजर ठेवणाऱ्याचे पाय धरून विनंती केली,

“मी हतं वडाराचं काम करून ऱ्हाईन. कुनाच्या पाचोळ्यावर पाय देनार न्हाय—”

“मग तुझं म्हणणं काय?” अधिकाऱ्यानं विचारलं.

“मला दर वर्षी आषाढी अमावास्येच्या दिवशी गावी जायाची परवानगी मिळावी.”

“ते तुझ्या वर्तनावर अवलंबून आहे.” अधिकारी म्हणाला आणि सावळा स्वच्छ वागू लागला. अगदी वडार बनला. अधिकाऱ्यानं त्याला गावी फक्त एक दिवस जाऊन येण्याची परवानगी दिली. सावळा आषाढात जोगणीला हजर झाला. लांब दाढी वाढलेला सावळा कुऱ्हाड घेऊन जोगणीबरोबर फिरला. रात्री सर्वांना भेटला. पंत, शंकरराव, दौलती, आपली बायकापोरं यांची भेट घेऊन तो पुन्हा गेला.

सावळा पुढं नियमानं येण्याची धडपड करू लागला. आपल्या जत्रेला आपण नाही गेलो, तर खोत येऊन जोगणी पळवील, म्हणून तो राबू लागला. दगड फोडू लागला. सर्व लोक त्याला वडार म्हणूनच ओळखू लागले आणि सावळा दिसेही तसाच.

गाव सोडल्यापासून चार वर्षं त्याला दर वर्षी जोगणीला जाण्याची परवानगी मिळाली; परंतु पाचव्या वर्षी त्यांच्यावरचा अधिकारी बदलून गेला आणि नवा आला. त्या नव्या अधिकाऱ्याला खूष करून हाताखाली घेण्यात सावळा अपेशी ठरला आणि त्यापुढं पाच वर्षं गावाला जाण्याची परवानगीच त्याला मिळाली नाही. ती पाच वर्षं त्यानं झुरत काढली. घमांडी किंवा बायको - जे कोणी येई, तेच त्याला खुशाली सांगे आणि ती ऐकून त्याला समाधान होई.

- आणि नवव्या वर्षी तो जेव्हा जोगणीला आला, तेव्हा त्याला सारंच एकदम बदललेलं दिसलं. ते जुने निवडुंगांचे डांग वाळून नवे तरतरून आले होते. त्या जुन्या घरात नवी माणसं वावरत होती. मरायचं नाही, असं ठरवून जगलेला दौलती एक वेगळ्या समाधानाचे सुस्कारे टाकीत होता. त्यानं कुसळाएवढी पोरं मेरूसारखी केली होती. आणि तो आता एका पायावर मरायला तयार झाला होता. त्याच्या त्या पिळदार देहाला आता

बाक आला होता. वाघासारख्या मिश्या रेशमासारख्या चमकत होत्या. पिकलेल्या भुवया कपाळावरच्या गंधात एकरूप होत होत्या. त्याच्या शरीरातील भरीव हाडं लखलखत होती. कातड्याच्या आडून शिरा सणसणीत दिसत होत्या.

मुलाप्रमाणं नातवाचा लौकिक पाहून मग मरायचं, अशा निर्धारानं जगलेली राहीबाई निर्धास्त झाली होती. तिच्या मानेत कंप निर्माण झाला होता. डोकीचे केस पांढरे झाले होते. चेहरा सुरकुत्यांनी झाकाळला होता आणि आजही ती मोठं कुंकू लावून शेळ्या राखीत होती.

आपल्या कष्टाचं चीज झालं, असं राधाबाईला वाटत होतं. तिच्या अकरा वर्षांच्या खडतर जीवनाचं सार्थक झालं होतं, कुंकवावीणं जगणं दुर्धर असतं, पण तेच जिणं राधा जगली होती. आज तिच्या घरात एक नव्हे, दोन जवान मुलं कर्ती झाली होती. दौलती आणि राही यांच्या डोळ्यांपुढं दोन राणोजी वावरत होते. फकिरा-साधू हे घरचा सर्व भार सांभाळीत होते. त्यांच्या त्या जुन्या घरात नवं आनंददायी वारं खेळत होतं.

फकिरा आता वयात आला होता. बापाच्या कीर्तीला साजेशा वर्तनानं तो गावात लाडका झाला होता. पाणीदार डोळे, रसरशीत चेहरा, पोलादाप्रमाणे शरीर घेऊन नुकताच तारुण्यात प्रवेश केलेला फकिरा पाहून लोक आनंदले होते. त्याच्या आईनं त्याला सर्व चांगली वळणं लावली होती. तो शांतपणे बोले, अन् मोजकं बोले. तो आपल्याच धुंदीत चाले. त्याला थिल्लरपणाची चीड असे. आपणही पंतासारखं वागावं, असं त्याला वाटे. तो आता हट्ट करीत नव्हता, तर देव्हाऱ्यात ठेवलेली राणोजीची तलवार पुजीत होता. गबऱ्याचं खोगीर त्याला फार प्रिय होतं. ते खोगीर नव्या गबऱ्यावर घालून बहिरी ससाण्याप्रमाणे तो माळावर सुरकुंडी घेत होता.

साधू सरकारी नोकरी सांभाळीत होता.

विष्णुपंत आता उतरणीला लागले होते. त्यांच्या पल्लेदार मिश्यांत करड दिसू लागली होती. रुंद, देखणा चेहरा फारच गंभीर झाला होता. त्याचबरोबर त्यांच्या मूळच्या करारीपणात अधिक भर पडली होती.

शंकरराव पाटलाचा देह आता अधिकच वाढला होता. म्हातारपणानं त्याला ग्रासण्यास सुरुवात केली होती; पण उरातील अहंकार संपला नव्हता. तो पूर्वीसारखाच होता. अहंकारी माणसं अहंकार घेऊन जन्मतात आणि अहंकार घेऊनच मरतात. शंकरराव पाटील त्यांपैकीच एक होता. भैरू, आप्पा ही जुनी माणसं म्हातारी झाली होती; परंतु जीवनातील तापट वृत्ती त्यांनी सोडली नव्हती. उलट, आता ती वाढली होती! इशा, किशा, बळी, मुरारी, घम्या, भिवा ही पोरं आता मोठी होऊन वाघाप्रमाणं वागत होती.

हे सारं पाहून सावळ्याला आनंद आला.

आषाढी अमावास्येचा तो दिवस उगवला. गावात आनंद पसरला. जोगण्या पाहण्यासाठी गावोगावचे लोक आले. सकाळपासून गावात एकच घाई सुरू झाली.

"एवढी ईर्ष्या असंल आणि तू जर माझ्या वंशाचा असशील, तर ती जोगणी माझ्या हयातीत परत आणशील!" हे बाजीबाचे करारी शब्द बापू खोत विसरला नव्हता. त्या शब्दांनी त्याच्या काळजात कुरूप केलं होतं. तो आज दहा वर्षे ती जोगणी आणण्याची शिकस्त करीत होता. परंतु त्याला अपेशच आलं. त्याचा आवेश वाटेगावकरांना पुरता कळला होता. जोगणीचा रिवाज मोडून आपल्या हद्दीत घुसून जो आपला माणूस मारायला भ्याला नाही, तो आपली जोगणी परत नेल्याशिवाय स्वस्थ बसणार नाही, याची एक प्रकारे धास्तीच घेऊन वाटेगाव सावध होता.

जिवावर उदार होऊन शंकरराव, पंत, सावळा, भैरू रामोशी, तायन्या महार यांनी बापूला निष्प्रभ केला होता.

जोगणी परत आणण्यासाठी बापूने काही करायचं बाकी ठेवलं नव्हतं. सर्व खटपटी करूनही त्याला यश आलं नव्हतं. सहा माणसं मरूनही जोगणी गेल्यामुळं शिगावकरांचा हिय्याच मोडला होता. कोणीही जोगणीसाठी शिर हातात घेऊन लढण्याची भाषा काढीत नव्हता. मग एकटा बापू काय करणार? सरकारी अधिकारी, परगावचे मित्र यांच्या बळावर जोगणी आणून बापानं उच्चारलेले शब्द खरे करून दाखवणं त्याच्या आवाक्याबाहेरचं होतं. त्यासाठी त्याला गांवची मदत व्हायला हवी होती; पण नेमकं तेच होत नव्हतं.

परंतु अलीकडे त्याचा दबदबा वाढत होता. गावातली नेटकी पोरं त्याच्या कह्यात आली होती. त्यातच स्वत:च्या जमिनी चांगल्या पोरांना वाट्यानं देऊन त्यानं त्यांना अंकित करून घेतलं होतं. दरवर्षी शिगावात निघणारा तो एकटा जोगा पाहून कैकांना वाईटही वाटत होतं. इभ्रतीखातर मरावं, असंही अनेकांना वाटत होतं; पण आपल्या एकट्यानं काय होणार, असा पेच पडत होता.

बाजीबा आता थकला होता. चालत्या घोड्यावर उडी घ्यायची धमक त्याच्यात उरली नव्हती. दु:खी अंत:करणाने तो त्या रंडक्या जोग्याकडे पाहत होता; परंतु जोगणीबद्दल एक शब्दही कधी बोलत नव्हता आणि इतरांचा तर तो घासच नव्हता. कोणीच जोगणी आणायची भाषा उघडपणे बोलू शकत नव्हता. कारण जोगणी म्हटलं, की त्याच्या डोळ्यांपुढे भैरू रामोशी आणि सावळा मांग कुऱ्हाडी घेऊन नाचत. त्यामुळं मनातले विचार मनातच राहत. आपण जोगणीविषयी काही तरी बोलू आणि ती बातमी कोणी तरी भैऱ्याला देईल — मग तो यम येऊन आपलं वाटोळं करील, असं सर्वांना वाटे. ही भीती आता थोडीशी बोथट झाली होती. खोताभोवती तरुण मंडळी उघड उघड जोगणी

परत आणण्याची चढाईची भाषा करीत होती. त्यामुळं कैकांना धीर आला होता.

— आणि याच दरम्यान एक नवलाईची गोष्ट घडली. ती म्हणजे बापू खोतानं आपली मुलगी शंकरराव पाटलाच्या भावकीत रावसाहेबाला दिली होती. ती सोयरीक जोडण्यासाठी त्याने चौदा हजार रुपये हुंडा दिला होता आणि तोही पुढला सगळा विचार करूनच. कारण शंकरराव पाटलानंतर रावसाहेबांकडे ती पाटीलकी येणार होती. आज तो काम करीत नसला, तरी शंकररावाच्या खालोखाल त्याला गावात मान होता आणि सासऱ्याच्या विचाराप्रमाणं फिरणाराही होता. त्याच्या आडून किती तरी गोष्टी बापू खोताला साधता येणार होत्या. हे सर्व लक्षात घेऊनच तो आज जोगणीचा गंभीरपणे विचार करीत होता.

सोप्यात तरणी पोरं जमली होती. कैक म्हातारे खांबाला टेकून बसले होते. बाजीबा चौफाळ्यावर बसून शांतपणे ऐकत होता. बापू बोलत होता,

"मला मरायची भीती नाही. माझं काळीज माझ्या पोटात नसून पाठीवर आहे; पण मी एकटा काय करू? मला बळ असून त्याचा उपयोग नाही. पाठबळ हवं. एकटा कधीही जाऊन मी कटून मेलो असतो; पण आता मी निश्चित सांगतो, की आमची जोगणी परत आलीच पाहिजे!"

"मग काय करू या? बोला — " गज्या माळ्याचा गलू माळी नाक फुगवून म्हणाला आणि बापूला गज्याच्या पराक्रमाची आठवण झाली. तो म्हणाला, "गलू! तुझ्या बापानं 'फेक भाला' म्हणताच आपला भाला फेकून त्या मांगाला खसकन टिपला. तसा वीर मला हवा!"

"मग मी तयार हाय!" बापाच्या करणीचा पोवाडा ऐकून गलू पुलकित होऊन म्हणाला आणि खांबाला टेकून बसलेला कुंभार म्हणाला,

"हो, हो. म्या गजूची जखम बघितली व्हती. टाळूत मारलेली तलवार त्याच्या नाकापतूर खाली उतरली व्हती."

हे ऐकून बापू चरकला. कुंभाराला गप्प करून तो म्हणाला, "झालं, ते गेलं त्याच्यासंगं. आता आजचं बोला. माझी पन्नास माणसं बाहेरची येणार आहेत. इथं सोप्यात — ही पन्नासएक भरतील आणि पाचपन्नास गावातून काढू या नि—"

"देऊ या दंगल उडवून!" ज्ञानू सुतार जोरात येऊन म्हणाला.

"हो, दंगल झाली पाहिजे!" खोत म्हणाला, "आता ताणून धरण्यात अर्थ नाही. शेंडी तुटो का पारंबी तुटो! जे होईल ते होईल!"

"उघड हाणामारी करायची का?" एकानं शंकेच्या सुरात प्रश्न केला.

"नाही. माझा जावई आहे त्या गावात. तिथं माझी बाहेरची मंडळी मुक्काम करून बसली आहेत. त्यापैकी काही मांगांची तलवार रोखून धरतील आणि काही रावसाहेबांबरोबर जोगणीच्या जवळ जातील आणि तीच महत्त्वाचं काम करतील. आपण

थोड्या अंतरावर असायचं, पांगून वावरायचं नि दंगल झाली, की जोगणीचा पीछा करणाराचे पाय तोडीत गावाकडे सटकायचं.''

''बरं, भैऱ्या रामोशाचं काय करायचं?'' दुसरी एक शंका उठली आणि एकदम चमकून बापू खोत म्हणाला,

''हो. भैऱ्या आणि सावळ्या हे दोघे तिथं असतील, तिथं आपली आठ माणसं असणार नि दंगलीत प्रथम हे दोन मुडदे खाली पडतील—''

''मग जमलं!... मग जमलं!'' सोप्यात एकच आवाज घुमला. जणू भैरू आणि सावळा यांचे खरोखर मुडदे पडले, आता त्यांना भास झाला आणि त्यांच्या उरावरचं ओझं हलकं झालं.

खलबत झालं. सर्व लोक उठून कामाला लागले. निरनिराळ्या वाटा धरून वाटेगावची वाट चालू लागले. एखाद्या युद्धाची तयारी करावी, तशी बापूनं तयारी केली. घोंगड्यांच्या भाळीत हत्यारं घेऊन शिगावचे लोक तयार झाले. सरहद्दीवर काहींनी घोडी तयार ठेवली. काही जाऊन पोहोचले. काही पांगून बसले. कोण भैऱ्याला शोधू लागले. कोण सावळ्याचा चेहरा निरखू लागले. ते सारेजण गर्दीत मिसळून गेले.

आकाश धुतल्या तांदळासारखं स्वच्छ झालं होतं. सूर्याचा झोका पश्चिमेला निघाला होता. त्याच्या किरणांतील प्रखरता किंचित थंड झाली होती. मनाला आल्हाद देणारा वारा वाहत होता. गावातली लिंबाची झाडं भरभरत होती आणि झुकांड्या खात होती. पेरणीची वाट पाहत पडलेल्या काळ्या जमिनी धापा टाकीत होत्या. दौलतीच्या घराजवळची चिंच डुलत होती.

जोगणी निघायची वेळ जवळ आली होती. काल धुतलेली कापडं घालून दौलती, राही, राधा गावात आली-गेली होती. गाव माणसांनी गजबजला होता. बारा बलुती धावपळ करीत होती. शंकररावानं आपल्या घोड्याला साज घालून नटवला होता. रेशमी आबदा घालून वर जीन घातलं होतं आणि त्या जिनालाच तलवार खुटवून स्वारी वर बसली होती. पाटलाचा घोडा सारखा उसळत होता. जत्रेकरी गर्दी करून त्या घोड्याला पाहत होते.

रिवाजाप्रमाणे मांगांची तलवार वाजत-गाजत निघाली. मुरा, बळी, किसना, घमांडी, ईश्वरा, भिवा, साधू, चिंचणीकर पिराजी, साजूरकर निळाजी, घोंचीकर बळी हे मातब्बर मांग त्यात दिसत होते. त्यांनी कडेकोट तयारी करून तलवारी उंचावून धरल्या होत्या. कैक भाले, कुऱ्हाडी लखलखत निघाल्या. हलगी कडाडू लागली. एकदम सारी जत्रा म्हणाली : 'आली मांगाची तलवार!'

फकिरानं गबऱ्यावर जुन्या गबऱ्याचं खोगीर चढवलं आणि हातात देव्हाऱ्यातील ती

तलवार घेऊन तो निघाला. इतक्यात बोलावणं आलं,

"ताबडतोब ये!"

फकिरा गबऱ्यावर बसला आणि सरसर त्या गाडीमार्गानं पंतांच्या वाड्याकडं वावटळीप्रमाणं निघाला. मार्गात दबा धरून गलू माळी बसला होता, त्यानं त्याच्याकडे डोळे फाडून पाहिलं आणि बाजूच्या एका जत्रेकऱ्याला विचारलं,

"ह्यो कोन?"

"ह्यो फकिरा." त्यानं उत्तर दिलं.

फकिरा पंतांच्या वाड्यात गेला, तेव्हा सावळा आणि भैरू. हे दोघे चिंतातुर होऊन बसले होते. त्यांचे चेहरे पाहताच फकिराला शंका आली. काही तरी नक्कीच घडलं आहे! त्याशिवाय ही लोखंडी माणसं अशी उदास होणार नाहीत. तो खाली उतरून आत गेला.

फकिरा आल्याचं कळताच पंत बाहेर आले. तेही चिंतातुरच दिसले. गंभीर स्वरात पंत म्हणाले,

"फकिरा, आज घात होणार आहे. शिगावचे लोक गावात शिरले आहेत—"

"कोण म्हनतं?"

"सावळा आणि भैरू!"

फकिराच्या कपाळावर आठी उमटली. तो सावळाला म्हणाला,

"मग आधीच न्हाय का सांगायचं? परस्पर बंदोबस्त केला असता—"

"हो," भैरू म्हणाला, "न्हाय तर आंगलट याची भानगड."

"काहीही असो," पंत समजावणीच्या सुरात म्हणाले, "आधी काय आणि नंतर काय, जी खबर मिळाली, ती महत्त्वाची. आम्ही सावध झालो. बेसावध असतो, तर घात झाला असता. आता कडक नजर ठेवा. सावळा, भैरू, — तुम्ही जुनी माणसं पोरांना लढाई शिकवा." पंत एकदम थांबले. त्यांनी फकिराला डोकीच्या केसापासून पायाच्या नखापर्यंत न्याहाळून घेतला आणि ते पुन्हा म्हणाले, "ही तलवार राणोजीची?"

"हो." एवढंच म्हणून फकिराने होकारार्थी मान डोलावली.

पंत म्हणाले, "फकिरा—"

एवढे शब्द उच्चारून ते पुन्हा थांबले. त्यांनी वळून सनदी शिपायाला हुकमी आवाजात सांगितलं, "नाथा, शंकररावांना मी बोलावलं म्हणून सांग. तातडीनं जा!"

नाथा पळतच गेला आणि पंत आवाज चढवून बोलू लागले,

"फकिरा, बापू खोतानं आमच्या हद्दीत शिरून राणोजीचं शिर मारलं आहे. जर तसा प्रयत्न झाला आणि तो करील... तर... त्याला आपल्या शिवेपार जाऊ देऊ नको. तुझ्या हातातील तलवारीची इज्जत फार मोठी आहे आणि ती तुझ्या हाती आहे!"

हे ऐकून फकिरा काहीच बोलला नाही. उगीचच त्याचे डोळे पाण्यानं भरले. उरातील हिंमत उसळून ती डोळ्यांत तरळू लागली आणि सावळा म्हणाला,

"खोत शिवंभाईर गेला, तर मी सरगाला जाईन!"

"जावा. झटून प्रयत्न करा. थांबू नका! मीही जोगण्या काढाया निघतोय."

फकिरा, सावळा, भैरू वाड्याबाहेर पडले आणि शंकरराव आले, त्यांना पंत म्हणाले, "पाटील, गावात काय घडामोडी होत आहेत?"

"बरं झालं, तुम्ही बोलावलं." पाटील म्हणाला, "ह्या वर्षी गावात काही तरी घडणार, असं वाटतंय. बुजार चेहरे केलेली माणसं बोळाबोळात उजळू लागली आहेत आणि रावसाहेबांच्या वाड्यात अगदी नवी माणसं दिसू लागली आहेत."

"म्हणजे खोतानं आमच्याखाली कोठार पुरून ठेवलं असून ते पेटणार आहे." पंत म्हणाले.

"पेटू द्या. दहा वर्षं झाली. जिवाला अटण लागली आहे." पाटील चिडून बोलू लागला, "एकदाचा शेवट होऊ दे. आजच जर—"

"आजच लागणार आहे शेवट!" पंत मध्येच म्हणाले, "खोतावर नजर ठेवा आणि दंगल पेटली, की फकिराची पाठ राखा. मी जोगणी काढतो. जा तुम्ही!" असं म्हणून पंत थांबले. पाटील काहीच बोलला नाही; परंतु दोघांच्याही मनात एकाच वेळी एकच भावना तरारली. पाटलानं एकदम पंताला मिठी मारली आणि पंतांच्या हातांनी शंकररावाला विळखा घातला. पाटील उद्गारला, "आता जगलो, तरच भेट!"

सर्व वाद्यांचा एकदम गडगडाट झाला. शिंग वाजलं आणि जोगणी निघाली. एकच नाद उठला. आकाशाला गचके बसू लागले. धनगरी ढोलानं घरांवर कौलं नाचू लागली. ढबंव... ढबंव... ढबंव! ताशा आणि मांग-हालगी यांनी माणसाचे शब्द मुके केले.

हत्यारांच्या सावलीत जोगणी वाटचाल करू लागली. महाराच्या थळाजवळ दौलती, राही आणि राधा ही जोगणीची वाट पाहत उभी होती. ती त्यांची दरवर्षीची जागा होती.

जोगण्या थोड्या चालून गेल्या आणि फकिरानं साधूला जवळ बोलावून म्हटलं, "तू माझ्या मागं आस. माझ्यावर मागनं येनाऱ्याचा मुडदा पाड. मुराला हकडं बोलाव!" असं म्हणून त्यानं वळून पाहिलं. शंकरराव जवळून घोडा आवरीत चालला होता. 'मी आहे' अशी डोळ्यानं खूण केली. मुरा आला. तो फकिराला आता दाजी म्हणत होता. त्यानं विचारलं, "काय, दाजी?"

"वाईच जपून. दगा व्हनार हाय!" गबऱ्यावरून चालता चालता फकिरा वाकून म्हणाला, "बरोबरीच्या गड्यांच्या माना सांभाळा आणि जोगणीवर चाल करील, त्याची झपाट्यात मान उतरा. चिचनीकर, साजूरकर नि घोंचीकर ह्यास्नी म्हनावं, हद्द

नका! जा.''

मुरा गेला. बळीला सांगितलं. एकमेकांनी एकमेकांना खबर दिली. बळी गर्रकन फिरून फकिराजवळ येऊन टाचा वर करून म्हणाला, ''दाजी, शिगावची किती मानसं असतील?''

हे ऐकून फकिरा चिडक्या सुरात म्हणाला, ''किती बी असू दे. शंभर, दोनशे, हजार! पुढं येनाराचं खांडुळं करा. जा. रामुश्यास्नी सांगा!''

खबर सर्वत्र पोचली. किंचित चोरटी हालचाल झाली. रामोश्यांनी खांद्यावरची घोंगडी रिकाम्या माणसांजवळ देऊन ते सरळ झाले. जोगणीजवळ असलेली पोरं नाहीशी झाली. ज्या बाजूला मोकळीक असेल, त्याच बाजूला फकिराचा गबऱ्या वळत होता आणि जिकडे फकिरा जाई, तिकडे साधू जात होता. त्या दोघांच्या पिछाडीवर शंकरराव आपला घोडा सावधपणे चालवीत होता. पुढं भैरू नि सावळा, शिवाय पंतांचा घोडा होता.

वातावरण तापलं. झटापट क्षणोक्षणी जवळ येऊ लागली. फकिराची पापणी हलेनाशी झाली. जोगणी थळात आली.

दौलतीनं नमस्कार करून मिशीला स्पर्श केला. राहीबाईच्या डोळ्यांपुढं राणोजी उभा राहिला. राधाबाईनं फकिरा-साधूची मनातल्या मनात दृष्ट काढली. जोगणी पुढं सरकली. नवखी माणसं लगट करू लागली. हत्यारं जिभा चाटू लागली.

जोगणी महारवाड्याच्या वाळवंटात आली आणि एकदम गाडीमार्गानं मांगांच्या चिंचेखालून सरळ आपला घोडा फेकीत बापू खोत पुढं आला. त्याबरोबर सर्वांचं लक्ष चटकन तिकडे गेलं. नजरा चढल्या. पहाऱ्याची पकड सैल झाली आणि जोगणीभोवती एकच मुरकुंड पडली. लगेच रामोशी परत फिरले, मांग उलटले, तरवारी चालू लागल्या. माणसं तुटून पडू लागली. सावळा, मुरा, बळी, निळू, भिवा, ईश्वरा रक्तबंबाळ झाले. भैरूनं डोळे झाकून कुऱ्हाड चालू केली.

परंतु फकिरा जागचा हालला नाही. तो खोतावर घारीसारखी नजर ठेवून होता. दंगल शिगेला पोचली. कोण तरी ओरडलं : 'जोगणी गेली!'

एक इसम गर्दीतून बाजूला निघाला आणि तो धावत बापू खोताकडे वळला. फकिरानं गबऱ्याला हळूच टाच मारली. फकिरानं जागा सोडताच साधूही धावला. शंकरराव डोकं शांत ठेवून पाहत होता. फकिरा काय करणार, याचं त्याला कोडं पडलं होतं.

गर्दीतून धावत गेलेल्या माणसानं जोगणीची वाटी खोताच्या हवाली केली आणि खोतानं आपला घोडा उलट फिरविला आणि... आणि फकिराचा गबऱ्या भरभरला.

जोणीचीजवळची दंगल मांग-रामोश्यांनी थंड पाडली आणि ते पाहू लागले, तेव्हा फकिरा बापू खोताच्या मागं जाऊन बिलगला होता. सलग काळ्या वावरात हजारो लोकांच्या डोळ्यांसमोर ती दोन कारवानी घोडी पळत होती. अखेर जोगणी गेली –

म्हणून सर्वांनी नि:श्वास कोंडून टाकले. पळत पळत फकिरानं आपला गबऱ्या खोताच्या डावीकडे वळवला आणि उजव्या हातानं डावीकडे वार करणं त्याला कठीण करून टाकलं. तरीही चिडक्या खोतानं तलवार उगारली. त्या तलवारीवरच लक्ष ठेवून धावणाऱ्या फकिरानं मुठीसकट ती तलवार उडवली आणि लगेच गबऱ्याला टाच मारून सरळ घोड्यावर घोडा घातला.

हातासह हत्यार गमावलेला खोत क्षणात गांगरला. त्यानं पटकन घोड्यावरून अंगच टाकलं आणि गबऱ्यापुढं झुकांडला. परंतु दुसऱ्याच क्षणी गर्रकन फिरून तो उलटला. तो तसाच भरवेगात खोताच्या अंगावरून पुढं गेला. खोत टापांखाली तुडवून पुन्हा गबऱ्याला उलट वळवून फकिरा परतला. गडबडीनं उठून खोत केविलवाणा चेहरा करून म्हणाला, "मला मारू नको. ही जोगणी—"

फकिराला धीरच झाला नाही. माणसाला ठार मारणं सोपं नसतं. त्यानं वाटी घेऊन बापूला ताकीद दिली,

"ठीक. ती तलवार तितंच पडू दे. तो घोडा नि जीव घेऊन पळ. परत हिकडं बघू नगं. हातं फकिरा नावाचं मरान गबऱ्यावर बसून फिरत असतं—"

बापू खोत घोड्यावर बसून शिगावकडे पळत गेला आणि गावातली दंगल शांत करून सर्वजण फकिराकडे धावत आले. पंतांनी गर्दीत शिरून विचारलं,

"फकिरा, काय झालं?"

फकिरानं ती मुठीसकट तुटून पडलेली तलवार दाखविली आणि जोगणी पुढं ठेवली. सर्वांनी एकच गर्जना केली आणि सारी घोंगडी गगनात उडाली. पंत गालांत हसत म्हणाले, "तू त्याचं डोकं का मारलं नाहीस?"

"ते त्याचं डोस्कंच हाय!" खोताच्या तलवारीकडे बोट करून फकिरा उत्तरला आणि पंतांनी त्याच्या पाठीवर थाप मारली.

"बापाचं नाव राखलंस!"

"हा काटा काढून माझा जीव मोकळा केलास!" शंकररावानं फकिराला मिठी मारीत म्हटलं आणि फकिरा ओरडला, "जोगणी खोताकडं कुनी दिली?"

"सातारच्या दुला मांगानं." मुरा म्हणाला.

'कुठाय त्यो?"

"चावडीत! चला." पंत म्हणाले, "जोगणी पुढं चालू द्या."

खोताच्या हाताची मूठ आणि तलवार चावडीवर रवाना करून पाटलानं पुन्हा जोगण्या चालू केल्या. पांगापांग झालेली माणसं पुन्हा आली. दौलती, राहीबाई, राधा यांनी फकिराला मिठ्या मारल्या. राधानं फकिराचा घाम पुसण्यासाठी पदर ओढला आणि त्याच्या कपाळाकडे पाहिलं. तोच तिला त्या एका दिवसाची आठवण झाली. लहानपणी

फकिरा व साधू बापाला नैवेद्य दाखवायला गेले होते, तेव्हा पाया पडताना त्यांच्या कपाळाला माती लागली होती. ती माती पुसून निघेल, असं वाटून तिनं हात आवरला होता आणि स्वत:चे आसू पुसले होते.

लोकांनी जखमा बांधून जोगण्या फिरवल्या. जोगणी विसर्जन करून पंत आणि पाटील चावडीत आले. तिथं दुलारी मांगाला बांधून सावळा आणि भैरू पहारा करीत बसले होते. रात्री त्याची चौकशी झाली. त्यानं डोकं मारण्याच्या भीतीनं सर्व हकीकत सांगून टाकली.

दुलारी हा साताऱ्यात सरकारी नोकरीत होता. तो गुन्हेगारांच्या खबरी पोलिसांना देऊन बराच हुद्याला चढला होता. साताऱ्यात सरकारी अंमलदारांनी त्याची व खोताची भेट करून दिली होती. पुढं त्या दोघांची मैत्री होऊन मित्राच्या मदतीला तो आज आला होता. इथं तो रावसाहेबांच्या वाड्यात दोन दिवस पाटील म्हणूनच राहत होता. त्यानंच गावात दंगल करावयाचे सर्व डावपेच रावसाहेबांच्या वाड्यात बसून आखले होते. आणि ते रावसाहेबांना माहीत होते.

ही सारी हकीकत ऐकून पंतांचं व शंकररावांचं डोकं सुन्न झालं. रावसाहेब खोताला सामील आहे, हे कळताच साप आपल्या उशाखाली आहे, असं शंकररावाला वाटलं. परंतु त्या संकटाची तोंडओळख झाल्यानं त्याला आनंदही झाला.

दुलारी सरकारी माणूस आहे, हे लक्षात घेऊन त्याला पंतांनी ताकीद दिली,

"तू सरकारी चाकर असून, ह्या झगड्यात पडू नये, तो पडलास. सरकारी नोकर, म्हणून तुला आम्ही एक वेळ क्षमा करून सोडत आहोत. तू आत्ताच्या आत्ता निघून जा!"

"पन मला मांग रामूशी जाऊ देनार न्हायती." दुलारी रडत म्हणाला.

"ठीक आहे. आम्ही तुझ्याबरोबर माणूस देऊ." असं म्हणून पंतांनी भैरूला सांगितलं, "भैरू, याला शिगावला पोचव!"

— आणि भैरू आपणाला पोचवणार, हे ऐकून दुलारी अधिकच रडू लागला. तो म्हणाला, "ह्यो मला शिगावऐवजी सरगाला पोचवील!"

हेही जोगणी प्रकरण भलतंच दणाणलं. जत्रेला आलेली हजारो माणसं जाताना फकिराची तारीफ करीत परतली. फुलांतील मध माश्यांनी पळवावा, तद्वत माणसांनी फकिराची कीर्ती गावोगाव पोचवली. जो तो म्हणू लागला — 'फकिरा जबर माणूस! त्यानं खोताला चीत केलं. मुठीसकट तलवार मारून त्या विंचवाची नांगीच मारली. खोत निकामी केला!'

फकिराच्या त्या दिवशीच्या वर्तनावर गाव बेहद्द खूष झाला. फकिरानं आपल्या पराक्रमाला घोडदौडीनं प्रारंभ केला. दौलती, राही, राधा यांच्यापेक्षाही सावळा आणि

भैरू यांना आनंद झाला. ते आपल्या जखमा विसरले. कर्तबगार माणसाची कीर्ती दिगंतरास जाते. ती ऐकून इतरांना क्षणभर आश्चर्य वाटतं; पण त्या कीर्तीच्या पाठीशी असलेला त्याग नि झीज ह्याकडे त्यांचं लक्ष नसतं.

सकाळीच सावळा बेळगावला निघाला. जाताना तो प्रथम फकिराकडे आला. त्यानं फकिराला मिठी मारली. त्याचे डोळे भरून आले आणि तो मोठ्यानं हसू लागला. त्याचं ते हसणं पाहून फकिरा गोंधळून गेला. दौलती, राही, राधा, साधू यांना नवल वाटलं.

"का हासतूस, गा?" फकिरानं विचारलं आणि सावळा म्हणाला,

"मला जुनी याद आली. तुम्ही लस्कर बघाय गेला नि मी दौलूआबाबरं भांडलू, त्येची मला आज याद आली." असं म्हणून तो गंभीर झाला. त्यानं भुवया चढवल्या, नाक फेंदारलं आणि तो म्हणाला, "काल गाजवलंस, माझ्या मनाजोगं झालं. शेनातला किडा शेनात ऱ्हात न्हाय! –"

"आता कवा येनार?" फकिरानं विचारलं.

"ते मी कसं सांगू?" सावळा लाचार स्वरात म्हणला, "जरी एखादा खून केला असता, तरी बरं झालं असतं. काळंपानी भोगून आलो असतो. पर ह्यो काळ्यापान्यापरास वंगाळ कायदा माझ्यामागं लागलाय."

"काय खटपट न्हाय का व्हनार?" फकिरा बोलला.

"कोन करनार?" सावळा चिडला नि म्हणाला, "आम्ही मुकी मानसं. त्यात कानफाटी. आमचं कानावर कोन घेनार?"

"पंतास्नी न्हाय का सांगायचं?"

"काय सांगू? त्येस्नी न्हाय का दिसत?"

"बरं, मी बोलतो एकदा."

"बोल. करा काई तरी." सावळा दुखावल्यासारखा बोलू लागला, "आठनऊ वर्सं काढली. लई वंगाळ काढली. वतनदार असून वनवासी झालोय. आता–" तो बोलता बोलता थांबला. त्याचा गळा दाटून आला आणि फकिरा म्हणाला,

"आता काय? –"

"आता गाव सोडू नये, असं वाटतंय!"

हे ऐकून फकिरा खिन्न झाला. त्याच्या काळजाला चिमटा बसला. तो हुकमी आवाजात म्हणाला, "तू आता जा. मी गप्प बसनार न्हाय नि पंतास्नी बी बसू देनार न्हाय!"

"हो, हो." सावळा एकदम हसरा चेहरा करीत म्हणाला, "मला परमुलखात मरू दिऊ नगा. माझी हाडं हातं माझ्या पांढरीत पडावी. माझ्या मढ्याला साऱ्यांचं हात लागावं. म्या तकडं कुत्र्याच्या मोतीनं मरू नये, असं मला वाटतं."

फकिराच्या वर्मी बाण लागला. तो संतापून म्हणाला,

'तर मग तू जाऊच नगं. येऊ दे...''

''नगं नगं—'' मध्येच सावळा म्हणाला, ''मला गावानं जायला सांगितलं म्हणून मी गेलो. गावाच्या मताइरुद्ध वागून कसं चालंल?''

''बरं, मग जा तर!'' फकिराला त्याचं म्हणणं पटलं. सावळा निघून गेला आणि 'म्या तिकडं कुत्र्याच्या मौतीनं मरू नये, असं मला वाटतं—' या सावळाच्या बोलानं फकिराच्या हृदयात डोंब पेटला. त्याचं मन उद्विग्न झालं. सावळासाठी काय करावं, याचा तो विचार करू लागला. तो चिंचेला टेकून किती तरी उशीर उभा राहिला.

सूर्य हळूहळू वर आला. त्याची कोवळी किरणं चिंचेच्या पानांवर बसून झोके घेऊ लागली. हिरव्या निवडुंगावर पिवळा सोनेरी प्रकाश उधळला गेला. गावची गुरं गावदरीला आली. माणसं कार्यक्षम झाली. विष्णुपंत मळ्याकडे निघाले. त्यांच्या घोड्याच्या टापा ऐकून फकिरा भानावर आला. पंतांचा घोडा चिंचेखाली येऊन थांबला. एवढ्याशा पोरासाठी पंतानं घोडा थांबवला, याचं मांगवाड्याला आश्चर्य वाटलं. आपल्या त्या प्रचंड घोड्याच्या पाठीवर झोके घेत रोखून पाहत पंत म्हणाले, ''फकिरा, काय झालं?''

''काई न्हाय, आबा.'' फकिरा हसला.

''नाही कसं? तुझा चेहराच सांगतोय.''

''आबा, सावळानाना गेला—''

''कुठं? बेळगावला?''

''हो, बेळगावला!''

''मग? तुझं काय म्हणणं आहे?''

''का गेला?''

हे ऐकून पंतांना पेच पडला. थोडा विचार करून ते म्हणाले,

''त्याला गुन्हेगार म्हणून सरकारनं हद्दपार केला आहे.''

''त्यानं काय गुन्हा केला?''

''काहीच नाही. तसा सरकारकडे मुळीच पुरावा नाही.''

''मग हे कोन इचारनार सरकारला?''

''आलं लक्षात. विचारलं पाहिजे आणि मीच ते विचारीन. तू जा घरात—''

पंतांचं घोडं थडाड् करून उडालं आणि धावत निघालं. फकिरा घराकडे वळला. दौलती दारात उभा होता. राधा बाहेर आली. मांगं जमली. दौलती म्हणाला,

''काय इचारलंस पंतास्नी?''

''सावळूनानाबद्दल.''

''मग काय म्हनलं त्ये?''

''सरकारला इचारनार हायती.''

हे ऐकून मांगांची काळजं डोंगराएवढी झाली. आता आपले दिवस सुखाचे येणार! जर पंत सातारला गेले, भांडले, तर हा कायदा बोथट होईल आणि आपल्या मागची लांडगेतोड संपेल. दु:खी मिळवू आणि सुखी खाऊ. आपल्या घरात, आपल्या पांढरीत — पसाभर का होईना, आपल्या या जमिनीत; जिथं जन्मलो, तिथंच आपली हाडं पडतील आणि तसंच व्हावं, असं म्हणत मांग घरोघर गेले.

— आणि पंधरा दिवसांनतर पंत साताऱ्याला रवाना झाले.

## ६

विष्णुपंत कुलकर्णी साताऱ्यात पोचले, तेव्हा त्यांच्याबरोबर भैरू रामोशी होता. साताऱ्याचा घाट चढताच चोरांची फार भीती असते, म्हणून तो सनदी शिपाई या नात्यानं पंतांबरोबर गेला होता. कचेरीपुढं त्यांना दुलारी मांग भेटला. त्यानं पंतांना नीट ओळखलं नाही, मात्र भैरूला चटकन हेरलं आणि तो तावात पुढं आला.

"कंच्या गावचं?" त्यानं जवळजवळ आडवं उभं राहात विचारलं आणि पंत म्हणाले, "आम्ही लांब तिकडे—"

"पर गावाला नावबीव हाय का न्हाय?"

हे ऐकून भैरू चिडला. त्यानंही दुलारीला ओळखलं. तो काही तरी बोलणार, इतक्यात पंत म्हणाले, "आम्ही वाटेगावचे. का? तू कोण?"

"मला वळाखलं का?"

त्याचा हा प्रश्न ऐकून भैरू म्हणाला,

"न्हाय वळाखलं. का? तू कोन राजाबिजा हाईस का काय?"

"त्ये तुला आता दिसंल! पन माजंच नाव हाय दुलारी वाघमारे."

"तू कोणीही ऐस. वाट सोड!" पंतांचा आवाज चढला, "तू कोण हे जाणून घ्यायला मी आलो नाही, मी प्रांतसाहेबांना भेटणार आहे!"

"ह्येनं त्या दिशी मला मारलं. माळाच्या दगडाच्या पाया पडाय लावलं—" दुलारी चिडून म्हणाला आणि मग पंतांच्या लक्षात आलं, की हा त्या दिवशी खोताबरोबर आला होता. यालाच पकडून चावडीत ठेवला होता व भैरूला बरोबर देऊन पाठविला होता. वाटेत भैरूनं याला मारलं, म्हणून हा चिडला आहे.

"मग तू का आला होतास?" पंत रागानं म्हणाले, "आता वाट सोड, नाहीतर घोडं अंगावर घालीन!" त्यांनी टाच मारली आणि गडबड वाढली. अधिकारी बाहेर आले आणि दुलारी नमला. पंतांना प्रांतानं ओळखून कचेरीत नेलं. भैरू एका झाडाखाली बसला.

विष्णुपंत कुलकर्णी हा काटेकोर वृत्तीचा माणूस आहे, याची सरकारी अंमलदारांना कल्पना होती. त्याच्याशी बोलताना जपून बोलावं लागतं, हे लक्षात येऊनच प्रांतसाहेबांनी बोलावयास सुरुवात केली,

"हं, बोला – कां येणं केलं होतं?"

"मी दरवर्षी इकडं सज्जनगडावर येत असतो दर्शनाला. तसाच आलो होतो आणि तुम्हाकडेही एक गाऱ्हाणं घालायची पाळी आली–"

"मग बोला ना – काय गाऱ्हाणं आहे?" प्रांत मध्येच म्हणाला, "तुम्हाला पाहून मला आनंद झाला. सांगा, काय?"

"माझ्या गावचा एक मांग आठ-दहा वर्षे बेळगावला नेऊन ठेवला आहे–"

"बरं, मग पुढं?" प्रांतानं टक लावून पाहत प्रश्न केला आणि पंत म्हणाले,

"तो माणूस सदनशीर शिपाई आहे. त्याला इनाम आहे, परंतु तो बेळगावात आहे–"

"त्याचं असं आहे..." प्रांतानं मध्येच आपलं म्हणणं मांडलं, "अशी माणसं वाईट असतात. त्यांच्या बाबतीत सरकार विचार करणार नाही."

"अशी, म्हणजे कशी?" पंतांनी प्रश्न केला.

"अशी, म्हणजे चोरटी?" प्रांत शांतपणे बोलू लागला, "ही माणसं भुरट्या चोऱ्या करून जनतेला हैराण करतात. त्यामुळं लोकांचा सरकारवरचा विश्वास उडतो आणि इतर बंडखोर प्रवृत्तींना चेव येतो. म्हणून अशी माणसं – नव्हे, ही जमातच डांबरट आहे. तिला क्षमा नाही!"

"असं म्हणू नका." पंत समजावणीच्या स्वरात म्हणाले, "सरसकट गव्हाबरोबर किडे रगडणं हा राज्यावरचा विश्वास दृढ करण्याचा मार्ग नव्हे, असं माझं मत आहे. सरकारनं दुःख बघूनच डाग देणं न्यायाला धरून होणार आहे."

"मान्य आहे." प्रांत म्हणाला, "अन्याय होऊ नये, याची आम्ही काळजी घेत आहोत–"

"मुळीच नाही!" पंत एकदम म्हणाले, "तसंच असतं, तर सावळा मांग दहा वर्षं बेळगावला राहिलाच नसता. मुक्याचं जाणं कोण होत नाही."

"त्यानं त्या भागात अशांतता निर्माण केल्यामुळंच त्याला भुरटा चोर समजून – नव्हे, ठरवून – गुन्हेगार जमातीच्या कायद्यान्वये हद्दपार केलं आहे!"

"त्यानं त्या भागात अशांतता निर्माण केली होती, याला पुरावा काय आहे?" पंतांनी मोजक्या शब्दांत प्रांताला पेच घातला आणि "सावळा हद्दपार झाल्यापासून त्या भागात शांतता झाली आहे, असं सरकारचं मत आहे का?" हा पंतांचा दुसरा सवाल ऐकून प्रांत बिचकला. तो म्हणाला,

"त्याला गुन्हेगार जमातीचा कायदा—"
"पण तो इसम गुन्हेगार आहे का?" पंतांनी लगेच प्रश्न केला आणि प्रांत म्हणाला,
"मी स्पष्ट बोलू?"
"जरूर-जरूर."
"तुम्ही गैर अर्थ काढू नका," प्रांत म्हणाला, "मांग-रामोशी जातींना हाताशी धरून काही उच्चवर्णीय लोक बेबंदशाही निर्मीत आहेत. ते लोक खून-दरोडे करतात आणि हे प्रतिष्ठित लोक आपली घरं सोन्यानं भरतात नि तेच त्या गुन्हेगार लोकांचं समर्थन करीत सुटतात—"
"झालं तुमचं?" पंत अगदी शांतपणे म्हणाले, "माझ्या भागात एकही दरोडा पडलेला नाही, तेव्हा माझ्या घरात सोनं येण्याचा संभव उरत नाही आणि मी एका गुन्हेगाराचं समर्थन करण्यासाठी आलेलो नसून एका सनदशीर शिपायाची न्याय्य बाजू सरकारच्या कानावर घालण्यासाठी आलो आहे. हे समर्थन नसून मी म्हटलं, त्याचप्रमाणे हे गाऱ्हाणं—"
"माझे शब्द तुम्हाला लागले." प्रांत दिलगिरीच्या स्वरात म्हणाला, "परंतु माझ्या म्हणण्याचा असा अर्थ घेऊ नका—"
"नाही घेत." पंत चढत्या सुरात म्हणाले, "ज्या जमातीला स्वत:च्या जातीचं नाव सांगणं ज्या कायद्यानं अशक्य करून ठेवलं आहे, त्या जातीचं समर्थन करणाराही दोषी मानला जाणार, याची मला कल्पना आहे; परंतु समर्थन करीत नाही, हे लक्षात घेतलं, तर मी दोषी ठरत नाही. म्हणून माझी विनंती आहे की, सावळाची बाब गंभीर आहे. ती आपण विचारात घ्यावी. नाही तर त्याच्या जमिनीचा लिलाव करण्याची तरतूद—"
हे ऐकून प्रांत स्तब्ध झाला. थोडासा विचार करून तो म्हणाला, "पंत, मी सावळाची चौकशी करतो—" असं म्हणून तो थांबला आणि एकदम आठवून परत म्हणाला, "आणि, हो परवाच तुमच्या गावच्या एका मांगानं म्हणे, त्या शिगावच्या खोताचा हात तोडला. याचा अर्थ काय? हा काय प्रकार आहे? सरकार या गोष्टीचा गंभीरपणे विचार करीत आहे."
हे ऐकून पंत म्हणाले, "मग मी म्हणतो, त्याही गोष्टीची तुम्ही खास नोंद घ्यावी, की त्याच खोतानं जोगणीची वाटी घेऊन निघालेल्या एका मांगाचं रिवाज मोडून आमच्या हद्दीत शिरून डोकं मारलं नि ते वेशीला टांगलं. ही फार लांबची गोष्ट नसून अवघ्या दहा वर्षांपूर्वीची आहे आणि तीच वाटी परत नेण्याचा प्रयत्न करीत असता त्याचा हातच मारला गेला; डोकं नाही. त्याचं डोकं सहज मारता आलं असतं आणि धार्मिक बाब म्हणून कायदाही काही करू शकला नसता—"
प्रांत डोळे विस्फारीत म्हणाला,
"तुमच्या गावचे मांग इतके लढाऊ आहेत?"

— आणि छाती काढून पंत म्हणाले,

"लढाऊ आहेत; भुरटे नाहीत! खोतानं ज्याचं शिर मारलं, त्याच्याच मुलानं खोताचा हात तोडला. मी म्हणतो, असा संयम पाळणारी जात दुसरी नाही!"

"म्हणजे खोत ती जोगणी परत नेत असता हा प्रकार घडला, तर!" प्रांत म्हणाला.

त्यावर पंत म्हणाले, "...आणि त्या कामी तुमचा दुलारी मांग त्या खोताला मदत करीत होता. आम्ही त्याला अटक करून सरकारी नोकर म्हणून सोडला. रिवाजाप्रमाणं त्याचंही डोकं मारणं सहज सोपं होतं."

हे ऐकून प्रांताला राग आला. त्यानं लगेच दुलारीला बोलावून घेतलं आणि विचारलं, "जोगणीच्या दंगलीत तू होतास?"

"हो, व्हतो. पन बघत व्हतो."

"खोटं बोलतो आहे हा!" पंत म्हणाले, "यानं ती वाटी हिस्कून खोताला दिली—"

"काय? खरं का?" प्रांत डाफरला. आणि दुलारी रडू लागला. तो केविलवाणा चेहरा करून म्हणाला, "मला बाबरखानसाहेबानं सांगितलं—"

"मग खोटं का बोललास?" प्रांत चिडला.

"माझ्या गावचे मांग असले नाहीत." पंत म्हणाले, "म्हणूनच म्हणतो, मांग जात इथून तिथून सारखी धरता येत नाही. कारण मोळापोटी केरसुणीही पैदा होत असते."

मग प्रांत काहीच बोलला नाही. पंत उठून सज्जनगडावर जाण्यासाठी निघून गेले. कबूल केल्याप्रमाणे सातारचा दपाटा बेळगावला गेला. सावळाच्या वर्तनाची नोंद सातारला आली आणि त्याची हद्दपारी रद्द केल्याचा हुकूम रवाना झाला.

सावळा गावी आला, तेव्हा नाचत आला. त्याला हर्षवायू व्हायची पाळी आली. आल्याबरोबर त्यानं फकिराचे पाय धरले. दौलती, राहीबाई, राधा यांच्या पाया पडून तो गावात गेला. पंतांपुढं त्यानं दंडवत घातला.

"आता मी माझ्या पांढरीत मरंन. माझी बायकोपोरं मला बघतील—" असं म्हणत तो गावभर फिरला. भैरूला कडकडून भेटला.

आता आपण कुणाच्या पाचोळ्यावर पाय द्यायचा नाही, आगळीक करायची नाही, बायकापोरांत कष्ट करून जगायचं. कष्टानं मातीचं सोनं होतं, वाईट कायदा कुत्र्यावाणी असतो, असं तो सांगत फिरला.

सावळा आल्यानं त्याच्या घरात नवा तजेला आला. मांगांना धीर वाटला. गावालाही बरं वाटलं. एक जवळचा दुरावलेला दिलदार माणूस जवळ आला, म्हणून फकिरालाही आनंद झाला.

फकिराच्या शब्दावर पंत सातारला गेले नि सरकारशी भांडले, म्हणूनच सावळाला नवा जन्म आला; फकिरानं त्याला माणसात आणला; नाही तर तो कुजून मेला असता, असं मांग म्हणू लागले. फकिराच्या शब्दाची किंमत त्यांना समजली आणि त्या वयात ते त्याला आपला कर्ता पुढारी समजू लागले.

दूरदूरचे मांग येऊन त्याला पाहून जाऊ लागले. फकिराचे मैतर झाले. विंचू ठार मारण्याऐवजी त्याला नांगी तोडून जिवंत ठेवणारा फकिरा लोकांना आगळा वाटू लागला.

— आणि राधालाही तो तसाच वाटू लागला. ती लहानपणापासून त्याला भीत आली होती. आताही ती भीत होती. ज्या दिवशी तो रागानं चिंचेवर चढून बसला, त्या दिवसापासून राधा त्याला चढत्या सुरात कधीच बोलली नाही. कधी राग आला, तर ती गिळून घेई. आता पुन्हा तिला हुरहूर लागली होती. आपलं कुंकू गाजलं — आता आपली ही कूसही गाजणार! पण पुढं काय? खोत गप्प बसणार नाही. हात तुटला म्हणून काय झालं? एक पाय मोडला, म्हणून गोम लंगडत नाही आणि तो खोत तर भयाण माणूस आहे. तो स्वस्थ न बसता सूड घेणार. त्यानं जर सूड घेतला, तर?

ती कल्पना तिला असह्य झाली; पण करणार काय? फकिराला कसं सांगावं, हा प्रश्न होता. रोज नवेनवे लोक त्याला भेटत होते. तो चिंचणीकर पिराजी, साजूरकर निळू आणि कैक रामोशी, कैक मराठे आणि तो कुमजेचा सत्त्या — त्यानं तर उघड बंड केलं आहे. त्याला तोफेच्या तोंडी देण्याचा हुकूम सुटलाय म्हणे नि त्याची फकिराशी मैत्री. सत्तू येऊन फकिराला भेटून जातो. ही सारी माणसं फकिरासारखीच दिसतात. फकिराही घोडं घेऊन कुठं तरी जात असतो. रात्री-अपरात्री येतो. जर एखादे दिवशी त्या खोतानं वेळ साधली, तर— ?

या विचारांच्या जाचात राधानं किती तरी दिवस काढले आणि एकदा तिनं निश्चय केला की, फकिराला बोलायचंच.

एकदा फकिरा दोन दिवस कुठंतरी गेला आणि तिसऱ्या दिवशी सकाळी पहाटेस आला. चिंचेखाली येताच गबऱ्यांच्या टापा ऐकून राधानं डोळे उघडले. तीन दिवस ती भिंतीला टेकून बसली होती. तिनं अन्नाचा घास घेतला नव्हता. गुडघ्यावर हनुवटी टेकून दौलती वाट पाहत होता. राहीबाई डोळे पुसत होती. पहाटे फकिरा आल्यानं सर्वांचा आत्मा शांत झाला. फकिरा घोडं बांधून घरात आला, तेव्हा दिवा जळत होता. राधाबाई भिंतीला टेकून बसली होती. दौलती खिन्न होऊन बसला होता.

ही सर्व परिस्थिती पाहून फकिराला चरका बसला. तो म्हणाला, "आई—"

राधाच्या गालांवर आसवांची धार चमकली, ती पाहून फकिराचा आवाज चढला.

"आई, काय झालं? साधू कुठाय?"

"चावडीत." दौलती म्हणाला.

"आई, का रडतीस? बोलत का न्हाई?"

"माझं रडं कुनालाच न्हाय कळायचं."

"का? सांग की." फकिरा जवळ बसला आणि राधा म्हणाली,

"कसं सांगू? मला जन्मभर तुझी भीती वाटली नि आता बी वाटतीय."

"माझी भीती? आगं, तू माझी आई—"

"आई?"

"हो, हो. माझी आई!"

"मग कुठं गेला व्हतास?"

— "चिंचनीला — पिराजीकडं."

"कुनाला इचारलं व्हतं?"

"कुनाला न्हाय इचारलं."

"का? आम्ही तीन जिवांनी दिव्यावानी जळायचं?"

"आई! थोरले आई, बाबा, माझं चुकलं."

"तुझ्या आईनं तीन दिवस पानी शिवलं न्हाई." दौलती राधाकडे बोट दाखवीत म्हणाला, "ही म्हातारी पाखरावानी वाट बघीत बसलीया. अन्न असून घास उतरंना, बाब्या—"

"पन तुम्ही एवढी काळजी का करता? मी आता का प्वार हाय?"

"तू मोटा हाईस." राधा म्हणाली, "पन ह्या काळजाला कसं सांगू? खोतासारखा वैरी दोन पिढ्या मागं लागलाय. दुखवलेला साप परवाच बिळात गेलाय. आमास्नी त्येची भीती वाटती—"

"पर मी भीत न्हाय." फकिरा म्हणाला, "आनी तो कवाबी येऊ दे. त्येनं नुसती फडी जरी वर केली, तरी मी त्येला चेचून काढीन! मी सावध हाय नि मला सारं ठावं हाय. आपल्या गावचा रावसाहेब पाटील, त्यो काळगावचा धोंडी चौघला — ही खोताची बिळं हायती. आनी त्या बिळांवर माझी नजर हाय."

"पर पांदीनं जाऊ नगं, माझ्या आंगावरनं जा, असं म्हननं बरं नसतं." दौलती बोलला आणि फकिरा हसत म्हणाला,

"मी तसं कसं बरं म्हनीन? मी कुनाच्या आंगावर जानार न्हाय नि कुनाला येऊ बी देनार न्हाय."

"आनी असाच रातचा-अपरातचा फिरत ऱ्हानार?" मध्येच राही म्हणाली.

"न्हाय बरं—" फकिरा म्हणाला, "आता तुमास्नी इचारल्यावाचून कुटंच जानार न्हाय."

''एवढंच कर.'' दौलती पुटपुटला नि फकिरा म्हणाला,

''मला वाटलं, तुम्ही बिनघोरी असाल—''

''म्हंजी आमास्नी तुझी काळजी न्हाय, असंच न्हवं!'' राधा म्हणाली, ''मी बोलत न्हाय. कारन नखाएवढा व्हतास, तवा ऐकलं न्हाईस — तोंड पोळलं—''

''आगं, तवा मी बच्चा व्हतो.'' फकिरा म्हणाला, ''आता परत चिंचंवर चढून खाली उडी टाकीन, असं मी म्हननार न्हाय! खरंच आई!''

''काय नेम सांगावा, बाबा, तुझा!'' राधा कौतुकानं म्हणाली आणि फकिरा हसला.

''माझं नशीब शिकंदर हाय — तू माझीच आई हाईस. तू बोल मला. तू बाबा —थोरली आई, आरं तुम्ही सारी माझी पंढरी हायसा—'' फकिरानं त्या सर्वांच्या पुढं डोकं टेकलं. त्याबरोबर त्या तीन आत्म्यांना कळ आली. दौलती कळवळ्यानं पुढं सरकला. त्यानं त्याच्या पाठीवरून हात फिरवला. राधाच्या डोळ्यात सागर उसळला. राहीनं उठून मिरच्या उतरून टाकल्या. ती म्हणाली, ''तुम्हा दोघांसाठी म्हनून आम्ही जगलो.''

''तुझा बाप तुझ्यावानीच व्हता.'' दौलती म्हणाला, ''जोगणीला हात घालीस्तवर कुनालाच बोलला न्हाय—''

''तसं तेवढं तू करू नगं!'' राधा म्हणाली, ''जे जे करशील, ते आमास्नी सांगून कर!''

सूर्य उगवून वर आला. पहिली किरणं रांगत रांगत दौलतीच्या खोपटात शिरली. निवडुंगावर पाखरं भिरभिरू लागली. रात्रभर दौड मारून आलेला गबऱ्या फुरफुरू लागला. बोलण्याच्या भरात चुकून राहिलेली कोंबडी खुराड्यात धडपडली. राधाचं मन हलकं झालं. ती उठली. उठता उठता पुन्हा म्हणाली,

''चांगली मानसं जोडावी. वाइटाची संगत करू नये. जिवाला जपावं. एवढंच आमास्नी कळतं—''

''आनी तेवढंच मला बी कळतं.'' फकिरा म्हणाला, ''माझी मानसं नुसती चिऱ्यासारखी हायती. जिथं बसवलं, तिथं बसनारी. आनी, आई! मरान मानसाच्या पुढं जन्माला येतं आनी ते मानसाला घेऊनच मरतं; पन मानसाचं मागं उरतं काय?''

''नाव — चांगुलपन.'' राधा मध्येच म्हणाली.

''आनी त्येच मला मिळवायचं हाय. तूच मला शिकवलंस, की मानसानं वाईट वागू नये, म्हनून. मी ते इसरत न्हाय — इसरनार न्हाय. पन—''

''पन काय?''

''तू रडायचं न्हाय.''

हे ऐकून ती हसली.

दिवस सुगीचे होते. दु:खाची जागा सुखानं घेतली होती. श्रीमंतीचं शिवार धुंद झालं होतं. पाखरं गुटगुटीत झाली होती. किडे माजले होते. गुरं उंडारली होती. माणसं दोन वेळा पोटभर खाऊन ढेकर देत होती. दिवसभर रानामाळात गेलेली माणसं घराकडे येत होती. रविनारायण आपल्या दारात उभा होता. त्याची ती पिवळी ऊन्हं हिरव्या निवडुंगावर पसरून एक नवाच रंग डोळे दिपवीत होता.

मांगांची पोरं कुंथत चक्र फिरवीत होती आणि सूर्याकडे पाहत मांग पेढाला बटी लावीत होते. एक बटी लावू आणि काम संपवू — दोन लावू आणि पुरं करू — तीन बट्या लावून सुटी करू, असं म्हणत ते काम उरकीत होते. पेढाची पोरं रडकुंडीला आली होती.

— आणि निवडुंगाच्या पलीकडे गुरं चारायला गेलेली पोरं ओरडत घराकडे येत होती. म्हशीच्या पाठीवर बसून गात होती : 'तू ऐक, नंदाच्या नारी!....'

एवढ्यात एक वाटसरू आला. तो एका ठेंगू घोड्यावर बसला होता. त्याच्या मानानं ते घोडं अगदीच खुजं होतं. त्यामुळं वरच्या त्या माणसाचे पाय जवळ जवळ जमिनीला लागत होते. एखाद्या गाढवावर बसावं, तसा तो बसला होता. डोकीला लाल रंगाचा पटका, अंगात जाड कापडाची बंडी, जरीकाठी धोतरानं कंबर बांधून त्यानं हातात पल्लेदार दांड्याची कुऱ्हाड घेतली होती. त्याचा रंग काळा होता. त्यानं आपल्या बेतात असलेल्या मिश्यांना पीळ भरून नाक फेंदारलं होतं. त्याच्या तांबरट डोळ्यांत राग दिसत होता. त्याला पाहून पोरांचा गलका बंद झाला. ती आपल्या सांकेतिक भाषेत एकमेकांना सांगू लागली,

"ए, आरील ठिकालाय, रं—"

"आरं, आरील नव्हं — झिंमक!" दुसरं केकाटलं आणि तिसरा चिरकला,

"आल वसरू नका—"

लगेच चौथं म्हणालं, "पेडू द्या."

त्या पोराचं ते बोलणं ऐकून तो इसम थांबला. आवाज नरम करून तो म्हणाला, "कुनाचं रं, तुमी?"

"आमी? — कुरवाड्याचं." एका पोरानं चटकन खोटं सांगून टाकलं.

तो इसम चकित होऊन म्हणाला, "मग ही रं, कसली भाषा बोलताय?"

"ही पोरांची—"

"काय चोरांची?" त्या हुशार माणसानं पोरांना चिमटा काढण्याचा प्रयत्न केला,

पण बनलेली ती पोरं वठली नाहीत. नाकाचा मुरठा करून एक पोर म्हणालं,

"तुम्ही किवंडं हायसा?"

"न्हाय बा— मला ऐकू येतं की."

"मग पोरांची म्हनताना तुमी चोरांची कशी ऐकली?" त्या पोरानं वाटसरूवर डाव उलटीत आणला आणि ते पुढं म्हणालं, "चोराच्या मनात—"

हे ऐकून सारी पोरं हसली. माळ हास्यानं भरला. हिरमुसला वाटसरू म्हणाला, "ए थट्टा करू नगा. त्या फकिराचं घर कंचं रं?"

हा प्रश्न ऐकून पोरांना पुन्हा संशय आला. त्यांनी एकमेकांना डोळ्यांनी खुणावलं. एक पोर म्हणालं, "तुमास्नी कंचा फकिरा पायजी?"

वाटसरू पुन्हा पेचात पडला. बाबजी मांगाचा झिंग्या निवडुंगाच्या बेळ्यातून उंदराप्रमाणे निघून फकिराकडे पळाला.

"हतं किती फकिरा हायती?" त्या वाटसरूनं पुष्कळ विचार करून विचारलं आणि पोरं म्हणाली,

"आवं, हतं चार फकिरा हायती."

त्या पोरांच्या बोलण्याचा रोख त्या वाटसरूच्या डोकीत आला. ही सारी मांगाची पोरं असून, ती आपल्याला गाढवात काढीत आहे, हे लक्षात येऊन तो म्हणाला, "त्या चार फकिरांच्या बापांची नावं रं काय?"

एक काळं हडकुळं पोर पुढं होऊन म्हणालं, "मी सांगतो — एकाचं शिग्या, एकाचं झिंग्या, एकाचं शिरग्या नि एकाचं मिरग्या—" ही नावं ऐकून सारी पोरं पोट धरून हसू लागली. काही लोळू लागली. वाटसरू भांबावून गेला. इतक्या वेळात त्या बेळ्यातून फकिरा माळाला आला. झिंग्या लंगोटी नीट करीत दूर उभा राहिला. सारी पोरं गप्प झाली आणि फकिरा म्हणाला, "कोन गाव, पाव्हनं?"

"आम्ही तिकडं काळगाव — कुमजंचं."

"कुनाकडं आलाय?"

"फकिराकडं."

"काय काम हाय?"

"मला कुमजंच्या सत्तूनं पाठवलंय."

सत्तूचं नाव ऐकून फकिरा चमकला. तो म्हणाला,

"सत्तूकडं मला तुम्ही दिसला न्हाय कवा."

"मी गोंदा गोंधळी. मी गावोगाव फिरत असतो. सत्तू माझा मैतर हाय. त्येनं मला फकिराकडं पाठवलंय—"

"मग मीच त्यो फकिरा. बोला, काय काम हाय? ए पोरानू, जावा तुमी आता."

पोरं गुरांना हाकीत गेली. गोंधळी घोड्यावरून उतरला आणि म्हणाला,

"सत्तूवर बाका प्रसंग गुदरलाय, म्हनून त्येनं मला तुमच्याकडं पाटवलंय."

"कसला प्रसंग?"

"जर तुम्ही हातपाय हलवलं, तरच सत्तूचा जीव वाचनार हाय — न्हाय तर त्येची आशा न्हाय—" गोंधळी खिन्न होऊन म्हणाला.

फकिरा एकाएकी गंभीर झाला. तो म्हणाला,

"कसला प्रसंग — सांगा तरी!"

"चला — सांगतो."

ते दोघे घराकडे निघाले. आपला एक मित्र संकटात आहे, हे ऐकून फकिरा बेचैन झाला. त्याची ती हकीकत ऐकण्यासाठी तो आतुर मनानं चालू लागला.

गोंधळी चालता चालता म्हणाला,

"ही पोरं कुनाची?"

"मांगांची."

"मला सांगितलं, कुरवाड्याची म्हनून."

"खोटं सांगितलं त्येंनी."

"हातं फकिरा किती हायती?"

"एकच — मी."

"मला त्येंनी चार सांगितलं."

फकिरा हसला.

"बरं, ती बोलत्यात बी निराळं." गोंधळी पुटपुटला.

"कसं?" फकिरानं विचारलं.

"आरील म्हंजी काय?"

"कुरवाडी."

"वरावला म्हंजी?"

"आला. ही भाषा आमच्या जातीची हाय."

"ही भाषा का म्हनून बोलता?"

"सरकारी अंमलदारास्नी कंळू नये, म्हनून."

दोघे घरात आले. कुमजंत घडलेला प्रकार गोंधळी सांगू लागला—

"बहादूरवाडीच्या दादा पाटलानं काल सत्तूला अटक केलीया. साहेबाचा तसा हुकूमच होता. आनी जेवढा म्हनून सरकारइरुद मानूस हाय, तेवढा सारा कैद करायचा त्येंचा बेत हाय!"

"सत्तूला कशी अटक झाली?" फकिरानं विचारलं.

''एका न्हाव्याकडं दाढी करीत व्हता. इतक्यात पन्नास लोकांनी त्येला अटक करून मळीला बांधून ठेवलाय. उद्याच ते सातारला निघनार हायती. ह्या अटकंमागं समदं पाटील हायती.'' गोंधळी म्हणाला आणि फकिरानं विचारलं,

''मला काय निरोप हाय सत्तूचा?''

''निरोप हाय की, 'माझ्यावर हत्यारानं उपकारा. जर जगलो, तर ते उपकार फेडीन!' ''

हा सांगावा ऐकून फकिराच्या वर्मी बाण लागला. तो उद्विग्न होऊन म्हणाला,

''तुम्ही इतका उशीर का केला?''

''काय करू? वाटाच बंद व्हत्या. आता तुम्ही घाई करा, न्हाय तर वारनेचा खोरा एका मर्दाला मुकंल!''

''दादा पाटलाची किती मानसं हायती?''

''पन्नास. पर हत्यारबंद—''

''हत्याराचं नाव नका मला सांगू. मानसं किती?''

''पन्नास.''

''मग निघू या!'' फकिराला घाई झाली.

''दोघंच?''

''ते का? मानसं जमवीत जायचं.'' फकिरा साधूला हाक मारून म्हणाला, ''सत्तूला सोडवायचा. मानसं काढा नि निघा!''

कडुसं पडलं आणि सर्व गडी जमले. मुरा, बळी, ईश्वरा, किसन, भिवा, घम्या असे पंचवीस जवान तयार झाले. गबऱ्यावरचं खोगीर आवळीत फकिरा म्हणाला, ''घमाडी, तू चिचनीला जा नि पिराला सांग. म्हनावं, दुपारी बहाद्दूरवाडीत ये. जा तू! एकजन जाऊन हरी नि रामाला घिऊन या!'' सर्व तयारी करून तो राधाकडे गेला. तिच्या पायांवर डोकं ठेवून म्हणाला, ''रागावू नगं. माझा मैतर मरनाच्या दाढंत हाय. त्येला सोडवाया जातू. बाबा, थोरले आई!—'' एवढंच बोलून त्यांच्या पायांना त्यानं मिठी घातली.

दौलती मग कापऱ्या आवाजात म्हणाला,

''जा — पर जपून!''

''कवा येनार?'' राधा आसू आवरीत म्हणाली.

''मी उद्या दीस बुडताना नक्की यीन!''

''आम्ही तवर भाकरी खानार न्हाय!'' राही म्हणाली.

''माझी काळजी करू नगा. सांजंला घरात हाय मी.'' फकिरा उत्तरला.

सारी तयारी झाली. गबऱ्या खेकाळला नि निघाला. राधाला हुंदका आला. ती मनातल्या मनात गबऱ्याला म्हणाली,

''बाबा, माझ्या फकिराला टाकून एकटा येऊ नगं. दोगं या. न्हाय तर—''

त्यावेळी फकिराचा घोडा दुडक्या चालीवर नाचत बहादूरवाडीची वाट चालत होता आणि फकिराच्या डोळ्यांपुढं कुमजेचा सत्तू मरणाचा कानोसा घेत मळीला बसलेला होता. त्याच्या ओठांवर बहादूरवाडी एवढेच शब्द नाचत होते. सूर्योदयाच्या आत बहादूरवाडी गाठायची. मग पुढं कसा वेढा घालायचा, सत्तूला मुक्त कसं करायचं आणि सूर्यास्ताच्या आत आईला कबूल केल्याप्रमाणं परत कसं फिरायचं, याचा विचार करीत तो निघाला होता.

७

कुमजं गावाला वारणा नदीनं एक पल्लेदार वळसा घेतला होता. त्या वळणदार, अगदी वारणेच्या कुशीत कुमजं वसलं होतं. काळजाच्या वडीसारखी सुपीक जमीन नि वारणेचं पाणी यामुळे त्या खोऱ्यात कुमजं हे कुबेराची अमरावती मानलं जात होतं. धरणी, पाणी नि कष्ट यांचा निसर्गानं सुंदर संगम घडवला होता.

परंतु त्या कुमजेत सत्तूचं काहीच उरलं नव्हतं. तो वठल्या वृक्षासारखा झडझडीत होता. बापानं सारी जमीन चिलमीत घालून गांज्याच्या व्यसनात फुंकून धूर करून टाकली होती आणि जमिनी विकून त्याचा गांजा ओढीत स्वत:चा धूर कैलासी रवाना केला होता. आज्याच्या कारकीर्दीतील घर आता मोडकळीस आलं होतं. सत्तूला फक्त आई होती. आईशिवाय त्याला आपलं म्हणायला जगात कोणीच नव्हतं.

कुणाचा दळाकांडा करून, तर कुणाची घरं सारवून, कुणाची खळी शिपून, अशी अनेक कामं करून भोसल्याच्या बणाबाईनं आपल्या सत्तूला जगवला होता. जेव्हा सत्तू शाळेत सातवी शिकत होता, तेव्हा बणाबाई घरोघर जात होती. आयाबायांना सांगून सत्तूसाठी लोणचं, सांडगे, पापड मागून आणीत होती. ते सत्तू खात होता आणि वाढत होता. उकिरड्यावर एखादं शाळवाचं ताट पोसावं, तद्वत त्या दारिद्र्याच्या उकिरड्यावर सत्तू पोसवला. रूपानं, गुणानं आणि शरीरानं सत्तू डोळ्यात भरू लागला. कैकांचे डोळे दिपले.

— आणि सत्तूचे डोळे उघडले. स्वत:चं भयानक दारिद्र्य त्याला दिसू लागलं. आईची दया आली. स्वत:ची लाज वाटली. त्यानं सातवीत शाळा सोडली आणि लष्करात जाऊन घोडदळात नोकरी धरली. मनानं आणि बळानं मजबूत सत्तू त्या घोडदळात लौकरच आगळा वाटू लागला. त्याची ती बेफाट घोडदौड बघून अधिकारी बावचळले. इंग्रजी हुद्देदारांची मती गुंग झाली. कैक तरुण मडमा सत्तूला पाहून जिभल्या चाटू लागल्या. साऱ्या घोडदळात वचक बसली. बंदुकीपासून कुस्तीपर्यंत तो अजोड ठरला.

कुमजेत बणाबाईला सुखाचे दिवस आले. कलंडलेलं घर सरळ होऊन स्वत:च्या पायावर उभं राहिलं. बणाच्या पायाला विश्रांती लाभली. पोरानं शेवटी पांग फेडला, असं गाव म्हणू लागला. कुमजेचं नाव सत्तूच लष्करात गाजवलं, म्हणून कैकांचे ऊर फुगले. बणाबाईकडे पैशाचा झरा वाहत येऊ लागला.

परंतु लौकरच निराळं घडलं. अधिकाऱ्यांच्या मत्सराला सत्तू कंटाळला. उद्धट, हेकट वर्तनानं चिडला. गुलामाप्रमाणं वागणं त्याला परवडलं नाही. त्याला शिसारी आली आणि एकाच वर्षात तो नोकरी सोडून पुन्हा कुमजेला आला. लष्करात नाव केलं, म्हणून लोकांनी त्याचं कौतुक केलं; परंतु मथाजी चौघुल्यानं उगीच नाक फुगवलं. तो सत्तूच्या तोंडावर म्हणाला,

"लष्करातनं आला, म्हंजी राजा हूनशान आला काय? कुंभाराची सून शेवटी कातवरालाच जानार—" या मथाजीच्या शब्दांनी सत्तू चमकला, वरमला; पण ते बोलणं कानाबाहेर टाकून तो पुन्हा कुमजेच्या त्या जीवनात एकरूप झाला. मिळेल तेव्हा विळा-मजुरी करू लागला आणि मजुरी नसेल, तेव्हा हातात कुऱ्हाड घेऊन फिरू लागला.

काही दिवस असेच गेले.

एकदा सत्तू नदीवर आंघोळीला गेला होता. चैत्राचं ऊन धरणीला होरपळीत होतं. प्रत्येक वस्तू तप्त झाली होती. नदीच्या पाण्यात मासे काजबारले होते आणि नव्या पालवीनं वारणाकाठ नटला होता. हिरव्या रेशमाची शाल पांघरून बसल्यासारखा वाटत होता. एकूण एक झाड पानाफुलांनी डवरलं होतं. आजूबाजूच्या जमिनी नांगरून धापा टाकीत पडल्या होत्या. जळतं वारं तापलेली धूळ उडवीत पळत होतं. उन्हात तगमग झालेली पाखरं मुकी झाली होती. नि:शब्द शांतता नांदत होती. वातावरण भलतंच रागावलं होतं.

सत्तू पांदीनं घराकडे निघाला आणि एकाएकी पांदीत एका बाईनं बोंब ठोकली. सारा वारणाकाठ थरथरला. वातावरण अधिकच तंग झालं. सत्तूनं तिकडे धाव घेतली.

एका तरुण, गरोदर महारणीनं मथाजी चौघुल्याचा अपराध केला होता. भर उन्हात येऊन तिनं त्या चढेल माणसाच्या कुंपणाची नांगी उपटली होती आणि त्याच वेळी तो तिथं आला होता. त्यानं आल्या आल्या त्या महारणीला माराय जुपी केली होती. तो तिला जुमानून लाथा घालीत होता आणि ती उपडी पडून ओरडत होती. काट्यात लोळत होती. आपल्या पोटावर लाथा लागू नयेत, म्हणून पोट दडवीत होती आणि किंचाळीत होती.

चौघुला दोन हातात दोन जोडे घेऊन तिला मारीत होता. डोकीपासून पायापर्यंत तो दमानं भरीव लाथा मारीत होता. ती निपचित पडली, की तो शांत होत होता आणि तिनं हालचाल करताच पुन्हा भडकून मारीत होता. ती मरत कशी नाही, याचीच जणू त्याला चीड आली होती. मग त्यानं तिच्या कुशीत लाथा मारण्याची खटपट सुरू केली. मग

मात्र सत्तूला स्वस्थ राहून पाहणं असह्य झालं. त्यानं चौधुल्याचा हात धरला आणि नम्रपणे म्हटलं,

"आबा, काय करता हे?"

"हिनं माझ्या कुपाची नांगी मोडली — उंडगी —"

"मग पुरे झाली की शिक्षा. सोडा आता."

"न्हाय! न्हाय! मी हिला जिवं मारनार! तू मागं सर!" चौधुला हात सोडवून घेत मान नकारार्थी हलवीत म्हणाला आणि सत्तू म्हणाला,

"मग कुपासाठी मानूस मारता की काय?"

"तू नगं सांगू मला. मी जाईन फाशीला!"

"चौधुलं, ती गरोदर हाय. चला." असं म्हणून सत्तूनं त्याचा हात धरला आणि चौधुला चिडला. त्यानं हिसका मारून सत्तूला दूर लोटलं आणि एकदम खवळून तो ओरडला, "गुमान जा!" तो पुन्हा भडकला आणि त्या बाईला मारू लागला. उशीर निपचित पडलेली महारीण हंबरडा फोडून म्हणाली,

"माझ्या बोटात बाळ हाय. मला मारू नगा. मी मरेन. मी परत हात लावणार न्हाय ऽ ऽ"

महारणीच्या त्या किंचाळीनं सत्तूचं काळीज पेटलं. तोच चौधुला पुढं जाऊन म्हणाला, "वराडतीस? मग वरडच तर—"

सत्तूच्या अंगाची आग झाली. तो चढत्या आवाजात म्हणाला, "चौधुल्या ऐकायचं आहे की नाही?"

"न्हाय ऐकत!" चौधुला हातात जोडा घेऊन गर्रकन परत फिरला. भुवया चढवीत डोळं वटारून तो म्हणाला, "मी हिला जिवं मारनार!"

"आणि मी तुला जिवं मारल्यावर?"

"मग मार की!" हातात जोडा घेऊन चौधुला तावानं पुढं गेला आणि हातातील कुऱ्हाड हवेत उंचावून सत्तू गरजला,

"चौधुल्या, मर आता!..." आणि एकाच दणक्यात चौधुला पांदीला आडवा झाला. मग एकापाठी एक दणके बसत राहिले. कुपाच्या काटक्यांप्रमाणं चौधुल्याच्या देहाची खांडोळी झाली. तो कधी मेला, हे सत्तूला समजंलही नाही. मग उशिरानं तो शांत झाला. त्यानं त्या महारणीला उठवून महारवाड्यात नेऊन सोडली आणि त्याच दिवशी कुमजही सोडली.

सत्तू फरारी झाला. मानवहत्या घडली, याची त्याला मुळीच खंत वाटत नव्हती.

उलट, आपण एक नेक कर्म केलं आहे, असं त्याला वाटत होतं. तो आपल्यासारखी पन्नास माणसं जमवून वारणेच्या खोऱ्यात संचार करीत होता.

चौघुल्यासारखा वाह्यात, ताठ माणूस उभा ठेवायचा नाही, असा त्यानं निर्धारच केला आणि त्यांचा निपटावा आरंभला. मी मी म्हणणारांना त्यानं चिरडून काढलं. सावकाराच्या व्याजाच्या वह्या नि गहाणखत जाळून कुळांना मुक्त करीत तो फिरू लागला. त्याच्या दराऱ्यानं वारणेचा किनारा हादरला. नवऱ्यांनी टाकलेल्या मुली त्यांच्या नवऱ्यांना पटवून त्यानं पुन्हा नांदाय लावल्या. त्या कामी ज्यानं कां कू केलं, त्याची वरात काढली. कैकांना एका पायावर उभे राहावयाची शिक्षा दिली. लाडक्या बापांना कडक दम भरला आणि चढेल जावयाची रग जिरवली. कैक मुलींचे विस्कटलेले संसार पुन्हा सुकर झाले. सोन्याचे झाले. या खोऱ्यात एकूण एक मुलगी दिल्या घरी नांदू लागली. भांडखोर नवऱ्यांना सत्तूची हबक बसली. प्रत्येक नांदत्या मुलीला सत्तू देव वाटू लागला.

सत्तू वारणेच्या खोऱ्यात एखाद्या राजासारखा मिरवत होता; परंतु सरकारही निजलं नव्हतं. पाच हजारांची रक्कम सत्तूला पकडून देणाराला इनाम म्हणून जाहीर झाली होती. साऱ्या चावड्यांच्या खांबाला तसे हुकूम चिकटले होते आणि त्या खोऱ्यातील इरसाल टगे सरकारला मदत करण्यासाठी जिवाचं रान करीत होतं. शिगावचा खोत, बहादूरवाडीचा दादा पाटील आणि मथाजी चौघुल्याचा मुलगा उमाजी चौघुला हे तर नुसते सावलीसारखे त्याच्या पाठीवर पाळत करीत होते; संधीचा वाट पाहत होते. टपून होते.

सत्तू निर्भय होता. तो गिरिकंदरात आणि वारणाकाठच्या शेवऱ्यांत फिरत होता. समोर येऊन हात उगारणारा त्यानं ठेवलाच नव्हता. कुमजेत त्याची फक्त म्हातारी आई होती. जेव्हा त्याला बणाबाईची आठवण होत असे, तेव्हा तो सरळ कुमजेला जात होता आणि आपल्या आईला भेटत होता. मग कितीही पहारा असो, कोणीही पाठीवर असो, तो त्याची पर्वाच करीत नव्हता. कुमजेबद्दल त्याला अभिमान वाटत होता आणि ज्या माउलीच्या कुशीत आपण जन्म घेतला, तिच्या भेटीसाठी तो निर्भय होत होता. शिवाय त्या भागातील बळी त्याने भुईसपाट केले होते. जे होते, त्यांना तो जुमानीत नव्हता. हां — एक फकिरा मांग सोडला, तर एकही माणूस आपल्या तोलाचा नाही, अशी त्याची समजूत होती. म्हणूनच तो स्वत: फकिराला भेटत होता. जिवाला जीव देणारा म्हणून त्याचं तो नाव घेत होता. जो बळी होईल, त्याचा पीळ काढावा, असा त्याचा बोल होता. आणि दारिद्र्याच्या साणेवर धैर्याला धार चढते, असा त्याचा दावा होता. शौर्य श्रीमंतीत फुलत नाही, ते गरिबीतही उसळून उठतं, याचा त्यानं स्वत: अनुभव घेतला होता.

परवा दिवाळीचा सण आला आणि सत्तूला एकाएकी आईची आठवण झाली आणि तो कुमजेला निघाला. अगदी निर्भान होऊन निघाला. फक्त बारा माणसं बरोबर होती. आईला कधी पाहीन, असं त्याला झालं होतं. आईच्या आठवणीनं जुना इतिहास त्याला

आठवत होता. सत्तूसाठी जिनं श्रीमंतांची घरं सारवली, त्या माउलीच्या भेटीआड कोणतीही शक्ती उभी राहणार नाही, अशा निश्चयानं तो निघाला होता.

आपल्या माणसांसह जो जेव्हा नांदगावच्या गावदरीला आला, तेव्हा चंद्र मध्यावर आला होता. पहाटेची चाहूल लागून चराचर सजीव होत होतं. सृष्टीला नवा तजेला येत होता. शुक्राची चांदणी, दिवा जळावी, तशी गगनात दिसत होती. नि:शब्दता नाहीशी होऊन शब्द साकार होत होते. निद्राधीन धरणीनं नेत्र उघडले होते. ढगांच्या अनंतरंगी गालिच्यावरून प्रकाश येत होता. पूर्वेचं क्षितिज हसत होतं. वारा गिरक्या घेत होता. वृक्षांची नम्रता ढळली होती. पाखरं आपले पंख झटकून सज्ज होत होती. जीवनाला हळूच गती मिळाली होती.

गोठ्यांतील बैलांच्या गळ्यांतील चाळ गुणगुणत होते. जाती फिरत होती आणि शेतकरणींची गीतं मंजुळ नाद काढीत होती. बायांच्या गळ्यातून निघालेला धारदार स्वर तलवारीप्रमाणे आरपार जात होता. सत्तू नांदगावच्या पेठेत आला आणि पहिला कोंबडा आरवला. आणि लगेच एका घरातून गीताची ओळ त्याच्या कानावर आली. ती ऐकून तो खटकन थांबला. सर्वजण थांबले. सत्तू कान टवकारून ऐकू लागला. ती बाई म्हणत होती :

*नसेल जरी माहेर, भाऊ असावा पाठीचा*
*गरिबांचा वाली, जसा सत्याबा कुमजंचा ॥*

हे शब्द ऐकून सत्तू गर्रकन फिरला. सारी माणसं गंभीर झाली. त्यांनी नि:श्वास रोखून धरले. सत्तू कानात प्राण आणून ऐकू लागला आणि त्या बाईचं दळणच संपलं. तिनं आपल्या दळणाचा नि गीताचा शेवट केला :

*सरलं माझं दळण, घास घालीते शेवटला*
*आळविते देवा, दे आवुक्ष सत्याबाला ॥...*

जातं जोरात फिरलं, गदकन थांबलं आणि सत्तूनं नि:श्वास टाकला. लोण्याप्रमाणं त्याचं काळीज वितळलं. त्याला भडभडून आलं. त्याचे ओठ थरारले...

"कुमजंत माझं काय आहे? इथंच माझी कुमज आहे. इथंच माझी आई आहे, इथंच माझी बहीण आहे."

हे ऐकून बरोबरची माणसं भांबावली.

गोंदा गोंधळी गंभीर चेहरा करून म्हणाला,

"पन दिस उगवंल न्हवं?"

"उगवू द्या." सत्तू म्हणाला, "मला दिवस आणि रात्र सारखीच आहे; परंतु ही माझ्यासाठी रोज सकाळी देवापुढं पदर पसरते; मला आवुक्ष मागते आणि मी तिला जन्मात पाहिली नाही. तिला पाहिल्यावाचून मी कुमजंला येनार न्हाय!"

हे ऐकून गोंधळी गोंधळला. त्यानं विचारलं,

"मग काय करायचं म्हणता?"

"जा आणि काकनासह कासार अन् लुगड्याच्या दुकानासह दुकानदार घेऊन या!" किंचित धावपळ झाली. 'सत्तू' हे नाव ऐकून दुकानदाराची बोबडी वळली. लुगड्याचं दिंड बांधून तो चालू लागला. कासार पेटारा घेऊन आला आणि सत्तूनं दारावर थाप मारली.

"दार उघड—"

"कोन हाय?" आतून ती बाई म्हणाली.

"कुमजंचा सत्त्याबा—"

'सत्त्याबा' हे नाव ऐकून ती पुढं झाली. तिनं दाराची कडी काढली आणि पिठानं भरलेले हात पुशीत ती त्याला पाहू लागली. सत्तूनं मटकन तिच्या पायांवर डोकं ठेवलं—

"ज्याला तू रोज आवुक्ष मागतेस, तो हा कुमजंचा सत्त्या तुझ्या पायांवर डोकं ठेवीत आहे." सत्तू म्हणाला आणि त्या बाईच्या डोळ्यांतून दोन आनंदाश्रू त्याच्या पाठीवर पडले. पेठेत गडबड झाली. आळी उठली. हां हां म्हणता गाव गोळा झाला. लोकांनी सत्तूला सोप्यात बसवलं. त्याच्या नवख्या बहिणीनं आरती आणली आणि त्याला ओवाळलं.

"आज दिवाळीची भाऊबीज हाय." एक शेतकरी उद्‌गारला आणि सत्तू म्हणाला, "अगदी भाऊबीजं दिवशीच मला बहीण मिळाली." त्यानं त्या आपल्या बहिणीपुढं पाच लुगडी ठेवली. तिला काकणं घातली, सुरती रुपयांनी तिची ओटी भरली आणि तो उठला. म्हणाला, "मला आवुक्ष मागत राहा. मी जातो!"

ती काहीच बोलली नाही. तिचा कंठ उगीचच दाटला. आपला सख्खा भाऊ कुठं तरी दूर निघाला, असं तिला वाटलं आणि सत्तूनं नांदगाव सोडलं.

सूर्योदयाला सत्तू कुमजेत आला. त्याला पाहून आईला आनंद झाला. दिवाळीचा सण तिनं त्याला जेवू वाढला. बरोबरीच्या सर्व लोकांसह तो जेवू लागला. त्याला निघण्याची घाई होती. तेव्हा बणाबाई तक्रारीच्या सुरात म्हणाली,

"उगीच मारलास त्याला."

"कुनाला?" सत्तूनं विचारलं.

"त्या चौधुल्याला—"

"उगीच? आनि त्यानं ती महारीन मारली असती, ती?"

"सरकारनं त्याला शिक्षा दिली असती—"

"अग, पन कधी? ती बाई मेल्यानंतरच ना?" सत्तू मध्येच आईला अडवून म्हणाला, "आनि एक नव्हे, दोन माणसं नाहक मेली असती. त्याऐवजी तो एकटा मेलेला वाईट न्हाई—"

"परंतु हा वनवास तुझ्या नशिबी आला ना!" आई दुःखी अंतःकरणानं म्हणाली,

"तो एकटा मेला खरं, प..."

"...पन मी एकटा नाही." सत्तू म्हणाला, "माझ्यासाठी दोन हजार मरतील. येऊ दे कुनीही. मी हयातभर लढत राहीन. मी फौज बनवून लढत राहीन. कारण मी चूक केलीच न्हाई!"

बणाबाई गप्प झाली, पुन्हा बोलली नाही. जेवण झालं आणि सत्तूनं कुमजं सोडलं. संगंची माणसं पांगवली आणि गोंदा गोंधळी बरोबर घेऊन तो विश्रांतीसाठी बहादूरवाडीत बाबा न्हाव्याकडे गेला.

सत्तूचे अनेक इमानी मित्र होते. त्यांपैकी एक बाबा न्हावी हा होता. त्यानं सत्तूची सोय करून दिली. दुपारी सत्तू तिथेच झोपला. रात्रीच्या जागरणामुळे त्याला सडकून झोप आली आणि गोंदा पहारा करीत बसला. बाबा आपल्या उद्योगाला गेला.

किती तरी दिवस पाळतीवर असलेल्या दादा पाटलाच्या गावातच — वाघाच्या घळीत आयता सत्तू आल्याची बातमी पाळतीवरच्या लोकांनी दादाला दिली आणि त्याला आनंद झाला. त्यानं लगेच माणसांची जमवाजमव सुरू केली. एवढ्यात सत्तूचा पिच्छा करीत करीत उमा चौघुला येऊन दाखल झाला. त्यामुळं त्या दोघांनाही धीर आला आणि त्यांनी पन्नास माणसं घेऊन भर दुपारी त्या घराला गराडा दिला. उमानं आपल्या लोकांना सांगून ठेवलं : 'जिवंत नाही, तर मुडदा पकडा!"

घराभोवतीचा गलका ऐकून गोंधळी चरकला. त्यानं सत्तूला जागं केलं. दादा पाटलानं आणि उमा चौघुल्यानं घर वेढलं आहे, हे ऐकून सत्तू क्षणभर खिन्न झाला आणि लगेच त्यानं पुढची तरतूद केली. गोंदा गोंधळी भ्रमिष्टासारखा बाहेर पाहत होता. त्याला सत्तू म्हणाला,

"आता काय करायचं?"

"भाईर पडू या नि म्होरं यील, त्याला कांडलीत निघू या!"

गोंधळी लढाईला तयार झाला. त्यानं कुऱ्हाडीचा दांडा ठोकला आणि सत्तू म्हणाला,

"तसं निघता येनार न्हाय. आपण दोन मानसं किती लढनार!"

हे ऐकून गोंधळ्याचा जोर एकदम ओसरला. तो गडबडीनं म्हणाला,

"मग काय करू? बोला!"

सत्तू विचार करून म्हणाला,

"त्याचं सारं लक्ष माझ्यावर हाये. मी सरळ जाऊन त्यांच्या हवाली होतो. तुम्ही मागच्या दारानं बाहेर पडायचं आणि लगेच आपली माणसं जमवून या बहादूरवाडीला वेढा घालायचा. आकाराम नि आनंद पाटील यांनी बहादूरवाडीची पिसू बाहेर जाऊ द्यायची नाही — मी काय म्हणतो ते लक्षात येतंय ना?"

"हो, हो." गोंदा म्हणाला.

"आनि तुम्ही लगेच वाटेगाव गाठा, फकिराला भेटा आणि त्याला हे सर्व

सांगा–'' बोलता बोलता सत्तू गंभीर झाला आणि चटकन उठून आपली कुऱ्हाड घेऊन म्हणाला, ''फकिराला सांगा, म्हनावं, कुमजंच्या सत्त्यावर हत्यारानं उपकार करन्यासाठी लवकर ये!''

''मग मी जाऊ?'' गोंधळी चाचरला आणि सत्तू म्हणाला– ''जा खरं; परंतु मध्यानरात्रीपर्यंत फकिरा इथं आला पाहिजे. मी निघालो पुढं.'' असं म्हणून तो सरळ अंगणात येऊन उभा राहिला. कुऱ्हाडीशिवाय सत्तू दारात आलेला पाहून उठलेल्या कुऱ्हाडी दबल्या. पन्नास माणसांनी एकदम मुरकंड देऊन त्याला पकडला. तो जिवंत सापडला, म्हणून उमाला आनंद झाला; परंतु हा वाघ एकाएकी इतका नरम कसा झाला, याचं आश्चर्य वाटून दादा पाटलाला धक्काच बसला. त्याचा चेहरा खर्रकन उतरला.

त्यांनी सत्तूच्या मुसक्या बांधल्या आणि लगेच तालुक्याला रवाना करण्याचा विचार केला; परंतु भर दुपारी सत्तूला घेऊन जाणं सोपं नव्हतं. त्यात वाटेत सत्तूची माणसं हल्ला करतील, या भीतीनं सरकारात खबर देण्यासाठी एक माणूस पाठवून सरकारी मदत येईपर्यंत सत्तूला मळीला – नदीकाठाला – बांधून ठेवावा, असा बेत करून त्यांनी त्याप्रमाणे केलं. माणूस तालुक्याला गेला आणि उमा व दादा हे सत्तूला घेऊन दाट शेवऱ्यांतच नदीकाठी मदतीसाठी वाट पाहत बसले. पाच हजारातील आपल्या वाटणीला किती येणार, याचा कैक मनातल्या मनात आकडा जुळवीत होते.

रात्र उलटत होती. नदीकाठचा गारठा पिसाट झाला होता. शेवरीच्या बारीक पानांच्या दाट गर्दीतून चंद्रप्रकाश खाली उतरत नव्हता. त्यात आता चंद्र मावळण्याच्या बेतात होता. वारणाकाठ मलिन झाल्यासारखा वाटत होता. किंजाळ, उंबर, जांभूळ या झाडांच्या सावल्या अंधारात भर घालू लागल्या होत्या. नदीच्या धारेत मासे धडपडत होते. पाणी खळखळाट करीत होतं. कुठं तरी दरड ढासळून पडत होती. त्यामुळं खेकड्याच्या बिळात शेपटी घालून बसलेलं कोल्हं भिऊन भन्नाट पळत होतं. बाजूला दादा पाटील घोंगड्याची भाळ मारून कुऱ्हाड पोटाशी धरून बसला होता. उमा भाकरीसाठी गावात गेला होता आणि एका मकाणाच्या खोपीत सत्तू निश्चल पडला होता.

गोंदा आता कुठं असेल? त्यानं कुठून कुठपर्यंत दौड केली असेल? ठरल्याप्रमाणं झालं असलं तर ठीक, नाही तर मग मरण टळत नाही, असा तो विचार करीत होता.

इतक्यात उमा आला. त्यानं आणलेल्या भाकऱ्या लोक खाऊ लागले. तो दादा पाटलाजवळ जाऊन बसला आणि म्हणाला,

''कसला विचार करता, पाटील?''

''खरं सांगू? सत्तूला पकडून इस्तू पदरात बांधून घेतल्यासारखं वाटू लागलंय–''

"पर का?" उमा उत्साहानं म्हणाला, "माणूस आता तालुक्यात पोहचला असला, तर सकाळपर्यंत बाबरखान फौजदार नक्की येईल. भिता का?"

"आपला माणूस तालुक्याला गेला असंल, असं कशावरून म्हणता?" दादा पाटील कण्हत म्हणाला, "सत्तू हाती लागल्यापासनं मला धडकीच भरलीया. सत्त्या लस्करी मानूस हाय. काय करील, त्येचा नेम न्हाय. एकाएकी त्यो हातात आलाच का?"

या प्रश्नानं उमाही चरकला; पण स्वत:ला आणि दादा पाटलाला धीर देण्यासाठी म्हणाला, "पाटील, घाबरू नका."

"आता घाबरून काय करायचं!" दादा पाटील म्हणाला, "पर जो इंग्रजांच्या डोईजड झाला, त्योच ह्यो सत्त्या हाय. जर का ह्यो गेला, तर वंशाला मानूसच ठिवनार न्हाय, हे मातर..."

या बोलण्यानं उमाला दादाची चीड आली. तो खिन्न झाला. सूर्योदयापर्यंत आपण गुमान सत्तूचं डोकं मारून मोकळं व्हावं, असा एक विचार त्याच्या मनात आला आणि दादा पाटील म्हणाला,

"सत्तूला आपून ठार जरी मारलं, तरी आपला जीव वाचत न्हाय—"

आपल्या मनातील विचार याला ऐकू गेला, की काय अशी शंका येऊन उमा चटकन उठला. त्याबरोबर हा उमा सत्तूचा खून करील, अशी दादाला भीती वाटली.

फकिरा आणि गोंधळी माणसं जमवीत बहादूरवाडीच्या गावदरीला आले होते. फकिरा आपल्या पांढऱ्या शुभ्र घोड्यावर बसला होता. साधू, सावळा, पिरा, मुरा, बळी अशी पन्नास माणसं दौडत होती. फकिराचं घोडं दुडक्या चालीवर पळत होतं. गावदरीला एक माणूस आडवा आला. त्यानं विचारलं,

"कोन चाललंय ते?"

"कोन आकाराम?" गोंदाचा आवाज ओळखून तो थांबला आणि फकिरानं घोडं उभं केलं.

मग गोंदानं विचारलं,

"हं, कसं काय? सत्तू कुटं हाय?"

"मळीला पानवठ्याच्या वरल्या शेवऱ्यात." आकाराम म्हणाला, "उमाचा इसम तालुक्याला जाताना आम्ही पकडून ठिवलाय. आम्ही आता मळीच येडलीया—"

"शाबास!" फकिरा म्हणाला, "हं, चला." त्यानं टाच मारली आणि ते सर्व पांदीनं मळीकडे निघाले. फकिरानं वास घेतला. माशांचा हिवळ वास आला. शेजारी भुयांची

घरं दिसत होती. त्यांची जाळी कुपावर वाळत पडली होती.

फकिरा सावळाला म्हणाला,

"सावळूनाना, त्यातली दोन जाळी घे अन् चल!"

ते पाणवठ्याला आले. फकिरानं आपलं घोडं किंजाळात बांधून कंबर बांधली. सावळा आणि बळी यांनी भुई होऊन, दिवटी घेऊन नदीनं वर यायचं नि बाकीच्या लोकांनी जिथं सत्तू आहे, तिथपर्यंत गुमान जायचं आणि उमा चौघुल्याच्या लोकांचं लक्ष त्या दिवट्यांकडे वळताच हल्ला चढवायचा, असा सारा बेत करून ते आपापल्या मार्गाला लागले.

रात्रीची मिठी सैल होत होती आणि जसजशी रात्र संपत होती, तसतसा उमा उतावळा होत होता. तो बावरून कानोसा घेत फिरत होता. एकाएकी नदीत खळखळाट झाला आणि उमा डाफरला,

"कबीरा?"

"जी." कबीर धावत आला.

"काय दिसलं?"

"दरड कोलमडली पाण्यात."

"दहाजणं खोपीजवळ असा, जा!" कबीरा गेला. थोड्या वेळानं सावळा आणि बळी नदीनं वर आले. त्यांच्या हातातील दिवट्या पाहून उमा चमकला. त्यानं निजलेल्या दादाला उठवलं. एवढ्यात एक इसम धडधड धावत आला.

"काय, रं? काय झालं?" उमानं विचारलं.

"मला काय तरी दिसलं." तो इसम म्हणाला.

"काय दिसलं?" उमाचा आवाज चढला आणि तो इसम म्हणाला,

"डुकार असंल—"

"मग डुकरासारखा पळतोस का?" उमा रागावला आणि त्या दिवट्या जवळ आल्या. त्यांचा गंभीर प्रकाश वारणेवर थरथरू लागला. त्या प्रकाशात झाडांच्या सावल्या झोके खाऊ लागल्या. उमानं दरडावून विचारलं,

"कोन आहे ते?"

"आमी भुई हाय." त्याबरोबर सर्वच लोक त्या दिवट्यांकडे पाहत राहिले आणि फकिरानं एकदम हल्ला चढवला. दणादण कुऱ्हाडी आदळू लागल्या. 'आलं, 'मेलो', 'धावा' — एकच दंगल उडाली. धडाधड माणसं कोसळू लागली. हातात तलवार घेऊन फकिरा चपळाईनं पुढं धावला आणि पुढं उमानं तळहातावर थुंकून कुऱ्हाड फिरवली. तो खोपीकडे मटकन निघाला आणि गोंधळी फकिराला म्हणाला,

"दाजी, उम्या आला!"

"येऊ दे." असं म्हणून फकिरानं उमावर झेप घेतली. तोच साधू ओरडला, "पाडा त्याला खाली!" मुरानं उमाला मध्येच आडवला. फकिरानं सत्तूचे दोर कापून त्याला मोकळा केला आणि आकारामानं एक कुऱ्हाड त्याच्या मुठीत दिली. ती मुठीत आवळीत सत्तू म्हणाला,

"हं, आता मागं सरा. कुठाय उमा चौघुला?"

मुरानं उमाला जखमी केला होता. दादा पाटील पायाला कुऱ्हाड लागल्यानं लंगडत माघार घेत होता आणि जेव्हा सत्तू सुटल्याचं सर्वांच्या लक्षात आलं तेव्हाच एकच पळापळ सुरू झाली. उमा आणि दादा यांनी नदीत उड्या घेतल्या. साऱ्या शेवऱ्यात उमाची माणसं पांगली. रात्री पळत्याचा पिच्छा करू नये, म्हणून फकिरानं आपली माणसं एकत्र केली. दंगल शांत झाली. फकिरा आणि सत्तू दोघे होते, म्हणून उमा पळाला, नाही तर त्यानं कहर केला असता, याची सर्वांना कल्पना होती.

सर्व लोक एकत्र आल्यानंतर सत्तूनं हातातील कुऱ्हाड टाकून फकिराला मिठी मारली आणि तो म्हणाला,

"नाईक, तुम्ही आला, म्हणून हा सत्तू वाचला. आता तुम्हाला माझ्या कैक आयाबहिनी, हा सारा वारनाकाठ दुवा देईल!"

"ह्यो दुवा देन्याचा सवाल काय?" फकिरा मांग म्हणाला, "दगडाला दगडाची गरज लागती आन् मी तर मानूस हाय!"

"अशी मानसं थोडी असतात." सत्तू म्हणाला, "तुम्ही माझ्यावर उपकाराचा डोंगरच रचला हाय. आता माझी एक विनंती—"

"काय?" फकिरा हुंकारला आणि सत्तू म्हणाला, "असंच तुमच्या मदतीला येन्याची मला संधी द्या. मी धावत येईन!" तो क्षणभर थांबला आणि पुन्हा समोरच्या वारणेवर बोट रोखून म्हणाला, "ही, ही वारनाच वळवून तुमच्याकडे आनीन!"

फकिरा काहीच बोलला नाही. ते सर्वजण नांदगावच्या रोखानं चालू लागले. नांदगावच्या गावदरीला येताच पहिला कोंबडा आरवला. ते सर्व थांबले. तिथून फकिराची वाट फुटून वेगळी होत होती. फकिराला पुढं जायची घाई झाली होती आणि '—सरीलं माझं दळण, घास घालीते शेवटला, आळविते, देवा, दे आवुक्ष सत्त्याबाला' या गीताचे स्वर सत्तूच्या कानात घुमत होते. दोघांनी एकमेकांचा निरोप घेतला.

फकिरा पुढं पश्चिमेकडं निघाला आणि पूर्वेला प्रकाशानं हालचाल आरंभली. ढगांच्या पायघड्या तुडवीत तो पुढं पुढं येऊ लागला. शुभ्र घोड्यावर बसून आपल्या घरी निघालेल्या फकिराची पाठमोरी आकृती पाहत सत्तू उभा राहिला. मग तो गोंदा गोंधळ्याला म्हणाला,

"रोज पहाटे आवुक्ष मागणारी बहीन असावी आणि भाऊ हा असा — फकिरासारखा असावा! सुदैवानं मला दोघंही आहेत. चला!"

## ८

कधी ना कधी घात होणार, या एकाच विचारानं राधाचं काळीज पोखरलं होतं. जखमी हृदयावर फकिराच्या त्या हालचालींच्या सारख्या जखमा होत होत्या. फकिरानं शांत बसावं, त्यानं कुठं जाऊ नये, त्याचे वैरी टपून बसले आहेत, ते केव्हा तरी डोकं वर काढतील, याचाच ती विचार करीत दिवस मोजीत होती.

फकिरा सत्तूची सुटका करून आला आणि दुसऱ्याच दिवशी बाबरखान फौजदारानं गावात येऊन डेरा दिला. गावातून त्याचं बोलावणं येण्यापूर्वीच मांगवाड्यात एकाएकी दंगल उडाली. आपापसात हाणामारी झाली. एकूणएक माणूस जखमी झाला. कधीही एकमेकाला शब्दानं न दुखावणारे मांग आपसात लढले, हे ऐकून गावाला आश्चर्य वाटलं आणि त्या मारामारीनं बाबरखान चरफडला. कारण बाबरखानाबरोबर उमा चौधुलाही आला होता. सत्तूची सुटका फकिरानंच केली, असा त्याचा दावा होता. नदीला रात्री झालेल्या चकमकीत एकूणएक माणूस जखमी झाला आहे, असं त्यानं बाबरखानाला सांगितलं होतं. त्या सर्व लोकांच्या जखमा पाहण्यासाठीच मुद्दाम बाबरखान आला होता. जो जो जखमी दिसेल, त्याला अटक करायची त्यानं तरतूद करून ठेवली होती.

परंतु साराच डाव उधळला गेला. आपसात मारामारी करून सर्वच मांग जखमी झाले आणि बाबरखानाची निराशा झाली. त्या रात्री सर्व मांग लोकांना बोलावणे करण्याऐवजी सर्वांना सकाळी सूर्योदयालाच चावडीवर बोलावलं. त्या वेळी दोन फळ्या करूनच मांग गावात दाखल झाले. एका फळीचा फकिरा, तर दुसरीचा सावळा हा पुढारी होता आणि सर्वच जखमी होते.

चावडीच्या कट्ट्यावर बाबरखान गुडगुडी ओढीत बसला होता. पाठीमागे एक बंदूकधारी शिपाई उभा होता. बाबर गुडगुडीचे मंद झुरके मारून, तोंड एकदम पसरून धूर सोडीत होता. त्याचा गिड्डा देह खाली बसल्यामुळं अधिकच रुंदावला होता. त्याच्या काळ्या चेहऱ्यावरील दाट भुवया, सणसणीत मिश्या, लांब दाढी आणि डोकीचे ताठ केस यांमुळे त्याची भीती वाटत होती.

सावळा एकदम पुढं झाला. त्यानं आपला जखमी उजवा हात डाव्या हातानं धरून फौजदाराला रामराम केला आणि जवळच बैठक मारली.

चावडीत विष्णुपंत कुलकर्णी, शंकरराव पाटील व इतर बडी मंडळी गंभीर चेहरे

करून बसली होती. धुराचा लोट सोडून बाबरखान समोर बसलेल्या सावळाकडे रागानं पाहत म्हणाला,

"काय रे, मी कसा दिसतो तुला? खरं सांग."

"अस्वलावानी दिसता, सरकार." सावळा उत्तरला.

त्याचं ते उत्तर ऐकून डेरा चरकला. सर्व लोक भयभीत होऊन पाहू लागले.

"तुला माझी भीती वाटत नाही?"

"न्हाय, सरकार!"

"का वाटत नाही?"

"मेल्यालं मेंढरू अग्नीला भीत नसतं, रावसाहेब!"

"खरं आहे तुझं." बाबरखान म्हणाला, "रात्री मारामारी का केली, रे?"

"मी वाईच दारू घेतली, म्हनून फकिराला राग आला. त्येनं मला काठी मारली. मग झाली जुपी." सावळानं एका दमात सारं सांगून टाकलं.

बाबरखान पुढं काहीच बोलला नाही. त्यानं पुढं कसलीच चौकशी केली नाही. दुपारी राहुटी उठवून तो रवाना झाला.

— आणि नंतर राधाला समजलं, की ती मारामारी केवळ नाटक होतं. वारणेच्या काठी मळीला झालेल्या जखमा पाहून आपण अडकू, म्हणून फकिरानं मुद्दाम मारामारी केली होती. त्या प्रसंगाची आठवण होऊन राधा बेचैन झाली.

गावातील आयाबाया राधाला सल्ला देत, 'फकिराचं लग्न करून टाक. सर्वात मोठा उपाय हाच आहे. एकदाचं लग्न झालं, की हा सुतासारखा सरळ होऊन प्रपंच करू लागेल.' पण ते राधाला पटत नव्हतं, कारण त्याच्या बापाचा — राणोजीचा — इतिहास ती विसरली नव्हती. पेढ्याची पुडी कमरेत खोचून त्यानं जीव दिला होता. त्याचीच अवलाद! त्याचं लग्न झालं काय, न झालं काय सारखंच.

पंधरा दिवस झाले आणि एके दिवशी चिंचणीकर पिराजी आला आणि राधाला म्हणाला,

"आक्का, तू बारा वर्सं गाव सोडून कुठं गेली न्हाईस. एकदा चल चिंचणीला, न्हा चार दिस नि ये मग!"

"न्हाय, रं, बाबा." राधा म्हणाली, "घरात आत्या हायती. त्येंच्यानं काम व्हत न्हाय नि या घरात भूत नाचतंय, त्येला कुटं सोडू?"

"त्येची नकं काळजी करू." पिराजी म्हणाला, "तू आत्याला बी घे संगं नि चल. फकिराची काळजी करू नकं. त्या भुताला मी मंतीर मारतो."

पिरानं फारच आग्रह केला आणि एक चाकोरीत कैक वर्षं काढून कंटाळा आलेली राधा चिंचणीला गेली. ती राहीलाही घेऊन गेली.

ऐन डोंगराच्या पायथ्याला परबती मांगाचं घर होतं. अगदी सह्याद्रीच्या कवळ्यातच चिंचणी वसली होती. सभोवतालची घनदाट झाडी, उंच डोंगर, बाजूला असलेलं कुरण — राधाला ते सारं नवंनवंच वाटलं. त्यात परबतीचा संसारही नेटका होता. पिराजी, त्याची बायको, एक मूल आणि नुकतीच वयात आलेली पिराजीची बहीण सरूबाई. साठ वर्षांचा म्हातारा परबती आणि म्हातारी. ही सारी माणसं कशी एका माळेत ओवलेल्या मण्यांसारखी वागत होती.

दोन दिवस सरूबाईची आणि राधाची चांगली ओळख झाली. फकिराची आई म्हणून परबती मोठ्या आदरानं तिच्याकडे पाहू लागला. एकदा दोनदा तो बोलता बोलता बोलूनही गेला,

"बाई, तू साधी न्हाईस — तू एका वाघाची आई हाईस!"

हे ऐकून राधाच्या अंगावर मूठभर मांस चढल्यासारखं झालं. फकिराबद्दल तिला अभिमान वाटू लागला.

परबतीचा तो संसार, ते घर, पिराजीचं मूल हे सारं पाहून राधाच्या मनात नवाच विचार घोळू लागला — जर फकिराचं लग्न केलं, तर त्यालाही मूल होईल. तोही संसाराला लागेल आणि आयाबाया सांगतात, तसंच का होणार नाही? लोक म्हणतात, स्त्री ही पुरुषाची वेसण असते. मग आपण फकिराला —

राधाला सरूबाईचा गोड स्वभाव, रंगरूप, सर्व काही पसंत पडलं. ही सरू आपली जर सून झाली, तर उभ्या गावात उजवी ठरेल, असा विचार करून एके दिवशी तिनं पिराजीला बाजूला नेऊन आपला हेतू सांगितला.

"पिराजी, एक गोष्ट बोलू?"

"आक्का, इचारू नगं. मला माग." पिराजी म्हणाला, "माझं डोस्कं कापून पायावर ठिवीन मी!"

"नगं मला डोस्कं तुझं." राधा म्हणाली, "मला सरू देऊन टाक! मी फकिराचं लगीन करत्ये."

"तुला सून पटली!"

"हो. मला पटली."

"रंगानं-रूपानं, गुनानं!"

"साऱ्यानं — साऱ्यानं, बाबा..."

"मग लगीच घेऊन जा नि लाव लगीन बरं!"

"म्हंजी तू नामानिराळाच. बरा हाईस की!"

"मग मी काय करू, ते सांग."

"तू ह्या लग्नात काय करनार?"

"काय करू? बोलिवलंस, तर पोळ्या खाईन..."

"म्हंजी माज्या आयत्या पोळ्या खानार तू?"

"मग सांग, काय, करू त्ये!"

"लग्नाचा तू किती खर्च करनार?"

"लगीनच करून देऊ!"

"न्हवं. लगीन माझ्या दारात झालं पाहिजे."

"मग सारं सामान घेऊन येतो नि तितं करतो."

"मग जमलं." राधा हरखून म्हणाली, "बाबास्नी इचार सांजंला."

"त्येला काय इचारायचं?" पिराजी म्हणाला, "ही बातमी ऐकून आबा टिरीनं ढोलकं वाजवील. तयारी कर. सारं लागंल, त्ये गाडीत भरीत चल. नवरी तुझी. नवरा तुझा. हे घर बी तुझं!"

राधाचा आनंद गगनात मावेनासा झाला आणि जेव्हा संध्याकाळी ही गोष्ट परबतीला व इतरांना समजली, तेव्हा सर्वांचे चेहरे हर्षानं मोहोरलं. सरू लाजून चूर झाली.

फकिराचं लग्न निश्चित करून राधा जलदीनंच परतली. फकिराच्या कपाळाचं बाशिंग आपण आता लौकरच पाहणार, या गोड विचारात त्या सासू-सुना देहभान हरपल्या होत्या. आता आपण सासू नि आजेसासू होऊन सून आणि नातसून दोघी आपल्या हाताखाली घेणार — केवढं हे आपलं नशीब! या कल्पनेनं राहीबाई मनातल्या मनात हसत होती.

राधाबाई नि राहीबाई दोघी कऱ्हाडला आल्या. पिराजी त्यांना पोचवण्यासाठी गाडी घेऊन निघाला होता. तो बैलांना सारखा दाबीत होता. ऐन दुपारी त्यानं कृष्णा गाठली आणि भाकरी खाण्यासाठी वाळवंटावर गाडी सोडली.

कृष्णाकाठच्या आंबराईत दूरदूरचे वाटसरू बसले होते. कोण जेवण करीत होते, कोण चुली पेटवून पीठ मळत होते, तर कोणी भाकरी खाऊन सावलीत आराम करीत होते. राधा, राही, पिराजी यांनी दुपारचं जेवण त्या सावलीत उरकलं, त्याच वेळी दूर कुठं तरी तापसरीचा भयंकर रोग आला असून मुंगीप्रमाणं माणसं मरत असल्याचं ते वाटसरू एकमेकांत बोलताना राधानं ऐकलं आणि तिचं काळीज चरकलं. एक-दोन

दिवसांच्या तापात माणूस मरतं, हे ऐकून तर तिला भलतीच भीती वाटली. फकिराच्या लग्नाच्या कल्पनेनं मोहरलेलं तिचं मन ही तापसरीची बातमी ऐकून काळवंडलं, ती खिन्न झाली. तिला त्या आंबराईत बसवेना. तिनं पिराजीला सांगून गाडी जुंपली आणि घर जवळ केलं.

आली आली म्हणता कार्तिकी पौर्णिमा आली. सर्वत्र तुळशीची लग्नं लागली आणि मग लग्नसराई सुरू झाली. पहिलीच तिथी धरून राधानं फकिराचं लग्न उरकून घेतलं. भोवतालच्या वीस गावात कुणाचं झालं नसेल, असं फकिराचं लग्न झालं. इंग्रजी लष्कराला हुलकावण्या देत स्वत: सत्तू दोनशे माणसांसह लग्नाला आला होता. त्यानं सुरती रुपयांनी नवरानवरीची ओटी भरली. उभा गाव फकिरावर तांदूळ टाकायला राधाच्या दारात आला. स्वत: विष्णुपंत, शंकरराव पाटील ह्या मंडळींनी देखरेख केली आणि त्या वेळी प्रत्येकाच्या डोळ्यांपुढं माळानं गबऱ्याला घेऊन दौडत येणारा राणोजी तरळला. दौलती आणि राहीबाई यांनाच वरबाप-वरमाईचा मान मिळाला. त्यांनीच मळवट भरला. राधा विधवा होती, परंतु ती आनंदात होती. तिला कुंकवाचं दु:ख वाटत नव्हतं.

सावळा तर मुख्य कारभारी होता. घमांडी, मुरा, बळी, साधू ही मंडळी आलेल्या पाहुण्यांची उस्तवारी करीत होती. फकिराच्या कपाळी पाच दिवस बाशिंग ठेवायचं, असा राधाचा निर्धार होता.

नवरा-नवरी बरोबर गेली. सर्व थोरांना मान दिला आणि लग्न संपलं.

आपण एक महान कार्य पार पाडलं, असं राधा, दौलती, राही यांना वाटलं. दौलती नि राहीबाई यांनी बोलून दाखवलं,

"आता फकिराचं बाशिंग ह्या डोळ्यांनी बघितलं, आता ह्ये कवाबी झाकू दे. आम्ही तयारी केलीया—"

कार्तिक महिन्यापासून वैशाखापर्यंत सहा महिने फकिरा घर सोडून कुठंही गेला नाही. राधाचं काळीज डोंगराएवढं झालं. लग्नाला आलेली सरूबाई चारच दिवस माहेरी जाऊन लगेच परत आली होती. ती राधाला काहीच काम करू देत नव्हती. सारं घर एकटीच आवरीत होती. त्यामुळं आम्ही जे पूर्वी कष्ट काढले, त्यासाठी आता देवानं आम्हाला सुखच द्यायला विचार केला आहे, असं राधा, राहीबाई, दौलती यांना वाटू लागलं होतं; परंतु आता साधूवरही चार तांदूळ पडलेले पाहावे, हा विचार काही त्या तिघांना सोडीत नव्हता.

सहा महिन्यांपूर्वी दूर कुठं तरी चालू झालेली तापसरी आता अगदी जवळ आल्याची बोलवा सुरू झाली होती. लोक काजबारले होते. मरणाच्या भयंकर कल्पना त्या खोऱ्यातून प्रत्येक माणसाच्या मनात नाचत होत्या. त्यातच गावंच्या गावं, घरंच्या घरं बसल्याच्या कथा एक दुसऱ्याला सांगत होते.

— आणि ते खरंही होतं. ती साथ अति उग्र स्वरूप धारण करून इंच इंच जमीन व्यापीत पुढं पुढं सरकत होती आणि गावात साथ पसरताच भरला संसार जिथल्या तिथं टाकून लोक सैरावैरा पळत होते. जणू त्यांच्यासाठी भयंकर वणवाच लागला होता. जो पळत नव्हता, तो निश्चित मरत होता. शंभरात फक्त दहाच कशीबशी वाचत होती. मरणारांना पुरण्यासाठी माणसं उरत नव्हती. घरातील सर्वच माणसं एकदम तापसरीचं भक्ष्य होत होती. मग त्या घरात कोण मरण पावला, हे पाहण्यासाठीही कुणाला शुद्ध उरत नव्हती.

या भयंकर साथीची बातमी ऐकून राधाचं काळीज पुन्हा चरकलं. दौलती हबकला. राहीबाई घाबरली आणि त्या तिघांच्याही पुढं एकच प्रश्न नाचू लागला.

"—आम्ही कुसळं वाढवून मेरू घडवला; पण आता ह्या तापाच्या साथीत तो मेरू टिकाव धरणार का?"

ही साथीची भयंकर भीती पाठीवर टाकून माणसं कसा तरी धीर धरत होती; परंतु पुन्हा दुसऱ्या एका तितक्याच भयंकर संकटानं मानवावर आक्रमण सुरू केलं—

ज्येष्ठ महिना मागं गेला. मृग नक्षत्र निघालं. माणसांनी चपळाई करून आपापल्या जमिनी पेरून टाकल्या आणि येणाऱ्या साथीला तोंड देण्यासाठी मनाची तयारी केली.

आकाशात ढगांनी प्रचंड धडपड केली. अक्राळविक्राळ ढग गगनात जमले व लगेच लोळत दूर निघून गेले. एकही थेंब पृथ्वीवर पडला नाही. मृग नक्षत्र कोरडं ठाण निघून गेलं. मृग नक्षत्रानं दगा दिला; पण पुढील नक्षत्र काही असंच कोरडं जाणार नाही, असा विचार करून माणसांनी कोलमडणाऱ्या मनाला आशेचा धीर दिला, पण...

पण दुसरंही नक्षत्रं आलं तसंच गेलं. मग मात्र हाहाकार उडाला. आषाढ कोरडा गेला नि धूळ उडू लागली. वळवानं उगवलेली गवतं मातीत एकरूप झाली. मातीत पेरलेलं बी पाखरांनी उकरून खाऊन त्याचा माग बुजवला आणि भयंकर दुष्काळ सुरू झाला.

सुंदर प्रदेश भकास झाला. एक भयंकर आग सर्व काही जाळून जावी, तशी स्थिती झाली. माणसं हंबरू लागली. गुरं हाडं-चिंध्या खाऊ लागली.

रोग, दुष्काळ आणि मृत्यू हे हातात हात घालून सर्वश्रेष्ठ मानवतेला चिरडीत निघाले आणि मृत्यूचं उग्र तांडव वाटेगावच्या समीप आलं. उपाशी माणसांवर साथीनं सहज कबजा केला. घरच्या घरं कण्हू लागली. दुष्काळानं केवळ हाडांचे सापळे केलेली माणसं

गारद करायला मृत्यूला सोपं झालं.

वाटेगावात माणसं मरू लागली. दाही दिशांना अंधार दाटला. लोकांना वालीच उरला नाही. सुरुवातीला मसणवटात काही चिता जळाल्या; पण लवकरच लाकडांची टंचाई आली आणि मग मढी मातीआड करण्याचीच सर्वांवर पाळी आली; परंतु लौकरच तोही प्रश्न बिकट झाला. दुष्काळातील उपासमारीनं अस्थिपंजर झालेल्या माणसांना दुसऱ्यासाठी खड्डा खणणं अवघड झालं. मग एका एका गोरीत बसतील तितकी मढी गाडली जाऊ लागली.

— आणि मग डोंगरातील कोल्ही, लांडगे यांनी गावदरीलाच तळ दिला. वैरण न मिळाल्यामुळे मेलेली गुरं खाऊन गावची कुत्री माजली आणि सर्वत्र कोल्ह्या-कुत्र्यांचं राज्य प्रस्थापित झालं.

उभा मांगवाडा साथीनं कण्हत पडला होता. जे कोणी उभे होते, ते पोटासाठी धडपडत होते. म्हातारी टाचा घासून खळ्या खणीत होती आणि राधाबाई व सरू घरी दाणे दळून घरोघर तरवणी पुरवीत होत्या. आजाऱ्यांची सेवा करीत होत्या. जे काही जवळ होतं, ते शेवटपर्यंत मांगवाड्यात सर्वांना चारून मग एकदम आपण सर्वच उपाशी मरायचं, असा त्या दोघांनीही निर्धार केला होता.

— आणि फकिरा, सावळा, साधू, मुरा मरणारांसाठी गोरी खणून हैराण झाले होते. एकट्या मांगांचीच नव्हे, तर उभ्या गावाची मढी पुरण्याचं काम त्यांच्याकडे आलं होतं. मरणानं जातिभेद नष्ट केला होता.

दुपारची वेळ होती. वातावरण तप्त झालं होतं. फकिरा नुकताच येऊन बसला होता. सरू व राधा याही आल्या होत्या. दौलती व राहीबाई एका जागी बसून कोण कोण मेलं, याची चौकशी करीत होते. इतक्यात मोक्या आला. म्हणाला,

"दाजी हाय काय?"

"हाय — या?" फकिरा म्हणाला.

"आता कशाला येऊ? चिंगा म्हातारी गेली—"

"मग चला तर—" असं म्हणून फकिरा उठला.

सर्वांनी चिंगा म्हातारीला मातीआड केलं आणि ते परत फिरले. वाटेत चालता चालता मुरा म्हणाला,

"दाजी, ही म्हातारी जगली असती."

"मग तिला का जीव नकोसा झाला?" सावळानं खवचटपणं विचारलं आणि मुरा म्हणाला, "अन्नावाचून मानूस मरतंय—"

"म्हंजी कसं?" फकिरा हुंकारला व मुरा म्हणाला, "मांगवाड्यात आज या घडीला चिपटंभर दानं न्हायती! माज्यानं हे हाल बघवंना—"

"मग काय करायचं?" फकिरानं विचारलं.

"काई करता येत न्हाई!" मुरा उद्गारला.

बोलत बोलत ते सर्व पांदीला आले आणि मांगवाड्याकडे वळून चालू लागले. मध्येच थांबून फकिरा म्हणाला,

"तुम्ही जावा आणि एकूण एक माणूस जमून बसा! मी गावात जाऊन येतो."

असं म्हणून तो झरकन पांदीनं गावाकडं निघाला. त्याची सर्व गात्रं बधिर झाली होती. तो विष्णुपंत कुळकर्ण्यांच्या वाड्यापुढं कधी आला, ते त्याच्या लक्षात आलं नाही. समोर वाडा पाहून तो एकदम भानावर आला.

काळोखानं विष्णुपंतांचा तो प्रचंड वाडा गिळंकृत केला होता. सर्वत्र अंधारानं आपलं अस्तित्व प्रस्थापित केलं होतं. गावात हूं की चूं होत नव्हतं. मधून मधून एखाद्या घरी रडण्याचा हलकल्लोळ उसळत होता, पण रडणाऱ्यांनाही रडण्यासाठी तकवा नव्हता. क्षणभरच ओरडून मग पुन्हा सर्व काही शांत होत होतं. मध्येच कुत्री दीर्घ सूर काढून रडत होती, त्यामुळं गावात भेसूरता अधिक उग्र होत होती.

फकिरा वाड्याच्या ढेलजेत येऊन थांबला. देवळीत जळणाऱ्या निरांजनाचा मंद प्रकाश त्याच्या मजबूत देहावर थरारला. फकिरानं हाक मारली,

"आबासाहेब—"

"कोण, फकिरा?" पंत गडबडीने मधल्या अंगणात आले. पंतांच्या वयानं आता साठी गाठली होती, पण त्यांचा धिप्पाड देह अजून दणदणीत होता. प्रचंड मस्तकावरचं टक्कल, रुंद गर्दन, टपोरे डोळे आणि पल्लेदार शुभ्र मिश्या यामुळं पंत एखाद्या ढाण्या वाघाप्रमाणं दिसत होते. त्यांचा आवाजही गुहेत वाघ गुरकल्याप्रमाणं गंभीर होता.

फकिरा पुढं होऊन एकदम पंतांपुढं थांबला. त्यानं आपले कठीण, मजबूत हात पाठीमागं धरले होते. त्याचे रसरसणारे डोळे पंतांवर स्थिरावले. त्याचा रुबाबदार चेहरा घामानं डबडबला. तो मनातल्या मनात शब्द शोधू लागला; पण पंतांनीच सुरुवात केली,

"मांगवाड्यात आणि महारवाड्यात काय चाललं आहे?" त्यांच्या करारी नेत्रांत चिंतेचा भाव तरळला.

देवळीत जळणाऱ्या निरांजनाकडे पाहत फकिरा म्हणाला,

"मांगांम्हारांचा वंशच उरत न्हाय, आबा!"

"आतापर्यंत किती माणसं दगावली?"

"चार दिसांत बारीक-मोठी ईस." फकिरा पुटपुटला. त्याचे शब्द अंधारात चडफडत गेले.

"मग तुझं म्हणणं काय आहे?" पंतांनी पुन्हा प्रश्न केला.

फकिरा ओठांवरून कोरडी जीभ फिरवीत म्हणाला,

"भाकरी भाकरी करून पोरांचं चरफडून मरनं आणि त्यांचा तो हंबरडा आता माझ्यानं ऐकवंना. ढेकळावाणी काळीज इरगाळतंय माझं."

फकिराच्या पापणीत देवळीतील त्या निरांजनाच्या प्रकाशाचे कण लोंबकळू लागले आणि त्यानं गरकन मान फिरवून आसू दडवले.

"तसं नाही—" पंत समजावणीच्या सुरात म्हणाले, "धीरानं घ्यायला पाहिजे आता, फकिरा."

"आबा—" फकिराच्या काळजातून कण्हत बोल आला, "मांग-म्हार भोपळीचा नि करडूचा पाला खाऊन जगतोय, पण जमंना. नुसती उपासमार असती, तर पोट बांधून काळीज शाबूत ठिवलं असतं; पण ह्य साथीनं कडेलोट केलाय आमचा—" फकिरानं पुढचे शब्द गिळून घेतले आणि पंतांकडे पाहिलं.

पंतांनी पुन्हा तोच प्रश्न केला,

"मग आता पुढं काय?"

पंतांचा धीरगंभीर आवाज वाड्यात घुमला आणि फकिरा मंद स्वरात म्हणाला,

"तुमीच सांगा!"

"मी? मी काय सांगू? गाव दुष्काळाच्या दाढेत आहे, हे मी सरकारात कळवलं आहे; परंतु टीचभर चिठ्ठीनं त्याचं उत्तर नाही आणि मी म्हणजे केवळ मृतांची नोंद करणारा झालो आहे."

"मग आमास्नी धनी कोन?" फकिराचा स्वर वैतागला.

"कोण कोणाचा धनी नाही!" पंत चटकन बोलून गेले, "माझ्याही भोवती आक्रोश सुरू आहे, मी संकटात आहे; परंतु माझं स्पष्ट मत आहे, की तुम्ही जगलंच पाहिजे! मरणापेक्षा आज जगणं हे महत्त्वाचं आहे."

"पन, आबा, कसं?" फकिरा अधिकच चिडक्या सुरात उद्‌गारला.

"जसं जमेल, तसं!" पंत खटकन बोलले, "काहीही करा, पण जगा!" त्यांनी झेप घेऊन, निरांजनाची वात वर करून मोठा प्रकाश केला. प्रकाशाची पाचर अंधारात खोल गेली अन् अंधार थरारला.

"मग आम्ही काय करावं?" फकिरानं गोंधळून पुन्हा प्रश्न केला आणि पंतांचा चेहरा बिथरला. त्यांच्या आवाजात अधिक कडवटपणा आला.

"ते मला कळत नाही." पंत गळ्यातील जानव्याला करकचून तिढा देत म्हणाले, "तुम्ही कुत्र्यासारखं मरू नका! हेही दिवस जातील—"

पंतांच्या मुखातून शब्दांऐवजी निखारेच बाहेर पडले आणि फकिराच्या अंत:करणात धैर्याचा महासागर लाट उसळीत उठला. त्यानं पंतांपुढं हात टेकला आणि तो उठून म्हणाला,

"आबा, मी जातो!"

"जा. उकिरड्याचा पांग फिटतो आणि तुम्ही तर माणसं आहात, माणसं— " पंतांनी फकिराला निरोप दिला.

काजळी झाडताच ज्योत प्रखर व्हावी, तद्वत फकिराचं मन उजळलं. गगनाला गवसणी घालण्याची प्रबलता त्याच्या छातीत निर्माण झाली. त्याच्या तरुण पायांत विजेप्रमाणं हिंमत संचारली. तो चिखल तुडवावा, तसा अंधाराला तुडवीत, बेभान होऊन मांगवाड्याकडे विद्युतगतीनं निघाला.

'तुम्ही जगलंच पाहिले!' हे पंतांचे शब्द त्याच्या डोकीवर घण घालीत त्याच्याबरोबरच धावत होते. त्या शब्दांचं काहूर उठलं होतं आणि ते जणू फकिराला लोटीत सुटलं होतं.

मांगांची आणि महारांची ती दोनशे घरं त्या काटेरी निवडुंगाच्या कड्यात गांगरून बसली होती. गंभीर शांतता नांदत होती. वाऱ्याच्या झपाट्यानं ते निवडुंग करकरत होतं. जणू काही वातावरण दाणेच खात बसलं होतं. मध्येच एखादं घुबड घूत्कार करून भीतीला उठवीत होतं. तिथं माणसाचं अस्तित्व नि शब्द त्या काट्यात रांगत होते. फकिराच्या दारापुढच्या लिंबाखाली जेवढी उभी माणसं होती, तेवढी जमून फकिराची वाट पाहत होती. या निकराच्या समयी पंत काय सांगणार हे ऐकण्यासाठी त्यांची मनं उत्सुक झाली होती.

जे अगदी जेर झाले होते नि भुकेनं वाकले होते, ते मनात म्हणत होते,

'पंतांच्या मनात देव शिरावा आणि त्यानं पंतांना सांगावं — ह्या गरीबांस्नी दे घरात असंल नसंल, त्ये...'

तर कोणी अंधारात फकिराच्या वाटेकडं रोखून पाहत अंदाज बांधीत होते —

फकिरा येताना पंचवीस पोती जोंधळे घेऊन यावा. फकिराचं पंतांवर भलतंच वजन आहे. पंत फकिराचा बोल वाया जाऊ देणार नाहीत आणि या वेळी पंत नक्कीच मांग-महार मरू देणार नाहीत.

असे नाना तर्क करीत माणसं फकिराची वाट पाहत होती. त्यांच्या डोळ्यांतील बुबळं कार्यक्षम झाली होती. मनं सारी दु:खं विसरली होती. पंत काही तरी करतील, या एकाच आशेनं त्यांच्या रक्तबंबाळ मनांना हुरूप आला होता. आपला निर्वंश होणार, ही भीती पार विसरून आता ते अंधारातून त्यांच्याकडे येणाऱ्या धान्याच्या पोत्यांचा हिशेब करीत होते.

इतक्यात अंधारातून एक धिप्पाड आकृती प्रचंड काठी टेकीत, अंगावर घोंगड्याची खोळ घेऊन त्या झाडाकडे येताना सर्वांना दिसली. 'आला फकिरा! —' असं मनात म्हणून सर्वच सरळ बसले. ती कानांची कवाडं खाडकन उघडली गेली; परंतु दुसऱ्याच क्षणी ते निराश झाले. ती आकृती त्यांच्याजवळ येताच तो फकिरा नव्हे, हे लक्षात येऊन कुणी तरी विचारलं,

"कोन हाय?"

"मी तायनू म्हार हाय, गा."

अंधारात सर्व वळवळ झाली. पुन्हा स्वर नरमाईनं कण्हले,

"काय, तायनुबा, कसं?"

"सारीच माणसं वळीनं निजवून आलोय." तायनू गंभीरपणे म्हणाला आणि बहिरूनं विचारलं, "म्हाताऱ्याचा ताप उतरला का?"

"ह्या तापाला औशिदच न्हाय." सावळाचा आवाज चरफडत आला.

तायनू म्हणाला,

"या तापावर एकच औशिद हाय—"

"कंचं? कंचं?" जवळजवळ सर्वांनीच तो प्रश्न एकदम विचारला आणि मग तायनू महार म्हणाला, "भाकरी!"

भाकरीचं नाव ऐकताच सर्व पुन्हा खिन्न झाले. त्यांचं जगणं-मरणं भाकरीत होतं आणि तीच त्यांना मिळत नव्हती — नव्हे, दिसत नव्हती. केवळ कोरडी भाकरी मिळावी, यासाठी ती माणसं चरफडत होती.

एवढ्यात फकिरा आला. त्याबरोबर सर्वांनी कान टवकारले. त्यांचे चेहरे गंभीर झाले. पटकुरं झटकून काहीजण किंचित पुढे सरकून बसले. मग सर्वांनी आपले नि:श्वास रोखून धरले. सर्व डोळे फकिरावर स्थिर झाले आणि लिंबाच्या मुळीवर बैठक मारून फकिरा म्हणाला,

"हं, बोला, गा!"

तायनू महार पुढं सरकत शांतपणे म्हणाला,

"काय म्हनलंत पंत?"

"त्येंनी जगाय सांगितलंय." फकिरा म्हणाला.

"पन कोरड्या बोलानं आम्ही कसं जगायचं?" सावळा बसल्या जागचा उठून बोलला आणि जरा पुढं येऊन पुन्हा बसला.

"खरं हाय त्ये." फकिरा म्हणाला, "आपून नि कुळकर्णी एकाच वाटंवर वाटचाल करतोय. मातर फरक एवढाच, की आपून आधी पोचनार नि पंत वाईच मागनं त्याच जाग्यावर येनार! म्हंजी मरनार — आलं का ध्येनात?"

"मग आमची वाट काय?" मुरा उद्गारला.

"म्हंजी आमी मेलं पायजे!" किवंडा हरी महार ओरडला.

"न्हाय! आमी जगलंच पायजे!" फकिरा खेकसला.

"आरं, पर कसं?" सावळानं मान वाकडी करून विचारलं.

कोंडी महार खांद्यावर ताऱ्या घेऊन उभा राहिला. त्यानं हात जोडून विचारलं,

"पांडुरंगा, इठ्ठला! माजी दोन पोरं घडीची सोबती हायती. त्येंच्या पोटात आज दोन दिवस शिपीभरबी तरवणी न्हाय. आता मी काय करू!"

"मी म्हनंन तसं करा!" फकिरा ताडकन उठून ओरडला.

"काय करू? – बोला, दाजी." सर्व कंठातून एकच प्रश्न बाहेर पडला आणि त्या सर्व गोंगाटावर मात करीत फकिरा म्हणाला, "पंतांनी सरकारात आर्ज केलं, पन सरकार उत्तर देत न्हाय. मारुतीवानी तोंडाची मानसं बघून आमास्नी वाटलं, ह्ये मारुतीच्या वंसाचं राज हाय. पर आता मातर असं वाटतं, की ह्ये कुंभकर्नाच्या अवलादीचं राज हाय. आपून तलवार घेऊनच ह्यंच्या उरावर नाचलं पायजे!..."

'आपून तलवार घेऊनच त्येंच्या उरावर नाचलं पायजे!...' हे फकिराचे निर्वाणीचे शब्द त्या काळोखाचं ऊर चिरीत दूर गेले. फकिरा चपळाईनं घरात गेला. त्याच्या पाठोपाठ राधा, दौलती, राहीबाई, सरूबाई हीही घरात गेली. फकिरा त्वेषानं पेटला होता. त्यानं देव्हाऱ्याकडे झेप घेऊन ती तलवार हाती घेतली. हीच तलवार धरून राणोजी शिगावच्या भर जत्रेत निर्भय झाला होता! हीच तलवार धरून फकिरानं खोताचा हात तोडला होता!

फकिरानं मग आईच्या पायांवर डोकं ठेवलं. राहीबाई आणि दौलती यांच्या कृश पायांना मिठी मारून, सद्‍गदित होऊन तो म्हणाला,

"आई, थोरले आई! – आबा. मी मरून ही मरनारी मानसं जगवनार! मला अडवू नका–" मग त्यानं सरूबाईच्या पाठीवरून हात फिरवून म्हटलं, "हबकू नगं. संभाळ सारं–" आणि तो बाहेर आला.

त्याच्या हातातील ती नंगी तलवार बघून सर्वांच्या छातीत हत्तीचं बळ खवळून उठलं. क्षणभर हालचाल झाली. फकिरा एक एक नाव उच्चारू लागला– "साधू, बळी, मुरा, केरू, सावळूनाना, घमांडी, तायनू महार, केसू महार, सुकाना, भाना... आनि ज्येच्या पायांत बळ नि उरात हिंमत असंल, त्येनं एका बाजूला निघावं!"

त्याचा हुकमी आवाज ऐकणाऱ्याच्या उरात शिरू लागला आणि प्रत्येक हृदयातून हुंकार निघू लागला.

घोंगावत आग्या मोहोळ उठावं, तद्वत दीडशे माणसं उठून बाजूला झाली. अंगात त्वेष चढून बेभान झालेल्या सावळानं डोकीवरचं घोंगडं, हवेत भिरकावून शड्डू ठोकला,

"उभं ऱ्हाऊ नगा. हत्यारं घ्या. हत्यारं उपाशी मरत्यात!"

फकिरा म्हणाला,

"हो, हत्यारं घ्या!"

क्षणभर धावपळ झाली. कुऱ्हाडीचे दांडे ठोकून बसले. तलवारी झळझळल्या. मग म्हाताऱ्याकोताऱ्यांना उद्देशून फकिरा म्हणाला,

"आम्ही येईपातुर तुम्ही मढ्यांस्नी पानी पाजून जतन करा. उद्या सकाळी अन्नाचा

हतं ढीग लावतो. घाबरू नका!''

आकाशात गडद काळोखात दोन चांदण्या मंद लुकलुकत होत्या. त्यांचा चोरटा प्रकाश फकिराच्या तलवारीच्या पात्यावर पडून ती तलवार उग्र भासू लागली. फकिरानं आकाशात दृष्टी रोखून रात्रीचा अंदाज घेतला आणि तो चालू लागला. त्याच्या पाठीमागं दीडशे हत्यारं चकाकत निघाली. उरलेली माणसं आपापल्या घराकडं गेली.

''गबऱ्याला तरी घेऊन जा!'' राधा काळीज कठीण करून म्हणाली आणि खटकन थांबून फकिरा उत्तरला, ''नगं, त्येला आताची दौड निभनार न्हाय. त्यो थकलाय—'' त्याबरोबर गोठ्यात गबऱ्या खेकाळला. त्याच्या त्या खेकाळण्याचा आवाज त्या निवडुंगात निनादला. राधाचं काळीज निर्धास्त झालं. जणू गबऱ्यानं 'घाबरू नको — फकिरा विजयी होऊन येणार' असा तिला धीरच दिला.

गावाबाहेर पडून माळाला लागल्यानंतर सावळानं आपली चाल वाढवून ती फकिराशी जुळविली आणि त्याच्या पार खांद्यापाशी तोंड नेऊन तो म्हणाला,

''दाजी, आपून कुटं जायचं?''

''माळंवाडीच्या मठकऱ्याला लुटाया!'' फकिरा उद्गारला आणि वादळाप्रमाणं समोर पाहत धावत निघाला. मग सारेच धावू लागले.

त्यावेळी माळंवाडी शांत होती. कोपीत एखादा म्हातारा बसावा, तशी ती डोंगराच्या खोऱ्यात बसली होती. तिच्या डोकीवर ती काळी रात्र नाचत होती. गावाच्या एका टोकाला तो मठकऱ्याचा चिरेबंदी वाडा वाळीत टाकल्याप्रमाणं फटकून उभा होता. त्या वाड्याच्या त्या चिरेबंदी भिंतीवर अंधार टकरत होता.

फार पूर्वी एका राजानं एका पुजाऱ्याला एका प्राचीन मठाची देखरेख ठेवण्यासाठी चौदा गावं इनाम दिली होती. तेव्हापासून आजपर्यंत त्या चौदा गावांच्या इनामावरच त्या मठाचा खर्च चालला होता; परंतु त्या चौदा गावांच्या जमिनीसाठी नि त्या दौलतीसाठी त्या गावात भलतीच होड लागून आजपर्यंत कैकांचे खून पडले होते. एक दुसऱ्याचा खून करून त्या मठाच्या मालकीसाठी आपल दत्तक घालीत होता. आजही त्या प्रचंड वाड्यात पाच मालकिणी आपलं रांडपण रेटीत होत्या. तिथं पेवात किडे नांदावे, तशी भाणसं नांदत होती.

मठकऱ्याच्या त्या चौसोपी वाड्यात प्रत्येक खांबाला दाण्याची एकएक कणगी उभी होती. कैक पेवांत धान्य सडत होतं. बाहेरच्या त्या कणगी सारख्या लावून खांबांशी जखडून उभ्या केल्या होत्या. जागोजाग शिकारी कुत्री खुरमुंडी घालून निजली होती. प्रत्येक कुत्र्यापाशी एक एक चाकरीचा गडी हत्यारबंद पडला होता. त्या विस्तीर्ण

वाड्याच्या मधल्या अंगणात पलंग टाकून तो मठकरी निवांत निजला होता. सोप्यात शेकडो गुरं दावणीला रवंथ करीत होती. तिथं निर्भय निजणाराच्या घोरण्यानं रातकिडे भयभीत झाले होते. चौदा गावांचं धान्य नि जीवन पोटात घेऊन तो दगडी वाडा सुस्कारे टाकीत होता.

— आणि त्याच वेळी त्या दगडांना फकिराचे हात भिडले होते. दीडशे लोकांनी गावाची नाकेबंदी करून मठ आणि गाव यांच्यामध्ये पाचर मारली होती. सावळा, बळी, मुरा यांनी पहिला आडणा मारायचं काम पुरं केलं होतं. गावची मुख्य वाट साधूनं दाबली होती.

हातात ती तलवार घेऊन फकिरा वाड्यात शिरण्यासाठी उतावळा झाला होता.

सर्वत्र शांतता नांदत होती. जणू वादळापूर्वीची ती शांतता प्रस्थापित झाली होती.

## ९

माळंवाडीची मठकरी पलंगावर पडून घोरत होता. मध्येच त्याच्या तोंडाची मचमच होत होती. आपल्याभोवती एक महासंकट विळखा घालीत आहे, याची त्याला मुळीच जाणीव नव्हती.

बाहेर सावळा आडणा मारायचं काम वेगात करीत होता. त्यात त्याला ते कार्य कसलाही आवाज न होऊ देता पार पाडायचं होतं. आडणा मारून आत शिरण्यापूर्वी दंगल होणं हे हुकमी पराजय होण्यासारखं असतं, याची त्याला कल्पना होती. म्हणून तो आपलं कार्य जलद पण काळजीपूर्वक करीत होता.

— आणि फकिरा हातात तलवार घेऊन नाचत होता. त्याचं मन वाड्यात शिरण्यासाठी उत्सुक झालं होतं. सर्व कार्य पार पाडून सूर्योदयाच्या आत आपण आपल्या घरी गेलं पाहिजे आणि त्या बेतानं हा कार्यभाग उरकावा, असं त्याला वाटत होतं, म्हणून तो एकसारखा म्हणत होता,

"सावळूनाना, आटप लौकर. न्हाय तर घात व्हईल!"

सावळा दरवाजा मारून फकिराला म्हणाला,

"हं — तयार असा!"

"तयार हाय. दरवाजा द्या लोटून!" फकिरा गंभीर आवाजात म्हणाला आणि सावळानं तो प्रचंड दरवाजा लोटला. त्याच्या आवाजानं रात्रीच्या त्या शांत वातावरणात सारा वाडाच हादरला. पेटत्या मशाली आणि नंग्या तलवारींनी मठकऱ्यांचं अंगण गच्च भरलं. सोप्यातील सर्व गुरं धडपडून उठली. कुत्र्यांनी वाडा डोकीवर घेतला. मठकरी दचकून

जागा झाला आणि त्यानं लाथा मारून चाकरांना जागं केलं आणि मोठ्यानं बोंब ठोकली:
"धावा... धावा!..."

फकिरा पुढं होऊन त्वेषानं ओरडला,

"बोंबलू नगं. न्हाय तर मुंडकंच मारीन! कुनीच, नरड्यातनं कसलाच आवाज काढायचा न्हाय! न्हाय तर जिवंच मराल!"

पुन्हा सर्व काही पूर्ववत झालं. उठलेले चाकर पुन्हा आपल्या जागी निपचित पडले. कुत्र्यांना मात्र फकिराच्या बोलण्याचा अर्थच कळला नव्हता. ती आपली तशीच भुंकत राहिली. मठकरी पुन्हा आपल्या जागी पडून पाहू लागला.

खांबाशी जखडून उभ्या केलेल्या कणगींवर कुऱ्हाडीचे द्रणके बसून कणगीबाहेर पडलेल्या त्या धान्याची गंगा अंगणापर्यंत धावत फकिराकडे आली आणि पन्नास सशक्त माणसं धान्याची पोती भरून वाड्याबाहेर जाऊ लागली.

मठकऱ्याच्या पहिल्या बोंबेनं जागा झालेला गाव साधू, घमांडी यांनी पुन्हा निजवला होता. पन्नास माणसं जागोजाग गोफणी जोडून दगड सोडीत होती. पुढे येणाराला थोपवीत होती. तायनू महारानं एकट्यानंच एक पांद रोखली होती. त्याचा तो प्रचंड देह गावकऱ्यांना भुतासारखा भासत होता. त्याच्या ओरडण्यानं तो खोरा दरदरत होता.

कणगीतील धान्य पोत्यात भरून माणसं अंधारात पळत होती, परंतु पुढील मुख्य पांदच गावकऱ्यांनी रोखल्यामुळं एकही पोतं अजून हद्दीबाहेर जाऊ शकलं नव्हतं. हे जेव्हा फकिराला उमजलं, तेव्हा तो पुढं आला. त्यानं खुणा करून आपली माणसं बाजूला काढली आणि मठकऱ्याची दावण कापून सर्व गुरं त्या पांदीत लोटली व एकदम गुरांच्या पिछाडीवर गोफणी सुरू केला. त्या चिंचोळ्या पांदीत त्या गुरांनी भयंकर धडधडाट केला. त्या जबर रेट्यानं गावचे गडी मागं सरू लागले आणि सारखा गोफणीचा मारा करीत फकिरानं वाट गाठली.

पूर्वेला तांबडं फुटलं होतं. दुष्काळानं पोळलेला मुलूख भकास भासत होता. झाडं कशी तरी उभी होती. वारा मात्र जोरात पळत होता. रोगटलेल्या करवंदी झिपऱ्या सोडून बसलेल्या भिकाऱ्याप्रमाणं दिसत होत्या. मात्र पूर्वेला जुनाच तजेला आला होता. रंगीत ढगांनी मंद वाटचाल आरंभिली होती. सर्व काही शांत भासत होतं. भूमी दग्ध होती, तर प्रकाश चैतन्यमय दिसत होता.

निवडुंगात डंग करकरत होते. पक्षी किलबिलत होते. गावात देवापुढं कर्णा वाजत होता. त्याचा दीर्घ नाद दूर दूर जाऊन भिडत होता. निवडुंगात त्या लिंबाखाली

मोत्यांसारखी धान्याची रास लागली होती. चिल्लीपिल्ली बुट्या, पाट्या घेऊन ओळीनं बसली होती. जाणती पोरं चेकाळली होती. कैक दिवसात आज प्रथमच ती दाण्याला स्पर्श करणार होती. नुसत्या धान्याच्या दरवळानं कैकांची भूक मेली होती. जणू अमृतच तिथं अवतीर्ण झालं होतं.

मुरा, सहदेव, तायनू महार ते कर्ते पुरुष धान्य वाटीत होते. बुट्या पळत होत्या. मांगामहारांच्या घरात एक आगळा आनंद पैदा झाला होता. कित्येक दिवस निपचित पडलेली जाती जीव आल्याप्रमाणं घरघरत होती. थंड चुलींना उबारा आला होता. किती तरी दिवसांनी आजच प्रथम तवे जाळ खाऊन तापत होते.

धान्य वाटून एक लहानसा ढीग उरला. तो मापानं वाटता येणार नाही, म्हणून मुरानं फकिराला विचारलं,

"दाजी, ह्ये दानं कसं वाटावं?"

"एक दाना गैर वाटू नगा." फकिरा म्हणाला, "डाव घ्या आनि डावीनं सारखं वाटा. एक दाना एका मानसाला एक दिवस जगवील, ह्ये इसरू नगा!"

सर्व धान्य डावीनं वाटून झालं आणि सूर्य निवडुंगावर आला. तो दिवस महार-मांगांना सोन्याचा दिवस भासला. कोवळ्या उन्हात दारात बसून त्यांची पोरं ऊन ऊन भाकरी शांतपणे खात होती.

सर्व काही स्थिर झाल्यानंतर फकिरानं कंबर सोडली आणि तलवार देव्हाऱ्यात उभी केली.

दुसऱ्या दिवशी स्वत: प्रांतसाहेब आपलं लष्कर घेऊन गावात शिरला. बाबरखानाच्या पोलिसांनी पहिल्या झपाट्यात फकिराला वेढा देऊन अटक केली आणि एकूण एक महार-मांग कैद करूनच त्यानं चावडी गाठली. चावडीत तरुण व गाजलेल्यांना प्रथम बेड्या ठोकल्या. काहींची दावण लावली. मग माळंवाडीच्या मठकऱ्याला लुटणाऱ्या गुन्हेगारांचा शोध लावण्याचं कार्य सुरू झालं. आयुष्यात प्रथमच हातात बेडी ठोकलेल्या अवस्थेत फकिरा उभा होता. मुरा, बळी, बहिरू, तायनू, घमांडी, सावळा या सर्वांच्या हातात बेड्या पडल्या होत्या. झडतीत सापडलेल्या भाकरीच्या बुट्या पोलिसांनी चावडीत आणून त्यांचा ढीग लावला होता. चावडीपुढील अंगण कैद्यांनी व गावकऱ्यांनी फुलून निघालं होतं.

पोलिसांनी वेशी दाबून धरल्या होत्या. सर्वत्र संगिनी लखलेखत होत्या. त्या गर्दीत बाबरखान आपलं प्रचंड पोट सावरीत शांतपणे वावरत होता. माळंवाडीच्या मठकऱ्यांच्या चेहऱ्यावर विजयी भाव ओसंडत होता. जेरबंद मांगमहाराकडं कुर्ऱ्यात पाहात तो मिशीला

पीळ भरीत होता.

फकिराच्या अटकेची बातमी समजताच विष्णुपंत धावतच आले. त्यांना पाहून गर्दी पांगली. लोकांनी भांग करून पंतांची वाट मोकळी करून दिली; परंतु पंत चावडीची पायरी चढले नाहीत — दारातच उभे राहिले. ते संतापानं थरथरत होते. सर्वत्र निःशब्दता निर्माण झाली. पंत बोलले — नव्हे, जवळजवळ ओरडले. त्यांचा राग शिगेला पोचला होता. लोक प्रांताच्या तोंडाकडे पाहू लागले. पंत म्हणाले,

"साहेब, काय आरंभलं आहे हे?"

"आम्ही गुन्हेगारांना अटक केली आहे." प्रांत गंभीरपणे कैद्यांची नावे नोंदीत उत्तरला आणि पंत एक पाय वरच्या पायरीवर ठेवीत म्हणाले,

"आम्ही गावचे सरकारी नोकर आहोत, हे मान्य आहे का आपणाला?"

"हो. मान्य आहे."

"मग आम्हांस न विचारता ही धरपकड कां केलीत?" विष्णुपंतांनी गावकामगाराचा नियम पुढं केला. त्यांचा स्वर वाढता निघाला नि प्रांतही चिडला. तो गुरकला,

"तसा आम्हांला अधिकार आहे आणि त्यांनी तर माळंवाडीच्या त्या मठकऱ्याला धडधडीत लुटलं आहे."

"परंतु त्याला काय पुरावा आहे?" पंतांनी पुराव्याची मागणी करून त्याच्याकडे रोखून पाहिलं, तेव्हा चटकन प्रांत म्हणाला,

"मठकऱ्याच्या धान्याचा माग या गावाच्या सीमेपर्यंत आला असून ह्या लोकांच्या घरात पुष्कळ भाकरी सापडली आहे." असं म्हणून प्रांतसाहेबानं आपलं बोट त्या सर्व लोकांच्या रोखानं फिरवलं.

हे शब्द प्रांतानं सभ्यतापूर्ण आणि स्पष्टपणे उच्चारले; परंतु विष्णुपंत खवळून गरजले,

"मग मला कां अटक करत नाही तुम्ही? कारण तो माग माझ्याही गावाला भिडला असून माझ्याही घरी तुम्हाला या क्षणी भाकरी सापडेल!"

हातापायांची आग झाल्याप्रमाणं चुळबुळत पंतांनी चौफेर दृष्टी फेकली. तेव्हा लोकांच्या नजरा फक्त त्यांच्यावर स्थिरावल्या होत्या.

"मग तुम्हाला काय म्हणायचं आहे?" प्रांत कपाळावर आठ्या आणीत म्हणाला, "स्पष्ट बोला ना, पंत—"

"मग ऐका, तर—" पंत निर्भीडपणे सर्व लोकांना उद्देशून बोलल्यागत बोलू लागले, "साहेब, हा माझा गाव दुष्काळानं चिरडून काढला असून इथं माणसं माती खाऊन जगण्याचा प्रयत्न करीत आहेत. त्यातच साथीच्या रोगानं आक्रमण करून इथं घरंच्या

घरं बसवली आहेत. इथं मांग-महार कुत्र्याच्या मौतीनं मरत आहेत, हे सर्व मी तुम्हाला कळवलं होतं की नाही?''

''खरं आहे, पुढं बोला!'' प्रांत बाबरखानाकडे पाहत म्हणाला.

''मग मला उत्तर कां दिलं नाही?'' पंतांनी कडाडून विचारलं.

''उत्तर दिलं नाही, याचा अर्थ असा नव्हे, की लोकांनी अराजकता माजवावी, कायदा हाती घ्यावा, एखाद्याला लुटावं! हे सर्व आम्हाला मान्य नाही!'' प्रांतानं नाक फेंदारलं, त्याचा चेहरा लालबुंद झाला.

''मग काय मान्य आहे?'' पंतही लालेलाल होऊन म्हणाले, ''लोकांनी कुत्र्याच्या मौतीनं मरावं? त्यांनी तीन वाटेची माती खावी? दहाच्या ऐवजी विसांनी एका गोरीत गाडून घ्यावे? हे मला मान्य नाही, सरकार!''

''मग काय मान्य आहे तुम्हाला?'' प्रांत पाय आपटीत खेकसला. त्याने चावडी डोकीवर घेतली. तो पंतावर बोट रोखून म्हणाला, ''काय तुम्हाला लुटालूट मान्य आहे? बेबंदशाही मान्य आहे?''

''याला उत्तर — होय!'' पंत धीरगंभीरपणे उद्गारले.

''ठीक. करा लुटालूट. आम्ही आरोपींना घेऊन आताच साताऱ्यास जातो.'' प्रांत डोळे आकुंचित करून म्हणाला आणि मग पंतही त्यात तालात म्हणाले,

''ठीक. खुशाल जा! पण लौकरच परत या!''

''का? कशाला?'' प्रांत गोंधळला.

''मला — विष्णुपंताला — अटक करायलो!'' पंतांनी निर्वाणीचं सांगून टाकलं.

''म्हणजे तुम्ही-तुम्ही स्वतः लुटालूट करणार?'' प्रांतानं चमकून विचारलं.

पंतांनी उपरण्यानं कंबर बांधली, प्रांतावर आपली जळजळीत नजर रोखली नि मान उंचावून उत्तर दिलं,

''साहेब, जर दुष्काळाचा आणि साथीचा बंदोबस्त झाला नाही, तर प्रत्येक माणसाला कुत्र्याच्या मौतीनं मरावं लागेल किंवा लुटारू होऊन काही दिवस जगावं लागेल; आणि मी कुत्र्याच्या मौतीनं मरणारा माणूस नाही, साहेब!''

विष्णुपंतांच्या त्या कडक बोलण्यानं प्रांत रडकुंडीस आला. तो नरमाईनं म्हणाला, ''मग आम्ही काय करावं, म्हणता?''

''तुम्ही सरकार आहात. हा दुष्काळ निवारा!'' पंत निर्भान होऊन म्हणाले, ''लोकांना मरणाच्या दाढेतून वाचवा. नाहीतर हा मराठा माणूस मरत मरत तुम्हाला मारीत मरेल, हे विसरू नका!''

पंत बोलत होते. लोक ऐकत होते. आपणच साहेबाशी बोलत आहोत, असं प्रत्येकाला वाटत होतं. प्रांत निरुत्तर झाला आहे, हे लक्षात येताच पंतांनी पुन्हा

कोपरखळ्या द्यायला सुरुवात केली,

"... साहेब, हे लोक मढी नसून जिवंत माणसं आहेत. जो बैल चुचकारून चालत नाही, त्याला पराणी टोचून पळायला लावणारे हे लोक आहेत. तलवार ह्यांच्यावर काबू करू शकत नाही. कारण तलवारी ह्यांनी फार चालवल्या आहेत."

हे ऐकून प्रांत चिडण्याऐवजी एकदम हसला आणि आणि नम्र स्वरात म्हणाला,

"आम्ही तुमचं वय नि दर्जा विचारात घेतला नाही, याबद्दल राग मानू नका. आम्ही हा दुष्काळ निवारण्याची शिकस्त करू आणि आम्ही सर्व आरोपींना मुक्त करतो!"

प्रांतानं असं म्हणताच पोलीस पुढं सरसावले. सर्वांच्या हातातील बेड्या निखळल्या. त्याबरोबर क्षणात चावडीपुढील ते अंगण हास्यानं नि आनंदानं भरलं. पंत चावडीची पायरी चढून आत गेले आणि प्रांताशेजारी खुर्चीवर शांतपणे बसले. फकिराच्या बेड्या निघताच त्यानं पंतांच्या पायांवर मुरकुंड दिली. शंकरराव पाटलानं आपली पल्लेदार मिशी नकळत कुरवाळली. 'माणूस असावा, तर पंतासारखा असावा', अशा कौतुकपूर्ण नजरेनं उभा गाव पंताकडे पाहत होता.

थोड्याच वेळात प्रांताचं बिऱ्हाड साताऱ्याच्या वाटेला लागलं आणि 'पंतांनी मांगा-महारांच्या बेड्या तोडल्या, लेका!' असं म्हणत लोक घरोघर गेले.

परंतु आठव्याच दिवशी गावात खळबळ माजली. उभा गाव चकित झाला. कारण एकदम साताऱ्याहून दोन हुकूम चावडीत येऊन थडकले होते. त्यांपैकी एका हुकमानं शंकरराव पाटलाची बडतर्फी झाली होती आणि दुसऱ्यानं शंकररावाच्या जागी रावसाहेब या नव्या पाटलाची नेमणूक केल्याचं जाहीर केलं होतं.

ही बातमी कळताच गावात चिंतेचं वातावरण निर्माण झालं. एक कर्ता, दयाळू नि दिलदार पाटील सरकारनं कमी केला, याबद्दल गाव चरफडला. नवा रावसाहेब पाटीलकीवर येण्यात शिगावच्या खोताचा हात नक्की असावा, असं जो तो म्हणू लागला. खोतानं सरकारात रदबदली करून आपल्या जावयाला पाटीलकी दिली असावी, असा सर्वांचा कयास झाला.

— आणि ज्या दिवसापासून रावसाहेब कामावर रुजू झाला, त्या दिवसापासून चावडीला वाघाच्या गुहेचं स्वरूप प्राप्त झालं. विष्णुपंतांना ती नेमणूक मुळीच मान्य नव्हती. त्यामुळं त्यांनी नव्या पाटलाला धारेवर धरलं होतं. चावडीत आग धुमसत होती. रावसाहेबावर झडप घेण्यासाठी पंत दबा धरून जणू बसले होते. ते जाणून होते की, शंकररावांची बडतर्फी

हा एक सरकारी डाव आहे. आता लौकरच मांग-महारांवर नवं संकट नक्कीच येणार!

— आणि ते खरंही होतं. रावसाहेब कामावर रुजू होताच त्यानं डोकीचं पागोटं फिरवलं. हातात फरशी कुऱ्हाड घेतली. आपल्या आळीची दांडगी पोरं बरोबर घेऊन तो गावालाच दाबू लागला,

"आता शंकररावाचं राज इसरा. आता रावसाहेब पाटील हाय. नीट वागा!" असं तो उघडउघड बोलू लागला. त्यानं फकिरासह कित्येकांवर करडी कमान धरली.

रावसाहेब गावचा पोलीस पाटील होऊन एक महिना झाला होता. सूर्य वरती पळत होता. उन्हातली प्रखरता नरम होत होती. रावसाहेब चावडीत बसता होता. पलीकडे पंत शांतपणे आपलं काम करीत होते. पाटलाच्या सभोवती बसलेली त्याची मंडळी चकाट्या पिटीत होती. खिदळत होती. जान्या जाधव पाटलाच्या समोर बसला होता. तो गांजा ओढून तर्र झाला होता. त्याच्या डोळ्याची पापणी लागत नव्हती. त्यानं पान खाल्लं होतं आणि तो बसल्या जागेवरून आपल्या दोन बोटांची कातर तोंडाला लावून पानाची पिचकारी दूर रस्त्यावर झुगारीत होता. चार दिवसांपूर्वी पहिल्यानं नांदाय आलेल्या आपल्या बायकोच्या गुणांचं, स्वरूपाचं वर्णन करीत होता.

जाधवाची बायको देखणी आहे, असा गावात गवगवा झाला होता. तो पाटलानंही ऐकला होता. म्हणूनच पाटील कानात जीव आणून जान्याच्या बाता ऐकत होता. बोलता बोलता पंताकडे चोरट्या नजरेनं पाहत दबक्या आवाजात जान्या म्हणाला,

"पाटील, एवढी देखणी बायको मला मिळंल, असं वाटलं नव्हतं; पर देवानंच मला ही केळीच्या खुटावानी बायकू दिली बघा!"

"त्याचं असं झालं..." रावसाहेब पाटील रंगात येऊन म्हणाला, "त्या येळी देवानं बी गांजा ओढला हुता. म्हनून त्यो केळीचा खूट बाभळीच्या खोडाच्या गळ्यात बांधला, बघ..." असं म्हणून पाटील पोट धरून हसला. त्या बरोबर सर्वच मंडळी नि चावडी दणाणली. त्यासरशी पंतांच्या कपाळाची शीर सणाणली आणि ते वळून चिडक्या आवाजात म्हणाले,

"पाटील! ही चावडी आहे. चव्हाटा नव्हे!"

हे ऐकून हसणारा पाटील एकदम आचकला. त्याचा चेहरा खर्रकन उतरला; पण लगेच त्याच्याही कपाळावर आठी उमटली आणि तो डोळे वटारून म्हणाला,

"आनि पंत, मी पाटील हाय, डोंबारी न्हवं!"

"मग डोंबाऱ्यासारखं वागणं बंद करा!" पंतांनी पुन्हा दणका दिला आणि पाटीलही पिसाट झाला.

तो मान उंचावून पंतांकडे पाहत म्हणाला,

"आम्ही कसंबी वागू. तुम्ही आमास्नी सांगू नगासा!"

"ते कसंबी वागणं घरात!" पंत पुढे पाहत, काम करीत उत्तरले, "देऊळ, चावडी, धर्मशाळा हे ज्याला कळत नाही, त्यानं पाटीलकीची हौस धरू नये!"

"ह्ये तुम्ही आमास्नी शिकवू नगा!" पाटील तावात येऊन म्हणाला, "मी हौसेनं पाटील झालो न्हाय. हक्कानं—"

"मग पाटलासारखं वागा!" पंत गुरकले.

"पर तुमी मला दाब देनारं कोन?" पाटील गुडघेमेटी घेऊन बोलला आणि पंत म्हणाले,

"मी विष्णुपंत कुळकर्णी आहे. नीट वागा, नाही तर मी तुम्हाला चार दिवसात सरळ करीन! पाटीलकीची धुंदी चढू देऊ नका!"

हा गलबला ऐकून पेठेतील लोक चावडीपुढं जमले. लोकांनी पाटलाला विचारलं,

"पाटील, काय भानगड हाय ही!"

"इचारा त्या पंतास्नीच," असं म्हणून पाटलानं मान फिरवली आणि पंत म्हणाले, "हे पाटील ह्या चावडीचा कुंटणखाना करू पाहत आहेत—"

एवढ्यात सातारचा खास पोलीस एक नवा हुकूम घेऊन चावडीत आला आणि पहिला वाद बाजूला सरला. पंतांनी तो हुकूम वाचून पाटलाकडे फेकला.

त्या हुकमानं वयात आलेल्या सर्व मांगांना आणि गावातील इतर गुन्हेगारांना तीन वेळ हजेरी लावण्याचा अधिकार पोलीसपाटील आणि कुळकर्णी यांना दिला होता.

तो हुकूम हातात पडताच रावसाहेब पाटलाने ताडकन उडीच मारली. उशीर चावडीच्या खांबाला टेकून ऐकत बसलेल्या रामोशाला पाटील म्हणाला,

"ए लेका रामुशा, पेंगत काय बसलायस? पळ — सारी मांगं म्होरं घालून ये, चल ऽ!"

त्याबरोबर रामोशी पटका सावरीत मांगवाड्याकडे निघाला. पाटलानं विजयी मुद्रेनं वळून पंतांकडे पाहिलं, तेव्हा ते किंचित खिन्न झालेले दिसले. त्यांच्याकडे पाहत पाहतच पाटील पुन्हा ओरडला,

"ए रामुशा, येताना त्या तायन्या म्हाराला बी आन!"

## १०

मध्यान्ह रात्र झाली होती. सारं चराचर अंधारात एकरूप झालं होतं. हूं का चू होत नव्हतं. निवडुंगात फक्त रातकिडे दीर्घ नाद काढून चिरकत होते; परंतु त्यांच्या चिरकण्यानं ती भीषण शांतता भंगत नव्हती. उलट, ती रात्र प्रखर नि क्रूर आहे, याचीच जाणीव होत होती.

ती हजेरीची वेळ होती. फकिरा अंथरुणावर पडला होता. त्याला रात्रभर झोपच येत नव्हती. आज पंधरा दिवस तो रात्री डोळ्यात काढीत होता. त्या दिवशी त्याला हजेरी लागली, तो दिवस नि त्या दिवशीचा तो रावसाहेब पाटलाचा कुर्रा हे सर्व त्याच्या मस्तकातून हालता हलत नव्हतं.

आपण माणूस असून हा केवढा अन्याय आहे! आपण तीन वेळा हजेरी द्यायची आणि ती पाटलानं घ्यायची! जर आपण कुठं निघालो, तर पाटलाचा लेखी हुकूम घ्यायचा. तो देणं न देणं पाटलाच्या स्वाधीन आणि जरी दिला, तरी तो ज्या गावी आपण जाऊ, तिथल्या पाटलाला द्यायचा नि त्याला हजेरी द्यायची आणि यात काही कसूर झाली, तर तीन महिने सक्तमजुरीची शिक्षा. नाही तर...

या विचारानं फकिराचं काळीज तुटत होतं. सरकारनं, खोतानं एक होऊन आपल्यावर हा सूड उगवला आहे, असं त्याला सारखं वाटत होतं. आता आपण कुठंही जाऊ शकत नाही. आता आपले हातपाय आपले नसून ते रावसाहेब पाटलाच्या दावणीत बांधले आहेत. आपल्या नाकात बैलाप्रमाणं ह्या कायद्यानं वेसण घातली असून, ती आपल्या वैऱ्याच्या हाती दिली आहे. आता पुढं मार्ग कोणता? आपण यापुढं हेच जीणं जगायचं का?

फकिरा तळमळत होता. अंधारात डोळे मिटून तो मनाशीच बोलत होता आणि त्याचं कणखर मन त्याला उपदेश करीत होतं :

'कालपरवा तू इतर माणसासारखा होतास; पण आता तू सरकारचा बंदी आहेस. तुझ्यावर आता पाटलाची हुकमत आहे. आता शंकरराव पाटील किंवा विष्णुपंत कुलकर्णी हे तुझ्या मदतीला येणार नाहीत. कायद्यानं त्यांच्यावरही मात केली असून, त्यांचा आता पडता काळ सुरू झाला आहे. म्हणून तर नांगरट्या रावसाहेब पाटील आज पंधरा दिवस भर मध्यान्ह रात्री तुझी हजेरी घेत आहे आणि सकाळी तू स्वत: जाऊन ती देत आहे, पुन्हा दिवस बुडताना पाटलापुढं तुला उभं राहावं लागत आहे.'

'मग मी काय करू?' फकिरा हृदयाच्या आतल्या आत कुणाला ऐकू न येईल, असा ओरडत होता. 'मी किती दिवस हजेरी द्यायची नि ती का द्यायची? सरकारनं हवं तर येऊन आमची गर्दन मारावी, आम्हाला तुरुंगात डांबावं; पण तसं न करता ही गुलामी का? मी गुलाम नाही. मी सनदशीर शिपाई—रखवालदार आहे. माझा बाप माळाला—गावासाठी कटून मेला? अन् मला तीन वेळा हजेरी? मी हजेरी देणार नाही!'

'काय? हजेरी देणार नाही मग तीन महिने तुरुंगात जा. पुन्हा ये नि पुन्हा हजेरी दे. नाही म्हणशील, तर तुरुंग... चक्र चालू...'

फकिराच्या डोकीत भयंकर वादळ उठलं. तो आतून पेटला. त्याला अंथरुणाचे चटके बसू लागले. त्याच्या सभोवतीचं वातावरण दाहक झालं. तो चटकन उठला. शेजारीच सरू शांत निजली होती. तिच्या नाकातून निघणारे नि:श्वास निर्भय ये-जा करीत होते.

पलीकडे राधा निपचित पडली होती. म्हातारा दौलती, राहीबाई यांची हालचाल मुळीच जाणवत नव्हती. साधू दारापुढल्या मांडवात होता. गबऱ्या ताठ उभा राहून झोप घेत होता. केवळ झोपेसाठी जमिनीला पाठ लावायची नाही, हा आपला अस्सल घोड्याचा धर्म तो काटेकोर पाळीत होता.

फकिराला ते वातावरण असह्य झालं. तो कावराबावरा झाला. मग पुन्हा शांत होऊन तो अंथरुणावर पडला. त्यानं दोन्ही हातांची खोबरमिठी मानेखाली घातली आणि त्याच्या डोळ्यांपुढं विचारांची भुतं नाचू लागली.

त्याच्या मिटलेल्या डोळ्यांपुढं तो दिवस उभा राहिला. ज्या दिवशी तो रामोशी आला आणि त्यानं चावडीवरचं बोलावणं सांगितलं, तेव्हा सर्व मांग ओळीनं चावडीवर उभे झाले होते आणि पाटील हातात फरशी कुऱ्हाड घेऊन सर्वांकडे करड्या नजरेनं पाहत होता. त्या वेळी फकिराही त्या गर्दीत उभा होता, पाटलानं सर्वांची नावं नोंदली आणि बजावून सांगितलं;

"आजपासनं साऱ्या मांगांनी अन् मांगांच्या नादाला लागलेल्या म्हारांनी हतं येऊन दोनदा हाजीर व्हायचं आणि म्या एकदा रातचं येऊन तुमास्नी उटवून हाजरी घ्यायची. जर का कुनी गैरहजर ऱ्हायला, तर बेड्या नि खडी..."

तो प्रसंग आठवताच फकिरा पुन्हा बावरला. इतक्यात महारवाड्यातील सारी कुत्री जागी होऊन त्यांनी दंगा केला. त्याचबरोबर फकिरा खाली अंग टाकीत पुटपुटला,

"आली हजेरी!"

तो कान टवकारून सासूंद घेऊ लागला. महारवाड्यातून हे पाटलाचं भेरगं आता इकडे येणार, या विचारानं पुन्हा त्याच्या मस्तकात भणभण आरंभली.

तरणाबांड रावसाहेब पाटील हाती कुऱ्हाड घेऊन पुढं दमदार गतीनं चालत होता. गण्या कोळी, जान्या जाधव, एकोबा परीट, दोन रामोशी, एक महार, तात्या मांग आणि आपल्या भावकीतील आठ माणसं घेऊन तो हजेरीला बाहेर पडला होता. चार-पाच कंदील बरोबर जळत चालत होते. जान्याच्या काखेत नंगी तलवार चमकत होती. कैक भाले जिभल्या चाटीत होते.

"ए तायनू महार ऽऽऽ" अशी महारवाड्यात पाटलानं मारलेली हाक मांगवाड्यात ऐकू आली. मग मांगवाड्यातली कुत्री जागी झाली. क्षणात त्यांनी डोकं फिरवल्याप्रमाणं मांगवाडा डोकीवर घेतला. सर्वत्र हलकल्लोळ उसळला आणि त्यातच '– ए बहिरू म्हार – एक किशा महारऽऽ ए दाद्याऽऽ' अशा हाका मारीत पाटील पुढं पुढं चालत होता आणि 'हाजरऽऽ' असं त्याला जागोजाग उत्तर मिळत होतं.

कुत्री भुंकत होती. महारवाड्यात नि मांगवाड्यात कुत्री भुंकल्यामुळं गावचीही कुत्री जागी झाली होती आणि सारा गावच कुत्र्यांच्या भुंकण्यानं व्यापला होता. त्यामुळं उभा गावच जागा झाला होता. आज पंधरा दिवस रोज रात्री असाच गाव जागा होत होता. पेंगुळलेली माणसं पाटलाला मनातल्या मनात इरसाल शिवी हासडून पुन्हा डोळे झाकीत होती.

थोड्याच वेळानं हजेरी फकिराच्या दारात आली. पाटील खटकन थांबला आणि त्यानं हाक दिली,

"साधू राणू ऽऽ"

"जी. हाय मी." मांडवात पडल्या पडल्या साधूनं उत्तर दिलं आणि लगेच पाटील गरजला,

"फकिरा राणू ऽऽऽ"

"हाजर ऽऽऽ" फकिरानं जबाब दिला; परंतु पाटलाचं समाधान झालं नाही. त्यानं पुन्हा पहिलीच हाक जोरात दिली,

"फकिरा ऽऽऽ"

"काय?" फकिराही बिथरून आतून ओरडला आणि पाटील एकाएकी चिडला. तो दोन पावलं पुढं सरकून म्हणाला,

"फकिरा, भाईर येऊन हाजरी दे!"

"मी भाईर येनार न्हाय!" फकिराचा आवाज चढला. मांडवात साधू जागा झाला नि उठून बसला. पाटील एकेरीवर का आला याचा तो विचार करीत आहे, तोच पुन्हा एकवार आवाज आला,

"तुला रोज हतं माझ्या म्होरं येऊनशान हाजरी दिया पायजे!"

"न्हाय. मी असाच. आतनंच देणार!"

फकिरा अधिकच चिडला आणि पाटील तरकटला. त्याचा तोल सुटला. तो मुठीतील कुऱ्हाडीचा दांडा आवळून, नाक फेंदारून म्हणाला,

"न्हाय! ती बायकूच्या पुढ्यातली हाजरी चालणार न्हाय. भाईर ये!"

— आणि त्याबरोबर धाडकन दार उघडलं नि फकिरा चौकटीत आला. कंदिलाचा लाल-पिवळा प्रकाश त्याच्या चेहऱ्यावर स्थिर झाला. तो अति उग्र झाला होता. त्याच्या डोळ्यांत जाळ पेटला होता. त्याच्या पीळदार मनगटात रक्ताचा दाब वाढला होता. त्या एकाच शब्दानं तो निर्भान झाला. साधू चटकन उठून उभा राहिला. दौलतीची झोप झडून गेली. सरूबाई, राधा, राही — सर्वच आश्चर्यानं पाहू लागल्या.

फकिरा चौकटीत येऊन पाटलावर नजर रोखून हळूच म्हणाला,

"काय म्हनलास?"

"भाईर येऊन हाजरी!" पाटील उद्गारला.

"आनि काय म्हनलास?" फकिरा जोरानं ओरडला. त्याबरोबर पाटलानं वळून पाहिलं आणि फकिराची खणखणीत चपराक त्याच्या डाव्या गालफडात खाडकन वाजली. तडाख्यात त्याचं पागोटं दूर उडालं नि त्याचा तोल जाऊन तो कोलमडला; पण लगेच स्वत:ला सावरून त्यानं कुऱ्हाड फिरवून हाणली; परंतु त्या वेळी फकिरा तिथं नव्हता. तो तलवारीकडे धावला होता. त्यामुळं पाटलाची कुऱ्हाड चौकटीत जाऊन रुतली.

तलवारीकडे निघालेल्या फकिराला राधानं अडवला. दौलती आडवा झाला. सरूनं हात धरला. फकिराच्या हातात ती तलवार आली, तर कत्तल होईल, याची त्यांना कल्पना होती. त्या सर्वांनी फकिराला देव्हाऱ्याकडं जाऊ दिला नाही. आईच आडवी आली आहे, हे लक्षात घेऊन फकिरा परत फिरला. तो सरळ जाऊन पाटलावर विजेप्रमाणं कोसळला. पहिल्या झडपेत त्यानं पाटलाला खाली ओढला. एखाद्या मांजरानं उंदीर चेलमडावा, तसा पाटील उलथापालथा झाला. एक जोराची लाथ बसून पाटलाला हूक भरली. तो दोन्ही पाय सरळ पुढं पसरून हातानं पोट धरून कण्हू लागला आणि बरोबरीच्या लोकांकडे केविलवाण्या नजरेनं पाहू लागला. उशिरानं पाटील बोलला,

"आरं, मेलू की रं ऽऽ"

दौलतीनं बाहेर येऊन फकिराला धरलं. राधा पुढं आली. त्या दोघांनी त्याला मिठी मारली. तोच जान्या तलवार घेऊन पुढं आला. त्याच्या पाठीत साधूने काठी हाणली, त्यासरशी हातातील तलवार टाकून जान्या अंधारात पडला. फकिरानं वाकून चटकन ती तलवार उचलली.

"नगा मारू, पाटील हाय त्यो पांढरीचा." साधू म्हणाला.

इतक्यात पाटील उठला आणि त्यानं गावाकडं तोंड करून दोन्ही हातांनी भयंकर अशी बोंब ठोकायला सुरुवात केली. क्षणात सारा गाव जागा झाला. मांगांनी हत्यारं काढली. महार धावले आणि थोड्याच वेळात गावकऱ्यांचा लोंढा मांगवाड्याकडं येऊ लागला.

काय झालं, कोण बोंब ठोकीत आहे, हे कुणालाच कळत नव्हतं.

तो प्रसंग खरोखर बाका होता. क्षणभरच फकिरा गांगरला; पण लगेच त्यानं साधूला इशारा दिला,

"साधू, तयार ऱ्हा!"

थोड्याच वेळात सारा गाव मांगवाड्यात एकत्र झाला. दौलती मांगाच्या दारात गर्दी झाली.

फकिरानं कंबर बांधून तलवार घेतली होती. सावळा, मुरा, बळी एकूण एक मांग अंधारात दबा धरून बसले होते. महारांनी टापरी बांधल्या.

तायनू महार मोठ्यानं ओरडला,

"आरं, कोन बोंबलतंय ह्ये?"

जरा वेळानं लोकांच्या लक्षात आलं, की रावसाहेब पाटील बोंबलतोय.

मग सर्वच लोक पाटलाकडं वळले. कुणी विचारू लागले,

"पाटील, काय भानगड हाय?"

तोपर्यंत रावसाहेब पाटलाची भावकीही त्या गर्दीत आली होती. पाटील आपली माणसं न्याहाळीत म्हणाला,

"मला मांगानं लाता मारल्या. मला फकिरानं मारलं!"

मांगानं मारलं, हे ऐकताच कैकांची डोकी बधिर झाली. मांगानं — नि पाटलाला मारावं, हा गावचा अपमान वाटून काही मंडळी एकदम भडकली. पाच-पंचवीस माणसांनी लगेच कुऱ्हाडी ठोकल्या आणि 'कुटं हाय त्यो फकिरा?' अशी आरोळी ठोकली. त्याबरोबर गंभीर शांतता पसरली.

सावळा करड्या सुरात म्हणाला,

"फकिरा हाकडं हाय! कुनाला मरायचं असंल, त्येनं हाकडं यावं!"

आता मोठी मारामारी होणार, या भीतीनं कैक एकदम पळू लागले. त्या पळापळीत कैक निवडुंगात शिरून अडकून पडले. निवडुंगाच्या कोंडात जर मांगांनी मारा केला, तर काय घ्या, या भीतीनं गावकरी चरकले आणि हां हां म्हणता एकूण एक माणूस गावाकडे पळत सुटला. दंगल पळत पळत पुन्हा चावडीवर एकत्र आली.

तिकडे चावडीवर गाव जमला नि इकडे मांगवाड्यात सर्व मांग एकत्र झाले.

एकाएकी हे संकट कसं उद्‌भवलं? संकट केव्हा केव्हा चालून येतं, तसंच घडलं. फकिरा खिन्न झाला. पाटलानं मुद्दाम ही कुरापत काढली. आता लौकरच गाव नि सरकार एक होणार. त्यात खोत तेल ओतून आग भडकवणार.

या सर्व गोष्टींचा विचार करीत मांग फकिराच्या दारात बसले होते, तोच विष्णुपंत कंदील घेऊन आले. त्यांना पाहताच फकिराच्या डोळ्यात पाणी आलं. त्यानं पंतांचे पाय धरले.

"ऊठ, काय घडलं, ते मला सांग!" पंत शांतपणे म्हणाले.

"आगळीक पाटलानं केली—" फकिरा झाल्या प्रसंगाची माहिती देऊन पुढे म्हणाला, "त्येनंच मुद्दाम वाढवलं ह्ये."

"हो. तो वाढविणारच होता." पंत उपलाणी हसत म्हणाले.

सावळानं पागोटं काढून पुढं ठेवीत प्रश्न केला,

"आमास्नी कुनी धनी हाय का न्हाय? ह्ये असं कुनीबी यावं नि आमास्नी मारावं!"

"त्याचं असं आहे—" पंत समजावणीच्या सुरात म्हणाले, "ह्या किल्ल्या शिगावातून फिरत आहेत. मात्र विंचू मारताना महादेवालाच दणका बसला आहे. गाव दुखावला आहे. तेव्हा..."

"मग आम्ही आता काय करावं?" फकिरानं मध्येच विचारलं.

तेव्हा पंत म्हणाले,

"आता गाव चढाई करील. सरकारची सारी चक्रं फिरू लागतील. पाटलावर हात टाकला, एवढं निमित्त पुढं करून सरकार, पाटील, गाव नि खोत — सर्वच तुम्हांवर तुटून पडतील!"

"मग ह्यातनं वाट कंची?" दौलतीनं मध्येच विचारलं.

"आता गाव सोडा!" पंत गंभीर आवाजात म्हणाले, "संकटाला बगल देणं कधी फायद्याचं होतं. शिवाय जे जे आज हजेरीला पात्र आहेत, त्यांच्यावर खोताची करडी कमान आहे."

"मलाबी तसंच वाटतंय." फकिरा म्हणाला, "मी आत्ताच शीव सोडून जातो!..."

"तसंच कर!" पंत म्हणाले, "मी नंतर ही सर्व परिस्थिती हळूहळू बदलीन व साताऱ्याला जाऊन जमेल तेवढी रदबदलीही करीन; परंतु जर तोपर्यंत गाव तुम्हावर आला, तर लढू नका! चलतो मी..." असं म्हणून पंत उठले.

पंताला घालवीत सर्व मांग मुख्य मार्गापर्यंत आले आणि जेव्हा पंतांनी निरोप घेण्यासाठी मागं वळून पाहिलं, तेव्हा सर्व मांगांनी त्यांना लवून मुजरा केला. पंत डोळे विस्फारून म्हणाले,

"जा, दुबळे होऊ नका! हेही दिवस जातील. दिवस घर बांधून राहत नाही!" असं म्हणून तो गावाकडे निघाले.

त्या बिकट काळोखात त्यांचा कंदील हाताच्या झोक्यानं मागंपुढं हेलकावे देत होता आणि प्रकाश अंधाराला रेटीत पुढंपुढं सरकत होता. महारवाडा ओलांडून पंत पुढं निघाले, तेव्हा त्यांना चावडीपुढं मोठी गर्दी झालेली दिसली. कित्येक कंदील पेटत होते. कैक दिवट्या ढणढणत होत्या. ते पाहताच पंत तिकडे वळले. पंतांना पाहताच सर्व लोक बोलणं बंद करून त्यांच्या रोखानं पाहू लागले.

रावसाहेब पाटील पाय पसरून बसला होता. त्याचे सर्व दात पडल्यामुळे तो वरचेवर रक्ताच्या चुळा टाकीत होता. पंतांना पाहताच तो सरळ झाला आणि विव्हळत म्हणाला,

"बघा ह्ये काय झालं! मला मांगानं मारलं!"

"मला सर्व काही समजलं आहे." पंत म्हणाले, "आता शांत राहा, उद्या काय करायचं, ते पाहू."

"उद्या?" पाटील ताडकन उठून ओरडला, "माझं दात पडलं, त्ये काय उद्या उगवणार हायती? आनि आम्ही गप्प बसून काय व्हनार? न्हाय बरं, आम्ही गप्प बसनार न्हाय! आम्ही आताच जाऊन मांगांची कत्तल करनार नि खोपटं पेटवून देनार! जाऊ दे भडवीची—"

"पाटील, ऐका! पंत करड्या आवाजात बोलू लागले, "तुम्ही फार उतावळे आहात. हजेरी घेताना— "घरातून नको, बाहेर येऊनच दे' म्हणून तुम्ही फकिराशी कुरापत काढली आणि आता वर खोपटं जाळण्याची भाषा काढता? जा. मग आताच जा नि मांगांची खोपट पेटवा. तुम्हाला आता कोणीच अडवणार नाही. कारण फकिरानं हा गाव सोडला आहे केव्हाच! —"

"म्हंजी पळून गेला?" कोणी विचारलं.

"ते मला माहीत नाही." पंतांच्या स्वरात प्रखरता आली. ते पाटलाकडे वळून म्हणाले, "एकही कर्ता मांग घरात नाही. त्यांची घोडी दूर गेली असतील. आता जावा नि पेटवा घरं! परंतु या गावासाठी माळाला कटून मरणाराची अवलाद दुबळी मानू नका! फकिरा शांत बसणार नाही! त्याचं घर पेटवा नि आपलं विझविण्यासाठी पाणी आणून ठेवा! जा—"

पंतांच्या बोलांनी वातावरण तप्त झालं. दिवट्या अधिकच तेजाळ भासू लागल्या. ऐकणारे गांगरले. तरी धिटावा करून पाटील म्हणाला,

"येऊ दे नि पेटवू दे माझा वाडा!"

"ठीक. मग माझ्या कानावर हात आहे." पंतांनी दोन्ही हात कानांवर ठेवून बजावलं, "पुढं जे जे होईल, त्याचे परिणाम तुम्हीच भोगा! फकिरा आपल्या सर्व लोकांसह आता डोंगरात गेला असेल किंवा डोंगर चढत असेल!"

## ११

एका उंच कड्यानं आपली मुंडी ढगात घातली होती. मंद गतीनं तरंगणारे प्रचंड ढग त्या कठीण सह्याद्रीच्या मस्तकावर आदळून दिशा बदलून घेत होते. उंच डोंगरातील रानटी वारे बेबंद पळत होते. त्यांच्या धसमुसळेपणानं घनदाट वनश्री नम्र होऊन त्यांना वाट देत होती. जे वृक्ष ताठ राहण्याचा प्रयत्न करीत होते, त्यांना वारा सहस्र करांनी वाकवीत पुढं रेटीत होता. करवंदी, बोरी, बाभळी, पिंपरण, जांभूळ, सागवान, पांगीरा या वृक्षांची वाऱ्यानं दाणादाण होत होती. पालापाचोळा त्याच्यापुढं लोटांगण घेत होता.

ऐन गिरिकंदरात एका दाट झाडीत फकिराचा तळ पडला होता. आठ कारवानी घोडी करवंदीच्या जाळीखाली पाग करून बांधली होती आणि त्याचा तो गबऱ्या पाठीवरचं जिन तसंच घेऊन उभा होता. एका कठीण प्रसंगात आपण आहोत, याची जणू त्यालाही जाणीव होती. सर्वत्र गंभीर वातावरण दाटलं होतं. फकिराची माणसं डोंगराच्या कपारीत सर्व नाक्याच्या वाटा दाबून बसली होती. हत्यारबंद माणसांनी करवंदीच्या विशाल जाळ्या

उग्र भासत होत्या. त्यांना छावणीचं स्वरूप आलं होतं. चिंचणीकर पिरा, साजूरकर निळू, साधू, मुरारी, बहिरू, सावळा, तायनू महार, बहिरोजी महार, घमांडी अशी एकाआगळी एक दिलदार नि बेडर माणसं तिथं वावरत होती.

आज एक महिन्यात दूरदूरचे मांग येऊन फकिराला मिळाले होते. हजेरी देऊन जगण्यापेक्षा लढून मरण्याचा त्यांनी हिय्या केला होता. आलेल्या लोकांना निरनिराळी कामं वाटून देऊन फकिरानं सर्व तयारी केली होती.

एका महिन्यात फकिरानं सह्याद्रीच्या खांद्यावरून कित्येक मैल दौड मारली होती. आणि कैक शिरजोरांना धूळ चारली होती. जे त्या भागात बळी होऊन बसले होते, त्यांना त्यानं जमीनदोस्त केलं होतं. त्याचं नाव ऐकून कैकांना कापरं भरत होतं. फकिराचा तो दरारा ऐकूनच रावसाहेब पाटील आपले शेवटचे दिवस जपून ठेवण्याचा प्रयत्न करीत होता.

परंतु फकिरानं ज्या दिवशी घर सोडलं, त्या दिवसाची त्याला सारखी आठवण होत होती. त्या दिवशी राधानं अगतिक होऊन स्वत:चं तोंड बडवून घेतलं होतं. सरूनं हुंदका कंठात दाबून ठेवला होता. म्हातारी राहीबाई ऊर बडवीत होती. दौलतीनं आसू ढाळीत गबऱ्यावर खोगीर घातलं होतं. त्या स्थितीत त्या चार जीवांना सोडून साधू नि फकिरा हे परागंदा झाले होते. आता त्यांची भेट कशी होणार? कधी होणार?

एकाएकी आलेला प्रसंग हा सर्वांनाच दाहक वाटल्यानं सर्वच दु:खी झाले होते. कर्ते म्हणून पुढे आलेले दोघेही मुलगे – फकिरा व व साधू – फरारी होत आहेत. ते परत कधी येणार? का सरकार, पाटील नि खोत त्या दोघांना ठार करणार? या अन् अशा कैक इंगळ्या राधा, दौलती, राही यांच्या काळजाला डसत होत्या.

फक्त दौलतीचंच नव्हे, तर मांगांच्या वस्तीतील प्रत्येक घर त्या रात्री रडलं. कारण घरटी एक माणूस तरी त्या दिवशी बाहेर पडून फरारी झालं होतं.

भर मध्यान्ह रात्री जेव्हा ती सारीजणं घर सोडून निघाली, तेव्हा सर्व लहानथोरांनी दारात येऊन त्यांना निरोप दिला होता. त्यांचे ते कृश हात, दुष्काळानं जर्जर केलेले देह, फकिराच्या सारखे नजरेसमोर येत होते. गेल्या काही दिवसांच्या अनुभवानं तो पार बदलून गेला होता. एका जाळीत निवांत पडून त्या प्रसंगाची तो आठवण काढीत होता.

आज आठ दिवस त्याला घराकडचीही काहीच बातमी कळली नव्हती. सरू त्याच्या डोळ्यांपुढं सारखी येत होती. आई भिंतीला टेकून तळमळत असेल, आबा घोर करीत असेल, थोरली आई चडफडत असेल. आपलं घर, आपलं अंगण, मांडव, गाव आपणाला अंतरलं. आता किती दिवस असे जाणार, याचा विचार करीत तो पडला होता.

रात्र सामसूम झाली होती. डोंगरातील जग केव्हाच निपचित झालं होतं. चराचर अंधारात विलीन होऊन किती तरी वेळ झाला होता. अति विशाल सह्याद्री – पण तोही थंड भासत होता. मध्येच कुठं तरी एखादं पाखरू नाजूक आवाज काढून भर्रकन जात

होतं. एखादं डुक्कर हुंकार देऊन रात्रीचं पोट फाडीत होतं आणि त्या प्रसिद्ध डुक्करमुसंडीनं लपलेली खोकडं जीव मुठीत घेऊन पळत होती. सशांच्या उरात धडकी भरत होती. बेलाग उंच गांजणीत तरसांची धडपड सुरू होती.

घमांडी दिवस बुडताना घराकडे गेला होता. तो घरची खुशाली ऐकून व आपली लोकांना देऊन येणार होता, म्हणून सर्वजण उत्सुक होऊन घमांडीची वाट पाहत होते. फकिराही मधूनमधून चाहूल घेत होता.

शेजारच्या जाळीत पिरा आणि घोंचीकर बळीबा हे दोघे निजले होते. ते दोघेही घोरत होते. त्यांच्या त्या प्रचंड घोरानं कोणाचंच चित्त स्थिर राहत नव्हतं. त्यांनी ती घर्र घर्र ऐकून एक मोठं रानडुक्कर त्या जाळीच्या रोखानं बावरून, कान टवकारून हळूहळू जवळ येऊ लागलं होतं; पण डुकराची त्या दोघांवर होणारी ती चढाई कोणालाही कळत नव्हती; कारण जो तो आपल्याच विवंचनेत होता. त्यांना झोप येत नव्हती आणि विचार त्यांना सोडीत नव्हते. आपलं काय होणार, या विचारावर बायकापोरांचं काय होणार, या विचारानं मात केली होती.

एका जाळीखाली अंधारात सावळा अंगावर घोंगडं घेऊन बसला होता. त्यानं सडकून गांजा ओढला होता आणि त्याला तार चढली होती. त्या तारेत तो बोलत होता. नि तायनू पडल्यापडल्या ऐकत होता. तो घोंगड्याची खोळ खालवर घालून, पोटाशी आपली प्रचंड कुऱ्हाड घेऊन सावळाच्या बोलण्याला हुंकार देत होता. आपल्या प्रत्येक शब्दाला तायनूनं हुंकार दिला पाहिजे, असा सावळाचा आग्रह होता. हुंकार देण्याला किंचित खंड पडताच तो तायनूला डिवचून जागा करीत होता. नाही तर मोठ्यानं म्हणत होता,

''जागं हायसा का?''

''हं. काय की.... बोला तुमी...'' तायनू अंगावर घोंगडं घेऊन त्याला म्हणत होता आणि मग सावळा समाधान व्यक्त करीत बोलत होता.

''ह्ये गोरे लोक मारुतीची अवलाद हाय. जवा मारुतीनं रावनाची लंका जाळून भुस्काट केलं, तवा रामानं मारुतीला आशीर्वाद दिला आनी सांगितलं — म्होरं तू राजा व्हशील. म्हनूनशान बघ ह्ये राज आलंया. पर, इच्याभनं, हे राम वंशाचं राज आमास्नी म्हागात पडलं. आमास्नी तीन यळा हाजरीच लावून बसलं—''

''थांबा—'' तोंडावरचं घोंगडं बाजूला सारीत तायनू म्हणाला, ''राम द्येव व्हता. त्यांच्या भक्ताचं ह्ये जर राज हाय, तर मग तुम्ही कोन? नि तुमचं त्येचं वैर का? बोला!''

''आवं, त्येच तर उमजंना.'' सावळा खजील होऊन म्हणाला, ''आमी गरीब मानसं, आमास्नीच ह्ये असं का?''

''आनी ऐका—'' तायनू म्हणाला, ''जर मारुतीच्या वंशाचं गोरं हायती, तर त्येस्नी शेपूट का वं न्हाय?''

"काय की, बा!" अंधारात सावळानं ओठ उफराटे केले आणि तो स्तब्ध झाला. पण पुन्हा थोडा विचार करून हळू स्वरात म्हणाला, "मला वाटतं, सायब लोकास्नी शेपटं असतीली, पर इजारीनं ती दिसत नसतील!"

हे ऐकून तायनूला हसू आलं नि मग ते मोठ्यानं हसू लागले. त्यांच्या त्या प्रचंड हास्यानं ती कपार जागी झाली. जणू तो सह्याद्रीच खदखदून हसत असल्याचा भास झाला.

"दाजी ऽऽ" पलीकडच्या जाळीतून फकिराचा आवाज आला. सावळानं हसू आवरून तिकडे निरखून पाहताच पुन्हा सर्व काही शांत झालं.

"येऊ का?" सावळा उद्‌गारला.

"घमांडी आला न्हाय?"

"हो. न्हाय आला." सावळा उत्तरला.

"का आला न्हाय अजून?"

"कुनाला ठावं!"

"का वाट चुकला?"

"कुनाला ठावं!"

"यदाळ यावा त्यो!"

"हो; पर कुठं अडाकला, कुनाला ठावं!"

"रात उलटली—" फकिराच्या सुरात कंप निर्माण झाला.

आकाशात पाहत सावळा म्हणाला,

"अजून बाजलं मावळलं न्हाय नि चोर त्या बाजल्यापाशी गेलेलं न्हायती. यील त्यो आता. निजा तुम्ही—"

"मला वाटतं, घमांडी वाट चुकला." फकिरा म्हणाला.

"मग काय करू म्हनता?" सावळानं विचारलं आणि फकिरा म्हणाला, "वाईच चुचकारून बघा."

सावळा जाळीबाहेर आला आणि एका कड्यावर उभा राहून खाली तळवटाकडे पाहत त्यानं मोराप्रमाणं विचित्र आवाज काढला. तो त्याचा आवाज दूर गेला. सर्वजण कानोसा घेऊ लागले. उशिरानं खालून प्रतिध्वनी आला आणि सावळानं आनंदानं उडी मारली.

"—घमा आला!"

त्याबरोबर बळीबाच्या जाळीजवळ आलेलं डुक्कर भेदरून धडपडत कपारीखाली धावलं.

थोड्या वेळानं घमांडी वर आला. त्याच्याबरोबर बेडसगावचा भिवा मांग होता. त्याला पाहून फकिराला किंचित आनंदच झाला. हा भिवा शरीरानं भलताच मजबूत होता. शिवाय

तो सावळाचा पाव्हणा होता. दगा होण्याचा मुळीच संभव नव्हता आणि आता फकिरालाही एक एक माणूस हवा होता.

बेडसगावकराला पाहून सर्वांना आनंद झाला. घमांडीनं घराकडची खुशाली नि एक हिंमतवान माणूस आणला, याबद्दल सर्वांनी त्याची पाठ थोपटली. मग त्यानं प्रत्येकाच्या घरची खुशाली, निरोप सांगितले आणि तो म्हणाला, "आठ दिवस झाले, शिगावकर खोत गावात आलाया. रोज रातचं पाटील मांगवाड्यात येऊन घरात शिरून झडती घेतोय. बायकापोरांस्नी शिव्या देतोय नि कालच सातारचा दांडगा सायब येऊनशान गेला. फकिरादाजीला धरून देनाराला इनाम दीन, असं म्हनीत व्हता. तवा दौलूआबानं नि राधा-आईनं सांगितलंय, की तुमी जपून असा. शिगावचा गनू रामोशी येनार हाय. त्येच्या-"

"त्येला डोंगर चढू देऊ नगा!" खंडू ओरडला, "खोत त्या गण्याला फितवून हकडं पाठवील नि दगा व्हईल!"

"नाईकाचं खरं हाय—" फकिरा म्हणाला, "आता कुनावरच सरळ इस्वास टाकू नगा. मानूस न् मानूस पारखून घ्या. न्हाय तर आपून सारी एका दमात मरू!" मग तो घमांडीकडे वळून म्हणाला, "बरं, आबानं आनी काय सांगितलं?"

"आबानं?" घमांडी म्हणाला, "गन्याला हाजरी लागलीया. तवा त्यो आबाकडं येऊन म्हनीत व्हता, की मला फकिराकडं घालवा—"

तायनू गप्प ऐकत होता. तो मध्येच म्हणाला, "खोटं. आता अशी कैकाला हाजरी लावून सरकार ती मानसं इकडं सोडील, आनी हतं येऊन दगा—"

"म्हनून आपून वाईच सावध असू या." मुरा म्हणाला.

त्या वेळी दगा होणार, या कल्पनेनं सर्वांनी मनं पोळली. आपले वैरी स्वस्थ नसून आपल्या जिवावर उठले आहेत, ते सर्व बाजूंनी आपल्यावर हल्ला करण्याची तरतूद करीत आहेत, याची जाणीव सर्वांना झाली.

परंतु बेडसगावकरासारखा एक जबरा माणूस आपल्या बंडात स्वत: येऊन सामील झाल्यानं त्यांना परम समाधान झालं होतं. भिवानं फकिराची ती उग्र मूर्ती जेव्हा पाहिली, तेव्हा तो चकित झाला. एका प्रबळ सत्तेविरुद्ध बंड करणारा हा आपल्याच जमातीतला माणूस म्हणून फकिरा त्याला दैवताप्रमाणं भासला आणि तोही जिवावर उदार झाला.

भिवाला पाहून तायनूला सर्वांपेक्षा अधिक आनंद झाला. भिवाच्या दाट करड्या मिश्या सरळ पुढं झेपावत होत्या आणि त्यांनी त्यांचा रुंद जबडा झाकला जात होता. त्याचे टपोरे डोळे भलतेच रागीट दिसत. त्यावरच्या करड्या भुवयांनी त्याच्या चेहऱ्यावर तापटपणाचा भाव सारखा दिसे आणि तायनूला तसलाच माणूस आवडत असे.

डोंगरी लाकडांचा जाळ मंद जळत होता. सावळा, तायनू व भिवा त्या जाळाभोवती बसून शेकत होते. भिवा चिलमीत निखारा कोंबून, मिश्या आजूबाजूला सारून झुरके

मारीत होता.

मध्यान्ह रात्र उलटली होती. वाऱ्याला जाग आली होती आणि तो कपारीनं बेभान पळत होता. घमांडी आल्यामुळे आणि घराकडची खबर समजल्यानं सर्वांच्या उरावरचं दडपण हलकं झालं होतं. ते जाळीजाळीत घोरत होते. गबऱ्या नाचत होता आणि त्याच्या शेजारच्या जाळीत फकिरा जागाच होता. त्याला झोप येत नव्हती. किती तरी उशीर पडून तो कंटाळला नि चटकन जाळीबाहेर आला. वाऱ्याच्या झोतानं त्याला बरं वाटलं. तो मग शांतपणे जाळाजवळ गेला. त्याला पाहताच भिवानं म्हटलं, "या की, बसा!"

"हं— बोला, कसं काय चाललंय तुमच्या खोऱ्यात?" फकिरा जाळाजवळ बसत बोलला आणि भिवा म्हणाला,

"बेडसगावात सरकारी खजिना हाय. तवा सारं गाव अंमलदारांनी उठवून काढलाय. त्यात आम्हां गरीबांवर ही हाजरी. डोस्कं हालवाय फुरसती न्हाय—"

"खजिना?" फकिरा गंभीर होऊन म्हणाला, "खजिना तिथं कसा?"

"—त्या भागातला सारा वसूल आधी बेडसगावला येऊन मग पुढं कोल्हापूरला रवाना होत असतो." भिवानं सांगितलं आणि फकिरा डोळे आकुंचित करीत म्हणाला,

"खजिन्यावर किती लोकांचा पहारा असतो?"

"पहारा कशाचा?" भिवा म्हणाला, "इनमीन चार मुंडकी — कवा तरी येऊन जात्यात. आनी एक बामन हाय, तो एकटाच त्याची राखन करीत असतो."

"म्हंजी खजिना कोन फोडील, असं सरकारला वाटत न्हाय?" फकिरानं आश्चर्य व्यक्त केलं.

"कोन फोडनार?" भिवा म्हणाला, "ह्या सरकारला कुनाचं भ्या वाटत न्हाय, म्हून तर त्यो खजिना बामनाच्या वाड्यात ठिवलाय. रक्कम तुंबली, की मग ती कोल्हापूरला जाती. त्यावेळी मातर सातआठ मानसं बंदुका घेऊनशान येत्यात..."

"खजिन्यात किती रक्कम असती?" फकिरानं प्रश्न केला.

"किती असती, कोन जानं!" भिवा उद्गारला आणि फकिराच्या डोकीत तो खजिना खळखळू लागला. तो चटकन उठून आपल्या जाळीत आला आणि त्यानं हाक मारली.

मुरा, बळी, साधू हे तिघे धडपडून उठले आणि धावले. त्यांना जवळ घेऊन फकिरा म्हणाला, "बेडसगावात इंग्रजांचा खजिना तुंबलाय—" असं म्हणून त्यानं पूर्वेकडं नजर टाकली.

आकाश लाल होत होतं. अनंत रंगांचा सडा सांडला होता. मखमली गालिचाच्या पायघड्या तुडवीत नवा रवि भूतलावर पदार्पण करीत होता. त्याची ती नयनरम्य शोभा पाहून फांदीफांदीवर बसलेली पाखरं आपल्या मंजुळ शब्दांत एकमेकांना सांगत होती— शेष वेचितां अठरा घटका। पूर्व दिशेने क्षाळले मुखा। कुंकुम रेखिले त्या तिलका।

अरुणोदय बोलिजे।

"मग काय करू या म्हनता, दाजी?" त्या तिघांनी प्रश्न केला आणि फकिरा बेडसगावच्या दिशेने पाहत धीरगंभीरपणे म्हणाला, "चला, तयारी करा! त्यो खजिना मारू या. वाटेत वाघ उठला, असं सायबाला वाटलं पाहिजे. लाव म्हनावं हाजरी नि कर हतं राज...."

"मग कवाची तयारी करू या?" साधू म्हणाला.

"लौकर चला! बेडसगावच्या त्या बामनाच्या वाड्यात ती दौलत अडकून पडलीय–" फकिरा आवाज चढवीत म्हणाला, "तिला मोकळी करा! हो. पन आदी मला आईला, बाबाला, थोरल्या आईला एकदम भेटून येऊ दे. पर तुम्ही मानसांची जुळनी करा! शंभर मानसं कडवी घ्या नि चला–"

हे सारं भिवानं ऐकलं होतं. तो पुढं येऊन म्हणाला, "पर बामनाकडं बंदूक हाय. आनी बंदुकीपुढं बळ बेकार व्हतं. भलताच मार हाय, म्हनं–"

"माझं बळ तोफेपुढे बेकार व्हनार न्हाय!" फकिरा तीव्र स्वरात म्हणाला, "बंदूक? असू दे बंदूक! किती गोळ्या उडवील ती? एक एक मानूस दहादहा गोळ्या खाऊ या! मेलेलं मेंढरू अग्नीला भीत न्हाय. उद्या मरायचं, त्ये आज मरू या! पन जरा मानसावानी नि हिंमतीनं! पंत म्हनीत, एक राजा हतं झाला. त्येचं नाव मी इसरलो. त्यो राजा म्हनत व्हता, शेळी हूनशान शंभर वर्सं जगन्यापरास वाघ हूनशान एक दिस जगावं. आनी त्येच खरं हाय. वाघच होऊ या नि वाघासारखं मरू या! चला. जमवा मानसं नि चला!– हो. पन आदी मी वाईच घराकडे जाऊन आईला भेटून येतू!"

फकिरा, साधू, मुरा, बळी बोलत असतानाच पूर्वेला रविनारायण शांतपणे वर आला. जणू तोही फकिराचं बोलणं ऐकून भारावला होता. लाल किरणांनी भूमंडळ खच्चून भरलं. सह्याद्रीवर त्या किरणांनी वर्षाव सुरू केला. वनराजी पिवळ्या किरणांनी शोभायमान केली. लहान लहान रानफुलं वाऱ्याच्या स्पर्शानं मस्तक डोलावून सूर्याला नमस्कार करू लागली. डोंगरी दुनिया जागी होऊन कार्यक्षम झाली.

फकिराची माणसं आंघोळी करून आली. कोण देवाचं नाव घेत जाळीत बसले, कोण धोतरं वाळवीत सूर्यनमस्कार करू लागले. मुरा, बळी, साधू बेडसगावच्या खजिन्यावर विचार करीत आपल्या तयारीला लागले.

'बेडसगावचा खजिना' या एकाच शब्दानं त्या डोंगरात जाळी न् जाळी कुजबुजत होती. प्रत्येक जाळीत खजिन्याची चर्चा चालू झाली आणि 'खजिना खजिना' करीतच तो दिवस मावळतीला गेला.

फकिरा घराकडे जाण्याची घाई करू लागला. घमांडीनं येऊन गबऱ्यावर खोगीर घातलं आणि तो म्हणाला, "दाजी! एकटं जाऊ नगा! रावसाहेब पाटलानं आपली मानसं

पाळतीवर ठिवल्याती.''

''बरं. मी सावळूनानाला घेऊन जातू.'' फकिरा म्हणाला, ''मी सावध हाय. तुम्ही मातर हतं जागत बसा. सावळूनाना नि तायनूआबा, हेस्नी म्हनावं चला—''

सूर्य डोंगराच्या पलीकडे हळूहळू उतरत मावळतीला गेला आणि फकिरा गबऱ्याला घेऊन डोंगर उतरत उगवतीकडे निघाला. दोघेही आपापल्या घरी निघाले होते. मात्र सूर्य एकटाच होता आणि फकिराबरोबर सावळा नि तायनू हे काळासारखे चालत होते.

डोंगरातून गावदरीला येईपर्यंत सर्वत्र सामसूम झाली होती. रानातली माणसं केव्हाच गावात गेली होती. सर्व पांदी निर्जन भासत होत्या. गावात एखादा माणूस बोलत होता. ते रात्रीच्या शांत वातावरणात दूरपर्यंत ऐकू येत होतं. फकिरा, सावळा, तायनू हे पाटलाच्या पडवीत येऊन थांबले. कारण फकिरापुढं दुसरा एक पेच पडला होता. तो म्हणजे गबऱ्याचा. गबऱ्या गावात गेला, की खेकाळून सर्व गाव जागा करील. लोक गबऱ्याचा तो आवाज ओळखणार. सर्व संकटात साहाय्यकर्ता म्हणून जिवापेक्षाही प्रिय असणारा गबऱ्या आज फकिराला एकाएकी संकटाप्रमाणे भासू लागला. तो विचार करीत आहे, तोच सावळा म्हणाला, ''कशाचा इचार करताय?''

''गबऱ्याचा''

''म्हंजी कसं?'' तायनूनं विचारलं.

''म्हंजी दारात गेल्यागेल्या आमी आल्याची वर्दी खेकाळून देनार नि...'' फकिरा पुढं बोलणार, तोच तायनू मध्येच म्हणाला, ''खरं हाय. आता असं करू या —' तुम्ही नि सावळा निघा. मी गबऱ्याला घेऊन हातं थांबतो—''

''आनी तुम्ही घराकडं कवा जानार?'' फकिरा चमकून म्हणाला.

''मी? सावळा आल्यावर जाईन. जावा. पर सावळा, तू लौकर ये, जा—''

फकिरा क्षणभर खिन्न झाला आणि गबऱ्याला तायनूच्या हातात देऊन अंधारात पुढं निघाला. सावळाही घराकडे फिरला. तेव्हा फकिरा म्हणाला,

''नाना! तायनूआबाला घरला जायचं हाय. लौकर ये नि त्येला जाऊन येऊ दे पोराबाळांस्नी भेटून...''

घरात मंद दिवा जळत होता. दौलती भाकरी खाऊन दातात काडी घालीत बसला होता. राहीबाई अंग टाकायचा विचार करीत होती. राधाचं चित्त स्थिर नव्हतं. सरू बावरून गेली होती. आज एक महिना होत आला होता. फकिराला तिनं पाहिलं नव्हतं. ती मनात पेटत होती; परंतु मनातली आग तिला विझवताही येत नव्हती. मनातलं दुःख दुसऱ्याला सांगून किंचित कमी होतं, पण सरूला तेही जमत नव्हतं. स्वतःला काय होत होतं, हे ती त्या घरात कोणालाही बोलू शकत नव्हती. म्हणून ती चरफडत होती. त्यातच अलीकडे गावात रोज नव्या भुमका उठत होत्या. कोण म्हणत, फकिराला धरणं येणार!

कोण म्हणे, सातारच्या सोजिरांनी फकिराला वेढा दिलाय. कोण म्हणे, शिगावचा खोत पाळतीवर असून तोच फकिराला पकडणार आहे. एकदा-दोनदा काही माणसं दारात येऊन गेल्याचं सरूनं पाहिलं होतं. रोज फकिराच्याबद्दल एक ना एक नवी बातमी तिच्या कानावर आदळत होती.

राधा आज संतापली होती. ती बाहेर पाहत पुटपुटली, "— त्येनं आपल्या बायकूला तरी न्हाय का भेटून जायचं? आमी न्हाऊ दे..." हे ऐकून दौलतीनं गपकन डोळे उघडले आणि आवाज दाबीत तो म्हणाला,

"कसा यनार त्यो? वैऱ्याची मानसं वळचनीला कान लावून बसल्यात—"

"हो. खरं हाय." राही मध्येच म्हणाली, "त्यो न्हाय येत त्येचं बरं हाय. देवा, नकं रं, त्येला इकडं येऊ देऊ!"

इतक्यात फकिरा गपकन घरात शिरला आणि सर्वांच्या कंठात भयंकर असा हंबरडा येऊन दाटला. राधा, सरू आणि राही यांनी शिकस्त करून आलेला हुंदका दाबला. दौलतीनं त्याला मिठी मारली. त्याच्या हातात कंप भरला होता. तलवार आईच्या हातात देऊन फकिरानं तिच्या पायावंर डोकं ठेवलं, तेव्हा सरू भानच विसरली. हुशार दौलती चटकन दारात येऊन टेहळणीवर उभा राहिला. ती घडीच अशी होती, की ती माणसं सर्व काही विसरली. त्यांची काळवंडलेली मनं क्षणात प्रफुल्लीत झाली. मायेची फुलं नेत्रातून आपोआप गळली नि पेटती हृदयं शांत झाली; पण पुन्हा साधूची आठवणही तितक्याच वेगानं पुढं झाली.

पहाटे तायनू दारात आला. तोही पोराबाळांना भेटून हर्षभरित चेहऱ्यानं आला होता. त्याला घेऊन फकिरा पुन्हा निघाला. सरूनं त्याच्या हातात ती तलवार दिली आणि उगीचच ती लाजली. पांदीपर्यंत राधा, दौलती, सरू फकिराला घालवीत आली. राहीनं दारात उभं राहून त्याला आशीर्वाद दिला. पांदीत सावळा नि गबऱ्या यांना पाहून पुन्हा सर्वांना आनंदाचं भरतं आलं. दौलतीनं गबऱ्याची शेंडी चाचपून त्याचा मुका घेतला व "लेका, संभाळ बाबूला—" आपला गाल त्याच्या कपाळावर घाशीत तो म्हणाला.

फकिरा सर्वांचा निरोप घेऊन निघाला, तेव्हा राधा म्हणाली, "आता वाट दिलीच पायजी. आमची काळजी नगं करू, जिवाला जप! आता लौकरच दुसरा फकिरा आमच्या घरात येनार हाय. हो—"

हे ऐकून सरू लाजून चूर झाली. फकिरानं चटकन तिच्याकडे पाहिलं; पण अंधारात तिचा लाजेनं मोहरलेला चेहरा त्याला दिसला नाही. मात्र दुप्पट बळ त्याच्या अंगात संचारलं नि तो ताडकन् गबऱ्यावर उडी मारून बसला.

पूर्वेला एका काळ्या ढगात एक लाल रेषा हळूहळू प्रखर होत होती. जणू अंधाराच्या भिंतीला तडा जाऊन त्या खिंडीतून प्रकाश पुढं येत होता.

फकिरा डोंगराकडे निघाला होता. त्याची पाठमोरी आकृती राधा पाहत होती.

## १२

अति उंच अशा सह्याद्रीच्या पाठीवरून ती सर्व माणसं बेडसगावकडे निघाली होती. त्या वेळी ती महाराष्ट्राचं भूषण — सह्याद्रीप्रमाणंच विशाल भासत होती. परिस्थितीनं त्यांना धनुष्याच्या कमानीप्रमाणं घडवलं होतं.

लहानशा पाऊलवाटेनं ते सर्व एकामागं एक चालत होते. कोणीही घाई करीत नव्हतं. कारण सूर्य अजून बराच वर होता. तोही मंदगतीनं विशालगडाच्या शिखरावरून चालत होता. त्याच्या किरणांनी वारणाकाठ सोन्याच्या राशीसारखा दिसत होता. कीर्र झाडीच्या मस्तकावर रुपेरी रंगच जणू आकाशातून सांडत होता.

डोंगर बोलत होता. पाखरं सुरकंड्या घेत आपापल्या घरट्याकडे जात होती. काही घरट्यांत किलबिल होती, तर काही फांद्यांवर बसून गोड गीत गात होती.

आष्टीच्या धोतरानं कंबर बांधून फकिरा गबऱ्यावर बसला होता आणि निश्चल बसून समोर पाहत हता. बेडसगावात काय होणार, याचा विचार तो करीत निघाला. त्याचा चेहरा भलताच गंभीर झाला होता. वावटळीत पाचोळा सापडावा, तसा तो विचारात गिरक्या घेत होता.

सरकारी खजिना लुटला, म्हणून सरकार आकाशपाताळ एक करील. मग आपलं काय होईल? आई, थोरली आई, सरू आणि दौलती यांना कोण मग? आणि आपण येतेवेळी आईला हे सांगितलं नाही. चूक केली. बेडसगावचा खजिना आपण लुटणार, हे आईला न सांगून आपण चूक केली.

या विचाराची हुरहूर फकिराच्या काळजात बोचत होती; पण गबऱ्या निर्भयपणे त्याला क्षणाक्षणाला पुढंच नेत होता. बळी हातात मुसळासारखी काठी घेऊन झेपा घेत होता. त्याच्या नि:श्वासानं त्याच्या नाकपुड्या फुगल्या होत्या आणि घोंचीकर बळीनं घोड्यावर बसून आपली ती प्रचंड दाढी मुठीत धरली होती. वारा भन्नाट येऊन त्या दाढीला विस्कटीत होता. मुरा वरचेवर मिश्या चापून-चोपून नीट बसवीत होता. सावळा वाघासारखा दिसत होता. एकूण एक माणूस निर्भय होतं. आपण आज मृत्यूशी सामना करणार आहोत, याची कल्पना असूनही ते यत्किंचितही मलूल झाले नव्हते. मात्र त्यांची मनं आपआपल्या घरात — बायकांमुलांत घुटमळत होती नि शरीरं बेडसगावची वाट चालत होती.

ते सर्व बेडसगावच्या गावदरीला आले आणि सूर्य मावळला. कडुसं पडत होतं.

फकिरानं आपल्या माणसांच्या टोळ्या करून गावाच्या पश्चिमेला त्यांना वारणेच्या वाळवंटात जाण्याची सूचना दिली. त्याप्रमाणं सर्व पांगून निघाले आणि सावळा, तायनू, पिरा, साधू, खंडू रामोशी यांना घेऊन फकिरा सरळ गावात घुसून निघाला. नदीच्या काठी जमून थोडी विश्रांती घ्यायची होती. शिवाय गावाला नीज लागल्याशिवाय काहीच हालचाल करता येणं शक्य नव्हतं, म्हणून तो ठरलेल्या ठिकाणी निघाला होता. गावच्या मध्यभागी फकिरा आला, तेव्हा पारावर बरेच लोक बसून गप्पा मारीत होते. त्यांनी फकिराची ती माणसं पाहिली आणि शिंग, हलगी, मशाली, तलवार, भाले, कुऱ्हाडी हे सारं पाहून त्यांनी कान टवकारले. काहींना तर राहवलं नाही. त्यांनी धीर करून विचारलं,

"कोन गाव, पाव्हनं?"

तेव्हा चटकन सावळा म्हणाला,

"बुक्कलपूर!"

"आमचा तमाशा हाय." लगेच तायनू महार म्हणाला, "आमची मानसं म्होरं गेली का?"

"न्हाय बा!" एक गावकरी तरुण चटकन म्हणाला, "पर नाच्या कुठाय वं, तुमचा?"

"त्योच तर म्होरं गेलाया." तायनू म्हणाला, "आज सांजला दिसंल की त्यो तुमास्नी—"

"म्हंजी तुमचा तमाशा हातं, आमच्या गावात व्हनार हाय म्हनता?" एका गावकऱ्यानं चेकाळून विचारलं आणि सावळा म्हणाला,

"हो. बामनाच्या वाड्याम्होरं आज आमचा तमाशा उभा ऱ्हानार हाय!"

"मग काय? मज्जा हाय—" सर्वच गावकरी म्हणाले आणि फकिरा हा त्या तमाशातील सरदार असावा, असा तर्क करू लागले नि फकिरा गावाबाहेर पडला.

— तोंडओळख मोडली होती. वारणाकाठ कष्टाळू शेतकऱ्यांप्रमाणं निश्चल झाला होता. कुठंही हूं की चूं होत नव्हतं. सर्वत्र सामसूम झाली होती. अंधाराच्या जाड थरानं सर्व चराचर झाकलं होतं. आकाशातील चांदण्यांच्या लखलखाटात फक्त वारणामाईचं पात्र अंधारात तळपणाऱ्या तलवारीप्रमाणं चमकत होतं. कुठं तरी एखादं पाखरू विचित्र आवाज काढून गंभीर वातावरणाला धक्का देत होतं.

फकिराची सर्व माणसं एकत्र आली आणि मग सर्वांनी चुळा भरून भाकरी सोडल्या. "ही भाकरी आता शेवटची समजून खाऊ या. कुनाला ठावं, आज कोन मरनार नि कोन जगनार!" फकिरा म्हणाला, "पर आज आपून सरकारी खजिना फोडून — म्हंजी मरनाचं दारच फोडून यमराजाला भाईर काढनार हाय. खजिना लुटीची बातमी ऐकून

सरकार पिसळून उठेल आणि परत आमास्नी त्येच्याबरोबर लढावं लागेल!'' फकिरा बोलत होता. भाकरीच्या कोरा हातात घेऊन सर्व ऐकत होते. भिवा उठला आणि म्हणाला,

''मरता मरता खजिना लुटू या, म्हंजी आपली पोरंबाळं तरी चार दिवस सुखानं खातील. कुनी बघितलंय म्होरचं—'' असं म्हणून त्यानं घास घेतला.

''पर मगाशी सारंच घसरलं.'' तायनू म्हणाला, ''बामनाच्या वाड्याम्होरं तमाशा हाय म्हनून गाव जमून बसलाय नि आमचाच तमाशा व्हनार—''

''काई न्हाय. तुटून पडा!'' पिरा म्हणाला, ''तमाशाला आलेले हौसे गल्लीनं पळतील. कसा तमाशा व्हतोय, त्यो तरी बघा!''

सर्वांची जेवणं झाली. मग कैकांनी गांजा ओढला. तर्र होऊन मग तयारी केली. त्या वेळी रात्र बरीच झाली होती. गाव सामसूम भासत होता. त्याचा अंदाज घेऊन फकिरा म्हणाला —' हं! पेटवा मशाली!—'' एकदम सर्व उठले. मशाली पेटल्या. त्यांच्या उग्र प्रकाशात शांत वारणा जागी झाली. वाहतं पाणी अधिकच अवखळ भासलं. कुऱ्हाडी ठोकून सरळ बसल्या. भाल्यांची फाळं सज्ज झाली आणि घमांडीनं हलगी शेकली. शिंग-हलगी खजिना लुटणारे मर्द जिवावर उदार झाले. हळूच जाऊन घात करणारी भ्याड माणसं ती नव्हती, तर वाजत-गाजत जाऊन, मरणाला जागं करून मग त्याला कवटाळणारी ती मर्द माणसं होती. फकिरा भर्रकन पुढं निघाला.

''हं, चला—'' कोणी तरी हुंकारलं आणि सर्व चालू लागले. गावात शिरताच हलगीवर टिपरू पडलं नि शिंगानं आरोळी ठोकली. सारा प्रदेश थरारला. बेडसगाव एकदम जागा झाला नि कान टवकारून ऐकू लागला.

''कसलं शिंग?—'' गाव बोलला नि पुन्हा स्वत:च उत्तरला, ''असेल वरात!''

हलगीच्या कडाक्यानं गल्ल्या हादरल्या नि शिंगानं भीतिदायी वातावरण पेटलं. फकिरा वादळाप्रमाणं ब्राह्मणाच्या वाड्यापुढं येऊन दाखल झाला. रघुनाथ ब्राह्मणाचा तो वाडा आता जागा झाला होता; परंतु दीड लाखाचा खजिना पोटात घेऊन निर्भय बसला होता. प्रचंड जुन्या चालीचा मजबूत दरवाजा बंद होता आणि त्या दरवाज्यावरच्याच कमानीत एका खिडकीत रघुनाथ येऊन पाहत होता. — वरात का बंड? — या प्रश्नानं त्याचं काळीज फोडलं होतं.

शेवटी त्याचा कयास खरा ठरला. दरोडाच आला, याची खात्री होताच त्यानं बंदूक सज्ज केली.

— फकिरा दाराला भिडला होता. नंग्या तलवारी, कुऱ्हाडी लखलखत होत्या. माणसात बळ उसळत होतं. ''—वाड्यात घुसा!—'' हा एकच आक्रोश त्यांना पुढं रेटीत होता. फकिरा हातात तलवार घेऊन अगदी दारालाच छाती लावून उभा होता. त्यामुळं वर कमानीच्या खिडकीतली बंदूक त्याला नेमू शकत नव्हती; परंतु रघू बामणाला

कड निघाली नाही. त्यानं अंधारात एक गोळी झाडली आणि मग मात्र गावाला खरा प्रकार उमगला. 'दरोडा आला', हा एकच बभ्रा सर्वत्र झाला आणि हिंमतवाली माणसं मिळेल ते हत्यार घेऊन बामणाच्या वाड्याकडे धावली.

पहिली गोळी कडाडताच फकिरा ओरडला, ''मशाली विझवा!''

क्षणात सर्वत्र अंधार दाटला आणि मुरा ओरडला, ''गाव आला. गोफणी जोडा — हाणा!''

घोड्यांवरून आणलेले वारणेच्या वाळवंटातील गोटे गल्लीनं गडगडू लागले. पुढून येणारी माणसं पटापट पडू लागली; परंतु लौकरच दगड संपले. फकिराची माणसं दगड चाचपू लागली आणि पिरा फकिराला म्हणाला,

''दाजी, दगड सरलं, पर गाव मागं सरत न्हाय! साऱ्या गल्ल्या भरल्याती मानसांनी—''

''मग हत्यारं काढा!'' फकिरा म्हणाला, ''हं! आता गय करू नका. दिसंल, त्याला कापीत वाट काढा आनी नदीवर चला. पांगू नगा. एका जिवानं, सारखं लढत म्होरं व्हा!'' — हे ऐकताच सावळा नि चिंचणीकर पिरा, साजूरकर निळू, तायनू, भिमा, मुरा ही बेडर माणसं पिसाट झाली नि त्यांनी त्या गल्ल्या दाबून वाट काढली.

— दरोडा मारून काढला, म्हणून गावानं नि:श्वास टाकला. बामन बंदूक घेऊन खाली आला. कैकांनी स्वत:ची पाठ थोपटली. उद्या गावाला सरकार इनाम देणार, असा विचार कित्येकांच्या डोकीवर नाचू लागला. कोणी अंथरुणावर डोकं टेकलं. हळूहळू सामसूम झाली.

परंतु नदीकाठी फकिरा वेडावला होता. पराजयाची आग त्याचं हृदय जाळीत होती. प्रत्येक माणूस कुढत होता, चरफडत होता. फकिरा आवेगानं म्हणाला,

''हं. बोला-काय करायचं? दरवाज्याला छाती लावून,-जीवन घेऊन आम्ही पळ काढला. जन्मभर पळतोय नि मरन मागं हात धुऊन लागलंय. आम्ही कुठवर पळायचं? मागं पळन्यापरास म्होरं मरनाच्या खाईत पडून मरावं. पळताना येनारं मरान वंगाळ, असं नरकात जातं मानूस! मरान साऱ्यांस्नीच येनार, सारंच मरनार; पर मरनात बी डावं उजवं असतं. कुत्र्याच्या मौतीनं मरनारं मानूस मेलं नि जगलं सारखंच. जर पळून जायचं असंल, तर ही हत्यारं आताच हतं वारनाआईच्या म्होरं जाळून, त्येंची राख कपाळाला लावून, सरळ सरकारला शरन जाऊ या नि जगू या! हत्यारं वागवायचा आमास्नी हक्क न्हाय!''

''मग काय करायचं?'' मुरा म्हणाला, ''गावानं भलताच नेट धरला. नशीब, वाट तर झाली नि सलामत भाईर आलो—''

''सलामत?'' फकिरा तरकटला, ''कवा आम्ही सलामत व्हतो?— आईच्या

पोटातनं भाईर आल्यापासनं—नव्हं, आईच्या पोटात व्हतो, तवापासनं रक्ताचं घोट घेतोय. लढतोय! आमी कवाच सलामत नव्हतो. सांजीरबाच्या माळाला माझा बाप कटून मेला, तवापासनं एक दिवस, एक घडी मला सुखाची लाभली न्हाय नि वैऱ्यांनी ती लाभू दिली न्हाय! इचारा या सावळानानाला —''

सर्व काही शांत होतं. फकिरा बोलत होता आणि ती पेटती माणसं हळूहळू फुलत होती. पुन्हा वारणाकाठ तप्त होत होता.

थोड्याच वेळात थकवा दूर झाला. वारणेचं थंड पाणी पिऊन माणसं तरतरीत झाली आणि पुन्हा त्यांच्यात झुंजेची ऊब उठली.

''हं, चला तर परत!'' तायनू महार उठून म्हणाला, ''आता झटून दार फोडू, न्हाय तर कटून मरू!—''

''चला, चला!'' सर्वच बोलले नि पिरा कुऱ्हाड ठोकून गरजला,—''शेका हलगी. उठा—''

''आता जर बेडसगावाला पाठ दावीन, तर बापाचं नाव सांगनार न्हाय! —'' सावळा गुरगुरला आणि सर्वत्र चेव आला. टक्कर घेऊन मरण्याची ऊर्मी सर्वांच्या अंगात संचारली आणि पुन्हा हलगी शेकली. पुन्हा वाळवंटाचे दगड पोत्यांत भरले नि तलवारी सज्ज झाल्या.

क्षणात पुन्हा हलगीचा कडकडाट झाला. पुन्हा दुप्पट जोरानं शिंग खेकाळलं आणि दाही दिशा दणाणून गेल्या.

पळून गेलेले दरवडेखोर पुन्हा माणसं जमवून आता निर्वाणीची झुंज देण्यासाठी आले; कदाचित त्यांनी पुन्हा दुप्पट माणसं आणली असतील आणि आता ते मुळीच हटणार नाहीत; उलट, आम्ही सरकारसाठी फुकट काय म्हणून मरायचं, असा विचार कैकांनी बोलून दाखविला. खजिना सरकारचा, राखणदार बामण नि लुटणारे चोर. मग आम्ही का मरायचं? असा पोक्त विचार करून गाव स्वस्थ बसला. धडाडीची माणसं पहिल्या उमाळीनं उठली; पण दुसरं कोणीच येत नाही, असं पाहताच त्यांनी काढता पाय घेतला.

— आणि फकिरा रघू बामणाच्या वाड्यापुढं आला.

बंदुकीच्या आटोक्याबाहेर स्वत:ची माणसं उभी करून त्यानं नाकी दाबली, गल्ल्या रोखल्या नि पिरा, मुरा, तायनू, घमा, साधू यांना घेऊन तो दाराला भिडला.

बामणाची बंदूक त्यांच्या डोकीवरून गोळी झुगारीत होती आणि फकिरा दरवाजा फोडण्याचा विचार करीत होता. सर्वत्र दंगल सुरू होती.

एकाएकी पिराला सुचलं आणि तो समोरचे चिरे उचलून त्या दारावर घालू लागला. त्याचा तो पिसाटपणा बळीच्या अंगात शिरला. मग सारीच बलवान माणसं पुढं आली आणि त्यांनी मोठमोठे दगड घालूनच तो प्रचंड दरवाजा मोडून काढला.

खिडकीतून तोंड काढून गोळ्या झाडणारी बंदूक उलटण्यापूर्वीच हत्यारांनी वाड्याचा चौक भरला. मुरा, बळी, घमांडी यांनी परसदार फोडून बंदूक हिसकली होती. हातची बंदूक जाताच रघू बामण अंधारात गडप झाल्यामुळं मुरा बेचैन होऊन त्याला शोधीत होता.

फकिरा चौकात आला तेव्हा बामणाचा प्रतिकार संपूर्ण मोडून पडला होता. वाड्यात अंधार होता. बाहेरची शांतता प्रस्थापित करून मशाली वाड्यात येताच रघू बामण एका खोलीपुढं तलवार घेऊन उभा असलेला दिसला. आपली मुलं, बायका, तरुण मुली यांना एका खोलीत बंद करून तो एकटाच त्यांच्या अब्रूचं रक्षण करण्यासाठी उभा होता. त्याला पाहताच फकिरा म्हणाला,

''कोन हाय त्यो?''

''मी आहे वाड्याचा मालक!'' रघू बामण तीक्ष्ण स्वरात म्हणाला, ''रघुनाथ बामण—''

''बराच जीव धरलाय!'' फकिरा म्हणाला, ''आज ह्या वाड्याचा मालक मी हाय! खजिना कुटं हाय? वाट सोडून बाजूला हो!''

''मी बाजूला सरणार नाही!'' रघू बामण पिसाट होऊन ओरडला, ''आणि कोणाला पुढं येऊ देणार नाही!'' असं म्हणून त्यानं हातातील तलवार झाडली. पोलादी पात्याला जोराचा हिसका बसून ते हत्यार थरारलं. फकिरा एकदम पेटला. हा बामण आपल्याला भीती घालीत आहे, आपल्या पुढं तलवार हासडीत आहे, असं वाटून फकिरा उसळून पुढं धावला, कमरेची तलवार खसकन ओढून तो म्हणाला,

''तलवारीला मी डरनार न्हाय नि खजिना लुटल्यावाचून मागं सरनार न्हाय! माझी वाट सोड! त्वा मरावं, असं मला वाटत न्हाय—''

''पर त्येला मरावंसं वाटतंय न्हवं—'' तायनू पुढं होऊन म्हणाला आणि त्याला अडवून फकिरा खेकसला — ''कुठाय खजिना?''

''तिकडे आहे — तुझ्या पाठीमागच्या खोलीत—'' बामणही तितक्या जोरात खेकसला.

फकिराला आश्चर्य वाटलं. खजिना माझ्याजवळ असून हा त्या खोलीपुढं का उभा आहे? त्या खोलीत नक्कीच काहीतरी असावं, असं वाटून फकिरानं विचारलं, ''तू तितं का उभा?—''

''ह्या खोलीत माझी बायकामुलं आहेत.'' बामण म्हणाला आणि फकिराला त्याचा राग आला. तो दोन पावलं पुढं जाऊन म्हणाला,

''बामना, तूच तेवढा बायकापोरांचा धनी हाईस नि आमी काय बोकडं पाळल्याती? चल, उघड ते दार!''

फकिराचा आवाज वाड्यात घुमला आणि त्या खोलीचं दार खाडकन उघडलं गेलं. रघू बामणाची बायको, भावजय व दोन तरुण मुली अशा चौघी समोर येऊन उभ्या राहिल्या. रघूची पत्नी हात जोडून म्हणाली, "बाबा, हा वाडा धुऊन घेऊन जा. परंतु... ह्या दोन मुलींची लग्नं झालेली नाहीत. मी पदर पसरून भीक मागते. आमची अब्रू..."

असं म्हणून त्या सर्व स्त्रिया आपापल्या अंगावरचे दागिने उतरून ठेवू लागल्या. तो प्रकार पाहून फकिराला भडभडून आलं. तो म्हणाला, "आई, थांब! मी खजिना न्हेनार हाय. तुमास्नी ओरबाडाय मी आलो न्हाय. कारन, आब्रू खाऊन उपाशी मानसं जगत नसत्यात. जावा, आपल्या घरात बसा!"

एवढ्यात खजिन्याच्या खोलीतून पिरा आला नि म्हणाला,

"लोखंडी तिजोरी हाय. किल्ली न्हाय–" किल्ली नाही, असं ऐकताच फकिरानं रघूकडे पाहिलं आणि तो चटकन म्हणाला,

"किल्ली कोल्हापूरला असते–"

"असं?" फकिरा म्हणाला, "मग असं करा. ती तिजोरी तशीच उचला नि निघा!"

"दांडगं धूड हाय त्ये." सावळा म्हणाला नि मग फकिरा विचार करून म्हणाला, "मानसं घेऊन जावा नि गावचा वडार सुतकीसकट आना, चला!"

सावळा, मुरा, बळी हे गावात गेले आणि वडार घेऊन आले. वडारानं आपल्या प्रचंड सुतकीचे घाव घालून तिजोरीचा बुकणा पाडला. पन्नास हजार रुपयांचा ढीग लावला.

रघू बामणाच्या वाड्यात, त्याच्यासमोर फकिरानं ती तिजोरी फोडली आणि वडाराची मजुरी चुकवून, पन्नास हजार रुपये पोत्यात भरून बेडसगाव सोडलं. वारणेला नमस्कार करून ते सर्व लोक एका माळाला लागले होते. पुष्कळ चालून आल्यानंतर फकिरा थांबला आणि त्यानं सर्व रक्कम वाटून देण्याची सूचना केली. वाटण्या करण्यापूर्वी आपल्या गावच्या गोरगरिबांना मदत म्हणून दोन भाग काढून, ते मांगवाड्यात व दुसऱ्या महारवाड्यात देण्याचं ठरवून उरलेली रक्कम सारखी वाटून दिली.

आणि मग आपापली रक्कम कमरेला लावून ते सर्व वाटेगावची वाट चालू लागले. गबऱ्या फकिराला घेऊन मोराप्रमाणं डुलत निघाला होता आणि आता पुढं काय होणार, याचा विचार करण्याऐवजी आता आपली पोरंबाळं काही दिवस सुखात जगतील, याचाच ते विचार करीत होते.

परंतु त्याचवेळी रघू बामण आपल्या घोड्यावर बसून कोल्हापूरचा मार्ग कापीत निघाला होता. खजिना लुटला, ही खबर सरकारात कधी एकदाची देतो, असं त्याला झालं होतं. तो नाक फेंदारून घोड्याला सारखी टाच मारीत होता.

## १३

"लौकरात लौकर फकिराला पकडला पाहिजे! नाही तर पन्नास हजारांपैकी एक पैही हाती लागणार नाही!" बापू खोत बोलत होता, "एवढं मोठं लष्कर आज पंधरा दिवस त्याला पकडू शकत नाही, याचा अर्थच मला समजत नाही!"

"त्याचा अर्थ सरळ आहे." प्रांताधिकारी म्हणाला, "पळणाराची एक वाट आणि शोधणाराच्या हजार वाटा. त्यांचा थांगच लागत नाही, त्यामुळं आमच्या लोकांची दौड व्यर्थ आहे. शिवाय एवढं मोठं धाडस हा मांग करील, यावर आमचा विश्वासच बसत नाही—"

"थांबा, सरकार—" प्रांताला मध्येच अडवून रावसाहेब पाटील म्हणाला, "शेवटी तुम्ही जे बोलला, त्येचा अर्थ आमाला कळत न्हाय!"

"अर्थ सरळ आहे. ऐका—" प्रांत म्हणाला, "जर फकिराला दौलतच हवी होती, तर त्यानं तुमच्या घरावर दरोडा घातला असता. सर्वशक्तिमान सत्तेशी वैर बांधण्याची त्याला गरजच काय होती? म्हणून असं वाटतं, की सरकारी खजिना लुटणारे लोक भयंकरच असले पाहिजेत. सुतकीनं तिजोरी फोडून सरकारी दौलत घेऊन जाणं ..."

प्रांत बोलता बोलता थांबला. त्याचा चेहरा किंचित उग्र झाला आणि चिंतेच्या छटांनी तो झाकळून गेला.

नेर्ल्याच्या माळाला छावण्या पडल्या होत्या. सातारचे सर्व वरिष्ठ अधिकारी येऊन दाखल झाले होते. गोऱ्या फौजेनं बंदुका भरल्या होत्या. नीर काढून गुन्हेगारांना पकडून चिरडून टाकू, या हिरीरीनं सर्व चक्रं फिरत होती — चोराकडून चोर पकडण्याची नीती सरकारनं अवलंबिली होती आणि त्या कार्यात त्या खोऱ्यातील नामवंत गुन्हेगार जवळ केले होते. त्यांना हत्यारं, अन्न, मदत सर्व काही पुरवलं जात होतं. थोडक्यात इंग्रजांनी आकाशपाताळ एक करीत आणलं होतं.

आज छावणीत बापू खोत, रावसाहेब पाटील, कुमजकर कबीरा, धोंडी चौघुला, सातारकर गण्या मांग अशी कैक इरसाल माणसं बसली होती. सर्व बडे अधिकारी तीक्ष्ण नजरेनं त्यांचे चेहरे निरखीत होते. त्यांच्या बोलण्याचा भावार्थ ताडून खऱ्याखोट्याचे धागे जुळविण्याचा खटाटोप करीत होते.

माळाला सर्वत्र शुभ्र छावण्या पसरल्या होत्या आणि त्या छावण्यांतून गोरे लोक हत्यारबंद वावरत होते. जणू काय कोणी तरी त्यांच्याशी युद्धच पुकारलं होतं.

उशीर विचार करून बापू खोत पुन्हा म्हणाला, "सरकारनं हे लक्षात घ्यावं, की फकिरा गावच्या पाटलाला मारून फरारी झाला आहे. पाहिजे तर विचारा ह्या रावसाहेबाला— ह्याचे दात पाडले त्यानं!"

साहेब का हे? — अशा भावार्थानं सर्वच लोक रावसाहेब पाटलाकडे पाहू लागले.

मध्यभागी सर्वांपेक्षा वरिष्ठ अधिकारी बसला होता. तो इंग्रज होता. त्याला मराठी समजत नव्हतं, म्हणून त्याच्या कानाजवळ एक दुभाषा ताठ उभा होता. महत्त्वाचा शब्द किंवा प्रांताच्या चेहऱ्यावर उमटणारा भाव ताडूनच तो इंग्रज दुभाषाला खूण करीत होता आणि चटकन तो दुभाषा नम्रपणे वाकून मराठीचा इंग्रजी तर्जुमा करून सांगत होता. त्याला सर्व लोक जॉन मायकेल म्हणत. तोच आता खजिना लुटणाऱ्यांचा नि:पात करण्यासाठी आला होता. रावसाहेब पाटलाकडे सर्वांनी टवकारून पाहताच जॉनसाहेबानं दुभाषाला विचारलं,

"हा कोण?"

"हा एका खेड्याचा पोलीस पाटील आहे. याच्याच गावच्या एका फकिरा नावाच्या मांगानं खजिना लुटला असावा, असा याचा दावा आहे."

हे ऐकून साहेबाचा चेहरा लालेलाल झाला. निळी बुबुळं गरगरा फिरली आणि तो पुढं रेलून म्हणाला,

"हा फकिरा कसला आहे?"

साहेबाच्या या सवालानं सर्वच गर्भगळित झाले. कोण उत्तर देतो, याची सर्वच वाट पाहू लागले. आणि मगरूर खोत आपला तुटका हात पुढं करून म्हणाला,

"माय-बाप! फकिरा भारी जबरा माणूस आहे. तो सिंहासारखा दिसतो, पण बळ हत्तीचं पाळतो आणि त्याच्या हातात तलवार तर विजेप्रमाणं खेळते."

"हो, हो." रावसाहेब पाटील मध्ये म्हणाला, "मामाचा हात त्यानंच तोडलाय—"

हे ऐकून साहेब गंभीर झाला. चिंतेचा भाव त्याच्या चेहऱ्यावर दाटला. तो पुटपुटला,

"कुठं आहे तो आता?"

"फरारी—" सर्वांनी एकदम उत्तर दिलं आणि साहेब अधिकच गंभीर झाला. तसा कबीरा चेकाळला. त्यानं खोताला खूण केली आणि खोत हळूच म्हणाला, "ह्या फकिराला विष्णुपंत कुलकर्ण्यांची मदत आहे. नव्हे, तो बामन त्याचा कणाच आहे. खजिना फकिरानंच लुटला आहे. जर हे खोटं ठरलं, तर जीभ कापून देईन!—"

"मग पकडा त्याला!" साहेब भडकून उठला आणि सर्वांवर नजर फिरवीत म्हणाला, "फकिराला पकडण्यासाठी जे करावं लागेल, ते करा—"

छावणीत वातावरण एकदम तंग झालं. अधिकाऱ्यांनी कमरेचे पट्टे नीट केलं. हत्यारं चाचपली आणि एकाग्र दृष्टीनं ते पुढील हुकूम ऐकू लागले. साहेब टेबलावर बोटानं रेषा ओढीत म्हणाला,

"खास लष्कर कामाला लावून त्याला वेढा घाला. त्याचबरोबर तो सत्तू आहे, त्यावर सारखं दडपण लावून धरा! काही लोकांनी त्याची ससेहोलपट चालू ठेवा. चला."

आणि मग दुप्पट धावपळ सुरू झाली. सर्व शक्ती फकिरावर रोखली गेली. सर्व विचार फकिराला शोधू लागले. हजारो डोळे, हजारो हत्यारं फकिराच्या मागावर निघाली. शेकडो घोडी दौडू लागली. सर्वांच्या जिभेवर 'फकिरा' हेच शब्द खेळू लागले. आणि—

सूर्य हळूहळू वर आला. किरणं मांगवाड्यात उतरू लागली. अंधाराचा विरविरीत थर दूर होऊ लागला. मांगांची माणसं जागी होऊन पाहू लागली आणि एकदम भयभीत झाली. पोरं गांगरली. स्त्रिया मुलं पोटाशी धरून पळू लागल्या; पण—

पण रात्री अंधारातच इंग्रज सैनिकांनी मांगवाड्याला वेढा दिला होता. सर्व वाटा रोखल्या होत्या. हत्यारांनी मरणाचा हात धरला होता. जागोजाग गोरे शिपाई शिकाऱ्यांप्रमाणं सज्ज झाले होते. मांगवाड्यातील लोकांचा गोंधळ पाहून एका अधिकाऱ्यानं हुकूम सोडला,

"—कोणीही पळायचं नाही. जो पळेल, तो मरेल! आपापल्या घरात बसून राहा!"

ह्या हुकुमानं वातावरण थरारलं. मांग आपआपल्या खोपटापुढे दीनवाणे होऊन बसले आणि आता पुढं काय होणार, याची वाट पाहू लागले. तोच रावसाहेब पाटील ओरडला,

"कोणी घरात जायचं नाही!" असं म्हणून तो अधिकाऱ्याकडे वळून म्हणाला, "साहेब, ह्यांचा दारकोंड केला पाहिजे!"

"दारकोंड?" मांगाची खोपटं न्याहाळीत तो साहेब म्हणाला, "अरे, पण ह्यांच्या घरांना दारंच नाहीत; मग ह्यांचा दारकोंड करण्याचा प्रश्नच कसा येतो? माझ्या हे लक्षातच येत नाही. म्हणे, दारकोंड करा! दारं नसल्यावर दारकोंड!" असं म्हणून तो साहेब पोट धरून हसू लागला.

"हासताय काय?" पाटील चिडला.

"मग काय रडू?" तो अधिकारी बिथरला.

"मी दारकोंड करून दावतो!" पाटील म्हणाला.

"मग करा ना!" असं म्हणून तो अधिकारी डोळे वटारून पाहू लागला आणि पाटील पुढं होऊन म्हणाला, "ह्या निवडुंगाच्या डांबांनी आनी बाभळीच्या-नांग्यांनी साऱ्या खोपींची दारं कुडून टाका!"

"हां—हे पटलं." साहेबानं मान डोलावली.

थोड्याच वेळात काटेरी कुंपण घेऊन, सर्व घरांची दारं बंद करून, मांगांचा दारकोंड पूर्ण करण्यात आला. सर्व माणसं आपापल्या दारात निर्वासित होऊन बसली आणि

त्यांच्यावर लष्करानं कडक पहारा सुरू केला.

मांगांचा आणि महारांचा दारकोंड झाला होता. त्या सर्व लोकांना जनावरांप्रमाणं वागवण्यात येत होतं. ती माणसं विचार करीत होती, की हा अन्याय आम्हांवर का? फकिराला पकडण्यासाठी आम्हांला यांनी अडकवलं आहे याचा अर्थ काय? बरोबर आहे. फकिरा आमचा आहे, म्हणून आम्हांलाच यांनी चिरडून टाकायचा बेत केला आहे; पण आमचा दारकोंड करून का यांना तो फकिरा सापडणार आहे?

— आणि त्याच वेळी निवडक सैनिक आणि बलिष्ठ घोडे घेऊन बाबरखान फकिराच्या मागे धावत होता आणि फौज पाठीवर घेऊन फकिरा सह्याद्रीतून दौडत होता. साधू, बळी, मुरा, सावळा, तायनू महार, निळू नि चिंचणीकर पिरा, भिवा असे निवडक साथीदार घेऊन तो झुकांड्या देत होता. गबऱ्याला जणू ती धावपळ कळून चुकली होती. त्याचा तर पायच जमिनीवर ठरत नव्हता. कीर्र झाडीतून, उभ्या कड्यावरून, सपाट प्रदेशातून तो फकिराला घेऊन वाऱ्याप्रमाणं धावत होता. त्याच्या पाठीवर पळून पळून कैक सरकारी घोडी कोकदम्याला आली होती. कैकांनी आपली घोडी बदलून घेतली होती. कैक सैनिक बदलून गेले होते.

कारण फकिराला कैद करणं सोपं नव्हतं. पिच्छा करणं आणि कैद करणं यातील भेद सैनिकांना उमगला होता. जर का हा फकिरा अचानक उलटला, तर सारंच मुसळ केरात जायचं, ही भीती सर्वांनाच वाटत होती, म्हणून ते पिच्छा करणारेही जीव राखूनच पाठलाग करीत होते.

— आणि फकिरा आपली नेक माणसं घेऊन नि हत्यारं नीट धरूनच पळ काढीत होता. पळ काढताना उलटण्याचीही तयारी त्यानं केली होती. मध्येच उलटून शत्रूला चेचून काढायचं, असा विचार त्यानं केला होता.

तब्बल आठ दिवस धावपळ करून शेवटी फकिरा एका डोंगरावर जाऊन पोहोचला होता. मागावरच्या लोकांना घोटाळ्यात घालूनच ते उंच शिखर त्यानं गाठलं होतं. आज तो दमगीर होऊन एका झाडाखाली बसून विचार करीत होता. आता लौकरच लौकर उलटून मागची माणसं कापून काढलीच पाहिजेत, तरच उसासा घेता येईल.

— आणि बाकीचे जोडीदार पुढं निघण्याची तयारी करीत होते. सर्वांनी जेवणं आटोपली. पुन्हा खोगीर घातलं, तेव्हा फकिरा म्हणाला,

"आता किती पळायचं? आपले सारे लोक कुठं हायती, त्याचा पत्ता न्हाय. मनगटानं मजबूत असलेल्या मानसांची मला आज गरज व्हती; पन तीच न्हायती!"

"कय इचार हाय?" सावळानं विचारलं.

"काय न्हाय–" फकिरा म्हणाला, "पिच्छा करनारास्नी हात दावून मगच पुढं जावं, असं वाटतंय–"

"मग ठरवा तर—" मुरा म्हणाला.

"ठरवायचं एवढंच." फकिरा म्हणाला, "आता सरकारच्या हालचालींची खबर लागेल. जर सरकार थंड असेल, तर आपुन आपली मानसं जमवून कुटं तरी उलटून ह्या मागं लागलेल्या भुतांचा निकाल लावायचा!"

सूर्य मावळेपर्यंत फकिरा त्या डोंगरावर थांबला होता, कारण आजच घमांडी येणार होता नि घराकडची खबर आणणार होता. फकिराचं सारं लक्ष घराकडं लागलं होतं. रकमा वाटून घेऊन बरोबरची सर्व माणसं आपापल्या गावी गेली होती. त्यांचं काय झालं असेल? का कोणाला अटक झाली आहे? जर एखादा आपल्यांतील माणूस पकडला गेला, तर? आणि त्याच्याकडे मुद्देमाल सापडला, तर इंग्रज चैन पडू देणार नाही आणि स्वत:ही चैन घेणार नाही. आता हा जो पाठीवर बाबरखान पडला आहे, तो खजिन्यासाठीच; परंतु जर भरीला भर पडून एखादा आमचाच माणूस पकडला गेला नि त्यानं गुन्हा कबूल केला, तर? ... अशा अनेक विचारांनी फकिरा आज चिंतातुर झाला होता. तो निर्वाणीचा विचार करीत होता. पाठीवर असलेल्या बाबरखानावर उलटून त्याचा नि:पात करायचा, हे ऐकून सर्वच गंभीर झाले. सावळा म्हणाला,

"वाईच दमानं घ्या. पार जिवावरच आलं, तर मग जीव देऊ, न्हाय तर जीव घेऊ. आता भाकरी खाऊ या—"

तिन्हीसांज झाली होती. भाकरी खाऊन फकिरा एका जाळीत पडला होता. घमांडी येणार म्हणून तो त्याची वाट पाहत होता. सावल्या लांबत होत्या. सूर्याच्या अस्तित्वाला ओहोटी लागली होती, अंधाराचा काळा पडदा जगावर पसरला जात होता. किरणांतली प्रखरता शीतल होऊन ती उगीचच धडपड करीत होती. रानटी वारा गवतात शिरून त्याला पाडीत होता. उंच झाडं वाऱ्यानं कापरं भरल्याप्रमाणं कापत होती. पाखरं आपापल्या घरट्यापुढं येऊन बसली होती. त्यांनी किलकिलाट आरंभला होता. आपली तीक्ष्ण नखं मुठीत घेऊन रानमांजरं त्या पाखरांवर टपली होती.

खाली तळवटाचा सुपीक प्रदेश अस्पष्ट दिसत होता. हिरवे मळे काळ्या ठिपक्यांचा आकार घेत होते. गावं घरांचा ढीग भासत होती आणि त्यांच्यावर धुराचे ढग तरळत होते.

नकळत आज उद्यात एकरूप झाला आणि सांज रात्रीच्या अंकावर निद्रावश झाली. चराचर लुप्त झालं. दृष्टीतील अपार लांबी मर्यादित झाली. सर्वत्र बिकट काळोख दाटला.

फकिरा, मुरा, पिरा, सावळा, बळी, साधू एका जाळीत येऊन सावध बसले. घमांडी येणार होता. त्यानं लौकर यावं, असं त्यांना वाटत होतं. त्याचबरोबर पाठलाग करणाऱ्यांचा अंदाज नव्हता. कदाचित तेही डोंगर चढण्याचा संभव होता. त्यात तो कडव्या नागासारखा बाबरखान फौजदार कुठं नि केव्हा वार करील, याचा नेम नव्हता.

एकाएकी तळवटाला गडबड झाली आणि फकिरा चटकन उठला. कानोसा घेऊ लागला. तोच तायनू म्हणाला, ''धनगराचं मेंढरू लांडग्यानं पळवलं असंल.'' आणि थोड्या वेळानं एक माणूस त्यांच्याच रोखानं येताना दिसला. सावळा पुढं होऊन ओरडला, ''कोन हाय त्ये?''

''मी हाय घमांडी–''

घमांडी आल्याचं कळताच त्यांचा आनंद गगनात मावेनासा झाला. त्या सर्वांनी एकदम घमांडीला मिठ्या मारल्या. मग ते सर्व एका खडकावर बसले आणि फकिरा म्हणाला, ''खाली गडबड कसली झाली?''

''बाबरखान परतला.''

हे ऐकून सर्वांनी सुटकेचा निःश्वास टाकला. त्यांच्या उरावरचं ओझंच जणू दूर झालं आणि मोकळी झालेली मनं क्षणात उल्हसित होऊन हासू लागली; परंतु फकिरा गंभीर होऊन म्हणाला,

''ह्यो बाबरखान परतला का?''

''का म्हंजी?'' सावळा म्हणाला, ''साप मानसाला भितो नि मानूस सापाला टराकतं, तसंच हाय ह्ये!''

मग ते सर्व घमांडीभोवती बसून ऐकू लागले आणि आणलेल्या खबरा तो सांगू लागला. घमांडी म्हणाला,

''बाबरखान, बापू खोत, चौगुला, कबीरा आणि सरकार ह्यांनी रान चाळून काढलंय. आज सकाळी आपली सारी मानसं पकडून नेर्ल्याला न्हेली. पंतास्नी बी छावनीचं बोलावनं आलं व्हतं, त्ये जानार व्हतं–''

''कुनाकुणाला अटक झाली?'' फकिरानं चटकन विचारलं आणि घमांडी म्हणाला,

''एंकून एक मानूस न्हेलंय. दौलूआबा, राधाआई, म्हातारी आई नि सरूकाकू–म्हंजी मांगवाड्यात औसदाला मानूस ठिवलं न्हाय!''

''म्हंजी? सारी मानसं न्हेली?'' बळीनं आश्चर्यानं विचारले.

''एक मानूस न्हाय मांगवाड्यात.'' घमांडी म्हणाला, ''आनी दारकोंड केलाया. समद्या दारास्नी बाभळीच्या काट्या लावून दारं कुडल्याती. ढोरं-गुरं उपाशी मरत्याती–''

''मग घात झाला–'' मुरा तरमळला.

''घात?'' घमांडी रडकुंडीला येऊन म्हणाला, ''सरकारी शिपाई मुंगीवानी पसरलाय. दिसलं, त्येला अटक करत्यात. जो त्यो म्हनतो, फकिरानंच खजिना लुटला–''

हे ऐकून ते सर्व गंभीर झाले. फकिरा उदास झाला. तो खिन्न होऊन म्हणाला,

''–घरटंच मोडलं माझं नि इचवाच्या पेवात पडलोय. आता पुढं काय?''

एकाएकी त्या जाळीत वातावरण तापलं. फकिराच्या डोळ्यांपुढं अटक करून नेलेली राधा, दौलती, राही, सरू यांच्या मूर्ती उभ्या राहिल्या. म्हातारीकोतारी, बायकापोरं काय करीत असतील?

फकिराला सरकारच्या या करणीची चीड आली. तो उद्विग्न होऊन म्हणाला,

"आता आपुन काई तरी केलंच पायजी! —"

"काय करायचं?" मुरा उद्गारला आणि फकिरा मुराला म्हणाला,

"अन्ना, आताच्या आता तुम्ही कुमजंला जायचं आनी सत्तूला गाठून त्येला ह्ये सारं सांगायचं. नेर्ल्याची ही छावनी मारूनच काढली पायजी—"

"बरं, आनी काय करू?" मुरानं विचारलं.

— आणि फकिरा म्हणाला,

"कंच्या दिसी नि कंच्या येळेला सत्तू छावनीवर येनार, त्ये पक्कं करा. म्हंजी आपुन बी त्या येळंला आपली मानसं जमवून छावनीला भिडायचं नि काढायची छावनीच मारून. आता दुसरा इलाजच न्हाय. मरान हे येणारच हाय. एवढंच की त्ये आलंच, तर वाईच लौकर तरी यील!"

"पर म्या परत कुठं यीयाचं?" मुरानं विचारलं आणि फकिरा म्हणाला,

"आता रातोरात दौड मारा. सत्तूला भेटून समदं ठरवून उद्या रातचं सातदऱ्यात या. तवर मी इकडं समदी तयारी करून वाट बघतो." असं म्हणून त्यानं आकाशात नजर झुगारली.

निरभ्र आकाशात चांदण्या लुकलुकत होत्या. चांगण्यांचा रुपेरी रस त्या विशाल वनराजीवर ओसंडत होता. ती कीर्र झाडी शांत भासत होती आणि तो महाराष्ट्राचा - बंडखोर महाराष्ट्राचा - आत्मा सह्याद्री अचल बसला होता. आज युगानुयुगं त्यानं कैक बंडखोरांना त्या एका जागी बसून - अचल बसूनच - अमोल साहाय्य केलं होतं. तो देशभक्तांचा अग्रणी, तो मराठी शाहिरांचा स्फूर्तिदाता आज जणू फकिराचा शब्द न् शब्द ऐकत होता आणि गालात हसत होता. त्यानंच कैक देशभक्तांना आपल्या कुशीत जागा दिली होती आणि कैक बलाढ्य पुंडांना, आक्रमकांना गारद केलं होतं. तो महाराष्ट्राचं कुलदैवत सह्यगिरी आज भलताच शांत नि गंभीर भासत होता.

कुमजेला जाऊन, सत्तूच्या मदतीनं छावणीवर हल्ला करण्याचा बेत नक्की करून, फकिरा उठला. मुरानं फकिराच्या गळ्याला मिठी मारली. दोघे कडकडून भेटले आणि लगेच मुरा घोड्यावर बसला.

"मारा दौड—" फकिरा म्हणाला, "वकूत कवा तरी येतो नि आला तर त्यो न्हात न्हाय. छावनीवरचा हल्ला लांबनीवर टाकू नगा! मी बी बसत न्हाय. जर त्यो बाबरखान पाठीवर पडला, तर उद्याच मी उलटून त्याला मारून काढतो. जावा आता.

उद्या लांब न्हाय! जपून...''

भर्रकन मुरानं लगाम ओढला. त्याचं घोडं जाळीआड झालं नि उसळून दौडू लागलं. त्याच्या टापांनी जंगल जागं झालं. जणू त्या सह्याद्रीचं विशाल हृदयच धडधडत होतं. फकिरा कान लावून उशीर ऐकत उभा राहिला. हळूहळू मुरा अंधारात दूर गेला आणि —

— आणि फकिरा झेप घेऊन गबऱ्यावर बसला आणि गबऱ्या चालू लागला. आपण कुठं निघालो आहोत, याचा कुणालाच पत्ता नव्हता.

अर्धा डोंगर उतरल्यावर खंडू रामोशी म्हणाला,

''कुठं जायचं आपुन?''

''नाईक, कुठं जायचं, हे परत मला इचारू नगा!'' फकिरा किंचित चिडक्या स्वरात म्हणाला, ''आता मी वाऱ्यावर पाचोळा—''

''असं म्हनू नगा.'' रामोशी आवाज चढवून म्हणाला, ''हातात शिर घेऊन फिरनारानं पाचोळा होऊन चालत न्हाय—''

''खरं हाय, नाईक?'' — गबऱ्यावरून उतरून फकिरा खंडूच्या खांद्यावर हात टाकून म्हणाला, ''मी हादरलो—''

''हादरू नगा.'' खंडू म्हणाला, ''टाचा रुतवून लढत लढत टाचंवर मरू या!''

''शाबास!'' फकिरा म्हणाला, ''मरू या! नेर्ल्याच्या माळाला आमची अब्रू, आमची अवलाद नि आमची आई कृस्ना दावनीला बांधनाराची छावनी कापून काढीत मरू या! आपुन मरू, पन ह्यो मुलूख मरनार न्हाय. ह्यो डोंगर मरनार न्हाय. ही झाडं... ही माती... ह्यास्नी मरान न्हाय!''

बोलत बोलत ते डोंगर उतरले.

## १४

सूर्य मावळत होता. गंभीर चेहरा करून विष्णुपंत छावणीबाहेर पडले आणि आपल्या घोड्याकडे निघाले. एका झाडाखाली भैरू रामोशी घोडा धरून त्यांची वाट पाहत होता. चालता चालता पंतांनी वळून पाहिलं आणि दौलतीनं हाक मारली,

''गावकर, मी दौलती हातं हाय—''

पंत नकळत वळून दौलतीकडे गेले आणि त्याच्यापुढं निश्चल उभे राहिले. हजारो लोकांच्या दावणीत दौलतीला बांधलेला होता. राधाबाई, म्हातारी राहीबाई, तरुण सरू आणि आपल्या गावची ती मांगं पाहून पंतांना भडभडून आलं. ते घोगऱ्या आवाजात

म्हणाले, "आलिया भोगासी सादर असावं. मी साहेबाशी बोलून पाहिलं; परंतु फकिरा हजर होईपर्यंत तुम्हाला त्यांनी ओलीस ठेवलं आहे, सोडणार नाही, असं म्हणतात. दौलती, धन्य तुझी! किती घाव घेत राहणार तू? खरंच, तू वज्रदेही आहेस!"

"आबा!" दौलती कापऱ्या स्वरात म्हणाला, "ही माझी नातसून कैदी हाय नि तिच्या पोटात बाळ हाय. त्ये बी कैदी हाय. ही सारी म्हातारी, पोरं, साऱ्यास्नी हे दिस यावं, असं काय पाप केलंय?..."

"आता रडू नका," पंत म्हणाले, "फकिराची भेट घेऊन त्याला सांगतो—"

"नगा, नगा!" राधा केविलवाणा चेहरा करून म्हणाली, "आमी अस्सं मरू, पन त्येला म्हनावं, तू हजर होऊ नकं."

"हो, हो—नकं." दौलती म्हणाला, "आमचं काय उरलंय? पन बाबूनं हजर व्हायला नकं. आमची काळजी करू नकं, म्हनावं."

दौलती, राधा बोलत होती. राही खाली मान घालून रडत होती. सरूचे डोळे रडून सुजले होते. तो प्रसंग तिला नवाच होता. पंत निघाले, तेव्हा सरूनं त्यांच्या पायांपुढं बंदिस्त हात टेकून नमस्कार केला आणि पंतांनी उपरण्यानं डोळे पुसले.

"—जावा, दिस बुडंल—" दौलती मिश्या सरळ करीत खणखणीत आवाजात म्हणाला.

पंत घरी आले, परंतु आज त्यांना कशातच बरं वाटत नव्हतं. ते आज जेवलेही नाहीत. नेर्ल्याच्या माळाची ती माणसांची स्थिती, ते हाल, तो अन्याय, यानं त्यांचं मनच विटलं होतं. या राज्यात हा एवढा भयंकर अत्याचार व्हावा, हे त्यांना मान्य नव्हतं. आपण प्रत्यक्ष यमपुरीच पाहून आलो आहोत, असं त्यांना वाटत होतं.

लगीला लटकणारा कंदील शांत जळत होता. सोप्यात पंत एकटेच बसले होते. सर्वत्र सामसूम होती. निम्मी रात्र होत आली होती. पंत उदास झाले होते. त्यांच्या पल्लेदार करड्या मिश्या पिंजारल्या होत्या. हे उघडेच बसले होते. आज आपणास झोप येणार नाही, याची त्यांना कल्पना आली होती. आपल्याला फकिरा कसा भेटणार, हा प्रश्न त्यांच्या मनात डाचत होता.

इतक्यात अंगणात पावलं वाजली. पंत चमकून पाहू लागले आणि बापू खोत व त्याचा जावई रावसाहेब पाटील सोप्यात आले. त्यांना पाहून पंतांना आश्चर्य वाटलं. त्यांनी विचारलं, "असे अपरात्री इकडं कुठं?"

"तुमच्याकडेच." खोत म्हणाला, " मांग लोकांस्नी सोडावं, म्हणून तुम्ही रदबदली करायला गेला होता, असं मला समजलं—"

"खोटं!—" पंत म्हणाले, "सरकारनं मला गावकामगार म्हणून बोलावणं केलं होतं. त्याचप्रमाणं मी गेलो होतो—"

"असं असं! —" खोत म्हणाला, "ठीक, आता पुढेमागे तशी रदबदली करू नका. कारण त्यास्नी मदत करू नका, एवढंच आमचं सांगणं—"

"मी कुणाचं सांगणं ऐकत नाही!" पंत एकदम चिडून गरजले. "मला विनंती करा. सांगणं सांगणारे तुम्ही कोण? आणि कुणासाठी मी रदबदली करावी की न करावी, हा माझा प्रश्न आहे!"

"पंत, ऐका—" रावसाहेब पाटील गुरकला, "असं तरकटू नगा. ही गावपांढर माझी हाय. ह्या पांढरीत नांदायचं असेल, तर सरळ नांदा! न्हाय तर—"

"नाही तर काय करणार?" पंत मध्येच ओरडले आणि पाटील म्हणाला,

"आमीच तुमास्नी सरळ करू—"

"असं?" पंत शांत होऊन म्हणाले, "तर मग आता ज्योत्यावरून प्रथम खाली व्हा! चला!"

"आवं, पर ऐका—" खोत म्हणाला आणि पंत पुन्हा ओरडले,

"प्रथम येथून चालते व्हा!"

बापू खोत नि पाटील निघून गेले आणि पंतांचं मन पुन्हा पेटलं. तो प्रकार त्यांच्या आयुष्यात नवाच होता. आता आपलंही जीवित सुरक्षित नाही, याची त्यांना कल्पना आली. आणि ते खिन्न होऊन पुटपुटले,

"माणसानं इतकं दुष्ट आणि इतकं मूर्ख नसावं!"

बाहेर रात्र निम्मी होत आली होती. कंटाळा आला, म्हणून अंग टाकण्याचा विचार करून पंत उठले, तोच फकिरा सोप्यात आला. पाहताच त्यांचा कंटाळा नाहीसा झाला. दाट भुवया चढवीत आश्चर्यानं ते म्हणाले,

"फकिरा, इकडं कुणीकडं? आणि एकटाच?"

"त्ये का?—" फकिरा म्हणाला, "आपली सारी फौज घेऊन आलोय!"

"असं?" पंत बाहेर पाहत उद्‌गारले, खंडू, साधू, पिरा, घमांडी उभे होते. बाकीची सर्व माणसं फकिरानं गावंदरीला निरनिराळ्या जागी टोळ्या करून बसविली होती आणि निवडक माणसं घेऊनच तो गावात आला होता. अंगणातील पाच-सहा गडी पाहून पंत म्हणाले, "फकिरा, तुझे वैरी जागोजागी टपून आहेत. तू असा एकट्यानं वावरणं धोक्याचं आहे!"

"खरंच पन्नास गडी संगं घेऊन आलोय!" फकिरा म्हणाला, "मला शेवटचा आशीर्वाद द्या—"

"थांब—" पंत डोकीवर मंदिल ठेवून म्हणाले, "चल, दूर रानात जाऊ. जरा बोलायचं आहे. मी आजच छावणीकडून आलो. ते सारं सांगतो तुला—" असं म्हणून ते अंगण उतरून चालू लागले आणि फकिरा त्यांच्यामागे निघाला. उशीर चालून गावाबाहेर

आल्यानंतर पंत एका आंब्याखाली बसले. ऐसपैस बसून चिंतायुक्त स्वरात ते बोलू लागले आणि फकिरा पुढं बसून ऐकू लागला. पंत म्हणाले,

"सरकारी विचार निर्वाणीचा झाला आहे. ते तुला कैद करूनच दम घेणार, असं वाटू लागलं आहे. तू हाती यावास, म्हणून त्यांनी आकाशपाताळ एक केलं आहे. हजारो निरपराध लोकांना पकडून माळाला डांबून टाकलं आहे. माणसं टाचा घासून मरणाची वाट पाहत आहेत. माझ्या अंगावर काटा उभा राहिला तो सर्व प्रकार पाहून–"

"मला ह्येच कळेना–" फकिरा म्हणाला, "मला कैद करन्यासाठी सारा मुलूख धारंवर का धरलाय?"

"मी छावणीत हा प्रश्न विचारला." पंत गंभीरपणे म्हणाले, "तेव्हा जॉनसाहेबानं उत्तर दिलं, की नाक दाबल्यावर तोंड उघडतं! यावर मी सवाल केला, की दु:ख तिथं डाग द्या–"

"मंग काय म्हनाला त्यो?" बळीनं चटकन विचारलं आणि पंत उत्तरले,

"ते म्हणतात, दिव्य औषधीनं बऱ्या न होणाऱ्या रोगावर शस्त्रक्रियाच करणं प्राप्त आहे. म्हणून त्यांनी तुझी सर्व माणसं पकडून आता ओलीस ठेवली आहेत. जोपर्यंत तू हाती येत नाहीस, तोपर्यंत कैद झालेला एकही माणूस मुक्त होणार नाही, ही दगडावरची रेघ आहे!"

"छावनीत आमचं कोन दिसलं का तुमाला?" फकिरानं विचारलं.

"सर्वच दिसले नि भेटले." पंत उत्तरले.

"आई?"

"हो."

"आबा?"

"तोही."

"नारू म्हातारा?"

"सर्वच भेटले." पंत वैतागून म्हणाले, "त्या प्रसंगाची आठवण नको! माणसांना इतकं क्रूरपणे वागवल्याचं दुसरं उदाहरण नाही! तरणी, म्हातारी, पोरं सर्वांना ओळीनं एकाच दावणीत गुरांप्रमाणं डांबलं आहे. ती छावणी नव्हे – फकिरा, यमपुरी उतरली आहे त्या माळाला! येताना मी दौलती, राधा यांना भेटून बोलून आलो. सूनबाईच्या हाताच्या दोऱ्या पाहून काळजाला आग लागली!

पंत एकदम थांबले. पुढचे शब्द जणू त्यांना आठवत नव्हते. उशीर कोणीच बोललं नाही. सर्वांच्या चक्षूंपुढं छावणी उभी राहिली.

"आई काय म्हनली?" फकिरानं विचारलं.

"त्या सर्वांचं मत आहे, की तू सापडू नयेस!" पंत म्हणाले, "त्या सर्वांनी आता दु:खाला पाठ दिली आहे ... पण ..."

"पन काय?"

"पण—" पंत म्हणाले, "तू हजर व्हावंस, असा साहेबांचा आग्रह आहे नि तू हजर होईपर्यंत ती माणसं जगण्याची आशाच नाही!"

"मग मी काय करू?"

"तुम्ही हजर व्हावं."

"मी हजर व्हायचं?"

"एकट्यानं नव्हे—"

"मग कुनी कुनी?"

"फकिरा, पिरा, मुरा, बळी, तायनू, सावळा, हरी, खंडू, भिवा—" पंत म्हणाले, "आणि दहावा घोंचीकर बळी सकाळीच कैद झाला."

"कैद झाला?" सर्वच चमकून उद्गारले आणि पंत म्हणाले,

"म्हणजे त्याला कैद केला. त्यानं कऱ्हाडच्या कृष्णा पुलावर लष्कराशी गर्दी केली; परंतु कैद झाल्यानंतर शिपायांनी व खोतानं त्याची दाढी उपटून काढली. तो मला दिसला, तेव्हा प्रथम मी त्याला ओळखलंच नाही. तो जखमीही झाला आहे—"

"मग घात झाला!" फकिरा म्हणाला, "आता जगन्यात राम उरला न्हाय. आता मरन्यात जन्माचं सार्थक व्हनार हाय! बळी ..." असं म्हणून फकिरानं नेर्ल्याच्या रोखानं वळून पाहिलं आणि चटकन उठून तो पुन्हा म्हणाला, "आबा, मी उद्याच ती छावनी गारद करनार!"

"छावणी मारून काढणं कुवतीबाहेरचं आहे." पंत म्हणाले, "लष्कराशी तुम्ही कशी झुंज देणार? तिथं बखतबंद लोकांची फौज आहे—"

"असेल!" फकिरा मध्येच म्हणाला, "मी कत्तल करीत करीत कटून जाईन! हजर होऊन वैऱ्याहाती मान देन्यापरास मरनालाच जीव देऊन मोकळा व्हयीन—"

"परंतु पुढं काय?" पंत म्हणाले, "आठ लोकांची गर्दन जाणं नि आठशांनी कत्तल करून घेणं, यातून कोणतं ठीक दिसेल, ते कर; परंतु लौकर कर आणि त्या गोरगरिबांचे प्राण वाचव! तो खोत, तो कबीरा, हा पाटील हे इरेलाच पडले आहेत. माझंही जीवित धोक्यात आहे, फकिरा! आत्ताच मला खोत धमकी देऊन गेला!—"

"मी वाईच इचार करतू." फकिरा म्हणाला, "साऱ्यास्नी इचारून, काय करायचं, त्ये नक्की करून मग मी तुमाला भेटतो."

"ठीक. तसं कर!" पंत म्हणाले आणि उठले व घराकडे निघाले. फकिरा रानात चालू लागला. पांगून ठेवलेली माणसं जमवून, त्या सर्वांचा विचार घेऊनच काय ते निश्चित

करायचं, असा बेत करून तो निघाला.

चांदणं दुधासारखं वर्षत होतं. सृष्टी रुपेरी प्रकाशानं न्हाऊन निघाली होती. वातावरण धुंद झालं होतं. विहिरीवरच्या कण्हेरीची फुलं आपला सुगंध पसरवीत होती आणि त्या मळ्याला लागून असलेल्या मसणवटीत घाणेरीला बहर आला होता.

मसणवटी नि मळा यांमध्ये सावळा व भिवा आपली दहा माणसं घेऊन बसले होते. बाकीची माणसं घोंगड्यांच्या खालवरी घालून पडली होती. सावळा आणि भिवा यांनी गांजा ओढल्यामुळे ते तर्र झाले होते. जे सुचेल ते बोलत होते. वाऱ्यानं गांज्याची तार चढतच होती. भिवा चेकाळून गेला होता. तो हळूच म्हणाला,

"पाव्हनं, आता असं करू या—"

"कसं करू या?" सावळ्या हुंकारला आणि भिवा म्हणाला,

"फकिरा लवकर येत न्हाय, तवर तुमी एक गोष्ट सांगा. मी एक लावनी म्हनतो—"

"काय? लावनी?" सावळा आश्चर्यानं म्हणाला, "आवं तुमी लावनी म्हननार?"

"का? का?" भिवा चिडक्या स्वरात म्हणाला.

"मला काय समजता तुमी? माझ्यावानी गानारा आमच्या गावात न्हाय दुसरा!—"

"त्ये खरं असंल, वं—" सावळा म्हणाला.

"पर हतं मळा जवळ हाय नि आपुन पाटलाच्या गावंदरीला बसलोय—"

"तुमी गुमान गोष्ट सांगा!" भिवा गुरुकला, "आनी मग ऐका ह्या सरज्याची लावनी!"

"बरं, बाबा!" सावळा म्हणाला, "आदी गोस्ट सुरू करतो. ऐका—"

"एका कुंभाराचं एक गाढव व्हतं. त्ये रोज दिवसभर काम करून थकत व्हतं, म्हनून कुंभार त्येला रातचा रानात सोडीत व्हता नि ते गाढव लोकांची उभी पिकं खात व्हतं. गहू, हरबरा, ऊस, गाजरं अशी पिकं चोरून खाऊन त्ये गाढव माजलं. अगदी भोपळ्यागत टमटमीत झालं—"

"म्हंजी रातभर चोरी करून दिसाचं घरला यीयाचं त्ये?" भिवानं मध्येच विचारलं आणि सावळा म्हणाला.

"हो. म्होरं त्या गाढवाला येक कोल्हा भेटला. त्यो बी चोर. मग त्या दोघांची जमली दोस्ती. आनी दोघं बी रातभर चोरून खात फिरू लागलं. पर कुनाच्या बाला घावायचं न्हाय ते दोघं!"

"बरं, म्होरं?" भिवानं हुंकार दिला आणि सावळा म्हणाला,

"एकदा अशीच चांदनी रात व्हती. गाढव नि त्यो कोल्हा एका मळ्यात शिरून खात व्हतं. पोटभर खाल्ल्यावर गाढव कोल्ह्याला म्हनतं, 'ए गड्या, मी गानं म्हनू का' पन कोल्हा टराकला. त्यो म्हनला, 'मामा, तुमचा आवाज दांडगा हाय. तुमी गानं कसं म्हननार?' तवा त्या गाढवाला राग आला नि त्ये बिथरलं नि कोल्ह्याला म्हनलं, 'ए, भडव्या, मला काय समजतोस? मला का गानं येत न्हाय व्हय?' "

"मग कोल्हा काय म्हनला?" भिवानं विचारलं आणि सावळा म्हणाला,

"त्यो काय म्हननार? त्यो म्हनाला, 'गाढवमामा, तुमी हातं गानं म्हना. मी त्या बांधावर बसून मळंकरी येतील, त्येस्नी बघतो.' कोल्हा दूर गेला. एका बांधावर बसला आनी त्या गाढवानं आपलं भसाडं गानं सुरू केलं. त्याबरोबर मळंकऱ्यांस्नी जाग आली. त्येंनी काठ्या काढल्या आनी त्या गाढवाला मार मारून खाली पाडलं. पार पडलं गाढव आनी मंग मळंकऱ्यांनी एक उखळ आनून त्या गाढवाच्या गळ्यात बांधलं. त्ये जितं व्हयील नि पळंल, म्हनून."

"आनी, वं, मंग?" भिवा उद्‌गारला.

"आनी काय?" सावळा म्हणाला, "उशिरानं गाढव जागं झालं आनी उखळासकट पळाया लागलं. तवा कोल्हा म्हनला, 'मामा, गानं चांगलं व्हतं. म्हनूनच तुमास्नी ह्यो मनी बक्षीस मिळालं'—जाली माजी गोस्ट. हं करा सुरू गानं—"

ही गोष्ट भिवाला पटली. तो एकाएकी पोट धरून हसू लागला. त्याच्या भयंकर हसण्यानं मळंकरी जागे झाले आणि मसणवटीत भूतच उठलं, असं समजून पळू लागले.

भिवा पोट धरून हसत म्हणाला,

"नका, नका. माझं गानं ऱ्हायलं. खरं हाय, माझ्या बी गळ्यात उखळ पडायचं रं, बाबा—"

एवढ्यात फकिरा आला. सर्व एकत्र आले आणि पंतांनी जे जे सांगितलं, ते सर्व फकिरानं सर्वांना सांगून तो म्हणाला,

"आठजन जोवर हजर होत न्हाईत, तवर आपली मानसं सुटत न्हायती. सरकार त्येस्नी सोडनार न्हाय!"

"आठजन कोन?" एकदम आवाज उठला.

"ऐका—" फकिरा म्हणाला, "फकिरा, पिरा, मुरा, बळी, तायनू, सावळा, भिवा आनी..."

"मग तुमचं मत काय?" सर्वांनी विचारलं.

"आताच त्ये मी कसं सांगू?" फकिरा म्हणाला, "जे पंतांनी सांगितलं व्हतं, ते म्या तुमास्नी कळवलं. आता म्होरं काय करायचं, ते मुरा आल्यावर ठरवू. सत्तूचं पाठबळ मिळालं, तरच आम्ही नेर्ल्याची छावनी कापून काढू, न्हाय तर ..."

"न्हाय तर काय?" भिवानं मध्येच विचारलं आणि फकिरा म्हणाला,

"न्हाय तर आमास्नी आपली मान कापून दिली पायजे – आठ मुंडकी घेऊनच सरकार माळाला खोतानं लावलेली दावन सोडनार हाय. आनी जर आम्ही आठजन हजर न्हाय झालो, तर एकून एक मानूस कुत्र्याच्या मौतीनं मरनार हाय. समद्यात मोठा घात झाला, नि त्यो म्हंजी बळीबा घोंचीकर कैद झाला–"

"काय बळीला पकडला?" सर्वांच्या मुखांतून आश्चर्याचा उद्गार निघाला आणि तळमळून फकिरा म्हणाला,

"बळीला कऱ्हाडला कैद झाली आनी छावनीपातूर अकरा मैल खोतानं त्येची दाढी उपटून काढली. मुस्क्या बांधून बळीची दाढी हिस्कून काढणारा खोत अजून जिवंत हाय. आनी आमीबी जिवंत हाय. आमच्या घरास्नी काट्या लावून आमचा दारकोंड करनारा पाटील अजून पायावर उभा हाय नि आम्ही हजर व्हायचं का न्हाय, ह्येचा इचार करतोय..."

"आनी ऐका–" खंडू रामोशी म्हणाला, "खोत हातंच-जावयाकडंच हाय. हातं बसूनच त्यो किल्ल्या फिरवतो–"

"मग बघता काय?" सावळा पिसाट होऊन म्हणाला, "बळीच्या बदलात खोताला कैद करू या चला–"

"हो, खरंच!" भिवा म्हणाला, "आनी त्यो पाटील बी. चला. दनक्याला दनका-"

"वाईच आमचा बी हात दावू या की!" तायनू म्हणाला आणि सर्वच उठले.

"थांबा." फकिरा म्हणाला, "खोताला भाईर काढायचा, तर मांजरानं कोंबडं उडवावं, तसं झालं पायजी आनि येता येता रावसाहेबाला बी वढा; काय व्हायचं, ते होऊ द्या."

"तुम्ही थांबा हातंच!" बळी म्हणाला, "आमी येतो भर्रकन. काळजी करू नका. त्येच्या बायकूला देखील कळू देत न्हाय–"

"मी घराकडं पळतो." फकिरा म्हणाला, "मांगुड्यात लवकर ये."

चेतलेली पन्नास माणसं घेऊन बळी, पिरा, सावळा, साधू हे गावाकडं धावले. वेशीपासून सर्वांनी निःश्वास रोखले होते. हातातील हत्यारं अलगद धरून भर वाऱ्याप्रमाणं ते पाटलाच्या वाड्याला जाऊन पालीप्रमाणं चिकटून बसले.

वाड्यात माणसं जागीच होती. खोत, पाटील उद्याचे मनसुबे आखीत होते. गणू नाईक, गण्या मांग अशी बरीच मंडळी बसली होती. गणू रामोशानं पुष्कळसे फरारी आणून खोतापुढं हजर केले होते. त्यांनी फकिराला कैद करण्यास मदत करावी आणि त्या बदलात सरकारनं त्याना गुन्हे माफ करायचे, असं ठरलं होतं.

पुष्कळ उशिरानं ती आलेली मंडळी निघून गेली आणि खोत अंगणात आला. सोप्यात काही माणसं बसली होती. कंदील जळत होते. गळ्यातील जानवं कानात अडकवून खोत अंधारातच सरकला. ज्योत्यावरून उतरून एका भिंतीआड बसला आणि गप्पकन सावळाची प्रचंड मिठी त्याच्यावर पडली. किंचित धुसफूस झाली आणि खोताचे पाय जमिनीपासून उचलले गेले. तोंड कायमचं बंद झालं होतं. हा काय प्रकार आहे, हे खोतालाच उमजलं नाही. आपण दूर जात आहोत, एवढंच त्याला जाणवत होतं.

किती तरी उशिरा मामा आला नाही, म्हणून रावसाहेब पाटील चमकला. त्यानं अंधारात रोखून पाहिलं आणि तो हळूच उठून दारात आला. कोणाशी बोलत असतील, असं वाटून तो पुन्हा जोत्यावर आला. इकडे तिकडे पाहत हळूच म्हणाला,

''मामा!''

हुंकार आलाच नाही. सर्वत्र सामसूम असून हा एकटाच कुठं गेला, याचा विचार करीत पाटील जोत्यावरून खाली उतरला आणि ...

— आणि एक भयंकर मिठी त्याच्यावर पडली. प्रथम गप्पकन तोंड बंद झालं नि लगेच तो अंतराळातून कुठं तरी वाहत निघाला आणि मग त्याच्या लक्षात आलं, आपण मृत्यूच्या मिठीत-नव्हे दाढेत आहोत. हा क्रूर मृत्यू आपणाला घेऊन निघाला आहे. मामाही याच वाटेनं गेला असावा. इतक्या सहजपणे आपण फसलो कसे, याबद्दल त्याला स्वत:चा संताप आला.

मांगवाड्यात पाटलाचे पाय जमिनीला लागले, तेव्हा त्यानं डोळे फाडून सर्वत्र पाहिलं. फकिरा त्याच्यापुढं उभा होता. पिरा, सावळा, बळी त्या तलवारी, कुऱ्हाडी, ती प्रचंड माणसं नि त्यांची ती अफाट करणी - हे सर्व पाहून पाटील भयभीत झाला. त्यानं खाली पाहिलं, तो त्याचा पराक्रमी मामा आडवा पडला होता. त्याला बांधून टाकला होता.

''शाबास!'' फकिरा म्हणाला, ''माझ्या मर्दानूं! आता मला कवा बी मरान येऊ दे. मी तयार हाय! ह्ये दोघं मागं ऱ्हायलं असतं नि मी मेलो असतो, तर ह्येंनी आमचं बी ठिवलं नसतं!''

''फकिऱ्या, आमास्नी गुमान सोड —'' पाटील बिथरून म्हणाला आणि खंडूनं एक लाथ हाणून त्याला क्षणात खाली पाडला.

''आता पाटीलकी इसर!'' खंडू ओरडला.

फकिरानं पाटलाला उचलून उभा केला नि उंबऱ्यापर्यंत ओढीत नेला आणि वैतागून तो म्हणाला,

''ह्यो दारकोंड का केलास? त्वा माझ्याशी इनाकारन वैर का बांधलंस? माझी गरीब

जमात नेल्याच्या माळाला डांबलीस. हे सारं त्वा का केलंस? बोल?''

"आता ह्यो बोलनार न्हाय. ह्येला घिऊन चला!'' साधू म्हणाला आणि त्यांना घेऊन ते सर्व डोंगराची वाट चालू लागले.

"आमची मानसं बांधून घातलीस!'' सावळा खोताच्या कानाजवळ जाऊन म्हणाला, "आता मी तुला डोंगरात बांधून घालनार! —''

ते पहाटे सातदऱ्यात आले, तेव्हा पहाटेचा वारा अंगाला चटके देत होता आणि चंद्र मावळत होता. वनराजीवर अंधार हळूहळू पसरत होता. पूर्वेला प्रकाशाची प्रखर रेषा स्पष्ट झाली होती आणि त्या रेषेचा छेद करीत एक प्रचंड काळा ढग अचल उभा होता; परंतु त्या ढगाला चैतन्यमय वारा लोटून दूर करीत होता आणि प्रकाशाची अपरंपार किरणं त्या ढगाखालून भूमंडळापुढं धावत होती. त्या अनंत किरणांच्या समूहानं दक्षिणेला नवाच रंग आला होता. शीड मोडलेल्या तारूप्रमाणं रेशमी ढग वाहत होते. जंगल जागं होत होतं. पाखरं दक्षिणेचं ते अप्रतिम रूप पाहून दंग झाली होती.

सह्याद्रीचं एक शिखर गगनाला भिडलं होतं आणि त्या शिखरावर एक प्रचंड वटवृक्ष उभा होता. विशाल मस्तकावर शेंडी उभी राहावी, तद्वत तो महावृक्ष दिसत होता आणि त्याच्या अनंत पारंब्यांनी त्या पर्वताला घट्ट धरलं होतं. त्या पारंब्यांच्या मिठीत एका अतिप्राचीन देवळाचे अवशेष विस्कटून पडले होते. त्या देवळाच्या पश्चिमेला भिंतीला लागून उभा कडा होता. त्या कड्यावरून पाहता त्या भिंतीपासून दोन मैल सरळ खाली जमीन दिसत होती. ती बाजू अगदी बेलाग होती. पाहणाऱ्याची नजर तरळत होती.

अशा त्या स्थळी फकिराचा तळ पडला होता. त्या देवळात येताच फकिरानं पाटील आणि बापू खोत यांना डांबून टाकलं नि भिंतीकडेनं आपली घोडी बांधून जागोजाग आपली माणसं पहाऱ्यावर ठेवली.

डोंगरावर येताच आता त्या दोघांचं काय करायचं, हा प्रश्न सर्वांपुढं उभा राहिला. जागोजाग टोळकी बसली आणि एकच चर्चा सुरू झाली. आमच्या सर्व दुःखाचं मूळ त्या दोघांत आहे. आता वाटेल ते होवो, आपण यांना सोडायचं नाही. मेलो, तरी त्यांना सोडायचं नाही आणि जर हे सुटले, तर आमचा वंशच नष्ट करतील. ही महाभयंकर माणसं मारूनच टाकली पाहिजेत! पण मारायची कशी? कसलं मरण यांना द्यावं? यांचा कडेलोट का करू नये?

निराशेच्या कोंडात सापडलेली माणसं गांगरत नाहीत. कारण झुंजणं हा त्यांचा स्वभावच बनलेला असतो. मन हे मूळचंच बेडर नसतं. ते अविरत होणाऱ्या आघातांनी निर्भय होतं. जसे पोलाद निखाऱ्यांत कैक क्षण तापून बाहेर येतं नि कणखर होतं, तद्वतच

त्या सर्वांची मनं जन्मभर दु:खाच्या भट्टीत जळून कणखर झाली होती.

## १५

"अजून मुरा कसा आला न्हाय?" फकिरानं विचारलं.

"चढन अवघड हाय." साधू उत्तरला.

"उशीर केला त्येनं."

"यील आता चंद्र उगवल्यावर."

"आज कितवी घडी हाय?"

"आज मध्यान्हीला चंद्र उगवंल!"

फकिरा पुढं बोलला नाही. तो पुन्हा विचारमग्न झाला. मुरानं लौकर यावं, सत्तूकडची बातमी कळावी आणि आपण लौकर काय ते निश्चित करून टाकावं, म्हणून उत्सुक होऊन तो मुराची वाट पाहत होता.

सूर्य मावळून पुष्कळ उशीर झाला होता. डोंगरावर कीर्र झाडीत काळोख मी म्हणत होता. वडाच्या झाडाखाली ते सर्व बसून बोलत होते. सर्वांचं लक्ष मुराच्या वाटेकडे लागलं होतं. तो येताच त्यांचं भवितव्य ठरणार होतं.

काल रात्री पकडून आणलेले खोत आणि पाटील त्या पडक्या भिंतीआड पडून कानोसा घेत होते. त्यांना हातपाय बांधून तिथं टाकलं होतं. आता आपण जगत नाही, याबद्दल त्यांची खात्री होती आणि शेवटी सर्वच डाव उलटल्यामुळं ते तळमळत होते. दैवानं आपली क्रूर थट्टा का करावी, म्हणून ते दैवाला शिव्या देत होते. हे जन्मभर सतावलेले बेरड आता एकदाच सर्व सूड घेणार! आता जे होईल, ते सहन करणं यापेक्षा दुसरं काहीच इथं नाही!

असा विचार करीत ते दोघे सासरेजावई कण्हत पडले होते. त्यांचे हात त्यांच्या पाठीवर बांधले होते आणि पाय बांधून दोन कोपऱ्यात त्या प्रत्येकाच्या कमरेला एक प्रचंड दगड बांधून एकमेकांपासून दूर ठेवलं होतं. त्यामुळं त्यांना काहीच करता येत नव्हतं. जसजशी रात्र उलटत होती, तसतसे आपण मरणासमीप जात आहोत, असं त्यांना वाटत होतं. रात्री अंधारातच त्यांना आणून त्या देवळात टाकलं होतं. दिवस त्यांनी त्या देवळात पडून काढला होता. बाहेर काय आहे, याची त्यांना मुळीच कल्पना नव्हती.

परंतु खोतानं धीर सोडला नव्हता. तो अंधारात जगण्याची धडपड करीत होता. ज्या दगडाशी त्याला बांधला होता, त्यालाच तो हिसके देत बसला होता. बाहेरची हालचाल

ऐकू येताच तो गप्प पडून पुन्हा कण्हत होता. सासऱ्याचं कण्हणं ऐकून पाटील शेवटची घडी मोजीत होता. मध्यान्ह रात्र उलटली आणि खोतानं तो दगड ओढला. दगड जमिनीवर पडला, तर आवाज होईल म्हणून त्यानं चटकन त्या पडत्या दगडाखाली पाठ दिली आणि मग हळूहळू त्याला ओढीत तो पाटलाजवळ आला. तो आपल्या दातांनी पाटलाच्या वाद्या कातरू लागला. उंदराप्रमाणं त्याचे हात सोडू लागला. जलद-अतिजलद तो कार्य करू लागला. मृत्यू जणू आपल्यापासून दूर जात आहे, असं त्याला वाटू लागलं आणि शेवटी त्यानं पाटलाचे हात मुक्त करूनच निःश्वास घेतला. आपलं तोंड त्याच्या नाकाजवळ नेऊन तो म्हणाला,

"हं, आटपा. माझे हात सोडा, लौकर...!"

चंद्र डोंगर चढून आला होता. सर्वत्र चांदणं पडलं होतं. वडाची प्रचंड सावली मावळतीला लांबच्या लांब पसरल्यामुळे देवळालगतचा तो कडा त्या सावलीनं झाकला होता आणि त्या सावलीत ते दोघे एकमेकाला मुक्त करीत होते.

पाटील सरळ होऊन खोताला सोडवू लागला आणि एकदम घोड्यांच्या टापांचा खडखडाट झाला. एकदम घाबरून बाहेरचा कानोसा घेत खोत म्हणाला,

"ह्यो कोन आला असावा?"

"येऊ दे. आपुन कसं निघायचं?" रावसाहेब पाटील कुजबुजला आणि खोत म्हणाला,

"चंद्र वर आलाय. मागच्या मागं अंधारात चलू या!"

मुराला पाहून त्या सर्वांना आनंद झाला. फकिरानं त्याच्या पाठीवर थाप मारली आणि सर्वजण एकत्र जमून सत्तूकडील बातमी ऐकायला उत्सुक होऊन मुराभोवती कडं करून बसले. हळू आवाजात मुरा म्हणाला,

"कबीरा, चौघुला नि पवार फौजदारांनी सत्तूला चारी बाजूनं कोंडलाय. टक्कूरं खाजवाय त्येला फुरसद न्हाय. छावनीकडं सरकन्यासाठी त्यो धडपडतोय; पण काइ जमेना. तवा गोंधळ्यानं मला निरोप दिला, की तुम्ही चला. पवाराला हुलकावनी देऊन मी छावनीवर हल्ला करतो. तुम्ही तयार असा—"

"पन कवा?" फकिरानं मध्येच विचारलं आणि मुरा म्हणाला,

"त्येच तर नक्की न्हाय!"

"मग आता त्यो इच्यार सोडा!" फकिरा निराश होऊन म्हणाला, "आता आम्हांला हजर झालं पायजे—"

रात्री पंतांची भेट, सर्व लोकांची धरपकड नि खोत, पाटील यांना आपण केलेली अटक हे सर्व मुराला सांगून फकिरा म्हणाला,

"—सरकारचा हुकूम हाय, की आम्ही मानसांनी छावनीवर हजर व्हावं, तरच आमची अटक झालेली बायका-पोरं मोकळी व्हतील!"

"दहाजनं?" मुरा म्हणाला, "कोन कोन?"

"फकिरा म्हणाला, "मी फकिरा, मुरा, बळी, हरी, पिरा, सावळा, तायनू, भिवा, खंडू आणि दहावा घोंचीकर बळी! पन बळीला अटक झाली–"

"काय? बळीला अटक?" मुराला धक्का बसला आणि फकिरा म्हणाला, "आता कामाला लागा. सकाळी आपुन छावनीवर हजर व्हायचं आनि त्या खोताचा काय त्यो निकाल लावा. चला!"

पाटील नि खोत यांचं नाव निघताच सर्व उठले आणि देवळात गेले, परंतु ते दोघेही तिथं नव्हते. ते दोघे पळून गेल्याचं लक्षात येताच सर्वांना धक्का बसला. सावळा ओरडला.

"दाजी, त्ये पळालं की!—"

"पळतील कसं?" फकिरा म्हणाला, "म्होरं आम्ही हाय, मागं वाट न्हाय. पळा. वाटा रोखा. त्येस्नी जिवंत जाऊ देऊ नका!"

क्षणात धावपळ झाली. चांदण्यात माणसं पळत सुटली. फकिरा अधिकच चिंतातुर झाला. जन्माचा वैरी हाती येऊन गेला, हे शल्य त्याच्या काळजात सलू लागलं आणि प्रथम खोताला ठार करीन आणि मग छावणीवर हजर होईन, हा विचार त्याच्या मस्तकात मूळ धरू लागला. उशिरानं घमांडी धावत आला आणि म्हणाला,

"देवळामागचा कडा उतरताना पडून त्ये दोघंबी मेलंत—"

"मेलं?" नि:श्वास टाकून फकिरा म्हणाला, "ठीक झालं, चला! या म्हनावं वर साऱ्यास्नी!"

"त्येंची मढी आनायची का?" घमांडीनं विचारलं.

"नको!" फकिरा उद्गारला.

रात्रभर फकिरानं डोकं टेकलं नव्हतं. सकाळीच छावणीवर हजर व्हायचं, म्हणून त्यानं सारी तयारी केली होती. पहाटेच तो स्नान करून आला होता. स्वच्छ कापडे अंगावर घालून आष्टीच्या धोतरानं त्यानं कंबर बांधली होती. सावळा, मुरा, तायनू, पिरा, भिवा हेही तयार झाले होते. सावळानं शिंग उजळून लखलखीत केलं होतं. शिंग फुंकीत साहेबापुढे हजर व्हायचं, असा त्यानं बेत केला होता. आपल्या बंडखोर जीवनाचा अंत समीप आला, याचं सर्वांना दु:ख वाटत होतं. या लढाईत कोण हरला नि कोण जिंकला, हा प्रश्न सर्वांच्या जिभेवर नाचत होता आणि शेवटी आपण शरणागती पत्करली, हे त्यांना बोचत होतं; परंतु कसं का असेना, आपण मानानं हजर होऊन ही लढाई संपवीत

आहोत, मार खाऊन नव्हे, याचं त्यांना समाधानही वाटत होतं.

सकाळीच फकिरानं साधूला बोलावून पुढं कसं वागायचं हे समजावून सांगितलं— आम्ही हजर झाल्यानं इतरांवर करडी नजर राहणार नाही. मग हळूहळू सर्वांनी आपआपल्या घरी जायचं, असं सांगून सूर्योदयाला थोडा अवकाश असतानाच तो घोड्यावर बसला. सर्व लोक साधूसह गावापर्यंत आले. पुन्हा सर्व एकमेकांच्या गळ्यात पडून भेटले. ती त्यांची शेवटची भेट होती.

एकाएकी फकिरा गावात आला नि विष्णुपंतांच्या वाड्यात शिरला. प्रथम पंतांच्या पायांवर डोकं ठेवून तो म्हणाला,

"मी हाजर व्हायला निघालो. जमात जपा माझी. साधू हाय मागं— "

पंत बोलले नाहीत. त्यांचा कंठ भरून आला होता. तेही त्याला गावाबाहेर वाटेला लावण्यासाठी निघाले.

मग फकिरा शंकरराव पाटलाकडे गेला आणि शंकररावजीनं धावत येऊन त्याला मिठी मारली.

गावात खबर पोचली, तेव्हा सारा गाव फकिराला पाहण्यासाठी धावला आणि त्याला चार पावलं वाटेला लावण्यासाठी निघाला.

पुन्हा गावाबाहेर येताच फकिरानं गावाला हात जोडून नमस्कार केला; तेव्हा शंकरराव म्हणाला,

"जा! घाबरू नकं! गाव तुला इसरनार न्हाय! बाप सांजीरबाच्या माळाला पडला नि बेटा नेर्ल्याच्या माळाला पडला. मी नि पंत आम्ही कोल्हापूरला मागोमाग येतो. जामीन म्हणून माझं नाव सांग!"

हे ऐकून फकिराला दुप्पट बळ आलं. तो भर्रकन गबऱ्यावर बसला आणि सावळानं शिंग फुंकलं.

सात घोडी भरधाव नेर्ल्याकडं निघाली. गबऱ्या सर्वांपुढं झेपावत होता.

छावणीच्या माळाला पुन्हा शिंग वाजलं आणि सारी छावणी हादरली. सर्व लोक बाहेर येऊन पाहू लागले, तोच फकिरा जॉनसाहेबाच्या तंबूपुढं येऊन गबऱ्यावरून उतरला नि सरळ तंबूत शिरला.

फकिराला समोर पाहून साहेब विचलित झाला; किंचित चमकून गेला नि उद्गारला, "कोण?"

"फकिरा रानूजी मांग–"

पुढं साहेब बोलला नाही. किती तरी वेळ तो फकिराकडे पाहतच राहिला. बाहेर 'फकिरा आला' असा गलका सुरू होता. त्या गलक्यानं साहेब भानावर आला नि म्हणाला,

"फकिरा? – बैस!"

हातातली ती तलवार टेबलावर ठेवून फकिरा म्हणाला,

"मी हजर व्हायला आलोय. ही बाकीची मानसं – आठ"

"आलं लक्षात!" साहेब हर्षभरित होऊन म्हणाला, "हजर होऊन तू मोठं शहाणपण दाखवलं आहेस. ठीक. बैस ना!"

"पन, साहेब!" फकिरा म्हणाला, "ह्या बेगुन्हा लोकांस्नी अटक करून त्येस्नी दावनी लावून तुम्ही शानपना दावला नाय–"

"मग काय करणार?" साहेब म्हणाला, "जर तुम्हीच आमच्या जागी असता, तर तुम्ही काय केलं असतं?"

"आमी?" फकिरा म्हणाला, "आमी अशी तुमची पोरंबाळं दावनीला लावली नसती, तर तुमचा तानपट्टा काढून तुमास्नी घोड्यांच्या टापांखाली तुडवून मारलं असतं!"

हे ऐकून साहेब गंभीर झाला. टेबलावरची ती तलवार उचलून तिची धार पाहात त्यानं खांदे उडवले आणि विषय बदलून तो म्हणाला,

"ही तलवार कुठं मिळाली?"

"ही तलवार माझ्या पूर्वजाला शिवाजीराजानं दिली." फकिरा गंभीर होऊन म्हणाला, "ही घेऊन माझा बाप खोतासंग लढला नि मी हिला घेऊन तुमच्याशी लढलो!"

"आणि शेवटी हरलात –" साहेब म्हणाला आणि हसला.

बाबरखान, प्रांतसाहेब वगैरे बडे अधिकारी जॉनसाहेबाच्या मागं येऊन उभे होते. दुभाषा ऐकून भाषांतर करून सांगत होता आणि साहेब रंगात येऊन बोलत होता. फकिराची करारी मुद्रा पाहून तो दिपला होता. 'आणि शेवटी हरला' या शब्दानं फकिरा दुखावला. तो चटकन म्हणाला,

"साहेब, तलवारीला धार नसेल, तर ती तलवार काय कामाची? - धारंवाचून तलवार नि बळावाचून बंड लटकं असतं, साहेब. माझी पाठबळ कोती पडली, म्हनूनच ही तलवार म्या तुमाला दिली!"

"ठीक, आता खजिन्यातील रक्कम द्या!. . ." असं म्हणून साहेब मोठ्यानं हसला.

"परत करण्याच्या बोलीनं ती मी लुटली नाही, साहेब! –" फकिरा म्हणाला.

"ठीक. परंतु थोडे तरी रुपये द्या!" साहेब म्हणाला, "फक्त पंधरा हजार!"

"त्ये तुमी आमास्नी द्या!" सावळा म्हणाला, "मग त्येच आमी तुमास्नी देतो–"

"म्हणजे सत्तर हजार पूर्ण होतील नाही का?" साहेब सावळाकडे वळून म्हणाला, "पंचावन्न हजारांचा दरोडा नि हे पंधरा हजार! तू अस्वल आहेस!-"

थोडा वेळ विचार करून साहेब दुभाषाला काही तरी बोलला आणि दुभाषी फकिराकडं वळून म्हणाला,

"साहेब म्हणतात, तू म्हणे, छावणीवर हल्ला करणार होतास?"

"खरं हाय!" फकिरा म्हणाला, "पन हल्ला करायचं माझ्या नशिबात नव्हतं नि त्यो बघायचं तुमच्या नशिबात नव्हतं!"

"ठीक. आता पुढं काय?" साहेब उद्गारला.

"आता बेगुन्हा लोक सोडून द्या!"

"कबूल!" साहेब बाबरखानाकडे वळून म्हणाला, "फकिरा जी जी माणसं दाखवील, ती सोडून द्या!"

बाबरखानानं गर्दन नमवून होकार दिला नि फकिरा छावणीबाहेर आला. त्याला पाहताच सर्व माळ ओरडू लागला. फकिरा धावत जाऊन राधाच्या गळ्यात पडला. दौलतीच्या पायांना त्यानं मिठी मारली. राहीला भेटला आणि मग त्यानं सरूला पोटाशी धरली. त्या पाचांच्या डोळ्यांतून कृष्णा-कोयना वाहत होत्या. राधा बोलण्यासाठी चरफडत होती; परंतु शब्दच उमटत नव्हता.

"तू का आलास?" दौलती आसू पुशीत म्हणाला.

"नकं, नकं." फकिरा म्हणाला, "म्या तुमास्नी जन्मभर दुःख दिलं. तुमाला ह्या दावनीत बांधून म्या जगनं. . ." तो पुढं बोलला नाही. राधा म्हणाली,

"साधू कुठाय?"

"त्यो खुशाल हाय!" फकिरा म्हणाला, "आई, आबा, थोरले आई, सरू, तुम्ही काळजी करू नगा. आता घरला जावा. साधू हाय. त्यो सारं बघील."

राधा बोललीच नाही. ती भ्रमिष्टाप्रमाणं फकिराकडे पाहत होती. राही मानेतील कंप आवरीत डोळे टिपीत होती. दौलती बावरला होता. तोच फकिरा बाबरखानाला म्हणाला,

" ह्या साऱ्या दावनी कापून ही समदी मानसं सोडा! चला!"

हे ऐकून बाबरखानानं वळून छावणीकडे पाहिलं. जॉनसाहेब उभा होता. त्यास बाबरखानानं फकिराची इच्छा सांगितली आणि साहेबानं सर्व लोकांना सोडण्याचं हुकूम दिला. क्षणात एकूण एक माणूस मुक्त झाला. दाही दिशा माणसं पळत निघाली. फकिराची माणसं जागची ढळली नाहीत. राधा नि सरू डोळ्यांत प्राण आणून फकिराकडं पाहत होत्या.

"साहेब, आता शेवटचा अर्ज!" फकिरा साहेबाकडे जाऊन म्हणाला, "ही माझी तलवार नि ह्यो घोडा माज्या आज्याला मिळावा. आम्ही दरवर्षी तलवार पुजतो."

"ठीक आहे!" साहेब उद्गारला आणि फकिराला आनंद झाला. त्यानं ती तलवार

नेऊन राधाच्या हातात दिली. पुन्हा तिचे पाय धरले आणि तो साहेबाकडे गेला.

सावळा, मुरा, तायनू, हरी, भिवा हे सर्व आपापल्या बायकापोरांना भेटून बोलत होते. त्यांची शेवटची भेट घेत होते.

---

सूर्य मावळतीकडे निघाला होता. उदास वातावरण माळावर नाचत होतं. दोनशे लहान-मोठी माणसं एका जागी जमून उभी होती. त्या सर्वांना फकिरा, मुरा, हरी, पिरा, तायनू यांनी हात जोडले आणि ते सर्व लोक छावणीत शिरले.

ती दोनशे माणसं गावाकडे निघाली होती. त्यांच्या अंगात चालण्याचं त्राण नव्हतं नि त्या सर्वांचे प्राण त्या छावणीत होते. क्षणोक्षणी ती सर्व लांबून वळून पाहत होती, हळहळत होती. सर्वांच्या नेत्रांतून आसू वाहत होते. आतापर्यंतची धडपड, ती झुंज, जमातीसाठी दिलेली लढाई - हे सारं सारं आठवून प्रत्येक माणूस म्हणत होता,

''त्येंनी जबर लढाई दिली-''

राहीबाईला गबऱ्यावर बसविली होती. दौलती त्याचा लगाम धरून ओढीत होता. राधा तलवार पोटाशी धरून डोळे टिपीत निघाली होती. सरू क्षणोक्षणी परतून पाहत होती.

''सूनबाई, काय बघता?'' दौलती खिन्न स्वरात म्हणाला, ''आता बाबू परत येणार न्हाय!''

''नका, नका तसं म्हनू!'' राधाच्या काळजात कळ आली. ती दाटल्या आवाजात म्हणाली, ''काय पाप केलं व्हतं, म्हणून हे सारं मी बघतेय! बाप त्या माळावर ज्येच्यासाठी पेढ्याचा पुडा कमरंत खोवून लढत मेला, तोच नेर्ल्याच्या माळावर आईसाठी आपनहून मरनाच्या दाढंत शिरला. कुनाला सांगावं नवल?''

''हे सारं आता मनाला सांगू या!'' दौलती म्हणाला, ''हां, गावं मनाला नि लाभ सांगावा जनाला - चला-''

एका लवणातून वर येऊन राधा एकाएकी थांबली आणि एक जुनी आठवण जागी झाली. ती वेड्याप्रमाणे डोळे झाकून विचार करू लागली. सर्व लोक थांबून पाहू लागले.

फकिरा लहान होता. नेर्ल्यात छावणी पडली होती. पोरं पोरं जमून साहेब कसले आहेत, हे पाहण्यासाठी गेली होती. राधानं फकिराला सर्वत्र शोधला; पण त्याचा पत्ता लागत नव्हता. मग ती रडू लागली. तेव्हा आत्तारानं खबर दिली, की फकिरा नेर्ल्याच्या माळानं गेला आहे आणि राधा नेर्ल्याच्या माळाला निघाली होती. ती चालताना फकिराची फोपाट्यात उमटलेली पावलं पाहत निघाली होती. पावलं पाहत पाहत ती याच जागेवर

आली आणि समोरून लहानसा फकिरा घराकडे धावत येताना तिला दिसला.

तिला अति आनंद झाला. घामानं डबडबलेला चेहरा, ती घरची ओढ, ते सारं पाहून राधाला भडभडून आलं. तिनं मटकन गुडघे टेकले आणि भर्रकन फकिरा येऊन तिला बिलगला. त्याला पोटाशी धरूनच राधा उठली. पदरानं त्याच्या पायांवरची धूळ तिनं झाडली.

त्याच जुन्या जागेवर तो प्रसंग नव्यानं आठवताच राधाचं मस्तक सुन्न झालं. सर्व शरीर बधिर होऊन ती गर्रकन वळून नेर्ल्याकडे पाहू लागली. तोच लहान फकिरा, घमांडी, मुरा, बळी येताना तिला दिसले. फकिरा राधाच्या रोखानं धावत आला. राधानं मटकन गुडघे टेकले आणि हात पसरून मिठी मारली.

— आणि क्षणात राधा भानावर आली. तिच्या मिठीत फकिराची तलवार होती. सरून तिला उठवली. मग ती अगतिक झाली. तिनं आपली नजर दूर फेकली आणि मोठा हंबरडा फोडला,

"फकिरा ऽ ऽ !"

# वैजयंता

१

वैजयंताच्या पायांतील नूपुरांच्या नादानं वातावरण भारलं होतं. उन्मादानं वेडावलेले प्रेक्षक मंत्रमुग्ध होऊन डोलत होते. तिचं अप्रतिम लावण्य, मधुर स्वर, नृत्यनैपुण्य यामुळे तमाशाशौकीन वास्तव जग विसरून कलेच्या दुनियेत वावरत होते.

कोणी कानांत प्राण आणून ऐकत होते; तर कोणी डोळ्यात ह्रदय घेऊन पाहत होते. नूपुरांच्या नियंत्रित झनझनाटाखाली कित्येकांच्या नजरा चिरडल्या जात होत्या. हजारो डोळे तिच्यापुढे चरफडत होते. कित्येकांची आतुरता, उत्सुकता शिगेला पोचून ते टाळ्या पिटून आपला आनंद व्यक्त करीत होते.

काही असंतुष्ट आत्मे बुभुक्षित दृष्टीनं तिला आपल्यात सामावून घेण्याची दुबळी खटपट करीत होते.

प्रेक्षकांच्या डोक्यावर धुराचं धुकं तरंगत होतं आणि त्यात उग्र अत्तराचा वास दरवळत होता. वातावरण हेलकावे खात होतं.

टाळ्या, शिट्या, हास्य यानं सदानंद थिएटर दणकत होतं, घुमत होतं. हलगीचा आवाज उसळून बाहेर पडत होता.

बावीस वर्षांची सुंदर वैजयंता नाचत होती. जणू तिच्या पायांत वीजच संचारली होती. ती अस्मानी रंगाचं पातळ नेसली होती. त्याच रंगाची पण जरीची तंग चोळी तिच्या भरदार दंडांत कचत होती. दिव्याच्या प्रखर प्रकाशात तिचं नोकदार नाक, पाणीदार टपोरे डोळे अधिकच मोहक दिसत होते. पदराआड न दडणारे उभार उरोज, बारीक कंबर, रसरशीत पोटऱ्या, विपुल केस अशी तिची ती ओतीव काया आणि नाजूक संयमी हालचाल यामुळं ती प्रेक्षकांच्या ह्रदयात केव्हाच सामावली होती.

वैजयंताच्या जोडीला चंद्रा रंग भरीत होती. हिरवी जरीची साडी तिच्या गोरेपणाला खुलून दिसत होती. अभिजात नृत्यनैपुण्य आणि गिरेबाज हालचाल यामुळे ती वैजयंताच्या तोडीस तोड देत होती.

प्रेक्षकांची न्यायबुद्धी त्या दोघींची तुलना करीत होती. वैजयंता आणि चंद्रा यात श्रेष्ठ कोण? हा प्रश्न त्यांच्या अंतरंगात क्षणोक्षणी उमटत होता.

रंगमंचाला लागून असलेल्या खुर्चीवर खुंदलापूरचा आबा पाटील बसला होता. सर्व प्रतिष्ठित मंडळींत तो सव्वा हात उंच भासत होता नि चटकन डोळ्यांत भरत होता. त्यानं डोकीला लाल रेशमी पटका बांधला होता, नि तो कपाळावर सरकवला होता. अंगात निळ्या रंगाचा गरम कोट घालून तो पाटावर बसावं तसा मांडी घालून खुर्चीवर बसला होता. त्याचा गुबगुबीत रुंद चेहरा, दाट भुवया, सावळा रंग, झुबकेदार मिश्या, प्रचंड छाती, भरदार गर्दन यामुळे बरेच हाडकुळे मवाली त्याच्याकडे कौतुकपूर्ण नरेजनं पाहत होते. त्यांना त्याचा हेवा वाटत होता.

परंतु पाटील तिकडे लक्षच देत नव्हता. अत्तराच्या फायाला बोट लावून नाकाचा शेंडा डिवचीत तो समोर वैजयंताकडे एकटक पाहत होता. मध्येच शिटी मारणाऱ्याकडे गुरकून पाहत - खुंदलापुरात असतास तर दणकंच दिलं असतं, असा चेहरा करून पुन्हा आपली समाधी लावीत होता.

डाव्या विंगेत वैजयंताची आई गजराबाई शुभ्र पातळ नेसून बसली होती. उजव्या विंगमध्ये बाबालाल शेटचा मुलगा चंदूलाल गंभीर होऊन पाहत होता. तो सर्व भाव डोळ्यांत घेऊन वैजयंताला न्याहाळीत होता. तिचा प्रत्येक अवयव टिपून घेत होता. त्यामुळे त्याच्या चेहऱ्यावर अनेक भाव उमटून लुप्त होत होते. त्यानं पँट घालून वर विरविरीत बुशकोट घातला होता. तो एखाद्या राजपुत्राप्रमाणे दिसत होता. बापानं त्याची दोन लग्नं केली होती, परंतु तो जन्मात कधीच संतुष्ट झाला नव्हता. थिएटरमध्ये नाचणारी प्रत्येक बाई ही आपल्या मालकीची आहे, असा त्याचा कित्येक दिवसांचा समज होता.

आणि आज प्रथमच नाचायला आलेली वैजयंता पाहून तो बेभान झाला होता, स्वत:ला विसरला होता; त्यामुळं त्याच्या डोळ्यांतली बाहुली हलत नव्हती.

परसू, गंगू, अप्पा, वैजयंता, चंद्रा यांचा तमाशा प्रेक्षकांवर अलौकिक मोहिनी घालीत होता. गंगूच्या शब्दानं हास्याचे भुईनळे घडोघडी पेटत होते.

गण संपला आणि गौळणी मथुरेला निघाल्या, तसा गंगू सोंगाड्या कृष्णाचा दोस्त पेंद्या होऊन आडवा आला. राधा झालेली चंद्राबाई पुढं सरकली आणि एक साधी गौळण होऊन आलेल्या वैजयंताला पेंद्यानं अडवलं. दोन्ही हात आडवे पसरून तो म्हणाला,

"ए, कुठं निघालीस एवढ्या कुऱ्यात?"

"मथुरेच्या बाजाराला!" वैजयंता जगातील सारा आनंद आपल्या चेहऱ्यावर आणीत म्हणाली, "राधाबाई पुढं गेली. मी जात आहे-"

"असं का?" — गंगू डाफरला. "अग पर, सेलटॅक्स भरलास का?"

"म्हणजे?" आश्चर्य प्रगट करीत वैजयंता म्हणाली. "माल विकण्यापूर्वी सेलटॅक्स? हा रे कुठला कायदा?"

"ए कायदेवाली! –" गंगू केकाटला. "अग, आमच्या राज्यात कायदा हमाली

१०१८

करतो – हे तुला ठावं हाय का?''

''नाही बरं–'' वैजयंता केविलवाणा चेहरा करीत म्हणाली. ''मी आज प्रथमच मथुरेला निघाले आहे. मला या राज्यातील कायदे नि कर माहीत नाहीत. कृपा करून तू मला सांग.''

''मग ऐक! –'' गंगू शेफारून म्हणाला. ''सेलटॅक्स म्हंजी जकात, नि जकात म्हंजी चारशे-वीस.''

गंगूच्या शब्दांनी वैजयंताच्या गालावर चंद्रज्योत उजळली. तसा गंगू पुन्हा ओरडला,

''हसून गार करू नकं. ती राधा कुठं गेली?''

मग राधा-चंद्रा परत आली. कृष्ण होऊन परसू आला. कृष्णानं आपल्या अवताराची महती गायिली नि मग राधा कृष्णचरणी लीन होऊन गौळण संपली.

लगेच परसूनं वग सुरू केला. तो गंगूला बरोबर घेऊन मुलुखगिरीवर निघाला. प्रेक्षक जागीच अंग घुसळून सरळ बसले. इतक्यात एका लावणीला प्रारंभ होऊन दोन अबलख घोडी रंगभूमीवर साकार होऊन दौडू लागली. प्रेक्षक हळूच कलेच्या दुनियेत विलीन झाले.

एका नदीवर परसू व गंगू येऊन दाखल झाले आणि त्याच वेळी एका श्रीमंताची दासी वैजयंता पाणी भरायला आली. तिला पाहताच परसू भान हरपून म्हणाला, ''गंग्या लेका, राजकुमारी पाण्याला आली–''

''खरंच की रं–'' गंगू निरखून पाहत म्हणाला. ''परसू, मला वाटतं, राजवाड्यात संप झाला असंल. न्हायतर ती पाण्याला का आली असती?''

''विचार! विचार!'' परसू म्हणाला,

गंगू खाकरून पुढं गेला आणि म्हणाला, ''खरं – देवाच्यान तुम्ही कोण?''

''मी वैजयंता–'' ती प्रेक्षकांच्या डोकीवरून भर्रकन नजर फिरवून म्हणाली, ''आता सांगा, तुम्ही कोण?''

परसूनं आपला आवाज टिपेला लावून लावणी सुरू केली –

*गाव आमचं सातारा शहर । राहतो देशावर ।*
*नावाचा आवाज तुझ्या आला ।*
*आम्ही आलो आशा करून । हेतु धरून सांग आम्हाला ॥*

''अगबाई! तुम्ही माझ्यासाठी आला?'' वैजयंता बावरून उद्गारली. गर्रकन फिरून तिनं तुणतुण्याचा स्वर कानात घेतला आणि पुढचं कडवं फेकलं –

*अहमदनगरची मोहना राणी । चहूंकडं वाणी ।*
*बटावू तिच्यासाठी मेला । मारीला तिच्या नवऱ्यानं ।*
*सांगते खूण । तो व्यर्थची मेला – ॥*

असं म्हणून कडवं संपताच पाठीवरचा पदर पुढं ओढून छाती झाकीत ती म्हणाली,

*परनारीसाठी रावण मेला । चंद्राला डाग लागला ।*
*बटावू मोहनेसाठी मेला ।।*

हे ऐकताच प्रेक्षकांत टाळ्यांचा कडकडाट झाला. 'भला जबाब दिला!' कित्येक उद्गारले.

परंतु परसू नमला नाही. उलट चढाई करीत तो पुढे सरकला. लोखंडावर कानस घासावी तसा स्वर तारेशी घासून त्यानं पुढील कडवं झुगारून दिलं —

*या विषय लोभासाठी । जमवली गठी ।*
*नावाचा डंका त्यांनी केला । हे नामू मारुती म्हणे आशा केली कुणी।*
*येऊन जन्माला ।।*

परसूनं जिवावर उदार होऊन ती आक्रमक भाषा सुरू करताच बेडर प्रेक्षकांना बरं वाटलं. यावेळी चंदूलालनं एकट्यानंच टाळी वाजवून आपलं मनोगत व्यक्त केलं.

परसू म्हणाला, ''बटावू मोहना प्रेमासाठी जगली नि बटावू प्रेमासाठी मेला. रणात नि प्रेमात मरणाऱ्या आत्म्याला मुक्ती प्राप्त होते, कारण प्रेमात पावित्र्य असतं आणि मांगल्यात देव असतो.''

''परंतु माझ्यासाठी कुणी मरू नये;'' वैजयंता भावनावश होऊन म्हणाली. ''मी दासी आहे. प्रेमाची मला चटक नाही. शिवाय हे हृदय रिकामं नाही. यात बालपणीच एका देवाची स्थापना केली आहे.''

वैजयंताची ती कला पाहून गजराबाईचे डोळे आनंदाश्रूंनी डबडबले. ती एकाग्र दृष्टीनं मुलीच्या पायाखाली त्या रंगभूमीवर पाहत होती. त्या ठिकाणीच पाच वर्षांपूर्वी चंद्रानं गजराचा पराभव केला होता. कलेच्या दुनियेतून तिला हाकून लावलं होतं. आणि आज त्याच जागेवर वैजयंता कलेचं चांदणं फुलवीत असलेली पाहून तिचं हृदय भरून आलं होतं.

बाबालाल बेहद्द खूष झाला होता. या मुलीचा सत्कार करायचा म्हणून त्यानं हार आणला होता. आबा पाटलाच्या डोक्यात भलतंच भूत नाचत होतं - बाई असावी तर अशी!

''एक गोष्ट विचारू?'' गंगू म्हणाला.

''विचार की—'' ती लाजली.

''तुम्ही पाण्याला का आला?'' गंगू म्हणाला. ''नव्हं-आमच्याकडं राजं लोक कांम करीत नसत्यात.''

''मग मी काही राजकन्या नाही! — मी दासी आहे. इथं चंद्रावळी नावाची थोर श्रीमंत बाई आहे; तिची मी दासी आहे.'' वैजयंतानं सांगितलं.

परसू विस्मयानं म्हणाला, ''गंग्या, जर ही दासी इतकी देखणी तर ती मालकीण

कशी असंल? अंगण इतकं सुंदर तर ते घर किती सुंदर असंल?''

''तसं काई न्हाई बरं–'' गंगू शांतपणे म्हणाला. ''एक एक घर जुनाट नि पडकं बी असतं–''

गंगूच्या बोलण्याची खोच प्रेक्षकांनी ओळखली. चंद्रा जुनाट घर नि वैजयंता सुंदर अंगण, असा अर्थ घेऊन त्यांनी टाळी दिली. परंतु विंगेत उभी असलेली चंद्रा एकदम फटफटीत पांढरी पडली. गंगूवर डोळे वटारून तिनं पाय आपटला, तशी त्यानं जीभ चावली.

''तू लोकांचं पाणी कां भरतेस?'' परसू म्हणाला. ''चल, आमच्या मुलखात. तितं काळी जमीन आहे. माणूस पेरलं तर माणूस उगवतं –''

''आनी कृष्णेचं पाणी प्यालं की काया सोन्याची होते!'' गंगू बोलला.

''मग तुम्ही असे वनवासी का?'' वैजयंतानं चटकन प्रश्न करून त्यांना गार केलं. आणि गंगू म्हणाला, ''आम्ही माजोरी म्हून हिंडतोय.''

लोक हसले आणि लगेच परसूनं सूर धरून लावणीला आरंभ केला –

*गाव आमचं ग सातारा। ध्यानामधी धरा।*
*मुलुख आहे न्यारा। पुणे धर्तीचा।*
*जिथं होती मराठ्यांची गादी। जबर होती सद्दी देश मर्दाचा।।*

या ओळीनं प्रेक्षकांपुढं गत-इतिहास उभा राहिला. कानात घोडदौड उठली. ह्रदयात तोफांनी गडगडाट केला.

आबा पाटील मिशीला पीळ भरू लागला. चवलीची दौलतजादा करणारे खिशात रुपया पाहू लागले.

वैजयंता बालिश हसत म्हणाली, ''माझं लग्न तिकडंच होणार आहे. मी अजून लहान आहे.'' असं म्हणून तिनं मागं सरकून तुणतुण्याचा स्वर कानात घेतला व ती गाऊ लागली –

*जशी तलम भरजरी घडी। तशी माझी आली भरामधी कुडी-*

या लावणीच्या शेवटावर तिनं एक भरदार झेप घेतली. त्यातच तिनं पाठीवरचा पदर फराऱ्याप्रमाणे उंचावून, डोकीवरून धरून पाण्यात मंदगतीने नाव चालावी, तसं नृत्य सुरू करताच प्रेक्षकांच्या नाजूक भावना एकदम उचंबळून आल्या.

बाबालाल शेटचा नोकर नि सदानंद थिएटरचा कारभारी बळिराम गार पडला होता. पोस्टाच्या पेटीप्रमाणे तोंड पसरून तो पाहत होता. उदार प्रेक्षकांनी दौलतजादा पुकारली, पण मध्येच आबा पाटील ओरडला,''चल – पन्नास रुपये!''

त्या आकड्यानं रुपयेवाल्यांचे ऊर दडपून गेले. आबा नोटा हवेत हालवू लागला. वैजयंतानं काढणी लावून विटा फेकावा तशी नजर त्याच्यावर फेकून परत घेताच

आबा चिरडला. तो पुन्हा गरजला,

"— शंभर रुपयं. चल!"

शंभर रुपये — थिएटरात आश्चर्य भरलं.

रंगमंचावर वैजयंता उभी होती आणि खाली आबा पाटील शंभर रुपयांच्या नोटा नाचवीत होता. लोक पाहत होते. तोच चंद्रा पुढं आली. ती वैजयंताच्या कानात हळूच म्हणाली, "वजू, जा की आण ते रुपये!"

"मी नाही बाई!" वैजयंता म्हणाली.

"बरं, मी आणत्ये!" असं म्हणून चंद्रा निघाली तसा आबा पाटील खेकसला - "ए, तू नकं! तिला येऊ दे — ती आली पायजे!"

चंद्रा थांबली. ते शब्द तिला काळासारखे क्रूर वाटले. क्षणात ती खचली. सारे थिएटर मिस्किलपणे हसलं. त्या हास्यानं तिचं काळीज विरघळून पाणी झालं. तिच्या पायात कापरं भरलं. कशीबशी ती परत आली आणि आशाळभूत स्वरात म्हणाली, "मेल्यानं माझा अपमान केला. उन्मत्त, निर्लज्ज, किरडीवाला!" ती शिव्या देत राहिली.

दिव्यांच्या प्रखर प्रकाशात यावेळी वैजयंता घामानं उफाळून निघाली होती. पातळ तिच्या अंगाशी चिकटलं होतं. चंदूलाल त्या स्थितीत तिला पाहण्यात गर्क झाला होता. तिच्या गोऱ्या मांड्या पातळातून अंधुक दिसत होत्या, त्यावरून त्याची नजर हालता हालत नव्हती.

"चल घे हे रुपयं!" पाटील स्वर चढवून म्हणाला. तशी चंद्रानं वैजयंताला कोपरानं डिवचलं — "जा ना आण!"

"मी नाही —" वैजयंता पुन्हा म्हणाली, तेव्हा चंद्रा पुढं सरकून म्हणाली, "ऐका ऽ वैजयंता शंभर रुपये दौलतजादा घेणार नाही!"

"मग किती घेणार? बोल—" आबानं नाक फेंदारून उलट सवाल केला. तशी वैजयंता म्हणाली,

"तिन्ही लोकीचं राज्यपद देऊ केलं तरी मी तिकडे येणार नाही —"

हा बोल आबाच्या वर्मी लागला खरा, पण इतरांना हर्ष झाला. बरी साल्याची जिरवली, असा भाव करण्यासाठी त्यांनी चेव येऊन टाळी पिटली.

"ऐका मंडळी —" बाबालालशेट रंगभूमीवर येऊ बोलू लागला. "ही वैजयंता आमच्या गजराबाईची मुलगी आहे. आज प्रथमच तिनं आपली कला तुम्हाला दाखवली. तुम्ही सर्व खूष आहात. या मुलीला तिच्या आईनं याच जागी नाचून शाळा शिकवली. नृत्यशाळेत नाच शिकवला. त्यामुळे तरवारीला अधिक धार आली, हे तुम्ही प्रत्यक्ष पाहिलंच. सर्व तमासगिरांनी जर असंच मुलांना तरबेज केलं तर उद्धार होईल, यात शंका नाही. एवढी मोठी चंद्रा फिक्की पडली आज. या मुलीचा मी सत्कार करतो." असं

म्हणून त्यानं वैजयंताच्या गळ्यात हार घालताच कडाडून टाळी पडली नि बारी संपली.

भावनावश होऊन उशीर बसलेली गजराबाई चटकन उठली आणि स्टेजवरच वैजयंताच्या गळ्यात पडली. तिला हृदयाशी घट्ट धरून ती अश्रू ढाळू लागली. परंतु भावनांचं समाधान होत नव्हतं. मग तिनं तिच्या गालाचं चुंबन घेतलं, नि ती पटकन खाली बसली आणि वैजयंताचे दोन्ही पाय धरून म्हणाली, ''याच जागेवर मी मेले होते, परंतु याच जागेवर या तुझ्या पायांनी मला जिवंत केलं —''

आपल्या आईची ती दारुण स्थिती वैजयंताच्या लक्षातच येत नव्हती. ती विस्मयचकित होऊन पाहत होती.

''आई, असं ग काय?''

''आज मी खरंच जिवंत झालेय —''

''मला समजलं नाही? —''

''घरी चल, सांगते —'' गजराबाईनं ते आनंदाश्रू निपटून डोळे रिकामे करून पाहिलं, तेव्हा तिला तिची वैजयंता अप्रतिम दिसली.

''मामा, चला —'' वैजयंता परसूला म्हणाली. दमलेला परसू उठला, तोच चंद्रा चिडक्या सुरात म्हणाली,

''गंगू, थांब; जाऊ नको —'' ती रागानं लाल झाली होती. 'मुडद्यानं माझा अपमान केला-भर सभेत मला गारद केली—' असं स्वत:शी ती बोलत होती.

''वैजयंता, कमाल केलीस!'' चंदूलाल लांब सुस्कारा सोडीत म्हणाला. परंतु त्याच्याकडे मुळीच लक्ष न देता ती घरी निघाली.

पायातील घुंगरं सोडून आईपाशी देऊन ती थिएटरबाहेर पडली तोच चंदूलाल व बळी दोघे आले. चंदूलाल म्हणाला, ''मी येतो घरापर्यंत —''

चंदूलालला पाहताच गजराबाईच्या काळजात धस्स झालं. भयभीत स्वरात ती म्हणाली, ''आम्ही तिघं आहोत. तुम्ही नका येऊ. आम्ही जाऊ.''

''तसं कसं?'' चंदूलाल आपुलकीच्या स्वरात म्हणाला. ''आज पगाराचा दिवस आहे. दारू पिऊन काही लोक दंगा करीत असतात. त्यात वैजयंता बरोबर. उगीच एकादा छेड काढील. चला-येताना आम्ही दोघे येऊ. परत यायला कितीसा वेळ लागणार आहे?''

गजराबाईचा नाईलाज झाला ती मुकाट्यानं चालू लागली. तिला चंदूच्या दुर्वर्तनाची पुरेपूर माहिती होती. म्हणून तिचं हृदय भीतीनं थरथरत होतं. आजपर्यंत जी जी बाई थिएटरमध्ये नाचत होती, तिला हरप्रकारे चंदू आपलीशी करीत होता. घरात दोन बायका असून तो कधीच संतुष्ट नव्हता. त्याची तृप्ती कशी ती होतच नव्हती. तमाशात नाचणाऱ्या बाईच्या दुर्बलतेचा नि लाचारीचा तो फायदा घेत होता. 'जर याची दुष्ट नजर आपल्या वैजयंतावर पडली तर?. . . तर. . .' गजराबाई उगीचच मनात भ्याली.

बळिराम ढेंगा टाकीत होता. त्यानं काळा लांब कोट घातला होता. डोकीचा पांढरा पटका काखेत धरला होता. त्याचं गुळगुळीत डोकं दिव्याच्या प्रकाशात चमकत होतं, नि तो गंभीरपणे विचार करीत होता. त्याचीही गजराप्रमाणे समजूत झाली होती.

'ही बोकडाची अवलाद या पोरीच्यापाठी नक्कीच लागणार! आणि या कामात आपली विनाकारण धावपळ होणार. आजपर्यंत मी पाप करायचं नि यानं आपला आत्मा शांत करून घ्यायचा. हे पाप कुठं फेडणार? याला चांगलं मरण, देवा, देऊच नको,' अशी तो देवाकडे चोरून मागणी करीत होता.

"का वैजयंता, बोलत कां नाहीस?" चंदू अगदी जवळ जाऊन म्हणाला.

"काय बोलू? मामाशी बोलते आहे ना!"

"आता ओळख होईल म्हणा—" तो म्हणाला. "ही पहिलीच वेळ आहे. आता रोज तू येशील तेव्हा मग बोलशीलच!-"

"नाही बरं का शेट!—" गजराबाई मध्येच म्हणाली. "माझी वैजयंता परत नाचणार नाही. आज मी मिनतवाऱ्या करून मुद्दाम नाचाया लावली तिला. यापुढं मात्र ती तमाशात नाचणार नाही."

"का? असं का?" चंदूला आश्चर्य वाटलं.

नंतर कुणीच काही बोललं नाही. मात्र हा माणूस उथळ आणि हलकट आहे असा वैजयंताचा समज झाला. आजपर्यंत ती त्याला दुरून पाहत होती, परंतु आज तो लोहचुंबकाकडे सुई सरकावी तसा आलेला पाहताच तिची खात्री झाली, की हा हलका परंतु तीक्ष्ण सुईसारखाच आहे.

## २

"ए हरामखोर! — रस्त्यावर घाण करतो? अरे म्युनिसिपालिटी बोंब मारील ना!..." जंगी ओरडला. त्याच्या त्या दमदार आवाजानं रात्र थरारली. तो आवाज शेजारच्या इमारतीवरून गडबडत दूर गेला.

वैजयंता, गजरा, परसू, बळी, चंदू — सारेच दचकले. त्यांनी चमकून बाजूला पाहिलं.

जंगी एका दिव्याखाली बसला होता. तो घरी जायचा विचार करीत होता, परंतु पायात गती येत नव्हती. डोळे उघडत नव्हते.

बाजूला तारेचे कुंपण होतं. त्या कुंपणात कित्येक झोपड्या थंडगार पडल्या होत्या.

एक कुत्र्याचं लहानसं पिल्लू हळूच रस्त्यावर आलं आणि जंगीकडे पाहत घाण करू

लागलं. तसा जंगी चिडला आणि ओरडला. परंतु ते पिल्लू भ्यालं नाही. ते आपलं कार्य उरकून परत त्या कुंपणात शिरलं आणि वळून जंगीवर गुरकलं व भुंकू लागलं.

जंगीला त्याचं नवल वाटलं. तो हसत म्हणाला, "डेरींगबाज आहेस – परंतु जर दिवसा येशील तर एकादी मोटार मोडशील साल्या–" असं म्हणून तो हसू लागला.

चंदूलालनं जंगीला ओळखलं आणि त्याला म्हणाला, "जंगी, झोप लागत नाही वाटतं?"

तसा जंगी उठून उभा राहिला. सहा फूट उंच धिप्पाड देह कार्यक्षम झाला. त्याच्या अंगावर निळा शर्ट नि खाकी पँट होती. हा जंगी घावडा जंगी म्हणून प्रख्यात होता. चाकूच्या घावानं तो 'घावडा' या नावानं ओळखला जात होता.

चंदूलालच्या शब्दानं तो भानावर आला. निरखून पाहत तो म्हणाला,

"तू... तू कोण?–"

"मी चंदूलाल-"

"मग जा तर–" जंगी उद्गारला. चंदूलालबरोबर दोन स्त्रिया आहेत हे लक्षात येताच जंगी शांत झाला. परंतु चंदूलालचं दुर्दैव आड आलं. आगाऊ शहाणपणा दाखवीत म्हणाला,

"जंगी, तू प्याला आहेस. पोलीस येईल–"

"मादरचोद! तू कोण सांगणार?" जंगी बिथरून म्हणाला. "बाबालालचा बेटा म्हणजे काय लॉर्ड साहेबाचा बेटा आहेस?"

"जंगी!–" चंदूलाल चिडक्या सुरात म्हणाला. "पोलीस पकडील म्हणून मी म्हणतो–"

"हॅट-" जंगी म्हणाला. "तू या देखण्या पोरीपुढं भाव खाऊ पाहत आहेस."

"जंगी!– तोंड आवर!" चंदू भडकला.

वातावरण तंग झालं. जंगीला चंदूलालचा राग आला. त्याला त्याचा पूर्वेतिहास ठाऊक होता. उजवा हात खिशात घालून तो शांतपणे म्हणाला, "मुजोर साल्या – पाजी आहेस तू. देखणी बाई दिसताच तुल चेव येतो नि म्हणे तोंड आवर–"

चंदूलालनं गपकन खिशात हात घातला. त्याच वेळी जंगीनं आपला हात तितक्याच वेगानं बाहेर काढला. लखलखीत पातं चमकलं. डोकीवरच्या दिव्याच्या धूसर प्रकाशात जंगी कृतान्त काळासारखा दिसू लागला.

चंदूचा हात बाहेर निघण्यापूर्वीच जंगी एकदम ओरडला,

"हात काढू नको!–"

चंदूलाल हताश झाला. वैजयंता, गजर, परसू यांनी पाय काढला. परंतु त्यांच्या पाठीवर जंगीचा आवाज पुन्हा टक्करला – "ए, थांबा - तुम्ही निघाला, मग हा मुडदा

कोण घेऊन जाणार? जाता जाता याचा मुडदाही घेऊन जा. याला मरण हवं आहे.''
"जंगी! तू नाहक माझा अपमान केलास.'' चंदूलाल उसन्या अवसानानं म्हणाला.
"तू हलकट आहेस — मुकाट चालू लाग!'' जंगी गुरकला.
"ठीक, मी जातो.''
"जा — परंतु जिवाची काळजी घे. जीव परत येत नसतो. जा. नादान!''
वैजयंतानं वळूनही पाहिलं नाही. ती घरी आली तेव्हा तिचा जीव भांड्यात पडला. एक सुस्कारा टाकून ती म्हणाली,
"हा मुडदा खरंच आगाऊ आहे —''
ती घरात गेली आणि थोड्या वेळानं चंदूलाल येऊन दारातील खाटेवर बसला. त्या चाळीच्या पुढं लिंब, शेवगा या झाडांची गर्दी होती. मधल्या अंगणात पुष्कळ लोक झोपत. त्यांच्या खाटा तिथंच असत. वैजयंतानं चंदूची मुळीच विचारपूस केली नाही. आल्याबरोबर चूल पेटवून ती चहा करू लागली. परसूला चहा हवा होता. ती चहा करीत असली तरी तिचं चित्त थाऱ्यावर नव्हतं. तिच्या हृदयात भीतीचं काहूर उठलं होतं. उद्या उमा काय म्हणेल? तमाशात नाचू नको असं त्यानं पुन्हा पुन्हा सांगितलं होतं. आईनं भलताच आग्रह केला आणि आपण उमाचं मन मोडलं. त्याला काय वाटेल? तो नक्कीच रागावेल. पण आपण तरी काय करणार? ही अशी नाजूक परिस्थिती आपल्याच वाट्याला का आली कोण जाणे!
चंदूलाल दारातील खाटेवर एकटाच चुळबुळत होता. तो शेट होता. तमाशातील बायांनी त्याची ऊठबस करायची असा रिवाज होता. परंतु वैजयंताला तो रिवाज मान्य नव्हता. शिवाय, ती काही तमाशात नाचणारी नव्हती. फक्त एक दिवस ती सहज उभी राहिली होती एवढंच!
चंदूलालला मात्र वैजयंताची ही बेपर्वाई अपमानास्पद वाटत होती. मात्र त्याही स्थितीत तो उठून जाऊ इच्छीत नव्हता.
गजराचा आनंद हृदयात सामावत नव्हता. आज आपला महान विजय झाला आहे, आपण चंद्रावर सूड घेतला आहे, हे वैजयंताला कसं सांगावं याचा ती विचार करीत होती.
परसू आज भलताच विचारमग्न झाला होता. वैजयंतासारख्या स्त्रिया जेव्हा तमाशात येतील तेव्हाच तमाशाचा उद्धार होईल असं त्याचं मत झालं होतं. आज दोन तपं तमाशा करून सर्वत्र गाजलेला तो तमासगीर होता. स्वत: कवीही होता. सर्व तमासगिरांवर त्याचं वजन होतं. वर्तनानं, गुणानं, मनानं, कवनानं तो श्रेष्ठ मानला जात होता. दहा वर्षांपूर्वी त्याची पत्नी निवर्तली होती. तेव्हापासून तो गजराबाईकडे राहत होता. त्याला बहीण नव्हती नि गजराला भाऊ नव्हता. म्हणून ती मायेची उणीव दोघांनी भरून काढली होती. सख्ख्या

बहीणभावापेक्षाही त्यांची एकमेकांवर माया होती.

आपण हयातभर तमाशा केला, पण आज या कालच्या पोरीनं फडात आपली तारांबळ केली, याचं त्याला नवल वाटत होतं.

वैजयंता चहा घेऊन आली तेव्हा परसू म्हणाला, ''बैस. तुझा तमाशा पाहिला. आत्मा संतुष्ट झाला. पण खरं सांगू! मी खचतही होतो.''

''का? का? कशानं?'' ती जवळच बसली आणि गुडघ्यावर हनुवटी टेकून हसत तिनं विचारलं.

''तुझ्यात इतका हजरजबाबीपणा असेल असं मला वाटलं नव्हतं. आता माझी खात्री झाली की, गायनासाठी गळा जसा आवश्यक असतो तद्वत कलेच्या आविष्कारासाठी खोल विचार, सुंदर देह आणि तितकीच जबर धमकही असणं जरूर आहे.''

वैजयंताला परसूबद्दल भारी आदर होता. ती त्याचा शब्द मोडीत नव्हती. ती काहीच बोलली नाही. फक्त हसली.

इतक्यात चंद्रा आली. तिच्याबरोबर गंगूही आला. त्यानं आपल्या खाटेची काळजीपूर्वक पाहणी केली.

चंदूलालकडे लक्ष जाताच चंद्रानं आश्चर्य प्रकट केलं. ''कोण चंदूशेट एकटेच बसले आहा?''

चंदूलाल फक्त हुंकारला. तोच चंद्रा म्हणाली, ''आल्ये मी पातळ बदलून.

ती तशीच घरात गेली आणि गंगू हळूच परसूजवळ येऊन म्हणाला. ''आजचा तमाशा मुळावर आला. चंद्राबाईनं मला फडातून काढलं. म्या म्हनं तिचा अपमान केला.'' त्यावर परसू काहीच बोलला नाही. मग मीही तिच्या फडात जाणार नाही, असं मनातल्या मनात ठरवून तो विचारमग्न झाला.

''हं शेट, बोला, काय म्हणता?'' चंद्रानं चंदूशेजारी खाटेवर बसत विचारलं.

''काही नाही. सहज आलोय मी.''

''ते मी ओळखलंय! पुढं बोला—''

''मग काय करू?'' चंदूनं लांबच्या लांब सुस्कारा टाकला, आणि चंद्रानं वैजयंताला हाक मारली -

''वैजयंता, इकडे ये ना—''

वैजयंता उठली. पदरानं सर्वांग लपेटून घेत ती आली आणि किंचित अंतर राखून बसली. थोड्या वेळापूर्वी जंगीनं वस्त्रहरण केलेला हा चंदूलाल शेट काय बोलणार आहे याचा ती विचार करू लागली.

''खरंच वैजयंता, तू कमाल केलीस!'' चंदूलाल म्हणाला, ''हे एकाएकी तू कसं करू शकलीस - नवल आहे!''

"अहो नवल कसलं? —" चंद्रा म्हणाली. "माशाचं पिल्लू पोहायला कसं शिकलं असं म्हटल्याप्रमाणेच तुमचं बोलणं आहे!" असं म्हणून वैजयंताकडे वळून ती पुढं म्हणाली, "वजू, अग तो खुंदलापूरचा पाटील तर वेडाच झाला आहे. तुझं ते पद लोकांना भलतंच आवडलं आहे."

वैजयंता काहीच बोलत नव्हती. फक्त ऐकत होती, हसत होती.

निम्मी रात्र उलटून गेली होती. चंद्र डोईवर आला होता. त्या शुभ्र प्रकाशात वैजयंता अधिकच मोहक दिसत होती. आपलं पद लोकांना आवडलं; फार फार आवडलं — हे ऐकून ती हर्षभरित झाली होती.

"मी तर त्या गाण्यावर फिदा आहे!" चंदू उद्‌गारला.

"मग करा धडाडी शेट, मोडाच ही घडी—" चंद्रानं मोकळं हसत विनोद करताच वैजयंता चमकली.

"अक्का, मला नाही आवडत हे!" वैजयंता किंचित चिडक्या स्वरात म्हणाली. तसा बळी उठून बसला. तो उशीर पडून ऐकत होता. तो म्हणाला,

"काय हरकत आहे? मग, आज ना उद्या घडी मोडणारच की! ती सासूनं मोडली काय नि सुनेनं मोडली काय — सारखंच!"

"बळी!" वैजयंताचा स्वर तीक्ष्ण झाला.

"काय?" त्यानं विचारलं.

"कसली घडी?"

"घडी — आपली भरजरी—" बळी चाचरला.

"जीभ सैल झाली!-"

"खरंच सैल झाली!" बळीनं कबूल केलं.

"मग आवरा, नाही तर रंडकी होईल!" वैजयंता दबक्या पण दाट आवाजात म्हणाली. "एक दात उरणार नाही. आपलं वय लक्षात घेऊन बोलावं!—"

"एवढाच गुन्हा!" असं म्हणून तो पुन्हा उताणा पडून त्या गाण्याची शीळ वाजवू लागला.

"अक्का, मी जाते." असं तुटक म्हणून वैजयंता फणकाऱ्यानं उठून घराकडे गेली आणि ती दोघंच अंगणात बोलत बसली.

"ही भलतीच बेमुर्वतखोर दिसते!" चंदूला वैजयंताचा राग आला.

"अजून अग्नीपासून दूर आहे तूप!—" चंद्रा म्हणाली. "शिवाय उमा आहे ना, तो आहे तिचा प्राण, त्याच्यासाठी ही जीव टाकीत असते."

"अच्छा! चंद्रा, मी जातो. एका खास कामासाठी मी तुला नंतर भेटेन. मला तुझी मदत हवी आहे, एवढंच मी तुला सांगून ठेवतो—" असं म्हणून चंदूलाल निघाला. बळीही

धडपडून त्याच्यामागोमाग चालू लागला.

मध्यान्ह रात्र गंभीर भासत होती, पण वैजयंता आणि गजरा जाग्या होत्या. त्या मायलेकींना झोपच लागत नव्हती. त्या आपल्या विचारचक्रात गिरक्या घेत होत्या. चंद्राचा पराभव झाला म्हणून गजराला हर्ष झाला होता. तर आज आपण तमाशात नाचून उमाला दुखवलं हे बरं केलं नाही — वैजयंताला वाटत होतं.

'एकदाच — फक्त एकच वेळ तमाशात नाच—' असा आईनं आग्रह केला, याचं कारण समजून घेण्यासाठी ती उत्सुक झाली होती.

शेजारच्या खोलीत उमाची आई-हौसाबाई आणि बाप ज्योती दोघं अजून जागीच होती. ती दोघं बहुतेक आपल्या तमाशाचीच चर्चा करीत असतील! उमा घरी येताच त्याला नाही नाही ते बोलून ती त्याचा अपमान करतील! पाहा — जिच्यासाठी रात्रंदिवस काळजी करीत असतोस ती तुझी लाडकी आज तमाशात नाचून आली! ही बाई तुझा संसार कसा करणार? — म्हणून ते उमाला हिणवतील, त्यांच्या मनात विष कालवतील नि तो चिडेल. पण मग आईनं तरी असं कां केलं?

आणि गजराबाईही त्याचाच विचार करीत होती. मनातील हर्ष-खेद, सुख-दुःख हे सारं व्यक्त करण्यासाठी शब्दांची गरज असते. अर्थात ती भासत नसते. पण गजराबाईला शब्दच सुचत नव्हते. एका जखमेवरची खपली नखलताना सर्व शरीरात कळ शिरेल की काय याची तिला भीती वाटत होती; आणि ती जखम तर अजून ओली होती.

गजराबाई त्यावेळी तरुण होती. तारुण्याचा दर्या क्षणाक्षणानं मर्यादेची रेषा गाठत होता. उन्मादाच्या लाटा उसळत होत्या. त्यांच्यावर प्रभुत्व करण्याचं सामर्थ्य कुणातच नव्हतं. गजराचं जीवन अस्थिर वाऱ्यासारखं होतं. स्वैर होतं.

त्यात तारुण्य, लावण्य आणि कला यांचा अपूर्व संगम तिच्याठायी झाला होता. त्यामुळं लौकिक आणि लक्ष्मी यांनी तिचा पदर धरला होता.

गजरा तमाशात नाचत होती. रंगमंचावर चंद्रा तिचा हात धरून शिकत होती, रुळत होती. गजराच्या तमाशानं सदानंद थिएटर भरभराटीला आलं होतं. बाबालाल खोऱ्यानं पैसा ओढीत होता. कित्येक रंगेल अभिरुचीचे आत्मे गजराबाईवर फिदा झाले होते. सावलीप्रमाणे बरोबर फिरत होते. हलक्या मनाची माणसंच अशी मागं लागतात, असं तिचं मत झालं होतं.

एके दिवशी ती मनात चरकली. आयुष्यात न घडावी ती गोष्ट घडली. दैवानं घात केला. महिना आला तसा गेला. पाळी टळली. मनाला हुरहूर लागली. ती अस्वस्थ होऊन विचार करू लागली. आपल्या कुशीत एक प्राण, एक मानव साकार होत आहे. या

अंकुराचा धनी कोण? आपण जरी मातृत्व पदरी घेतलं तरी दातृत्व कोण घेणार?
या विचारानं गजराबाई बेचैन झाली. कोळपून गेली. भयभीत झाली. आपल्या पोटी जन्माला येणाऱ्या मुलानं कुणाचं नाव सांगावं? त्याला बापच नाही, ही कल्पनाच तिला दाहक वाटत होती. तिनं सलगीच्या बायांना ते गुपित सांगून उपाय विचारले, तेव्हा अनेकींनी अनेक उपाय सांगितले. बहुतेकींनी हा अंकुर मुळातच मारावा असं सुचवलं आणि हृदयात रोवलेली ती मुळी जाळण्याचे अनेक जालीम मार्ग दाखवले. गजरानं शर्थ केली, पण ती मुळी जळत नव्हती. तिनं हृदयाशी तिढा दिला होता. अगदी आळपून बसली होती.

शेजारची हौसाबाई त्याचवेळी गरोदर होती. गजरानं आपलं ते गुपित तिला सांगताच ती धीराच्या सुरात म्हणाली, "गजराअक्का; असू दे. त्ये तुझ्या काळजाचा देठ हाय. त्यो कापू नकं."

ती चाळ गरीब वस्तीत होती. तिथं काही खोल्या तमासगीरांच्या होत्या. गजराबाईचा शेजारी जोती हा एक जुना तमासगीर होता. परंतु तो आता एका कारखान्यात नोकरी करीत होता. त्याची बायको हौसाबाई ही सुद्धा तमाशातच होती. तीही आता गरतीसारखा संसार करीत होती. त्यांचं सर्व ठीक चाललं होतं. तमाशाच्या धंद्यात मिळणारा मान हा बेगडी आहे. तमाशावाला म्हणताच समाजात, जातीत किंमत नसते. शिवाय कंत्राटदाराच्या इच्छेनुसार तमासगिरांना नाचावं लागतं, प्रसंगी मानहानी सोसावी लागते. या सर्व गोष्टींचा वीट येऊन जोती आणि हौसाबाई यांनी तमाशाला कायमचा रामराम ठोकला होता. तमासगिराला कुणी मुलगी देत नाही, कोण सोयरीक करीत नाहीत. तेव्हा आपण जर आताच सावध होऊन वागलो तर आपली पुढची पिढी दोषमुक्त होईल. केलेलं पाप मातीआड होईल - म्हणून ती दोघं तमाशापासून अलिप्त राहिली होती. परंतु शेजारधर्म त्यांनी सोडला नव्हता.

गजराबाई आणि हौसाबाई दोघी एकाच आठवड्यात बाळंत झाल्या. जोतीनं त्यावेळी गजराला सर्व मदत केली. दोन्हीकडचं पाणी भरलं आणि एकाच दिवशी दोन्हींकडे दोन पाळणे हलू लागले. गजराबाईला मुलगी झाली, तर हौसाला मुलगा झाला. तिनं आपल्या मुलाचं नाव उमा असं ठेवलं नि गजरा आपल्या तान्हुलीला वैजयंता म्हणू लागली.

परंतु गजराबाईच्या कलेला कष्टाचं रूप आलं होतं. बाराव्या दिवशीच ती आपली वैजयंता घेऊन थिएटरमध्ये नाचायला गेली आणि विंगमध्ये बाळाला निजवून तमाशा करू लागली. पुढं तो तिच्या जीवनाचा क्रमच झाला.

दोन महिन्यांची वैजयंता घुंगरं, ताल, सूर, डफ, तुणतुण यांच्या नादावर विंगमध्ये खेळू लागली. सात वर्षांपर्यंत रोज रात्री वैजयंता थिएटरमध्ये नियमानं जात होती. विंगेत बसून हर्षभरित होऊन आईचं नृत्य पाहत होती. गायन ऐकत होती. झाडाच्या शेंड्यावर

बसून किलकिलाट करणारा चिमण्यांचा थवाच आईच्या पायात बोलत आहे असं वाटून तिचं बालमन आश्चर्यचकित होत होतं आणि त्यावेळी होणारे सर्व परिणाम हृदयात घेऊन ती घरी येत होती.

मग ती दिवसभर उमाबरोबर खेळत होती. तिला उमा आणि आई एवढीच आपली आहेत असं वाटत होतं. उमावाचून तिला चैन पडत नव्हतं. क्षणभरही ती त्याच्यापासून दूर रहात नव्हती.

मध्येच आईपुढं ती रात्री पाहिलेलं नृत्य करी आणि तिच्या पायांतील ते ताल गजराला कळत. कौतुकाला भरतं येऊन ती तिला चटकन पोटाशी धरी. तिच्या पायाचे पटापट मुके घेई. 'माझ्या बाईचे पाय बोलके आहेत', असं म्हणून स्वत:च्या कपाळी बोटं कडकन मोडून अलाबला घेई.

वैजयंताला बाप नाही ही टोचणी गजरानं केव्हाच फेकून दिली होती. मी तिची आई आणि मीच बाप असं ती म्हणत होती. तिला कशाचंही उणं पडू देत नव्हती. पैसा पाण्यासारखा उधळीत होती.

वैजयंता लहानपणापासूनच आईला छळीत होती. खाऊचा पुडा उजव्या हाती घेऊन लगेच डावा हात पुढं करून म्हणत होती, "आणि उमाचा!" यामुळं गजराबाईला प्रत्येक वेळी प्रत्येक वस्तू उमासाठी निराळी आणावीच लागत होती. एकदा वेणीचा गोंडा उमाला आणला नाही म्हणून ती रडत बसली आणि उमासाठी दुसरा गोंडा आणलेला पाहिला तेव्हा हसली.

आपल्या लाडक्या वैजयंताबरोबरच गजरा उमाचेही लाड करीत होती, यामुळे जोती नि हौसाबाई यांनाही आनंद होत होता. एकदा जोती सहज म्हणाला,

"गजराबाई, ही पोरं साळंत घालू या! दिवसभर कोंबड्यावानी मातीत खेळत्यात—"

जोतीचं म्हणणं गजराला पसंत पडलं. त्याच दिवशी तिनं दोन पाट्या आणल्या आणि त्या दोघांना शाळेत घातलं. रोज सकाळी गजराबाई त्या दोन मुलांना शाळेत सोडून येत होती, आणि जोती त्यांना परत आणीत होता. लवकरच त्या दोघांना अक्षरांची गोडी लागली. घर, शाळा, खेळ यात ती रमून गेली.

परीक्षेच्या पायऱ्या चढत चढत ती दोघं सुज्ञपणाकडे निघाली आणि त्यांनी वयाची सरहद्दही समीप आणली. ज्ञान नि वय यांजबरोबर परस्परांविषयी प्रेम, आपुलकी, निष्ठा यांचा विकास झाला. शरीराबरोबर स्वरूपात बदल होऊन बालपणीच्या मैत्रीचं शुद्ध प्रेमात रूपांतर झालं. हे सारं झालं, हे त्यांच्याही लक्षात आलं नाही. एवढं मात्र खरं की, आपल्या देहात एकच आत्मा वास करीत आहे, अशी त्यांची निश्चित समजूत झाली.

वैजयंता अलीकडे बुजत होती. स्त्रीसुलभ नियमांनी तिला जखडलं होतं आणि

स्त्रीजन्मासाठी निर्माण केलेल्या सर्व मर्यादा तिला आखून दिल्या होत्या. आपल्या देहाचा प्रत्येक अवयव असा गतिमान का, याची जाण होऊन ती लाजत होती. अगदी लाजून चूर होत होती.

ती शाळेतून घरी येताच गजरा नित्यनेमानं तिची दृष्ट काढीत होती. पुढं गजराबाईनं वैजयंताला नृत्य शिकण्यासाठी एका नृत्यशाळेत घातलं.

शाळेतून वैजयंता सरळ नृत्यशाळेत तासभर जाऊन नृत्य शिकत होती आणि तिथून थिएटरात आईकडे जात होती. याही वेळी उमा बरोबर असायचा. मग बारी संपल्यानंतर गजरा, वैजयंता, उमा अशी तिघं येत होती.

वाटेत येताना गजराबाई म्हणे, ''तमाशाला येणारी सारीच माणसं वाईट नसतात. पण सारीच चांगलीही नसतात. त्यांच्यापासून आपण दूर असावं, नाहीतर भयंकर टोचणी लागते. सोन्याप्रमाणे माणूस पारखावं!''

या सांगण्याचं कारण एवढंच की, वैजयंतानं सावध असावं. कुणी तिला फसवू नये. आता तिला सोळावं वर्ष लागलं होतं. तिची उभार देहयष्टी पाहून कैक भुंगे गुंगत होते, हे गजराला दिसत होतं. शिवाय, डागणीची कळ कशी असते याचा तिनं स्वत: डागण्या घेऊन अनुभव घेतला होता. तमाशातील ते वातावरण उमालाही शुद्ध वाटत नव्हतं. तो रोज येतेवेळी खिन्न दिसे, आणि एकांतात वैजयंताला म्हणे, ''तू तमाशात नाचू नको.''

मग ती त्याला हळूच चिमटा घेऊन म्हणे,

''बरं, बरं, बरं– !''

## ३

वैजयंताचं वाढतं वय नि अप्रतिम रूप पाहून गजराचं मन खचत होतं. आनंदाऐवजी एकपरीनं ती गांगरत होती. हिचं लग्न कसं होणार? कधी होणार? लौकर व्हावं आणि आपण जरी वाकड्या वाटेनं आयुष्य कंठलं तरी आपल्या वजूनं सरळ गरतीसारखा संसार करावा, तो आपण पाहावा, एकादं नातवंड खेळवत डोळे झाकावे, असं सारखं तिला वाटत होतं.

एकीकडे या विवंचनेत असताना उमा आणि वैजयंता त्यांच्यातील तो जिव्हाळ्याचा संबंध तिला आशेचा तुणीर वाटत होता. आपण हा तंतू सोडू नये; जर हे लग्न जमलं तर वजूचा संसार सोन्याचा होईल, ह्याबद्दल तिची खात्री होती. कधी कधी ती म्हणे, 'ही सोयरीक नक्की होईल. जोती शहाणा आहे. आपला शब्द मोडणार नाही.' आणि या एकाच विचारानं ती निर्धास्त होत होती.

त्याच वेळी जोतीही तोच विचार करीत होता. त्या दोघांतील ती सलगी त्याला धडकीच भरवीत होती. ही पोरगी उमाच्या गळ्यात पडली, तर साराच घोटाळा होईल असे वाटून तो हौसाबाईला हळूच म्हणे, 'अग ए, ही वजी उमाच्या गळ्यात पडंल बरं का!' यावर मग हौसाबाई म्हणे, 'तुमचा भारी बारीक विचार! अजून पोरं नव्हं का ती?'

परंतु गजरा, जोती, हौसा यांचे हे विचार त्यांच्या मनातच होते. ते जनात आले नव्हते. त्यामुळं वैजयंता आणि उमा यांना त्याची दखल नव्हती. त्यांचा रोजचा क्रम नियमानं चालत होता.

शेवटी गजरानं मनाचा हिय्या केला. जोतीला घरी बोलावून तिनं तो विषय काढला. तिनं विचार केला, मनाची रुखरुख एकदाची काढून टाकू. ती खालच्या सुरात म्हणाली,

"दादा, माझी वैजयंता आता उपवर झाली. तिचं लग्न करावं असं माझं मत आहे."

"खरंच की!" जोती काळजीच्या स्वरात म्हणाला. 'पोरगी नेटकी झाली हं खरं!" त्यानं इथंच संपवलं, कारण गजराबाई वैजयंताचं उमाशी लग्न करू या, अशी नक्की गळ घालणार याची त्याला कल्पना आली होती. त्यामुळे या बाईला कसं टाळावं याचीच त्याला फिकीर पडली होती. वेलीला न दुखवता त्याला वाळूक तोडायचं होतं. परंतु त्याच्या चेहऱ्यावरची उत्सुकता पाहून गजराला आनंद झाला.

"तसं नाही! वैजयंता तुमच्या उमाला द्यावी असा माझा विचार आहे!" ती म्हणाली.

"तसं कसं? असं वळचणीचं पाणी आढ्याला का बरं न्हेता? नि ते कसं जाणार?" जोती जातिवंत तमासगीर. त्याच्या बोलण्याचा फटकारा कुठं बसला हे गजराला समजलं नाही. मात्र कळ जरूर आली. ती चपापून म्हणाली,

"तुमचं मत काय, सांगा बरं!"

"हे काय इचारता? आम्ही गरीब माणसं; आनी आता लगीन करायची. आमची ऐपत हाय का?" जोती केविलवाणा चेहरा करून काळजावर वार करायची संधी शोधू लागला. तो शांतपणे म्हणाला, "शिवाय प्वार शिकतंय – त्येची आई म्हनती त्येला वकील करायचा-"

"मग बिघडलं कुठं? कराना!" गजरा गंभीरपणे म्हणाली. "पुढील सर्व खर्च मी करीन. मला उमा परका नाही. लहानपणापासून तो नि वजू दुजी दिसलीच नाहीत. मी त्याला जावई म्हणणार नाही; तोही माझा लेक समजेन."

या बोलण्यानं जोती पेचात आला. त्याचं मूळचं धोरण डळमळीत झालं. गजराबाईला न दुखवता त्याला त्या प्रसंगातून बाहेर पडायचं होतं.

"आवं पर तुमी नि आमी – यांच्यात जमीनअस्मानाचा फरक हाय, त्येचं काय? तुमच्याकडं गुडघाभर पैका तर आमचं हे हातावर पोट! तुमी आपला तुम्हाला दंडल असा पाव्हणा बघा. तुमच्या चांदापशी माझी पंती काय वं करणार!"

"तुम्ही असं काही म्हणू नका!"

"नका-नका! भलती गळ घालू नका." जोती चेहरा पाडून म्हणाला. "गजराबाई, तुमच्या पोरीचा जन्म आमच्या म्होरं झालाय. त्यो कसा झाला त्ये आमास्नी ठावं –"

"म्हणजे तुम्हाला काय म्हणायचंय?" गजराबाई घाबरली. जोतीच्या शब्दांनी मांजराप्रमाणे तिला ओरबाडलं. ती चमकली आणि बिथरलेल्या मांजराकडे पाहावं तशी पाहत राहिली.

"म्हंजी त्येचं असं –" त्यानं पुन्हा सुरवात केली. "पोरीचं वागणं, रंगरूप हे सारं आमास्नी ठावं हाय; एवढंच मला म्हणायचं व्हतं–"

"मग नडतंय कुठं?" गजरा संताप दाबीत म्हणाली आणि जोती भकास चेहरा करून बोलू लागला,

"आमास्नी लगीन करायचं न्हाय, आनी तुमी आमास्नी परत असं बोलू नका. आपल्या तोलाची नि मोलाची माणसं बघून टाका तांदूळ."

"म्हणजे कसं काय?" गजराचा राग मस्तकात उसळत होता. ती शिकस्तीनं स्वत:ला सावरीत होती. त्याचा प्रत्येक शब्द तिच्या वर्मी घाव घालीत होता. पण त्याचा रोख स्पष्ट नव्हता; आणि म्हणूनच ती अगतिक होत होती. ती चिडून कापऱ्या स्वरात म्हणाली, "कृपा करा नि तुम्हाला काय म्हणायचं ते सरळ सरळ सांगा-"

"त्यात काय वाकडं हाय? –" शब्द चिरडायचे, डोळे झाकायचे नि वर्म भेदायचे या कलेत जोती तरबेज होता. तो शून्यात पाहत म्हणाला, "हातच्या कांकणाला आरसा लागत न्हाय! गजराक्का, मी मुलखाचा गरीब. तुमच्या पंक्तीला कसा बसू? लग्नाची मला ऐपत बी न्हाय नि घाई बी न्हाय–"

"मग मी करते. मला घाई आहे!"

"मग करा की! मला का इचारता?"

"मग कसं करायचं?"

"आता कसं सांगू? – अक्का, माझा माल कोरडा हाय. नासायची भीती न्हाय. तुमी तुमच्यावाणी चांगली जागा बघा आनी करा पोरीचं लगीन–"

जोतीच्या या शब्दांनी गजराच्या काळजात मेखच मारून टाकली. त्याच्या बोलण्याचा रोख लक्षात येऊन तिच्या हृदयाची आग झाली. वैजयंताला बाप नाही, म्हणूनच हा राक्षस इतका वेळ आपल्या काळजाची चिरफाड करीत होता, हे लक्षात येताच ती शांत झाली. नि:शब्द झाली, मुकी झाली – जन्माची मुकी झाली.

जोती उठून निघाला तेव्हा ती फक्त म्हणाली, "मी पाया पडते. ही गोष्ट कुणाला सांगू नको."

"मला का याड लागलंय?" असं म्हणून तो शांतपणे निघून गेला.

जोती दृष्टिआड होताच गजराला रडू कोसळलं. ती मनमुराद रडली. आजपासून वैजयंताच्या लग्नाविषयी कोणालाही बोलायचं नाही, असं तिनं ठरविलं. आता वैजयंताचं लग्न शक्य नाही — तिला उत्कृष्ट कलावंत करायची, असा तिनं निश्चय केला, आणि आसू पुसून ती रिकामी झाली.

वैजयंतानं उत्कृष्ट कलावंत व्हावं या जाणिवेनं तमाशात कुठं संकट आहे, याची कल्पना ती तिला देऊ लागली. ''वैजू, तू आपलं पाऊल जपून टाक, आता तू मोठी होत आहेस. माझ्याकडे येणारा जरी कोल्ह्यासारखा दिसतो तरी वाघ असतो, हे तू लक्षात ठेव. बेदरकार वर्तनाचा परिणाम भयानक होतो. याचा अर्थ तू गोगलगाईचं जीवन कंठावं असाही नाही. निखाऱ्याच्या राशीत सोन्याची किंमत निश्चित होत असते.''

हे सर्व वैजयंता ऐकून घेत होती; आणि आईचा प्रत्येक शब्द हृदयात साठवून ठेवीत होती. अगदी गाठीला बांधून जपून ठेवीत होती.

याच दरम्यान एक अघटित घटना घडली.

वैजयंताच्या शाळेत त्या दिवशी वार्षिक समारंभ होता. त्यासाठी मुलीने विश्वामित्र-मेनका हे नृत्य बसवलं होतं, आणि सर्वांनी वैजयंतालाच मेनकेची भूमिका दिली होती. मुलींनी फार मेहनत घेऊन ते नृत्य बसवलं होतं.

शाळेचं पटांगण नुसतं प्रेक्षकांनी फुलून निघालं होतं. शिक्षक, पालक, बडेबडे अधिकारी, निमंत्रित पाहुणे व इतर यांनी गर्दी केली होती. गर्दीत उमा अगदी पुढची जागा पटकावून बसला होता. तो वैजयंताची वाटच पाहत होता.

ठरल्या वेळी कार्यक्रम सुरू झाला. फुलांनी मढलेली वैजयंता रंगभूमीवर येताच प्रेक्षक आश्चर्यानं थक्क झाले. तिचं अप्रतिम स्वरूप द्विगुणित झालं होत. पायातील नूपुरांना जणू वाचाच फुटली होती. क्षणात प्रेक्षक तल्लीन झाले. तिची प्रत्येक हालचाल लोकांना आकर्षक वाटत होती. हजारो डोळे तिच्यावर स्थिरावले होते, आणि कौतुक करीत होते. टाळ्यांसाठी सहस्र कर उंचावत होते.

जनतेनं केलेल्या त्या कौतुकानं वैजयंता भारावली होती. पुलकित होऊन पाहत होती.

जेव्हा नृत्य संपलं तेव्हा सर्वांनी पुन्हा तोंड भरून तिची स्तुती केली. अधिकारीवर्गानं पाठ थोपटली. त्या सर्व स्तुतिसुमनांच्या वर्षावानं तिचं हृदय भरून आलं होतं. ती सर्व जनता तिला आपल्या आईसारखी भासू लागली. आई जसं कौतुक करीत होती; तसंच ही दुसरी आई आपले कौतुक करीत आहे. आईनं घरात कौतुक केलं; पण हे मैदानातलं कौतुक. त्याला मोल नाही, असं तिला वाटलं. ती स्वत:ला विसरून बसली.

प्रेक्षक, मास्तरणी, शहाणी माणसं तारीफ करीत होती आणि ती त्यांची गजराशी तुलना करीत होती.

उमानं गर्दीत शिरून तिला ओढीत बाहेर काढली आणि आपल्या अस्तित्वाची जाणीव

करून दिली; तेव्हा ती भानावर येऊन त्याला बिलगली.

"उमा मी नाचले-"

"हो, हो. पाहिलं मी!" तो म्हणाला. "चल लौकर; नाहीतर तुला दृष्ट लागेल." तशी ती लाजली नि सवयीनुसार खाली मान घालून चालू लागली.

ती दोघं थिएटराकडे निघाली होती. गजराला घेऊन नंतर ती घरी जाणार होती.

रात्रीचे दहा वाजत होते. रस्ते सुन्न दिसत होते. निर्जीव भासत होते. भिकारी आणि बेवारशी पोरं फूटपाथवर अंग टाकीत होती. मध्येच एखादं चावट पोर त्या दोघांना पाहून चिचुंद्रीसारखं चिरकत होतं आणि ती दचकून उमाला अधिकच खेटून चालत होती. त्याचा स्पर्श तिला हवाहवासा वाटत होता. झाडांच्या गर्दीत जळणाऱ्या दिव्यांचा प्रकाश हिरवा होऊन तिच्यावर वर्षत होता. त्यामुळं ती अधिकच सुंदर दिसत होती. तिचं मन अजून नाचतंच होतं.

"एक गोष्ट बोलू?" उमा म्हणाला.

"हो-हो. बोल ना! मी एकटीच किती बोलू?" मान तिरपी करून तिनं नाक उडवलं नि ती हसली.

"तू फारच सुंदर नाचलीस."

"आणि काय?"

"तू फारच सुंदर दिसत होतीस."

"हे तर सर्वच म्हणत होते!" ती रुसक्या सुरात म्हणाली. "थोडं निराळं बोल-"

"मग तेच ऐक ना!"

"मग सांग ना!"

"माझी एक विनंती ऐकशील?"

"मी कधीच तुझं म्हणणं मोडणार नाही. का, सांगू? तू माझा देव आहेस."

"म्हणून म्हणतो-"

"तेच लौकर सांग ना-"

"तू शाळेत नाचलीस-"

"ते मला ठाऊक आहे रे बाळा-"

"अग ऐकना-"

"बरं, बोल."

"माझी इच्छा आहे-"

"काय?"

"तू तमाशात कधीच नाचू नकोस."

"मी कधीच तमाशात नाचणार नाही. बस्स?"

"एवढंच कर."

ती दोघं हसली आणि थेटरात शिरली.

गजराची बारी सुरू होती. तमाशा भर जोसात आला होता. चंद्रा आणि गजरा या दोघी तळपत होत्या. परंतु चंद्रा चढती भासत होती. तिच्या तारुण्यानं सर्व नजरा आकर्षून घेतल्या होत्या. गजरा पोक्त दिसत होती. देहात सैलपणा येऊन तो अवजड भासत होता.

माणसाला नवं आवडतं. त्यात त्यांचा दोष नव्हता. उत्तान हावभावानं आणि उन्मादक नजरेनं चंद्रा प्रेक्षकांना उद्दीपित करून सर्वांचं लक्ष वेधून घेत होती.

त्या दोघीत अस्तित्वाचा दारुण संगरच जणू अंतिम पर्वात सुरू झाला होता.

दौलतजादा होत होती. चंद्रा पैसे घेऊन येत होती. हसत होती. कटाक्ष फेकीत होती. प्रेक्षकांनी जसं वळवावं तशी वळत होती.

एक रुपया दौलतजादा घेऊन चंद्रा स्टेजवर आली. घुंगरांचा झनझनाट करीत म्हणाली, "ऐका ऽऽ या रुपयाचं म्हणनं आहे की - शिवू नका मशी दुरून बोला - ही लावणी झाली पाहिजे."

"हो - झाली पाहिजे!" मध्येच प्रेक्षकांतून आवाज आला.

चंद्रानं कपाळावर आठी घातली. नाक मोडीत दुःखी स्वरात ती म्हणाली, "हो. खरं आहे. पण मी काय करू? माझ्या जोडीला बैल चांगला नाही. मी म्हाताऱ्या बैलाबरोबर हे औत एकटी कशी ओढू?"

या विनोदानं प्रेक्षक हसले. पण त्याच क्षणी गजराच्या अंगात कंप भरला. डोळे भरून आले. गळा दाटला. त्या शब्दांनी तिचं हृदय रक्तबंबाळ झालं. तिची नजर क्षणात भुईसपाट झाली. चेहरा फटफटीत पडला. ती गलितगात्र होऊन मटकन खाली बसली.

बारा वर्षं पायात वागवलेली घुंगरं त्या घडीला तिनं सोडून काढली. आसूभरल्या डोळ्यांनी ती जागा न्याहाळली, आणि तिथली धूळ कपाळाला लावली. कमरेत खोचलेला पदर ओढून तिनं डोळे पुसले.

त्याच क्षणी तिनं तमाशाचा कायमचा निरोप घेतला. परत इथं यायचं नाही, असा निर्धार करून ती बाहेर पडली आणि उमा-वैजयंता यांना घेऊन घरची वाट चालू लागली.

गजराबाईचा चंद्रानं भयंकर अपमान करून तिला भर फडातून जणू हाकूनच दिलं होतं. परंतु 'चंद्राच्या त्या क्रूर कृत्याचा सूड घेऊनच मरेन!' अशी प्रतिज्ञा तिनं मनात केली होती.

दुसऱ्याच दिवशी ती बाहेर पडली आणि एका श्रीमंताच्या घरी मोलकरणीची नोकरी पत्करून भांडी घासू लागली. हजारो लोकांना भुरळ घालणारे हात धुणी धुऊ लागले.

आणि दुसऱ्याच महिन्यात वैजयंताची शाळा सुटली. खर्च झेपत नव्हता. ती घरात सर्व कामं करू लागली.

वैजयंताच्या मागोमाग उमाही शाळा सोडून बसला. तो बेकार हिंडू लागला.

या गोष्टीला आज सहा वर्षं झाली होती. गजराबाईनं आपलं जळतं मन राख होऊ दिलं नव्हतं; आणि जेव्हा तो अपमान, ती टोचणी असह्य झाली तेव्हा ती बाबालालशेटला म्हणाली,

''एकदा वैजयंताला थेटरात तमाशात उभं करून पाहायचं आहे. जर ती चांगली खेळली तर मला तेवढाच आधार होईल. कुठवर लोकांची भांडी घासू?''

बाबालालला गजराची दया आली. त्यानं शब्द खर्चून चंद्राला सांगितलं. ''वैजयंताला फडात उभी करून एकदा बघू या. तू तिला काही देऊ नको. मला फक्त पाहायचं आहे - तिचं कसब.''

चंद्राला नाही म्हणताच येत नव्हतं. एकतर बाबालालचा शब्द होता आणि दुसरं म्हणजे गजराचा थिएटरात अपमान केल्याची गोष्ट ती विसरून गेली होती. ती तयार झाली.

मग गजरानं वैजयंताची विनवणी केली होती. ''फक्त एकदाच - माझ्यासाठी आणि एकच दिवसासाठी तू तमाशात उभी राहा.''

''आई, मला तू दुसरं काही सांग. पण एवढं सांगू नकोस!''

''नाही! फक्त एकच दिवस, आईसाठी एकच दिवस नाच! त्याने माझा आत्मा समाधान पावेल. मग मी भीक मागून तुला पोशीन!''

वैजयंताचा नाइलाज होऊन तिला आईची विनंती मान्य करणं भाग पडलं होतं. म्हणूनच ती आज तमाशात नाचून आली होती. थकवा आला म्हणून निजली होती. गजराचा आत्मा शांत झाला होता.

वैजयंतानं आईचं कार्य उत्कृष्ट पार पाडलं होतं. भर फडात चंद्राला गारद केलं होतं आणि तो सूड उगवला होता.

उमाची विनंती पायदळी तुडवून आईची विनंती तिनं ऐकली होती; आणि उद्या उमा काय करील, काय म्हणेल याची धास्ती उरात घेऊन ती निजली होती.

गजरा जागत होती. कैक दिवसांची अंतरीची जखम एकाएकी भरून आल्याचा तिला आनंद झाला होता. सकाळी उठताच तमाशात नाचण्याचा आग्रह आपण का केला ते वैजयंताला सांगायचं असं तिनं ठरवलं होतं.

परंतु एक विजय मिळवीत असता तिची वैजयंता दुसरी आघाडी हरली होती. तिनं

आईच्या हृदयाची जखम भरून काढली होती, तर स्वत:च्या हृदयात एक भयंकर जखम करून घेतली होती.

सकाळी गजरा लौकर उठली, तेव्हा तिचा चेहरा प्रफुल्लीत दिसत होता. वैजयंतानं तिच्या आधी उठून सैंपाक उरकला होता. परंतु ती मलूल दिसत होती.

गजराच्या हे लक्षात येऊन ती सद्‌गदित होऊन म्हणाली, "वैजू, हे काय? तू माझ्यावर उपकारांचा डोंगर रचला आहेस. मी वेडी होऊन तुला आग्रह केला. तू माझं ऐकून आपल्या आईसाठी तमाशात उभी राहिलीस नि मला पुनर्जन्म लाभला!" असं म्हणून गजरानं तपशीलाने आपल्या अपमानाची कहाणी वैजयंताला सांगितली. वैजयंता काहीच बोलली नाही, तेव्हा पुन्हा पुन्हा भीतीयुक्त सुरात गजरा म्हणाली,

"आता तू कशाचीच काळजी करू नको. तुझं लग्न काही होणार नाही, कारण तू माझी आहेस नि मी कलंकित आहे. तेव्हा आता आपण उगीच भलत्या इच्छा करण्यात अर्थ नाही. दु:खी मिळवून सुखी खाऊ. आपण गरीब आहोत. आपला वाली नाही. परसू, गंगू ही वनची पाखरं आहेत. आज ना उद्या ती उडून जाणार. परंतु तू कुठं जाऊ नयेस. रात्री तो चंदूलाल आला, तेव्हापासून भीतीनं माझं काळीज फुटलं आहे. तो फार दुराचारी माणूस आहे. तो आला तर एकही शब्द लवचीक बोलू नको. नाहीतर तो राळ्यावर ब्रह्मांड रचील. या भागात तो जंगी आहे म्हणून हा चंदूलाल माणूस आहे. नाहीतर तो सैतान आहे. आता तो तुझी पाठ घेणार. तेव्हा जपून अस. तू कुणाचा हात धरून जावं किंवा तुला कुणी ओढून न्यावं ही कल्पनाच मला सहन होत नाही. तसं झालं, तर मग माझ्यानं कष्ट होणार नाहीत. मी वेडी होईन!"

वैजयंता डबडबत्या डोळ्यांनी पाहत ऐकत होती. आईचं अंत:करण ती भरल्या नेत्रांनी पाहून घेत होती आणि भावी जीवनातील संकटांच्या सावल्या पाहून भयचकित झाली होती.

गजराबाई सर्व सांगून कामावर गेली.

## ४

आठ दिवसातच वैजयंताच्या जीवनाला निराळी गती मिळाली होती. ती चकित होऊन अवतीभोवती पाहत होती. एक दिवस तमाशात उभे राहाताच हे चमत्कार कसे झाले? तमाशाच्या क्षेत्रात त्या एकाच दिवसानं खळबळ झाली होती. एखादी नवी हरिणी मैदानात येताच पारधी सज्ज होतो, तसे कित्येक पारधी वैजयंताची शिकार करायला तयार झाले होते.

बाबालाल, आबा पाटील हे तर आलेच; पण दूरदूरचे तमासगीर येऊन तिला आपल्या फडात येण्याची गळ घालून गेले. कित्येक थिएटरमालक, कंत्राटदारांनी मुद्दाम येऊन तिच्याशी ओळख करून घेतली. आबा पाटलानं तर कहर केला. तो घरातून हलता हलत नव्हता. जेव्हा गेला, तेव्हा त्यानं ते शंभर रुपये वैजयंताला बक्षीस दिले. हे रुपये परत नेले तर पाप आहे, असं तो म्हणाला.

चंदूलाल बहिरी-ससाण्याप्रमाणे सारख्या घिरट्या घालीत होता. सांज-सकाळ चंद्राकडे येऊन बसत होता.

त्यामुळं चाळीत चर्चा होत होती. गजरानं मुलीला शिकवून काय मिळवलं? अखेर तमाशात उभी केली! असं म्हणून कोणी नापसंती दर्शविली तर जोती अभिमानानं म्हणाला, "चुलीचं लाकूड चुलीलाच जळणार; त्याचा इमला होणार नाही! आपण सावध होतो म्हणून बरं. नाहीतर ही सून महाग पडली असती!"

आणि आज आठ दिवस उमा तर चाळीत दिसतच नव्हता. त्यामुळंच वैजयंताची भीती अधिक वाढली होती. त्याला भेटून त्याचा राग शांत करायचा विचार करून ती थकली होती.

दुसरी गोष्ट - चंद्रानं गंगूला फडातून काढला होता. तो आता हातगाडी घेऊन हमाली करीत होता आणि गंगूला काढला म्हणून परसू स्वतः चंद्राचा फड सोडून बसला होता. तो गंभीर होऊन आयुष्याचा विचार करीत होता.

हे सर्व लक्षात घेऊन वैजयंताच्या काळजाचं पाणी पाणी होत होतं.

दुपार झाली होती. उष्णता वाढली होती. चाळीत सामसूम होती. शेजारची हौसाबाई बाहेर गेली होती आणि एकटी वैजयंता विचारात बसली होती.

इतक्यात उमा आल्याची तिला चाहूल लागली. तो एकटाच आपल्या घरात बसला होता. उमा काय म्हणेल याचं उगीच दडपण वैजयंताला असह्य झालं होतं. एकदाचा काय ते तो म्हणू दे, असं ठरवून ती त्याच्या खोलीत गपकन शिरली. तिनं समोर पाहत पाठीमागं दार लावून घेतलं.

"का आलीस तू?" त्यानं रुक्ष सुरात विचारलं.

"तुझी क्षमा मागायला -" ती शांतपणे उद्गारली. उमाचा चेहरा लाल दिसला. ती अपराध्याप्रमाणे पाहत राहिली. त्याच्या डोळ्यांत पाहण्याचे सामर्थ्य आपल्यात नाही, याची जाणीव होऊन तिनं ओठावरून जीभ फिरवून ते ओले केले.

"तू तमाशात कां नाचलीस?"

"मला आईनं तसा आग्रह केला."

"का?- कारण काय?"

"तू शांतपणे ऐकून घे- सारं सांगते."

"मला एकाच शब्दांत सांग!" तो आवाज किंचित चढवून म्हणाला.

"पण एकाच शब्दात कसं सांगू?" तिनं हताशपणे विचारलं.

"मग आता तू जा-" उमा संतापून म्हणाला. "तू नि तुझं अंतरंग यात फार फरक आहे. आईनं आग्रह केला - मग मी घडोघडी केलेली विनंती? त्याचं काय?"

"परंतु माझी मनःस्थिती लक्षात घे. मी आईच्यापुढं - आईसाठी एकच दिवस म्हणून ते पाप केलं. तू क्षमा करशील अशी आशा होती म्हणून."

"खोटं. मी तसा मूर्खपणा करणार नाही वैजयंता. या क्षमायाचनेमागंसुद्धा कपट आहे. माझ्याही आईबापांचा आता आग्रह आहे-"

"काय आग्रह आहे?" वैजयंता दीनवाण्या नजरेनं पाहत म्हणाली आणि कानात प्राण आणून ऐकू लागली.

"मी तुझ्याशी संबंध ठेवू नये."

"पण कारण काय?" तिच्या स्वरात अगतिकता आली. कंप भरला. ती कळवळून म्हणाली, "उमा, ही क्षुल्लक बाब आहे!"

"असं? मग मोठी बाब कोणती? मी आज आठ दिवस पाहत आहे - जोड्यांचा ढीग लागतो आहे तुझ्या दारी! ते जोडे मोजणाराची अवलाद मी नाही! तू हलकट आहेस-"

"उमा!"

"- आणि निर्लज्जही आहेस. रूपानं सुंदर, पण मनानं कुरूप आहेस. कपटी! हेकेखोर...."

"उमा! उमा! उमा-" कानात तप्त शिसं ओतावं तसं वाटून वैजयंता थरथर कापू लागली. तिनं तोंड झाकून घेतलं. हुंदके देत ती रडू लागली. आपलं रक्त गोठत असल्याची तिला जाणीव झाली, परंतु धीर करून ती म्हणाली, "आता पुरे, मी पाया पडते. ही झाली तेवढी शिक्षा मला पुरे. आता नाही सहन होत!" असं म्हणून ती एक-एक पाऊल पुढं येऊ लागली. त्याच्या पायांवर डोकं ठेवून त्याला शांत करण्यासाठी ती पुढं गेली. पण....

उमा क्रोधातिशयानं बेभान झाला होता. विवेकावरचा त्याचा ताबा सुटला. समोर येताच त्यानं खाडकन तिच्या मुस्कटात भडकावली.

"आईऽऽ" एवढा एकच शब्द उच्चारून ती गप्प झाली. दोन्ही हात गालावर धरून ती खळकन निखळून पडावी तशी पडली. क्षणात दातखीळ बसून ती निपचित झाली.

थोड्या वेळानं ती शुद्धीवर आली, तेव्हा उमा तिला वारा घालीत होता. ती ओलीचिंब झाली होती. गालावर चार बोटं जशीच्या तशी उमटली होती. तोच गाल धरून ती कशीतरी उठली नि पदर सावरून दाराकडे गेली. दारातूनच का कोण जाणे, पुन्हा मागं

वळून नम्र स्वरात ती म्हणाली,

"मी क्षमा मागायला आले होते-"

"म्हणूनच मी क्षमा केली;" उमा शांतपणे म्हणाला. "तमाशात नाचणाऱ्या बाईला अशीच क्षमा करावी लागते. तर ती-"

तिने पुढील शब्द न ऐकता आपला गाल पुढं केला. तो दाखवीत म्हणाली, "तू मला मारलंस."

"मारलं नाही. आपल्या प्रेमाचा शेवट करून त्यावर अंतिम शिक्कामोर्तब केला आहे. आता तू आनंदानं आपला धंदा कर. रोज नवे नवे श्रीमंत तुझ्या घरी येऊ देत. तुझी भरभराट होवो, एवढीच इच्छा आहे."

या अखेरच्या शब्दांनी तिच्या अंगावर काटा फुलला. संताप अनावर होऊन अश्रूंची धार वाहू लागली.

"मी जाते. आता परत येणार नाही."

"नको येऊस. पण लक्षात ठेव, माझ्याशी जसं वर्तन केलंस तसं दुसऱ्याशी करू नकोस."

ती काहीच बोलली नाही. बोलण्यासाठी ओठ थरारले, पण शब्द उमटले नाहीत. ती मुकाटपणे आपल्या खोलीत आली. आपल्या प्रेमाचा तो भयंकर शेवट तिला असह्य होऊन ती वेडावली. किती उशीरपावेतो हृदयात दबलेला हंबरडा मोकळीक मिळताच बाहेर पडला. पदराचा बोळा तोंडात कोंबून तो पुन्हा दाबीत ती रडू लागली. खूपखूप रडावं, असं तिला वाटू लागलं. डोळ्यांतील अश्रूंनी तिचं वक्षःस्थळ भिजलं. जणू हृदयातील प्रेमाच्या स्मृतींना ती अश्रूंचं स्नानच घालीत होती, आणि आपल्या या अश्रूंनी त्या स्मृती वाहून जातील, म्हणून ते आवरीत होती.

सूर्य मावळतीकडे वळला होता. प्रखरता शांत झाली होती. धगधगता सूर्य शीतल वाटत होता. धुरकट रंगाचे लहानसे ढग दूर सरकत होते आणि सोनेरी किरणं सूर्याभोवती गोळा होत होती.

उमाचं मन भानावर आलं होतं. त्याच्या मस्तकात दारुण द्वंद्व सुरू झालं. त्याचे सर्व सुज्ञ विचार त्याच्यापुढं उभे राहून त्याला विचारू लागले -

तू मूर्ख तर नाहीस? एकदाच ती तमाशात नाचली, त्यासाठी तू एवढा उग्र का झालास? नेत्राचे दिवे करून ती तुझी वाट पाहत होती. तुला पाहताच तिच्या गोऱ्या गालावर उषःकाल फुलत होता आणि त्या गालावर तू आज मारलंस?

या प्रश्नाला त्याच्याकडे उत्तर नव्हतं. तो उद्वेगानं उठला आणि बाहेर पडला. जिथं

वैजयंता मूर्च्छित पडली होती, त्या जागेकडे पाहण्याचं त्याला धैर्य होईना; म्हणून तो भटकत निघाला. त्या वेळी तो दगडी पुतळ्यासारखा भकास, निर्विकार दिसत होता.

थिएटरसमोर चंदूलाल आपल्या मित्रमंडळीत उभा होता. उमाला पाहताच वैजयंता याच्यासाठीच जीव टाकीत असते, या चंद्राच्या विधानाची त्याला आठवण झाली. उमा आणि वैजयंता या दोघात पाचर मारल्याशिवाय वैजयंता वेगळी पडणार नाही आणि आपल्या हातीही लागणार नाही, याचा त्यानं विचार केला होता.

उमा समोर येताच तो त्याला थांबवीत म्हणला, ''ए - तुझं नाव काय?''

''उमा-'' उमानं थांबून उत्तर दिलं आणि प्रसंग बाका आहे, हेही ताडलं.

''तू त्या वैजयंताची का पाठ धरली आहेस?'' चंदूलालनं डोळे वटारून विचारलं.

''कोण म्हणतं?'' उमा शांतपणे म्हणाला.

''तसं त्या दोघींनी मला सांगितलं आहे.'' चंदूलाल त्याच्या शक्तीचा अंदाज करीत त्याच्या चेहऱ्यावरचे भाव निरखीत म्हणाला. उमाला त्याची चीड आली. हा आता आपणाला मुद्दाम भेडसावीत आहे, 'मी तसं करीत नाही' अशी या डाकूला आपल्याकडून कबुली हवी आहे, याचा विचार आणि येणाऱ्या प्रसंगाला तोंड देण्याची मनाची तयारी करून तो म्हणाला,

''तू लबाड आहेस.''

''मी लबाड? चल-'' असं म्हणत चंदूलालनं उमाचा गळा धरला. उमाला याची कल्पना होतीच. चंदूलाल अंगावर येताच त्यानं त्याच्या काळजात एक जोरदार ठोसा हाणला. पश्चात्तापानं धुमसणारं मस्तक संतापानं पेटलं आणि मग उमा चंदूलालला ठोशावर ठोसे देऊ लागला. अगदी ठार मारण्यासाठी मारू लागला.

हा एवढं आक्रमण करील याची चंदूलालला कल्पनाच नव्हती. इतरांप्रमाणे हा गांगरून सुटका करून घेईल, या समजुतीनं त्याला दगा दिला आणि तो मार खाऊ लागला. थोड्याच वेळात त्याचा प्रतिकार दुबळा झाला. तो निर्वाणीवर आला. त्याने खिशातून खसकन चाकू काढला. गर्दी वाढली. लोक पळू लागले. सर्वत्र धावपळ सुरू झाली. 'पोलीस-पोलीस' लोक ओरडू लागले.

चंदूलाल भडकून कसातरी उठला आणि डोळे झाकून उमावर वार करू लागला. उमानं प्रसंगावधान राखून चाकू धरण्याची खटपट केली, पण गडबडीत चाकूचं पातं त्याच्या तळहातात शिरलं.

आणि पोलिसांनी दोघांच्या माना धरल्या. दंगल शांत झाली. पोलीसस्टेशनवर चंदूलालनं उमाला चाकू मारला, असं सिद्ध झालं. उमा पट्टी मारून घरी आला. चंदूलाल जामिनावर मुक्त झाला.

उमाला चंदूलालनं चाकू मारला, हे ऐकून वैजयंतावर आकाश कोसळले. दुपारी

मारलेलं ती विसरली. हाताला पट्टी मारून आलेला उमा तिनं पाहिला, तेव्हा तिचा जीव भांड्यात पडला.

उमाला चंदूलालनं चाकू मारला, हे कळताच जोती भडकला आणि चौकीवर जावं तसा तो धावत जंगीकडे गेला.

आठ वाजले. अंधारानं ती चाळ मुठीत घेतली. चंदूलाल पोलीसस्टेशनवरून थेट चंद्राकडे आला. तो दारू प्याला होता. मंदगतीनं त्याला येताना पाहून चाळ भयभीत झाली. लोकांनी दारं लावून घेतली.

चंदूलाल शांतपणे चंद्राच्या खोलीत गेला. चंद्रा तेव्हा तमाशाला जाण्यासाठी साजसरंजाम करीत होती. नटलेली चंद्रा चंदूलालला मोहक वाटली. तो उद्दीपित झाला. त्यानं तिला कवटाळून पोटाशी धरली.

"तुम्ही उमाला का मारलं?" चंद्रानं प्रश्न करताच तो दचकला. मिठीतली चंद्रा सोडून तो तरातरा अंगणात आला आणि सर्व शक्ती एकवटून ओरडला,

"चल - उम्या! ये, बाहेर ये."

त्याचा तो आवाज रात्रीची चिरफाड करीत दूरवर गेला. उमा बाहेर यायला निघाला, तेव्हा लोकांनी त्याला कोंडून ठेवला.

चंदूलाल बडबडतच होता, "मला तू मारलंस. मी जन्मात असा मार खाल्ला नव्हता. एकदम मारलंस तू! मला कल्पना नव्हती. तू मला मारशील यावर माझा विश्वास नव्हता. पण...... तू मला भरपूर मार दिलास." तो निर्लज्जपणे कबुली देत होता. दारूमुळं त्याला भान नव्हतं. म्हणून तो अगतिक होऊन 'उमानं मारलं - उमानं मारलं' असं ओरडून बोलत होता. त्याच्या या बोलण्यावरून खरा प्रकार लोकांच्या नि वैजयंताच्या लक्षात आला की, चंदुलालला उमानं बराच मार दिला आहे आणि तो दारूच्या नादात त्याची कबुली देत आहे.

काही लोक चंदूची ती बडबड ऐकत होते, पण पुढं कोणीच जात नव्हते. शेवटी परसूनं पुढं जाऊन म्हटलं, "चंदूशेट, तुम्ही शहाणी माणसं - असं गैर कां वागता? जा निजा-"

"कां? कां? तू कोण मला सांगणार?" चंदूलाल त्याच्यावर बिथरून झेप घ्यायच्या पवित्र्यात उभं राहून म्हणाला, "तू परसू ना? तू एक नंबरचा चोर आहेस. तुझीच वैजयंतावर नजर आहे. माझी खात्री आहे की, तू तिला पळवणार आहेस. परंतु याद राख - मी तुला सोडणार नाही. आणि तो उम्या तर भानचोद-"

त्याच्या बडबडीतून त्याच्या अंतरीची तळमळ स्पष्ट होत होती. हा वैजयंतासाठीच वेडावला आहे, अशी लोकांची खात्री झाली होती. पण त्याला घरी जा म्हणता येत नव्हते. तो आता माणसात नव्हता.

या चाळीत आपणावर चाल करून येणारा कुणी नाही, याची चंदूलालला खात्री होती. शिवाय वैजयंताला आपलं बळही दिसावं, अशी त्याची इच्छा होती.

परंतु झालं भलंतच. जोती जो गेला तो जंगीला घेऊनच आला. चंदूलाल एकटाच मैदानात पाहून जंगीला आनंद झाला. काहीतरी कुरापत काढून चंदूलालशी त्याला भांडण करायचं होतं, म्हणून तो संधी पाहत होता. कारण त्या दिवशी वैजयंताला पोचवीत चंदूलाल गेला आणि वाटेत बत्तीखाली त्या दोघांची बाचाबाच होऊन प्रकरण कसंतरी मिटलं; त्याच रात्री परत येत असता एकट्या निजलेल्या जंगीचा खून करण्याचा प्रयत्न चंदूलालनं केला होता. परंतु जंगी ऐनवेळी जागा झाला म्हणूनच वाचला. 'परत रात्री का आलास' असं जंगीनं विचारलं, तेव्हा 'तुझी माफी मागायला आलो,' असं चंदूलाल म्हणाला होता. तरी खरा प्रकार बळीने जंगीला सकाळी सांगितला होता.

त्यामुळं चंदूलाल हा कधी ना कधी आपला घात करील, अशी जंगीची समजूत झाली होती आणि तो घात करण्यापूर्वी त्यालाच चिरडून टाकावा अशा विचारात तो होता. आज ती संधी चालून आलेली पाहताच तो चेतला.

"मागं सरा-" जंगी सर्व शक्तिनिशी एकवटून ओरडला. लोकांची पांगापांग झाली. चंदूलाल जंगीला पाहून दचकला. तोल सावरील तो म्हणाला,

"जंगी..... तू माझा इन्सल्ट करू नको. घडीघडी तू माझ्या भानगडीत पडून मला त्रास देऊ नकोस."

जंगी काहीच बोलला नाही. त्यानं चंदूलालच्या थोबाडावर ठोसा मारला आणि विचारलं, "चाकू कुठाय, बोल-"

चंदूलाल धडपडून उठून सरळ होतो न होतो तोच दुसरा ठोसा बसला आणि तो पुन्हा कोसळून पडला. परत उठण्याची धडपड करीत असतानाच जंगीनं त्याच्या मांडीवर बुटाची लाथ मारून त्याचा तो प्रयत्न क्षणात मारून काढला.

"जंगी- माझी मांडी!" चंदूलाल पडून ओरडला आणि जंगीनं चाकू खोलला. टर्रर- असा चाकूचा आवाज ऐकून लोकांची काळजं फाटली. आता भयंकर प्रकार होणार, याची कल्पना करून त्यांनी दारं धडाधड बंद केली.

"जंगी, हात आवर!" बाबालाल धडपडत येऊन ओरडला. चंदूलाल उमाकडे पुन्हा मारामारी करायला गेला आहे, हे बळीनं सांगताच तो धावत आला होता.

जंगी एकदम भानावर आला. त्यानं चाकू बंद करून खिशात घातला. बाबालालकडे वळून तो म्हणाला, "हा महामूर्ख तुमचं अखेर वाटोळं करणार आहे. इतका हलकट, कपटी नि नादान माणूस या दुनियेत नाही. याला सांभाळा-"

"काय केलं त्यानं जंगी?" बाबालाल त्याला शांत करीत म्हणाला. आणि जंगीनं त्या रात्रीची सर्व हकीकत सांगितली. ती ऐकून बाबालालनं त्याला वचन दिलं- "चंदूलाल

तुझं नाव काढणार नाही; तू निर्धास्त अस.'' जंगी निघून गेला आणि चंदूलाल उठला. त्यानं अंगाची धूळ झटकली. नाकातून वाहणारं रक्त रुमालानं पुसलं. समोरचे दोन हात हालवून त्यांची तपासणी केली. त्याची ती अवस्था पाहून बाबालालला वाईट वाटलं.

महिनाभरात उमाची जखम बरी झाली. चंदूलाल दंड भरून मुक्त झाला. त्याच दरम्यान उमा आणि चंदूलाल यांची ती मारामारी वैजयंतावरून झाल्याची अफवा उठली. ती ऐकून वैजयंता भ्याली. जर ही बातमी खरी असेल, तर मग भयंकर आहे! याचा अर्थ, आपण सुरक्षित नाही. आपलं अस्तित्व धोक्यात आहे, असं वाटून ती स्वत:ला दडवण्याचा प्रयत्न करू लागली. ती घराबाहेर सहसा दिसतच नव्हती.

मग दुपारच्या वेळी चंद्राबाईच तिच्याकडे येऊन बसू लागली. ती नियमानं येऊ लागली, तशी वैजयंताची चिंता वाढू लागली. काहीतरी विपरीत घडणार, असं तिला वाटू लागलं.

चंद्रा येऊन हसत-गात बोलत होती. परंतु बोलणं संसाराचं, सुखदु:खाचं नसे. ती स्वत:च्या जीवनात आपण कसं वर्तन केलं, याचाच पाढा वाची. त्याचबरोबर तमाशाचं जीवन किती कष्टाचं असतं, त्यात तरुण बाईची परिस्थिती कशी होते, स्टेजवर आई म्हणणारे, पण एकांतात वासनाधीन होऊन दुष्टपणा करणारे तमासगीर कसे असतात, याचं वर्णन ती करी. आपल्यावर किती लोकांनी कसकसे अत्याचार केले, परंतु आता आपण निर्भय आहोत - त्यामुळंच आपली सद्दी जोरात आहे - म्हणून लोक आपल्याला भितात, असं ती सांगे.

चंद्राच्या या बोलण्याचा हेतू वैजयंताच्या लक्षात येत होता. आपणही असंच बेबंद वर्तन करावं, यासाठीच ही असं सांगत असावी, असं तिनं मनाशी पक्कं ठरवून ठेवलं होतं.

आणि ते बरंचसं खरंही होतं. वासना भडकावून वैजयंताचं मन अस्थिर करावं, एवढ्यासाठीच चंद्रा रोजरोज येऊन त्या प्रेमकथा सांगत होती, हसत होती नि पुरुषलीला वर्णीत होती.

आणि वैजयंता शांतपणे ऐकत होती.

## ५

जीवनाच्या लाटेवर माणूस कस्पटाप्रमाणे तरंगत असतो, लाटेबरोबर वाहवतो. कोणत्या किनाऱ्याला लागणार याची त्याला कल्पना नसते. वैजयंताची स्थिती तशीच झाली होती. तिला जीवन दुर्धर वाटत होतं.

परसू स्वत:चा फड उभा करण्याची धडपड करीत होता. तो दिवसभर हिंडत होता. हुशार, हजरजबाबी माणसं एकत्र करून एक उत्कृष्ट फड उभा करण्याचा त्याला ध्यास लागला होता. गंगू आपली हातगाडी रेटून मेटाकुटीला आला होता.

एकूण ती सर्व एकाच चक्रात सापडली होती. त्यांना बाहेर पडण्याचा मार्गच सापडत नव्हता.

आईचे कष्ट, गंगूचे हाल, परसूची धावपळ हे सर्व वैजयंता पाहत होती. पस्तीस वर्षाचा देखणा परसू आजपर्यंत तमासगीर म्हणून गाजत होता आणि आज त्याचा तो रंजीस, उद्विग्न चेहरा, गंगूची वैतागलेली मूर्ती, आईची थकणारी हाडं यानं तिचं काळीज तिळतीळ तुटत होतं आणि त्या कोलाहलात स्वत:च्या अंतरीचं दु:ख ती विसरत होती.

आकाशात शुभ्र ढग रेंगाळत होते. सूर्याची चैतन्यमय किरणं मुंबईच्या भिंतीवर चढत होती. आल्हाददायी वारा वरच्यावर चरफडत होता. शेवग्याच्या झाडावर एक कावळा बसून गुरकत होता. चिमण्यांचा थवा भिरभिरत होता.

गंगू गाडीच्या चाकात वंगण भरीत होता. परसू गंभीरपणे त्या चाकाकडे पाहत होता. इतक्यात बाबालाल शेट आबा पाटलाला घेऊन आला. आबा पाटलाची मिशी न्याहाळीत गंगू मनात म्हणाला, हा 'वैजयंताला खुंदलापुरात नाचवणार, नाहीतर मी आपली झुबकेदार मिशी भादरणार,' असं म्हणाला होता. पण अजूनही त्यानं मिशी भादरलेली दिसत नाही.

''काय गंगाराम?'' बाबालाल म्हणाला, ''कुठं गेली वैजयंता? पाटील आले आहेत म्हणावं!''

''काय पाटील, अजून मिशीची भानगड केली न्हाय वाटतं?'' गंगू हसत म्हणाला, तसा आबा चमकला. म्हणाला,

''गंग्या, तू सापावाणी हायस नि पक्का डौकील-''

''काय शेट? आणि हे कोण-पाटील? तुम्ही केव्हा आलात?'' वैजयंता पदरानं हात पुशीत हसत दारात आली. तिच्या त्या मोकळ्या हसण्यानं पाटील रंगात आला. पायाच्या नखापासून डोकीच्या केसापर्यंत तिला न्याहाळीत तो हसला आणि ओसरीवर बैठक मारीत म्हणाला,

''आनंद झाला. एवढाच जरी लोभ असला, तरी आम्ही आनी शंभर वर्षं जगू नि परत परत येऊ-''

हे ऐकून वैजयंतानं तोंडाला पदर लावला. ''काय म्हणणं आहे शेट?'' तिनं विचारलं.

''काय सांगू वैजयंता!'' बाबालाल म्हणाला, ''तू खरं म्हण, नाहीतर खोटं म्हण. पण माझा धंदा पार बसला.''

लगेच गंगू म्हणाला, ''मग हकडं का आला? रस्त्याची माणसं न्हीयाची नि उठवायचा न्हाय का त्यो?''

गंगूचे ते बोलणं ऐकून वैजयंता मोठ्यानं हसली.

''भले! सरज्या,-'' आबा पाटील गंगूला म्हणाला, ''तू लाखाचा बोल केलास, पर या घडीला फुकट. जर हे तू फडात बोलला असतास, तर मानसं हसून मुतली असती-'' आबा पाटील प्रत्येक शब्द वैजयंताकडे पाहत बोलत होता. आपण मोठे आहोत, तमाशाची माहिती आपणाला जास्त आहे, हे त्याला वैजयंताच्या निदर्शनाला आणायचं होतं. त्याचबरोबर आपणच तुझ्यासाठी वाटेल ते करू शकतो, तुझा सर्वात श्रेष्ठ हितचिंतक आपणच आहोत, असा भाव त्याच्या शब्दातून निघत होता.

खुंदलापुरात दोन फळ्या पडून त्याची ती दुही आता हातघाईवर आली होती. रोज मारामाऱ्या होत होत्या. त्यापैकी एक खटला हायकोर्टात आला होता, म्हणून तो मुंबईस आला होता. परंतु हा चाळिशीपर्यंत मजल मारलेला दणकट माणूस गहूभर नमलेला दिसत नव्हता. तो वैजयंतावर संपूर्ण भाळला होता. काहीतरी काम काढून तो मुंबईस येत होता आणि त्याने बाबालाल शेटशी चांगलीच मैत्री जमवली होती. मोठा माणूस म्हणून बाबालाल त्याला मान देत होता.

खेड्यावरची माणसं मोठी रंगेल अभिरुचीची असतात, असा बाबालाल शेटचा समज होता. आबा पाटील आज भलताच रंगात येऊन बोलत होता. काहीतर भलतं सलतं बोलून जाईल, म्हणून बाबालाल जपून बोलत होता.

वैजयंता म्हणाली, ''तुमचा धंदा बसला, त्याला मी काय करू म्हणता? मी गरीब माणूस-''

''वैजयंता, खरं सांगू? पोटात सुगंधी कस्तुरी घेऊन वनात भटकणाऱ्या मृगासारखी तुझी अवस्था झाली आहे. तू जर आपला फड उभा केलास तर पब्लिक तुला डोक्यावर घेईल! गजराचे हाल तू का म्हणून करते आहेस? माझं ऐक, तुझ्यात अप्रतिम कला आहे. त्या दिवसापासून कित्येक लोक तुझी तारीफ करतात. ते तुला विसरले नाहीत-''

''लांब कशाला, हातंच बघा-'' आबानं स्वत:चा पुरावा सादर केला. ''मी बारा वर्षं तमाशा बघितला, पण वैजंता, तुझ्यासारखा तमाशा मला कवाच दिसला न्हाय. अशी बाई, असा नखरा, सारंच निराळं. सगळं काळजाच्या कप्प्यात घालावं. न्हायतर गावगन्ना तमाशे हायती. मोर नाचतो म्हणून लांडूर बी नाचतो झालं....'' आबा मनापासून बोलत होता, काळजाचा कप्पा, नखरा, हे शब्द बाबालालला बरे वाटले नाहीत. त्याला काळजी वाटत होती, ती म्हणजे ही बाई फटकन काहीतरी बोलून याचा अपमान करील. ती काही धंदेवाईक नाचणारी नाही.

परंतु वैजयंतानं उलट केलं. ती पाटलाच्या त्या बोलण्यावर मनापासून हसली आणि म्हणाली, ''खरं सांगू? मला तमाशा करायचा नाही.''

"का? का?" आबा पाटील पोटतिडकीनं म्हणाला, "का बरं असं? माशाच्या पिल्लानं पाण्यात खेळायचं न्हाय तर का वाळवंटीला चरफडायचं? हेच बघा माणसाचं चुकतं! माणसाला जे येतं, ते ते करीत न्हाय, नकं तेच करीत बसतं. ह्ये हातचं सोडून पळत्याच्या पाठी लागनं मला पास न्हाय!"

"खरं आहे पाटलांचं-" बाबाशेट म्हणाला, "वैजयंता, तू आपला फड उभा कर. हा परसू, हा गंगू. ही रत्नासारखी माणसं फुकट बसली आहेत. अग, हे चिरे आहेत. तुम्ही तिघं एकत्र आला, तर तमाशा उभा राहील. तुला भरपूर पैसा प्राप्त होईल. मलाही चार पैसे मिळतील आणि तुला काही नाही मिळालं तरी मी पर्वा करीत नाही. फक्त खर्च निघाला तरी बस्स."

परसू शांतपणे ऐकत होता. बाबालालची ती भाषा त्याला परिचित होती. बाबालाल मूळचा अंडी विकणारा - त्या धंद्यात दिवाळं निघालं आणि तो तमाशाचा शौकीन असल्यामुळं तमाशाचं थिएटर सुरू करावयाची कल्पना त्याला सुचली. पुढं ओळखीच्या तमासगिरांनी त्याला हात दिला म्हणून आता तो शेट म्हणून प्रतिष्ठा पावला होता आणि खोऱ्यानं पैसे ओढीत होता. परसूला हे सर्व ठाऊक होतं. आज त्याची ती उदार वृत्ती उचंबळून आलेली पाहून तो शांतपणे म्हणाला, "बरं शेट, मी आपला फड केला तर काय शिदा देणार? बोला."

"शिदा? ऐक परसू- जर तुझ्या फडात वैजयंतासारखी हिरकणी असेल, तर तू सांगशील ती रक्कम मी देईन! यात जीभ बदलणार नाही!"

"आणि वैजयंतासारखी नाचणारी बाई नसंल तर?"

"तर मग काम तसा दाम-" असं म्हणून बाबाशेट हसू लागला.

"परंतु मी चिऱ्यासारखा माणूस आहे की!"

"हिऱ्याची किंमत पैलूनं वाढते-" बाबालाल म्हणाला, "आणि कोंदणानं शोभा हे तुला का मी सांगावं? तू शहाणा आहेस. शिवाय आता बाई चांगली असेल तरच पब्लिक थेटरात शिरते. आम्हालाही प्रेक्षकांचं ऐकावं लागतं. थेटराबाहेर बाया बसल्या तरच चार पैसे अधिक मिळण्याचा संभव होता. परंतु आता कायद्यानं तसं करत नाही. म्हणून कोणत्या बाईवर पब्लिक फिदा होईल, हे आम्ही आता स्वतः पारखून ठरवतो नि मग पैसा खर्चू की नाही हे सांगतो."

"म्हणजे बाई चांगली आणि पब्लिक फिदा होईल अशी असंल तर तो तमाशा चांगला- असं तुमचं मत आहे, आणि याचमुळं तमाशाचं वाटोळं झालं आहे- नि ते थेटरमालकांनी केलं." असं म्हणून परसूनं बाबालालशेटवर एक प्रकारे आरोप केला. परंतु शेट त्याला उत्तर न देता वैजयंताला म्हणाला,

"वैजयंता, तुझा तमाशा लोकांनी पाहिला असून तू तरुण, देखणी, सर्वगुणसंपन्न

आहेस. लोकांना सुंदर, नवं असं काहीतरी हवं असतं. म्हणून म्हणतो - विचार कर.''

"किती शिधा देणार?" वैजयंतानं सहज विचारलं.

"सांग किती घेणार?" शेटनं तगादाच केला.

आबा पाटील टवकारून पाहू लागला.

''इतरांपेक्षा दोनशे अधिक.'' बाबाशेट म्हणाला, ''तू सांगशील ते मला मंजूर-''

"करा, करा तमाशा-'' आबा म्हणाला, "जर तुमचा तमाशा मैदानात आला, तर सात सैदा पाच बकरी मारून कंदुरी करीन.

''मग आमी तमाशाच करणार न्हाय!'' गंगू चटकन म्हणाला, ''तमाशा तुमी बघनार नि बकरी बरीक फुका मरनार!''

बऱ्याच वेळानं आबा, बाबालाल निघून गेले. गंगूनं आपली गाडी रेटून वाटेवर लावली.

परसू आणि वैजयंता दोघंच घरात होती. वैजयंता गजराबाईइतकाच परसूला मान देत होती. लहानपणापासून त्याच्याविषयी तिला फार मोठा आदर होता. तो अलीकडे उदासवाणा चेहरा करून हिंडत आहे, हे तिला सहन होत नव्हतं. त्यानं फडाला लागणारी सर्व माणसं तयार केली होती. फक्त सुंदर बाईच मिळत नाही म्हणून तो वैतागला होता. नाचणाऱ्या बाई मुंबईत काही कमी नव्हत्या; परंतु त्या सर्व थिएटर मालकांच्या आहारी जाऊन शेफारल्या होत्या. शिवाय तशा बायांची त्याला जरुरी नव्हती. आणि आता वैजयंताच्या बोलण्यात तशी तयारी दिसल्याने तो तिचाच विचार करीत होता. परंतु तू नाच, असं म्हणायचं धाडस त्याला होत नव्हतं.

परसूनं मुकं बसू नये, काहीतरी बोलावं, असं तिला वाटू लागलं. ती एकटक त्याच्याकडे पाहत होती, पण तो बोलत नव्हता. त्याला बाबालाल शेटचा राग आला होता.

''वैजू, ऐकलंस ना?'' तो उशिरानं बोलू लागला. ''तमाशा, तमासगीर यांना या थिएटरवाल्यांनी समूळ नष्ट केलं आहे, असं माझं मत आहे. म्हणे जर बाई चांगली असेल तर - हिऱ्याची किंमत पैलूनं वाढते. काय माणूस आहे!''

''माझ्या हे लक्षात येत नाही-'' वैजयंता म्हणाली, ''की हे माझ्याच का मागं लागले आहेत?''

''त्यात गुपित काहीच नाही.'' परसू म्हणाला, ''ज्या बाईवर पैसे मिळण्याची खात्री असते, त्या बाईचा हे असाच पिच्छा पुरवतात. त्या दिवसापासून कित्येकांची माथी फिरली आहेत. तू त्या सर्वांना विसरली असशील, पण ते विसरणार नाहीत. त्या चंदूला तर म्हणे वेडच लागलंय!'' असे म्हणून तो उगीचच उठून बाहेर गेला. कुठं जाणार, कधी येणार - तो काहीच बोलला नाही.

वैजयंता एकटीच बसली होती. चंदूलाल वेडा झालाय हे ऐकून ती त्याचाच विचार करू लागली. पलीकडे हौसाबाई आणि उमा यांची बाचाबाच ऐकून ती उठली आणि

दारात येऊन थांबली व ऐकू लागली.

''मी घरात जेवणार नाही'' - असं उमा म्हणत होता, तर 'दारात का जेवणार' असं हौसा विचारीत होती.

इतक्यात बळी आला. आल्याबरोबर अंगातला कोट काढून तो डोकीवर हात फिरवीत मटकन बसला.

हा नक्कीच काहीतरी विपरीत घेऊन आला असावा, असा वैजयंताचा तर्क झाला. ती म्हणाली, ''हं बोला, काय हुकूम आहे?''

''काही नाही. सहज आठवण झाली म्हणून आलो आहे.'' वैजयंताचा हसरा चेहरा पाहून बळी रंगात येऊन म्हणाला,

''माझी आठवण एकाएकी का बरं झाली?''

''का म्हणजे काय?'' तो चेकाळून म्हणाला. ''आठवण ही चोरासारखी असते. म्हणजे ती चांगल्याच माणसाची होते. आणि मी तुम्हाला कसला हुकूम करू? मी स्वतःच हुकमाचा ताबेदार आहे. माझा जन्म फुकट आहे बाई! मी खरं सांगतो, दिवसभर कुत्र्यावाणी हिंडायचं आणि रात्री खाटेत ढेकूण वळवळतो तसं त्या थेटरात फिरायचं नि पुन्हा खुरमंडी-''

''ते मला माहीत आहे. पण आज तुम्ही कां आला ते सांगा ना.'' वैजयंता अहोजाहो बोलताच बळीचा आत्मा संतुष्ट झाला. समाधानाची छटा त्याच्या चेहऱ्यावर दिसू लागली.

''वैजयंताबाई, माझं या दुनियेत कुणीच नाही. मी तसा फार दुःखी आहे. तुम्ही माझ्याप्रमाणं दुःखी व्हावं, अशी मात्र माझी इच्छा नाही. तुमचंच उदाहरण घेऊ या. तुम्ही काही माझ्या - म्हणजे दैवात जे असंल तसं तुमचं घडंल. तुम्ही कुणाच्या पदरी पडाल ते काही आता सांगता येत नाही. तुम्ही माझ्या पदरी पडावं असं मला वाटून काय होणार? दैवात ते असावं लागतं. आता तुमच्यासाठी तगादा लावून काय होणार?''

''मला तुमचं हे काहीच कळत नाही!'' तिनं मध्येच म्हटलं, बळी हसला. म्हणाला,

''कसं सांगू? हेच पाहा - माझ्या चार बायका मला सोडून गेल्या. म्हणजे तमासगिरांनी एकेक पळवली. बोक्यानं कोंबडी पळवावी, तसं झालं. याचा अर्थ त्या माझ्या दैवी नव्हत्या....'' असं म्हणून तो एकाएकी गंभीर होऊन हळूच म्हणाला, ''तुम्हाला पळवायची तयारी होऊ लागली आहे. जरा सावध असा... परंतु माझं नाव.... म्हणजे हे मी तुम्हाला सांगितलं हे कुठं बोलू नका!'' असं म्हणून तो उठला. आपण एक मोठं कार्य केलं, अशा आविर्भावानं निघून गेला.

बळी गेला, पण त्याचे शब्द वैजयंताच्या मस्तकात थैमान घालू लागले. हा बळी असं का बोलून गेला? त्याचा अर्थ काय? का मी भ्यावं म्हणून मुद्दाम हा असं बोलला? की चंदूलालनं एखादं नवीन कारस्थान रचलं आहे? तिला काहीच कळत नव्हतं. फक्त

मानेवर भीतीची तलवार लटकत आहे, असं तिला वाटू लागलं. दिवसभर ती बेचैन झाली.

सर्वत्र सामसूम होती. अंगणात अंधार भरला होता. फक्त दोन खोल्यांची दारं उघडी होती. गजरा, परसू, गंगू ओसरीला बसून बोलत होती. त्या खोलीपासून आठवी असलेली चंद्राची खोली उघडी होती. ती थेटराकडे निघाली होती. आपला साज करीत होती.

त्या दोन खोल्यात दिवे जळत होते. त्यामुळे प्रकाशाचे दोन पट्टे अंधारात आडवे पडले होते. ते दोन पट्टे भयंकर जबड्यातील सुळ्यांसारखे भासत होते.

चंद्राच्या खोलीत चंदूलाल केव्हा आला, याचा कुणालाच पत्ता लागला नव्हता. तो चंद्रासमोर बसून तिला न्याहाळीत होता, आणि ती काजळ भरीत होती.

गजराच्या ओसरीला गजरा, परसू बोलत होती. गंगू फक्त ऐकत होता.

दुपारी बळीनं तसं का सांगितलं याची चर्चा सुरू होती. ती ऐकून वैजयंता अस्वस्थ झाली होती. गजराबाई घरी येताच तिनं बळी काय म्हणाला ते तिला सांगून टाकलं होतं.

वैजयंताचं चित्त लागत नव्हतं. मनाची अस्वस्थता दूर व्हावी म्हणून ती उठली आणि चंद्राच्या खोलीकडे गेली. आत चंदूलाल दिसताच ती दारातच थांबली.

चंद्रा आणि चंदूलाल दोघं बोलत होती. चंद्रा तमाशाला निघाली होती. तिने सारा साज-शृंगार केला होता. आज रंगभूमीवर कोणते भाव कसे व्यक्त करायचे, कोणत्या क्षणी कोणती लकब घ्यायची, हे ती आतापासूनच मनात निश्चित करीत होती. त्यामुळे ती अधिकच आकर्षक दिसत होती.

तिचे ते उन्मादक हावभाव न्याहाळीत चंदूलाल बसला होता.

''मी फारच भ्याले. एकाएकी कां आलात?'' चंद्रानं विचारलं.

''म्हणजे! तू अजून पुरुषांना भितेस?''

''होय, भिते.''

''का? पुरुष म्हणजे लांडगे की बोके?''

''सांगू?'' किंचित छाती पुढं करीत चंद्रा म्हणाली, ''पुरुष भ्रमरासारखे असतात. ते फुलानं भाळतात.''

''परंतु फूल त्यांना भीत नसतं!'' चंदू म्हणाला. त्यावर ती काहीच बोलली नाही. मग अंगावर काटा शिरशिरल्यासारखं करीत म्हणाली,

''आज सकाळी जंगी आला होता.''

जंगीच नाव ऐकताच चंदू वरमला. तो उद्विग्न होऊन म्हणाला, ''जंगीनं माझ्याशी वैर बांधलंय. या वर्षात त्याचा निकाल मी लावीन. पण चंद्रा, जंगीच्या दादागिरीपेक्षा या वैजयंताची दादागिरी मला सहन होत नाही. उरात चाकू बसावा तशी ती बसली आहे.''

''मग टाका काढून नि व्हा रिकामं!'' निऱ्यांचा घोळ मांडीच्या निडणीत दाबीत ती म्हणाली, ''एखाद्या बाईसारखं रडता कशाला?''

"तू मला मदत कर."

"काय करू?"

"तिला एकदाच तुझ्या घरी बोलाव-"

"नाही ग बाई- तुम्ही शिकार करून जाल घरी आणि मला तुरुंगात जावं लागंल!"

"ते सर्व मी पाहीन! मी शपथ देतो."

"आत्ता नाही जमायचं! नंतर बघू."

वैजयंताच्या उरात धडकी भरली. ते बोलणं ऐकून तिचे पाय लटपटत ती परत निघाली. तिला घाबरलेली पाहून गजरा चरकली. म्हणाली,

"वैजू, कुठं गेली होतीस?"

"चंद्राच्या खोलीकडे." ती पुटपुटली. परंतु तिच्या आवाजातील विचलित अवस्था गजराच्या लक्षात आल्यावाचून राहिली नाही.

"काय काम होतं आता तिकडे?"

"काही नाही ग, सहज गेले होते-" वैजयंता हळूच म्हणाली, "पण मी घरात गेलेच नाही. चंदूलाल आला आहे नि ती दोघं माझ्याविषयी बोलत होती; ते ऐकून बाहेरच्या बाहेरच परतले."

"काय बोलत होती ती?" गजरा रागात म्हणाली.

"ते नंतर सांगेन. आता नको!"

"ते मला माहीत आहे." गजरा काळजीच्या आवाजात म्हणाली, "मी तिला पुष्कळ दिवस ओळखते. आता मी तुला हात जोडते. तू स्वतः होऊन संकटात शिरू नको. माणसानं मरणाची वाट पाहावी. पण मरणाची वाट चालू नये. सत्यानाश होतो."

"आई, आता मी असं कधीही करणार नाही." भेदरल्या मनःस्थितीतून बाहेर पडत वैजयंता म्हणाली, "आता कान धरला मी-"

त्या दिवसापासून वैजयंता जपून पाऊल टाकीत होती. उंदरावर टपलेल्या मांजराप्रमाणे हालचाली करीत होती. तरीही स्वतःला उंदीर समजून दचकत होती. दिवसभर घराबाहेर पडत नव्हती. कामापुरतीच दारात येत होती. आपण चंदूच्या उरात चाकू रुतल्यागत रुततो आहोत. आणखी किती जणांच्या डोळ्यात आपण सलत आहोत, कोण जाणे, याची तिला चिंता पडली होती. बिब्याच्या झाडाखाली बसणाराच्या अंगाला ती सावली उतते असे म्हणतात. ते खरं असायचं. आपण सावली म्हणून जाऊ नि ही सावली अंगाला उतायची. कुणी सांगावं? माणसाचे विचार पालटायला वेळ लागत नाही.

प्रत्येक क्षणी वैजयंता आपल्याच विवंचनेत असे. त्याचबरोबर उमाचा राग शांत होऊन त्यानं आपल्याशी बोलावं, हसावं असं तिला वाटत होतं. त्याच्या शब्दासाठी ती आसुसली होती. त्याची कसलीही हालचाल ऐकू यावी, त्यासाठी सशाप्रमाणे कान

टवकारीत होती.

कधीमधी उदास वाटून ती मलूल होऊन बसत होती नि स्वत:शी बोलत होती. तमाशात उभं राहून मला काय मिळालं? चंद्रावर विजय मिळाल्याचं आईला समाधान मिळालं. पाहणारांना आनंद मिळाला; आणि माझ्या वाट्याला दारुण दु:ख आलं. जो माझा होता, त्याने मला झिडकारलं नि आपलं हृदयच गमावलं. एवढंच नाही तर कित्येक वैरी जोडले. चंदूलाल मला राख करू पहात आहे. आबा पाटील तर म्हणे पैजच मारून बसला आहे. काय ही आपली बोरातील आळीसारखी स्थिती!

महिन्याभरात वैजयंताच्या काळजीत आणखीच भर पडली. घरात सर्वच गोष्टी संपत आल्या होत्या. गजरा रोज लोकांची धुणी धुऊन थकून येत होती. तिचा पगार पुरत नव्हता. परसूचा तमाशाचा फड उभारायचा प्रयत्न मूळ धरीत नव्हता. गंगू हातगाडी रेटून हैराण होत होता. त्याची हाडं उघडी पडून आवाज आत ओढला जात होता. आणि हे सारं पाहून वैजयंता अधिक बेचैन होत होती.

आणि एके दिवशी संध्याकाळी गजरा कामावरून आली ती थंडीने हुडहुडतच. आल्या आल्या तिनं अंथरूण धरलं. दिवसभर धुणी धुऊन गारठा झाला असेल असं ती म्हणाली खरी, परंतु रात्री तिला फणफणून ताप भरून ती निश्चल होऊन पडली.

यावेळी मात्र वैजयंताचा धीरच खचला. आईचे अपार कष्ट आठवून रडू लागली. गजरा पहाटे उठून घरची निम्मी कामं उरकून अंधारातच घर सोडीत होती. दिवसभर लोकांचे काम करून पुन्हा अंधारातच घरी येत होती. कधीच तिला दिवसा घर दिसत नव्हतं. रजा नव्हती, की विश्रांती नव्हती. आजच्या युगातील ती गुलामगिरीच जणू तिच्या दैवी आली होती.

तिनं अंथरूण धरताच वैजयंता, परसू, गंगू यांचं धाबं दणाणलं. सर्वांचा एक आधारच जणू मोडून पडला होता.

रात्रभर गजराबाई तडफडत होती. बडबडत होती. सबंध रात्र वैजयंता तिच्या उशाशी बसून होती. आपल्या डोकीवरची ही मायेची सावली क्रूर दैवानं जर पुसून टाकली तर?... याची तिला भीती पडली होती. तो एकच प्रसंग कल्पनेने पुन्हा पुन्हा डोळ्यापुढं उभा करून ती गांगरली, रडली नि करपली.

पहाटे गजरा शुद्धीवर आली. डोळे उघडून तिनं सगळीकडे पाहिलं. वैजयंता, परसू, गंगू ही तिघं उशापायथ्याशी असलेली पाहून तिला वाईट वाटलं. वैजयंताला जवळ घेऊन ती म्हणाली, ''वजू, रडतेस तू?''

''आई, तू मला घाबरवलंस ना!'' वैजयंतानं घाईघाईने अश्रू निपटून टाकले.

''मला काहीच व्हायचं नाही.'' गजरा भकास चेहऱ्यावर रुक्ष स्मित आणीत म्हणाली. ''घाबरू नको माझ्या सोन्या, माझा हा आजार तात्पुरता आहे. तू बंगल्यावर

जाऊन बाईला सांग. म्हणावं, आज मी कामावर येणार नाही. बरं वाटलं की येईन. जाशील?''

वैजयंतानं मानेनंच होकार दिला. गडबडीनं चूल पेटवली. गंगूनं एक आण्याची साखर, दोन पैशांची बुकी, एक आण्याचं दूध आणून दिलं. चहा झाला नि केसांवरून फणी फिरवून वैजयंता गजराबाईच्या मालकीणबाईला सांगायला निघाली.

६

वैजयंतानं नि:श्वास रोखून बटन दाबलं. घंटी खणखणली नि खटकन दार उघडलं.

''कोण तुम्ही?'' एका देखण्या तरुण बाईनं विचारलं आणि रोखलेला नि:श्वास सोडीत वैजयंता म्हणाली,

''मी गजराबाईची मुलगी.''

''काय? गजराची तू? केवढी झालीस ग! आणि कां आली होतीस? गजरा कुठं आहे?'' बाईनं एकात एक अनेक प्रश्न विचारले. पायाच्या नखापासून डोकीच्या केसांपर्यंत वैजयंताला न्याहाळीत ती हसली.

प्रथम 'कोण तुम्ही' आणि नंतर गजराची मुलगी हे समजताच 'अगं तुगं' हा त्या बाईच्या जिभेचा खेळ का झाला हे लक्षात येऊन वैजयंता गंभीर झाली. म्हणाली,

''आई आजारी आहे. आज येणार नाही.''

''असं? काय होतंय तिला?''

''रात्री ताप भरला.'' वैजयंता उत्तरली.

''काही हरकत नाही.'' बाई म्हणाली. ''नीट औषधपाणी कर. आजच आम्ही शिरडीला जात आहोत. आठवडाभर येणार नाही. गजराला सांग नि तिला विश्रांती घेऊ दे. जा आता, पण थांब हं -'' असं म्हणून बाई घरात गेली आणि दहा रुपयांची नोट घेऊन आली. नोट वैजयंताच्या हाती देत पुन्हा ती काळजीच्या सुरात म्हणाली, ''डॉक्टरकडे गजराला घेऊन जा हं!''

बाईची ती हालचाल, ते मोठेपण, नोकराविषयीची कळकळ हे सारं पाहून वैजयंताला बरं वाटलं. 'अहोजाहो' वरून ती 'अगं तुगं' वर आली हे आता विसरली नि मनात म्हणाली - बाई देवमाणूस आहे.

''बरं, जा तू-'' असं म्हणून बाई मागं सरली. वैजयंता वळली तोच पुन्हा हाक आली, ''ए थांब, मोरीत चार भांडी आहेत खरकटी, तेवढी घासून जा!''

वैजयंता काहीच बोलली नाही. मुकाट्यानं मोरीत शिरली. हजारो चक्षूंसमोर आपल्या

कलेचं अलौकिक इन्द्रधनुष्य निर्माण करू शकणारी वैजयंता आयुष्यात प्रथमच मोलकरीण झाली. जिच्या तरल नजरेनं काही काळापूर्वी कित्येकांना भुईसपाट केलं. ती कमरेस पदर खोचून आईच्या कामावर रुजू झाली. ज्या हाताच्या लकबेनं किमया केली ते हात खरकट्या ताटावरून फिरू लागले. मालकीणबाई दुरून पाहत होती.

वैजयंताचा पिंड कलावंताचा होता. कला ही खडकाखाली झिरपणाऱ्या पाझराप्रमाणे गुप्त असूनही झिरपत असते. तद्वत वैजयंताची एकूण एक हालचाल आकर्षक होती. ती पाहून बाई चकित झाली.

श्रमातही एक प्रकारचं संगीत असतं, एक लय असते, याचा साक्षात्कार होऊन ती बाई म्हणाली,

"काय ग, कुठं काम करतेस?"

"कुठंच नाही. घरीच असते—" असं म्हणून वैजयंतानं बाईकडे पाहिले तेव्हा तर ती अधिकच घोटाळ्यात पडली.

"तू नाटकात काम करतेस वाटतं?" तिनं विचारलं. या प्रश्नाला मानेनंच होकारार्थी उत्तर देऊन वैजयंता मोरीबाहेर आली. घरी निघाली तेव्हा बाई म्हणाली,

"आणि हे पाहा, आम्हाला परत यायला आठ दिवस लागतील. गजराला कामावर यायची काही गरज नाही. पण हो. . . .आमचा सुरेश घरी आहे. त्याचा डबा येणार आहे. फक्त सकाळी पाणी भरायचं काम आहे. तेव्हा तू सकाळी येऊन तेवढं करून जात जा. काय?"

"बरं आहे." एवढंच बोलून वैजयंता निघाली.

"ए - आणि हे पाहा," बाई पुन्हा ओरडली, "सुरेशला कॉलेजात जायचं असतं त्यापूर्वी ये. बरं का!"

"येईन की-" असं म्हणून वैजयंता दृष्टिआड झाली.

ती घरी आली तेव्हा गजरा उठून बसली होती. परसूनं तिला दवाखान्यात नेऊन आणली होती. वैजयंता आल्याबरोबर आईला बिलगली. उशीर का झाला हे आईनं विचारताच, बाई शिरडीला जाणार, आठवडा मोडणार, तू विश्रांती घे, वगैरे सारंच तिनं एका दमात सांगून टाकलं; आणि ती म्हणाली, "रात्रीची चार भांडी होती खरकटी, ती घासून आले."

"वजू! तू भांडी घासलीस?" गजराचे डोळे भरून आले. बाईनं तिला भांडी घासायला लावली याचा तिला राग आला.

"मग काय झालं?" वैजयंता म्हणाली. "रोजच तू काम करावं आणि आम्ही-"

गजरानं तिचे हात हाती घेऊन त्यांचा मुका घेतला. तिचं मन दग्ध झालं. वैजयंता चटकन म्हणाली,

''बाईचा भाचा एकटाच घरी आहे. रोज सकाळी येऊन पाणी भर, असं बाईनं सांगितलं आहे.'' त्यावर गजरा काहीच बोलली नाही.

गजराचा ताप चढउतार करीत होता. कमालीची अशक्तता येऊन ती एका जागीच बसून होती. वैजयंता रोज सकाळी पाणी भरायला जात होती. चार दिवसात सुरेशशी तिची ओळख झाली होती. रोज ती येताच तो गजराच्या प्रकृतीची आस्थेनं विचारपूस करीत होता. त्यामुळे तिला तो आपला जवळचा कुणी असल्यासारखा वाटत होता.

एकदा ती पाणी भरून निघाली, तेव्हा सुरेश रुसका आविर्भाव करीत म्हणाला, ''ए गडे, जरा चहा करून दे नि मग जा!''

मोठी माणसं, बाईचा भाचा - नाही म्हणता येत नाही. आणि त्याची भीड मोडणं तिला शक्यही झाली नाही. तिनं स्टोव्ह पेटवून चहा केला. कप त्याचेपुढे ठेवला, तेव्हा तो पुन्हा हसत म्हणाला, ''तूही घे ना -''

''नाही. मी एकदाच घेते.''

''अरे वा! तू किती शिकलीस?''

''सातवी -''

''परंतु वाचन पुष्कळ झालं आहे वाटतं?''

ती फक्त हसली. तिला घरी जायची घाई होती.

''तुम्ही काय शिकता?'' तिनं विचारलं.

''मी? आता वकिली.'' सुरेश आपला आवाज अधिक भरदार करीत म्हणाला. ''तुझं वय काय?''

''एकवीस.''

''लग्न झालंय?''

''नाही.''

''का?''

''मला माहीत नाही.''

''अरे, तू साक्षीदारासारखी उत्तर देतेस!''

''तुम्ही वकिलासारखं विचारता म्हणून!''

''हे दहा रुपये घे.'' सुरेश हसत म्हणाला, ''आई तुझी आजारी आहे. औषध....''

या घरातील सर्वांचा आपल्या आईवर भारी जीव दिसतो नि ही सारी माणसं प्रेमळ आहेत. त्यांना आमची दया येते, असं मनात म्हणत तिनं ते पैसे घेतले.

''जाते मी.'' तिनं रेशमासारखा स्वर काढला. ती निघाली तेव्हा सुरेश म्हणाला,

''ए थांब. रात्री आठ वाजता दोन भांडी -''

''ती सकाळी घाशीन.'' असं म्हणून ती चालू लागली.

"नाही. तुला आलंच पाहिजे!" त्याची अधिकारवाणी तिच्या पाठीवर टक्करली.

संध्याकाळी गजरा दवाखान्यांत निघाली, त्यावेळी परसू, गंगू आणि वैजयंता ही तिघं तिच्याबरोबर आली. तिथून वैजयंता सुरेशकडे भांडी घासायला निघून गेली.

आठ वाजले होते. रस्त्यावरचा उत्साह मावळत होता. माणसांची गर्दी मंदावली होती. कोलाहल मात्र कायम होता. कोण कोणाकडे पहात नव्हतं. जो तो आपल्या नादात दंग दिसत होता. वैजयंता बंगल्यावर पोचली. तिनं घाईतच बटन दाबलं. बंद दार उघडत सुरेश हसला.

"मला वाटलंच की तू येणार-" त्यानं पुन्हा दार बंद केलं.

"झालं का जेवण?"

"म्हणजे?" तो फक्त हसला.

"मला एकटीला रात्री जायचं - उशीर होईल." ती काळजीच्या स्वरात म्हणाली.

"तू वाऱ्यासारखी तरल आहेस." तो रोखून पहात म्हणाला. वैजयंतानं चटकन त्याच्याकडे पाहिलं. त्याचा चेहरा फटफटीत पडत होता. त्याचं बोलणं, चालणं, हसणं सर्वच अगतिकपणाचं होत होतं. त्याची रुंद छाती वेगानं खालीवर होत होती. आज तो नवा नि निराळा दिसत होता.

"मग जाते मी -" ती बावरून म्हणाली.

"तू जाणार?" त्याचा स्वर बोंदकरला, तशी वैजयंता भयभीत झाली. इतक्यात घंटी ठणठणली. तसा तिचा जीव खाली पडला. चटकन तिनं दार उघडलं.

"कोण? गंगूमामा?" ती चकित झाली.

"अक्का म्हनली, घेऊन ये, म्हून आलू!" गंगू म्हणाला. "झालं का काम? चल."

गंगूला पाहून तिला भलता धीर आला. परंतु आपण एका विचित्र परिस्थितीत आहोत याची त्याला कल्पना येऊ नये म्हणून तिनं काळजी घेतली. सुरेशकडे जळजळीत कटाक्ष टाकून ती म्हणाली, "सरकार, तुम्ही वकील व्हायच्या नादी लागू नका. तुम्ही वकील होऊ शकणार नाही, मात्र खुनी किंवा त्यांचे दाते-" असं म्हणून ती घराबाहेर पडली. घर येईपर्यंत ती एक शब्दही बोलली नाही.

ती घरी आली तेव्हा गजराची चिंता मिटली. तिला पाहताच ती म्हणाली, "झालं भांडी घासून? किती भांडी होती?"

"हो. . . हो. . .झाली." वैजयंता चाचरली. घडला प्रकार आईनं जाणला आहे, असं वाटून ती खिन्न झाली.

"उद्या पुन्हा जाणार का?" गजरानं विचारलं.

"नाही." असं म्हणून वैजयंता घरकामाला लागली आणि गजरानं समाधानानं अंग टाकलं. पडल्यापडल्या ती बोलू लागली -

''वजू, हे जग फासेपारध्यांनी भरलं आहे, हे तुला कळावं म्हणून शाळेत घातली, फार जपून वागावं लागतं. धक्का लागू नये याची काळजी घ्यावी लागते. मला फार फार धक्के लागले. ते अनंत धक्के खाऊन मग मला जगाचं स्वरूप समजलं. तशी तूही करू नको. अपरात्री त्या चार भांड्यांसाठी जायची गरज नव्हती.''

''आई, मी तुझ्या पाया पडते.'' पश्चात्तापदग्ध होऊन वैजयंतानं तिच्या पायाला हात लावला, तसा तिच्या हाताला चटका बसला. पुन्हा गजराचा ताप चढत होता. मग ती रडकुंडीला येऊन म्हणाली, ''आता मी अशी चुकणार नाही आई! मला तो सरळ वाटला. मला शेवटपर्यंत त्याचा हेतू उमगला नाही. मात्र त्याचा विचार हलकट असावा हे खरं. त्यानं मला कपटानं बोलावलं होतं. आता मी घर सोडून कुठं जाणार नाही!'' असं म्हणून तिनं डोळे पुसले.

''तसं नाही बाई, सोन्याची किंमत निखाऱ्याच्या राशीतून निघाल्यानंतर ठरते; एवढंच मला सांगायचं.'' असं म्हणून गजरा शांत पडली.

गजराचा ताप एकदम चढला. त्यामुळं त्या रात्री कुणीच जेवलं नव्हतं. वैजयंता, परसू, गंगू उशाला जागत बसली होती. गजरा डोळा उघडत नव्हती; त्यामुळं वैजयंता तळमळत होती. नको ती कल्पना तिला भेडसावीत होती. ती खचत होती.

मध्यान्हीला गजरा पुन्हा बडबडू लागली -

''माझ्या वजूला सुख मिळावं म्हणून मी दु:खाचे घास घेतले. एकदा वजूला हळद लागावी नि नवरी होऊन ती बोहोल्यावर चढावी. तिच्या कपाळी मी बाशिंग पाहावं. बाशिंगाचे गोंडे भिरभिरतील तेव्हा माझी देखणी वजू . . .कशी दिसेल! तिला दृष्टच लागेल. पण. . .

''म्हणून मी जोतीला देवासारखा आळवला. तोंड नि पदर पसरून भीक मागितली. उमा नि वैजयंता. . . जोडा शोभला असता. पण तो. . .कुलवंत झाला. मी कलंकित आहे. त्यानं माझा शब्द झिडकारला.

''परंतु तो कुलवंत कसा? तोही तमाशात होताच की! गरीब बळीची हौसा त्यानं जबरीनं घरात आणली. तीही नाचत होती. पण आता ती गरती ठरली, पवित्र ठरली. आणि माझी वजू? मी? आम्ही पापी. . .कसा हा न्याय? याला का न्याय म्हणायचा?''

गजरा सारखी बडबडत होती. जीवनातील एक एक नवलपूर्ण गुपित उघडं करीत होती. त्यामुळंच जणू तिचं हृदय हलकं होत होतं. शब्दागणिक तिच्या चेहऱ्यावरचे भाव बदलत होते. कित्येक दिवसांची तळमळ ती व्यक्त करीत होती.

आईच्या तोंडून निघणारे शब्द वैजयंताला मोलाचे वाटले. ती आसूभरल्या डोळ्यांनी पाहत ते ऐकत होती. हौसाबाई, जोती मूळचे तमासगीर - बळीची हौसा जोतीनं बळकावली. पुढं उमा झाला - हे ऐकून आपण उमापेक्षा हीन, कलंकित नाही, असं

तिला वाटू लागलं.

आपण त्याला हृदय दिलं ते तो थोर कुलवंत म्हणून नाही. तो बरोबरीचा समजूनच त्याच्यावर प्रेम केलं. त्याचा शब्द पडू दिला नाही. पण एकच शब्द मोडताच त्यानं आपला घोर अपमान केला. आपल्याला ठोकरलं. हाकून दिलं. परंतु आपण लाचार नाही. त्याच्यापेक्षा कमी नाही - हा अहंकार त्याच क्षणी तिच्या हृदयात जागा झाला आणि यापुढं त्याच्याकडून अपमान सहन करावयाचा नाही, असं तिनं ठरवलं.

सकाळी गजराला थोडं बरं वाटत होतं. ती उठून बसली होती. परसू तमाशाचा फड उभारायच्या खटपटीसाठी बाहेर गेला होता. गंगू हातगाडी घेऊन काम शोधायला गेला होता. वैजयंता आज बंगल्यावर कामाला गेली नव्हती. ती नळावर धुणी धूत होती.

चाळ ओसाड भासत होती. मोठी माणसं दिसत नव्हती. पोरं खेळ मांडून खेळत होती. उमा गेले कित्येक दिवस वैजयंताला टाळीत होता. ती त्याच्या नजरेची भुकेली होती. पण तो तिच्याकडे नजरच वळवीत नव्हता. आज तो एकाएकी नळावर आला.

"वजू!" तो हळूच म्हणाला.

"मला तू कौतुकानं वजू म्हणत होतास. आता वैजयंता म्हण. आता तुझं कौतुक नको. त्या दिवसांची राख झाली -"

"अग ऐकून तरी घे!"

"काय ऐकू?" ती फणफणली. "सर्व काही ऐकलं आहे मी तुझं. आता काय सांगणार तू?"

"वजू, ऐकून घे ना!" तो विंचू चावल्याप्रमाणे चिरकला. तशी ती पुन्हा उसळून म्हणाली,

"चंदूलालला सांगून मी तुला मार बसवला, असं तुला म्हणायचं आहे का?"

"नाही ग."

"मग शहाणा आहेस." ती म्हणाली. "मी तमाशात नाचणारी आहे. तरी, इतकी दुष्ट नाही. आणि मारेकऱ्याची अवलाद खास नाही. दुसरे हे की पूर्वीप्रमाणेच सदैव माझ्या दृष्टीत मोठा ऐस. किडामुंगी ठरू नको. एवढंच कर."

"माझ्याकडून ती चूक झाली. मी मारलं तुला-"

"त्याचंही कारण होतं--" ती खाली पाहत म्हणाली. "मी नाचणारी. तू कुलवंत आईबापाचा मुलगा, म्हणून तू मला कुत्र्याप्रमाणे वागवलंस, मारलं, हाकून दिलंस. मी तेव्हा पाया पडत होते. राजा, पण तुला दया आली नाही. कारण मी पापी-हीन-नीच! आणि तू? पण. . ." ती बोलली नाही. उमा भ्रमिष्टासारखा पाहत राहिला. त्याची ती केविलवाणी अवस्था पाहताच वैजयंतानं शेवटचं पातळ पिळून काढलं.

"तू या थराला पोचशील याची कल्पना मला नव्हती!" तो सावरून म्हणाला.

"कशी असणार? तू मला गव्हाणीतलं कुत्रं समजत होतास. परंतु माणसानं दिवा घेऊन दुसऱ्या दिव्याखाली अंधार पाहू नये. इथं मुंबईत सर्व दिव्यांचा प्रकाश खाली नसतो. तो वर असतो." असं म्हणून ती धुणी घेऊन घरी आली आणि एकाएकी तिला भडभडून आलं. ती दोन्ही हाताने तोंड झाकून रडू लागली. जणू उमाला हृदयातून काढून टाकताना तिला दारुण यातना होत होत्या. आपण इतकं बोलायला नको होतं, असं मनात येऊन ती दारात गेली. उमा नळावर नि:शब्द उभा होता. त्याला पाहून ती पुन्हा चरकली. आपल्या हृदयाच्या तारा तटातट तुटताहेत असं तिला वाटलं.

दिवसभर मुकं झालेलं वातावरण बोलत होतं. सूर्य मावळत होता. सावल्यांनी सर्व घरं झाकली होती. मावळती किरणं दूर डोंगरावर बसून मुंबईवरचं सावल्याचं राज्य पहात होती. यंत्रं विश्रांती घेत होती. माणसं घराची वाट चालत होती. जीवन मरगळलं होतं.

परसू त्रासून आला होता. फडात नाचणारी बाई नाही म्हणून त्याचा तमाशा उभा रहात नव्हता. गंगू आपली गाडी बाजूला लावून धापा टाकीत आला. वैजयंता अस्वस्थच होती. गजरा गप्प पडून होती. त्यामुळं त्या घरात वातावरण कुंद झालं होतं. तशीच जेवणं झाली. अखेर ती शांतता असह्य होऊन गजरानं परसूला विचारलं,

"काय झालं फडाचं?"

"अक्का, अजून काहीच नाही." बेकारीला कंटाळलेला परसू म्हणाला. उत्तम फड करायचा तर उत्तम अशी बाई हवी. आजकाल नाचणारी बाई ही फडाचा कणा ठरली आहे. ती जर सर्वगुणसंपन्न नसेल, तर फड उभाच राहू शकत नाही. आजचा थेटर-मालक बाई बघूनच बारीचा भाव लावतो आणि ती मला मिळत नाही."

"मामा, मी तयार आहे!" वैजयंता म्हणाली. त्या शब्दांनी सर्वांना आश्चर्याचा धक्का बसला. परसू, गजरा तिच्याकडे पाहत राहिली. गंगू चटकन उठून बसला.

"वजूबाई, खरंच म्हणता?" परसूचा विश्वासच बसत नव्हता.

"हो, खरंच! मी तमाशात नाचणार. निखाऱ्याच्या राशीत बसून या कलेला मोल करायला लावणार. तुम्ही माणसं तयार करा -" वैजयंता म्हणाली.

"माणसं तयार आहेत-" परसू म्हणाला आणि गंगू हळूच पुढं झाला आणि गंभीर मुद्रा करून म्हणाला,

"देवा खंडूबा, आता डोळे झाकू नगं. एकच दिवस ही बाई तमाशात न्हायली नि मला बैल व्हून वढायची पाळी आली. तसं तेवढं नंग."

गंगूचं हे बोलणं ऐकून वैजयंता मोठ्यानं हसली. पुष्कळ दिवसांत अशा मोकळेपणानं ती हसली नव्हती.

"हरी-रामा हे दोन सूरकरी-" परसू गंभीरपणे सांगू लागला. त्यांचा सूर ढगाला भिडवून घ्यावा. नेर्लेकर गणूचं ढोलकं - तालाचं माप मोजून देणार तो. मी माझा शब्द

तराजूत तोलून देईन. उणा पडलो तर तमाशात तोंड दाखवणार नाही. गजरा बहिणीचा मी भाऊ आहे.''

गंगू कान पाडून ऐकत होता. आपला उज्ज्वल भविष्यकाळ पाहून तो चेकाळून म्हणाला, ''वैजयंताबाई म्हंजी इंद्राची उर्वशी. तिला दुरून बघा; न्हायतर इजेचा झटका बसून मुडदा पडंल. पण जर का लांब बसून ऐकलं तर मुडद्याचं माणूस व्हईल.''

वैजयंता हास्यानं मोहरली होती. गंगूचा आनंद तिला पुलकित करीत होता. काजळी झाडलेल्या दिव्याप्रमाणे ती उजळली होती.

गजराची ओसरी हर्षानं भरली होती. परसू म्हणाला, ''एक राहिलं. गंगू सोंगड्या मढं हसविणार नि नाही हसलं तर—''

''तर सांगू?'' गंगू मध्येच म्हणाला, ''तर त्येला कचऱ्याच्या गाडीला जुपावा—''

हे ऐकू सर्वच पोट धरून हसू लागले.

आपल्या भावी तमाशाचं चित्र परसूला दिसू लागलं. वैजयंताच्या अंगात सर्व गुण आहेत. ती तरल आहे, कणखर आहे. तिच्या कंठात अमृत आहे. तिच्या बळावर आपला फड निश्चित गाजेल. आपण दाही दिशा दणाणून सोडू — असा अहंकार त्याच्या हृदयात घर करू लागला.

गजराच्या घरी तमाशाच्या तालमीला आरंभ होताच कित्येकांच्या भुवया अंतराळात चढल्या. अखेर बिचारीला नाचावं लागलं — बिचारीचं लग्न नाही झालं, असे मिठाच्या पाण्यासारखे उद्गार कित्येकांनी काढून जखमेवरची खपली काढली.

आता वैजयंताशी लौकरच सामना देणं भाग पडणार, याची चंद्रानं खूणगाठ बांधली आणि ती चरकली.

बाबालालशेटला मात्र ती बातमी ऐकून भलताच आनंद झाला. त्यानं धावत येऊन वैजयंताचं कौतुक केलं आणि लगेच आबा पाटलाला लिहिलं, 'तुमचं नशीब शिकंदर आहे. वैजयंताचा फड तयार आहे. तुम्ही तयार असा.' बाबालालचं ते पत्र हाती येताच पाटलाचं मन मुंबईची वाट चालू लागलं.

उमा पश्चात्तापानं दग्ध झाला. आपण आपल्या हातानं वैजयंताला तमाशाच्या फडात लोटून दिली. आता तिच्या नशिबी अध:पातच आहे. लवकरच ती चोरांच्या बाजारात उभी राहाणार नि तिथं तिची मनसोक्त लूट होणार... कित्येक गिधाडं तिच्यावर तुटून पडणार आणि मग नुसता हाडांचा सापळा उरलेली वैजयंता दुर्लौकिकाचं खापर डोकीवर घेऊन फिरत असलेली पाहण्याचा दुर्दैवी प्रसंग आपल्यावर येणार. आपण विवेक सोडला. अविचारी होऊन तिला दुखवली. गरीब, प्रेमळ वैजयंता नष्ट होऊन अध:पतनाकडे निघाली. अध:पतनाचा मार्ग आपण आपल्या हातांनी तयार करून दिला.

तो भ्रमिष्ट होऊन हिंडू लागला. वैजयंताच्या विचारांनी त्याची पाठच धरली. सर्वत्र

त्याला तिचंच नाव ऐकू येऊ लागलं.

बाबालालशेटनं नाक्यावर मोठा बोर्ड लावला होता —

'लौकरच येणार! लक्षात ठेवा! तलम भरजरी घडी घेऊन वैजयंता पुन्हा येणार! तुम्हीही न चुकता या. परंतु — जरा दिल को संभालके —'

पण गजराचं मन काळजीनं पोखरत होतं - आता वैजयंताचं काय होणार?

## ७

एका सकाळीच बाबालाल आला. प्रथम त्यानं गजराबाईच्या प्रकृतीची चौकशी केली. तिच्या आजाराला उतार पडत नव्हता. ती अशक्त झाली होती. पैशाअभावी रोगाचं निदान, औषधपाणी वगैरे काहीच करता येत नव्हतं. हे पाहून बाबालालनं दोनशे रुपये वैजयंतापुढं ठेवले आणि चिंतायुक्त आवाजात म्हटलं,

"गजराबाईच्या आजाराचा बंदोबस्त कर."

वैजयंताला भडभडून आलं. ती म्हणाली, "इतके रुपये कशाला?" तशी बाबालाल म्हणाला,

"हे दान नाही. हे उपकार पण नव्हेत. तुझी बारी माझ्या थिएटरात कष्ट करणार याची मला पूर्ण जाणीव आहे. म्हणून तुझ्या रकमेचा एक हिस्सा मी आगाऊ देत आहे."

हे ऐकून वैजयंताचा आनंद दुणावला. ती हसत म्हणाली, "तरीदेखील हे उपकारच मानीन!"

"काही नको —" बाबालाल म्हणाला. "मला आता नक्की तारीख सांग. बोर्ड लावले आहेत. प्रेक्षक तुझ्या आगमनाची चातकासारखी वाट पहात आहेत."

"तुमच्या सोयीची कोणतीही तारीख तुम्ही जाहीर करा. माझी तयारी आहे." वैजयंता उत्तरली. तेव्हा बाबालाल गंभीर होऊन म्हणाला,

"वैजयंता, तुला चंद्राशी बारी द्यावी लागणार आहे, हे विसरू नको नि ती चंद्रा आहे बरं! तू जर आरंभीच मार खाल्लास तर तुला उठून उभं राहणं अशक्य होईल, याचा विचार कर!"

"मी संपूर्ण विचार केला आहे." वैजयंता पदराशी चाळवाचाळव करीत म्हणाली, "मेलं मेंढरू अग्नीला भीत नाही. तूर्त मी बारीचा विचार करते — यशापयशाचा नाही!"

"नकोच करू —" बाबालाल मध्येच म्हणाला. "तू, परसू, गंगू, जिकडं असाल तिकडं यश. याची मला पूर्ण कल्पना आहे."

गंगू हातगाडीच्या चाकात वंगण घालीत होता. तो हळूच म्हणाला, "शेट, माजं

ऐकता? कसलाबी तमासगीर आणा, त्येला फुकून लावीन तरच नावाचा गंग्या! जा आणि करा तारीख डिक्लर.''

''मग येती दहा तारीख नक्की!'' असं म्हणून शेट चंद्राच्या खोलीकडे फिरला. पण पुन्हा काहीतरी आठवून परत आला. म्हणाला, ''खुंदलापूरच्या आबा पाटलाचं पत्र आलं आहे. पाटील देवाला बकरं कापूनच येणार आहे. मोठा तमाशाशौकीन माणूस. वैजयंता, तो पत्रात लिहितो, की वैजयंतासाठी सारी दौलत जरी गेली तरी डरणार नाही – '' असं बोलून शेट कौतुकानं हसू लागला.

''म्हणजे विचार तरी काय आहे त्यांचा?'' आश्चर्य व्यक्त करीत वैजयंतानं विचारलं; आणि कपाळावर आठी घालीत बाबालाल म्हणाला,

''दुसरा काय असनार? हे सातारी लोक दुभत्या म्हशीसारखे असतात. जेवढा चारा घालावा तितकं दूध देणार. तू नुसती चुचकारीत राहा नि पाहा–''

त्यांचं ते बोलणं ऐकून वैजयंता अस्वस्थ झाली. ती काहीतरी बोलणार तोच गजराबाई क्षीण स्वरात म्हणाली, ''तमाशात मुलीनं नाचू नये अशी माझी इच्छा होती, परंतु नाइलाज झाला आहे. आता एवढंच करा – माझ्या वजूला जपा!''

''गजराबाई, त्याची काळजी नको!'' शेट चटकन म्हणाला. चंदूलालच्या गैरवर्तनाची तक्रार करावी असं गजराला वाटलं, पण मध्येच वैजयंता म्हणाली,

''मला जपायला मी काही लहान बाळ नाही! आई, तू आता माझी काळजी करू नको. लौकर बरी होऊन माझीच काळजी दूर कर. मला काही होणार नाही. खुडून घ्यायला मी काही भाजी नाही!''

दिवसांची माळ सरकन सरकली आणि दहा तारीख येऊन दाखल झाली. त्या दिवशी सदानंद थेटरात तोबा गर्दी उडाली. थेटर ठासून भरलं, अशी गर्दी पूर्वी कधीच झाली नव्हती, असं बाबालाल ओळखीच्या मंडळीला पुन्हा पुन्हा सांगत इकडे तिकडे फिरत होता. बळी झुरळाप्रमाणे त्या गर्दीत वावरताना दिसत होता. खुंदलापूरचा आबा पाटील बरीच मंडळी घेऊन जत्रेला जावं तसा तमाशाला आला होता.

चंदूलाल रिवाजाप्रमाणे विंगमध्ये शांत बसला होता.

चंद्राची बारी प्रथम उभी राहिली. ती ईर्षेनं आपली कला सादर करू लागली. तिच्या नृत्य-नैपुण्यानं प्रेक्षकांत नि:शब्दता पसरली. आज आपण सारं कसब पणाला लावून वैजयंताला पाय ठेवायला जागाच द्यायची नाही असा खोल विचार करून चंद्रा कलेचा कलश भरीत होती.

आबा पाटील रंगात आला होता. तो डोळे झाकून दौलतजादा सोडत होता. त्यामुळं इतर शौकीन त्याच्यावर बिथरले होते. हा भरमसाट रक्कम सोडून आमचा अपमान करीत आहे - आमच्या दौलतजादा सोडण्याच्या हक्कावर गदा आणीत

आहे, अशी कित्येकांनी बाबालालकडे तक्रार केली; तेव्हा 'मी काय करू? त्याच्या नगाऱ्यापुढं तुमची टिमकी वाजत नाही हा काय माझा दोष?' असं म्हणून तो त्यांची समजूत घालीत होता.

आपल्या बारीचा शेवट करताना चंद्रानं एक फार्स सुरू केला - दोन मित्र दारू पिऊन वेश्येकडे जातात आणि तिच्यावरून त्यांचं भांडण जुंपतं. फार्स सुरू होता. प्रेक्षक चेकाळून हसू लागले. त्या हास्याच्या वावटळीतच चंद्राची बारी संपली.

वैजयंता सर्व तयारीनं रंगमंचाकडे निघाली. तोच गंगू म्हणाला, "वजूबाई, उमा बी आलाय!"

त्या शब्दांनी तिची समाधीच भंगली. उमाचं नाव कानी पडताच बावरली. पण पुन्हा स्वत:ला सावरून ती पुढं गेली. बारी सुरू झाली.

गण झाला, आणि गौळणीला प्रारंभ होताच वैजयंता राधा होऊन मथुरेला निघाली. तेव्हा थिल्लर प्रेक्षकांच्या भावनांचा बांधच फुटला. टाळ्या नि शिट्यांना ऊत आला. वैजयंताला तमाशात पाहण्याचं स्वप्न साकार झालं. त्यामुळं आबा पाटील खुलून गेला. आजूबाजूची लहानशी हालचालही त्यांना सहन होत नव्हती. शिट्या घालणारांकडे तो गुरकून पहात होता.

प्रेक्षक वैजयंताला विसरले नि राधेला पाहू लागले. गव्हासारखा गोरा रंग, तलम अस्मानी पतळ, शुभ्र रंगाची जरीची तंग चोळी; यामुळं तिचं सौंदर्य द्विगुणित झालं होतं. ती फुलांनी डंवरलेल्या वेलीसारखी भासत होती. नजरेतील तरलता, हावभावातील संयमी वृत्ती, शब्दातील स्पष्टता यांनी प्रेक्षक केव्हाच गुंग झाले.

गंगू बिथरून आडवा झाला. म्हणाला, "बाई, कुठं निघालीस या उन्हात?"

"का रे बाबा? मी मथुरेला जात आहे."

"आगं ते खरं, पर..." गंगू म्हणाला. "तुझं परमिट कुठं हाय? ते दाखव."

"ए बाबा, कसलं रे परमिट?" ती मंजुळ स्वरात म्हणाली. त्या स्वरानं प्रेक्षकांच्या भावना डिवचून तरंग उठले.

गंगू म्हणाला, "मानवात काळा बाजार करून बरीच मंडळी आमच्या राज्यात आलीया. म्हणून कृष्णदेवानं एक वटहुकूम काढलाय—"

"वटहुकूम म्हणजे रे काय बाबा?" तिनं विचारताच गंगू कावराबावरा झाला. म्हणाला,

"वटहुकूम म्हंजी काय कुनाला ठावं! मी आजच दिवटीवर आलोय—"

"मग काल कुठं होतास?" राधानं विचारलं.

"सांगू का?" गंगू हसत म्हणाला. "काल मी भेंडीबाजारच्या नाक्यावर हातगाडी रेटत व्हतो—" गंगूनं जीवनातील सत्य अचानक उच्चारताच थेटर हसलं. पण वैजयंता

भानच हरपली. कारण गंगू नि त्याची गाडी तिनं पाहिली होती. ते चित्र डोळ्यांपुढं तरंगू लागून ती कितीतरी उशीर हसत होती. आणि तिचं ते हसणं पाहत प्रेक्षकही हसत होते. नंतर तिनं स्वत:ला सावरलं. फणकारून ती बोलली.

"ए बाबा, वाट सोड. मी हातगाडीवाल्याचं ऐकणार नाही!"

"माझं ऐकणार न्हाय?"

"हो-हो! नाही ऐकणार—"

"भाव चढला वाटतं?" गंगू खेकसला.

"हो-हो. चढला भाव!" तिनं मानेला हिसडा दिला; तसा गंगू म्हणाला,

"भाव चढला? तर मग कसा रत्तल?"

वैजयंता खुदकन हसताच टाळ्यांनी थेटर घुमलं. मग कृष्ण आला. राधेला त्यानं आपल्या अवताराची यादी लावणीत गुंफून सांगताच ती अंतर्मुख होऊन त्याला शरण गेली, आणि वैजयंताची गौळण संपली.

नंतर देशद्रोही हा वग सुरू झाला. एक प्रधान राज्य बळकावतो व राजकन्येवर जुलूम करतो. त्यावेळी एक शिपाई राज्यकन्येला मदत करतो. त्याचं शौर्य पाहून ती राजकन्या त्याच्यावर मोहित होऊन प्रेम करू लागते.

या वगात शिपाई परसूवर वैजयंता राजकुमारीच्या रूपात प्रेम करते. वैजयंतानं आपल्या अभिजात अभिनय आणि गायनकौशल्यानं प्रेक्षकांना तल्लीन करून सोडलं. निस्सीम प्रेम करण्याची रीत तिनं साकार केली. परसूत उमाची मूर्ती कल्पून तन्मय होऊन जशी ती पूर्वी उमाशी वागली, तशीच ती स्टेजवर तेच प्रसंग उभे करू लागली. आपल्या जीवनातील एकूणएक प्रसंग तिनं पुढं आणले. तेच हसणं, तेच रुसणं, तेच बोलणं, त्या विनंत्या, ती निष्ठा नि श्रद्धा आणि तोच आदर यांनी सर्व प्रेक्षकांना नकळत उचलून आपल्या जीवनाच्या दुनियेत नेऊन चकित करून सोडलं.

उमा वेडावून पहात होता. वैजयंताची प्रत्येक हालचाल त्याला ओळखीची वाटत होती. प्रत्येक घटना परिचित वाटून तो अंतरात दग्ध होत होता. तिचा प्रत्येक शब्द अमृताप्रमाणे कानात शिरून जुन्या आठवणी जागृत करीत होता. त्यामुळं त्याचं हृदय चरफडत होतं. दिव्यावर पतंगानं टकरा घ्याव्यात तशी त्याची नजर वैजयंतावर हेलावत होती.

बारीचा शेवट करताना वैजयंतानं प्रेक्षकांच्या भाविक मनाला स्पर्श केला. टाचेपर्यंत विपुल केस सोडून भिल्लीण होऊन ती रामासाठी बोरं घेऊन आली. बोरांचा स्वीकार करण्यासाठी तिनं रामाची आराधना आरंभली.

ते भिल्लिणीचं नृत्य तिच्या तमाशाचं वैभव ठरलं. राम संतुष्ट होऊन म्हणाला, "एक गोष्ट बोलू?"

"हो-हो. बोल ना!" ती म्हणाली. "मी एकटीच कुठवर बोलू!"

"तू फार सुंदर नाचलीस." परसू शांतपणे म्हणाला.

"आणि काय?" तिनं त्याच्याकडे पाहत विचारलं.

"तू फारच सुंदर दिसत होतीस!"

"यापेक्षा निराळं काही असलं तर सांग!"

"ऐक ना!"

"काय?"

"माझी एक विनंती ऐक."

"मी तुझं मन कधीच मोडत नाही नि मोडणार नाही. कारण तू माझा देव आहेस!" वैजयंता भावनावश होऊन म्हणाली. तिला भडभडून रडू कोसळलं. तिनं मटकन खाली बसून रामाचे पाय धरले.

परसूनं मुजरा करून बारी संपवली.

उमाचं भान हरपलं. मागे एकदा शाळेतून येत असता वैजयंता त्याच्याशी असंच बोलली होती; आणि ज्या दिवशी त्यानं तिला मारलं, त्यावेळी ती अशीच त्याच्या पायांवर पडली होती. त्या गोष्टीची आठवण होऊन तो वेडावला आणि तडक थेटराबाहेर पडला.

आयुष्यात प्रथमच आपली बारी देऊन वैजयंता घरी आली. अजून तिच्या डोळ्यापुढं आबा पाटील, बाबालाल यांनी केलेलं कौतुक; टाळ्या, हास्याचे लोट हे सारं कायम होतं. खरंच, पैशाचा पाऊस पडला होता. गजराबाई आतुर होऊन तमाशा कसा झाला याची पुन्हा पुन्हा चौकशी करीत होती.

गंगू नि परसू यांचा आत्मा संतुष्ट झाला होता.

परंतु अंथरुणावर अंग टाकताच वैजयंताच्या डोळ्यापुढं एकेक प्रसंग चित्रपटासारखे तरळू लागले. मागं ती तमाशात नाचली, त्याच्या दुसऱ्या दिवसापासून चंदूचा तिच्यामागं सुरू झालेला ससेमिरा, नंतर जंगीचं ते भांडण — मग उमाकडून झालेला अपमान आणि बसलेला मार, पुढं उमाची चंदूशी झालेली मारामारी, आईचा आजार...

आणि आताही आपण नाचून आलो आहोत. उद्या काय वाढून ठेवलं आहे दैवानं, कोण जाणे! आणखी किती शत्रूंची भर पडणार? आणि आपण कोणत्या थराला जाऊन बसणार?

परंतु त्याची आता चिंता का करायची? सर्व काही आपण विचारपूर्वक करीत आहोत. जे जे होईल ते पहायचं नि सहन करायचं! त्याखेरीज गत्यंतरच नाही आता!

मात्र यावेळी उमाची भीती नाही. ते एक बरं झालं. आता तो काही का म्हणेना! आता आपले मार्ग भिन्न आहेत. आपण वाटेल ते करू शकतो. आपल्याला कोण आडवणार? आपण आता कुणाचीच नाही!

वैजयंता नकळत रडत होती आणि मनाची समजूत घालीत होती.

"वैजयंता—" सकाळी आबा पाटलानं दारातून हाक मारली आणि ती धडपडून जागी झाली. अंगावरचं पातळ गडबडीत सावरून ती उठली आणि म्हणाली,

"या ना पाटील!"

आबा आत आला, तेव्हा त्याला आश्चर्य वाटलं. तमासगीरच व्हायचंय तर माणसं जोडली पाहिजेत, हा त्या धंद्यातील न्याय होता नि रिवाज होता. तो पाटलाला आत बोलावून वैजयंतानं पाळला होता.

गजराबाई, गंगू, परसू, केव्हाच उठले होते. ते वैजयंताच्या उठण्याची वाट पहात होते. आबाचा शब्द ऐकताच ती उठली, तेव्हा ती आळसटून गेली होती; थकल्यासारखी दिसत होती. डोळे विस्फारीत तिनं विचारलं, "कसं येणं केलंत पाटील?"

"हे काय इचारनं झालं?" आबा म्हणाला. "रातभर डोळ्यांना नीज न्हाय. ही तुमची केसाची येणी सापावाणी रातभर डोळ्याम्होरं हालता हालंना—"

"मग भीतीनं काळीज तर फुटलं नाही ना?" आपला आंबाडा चाचपीत वैजयंता म्हणाली नि हसली.

"छा! तसं कसं?" काळजावर हात ठेवून वैजयंताला भरपूर पाहून घेत आबा म्हणाला. "हे काळीज फुटणारं न्हाय बरं! त्ये का बटार बिस्कूट हाय व्हय? ते पोलादाचं घडलंय—"

"नाही म्हटलं, माझी लांबसडक वेणी सापावाणी डोळ्यापुढं वळवळली नि तुमची नीज उडाली. तेव्हा..." असं म्हणून ती मोठ्यानं हसली.

"कसा काय झाला आमचा तमाशा?" परसूनं मुद्दाम मध्येच प्रश्न केला, तसा पाटील भुवया चढवून म्हणाला,

"ते काय बोलावं? मी खुंदलापूरचा पोलीस पाटील हाय, नि मी सकाळीच तुमच्या दाराला दरवेशावाणी आलू- ह्यावरनंच..." एवढंच बोलून पाटील एकटाच हसला. पुन्हा थांबून तो म्हणाला, "माज्या गावाला तमाशाचा भलता नाद हाय. कैकांनी तमाशापायी वाटुळं करून घेतलंय! या कवातरी नि बघा! बाकी तुमच्या तमाशाला तोड न्हाय. त्यात ही बया म्हंजी तरवार हाय. हिचं डोळं म्हंजी भाल्याची फाळं..."

"पुरे, पुरे पाटील! मला चढवू नका!" वैजयंता रुसका चेहरा करून म्हणाली. "आम्ही गरीब आहोत—"

"पण मनानं, गुणानं तुमी राजं हायसा!" पाटील गंगू, परसू, गजराबाई या सर्वांकडे आळीपाळीनं पहात म्हणाला. "आमापाशी धन चापून हाय, पर गुण न्हाय! रोज गावात

१०६८

मारामाऱ्या, कोर्टकचेऱ्या, दांडगी भानगड! आनी एक गोष्ट बोलू?''

"बोला की!'' गंगू रंगात येऊन म्हणाला. ''आता तुमचीच बारी हाय!''

''छा! तसं म्हणू नका नि मला खुळा समजू नका. आरसा दिसला की, मानूस तोंड बघतं. तसं ही बाई दिसली की, मला खरं बोलावंसं वाटतं!''

''मग बोला ना!'' वैजयंता म्हणाली.

''काई न्हाय. फक्त एकदा तुझं पाय माझ्या पांढरीला लागू दे. खरीच कृपा कर माझ्यावर - या आबा पाटलावर!''

''नाही ग बाई!'' उगीच छातीवर हात ठेवून घाबरल्यासारखं करीत वैजयंता म्हणाली. ''काय नेम सांगावा? तुम्ही डांबरट माणसं - मला कोंडून ठेवलंत तर काय करायचं?''

हे ऐकून पाटील बावचळला. अवस्थ झाला. तिच्या डोळ्यात रोखून पहात म्हणाला, ''खोटं! सात कुलपात तू ऱ्हानार न्हायीस. आनी आम्ही डांबरट असलो तरी दिलानं दणकेबाज हाय! आमी जानाराला ऱ्हा म्हनत हाय नि ऱ्हानाराला जा म्हणत न्हाय! तू घाबरू नगं. जातू मी!'' असं म्हणून पाटील उठला. त्यानं शंभर रुपयांच्या नोटा खिशातून फसकन ओढून या सर्वांच्या पुढं टाकल्या आणि दमदार पावलं टाकीत तो बाहेर पडला.

आबा पाटील जाताच वैजयंता विचारमग्न झाली. हा महाधूर्त आहे. ह्याला तमाशाचा नाद आहे एवढंच नाही, तर याला आपलं वेड लागलं आहे! आपल्यासाठी खरंच हा वाटेल ते करील. हा जे बोलतो ते खरं बोलतो. बोलता बोलता कित्येक गोष्टी हा कसलाच आडपडदा न ठेवता बोलून गेला! तरी पण हा लंपट नाही, दिलदार आहे.

चार दिवस लोटले. चंद्रा एकाएकी आली नि म्हणाली, "ऐकावं नवलच बाई!''

चार दिवस मनात अढी धरून ती आली नव्हती. आता आली ती काहीतरी नकोसं घेऊन आली असावी, असं समजून वैजयंता सावध झाली. म्हणाली,

''कसलं नवल घडलं?''

''अग, तो उमा माझ्याकडे आला आणि म्हणतो मला तमाशात घ्या! मला तमाशा जमेल का? जेव्हा मी म्हणाले, तमासगीर आईबापाचं मूल आहात तुम्ही - न जमायला काय झालं? तशी तो आश्चर्यचकित झाला. आपली आई आणि बाप तमाशात होते, ही गोष्टच त्याला माहीत नव्हती. मी बाई सहज बोलून गेले, पण तो भारीच बेचैन झाला.''

''मग शेवटी काय झालं?'' वैजयंतानं विचारलं. त्यावर चंद्रा कष्टी झाल्यासारखं करीत म्हणाली,

''काय करणार? मी त्याला आपल्या फडात घेते असं वचन दिलं. त्यानं मला स्पष्ट सांगितलं की, आपल्या आततायी वर्तनामुळं वैजयंतानं स्वत:ला तमाशात झोकून दिलं आहे, त्यामुळं आपल्या मनाला पश्चात्तापाची आग लागली असून ती शांत व्हावी, म्हणून आपण तमाशात येत आहो.''

चंद्राकडून हे सर्व ऐकून वैजयंता पुन्हा अस्वस्थ झाली. परंतु अंतरीची ती तगमग तिनं बाहेर मुळीच दिसू दिली नाही. चंद्रा उठून जाताच खिन्न झाली. तिनं डोळे घट्ट मिटून घेतले. ती मनात म्हणाली, '— याचा अर्थ तू माझ्या जीवनात सदैव उभा राहणार! अगदी मानेवर तलवार लटकावी तसा!'

८

वैजयंता आता सुखावली होती. सुख, संपत्ती, संगीत यांच्या गगनात स्वैर भ्रमण करीत होती. सर्वत्र तिची ख्याती झाली होती. परसू, गंगू, पुनाजी हे फडकरी तिला जिवापलीकडे जपत होते.

पालीपुढं विंचवानं नांगी टाकावी, तद्वत सर्व थिएटर-मालक वैजयंतापुढं दबून होते. 'मुजोरी करणाऱ्या थिएटर-मालकाच्या थिएटरपुढं आपण फुकट तमाशा करू आणि थिएटर बंद पाडू' अशी एकदा बारी सुरू असताना तिनं जाहीर धमकी देऊन ठेवली होती.

याच वेळी चंद्राच्या फडाला 'उमा-चंद्राचा फड' असं नाव प्राप्त झालं होतं. या दोन फडात रोज झटापटी होत होत्या.

चंदूलालचं त्रासदायक अस्तित्व आता तिला जाणवत नव्हतं. आबा पाटील अधीमधी येऊन देवावर गुलाल उधळावा तसा तिच्यावर पैसा उधळून जात होता. बळी पहिल्यापेक्षा आदबशीर वागत होता. एकंदरीत तिच्या सभोवतीची परिस्थिती सुखदायी अशीच होती.

उमा अलीकडे वैजयंतापासून दूरच राहण्याचा प्रयत्न करीत होता.

चंद्रानं ज्या दिवशी उमाला 'तुझी आई तमाशात नाचत होती' — ही गोष्ट सहज सांगून टाकली, त्या दिवशी त्यानं जोतीशी कडाक्याचं भांडण केलं होतं. तो आई, बाप यांना नको नको ते बोलला होता. आपण तमाशात होतो ही गोष्ट गजराबाईनंच उमाला सांगितली असावी, असा समज करून घेऊन हौसाबाई व जोती गजरा व वैजयंता या मायलेकींना पाण्यात पहात होती.

जोती रोज कामावरून येताना दारू पिऊन येई आणि दारात बसून उपहासानं बोलत राही, मध्येच थिएटरात जाऊन चंदूलालशी कानगोष्टी करताना दिसे. एकादे दिवशी दारू पिऊन दारात बसून वैजयंता दिसताच दागिने मोजीत बसे आणि रोज एक दागिना असं म्हणून थुंके.

जोतीच्या हालचालीची नि प्रखर शब्दांची वैजयंतानं दहशतच घेतली होती. कारण तो उमाचा जन्मदाता होता. आज दोन तपांचा शेजारी - त्यानं असं बोलणं नि वर्तन

करणं, हे तिला जास्तच अस्वस्थ करीत होतं. तसं पाहिलं, तर आता तमाशात एकापेक्षा एक भयंकर विचाराची माणसं तिला दिसत होती. डोळे मोडीत पाहणारे, उन्मत्तपणे लगट करणारे, आपणच कलेचे भोक्ते असल्याचा आव आणून स्वत:ची विषयलोलुपता दडवू पाहणारे असे अनेक लोक ती रोज पहात होती. फक्त एका स्पर्शासाठी आसुसलेले असंतुष्ट आत्मे, अश्लील शब्दांचा स्पष्ट उच्चार करून स्वत:चं समाधान करून घेणारे पुण्यवान - अशी अनेक माणसं ती जवळून बघत होती. परंतु जोतीचं ते वर्तन त्या थरात बसत नव्हतं. जोतीनं मांडलेलं वैर अधिक दाहक होतं.

चाळीत पहाटेपासून गडबड सुरू झाली होती. नळावर भांडी धडधडत होती. घरोघर चुली पेटल्या होत्या. पोरंबाळं बोलत होती. काहींनी भाकरी बांधून घर सोडलं होतं.

जोतीही कामावर निघाला होता. रात्री तमाशा करून आलेला उमा दारात पडलेला पाहून त्याचं डोकं फिरलं. "शेवटी माझ्या तोंडाला डांबर फासलं! तमाशात गेला. चांगली फंड सर्वीसवाली नोकरी धरली नाही. या बायांनी पोराचं डोकं फिरवलं म्हणूनच शहाणं पोर कामातून गेलं!" असं तो सारखा बडबडू लागला. उमा त्याची बडबड ऐकत गप्प पडून होता.

जोतीच्या बोलण्यानं वैजयंताही उठली होती. त्याच्या शब्दातील आपल्यावरचा रोख किती आहे याचीच जणू ती गणती करीत होती.

जोती दारात येऊन बसला. पलीकडची म्हातारी कामावर निघाली, तिला त्यानं हाक मारून बोलावली. ती जवळ येताच तो मिस्कीलपणे हसत म्हणाला, "ए म्हातारे? या वयात लोकांची भांडी का घासत बसलीस?"

"मग काय करू बाबा?" म्हातारी सहज सुरात बोलून गेली, तसा जोती म्हणाला, "आगं माझं ऐक! तू तमाशा कर. तुझं बरं व्हयील. रोज एक दागिना गळ्यात घालून ठुमकशील — काय?"

म्हातारी भडकली. डोळे वटारून म्हणाली, "निलाजरा मेला! आपली बायको नाचव परत तमाशात! काही जिभेला हाड मेल्याच्या! रामाधर्माच्यापारी—" असा भडिमार करीत म्हातारी कामाच्या ओढीनं निघाली. परंतु उमाला ते असह्य झालं. तो उठून म्हणाला,

"काय मिळवलं हे असं बोलून?"

"मग काय झालं? थट्टा केली—"

"कसली थट्टा ही!" उमानं स्वर चढवीत विचारलं. "लाथा खायची थट्टा का करायची?"

"आपल्या आईवाणी हाय म्हातारी!" जोती हसला.

"पण हे असं रोज बोलायचं का?"

"का! काय झालं? कुणाच्या बापाचं भ्या हाय?" जोती डाफरून म्हणाला. "आमी

कुनाचं नाव घेत न्हाय. आमी आपलं काय बी बोलू—''
''परंतु ते कळतं ना—''
''कळू दे.''
''मग हे थांबणार का नाही?''
''न्हाय थांबणार. दे मला फासी!'' असं ओरडून जोती उठला.
''तू हे कुणाला बोलत असतोस?''
''दुनियेला—'' जोतीचे डोळे लाल झाले.
उमा समोर आला. बाचाबाच हातघाईवर आली. हौसानं जोतीला धरलं. 'न्हावू द्या. जा कामावर!' असं म्हणून तिनं त्याला बाजूला खेचलं. जोतीच्या बडबडीनं वैतागलेले शेजारी दुरून ऐकू लागले—
''तू कोण मला दम देणार?'' असं म्हणत हौसाच्या हातातून स्वत:ला सोडवून घेत जोती उमावर धावला. ''तू त्या बायकांची बाजू घेऊन मला टरकावतोस! लेका, जिवं मारीन. खून करीन! त्या पोरीच्या नादाला लागून...''
वैजयंताचं नाव निघताच उमा भडकला. ''परत तिचं नाव घेऊ नको!'' तो ओरडला. ''मोठा आला अब्रूदार! जन्मभर तमाशा करून आता साधू—''
उमाचा हा शब्द जोतीच्या वर्मी बोचला. तो उमावर एकदम घसरला आणि उमानं दूर लोटताच खांबावर आदळला.
''माझं डोस्कं फोडलं—'' असं ओरडतच तो उठला. त्याच्या डोकीला खांब लागून खोक पडून रक्त वहात होतं. सर्वांना रक्त दाखवीत तो बोलू लागला, ''बघा, मला लेकानं मारलं. नाचणाऱ्या बायकांसाठी माझं डोकं फोडलं. आता मी चौकीवर जातो!'' असं म्हणत तो पळत सुटला. त्यानं कोणाचंच ऐकलं नाही.
त्या प्रकारानं चाळीतील लोक थरारले. त्याचबरोबर जोतीचा तो वाह्यातपणा त्यांना आवडला नाही. हा म्हातारपणी चळला आहे, असं म्हणून कित्येकांनी शिव्या दिल्या. 'वैजयंतासाठी मला मारलं' असं हा चौकीवर सांगतो की काय, म्हणून उमा घाबरला होता.
परंतु जोती दिवसभर परतच आला नाही. तो संध्याकाळी परत आला आणि खिन्न होऊन बसला. लोकांना त्याचं आश्चर्य वाटलं.
आजच जोतीची नोकरी संपल्याचं त्याला समजलं होतं. वय झाल्यामुळं त्याला कमी करण्यात आलं होतं. मात्र त्याच्या जागी त्याच्या मुलाला ठेवायची तयारी मालकानं दाखवली होती.
आपली नोकरी उमानं करावी म्हणून जोतीनं दोन दिवस त्याला गळ घातली, पण आपण नोकरी करणार नाही, असं त्यानं स्पष्ट सांगितलं. आणि मग जोतीनं त्याला

विचारायचं सोडलं. दोन दिवसांनी तो दोनशे रुपये घेऊन आला नि म्हणाला, "नकं नोकरी करू. मला रक्कम मिळाली–"

तो काय म्हणत होता याचा उमा किंवा हौसा यांना अर्थच समजला नाही.

त्या दिवसापासून जोती रोज दारू पिऊन येत होता आणि फंडाचे मिळालेले सर्व पैसे दारात आणून मोजत बसत होता. ते पाहून लोक म्हणत, 'याला नक्कीच वेड लागलं!'

वैजयंता, गजराबाई या समोर दिसताच जोती चरफडत होता. द्वेषानं जळत होता. मनातल्या मनात शिव्या देत होता. यांनी आपल्या आयुष्यातील गुपित आपल्या मुलाला सांगून आपली ताटातूट केली, म्हणूनच उमा इतका निष्ठुर झाला, असं तो बडबडत होता.

एकदा तो रुपये घेऊन दारात बसला होता. एकाएकी वारा आला आणि त्या सर्व नोटा उडाल्या. एक नोट गजराबाईच्या दारात पडली होती. गजराला राहवलं नाही. तिनं ती नोट उचलून जोतीच्यापुढं धरली. तसा तो बिथरला.

"टाक-टाक! हात लावू नकं. माझ्या कष्टाचं हे पैसे हायती! पापाचं नव्हं!" तो रागात बोलला.

त्याच्या त्या शब्दानं गजराबाई कष्टी होऊन घरात गेली.

जोतीच्या या उपद्व्यापानं उमा हैराण झाला. त्याच दरम्यान बाबालालचं नवं थिएटर जळगावला सुरू झालं, तेव्हा उमाची बारी काही दिवसांसाठी खानदेशात गेली.

तेव्हा जोती म्हणू लागला – "माझं मूल देशोधडी लावलं. याचा मी सूड घेणार!"

## ९

बाबालालच्या धंद्याला भरभराट आली होती. या वर्षी खानदेशात त्यानं दोन थेटरं उभी केली होती. त्यामुळं त्याची सारखी धावपळ चालली होती. फडांची अदलाबदल, हिशेब, यांसारखी कामं तो स्वत: करीत होता. तमाशा, तमासगीर नि थिएटर यांखेरीज इतर गोष्टींचा तो विचारच करीत नव्हता.

सदानंद थिएटरची सर्व व्यवस्था आता चंदूलालच पहात होता. जोवर तिथं बाबालाल होता तोवर चंदूच्या हातात काहीच अधिकार नव्हता. पण बाबालाल खानदेशात जाताच चंदू या थिएटरचा सर्वसत्ताधीश बनला. मूळचाच बेबंद चंदूलाल आता स्वैर होऊन कारभार करू लागला. बापानं तमासगिरांचे लाड केले आहेत म्हणून हे मूर्ख डोईजड झाले आहेत, त्यांना शुद्धीवर आणलं पाहिजे, असं ठरवून तो सर्वांशी वागत होता. क्षणोक्षणी 'हे चालणार नाही, ते चालणार नाही' असा दाब देत होता.

परंतु वैजयंता मात्र त्याची जरब जुमानीत नव्हती. त्यामुळं तो चिडत होता. इतर तमासगीर बाया कशा नम्र नि सरळ असतात — ये म्हणेन तेव्हा येतात, जा म्हणताच जातात — आणि हीच एवढी कोण लागून गेली आहे राजकन्या? हिची एवढी मिजास का?

वैजयंता त्याच्या उरात चाकूसारखी रुतली होती. त्यात ती मुळीत नमत नव्हती, त्यामुळे खटके उडत होते.

"नाही! वैजयंता, पब्लिकशी सरळ वागलं पाहिजे!" तो डोळे फाडून म्हणत होता.

"मी सरळ तमाशा करीन नि सरळ जाईन. दुसरं मला मान्य नाही. तमाशा म्हणजे माझ्या देहाचं नग्न प्रदर्शन नव्हे! जनतेची मालकी माझ्या कलेवर-शरीरावर नाही!"

"परंतु लोकांचं मन राखलं पाहिजे. जर कोणी बोलावलं, तर चार पावलं गेलं पाहिजे!" तो जोर देऊन आग्रहानं म्हणत होता. "फक्त स्पर्शानं काय होणार आहे? फडात डोळा मारून घरी विडा देतात. मग तुला केवळ हातात हात द्यायला काय हरकत आहे?"

"मी इतरांसारखं वागणार नाही आणि कुणाचं भलतंच ऐकणारही नाही. एकादी पैशासाठी कुणाच्या मांडीवर बसेल, मी मात्र कुणाच्या वाऱ्याला उभी राहाणार नाही. मग हातात हात घ्यायचं नावच काढू नका शेट! मी तमाशा करण्यापूर्वी हे सारं थोरल्या शेटना स्पष्ट सांगितलं आहे नि अजूनही सांगते आहे—" वैजयंता निर्वाणीवर येत होती.

"हा तुम्हा बायकांचा लोकांवर जुलूम आहे! ते काही फक्त गाणी ऐकण्यासाठी येत नाहीत!"

"आणि मीही इथं कसबीण म्हणून येत नाही. तमाशात कसूर झाली तर जनतेनं मला फाशी द्यावं. पण तुम्हीच लोकांच्या नावावर हे वाह्यात वर्तन माझ्यावर लादताहात!" वैजयंता लालेलाल चेहरा करून म्हणाली. मग बळी आणि इतर फडकरी यांनी मध्यस्थी करून त्या दोघांना समजावलं.

चंदूलाल निघून गेला, पण चारचौघांत झालेल्या अपमानामुळं मनातल्या मनात मात्र तो ज्वालामुखीप्रमाणे धगधगू लागला.

'कालची पोर ही! पण काय अहंता! म्हणे मी देहाचं प्रदर्शन करणार नाही! तो तिचा मग्रूर देहच चेलपटून त्यातील पीळ काढून चऱ्हाटाप्रमाणे फेकून दिला पाहिजे!' या अंतरीच्या बडबडीनं त्याच्या मानेवरचा सैतान किंचित शांत होताच त्याला जंगीची आठवण झाली आणि तो दचकला.

'त्या सैतानानं पहिल्याच दिवशी तिच्यासमोर आपल्याला आव्हान देऊन आपला घोर अपमान केला. आपली पत उडाली. आपण तिच्यासमोर दुबळे ठरलो. जर तो प्रसंग उद्भवला नसता तर पुढं ही पाळी आलीच नसती. शिवाय जंगीनं मुद्दाम येऊन आपल्याला

तिच्या दारात मारलं... म्हणूनच तिनं आपलं पाणी ओळखलं आहे.

'मग काय करावं?'

असे कित्येक विचार मनात येऊन त्याच्या काळजाचे पापुद्रे कुरतडून जात होते. त्यामुळं तो अस्वस्थ झाला होता.

वैजयंताही त्या कटकटीनं चिडली होती. प्रेक्षकांना संतुष्ट करण्यासाठी तमासगिरांनी – विशेषत: बायांनी सर्व मर्यादा सोडून वर्तन करावं हे चंदूचं मत तिला पसंत नव्हतं. एकदा बाबालालशेटला भेटून त्याचा निकाल लावून टाकावा, नाहीतर थिएटर सोडून आपला तमाशा बाहेर करावा, याचा तो विचार करीत होती.

एके दिवशी बारी सुरू असताना अचानक बाबालालशेट आला. वैजयंताशी थोडं बोलून निघून गेला. बरं झालं, आता सकाळीच त्याला भेटून चंदूची चांगलीच कानउघाडणी करायची, असं तिनं ठरवलं.

परंतु बाबालाल त्याच रात्री खानदेशात गेला. सकाळीच चंदूनं हिशेब पाहिला. काही लोकांना त्यानं शिधा दिला आणि त्याला वैजयंताची आठवण झाली, तसा तो विचारमग्न झाला आणि त्याच्या त्या अंतिम विचाराचं थैमान त्याच्या डोकीत उठलं. पुढं परिणाम काय होईल याची स्पष्ट कल्पना त्याच्या पुढं येऊ शकली नाही. तो उदास झाला. घरात कुणीच नव्हतं. दोन्ही बायका माहेरी गेल्या होत्या. त्यानं बळीला हाक मारली.

"आताच वैजयंताकडे जा–"

"आनी काय करू?" बळीनं विचारलं. काहीतरी भानगड उद्‌भवणार अशी त्याला शंका आली.

"तू तिला सांग – म्हणावं थोरल्या शेटनं बोलावलं आहे. उभ्या उभ्या येऊन जा. काय? पळ–"

"निघालो." असं म्हणून बळी ढेंगा टाकू लागला.

"ए! थांब – इकडे ये." चंदूनं त्याला पुन्हा परत हाक मारली. "हे पाहा, बाबालालशेट गेले असं चुकून बोलू नको. नाहीतर ठार मारीन–"

"छा, छा – चुकणार नाही." बळीचा चेहरा रुंदावला.

"ती जर नाही आली तर तुझी खैर नाही!" चंदू नजर रोखून म्हणाला. "लौकर ये नि त्या लक्षादादाला इकडे पाठव. जा – पळ बघू!"

तासाभरानं बळी परत आला तेव्हा लक्षादादा, खाशादादा आणि त्यांची दोस्तमंडळी यांनी घर भरलं होतं. सर्वत्र दारूची घाण दरवळत होती. चंदूलालच्या पापण्या जड झाल्या होत्या आणि जीभ मंदावली होती. त्यानं डोळे वटारून विचारलं,

"काय रे? काय म्हणाली ती?"

"ती येतीया. आता निघाले म्हणली."

"शाबास!" चंदूलाल संतुष्ट झाला. त्यानं एक मोठं ग्लास भरून बळीच्या हाती दिलं नि म्हणाला, "हं, मार एवढं! घे एका दमात! चल आटप!"

"आवं पर ही अर्धी बाटली हाय की!" बळीनं भेदरून ग्लासाकडे पहात तक्रार केली.

"असू दे – पी. मोठं काम केलं आहेस तू. घे पिऊन! चल–"

बळीनं तो ग्लास पोटात ओतून घेतला आणि लोळून उठलेलं गाढव अंग झाडतं तसं सर्वांग झटकीत नाक-तोंड एकत्र करून म्हटलं,

"छा: पिवर माल हाय बरं!"

"आता तू आसपास बैस आणि ती येऊन गेली की परत ये. जा – पळ..." चंदूनं त्याच्या पाठीवर थाप मारताच बळी चालू लागला. तो दारात आला तेव्हा त्याच्या पोटात डोंब उसळला. पोटातील ती आग बळीच्या मस्तकाकडे सरकली होती. त्यामुळं त्याची सर्व गात्रं बधिर झाली होती. हातापायातील शक्ती पांगळी होऊन तो पाय कसेतरी ओढीत नाक्यावर आला. कान, डोळे, हातपाय सर्वांवरचा ताबा जाऊन तो आता वेड्यासारखा हसू लागला. तिथल्या एका झाडाच्या बुंध्याला पाठ लावून तो बसला, तेव्हा त्याचा अवतार पाहून जाणारे लोक हसू लागले. हे सर्व लोक मूर्ख आहेत अशा आविर्भावानं बळी पोट धरून हसत त्यांची कीव करू लागला. थोड्या वेळानं त्याची नजर समोरच्या छपरावर स्थिरावली. त्या छपरावर – "येणार–येणार–तुमची लाडकी वैजयंता येणार!" असा तमाशाचा बोर्ड दिसत होता. त्यावर एक बाई डोकीवर पदर उंचावून नाचत होती. वाऱ्यानं तो बोर्ड कलंडून लोंबकळत होता. त्याकडे एकाग्र चित्तानं पहात बळी हसत होता नि बोलत होता – "तुमची लाडकी वैजयंता येणार नि तिला फासी लागणार. फासी-फासी-फासी!"

हसता हसता तो मध्येच रडत होता. 'ती गरीब आज फासी जाणार वाघाच्या घरी पाव्हणी..."

उन्हाची प्रखरता भलतीच वाढली होती. वैजयंता बाबालालकडे निघाली होती. तिची चपळ नजर भिरभिरत होती. ती नाक्यावर आली आणि समोर बाबालालचं घर दिसताच तिनं आपला वेग अधिकच वाढवला.

"वजंताबाई, हकडं या!" बळीनं शांतपणे हाक मारली. तशी खटकन वैजयंता थांबली. तिनं बळीकडे न्याहाळून पाहिलं, तेव्हा तो कसातरी बसला होता. डोळे लाल झाले होते. अंगाची सारखी तगमग चालली होती. त्याची ती दारुण अवस्था पाहून वैजयंतानं घाबरून विचारलं,

"बळबा, काय हे?"

"काय नाही. दारू प्यालोय मी. तुम्ही आता म्होरं जाणार, पर माझं ऐका. देवाच्यानं

खरं सांगतो. माझा तुमच्यावर भारी जीव हाय. पन त्यो बोकड वाईट मानूस. म्हंजी असं — त्यो बाबालाल रातीच गेला मसनात. आन् चंदूलाल दारू पिऊन... तुमची वाट बघत बसला... खरंच, आता तुमी ठार मरनार... त्यो आज तुमाला सोडणार न्हाय... सारं दादालोक तर्र...''

वैजयंता चटकन उठून परत फिरली. सर्व शक्ती एकवटून जवळजवळ ती धावतच निघाली. फासेपारध्याच्या हातून सुटलेल्या हरिणीसारखी तिची अवस्था झाली. कोणीतरी धावत येऊन आपल्याला ओढून नेईल आणि एका भयंकर आगीत आपला हा देह फेकून देईल, असं वाटून ती पळत होती.

वैजयंता दूर गेल्यानंतर बळीच्या लक्षात आलं, की ती परत गेली. तेव्हा तो हसला. वाचली! — त्यानं मांडीवर टाळी मारली आणि स्वत:लाच सांगितलं, ''ती पळाली.''

त्यानं जेव्हा जबरीनं डोळे उघडले तेव्हा सात वाजून गेले होते. उन्हाची जागा सावलीनं घेतली होती. वातावरणातील दाहकता निमाली होती. हवेत आल्हाद भरला होता. इमारतीच्या गल्लीत वाट चुकलेलं वारं एकदाच रस्त्यावर येऊन भन्नाट पळत होतं आणि त्याच्यामागून कागदाचे कपटे धूम ठोकीत होते.

बळीची नजर आता निवळली होती. येणारा चेहरा त्याला दिसत होता. समोरून जंगी येताना पाहून त्याला आनंद झाला. त्यानं उठायची खटपट केली.

''या जंगी दादा!'' बळीला उठता आलं नाही, तेव्हा तो मग तसाच बसून बोलू लागला. ''जंगीदादा, बसा.''

बळीची दारू जंगीच्या लक्षात आली. तो उगीच चेष्टा करावी म्हणून त्याच्यापुढं बसत म्हणाला, ''काय किती घेतलीस?''

''अर्धी बाटली. चंदूशेटनं दिली. पण भारी कडक! ती लक्षादादाच्या भट्टीची. माझी हाडंच पांगळून गेली!''

जंगीला गंमत वाटली. बळीला अधिक छेडावा म्हणून तो म्हणाला,

''तरीच तुझी बकरी डोंगरावर गेली!''

''छे, छे! ती परत गेली!'' बळी गंभीर होऊन म्हणाला. ''आज चंदूलाल तिची आगळ काढणार व्हता. पर म्याच तिला वाचवली.''

जंगी त्याच्या बडबडीनं घोटाळ्यात पडला. तो चिडून म्हणाला, ''ए भानचोद, सरळ सांग ना!''

''आवं, वजंताबाई — आज तिच्यावर चंदू जबरी करणार व्हता. पर म्या तिला सारं सांगून परत फिरवली. न्हायतर मेली असती ती!''

''साल्यांनो, पाप करू नका!'' जंगी हसत म्हणाला. ''नरकात जाल तुम्ही सारे! सर्वांच्या पुढं तू जाशील, मादरचोद—'' असं म्हणून बळीच्या गुळगुळीत टाळूवर

एक टपली मारून जंगी निघून गेला.

आठच्या सुमाराच बळीच्या पायात तकवा आला आणि तो कसाबसा घरी पोचला, तेव्हा घरात वातावरण पेटत होतं. वैजयंता न आल्यानं चंदू खवळला होता. बळी दिसताच तो ताडकन उठला. याच हरामखोरानं तिला उलटसुलट सांगितलं म्हणून ती आली नाही, असा संशय येऊन तो बळीवर धावला.

"निमकहराम! बोल, ती का आली नाही? आणि खरं खरं सांग, नाहीतर तुझी आतडीच काढतो बाहेर! बोल!" चंदूच्या आवाजानं घर गरजलं. त्याचा स्वत:वर मुळीच ताबा नव्हता. वैजयंता आता येईल, मग येईल असं म्हणून आतुर मनाला शांत करण्यासाठी आतापर्यंत तो सारखा दारू पीत होता. त्याचा तो रुद्रावतार पाहून बळी गांगरला. आता आपला मुडदा पडणार याची खात्री होऊन तो काहीतरी बोलण्यासाठी बोलला,

"ती-ती - येत व्हती—"

"मग काय झालं?"

"तिला जंगीनं परत नेली!" बळीनं जंगीचा मोठा अडसर घेतला नि तो कोसळून पडला.

जंगीचं नाव ऐकताच चंदू पेटला, लक्षा, खाशा बिथरले. तापलेली डोकी तरकटून पेटली. एकदम भडका झाला.

मुठीतील चाकू गरम झाले!

काळोखाच्या प्रचंड ढिगाऱ्याखाली ती वस्ती दबली होती. बोलणं, चालणं, हालणं सारंच मंदावून माणसं अचल झाली होती. उद्याची विवंचना त्याला थोपटून निजवीत होती. सर्व काही शांत सामसूम झालं होतं.

परंतु वैजयंता चरफडत होती. भय, उद्वेग, चिंता यांनी तिचं हृदय थरथरत होतं. आज काय झालं असतं, हा एकच प्रश्न तिच्यापुढं नाचत होता.

आपण एका अभेद्य चक्रव्यूहात शिरत होतो, थोडक्यात बचावलो. नाहीतर? आज आपली राख झाली असती. आपला अहंकार, आपली इज्जत सर्वच त्या चक्रव्यूहात नष्ट झालं असतं.

आणि ते कसं नष्ट झालं असतं याचं भयाण चित्र ती कल्पनेनं आपल्या चक्षूंपुढे उभं करू पहात होती नि थरथर कापत होती. "आई, माझ्या अंगावर पांघरूण घाल. मी आज तमाशाला जाणार नाही—" असं पुन्हा पुन्हा म्हणत होती. परसू, गंगू, पुनाजी हे चिंतातुर होऊन बसले होते. एकाएकी हा काय प्रकार उद्भवला हे त्यांना कळेना.

अकस्मात ती शांत वस्ती हादरली. सर्वत्र एकच आवाज निनादला — खून!

जाळ्यात अडकलेले मासे धडपडावे तद्वत माणसं धडपडून उठली, कान टवकारून ऐकू लागली. कानोसा घेऊ लागली. मग आतुर होऊन दारात आली.

''खून? कोणाचा?'' असं म्हणून वैजयंता ओसरीला आली, तेव्हा माणसं पळत होती — एकमेकांशी बोलत होती.

''काय झालं?''

''खून झाला, खून!''

''कोणाचा खून?''

''जंगीचा खून!''

''जंगीचा? कुणी केला?''

''चंदूलाल—''

''नाही. खोटं — चंदूचा खून झाला!''

''कोण म्हणतं? आरं एक नाही चार खून!''

या हलकल्लोळात ती वदंता नाचत होती. ती ऐकून वैजयंता भांबावली. आणि पुन्हा घरात जाऊन म्हणाली, ''माझ्या अंगावर घाला.''

आज मृत्यु आपल्यासाठी आला होता, परंतु बळीनं देव होऊन आपली मृत्यूची वाट चुकवली. तेव्हा तो भयाण मृत्यू चिडला आणि त्यानं हे खुनाचे सत्र आरंभून कोणाचा तरी बळी घेतला. आपण मात्र वाचलो — असं म्हणून तिनं काळजावरून हात फिरविला.

थोड्या वेळानं वातावरण गलितगात्र झालं. कोणीही बाहेर फिरकत नव्हतं. थिएटर बंद पडलं होतं. खरा प्रकार काय घडला असावा, याची नुसती कल्पनाच लोक करीत होते.

परंतु पोलिसांची मोटार त्या भयंकर रात्रीला चिरडीत धावत होती; बोळाबोळातून ती दाहक धूर सोडीत होती. 'पोलीस' — लोक हळूच बोलत होते.

पोलिसांची मोटार रात्री बारा वाजता आली आणि वैजयंताच्या दारापुढं थांबली, तशी वैजयंता भेदरून उठली.

''वैजयंता कोण?'' एका अधिकाऱ्याचा प्रबळ आवाज त्या निर्बल वस्तीवर घुमला.

''कोण आहे?'' परसूनं हळूच विचारलं.

''हेच घर का?'' पोलिसानं विचारलं.

''हो, हेच घर. मीच वैजयंता!''

''चल पोलीस स्टेशनवर!''

''मी एकटीच? मामाला घेऊ?''

''चालेल.'' त्या अधिकाऱ्याचा आवाज खर्ज्यात निघून दूर गेला.

"मी अंगावर घेते—" वैजयंताचे शब्द क्रापले.

वैजयंता आणि परसू यांना घेऊन मोटार भरकन गेली. गजराबाईचे हातपाय गळून गेले. 'माझ्या वजूला कुठं नेली?' ती स्वत:ला विचारू लागली.

आपण पोलीस-स्टेशनवर जात आहोत, हे पोलीस मला का घेऊन निघाले आहेत, असे शब्द वैजयंताच्या जिभेवर चरफडू लागले. इतक्यात ती मोटार पोलीस-स्टेशनच्या आवारात शिरली आणि वैजयंतानं जिभेवरचे शब्द गिळून घेतले.

पोलीस-स्टेशनमध्ये युद्धाचं वातावरण निर्माण झालं होतं. पोलीस कार्यक्षम नि गंभीर दिसत होते. लाठीच्याऐवजी पिस्तुलं दिसत होती. एका कोपऱ्यात बळी केविलवाणा चेहरा करून बसला होता. आता त्याची दारू पार उतरली होती. वैजयंता दिसताच तिला 'ये' असं डोळ्यानं खुणवून आणि पुन्हा मटकन डोळे झाकून गुडघ्यात मान घालून तो आजारी माकडाप्रमाणे बसला.

पोलिसांची धावपळ, ती रक्तानं न्हालेली माणसं, सर्वांगाला पट्ट्या मारलेला खाशादादा, हबकून बसलेला बळी हे पाहून वैजयंता भयभीत झाली. आयुष्यात प्रथमच त्या तसल्या वातावरणात आल्यामुळं तिला चुलवणातच शिरल्याचा भास होत होता.

मिनिटामिनिटाला फोनची घंटा वाजत होती. साहेब फोन घेऊन बोलत होता. गंभीर मुद्रा करून मग खाशाबाकडे कटाक्ष फेकून विचारमग्न होत होता. कोणी तरी काळजीच्या सुरात विचारत होतं,

"काय? मेला तो?"

"नाही, पण जगायची आशाही नाही."

"जबानी झाली ना?"

असे तुटक शब्द ऐकून वैजयंता अधिक बुचकळ्यात पडत होती. कोण मेला?

हळूहळू एक एक गोष्ट कानावर येऊन घडलेला प्रकार तिच्या लक्षात आला, की चंदूलाल, लक्षा, खाशा यांनी आपली माणसं घेऊन जंगीवर हल्ला चढवला. त्यावेळी मोठी मारामारी झाली आणि जंगीच्या मारामारीत चंदूलाल, लक्षा, हे दोघे भयंकर जखमी होऊन दवाखान्यात पडून अजून शुद्धीवर आलेले नाहीत; आणि या सर्वांनी जंगीची निर्दयपणे कत्तल केली आहे व तो आता गॅसवर असून त्याची आशा नाही.

मॅजिस्ट्रेटनं इस्पितळात जंगीची जबानी घेतली, तेव्हा त्यानं सर्व प्रकार सांगून हल्ला करण्यापूर्वी ते सर्व दारू पिऊन तयार होते आणि वैजयंता नावाच्या बाईवर जबरी करणार होते, या गोष्टी आपल्याला बळीकडून समजल्याचं सांगितलं. त्यावरूनच बळीला अटक झाली होती.

हा प्रकार लक्षात येऊन वैजयंताला कंप भरला. इतक्यात जबान्यांच्या विधीला आरंभ झाला.

प्रथम बळी उठून बोलू लागला —

"वैजयंताबाईवर पुष्कळ दिवस चंदूलाल शेटची वाईट नजर होती. परंतु त्याची इच्छा पूर्ण होत नव्हती. काल त्यानं आपल्या बायका माहेरी पाठवल्या आणि मला वैजयंताकडे पाठवलं. शेटच्या हुकुमाप्रमाणे मी जाऊन थोरल्या शेटनं तुला बोलावलं आहे असं सांगून आलो. त्यावेळी लक्षा, खाशा हे दादालोक घरात बसले होते. ते दारू प्याले होते. मलाही शेटनं एक मोठं ग्लास दिलं नि ते मला चढलं. मी एका झाडाखाली बसलो. नंतर मला वैजयंता दिसली. मी तिला काहीतरी सांगितलं. नक्की काय ते मला आठवत नाही, तेव्हा शेट माझ्यावर चाकू घेऊन धावला. वैजयंता का आली नाही, असं विचारून तो मला चाकू मारणार होता. पण मी त्यावेळी जंगीचं नाव मुद्दाम सांगून जीव वाचवला. मी सांगितलं, की जंगीनं वैजयंताला येऊ दिलं नाही. हे ऐकून ते सर्व चिडले आणि जंगीला मारण्यासाठी निघून गेले. नंतर कोणाचा कसा सुपडा साफ झाला — मला माहीत नाही."

बळीची जबानी संपली आणि तो पुन्हा आपल्या जागेवर जाऊन पूर्वीसारखाच खुटक्यात मान घालून बसला. नंतर पोलीस-ऑफिसर वैजयंताकडे वळून म्हणाला,

"हं. तू तमाशात नाचतेस? ठीक बोल."

"सकाळीच अकरा वाजता बळीनं मला सांगितलं, की तुला बाबालालनं बोलावलं आहे. त्याप्रमाणे मी बारा वाजता घर सोडलं. परंतु नाक्यावरच मला बळीनं हाक मारली. तो दारू प्याला होता. तो हसत होता नि रडतही होता. तो म्हणाला, तुझ्यावर माझा भारी जीव आहे, पण आज तू मरणार. चंदूलाल तुला..." असं बोलताना एकाएकी वैजयंता अडखळली, लाजली आणि पुन्हा म्हणाली, "मग मी प्रसंग ओळखला आणि परत फिरले. पुढे काय झालं, मला ठाऊक नाही."

नंतर खाशाबानं सांगितलं, "आठ वाजता जंगी हातात लोखंडी सळई घेऊन आला. तेव्हा आम्ही दारू प्यालो होतो. 'तुम्ही त्या बाईवर जबरी करणार काय रं?' असं म्हणून जंगीनं मारामारी सुरू केली. पहिला फटका त्यानं मला मारला. डोकं फुटून मी पडलो आणि मग त्यानं चंदूला चाकू मारला. जंगीवर कुणी वार केले मला ठाऊक नाही. पण जंगी ओरडत होता — 'गरीब बाईच्या पाटी का लागला तुम्ही? तिनं मला सारं सांगितलं' —"

"अरे मग नाक्यावर मारामारी कशी झाली?" ऑफिसर डिरकला. तशा खाशा म्हणाला,

"नाक्यावर? तेव्हा आम्ही घरी जात होतो. त्यावेळी जंगी आला नि त्यानं आम्हाला मारलं—"

इतक्यात बळी उठून म्हणाला, "सरकार, ह्येची दारू अजून साफ उतरली नाही.

त्याची कवटी फुटली असती म्हणजे खरं बोलला असता—''

"चूप!—" एक पोलीस खेकसला.

मग सर्वांच्या जबान्या झाल्या. सर्वांनी एकच सांगितलं, की नाक्यावर जंगीनं मुद्दाम मारामारी केली. ते ऐकून बळीला संताप आला. गावाचा भित्रा, भोळा बळी अगतिक झाला. परंतु तो पुन्हा मान खाली घालून स्तब्ध बसला.

थोड्या वेळानं फोन आला. पोलीस अधिकारी बोलू लागला, "कोण डॉक्टर? हॅलो — हं बोला — काय? मेला?" एकाएकी तो अधिकारी गंभीर झाला. आपली शांत नजर सर्वांवरून फिरवीत शेवटी ती वैजयंतावर स्थिर करून तो उद्गारला, "जंगी मेला!"

उगीचच वैजयंताचे डोळे थरारले. टपोरे डोळे स्थिर होऊन दोन अश्रू पापण्यांच्या काठावर हळूहळू आले. दिव्याच्या प्रखर प्रकाशात ते रत्नाप्रमाणे क्षणभर चमकून पटकन कोसळून तिच्याच पदरात गुप्त झाले. ती मनात म्हणाली, आपल्यासाठी या ना त्या कारणानं एका समर्थ माणसाचा बळी गेला! त्याची कत्तल झाली!

जबानी संपताच पोलिसांनी वैजयंताला पुन्हा घरी आणून सोडलं, तेव्हा पहाट होत होती. रात्रभर गजराबाई डोळ्यात प्राण आणून तिची वाट पहात होती. जेव्हा ती आली तेव्हा तिच्या जिवात जीव आला.

पण वैजयंताच्या हृदयावरचं दडपण अजून दूर झालं नव्हतं. तिचं मन खचलं होतं. पुन्हा पांघरूण अंगावर घेऊन ती जी पडली, ती आठ दिवस पडूनच होती.

## १०

जंगी खून खटला अकरा महिने चालून एकदाचा निकालात निघाला होता. बाबालालनं सर्व प्रकारे शिकस्त करूनही त्याला अपयश आलं होतं. सर्व आरोपींना जबर शिक्षा झाल्या होत्या. त्यात चंदूलालला तर दहा वर्षांची सक्तमजुरी झाली होती. त्यामुळे बाबालालची स्थिती केविलवाणी झाली होती. पाण्यासारखा पैसा जाऊन जे व्हायचं ते झालं होतं. आता हायकोर्टात अपील दाखल करून दैवावर हवाला ठेवून तो स्वस्थ बसला होता.

या खटल्यात वैजयंताचं नाव गुंतल्यानं सर्वत्र तिच्या नावाचा भलताच गाजावाजा झाला होता. 'एका सुंदर युवतीसाठी रक्तपात' असे वृत्तपत्रांनी मथळे दिले होते. पुढं पुढं तर त्या खटल्याचं नावच 'वैजयंता खटला' असं पडलं होतं. अकरा महिने वैजयंताच्या जिवात जीव नव्हता. पण जेव्हा सर्व आरोपींना शिक्षा झाल्या, तेव्हा तिला हायसं वाटलं होतं.

आता ती अगदी निर्भय झाली होती. तिच्या तमाशाला जोड नव्हती. त्यामुळं सर्व थिएटर मालक तिच्यामागं लागले होते.

परंतु चंदूलालच्या दुष्कृत्यानं तिचं मन विटलं होतं. तमाशाच्या अधोगतीला हे कंत्राटदारच प्रामुख्यानं जबाबदार आहेत, असं तिचं मत झालं होतं. आणि आपण आपला तमाशा कनातीबाहेर मैदानात करावा, लोक देतील ते घ्यावं – म्हणजे हे थिएटर मालकांचे भुंगे टळतील, असं तिला एकसारखं वाटत होतं.

त्याचबरोबर उमाचा फड गावोगाव फिरत असून त्याचा पुष्कळ लौकिक वाढला आहे, अशा बातम्या ती ऐकत होती. एखादे दिवशी उमाची स्मृती होताच जुन्या आठवणी उसळून ती आपल्या गतजीवनाच्या विचारात मग्न होत होती. आपली प्रेमाची दुनिया स्वप्नासारखी का विरली याचा ती तासन्तास विचार करी नि मग काय चुकलं, कोणाचं चुकलं याचा निवाडा करी.

अकरा महिन्यात उमाचं एक पत्र आलं होतं. तेही गजराबाईच्या नावावर होतं. शेवटी त्यात वैजयंताला फक्त त्यानं नमस्कार लिहिला होता. त्या दिवशी ती रात्रभर रडली. वीस वर्षांची ओळख हा विसरला कसा? एवढंच स्वत:ला विचारीत ती रात्रभर चरफडत होती. त्यानंतर मात्र त्याचं पत्रही नव्हतं. म्हणून ती म्हणत होती, 'तो आपल्याला संपूर्ण विसरला. चंद्रानं त्याला पूर्ण आपलासा केला असावा. पण चंद्रापेक्षा आपण अधिक देखणी, अधिक सुंदर, तरुण असं असता हे घडलं कसं? पण मग आईबापाचाही त्यानं त्याग का करावा? एकदा तो चंद्राजवळ म्हणाला होता म्हणे, की आपल्यामुळंच वैजयंता तमाशात गेली. आता आपल्या मनाला शांती लाभणार नाही; म्हणून आपणही तमाशात जाणार! त्याचं हे म्हणणं खरं असेल का? मग तो आपल्याला भेटला कसा नाही? हो, एकदा भेटला नळावर, पण मीच त्याला मूर्खासारखं टाकून बोलले. लहानपणीसुद्धा त्याला कधीच बोलू दिलं नाही. आपलंच घोडं पुढं दामटलं. त्यावेळी नळावर त्याचा अपमान करताना मला केवढा आसुरी आनंद लाभला. पण त्यामुळं जन्मभर टोचणी मागं लागली त्याचं काय? आता या यातना किती दिवस सहन करायच्या? त्याला विसरून हा देह, हे हृदय कुणाला देऊ?'

असे एक ना अनेक प्रश्न तिला भंडावून सोडीत होते. परंतु पुन्हा सकाळी तीट वटवीत होऊन आपलं काम करीत होती. बोलण्यात, तमाशात रमून जात होती. अंतरीची ती तळमळ आता तिच्या अंगवळणी पडून तिला सुखदायीच वाटत होती. आपल्या हृदयाच्या तारा अशाच छेडल्या जाऊन हे स्मृतिसंगीत अखंड ऐकावं, असं तिला वाटत होतं.

आज बारी नव्हती. ती व गजराबाई या दोघीच घरात होत्या. वैजयंता मलूल दिसत होती. खरं म्हणजे तिचं मन विचारचक्रात गिरक्या घेत होतं.

इतक्यात परसू आला. त्याबरोबर तिच्या चेहऱ्यावर हास्य फुललं. नकळत श्रद्धापूर्ण नजरेनं तिनं त्याच्याकडे पाहिलं.

गजराबाई म्हणाली, ''बारीचा कंटाला आलाय. फिरून तरी यावा!''

वैजयंता पातळ बदलून तयार झाली नि निघाली. सांज होत होती. गर्दीतून चालत होती. परसूच्या मागून चालताना ती मनात लाजत होती. लोक काय म्हणत असतील? याची कल्पना करून ती उगीचच गालात हसू दाबीत होती.

रस्त्यावर चालणाऱ्या माणसांना गतीनं अंकित केलं होतं. जो थांबेल त्याला धक्का बसेल हा नियम वैजयंताला माहीत होता. म्हणून ती जपून पावलं टाकीत होती.

आकाश स्वच्छ होतं. मावळतीची किनार मात्र ढगांनी भरली होती. किरणांच्या वर्षावानं तो सागर भारावल्याचा भास होत होता. जणू त्याच्या वेगवान लाटांवर ती सोनेरी किरणं आरूढ होऊन खेळत होती. किरणांचा रंग पोटात घेऊन लाटा किनाऱ्याकडे येत होत्या नि एकदम दमगीर होऊन दीर्घ निःश्वास टाकून परत वळत होत्या.

वैजयंताची अचल नजर लाटांवर हेलकावे घेत होती. ती देहभान हरपून तो अथांग सागर डोळ्यात सामावून घेत होती. तिला पाहून तो सागर हसत होता.

आणि परसू फक्त वैजयंताला न्याहाळीत होता. कोणीच बोलत नव्हतं.

लाटांची ती धवल धावपळ वैजयंता पाहत होती. लाटेतून लाट निपजत होती. एक दुसरीच्या डोकीवरून उडी घेत होती. पुढं येणारी नरम वाळूवर शांत होऊन पुन्हा परत फिरत होती. त्या प्रचंड लाटांमध्ये वैजयंताचं मन गुंतलं होतं. आपल्या जीवनाची तुलना ती त्या लाटांशी करीत होती.

पश्चिमेला सूर्य बुडाला, त्याच वेळी पूर्वेला चंद्रोदय झाला होता. वातावरणातील ते परिवर्तन तिला आल्हाददायक वाटलं. उरलीसुरली पिवळी किरणं सागराच्या तळाला गेली आणि रुपेरी प्रकाशात तो अरबी सागर नवरूप नटला. चांदीच्या लाटा उधळू लागला. एक लाट येऊन तिच्या पायाजवळ थांबली. आत्मसमर्पण करून लुप्त झाली.

''अग बाई!'' असं उद्गारून ती किंचित दूर सरून बसली. तेव्हा परसू तिची पुलकित अवस्था पाहत हळूच म्हणाला,

''लाटेवर लाट आदळून गेली!''

''कोण, मी लाट?'' मान तिरपी करीत तिनं प्रश्न केला. त्यावेळी चंद्र नारळीच्या बनातून हळूच वर आला होता. नारळीच्या लांबट सावल्या पाण्यावर आडव्या पडून त्या लाटांवर डगमगत होत्या. त्या गर्दीत वैजयंताची सावली कलती होऊन पाण्यात बुडत होती आणि लाटा तिला पाण्यात कुसकरून पाण्याशी एकरूप करीत होत्या. आपल्या सावलीची ती स्थिती पाहून वैजयंता लाजत होती.

''वैजयंता?'' परसू हळूच म्हणाला.

"काय मामा?" ती हुंकारली.
"बोल ना—"
"तुम्हीच बोला. खूप बोला. मी ऐकते!"
"नाही, तू बोल!"
"मी फार बोलले आहे. आता ऐकणार मी!"
"मी एकटाच किती बोलू?"
या प्रश्नानं ती चमकली. तिला ते शब्द ओळखीचे वाटून ती हसली.
"या लाटा का उठतात?"
"वारा त्यांना उठवतो."
"ही लाट म्हणजे वाऱ्याची पावलं. माणसाचं जीवन म्हणजे सुद्धा वाऱ्याची पावलं आहेत. खरं सांगू? माझं जीवन ह्या लाटेपेक्षा निराळं नाही. मी कोणत्या किनाऱ्यावर आदळणार, हे मला माहीत नाही." असं म्हणून ती हसली.
"आणि काय वाटतं तुला वैजयंता?" सारंगीच्या तारा छेडून उन्मादक स्वर मनमुराद ऐकावे, अशा उद्देशानं परसूनं विचारलं आणि वैजयंता म्हणाली,
"वाटतं, या लाटेप्रमाणं धावत जाऊन किनारा गाठावा, नि श्वास घ्यावा. त्याच्या हृदयावर मस्तक ठेवून नम्र व्हावं, परंतु परत फिरू नये. तिथंच रहावं — संसार करावा—" असं म्हणून ती थांबली. चटकन उठून त्याच्याजवळ जाऊन तिनं त्याचे हात धरले आणि ती लाजली. तो अचल, विचारमग्न दिसला, तशी ती अस्वस्थ झाली. 'वैजयंता, तू माझी हो—' असं जर हा म्हणाला तर?... तर त्याला नाही म्हणायचं सामर्थ्य आपल्यात आहे का? मुळीच नाही! असं मनात येऊन ती घाबरली, बावरली.
दुसऱ्याच क्षणाला पदरानं सारं अंग लपेटून घेऊन ती उठली आणि म्हणाली,
"मामा, आता चला!"
परसू उठून चालू लागला.
वैजयंतानं पाऊल उचलताच तिच्या पायाखाली ओली वाळू चर्रकन चिरकली.
तिनं घरात पाऊल टाकलं न टाकलं तोच गजराबाई म्हणाली, "वजू उमाचं पत्र आलं आहे. हे पाहा—"
हाती पत्र येताच वैजयंताच्या सर्व भावना अनावर होऊन उचंबळून आल्या. चटकन ते पत्र काळजात लपवावं असं तिला वाटलं. दिव्यापुढे जाऊन ती पत्र वाचू लागली —
*प्रिय वैजयंता,*
*तुझी आठवण क्षण टाळीत नाही. मी जणू त्या स्मृतीवरच जगत असतो. तमाशा ठीक चालू आहे, परंतु चंद्राबाईचं वर्तन मला बरं दिसत नाही. त्यातच मला ताप येत असतो. हे तुला कळवण्याचं कारण माझ्यावर फक्त तुझाच हक्क होता. आता आहे*

*की नाही ठाऊक नाही. आता फक्त एकच कर - माझ्याकडून जे गैरवर्तन झालं ते विसर. मला क्षमा कर. तू तुझी मुखत्यार आहेस. पण मी त्यावेळी गैर वागलो याची आताच नव्हे, तर त्या क्षणापासून खंत वाटत होती. काही वेळा हे तुला सांगावं असं वाटत होतं, पण वजू, तू ऐकून घ्यायच्या मन:स्थितीत नव्हतीस.*

*आता एकच विनंती आहे, की आपली भेट कधीच होऊ नये. परंतु तू मला क्षमा केल्याचं मी ऐकावं. तेवढंच समाधान. गजराआईला मी काय लिहू? तुझी नि माझी ती एकच आई आहे, हे मी कसं विसरू? पुष्कळ दिवस या भावना दडपण्याचा यत्न करून पाहिला, पण आता अशक्य झालं म्हणून हे लिहीत आहे. कदाचित तू माझी कीव करशील...*

पुढं पत्र वाचणं अशक्य होऊन ती खिन्न झाली. तिचे डोळे भरून आले. हुंदका कंठात येऊन चरफडू लागला. 'राजा, मीच चुकले! तू सागरासारखा अथांग. तुझा मला अंतच लागला नाही. तूच मला क्षमा कर. मीच तुला काही वेळा विसरले.' तिचा कंठ दाटला. ओठ थरथरू लागले.

तिची ती विलक्षण अवस्था पाहून गजराबाई, परसू, गंगू यांना आश्चर्य वाटलं. आपल्या मनातील ते तांडव कोणी पाहू नये, म्हणून वैजयंता उठून अंगणात गेली. आपलं हृदय परत सापडलं, आतापर्यंत आपण हृदयाशिवाय जगत होतो, असं वाटून ती हसली.

"कोण वैजंयता?" अंधारांतून येता येता बाबालालनं विचारलं. तशी ती बावरली. अर्धे पत्र वाचायचं होतं ते तसंच पोलक्यात घालून हृदयाशी दाबून ठेवून ती म्हणाली,

"या शेट!" एकाएकी बाबालाल कां आला असावा या विचारानं ती दचकली.

"चल घरात!" बाबालाल दु:खी स्वरात म्हणाला.

घरात घेऊन बाबालाल गंभीर मुद्रा करून बसला, जणू काही तरी जगावेगळं तो सांगणार आहे, पण ते सांगण्यासाठी शब्द शोधीत आहे, असंच वैजयंताला वाटलं आणि ती चिंतातुर झाली.

उशिरानं बाबालाल खिन्नपणे म्हणाला, "आज हायकोर्टाचा निर्णय समजला, शिक्षा कायम झाल्या, चंदूलाल आता दहा वर्षे जाणार. अब्रू, पैसा नि मुलगा-सारंच गेलं. दोन सुना दहा वर्षे मला सांभाळतील असं वाटत नाही. एकूण माझ्या घराची संपूर्ण वाताहत झाली-"

वैजयंता गंभीर होऊन फक्त ऐकत होती. हा पुढं काय सांगणार याची तिला भ्रांत पडली होती.

"बरं, आतां पुढं काय करायचं?" गजराबाईनं प्रश्न केला, तेव्हा बाबालाल म्हणाला, "आज चंदूलाल कोर्टात भेटला. त्याची एकच इच्छा आहे, की तुरुंगात शिक्षा

भोगायला जाण्यापूर्वी वैजयंतानं भेटावं. त्याला काहीतरी बोलायचं आहे, असं तो म्हणत होता-''

बाबालालच्या त्या शब्दांनी वैजयंताचं हृदय पुन्हा विदीर्ण झालं, तिला नकळत कंप भरला. 'मी त्याला का भेटू? तो कोण माझा?' असं ती मनात बोलू लागली. मग ती उघडपणे म्हणाली,

''पण ती म्हणते, मी त्याला भेटायचं कारणच काय? मी कोण त्याची? माझं नि त्याचं नातं काय? बरं, एक शेट उपकारकर्ता म्हणावं तर तसंही नाही. उलट आजपर्यंत मला गारदच करायचा त्यानं प्रयत्न केला आहे. मग ही इच्छा कसली?''

''ते काही असो वैजयंता!'' बाबालाल म्हणाला. ''तरुणपणी चुका होतात. त्याला इलाज नाही. पण तू आता नाही म्हणू नको. त्याची ही अंतिम इच्छा आहे. या खटल्यात मी खलास झालो. जर तो सर्व पैसा खर्चून तुझ्याशी लग्नच त्यानं केलं असतं तरी बरं झालं असतं; परंतु त्यानं मला हे सर्व सांगितलंच नाही. म्हणून आता हा पश्चात्ताप-''

त्याच्या बोलण्याचं तिला आश्चर्य वाटलं. ती नुसती पहातच राहिली. पुत्रवियोगानं हा भ्रमिष्ट झाला असावा. याला दुखवू नये, असं वाटून ती बोलली नाही; परंतु पुन्हा पुन्हा बाबालाल म्हणाला, ''तू तरी मला या प्रकरणाची कल्पना द्यायची! जर मला हा प्रकार, हे असं विपरीत होईल याची कल्पना असती, तर मी कशाचीच पर्वा केली नसती, मी त्याच्याशी तुझं लग्नच केलं असतं. जात, कुळी, प्रतिष्ठा मी काहीही पाहिलं नसतं. तू नाचणारी म्हणून काही दिवस लोकनिंदा झाली असती; पण पुढं सर्व काही ठीक झालं असतं नि हा सर्वनाश तर निश्चित टळला असता.''

बाबालाल कष्टी होऊन निःश्वास टाकीत शांतपणे बोलत होता. आपले शब्द वैजयंताला लागतील, ती चिडेल याची त्याला कल्पनाच नव्हती. त्या दारुण प्रसंगानं त्याची सदसद्विवेकबुद्धी गांगरली होती. पण नवल हे की त्याही वेळी त्याचा दांभिकपणा आणि अहंकार सजीव होता. तो त्याच्या शब्दांतून बाहेर पडत होता. जणू परिस्थितीच्या आघातानं त्याच्या मनाचे सर्व पडदे फाटून सत्य बाहेर पडत होतं.

बाबालालच्या त्या बोलण्यानं वैजयंताला चीड आली होती, त्या ढोंगी माणसाला हाकून द्यावं, असं तिला वाटलं, परंतु आता दुःखात आहे, त्याचं मन दुबळं झालं आहे, असा विचार करून सौम्य शब्दांत ती म्हणाली,

''शेट, तुम्ही बोलत बोलत माझा अपमान करीत आहात. चंदूलाल तुमचा मुलगा असला, तरी त्याच्या दुष्कृत्यांचा डोंगर तुम्ही दृष्टिआड करू नका. इतका पाजी, नादान दुसरा कुणी नसेल! आणि मी नाचणारी असले तरी अशा हलकटाच्या सावलीलासुद्धा उभी राहणार नाही! कृपा करून माझ्या काळजाला घरं पाडू नका. मी त्याची भेट घेणार

नाही! मुळीच नाही - कदापीही नाही!''

''नको, नको - असं म्हणू नको!'' बाबालाल गयावया करीत म्हणाला. ''हे सर्व तुझ्यामुळं त्याच्या नशिबी आलं आहे. आमचा जो हा सर्वनाश झाला, त्याचं मूळ कारण तू आहेस, तुझ्यासाठीच तो बरबाद झाला. जन्मातून उठला-'' बाबालालच्या या बोलण्यानं वैजयंता पुन्हा पेटली. ती खवळून म्हणाली,

''असं? मग नक्कीच तुमची बुद्धी भ्रष्ट झाली आहे. माझ्यासाठीच का त्यानं अनंत पापं केली! उमावर चाकू चालवला. जंगीचा भर रस्त्यात खून केला - ते का त्याला मी सांगितलं होतं? आणि मला हाताखाली घेण्यासाठी त्यानं चंद्राला कुंटीण नेमली होती, ते का मला सुख देण्यासाठी की मला गिळून टाकण्यासाठी? शेट,जो दुसऱ्याचा घात करू पहातो, त्याचा घात हा असा होतो. मी तर म्हणते, अशा या पाप्याला फाशी कशी झाली नाही? मी त्या दिवशी दहीभात खाल्ला असता-''

''ठीक. मी जातो-'' असं तुटक बोलून बाबालाल उठला, आणि शांतपणे निघाला, तेव्हा बाहेर अंधार दाटला होता. रस्त्याकडेचे दिवे अंतराळात डुलत होते. त्यामुळं बाबालालची सावली त्या डांबरी रस्त्यावर आडवी पडून घडपडत निघाल्यासारखी दिसत होती.

वैजयंता कितीतरी वेळ त्याच्या मूर्खपणाचा विचार करीत बसून राहिली. उमाच्या पत्राची आठवण येताच तिनं बाबालालच्या विचारांची भुतं हाकून दिली आणि उमाचं पत्र काढून ती वाचूं लागली, उमानं लिहिलं होतं-

*मी आता थेटरात तमाशा करीत नाही. तमाशा ही मैदानी कला आहे. ती कनातीत कोंडून वाढणार नाही, म्हणून मी तमाशा मैदानात करीत आहे. परंतु आमच्या फडात एकोपा नाही. चंद्राचं आणि माझं पटत नाही. तिच्या वर्तनात यत्किंचितही बदल होत नाही. तरीही मला तूर्त हा फड सोडता येत नाही. कारण मला माझा स्वत:चा फड उभा करायचा आहे. तमासगिरानं मानानं जगावं, हे मत चंद्रा मानीत नाही. या एकाच गोष्टीवरून आमचं दुमत आहे. ती उत्कृष्ट कलावंत असूनही फुकट जात आहे. तिचं वागणं बेबंद असतं. उथळपणा नि चंचल वृत्तीला तुलनाच नाही. त्यामुळं तिचं तेज वाढत नाही. मी अंधारात चाचपडत आहे. तुझा बोलबाला ऐकून मन डोंगराएवढं उंच होतं. असो.*

*तुला एकदा भेटावं असं मनात येतं, पण खरं म्हणजे भेट होत नाही तेच ठीक आहे. कारण मी दुखवलेलं तुझं मन आता खुनशी बनलं आहे. ते मला पाहताच सूडाचाच विचार करणार; आणि तू माझ्यावर सूड घेऊ नये म्हणून मी दूरदूर आलो आहे. आईला नमस्कार सांग. परसूमामा, गंगूमामा — या सर्वांना माझा नमस्कार सांग. तुला काय सांगू. ते कळत नाही.*

*तुझा वैरी – उमा*

हे पत्र वाचून तिनं पानं फिरवून पाहिली. तिला तो मजकूर अपूर्ण वाटला, म्हणून सर्वत्र नजर फिरवून ती निराश झाली. पत्रात उमानं आपला पत्ताही लिहिला नव्हता. त्यामुळं ती बेचैन झाली.

दुसऱ्या दिवशी बाबालाल आला तो बडबडतच – "गेला चंदूलाल, कोणत्या तुरुंगात नेला त्याला कोण जाणे! त्याचं पत्र येईल तेव्हाच त्याचा पत्ता लागेल. मग मीच जाऊन त्याची भेट घेईन. माझी तर खात्री झाली की ही संसाराची विस्कटलेली घडी पुन्हा बसणार नाही. तो सुटून येईपर्यंत मी जगेन असं मला नाही वाटत..."

त्याची ती बडबड ऐकून वैजयंताला राग आला. परत ही पीडा का आली असं वाटून ती म्हणाली,

"शेट, का आला होता तुम्ही?" तेव्हा थोडा विचार करून बाबालाल म्हणाला,

"त्यानं तुझी फार फार वाट पाहिली, आणि तो फार निराश झाला. तरी पण जाताना तो मला सांगून गेला आहे, की वैजयंताला मदत करा. पैसे द्या. तिची काळजी घ्या. मी नक्कीच तिला भेटणार आहे..."

बाबालालच्या या शब्दांनी तिला इंगळ्या डसल्यासारखं झालं. ती म्हणाली, "मला मदत करणारा तो कोण? त्याला म्हणावं, प्रथम आपल्या त्या दुर्दैवी बायकांची काळजी घे. माझी चिंताच करू नको!"

वैजयंताच्या या बोलण्यानं बाबालालचं मन भलतंच दुखावलं. तो एकाएकी वैतागून म्हणाला, "तू कोणतीही गोष्ट ऐकूनच घेत नाहीस याचा अर्थ काय? का मला कसलंच समाधान लाभू नये, अशी तुझी इच्छा आहे? खरं आहे! तू तरी काय करशील! आमचंच दैव उलटलं आहे, म्हणूनच तुझ्यासारखीला देवपण आलं आहे!" असं म्हणून त्यानं स्वत:च्या तोंडात फडाफड मारून घेतलं. रागानं थरथर कापत तो उठला आणि चालू लागला. अगदी वेड्यासारखा तो निघून गेला.

बाबालाल गेल्यानंतर वैजयंताच्या मनावर इतका वेळ पडलेलं दडपण हलकं झालं. तिच्या मनात नाना विचार थैमान घालीत उठले. ती मनात म्हणाली, 'हा चंदूलाल टळत नाही हाच याचा अर्थ. माझ्यामुळंच त्यांचं वाटोळं झालं असं त्यांना वाटत आहे, पण ते मूर्ख आहेत. काहीही वाटू दे त्यांना! मी त्याला भीत नाही. पण... पण तो तुरुंगात राहूनही माझी पाठ सोडणार नाही – दहा वर्षं त्याच्या नावाचं भूत माझ्या काळजावर सारखं थैमान घालीत राहणार की काय? आणि काय नेम सांगावा? दहा वर्षांपूर्वीच तो कदाचित तुरुंगातून मुक्त होऊन येईल! पण जरी दहा वर्षांनंतर आला तरीही तो येईल तेव्हा पशूच होऊन येईल!'

या विचारानं ती दचकली आणि स्वत:शीच म्हणाली, 'काय मेली पीडाच

झाली ही!'

सतत दोन वेळा बाबालाल येऊन जे बोलला, ते गजरानं ऐकलं होतं. परंतु त्या बाबतीत ती काहीच बोलली नव्हती, याचं वैजयंताला नवल वाटलं होतं. शेवटी तिनं गजराबाईला विचारलंच – "आई, माझ्यामागं ही काय पीडा लागली आहे? नि तू खुशाल ऐकून घेतेस, याचं नाव काय? बोलत का नाहीस तू?"

"वजू, तू बोललीस तेच बरोबर होतं!" गजरा म्हणाली. "मी आणिक काय बोलू? पण मी म्हणते, तू इतकी भ्यालीस का? अग, तो तुरुंगात आहे. त्याची दहा वर्षं भरायची आहेत..."

"पण तो कधीतरी सुटणार ना?" वैजयंता आवेगानं मध्येच म्हणाली. "मला आताची भीती नाही ग आई, मला उद्याची भीती वाटू लागली आहे! उद्या म्हणजे दहा वर्षांनं काय होणार माझं? तो हलकट आहे–"

"वैजयंता, आपण तमासगीर आहोत." गजरा म्हणाली. "अग, आपण उद्याची काळजी करू नये. जर तमाशात नाचायचं, तर उद्याची चिंता करू नये. तो 'उद्या' आपला तमासगिरांचा नाही! जाते ती घडी आपली. दहा वर्षांत काय होईल, कोणी सांगावं? रोवलेला दगड एका जागी रहात नाही. मग या दहा वर्षांत आपण कुठं असू कोण जाणे!"

"मला बाई त्याची भीतीच वाटते!" वैजयंता पुटपुटली.

"काही कारण नाही भ्यायचं!" असं म्हणून गजराबाई उठून दारात जाऊन परत येत म्हणाली, "मी त्या जोतीला पाठचा भाऊ समजून विनवलं. त्यानं ऐकलं असतं तर तुझं लग्न झालं असतं. तुला धनी मिळाला असता. आज तू तमाशात दिसलीच नसतीस. पण नशीब फुटकं. ते जमलं नाही. त्यात उमा दुबळा निपजला. त्याचा लहानपणी तुझ्यावर जीव होता. तो मनावर घेऊन लग्न करील, असं मला वाटत होतं. पण त्यानं ऐकलं नाही. आणि तोही सारं सोडून तमाशात गेला. तुला नाकारून तो त्या चंद्राच्या जाळ्यात पडला. जर त्यानं लग्न केलं असतं, तर आता तुला चंदूलालचा विचार करीत बसायची पाळी आलीच नसती!"

गजराच्या त्या शब्दांनी पुन्हा वैजयंताच्या मनात पाचर मारली. उमानं गैर केलं. जर त्याचं प्रेम खरं असतं, तर तो चंद्राच्या फडात गेलाच नसता! आईबापाचं न ऐकता त्यानं आपला हात हाती घेतला असता. मग मात्र आपण सुखी झालो असतो. परंतु उमाचं प्रेम ढोंगी होतं, म्हणूनच त्यानं एका लहानशा गोष्टीकरता आपल्याला ही जबर शिक्षा दिली आणि आता पत्र लिहीत आहे, तेही एक ढोंगच आहे. नाहीतर त्यानं आपला पत्ता लिहिला असता किंवा एखादे वेळी येऊन भेटून गेला असता. त्याला आपली प्रीत उमजलीच नाही!

आणि मी मात्र फसले. संपूर्ण फसले. चुकले आणि स्वत:ला मुकले!

## ११

तुरुंगाच्या त्या भिंती कणखर उभ्या होत्या. त्यामुळे मानवी शक्तीचा अवखळपणा कुंठित झाला होता. त्या भिंतींच्या वेढ्यात वातावरण दमगीर झालं होतं. प्रचंड दरवाजापुढे सशस्त्र शिपाई संगीन लावलेली बंदूक रोखून पहारा करीत होता. आतल्या बाजूला निखाऱ्याप्रमाणे डोळे असलेला क्रूर माणूस कैद्याच्या वेषात उभा होता. तो वॉर्डर होता. त्याचा धिप्पाड देह त्या तुरुंगाच्या मोठेपणात भरच घालीत होता. दारातून आत गेलं, की एक मनोरा दिसत होता. त्या उंच मनोऱ्यावर एक प्रचंड घंटा लटकत होती आणि त्या घंटेचे दोर धरून दोन कैदी गंभीरपणे बसले होते.

तिथं उद्वेगानं, क्रौर्यानं, अविचारानं पछाडलेली माणसं विचित्र हालचाल करीत होती. या जगात जीवन जगताना मानसिक विकृतीनं पांगळी झालेली मनं तिथं दहशतीच्या जबर रुळाखाली दडपली जात होती.

तिथं आलेले ते कैदी एके काळी माणसंच होते. पण मानवी नियम, नैतिक नियंत्रणं त्यांनी अमान्य केली, म्हणूनच ते बंदिस्त होऊन त्या भिंतीआड चरफडत होते. बाहेरच्या जगात कोणी शील तर कोणी सोनं व कोणी प्राण तर कोणी वहाण जे सापडलं ते चोरलं होतं. म्हणूनच त्यांना त्या भेसूर जगात येऊन चिंता, अगतिकता यांच्या डोहात बुडावं लागलं होतं.

त्यात कित्येक नवखे होते, तर कित्येक निर्ढावलेले होते. ते गात होते, हसत होते, दिवसभर कष्ट करून रात्री निवाऱ्याला येत होते. तासातासाला त्या मनोऱ्यावर ती प्रचंड घंटा घणघणत होती. ते ठोके ऐकून ती माणसं आपल्या मुक्तीचे क्षण मोजीत होती. कोणी रात्री दचकत होती, कोणी साफ खचली होती. काही मृत्यूची वाट पहात होती. परंतु ती माणसं होती - नव्हे, माणसातील भयंकर असे नमुने होती.

पाखरांप्रमाणे स्वैर भ्रमण करणारा चंदूलाल आता त्या दगडी पिंजऱ्यात कोंडला गेला होता. ऊठ, बस, गिनती, बेडी, बंद, कष्ट नि जरब यांच्या वरवंट्याखाली त्याचं मन पिचून निघत होतं. एक एक क्षण डोंगराएवढा येऊन हत्तीप्रमाणे हळूच जात होता. इतका हळू मार्ग क्रमणारा सूर्य त्यानं पूर्वी कधीच पाहिला नव्हता.

चंदूलाल रोज रोज दिवस मोजीत होता. गेले किती आणि उरले किती याची वजावट करून उरलेल्या दिवसांची ती प्रचंड संख्या पाहून मनातल्या मनात रडत होता. आतासे अवघे चार महिने गेले होते. अजून नऊ वर्षं आठ महिने भविष्यकाळाच्या उदरात होते. आपली दहा वर्षे पुरी होऊन आपण सुटू, या गोष्टीवर त्याचा विश्वासच बसत नव्हता. ती नऊ वर्षं आठ महिन्यांची संख्या त्याच्या मस्तकात निराशेचं वावटळच उठवीत होती. पण काही वर्षं माफी मिळेल, असं तो स्वतःला सांगून धीर देत होता. बुडत्याला काडीचा

आधार होतो, तद्वत 'काही वर्ष माफी' या शब्दावर तो पटकन उडी मारून बसत होता.

गेल्या चार महिन्यात चंदूलालला बाबालालची दोन पत्रं आली होती आणि दोन वेळ बाबालाल येऊन भेटून गेला होता. त्या दोन पत्रांनी नि भेटीनं एक एक भयंकर प्रकार त्याच्यापुढं येऊन चंदूलाल विरघळला होता.

त्याची पहिली बायको आजारीच होती. तिच्या दोन बरगड्या निकामी झाल्या होत्या. धाकटी बायको माहेरीच होती नि लौकरच ती दुसरा घरोबा करणार होती. बाबालालचा धंदा पार बसला होता. खानदेशची थिएटरं बंद पडली होती. मुंबईचं थिएटरही वैजयंतानं तिथली बारी बंद केल्यामुळं जवळजवळ बंद पडल्यासारखंच झालं होतं. एकूण सगळ्या बाजूंनी बाबालाल पेचात आला होता. त्याला जगणं मुष्किल झालं होतं.

या सगळ्या बातम्या ऐकून चंदूलालचं काळीज मात्र फाटत होतं. त्याचं मन खंगत होतं. परंतु याच सुमाराल खुंदलापूरचा दत्तू सवाखंडे तुरुंगात आला नि त्यानं पहिल्याच दिवशी चंदूलालचं मन वेदनामुक्त केलं. आबा पाटलाचा हाडवैरी म्हणून चंदूनं त्याच्याशी दोस्ती केली होती; आणि तरुण, देखणा, दुर्दैवी प्राणी म्हणून दत्तूच्या मनात चंदूलालविषयी सहानुभूती निर्माण झाली होती. ते दोघे एकाच बराकीत रहात होते. त्या दोघांनी एकमेकांच्या जीवनकथा परस्परांना ऐकविल्या होत्या.

दत्तू सवाखंडे हा खुंदलापूरचा एक वीरपुरुष होता. त्याचं आणि आबा पाटलाचं मोठं वैर होतं. गावात दोन फळ्या पडून वैर वाढत होतं. रोज मारामाऱ्या होत होत्या. आबा पाटील धमालाचा कर्ता होता, तर दत्तू सवाखंडे हा निम्म्या गावाचा पुढारी होता. सर्व सवाखंडे दत्तूच्या पाठीशी खडे होते. किंचित आगळीक होताच कुऱ्हाडी उठत होत्या. मुडदे पडत होते. अशाच एका मारामारीत दत्तूनं आबा पाटलाच्या फळीचा एक गडी कुऱ्हाडीने ज़बर जखमी केला होता. या गुन्ह्यात दत्तूला सहा महिन्यांची सजा झाली होती.

दत्तू हा मोठा ऐटबाज गडी होता, तो तरुण होता, तसाच देखणाही होता. शिवाय त्याचा दराराही मोठा होता. पूर्वी कित्येक वेळा मारामारी करून तो या तुरुंगात येऊन गेला होता. सर्व अधिकारी त्याला वरमत होते. काही वॉर्डर खुंदलापूरच्या आसपासचे असल्यामुळे ते दत्तूला मान देत असत नि तो जेलरप्रमाणे कित्येक कैद्यांचे मुजरे घेत, शिक्षा भोगीत होता.

ज्या दिवशी दत्तू तुरुंगात आला, त्या दिवशी चंदूलाल रेड्याप्रमाणे मोट ओढीत होता. त्या सक्त कामानं त्याची हाडं पिचत होती. परंतु आल्या आल्या दत्तूनं त्याची बदली करून घेतली होती. आपल्या मानेवरचं शिवळ दूर करणारा हा बहाद्दर जन्मभर आपल्या बरोबर रहावा, असं चंदूलालला वाटत होतं. एकदा चंदूलाल त्याला म्हणालाही होता,

"दत्तू, तू शिक्षा संपल्यावर जाणार?"

"जाणार म्हणजे? जाणारच!"

"मला वाटतं, तू माझी शिक्षा पुरी होईपर्यंत जाऊच नये! एकाच वेळी दोघे जाऊ!" चंदूलाल रडवा चेहरा करून म्हणाला होता; आणि त्यावेळी दत्तूनं पटकन उत्तर दिलं होतं,

"दोस्त, तू चिंता करू नकोस. येत्या नऊ वर्षात अठरा वेळा मी या तुरुंगात येणार आहे!" यावर ते दोघेही हसले होते.

वैजयंता नावाच्या एका देखण्या नाचणाऱ्या बाईसाठी खून करून आलेला म्हणून दत्तूला चंदूलालची दया येत होती. त्याचा तापट स्वभाव, चिंतातुर मन:स्थिती आणि वैजयंताविषयीची अपार ओढ हे दत्तूच्या लक्षात आलं होतं. म्हणूनच तो चंदूलालशी सलोख्यानं वागत होता.

एका रात्री ते दोघेच जागत होते. रात्र निम्मी झाली होती. चंद्र खिडकीत आला होता. बाहेर पहारेकरी उभ्या उभ्या डुलक्या घेत होते. सर्वत्र भेसूर शांतता नांदत होती. कैद्यांचं घोरणं, बडबडणं, तोंडाची मचमच, खाजवण्याची खरखर, झोपेत किंचाळणं यानं वातावरण क्षणभर हेलकावे घेत होतं नि मग पुन्हा शांत होत होतं.

मध्यरात्र झाली. मनोऱ्यावरच्या घंटेनं बारा टोले देताच, 'सर्व ऑल बेल' अशी हाक दूर गेली. दत्तूनं ती शांतपणे ऐकून म्हटलं, "तुला झोप येत नाही?"

"नाही. फार थोडी. कधी कधी तर मुळीच नाही!" चंदूलाल म्हणाला.

"मग ऐक!" दत्तू म्हणाला. "भरपूर झोप घे. नाहीतर दहा महिन्यातच मरशील."

त्यावर चंदूलाल काहीच बोलला नाही. दत्तूनं घोंगडं अंगावर घेतलं तसा चंदूलाल म्हणाला, "तू झोपू नको, आपण बोलत बसू या."

दुसऱ्या दिवशी सकाळीच बाबालाल भेटीला येणार होता, त्यामुळे चंदूलाल आतुर झाला होता. हुरहूर लागून त्याची झोप उडाली होती. उद्या कदाचित दोन्हीही बायका येतील, असं त्याला वाटत होतं. कारण त्यानं त्या दोघींना पत्रं लिहिली होती आणि जर त्या उद्या आल्या नाहीत तर . . . पुढील कल्पना त्याला सहनच होत नव्हती.

"ए - तू एकट्यानं तो खून केलास?" दत्तूनं विचारताच चंदूलाल भानावर येऊन म्हणाला,

"नाही, आम्ही सात जण होतो!"

"मग वाईट केलंस!"

"परंतु तो भयंकर माणूस होता!"

"हो. पण तू मिळवलंस काय?"

"काहीच नाही!" चंदूलाल निराश होऊन म्हणाला. "ते सारं मी वैजयंतासाठी केलं." यावेळी त्याचा आवाज बोंदकरल्यासारखा निघाला. त्याच्या घशाला कोरड पडली होती.

"ती वैजयंता कशी आहे?"

"फारच देखणी आहे!" असं म्हणून चंदूलालनं समोर दिसणाऱ्या पूर्ण चंद्राकडे डोळे रोखले नि निःश्वास कोंडून ठेवीत तो पुन्हा म्हणाला, "ती या चंद्रासारखी दिसते. त्या चंद्रावर तो डाग तरी दिसतो. पण ती स्वच्छ आहे. मला तिचं वेडच लागलं! तिच्या अहंकारानं माझं मन इरेला पडून तो खून मी केला."

"ती इतकी देखणी असेल, तर आबा पाटील तिला मुळीच सोडणार नाही!" दत्तू आत्मविश्वासानं म्हणाला. "आबाची करणी मला माहीत आहे. त्या चंद्रासारख्या वैजयंताला तो कोटाच्या खिशात कोंबून बसणार, हा माझा कयास मुळीच चुकणार नाही. परंतु मला तुझी दया येते. तू नाहक बरबाद झालास. नखाच्या कामाला तू कुऱ्हाड चालवून स्वत: नष्ट झालास!"

"मला समजलं नाही!" चंदू चमकून म्हणाला, तेव्हा दत्तू हसला. म्हणाला,

"तू वेड पांघरू नको नि भोळा होऊ नको!"

"दत्तू, मला गरीब समजू नको. मी एका प्रबल माणसाचा खून केला आहे!" चंदूलाल तीक्ष्ण स्वरात उत्तरला. त्याच्या धारदार सुरानं दत्तू चमकला. तो गर्रकन वळून म्हणाला,

"मी म्हणतो, त्या कामासाठी खुनाची गरजच काय होती? कोणत्या वस्तूला किती किंमत द्यावी हा सरळ व्यवहारच, चंदूलाल, तुला समजला नाही. म्हणून -"

"मग तू मला हे सांग, तू जर माझ्याजागी असतास तर तू काय केलं असतंस?" चंदूलालनं 'काय केलं असतंस' या शब्दांवर जोर दिला आणि दत्तू म्हणाला,

"ऐक! जर तुझ्याजागी मी असतो, तर एकाच दिवसात ती वैजयंता काबीज केली असती, नाहीतर सवाखंड्याच्या अवलादीचं नाव सांगितलं नसतं!" असं म्हणून त्यानं मिशीला हात लावून हळूच तिला पीळ भरला. त्यावेळी त्याचा सारा अहंकार जागा झाला होता. त्याचा आवाज कडा पडावा तसा गडगडला. चंदूलालचा स्वाभिमान डिवचला गेला. तो दत्तूकडे पहात म्हणाला,

"दत्तू, मला पाहून कित्येकांची गाळण उडत होती. ते जाऊ दे. तिनं तुला झिडकारलं असतं, तर तू काय केलं असतंस ते सांग!-"

"ते काय सांगायचं? मी फार बायका पाहिल्या आहेत. जी बाई फार देखणी असते, ती घमेंडखोर असते. अशी बाई पोरकट माणसावर फिदा होत नाही, कारण ती स्वत:वर फिदा असते. आणि खरं सांगू? ती ज्या पुरुषावर फिदा होते त्याची ती जन्माची होते. हलकट माणूस तिला आवडत नाही? तिला दिलदार माणसं पसंत पडतात!"

"अरे बाबा, हे तत्त्व मला सांगू नको. तू म्हणतोस त्याच जातीची ती बाई आहे. पण तू काय केलं असतंस ते सांग ना -"

"मी? जर मी तुझ्या जागी असतो आणि जर तिनं मला झिडकारलं असतं, तर मी

ती मूर्ख खुनाखुनी केली नसती नि नाहक बुडालो नसतो. मी खसकन तिचं नाकच कापून टाकलं असतं, आणि त्यानं मला दहा वर्षांची शिक्षा मुळीच झाली नसती. घर बुडालं नसतं. फक्त वर्षभरासाठी इथं आलो असतो. मात्र एका सपाट्यात ती जन्मातून उठली असती. तिचं देखणेपण धुळीला मिळालं असतं आणि माझ्या अपमानाचं घोर प्रायश्चित्त तिला जन्मभर भोगावं लागलं असतं. म्हणून मी म्हणतो तुझा व्यवहार चुकला -''

''परंतु नाक कापून प्रश्न निकालात निघतो कसा?'' चंदूलाल म्हणाला. तेव्हा दत्तूला त्वेष चढला. तो खेकसला, ''चंदूलाल, तुला माझं मत पटणार नाही. ते कर्म करायला हृदयात दगड असावा लागतो. नाक कापून तू जर आला असतास, तर एका वर्षात परत गेला असतास नि ती देखणी जन्मभर विद्रूप होऊन जळत जगली असती. हे तुला नाही कळणार, कारण तुम्ही मुंबईचे सुरेवाले दळभद्रे - तुम्ही पाठीमागून सुरे मारणार! समोर जाऊन कपाळात कुऱ्हाड घालण्याची हिमत ही मुंबईला पिकत नाही! अरे, आता ती पूर्वीपेक्षा दिमाखात नांदत असेल हे खरं नाही का? आणि तू पूर्वीपेक्षा अधिक बरबाद झालास! यांत कोण हरलं? कोणाचा पराभव झाला! सांग ना -''

दत्तूच्या या जळजळीत भडिमारानं चंदूलाल बेचैन झाला. त्याच्या अंतरातील जखम एकदम वहावू लागली. त्यानं कबूल केलं, की आपलं चुकलं. वैजयंता आज सुखात आहे नि आपण घोर दुःख भोगत आहोत. खरंच, जर आपण तिचं खसकन नाक कापलं असतं, तर दहा वर्षं मोजण्याची पाळीच आली नसती.

तो काहीच बोलत नाही असं पाहून दत्तू पुन्हा म्हणाला, ''नीज आता. नाहीतर लौकर मरशील नि तुझा धूर कैलासावर जाईल!'' असं म्हणून त्यानं अंग टाकलं.

दत्तूचं खरं, आपलं चुकलं, जंगीचा खून करून आपण चूक केली, या विचारानं चंदूलाल वेडावला. त्यानं एकदम उठून खिडकीच्या गजांना मिठी मारली. त्याच स्थितीत त्याच्या डोळ्यांदेखत चंद्रास्त होऊन सूर्योदय झाला.

सकाळी ठरल्याप्रमाणे बाबालाल भेटीला आला तेव्हा चंदूलाल आवेगानं त्याच्या गळ्यात पडला. कितीतरी वेळ त्या दोघांच्या कंठातून शब्दच उमटत नव्हता. त्यांची भारावलेली मनं हलकी झाली तेव्हा ते बोलू लागले. आता काय ऐकायला मिळणार, या विचारानं चंदूलाल हादरला होता; तोच आबालालच म्हणाला, ''एकंदरीत आपलं वाईट झालं. थोरली सून दोन घडीची सोबतीण आहे आणि धाकटी सूनबाई दुसरा नवरा करण्याच्या तयारीत आहे. पंचांनी तिला तशी संमती दिली आहे. मी तिला आडकाठी कशी करू?''

या शब्दांनी चंदूलालच्या मस्तकात आग पेटली. दुःख, संताप यांनी त्याच्या हृदयात कल्लोळ झाला. मोठ्या कष्टानं त्यानं ते सारं दुःख दाबण्याचा प्रयत्न केला. पण डोळ्यांनी त्याला दगा दिला. ते नकळत भरून वाहू लागले.

"आता रडून काय होणार?" बाबालाल त्याच्या पाठीवरून हात फिरवीत सद्गदित होऊन म्हणाला, "त्या हलकट बाईच्या पायी तू हा सर्वनाश करून घेतलास. आता धीरानं दिवस काढ. नाहीतर मरून . . . ."

"हे सारं ऐकून मला जगण्याची इच्छाच होत नाही! कशाला जगू? दहा वर्षांनं येऊन काय करू? काय खाऊ? का येऊन भीक मागू?" चंदूलाल रडू लागला. भविष्यकाळ त्याला अंधकारमय दिसू लागला होता.

"तसं म्हणू नको!" बाबालाल त्याला धीर देत म्हणाला. "हिंमत सोडून चालणार नाही. तू बायकोला पत्र लिहून कळव. ती तुझं ऐकून दुसरा नवरा करणार नाही!"

"खोटं! बाबा, मी कोणत्या तोंडानं तसं तिला सांगू? ती मुळीच माझं ऐकणार नाही. आयुष्यात बायकोचं नातंच मी पाळलं नाही. मग तिनं माझं का ऐकावं?"

मग कितीतरी वेळ कोणीच बोललं नाही. एकाएकी चंदूलालनं विचारलं, "वैजयंता कुठं आहे?"

"मुंबईतच आहे. तिचे हजारो धंदे चालू आहेत. तमाशाही करते." बाबालाल बोलू लागला. "ती काय चालीची बाई आहे? आबा पाटील रोज येत असतो. परसू आहेच. परवा उमाचा म्हातारा जोती भेटला होता. तो म्हणत होता, वैजयंता परसूशी लग्न करणार आहे. आपणाला काय करायचं? ती मसणात जाऊ दे. मात्र भयंकर बाई! आमचं संपूर्ण वाटोळं केलं तिनं..."

"खरं आहे!" चंदूलालच्या काळजात कालवाकालव झाली. तो भकास दृष्टीनं बापाकडे पाहू लागला, तेव्हा बाबालालनं हळूच शंभराशंभराच्या दोन नोटा त्याच्या मुठीत कोंबल्या.

"खरंच, वैजयंतानं वाटोळं केलं!" चंदू उद्गारला. त्यानं दोनशे रुपये मुठीत घट्ट आवळून धरले.

"काय करणार याचं?" म्हाताऱ्यानं विचारलं.

"काही नाही; उगीच आधार!"

"असूं दे. पण चंदा, आता धंदा बसला!"

"नका!" चंदूलाल ओरडला. "मला काही सांगू नका! नाहीतर मी प्राणच गमावून बसेन! नाही ऐकवत ते मला -"

"नको नको! मी काहीच सांगणार नाही!" विस्तवानं हात पोळावा तसा झटकन पलटा घेत बाबालाल म्हणाला, "आनंदात रहा. मी दर महिन्याला येईन. मला यावंच लागेल!"

भेट संपली आणि चंदूलाल वॉर्डमध्ये आला, तेव्हा दत्तू पत्र वाचत बसला होता. तो चंदूकडे पाहून हसला.

"काय झाली भेट?"

"हो. झाली की?"

"काही विशेष घडलं?"

"काही नाही. पत्र कुणाचं ते?"

"माझ्या घरचं. वाच की!"

चंदूलाल दत्तूचं पत्र वाचू लागला छ

*- इकडे सर्व मंडळी बरी आहेत. काळजी नसावी. या वर्षी आम्ही आपली सवाखंड्यांची वेगळी जत्रा भरवणार आहो. तशी तयारीही केली आहे. या वर्षी खुंदलापुरात दोन जत्रा. दोन तमाशे. म्हणजे भलताच रंग भरणार आहे. आम्ही आपल्या जत्रंकरता उमा-चंद्राचा तमाशा नक्की केलाय, सुपारीही दिली आहे. आबा पाटलानं धमालांच्या जत्रेसाठी वैजयंताला सुपारी दिली असून ती येणार आहे. जत्रा आता दीड महिन्यावर आली असून तुमची शिक्षा एक महिना उरली आहे. तुम्ही आला की, आम्ही तुमची जंगी मिरवणूक काढायचा विचार केला आहे.*

पत्र नि वैजयंताचा त्यांतील उल्लेख वाचून चंदूलालनं लांबलचक नि:श्वास टाकला.

"काय? कसं वाटलं? मी म्हटलं ते खोटं नाही! तो आबा पाटील तिला सोडणार नाही!" असं म्हणून मिस्किल हसत दत्तूनं चंदूलालला टोचणी दिली. त्यामुळे तो फारच अस्वस्थ झाला. तो काहीच बोलला नाही.

दुसऱ्या दिवशी रात्री चंदूलाल उदास होऊन बसला होता. एक बायको मरणार, दुसरी लग्न करणार, वैजयंता खुंदलापूरला जाणार! मी पराभूत झालो आणि ती विजयी झाली. नव्हे, मी मेलो नि ती जगली - अमर झाली! या विचारांचे भुंगे त्याचं काळीज कुरतडत होते. त्याला झोप येत नव्हती. जवळच दत्तू अंगावर कांबळं घेऊन पडला होता. तो जागाच होता. तो चंदूलालचा विचार करीत होता. याला वैजयंताचं भलतंच वेड आहे. हा जर आता मोकळा झाला, तर नक्कीच तिचा घात करील. वैजयंताचा तमाशा उभा राहण्यापूर्वी जर हा खुंदलापूरला आला आणि याला थोडा आधार दिला तर हा वाटेल तो अविचार करील. मी म्हणतो तसं जर यानं तिचं नाक खसकन कापलं तर . . . सर्व धमालांची तोंडं काळी होतील. त्यांची बेअब्रू होईल. नव्हे - जत्रा फक्त आमची सवाखंड्यांचीच भरेल. मात्र हा चंदूलाल जत्रेपूर्वी खुंदलापुरात दाखल झाला पाहिजे. हा तुरुंगातून सुटला की, वैजयंताला ठेवणार नाही.

एवढ्यात चंदूलाल दत्तूला धरून गदगदा हालवीत म्हणाला, "दत्तू, उठ ना, मला झोप येत नाही!"

"बरं, काय म्हणणं आहे? हं, सांगा." दत्तू उठून बसत म्हणाला.

"जर मी आता मोकळा झालो, तर तिला ठारच मारीन; नाहीतर तिचं खसकन नाकच

कापीन!''

''तर मग मी तुला मोकळा करतो!'' दत्तू म्हणाला. ''फक्त शंभर रुपये आणि मनाची तयारी करून ठेव. बाकी सर्व मी पाहीन. तू फक्त निघायचं!''

''मी दोनशे रुपये नि मनाची तयारी करून बसलो आहे. मला खुंदलापूरला जावंसं वाटतंय -''

''शाबास!'' दत्तू म्हणाला. ''तू खरा बहाद्दर आहेस. आता नीज. मी सारं करतो.''

''काय करणार तू?'' चंदूलालनं हताश होऊन विचारलं. तेव्हा दबक्या आवाजात दत्तू बोलला,

''माझ्यावर विश्वास ठेव. मी तुला मुक्त करतो!''

हे ऐकून चंदूलालचं मन उसळून उठलं. ते पाखराप्रमाणे गगनात भरारी मारू लागलं. ते खुंदलापूर! तो आबा पाटील! आणि ती वैजयंता! आपली मुक्ती जवळ आली या कल्पनेनंच तो बेभान झाला. दत्तूच्या दंडाला धरून तो म्हणाला, ''तू बोलतोस ते सर्व खरं का?''

''खरं म्हणजे खरं!'' दत्तू नाक फेंदारून म्हणाला. ''ही सवाखंड्याची अवलाद खोटं बोलणार नाही!''

''मग दे वचन!'' चंदूलालनं हात पुढे केला.

''हे घे!'' दत्तू त्याचा हात हातात घेऊन म्हणाला. ''आणि ऐक, खुंदलापुरात तुझ्या जन्मभर जगण्याची जबाबदारीही मी घेतो.''

''बस्, बस्! एवढंच कर. इथं मरण्यापेक्षा बाहेर मरू दे. मला समाधानानं मोकळ्या जागेत मरू दे!'' असं म्हणून चंदूलालनं दत्तूचे पाय धरले. त्याच्या मनावरचं ओझं नाहीसं झालं. तो फक्त सुटकेचाच विचार करू लागला.

आणि पंधराव्या दिवशी दत्तूच्या सुटकेचा हुकूम आला, तेव्हा त्याला गगन ठेंगणं वाटलं. पण त्याच वेळी चंदूलालवर आकाश कोसळलं. तो लहान मुलाप्रमाणे रडू लागला, तेव्हा दत्तू म्हणाला,

''चंदूलाल, घाबरू नको. मी सर्व तयारी केली आहे. आमची जत्रा भरण्यापूर्वी पंधरा दिवस तू सुटणार -''

''परंतु कसा दत्तू?'' चंदूलाल ओरडला.

''ओरडू नको!'' दत्तू म्हणाला. ''तो ढेकणेमामा हवालदार आहे ना, तो त्या दिवशी तुला बाहेर फैलावर जंगलात लांकडं तोडायला चल म्हणेल; तेव्हा तू तयारीत पैसे घेऊन बाहेर जा आणि ढेकणे सांगेल तसा वाग. सुटका होताच खुंदलापूर गाठ. खुंदलापूर येथून पन्नास मैल आहे. रोज रात्री दहा मैल मजल मार. दिवसा प्रवास करू नको आणि रस्त्यानं चालायचं नाही. डोंगरांतून यायचं. तेवढा खुंदलापूरला ये, मग मी आहे -''

"पण खुंदलापुरात कुठं येऊ?" चंदूलालनं कापऱ्या सुरात प्रश्न केला.

"गावदरीला माझा मळा आहे. समोर दोनच फर्लांगावर आबा पाटलाचा मळा आहे. तिथं जाऊ नको. त्याच्या विहिरीवर नारळाची दोन झाडं आहेत हे लक्षात ठेव. माझ्या मळ्यात मोठं आंब्याचं झाड आहे. तिथं ये." असं सांगून दत्तू म्हणाला, "खुंदलापुरापर्यंत सापडू नको."

त्या रात्री ते दोघे बराच वेळ बोलत बसले. पुन्हा एकदा दत्तूनं चंदूला सर्व योजना नीट समजावून दिली.

दुसऱ्या दिवशी दत्तू निघून गेला, परंतु चंदूलालच्या हृदयात प्रखरशा हुरहुरीची पाचर मारून गेला.

तो दिवस केव्हा येणार! आपण केव्हा सुटणार! खुंदलापूर कसं असेल! तिथं वैजयंता येणार नि आपण तिचं नाक खसकन कापणार या एकाच विचाराचं त्याला विलक्षण वेड लागून राहिलं.

## १२

दत्तू गेल्या दिवसापासून चंदूलाल खरोखरच वेडावला होता. नऊ वर्षांचा हिशेब सोडून तो त्या अमावास्येचाच विचार करीत होता. पण ती कधी येणार याचा त्याला काहीच पत्ता लागत नव्हता. हुरहूर क्षणाक्षणाला वाढत होती. त्याला त्या तुरुंगाची चीड आली होती.

त्या भयंकर विवंचनेत पंधरा दिवस भर्रकन निघून गेले आणि तो त्याचा मुक्तिदिन येऊन ठेपला. त्या सकाळीच ठरल्याप्रमाणे तो ढेकणेमामा बराकीपुढं येऊन म्हणाला, "ए, तुला बाहेर फैलावर जायची वर्दी आहे. चल - आणि ऐक, तयारीत चल!"

चंदूलाल दोनशे रुपये बरोबर घेऊन बाहेर पडला. त्या दिवशी तो फार अस्वस्थ झाला होता. खुंदलापूर त्याच्या डोकीत नाचत होतं. सूडाच्या कल्पनेनं तो बेभान झाला होता. सर्व शक्ती एकवटून तो लाकडं तोडीत होता.

सूर्य आज वेगानं जात आहे, असं त्याला वाटत होतं. ढेकणे एका झाडाखाली बसला होता. तो चंदूलालकडे पहात होता. दिवस वरता फिरताच त्यानं चंदूलालला जवळ येण्याची खूण केली. तो जवळ येताच त्यानं हात पसरला तेव्हा चंदूलालनं गुमान दोन नोटा त्याच्या हातात दिल्या. त्या घेऊन ढेकणे म्हणाला, "आता जाते वेळी फैलातून मागं रहा."

"आणि काय करू?" असं चंदूलालनं विचारताच ढेकणेनं डोळे वटारले आणि

चंदूलालचं तोंड बंद होताच मोठी जांभई दिली. चंदूलाल नंतर काहीच बोलला नाही. तो मुकाट आपल्या जागेवर जाऊन लाकडं तोडू लागला.

संध्याकाळ झाली आणि ढेकणेमामाचा फैल परत फिरला. ठरल्याप्रमाणे चंदूलाल मागं राहून जंगलातून खुंदलापूरकडे तोंड करून भर वेगात निघाला.

काही वेळानं फैल दरवाज्याजवळ आला, तेव्हा एक पहारेकरी ढेकणेमामाला म्हणाला, ''मामा, एक कैदी कमी आहे!''

त्याला मध्येच अडवीत ढेकणे हळूच म्हणाला, ''आता बोंबलू नको, नाहीतर कैदी गेला नि नोकरीही त्याच्या मागं जाईल! फैल पहिल्या गेटातून आत कोंब नि मग बोंब ठोक. चल!''

''पण गिनती होईल ना?'' पहारेकरी चिरकला आणि ढेकणे म्हणाला,

''अरे चल तू -''

''मामा, कैदी बाराऐवजी अकराच आहेत!''

''असू दे. त्या अकराव्यातच बारावा आहे. एक कैदी डबल आहे!'' असं म्हणून ढेकणे लष्करी ऐटीत पुढं झाला आणि बिनबोभाट त्याचा फैल पहिल्या गेटातून आत शिरला. पहिल्या गेटात बारा नोंदवून ढेकणेनं अंग झटकून टाकलं.

थोडा वेळ गेला. कैदी बंद होऊ लागले, तेव्हा एकाएकी पहारेकरी ओरडला, ''कैदी फरारी!''

कैदी फरारी! कैदी फरारी! अशी सर्वत्र बोंब उसळली. क्षणात हलकल्लोळ माजला. पहारेकरी धावत सुटले. हत्यारी शिपाई सज्ज झाले. सैनिकी मोटारी पळत निघाल्या. शहराकडे फोन गेले. शहरी पोलीस नाक्यावर उभे राहिले. सर्व वाटा रोखा, असा हुकूम निघाला.

तासातासाला वाजणारी ती प्रचंड घंटा अखंड वाजू लागली. तुरुंगाच्या इमारतीवर प्रचंड लाल दिवा पेटला. वातावरण भेदरलं. सारा तुरुंग थरारला.

आणि 'वैजयंता खटल्यातील प्रमुख आरोपी चंदूलाल फरारी!' असा मजकूर वर्तमानपत्रासाठी मुद्रित होऊ लागला.

त्यावेळी चंदूलाल तुरुंगापासून सात मैलांपेक्षा पुढे निघाला होता. काळ्या गडद अंधारानं त्याच्यावर कृपाछत्र धरलं होतं. त्यानं हमरस्ते सोडले होते नि तो आडमार्गानं चालत होता, नव्हे पळत होता. त्याचा तो भयंकर मार्ग कीर्र झाडीतून त्याला घेऊन जात होता. आता तो कशालाच भीत नव्हता. फक्त त्याला माणसाची भीती वाटत होती. तो ज्या वाटेनं चालला होता, ती वाट एक डोंगराच्या पायथ्याला घासून गेली होती. डाव्या बाजूला ती डोंगरांची रांग उभी होती, त्यामुळं चंदूलाल निर्धास्त होता. तो अवघा डोंगर त्याला सुलभ नि सुखकारक वाटत होता.

त्या रात्री तो अविश्रांत चालला. त्यानं बारा मैल पूर्ण करून समोर पाहिलं तसा तो भयचकित झाला नि खट्कन थांबला.

पूर्वेला प्रकाश मोहरत होता. तेजोमय रंगानं क्षितिजाची किनार शोभिवंत होत होती. निळ्या रंगाच्या तलम वस्त्राला गडद गुलाबी किनार जोडावी तसा तो देखावा भासत होता. त्या रंगात प्राण आला होता. मध्येच पोलादी पट्टा उमटून तो उजाळलेल्या तरवारीप्रमाणे दिसत होता. निळ्या रंगाच्या त्या विशाल पार्श्वभूमीवर त्या अनंत रंगांच्या गर्दीतून एक महान शक्ती उदय पावत होती. जणू त्या तेजाळ रंगाच्या गालिच्यांच्या पायघड्या तुडवीत रविराज अवतीर्ण होत होता. त्या आल्हाददायी वातावरणात चैतन्य खेळत होतं. पाखरं भराऱ्या मारीत होती. ती गात होती, नाचत होती.

आणि चंदूलालच्या उरात धडकी भरली होती. निसर्गाचं ते दिव्य स्वरूप पाहून तो भयभीत झाला होता. त्याला रात्र, अंधार, निर्जनता हवी होती. साऱ्या जगाला सुखकारक वाटणारा तो अरुणोदय चंदूलालला भीतिदायक वाटला आणि तो एखाद्या लांडग्याप्रमाणे शेजारच्या डोंगरात शिरला.

रात्रभर तो निर्भय होता, परंतु सूर्योदय होताच त्याच्या काळजानं ठाव सोडला. संकटाचा त्याला साक्षात्कार झाला. तुरुंगातील ते जीवन सरळ नि सोपं होतं, असं त्याला वाटू लागलं. कारागृहापेक्षा हे बाहेरचं जीवन कठीण आणि दाहक आहे, याची त्याला आजच प्रथम कल्पना आली.

दिवसभर तो त्या डोंगरात बसला होता. तो हूं का चूं करीत नव्हता. त्याच्या डोकीवरच एक उंबर पिकला होता. त्याची उंबरं त्याच्या अंगावर पडत होती आणि ती तो उचलून खात होता.

अगदी जीव मुठीत घेऊन चंदूलालनं तो दिवस डोंगरात काढला. दिवस मावळून अंधार पडताच तो उठून चालू लागला. त्याबरोबरच त्याचे विचारही चालू लागले.

आपण चूक केली. वैजयंतासाठी संसाराची राखरांगोळी करून घेतली. दत्तूचं म्हणणं खरं आहे. जंगीच्या खुनाची गरज नव्हती. उगीच ती दारू घेतली नि तो बलात्काराचा कट केला. खरं म्हणजे तो जंगी सरळ होता. पण आपण विनाकारण त्याच्या पोटात चाकू खुपसला. तेव्हा तो किती मोठ्यानं ओरडला!

इतक्यात त्याच्या पुढ्यात काहीतरी सळसळलं. तसा तो गांगरला. त्याला दरदरून घाम फुटला. त्याची बोबडी वळली. पण लगेच एक रानडुक्कर धडपडत दरडीनं वर गेलेलं त्याला दिसलं, तेव्हा आपण उगाच भ्यालो असं म्हणून तो हसला आणि चालू लागला. आता कसलाही विचार मनात आणायचा नाही, असा त्यानं मनात निश्चय केला.

परंतु विचार त्याची पाठ सोडत नव्हते.

विचार न करून तरी कसं भागेल? आता खुंदलापुरात तर गेलंच पाहिजे. तिथं ती

वैजयंता येणार आहे. तिचं नाक कापूनच आपण या दु:खातून मुक्त होऊ शकतो. पण तेही कसं शक्य आहे? आपण तिचं नाक कापलं आणि दत्तूनं आपल्याला आश्रय दिला, तरी उघडपणे या जगात आपल्याला कसं वावरता येणार? सरकार स्वस्थ बसणार नाही. ते पिच्छा करणारच...

करीना? आता भय नाही. पुढं जे व्हायचं ते होऊ दे. आता थांबता येणार नाही. एकदा तिचा नक्षा उतरला म्हणजे मग मरण जरी आलं तरी हरकत नाही.

असं म्हणत चंदूलाल पळत होता. मैलच्या मैल अंतर कापीत तो पूर्वेकडे धाव घेत होता. दिवस उगवला, की एखाद्या पशूप्रमाणे खबदाडीत शिरून देह दडवायचा आणि काळोख पडताच रस्ता काटायचा, असा त्याच्या जीवनाचा क्रम होऊन तो खुंदलापूरच्या समीप येत होता.

तो जसजसा पुढं सरकत होता तसतसा संपूर्ण बदलत होता. क्रूर-अतिक्रूर दिसत होता. पौष महिन्याच्या कडक थंडीनं त्याचं अंग तडकून त्याला भेगा पडल्या होत्या. त्या भेगा उन्हानं तडकून रक्ताळल्या होत्या. त्याच्या ओठांचं धिरडं झालं होतं. त्यातून रक्त गळत होतं. दाढीचे खुंट भलतेच वाढले होते. त्याच्या देहाचा हा भयानक कायापालट त्याच्या डोळ्यांदेखत होत होता. भीतीनं त्याचा चेहरा ओढला होता. डोळे तांबारले होते नि तो विद्रूप झाला होता. पण त्याला याचा पत्ता नव्हता. कारण तो वेडा झाला होता. देहभान विसरून तो पळत होता.

दहाव्या दिवशी भर मध्यान्ह रात्री तो खुंदलापूरच्या शेजारी येऊन दाखल झाला. मग त्यानं गती वाढवली, डोंगर सोडला नि सडक धरली. परंतु आपण कुठं आहो याचा त्याला पत्ता नव्हता. कुणाला विचारण्याची सोय नव्हती.

चांदणं सर्वत्र दुधासारखं पडलं होतं. चंद्र डोकीवर आला होता. दूर एक गाव दिसत होता. चांदण्यात घरावरचे पत्रे लखलखत होते.

चंदूलाल सडकेनं निघाला होता. पुढं एका ठिकाणी पुष्कळ गाडीवान गाड्या सोडून विश्रांती घेत होते. त्यापैकी एकानं चंदूलालला पाहिलं.

"कोण गाव?" तो गाडीवान पडूनच म्हणाला.

"नांदलापूर -" चंदूलाल चालत चालत उत्तरला आणि गाडीवान केकाटला, "आवं पावणं, नांदलापूरची वाट मागं ऱ्हायली! राव, तुमी वाट चुकला की -"

"मग ही वाट कुठं जाती हो?" चंदूलालनं मुद्दाम विचारलं, तेव्हा गाडीवान म्हणाला, "ही वाट सरळ खुंदलापुरात गेलीया -"

"मग बरं झालं!" चंदूलाल म्हणाला, "मला खुंदलापूरला जायचं आहे."

"मग सरळ नाकाच्यासमोर जावा!" असं म्हणून गाडीवान अंगावर घोंगडं घेऊन पुन्हा आडवा झाला.

चंदूलाल पुढं निघाला. आता त्याचा वेग पुन्हा वाढला होता. खुंदलापूर समोर दिसत होतं. अचानक त्याला तो गाडीवान भेटून त्यानं मार्ग दाखवला होता. आज दहा दिवसात चंदूलाल प्रथमच बोलला होता; त्यामुळं त्याचे ओठ तडकून रक्त वहात होतं. पण त्याकडे त्याचं लक्ष नव्हतं. तो खुंदलापूर पहात होता.

मध्यान्ह रात्र उलटली, तेव्हा चंदूलाल खुंदलापूरच्या गावदरीला आला होता. आकाशात चंद्र कलता झाला होता. त्या कलत्या चंद्राच्या प्रकाशात आबा पाटलाच्या मळ्यातील ती नारळीची दोन झाडं गगनात झुकांड्या मारीत होती. त्यांना पाहून चंदूलाल हर्षभरित झाला. लगेच त्यानं पलीकडं पाहिलं, तेव्हा त्याला दत्तूच्या मळ्यातील प्रचंड आंबा दिसला. तशी त्यानं दौड मारली.

अगदी मळ्याजवळ जाताच चंदूलालनं विचार केला, कुणी परका माणूस भेटला तर घात होईल. दत्तूच भेटला पाहिजे. आपण फरारी आहोत हे जर दुसऱ्याला समजलं, तर ते आबा पाटलाच्या कानापर्यंत जाईल आणि ज्या कामासाठी आपण इथवर आलो ते पार पडण्यापूर्वीच पुन्हा बंदी व्हावं लागेल. असं म्हणून तो खाली बसला आणि सरपटत निघाला. मग तो पोटाने सरपटत त्या आंब्याच्या झाडाखाली आला तेव्हा पहाट झाली होती. कोंबडे आरवत होते, जाती घरघरत होती, लोक जागे होत होते.

दत्तूचे बैल दावणीत उठून उभे राहिले होते. त्यांच्या गळ्यातील घंटा गुणगुणू लागल्या होत्या.

चंदूलाल कानोसा घेत होता. दत्तूचा आवाज ऐकण्यासाठी त्याचा आत्मा आतुर झाला होता. इतक्यात दत्तूचा मोठा कुत्रा हळूच आला आणि त्यानं चंदूलालवर एकदम झडप घातली. कुत्र्यानं त्याचा लचका तोडला, त्यासरशी चंदूलालनं एकदम गर्रकन फिरून त्याची मान पकडली आणि सर्व शक्ती एकवटून एक जोरदार बुक्की मारली. कुत्रं पळत मांडवात गेलं पण भुंकलं नाही. त्या दणक्यानं त्याचा आवाजच बंद झाला होता.

कुत्रं पळत आलं नि भुंकत नाही, हे लक्षात येताच दत्तूचा गडी कुम्या घाबरला. तो उठून हळूच दत्तूजवळ जाऊन त्याला उठवून म्हणाला, "दादा, उठा, मळ्यात कोनतरी शिरलंय!"

"कुत्रं कुठं आहे?" दत्तूनं पडूनच विचारलं.

"कुत्रं हाय. त्ये पळंत आलं - पर भुंकंना!" कुम्या उत्तरला.

"भुंकंना?" दत्तूला नवल वाटलं. तो उठला आणि त्यानं कुऱ्हाडीचा दांडा ठोकून विचारलं, "कोणत्या बाजूनं कुत्रं पळत आलं?"

"आंब्याच्या बाजूनं."

कुऱ्हाड सरळ धरून दत्तू आंब्याकडे गेला. त्याचेपुढं चंदूलाल बसला होता.

"कोण आहेस तू?" दत्तूनं कुऱ्हाड उगारून विचारताच चंदूलालनं तो आवाज

ओळखला.

"दत्ताजी - मी आहे चंदूलाल -"

"चंदूलाल? आलास?" दत्तूनं त्याला मिठी मारली. "बरं झालं आलास! मी तुझी वाटच पहात होतो. तू जत्रेपूर्वी आलास हे एक बरं झालं. चल -"

मग ते दोघे दारातील मांडवात आले, तेव्हा कुम्याच्या जीवात जीव आला. ते कुत्रं शेपटी घोळीत जवळ आलं. दत्तू म्हणाला, "कुम्या, मक्याची कणसं भाज नि हा पाव्हणा इथं आहे हे कुणाला सांगू नको, नाहीतर ठार मारीन! जा. पळ -"

कुम्यान कणसं भाजली. ती चंदूलालनं पोटभर खाल्ली आणि पाणी पिऊन तो म्हणाला, "आता मला झोप आली आहे."

"आता आठ दिवस निर्धास्त झोप काढ! -" दत्तू म्हणाला. "चल घरात."

चंदूलाल खुंदलापुरात आल्यानं चंदूलालपेक्षा दत्तूलाच शतपटीनं आनंद झाला होता. आपण आता निश्चित आबा पाटलावर मात करू. हा चंदूलाल त्या वैजयंताचं वाटोळं करील नि त्याबरोबर आबाच्या लौकिकाची राख होईल. आता धमालांचा पराभव आपल्या घरात आराम करीत आहे, असं मनात म्हणतच तो गावात गेला.

दुसऱ्या दिवशी दत्तूनं चंदूलालला सांगितलं, "तू आता दाढी करू नकोस. वाढू दे ती. आणि पटका, धोतर नि पैरण असा पोषाख कर म्हणजे तुला कोणी ओळखणार नाही!"

त्या दिवसापासून चंदूलालचा पुन्हा कायापालट झाला. कल्हई रंगाचा पटका, भरदार पैरण, पिवळं पहिलवानी चालीचं पंजी, खांद्यावर घोंगडं अशा थाटात तो त्या मळ्यात राहून वैजयंताची वाट पाहू लागला.

## १३

खुंदलापूरची ती जत्रा आता उद्यावर येऊन ठेपली होती. गावात वातावरण तंग झालं होतं. मातबर धमाल आणि जबर सवाखंडे यांनी कडेकोट बंदोबस्त केला होता. कित्येक दिवसांची त्यांच्या मनातली तेढ उद्या रणात येणार होती, म्हणून दोन्हीकडची माणसं धुंद झाली होती. ती झुंजेच्या बैलांप्रमाणे चालत होती.

गावाबाहेर एक चिंचेचं बन होतं. त्या बनात त्या गावच्या देवाचं - खुंदलूबाचं देऊळ होतं. आज त्या बनात शेकडो दुकानदारांनी आपली पालं मांडली होती. बत्ताशांच्या पाट्या आणि चुरमुऱ्यांची पोती येऊन दाखल झाली होती. पलीकडे लाकडी पाळणा उभारला गेला होता.

देवळाशेजारीच शाळा होती. त्या शाळेत प्रचंड पोलीसदल घेऊन स्वत: फौजदार उतरले होते. समोरच्या ओसरीत बंदुकीचं बुचाडं लावून एक हत्यारी पोलीस पहारा करीत होता.

उमा-चंद्राचा तमाशा अजून न आल्यानं सवाखंडे मंडळी कष्टी दिसत होती. परंतु धमाल मंडळी खुषीत होती. कारण त्यांचा तमाशा नि प्रख्यात वैजयंता येऊन पोहोचली होती. त्यामुळं आबा पाटलाचं प्रचंड डोकं जणू गगनालाच घासत होतं.

वैजयंता आली होती. तिला देवळापासून अवघ्या चार फर्लांगावर आबा पाटलानं आपल्या मळ्यात उतरवली होती. अगदी गावदरीलाच तो मळा होता. नवं घर, निवांत जागा - दोन दिवस वैजयंतानं आनंदात रहावं म्हणून आबानं मुद्दाम तशी व्यवस्था केली होती. शिवाय तसं करण्यात त्याचा दुसरा एक हेतू होता, की आपलं वैभव पाहून वैजयंताचे डोळेच दिपावेत.

त्या मळ्यात खरंच आबाचं वैभव होतं. त्यानं नुकतंच एक चिरेबंदी घर बांधलं होतं. त्या घरासमोर स्वच्छ पाण्याची विहीर होती, त्या विहिरीजवळच उंचच्या उंच नारळीची दोन झाडं गगनाला भिडली होती. जणू आबाच्या दौलतीच्या त्या दोन पताकाच तळपत होत्या. विहिरीपासून दूरपर्यंत पाटानं कण्हेरीचे ताटवेच्या ताटवे लावले होते. ते आता फुलून दरवळत होते. दारापुढंच हिरवा चाफा फुलला होता. त्याचा सुगंध वातावरणात, एकरूप झाला होता. घरापुढं थोडं अंगण होतं. त्या अंगणालाच आबाचा उंसाचा फड येऊन भिडला होता.

आबाचा हेतू अगदी सफल झाला होता. सूर्य मावळण्यापूर्वीच वैजयंता त्या मळ्यात आली होती, तेव्हापासून ती हर्षभरित झाली होती. आबाच्या सामर्थ्याचं नि दौलतीचं ती क्षणोक्षणी कौतुक करीत होती.

आबानं त्या घरात दुसरीही तयारी केली होती. सर्व तमासगिरांचा सैपाक तिथंच होणार होता. चहा, दूध, पाणी, विडीकाडी, पानसुपारी, दारू कोणतीच वस्तू नाही असं म्हणायची पाळी येऊ नये, म्हणून त्यानं खबरदारी घेतली होती. सर्व व्यवस्था नीट पहाण्यासाठी केरू धमाल या म्हाताऱ्याची खास नेमणूक केली होती. वैजयंतासाठी खास एक गाडी आणली होती आणि दारात एक कोरीव माचा टाकला होता.

वैजयंता मळ्यात आल्याची बातमी समजताच आबाच्या फळीची मोठमोठी माणसं देवळात जाण्याचं निमित्त करून मळ्यात येऊन जात होती.

कडूसं पडत होतं. दारात माच्यावर वैजयंता बसली होती. वातावरण कसं शांत शांत होतं. मंद वारे अनेक फुलांचा सुगंध घेऊन तिच्यावर उधळून जात होते. त्या मादक सुगंधानं ती धुंद झाली होती.

त्याच वेळी घरात परसू, गंगू, पुनाजी, हरी ही मंडळी गाद्यांवर लोळत होती नि तो

थाट पाहून दचकत होती. त्या सर्वांना आबाची भीतीच वाटू लागली होती. कारण 'पैसा कुरीनं पेरीन, पण वैजयंताला खुंदलापूरला नेईन' ही आबाची घोर प्रतिज्ञा त्यांच्या आठवणीत होती.

हळूहळू अंधार पडला आणि खुंदलापूर त्यात बुडालं. हिरव्या रंगाची गर्द झाडी अंधारात एकरूप झाली. वातावरणात भेसूरता आली नि ते ओसाड भासू लागले.

थोड्या वेळानं चंद्र झाडाला लागावा तसा त्या झाडीतून हळूच वर आला आणि वातावरण पुन्हा हसलं. नाटकाचा पडदा पडून देखावा बदलावा तसं घडलं.

त्या मधल्या काळोखात दत्तू सवाखंडे आणि चंदूलाल हे दोघे पूर्वेकडून त्या उसात शिरले आणि कोल्ह्याप्रमाणे अंगणाला भिडले, याचा कुणालाच पत्ता नव्हता. ते दोघे उसाच्या सावलीत कुंपणाआड बसून समोर पहात होते नि ऐकत होते. चंद्रप्रकाशात अंगणातील सर्व काही त्यांना स्पष्ट दिसत होतं. मात्र ते दोघं कुणालाच दिसत नव्हते.

अंगणात माच्यावर वैजयंता बसली होती. ती शुभ्र पातळ नेसली होती. तिला पाहून चंदूलाल भान हरपून विचार करीत होता. उद्या येऊन काय करायचं, कसं करायचं हे विसरून तो वेड्यासारखा तिला पोटभर पहात होता. ती त्याला आज कित्येक दिवसांनी दिसत होती.

उद्या चंदूनं कोणत्या वाटेनं यावं, कुठं दडावं, संधी साधून वैजयंतावर कशी झडप घालावी व आपलं कार्य उरकून पुन्हा कसं परत फिरावं हे सर्व समजावून देण्यासाठीच दत्तूनं त्याला तिथं आणला होता; आणि आता तो त्याचाच विचार करीत होता. पण चंदूलालचं लक्षच उडालं होतं.

ते दोघे त्या उसातून वैजयंताकडे पहात होते. त्यांचे चार डोळे निखाऱ्याप्रमाणे वैजयंतावर रोखले होते.

थोड्या वेळानं परसू बाहेर आला. नंतर वैजयंता व परसू दोघं बोलत बसली. जुना तमाशा व तमासगीर या विषयावर परसू बोलत होता आणि वैजयंता ऐकत होती.

एके काळी या महाराष्ट्रात तमाशा नि जनता यांचे संबंध निराळे होते. कोणत्याही गावात जाऊन तमासगीर पाटलाकडे हजेरी लावीत असत नि तो पाटील लगेच त्यांना शिधा म्हणून धान्य देत असे. मग गावात तमाशा आल्याची दवंडी देऊनच लोकांना जमवीत असे.

सारा गाव तमाशा पाहून संतुष्ट होई आणि तमासगिरांना इनाम देई. काही गावं तर आपल्या गावच्या तमासगिराला बैता पोसावा तसा पोशीत असत. म्हणजे जनता तमासगिरांना जिवंत ठेवी आणि तमासगीर तमाशाला जिवंत ठेवीत.

परंतु अलीकडे तमाशाला कंत्राटदारांनी कनातीत कोंडला असून तो चवचाल प्रेक्षकांसाठीच केला जात असे. कंत्राटदार सांगेल तसा तमाशा करूनच तमाशा मरू

लागला आहे. हा कलाप्रकार मैदानी आहे. तो मैदानातच वाढतो. म्हणून आपण थेटरं सोडली ते ठीक केलं.

ती दोघं बोलत आहेत, इतक्यात आबा पाटील आपली बडीबडी मंडळी घेऊन मळ्यात आला. एकाएकी अंगण भरलं. ती आलेली माणसं आबाच्या फळीची इरसाल माणसं होती. तशीच ती गबर नि शौकीनही होती.

सर्व मंडळी शांतपणे बसली. वैजयंता माच्यावर बसली होती. तिच्या शेजारी आबा पाटील बसला. त्यानं प्रथम सोय कशी काय याची चौकशी केली, तेव्हा सर्व काही ठीक आहे, असा कृतज्ञतेचा भाव तिच्या चेहऱ्यावर उमटला नि पदराची चाळवाचाळव करून ती नीट बसली.

चंद्राच्या प्रकाशात उजळलेली ती वैजयंता पाहून आलेली माणसं गुंग झाली, डोळे भरून तिच्याकडे फक्त पहात राहिली. बोलण्याचं कुणालाच सुचत नव्हतं.

सदोपंत कुलकर्ण्यानं काळजीच्या स्वरात प्रश्न केला, ''प्रकृती वगैरे सर्व ठीक आहे ना?'' त्यावर वैजयंतानं फक्त गोड हास्य करीत होकारार्थी मान डोलवली, तशा सर्व माना एकदम डोलू लागल्या.

ही मंडळी मोठी बिलंदर आहे; हे वैजयंताच्या लक्षात यायला उशीर लागला नाही. ती सर्वांकडे गोड हसून त्यांच्यावर जादू करू लागली. तशी ती मंडळी बावचळून गेली.

सदोपंत हा गावचा कुलकर्णी होता. त्याचं वय निम्मं झालं होतं. पण त्याचा आत्मा चवचाल होता व तो बोलण्यात भलताच बेरकी होता.

नामा तेली हा अंगापिंडानं गावात मोठा म्हणून मान्यता पावला होता. त्याची मोठी जमीन होती. हा भारी तमाशाशौकीन होता, पण अबोल होता.

सावळा धनगर हा सव्वा खंडी मेंढरांचा धनी होता. हाणामारीत तो भलताच हुशार होता. म्हणूनच आबा पाटलानं त्याला जवळ केला होता.

नाथा पाटील हा काळीचा पाटील होता. हा आबाचा उजवा हात होता.

सुभाना गुरव हा देवाचा मानाचा गुरव होता, तर वीरमल गुजर हा श्रीमंत असून गाण्याचा नादी होता. अशी ती माणसं वैजयंताला पाहून चकित झाली होती. पण सदोपंत मात्र चढाई करीत होता. तो उशिराने पुन्हा म्हणाला,

''तुमच्या प्रकृतीची चौकशी एवढ्यासाठी, की या दोन दिवसात आम्ही तुम्हांवर मोठा भार घालणार आहोत -'' असं म्हणून त्यानं सर्वांच्या तोंडाकडे पाहिलं, तेव्हा ते सर्व चकित होऊन सदोपंतांकडे पहात होते. मात्र आबा पाटील अस्वस्थ झाला होता. कुलकर्ण्याच्या बोलण्यातील पेच त्याच्या लक्षात आला होता, त्यामुळं त्याच्या भुवया चढउतार करीत होत्या.

इतक्यात सुभाना गुरव बोलता झाला, ''म्हंजी असं - ते ओझं तुमच्यावर पडणार

हाय - ते तुम्ही झेपलं पायजी -''

गुरवाच्या बोलानं पाटील पुन्हा चमकला. तोच सदोपंत खाकरून म्हणाला, ''म्हणजे वैजयंता, असं की दोन दिवस आम्ही तुम्हाला विश्रांतीच घेऊ देणार नाही -''

'' - म्हंजी तुमच्यावर दांडगा भार पडणार!'' नामा तेल्यानं सदोपंतांचं वाक्य पूर्ण होऊ दिलं नाही. तो मध्येच फुसफुसला.

''आरं सारंच उलटं का बोलताय?'' आबा पाटील किंचित बिथरून म्हणाला, तेव्हा सदोपंत म्हणाला,

''म्हणजे वैजयंता, आम्ही असं म्हणतो, की तुला एका मोठ्या तमासगिराशी बारी द्यावी लागणार आहे!'' सदोपंतानं उशीर उलटं चाललेलं बोलणं अखेर पायावर उभं केलं नि डोकीची टोपी काढून पाटलापुढे उपडी ठेवून दिली. पाटलाला हायसं वाटलं.

कितीतरी वेळ दाढेला तंबाखू नि चुना धरून बसलेल्या सावळा धनगरानं सदोपंतांच्या चकचकीत डोकीवरून पलीकडे एक जोरदार पिचकारी मारली. बंदुकीची गोळी चुकवावी तसं मट्‌कन डोकी खाली घालून सदोपंतानं चमकून शेंडीवरून हात फिरवला. डोकं ओलं झालं नाही याची खात्री करून घेऊन त्यानं धनगराकडे निखाऱ्यासारखा कटाक्ष टाकला.

इतक्यात वीरमल गुजर म्हणाला, ''सवाखंडे वात्रट आहेत. त्यांनी तुमच्याशी बारी देण्यासाठी एक मोठा तमासगीर नक्की केला आहे. तो आताच येईल.''

''मोठा म्हंजी दांडगा -'' नाथा पाटील बोलला आणि सावळा धनगर गुडघ्यावर ढोलकीचा ठेका नाचवीत म्हणाला,

''आमच्या पांढरीचं नाव झालं पायजी!''

''कां होणार नाही?'' कुलकर्णी सदोपंत गुरकला. ''काळजी करू नका. वैजयंताचं हे रूप, हे डोळे, ही कांती, ही गंभीर मूर्ती हे सर्व पाहून मी पैज मारून सांगतो - आमचा तमाशा श्रेष्ठ ठरणार! गाजणार -''

परसू, गंगू, पुनाजी ऐकत होते. वैजयंता शांत बसली होती. ती एका वेळी खुद्‌कन हसत होती, तशा मंडळीत उकळ्या फुटत होत्या. गंगू बोलण्यासाठी चुळबूळ करीत होता; परंतु त्याला संधीच सापडत नव्हती.

केरू धमाल चहाची तयारी करीत होता. चहाचं पातेलं चुलीवर ठेवून तो ऐकत होता.

आणि त्याच वेळी उसात दत्तू आणि चंदूलाल दोघे एकूण एक शब्द टिपून घेत होते, याची कुणालाच कल्पना नव्हती.

कितीतरी वेळ त्या गप्पा चालल्या होत्या. सदोपंताला मात्र गप्प बसवत नव्हतं. तो पुन्हा पुन्हा काहीतरी बोलत होता. एवढा शहाणा माणूस - असा एकाएकी बावचळला कशानं याचा पाटील विचार करीत होता.

उशीर वैजयंताकडे पाहून तिला संपूर्ण न्याहाळून पुन्हा सदोपंत म्हणाला, "ऐका मंडळी - ही चंद्रकळा तनुधारिणी आणि वेलीसारखी लवचीक वैजयंता उद्या नक्कीच वावटळ होऊन आमची पागोटी अस्मानात आणि त्या सवाखंड्याचा लौकिक स्वर्गात पोचवणार आहे. यात चूक झाली तर मी आपली ही जीभ कलम करून देईन -" असं म्हणून त्यानं आपल्या जिभेचा शेंडा बाहेर काढून दाखवला. तसा गंगू चटकन पुढं सरकला. सदोपंतापुढं तोंड नेऊन तो म्हणाला,

"बघू तुमची जीभ? एकच हाय का दोन हायत्या सापावाणी?"

यावेळी मात्र वैजयंता मोकळं हसली. बहरलेल्या लतेप्रमाणे तिचं शरीर हिंदकळलं. ती हसतच म्हणाली, "कोण तमासगीर येणार आहे?"

"ते आम्ही काय सांगणार?" आबा पाटील म्हणाला. "बाकी आमचं नाव बुडू देऊ नका. आमास्नी यश मिळवून दे!"

पाटील गंभीर झाला, तसा नामा तेली म्हणाला, "नक्कीच देणार! मी उशीर बघतोय. माझी खात्री झाली, की ही बया तुम्हास्नी जे पायजे ते देणार. काळजी करू नका!"

या बोलानं सर्वांना धक्का बसला. पुन्हा तेल्यानं गुंतागुंत केली नि पाटील बिथरला. पण इतर मंडळींना हुरूप आला. इतकं बोलूनही ही बाई काहीच बोलत नाही, त्या अर्थी ही तशीच आहे, असं वाटून त्यांची डोकी तरकटली.

इतक्यात फौजदार आला. दोन पोलीस त्याच्याबरोबर होते. तो येऊन माच्यावर बसला. "का येणं केलं?" असं विचारतांच फौजदारानं वैजयंताकडे निरखून पाहून म्हटलं,

"एकूण या जत्रेत रणखुंदळच होणार असा रंग दिसू लागला आहे! इथं बंदोबस्त करणं कठीण आहे. सर्वत्र हत्यारं चमकू लागली आहेत. धमालांनी भालेच भाले सज्ज केले आहेत, तर सवाखंड्यांनी कुऱ्हाडीचं पीकच काढलं आहे. तुमच्या आळीला पन्नास भाला नि सवाखंड्याच्या फळीला शंभर कुऱ्हाड तयार आहे -"

फौजदाराचा तो आवाज वैजयंताला ओळखीचा वाटला. पण चेहरा आठवेना म्हणून ती विचारमग्न झाली. इतक्यात आबा पाटील म्हणाला,

"मग तुमचं म्हणणं काय हाय रावसाब?"

"आमचं म्हणणं एवढंच, की तुम्ही दोघांनी उद्या एकमेकांची कातडी काढू नयेत!" फौजदार उत्तरला.

"ते खरं हाय!" पाटील म्हणाला. "पर आम्ही एकमेकांची कातडी काढू म्हणून तुम्ही आम्हा दोघांची कातडी काढू नका म्हंजी झालं!"

आबाचं हे बोलणं ऐकून सर्व मंडळी हसली.

"आत्ताच माझ्याकडे एक हुकूम आला आहे, की धमाल आणि सवाखंडे यांनी

आपापल्या पालख्या देवळात नेऊ नयेत. त्या दोन्ही पालख्या पहिल्या पायरीपासून परत फिरल्याच पाहिजेत.'' असं फौजदारानं सांगितलं तेव्हा आबा ओरडला,

''कबूल-कबूल! पर ह्यो कायदा सवाखंड्यांनीबी पाळला पायजी! जर त्येंची पालखी देवळात गेली, तर दारात रक्ताचं शिंपणंच व्हनार-हो!''

सर्व मंडळी गंभीर झाली. 'रक्ताचं शिंपणं' या शब्दांनी वातावरण तंग झालं. फौजदारानं प्रश्न केला, ''पालखी निघण्यापूर्वी दुसरा कार्यक्रम काय?'

''आदी तमासगिरांची मिरवणूक निघणार-'' आबा पाटील म्हणाला, ''नंतर देवाची पालखी.''

''मी त्या मिरवणुकीला येणार नाही!'' वैजयंता म्हणाली, तेव्हा सर्वांना धक्का बसला. साऱ्यांनी एकदम एकच प्रश्न विचारला,

''का? काय झालं?''

''नाही!'' वैजयंता पुन्हा म्हणाली, ''मी नाही येणार-''

''अग पर आमच्या गावचा त्यो रिवाज हाय!'' पाटील समजावणीच्या सुरात म्हणाला. ''देवाच्या पालखी आदी तमासगिरांची मिरवणूक निघालीच पाहिजे-''

''ते काहीही असो! मी येणार नाही!'' वैजयंता निक्षून म्हणाली. ''पण परसूमामा, गंगूमामा - ही सारी मंडळी येतील. फक्त मी एकटीच येणार नाही!''

''ठीक, ठीक. नका येऊ!'' सर्वांनी अनुमती दिली. सदोपंत म्हणाला,

''काहीतरी खाजगी अडचण असेल. नका येऊ!''

''पर परवा मात्र ही अडचण आडवी येऊ देऊ नका!'' वीरमल गुजरानं कळकळीनं सांगितलं नि सर्व मंडळी जायला निघाली.

फौजदारासह सर्व जण निघून गेले, तेव्हा उसात बसलेल्या चंदूलालनं दीर्घ नि:श्वास टाकून ऊर रिकामं केलं.

''चलू या!'' चंदूलाल म्हणाला.

''जाऊ की - थांब!'' दत्तू उद्गारला.

''फौजदार येऊन गेलाय. पाहील कुणीतरी!'' चंदूलालनं काळजी व्यक्त केली.

''थोडा वेळ ऐकू या-'' दत्तूनं चंदूलालला गप्प केला नि ते दोघे पाहू लागले.

आलेल्या लोकांना वाटेला लावून आबा पाटील परत आला. तो आज वैजयंताबरोबर जेवणार होता. तो माच्यावर बसताना केरूनं एक बाटली आणली. ती घेऊन एक पेला भरून आबानं वैजयंतापुढं धरला. ''हं - घे एवढं!'' तो गुरकला.

''नाही, मी कधीच घेत नाही!'' वैजयंतानं तोंड फिरवीत म्हटलं.

''बरं, नकं घेऊ!'' असं म्हणून आबा पाटलानं तो प्याला एका दमात घशात ओतून घेतला. क्षणात त्याच्या पोटात प्रलय झाला नि लगेच डोळे धुंद झाले. पुन्हा त्यानं दुसरा

प्याला भरून गडप केला.

"तू दारू घेत न्हायीस हे बरं न्हाय!" असं म्हणून तो सरळ झाला, तोच केरूनं ताटं मांडल्याची वर्दी दिली.

जेवणं झाली. पुन्हा आबा आणि वैजयंता बाहेर येऊन माचावर बसली, तेव्हा चांदण्याचा नुसता वर्षाव होत होता. रुपेरी प्रकाशात ती सर्व हिरवीगार झाडी न्हाऊन निघाली होती. समोरच्या नारळीच्या झाडावर शुभ्र प्रकाशाचे थर जमून त्याची मोठमोठी पानं तरवारीप्रमाणे लखलखत होती.

"तो मळा कोणाचा?" वैजयंतानं प्रश्न केला.

"त्यो दत्तू सवाखंड्याचा-"

"कसा आहे तो दत्तू?"

"डांबरट हाय लेकाचा-" आबा गुंगीतच म्हणाला. "परवाच त्यो तुरुंगातनं आला!"

"तुरुंगातून?" वैजयंता चमकली. तुरुंगाचं नाव निघताच तिला चंदूलालची आठवण झाली. क्षणात ती भयचकित होऊन तिनं हळूच त्या उसात पाहिलं. चंदूलाल फरारी झाला आहे - तो उसात येऊन बसल्याचा तिला भास झाला. तिची ती अस्वस्थ मनःस्थिती लक्षात येताच आबा पाटील हसला.

"का? भ्यालीस का?"

"मला भीतीच वाटते! तो चंदूलाल फरारी झाल्याचं ऐकून मला धडकीच भरली आहे!"

"अग पर तुला भ्यायचं कारन काय?"

"तो माझ्या पाठीवर सापासारखा पडला आहे. तो मला कुठंतरी गाठण्याचा नक्कीच प्रयत्न करणार. म्हणून मी त्याला भीत असते. माझ्या मनानं त्याची दहशतच घेतली आहे!" वैजयंता हळू आवाजात म्हणाली. तिच्या स्वरात कंप भरला होता, ओठ थरथरत होते आणि नजर भुईसपाट झाली होती. एकाएकी अंगावर काटा शिरशिरल्यासारखं करीत तिनं वर पाहिलं.

तिची भेदरलेली मूर्ती व आवाजातील कंप लक्षात येऊन आबानं तिच्याकडे पाहिलं तेव्हा ती पुन्हा मान खाली घालून विचारमग्न झाली होती. जणू आपलं भवितव्यच ती पहात होती. त्या वेळी चंद्राचा प्रकाश तिच्यावर पडून ती फुलल्याप्रमाणे दिसत होती. सुंदर स्त्री सुखात तशी दुःखातही सुंदरच दिसते. वैजयंता त्या स्थितीत अधिकच मोहक दिसत होती. तिची ती मंद हालचाल, नाजूक, तरुण नि उन्मादक काया, मानेवरचा विशाल आंबाडा, स्वप्नाळू पाणीदार डोळे पाहून आबाच्या मनाचा तोल गेला. धुंद मन अधिकच बेहोष झालं. त्यानं हळूच तिचा हात हाती घेतला. काहीतरी बोलायचं म्हणून तो घोगऱ्या आवाजात म्हणाला,

"उगीच घाबरू नकं. मी आबा धमाल हाय. गोळी घालीन त्येला!"

तिचा हात त्याच्या हातात होता. तो सोडवून घ्यायचा ती प्रयत्न करीत नव्हती. तिला त्याचं भानच नव्हतं. त्यामुळं आबाच्या हृदयात प्रचंड कोलाहल झाला. त्या मादक स्पर्शानं त्याचं भान हरपलं. त्यानं तिला जवळ ओढण्याचा प्रयत्न केला, तोच समोरून कुणीतरी आलं. तसा आबा पुन्हा भानावर येऊन ओरडला, "कोण हाय?"

"मी पांडू रामोशी-"

"काय रं? काय भानगड?" आबानं विचारलं.

"चावडीवर बोलावणं हाय तुमास्नी!" रामोशी म्हणाला आणि पागोटं काखेत दाबून आबा उठला, तोच रामोशी पुन्हा म्हणाला, "शेवटी उमाचा तमाशा आला-"

'उमाचा तमाशा आला' या शब्दांनी वैजयंता एकदम भानावर आली. ती हर्षभरित होऊन म्हणाली,

"काय? उमा आला?"

"हो, आला. का?" रामोशी उत्तरला.

'उमा आला - उमा आला-' असं लहान मुलाप्रमाणे ओरडत वैजयंता घरात गेली आणि परसू, गंगू, पुनाजी यांना म्हणाली, "मामा, उमा आला. उद्या उमा बारी देणार, उमा-" परत ती अंगणात आली, तेव्हा सर्वच जण दारात आले. तिचं स्वरूप द्विगुणित झालं होतं. साऱ्या जगतातला आनंद तिच्या चेहऱ्यावर ओसंडत होता. ती आबा पाटलाकडे हर्षभरित दृष्टीनं पहात म्हणाली,

"पाटील, मी उद्याचा तमाशा रंगवीन. कधी केला नव्हता असा मी उद्या तमाशा करीन..."

आबा पाटील तिचा तो आनंद पाहून फक्त हसला आणि ढेंगा टाकीत चावडीकडे निघाला.

दत्तूनं दीर्घ निःश्वास टाकला. तो मनात म्हणाला, 'कधी केला नाही असा तू तमाशा करण्यापूर्वीच तुझ्या जन्माचा कधी झाला नाही असा तमाशा होणार आहे, याची तुला काय कल्पना? तू खुशीत गाजरं खात थोडी कळ काढ!'

नंतर तो चंदूलालच्या दंडाला धरून हळूहळू आबा पाटलाच्या उसाबाहेर गेला.

## १४

दत्तू सखाखंडे चंदूलालला घेऊन आपल्या मळ्यात आला तेव्हा कुम्या एकटाच मांडवात बसला होता. त्याला दत्तू म्हणाला, "कुम्या, तमासवाली मंडळी आली आहे. त्यांना

चहाला घेऊन ये. जा - माझं नाव सांग!''

कुम्या चटकन उठून निघाला. त्यालाही चंद्राला पुन्हा पाहायची इच्छा होती. तो किंचित दूर गेला तेव्हा दत्तूनं त्याला थांबवलं - ''ए, कुम्या थांब!''

चंदूलालला तिथंच सोडून दत्तू झपाझप पावलं टाकीत कुम्याकडे गेला आणि दबक्या आवाजात म्हणाला, ''कुम्या, तू तमासवाल्यांना पाहिलंस?''

''हो - मगाशीच!''

''ती बाई कशी आहे?''

''मायंदाळी देखणी हाय ती!''

''मग तिला घेऊन ये. अगदी आलंच पाहिजे म्हणावं! आणि हे पाहा येताना चार बाटल्याही घेऊन ये. त्या गिरजा लोहाराला माझं नाव सांग. जा, पळ लौकर!''

कुम्याला घालवून दत्तू परत मांडवात आला, तेव्हा चंदूलाल दुर्मुखलेला चेहरा करून बसला होता. 'आपण फरारी आहोत - कोणीतरी पाहील आणि आपण पुन्हा तुरुंगात जाऊ' ही भीती तर त्याच्या हृदयात ठाण मांडून बसली होतीच, पण पुढं काय होणार याचा स्पष्ट अंदाज नसल्यामुळं त्याच्या मनाची सारखी घालमेल होत होती.

''आता उगीच विचार करू नका!'' दत्तू शांतपणे म्हणाला. ''तुला मार्ग मोकळा झाला आहे. ज्या वाटेनं आपण आलो त्याच वाटेनं तू उद्या जायचं, नि आपलं कार्य उरकायचं. तू नशीबवान आहेस. ती जणू उद्या तुझी वाटच पहात एकटी बसणार आहे...''

''मग मी नक्की काय करू?'' चंदूलाल मध्येच म्हणाला. ''काय करावं काही सुचत नाही.'' असं म्हणून त्यानं हाताची बोटं मोडली.

''तुझ्या मनाला वाटेल ते कर!'' दत्तू म्हणाला. ''ती एकटी असणार. आणि तिथं असलाच तर तो केरू धमाल असेल. तो तुझ्या आडवा येणार नाही. गपकन घरात शिरून दार बंद करून घे. मग काय होईल - सांगू? तो केरू गावात पळत सुटेल. नंतर तू सावकाशानं बाहेर पडून इथं ये. बस!''

''ती मला उद्या एकटीच सापडणार!'' चंदूलाल स्वत:शीच बोलू लागला. ''आता मी विचारच करीत नाही. जे करायचं ते उद्याच करीन!'' त्याचा आत्मा प्रक्षुब्ध झाला आणि नजर लांडग्याप्रमाणे विलक्षण उग्र झाली. तो असंबद्ध बडबडू लागला. ''- धंदा बसला... बायको नवरा करणार... मी परत तुरुंगात जाणार...''

''चंदूलाल!'' दत्तू खेकसला, ''हे काय? धीर धर. बाकी एवढं खरं, की तुला वेड लावण्याचं सामर्थ्य त्या बाईत निश्चित आहे. नुसती तरवार आहे ती. पण तू फुकट गारद झालास. तुझ्या पदरी काहीच पडलं नाही. आता मात्र पुन्हा वेळ आली आहे. ती दवडू नको. आणि खरं सांगू? मी तुला आपला मित्र मानला आहे - तुझ्याशी मित्रद्रोह करायचा नाही, नाही तर हे कार्य मी स्वत:च केलं असतं. अशा बाईला मांजरानं उंदीर खेळवावा

तशी खेळवली पाहिजे!'' त्यावर चंदूलाल दाढी चोळीत गंभीरपणे म्हणाला,

''दत्ताजी, तू बेफिकीर ऐस, मी उद्या नक्कीच आश्चर्यजनक असं करीन. सर्व जत्रा थक्क होईल. धमालांची गाळण उडेल. तू पाहात राहा -''

नंतर कितीतरी वेळ कोणीच बोललं नाही. थोडा विचार करून दत्तू म्हणाला, ''आता ते तमासगीर इथं येणार आहेत. त्यांना तू ओळख देऊ नको. उमा, चंद्रा आताच येतील. त्यांच्यावर विश्वास ठेवणं बरं नाही, गावात फौजदार आला आहे, तो तू पाहिलासच! तू मांडवातच पडून रहा. नाहीतर उद्याचं कार्य धोक्यात येईल . . .'' असं सांगून दत्तू उठला नि घरात गेला.

चंदूलाल एकटाच मांडवात पडला होता. तो उताणा पडून आकाशात पहात होता. त्याच्यापुढं एक शुभ्र ढग पिंजला जात होता. त्याची नजर त्या ढगाशी खेळत होती. ह्यावेळी त्याचं हृदयही ढगाप्रमाणं पिंजलं जात होतं. तो मनात म्हणत होता, 'हा दत्तू बिलंदर आहे आणि मी कमनशिबी आहे. आता ती चंद्रा, बळी ही ओळखीची माणसं इथं येणार, पण मी त्यांच्यासंग बोलू शकणार नाही. मी त्या तुरुंगाबाहेर असलो, तरी या दत्तूच्या मोठ्या तुरुंगात आहे. त्या तुरुंगापेक्षा हा तुरुंग भयाण आहे.

'आपण म्हणजे एक मढं आहो नि दत्तू एक एक भीतीचा दगड रचून ते गाडीत आहे. लौकरच आपण दृष्टिआड होऊ - आपण फार काळ जगू शकणार नाही. फक्त एकदा ती वैजयंता भेटावी नि आपण तिच्यावर सूड घ्यावा. मग या भयंकर दहशतीच्या रुळाखालून, भीतीच्या दाढेतून मुक्त व्हावं!'

असा विचार करीत चंदूलाल पडला होता. इतक्यात कुम्या दारूच्या बाटल्या घेऊन आला. तमासगीर येत आहेत अशी त्यानं बातमी दिली आणि उमा येत नाही हेही सांगितलं, तेव्हा दत्तूला आनंद झाला. तो मांडवात आला आणि चंदूलालला म्हणाला,

''हे पाहा, ती चंद्रा येत आहे. सावध ऐस! मी तुला इथंच दारू आणून देईन. तू बोलू नको!''

''म्हणजे आता तू सर्वांना दारू पाजणार?'' चंदूलालनं घाबरून विचारलं.

''चंद्रासह सर्वांना भुईसपाट करतो पाहा!'' असं म्हणून दत्तू पुन्हा घरात गेला आणि चंदूलाल तळमळू लागला. तो अस्वस्थ होऊन बसला आणि आता काय काय प्रसंग पाहायला मिळणार याचा विचार करू लागला.-

इतक्यात ती तमाशेवाली मंडळी आली. त्यांच्या आकृत्या पाहून चंदूलालचा आत्मा पेटला. चंद्राला दुरून पाहून त्याचं काळीज उगीचच फाटल्यासारखं झालं. तो आशाळभूत नजरेनं पाहू लागला. तिच्या चालण्यातली चपलता, पदर घेण्याची विलोभनीय तऱ्हा त्याचं लक्ष खेचून घेत होती. पण तिच्या डोळ्यातली गहिरी चंचलता त्याला दिसत नव्हती. चंद्राच्या देहातला कणन्‌कण त्याच्या परिचयाचा होता. त्यामुळं

त्याला तिची जबर ओढ लागली.

ही सर्व माणसं एके काळी त्याच्या थिएटरमध्ये नोकराप्रमाणे वागत होती आणि तो विंगेत बसून त्यांचा तमाशा पहात होता. आज मात्र स्वत:च्या दुर्दैवाला दोष देत चोराप्रमाणे स्वस्थ पडून राहण्याचं त्याच्या नशिबी आलं होतं.

इतक्यात दत्तूनं त्याला एक ग्लासभर दारू आणून दिली आणि तो म्हणाला, ''ही चंद्राही काही कमी नाही. नुसती धवळी नागीण आहे -'' असं म्हणून मुळीच न थांबता लगबगीनं तो परत गेला. चंदूनं दारू पिऊन अंग टाकलं. पुढील सर्व प्रसंग त्याला असह्य झाला.

बाहेर अंधार दाटला होता. चंद्रा गेल्यापासून उमा एकटाच गणू सवाखंड्याच्या माडीवर बसला होता. तो मनात चरफडत होता. चंद्राच्या त्या परिवर्तनाची त्याला चीड आली होती. आल्या आल्या ती दत्तू सवाखंड्याचा चहा प्यायला गेल्यानं तिच्या उथळपणाचा तो विचार करीत होता.

ही दुष्ट बाई दुसऱ्याचा तर नाहीच, पण स्वत:चाही विचार करीत नाही. हिचं पुढं काय होणार! ही किती दिवस अशी स्वैर वागणार! कोण हा दत्तू - त्याची हिची ओळखसुद्धा नाही, फक्त त्याचा निरोप आल्याबरोबर अपरात्री ही चहाला गेली. याचा अर्थ काय?

चंद्रा त्या फडाची स्वामिनी होती. सर्व तमासगीर तिच्या जरबेत होते, ती कुणाचंच ऐकत नव्हती. प्रतिष्ठेनं वागण्याची तिला आच नव्हती. मात्र तमाशा उभा राहिला, की ती उमाच्या शेजारी हिरकणीसारखी शोभत होती आणि तमाशा संपला, की माझी मी मुखत्यार म्हणून वर्तन करीत होती. ती कुठंही जात होती, कोणाशीही सलगी करीत होती, याचाच उमाला राग आला होता. पण त्याची ती पर्वा करीत नव्हती. एवढंच नव्हे, तर तिच्या त्या स्वैरपणाला विरोध करताच ती फणकाऱ्यांना म्हणत होती, 'मला कुणी काबूत ठेवण्याची धडपड करू नये. मी आग आहे!'

उमा आज एकटाच बसला होता. त्याची प्रकृती किंचित ठीक नव्हती. म्हणून तो दत्तूकडे गेला नाही. पण चंद्रा जाताच कुणीतरी त्याला वैजयंता आल्याची बातमी सांगितली होती. त्यामुळे तो अस्वस्थ झाला होता. नकळत त्याचं मन चंद्रा आणि वैजयंता यांची तुलना करू लागलं.

अर्धी रात्र उलटली आणि चंद्रा आली. आली कसली, तिला लोकांनी आणली होती. तिला वस्त्राची शुद्ध नव्हती. केस विस्कटले होते. चेहरा ओढला होता, नि ती धडपडत होती. मात्र ती सारखी रडत होती.

गुलाब, मार्तंडा, बळी वगैरे तमासगीर रोगी कोंबड्याप्रमाणे तिरपडतच वर आले आणि जिथं तिथं गप्प बसून राहिले. धरणीवर अंग टाकण्याचंही त्यांना भान नव्हतं.

दत्तूनं चंद्राला कशीबशी आणून सोडली आणि तोही झुकांड्या घेत निघून गेला. तो सर्व प्रकार पाहून उमाला तर किळस आली. पण तो शांत बसून राहिला. जागचा हलला नाही.

चंद्रा रडत होती, त्यावरून निश्चित आज काही तरी तिच्या मनाविरुद्ध प्रकार घडला असावा, असा त्यानं कयास केला.

इतक्यात ती अंथरुणावरून उठून हळूहळू त्याच्याजवळ येऊन बसली, तरीही उमानं शब्द उच्चारला नाही, तेव्हा ती पदरात तोंड दडवून रडू लागली. शब्दाऐवजी हुंदके उसळू लागले.

मग पुन्हा ती उठून आपल्या अंथरुणावर जाऊन पडली नि तसेच हुंदके देत निजली.

थोड्या वेळानं तिच्या मस्तकातली बधिरता कमी झाली. उरावरचं ओझं दूर झाल्यासारखं वाटलं. पण हृदयातली कळ अधिकच तीव्रतर होऊन ती स्वत:शी बडबडू लागली - "अगदी नादान! आयुष्यात इतका घातकी, रानटी माणूस भेटला नाही. जे भेटले ते लाचार होते. गालावरचं स्मित पहाण्यासाठी ते डोळ्याची पलकं पसरीत होते. शब्द झेलण्यासाठी तोंड पसरीत होते. पण हा माणूस माणूसच नव्हे तो! हलकट-जंगली पशू! त्यानं इतकं गैर... पण आपणच चूक केली. आपण तिथं जाणं टाळलं असतं, तर तो प्रसंग आला नसता... छी: ...

"मेलं सारंच विलक्षण! तो दारात-मांडवात पडलेला माणूस कोण होता कोण जाणे! तो का चरफडत होता? का ओरडत होता? त्याच्या देहाचा डोंब का झाला होता? तो गडबडा लोळत का होता? नि त्यानं आपलं नाव घेऊन हाक का मारली?"

चंद्राला पुढील विचार असह्य झाले. तिच्या मस्तकात तिडीक उठली. ती रात्र तिनं डोळ्यात काढली.

सकाळी उठल्याबरोबर उमानं चंद्राला विचारलं, "रात्री रडत का होतीस?" तेव्हा ती कपाळावर आठी आणीत म्हणाली,

"त्या मेल्यानं रात्री माझ्यावर दरुडा घातला!"

"हे खोटं आहे!" उमा चिडून म्हणाला. "तिजोरी दरोडेखोराच्या दारात घेऊन जायचं नि मग लुटलं म्हणून बोंब ठोकायची. मला हे पटत नाही!"

त्यावर ती ओशाळली आणि काहीतरी बोलणार, इतक्यात दत्तूसह बरीच सवाखंडे मंडळी माडीवर आली. ती सर्व बडी माणसं तमासगिरांची विचारपूस करण्यासाठी आली होती. त्यात दत्तूला पाहून चंद्राला राग आला. त्याला जाब विचारण्याची तिनं तयारी केली. पण...

पण दुसऱ्याच क्षणी नवल घडलं. दत्तूनं भरजरी पातळाची घडी चंद्राच्या पायावर मुद्दाम ठेवली नि तो चोराप्रमाणे दूर झाला. रात्रीचा प्रकार हिनं आता चारचौघांत मांडला, तर आपली बेअब्रू होईल, असं वाटून तो स्वतःची नजर चुकवू लागला. एक म्हातारा सवाखंडे म्हणाला,

''ती वैजयंता आलीया. जत्रा अफाट जमलिया. आज कसूर ठिवू नका बरं -'' आणि लगेच दत्तू नरमून बोलू लागला -

''चंद्रा, राग धरू नको. अन्याय पोटात घे. चुकीवाकीबद्दल क्षमा कर. एखादी गोष्ट आमच्या हातून घडू नये ती घडलीही असेल. पदरात घे, अशी आमची सवाखंड्यांची विनंती आहे.''

हे त्याचं कावेबाज बोलणं फक्त चंद्रा व उमा यांनाच कळत होतं. बाकीची माणसं मुकाट माना डोलावीत होती.

आणि त्याच वेळी दत्तूच्या शब्दांनी पाण्यानं निखारा विझावा तशी चंद्रा थंड पडली. लगेच तिच्या मनातली आग नष्ट झाली. काजळी झडताच ज्योत उंच व्हावी तशी ती प्रफुल्लित दिसू लागली.

आलेली माणसं परत निघाली, तेव्हा चंद्रानं दत्तूला विचारलं, ''तो धडपडणारा माणूस कोण?''

''तो एक आमचा पाव्हणा आहे नि त्याला महारोग जडलाय!'' दत्तू चटकन उत्तरला.

''मग तो माझं नाव का घेत होता?'' चंद्रानं विचारलं.

''त्याला चढली होती!'' असं म्हणून दत्तू घाईघाईनं भरभर पावलं टाकीत निघून गेला. तेव्हा चंद्रा गर्रकन उमाकडे वळली आणि उमा म्हणाला,

''रात्री रडत होतीस-दरुडा घातला म्हणून फिर्याद करीत होतीस नि आता हसतेयंस याचा अर्थ काय?''

''याचा अर्थ असा -'' चंद्रा विजयी मुद्रा करून म्हणाली, ''आता त्यानं क्षमा मागितली. आणि मी काही त्याची गर्दन मारू शकणार नाही! तो गरीबाप्रमाणे बोलला तोच माझा विजय!'' असं म्हणून ती जरीचं पातळ न्याहाळू लागली, तेव्हा उमा भडकून म्हणाला,

''चंद्रा, तुझ्या या वर्तनाची मला किळस येऊ लागली आहे! तू आज कोणत्या बळावर तमाशाचा फड मारणार आहेस? तू दारू पिऊन नंगानाच करणारी बाई वैजयंतावर कशी मात करणार? आज ती वैजयंताच तुझ्यापुढे मैदानात येणार आहे याची तुला कल्पना आहे का?''

''तुम्ही त्याची काळजी करू नका!'' चंद्रा किंचित गर्वानं म्हणाली. ''मी आज तिला झडझडीत उघडी करते. एक माणूस ठेवीत नाही तिच्यापुढे! मात्र कृपा करून

तुम्ही खंबीर असा, तिच्यापायी धीर सोडून माझा कडेलोट करू नका. रंगदेवतेनं तिलाच काही अमर वरदान दिलेलं नाही!''

तो सबंध दिवस उमा कोणाशीच बोलला नाही. पालखी निघून गेल्यावर तमाशा उभा रहाणार आणि वैजयंताशी समोरासमोर बारी देण्याची कठीण पाळी आपल्यावर येणार याचाच तो विचार करीत होता.

गावात तमासगिरांच्या मिरवणुकीची तयारी झाली होती. परगावचे जत्रेकरी आणि गावकरी रस्त्यावर येऊन एकच हलकल्लोळ उसळला होता. सर्वच वाद्यं एकाच वेळी वाजून गाव दणदणत होता. सवाखंडे आणि धमाल रणभैरी होऊन मिरवणुकीतून चालत होते.

पेट्रोमॅक्सच्या बत्त्यांनी रस्ते भरले होते. आबा पाटील नि दत्तू सवाखंडे दोघेही बंदुकी खांद्याला लावून चालत होते. कुऱ्हाडी, भाले यांनी वातावरण उग्र केलं होतं.

त्या मिरवणुकीत फक्त वैजयंता नव्हती.

आणि त्याच वेळी चंदूलाल दत्तूच्या उसात पडला होता. भाकरी खाऊन तो उताणा पडला होता. त्यानं प्रचंड कुऱ्हाड पोटावर घेतली होती. त्याचं लक्ष गावाकडे लागलं होतं, पण गावात काय चाललं आहे, त्याला मुळीच कळत नव्हतं. त्याच्या मस्तकात बधिरता सारखी वाढत होती.

गावात वाद्यांचा जेव्हा प्रचंड गडगडाट झाला, तेव्हा चंदूलाल धडपडून उठला आणि साक्षात मृत्यूप्रमाणे धीरगंभीर पावलं टाकीत निघाला. हातात कुऱ्हाड मजबूत धरून तो सरळ उसात शिरून आबा पाटलाच्या अंगणाजवळ येऊन थांबला. त्यानं चौफेर नजर फिरवून कानोसा घेतला. केरू धमाल दारातील माचावर बसला होता. वैजयंता घरात असावी अशी त्याची खात्री झाली. केरूनं प्रतिकार केला तर त्याला ठार मारायचं-मग तिचं नाक कापण्याऐवजी, ज्या हेतूनं आपण आपला सर्वनाश करून घेतला, तो हेतू सफल करून घ्यायचा-प्रथम तिचा तो तोरा जमीनदोस्त करायचा असा त्यानं मनाशी बेत केला. पतंगाप्रमाणे आपण ज्योतीवर झडपा मारल्या, पण तिनं ती ज्योत विझू दिली नाही; उलट आपलीच पंखं जळून खाक झाली. आता तिचं नाक कापण्यापेक्षा तिला ठारच केलेली बरी; असा विचार करून तो तयार झाला.

आकाश ढगाळलं होतं. चांदण्या भेदरल्याप्रमाणे लुकलुकत होत्या. नारळीची ती दोन झाडे अचल उभी होती. वारा पडला होता. चंदूलालच्या देहाला एक झटका बसला नि त्याला एकाएकी गती प्राप्त झाली. तो भर्रकन घरात शिरला. त्यानं प्रथम दार बंद करून घेतलं नि मग पल्लेदार निःश्वास टाकला.

दार कर्र ऽऽ वाजताच वैजयंतानं वळून पाहिलं नि ती विस्मयचकित झाली. तिनं त्याला ओळखलं नाही. त्याची ती दाढी, तो पटका, तो अवतार हे सर्वच निराळं होतं.

चेहरा किंचित परिचयाचा वाटत होता. पण निश्चित कोण हे आठवत नव्हतं. स्मृतीचं दार बंद होतं. ते उघडत नव्हतं.

"कोण तुम्ही?" तिनं भयचकित होऊन विचारलं, तेव्हा एक पाऊल पुढं टाकून चंदूलाल म्हणाला,

"ते सर्व सांगण्यासाठीच आलो आहे. आता फक्त ऐकण्याची तयारी कर!"

वैजयंतानं तो आवाज ओळखला. तेव्हा तिला भयंकर धक्का बसला. तो अकस्मात आलेला पाहून तिचा चेहरा खर्रकन उतरला. क्षणात ती फटफटीत कापरासारखी दिसू लागली. भयंकर वादळात दिवा सापडावा तशी तिची अवस्था झाली. गात्रं बधिर होऊ लागली. तेव्हा बहिरी ससाण्याला पाहून चिमणीनं उडण्यासाठी मुरावं तशी ती मुरली आणि ती खोली सोडून दुसऱ्या खोलीत पळत गेली; पण ती खोली पहिलीपेक्षा फारच अरुंद होती. पाण्याच्या तळाशी गुदमरावं तशी ती गुदमरली. आपला मृत्यू जवळ आला याबद्दल तिची खात्री झाली.

इतकं स्वतः जपून शेवटी निरर्थक ठरलं. अखेर वणवा येऊन भिडलाच. बंद खोलीत धडपड पांगुळली. देहातील कंप अधिक वाढला.

चंदूलाल बुभुक्षित दृष्टीनं तिच्याकडं पाहत होता. ती ओरडली -

"तू कां आला आहेस?"

"तुला ते कळणार नाही. तूच नीच, घमेंडखोर आहेस!" चंदूलाल म्हणाला, "पण नवल हे, की तुला हा माझा अवतारही दिसत नाही का?"

"तुझी इच्छा तरी काय?" तिनं सर्व शक्ती एकवटून प्रश्न केला. त्यानं हातातील कुऱ्हाड पुढं केली आणि म्हटलं,

"मी वाटेल ते करीन-तू पहात राहा!" असं म्हणून तो पुढं सरकला.

वैजयंतानं जीभ फिरवून ओठांना ओलावा दिला आणि पाठ भिंतीला लावून ती उभी राहिली. ती गर्भगळित झाली आहे, हे लक्षात येताच चंदूलालनं तिच्यावर झडप घातली. मांजरानं उंदीर धरून तो झिंझटून निर्जीव करावा तद्वत तिला चेलमडून त्यानं पिळून सोडली; वैजयंताच्या देहातली सर्व शक्ती संपली होती, पायात धीर उरला नव्हता. ती मट्कन खाली बसली. क्षणात भान हरपून बावचळून सर्वत्र पाहू लागली. जणू ती स्वतःचा प्राण, स्वतःची शक्तीच त्या खोलीत शोधीत होती. तिचे दागिने तुटून सर्वत्र विस्कटले होते. केस सुटले होते.

चंदूलाल घोगऱ्या आवाजात म्हणाला, "हं-उठून इकडे ये!" तेव्हा ती कशीतरी उठली आणि भिंतीशी उभी राहिली. तिचा सर्व देह घामानं भिजला होता. प्रत्येक स्नायू कापत होता, ओठ थरथरत होते नि डोळ्यांत भीती भरली होती.

चंदूलालनं तिचं सर्व शरीर पाहून घेतलं. ते त्याच्या डोळ्यात बोचलं. मग तो बेबंद

झाला. त्याच्या कामांध डोळ्यातून ठिणग्या उसळल्या. त्यावेळी त्याला काहीच दिसत नव्हतं. त्याच्यातली सर्व संवेदनशीलता फक्त वैजयंताच्या देहावर केंद्रित झाली होती. जगणं-मरणं तो विसरून बसला होता.

"इकडे ये—" तो पुन्हा म्हणाला; परंतु ती जागची हालली नाही. त्यामुळं तो चिडला. निर्वाणीचा विचार करून त्यानं तिला खसकन पुढं ओढली; मग आवेगानं, हर्षानं, उन्मादानं तिला हृदयाशी कवटाळून धरली.

काही क्षण असेच गेले, आणि एक विलक्षण चमत्कार झाला. वैजयंताच्या मादक स्पर्शानं त्याच्या देहातील नसन्नस पुन्हा सजीव झाली. मस्तकातील बधिरता खाली हृदयात उतरली. तो आश्चर्यचकित होऊन पाहू लागला.

वैजयंता शांत होती. मुळीच हालचाल करीत नव्हती. ती प्रेताप्रमाणे त्याच्यापाशी तशीच उभी होती. डोळे अश्रू ढाळीत होते - ओठ थरथरत होते — ती बोलत होती.

"तुला काहीच लाभ होणार नाही. तू या देहाची विटंबना करशील, चिरफाड करशील, पण सारंच व्यर्थ आहे. हा देह लुटून तुझ्या पदरात काहीच पडणार नाही. तू मला लुटून जाशील - पण पुढं काय? तू अगदीच मूर्ख आहेस—"

तिचे ते शब्द, ती दुर्बलता, ती भयभीत अवस्था - हे सर्व पाहून चंदूलाल गोंधळला. त्यानं बाहुली दूर ठेवावी तशी तिला भिंतीकडेला उभी केली आणि तो तिच्यापुढं उभा राहिला. ती बोलतच होती.

"तू मूर्ख आहेस. तू माणूस म्हणून जगण्यालायक नाहीस. आज तुझी इच्छा तृप्त होईल. तू आपली वासना जाळण्यासाठी माझ्या काळजावर निखाऱ्याची रास रचून मोकळा होशील. पण मी तुझा कोणता अपराध केला होता?"

"मी—मी तुझ्यासाठी बरबाद झालो!" चंदूलाल खेकसला. क्षणात तो शुद्धीवर आला. त्याच्या डोळ्यातील धुंदी दूर झाली. थोड्याच वेळापूर्वीचे ते अघोर विचार बाजूला सरकले नि तो तिला गुन्हेगार ठरवू लागला. "मला दुःखात लोटून तू सुखात आहेस. मी सर्व बाजूनं नष्ट झालो - उद्ध्वस्त झालो, त्याला तू कारण आहेस!"

"तू खरा नादान आहेस!" वैजयंता धीर वाढवून म्हणाली, "जंगीचा खून करून तुरुंगात गेलास ते का माझ्यासाठी? तू स्वतःच्या हातानं आपल्या घरादाराला काडी लावलीस नि त्याचं खापर माझ्या शिरी फोडतोस! तू महाहलकट आहेस. मी तुला एका शब्दानं उत्तेजन दिलं नाही. कारण मला आरंभापासूनच तुझी किळस येत होती. आणि आता मला तू जनावरापेक्षाही जनावर वाटत आहेस. आता तुझ्या दुर्वर्तनाची परमावधी झाली..."

तो स्तंभित होऊन ऐकत होता; आणि ती जिवावर उदार होऊन मनाची तयारी करून बोलत होती.

"हं! आता थांबू नको. आता तुझी नीच इच्छा असेल ती तृप्त करून घे नि लौकर काळं कर. मलाही तुझा हा जाच सोसवत नाही. मूर्खा, मला परत दिसू नकोस. चल — क्षणिक सुखासाठी माझा बळीच जर तू घेणार असशील तर घे. पण लक्षात ठेव! त्या सुखाचं तुला समाधान लाभणार नाही. तू या देहावर विजय मिळविशील, परंतु माझं हृदय अजिंक्य आहे. आणि ते माझ्यापाशी नाही. ते मी लहानपणीच उमाला अर्पण केलं आहे. तू मात्र नाहक जळून राख झालास!

"मी गरीब आईची लेक, तमाशावालीची मुलगी म्हणून मी तुझी शेज सजवलीच पाहिजे, ही तुझी अघोरी इच्छा मला मान्य नव्हती. त्या इच्छेसाठीच तू हा असा माणसातून उठून जनावरात जमा झालास!"

"आता तू निखाऱ्यावर फुंक मारू नको!" चंदूलाल ओरडला. "तू मला आरंभापासूनच हैवान समजत आली आहेस!"

"मग त्यात काय खोटं होतं?" वैजयंता आता पूर्ण भानावर येऊन बोलत होती. जन्मभर पाठी लागलेला हा कामांध अखेर पशूप्रमाणेच वर्तन करणार याची तिला कल्पना होती. पण तो दुष्ट प्रसंग क्षणानं पुढं लोटावा म्हणून ती बोलत होती. त्यानं निखाऱ्याचं नाव कळताच तिला चेव आला. ती म्हणाली,

"तू निखारा असतास तर मी तुला इतका दूर ठेवलाच नसता. म्हणे हैवान समजले! उद्याच तुझी एक बायको दुसऱ्याची शेज साजरी करणार आहे आणि तू हा निखारा होऊन माझ्या अब्रूवर आग ओतायला आला आहेस. पण लक्षात ठेव—"

"काय लक्षात ठेवू?" तो मध्येच म्हणाला, तेव्हा वैजयंता उद्गारली —

"ही वैजयंता भोगल्याचं समाधान तुला या जन्मी तरी मिळणार नाही. खचित मिळणार नाही. कधीच मिळणार नाही!"

"काय होईल?" तो गरजला. "मला उद्याची पर्वा नाही. मी भीत नाही. मी प्राण मुठीत नव्हे - तळहातावर धरला आहे. मला भेडसावू नको!"

"भेकड!" वैजयंतानं चढाई सुरू केली. "तुझ्या दैवी 'उद्या' नाही. मला ठाऊक आहे. तू स्त्रीलंपट आहेस. तू आपली वासना तृप्त करण्यासाठी वेडा झाला आहेस. तुला माझं रूप, तारुण्य पाहवत नाही. तू उद्याची बात करू नको. तो 'उद्या' मांगल्याचा, सज्जनांचा नि शूरांचा आहे. तुझा नाही. पण जेव्हा माझी अब्रू माझ्यासमोर जळेल तेव्हा—"

"तेव्हा काय करशील तू?" तो खवळून ओरडला नि वैजयंता शांतपणे म्हणाली,

"तेव्हा तू या घराबाहेर जाण्यापूर्वीच मी या भिंतीवर टक्कर घेऊन स्वतःचा शेवट करीन. ज्या दुष्ट डोळ्यांनी तू माझी अब्रू पाहशील, त्याच डोळ्यांना माझ्या रक्ताचा सडा पहावा लागेल!" असं म्हणून तिनं एक पाऊल उचललं. त्याच्या डोळ्यातील क्रूरता पाहून

ती ओरडू लागली, "आटोप, आता थांबू नको. मी तुला फार फार भ्याले. मला ती भीतीच आज नष्ट करायची आहे!" असं म्हणत ती एक एक पाऊल पुढं टाकीत त्याच्या अंगावर चालून जाऊ लागली आणि एकदम त्याच्यापुढं जाऊन थांबली.

वैजयंताचा तो भयंकर अवतार पाहून तो चकित झाला. टक्कर घेऊन रक्ताच्या थारोळ्यात पडलेलं वैजयंताचं प्रेत त्याच्या कल्पनेनं आणून त्याच्यापुढं ठेवलं आणि ते पाहून त्याला भीती वाटली. मनात प्रक्षोभ पावलेल्या सर्व भावना थिजल्या, गारठल्या. तापलेल्या वाळवंटावर वळवाचा पाऊस पडावा तसा तो शांत-थंड झाला. वैजयंताची सुंदर मूर्ती रक्तात पडलेली पाहून त्याचं अंतर्मन गर्भगळित झालं नि गुन्हेगाराच्या पिंजऱ्यात उभं राहिलं. हळूहळू त्याचे रक्ताळलेले डोळे पाणावले. त्यानं चटकन तिचे दोन्ही दंड धरून हळूच हालवले आणि सद्गदित होऊन तो म्हणाला,

"वैजयंता, मी जातो. मला जगण्याची रीतच कळली नाही. पण आता त्याचा विचार करण्यातही अर्थ नाही. आता वेळ झाला. फार वेळ झाला. सर्व मर्यादा ओलांडून मी आता दूर गेलो आहे–" असं म्हणत त्यानं स्वतःच्या तोंडावरून हात फिरवला, घाम निपटून टाकला नि कुऱ्हाड घेऊन तो निघाला. त्यानं खटकन कडी काढली आणि बंदुकीतून गोळी जावी तसा उसात अदृश्य झाला.

वैजयंता पाठोपाठ चौकटीत आली. पण तिला तो दिसला नाही. क्षणात एक लहानसा निराशेचा ढग तिच्या चेहऱ्यावर येऊन बाजूला सरकला, तेव्हा आबा पाटलाच्या उसातून चंदूलाल चालत होता. त्याच्या धक्क्यानं ऊस करकरत होता. उशीर ती त्याचा आवाज ऐकत राहिली.

इतक्यात गावाकडून लोकांचा लोंढा आला. सर्वांच्यापुढं आबा पाटील धावत होता. त्यानं बंदुकीत काडतुसे भरली होती. फौजदार नि सर्व तरुण धमाल मळ्यात आले.

चंदूलाल घरात शिरताच केरू आबा पाटलाला वर्दी देण्यासाठी झपाट्यानं निघाला होता, परंतु तो वयानं म्हातारा असल्यामुळं त्याला दौड मारता आली नव्हती. त्यातच आबा पाटील लौकर भेटला नाही. त्यामुळं बराच वेळ गेला होता. आता नक्की घात झाला असावा, अशा कल्पनेनं तो पळत आला होता. परंतु वैजयंता सुखरूप आहे, असं पाहून त्याला हायसं वाटलं.

"कोन होतं वैजयंता?" आबानं विचारताच ती शांतपणे उत्तरली,

"तो चंदूलाल होता!"

"कुठं गेला?"

"उसात–" एवढंच बोलून ती घरात गेली. लोकांनी ऊस शोधला, सर्वत्र लोक पांगले. पोलिसांनी जमीन चाळली, पण व्यर्थ! त्यांना चंदूलाल सापडला नाही. सर्वांची निराशा झाली.

परंतु वैजयंता प्रफुल्लित झाली होती. ती निर्भय दिसत होती. कित्येक दिवसांची तिची जखम एका क्षणात भरून आली होती. सर्वत्र तिचीच चर्चा होत होती. सवाखंड्यांचं कारस्थान म्हणून आबा खवळून गेला होता. मळ्यात पोलीस पहाऱ्याला उभा होता. पण वैजयंताला त्याचं काहीच वाटत नव्हतं. चंदूलालही एक माणूस आहे, याचा तिला एक नवा शोध लागला होता. पण लगेच तिचं मन म्हणत होतं - तो कदाचित परत येईल आणि त्या वेळी कसा येईल कोण जाणे!

## १५

आज वैजयंताचा खून होणार होता, या वार्तेनं अवघी जत्रा हादरून गेली होती. घडीभरात वैजयंताचं नाव सर्व लोकांच्या जिभेवर नाचू लागलं. या प्रसंगानं जय कुणाचा — उमाचा की वैजयंताचा हा सवाल अधिक कसाला लागला.

दोन्ही बाजूंच्या दोन पालख्या देवळापुढं पहिल्या पायरीला स्पर्श करून परत फिरल्या होत्या. मध्यान्ह रात्र उलटली होती. देवाच्या नावानं 'चांगभलं' करणाऱ्या माणसांनी उमा, चंद्रा नि वैजयंता यांची नावं घेतली होती. न सांगता हजारो लोक चिंचेच्या बनात एकत्र झाले होते. तमाशा, उमा-चंद्रा, वैजयंता यांच्या नावाच्या घोषात बिचाऱ्या देवाचं अस्तित्वच गारद झालं होतं.

चिंचेच्या बनात किंचित अंतर राखून दोन रंगमंच उभारले होते. झाडांच्या फांदी-फांदीला पेट्रोमॅक्सच्या बत्त्या लटकत होत्या. सर्वत्र झगझगाट झाला होता.

माणसाला माणूस खेटून बसलं होतं. मोठमोठी रंगीबेरंगी पागोटी, धिप्पाड देह, उग्र चेहरे असलेली तमाशाची शौकीन माणसं पल्लेदार मिश्यांना पीळ भरीत होती. सर्वत्र कुऱ्हाडी चमकत होत्या, भाले लकाकत होते. हत्यारं धरणाऱ्या माणसांचे डोळे तांबारले होते. ती सर्व माणसं तमाशाची वाट पहात होती. उमानं रंग भरला तर बरं, नाही तर वैजयंताकडं जायचं असं कैकांनी मनाशी ठरवलं होतं. तर काहींचं मत होतं की, वैजयंतानं सरळ तमाशा केला तर बरं, नाही तर सरळ द्यायची ताणून!

इतक्यात आबा पाटलानं एखादी राणी आणावी तशा कडेकोट बंदोबस्तात तरवारीच्या कैचीत वैजयंताला फडात आणली.

नुकत्याच उमललेल्या टपोऱ्या फुलाप्रमाणे ती सर्वांच्या डोळ्यात भरली. आज ती पुलकित झाली होती. तिचा देहच जणू कलामय झाला होता.

तोच पलीकडे गडबड झाली. उमा-चंद्रा फडात येताच दत्तू सवाखंडेनं हवेत गोळी झाडून भयंकर सलामी दिली. लगेच उमाची हलगी कडाडली. उमानं आज निश्चय केला

होता, की एकदा वैजयंताचा गर्वहरण झाल्याशिवाय ती सरळ होणार नाही. म्हणून तो तयार होता. चंद्रानं तर कंबरच बांधली होती. आज ती अपूर्व असा तमाशा करणार होती. तिचा पायच ठरत नव्हता.

दोन बाजूला दोन तमाशे एकाच वेळी सुरू झाले. एकाच वेळी दोन्हीकडं गणगौळणीला प्रारंभ झाला. सदोपंत, सावळा धनगर, वीरमल वगैरे मंडळी रुपयांच्या ओण्या बांधून बसली होती; आणि तिकडे सवाखंडे नागाप्रमाणे फणकारत होते.

तमाशांनी लोकांना लगेच काबूत आणलं. नाही रुचलं तर तिकडे जाऊ, हा विचार लोक विसरले. उमानं आपली माणसं गुंगवली तर वैजयंतानं आपल्या समोरच्या श्रोत्यांना मंत्रमुग्ध करून सोडलं. उमा नि चंद्रा ही दोघंही आपली कसोटीची वेळ समजूनच तमाशा करीत होती. चंद्राची गहिरी नजर लोकांना हलू देत नव्हती. तिच्या पायातली जादू तर कमालच करीत होती!

इकडे वैजयंता तरवारीप्रमाणे तळपत होती. ती आज कित्येक दिवसांनी उमाला भेटत होती – तिने मैदानात अजून त्याला पाहिला नव्हता. त्याचा पराजय करण्यातच आपलं समाधान आहे, असं तिला वाटत होतं.

कंठ, काव्य नि नृत्यकला यानं ते बन नंदनवन झालं होतं. दोन तमाशे रंगदेवतेला आळवीत होते. आणि त्याच वेळी एकमेकांवर मात करायचे मनसुबे रचीत होते.

वैजयंता हळूच परसूच्या कानात म्हणाली, "मामा, गौळण सकाळपर्यंत चालू द्या!"

परसूला त्याचा अर्थ उमगला नि त्यानं तसंच केलं. भाविकाच्या भावनांना आवाहन, प्रेम, नृत्य, संगीत, विनोद या साऱ्यांचा परिपोष गौळणींतून करता येईल व जनता प्रसन्न होईल, असा दूरचा विचार करूनच वैजयंतानं गौळण लांबवली. खरा तमाशा सकाळी सूर्यप्रकाशात करता येईल नि तोपर्यंत उमा रिकामा होईल, हा तिचा हेतू होता. परसूनं कंबर बांधली. गंगूनं विनोद करून चांदणं फिकं पाडलं आणि वैजयंतानं राधा होऊन चिंचेच्या बनात गोकुळ अवतीर्ण केलं, तेव्हा परसूचा कंठ नुकताच तापत होता.

नेमकी याच वेळी उमाची चूक झाली. ती लक्षात येऊन चंद्रा म्हणाली, "उमाजीराव, वैजयंताची गौळण अजून संपली नाही आणि तुम्ही गौळण संपवली–"

"घोटाळा झाला!" उमा म्हणाला. "तिनं ठीक प्रारंभ केला. माझं चुकलं. आता वग सुरू केल्यावाचून गत्यंतर नाही." असं म्हणून त्यानं 'राजा हरिश्चंद्र' हा वग सुरू केला. सोंगाड्या गुलाब, कबीरा, मार्तंडा, बळी यांनी उमाची बाजू सावरली. तमाशा चढत चालला. रंगाच्या लाटा उंचावल्या.

परंतु तोपर्यंत वैजयंताची राधा मथुरेत पोचलीच नव्हती. ती त्या चिंचेच्या बनातच रंग भरीत होती.

पूर्वेला अरुणोदय झाला. त्या तेजोमय प्रकाशात पेट्रोमॅक्सचा प्रकाश दुबळा झाला.

त्या रविराजाला अभिवादन करून वैजयंतानं आपली गौळण समाप्त करून चहासाठी तमाशा मोडला.

चार फर्लांग जायला आबानं बैलगाडी आणली होती. वैजयंता घरी जाऊन आंघोळ, चहा आटोपून नवा पोशाख करून परत आली. तेव्हा उमाची भलतीच धावपळ झाली होती. चंद्राही मनात हादरली होती.

दोन्ही तमाशे पुन्हा उभे राहिले. माणसं आपापली जागा धरून परत बसली. परंतु त्याच वेळी चहाला गेलेल्या चंद्राला सवाखंड्यांनी आग्रह करून भरपूर दारू पाजली होती. ती फंडात आली, तेव्हा तिच्या डोळ्यातील तरलता मंद झाली होती. पायातली चपलता लोपली होती.

उमाचा हरिश्चंद्राचा वग पुन्हा सुरू झाला. चंद्रा पुण्यशील तारामतीची भूमिका करीत होती. त्यामुळं तर विसंगतीचा कडेलोटच झाला. चंद्राचं ते असंबद्ध वर्तन लक्षात येताच उमानं दत्तूला विचारलं, "चंद्राला दारू कुणी दिली?" त्यावर दत्तू हसून म्हणाला,

"आम्हीच. हं करा दाबात. एकच प्याला दिला!"

उमाला संताप आला. तो मनाला म्हणाला, 'अनर्थ झाला! या एकाच प्याल्यात ही हजारो माणसं गडप होऊन...' तो चंद्राच्या मूर्खपणाचा विचार करीत असतानाच त्याचे पाय उखडले जाऊ लागले. चंद्राला दारू चढत होती...

इकडे वैजयंतानं छक्कड सुरू केली होती. आधीच ती नटून आली असल्यानं परसूनं सुरुवात केली —

*पायामधी जोडवी तुझ्या बारा रुपयं वजनाची । पायात पैंजण मारू पट्टा बोटात दाटी इरुद्याची । अंगठ्यात अंगठोळ शिंदेशाही तोडं उंच चिनी चांदीचे । कमरपट्टा सोन्याचा त्याला कुलपं कळसूत्राची । दंडात वेळा गोट पाटल्या तऱ्हा न्यारी त्याची । गळ्यात चंद्रहार वज्रटीक लड मोत्याची । दुल्लड पानपोत वर एक माळ पुतळ्यांची ।*

*केवढा मुद्राराकडी केसांत फुलं बसवलीस हर जिनसी, काय तारीफ सांगू तुझ्या बुचड्याची । मानेचा गोल, छातीचा डोल, बारीक कंबर मुठीच्या मापाची । शुभ्र स्कंध, गव्हाळी मांडी, टांचा गोल जणू वाटी खोबऱ्याची । नाकडोळे जसे वदले, बारीक भुवया कोर चंद्राची । तू स्त्री रूपाची तत्काळ दृष्ट होईल तुला आमची । तू हाती आल्यावर बकऱ्याची कंदुरी करीन त्या कवठ्याच्या सात सैदाची!...*

*दे तू हातामधी हात नको पाहू आता अंत —!*

*एवढी होऊ दे नावाची आरोळी । जगालोकांत वाजू दे टाळी । पिवळ्या चाफ्याची कळी तू कवळी । जाती झुकत नागीण धवळी ॥*

कडवं संपताच वैजयंता पुढं आली आणि परसूला उत्तर देऊ लागली. लोक कान टवकारून ऐकू लागले.

*ऐका राव मी नार नव्हं गरिबाची । सून श्रीमंताची । माझ्या वाड्याला चौकी शिपायांची । मी पत्नी हिंमतबहाद्दराची । जशी सीता रामाची । तारामती हरिश्चंद्राची । उर्मिला लक्ष्मणाची । लोपामुद्रा अगस्तीची । अहिल्या गौतमाची । मी असली असून संगत करू का या हलकटाची । या कामी दशा झाली कैकाची । लंकेच्या राजा रावणाची । ज्याची ज्याची कोटी घरं काशाची नी तांब्याची । पाच लक्ष पाषाणाची । सहा लक्ष चिरंबंदीची । कांचनाची सात कोटीची । सरळ हवेली नऊ ताळाची । तीनकोणी लंका चौफेर चार योजना लांबीरुंदीची ।*

*वाली पुत्र अंगद पहावया गेला । तहानभूक हरली त्याची । तसल्याचा प्रलय झाला मग कथा काय तुजसारख्या मर्कटाची । जात पुरुषाची द्वाड । त्याला मस्तीचं थाड । मेला सोदा लबाड । नित होते मी गंगेला सोवळी । बोलणाराची धरून किरडी आवळी । सून गवळ्याची मी चंद्रावळी । मला पाहून कैक तळमळी ।।*

पुढील श्रोत्यांनी प्रचंड हुंकार दिला नि टाळ्यांचा कडकडाट करून वैजयंताचं कौतुक केलं. उमा-बाबाजीच्या या छकडीनं वैजयंतानं मैदान मारलं.

चंद्राची ती तऱ्हा घातक ठरली. तिची जीभ जड झाली. पापण्या जड झाल्या. हळूहळू ते श्रोत्यांच्या ध्यानी आलं. पतिव्रता तारामती पाहणाऱ्या लोकांना दारू पिऊन झिंगलेली चंद्रा विद्रूप वाटू लागली. सत्त्वशील तारामतीनं घेतलेली जनमनाची पकड सुटली आणि लोक भर्रकन उठले.

अमृताचं हलाहल झालं. लोकांनी हुई ऽ ऽ केली. घोंगडी झटकली. आणि तो महापूर तसाच धावत वैजयंताकडं निघाला. उमा उद्विग्न होऊन फक्त पहात होता. कलावंताला दिलेली ती एक डागणी होती. हा पराजय दारुण होता. त्याचा आत्मा पेटून त्याची राख झाली.

"आरं बाबा ऐका—" सवाखंडे ओरडू लागले.

"आरं ऐका काय? ती बया दारू पिऊन तरकटतीया — चला तिकडं!" असं म्हणत लोक निघाले, तेव्हा सवाखंडे चिडले. इरेला पडून ते लोकांना अडवू लागले. दंगल वाढली. दत्तू उमाला म्हणाला,

"हं, तुम्ही सुरू करा."

पण उमानं डफ खाली ठेवला, आणि सर्व सवाखंडे भडकले. त्यांनी लोकांत शिरून दंगल वाढवली. वैजयंताच्या समोर जाऊन ते ओरडू लागले,

"आमाला उमाचा तमाशा पाहिजे—"

तशा धुमाळांनी कुऱ्हाडी फिरवल्या. फौजदारानं शिटी फुंकून पोलिसांना हुशार केलं. आबानं बंदूक लोड केली.

वैजयंताच्यापुढं तांडव सुरू होतं. सर्वत्र हलकल्लोळ उसळला होता. गर्दीत शिरून

दत्तू ओरडला, ''वैजयंताला ओढा!''

आबा पाटील बंदूक सरळ धरून पुढं सरसावला.

फौजदार, पोलीस, शहाणी माणसं यांनी ती दंगल काबूत आणली. परंतु आम्हाला उमाचा तमाशा पाहिजे! हे पालुपद काही संपेना. शेवटी आबा पाटील स्टेजवरून म्हणाला,

''ह्यो तमाशा आमचा धमालांचा हाय. हतं वैजयंता हाय. ज्येला उमा पायजी त्येनं सवाखंड्याच्या फडात जावं! हतं उमाचं नाव काढील त्येला मी गोळी घालीन—'' तरीही दंगल थांबेना.

वैजयंता, परसू, गंगू सर्वच गोंधळून उभे होते. त्यांना काहीच सुचत नव्हतं. इतक्यात उमा स्टेजवर आला. त्याला पाहताच सर्वत्र शांतता प्रस्थापित झाली. सर्व लोकांकडे रोखून पाहात उमा म्हणाला,

''मंडळी, माझा तमाशा मोडला. हा फड या वैजयंताचा आहे. इथं माझ्या तमाशाची मागणी करणं हे न्याय्य नाही. मी स्पष्ट सांगतो, तारामतीला-चंद्राला दारू पाजून सवाखंड्यांनी माझा तमाशा मोडून काढला. मी हरलो आहे. परंतु आम्ही तमासगीर एक आहोत. कला एक आहे. तुम्ही कटून मरू नये. उमा नि वैजयंता दोन नाहीत. बसा नि बघा. मी वैजयंताच्या फडात तमाशा उभा करतो. तुम्ही कत्तल करून मरू नये म्हणून म्हणतो — बसा!''

लोकांनी हर्षभरित होऊन टाळी वाजविली. भराभर लोक बसले. वैजयंता विस्मयचकित झाली होती. आज कित्येक दिवसांनी ती उमाला प्रथमच पहात होती. आनंदाश्रूंनी डोळ्यात गर्दी केल्यानं ती चुळबूळ करीत होती. लहान मुलाप्रमाणं निर्मळ चेहरा करून त्याच्याकडे पहात ती मनात म्हणत होती, 'अखेर सागरच सरितेकडे धावला.' तिच्या हृदयात आनंद मावत नव्हता. तिच्या देहातील कण न् कण हर्षभरित झाला होता नि डोळ्यात फुलं फुलत होती.

बटावाच्या वगाला प्रारंभ झाला. परसूच्या शब्दानं बटावू या वगाची कडवी हवेत निनादू लागली.

दिल्लीचे व्यापारी अहमदनगरला आले. त्यांनी तिथं मोहना नावाची एक अप्रतिम सुंदर स्त्री पाहिली नि ते सारे मोहना-मोहना करीत दिल्लीस परतले. त्या व्यापाऱ्यांच्या तोंडून मोहनाची कीर्ति ऐकून छेलबटावू वेडा झाला.

या वेळी उमा पडद्यामागं बटावाचा पोषाख करीत होता. वैजयंता मोहनेचे रूप घेत होती. ती म्हणाली,

''उमा, आता तरी बोल.''

''थांब! आता माझ्या डोकीत तमाशा आहे!'' उमा म्हणाला. ''तमाशा संपला की

मग निवांत बोलू!'' असं म्हणून तो सज्ज झाला.

बाहेर परसूनं वास्तव जग अदृश्य करून गतकालीन दिल्ली शहर, मोहना, बटावू वाणी यांचं अस्तित्व प्रस्थापित केलं होतं. रसरंगाची सरिता चिंचेच्या बनात आली होती. मनं तल्लीन झाली होती.

एकदम परसूचा आवाज कडाडला. त्यानं आरोळीनं कडवं सुरू केलं —

*दिल्लीचा बटावू झोरा बावरा । हजारात हिरा । लाखामधी मोहरा । चंद्र गगनात मारीतो लहरा । वय पंचवीस कोवळा चेहरा । शब्द जणु त्याचा मंजुळ वारा । मस्तकी शोभे मोत्याचा तुरा । दंडी दंड पेट्या रेशमी दोरा । मुखी पानांचा विडा रंगला — । पायात पठाणी जोडा । कंठी करगोट शिंदेशाही तोडा । कडी सोन्याची पवित्रलेला ॥*

*अबलख घोडा सजवला छान । त्याचा काळा कुमाईत वाण । त्यावर ठेवलं जिन सामान । खंडापटा गेंद वर दोन । सोनेरी सडका चारी बाजूनं । मोत्याच्या लडी दिल्या सोडून । अंकावर रूपं खेळवीलं जुनं । पायी त्याचे कोयऱ्या वाजे घणघण । चोख चांदीचे वाळे वर दोन । नाद त्यांचा उठला ।*

*खाली सोडल्या मोत्याच्या माळा । पंखचौकाला गोंडा शोभला । असा घोड्याचा शृंगार केला ॥*

वैजयंता मोहना होऊन तळपू लागली. उमा बटावू होऊन अनंत अडचणींतून तिच्या भेटीला निघाला. तो अहमदनगरला येऊन अंबाबाईच्या देवळात उतरला, तेव्हा त्याला गंगू पुजारी भेटला. त्यानं बटावाला मदत केली. मोहना बटावू भेट घडवून आणताना गंगूनं हास्याचा पाऊसच पाडला. श्रोते हर्षभरित होऊन तमाशा पहात होते. ते एकमेकांचा जीव घ्यायची ईर्षा विसरून देहभान हरपले होते. आता ही भेट कशी होणार याच आतुरतेत ते बुडाले होते.

आणि पहिल्याच भेटीत ती देखणी मोहना त्या बटावावर मोहित झाली.

दुसऱ्या दिवशी भर मध्याह्न-रात्री मोहना बटावाला भेटण्यासाठी त्या देवळात आली. तेव्हा एकाएकी मोहनातील मूळची वैजयंता प्रकटली. उमाला समोर पाहून आपण या ठिकाणी 'मोहना' आहोत हेच ती विसरून गेली. कित्येक दिवस हृदयात दबलेली ओढ एकदम उचंबळून आली. भावनावश होऊन तिनं उमाला मिठी मारली. त्याला हृदयाशी कवटाळून धरलं.

तेव्हा प्रेक्षक डोलत होते. आपण तमाशा पहात नसून एक जिवंत चित्र पाहात आहोत, असं त्यांना वाटत होतं. आणि आपण तमाशा करीत आहोत याचं वैजयंताला भानच उरलं नव्हतं. आज माझा उमा मला भेटला या समाधानात ती बुडाली होती. आनंदाश्रूंनी त्याचं हृदय भिजवीत होती.

प्रेक्षक टाळ्या पिटीत होते. पागोटी उडवीत होते. तमाशा रंगला होता.

"उमा, आता मला सोडून जाऊ नकोस–" ती रडत रडत म्हणाली.

"नाही जाणार. आता कुठंच जाता येणार नाही!" तो सद्‌गदित होऊन म्हणाला.

"तू मला अग्नीत सोडून गेलास, मी किती दिवस जळत होते - पण जगले." वैजयंता भावना काबूत आणीत आर्त स्वरात म्हणाली, "मी मेले असते पण तुझ्याचसाठी जगले!"

"शांत हो!" तो म्हणाला. "सोन्याची कसोटी अग्नीत लागते. आता हे सोनं मी काळजात ठेवीन. जपीन."

बटावाच्या वगात वैजयंतानं स्वत:चं जीवन ओतून त्याला सजीव करून प्रेक्षकांना चकित केलं.

वैजयंता उमापासून अलग होताच प्रेक्षकांनी नि:श्वास टाकला आणि –

आणि याच वेळी कुम्या ओरडत आला – "दत्तू सवाखंड्याच्या मळ्यात खून!"

तमाशा मोडलाच होता. उठलेली माणसं दत्तूच्या मळ्यात धावली नि चकित झाली.

मळ्यातील त्या प्रचंड आंब्याच्या झाडाला चंदूलालनं गळफास लावून घेऊन आत्महत्या केली होती. त्याचं मढं लटकत होतं.

रात्रभर उद्वेगानं अगतिक होऊन, दारुण निराशेनं वेडावून, पराजयानं पोळून तो हिंडत होता आणि अखेर अशा क्रूर रीतीनं त्यानं स्वत:चा शेवट करून घेतला होता.

'हा कोण गावचा?' म्हणून लोक निरखीत होते, तेव्हा बळी पुढं गेला. त्यानं तो आपला जुना मालक ओळखला. तो म्हणाला, "ह्यो आमचं मालक चंदूलाल शेट. ह्यो तुरुंगातून फरार हायती!"

दत्तूला अटक करून फौजदार परतला, तेव्हा वैजयंता उमाला घेऊन मळ्यात गेली होती. ती त्याच क्षणी मुंबईकडे निघण्याची तयारी करीत होती. आता तिला त्या खुंदलापुरात क्षणभरही राहवत नव्हतं. दोन दिवस रहा – असा आबा पाटलानं फार आग्रह केला, पण तिनं ऐकलं नाही. बांधाबांध करून ती निघाली. तेव्हा आबानं तयारी केली. दोन बैलगाड्या देऊन तिला निरोप दिला. जेव्हा ती गाडीत बसून खुंदलापूर स्टेशनकडे निघाली, तेव्हा सर्व धमाल तिला चार पावलं वाटे लावण्यासाठी निघाले होते. त्यात संदोपंत, सावळा, वीरमल आणि स्वत: फौजदारसाहेबही होते. फौजदाराला पाहताच वैजयंता चमकली.

"तुम्ही सुरेश ना?" तिनं विस्मयानं विचारलं. तेव्हा फौजदार म्हणाला,

"हो. तुझं भविष्य खरं ठरलं!"

गावापासून खुंदलापूर स्टेशन दहा मैल दूर होतं नि त्यावेळी सूर्य मावळत होता. गाड्या मंद-गतीने चालत होत्या. उमाला घेऊन वैजयंता एका गाडीत बसली होती.

हळूच चंद्रोदय झाला. भाळावर रुपेरी रस वर्षू लागला. चंद्रप्रकाशात सृष्टी न्हाऊन निघत होती. अंधाराचा कण न् कण त्या रुपेरी रंगात बुडाला होता. निळ्या आकाशात

चांदण्या स्वच्छ करून पुन्हा आपापल्या जागी बसवाव्या, तद्वत ढाळ देत होत्या आणि आज त्या चंद्राच्या भोवती अधिकच शोभत होत्या.

वैजयंता उमाला खेटून बसली होती. त्याचा स्पर्श आज तिला नवा नि उन्मादक भासत होता. ती पुलकित होऊन त्याला चोरून न्याहाळीत होती. तिचं स्वप्नाळू मन नव्या विचारात गुंतलं होतं. ती हळूच म्हणाली,

''एक गोष्ट बोलू?''

''प्रथम माझं ऐक!'' उमा म्हणाला.''

''बरं सांग! ऐकते.'' तिनं मन आत ओढली आणि उमा म्हणाला,

''आता गेल्याबरोबर प्रथम लग्न!''

त्या 'लग्न' शब्दानं तिच्यावर क्षणात अमृताचा वर्षाव केला. गगनातील नवलक्ष चांदण्याचा रंग फिका पडला. ती अधिकच उजाळली. जीवनाचं साफल्य जवळ येत आहे, असं वाटून ती अधीर झाली. ह्दयाचे तुटलेले तंतू जुळले नि ते सप्तसूर काढू लागले. त्या निनादात 'संसार' हा एकच शब्द साकार होऊन जीवनाचं गीत गाऊ लागला. तिनं नकळत डोळे झाकले. गपकन ती संसार-स्वप्नात विलीन झाली. तिच्या कानात सनईचे मंगल-स्वर घुमले. लग्न - नंतर संसार! आणि मग आपण आई होऊ असा विचार येताच तिच्या ह्दयातून लहान बाळाचा हुंकार निघाल्याचा तिला भास झाला नि ती दचकून जागी झाली, लाजली. मग तिनं हळूच उमाच्या ह्दयावर मस्तक टेकलं. जणू ती मंगल-प्रीतीपुढे नतमस्तक झाली.

एवढ्यात गाडीला गती मिळाली. त्याचबरोबर आतुरता प्रबळ झाली. ती उद्याची वाट पाहू लागली. त्या उद्यात तिच्या जीवनाचं साफल्य सामावलं होतं. तो 'उद्या' तिचं सौभाग्य, मांगल्य नि नवजीवन घेऊन येणार होता. आपले सुंदर डोळे विस्फारून तिनं चोहोंकडे पाहिलं —

तेव्हा तिचा तो भाग्यशाली 'उद्या' तिच्याकडे येत होता, नि ती त्याच्याकडे जात होती.



## अनुक्रम

परिशिष्ट १

# 'गाजलेली लोकनाट्ये' : प्रस्तावना

'तमाशा' हा शब्द उच्चारला की अनेकांच्या डोक्यात त्या शब्दाचे अनेक अर्थ येतात. लहानपणी मला शाळेत एक कविता शिकविण्यात आली होती. ''शाळेसी जाताना मुलांनी वाटेत। तमाशा पहात थांबू नये ।।'' हीच ती कविता. मास्तरांनी 'तमाशा' शब्दाचा अर्थ सांगितला तो असा की तमाशा म्हणजे डोंबारी, जादूगार अगर माकडवाला यांचा खेळ, किंवा रस्त्यावर चाललेले एखादे भांडण. मी थोडा मोठा झालो तेव्हा दुसराही अर्थ मला कोणी तरी सांगितला. 'तमाशा' म्हणजे सभ्य लोकांनी व विशेषत: त्यांच्या मुलांनी अगर स्त्रियांनी न पाहण्याजोगा नाटकाचा एक प्रकार. त्यात नाच्या असतो, तो अश्लील हावभाव करतो, शृंगारिक गाणी म्हणतो. तमाशा करणारे लोक अस्पृश्य असतात. तो पाहणे म्हणजे पाप आहे. पुढे पुढे तमाशा शब्दाचा गर्भितार्थही समजू लागला. एखादी गंभीर चर्चा चालू असता मध्येच एखादा हसला की त्याला चटकन विचारण्यात येते : ''हसतोस काय? इथं काय तमाशा चाललाय?'' एखाद्या घरात नवरा-बायकोचे भांडण चालले असले की बाहेरून शेजारी सहज बोलतात : ''काय ऐकता? रोजचाच आहे तमाशा!'' 'चारचौघात तमाशा नको' हेही वाक्य अनेक वेळा कानावर आदळले आणि तमाशा शब्दाचा गर्भितार्थ अधिकाधिक स्पष्ट झाला.

पुढे महागोंडच्या (माझे मूळ गाव) जत्रेत तमाशा पाहण्याचा योग आला. हजारो शेतकरी जमले होते. तमाशा नामांकित असल्यामुळे दहादहा, बाराबारा मैलांवरूनही शेतकरी आले होते. अनेक शेतकऱ्यांनी चिरमुरे व बत्तासे खरेदी केले व ते धोतराच्या शेवात घेऊन धुळीतच बैठक मारली.

रॉकेलचे डबे लोखंडी बुट्यांमध्ये पालथे करण्यात आले व दोन मोठमोठ्या मशाली पेटवण्यात आल्या. आता सर्वांचे लक्ष स्टेजकडे लागले. स्टेज म्हणजे दोन कांबळी जमिनीवरच अंथरल्या होत्या व मागच्या बाजूला दोरीवर एक कांबळे टाकून थोडासा आडोसा केलेला होता. या आडोशाला नाच्या आपला साज चढवीत होता व त्याच्या शेजारी धग करून हलगी शेकली जात होती. कांबळ्याच्या स्टेजवर तीनचार तमासगीर बसले होते व आपापली सणगे सज्ज करीत होते. ढोलवाल्याने हातातल्या चिलमीचा जोराने एक दम मारला व चिलीम मागच्या साथीदाराकडे दिली. ढोलग्याच्या खुंट्या पिळल्या, तुणतुणेवाल्याने तुणतुण्याचा कान पिळला. ढोलगे व तुणतुणे यांचा सुर मिळाला. मागे हलगीवाल्याने हलगीवर थाप टाकली व हलगी शेकून झाल्याचा इशारा

दिला. लग्नातील अंतरपाटाप्रमाणे एक धोतर स्टेजवर आडवे धरण्यात आले. ढोलगेवाला, हलगीवाला व इतर सुरत्ये प्रेक्षकांकडे पाठ करून स्टेजवर उभे राहिले. वाद्यांचा म्होरा वाजला. लय खूप वाढवून तीन आवर्तनांचा मुखडा झाला व मध्ये धरलेले धोतर झटकन बाजूला करण्यात आले. त्या धोतराच्या आड नाच्या होता. त्याने प्रेक्षकांना लवून सलाम केला. सर्वांची तोंडे आता खेळाकडे लागली. नाच्याने मुजऱ्याच्या नाचाची पावले टाकायला सुरुवात केली.

मुजरा संपल्यानंतर गण झाला. कृष्ण-गोपीच्या भागाला सुरुवात झाली. पेंद्याच्या विनोदाने प्रेक्षकांत हास्याच्या उकळ्या फुटू लागल्या. राधा (नाच्या) मधूनच नाचे, मध्येच मुरके तर मध्येच लचके. राधेचे गाणे सुरू झाले की कृष्णाचा पार्ट करणारा ढोलगेवाला आपणच ते गाणे पुढे म्हणू लागे. कृष्णाचे गाणे सुरू झाले की राधा त्याची जी ओढी. कृष्णाने राधेला अडविले. राधेने 'मावशी' म्हणून आरोळी मारली. तुणतुणेवाल्याने आपल्या धोतराचा सोगा लुगड्याच्या पदराप्रमाणे डोकीवर ओढला व तो मावशी बनून पुढे सरसावला. थोडासा संवाद, लगेच छक्कड सुरू झाली. छक्कडीचे एक कडवे संपले, मध्येच राधेचा नाच सुरू झाला. नाच रंगात आला. प्रेक्षकांतून राधेवर चिरमुऱ्याचा व बत्ताशांचा मारा सुरू झाला. शिट्या वाजवून प्रेक्षकांनी आपली पसंती दर्शविली.

तमाशाला रंग चढू लागला. तो पाहणाऱ्या हजारो शेतकऱ्यांच्या चेहऱ्यावरून हे स्पष्ट होत होते. टाळ्या मुळीच वाजत नव्हत्या. पण गाण्याच्या तालावर डुलणाऱ्या हजारो माना, सोंगाड्याच्या विनोदाने उडणारे हास्याचे फवारे व नाचाच्या ऐन रंगाच्या वेळी नाच्यावर उडणारे चिरमुरे एकच गोष्ट दाखवीत होते. ती म्हणजे सारा जनसमुदाय तमाशात पूर्ण रंगून गेला होता, वर्षांतून एकदाच जत्रेच्या वेळी मिळणारी करमणुकीची मेजवानी यथेच्छ झोडीत होता.

मध्यान्ह रात्रीनंतर वगाला सुरुवात झाली. त्यापूर्वी प्रेक्षकांतून आरोळ्या उठल्या होत्या— 'बटावाचा वग लावा;' 'श्रीयाळ राजाचा वग होऊ द्या;' 'हरिश्चंद्राचा झाला पाहिजे!' शेवटी हरिश्चंद्र-तारामतीच्या वगाला सुरुवात झाली व प्रेक्षक जीव कानात आणून ऐकू लागले.

एका पदाने विषयाची प्रस्तावना झाली. संवाद व लावण्या रंगू लागल्या. ढोलगेवालाच सोनेरी रंगाचा मुकुट चढवून तलवार बांधून हरिश्चंद्र बनला होता. हलगीवाला, झांजाड्या इत्यादी स्टेजवरच वेश पालटून इतर पात्रांची कामे वठवीत होते. घटकेपूर्वी राधेच्या भूमिकेत शृंगारिक डोळेमोड करणाऱ्या नाच्याने आता प्रेक्षकांची हृदये करुण रसाने हलवायला सुरुवात केली होती. वातावरण गंभीर होत चालले होते. शेवटी तारामतीचे डोके उडविण्याकरता हरिश्चंद्र स्वत: तयार झाला व 'ही माझी तलवार हो विजयी' हे पद म्हणू लागला, तेव्हा अनेक प्रेक्षकांच्या डोळ्यांतून अश्रू वाहू लागलेले मी पाहिले.

आज २४ – २५ वर्षांनतरही तो देखावा माझ्या डोळ्यांसमोर स्पष्ट दिसत आहे. ते सूर कानात घुमत आहेत.

कोंबडा आरवायच्या सुमाराला वग संपला. पाटील, कुलकर्णी, देसाई वगैरे प्रतिष्ठित मंडळींनी आपापल्या आवडीच्या लावण्या, छक्कडी म्हणण्याचा तमासगीरांना आग्रह केला. तुणतुण्याचा आधीच चढलेला सूर आणखी चढला. लावण्या, छक्कडी, झगडे पहाटे सूर्योदय होईपर्यंत चालले होते आणि ते हजारो शेतकरीही शेवटपर्यंत बसले होते.

आठ-दहा वर्षांनंतर पुन्हा एकदा महागोंडच्या जत्रेत तमाशा पाहण्याचा योग आला. या वेळीही पूर्वीप्रमाणेच हजारो शेतकरी आले होते. त्यांचा उत्साहही पूर्वीचाच दिसला. तमाशाचे स्वरूप मात्र थोडे बदलले होते. मशालीच्या ऐवजी किटसनच्या बत्त्या लागल्या होत्या. माचे व फळ्या वापरून उंच स्टेज बनविण्यात आले होते. नाच्या ऐवजी नाचणारी बाई होती. परंतु प्रयोगाच्या एकंदर ढाचा (फॉर्म) व अंतरंग (कंटेंट) फारसे बदललेले नव्हते.

काही वर्षांनंतर कोल्हापुरात थिएटरमध्ये तमाशा पाहिला. 'संगीत जलसा' अशी त्याची जाहिरात करण्यात आली होती. त्या जलशात तीन-चार ताफे काम करीत होते. नाचणाऱ्या दोन बाया, सोंगाड्या, पायपेटीवाला, तबलजी, त्रिगणवाला (ट्रँगल प्लेयर) इतक्यांचा ताफा होता.

कवाल्या, लावण्या व सिनेमातली गाणी यांची भेसळ करून व मधून मधून सोंगाड्याच्या नाचणाऱ्या बायांशी होणाऱ्या संवादात पाचकळ विनोद दाखवून प्रत्येक ताफा प्रेक्षकांची सुमारे अर्धा तास करमणूक करीत होता व नंतर त्या बाया पुढच्या रांगेतील प्रेक्षकांकडून 'दौलतजादा' स्वीकारून पडद्याआड होत होत्या.

पुढे शाहीर नानिवडेकर यांनी बसविलेल्या 'फॅशनचा वग', 'किसरूळचा शेतकरी', 'वसाडगावचा जमीनदार' वगैरे छोट्या तमाशांत मी स्वत: कामेही केली. शाहीर नानिवडेकर यांनी जुन्या तमाशाच्या ढाच्यात व अंतरंगात अनेक फरक केलेले मला आढळले. त्यांनी नाच्याला अजिबात फाटा दिला होता. परंपरागत चालत आलेल्या गण गौळण, कृष्ण-गोपींचा झगडा वगैरे पूर्वरंगाला फाटा देऊन ते एकदम वगाला सुरुवात करीत होते. शृंगार, पाचकळ विनोद हेही त्यांच्या तमाशात नव्हते. मात्र लावण्यांच्या जुन्या चाली, त्या उठावदार करण्याकरता लागणारी ढोलगे, तुणतुणे, झांज इत्यादी वाद्ये त्यांनी कायम ठेवली होती. अंतरंगात (कंटेंटमध्ये) खूपच बदल केला होता. उदाहरणार्थ, 'किसरूळचा शेतकरी' हा त्यांचा वग पाहा. शेताला मुकलेला, कर्जबाजारी शेतकरी कर्ज फेडण्यासाठी पैसे जमवावे म्हणून मुंबईचा रस्ता धरतो. मुंबईत सर्व कामगारांची जी अवस्था होते, तीच त्या किसरूळच्या शेतकऱ्याची होते. कर्ज फेडण्याची त्याची स्वप्ने धुळीला मिळतात. दुसरे उदाहरण म्हणजे 'वसाडगावचा जमीनदार.' यात सरंजामी

सरदारांचे पिढ्यानपिढ्या चालत आलेले मूर्खपणाचे व शेतकऱ्यांना पिळून कमविलेल्या पैशाच्या उधळपट्टीचे चाळे शाहीर नानिवडेकरांनी खुबीदारपणे रेखाटलेले होते. गणेशोत्सव, साहित्यसंमेलने यांसारख्या प्रसंगीही हे तमाशे त्यांनी करून दाखविले. ते अत्यंत लोकप्रिय झाले होते.

महाराष्ट्रीय शेतकरीवर्गात प्रचाराचे एक अत्यंत प्रभावी हत्यार म्हणून सत्यशोधक समाजाने तमाशाचा उपयोग केल्याचे मी ऐकले आहे. दुर्दैवाने ते तमाशे पाहण्याची संधी मला कधीच मिळाली नाही.

गेल्या ६-७ वर्षांतील तमाशाविषयीचा माझा अनुभव म्हणजे शाहीर अण्णा भाऊ साठे यांनी लिहिलेल्या तमाशाच्या शेकडो प्रयोगांत प्रत्यक्ष कामे करण्याचाच आहे.

गेल्या पाचसहा वर्षांत अण्णा भाऊंचे तमाशे नागपूरपासून रत्नागिरीपर्यंत व अहमदाबादपासून सोलापूरपर्यंत शेकडो ठिकाणी रंगभूमीवर आणले गेले व ते अक्षरश: लाखो लोकांनी पाहिले. त्यात शहरातील सुशिक्षित मध्यमवर्गीय; वारली, आदिवासी यांच्यासारखे अशिक्षित शेतकरी; गिरण्यात, कारखान्यात राबणारे कामगार, खंडावर जगणारे जमीनदार; धीरगंभीर इतिहाससंशोधक, नावाजलेले नाटककार व कवी; डॉक्टर, प्रोफेसर, पत्रकार, स्त्रिया, मुले इत्यादी समाजातील अनेक थरांचे व धंद्यांचे लोक होते. बहुतेक सर्वांनाच अण्णा भाऊंचे तमाशे आवडले. कारण साधे आहे. महाराष्ट्रीय जनतेच्या हृदयाला भिडणारे, तिची पकड घेणारे असे काही विशेष गुण त्या तमाशात आहेत.

परंपरागत चालत आलेल्या लावण्यांच्या ढंगदार चाली अण्णा भाऊंनी जशाच्या तशाच उचलल्या. साध्या, सर्वांना समजणाऱ्या परंतु प्रभावी अशा शब्दांची व कल्पनांची जोड त्या चालींना दिली. पूर्वीच्या तमाशांत सोंगाड्याच्या विनोदाला मोठे स्थान होते. सोंगाड्या हे तमाशातील सर्वांचे आवडते पात्र असायचे. अण्णा भाऊंनी सोंगाड्याऐवजी आपला नवा 'धोंड्या' निर्माण केला. सहजसुंदर विनोदाला उपरोधाची तीक्ष्ण धार लावली. वर्गजागृत 'धोंड्या' आपल्या वर्गशत्रूंवर जबरदस्त हल्ले करू लागला. जुन्या तमाशातील राधाकृष्णप्रेमावर, उत्तान शृंगाररसावर आधारलेल्या लावण्या व अश्लील कोट्या आणि पाचकळ हावभाव यावर आधारलेला विनोद अण्णा भाऊंच्या नव्या तमाशात आता नवा, साऱ्या जनतेला रुचेल व खुलवील असा नवा साज घेऊन मराठी रंगभूमीला हलवू लागला आहे.

मालकाने 'धोंड्या' म्हणून हाक मारताच तो मालकाला म्हणतो, "माझं नाव धोंडी, डी, डी,! डला या ड्या न्हवं!"

"गाढवा, उलट उत्तरं करतोस मला?" म्हणताच "मी गाढाव न्हाय. माणूस हाय!' धोंडीबाने जबाब दिलाच. हीच वर्गजागृत 'धोंड्याची' साधी उत्तरे कामगार, शेतकऱ्यांच्या हृदयाला गुदगुल्या करतात. त्यांची करमणूक करीतच 'धोंड्या' त्यांना स्वाभिमानाने

जगण्याचे धडे देतो.

अण्णा भाऊंनी आपल्या बहुतेक सर्वच तमाशात जुन्या तमाशातील झगडा या लावणीच्या प्रकाराचा उपयोग अत्यंत कुशलतेने केला आहे. पूर्वीच्या तमाशात झगडा हा राधा-कृष्ण, आषुक-माषुक, प्रिया-प्रियकर यांच्यात व्हायचा. अण्णा भाऊंनी तो झगडा (संगीत सवाल जबाब) राबणारा आणि पिळणारा अशा दोन वर्गाच्या प्रतिनिधींच्या तोंडी घातला. या नव्या तमाशात संपावरचा कामगार काँग्रेसमंत्र्याला सवाल करतो.

*तुम्ही अहिंसावादी । सत्याचे दर्दी । गरिबांची टाळकी का फोडता ?*

आणि मंत्री उत्तर देतो –

*तुम्ही कायद्याला मोडून । शांतता तोडून । संपाचा हैदोस का घालता? ॥*

संपावरच्या कामगारांवर लाठीहल्ला झालेला असतो व डोक्याला बँडेज बांधलेला कामगार काँग्रेसमंत्र्याला वरील प्रश्न विचारतो. मंत्र्याचा उत्तरांतूनच 'कायदा', 'शांतता', 'अहिंसा', 'सत्य' या शब्दांचा प्रेक्षकांसमोर बोऱ्या वाजतो.

अत्यंत काटकसरीने वापरलेले मोजके शब्द अण्णा भाऊंनी लिहिलेल्या या झगड्यात अनेक वेळा इतके प्रभावी ठरले आहेत की तमाशा पाहून गेलेल्या प्रेक्षकांच्या तोंडी कित्येक दिवस ते घोळत राहतात. याचे सुंदर उदाहरण म्हणजे 'माझी मुंबई' या तमाशातील झगडे हे होय. मुंबई शहर महाराष्ट्राला न जोडता स्वतंत्र ठेवावे असे प्रतिपादन करणारे शेटजी, मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राची मागणी करणाऱ्या विष्णूला विचारतात –

*नाना भाषेची । नाना जातींची । तूच मागशी कशी हिला? ॥*

विष्णू उत्तर देतो : (कारण)

*जशी गरुडाला पखं । आणि वाघाला नखं । तशी ही मराठी मुलखाला ॥*

किंवा शेटजी विचारतात :

*आम्ही सोडून घरदार । हिचा वाढवाया व्यापार । पैसा पेरिला का बोला?॥*

विष्णू उत्तर देतो :

*नदीला बगळा । जमून सगळा । टपून बसतो कशाला?॥*

'गरुडाला पखं वाघाला नखं । तशी ही (मुंबई) मराठी मुलखाला' हे कडवे १९४८च्या ऑक्टोबरमध्ये संयुक्त महाराष्ट्र परिषदेत शिवाजीपार्कवर प्रथम घुमले व त्याचे पडसाद अद्याप भिंतीवरच्या पोस्टरांमधून, सभांमध्ये घोषणांच्या रूपाने उमटलेले दिसतात. ते कडवे संयुक्त महाराष्ट्र चळवळीत एक राजकीय घोषणाच होऊन बसले आहे आणि यातच अण्णा भाऊंच्या तमाशांचे वैशिष्ट्य आहे.

मराठी रंगभूमीच्या ऱ्हासाची कारणे सिनेमाचे आगमन, थिएटराची दुर्मिळता इत्यादी गोष्टीत शोधणाऱ्या नाटककार-नटांनी तमाशाच्या बाबतीत अण्णा भाऊंनी अवलंबिलेल्या मार्गाचा अभ्यास करावा. अण्णा भाऊंनी जनतेला सुपरिचित व प्रिय असलेल्या तमाशाच्या

जुन्या ढाच्यात नवे लोकशाही अंतरग ओतून, जनतेच्या लोकशाही स्वातंत्र्य चळवळीशी आपल्या कलेची सांगड कशी घातली, ऱ्हास पावलेल्या किंवा भ्रष्ट झालेल्या महाराष्ट्रीय तमाशाला मराठी जनतेत पुन्हा मानाचे स्थान कसे प्राप्त करून दिले, त्याचा विचार करावा.

आजरे, दि. ९-१२-१९५०  — *द. ना. गव्हाणकर*

परिशिष्ट २

## 'शाहीर' : प्रस्तावना

अण्णा भाऊ साठे यांच्या काही पोवाड्यांचा व लावण्यांचा संग्रह या पुस्तकांत केला आहे. या संग्रहाला मी प्रस्तावना लिहावी अशी अण्णा भाऊंनी इच्छा दर्शविली.

अण्णा भाऊ आणि त्यांचे साथी अमर शेख, गव्हाणकर आणि इतर मंडळी यांच्या काव्यकृती, पोवाडे, लावण्या, गाणी, तसेच त्यांचे तमाशे व नाटके गेली पाच-सहा वर्षे महाराष्ट्रापुढे आहेत. त्यांच्या तमाशावर तर सरकारची करडी नजर पडून ते बंदही पाडण्यात आले. एवढेच नव्हे. तर वऱ्हाडामध्ये त्यांचे पथक तमाशा करायला गेले असता त्या सर्व पथकाला अटक करून विनाचौकशी कित्येक महिने तुरुंगातही डांबून ठेवण्यात आले. पुढे काही दिवस अण्णा भाऊंना भूमिगत राहावे लागले. तर त्यांचे साथी अमर शेख व गव्हाणकर नासिक जेलमध्ये लाठीमार-गोळीबाराच्या हल्ल्यांत तावूनसुलाखून बाहेर पडले. अशा परंपरेच्या लेखकवर्गापैकी अण्णा भाऊ. ते कम्युनिस्ट पार्टीचे सभासद म्हणून त्यांच्या पोवाडे-लावण्यांची चर्चा महाराष्ट्रात होऊ लागली आहे.

कम्युनिस्ट लेखकांच्या साहित्यिक लेखनाला महाराष्ट्रातील नामवंत लेखकवर्गामध्ये अद्याप फारसे मानाचे स्थान देण्यात आलेले नाही. त्यांचे काव्यलेखन 'प्रचारकी' असते. म्हणजे ते 'खरे काव्य' नसते असा त्यांचा आरोप आहे. त्यात उघड उघड 'वर्गीय दृष्टिकोण' असतो हा दुसरा आरोप. आणि त्यात कलेचे तंत्रच नसते व असलेल्या तंत्राची मोडतोडच काय ती त्यात आढळते असा तिसरा आरोप. आणखीही इतर आरोप आहेतच. पण त्या सर्वांची यादी इथे नको.

आमच्या लेखकांची कृती प्रचारकी आहे व तिच्यात वर्गीय दृष्टिकोण आहे हे खरे आहे. आणि हा जर 'आरोप' असेल तर आम्ही 'गुन्हेगार' आहोत. पण कुणाच्या दृष्टीने 'गुन्हेगार?' 'कोणाचा 'गुन्हा' आम्ही करतो?'

अण्णा भाऊंची काव्य-पोवाडे-लावण्या ऐकणारा बहुसंख्य श्रोता कामगार व शेतकरी वर्गातला असतो. त्यांच्या काव्यावर ते खूष होतात. त्यांना स्फूर्ती येते, जीवनात आशा दिसू लागते. आणि म्हणूनच आमचे फड बाहेर पडताच त्यांच्यावर काँग्रेसी सरकारने बंदी घातली. पण लगेच त्याच काँग्रेस पुढाऱ्यांनी लाखो रुपये सरकारी खजिन्यातून व खाजगी भांडलदारांकडून घेऊन स्वतःचे 'भाडोत्री' फड उभारण्यास सुरुवात केली. याचा अर्थ एवढाच की कम्युनिस्ट कलाकारांचे पोवाडे, लावण्या वगैरे कामगार-शेतकरी जनतेला आवडू लागले. त्यांच्या प्रत्यक्ष जीवनावर व आचरणावर त्यांचा परिणाम होऊ

लागला आणि जनमनाची साहित्यमार्गाने पकड घेऊ पाहणारी प्रतिगामी वर्गाची सत्ता आमच्या साहित्यमार्गानेच हादरू लागली. आमच्या काव्यावर व साहित्यावर एका बाजूने पोलिसी हल्ले होऊ लागले तर दुसऱ्या बाजूने 'साहित्यिक' म्हणविणारे काही टीकाकार केवळ कलात्मक चर्चेचा आविर्भाव करून सूक्ष्म व मानसिक हल्ला करू लागले. त्यांच्याकडूनच वरील 'आरोप' येतात.

त्याला उत्तर काय?

प्रथम हे सांगून ठेवणे जरूर आहे की आरोप करणाऱ्यांमध्ये सगळेच आमचे विरोधक किंवा शत्रू नाहीत. उलट सरकारने बंदी घातली असता त्या बंदीविरुद्ध टीका करून आमच्या तमाशा-पोवाड्यांना मोकळीक असावी अशी मागणी करण्यात अनेक साहित्यिक आमच्याशी सहभागी झाले. त्यांच्यामध्येही या तीन कम्युनिस्ट कलावंतांवर वरील आरोप करणारी मंडळी सापडतील. त्यांना उत्तर काय?

आरोपांना उत्तर साधे व सोपे आहे. आमचे कलावंत माणसात राहतात, जनतेत वावरतात, तिच्याशी समरस होतात, तिच्या जीवन-लढ्यात सहभागी असतात. म्हणून त्यांच्या कलेचा आत्मा जनतेशी निष्ठा ठेवून स्फूर्ती घेतो. तिच्यासाठी व तिच्याविषयी ते लिहितात.

ही बहुसंख्य जनता कोण?

ती असंख्य माणसांचा रूपगुणविरहित असा मांसल गोळा आहे की विशिष्टगुणसंपन्न सुबुद्ध असा वर्ग आहे? आमचे म्हणणे असे की केवळ मनुष्यमात्राचा मेळावा म्हणजे जनता असे नव्हे, तर समाजामध्ये जीवनाचा जो प्रचंड व्यवहार चालतो, त्याचा आधारस्तंभ जो कामगारवर्ग, शेतकरी वर्ग व कष्टाळू मध्यमवर्ग, ते मिळून आजची जनता बनते. त्या व्यतिरिक्त जे आहेत ते जनतेच्या बाहेर. आमचे कलावंत या जनतेचे. म्हणूनच ते लिहितात ते या वर्गाच्या दृष्टीने लिहितात.

आमच्या कलावंतांची कृती वर्गीय दृष्टीची असते व असली पाहिजे.

कारण हेच वर्ग समाजजीवनाचे आधार. त्याचे श्रम समाजधारणा करतात. स्वत:ला पोसून ते त्याच्या जीवावर जगणाऱ्या वर्गाला पोसतात. अधिष्ठित भांडवलदार-जमीनदार वर्ग मात्र त्यांना राबवून दारिद्र्य व दु:खात ठेवून आपली वर्गसत्ता व समाज चालवू पाहतात. पण हे दिवसेंदिवस कठीण होत आहे. जुन्या सरंजामी-भांडवलदारी आर्थिक संबंधांवर आधारलेला समाज मोडत चालला आहे व मोडला पाहिजे.

ते केल्यानेच आपल्यावरचा दारिद्र्याचा, दु:खाचा डोंगर उखडून पडेल.

त्या कार्यासाठी कामकरी-शेतकरी वर्गाला उत्स्फूर्त करणारे, त्यांची सुखदु:खे गाणारे, त्यांचे वीरत्व-शौर्य, जयापजय सांगणारे काव्य निर्माण करणे हे आमचे उघड उघड ध्येय आहे. तसे करणे 'गुन्हा' असेल तर आरोप कबूल!

म्हणून कम्युनिस्ट कलावंतांची कृती वर्गीय दृष्टिकोनाची असते व ती प्रचारकीही असते. पण हा गुन्हा नाही.

कारण वर्गबद्ध समाजाच्या साहित्यामध्ये आजपर्यंत ज्या ज्या नामांकित कलाकृती झाल्या, त्या प्रचारकीच होत्या. उत्तम कला प्रचारकी होतेच व उत्तम प्रचार हा कलात्मक बनतो. उत्तम कलेचा विषय मनुष्य असल्यामुळे व मनुष्याचे जीवन व आत्मा वर्गबद्ध समाजामध्ये वर्गीय गुणांनी वेढलेला असल्यामुळे, त्या कलेला वर्गीय स्वरूप येतेच येते. परंतु या मुद्द्याचा जास्त ऊहापोह छोट्याशा प्रस्तावनेत शक्य नाही.

मराठी वाङ्मयाचेच बोलायचे तर विचारून पाहा, की महानुभावांचे गद्य दडविले का गेले? त्यांची सुंदर काव्यकृती, 'रुक्मिणी-स्वयंवर' आदी मराठी भाषेतील आद्य ग्रंथ लुप्त करण्यात का आले व कोणी केले? विचारून पाहा की ज्ञानेश्वरीकर्त्यांवर जुलूम का झाले, तुकारामी गाथा बुडविली का व कुणी? आणि तरीसुद्धा जनता त्यांना विसरली का नाही? आणि कोण म्हणले की त्यामध्ये कला-काव्य नाही, त्यात प्रचार नाही वा त्यात वर्गदृष्टी नाही?

अण्णा भाऊंच्या काव्यामध्ये कामगार-शेतकरीवर्गाची दृष्टी आहे. त्यांचे लढे, त्यांची सुखदु:खे आहेत. 'मुंबईचा गिरणी कामगार', 'तेलंगणचा शेतकरी' वगैरे पोवाड्यांमध्ये ही वर्गदृष्टी तर अगदी उघड व स्पष्ट आहे.

पण निव्वळ त्यांची वर्णनात्मक लावणी घेतली तरीसुद्धा त्यात वर्ग दिसतो. जनता दिसते, तळमळ दिसते. मला वाटते, त्यांची 'मुंबईची लावणी' ही अगदी अजोड कृती आहे. मुंबईची वर्णने अनेक आहेत. परंतु इतके सुंदर व भावपूर्ण वर्णन दुसरे नाही. पण ही अशी मुंबई कुणाला दिसू शकते? व तिचे दुर्गुण दिसूनसुद्धा त्यांतून मार्ग काढून दाखविणारा सूर कोण काढू शकेल? कामगारवर्गाचा कवीच ते करू शकतो.

माझ्या म्हणण्याचा अर्थ असा नव्हे की ही लावणी आणखी चांगली होऊ शकणार नाही. मुद्दा असा की अशा रूपगुणांची कला कोण साधू शकतो?

काही टीकाकारांचा आरोप असा आहे की वर्ग व प्रचारावर नजर ठेवणाऱ्या कम्युनिस्ट कवींना दुसरे काहीच दिसत नाही. त्यांना भाषेचा व राष्ट्राचा अभिमान व कर्तृत्व दिसत नाही.

या आरोपाला उत्तर अण्णा भाऊंचा 'महाराष्ट्राची परंपरा' हा पोवाडा आहे.

महाराष्ट्रावर अनेक कवींनी काव्यरचना केली आहे. त्या सर्वांची तुलना करून पाहणे शक्य नाही. पण रामदासांचे 'आनंदवन भुवन', टेकाडे यांचा 'महाराष्ट्र', गडकरींचे 'कृष्णाकाठी कुंडल', किंवा माधव जूलियन, विनायक, टिळक, तांबे व इतर नामवंत कवींच्या कृतीमध्ये महाराष्ट्राचे व मराठीचे जे दर्शन घडते, त्यामध्ये ज्या भावना स्फूर्त होतात, त्यात जो कल्पनांचा व भाषेचा विलास दिसतो, त्यापेक्षा निराळे व वैशिष्ट्यपूर्ण

दर्शन अण्णा भाऊंच्या 'महाराष्ट्रा'त दिसते हे सांगायला नको. स्पष्टीकरणार्थ उतारे देऊन जागा अडवीत नाही.

आमच्या कवींना आपल्या वर्गाचा अभिमान आहे, मराठी भाषेचा अभिमान आहे, महाराष्ट्राचा आहे, तसेच हिंदुस्थानचा आहे. अण्णा भाऊंच्या काव्यात हे अगदी स्पष्ट दिसते.

पण आमच्या राष्ट्र आणि वर्गाभिमानी दृष्टीच्या जोडीला आंतरराष्ट्रीय अभिमानाचीही दृष्टी असते. आमच्या देशाबाहेर आमचे दोस्त कोण व दुष्मन कोण हेही आमचे कवी ओळखू शकतात, एवढेच नव्हे, तर त्यावर कवनेही करू शकतात.

आजची दलित जनता ही आंतरराष्ट्रीय आहे; कामगारवर्गाचे तत्त्वज्ञान त्या आंतरराष्ट्रीयत्वामध्ये आपले दोस्त हुडकते. आणि आमचे कवी त्यांची कवने गातात — हे कम्युनिस्ट कवींचे वैशिष्ट्य इतरात दिसणार नाही.

तुर्की कवी नाझिम हिकमत तुरुंगात पडला असता हिंदी कामगारांची आठवण आपल्या काव्यात करतो. चिलियन कवी पाब्लो नेरूदा स्तालिनग्राडच्या लढाईवर लिहितो, तसेच सोविएत कवी तुर्सुन जाद हिंदुस्तानच्या अस्पृश्य कामगाराबद्दल काव्य लिहितो. कामगार वर्गाच्या या तत्त्वज्ञानाने, मार्क्सवादाच्या दृष्टीने जगाकडे पाहणारे कवीच काय ते अशी विश्वव्यापी, मानवताग्राही दृष्टी घेऊन प्रगतिमान वर्गनिष्ठ असे काव्य निर्माण करू शकतात.

अण्णा भाऊंच्या पोवाड्यांत स्तालिनग्राड, बर्लिनचा पाडाव, वगैरे विषय येऊ शकतात, याचे कारण मॉस्कोहून तसा 'हुकूम आला' म्हणून नव्हे; तर त्या घटनांनी जनतेला व कवीला खरोखरीचे हलविले. त्या घटनाशी त्याला आत्मीयता वाटली म्हणून. मराठी भाषा, महाराष्ट्र देश, आपला कामगारवर्ग आणि स्तालिनग्राड या सर्वांची गुणसंग्राहक अशी आत्मीयता कम्युनिस्ट कवीच्या कृतीत दिसल्याने अनेक थोतांडी राष्ट्राभिमान्यांच्या पोटात दुखू लागते हे खरे. त्यांना हेवा वाटतो की जगातला कुठचाही नामवंत कवी डंकर्क किंवा हिरोशिमावर काव्य करू शकला नाही. पण स्तालिनग्राड मात्र गाइले गेले. हे टीकाकार आज चिडून कम्युनिस्ट साहित्यावर हल्ला करीत आहेत. तरी पण याच पुरोगामी साहित्याशी दिशा बळावत जाणार हे नक्की. कारण इतिहासाच्या गतीची दिशाच तशी आहे.

हे जरी असले तरी अण्णा भाऊंच्या काव्यांत दोष नाहीत किंवा त्यावर टीका होऊ शकत नाही असे नव्हे.

अण्णा भाऊ व त्यांचे सहकारी यांच्या कलाकृतीमधून साहित्यामध्ये काही नवीन प्रश्न उत्पन्न होतात. उदाहरणार्थ नवे वर्ग, नवा समाज, किंबहुना नवा निसर्ग, नवी हत्यारे-अवजारे, त्या भोवतालच्या नव्या भावना या सर्वांची घडण करताना काव्याच्या साच्यामध्ये

काय फरक होऊ शकतात? जुना साचा वापरताना त्याची नव्या विषयाशी विसंगती आली तर ती कशी सोडवायची? या नव्या वर्गीय काव्यात नव्या भावनांचे चित्रण पाहिजे आहे तसे होत आहे का? असे प्रश्न उभे राहतात.

'महाराष्ट्राची परंपरा' हा पोवाडा लिहिताना ब्रिटिश अमदानीतील साम्राज्यविरोधी चळवळीचा वृत्तान्त मराठ्यांच्या जुन्या लढायांना पुस्ती म्हणून जोडून पूर्ण करण्यापलीकडे त्यात जास्त वैशिष्ट्य काय असा प्रश्न होऊ शकतो. संत वागीश्वर, शिवाजी-मावळे, आंग्रे-मराठे आमचे जुन्याच काव्यांतले व परिचयाचे. उमाजी नाईक व फडकेही जुन्या काव्यांत आहेतच. त्यांची परंपरा घेताना असे काय वैशिष्ट्य तुम्ही दाखविले असे कोणी विचारले तर?

या ठिकाणी कबूल करावे लागेल की जुन्या इतिहासाची परंपरा सांगताना अण्णा भाऊंनी केवळ 'परंपरागत' इतिहासच हाताळला आहे. त्यातील जनता व वर्ग याचे योग्य दर्शन त्यांना मिळालेले नाही.

उदाहरणार्थ, मराठी भाषेच्या विकासाची व मान्यत्वाची लढाई म्हणजे महाराष्ट्राच्या राष्ट्रीयत्वाच्या एका मूलभूत अंगाची लढाई. ती ज्ञानेश्वराने सुरू केली नसून त्या पूर्वीची आहे. अण्णा भाऊंना महानुभाव कवींनी जे दलित जनतेचे लढे केले व ज्या लढ्यांनी मराठी भाषेला राज्यावर बसविले त्यांची माहिती दिसत नाही. देवगिरीच्या व त्या आधीच्या यादव राज्याच्या घडामोडीतील वर्गलढे, तसेच मराठी जनतेच्या गद्य-पद्यांच्या जमीनदार-राज्यांच्या संस्कृतीशी व संस्कृताशी झालेल्या लढाया अद्याप आपल्या इतिहासकारांनी उघड करून दाखविलेल्या नाहीत. म्हणून ही न्यूनता त्यांच्या काव्यात दिसते. सरंजामी इतिहासाला केवळ कामकरी-संपाची पुस्ती जोडल्याने नवी परंपरा बनत नाही हे अजून आपल्या साहित्यिकांना स्पष्ट व्हायचे आहे. लढाऊ कामगारवर्गाची ऐतिहासिक परंपरेशी सांगड घालतेवेळी नवोदित समाजाच्या कलेला इतिहासही नव्याने सांगावा लागेल. म्हणून इतिहासदत्त संस्कृतीचे मार्क्सवादी दृष्टीने पुनर्वाचन करूनच महाराष्ट्राचे यथार्थ दर्शन काव्यात होऊ शकेल. ते करून देण्याचे कार्य अण्णा भाऊ व त्यांचे साथी यांना पुन्हा हाती घ्यावे लागेल.

कम्युनिस्ट साहित्यिकांपुढे दुसरा आणखी एक प्रश्न आहे. क्रांतिकारक वर्गांच्या श्रमाची, संघर्षाची जी साधने आणि भूमी, त्यांना कलेचा लेप देऊन सजवायचे कसे? त्यातील काव्यमय आत्म्याचा आविष्कार कसा करावा? त्यामध्ये काव्यरस भरावा कसा? उदाहरणार्थ, मराठी काव्यातला पोवाडा घ्या. हा बहुतांशी वीरांची आख्याने गाण्यासाठी वापरला जातो. त्याचा साचा, त्यातील वर्णने, कल्पना, उपमा वगैरे, सरंजामकालीन हत्यारे, युद्धपद्धती, तसेच वर्गसंबंधातून उद्भवणाऱ्या तत्कालीन भावना यांना अनुसरूनच पोवाड्यांतील काव्याचा परिपोष करतात. जुने पोवाडे अजून महाराष्ट्रीयांना

हलवू शकतात.

तीच पोवाड्याची काव्यपद्धती जर बर्लिनच्या युद्धाला अथवा मुंबईतील खलाशांच्या बंडाला किंवा संपाला लावली तर त्यात मूलभूत असे फरक काय व्हायला पाहिजेत, याचा कलेच्या व तंत्राच्या दृष्टीने विचार झाला पाहिजे. तसेच नवीन वर्गाच्या जीवनाला अनुरूप असा काव्यात्मा निर्माण करण्याच्या दृष्टीने त्याचा खोल विचार व्हायला पाहिजे. सिहगडच्या पोवाड्यात वीरश्रींचे विशिष्ट पद्धतीने वर्णन असते. पोवाड्यातला वीर क्रोधाने लाल होतो. तलवारीचे हात करीत उडी घेतो, युद्धाचे आव्हान येताच इष्कांतून उठून स्त्रियांची कत्तल करून नंतर रणात उतरतो, वगैरे.

पण अलीकडचा सेनापती क्रोधाने लाल होत नाही. तलवारीचे हात करण्याची त्याला जरुरी नसते. स्वत:च्या स्त्रियांची कत्तल किंवा जोहार तर दूरच राहो! तरी पण तो शूर असतो, युद्धकौशल्य जाणतो. जुन्या पोवाड्यांची तलवार, घोडा, घोरपड, गडकिल्ले याभोवती परंपरेने सांधविलेली भावना जशी 'सिंहगड' वाचताना श्रोत्याला हलविते, तशी जिच्यामुळे आर्टिलरी, विमान, टँक व शहरातील बॅरिकेड यांच्याभोवतीही आपल्या भावना हलू शकतील अशी काव्यशक्ती नव्या कलावंतांची असली पाहिजे. तरच पोवाड्याचे जुने पण स्फूर्तिदायक सुंदर तंत्र नव्या वर्गाच्या लढ्यांना सजवू शकेल.

अण्णा भाऊंच्या काव्यामध्ये याची जाणीव दिसून येते. पण ती अद्याप परिपूर्णतेला पोचलेली नाही. खलाशांच्या बंडाचा भाग लिहिताना खलाशांच्या नौकांचे व युद्धाच्या तयारीचे सुंदर शब्दांत त्यांनी वर्णन तर केलेच आहे. पण त्याच्यापुढे जेव्हा कामगार संप करून खलाशांच्या मदतीला जातात त्यावेळच्या वर्णनात जुनी धाटणी आणि नवा वर्ग याची सांगडही त्यांना घालता आली आहे असे मला वाटते. उदाहरणार्थ —

*ती हाक ऐकता कामगार मग उठला*
*खलाशाला सहाय्य करण्याला ।*
*संपाचा घण मग त्याने हाती घेतला*
*हादरले वायुमंडळ असा गर्जला ॥*
*कारखाने आणि गिरण्याला थांबवून पार यंत्राला*
*कारभार ओस पाडिला सामसूम केले नगराला*
*कामगार आला रस्त्याला ।*
*उभारून भुईकोटाला*
*दमगीर केला मशिनगनवाला ।*
*तो शिवाजी पार्कला हातघाईवर आला*
*परळात प्रलय मांडिला । विसरून देहभानाला*
*त्यानं लालबागला लाल रंग आणिला ।*

तरी पण सार्वत्रिक संपासारख्या अत्यंत प्रखर हत्याराचे वर्णन रसात्मक व्हायला, व शहराच्या सामसुमीचा क्रांतिकारक अर्थ समजायला श्रोता शहरी असला पाहिजे. चालत्या कारखान्यांची व धावत्या समाजजीवनाची भावना त्याच्या मनामध्ये रुजली असली पाहिजे. तरच या ओळींचा काव्यमय परिणाम त्याच्यावर होऊ शकेल. उदाहरणार्थ, संपाचे आणखी वर्णन पाहा—

*कामगार मैदानी आला*
*गिरण्यांची तोंडे दाबुनि साचा बंद केला*
*त्रासनात आऱ्या जाहला ।*
*थैली फेकून बाजूवाला झाला बाजूला ।*
*कपड्याचा हात मोडला ।*
*तिरिमिरी आली धोट्याला ।*
*रोवीण केट भुलेरात गोंधळ माजला ।*
*मढ्यासमान पडल्या गिरण्या प्राणचि गेला*

या वर्णनात काव्य कुणाला दिसेल व कुणाला नाही ! ज्या वर्गाचे जीवन धोट्याला बांधलेले आहे, त्याला ते दिसेल. पण त्या धोट्यावर ऐतखाऊ मालकी सांगून, धोट्याच्या धावीमधून धन उत्पन्न करणाऱ्या श्रमकर्त्या कामगारवर्गाला जे छळू पाहतात त्यांना नाही दिसणार! भांडवलदारवर्गाशी लढून ज्यांनी आतापर्यंत संगर केले, ज्यांची मुलेबाळे, गणगोत त्या संगरामध्ये लढली, ब्रिटिश साम्राज्य व प्रतिगामी हिंदी भांडवलदार यांच्याशी लढून जे वीर बनले, त्या वर्गाला, त्याच्याशी बंधुभाव ठेवणाऱ्यांना हे काव्य दिसू शकते. काव्य निर्माण करण्यासाठी जशी जनताग्राहक वर्गदृष्टी लागते, तसेच त्यातील भावनांमुळे फुलून जाणाऱ्यांसाठीही तशीच मनोमय घडण लागते. बाजीराव सरंजामदारांना सिंहगडचा पट्टा कळेनासा झाला. त्यांना लावणीच्या कमरेची लचकच काय ती समजे. तिथे शिवकालीन अज्ञानदास कवीचे कर्तृत्व काय करणार? त्याचप्रमाणे अण्णा भाऊंच्या धोट्याशी तिरिमिरी आणि भुलेराचा गोंधळ शेठजीच्या समाजाला कळला नाही तर त्यात त्यांचा काय दोष? पण क्रान्तिकारक कामगारवर्गाला तर कळेल.

वाङ्मयाकडे आणि विशेषत: मराठी वाङ्मयाकडे पाहण्याची आमची दृष्टी कशी असावी याची थोडीशी चर्चा 'जनता आणि वाङ्मय' व 'माझी मराठी' इत्यादी प्रबंधांत झालेली आहे. त्याचप्रमाणे एप्रिल महिन्यात कलकत्यामध्ये कम्युनिस्ट साहित्यिक, टीकाकार व कलावंतांची जी बैठक झाली त्यामध्ये यासंबंधी बरीच चर्चा झाली. भाषावार राज्यरचना नसल्यामुळे व अशा रचनेला प्रतिगामी राज्यकर्त्यांचा विरोध असल्यामुळे मराठी भाषेचा, तसेच संमिश्र राज्यांतील इतर भाषांचा कसा कोंडमारा होतो, त्यांच्या विकासाला कसा अडथळा येतो याची तेथे चर्चा झाली. भाषावार राज्यरचनेची चळवळ

जनतेची आहे व तिला चालना देण्यासाठी आपल्या भाषेचे, साहित्याचे, इतिहासाचे शास्त्रशुद्धदृष्ट्या नीट वाचन व अध्ययन करणे किती आवश्यक आहे याची चर्चा झाली. तेथे जमलेल्या मराठी, बंगाली, तेलगू, तामिळ, गुजराती, हिंदी वगैरे भाषांच्या साहित्यिकांनी आपापल्या भाषांतून व आपल्या विशिष्ट संस्कृतिगुणांना अनुलक्षून जनतेच्या व कामगार-शेतकरी वर्गाच्या स्वातंत्र्याला व जीवनाला पोषक व त्यांच्या जीवनलढ्यांचे विजयी हत्यार बनू शकेल असे साहित्य व कला निर्माण करण्याचा निश्चय केला. अण्णा भाऊ साठे व त्यांचे सहकारी मित्र त्यांच्या त्या कार्याला ही प्रस्तावना पोषक होवो अशी आशा व्यक्त करून ती संपवितो.

मुंबई, दि. १६-४-१९५२ — *एस. ए. डांगे*

परिशिष्ट ३

# 'प्रातिनिधिक कथा' : प्रस्तावना

तसे पाहिले तर मराठी साहित्याने अनेकांना नगण्य गणले आहे. साहित्यात ज्यांचे कर्तृत्वच नाही किंवा सुमारच आहे, त्यांचा विचार न होणे स्वाभाविक आहे, अशांचा विचार व्हायला हवा असा आग्रह कुणी बाळगणार नाही, तसा आडमुठेपणा कुणाकडून घडणार नाही असे नव्हे; पण ते इष्टही नव्हे. मात्र ज्यांच्या भाळी कर्तृत्वाचे शिरपेच खोवले गेले आहेत त्यांचा विचारच बाजूला टाकणे, विचार करण्याच्या आड येणे किंवा त्याकडे साफ काणाडोळा करीत राहणे हे निश्चित आडमुठेपणाचे आहे; ते न्याय देण्याचे काही कृत्य नव्हे. अनाठायी आडमुठेपणा वंध्येसारखा झिंझाडणाराच असतो.

अण्णा भाऊ साठे यांच्या वाट्याला असे न्यायदान आले आहे. कर्तृत्वच नाही म्हणून विचारही नाही असे अण्णा भाऊंच्या बाबतीत घडते तर त्याबाबत नको तो अप्रस्तुत आग्रह बाळगण्याचे कारण नव्हते. पण बहुतांशी सारे काही असूनही, उपेक्षिततेचा गाळाच अण्णा भाऊंच्या माथी बसावा, ही अण्णा भाऊंची साहित्यिक शोककथा आहे.

अण्णा भाऊंच्या चाहत्यांनाच ही कथा शोककारक होती असे नव्हे, तर खुद्द अण्णा भाऊंनाही त्याची सल सलत होती असे दिसते. क्वचित केव्हा ती घडणाऱ्या अण्णा भाऊंच्या भेटीतला एक प्रसंग; त्या संदर्भाने अण्णा भाऊंचे प्रकट झालेले मनोगत आठवते.

१९६४-६५ मधली गोष्ट. साताऱ्याच्या 'रजताद्रि' हॉटेलसमोर उभे राहून अण्णा भाऊ उभ्या उभ्या बोलत होते :

"तर त्याचं काय आहे ... हं ... कोण बरं ती बाई? ... जिनं तो इतिहास लिहिला ... मराठी कादंबरीचा इतिहास हो ... काय बरं नाव तिचं? ... डोळ्यांसमोर आहे हो."

अण्णा भाऊंच्या आठवणींचा पडदा पकडून मी म्हटले होते, "... त्या ना? त्या कुसुमावती देशपांडे ..."

"हां ... बरोबर बघा. तीच ती तुमची देशपांडे ..." अण्णा भाऊंनी हातावर टाळी देत म्हटले होते.

"... काय केलं देशपांड्यांनी अण्णा भाऊ?" मी सहज विचारले.

"अहो, काय केलं काय विचारता? या बाईनं तो इतिहास लिहिला ..."

"मराठी कादंबरी : पहिले शतक १८५०-१९५० (पूर्वार्ध व उत्तरार्ध)" मधल्या जागा मी भरून काढल्या.

"हं, तर तोच ... काय तो इतिहास पण बघा. एवढा मोठा इतिहास लिहिला. बरा लिहिला, चांगला लिहिला असं पुण्या-मुंबईकडं विद्वान साहित्यिक बोलतात. पण बाईला आमची एकही कादंबरी दिसली नाही. अख्ख्या इतिहासात चुकून नावसुद्धा नाही. हे असं आहे." हे बोलताना, अण्णा भाऊंचा आवाज कातर झाल्यासारखे मला वाटले. डोळ्यांत विलक्षण विषण्णतेची गडद छाया तरळून गेल्याचाही भास झाला. अण्णा भाऊंची व्यथा जाणवली.

१९६४-६५ मध्ये केव्हा तरी अण्णा भाऊ सातारला आले होते. सोबत शाहीर गव्हाणकर आणि इतर अनेक मंडळी होती. सातारच्या हजेरी माळावर 'फकिरा'च्या चित्रीकरणासाठी त्यांचा तळ पडला होता. 'फकिरा'मधील ब्रिटिश सोल्जरांच्या प्रसंगासाठी एन्.सी.सी.मधील कॅडेट्स् हवे होते; म्हणून छत्रपती शिवाजी कॉलेजच्या आम्हा एन्.सी.सी. अधिकाऱ्यांशी शाहीर गव्हाणकरांनी संपर्क साधला होता; तर त्या वेळचे सातारचे कलेक्टर एम्.ए. देशमुख यांना चित्रीकरणाच्या परवानगीपूर्वी, हजेरी माळाचा वापर करू देण्याआधी मूळ 'फकिरा' कादंबरी वाचण्याचा सोस सुटला होता. (कारण अण्णा भाऊ वगैरे कम्युनिस्ट असल्याने, त्यांना त्यांच्या दृष्टीतून आवश्यक तरतुदींची पूर्तता करणे हे परमकर्तव्य वाटत होते.) त्यासाठी अण्णा भाऊंनी मला गाठले होते. त्या संदर्भाने गाठीभेटी, चर्चाविनिमय घडत गेला. प्रा. कुसुमावती देशपांडे यांच्या 'मराठी कादंबरी'मधील स्वत:चा अनुल्लेख अण्णा भाऊंच्या बोलण्यातून अशाच एका प्रसंगाने उभारून आला. मात्र अण्णा भाऊंची ही व्यथा कथा बनून राहिली नाही.

अण्णा भाऊंची व्यथा पोटतिडकीची होती. त्यात द्वेष नव्हता, पण राग होता. कुसुमावतीबाईंच्या तिरकस उल्लेखामागे, एवढ्या मोठ्या समाजशील विद्वत्तेला अद्यापही 'मूल्य' जोखता येत नाही याबद्दल कडकडीत भावना होती. विखार निश्चितच नव्हता, मात्र 'उद्या-परवा केव्हातरी; आम्ही अगर आम्हापैकी कुणीतरी बच्चमजी पटवून देऊ; पटवून घ्यायला लावू' असा निर्धार होता. काळ्याकरंद अंगकांतीमधून टकटकणाऱ्या दोन डोळ्यांत 'आमचं न्याय्य आहे. आम्ही ते सोडणार नाही. का सोडू? कशासाठी सोडू? मात्र तुमचं तुम्हाला सोडायला लावण्याखेरीज गत्यंतर ठेवणार नाही,' असा विलक्षण गहिरा आत्मविश्वास उतू जात होता. अण्णा भाऊंचा आविर्भाव हा खास करून अण्णा भाऊंचाच होता. त्याला तुलना नव्हती.

अण्णा भाऊंच्या हृदयात व्यथा होती; पण व्यथेपोटी वाया जाणे नव्हते. अण्णा भाऊंची ती हिंमत होती. स्वत:च्या बळावर प्रचंड कातळामध्ये स्व-कर्तृत्वाचे शिल्प खोदणाऱ्या अण्णा भाऊंसारख्या प्रतिभावंताला स्तुतिनिंदेचे सोयरसुतक नसते. स्तुतीचे यश तो पचवितो आणि अपयशाचे कडूजहर घुटके गिळतो : सारे रस्ते यशाकडे न्यावेत ही त्यांची दृष्टी असते. ह्या सरळ गणिती दृष्टीने, चढत्या-वाढत्या भूमिती श्रेणीने अण्णा

भाऊंनी मी मी म्हणणाऱ्यांच्या पंक्तीत मानाचे पान पटकावले. 'ऐतिहासिक साहसरम्यता', 'चित्रपटासाठीच बेताव्यात अशा कथावस्तूंची रूपसिद्धता', आणि 'सामाजिक जाणीवांच्या वेदनांचा विद्रोह' या त्रि-सूत्रीचे अलोट बळ पोतडीत बाळगणारा अण्णा भाऊंसारखा कलावंत जुन्या चाकोऱ्या मोडतो, नव्या निर्माण करतो. इतरांसमोर सतत आव्हानांमागून आव्हाने ठेवणे आणि इतरांनी दिलेल्या आव्हानांना त्याहूनही मोठे वादळ बनून त्यावर स्वार होणे हे महत्त्वाचे मानतो. अण्णा भाऊंनी उमलत्या वृत्तीने ते केले.

अण्णा भाऊ सतत लिहीत होते; फिरत चालत होते. प्रत्येकाच्या जीवनाचा एक 'स्वधर्म' असतो. तो जाणणे जरूर असते. त्याची ओळख करून घेणे आवश्यक असते. प्रत्येकाच्या जीवनाचा एक स्वधर्म असतो; म्हणजे त्याला तो जाणता येतो किंवा त्याने जाणलेला असतो असे नाही. स्वधर्माची ओळख हा मोठेपणाच्या मार्गावरला एक सोपान असतो. अण्णा भाऊंना त्याची जाण पुरेपूर लाभली होती. एरवी सलणारी कुठलीही व्यथा मनात राखून वागणे-वावरणे हे दुसरे मरणच असते. तसाच झळझळीत आत्मविश्वास आणि आत्मबळ असल्याखेरीज हे मरण टळत नाही. पण अण्णा भाऊंनी प्राकृतिक मरणाखेरीज अन्य मरण मुळी स्वीकारलेच नाही; नेहमीच टाळले, पार फेकून दिले. त्यामुळे वंदण्या-निंदण्याचा हर्षखेद झाला तरी त्यातून खुंटणे घडले नाही. खुंटणे हे आणखी एक प्रकारचे मरणच असते. मरणाचेच ते दुसरे नाव आहे. पण काहीही घडो, खुंटले जाणे हा अण्णा भाऊंचा प्रकृतिपिंड नव्हता. साहजिकच आपल्या स्वधर्माशी अण्णा भाऊ थटून राहिले. या थटून राहण्याच्या बुडाशी बलदंड जीवनासक्तीचा धाराप्रवाही झरा दिसतो. त्यातून अण्णा भाऊंच्या हाती जिण्याचे आणि लेखनाचे एक प्रयोजन आले. त्याची कक्षा न ओलांडता अण्णा भाऊंनी ते प्राणपणाने जपले. साहित्यिक अण्णा भाऊंचे सृजन या 'प्राणपणा'त आहे.

अण्णा भाऊंनी, मराठी साहित्याच्या क्षेत्रात पाचपंचवीस दुर्वा आणि फुले रुजविली, रक्त आणि अश्रू शिंपडले, वेदना आणि विद्रोह पेटविले; त्या साऱ्यांच्या पायखुणा इतक्या जबऱ्या आहेत की, त्या ओलांडून पुढे जाणे अशक्य आहे. त्यांनी चाकोरलेल्या पायवाटा बुजविणे शक्य नाही आणि त्या दिशेने नवे मार्ग चोखाळल्याखेरीज गत्यंतर नाही, हे त्यामधील मूळ सूत्र आहे. त्या दृष्टीने मराठी साहित्याच्या इतिहासात अण्णा भाऊंच्या लेखनाकडे दुर्लक्ष झाले आहे. दिलदार पिळदारपणा हा अण्णा भाऊंच्या स्वभावाचा आणि पौरुषसंपन्न पेचदारपणा हा त्यांच्या अखंड लेखनाचा धर्मच आहे. आपल्या अखंड, एकसूत्रात्मक आणि सलग साहित्यात अण्णा भाऊंनी मराठी मातीचे लावण्य आणि मराठी अंगामनाची पौरुषता यांचे चैतन्यशाली व सामर्थ्यवान चित्र रेखाटले : मग ती कादंबरी असो, कथा असो, नाटक असो. वग, तमाशा किंवा पोवाडा-असे काहीही असो; वशिड तटतटलेल्या मदमस्त बैलाच्या अंगांगात सणसणून राहिलेल्या रगीसारखी रग ही अण्णा

भाऊंच्या साहित्याची नस आहे आणि त्यांच्या जीवनातला सहज ऋजुभाव साऱ्या साहित्याला गळामिठी घालून आहे हे अधिकच आहे. त्यामुळेच तर, गावकुसाबाहेरच्या घाणेरड्या वस्तीत दारिद्र्याचे दशावतार भोगलेल्या विषमतेच्या चरकात जीव पिळून निघालेल्या अंगावरची लवही दिसू नये अशा दारुण अवस्थेत पिचत पडलेल्या आणि सगळ्या परंपरांनी नकार दिलेल्या समाजावर अण्णा भाऊंनी आगपाखड केली नाही. नस्त्या आक्रस्ताळेपणाला वाव राखला नाही. मानवी जीवनातल्या ऋजुभावनेला साथीला घेऊन, क्षमाशील संतवृत्तीने अण्णा भाऊंनी 'माणसा'चे अलोट दर्शन घेतले. पंढरीच्या वारकऱ्याच्या धारणेने त्यांनी हे केले. जिथे माणसाला जगणे शिकवायचे आहे, माणसाने माणूस म्हणून जगण्याखेरीज त्या जिण्याला अर्थच नसतो, पण माणूस म्हणून जगायचे तर कसे जगायचे याचे आत्मबळ द्यायचे आहे, तिथे गर्भगाभे लाजाळूच्या बांधिलकीने हळुवारपणे हाताळावे लागतात; मर्मबंधांची उकल अवचटपणाने करून चालत नाही. अण्णा भाऊंनी हे इतक्या समर्थपणे जाणले होते की, तसे आणि तेवढ्या पातळीवरचे जाणणे क्वचितच घडते. यासाठी मनाजवळ नैतिक दृष्टीची धार्मिकता असावी लागते. अण्णा भाऊंच्या ठायी ही नैतिक तपश्चरणाची दृष्टी होती. त्यामुळे तर, साम्यवादाच्या टिळेमाळा घालूनही अण्णा भाऊंनी प्रचारी साहित्याचा हिणकसपणा निपटून काढण्यात यश घेतले आणि वैफल्यग्रस्त बनून माणसांना विद्रूप करण्याचे टाळले. उलट जे 'रंगविणे' अशक्य अशी कल्पना आणि रंगविणे शक्यच झाले तर त्याला साहित्याची कळा लाभणे केवळ असंभव अशी परंपरागत धारणा, ते अण्णा भाऊंनी सहजभावाने रंगवून दाखविले. अण्णा भाऊंची ही मान्यताप्राप्त खेळी, साहित्यनिर्मितीला आणि साहित्यसमीक्षेला नवे वळण आणि दिशा देणारी ठरली. अण्णा भाऊंसारख्या मांग जातीत जन्माला आलेल्या, मातीखालच्या मातीत गाडल्या गेलेल्या मराठीतल्या पहिल्या बंडखोर दलित साहित्यिकाची, मराठी साहित्यक्षेत्राच्या शेजसरीतील सगळी सफर मरगळत्या जीवनात प्राण ओतणारी आहे. सर्वस्पर्शी क्रांतीचे – बदलाचे – रणभूत जागवून अण्णा भाऊंनी मराठी साहित्याला लागलेला दारकोंड काढला, त्याला ताटी लावली आणि त्याचे महाद्वार बनविले. त्यातून अवघा सामान्य इकडेतिकडे करताना पाहिला. उघडउघड अर्धाकच्चा काळ असताना, अण्णा भाऊंनी हे केले. ते त्यांचे मोठेपण आहे.

अण्णा भाऊंनी अनेक साहित्यप्रकार हाताळून आपल्यातील लेखकाचे अनिर्यत्त्व प्रकट केले. माणसात लेखक होता. त्यामागे परिस्थितीची तराटणी होती, तिच्या बुडाशी प्रेरणांची नागीण सळसळत होती, लेखकाच्या विशिष्ट प्रतिभेची जात ओसंडत होती आणि वाचकवर्गाची निश्चिती डोळ्यांसमोर तरळत होती. – एवढ्या साम्यंतर कलाकृतींचे सृजन अटळ होते. अण्णा भाऊ त्याचे साधन झाले. त्यांनी ते केले आणि धक्के बसले. आक्षेपही झाले. ज्यांना लौकिकार्थातील वेगळेपणाचे धक्के बसलेल्यांनी

ते समजावून घेतले. वेगळेपणाचे सामर्थ्य आणि सौंदर्य, रूप आणि स्वरूप असे ह्या समजून घेण्याचे रूपरंग होते. पण असे काही नाहीच, कुठले काय झाले आहे नवीन? अशी ज्यांची धारणा होती, त्यांच्याकडून आक्षेप येत गेले. काही आक्षेप न कळण्यातून तर काही दूषित दृष्टीतून अशी ह्या आक्षेपाची मांडणी होती. अण्णा भाऊ उच्चभ्रू नव्हते, मांग; म्हणजे दाणगट; रांगडे उच्चभ्रूंसारखे कलाबतूपूर्ण वाङ्मय त्यांना कसे लिहिता येणार? म्हणजे रांगड्याचे साहित्यही तसेच रांगडे असणं हे एक, आणि दुसरे असे की, अण्णा भाऊंच्या साहित्यात एवढे असून असून असणार काय? बटबटीत, प्रखर वास्तव. केवळ राबस वास्तवाच्या भेदक दर्शनात साहित्य कसे असू शकेल? अण्णा भाऊ साम्यवादी; म्हणजे त्यांचे साहित्य भडक, अवास्तव व प्रचारी असणार, हे तिसरे. असे अनेकांचे कित्येक आक्षेप. पैकी सगळेच खोटे तसे नसले तरी मनाच्या दूषितपणामुळे आक्षेपांचा रंग अधिक गडद बनलेला. कदर होणे कठीण. स्वाभिमानी अण्णा भाऊंनी ती मागणेही अशक्य होते. खऱ्या रसिकाला कदर आपणाहून द्यायची असते. खरी रसिकता तीच असते. ते घडले नाही. कदर कृतघ्न बनली; मात्र अण्णा भाऊ साठे मराठी परंपरेशी कृतज्ञ राहिले. या साऱ्याच संदर्भात 'या देशावर आम्ही प्रेम तर का करावे?' किंवा 'या देशातल्या माणसांना आम्ही आपलं का मानावं?' असे प्रश्न अण्णा भाऊंनाही विचारता आले असते. पण त्यांनी ते विचारले नाहीत. समंजस जीवनदृष्टीने त्यांना ते विचारू दिले नाहीत. अण्णा भाऊंचा राग देशावर नव्हता. त्या देशातल्या, येणाऱ्या-जाणाऱ्या लोकांवरही नव्हता; तर त्यांच्या विचारप्रक्रियेतून-क्रियाप्रतिक्रियांतून आकाराला आलेल्या मनुजवैरी समाजरचनेला होता. ह्या समाजरचनेत परिवर्तन करायचे तर देशाची, त्यामधील माणसांची हेटाळणी करून उपयोग काय? तराटणी द्यायची तिथे ती जरूर द्यावी; पण नेहमी तरादून राहण्यात हाशील काय? अण्णा भाऊंच्या समंजस जीवनदृष्टीने हे केलेले नाही. ऐन युद्धाच्या वेळी काय हाती घ्यायचे आणि काय बाजूला ठेवायचे हे अण्णा भाऊ चांगले जाणत होते. म्हणून तर त्यांनी, हिऱ्यामोत्यासारखे शब्द जपून ठेवले. पै-पैशाला मिळणाऱ्या नकली मण्यासारखे उधळले नाहीत. उलट, शल्य उरी घेऊन मातीशी स्नेह जोडू इच्छिणाऱ्या ससाण्याप्रमाणे अण्णा भाऊंनी अर्थहीन जीवनातील अर्थपूर्णतेचा वेध घेताना मऱ्हाटी आणि खास करून मऱ्हाटी संस्कृतीचे संचित उभे केले. अण्णा भाऊंनी केलेला हा हिशेब लक्षणीय आहे.

अण्णा भाऊंच्या घराण्यात सात पिढ्यांत कुणी शिकून नाव केले नव्हते. अण्णा भाऊ जवळजवळ त्यापैकीच एक. लहानपणीच शाळेत जाऊन शिकायचे असते, हे घोडपोर होईपर्यंत तरी अण्णा भाऊंना कुठे माहीत होते? पण आई वालूबाईचे टुमणे सारखे मागे होते आणि हाताचे घोटे, दगडासारखे कठीण झाल्याच्या काळात — घोटे न वळण्याच्या स्थितीत — अण्णा भाऊंनी शाळेचे तोंड बघितले. पण तेही अगदी थोडा वेळ. एकदोन

दिवसांसाठी जाऊन येण्यापुरते. अण्णा भाऊंची दृष्टी गतिमान, वृत्ती शाहिरी; साहजिकच मागे पाहत पाहत पुढे जाणे ही प्रवृत्ती. अण्णा भाऊ नित्यनेमाने शाळेकडे फिरकलेच नाहीत, याच्या मुळाशी या प्रवृत्तीचा सहयोग आहेच; पण आईची भुणभूणही चुकली नव्हती. ती सतत सुरू होती. तिला अण्णा भाऊंचे आश्वासक उत्तर होते, ''शाळेत नाही गेलो तरी मरणार नाही आणि गेलो तरी जगेन असं मुळीच नाही.'' पुढे अण्णा भाऊ स्वत: जगले आणि लोकांना त्यांनी जागविले. माणूस म्हणून जगण्याचा आणि जगविण्याचा त्यांनी अव्याहत आटापिटा केला. 'माणूस म्हणून मानानं जगा आणि अभिमानानं जगू द्या,' अशी अण्णा भाऊंची हाळी होती. 'जगा आणि जगू द्या' एवढाच मर्यादित आशीर्वाद नव्हता. जवळजवळ निरक्षर असलेल्या अण्णा भाऊंनी आत्मविश्वासरहित माणसाच्या मनात चैतन्याची समर्थ वेल रुजू घातली; एका उपेक्षिताने अन्य अनेक उपेक्षितांच्या जीवनात कोरलेली अक्षरशिल्पे, कित्येकांची जीवन झळाळून टाकणारी ठरली. बासरी, स्वरपेटी, बुलबुलतरंगसारखी वाद्ये उत्तम वाजविणाऱ्या अण्णा भाऊंनी, माणुसकीला पारख्या झालेल्या कित्येक सामान्यांच्या जीवनात गुप्त झालेल्या, अनेक वाद्यांचे सप्तसूर तन्मयतेने आळविले. सृष्टीच्या चातकाने आकाशाकडे मान करून सलिलाची प्रतीक्षा करावी तसे अनेकांना त्यातून जीवन जगण्याचे निमंत्रण मिळाले. त्यासाठी अण्णा भाऊंनी देव, दैव, दैववाद. धर्म, संस्कृती आदी 'गुणा'मुळे मानवी जीवनावर दाटणारी काजळी झाडून ज्ञानविज्ञानांच्या प्रेरणा अंगीकारल्या; पराभूत, वंचित, उपेक्षित अशा साऱ्यांना मातीचे सत्य समजावण्याचा प्रयास राखला आणि दिवसेंदिवस ओसरत जाणारे मानवीपण व माणसाचे मूल्य कसे वाढत जाईल याचा शोध घेतला. अण्णा भाऊंनी माणसाच्या गुणदोषांसकट त्याच्यामधील विधायक 'स्वधर्माचे' स्वागत केले. त्याचे मनोगत सांगितले आणि उद्‌गानही केले. मात्र त्यासाठी कल्पनेचे आकाश बाजूला ठेवून मातीचे वास्तव स्वीकारले.

अण्णा भाऊंनी प्रत्यक्षानुभव, सहानुभव आणि परोक्षनुभव अशा साऱ्या माध्यमांतून लिहिले. अधिक भर वास्तवानुभूतीवर राहिला. अण्णा भाऊ सांगतात, ''प्रतिभेला सत्याचं-जीवनाचं दर्शन नसेल तर, प्रतिभा, अनुभूती वगैरे शब्द निरर्थक आहेत. सत्याला जीवनाचा आधार नसला की, प्रतिभा अंध:कारातील आरशाप्रमाणं निरुपयोगी ठरते. मग कितीही प्रयत्न करून त्यात प्रतिबिंब दिसत नाही आणि कल्पकता निर्मळ ठरते. अगदी पंखविरहित पाखराप्रमाणे ती उडूच शकत नाही. जशी प्रतिभेला वास्तवाची गरज असते तद्वतच कल्पनेलाही जीवनाचे पंख असणं आवश्यक असतं. आणि अनुभूतीला सहानुभूतीची जोड नसेल तर आपण का लिहितो याचा पत्ताच लागत नाही.'' अण्णा भाऊ जीवनवादाची प्रस्तावना करताना प्रतिभा आणि कल्पकता यामध्ये जीवन उभे करतात. त्या दृष्टीने जीवन हा दोहोमधला पूल आहे. हरिभाऊ आपटे यांच्यानंतर इतक्या

कलापूर्ण चतुराईने वास्तव उचलणारे अण्णा भाऊ हे एक अग्रक्रमाचे लेखक आहेत.

अण्णा भाऊंनी स्वत:ला जाणवलेल्या जाणीवांनुसार, गाठी न बांधता नि न सोडता लेखन केले. अण्णा भाऊंनी मजबरोबरच्या एका खाजगी चर्चेत म्हटले होते: ''आपण शाहीरगडी. पुरोहितपण करायचं माहीत नाही. त्यामुळं आपण आपल्या साहित्यात गाठी मारण्याचा आणि गाठी सोडण्याचा प्रकार काही केलेला नाही.'' याचा अर्थ, अण्णा भाऊंनी कलात्मकतेची बूज राखली नाही असे नाही; ती राखण्याचा प्रयत्न केला. कदाचित गंभीरपणे केला नाही असे वाटत नाहीच असे नाही; पण केला हे नाकारता येत नाही. मानवी मनातील मूलभूत विधायक प्रवृत्तींना आवाहन करून, त्यामध्ये परिवर्तन घडवून आणण्याचे साहित्यामधील सामर्थ्य अण्णा भाऊंनी कलामूल्यांपेक्षा अधिकचे मानले. अधिक मोलाचे मानले. कलामूल्यांचा विचार केला, पण त्याची कलाबतू होऊ दिली नाही. अण्णा भाऊंच्या मनात साम्यवादाची जाज्वल्य निष्ठा होती. पण त्याचा अर्थ लेखनात लाल धूळ, लाल टापा, लाल माती असे सारे लालीलाल नव्हते. उरात सदैव समाजवादाची आच होती, पण सारखे साम्यवादी बाळबोध धडेच भरविले गेले असे नाही. असे मानणे ही वंचना आहे. असेही लेखन अण्णा भाऊंनी केले; पण त्याची आणि ह्याची दोहोंची जात वेगळी. त्यांची सांगड घालता येत नाही. कुणा एकाचे महत्त्व चढविण्यासाठी किंवा उणावण्यासाठी तशी सांगड घालणे इष्ट नाही. कलात्म आणि प्रचारात्म असे अण्णा भाऊंनी लेखनाचे पूर्णत: दोन वेगळे प्रांत केले. शक्यतो त्याच्या सीमारेषा जपल्या. आवश्यक तिथे जरूर ते रंग उधळून दिले, शक्य तिथे मिश्रण केले; योग्य जागी संयुग साधले; अशक्य त्या जागी सरळसरळ वेगळेपण उभे केले. अण्णा भाऊंनी केळीच्या गाभ्यासारख्या 'फकिरा', 'वैजयन्ता', 'वारणेच्या खोऱ्यात', 'अलगूज', 'माकडीचा माळ', 'चंदन', 'वारणेचा वाघ', 'रानगंगा', 'विष्णुपंत कुलकर्णी', 'बिलवरी', 'रानगा', 'कोंबडीचोर' अशा काही कथा-कादंबऱ्या निर्मिल्या; तर 'बिलंदर बुडवे', 'मूक मिरवणूक', 'खापऱ्या चोर', 'माझी मुंबई', 'अकलेची गोष्ट', 'बेकायदेशीर', अशा वगनाट्यांतून सरळसरळ धुमधडाकेबाज प्रचाराची लयलूट केली. त्यामुळे एका अण्णा भाऊंत दोन अण्णा भाऊ दिसले तरी, त्यांनी लेखन-प्रयोजन आणि कलावंत लेखणी यांस नेहमीच अधिक मानले. कदाचित अपवाद करता समप्रमाण ठेवले. कुठे कमीअधिक आढळले तरी ते प्रसंगोपात; शक्यतो समान पातळीवरच राखले. आणखी एक घडले ते हे की, पुरोगामी प्रवृत्तीचा पुरस्कार करणाऱ्या अण्णा भाऊंचा काव्यात्मा मराठी सारस्वताचा होता याचे दृश्यफल दिसले. मराठी मातीचे, तिच्या गुणदोषांसकट, पुऱ्या अंगोपांगांसह अण्णा भाऊंनी प्रतिनिधित्व केले. केवळ चार घटका करमणूक करावी म्हणून काही अण्णा भाऊंनी लिहिले नाही. हे त्यांच्या लेखन-पठडीत बसत नव्हते. अस्पृश्य जीवनाचे उद्गान, नव्या वाङ्मयीन जाणीवा अधिक कलामूल्यांची

झेपेल तेवढी ताण राखून अण्णा भाऊंनी वेगळ्या दृष्टीने प्रबोधन केले. प्रबोधनात्मक लेखन हे अण्णा भाऊंच्या लेखनाचे कळसूत्र आहे.

अण्णा भाऊंच्या चरित्र-आत्मचरित्रांचा या प्रबोधनात्मक कळसूत्राला आधार आहे : अगदी बालवयात अण्णा भाऊंनी कल्याणला आपल्या बापाबरोबर कोळसे भरले, कापडाचे गठ्ठे पाठुंगळीला लावून फिरणाऱ्या फिरस्त्याबरोबर तशीच गाठोडी पाठीवर लादून हिंड हिंड हिंडले, मोरबाग गिरणीत झाडूवाल्याचे काम केले, पुढे त्याच गिरणीत झाडूवाल्याचे कसबी कामगार कार्यकर्ते म्हणून त्रासन खात्यात लागले, साम्यवादी पक्षाचा गंडादोरा बांधून सामान्य कार्यकर्ते म्हणून, अनेक ओझी घेऊन वणवण भटकले. बापू साठेच्या तमाशात नाचले. असे खूप खूप घडले. वैयक्तिक आणि सामाजिक अशा दोन्ही जीवनात. पण अण्णा भाऊंनी कडवी जिद्द टाकली नाही. तिलाच लेखनात प्रमुख रसाचे स्थान दिले. वाळवे तालुक्याचा वारसा सांभाळणाऱ्या 'त्या' फकिराचे अण्णा भाऊ भाचे : त्यांच्या जन्माला दोन-चार दिवस होतात न होतात तोच धनाढ्य इंग्रजांचा खजिना लुटून घोडदौड करीत वाटेगावला फकिरा, अण्णा भाऊंच्या झोपडीपुढे दत्त म्हणून उभा झाला आणि घोड्यावरची मांड थोडीही ढिली न करता बाळबाळंतिणीसाठी दोन ओंजळी सुरती रुपये देऊन पुढे गेला. त्या टापांची लय अण्णा भाऊ पुढे कधीच विसरले नाहीत. अण्णा भाऊंच्या लेखनातून ह्या 'गॅलोपिंग स्टेप्स'चा प्रत्यय पुन:पुन्हा येतो. उद्दाम कलंदर वृत्तीने अण्णा भाऊंनी, पोटतिडकेमधून तटस्थता वगळून, भावनेतून चिंतनाला गाळून, शक्तीतून संयमाला दूर ठेवून आपल्या अमाप शक्ती चौखूर उधळल्या. आयुष्याच्या संध्याकाळी तर त्या फारच इतस्तत: फेकल्या गेल्या. साम्यवादी विचारप्रणाली, व्यक्तिगत जीवनाची झालेली होरपळ, आंतरराष्ट्रीय भाषांतून लेखनाला लाभलेला प्रतिसाद, त्यामुळे अण्णा भाऊंच्या कलावंत मनाने गमावलेला असंतुष्टपणा, माणसे विद्रूप करायची नाहीत अशी प्रतिज्ञा असूनही प्रत्यक्ष भोवताली गोळा झालेला विद्रूप माणसांचा गोतावळा, दारिद्र्याच्या खाईत आयुष्याची झालेली कुतरओढ, ज्यांनी घडविले त्यांनीच अखेरच्या क्षणी धिक्कारल्याचे मनस्वी दु:ख — अशी आणि यासारखी त्याची अनेक कारणे असतील. कारणे काहीही असली तरी त्यामुळे अण्णा भाऊंच्या लेखनात काही 'अशुद्ध' येऊन राहिले हे नाकारून चालत नाही. स्वाभाविकच इतर काही मुद्दे लक्षात ठेवूनही, यामुळे, अण्णा भाऊंना वाङ्मयीन यश लाभले तरी वाङ्मयीन श्रेय दूर राहिले हे मान्य करणे जरूर ठरते. अण्णा भाऊंनी अण्णा भाऊंना 'जपले' नाही. इतरांनी त्यांची 'कदर' केली नाही. साहजिकच फुले-आंबेडकरांचा वारसा घेऊन उभे राहिलेले, मराठी साहित्य-संस्कृतीची परंपरा न नाकारणारे अण्णा भाऊ पहिले दलित बंडखोर लेखक झाले; पण विशिष्ट मर्यादेपर्यंत जीवनाची काव्यात्म जाणीव असलेल्या अण्णा भाऊंचे अखंड साहित्य त्यांच्या चरित्र-आत्मचरित्राची अपुरी कहाणी ठरली. अण्णा भाऊंची ही वाङ्मयीन

शोकांतिका आहे.

अण्णा भाऊंनी, सर्वसामान्यांचे 'दुर्बळ जिणे' बदलण्यासाठी 'बंडाचा झेंडा' हाती घेतला आणि 'विजयी रण' करण्याची ईर्षा बाळगली. श्रमधारा आणि रक्तधारा यांनी साहित्याची धार धरली. कथा, कादंबरी, नाटक, पोवाडे, तमाशे, पक्षकार्य असा साऱ्या माध्यमांची राबणूक अण्णा भाऊंनी पुरेपूर करून घेतली; आणि श्रमिकांच्या राज्याचे स्वप्न पाहिले. लेखनात मोत्याचे खडे घातले आणि अग्निस्फुल्लिंगही पेटविले. असंतोष कसा असतो, कसा तुटून पडतो, प्रस्थापित - अप्रस्थापित यांत उलथापालथ कशी करतो, माणूसच माणसाला किती हीन बनवितो आदी साऱ्यांचे दर्शन देताना, अण्णा भाऊंनी शोधले काय असेल तर माणूस कुठे आहे आणि कुठे नाही हे. संवेदनशील मनानं त्यांनी त्याचा अखंड शोध घेतला. जीवनाच्या शाळेत घेतलेल्या स्वानुभवातून घेतला. अण्णा भाऊंनी म्हटले आहे, "मी जे जीवन जगतो, जगत आहे नि जे मी अनुभवले आहे, तेच मी लिहितो. माझी माणसे मला कुठं ना कुठं भेटलेली असत, त्यांचं जगणं-मरणं मला ठाऊक असतं." अण्णा भाऊंसारखा पिळदार साहित्यिक आपल्या माणसांबरोबर कित्येक मरणे मरत असतो आणि जगणे तर अव्याहत सुरू असते. त्याला आपल्या माणसाचे नुसते जगणे-मरणे ठाऊक असून चालत नाही. माणसांचे थोडे बाजूला ठेवले आणि स्वत:ला झालेल्या ललितकृतीचाच विचार केला, तर त्याहून वेगळी अशी स्थिती नसते. हरेक कलावंत आपल्या प्रत्येक कलावृतींबरोबर काही प्रमाणात जगत आणि मरत असतोच. साहित्यिकाने आपल्या साहित्यावर पोटच्या मुलाप्रमाणे प्रेम करावे, हे सूत्र सर्वसाधारण साहित्यिक थोडेच अमान्य करीत असतो? पण अण्णा भाऊंसारखा साहित्यिक आपल्या साहित्यावर त्यापलीकडले, आभाळ भरून उरणारे प्रेम करतो. अण्णा भाऊ सांगतात : "साहित्यिकानं वाघिणीप्रमाणं प्रेम करावं. वाघिणीचं एखादं पिल्लू मलूल अगर चपळ निघालं नाही तर ती ते खाऊन टाकते. त्याप्रमाणं साहित्यिकानं स्वत:च्या चुका गिळून टाकाव्यात व समृद्ध ते राहू द्यावं." सरत्या काळातील अण्णाभाऊंची लेखनकामाठी ही निकस साहित्याच्या निर्मितीची चुकांची मालिकाच होती. ती गिळून टाकण्याची, अण्णा भाऊंना काळानेच संधी नाकारली.

काळ ती यथावकाश दुरुस्त करून घेईल. काळ कुणाचा मुलाहिजा ठेवत नसतोच. अण्णा भाऊंनी स्वत:भोवती आखून घेतलेली किंवा घ्यायला लागलेली मर्यादांची चौकट अनेक मलूल साहित्य-पिल्लांच्या निपजण्याला बव्हंशी कारण ठरली. इतर अनेक कारणे जोडीला आहेत. स्वानुभूतीतूनच रेखाटनाची आकांक्षा, लेखनप्रयोजनाची वरपांगी व्यापक पण आकुंचित कक्षा, बदलत्या जगाच्या आकलनातील कमकुवतपणा, चिंतनाला वगळून चेतावणीवर असलेला भर, आदी कित्येक कारणांनी, काही विशिष्ट मर्यादेपर्यंत, अण्णा भाऊंना डोळे लकाकून टाकणारे सामर्थ्य दिले आणि मर्यादा ओलांडल्या. तिथे काही

काळ डोळे झाकून घेणे बरे असेही झाले. अण्णा भाऊंना अनेकदा अनेकांकडून चकवा मिळाला, पण त्यांना त्याचे आकलनच होऊ शकले नाही. आकलनाच्या अल्याड राहून अण्णा भाऊ 'वैजयंता'च्या 'प्रस्तावने'मधून पुन:पुन्हा धोशा लावत गेले की, ''जो कलावंत जनतेची कदर करतो त्याचीच कदर जनता करते, हे मी प्रथम शिकून नंतर लेखन करीत असतो. माझा माझ्या देशावर, जनतेवर नि तिच्या संघर्षावर अढळ विश्वास आहे. हा देश सुखी, समृद्ध नि सभ्य व्हावा, इथं समानता नांदावी, या महाराष्ट्रभूमीचं नंदनवन व्हावं अशी मला रोज स्वप्नं पडत असतात. ती मंगल स्वप्नं पाहत पाहत मी लिहीत असतो. केवळ कल्पकतेचे कृत्रिम डोळे लावून जीवनातील सत्य दिसत नसतं. हे सत्य हृदयात मिळवावं लागतं. डोळ्यानं सर्वच दिसतं. परंतु ते सर्व साहित्यिकाला हात देत नाही. उलट, दगा मात्र देतं. माझा असा दावा आहे की, ही पृथ्वी शेषाच्या मस्तकावर तरली नसून ती दलितांच्या तळहातावर तरली आहे. त्या दलितांचं जीवन तितक्याच प्रामाणिक हेतूनं नि निष्ठेनं मी चित्रित करणार आहे नि करीत आहे.'' अण्णा भाऊंनी असे धोशे निष्ठापूर्वक लावले तरी त्यातील तकलादूपणामुळे त्यांनी वाङ्मयीन श्रेय गमावण्यास साहाय्यच पोचविले. अण्णा भाऊंचा मन:पिंड माणुसकीने ओथंबलेला होता, करुणेने निथळलेला होता. जे जे म्हणून कुणी अंधारयात्रिक असतील त्यांना सूर्यसन्मुख करण्याचे अण्णा भाऊंचे व्रत होते. अण्णा भाऊंचा 'दलित' जातवाचक दलित नव्हता. त्यापलीकडे तो उभा होता. शोषित, श्रमजीवी मग तो कुणीही असो, तो दलित, अशी अण्णा भाऊंची व्याख्या होती. त्याला जातपात-पंथ-धर्मभेद याची कसलीच बंधने नव्हती. माणसाच्या जगाचे अण्णा भाऊ वाचन करीत होते : माणूस असणाऱ्या आणि नसणाऱ्या माणसाचे हे जग होते. त्याच्या संघर्षशील, जिद्दी, वृत्ती-प्रवृत्तीमध्ये, वेदना-विद्रोहामध्ये शोधप्रक्रिया सुरू होती. नशिबी आलेल्या आयुष्याच्या भोगवट्याने अण्णा भाऊंच्या साऱ्या भुका व तृष्णा कडवट करून टाकल्या असल्या तरी वैयक्तिक आयुष्याचा जंजाळ अण्णा भाऊंनी आपल्या लेखनात कधी पसरून दाखविला नाही. माणसे फार आवडणाऱ्या, त्यांच्यातील महान श्रमशक्तीवर कमालीची श्रद्धा असणाऱ्या अण्णा भाऊंच्या लेखननिर्मितीचा स्रोत मानव्यावरील श्रद्धानिष्ठेत अधिक आहे. जगावर उत्कटतेने प्रेम करतो त्याच्या ठायी बोलण्या-लिहिण्या-करण्याचे सामर्थ्यही येते. बऱ्यावाईट जगावर अष्टांगांनी प्रेम करायला शिकल्याखेरीज माणसाला विपुलतेने, सातत्याने व समग्रपणाने लिहिता येणेच अवघड आहे : काही साहित्यिक लेखनाच्या दृष्टीने लवकर संपतात आणि काही दीर्घजीवी ठरतात. यामागे मानव्यनिष्ठा हा एक प्रमुख घटक आहे. अण्णा भाऊंनी 'स्वधर्म' जाणला. स्वत:चा धर्म तोच 'सर्वांचा धर्म' अशी हाळी मात्र दिली नाही. अण्णा भाऊंना लढा मान्य होता, आक्रोश नामंजूर म्हणून तर अवास्तव असमंजसपणाने त्यांनी कशाचा धिक्कार केला नाही, तसा अनावर उताविळीने

कशाचा स्वीकारही झाला नाही. कुठल्याही रीतीची विकृती चित्रित न करता, माणसे विद्रूप न करता विकृत बनलेल्या जीवनाची तळामुळातली बैठक बदलणे शक्य आहे काय याचा विचार अण्णा भाऊंनी सतत केला. त्यासाठी फार खोलवर चिंतनात ते घुसले नाहीत; घुसले असते तर आहे याहून अधिक वाङ्मयीन श्रेयाचे धनी झाले असते; पण अण्णा भाऊंनी सारे तळमळीवर, मन:पूर्वकतेवर, पोटतिडकीवरच भागवून नेले. समाज केवळ भौतिक दृष्टीनेच समृद्ध होऊन चालत नाही तर नैतिक दृष्ट्याही त्याला अधिष्ठान असावे लागते. अण्णा भाऊंची ही धारणा होती. जळणाऱ्याला जळू द्यावे किंवा जाळणाऱ्याला जाळू द्यावे हे मानवतावादी प्रतिभावंत साहित्यिकाला पाहणे अशक्य असते. साहजिकच अण्णा भाऊंना स्वधर्माच्या कवेत जेवढे जेवढे म्हणून सामावणे शक्य तेवढे त्यांनी बीज म्हणून कवटाळले, रुजू घातले. त्यामुळे हातात सदैव चूड असलेल्या अण्णा भाऊंच्या मस्तकात नेहमी माणूस, माणुसकी आणि न्याय इत्यादीचे चक्रीवादळ घोंघावत राहिले आणि अण्णा भाऊंनी 'चिखलातील कमळां'नी 'अग्निदिव्य' उभे केले. 'वारणेच्या खोऱ्यात' 'अलगूज' घुमविले. 'माकडीच्या माळा'वर 'केवड्याचे कणीस' रुजू घातले. 'आग', 'अहंकार', 'वैर'ला 'रूपा'कार दिला. धो धो लिहिले. पण एवढे पुरेसे नव्हते. अण्णा भाऊंच्या साहित्यातील एकदेशीपणा हा तसा त्यांना मागे खेचणाराच होता. अण्णा भाऊंनी शैलीकार श्री. म. माटे यांच्यानंतर पहिल्यांदा दलितांचे प्रत्ययकारी चित्रण केले किंवा त्यांनी मध्यमवर्गीय जीवन लेखनाचा विषय केला नाही; या तशा मर्यादित कौतुकाच्या बाबी ठरतात. खरे महत्त्वाचे हे आहे की, अण्णा भाऊंनी माणसाला माणूस दाखविला. कलात्मक आणि प्रचारात्मक दोन्ही रीतींनी! जे जे अन्यायाखाली भरडले जातात; दु:ख, दारिद्र्य, दैन्य, दुखणे, दुरवस्था आदी अवस्थांनी हैराण होतात; परिस्थितीच्या चरकाखाली चिरडले जातात; उपेक्षा अवहेलना, हेटाळणी, अपमान यांच्या दाहक चटक्यांनी अगतिक बनतात; ते सारे, मग ते कुणीही असोत, अण्णा भाऊंना आपले वाटतात. अण्णा भाऊंमधील कलावंत त्या सर्वांशी अतूट नाते जोडतो. जातपात-धर्मपंथ भेदातीत अण्णा भाऊंनी, स्वत:च्या अनाठायी आग्रहातून लेखन करून मराठी साहित्यात अस्पृश्यतेचे प्रस्थापन केलेले नाही. अण्णा भाऊंच्या एकलक्ष्यी साहित्यामधील ही लक्षणीयता विशेष स्वरूपाची आहे. म्हणून तर, अण्णा भाऊंचे साहित्य ग्रामीण, प्रादेशिक आणि दलित यांच्या अंतर्बाह्य स्वरूप-रंगात बुचकळून जाऊनही, त्यापलीकडे ते गेल्याचे दिसते.

अण्णा भाऊंचे समग्र साहित्य गाळात रुतून बसलेल्या हत्तींच्या कळपाप्रमाणे, शिळेखाली ध्येयआकांक्षा पार गेलेल्या लोकजीवनातील स्पंदनांचे विविधस्पर्शी आरेखन आहे. मानवतावादी शाहीर असलेल्या अण्णा भाऊंनी फिजिशियन आणि सर्जन अशी दोन्ही कामे एकदमच केली. जनतेच्या नाडीवर नेमके बोट ठेवले. साहित्यातून विचारी

व विकारी मनांचे दर्शन घडविताना निर्बीज पंखपानांच्या स्वप्निल वातावरणात अण्णा भाऊ कधी रमले नाहीत. धरसोड किंवा तडजोड जमली नाही. एक तर रोमांच उठावेत, दलितांना न्याय मिळताच आत आत कुठे तरी बरे वाटत जावे किंवा झेंडूच फुटावा असे अण्णा भाऊंच्या एकत्रित साहित्याचे स्वरूपच आहे. अण्णा भाऊंच्या साहित्याने 'मुक्ति कोन पथे?' असा दीनवाणा 'आ' करून हताशपणे वाट पाहत, ताटकळत असलेल्या व्यथांना कधी कणवेने, कधी सहानुभूतीने, कधी अंतर्मुख होऊन तर कधी आंतरअग्नी फुलवून मुखर करण्याचा प्रयत्न केला. आशयाचे बलदंडपण, अश्वत्थाच्या सळसळीसारखा ध्येयवाद, क्रांतदर्शी मानवतावाद आणि हृदय विंधून टाकणारी नितांत जिव्हाळ्याची लोभसवाणी तळमळ याद्वारा साहित्यविषयक सरळ गणिताने, अण्णा भाऊंनी साहित्याची शिखरांमागून शिखरे पायांखाली घातली. लिहावेसे वाटते म्हणून आणि लिहिल्याखेरीज राहवतच नाही म्हणून लिहिणारे अण्णा भाऊ हे लेखक होते. उबवणे आणि कृत्रिम रीतीने सजविणे हे अण्णा भाऊंच्या स्वभावातच नव्हते. साहजिकच माणसांविषयी, ज्या माणसांवर प्रेम केले, त्याविषयीच अण्णा भाऊंनी लिहिले. महात्मा फुले यांच्या 'शेतकऱ्याचा आसूड'ची परंपरा चालविणाऱ्या अण्णा भाऊंनी धनवंत धर्मांध-विकारवंतांच्या विचारकृतीवर 'भीमरावपंथी' घणाघात घातले.

*प्रथम मायभूच्या चरणा ।*
*छत्रपती शिवबा चरणा ॥*
*स्मरूनी गातो कवना ॥धृ॥*

अशा दुर्दम्य श्रद्धेने त्यांनी सामान्यांची जीवन-कवने गायिली. सज्जड धुळाक्षरे गिरविली. भेदरलेल्या, हतबल झालेल्या, लढाई विसरू पाहत असलेल्यांच्या मनात नवे त्राण आणि बळ आणले. सारे हिशेबी गणित उधळून देऊन केले. त्यामुळे इतरांना हिशेब जुळविणेही कठीण गेले, तसे दिसते.

त्यामुळे प्रचलित साहित्य-चौकटीतही विचार करणे क्रमप्राप्त ठरेल. अमुक एक प्रकारचे साहित्य हेच साहित्य, तसेच नसले तर नव्हे. अमकी अमकी चौकट, त्यातच सारे साहित्य बसते. नसले तरी ठोकून ठोकून बसविले पाहिजे; असा आग्रह अनाठायी असला तरी अण्णा भाऊ त्यात अडकले यात शंका नाही. साहित्य हा चैतन्यपूर्ण जीवनाचा, मानवी आत्म्याचा प्रकट हुंकार आहे. तो चौकटीत असेल अगर चौकटीच्या बाहेर असेल; नेमका कशात असेल-बसेल हे सांगणे शक्य नाही. स्वसंवेद्य, स्वयंपूर्ण चैतन्यशीलतेच्या अवतीभवतीच्या बंधनांचा विचार कसा करता येणार? ते शक्य नसते. पण प्रस्थापित साहित्य-संप्रदाय नेमके तेच करीत असतात. मग स्वत:ला न्याय्य व दुसऱ्यालाही न्याय्य करण्याच्या आविर्भावात अन्याय्य करून मोकळे होत असतात. अण्णा भाऊंच्या बाबतीत हेच घडले. उच्चभ्रूंच्या प्रस्थापित साहित्य-संप्रदायाने नवी

म्हणून काही वाङ्मयीन मूल्ये, आकृतिबंध, नव्या जाणीवांचे मानसशास्त्रीय संशोधन, नेणीवेचे रेखांकन, कलेचे तलस्पर्शी दर्शन इत्यादी स्वीकारली, त्याबाबत आग्रही वृत्ती राहिली. परिणाम असा झाला की, अण्णा भाऊ (आणि तत्सम अनेकांचे) साहित्य अनुल्लेखनीय ठरले. उल्लेख करावाच लागला तेव्हा ते अ-कलात्मक म्हणून बाजूला सारले गेले. पण एखादा साहित्य-संप्रदाय प्रस्थापित करीत किंवा होत असताना त्याबाहेरही काही राहून आपले प्रभुत्व प्रस्थापित करीत असतो; त्याचाही एक साहित्य-संप्रदाय स्थापित होऊ शकतो; हे एका बाजूने विसरले गेले तर दुसऱ्या बाजूने कालानुसार कलामूल्ये बदलली तरीही वाङ्मयाचे म्हणून एक शाश्वत मूल्य आहे, हे अमान्य करता येत नाही, हे नामंजूर करण्यात आले. परिणामी अण्णा भाऊंसारखे साहित्यिक उपेक्षित राहिले. प्रचलित टीकाकारांना उल्लेखनीय वाटले नाहीत. एकूणच मराठी समीक्षा मागेपुढे किती आहे, त्याचे हे प्रमाण आहे.

पण अण्णा भाऊंनी आपला सूर बदलला नाही, कथा-कादंबऱ्या इत्यादी वाङ्मय लिहिले. सातत्याने व पोटतिडिकीने लिहिले; उन्मळून लिहिले आणि पैसा हवा होता म्हणूनही लिहिले. दुसऱ्या प्रकारचे लिहिणे अर्थातच हीण मिसळल्यागत आहे. पहिले सकस आणि अव्वल आहे. विपुलता किंवा लोकप्रियता हे वाङ्मयीन गुणवत्तेचे लक्षण नाही; पण या विपुलते-लोकप्रियतेमागील दृष्टी महत्त्वाची आहे. अण्णा भाऊंच्याजवळ अशी विलक्षण पोटतिडिकेने सळसळणारी ध्येयदृष्टी आहे. आतडी पिटवटून यावीत, तटातट तुटावीत, मस्तक चक्रावून जावे, उभे जीवनच बेहोष व्हावे; अशी दारुण परिस्थिती या ध्येयदृष्टीने नजरेखालून घातली आहे. त्यातून अण्णा भाऊंच्या साहित्याने ठसकेबाज पीळ घेतला आहे. बाभळीच्या गाठीगत रूप मिळविले आहे. हा पीळ सुटतो आणि रूप निदर्शनास येते, ते अण्णा भाऊंच्या संबंधात दोन प्रश्नांची उत्तरे घेण्याने। ते असे :

१. जीवनाकडे पाहण्याची अण्णा भाऊंची दृष्टी कोणती आहे? आणि

२. अण्णा भाऊंनी लिहिले ते का लिहिले? कुणासाठी लिहिले?

तसे पाहता हे दोन्ही प्रश्न परस्परावलंबी आहेत, परस्परपूरक आहेत. एकमेकांत ते असे गुंतून गेले आहेत की त्यांचा वेगवेगळा विचार करणे काहीसे जिकिरीचे ठरणार आहे. कारण अण्णा भाऊंनी जीवनमूल्ये आणि कलामूल्ये यांचा समन्वय कलाकृतीत घालण्याचा यशस्वी-अयशस्वी प्रयत्न सतत केला आहे.

अण्णा भाऊंनी काही जीवन-मूल्ये मानलेली आहेत. कुणी काही म्हटले, मानले तरी अण्णाभाऊंनी आपली जीवन-मूल्ये सोडलेली नाहीत की टाकलेली नाहीत. अण्णा भाऊ कम्युनिस्ट आणि त्यांच्या विचारसरणीशी काही ही मूल्यकल्पना सुसंगत नाही. जीवन-मूल्ये वगैरे कल्पनासंबंधी कम्युनिस्ट काय मानतो? कम्युनिस्ट नेते श्री. अ. डांगे यांनी

'वाङ्मय आणि जनता'मध्ये म्हटले आहे ते असे : ''जीवनात अनादी, अचल अशी मूल्ये मुळीच नसतात; कारण खुद्द जीवन हेच अनादी अगर अचल नसते. आजपावेतो मानवी जीवनाने जर सर्वात मोठा ध्यास घेतलेला असेल तर तो भौतिक वस्तू मिळविण्यासाठी झगडण्याचा; जीवन शक्य करण्यासाठी — जीवन जगवून ते वाढीस लावण्यासाठी — झगडण्याचा. या भौतिक वस्तू, ही भौतिक मूल्ये निर्माण करावयाची व वाटून घ्यायची यासाठी युगायुगातील स्त्री-पुरुषांनी एकमेकांशी सामाजिक नाती जोडली आणि ती अशा रीतीने जोडली की, जेणेकरून आपल्या भौतिक सुखसोयींची वाढ व्हायला मदत व्हावी. या सामाजिक नात्यातूनच दरेक युगामध्ये स्त्री-पुरुषांच्या नैतिक व नीतिशास्त्रीय, भावनात्मक स्वभावविशेषांची जोपासना झाली. प्राथमिक गण समाज, गुलाम समाज, सरंजामी समाज, भांडवलशाही समाज व सोविएत समाज असे समाज स्त्री-पुरुषांनी मानवी इतिहासाच्या वेगवेगळ्या युगांत स्थापन केले. या समाजातील सामाजिक नाती — वर्गीय नाती — ही आपापल्यापरी वेगवेगळ्या नैतिक व भावनात्मक स्वभावविशेषांनी युक्त अशी आहे. जेव्हा एकंदर समाजाच्या भौतिक सुखाची वाढ प्रचलित सामाजिक नात्यापायी अडून राहते — मग ही नाती गुलाम व मालक अशी असोत, भूदास व जमीनदार अशी असोत, कामगार व कारखानदार अशी असोत — आणि जेव्हा दलित व पिळली जाणारी जनता या अडचणीतून बाहेर पडायचा मार्ग शोधू लागते तेव्हा ती नवी मूल्ये, नव्या भावना, नवी सत्ये, नवी वास्तवता निर्माण करते. जुन्या नात्यांना उचलून धरणारे हे प्रतिगामी ठरतात; बदललेल्या अगर बदलणाऱ्या नात्याचे पोवाडे गाणारे हे प्रगतिशील — पुरोगामी — ठरतात. सामाजिक इतिहासाचा हा एकच एक शास्त्रीय सिद्धान्त आहे.

खरे जीवनदर्शन ते हेच आणि म्हणून खऱ्या कलेचे मोजमाप करायला मानदंड हा एकच. मात्र त्या युगातल्या कलाकृतीचे, आपापल्या काळातल्या पिळल्या जाणाऱ्याचे, राजकीय व आर्थिक कार्यक्रमांचे जाहीरनामे फडकावले तरच ती कलाकृती प्रगतिशील व त्या युगाची खरी प्रातिनिधिक होऊ शकते, असा याचा अर्थ नव्हे. जी कलाकृती आपापल्या युगातल्या 'सत्या'शी, 'वास्तवते'शी 'मानवते'शी खरोखर समरस होते, ती आपला आविष्कार करण्यासाठी.आपली स्वत:ची स्वतंत्र रीत ती शोधून काढते, आपापल्यापरी स्वतंत्र रूप धारण करते. जी कलाकृती अशी समरस होत नाही, जीवनाच्या वास्तवतेपासून स्वत:ची फारकत करून घेते, तिला उतरती कळा लागते, ती पोकळ ठरते.'' यामधील शास्त्रीय सिद्धान्त आणि तदनुषंगिक विवेचन इत्यादींशी अण्णा भाऊ सर्वसाधारणपणे सहमत असले तरी जीवनात ते काही ठाम मूल्ये मानतात यात शंका नाही. अण्णा भाऊंच्या दृष्टीने ही मूल्येही अगदी स्पष्ट आहेत, ती अशी : देशाचे स्वातंत्र्य, स्त्रीचे शील, पुरुषाचा स्वाभिमान आणि मानवाची प्रतिष्ठा. याबाबत

तडजोड नाही, कसनुसेपण नाही. तडजोड करू पाहतो तो नाहीसा होतो, इतिहास त्याला क्षमा करीत नाही. इतिहासाला ते साफ नामंजूर असते; कारण यावर जीवनाचे 'अस्तित्व' असते, जीवनातील 'वास्तवता' निर्भर असते. देशाची मान मोडली, स्त्रीचे शील भंगले, पुरुषाचा स्वाभिमान खचला, माणसाची मानच मोडली, तर ताठ मान कुणाची राहील? कशासाठी राहील? अण्णा भाऊंचा असा प्रश्न आहे.

या प्रश्नामागे विशिष्ट सूत्र आहे. अण्णा भाऊ व्यक्तीचा विकास पाहत नाहीत, तर समाजाच्या विकासाकडे लक्ष देऊन राहतात. व्यक्तिरूप नव्हे तर समष्टिरूपात ते साऱ्यांचा विकास पाहतात. कारण समाजाच्या विकासात व्यक्तीचा विकास असतो आणि व्यक्तीचा विकास म्हणजे त्याच्यामधील 'सत्'चा, 'ऋत'चा विकास; हा विकास व्यक्तीबरोबर समाजाला मोठे करतो. म्हणून व्यक्तीव्यक्तींचा मिळून बनलेला समाज गुणपूर्ण कसा होईल, कसोटीला कसा उतरेल याचा विचार अण्णा भाऊंच्या वाङ्मयात लहरत असतो. अण्णा भाऊंच्या साहित्यामधील एकही पात्र असे नाही की जे दुर्गणी बनले आहे. उलट दुर्गुणी पात्रे सद्गुणी बनावीत आणि समाजाच्या उपयोगी ठरावीत असाच प्रयत्न आहे. या प्रयत्नात 'तरल' कला असलीच पाहिजे असा अण्णा भाऊंचा आग्रह नाही. प्रामुख्याने परिणामावर लक्ष असल्याने असा आग्रह ते धरू शकत नाहीत. साहजिकच सद्भिरुची, सत्प्रवृत्ती आणि सद्वर्तन इत्यादींकडे अण्णा भाऊंची धाव असते. ही धाव आपल्या पात्रांकरवी ते पुरी करतात. त्यातील काही तर समाजाच्या खालच्या तळापर्यंत झिरपत पाझरत येईल असे मानतात. तशी श्रद्धा उराशी बाळगतात. या श्रद्धेपोटी, अंत:प्रेरणेचा प्रबळ आविष्कार आणि नैतिक मूल्यांवर त्यांची अपार निष्ठा आहे, हे स्पष्ट आहे. अशी अंत:प्रेरणा किंवा नैतिक मूल्ये वगैरे कम्युनिस्टांच्या तत्त्वज्ञानात बसतात की नाहीत हा अण्णा भाऊंच्या दृष्टीने गौण प्रश्न आहे. अण्णा भाऊंच्या जगात—मनात—ते सारे आहे. अण्णा भाऊ कम्युनिस्ट खरे; पण झापड बांधलेले पोथीबंद कम्युनिस्ट नव्हते. कम्युनिस्टांची वाट थोडी बाजूला करून, थोड्या वेगळ्या वाटेने मन:पूत फेरफटका मारून येण्याचे स्वातंत्र्य ते जरूर घेतात. त्यामुळे अण्णा भाऊंच्या साहित्यातून जनतेच्या—सर्वसामान्य माणसांच्या—हृदयाचा व भवितव्याचा आविष्कार होताना दिसतो. नैतिक मूल्यांची जाण—जोपासना—समाजाला मोठे करते, माणसाला थोर बनविते. अण्णा भाऊंच्या मनीमानसी हे सामर्थ्य बिंबले गेले आहे. त्यामुळे त्यांच्या कथा-कादंबऱ्यांची घडण त्या दिशेने होताना आढळते. सत्तू, चंदन, फकिरा, विष्णुपंत कुलकर्णी, व्यंकू अशी कितीतरी पात्रे उदाहरणादाखल पुढे करता येतील. ती केवळ सौंदर्यदर्शनाकडे नव्हे तर समृद्ध जीवनदर्शनाकडे जाताना दिसतात. म्हणून दिलेला शब्द पाळतात. त्यासाठी प्रसंगी प्राणही गमावतात; एखाद्याचे पाठीराखेपण करताना हवी तेवढे संकटे उद्भवली तरी ते ती निमूटपणे सोसतात, पण अन्याय, अत्याचार, इत्यादींवर

तुटून पडतात. मागेपुढे काही पाहत नाहीत. या सगळ्या प्रक्रियेतून आदर्श जीवनव्यवस्थेसाठी, दलित जनतेच्या मर्मभेदक आक्रोशाचा आविष्कार होतो. गंभीर प्रकृतीचे अण्णा भाऊ शाहिरी पद्धतीने हा आक्रोश मांडतात, त्यामुळे तो गडद होऊन येतो. नितळ रूपामध्ये त्याचे निदर्शन क्वचित होते. पण जेव्हा होते तेव्हा ते नितांत आल्हाद देऊन जाते.

अण्णा भाऊंची प्रकृती शाहिरी आहे. लोकजागृती, लोकशिक्षण, त्यातून ईप्सित समाजरचना ही शाहिरी प्रवृत्तीची रग असते. अण्णा भाऊ त्याला अपवाद नाहीत. त्यात अण्णा भाऊ पडले कम्युनिस्ट. मात्र शाहिरी वाङ्मय आणि काही कादंबऱ्यांचे अपवाद वगळता कम्युनिस्ट अण्णा भाऊ क्वचितच भेटतात. अण्णा भाऊंनी 'दावे' केले त्याप्रमाणे लिहिले. पण ते करताना, पाहिले तसे लिहिले असे घडलेले नाही. सगळेच पाहिलेले असेही झालेले नाही. जे पाहिले ते जीवनस्पर्शी कलेच्या अंगाने मांडले आहे; आणि जे पाहता आलेले नाही, पाहणे शक्य नाही ते 'जिवीच्या जिव्हाळ्याने' जाणून घेऊन रंगविले आहे. हे रंगविणे संकुचित अर्थाने दलितांपुरते मर्यादित नाही. साऱ्यांचीच मंगल स्वप्ने प्रामाणिक निष्ठेने पाहणारा अण्णा भाऊंसारखा लेखक असा संकुचित असत नाही. साहजिकच अण्णा भाऊंच्या कथा-कादंबरीमध्ये प्रा.श्री.म. माटे यांच्या कथांमधील विविध जातीजमातींच्या माणसांचा अव्याजमनोहर मेळावा उभा राहिला आहे. खचलेले, पिचलेले, दबलेले, मुरगळलेले, मरगळलेले, दडलेले, दडपलेले, काजळलेले असे अनेक, अनेक रीतींचे उपेक्षित त्यात आहेत. अण्णा भाऊंचे त्यांच्याशी अलोकीचे अतूट नाते आहे. ही माणसे जातिधर्माने वेगळी आहेत, आचार-विचाराने निराळी आहेत; अण्णा भाऊंना ते माहीत नाही असे थोडेच आहे? पण त्यांच्या बाबतीत अण्णा भाऊंच्या ठायी एकच नाते आहे : ते आहे माणसाचे, माणुसकीचे. म्हणून त्यांना निर्मळ जीवनाचा लाभ घडावा, घडणं जरूर आहे; त्यांचा तो हक्क आहे, अशी अण्णा भाऊंची आच आहे. ही आच आहे ती, ती माणसे तशा विशुद्ध जीवनाची मागणी करतात म्हणून. परिस्थितीने या माणसांच्या भोवती काही कोंडाळे झाले आहे, काही कोंडीत पडून पिचू लागली आहेत, काही बुरी कृत्ये हातून घडली आहेत, घडताहेत, पण त्यांचा मूळ सत्प्रवृत्त आत्मा शाबूत आहे. अण्णा भाऊंचे आवाहन त्यास आहे. जसे ते पात्रांच्या कोंडीत अडकलेल्या आत्म्यास आहे, तसेच ते बाहेरील जनसामान्यांच्या मळभ आलेल्या समजुतीसही आहे. परस्परांनी समजून घ्यावे, समजून राहावे, पराकोटीच्या सहृदयतेने आणि असीम सहानुभूतीने सामंजस्य घडावे अशी अण्णा भाऊंची धारणा आहे. त्या दृष्टीने अण्णा भाऊंनी 'माणुसकीचा गहिवर' घातला आहे, 'उपेक्षितांचे अंतरंग' उकलून दाखविले आहे. वरवर पाहता अण्णा भाऊंनी आपल्या कथा-कादंबऱ्यांतून 'भावनांची मांडणी' सजविल्याचा भास होत असला, तरी त्यामागे असलेले विचारांचे संघर्ष दुर्लक्षून चालत

नाही. भावनेत ओघळणारे पण विचारात मात्र साफ कोरडे असे अण्णा भाऊंच्या कथा-कादंबऱ्यांचे एकूण स्वरूपच नाही. अण्णा भाऊंनी अशी कुठलीही 'बेइमानी' केलेली नाही. दलितांभोवती अक्राळविक्राळपणे पसरलेल्या परिस्थितीविरुद्ध त्यांनी जंग सुरू केलेले असल्याने अशी 'बेइमानी' खपणारीही नव्हती. दलितांनी जाणता-अजाणता, मूक - प्रकटपणे उभारलेल्या बंडातून अण्णा भाऊंच्या साहित्याचा जन्म झाला आहे. त्यामुळे त्यात समूहशक्तीला केलेल्या आवाहनाबरोबर 'एतद्देशीयत्व' खच्चून भरले आहे. अण्णा भाऊंच्या बिनहत्यारी लढाऊ जनतेचे ते कवच आहे; आणि श्रमजीवी जनतेच्या भावनारूपाचे दर्शन हा अण्णा भाऊंचा तर सोडाच, पण एकूणच मराठी कथा-कादंबरीचा अभिमानविषय आहे. दोन बाप्ये आणि एक बाई, अगदीच कंटाळा आला तर दोन बाया आणि एक बाप्या, त्यांची कुठेतरी, कधीतरी, केव्हातरी धावतीपळती गाठभेट, भेटता भेटताच प्रेम बसणे, वाढणे; त्यांचे हे 'असे' पाहून तिसऱ्या कुणाला तरी हुक्की येणे, त्याने मध्ये 'पडणे', संघर्षाला सुरुवात, मग सवंग शृंगार, धावपळ, झटापट, अपघात, घात, थोडा पार्श्वभूमीदाखल सामाजिक-राजकीय 'कल्चर', अलऽ लऽडूरची भाषणबाजी, समाजवाद-साम्यवाद वगैरे चलनी नाण्यांच्या अंगाअंगाने अज्ञान, दारिद्र्य, पिळवणूक, अत्याचार, इत्यादींबद्दल काहीतरी बकवास, संकटे, अडचणी, झटापट, नष्ट होणे आणि शेवटी प्रेमगोंधळाची वस्त्रगाळ वर्णनं बाकी राहणे; अशा त्या काळच्या डबक्यातून — अपवाद करून — अण्णा भाऊंनी मराठी कथा-कादंबरीला ताकदीने दूर सरकविले. त्याचे कारण हे की, अण्णा भाऊंना माणसांचा आत्मा हरवायचा नव्हता, तर त्याच्या वर्धिष्णू इतिहासाकडे लक्ष ठेवून त्याला दिशेला लावायचे होते. त्याची सोबत करावयाची होती. अण्णा भाऊंनी ही सोबत पतिव्रतेच्या निष्ठेने केली, जनतेच्या अनुरोधाने त्यांनी लिहिले आहे. स्वत:च्या चित्रणाच्या मनोभावनेच्या अनुरोधाने जनतेचा मुखवटा विदारलेला नाही. अण्णा भाऊंना म्हणूनच आपल्या साहित्याला कोणती बिरुदे बहाल केली जातात याची फिकीर नाही.

अण्णा भाऊंचा जनतेवर — माणसावर — मोठा विश्वास होता. हा विश्वास कसा मोजता येईल? आकाश, धरणी व्यापून उरणारा हा विश्वास आहे. माणसाच्या सृजनशीलतेवर त्यांची प्रगाढ निष्ठा आहे. माणसाइतका दुसरा सृजनात्मा पाहिला नाही, असाच त्यांचा दावा आहे. म्हणून माणूस वाढला पाहिजे, मोठा झाला पाहिजे ही अण्णा भाऊंची दृष्टी आहे. माणसाच्या वयाबरोबर संस्कृतीही वाढल्याखेरीज समाजाला भवितव्य नसते. त्या दिशेने अण्णा भाऊ पुढे चालत राहिले. त्यामुळे सामान्य माणसाच्या जीवनाची बखर रंगत गेली, सजत राहिली. अण्णा भाऊ जनतेचे कलावंत बनले. अण्णा भाऊंचे कथा-कादंबरी, वाङ्मय म्हणजे जनतेची कला व 'जनतेचे वाङ्मय' यांच्या सुरेख संगमाचा अचूक पत्ता आहे.

त्या दृष्टीनेच अण्णा भाऊंनी मानवी संस्कृतीचे वय कसे वाढेल याचा विचार केला. तिची चांगली वाढ हा त्यांचा ध्यास होता. आपल्या वृत्ती-प्रवृत्तीसंबंधी, आचार-विचारसंबंधी, कथा-कादंबऱ्यांसंबंधी मान्यवर समीक्षक न्यायनिर्णय काय करतील याची चिंता न बाळगता, कदर न करता, अण्णा भाऊंनी हा ध्यास खच्चून पुढे रेटला आहे. सामान्य माणूस जगतो कसा? खातो, पितो काय? झोपतो कुठे? कसा? त्याच्या भावना काय आहेत? कशा होतात त्या प्रकट? हा सामान्य माणूस लढतो कसा? पुन: पुन्हा ताकद गमावूनही ताकद वाढवतो कसा? पिळवणूक, अत्याचार, गांजवणूक इत्यादींनी नाडला जात असूनही त्याच्या ठायी तडफ आणि जिद्द येते कुठून? एकूणच जगणे अशक्य असूनही (म्हणजे इतरांना तसे वाटत असताना) तो वागतो तरी कसा? — अण्णा भाऊंनी या 'श्रमिकाच्या जगाचे' कलावंतदृष्टीने रेखाटन केले आहे. शेवटी जनतेच्या जीवनाचा — राजकारणादी सगळ्या कारणांचा — आविष्कार कलेच्या द्वारा करायचा तो कलेच्या नियमांना धरून व्हायला हवा, हे नि:संशय उचित आहे. अण्णा भाऊंनी ही 'उचितता' सांभाळली आहे. आविष्कृतीच्या क्षेत्रात कलावंत हा पूर्ण स्वतंत्र असल्याने त्या बाबतीतील नियम त्याचे त्यानेच बनवायचे असतात, प्रत्यक्ष लेखनाच्या द्वारे तोच त्याचा साचा तयार करीत असतो. अण्णा भाऊंनी नेमके हे केले. अण्णा भाऊंची जीवनमूल्येच वेगळी असल्याने त्यांची वाङ्मयीन मूल्येही निराळी आहेत; त्यात कालसापेक्षतेचा भागही अंतर्भूत आहे. अण्णा भाऊंची ही वेगळी वाट कलामूल्ये थिटी बनवीत नाही, साहित्यिक गुणवत्ता कमी करीत नाही : दीर्घकालीन वाङ्मयीन श्रेयाला थोडा बाध आणते. मात्र एकूणच साहित्याच्या समृद्ध व्यक्तिमत्त्वात आपल्यापरीने थोडीफार — अगदी टिटवीच्या थेंबाने का होईना — भर टाकते. हे मान्य होणे न होणे, करणे न करणे ज्याचा त्याचा प्रश्न आहे. मात्र निष्कारण गोष्टींचे बागुलबुवे उभे करून शब्दांचे अर्थ दुबळे करणेही इष्ट नाही. ह्या बाबतीत, आपण साऱ्यांनीच आपणा सर्वांची मने एकदा नीट पाखडून घ्यायला हवीत.

एकूणच चळवळी, मग त्या महाराष्ट्रातील असोत, भारतीय स्तरावरील असोत अगर आंतरराष्ट्रीय असोत, तद्विषयक महामूर रणसंग्रामातील अण्णा भाऊंसारख्या लोकलेखक शाहिरांचे कर्तृत्व किती मोठे होते हा अभ्यासाचा एक स्वतंत्र विषय आहे. राष्ट्रीय पातळीवरील चळवळींमधील भरती-ओहोटीचे पडसाद अण्णा भाऊंच्या एकूण रचनेत कसे उमटले होते हे पाहणे हा स्वतंत्र चिंतनाचा विषय ठरेल. निदान ठरावा. देशभर राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय आंदोलनाचे पडघम घुमत असताना अण्णा भाऊंसारख्या लेखकांच्या लिखाणास सुरुवात झाली. गतीही लाभली. राष्ट्रीय लढा लोक पुढे रेटत नेत होते आणि अण्णा भाऊंसारखे प्रतिभावंत लेखक आपली सृजनशक्ती, त्या गाड्याला अधिक प्रगत करण्यासाठी शस्त्राप्रमाणे वापरत होते. लोकांबरोबर राहताना लोकांसाठी

नव्या जगाचे स्वप्नही त्यांना पडत होते. ते प्रत्यक्षात उतरावे, नावारूपाला चढावे म्हणून त्यांनी त्यासाठी आपले शब्द राबविले, प्रतिभा खर्ची घातली. बहुतांशी सहजभावे, नैसर्गिकपणेच लिहिले. अडथळे लिहिले तिथे अर्थातच फसले. पण एकूण हिशेब करता, अण्णा भाऊ नाटकी नव्हते. वैयक्तिक काय, सामाजिक काय की साहित्यिक काय, कुठेच अण्णा भाऊंनी 'नाटकी पोझ' घेतली नाही. ते त्यांच्या प्रकृतीच्या एकदम विरुद्ध होते.

अण्णा भाऊंनी उण्यापुऱ्या एकोणपन्नास वर्षांच्या हयातीपैकी लेखनासाठी वापरलेल्या पंधराएक वर्षांच्या काळात चाळीसभर कादंबऱ्या लिहिल्या. शंभर-सव्वाशेपर्यंत कथा बांधल्या. 'इनामदार', 'पेंग्याचे लगीन' अशी दोन-तीन गावरान नाटके रचली. 'अकलेची गोष्ट'सारखी अकराएक लोकनाट्ये उभी केली. 'स्तालिनग्राडचा पोवाडा', 'महाराष्ट्राची परंपरा', 'माझी मैना'सारखे लावणी-पोवाडे गाजविले. 'चित्रा' कादंबरीला कन्नड, रशियन, पोलिश भाषातून भाषान्तर होण्याचे भाग्य लाभले. 'वारणेच्या खोऱ्यात' गुजरातीत शिरली. 'फकिरा' हिंदी व पंजाबी भाषेत गाजून राहिली. 'अलगूज', 'आवडी', 'माकडीचा माळ', 'चिखलातील कमळ', 'वारणेचा वाघ', 'बारा गावचं पाणी' या कादंबऱ्यांना चित्राकार लाभला; आणि कादंबऱ्याइतक्याच चित्रपट म्हणूनही त्या गाजल्या. मऱ्हाट देशांबरोबरच आंतरराष्ट्रीय परिसरही अण्णा भाऊंनी पादाक्रांत केला. वि.स. ऊर्फ भाऊसाहेब खांडेकरांच्या नंतर परभाषांतून भाषान्तरित झालेले अण्णा भाऊ साठे हे अग्रक्रमाचे लेखक असावेत. यातून अण्णा भाऊंना आर्थिक लाभालाभ काय झाला हे प्रकरण शोककारक खरे; पण मराठ देशातले साहित्यिक अण्णा भाऊ देशी-विदेशी सर्वसंचार करणारे ठरले; हे खचित अभिमानाचे आहे.

अण्णा भाऊ लोकशाहीर म्हणून ख्यातकीर्त होते. त्यांनी पोवाड्याच्या कलेला वेगळी बैठक दिली. पोवाडा सौंदर्यपूर्ण रीतीने उभा केला आणि त्याद्वारे जनजागृती साधून जनशिक्षण केले. पावलोपावली सौंदर्यहानीचे धोके असूनही सर्वांगाने विचारपूर्वक पण कलात्मकतेने पोवाडे रचले असा त्यांचा गौरव अमर शेख यांनी केला आहे; तो अर्थांगांनी सार्थच आहे. या लोकशाहिराच्या गौरवाइतकाच कथा-कादंबरीकार म्हणून अण्णा भाऊंना मान आहे. मात्र 'फकिरा', 'वैजयंता', 'वारणेच्या खोऱ्यात', 'माकडीचा माळ'सारख्या कादंबऱ्या सोडल्यास इतर कादंबऱ्या दीर्घकथासदृश आहेत. अर्थात त्या कथा म्हटल्या पाहिजेत. कथासदृश कादंबऱ्या आणि कथा यातून अण्णा भाऊ हाडाचे कथाकार आहेत हेच प्रकर्षाने जाणवते. 'कथाकार अण्णा भाऊ' हा, अण्णा भाऊ साठे यांच्या समग्र साहित्याचा सूत्रधार आहे.

लोकनाट्यकार अण्णा भाऊंच्या प्रतिभेची जात मूलतः कथाकाराचीच आहे. रसरशीत जीवनदर्शन, चित्रमयतेचे रंगदर्शन, ठसठशीत व्यक्तिचित्रण आणि मूलाधाराचे कातीव

वैभव आदी गुणांनी समृद्ध अण्णा भाऊंची कथा आत्ममुक्तीचा उद्घोष करणारी आहे; तिला कहाणीचा स्पर्श आहे, लघुकथेचा बाज आहे, पण ती पूर्ण कहाणी नाही की संपूर्ण लघुकथा नाही. त्यामधली समग्र कथा आहे. अण्णा भाऊंनी ती जोसाने लिहिली आहे. कथा किंवा कादंबरी असा भेदाभेद न करता अण्णा भाऊंनी कथालेखन केले आहे. त्या दृष्टीने कथांत अण्णा भाऊ आहेत.

१९४९ साली अण्णा भाऊंनी 'मशाल' साप्ताहिकामध्ये 'माझी दिवाळी' नावाची पहिली कथा लिहिली; आणि नंतर निरनिराळ्या रूपांत कथाच लिहिल्या. 'खुळंवाडी', 'बरबाद्या कंजारी', 'भानामती', 'फरारी', 'लाडी', 'गजाआड', 'आबी', 'मास्तर', 'रानबेली', 'जिवंत काडतूस', 'कृष्णाकाठच्या कथा' असे त्यांचे कथासंग्रहामागून कथासंग्रह निघाले. अण्णा भाऊंच्या नावावर काही प्रक्षिप्त कथांचे पीक निपजावे इतपत त्यांच्या कथांचा झपाटा जबर होता. अण्णा भाऊंनी या साऱ्या कथांतून रांगड्या मराठी जीवनाचे, मताचे, मनाचे आणि मातीचे अद्‌भुत कादंबरी वाटावे असे सत्यचित्र रेखाटले. अनेक भुका व तृष्णा यामागे धावणाऱ्या, 'ठासलेल्या बंदुका'सारख्या माणसांच्या अण्णा भाऊंच्या कथा, आचार्य अत्रे यांनी म्हटल्याप्रमाणे 'जगण्यासाठी लढणाऱ्या माणसांच्या कथा' आहेत. जगण्यासाठी ही माणसे लढतात तेव्हा समाजातल्या किती तरी दाहक पातळ्यांचे विषण्ण करून टाकणारे दर्शन त्या देतात. 'माझे अनुभव सांगण्यासारखे वाटतात' या जाणीवेने लिहिलेली - अण्णा भाऊंना तृप्ती आणि रसिकांना बेचैनी देणारी, प्रस्थापितांविरुद्ध बंडावा करणारी कथा अण्णा भाऊंनी मराठी कथावाङ्‌मयात नेटाने प्रस्थापित केली यात शंका नाही.

अण्णा भाऊंची समग्र कथा व्यक्तिचित्रणात्मक, रूढीविध्वंसनार्थक अस्पृश्योद्धार - कार्यात्मक, अद्‌भुत रंजनात्मक, करुण विनोदात्मक, ग्रामीण कलात्मक आणि दीर्घकथा अशा प्रकारांत मोडणारी आहे.

आपली विविधांगी साहित्यसेवा महाराष्ट्राच्या चरणी रुजू करताना अण्णा भाऊंनी प्रसंगोपात आपले मनोगत प्रकट केले आहे. कथेसंबंधातही तसे ते आहे. 'बरबाद्या कंजारी'च्या 'प्रस्तावने'मध्ये आपल्या कथालेखनासंबंधी विवेचन करताना अण्णा भाऊंनी म्हटले आहे : ''मी जे जीवन जगतो, पाहतो, अनुभवतो, तेच मी लिहितो. मला कल्पनेचे पंख लावून भरारी मारता येत नाही. त्या बाबतीत मी स्वतःला बेडूक समजतो ... बरबाद्याचा जेव्हा कान कापला तेव्हा मी अंधारात बसून पाहत होतो. सुलतान नि भोमक्या हे दोघे अमरावती मध्यवर्ती तुरुंगात माझ्याच बराकीत बंदी होते. आम्हा तिघांच्याही कार्डावर 'खून करणे, दरोडा घालणे' असे भयानक आरोप होते ... मकुल मुलाणी तर मला मामा म्हणत होता. इरेनं गाढव खाणारा तुका अजून जिवंत आहे. फक्त त्याला ते गाढव पचलं नाही एवढंच. एकंदरीत माझी माणसं ही वास्तव आहेत नि जिवंत आहेत.'' अण्णा भाऊंच्या

अवतीभोवतीची ही माणसे आपल्या अवतीभोवती वावरणारी अशीच आहेत. परिचितासारखी वाटली तरी विलक्षण आहेत. चेतोहारी गहिऱ्या भाषेने अण्णा भाऊंनी ती स्मरणीय केली आहेत.

अण्णा भाऊंच्या उभ्या कथांतून अशी माणसे ठायी ठायी भेटतात : बरबाद्या कंजारी, निळू मांग, भोमक्या, बिलवरी, तुक्या, सपया, मकुल मुलाणी, राणोजी नसरू, सावळा मांग, भोमा, 'कोंबडीचोर' रामू, गंगाराम माहूत, विष्णुपंत कुलकर्णी, मलू ढेकणा, रामनाक महार, गीता, मीरा, रूपा, लाडी, चिल्ली, आबी, भानामती अशी किती तरी माणसे, किती तरी प्रश्न, दर्शन आणि प्रबोधन घेऊन येतात.

अण्णा भाऊंची ही माणसे झुंझार आहेत आणि बहुश: तीन गोष्टींसाठी ती रण मारण्याची तयारी करून बसतात : पुरुषांचा स्वाभिमान, स्त्रीचे शील आणि देशाचे स्वातंत्र्य. भुका आणि तृष्णा यांसाठीही ती नेहमी युद्धप्रवृत्त होतात. पण मुख्य विचाराचा विवेकही करतात. या सगळ्या उतट उत्कटतेतून वीर आणि करुण रसाच्या अंगाने कथावस्तूचे भरणपोषण होते. चित्ताकर्षक मनोहारीत्व, कसदार गहिरी भाषा, उत्फुल्ल संवाद, जातिवंत जिव्हाळा आणि प्रबोधनाची नस पकडून अण्णा भाऊ 'गच्च' कथा सांगतात. प्राय: सहजगत्या हे घडते. अखेरच्या काळातील काही कथांमधील 'पांढरपेशीकरण' वगळता या सहजपणात दुबळेपण कुठे भेटत नाही. कित्येक जागा तर अशा भेटतात की, अंत:करणाचे अग्निकुंड झाल्याचा भास होतो आणि गात्रे थरारतात! चैतन्याचे अस्तित्व तेजाळून उठते. अण्णा भाऊंचे पाय मातीत होते तसेच डोळे थोडे स्वप्नांवर असते तर त्यांच्या अख्ख्या कथासाहित्याला ऐतिहासिक मूल्यापेक्षा वाङ्मयीन मूल्य अधिक लाभले असते याची जाणीव होते; आणि असे असूनही अण्णा भाऊंच्या साऱ्या गुणदोषांसकट त्यांच्यावर प्रेम करणे जरूर वाटते. कारण शेवटी अण्णा भाऊ कोण होते, काय होते, काय करीत होते, काय खातपीत होते हे कोण पाहणार आहे? — कालप्रवाहाच्या पाणलोटात असे सारे अनुषंगिक बघता बघता वाहून जाते. अण्णा भाऊंसारखा प्रतिभावंत कोणत्या वाङ्मयीन जाणीवा, कोणत्या कालसंदर्भाने प्रकट करीत असतो हे महत्त्वाचे असते. कारण त्यावर वाङ्मयातील बदल अवलंबून असतात : अण्णा भाऊंच्या साहित्याने अशी बदलांची, दिशांची आणि वळणांची नोंद केल्याचे स्पष्ट दिसते. ग्रामीण-प्रादेशिक, दलित, विशेषत: दलित वाङ्मयाचा चढतावाढता विकासक्रम हे त्याचे ठळक प्रत्यंतर आहे.

अण्णा भाऊंचे सारे साहित्य संघर्ष आणि वाङ्मय या अद्वैतात आहे : त्याची फारकत करून त्याचा अन्वयार्थ लावता येत नाही. अण्णा भाऊंच्या साहित्याच्या निर्मितीची बीजे आणि प्रेरणा, चिंतनाच्या मूठभर कक्षा आणि आकलनाचा आवेग, वास्तवाच्या मर्यादांचे व्यापकत्व आणि स्वप्नांचे न दिसणारे पाय, कलामूल्यांचे स्वरूप आणि जीवनदृष्टीचे

डोळस आंधळेपण, साम्यवादी विचारप्रणालीची बांधिलकी आणि आत्मीय अलिप्ततेचे आंधळेपण, दारिद्र्याच्या निशाणाखाली एकत्रित होऊन जगण्यासाठी पत्करावे लागणारे हौतात्म्य आणि माणूस म्हणून जगण्याविषयीचे आवाहन आदी साऱ्या गोष्टींची उकल या अद्वैतात आहे. अण्णा भाऊंना समजावून घेण्याची ती खूण आहे; त्यासाठी त्या वाटेचे वाटसरू झाले पाहिजे.

ह्या देशात मरण स्वस्त आहे, होत आहे; म्हणून अण्णा भाऊ अस्वस्थ राहिले. वाङ्मयाच्या कारखान्यातील धडाडता बॉयलर बनून, आपल्या लहानखुऱ्या कुवतीनुसार त्यास भडाग्नी देत गेले. कवी नारायण सुर्वे यांनी म्हटले आहे, "आम्हाला सर्वात मोठे चार शाप आहेत. ते शाप घेऊन आमचा लेखक वा शाहीर पुढे येतो आणि त्या शापांच्याच ओझ्याखाली, जसे एखादे गाढव मरमर काम करून चिरडून मरावे तसा अचानक मरतो. ते शाप म्हणजे, दारिद्र्य, अज्ञान, जात आणि राजकारण." अण्णा भाऊ या शापचक्रात उगवले, पोसले, वाढले, रोडावले, खचले आणि गेले. आणखीही जातील. भावनेने नव्हे, कर्तव्यदृष्टीनेही नव्हे, तर न्याय्य म्हणून. आम्ही या साऱ्याची किंमत केव्हा आणि कशी चुकविणार, की चुकविणारच नाही, एवढाच प्रश्न आहे.

औरंगाबाद, दि. १५-४-१९९१ — *एस. एस. भोसले*

परिशिष्ट ४

# 'फकिरा' : प्रस्तावना

**गृहस्थ :** (दारातून) काय चाललंय? येऊ का आत?

**मी :** या ना, या!

**गृहस्थ :** (दारातून आत येत) तसं नाही! पण काही महत्त्वाचं काम चाललं असलं, तर—

**मी :** काम चाललंय. ते महत्त्वाचं आहे; पण तुम्हाला आत यायला काही हरकत नाही. झाली, तर या कामाला तुमची मदतच होईल.

**गृहस्थ :** (पुढं येऊन बसतात.) ती कशी काय, बुवा?

**मी :** अहो, काही काही कामं अशी असतात, की त्यात जितके भागीदार अधिक, तितका त्यांच्यापासून होणारा आनंद मोठा! वाङ्मयाला रसास्वाद हे असंच एक काम आहे. त्याच्यात कुणी बरोबरीनं भाग घ्यायला नसेल, तर तो आनंद केव्हा केव्हा फिका वाटू लागतो. भर पंक्तीत भुरके मारल्याशिवाय बासुंदीची लज्जत् कळत नाही, तसंच थोडंसं आहे हे!

**गृहस्थ :** तुमचं काही नवीन लिहिणं चाललंय वाटतं?

**मी :** अं हं! एक प्रस्तावना लिहायचीय. विचार करतोय तिचा!

**गृहस्थ :** अलीकडं प्रस्तावना लिहिताय तुम्ही!

**मी :** ते असं होतं पाहा, मनुष्य म्हातारा झाला, म्हणजे तरुण मंडळी त्याला नमस्कार करायला येतात. मग साहजिकच त्याला त्या तरुणांना आशीर्वाद द्यावे लागतात. क्रिकेटमधून निवृत्त झालेल्या मंडळींना पुढे तरुण खेळाडूंना मार्गदर्शन करावं लागतं ना, त्यातलाच प्रकार आहे हा! खेळाडू खेळत असतो, फटके मारीत असतो; पण वडिलकीच्या नात्यानं त्याचं कौतुक करायला किंवा तो फटका असा मारायला नको होता नि तसा मारायला हवा होता, असं सांगायला—

**गृहस्थ :** कुणाच्या पुस्तकाला प्रस्तावना लिहिताय?

**मी :** अण्णा भाऊ साठ्यांच्या.

**गृहस्थ :** शाहीर अण्णा भाऊ साठे? परवा इथं आले होते! अहो, ते तर पोवाडे रचतात, तमाशे करतात. त्यांच्या एखाद्या तमाशाला तुम्ही प्रस्तावना लिहिताय की काय?

**मी :** त्यातली काही जाण असती, तर लिहिलीही असती; पण आज अण्णा भाऊंच्या ज्या पुस्तकाचा परिचय मी करून देणार आहे, ती एक कादंबरी आहे. ही तिसरी कादंबरी

त्यांची. कादंबऱ्यांप्रमाणे कथाही लिहितात अण्णा भाऊ. मोठ्या खुमासदार असतात त्या. 'खुळंवाडी' वाचली आहे तुम्ही?

**गृहस्थ :** (हसत) खुळंवाडी? विनोदी गोष्टींचा संग्रह आहे की काय, हा?

**मी :** अण्णा भाऊंच्या गोष्टीत विनोद नसतो, असं नाही; पण त्यांचा प्रकृतिधर्म आहे गंभीर लेखकाचा! ज्यानं फार भोगलं आहे, सात पडद्यांतून नव्हे, तर समोरासमोर जीवनातल्या क्रूर सत्याचं ज्याला दर्शन घडलं आहे, अशा पोटतिडकीनं लिहिणाऱ्या साहित्यिकाचा आत्मा त्यांच्यापाशी आहे. साहजिकच त्यांच्या गोष्टी मोठ्या वैशिष्ट्यपूर्ण असतात. ग्रामीण कथाकार म्हणून दिघे, माटे, ठोकळ, भोसले, यांच्यापासून व्यंकटेश माडगूळकर, मिरासदार, शंकर पाटील, रणजित देसाई यांच्यापर्यंत अनेकांची नावं तुम्ही ऐकली, तरी तिचा ढंग या सर्वांच्यापेक्षा अगदी निराळा आहे.

**गृहस्थ :** तो कसा काय, बुवा?

**मी :** झणझणीत पण फक्कड कांद्याच्या पिठल्याला जी रुची असते, तसं काही तरी अण्णा भाऊंच्या कथा वाचून वाटतं. (गृहस्थ हसू लागतो. ते पाहून) तुम्हाला स्वयंपाकघरातील उपमा आवडत नसली, तर आभाळातली देतो. संध्याकाळी पश्चिमेकडे नाना प्रकारच्या गडद रंगांनी रंगून गेलेले ढग दिसतात ना? तशा — जाऊ दे ते! समाजाच्या तळाच्या थरातली माणसं, घटना आणि जीवन हे सारं अण्णा भाऊंनी अनुभवलं आहे, पचविलं आहे. माझ्यांसारखे पांढरपेशे लेखक घराच्या खिडकीतून किंवा गच्चीत टाकलेल्या आरामखुर्चीतून बाहेरचं जीवन अनुभवतात, तसं अण्णा भाऊंचं नाही. या थरातच त्यांचा जन्म झाला. टीपकागद जसा झटकन ओली अक्षरं टिपतो, त्याप्रमाणं लहानपणापासून खेडेगावातील दलितांच्या आयुष्यांतली आसवं अण्णा भाऊंच्या कलावंत मनानं टिपून घेतली आहेत. नुसती आसवंच नाहीत, तर त्यांच्या आशा-आकांक्षा, त्यांचे राग-लोभ सारं काही त्यांनी आत्मसात केलं आहे. या साऱ्या अनुभवांतून त्यांच्या कथा निर्माण झाल्या आहेत.

**गृहस्थ :** मग त्यांची ही नवी कादंबरी जरूर वाचायला हवी!

**मी :** तेच तुम्हाला सांगणार होतो मी! पुण्या-मुंबईकडल्या सपक किंवा लंपट कामकथा वाचून कंटाळलेल्या तुमच्या मनाला या कादंबरीनं चांगला रुचिपालट मिळेल. हिचं सारं कथानक वारणेच्या खोऱ्यात आणि त्याच्या आसपासच्या भागात घडतं. हिच्यातली प्रमुख पात्रे आहेत ती मांग आणि महार जमातींतली.

**गृहस्थ :** म्हणजे सामाजिक सुधारणेची ही कादंबरी आहे की काय? हरिजनोद्धार वगैरे—

**मी :** ही कादंबरी आजची नाही. ती एक प्रकारची ऐतिहासिक कादंबरी आहे. ऐतिहासिक म्हणजे शिवाजी, तानाजी किंवा अशोक-चंद्रगुप्त यांच्या काळातली नव्हे.

इंग्रजी अंमल प्रस्थापित झाल्यानंतर या शतकाच्या आरंभी दक्षिण महाराष्ट्रातल्या खेडेगावच्या परिस्थितीचं-विशेषत: एक खेड्यातल्या मांग जमातीचं आणि तिच्यातल्या शूर बापलेकाचं-चित्रण करणारी ही कादंबरी आहे. वारणेच्या खोऱ्यातली ही कादंबरी अण्णा भाऊंनी लिहावी, हे स्वाभाविकच आहे. त्यांचं बाळपण याच खोऱ्यात गेलं आहे आणि ज्या जमातीचं पन्नास-साठ वर्षांपूर्वीचं चित्रण त्यांनी केलं आहे, तिच्यातच त्यांचा जन्म झाला आहे. प्रत्येक ललित-लेखक कळत-नकळत आत्मचरित्राचा उपयोग करीत असतो. लहानपणी पाहिलेल्या, ऐकलेल्या, परंपरेन चालत आलेल्या आणि मनावर खोल संस्कार करून गेलेल्या अनेक गोष्टी, ललित-लेखनात प्रतिबिंबित होत असतात. अण्णा भाऊही या नियमाला काही अपवाद नाहीत.

**गृहस्थ :** पण या कादंबरीचं कथानक काय आहे?

**मी :** हे पाहा, असं थोडक्यात कथानक सांगून तिची गोडी तुम्हाला कळणार नाही. कुठल्याही कादंबरीचं कथानक सारांशानं सांगू नये, या मताचा मी आहे. अहो, नर्तिकेचा एखादा फोटो पाहून तिच्या नाना तऱ्हेच्या नृत्यांचं कसब कधी आपल्याला कळेल का? हे छापील फॉर्म इथे पडलेले आहेत. त्यातलं नुसतं पहिलं प्रकरण वाचून पाहा. मी ते वाचलं, तेव्हा एखादा चित्रपट माझ्या डोळ्यांपुढून सरकत असल्याचा भास झाला मला. या पहिल्या प्रकरणात मांग-कुटुंबातला कर्ता पुरुष राणोजी उशिरा घरी परत येतो. त्याच्या वाटेवर कान लावून बसलेले त्याचे आई-बाप, बायको आणि मुलं यांची मन:स्थिती कशी झालेली असते, शेजारच्या गावातल्या जोगणी आपल्या गावात आणण्याची आणि त्याला मोठेपण प्राप्त करून देण्याची इच्छा शूर राणोजीच्या मनात कशी निर्माण होते, लहानग्या फकिराच्या बोलण्यानंसुद्धा ती इच्छा तशी चेतवली जाते, दुसऱ्या दिवशी हा निधड्या छातीचा शूर तरुण जोगणी कशा घेऊन येतो, त्या आणायच्या वेळीही आपल्या लाडक्या मुलांसाठी पेढ्यांचा पुडा न्यायला तो कसा विसरत नाही आणि शेवटी जोगणी आपल्या गावाच्या हद्दीत आणल्यावर विरोधकांकडून तो अन्यायानं कसा मारला जातो, हे सर्व चित्र अण्णा भाऊंनी मोठ्या रसरशीत रीतीनं चित्रित केलं आहे.

**गृहस्थ :** तुम्ही सांगितलेला प्रसंग तर मोठा अटीतटीचा दिसतो; पण या जोगणीभोवतीच लेखकानं सारं कथानक गुंफलं असेल, तर ते एक जुन्या काळच्या श्रद्धांचं आणि त्यांच्यावर अवलंबून असलेल्या खेडवळ समाजाचं चित्रण होईल.

**मी :** हे पाहा, या कादंबरीचा काळ आजचा नाही. तो पन्नास-साठ वर्षांपूर्वीचा आहे. या वेळेच्या हरिभाऊंच्या मध्यमवर्गाच्या कादंबऱ्यांतसुद्धा धर्मभोळेपणाचं चित्रण आलंच आहे, कुठं देवर्षीचं बंड आहे.

**गृहस्थ :** या जोगणीमुळं दोन गावांत जी चुरस उत्पन्न झाली असेल, तिच्या खेरीज आणखी काय आहे, या कादंबरीत?

**मी :** या चुरशीतूनच लेखकानं पुढल्या कथानकाचा विकास घडवून आणला आहे. राणोजीनं आणलेल्या जोगणी परत नेण्याचा प्रयत्न केला जातो. त्या वेळी त्याचा मोठा झालेला मुलगा फकिरा खूप शर्थीनं लढतो. तो त्या जोगणी आपल्या गावातून जाऊ देत नाही. हा फकिराच कादंबरीचा नायक आहे. त्याचं शौर्य, त्याचं धाडस, कुठल्याही अन्यायाविषयी त्याला वाटणारी चीड आणि त्याची बंडखोरी वृत्ती यांनीच पुढलं सगळं कथानक घडवलं आहे. आताच मी तुम्हाला या कादंबरीचा प्रारंभ सांगितला ना? तसाच तिचा शेवटही मोठा चित्तवेधक व हृदयस्पर्शी आहे. फकिरा आणि त्याचे साथीदार इंग्रज सरकारविरुद्ध आपल्या परीनं बंड करतात, झगडत राहतात, दऱ्याखोऱ्यांत लपून आपला झगडा चालवितात.

**गृहस्थ :** पण असं बंड करण्याचं कारण काय?

**मी :** कारण नेहमीचंच आहे. या दोन गावांच्या चुरशीतूनच या गावातल्या साऱ्या मांग-महारांचा वहीम सरकारला येतो. त्यांच्यावर हजेरी लादली जाते. हजेरीची ती अत्यंत अपमानकारक पद्धत शेवटी फकिराला सहन होत नाही. त्यातून पुढच्या संघर्षाची ठिणगी पडते. पुढे आपल्या गावातल्या उपास काढणाऱ्या महार-मांगांसाठी फकिरा आणि त्याचे साथीदार धान्य लुटून आणतात.

**गृहस्थ :** तुम्ही मघाशी शेवटचा प्रसंग मोठा हृदयस्पर्शी आहे, असं म्हणालात, तो काय आहे? फकिरा फाशीबिशी जातो की काय?

**मी :** हळूहळू तुम्ही कादंबरीचं सारं कथानकच माझ्याकडून काढून घ्यायला लागलात की! ते असू दे. तो शेवटचा प्रसंग मला मोठा परिणामकारक वाटला. फकिरा आणि त्याचे साथीदार सरकारी शिपायांना दाद देत नाहीत; पण शेवटी त्यांच्या कुटुंबातली माणसं पकडली जातात, ओलीस धरली जातात. सत्याप्पासारख्या दोस्ताकडून कुमक मिळण्याचा संभव नाहीसा होतो. यशाची बिलकूल आशा नाही; असं दिसताच फकिरा साहेबासमोर हजर होतो आणि आपल्या माणसांची मुक्तता करवितो. त्याचं ते हजर होण्याचं वर्णन अण्णा भाऊंनी मोठ्या ऐटबाज रीतीनं केलं आहे.

**गृहस्थ :** तुम्ही सांगता, हा प्रसंगसुद्धा चित्रपटात रंगेल, असाच आहे.

**मी :** अण्णा भाऊंच्या कादंबरीचा हा विशेष आहे. ती उग्र पण चित्तवेधक प्रसंगांनी भरलेली आहे, हे खरंच आहे; पण या सर्व प्रसंगांत एक मोठा गुण असा आहे, की ते जणू आपल्या डोळ्यांपुढं घडत आहेत, असं वाचकाला वाटत राहतं.

**गृहस्थ :** पण केवळ चमत्कृतिजनक किंवा चित्त थरारून सोडणारे प्रसंग भरपूर असले, म्हणजे चांगली कादंबरी होते का?

**मी :** छे! जिवंत स्वभावचित्रण नसलं, तर ते नुसते चटकदार प्रसंग घेऊन काय करायचे? ती नुसती ठो ठो करणारी तोट्यांची माळ होईल! या कादंबरीतील तीन

स्वाभावचित्रं वाचकांच्या मनाची पकड घेतील, अशी उतरली आहेत. पहिलं फकिराचं. त्याचा उमदा, शूर आणि प्रेमळ स्वभाव सर्व कादंबरीत पसरला आहे— अगदी झगझगीत प्रकाशासारखा! पण या चित्रणापेक्षाही मला अधिक आवडली ती दोन पात्रं म्हणजे फकिराची आई राधा आणि त्या गावातले कुलकर्णी पंत. तशी राधा कादंबरीत फार थोडा वेळ आपल्याला भेटते. शूर नवऱ्याची बायको होणं आणि शूर मुलाची आई होणं, याचं सुख काय आहे आणि दु:ख काय आहे, हे तिला पुरेपूर अनुभवावं लागतं. तिच्या पत्नीहृदयाच्या आणि मातृहृदयाच्या अंतरीच्या वेदना लेखकानं जाता जाता नुसत्या सूचित केल्या असल्या, तरी त्या वाचकाला हृदयाला जाऊन भिडतात. पंतांचा स्वभावही मोठा ठसठशीत रेखाटला आहे. दिलदार, करारी, साऱ्या गावावर प्रेम करणारा असा हा जिवंत काळजाचा मनुष्य कादंबरीतल्या कालप्रवाहाबरोबर जसजसा वृद्ध होत जातो, तसतसा त्याच्याविषयी वाचकाच्या मनातला आदर वाढत जातो.

**गृहस्थ :** या कादंबरीची भाषा ग्रामीण पद्धतीचीच असेल?

**मी :** त्या भाषेचंही वैशिष्ट्य आहे. शहरातला पांढरपेशा मनुष्य लिहितो, तसलं शुद्ध गद्यही अण्णा भाऊ सहजतेनं लिहितात. खेड्यातील बोली हा तर त्यांच्या तळहाताचा मळ आहे. ती ऐकतच ते लहानाचे मोठे झाले; पण त्यांच्या या साऱ्या लेखनात एक प्रकारची स्वत:ची ऐट आहे. कुठल्याही प्रकारचा उसनेपणा नाही. मधून मधून लेखक जे निसर्गवर्णन करतो, त्यात किंवा साध्या गोष्टी नवीन धाटणीनं वर्णन करण्यात त्यांच्या भाषेला काव्याची किनार सहज शोभा देऊन जाते. उदाहरणार्थ, ही वाक्यं पाहा : 'बेलगाम गवऱ्या भन्नाट निघाला.', 'त्या शब्दांनी त्याच्या काळजात कुरूप केलं होतं.', 'दारिद्र्याच्या साणेवर धैर्याला धार चढते, असा त्याचा दावा होता.', 'आई तू साधी न्हाईस—तू एका वाघाची आई हाईस!', 'तिथं, पेवात किडे नांदावे तशी मानसं नांदत होती.'

**गृहस्थ :** आज तुमच्याकडे सहज आलो, ते बरं झालं म्हणायचं.

**मी :** या लेखकाला प्रतिभेचं देणं आहे. जीवनात आग ओकणाऱ्या हरेक तऱ्हेच्या गोष्टींचा अनुभव आहे. त्याच्या मनात एक प्रकारचा पीळ आहे—आणि अन्यायाविरुद्ध बंड उभारणाऱ्या वृत्तीचा तो पूजक आहे! हे सारं ही कादंबरी वाचता वाचता तुमच्या सहज लक्षात येईल; पण हे सर्व जमेला धरूनही अण्णा भाऊंनी काही गोष्टींकडे अधिक लक्ष देणं जरूर आहे, असं मला वाटतं. त्यातली ही, की त्यांची कादंबरी ही अधूनमधून प्रसंगांची मालिका वाटते. प्रसंगी स्वभाव, वातावरण, विषय, शैली या सर्वांची समरसता होऊन जी निर्मिती होते, ती कलादृष्ट्या श्रेष्ठ ठरते. अण्णा भाऊंना अजून ही सर्व गुणांच्या समरसतेची किमया साधलेली नाही. शिवाय त्यांच्या कादंबरीचा जो मुख्य प्रेरक भाग आहे, तो त्या काळाचं चित्र या दृष्टीनं कितीही चांगला असला, तरी ऐतिहासिक किंवा

साहसप्रधान अशा कथानकांच्याद्वारे असले विषय सांगण्यात स्वातंत्र्यानंतर तितकंसं स्वारस्य राहिलेलं नाही. ज्यांना कलात्मकतेइतकंच सामाजिक महत्त्व वाटतं, अशा लेखकांपैकी अण्णा भाऊ आहेत. अशा लेखकांना अन्यायाची चीड असो किंवा न्यायाची, ती व्यक्त करताना केवळ भूतकाळाला चिकटून राहता उपयोगी नाही. आता आपल्या सर्व सामाजिक संघर्षाचं स्वरूपच बदललं आहे. अशा वेळी अण्णा भाऊंनी आजची खेडी, तिथली खालच्या थरातली जनता, तिचं जीवन आणि तिच्यापुढे दत्त म्हणून उभ्या असणाऱ्या समस्या यांचं चित्रण केलं, तर ते अधिक उद्‌बोधक होण्याचा संभव आहे. सामाजिक प्रकृतीच्या लेखकाला 'प्राप्तकाल हा विशाल भूधर, सुंदर लेणी तयात खोदा' हा केशवसुतांचा संदेश नेहमीच प्रेरक वाटला पाहिजे. मात्र अण्णा भाऊंनी असं काही तरी करावं, असं मला वाटत असलं, तरी प्रत्येक लेखकाची शक्ती व त्याच्या मर्यादा याची मला परिपूर्ण कल्पना आहे. नदीचा प्रवाह काय तिच्या काठावरल्या लोकांच्या इच्छेनुसार वाहतो? पण त्यानं कितीही वेडीवाकडी वळणे घेतली, तरी त्याच्या भोवतालचा भाग तो पिकवीत जातोच जातो. कलावंतांचंही तसंच आहे. हे लक्षात ठेवूनच आपण अण्णा भाऊंच्या चौथ्या कादंबरीची वाट पाहात राहू या.

कोल्हापूर, दि. ५-३-१९५९ — *वि. स. खांडेकर*

परिशिष्ट ५

# दलित साहित्य संमेलन : १९५८
# अण्णा भाऊ साठे यांचे
# उद्‌घाटनपर भाषण★

नियोजित अध्यक्ष, स्वागताध्यक्ष, कार्यवाह व बंधु-भगिनींनो,

या महाराष्ट्र दलित साहित्य संमेलनाचे उद्‌घाटन माझ्यासारख्या एका दलितानं करावं हा एक अपूर्व असा योग असला तरी हे आचार्य अत्रे यांचे कार्य मी करीत आहे याची मला जाणीव आहे.

दलित साहित्यिकांचे वेगळे संमेलन भरवून हा सवतासुभा कां उभा करता, असा प्रश्न काही मंडळी करीत आहेत. काहींच्या मते अस्पृश्यता निवारण करणारा कायदाच अस्तित्वात असल्यामुळे आज दलित हा शब्दच निरर्थक झाला आहे. सर्व काही ठीक आहे. परंतु हा प्रश्न निर्माण करणारे दलितांना माणूस मानतात. पण त्या दलितांचा एक वर्ग आहे ही गोष्ट ते मान्य करीत नाहीत. त्यामुळेच हा वरील प्रश्न निर्माण होत आहे.

कारण केवळ महाराष्ट्रापुरतेच जरी बोलायचे झाले तरी दलित माणसाचा मोठा वर्ग या महाराष्ट्रात अस्तित्वात आहे. त्यांचे जीवन वेगळे असून, इतर वर्गाशी ते संलग्न आहे. हा वर्ग या देशात अग्रेसर असून, त्याच्या न्यायी संघर्षाचे परिणाम सर्व समाजावर होत असतात. तो या देशाचा सामाजिक, सांस्कृतिक पाया आहे. परंतु तो पिळला जाणारा नि कष्ट करणारा दलित म्हणून निराळा आहे, नि उपेक्षित आहे. आणि अशा या दलिताला आपले जीवनाचे स्पष्ट प्रतिबिंब आजच्या मराठी साहित्यात दिसत नाही. आजचे साहित्य आरशासारखे स्वच्छ असावे. त्यात आपले प्रतिबिंब स्पष्ट असावे एवढीच त्याची मागणी आहे. आपला चेहरा आहे तसा दिसावा असं वाटणं गैर नाही.

कारण तरंगमय तळ्यात पडलेली सावली जशी लांबळुकी नि डगमगती दिसते तद्वत आजचा दलित आजच्या साहित्यात दिसतो. हा दलित आजच्या समाजाचे हृदय आहे, त्या हृदयाचे प्रदम्य स्पंदन होत असते. त्यात हर्ष, खेद, कोमल, कठोर अशा भावना जागृत झाल्यात, त्या भावनांचे तंतू जुळून त्या त्याच्या भावनाचा उगम कशात होतो याची

---

★ २ मार्च १९५८ रोजी महाराष्ट्र दलित साहित्य संघाच्या वतीने आयोजित केलेल्या पहिल्या साहित्य संमेलनातील शाहीर अण्णा भाऊ साठे यांचे उद्‌घाटनाचे भाषण.

कोणी नीट दखल घेत नाही. हा माणूस कष्टासारखे खडतर कर्म का करतो हे जोपर्यंत लेखकाला कळत नाही, तोपर्यंत तो त्याचे दलिताचे साहित्य निर्माण करू शकत नाही. दलित वर्गाचे अथांग जीवन दिसण्यासाठी लेखकाला एक दिव्य दृष्टी असावी लागते. तो त्या वर्गाशी एकनिष्ठ असावा लागतो. तो वस्तुनिष्ठ असावा लागतो. आणि त्याचा दलितवर्गाच्या सर्व न्यायी संघर्षावर नि त्याच्या अंतिम विजयावर विश्वास असला पाहिजे. म्हणजे तो लेखक ध्येयवादी असला पाहिजे. नि त्याची कल्पकता ही अशीच हवी.

माणूस जगतो का? नि जगण्यासाठी एवढा धडपडतो का? याचा विचार आम्ही करणे जरूर आहे. त्या धडपडणाऱ्या पतिताला आम्ही भिन्ना समजतो, तो उंच गगनात गेलेल्या विद्युतमय मनोऱ्यावर उभे राहून विजेच्या तारा जोडतो, खाणीत उभ्या कड्यावर चढून सुरुंगाना पेट देतो किंवा पोलादाच्या रस करणाऱ्या भट्टीवर तो निर्भय वावरतो आणि या सर्व ठिकाणी मृत्यू त्याची वाट पाहत असतो. कधी कधी त्याची व मृत्यूची गाठ पडून हा दलित कष्ट करीत करीत मरण पत्करतो. ही जगण्याची नि मरण्याची आगळी रीत आहे. ती लेखकाने समजून घ्यावी. सुरुंगाना पेट देता देता किंवा पोलादाच्या रसात बुडून मरणे, नाही तर विजेच्या धक्क्याने मरणे, दिवाळे निघाले म्हणून शेअर बाजारात मरणे या मरणातील अंतर लेखकाने मोजून पाहावे नि श्रेष्ठ मरण कोणते ते निश्चित ठरवावे.

दलितातही सर्व भावना इतरांप्रमाणे सदैव जागृत असतात. पण तो इतरांपेक्षा जरा निराळा असतो. कारण तो हाडामांसाचा केवळ गोळा नसतो. तो निर्मितीक्षम असतो. तो वास्तव जगात कष्टाचे सागर उपसून दौलतीचे डोंगर रचतो. अशा या महान मानवावर महाकाव्य रचणारा त्याला हवा असतो...

एका झाडाखाली तीन दगडांची चूल करून मडक्यात अन्न शिजवून दोन मुलं नि बायको यांना जगविणारा हा दलित वरवर कंगाल दिसला तरी त्याची संसार करण्याची इच्छा केव्हाही पवित्र अशीच असते. कुटुंबसंस्थेवरचा त्याचा विश्वास मुळीच ढळलेला नसतो. परंतु त्याची कुटुंबसंस्थाच भांडवलदारी जगाने त्या झाडाखाली हाकलून दिलेली असते. त्याचे आम्ही निरीक्षण करावे, याची कारणपरंपरा शोधावी आणि मग त्या कंगाल दिसणाऱ्याविषयी लिहावे. जपून लिहावे; कारण या समाजाची घडीन् घडी त्या दलिताने व्यापवली आहे. अधिक काव्यमय शब्दात बोलायचे झाले तर असे म्हणता येईल की, "हे जग, ही पृथ्वी शेषाच्या मस्तकावर नसून दलिताच्या तळहातावर तरलेली आहे." अशा या दलिताचे जीवन खडकातून झिरपणाऱ्या पाझराप्रमाणे असते. ते जवळ जाऊन पाहा. मग लिहा. कारण 'जावे ज्याच्या वंशा तेव्हा कळे' हे तुकारामाचे म्हणणे खोटे नाही.

म्हणून दलिताविषयी लिहिणाऱ्यांनी प्रथम त्याच्याशी एकनिष्ठ असले पाहिजे. तू गुलाम नाहीस, हे जग तुझ्या हातावर आहे, याची जाणीव करून घ्यावी. त्याचे जीवन वरच्या पातळीवर नेण्याची शिकस्त करावी आणि त्यासाठी लेखक हा सदैव आपल्या

जनतेबरोबर असावा लागतो. कारण जो कलावंत जनतेबरोबर असतो त्याच्याबरोबर जनता असते. जनतेकडे पाठ फिरवणाऱ्याकडे साहित्यही पाठ फिरवीत असते. जगातील सर्व श्रेष्ठ कलावंतांनी वाङ्मय हा जगाचा तिसरा डोळा मानला आहे. आणि तो डोळा सदैव पुढे व जनतेबरोबर असणे जरूर आहे.

परवा मराठी भाषेसाठी जनतेने अभूतपूर्व असा संग्राम दिला. खऱ्या अर्थाने तो लढा मराठी साहित्यासाठीच होता नि आहे. त्या लढ्यात सोळा सोळा वर्षांच्या मुलींनी आत्मबलिदान दिले. त्या लढ्यात जे कलावंत जनतेबरोबर होते, त्यांनी या महाभारतावर कवनं रचली. कुणाच्या काव्याच्या करवती तापल्या. कुणाची कृपणता वीररस उधळू लागली. कुणी मराठी भाषेची महती गायिली. त्या कलावंताना हा महाराष्ट्र कधीच विसरणार नाही. परंतु जो कलावंत जनतेबरोबर नसतो, तो बंद खोलीतील कला मांडीवरच्या खुणा मोजते नि मांडीवरच्या खुणा मोजणारी आम्हा दलितांची कला नसते. आमची कला डमडम गोळीच्या खुणा मोजते. ती आमची कला, ते आमचे साहित्य त्याचबरोबर दलित स्त्रियांच्या गालावरच्या तिळावर जी सुंदर कलाकृती असेल ती कलाकृती आमची. जो कलावंत ध्येय जाणत नाही, जनता जाणत नाही, तो कोणत्या मार्गाने जातो याची कैक उदाहरणे देता येतील. आम्हाला जे दिसते ते आम्ही लिहितो. कला ही वर्गातीत असावी, प्रचारातीत असावी असा त्याचा दावा असतो आणि अशा या कलावंताचा आज बोलबालाही कमी नाही. परंतु जो जनतेला जाणत नाही, तो तिला विद्रूप करतो याचे नमुने मराठी साहित्यात मुबलक मिळतात.

एका बारा वर्षांच्या मुलीचे बोक्यावर प्रेम बसणे आणि त्याने कामवासना तृप्त करावी म्हणून तिने चड्डी फेडणे या कथेला काय नाव देता येईल? ही माणसाला हैवान करीत नाही? एक कारकून संततिनियमन करावे म्हणून स्वत:वर शस्त्रक्रिया करून घेतो, पण त्याची तिसऱ्यांदा (पत्नी) गरोदर राहते म्हणून तो झुरतो; याचा अर्थ ती बाई व्यभिचारी होत नाही? कथेपासून आम्ही काय शिकावे?

महिला संघाची अध्यक्ष बाई पुण्याहून मुंबईस येत असता गाडीत भेटलेल्या एका माणसाबरोबर अखेरचा डाव खेळते. ही माणसांची निंदा नाही का? या कमला फडकेच्या कथेत मराठी माणूस नाही आणि दलित तर मुळीच नाही. हे फडके पति-पत्नीचे वाङ्मय 'असेच' नाही, याचाच अर्थ जो ध्येय जाणत नाही तो जनतेला विद्रूपच वाटतो. हे सर्व मनोविश्लेषणवादाची रापी घेऊन माणसांची कातडी सोलू लागले आहेत. म्हणून हे दलितांचे वेगळे साहित्य संमेलन भरत आहे एवढेच. हे मनोविश्लेषणवादी आपल्या वाङ्मयाचे समर्थन करताना म्हणतात, जीवनाच्या दोन बाजू असतात. पैकी एकीचा खोल जाऊन आम्ही अंत घेतो; परंतु नाशिकात गंगा आणि गटार दोन्ही अस्तित्वात आहे. तुम्ही गंगेऐवजी गटारच का पसंत करता?

आम्हाला गंगेसारखे निर्मळ साहित्य हवे आहे. आम्हाला मांगल्य हवे आहे. आम्हाला मराठी साहित्याच्या थोर परंपरेचा अभिमान आहे.

कारण मराठी साहित्याची नांदी आमच्याच जीवनसंघर्षाने झडली आहे. जेव्हा दलितांची सावली असह्य होती तेव्हा महानुभावपंथीय साहित्यिकांनी, सर्वांना ज्ञान मिळाले पाहिजे, ज्ञान हे मोक्ष असे समजून बंड केले. ते आमचे साहित्यिक. माणसाला माणूस म्हणून जगता आले पाहिजे असा दावा मांडून ज्यांनी दलितांच्या भाषेत महाराष्ट्राला सुंदर ज्ञानेश्वरी दिली ते आमचे साहित्यिक आणि चुकलेले महाराचे मूल कडेवर घेऊन जाणारे ते एकनाथ, ते आमचे साहित्यिक. जो दलिताला कडेवर घेतो, त्याला जिभेवर घेतो आणि त्याला जो विद्रूप करतो, त्याला दलित विद्रूप करतो अशी इतिहासाची साक्ष आहे.

शब्दांना नुसता आकार देणे सोपे असते. त्या आकाराला आत्मा देणे त्याहून अवघड आहे. तेदेखील काही लेखकांना सहज साधून जाते. पण त्या आत्म्यामागची इतिहास-परंपरा शोधणे आणि तिचा अर्थ लावणे फार अवघड आहे.

हा आचार्य अत्रे यांचा खुलासा आम्ही दलित लेखकांनी समजून त्याचा अर्थ लावावा आणि इतिहास परंपरा शोधण्याचा प्रयत्न करावा. आम्ही आपल्या वर्गाचे इमान पटवून त्याचा उपमर्द होणार नाही याची काळजी घेऊन त्याचे साहित्य निर्माण करू या. या दलिताचे जीवन सुखी व समृद्ध कसे होईल याची काळजी करू या, या दलिताला नि त्याच्या जीवनाला वरच्या पातळीवर नेण्याचा आपल्या कलेतून प्रयत्न करू या.

काही विद्वान म्हणतात, ''अस्पृश्यता कायद्याने नष्ट केली आहे. तेव्हा दलित हा प्राणी अस्तित्वात नाही'', परंतु हा केवळ भ्रम आहे. एका गावात एका सार्वजनिक आडावर पाणी भरताना उच्चवर्णीय हिंदूंची काळजे धडधडतात. महारामांगाचा पोवरा जोपर्यंत पाण्यात आहे तोपर्यंत आपला पोवरा पाण्यात सोडत नाहीत. कित्येक हॉटेलात 'खास' कप ठेवलेले आढळतात. याचे कारण युगायुगाचे समज एका क्षणात नष्ट होत नसतात. म्हणून आम्ही दलित साहित्य निर्माण केले पाहिजे. एके ठिकाणी गॉर्की म्हणतो, ''शब्द आणि कल्पनाच्या साधनावर उभारलेल्या या कलेचे खरे वैशिष्ट्य मानवी चुकांचे ज्ञान करून देणे हेच आहे असे म्हणता येत नाही. मानवाला त्याच्या बाह्य जीवनाच्या परिस्थितीतून वरच्या पातळीवर नेण्याचा प्रयत्न करणे, त्याला कमीपणा आणणाऱ्या वास्तव जगाच्या बंधनातून मुक्त करणे आणि तू गुलाम नाहीस, तू वास्तव जगाचा धनी आहेस, तू जीवनाचा स्वतंत्र निर्माता आहेस, असा साक्षात्कार मानवाला करून देणे हे वाङ्मयाचे खरे वैशिष्ट्य आहे. या अर्थाने वाङ्मय सदैव क्रांतिकारक असते.'' म्हणूनही वरील अर्थाने परिपूर्ण असे साहित्य निर्माण करू या आणि लेखण्या दलितांच्या चरणी अर्पूया एवढेच.



# अण्णा भाऊ साठे यांची वाङ्मय सूची

## अ) कथासंग्रह

| क्र. | कथासंग्रह | आवृत्ती | प्रकाशन संस्था |
|---|---|---|---|
| १. | बरबाद्या कंजारी | प्रथम आवृत्ती, ऑग.१९६० | विद्यार्थीगृह प्रकाशन, पुणे-९ |
| २. | चिरागनगरची भुतं | प्रथम आवृत्ती, ऑग.१९७८ | (१ ते ५) |
| ३. | निखारा | | |
| ४. | नवती | | |
| ५. | पिसाळलेला माणूस | | |
| ६. | आबी | दुसरी आवृत्ती, १९८६ | भगवानदास हिरजी, मुंबई-४ |
| ७. | फरारी | | (६ ते ९) |
| ८. | भानामती | | |
| ९. | लाडी | दुसरी आवृत्ती, जाने.१९८६ | |
| १०. | कृष्णाकाठच्या कथा | | मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई-४ |
| ११. | खुळंवाडी | | (१०-११) |
| १२. | गजाआड | पाचवी आवृत्ती, मार्च१९९७ | सुरेश एजन्सीज, पुणे |
| १३. | गुऱ्हाळ | | (१२-१३) |

## आ) नाटके

| क्र. | नाटक | आवृत्ती | प्रकाशन संस्था |
|---|---|---|---|
| १. | इनामदार | प्रथम आवृत्ती, मे १९५८ | चंद्रकांत शेट्ये, कोल्हापूर-२ |
| २. | पेंग्याचं लगीन | | |
| ३. | सुलतान | | |

## इ) शाहीर

| क्र. | नाव | आवृत्ती | प्रकाशन संस्था |
|---|---|---|---|
| १. | शाहीर | दुसरी आवृत्ती १९८५ | मनोविकास प्रकाशन, मुंबई |

## ई) तमाशा

| क्र. | लोकनाट्य / तमाशाचे नाव | आवृत्ती | प्रकाशन संस्था |
|---|---|---|---|
| १. | अकलेची गोष्ट | १९४५ | |
| २. | खापऱ्या चोर | दुसरी १९८३ | चंद्रकात शेट्ये, कोल्हापूर-२ |
| ३. | कलंत्री | १९४६ | |
| ४. | बिलंदर बुडवे | -- | |
| ५. | बेकायदेशीर | १९४७ | |
| ६. | शेटजीचं इलेक्शन | १९४६ | |
| ७. | पुढारी मिळाला | १९५२ | |
| ८. | मूक मिरवणूक | १९४९ | |
| ९. | माझी मुंबई | १९४८ | |
| १०. | देशभक्त घोटाळे | १९४६ | विद्यार्थीगृह प्रकाशन, पुणे-९ |
| ११. | दुष्काळात तेरावा | | |
| १२. | निवडणुकीतील घोटाळे | १९४६ | |
| १३. | लोकमंत्र्यांचा दौरा | १९५२ | |
| १४. | पेंग्याचे लगीन | | |

## उ) प्रवासवर्णन

| क्र. | नाव | आवृत्ती | प्रकाशन संस्था |
|---|---|---|---|
| १. | माझा रशियाचा प्रवास | | सुरेश एजन्सीज, पुणे |

## ऊ) कादंबऱ्या

| क्र. | कादंबऱ्या | आवृत्ती | प्रकाशन संस्था |
|---|---|---|---|
| १ | आग | | विद्यार्थीगृह प्रकाशन, पुणे-९ |
| २. | आघात | | (१ ते १३) |
| ३. | अहंकार | | --"-- |
| ४. | अग्निदिव्य | | --"-- |
| ५. | कुरूप | | --"-- |
| ६. | चित्रा | | --"-- |
| ७. | फुलपाखरू | | --"-- |
| ८. | वारणेच्या खोऱ्यात | | --"-- |
| ९. | रत्ना | चौथी आवृत्ती, मार्च १९८८ | --"-- |
| १०. | रानबोका | | --"-- |
| ११. | रूपा | दुसरी आवृत्ती, १९८१ | --"-- |
| १२. | संघर्ष | | --"-- |
| १३. | तास | | --"-- |
| १४. | गुलाम | | चंद्रकांत शेट्ये, कोल्हापूर-२ |
| १५. | डोळे मोडीत राधा चाले | | (१४ ते २३) |
| १६. | ठासलेल्या बंदुका | | |
| १७. | जिवंत काडतूस | | |
| १८. | चंदन | सातवी आवृत्ती, जाने.१९९३ | --"-- |
| १९. | मूर्ती | | --"-- |
| २०. | मंगला | | --"-- |
| २१. | मथुरा | पाचवी आवृत्ती, जाने.१९९१ | --"-- |
| २२. | मास्तर | | --"-- |
| २३. | चिखलातील कमळ | चौथी आवृत्ती, जाने. १९९१ | --"-- |
| २४. | अलगूज | | मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई-४ |

| क्र. | कादंबऱ्या | आवृत्ती | प्रकाशन संस्था |
|---|---|---|---|
| २५. | रानगंगा | तिसरी आवृत्ती, जाने. १९९७ | मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई |
| २६. | माकडीचा माळ | | (२४ ते २९) |
| २७. | कवड्याचे कणीस | तिसरी आवृत्ती, नोव्हें. १९७९ | --"-- |
| २८. | वैजयंता | | --"-- |
| २९. | धुंद रानफुलाचा | | --"-- |
| ३०. | आवडी | तिसरी आवृत्ती, १९९१ | सुरेश एजन्सीज, पुणे |
| ३१. | वारणेचा वाघ | | (३० ते ३५) |
| ३२. | फकिरा | सोळावी आवृत्ती, जाने.१९९५ | --"-- |
| ३३. | वैर | पाचवी आवृत्ती, ऑगस्ट १९९३ | --"-- |
| ३४. | पाझर | | --"-- |
| ३५. | सैरसोबत | | --"-- |

## ए) प्रसिध्द पोवाडे

| क्र. | पोवाड्याचे नाव | लेखनकाल |
|---|---|---|
| १. | नानकीन नगरापुढे | १९४२ |
| २. | स्टॅलिनग्राडचा पोवाडा | १९४२ |
| ३. | बर्लिनचा पोवाडा | १९४२ |
| ४. | बंगालची हाक | १९४४ |
| ५. | पंजाब-दिल्लीचा दंगा | १९४७ |
| ६. | तेलंगणचा संग्राम | १९४७ |
| ७. | महाराष्ट्राची परंपरा | १९४७ |
| ८. | अमळनेरचे अमर हुतात्मे | १९४९ |
| ९. | मुंबईचा कामगार | १९४९ |
| १०. | काळ्याबाजाराचा पोवाडा | १९४९ |

परिशिष्ट ७

# अण्णा भाऊ साठे यांच्या कादंबरीवर आधारित चित्रपट

| क्र. | कादंबरी | चित्रपट व निर्मिती वर्ष | संस्था | दिग्दर्शक | गीतकार | संगीतकार | पटकथा-संवाद |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १. | वैजयंता | वैजयंता[१] १९६१ | रेखा फिल्म्स | गजानन जागीरदार | ग.दि. माडगूळकर | वसंत पवार | व्यंकटेश माडगूळकर |
| २. | आवडी | टिळा लावते मी रक्ताचा १९६९ | चित्र ज्योत | वसंत पेंटर | जगदीश खेबूडकर | राम कदम | जगदीश खेबूडकर |
| ३. | माकडीचा माळ | डोंगरची मैना १९६९ | विलास चित्र | अनंत माने | जगदीश खेबूडकर | राम कदम | शंकर पाटील |
| ४. | चिखलातील कमळ | मुरली मल्हारी रायाची १९६९ | रसिक चित्र | गोविंद कुलकर्णी<br>दत्ताराम गायकवाड | जगदीश खेबूडकर | प्रभाकर जोग | दिनकर पाटील |
| ५. | वारणेचा वाघ | वारणेचा वाघ[२] १९७० | नवदीप चित्र | वसंत पेंटर | जगदीश खेबूडकर | राम कदम | जगदीश खेबूडकर |
| ६. | अलगूज | अशी ही साताऱ्याची तऱ्हा[३] १९७४ | श्रीपाद चित्र | मुरलीधर कापडी | ग.दि. माडगूळकर | विश्वनाथ मोरे | मधुकर पाठक |
| ७. | फकिरा | फकिरा | चित्रनिकेतन | कुमार चंद्रशेखर | ग.दि. माडगूळकर | राम वढावकर | के. ए. अब्बास<br>अण्णा भाऊ साठे |

१. **'वैजयंता'** या चित्रपटास १९६१-६२ या वर्षाचे 'सर्टिफिकेट ऑफ मेरिट' हे उत्कृष्ट मराठी चित्रपटाचे राष्ट्रीय पारितोषिक.
२. **'वारणेचा वाघ'** या चित्रपटास १९७०-७१ या वर्षाचे महाराष्ट्र राज्य उत्कृष्ट मराठी चित्रपट क्रमांक दोनचे पारितोषिक.
३. **'अशी ही साताऱ्याची तऱ्हा'** या चित्रपटास १९७३-७४ या वर्षाचे महाराष्ट्र राज्य उत्कृष्ट मराठी चित्रपट क्रमांक तीनचे पारितोषिक.